काही नाही तरी सुमारे दोनशे गावी स्वामी गेले होते. या गावी जाणे, तेथील स्थाने नमस्कारणे, तेथील भक्तांना भेटणे—इत्यादी कामे केवळ सहा महिन्यांत आटोपतील असे वाटत नाही. त्या वेळच्या महाराष्ट्रातील रस्ते, प्रवासाची साधने वगैरे लक्षात घेऊन कमाल मर्यादा म्हणून हा काळ मी दोन वर्षांचा मानला आहे. तसेच, लीळा गोळा करून रिद्धपूरला परत आल्यावर आचार्यांना त्या लीळा वाचून दाखवणे, त्यात दुरुस्ती करणे व मग त्याची अंतिम प्रत तयार करणे, यासाठी मात्र मीही सहा महिन्यांचा कालावधी मानला आहे, तो अभ्यासकास पटेल असे वाटते. हा सर्व कालावधी लक्षात घेऊन व जास्तीत जास्त अलीकडचा काळ घेऊनही 'लीळाचरित्रा'चे लेखन शके १२०० मध्ये पूर्ण झाले असावे. म्हणून स्थूल मानाने शके १२०० हा 'लीळाचरित्रा'चा लेखनकाल निश्चित करण्याला हरकत नाही. स. मुरलीधरशास्त्री मानतात त्याप्रमाणे तो यापूर्वीचाही असू शकेल.

## 'स्मृतिस्थळा'चा पुरावा

या कालनिर्णयाला बाधक असा एक पुरावा आहे. तो 'स्मृतिस्थळा[10]'तील आख्यायिकांचा. 'स्मृतिस्थळा'त 'अटनि गदोनायेक दर्शनाप्रकासीं म्हाइंभटीं अपरीतोषु करणें:' (१३९); 'तथा ईश्वरलीळाश्रवणें प्रसादोदकपूर्वक खेइभट भोजन स्वीकारू:' (१४०); 'म्हाइंभटां लीळाश्रवणें भटीं लीळाशोधनानुज्ञा:' (१४१); व 'तथा सारंगपंडित क्षीरभोजन परीत्यजनि अनुचितानुवादु:' (१४२) अशा लीळाशोधनाच्या चार लीळा आल्या आहेत. गोविंदप्रभूंच्या निधनानंतर नागदेवाचार्य निंबा येथे येऊन राहिले. त्या काळापासून तो त्यांच्या मृत्यूपर्यंत घडलेला वृत्तांत 'स्मृतिस्थळा'त येतो, आणि तोही सामान्यत: कालक्रमानुसार, असे माझे मत आहे. तदनुसार लीळाशोधनाच्या वरील चार लीळा ज्याअर्थी 'स्मृतिस्थळा'त आलेल्या आहेत त्याअर्थी 'लीळाचरित्रा'चे लेखन गोविंदप्रभूंच्या निधनानंतर म्हणजे शके १२०९ मध्ये नागदेवाचार्य निंब्याला आल्यानंतर केव्हातरी झाले, असे अनुमान करावे लागते. पण अंतर्गत व बाह्य प्रमाणांच्या आधारे ते त्याज्य ठरते. 'स्मृतिस्थळा'त गोविंदप्रभूनिधनोत्तर नागदेवांच्या आख्यायिका कालक्रमाने येतात असे माझे मत असले तरी ते मी वेदवाक्य मानीत नाही. अंतर्बाह्य पुराव्यावरून 'स्मृतिस्थळा'तील काही आख्यायिका त्याज्य किंवा त्यांचा कालानुक्रम चुकीचा ठरला तर तो नि:संदिग्धपणे मान्य केला पाहिजे, एरवी नाही.

'स्मृतिस्थळा'तील लीळाशोधनाच्या उपरोक्त आख्यायिका कालक्रमाच्या दृष्टीने अंतर्बाह्य पुराव्याच्या आधारे चुकीच्या ठरतात, असे मलाही वाटते. एक तर 'स्मृतिस्थळा'च्या आरंभीच १३ व १४ व्या आख्यायिकेत 'केसोबास गंगे विजन करीति: तेथ रत्नमाला स्तोत्रें करीति:' (१३); 'मग केसोबासी रत्नमाळा केलीया: तिया भटोबासापासि वाचिलीया:' (१४) असा स्पष्ट निर्देश आहे. 'रत्नमाळास्तोत्रा'चा मुख्य आधार म्हाइंभटांनी संकलित केलेले 'लीळाचरित्र' हे सर्वश्रुत आहे. तेव्हा 'रत्नमाळास्तोत्रा'च्या रचनेपूर्वी 'लीळाचरित्रा'चे संकलन व लेखन पूर्ण झाले असले पाहिजे हे स्पष्ट दिसते. 'स्मृतिस्थळा'चा खरा आरंभ केसोबासांचे अनुसरण व 'रत्नमाळास्तोत्रा'च्या रचनेच्या आख्यायिकांपासूनच होतो. याचा अर्थ असा की, भटोबास निंब्याला येण्यापूर्वी, म्हणजे शके १२०९ पूर्वी 'लीळाचरित्रा'चे संकलन व लेखन पूर्ण झाले होते. म्हणजेच हे कार्य ते रिद्धपूरला असतानाच झाले होते. याला दुसरे बलवत्तर प्रमाण असे की, केसोबासांच्या 'मूर्तिप्रकाश' ग्रंथाच्या शेवटी सर्व पोथ्यांत 'शके १२१०: विजए नाम संवत्सरे: फालगुन सूध दसमी: गुरुवारी—तद्दीनीं केसोबासातें वेव्हारासि

१० वा. ना. देशपांडे, संपादक: स्मृतिस्थळ.

धरूनि नेलें : तें मूर्तिप्रकास ग्रंथ : अवस्थाभुत गीतु : आणि रत्नमाळा हे तीन्ही ठाए ते दीसी केले[११]' अर्थात, शके १२१० पूर्वीच 'लीळाचरित्रा'चे लेखन पूर्ण झाले असले पाहिजे. याला आणखी सबळ पुरावा म्हणजे 'इतिहास' प्रकरणातील 'लीळाचरित्रा'च्या निर्मितीचा वृत्तांत. तो पूर्वीच उद्धृत केला आहे. ही सर्व प्रमाणे लक्षात घेता 'स्मृतिस्थळा'च्या १३९ ते १४२ आख्यायिकांतील लीळाशोधनाचा वृत्तांत हा 'स्मृतिस्थळा'च्या काळात म्हणजे निंबा येथे घडलेला नसून तो त्यापूर्वीच रिद्धपूरला घडला असला पाहिजे हे स्वच्छ दिसून येते. तो स्मृतिकाळात घडला असता तरी तो 'स्मृतिस्थळां'तील १२ ते १४ या आख्यायिकेपूर्वी यायला पाहिजे होता. 'स्मृतिस्थळा'च्या रचनेतील हा विपर्यास मान्य केला पाहिजे. तेव्हा 'लीळाचरित्रा'चे लेखन रिद्धपूर येथेच झाले असले पाहिजे, हे निर्विवादपणे सिद्ध होत असल्यामुळे सध्याच्या 'स्मृतिस्थळा'वरून निघणारे अनुमान त्याज्य समजले पाहिजे. 'इतिहास प्रकरणा'च्या आधारे ठरविलेला शके १२०० हा 'लीळाचरित्रा'च्या लेखनाचा काळ निश्चित करणे युक्तिसंगत होय.

## मूळ 'लीळाचरित्र' : खालशाच्या धाडीत नष्ट

पण आज उपलब्ध असलेल्या 'लीळाचरित्रा'चा पाठ हा म्हाइंभटांनी शके १२०० च्या सुमारास लिहिलेल्या 'लीळाचरित्रा'च्या पोथीवरून प्रतिलिपित होऊन आलेला पाठ होय असे मात्र म्हणता येत नाही. म्हाइंभटांनी लिहिलेल्या 'लीळाचरित्रा'च्या पोथीच्या त्या वेळी प्रतिलिपी तयार करण्यात आल्या असाव्या असे दिसत नाही. या ग्रंथाची एकच प्रत होती आणि तीच नागदेवाचार्यांजवळ होती. त्यांच्या निधनानंतर ती बाइदेवबासाकडे व नंतर कवीश्वरबास, अर्थात भास्करभट्ट बोरीकर या आचार्यांजवळ आली. भास्करभट्टांजवळ ही पोथी असतानाच 'खालस्या'ची धाड आली त्या वेळी ही पोथी नाहीशी झाली.

सिद्धांते हरिबास व धाकटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त 'आन तिन्ही रूपें चरित्रे म्हाइंभटींचि केलीं : परि ते लीळासंबंध. . . . खालसाचिया धाडीसी नाहीचि जाले :' असा स्पष्ट उल्लेख आहे. कृष्णमुनीच्या 'अन्वयस्थळा'तही 'म्हाइंभटोबासीं : लीळाबंद केला : तो धाडीमाजी गेला : सकळही :' असा निर्देश केलेला आढळतो.

'इतिहास प्रकरणा'त मात्र हा वृत्तांत पुढीलप्रमाणे विस्ताराने वर्णन केलेला आहे :

'ऐसे असतां दीलीचेनि सुलतानें चालि केली : तेणें राजीकभेणें कवीश्वर कोकणा गेले. . . कवीश्वर कोकणा जातां मार्गी चोर उठीले : तेहीं कोकणीचा घाट उतरतां समस्त गुरुकूळ नागवीलें : पोथीयांची झोळी परसरामबासापासी होती : त्यांतूनि परसरामबासीं एक पुस्तक काढीलें : तें भोइवरि तनांत गाळीलें : एर जवं गाळावी तवं तेणें चोरें परसरामबासाचीये हातीची झोळी आसडूनि नेली : त्यांत आदीसहीत पाच रूपें चरीत्रें : प्रकरणाची पोथी : स्थानाची पोथी इतुके गेले[१२] :'

## उपाध्ये हिराइसाकडून पुनर्लेखन

भास्करभट्टांच्या आचार्यकालात झालेली ही दिल्लीच्या सुलतानाची स्वारी किंवा खालस्याची धाड म्हणजे शके १२३० (इ.स. १३०८) मध्ये झालेली मलीक काफूरची स्वारी असावी. अशा रीतीने शके

---

११ वि. भि. कोलते, संपादक : मूर्तिप्रकाश, प्रस्तावना, पा. २–४.

१२ पूर्वोक्त.

१२३० मध्ये 'लीळाचरित्रा'चा मूळ पाठ नाहीसा झाला. त्यामुळे त्याच्या पुनर्लेखनाची आवश्यकता निर्माण झाली. सुदैवाने त्या वेळी 'लीळाचरित्र' अनेकांना मुखोद्गत होते. म्हाइंभटांनी लिहिलेली 'लीळाचरित्रा'ची पोथी एकच असली तरी त्या पोथीवरून अनेक जण त्या लीळा तोंडपाठ करून ठेवीत असत, आणि आपापल्या शिष्यांकडून त्यांचा 'घोक' करवून घेत असत. या घोकाच्या आधारे 'लीळाचरित्रा'च्या पुनर्लेखनाचे काम प्रथम कमळाइसाची शिष्या हिराइसा हिने केले. पूर्वोक्त सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त 'म्हाइंभटाचा लीळासंबंध गेला म्हणौनि मग कमळाइसाचां हीराइसीं तीन्ही रूपे लीळा शोधिलीया : त्यासी एकसंदी प्रज्ञा होती म्हणौनि[१३] :' असे म्हटले आहे. कृष्णमुनीच्या 'अन्वयस्थळा'तही हाच उल्लेख अधिक स्पष्ट शब्दांत केलेला आहे. कृष्णमुनी म्हणतात :

म्हाइंभटोबासीं : लीळाबंद केला : तो धाडीमाजी गेला : सकळही ।। उपाध्य कंजाख्या : तयाची नंदिनी : हीरांबा योगीनी : प्रज्ञावंत ।। एकसंदी प्रज्ञा : होती हीरांबेसी : सोधनी लीळेसी : केली तेहीं ।। लीळेचा संबंध : म्हाइंभटकृत्य : सकळही श्रुत : हीराइसा ।। सकळही श्रीमुख : होतें मुखपाठ : प्रज्ञा पै अचाट : एकसंधी ।। लीळा तीन्ही रूपें : हीरांबा शोधनी : पुस्तके लीहुनी : बंद केला[१४] ।। (१३७–१४२).

'इतिहास प्रकरणा'त[१५] या हीराइसेच्या पाठाविषयी पुढील उल्लेख आढळतो :

'कमळाइसेची सीक्षे हीराइसें : तेहीं कमळाइसापासूनि लीळा घोकीलीया : हीराइसीं आपुलेया सीक्ष्यासीं पाटकुले मालोबासासी सांघीतलीया : तेहीं लीळा लीहीलीया : त्यातेंही हीराई पाठ ऐसें म्हणति :'

यावरून 'लीळा' हिराइसेने लिहिल्या नसून तिने सांगितलेल्या लीळा पाटकुले मालोबासांनी लिहिल्या असे दिसते. या बाबतीत पूर्वोक्त दोन्ही 'अन्वयस्थळां' चा–विशेषत: सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'चा पुरावा अधिक प्रमाण मानला पाहिजे. त्यावरून कमळाइसाच्या हिराइसेनेच 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन केले, हे स्पष्ट दिसते. कदाचित, 'इतिहास प्रकरणा' तील निर्देशाप्रमाणे, हे पुनर्लेखन करताना हिराइसेने लीळा सांगावी व पाटकुले मालोबासांनी ती लिहून घ्यावी असे असावे. म्हणजे पाटकुले मालोबास हा हिराइसाचा केवळ लेखनिक असावा. तेव्हा 'लीळाचरित्रा' चे पुनर्लेखन उपाध्ये हिराइसाने केले याविषयी संशय राहू नये.

## पुनर्लेखनाचा काळ

हे पुनर्लेखन केव्हा झाले असावे ? खालस्याच्या धाडीत म्हाइंभटांचा मूळ ग्रंथ नाहीसा झाल्यावर, लवकरच देशात स्थिरस्थावर झाल्यानंतर आचार्य भास्करभट्ट बोरीकर कोकणातून परत आले. त्यानंतर त्यांच्याच प्रेरणेवरून हे पुनर्लेखन झाले असावे, असे मला वाटते. या कार्याला जास्तीत जास्त दोन वर्षे लागली असावीत असे मानले तर 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन शके १२३२ च्या सुमारास झाले असावे असे म्हणण्यास हरकत नाही[१६].

१३ हरिबास व धाकुटे सोंगोबास, अन्वयस्थळ.

१४ ह. ना. नेने, संशोधन लेखसंग्रह, पा. १४६–१६७.

१५ पूर्वोक्त.

१६ म्हाइंभटांचा लीळासंबंध खालशाच्या धाडीत नाहीसा होण्यासंबंधी हरिबास व धाकुटे सांगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त पुढील उल्लेख आढळतो : "तिन्ही रूपें चरित्रें म्हाइंभटींचि केली : परी तें

## पुनर्लेखनाची यथार्थता

मुखपरंपरेने पुर्नलिखित 'लीळाचरित्र' हे म्हाइंभटांच्या मूळ ग्रंथाचे यथातथ्य पुनर्लेखन असावे की नाही, असा प्रश्न निर्माण होणे शक्य आहे. मला असे वाटते की, हिराइसाने केलेले पुनर्लेखन यथातथ्य असावे. वेदादि संस्कृत ग्रंथ शेकडो वर्षांच्या मुखपरंपरेने आलेले आहेत, हे या ठिकाणी लक्षात घेतले पाहिजे. 'लीळाचरित्रा'च्या मुखपरंपरेत असे शेकडो वर्षांचे अंतर पडलेलेही नाही. 'खालस्या'च्या धाडीपर्यंत हा ग्रंथ मूळ स्वरूपात उपलब्ध होता. त्यावरूनच सर्व अनुयायी तो मुखोद्गत करीत असत. हिराइसाची गुरू कमळाइसा ही नागदेवाचार्यांची शिष्या व भास्करभट्टाची गुरुभगिनी. मूळ ग्रंथ नाहीसा होण्यापूर्वीच तिला त्याचा 'घोक' होता. अर्थात, तिच्या मुखपाठात तो यथातथ्य स्वरूपात होता. याच काळात कमळाइसापासून हिराइसेला त्याचा घोक होता, तेव्हा तोही यथातथ्य असला पाहिजे. विशेषतः हिराइसाची 'एकसंदी प्रज्ञा' लक्षात घेतली तर तिच्या यथातथ्य घोकाविषयी शंका राहाण्याचे कारण नाही. हिराइसाच्या या 'एकसंदी प्रज्ञे'ची, म्हणजे एखादा ग्रंथ केवळ एकवेळ ऐकून जसाचा तसा लक्षात ठेवण्याच्या व पुन्हा म्हणून दाखविण्याच्या बुद्धिकौशल्याची एक आख्यायिका उपाध्ये आम्नायाच्या 'वृद्धान्वया'त आढळते, ती अशी :

"कवीश्वरीं ग्रंथ केला होता : तो कमळाइसापासी सत एक वाचीला : तवं तेहीं म्हणीतलें : 'तुम्हीं काइसेया कष्टलेती ? हा ग्रंथ जुनाचि असे : जर लटकें म्हणाल तरि माझिय हिरांबासि घोकु असे :' हिराइसासी एकसंधी प्रज्ञा होती : पोमाइसासि दोसंदी होती : धानाइसासि तींसंदी होती : तो हिराइसीं ग्रंथ म्हणीतला : तैसाचि तेहीं दोघीं म्हणतिला : झालेनि ते उगेचि राहिले : मग कमळाइसीं कवीश्वरबासातें म्हणितलें : 'बा : ग्रंथ बरवा अपुर्व असे केला :' म्हणोनि मागील वृत्तांत सांघीतला[१७] :"

## पुनर्लेखनाचे स्वरूप : खंडित 'लीळाचरित्र'

**यावरून हीराइसाकडून झालेल्या 'लीळाचरित्रा'च्या पुनर्लेखनाच्या यथातथ्यतेविषयी शंका राहू नये.**

---

लीळासंबंध : आन थोरलें अुंबरवटाचें पात्र : आन थोरला दाढेचा विशेष : आन चौथा भाग वस्त्रेप्रसाद : ऐसे वाचासुंदर बोल्हाइसा सहित खालसाचीया धाडीसी नाहींचि जाले :" यावरून म्हाइंभटांचा लीळासंबंध बोल्हाइसाकडून नाहीसा झाला (परशरामबासांकडून नव्हे) अशी कल्पना होण्याचा संभव आहे. 'अन्वयस्थळा'तील हाच वृत्तांत कृष्णमुनीच्या 'अन्वयस्थळा'त पुढीलप्रमाणे आलेला आहे : "म्हाइंभटकृत्य : लीळाबंध केला : तो अवचीता गेला : धाडीमाजी ।। अुंबरवटाचें : पात्र पैं थोरलें : धाडीमाजी गेलें : तेंहीं देखा ।। थोरला जो होता : दाढेचा विशेक : प्रसाद आणीक : चौथा भाग ।। इत्यादीक होते : बोल्हाइसापासी : वेवस्था तयासी : ऐसी झाली ।।" यावरून 'लीळाचरित्रा'ची पोथी बोल्हाइसाजवळून गेली असे मुळीच दिसून येत नाही. याचा अर्थ इतकाच की, बोल्हाइसाजवळ जे प्रसाद आणि विशेष होते त्यांपैकी अुंबरवटाचे पात्र त्या धाडीत गेले. बाकीच्या प्रसादविशेषांची वाटणी कशी करण्यात आली याचे वर्णन पुढे केलेले आहे. सारांश, खालशाच्या धाडीत परशरामाच्या हातून आसडून नेलेल्या पोथीत 'लीळाचरित्रा'ची पोथी गेली, या 'इतिहास प्रकरणा'तील माहितीला 'अन्वयस्थळा'तील माहितीचा विरोध येत नाही, हे स्पष्ट दिसून येईल. काही महंत असे मानतात की 'लीळाचरित्रा'ची पोथी प्रथम परशरामबासांकडून गेली व नंतर दुसऱ्यांदा ती बोल्हाइसाकडून गेली. या त्यांच्या समजुतीला पोषक असा आधार मला मिळाला नाही.

१७ वि. भि. कोलते, संपादक : सह्याद्रिवर्णन, प्रस्तावना, पा. ७९.

पण हिराइसाने 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन केले म्हणजे काय केले ? म्हाइंभटांची संहिता तिने शब्दशः सांगून लिहून काढली काय ? तसे तिने केले असल्याचे मात्र आढळत नाही. कारण, तसे करण्याची त्या वेळच्या आचार्यादी प्रज्ञावंत महंतांना व म्हणून हीराइसालाही आवश्यकता वाटली नाही. कोणत्या का रीतीने होईना, म्हाइंभटांनी तयार केलेले संपूर्ण 'लीळाचरित्र' पूर्ण स्वरूपात पुन्हा उपलब्ध होणे एवढीच त्या वेळी आवश्यकता होती. म्हाइंभटांनी तयार केलेल्या 'लीळाचरित्रा'ची एकमेव पोथी नाहीशी झाली होती हे खरे, पण त्यातील काही भाग निरनिराळ्या रूपांनी अजून विद्यमान होता. 'लीळाचरित्रा'तून सर्वज्ञांची वचने निवडून व त्यांचा आचारविचारांच्या अनुषंगाने अन्वय लावून केसोबासांनी नागदेवाचार्यांच्या विद्यमानीच सूत्रपाठ तयार केला होता. त्याचप्रमाणे 'लीळाचरित्रा'त आलेल्या, सर्वज्ञांनी वेळोवेळी सांगितलेल्या दृष्टांतातून ११४ दृष्टांत निवडून व उद्धरणक्रमाने त्यांचा अन्वय लावून 'दृष्टांतपाठ'ही स्वतंत्रपणे तयार केला होता. ही वचने व दृष्टांत 'लीळाचरित्रा'तून वेगळी काढताना त्यांच्या 'प्रकरणवशा'सहित, म्हणजे सर्वज्ञांनी ती वचने व दृष्टांत ज्या प्रसंगी सांगितले त्या प्रसंगांच्या लीळांसहित वेगळी काढली असावीत असे दिसते. कारण, या वचनांच्या प्रकरणवशाची स्वतंत्र पोथी त्याचवेळी परशरामबासांकडून स्वतंत्रपणे तयार झाली असावी असे म्हणण्यास जागा आहे. 'लीळाचरित्रा'तील वचने, वचनाचे प्रकरणवश आणि अन्वयी लावलेले दृष्टांत स्वतंत्रपणे उपलब्ध असल्यामुळे 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन करताना ती वगळली तरी हरकत नव्हती. म्हणून हा भाग वगळून 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन झाले असावे. 'चरित्रा'च्या किंवा 'लीळे'च्या निवेदनात पूर्वापर संदर्भाला आवश्यक व अपरिहार्य असतील तेवढीच वचने व दृष्टांत ठेवून आणि बाकीची सर्व वगळून (कारण ती अन्यत्र उपलब्ध होती) हीराइसाने चरित्रांचे पुनर्लेखन केले असावे असे स्पष्ट दिसते. आज उपलब्ध असलेल्या कोणत्याही पाठात सर्व वचने व दृष्टांत आढळत नाहीत. त्याचे कारण हे होय. हा अपवाद वगळता हिराइसाकडून, म्हाइंभटांच्या चरित्रांचे पुनर्लेखन यथातथ्य स्वरूपात झाले असावे, असे म्हणण्यास हरकत नाही.

## हिराइसापाठ : पिढीपाठ

हिराइसाने पुनर्लेखन केलेला म्हाइंभटांच्या 'लीळाचरित्रा'चा पाठ हाच आज उपलब्ध असलेल्या 'लीळाचरित्रा'च्या बहुतेक पाठांचा आधारभूत पाठ होय. असे असले तरी हिराइसाच्या काळातच म्हाइंभटांचा मूळ ग्रंथ इतर अनेकांना मुखोद्‌गत होता. त्यांनी स्वतः किंवा त्यांच्या शिष्यांनीही आगेमागे त्याचे पुनर्लेखन केलेले आढळून येते. त्यामुळे बरीच मतांतरे किंवा वासना निर्माण झाल्या. 'तिसरा मन्वंतरीं परसरामबासीं समस्त वासना एकवट करुनि एक पाठ केला : तेथ परसरामबा वासना प्रधान : तयासि पीढीपाठ म्हणती :' असा उल्लेख थोरल्या पाठाच्या 'अन्वयस्थळा'त आढळतो. पण हरिबास आणि धाकुटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त मात्र 'कमळाइसाचां हीराइसीं तीन्ही रूपें लीळा शोधिलीया : त्यासि एकसंदी प्रज्ञा होती म्हणौनि : मग त्याचि लीळा अधारें तिन्ही रूपें चरित्रें आदि परसरामबासीं केलीया :' एवढाच उल्लेख आहे. कृष्णमुनीच्या 'अन्वयस्थळा'तही 'लीळा तीन्ही रूपें : हीरांबा शोधनी : पुस्तके लीहुनी : बंद केला ।। तीया लीळाधारें : आदी तीन्ही रूपें : केल्या ज्ञानदीपें : प्रशरामें:' (१४२, १४३) असेच म्हटले आहे. 'तिन्ही रूपें चरित्रें आदि' किंवा 'आदी तीन्ही रूपें' याचा अर्थ तिन्ही रूपे चरित्रांच्या (लीळांच्या) आदी, अर्थात मथळे तेवढेच परशरामबासांनी तयार केले, असाच वाटतो. त्यांनी स्वतः एखादा स्वतंत्र पाठ तयार केला असावा असे वाटत नाही.

## पिढीपाठ संशोधनाचा इतिहास

'पिढीपाठा'च्या संशोधनाचा जो इतिहास याच 'अन्वयस्थळ'कारांनी दिलेला आहे त्यात हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या मतें '... आनिक दुसरा पीढीपाठ चरित्राचा सकळ पाठ शोधुनी अचळा सीवबासीं केला : आन शोधुनि मांडिला :' त्याचप्रमाणे कृष्णमुनीच्या मते 'आणीक थोरली प्रसादसेवना : पीढीपाठ जाणा : चरीत्राचा ।। सकळही पाठ : शोधुनी शिवबासीं : आन्वयो लीळेसी लावियेला ।। पीढीपाठ ऐसे : नाव ठेवुनीया : शोध शोधनीया : मांडियेला ।। इत्यादिक ऐसी : शीवाची शोधनी...' (२०९-२१२). याचा अर्थ असा की, 'पिढीपाठ' हे नाव प्रथम अचळ सिवबास म्हणजेच गुजर सिवबासांनी आपण शोधून तयार केलेल्या पाठाला ठेवले. हरिबास व धाकुटे सोंगोबास यांनी 'हिराइसाची शोधनी मुळ : मग शिवबासाचा पिढीपाठ'; आणि कृष्णमुनीने 'प्रथम शोधनी : केली हीराइसीं : अन्वयो लीळेसी : लावीयेला ।। दुसरी शोधनी : पीढीपाठ केला : आन्वये लावीला : सीउबासीं ।।' असे म्हटले आहे, त्यावरूनही हेच दिसून येते. सिउबासामागा मुरारीमल्लबासांनी केलेल्या शोधनीला पिढीपाठाची दुसरी शोधनी म्हटले आहे त्यावरूनही याच मताचा पाठपुरावा होतो. पण थोरल्या पाठाच्या 'अन्वयस्थळा'त तर परशरामबासांच्या शोधनीलाही 'पिढीपाठ'च म्हटले आहे. राघव कवीच्या 'चरित्र अबाब' या काव्यात पाठसंशोधनाचा इतिहास नमूद करताना म्हटले आहे की :

'प्रथम आरंभीं : लीळांचें शोधन : केलें पूर्वजानें : माहीभटीं : ।।
दुसरी शोधनी : परशुरामबासांनी : लीळांची करूनि : बंद केला ।।
मग तीसऱ्यानें : सीवाची शोधनी : मुरारीमल्लानीं : चवथेन ।।'

शिवबासांच्या पूर्वोत्तर पाठसंशोधनाचा हा इतिहास आहे, त्याअर्थी तो पिढीपाठाच्या संशोधनाचा इतिहास आहे, हे स्पष्ट दिसते. यात पहिले शोधन म्हाइंभटांनी केले हे जितके खरे आहे, तितकेच त्यांचा मूळ ग्रंथ हरवल्यावर त्याचे पहिले शोधन व पुनर्लेखन हिराइसाने केले हेही खरे आहे. दुसरे शोधन हे परशरामबासांचे असे अबाबकारही सांगतात. या सर्व मतांचा समन्वय करून असे म्हणता येईल की, 'पिढीपाठ' ही संज्ञा गुजर सिवबासांनी प्रचलित केली हे खरे आहे. पण त्यांनी आपल्या शोधनीला मुख्य आधार म्हणून घेतला तो 'आद्य' वगैरेसहित परशरामबासांनी तयार केलेल्या पाठाचा आणि परशरामबासांनी जो पाठ तयार केला तो हिराइसाचा पाठ प्रमाण म्हणून घेऊन, हे आपण पाहिलेच आहे. याचमुळे हिराइसाच्या पाठाला व परशरामबासांच्या पाठालाही 'पिढीपाठ' म्हणून म्हणत असावे.

त्याच्याच आधारे तिसरे संशोधन गुजर सिवबासांनी व चौथे संशोधन मुरारीमल्लबासांनी केले. या चौघांच्याही पाठांना 'पिढीपाठ' ही एकच संज्ञा लावायला हरकत नाही. त्या सर्वांचा प्रमाणभूत आधारपाठ उपाध्ये कमळाइसाची शिष्या हिराइसा पाठ असून इतर तीन पाठ म्हणजे हिराइसा पाठात इतरांच्या वासना व शोध स्वतंत्रपणे नमूद करून तयार झालेले पाठ होत. त्याचे शेवटचे शोधन मुरारीमल्लबासांच्या 'पिढीपाठा'त आढळते.

## पंडितांची ब्राह्मणी : हिराइसा : हिचा पाठ

या चार पाठांबरोबरच दामोदर पंडिताची ब्राम्हणी व नागदेवाचार्यांची शिष्या हिराइसा हिच्या पाठाचाही अंतर्भाव केला पाहिजे. संपादनासाठी मला उपलब्ध झालेल्या पोथ्यांत उपाध्ये हिराइसा व

ही नागदेवाचार्य शिष्या या दोहोंचेही पाठ आहेत. त्यांची तुलना करून पाहिल्यावर एक दोन लीळांखेरीज-करून मला त्यात फारसा फरक आढळला नाही. बहुतेक लीळा अक्षरशः सारख्या आहेत. त्यावरून हे दोन पाठ भिन्न म्हणून नमूद केलेले असले तरी वस्तुतः तो एकच पाठ असावा असे मला वाटते. त्यामुळे नागदेवाचार्य शिष्या हिराइसाचा पाठही तत्त्वतः पिढीपाठ म्हणून संबोधायला हरकत नाही.

## पारिमांडल्य नागनाथ पाठ

या 'पिढीपाठा'व्यतिरिक्त महानुभाव पंथात मान्य असलेला आणखी एक पाठ म्हणजे नागनाथ पाठ होय. 'पारमांडल्ये आनोबासाचां सीक्षीं नागोबासीं तीसरा नागनाथ पाठ चरित्राचा बोलिला:' असा 'अन्वयस्थळा'त त्याचा उल्लेख आहे. पंथातील प्रमाण पाठाविषयी लिहिताना 'अन्वयस्थळ'कार हरिबास व धाकुटे सोंगोबास म्हणतात: 'ऐसे हे शास्त्रे सकळ मार्गा प्रमाणयुक्त आन्वइक जाणावे: यावेगळे आर्थ: आर्थांतर: प्रमए: चरीत्रादीक तेतुलेहि क्षेपकचि जाणावे: हिराइसाची शोधनी मुळ: मग शिवबासाचा पीढीपाठ: आन पारमांडल्ये आम्नाइं आनोबासाचिया नागनाथाचा पाठ: ऐसिया तीन: तिही रूपाचिया चरित्र सोधनीया सर्वासि प्रमाण: एर काहीचि प्रमाण नोहे: क्षेपक जाणावे:' कृष्णमुनीच्या 'अन्वयस्थळा'त देखील याला दुजोरा मिळतो.

## तळेगावकर व वाइंदेशकर पाठ

या प्रमाण पाठाव्यतिरिक्त 'लीळाचरित्रा'चे आणखी अनेक पाठ तयार झाले आहेत. त्यांची माहिती 'इतिहास प्रकरणा'त आढळते[१८]. पण, 'इतिहास प्रकरणा'तही ज्यांचा निर्देश नाही असे आणखी दोन पाठ आढळतात. एक तळेगावकर पाठ व दुसरा वाइंदेशकर पाठ. तळेगावकर पाठाच्या पूर्वार्ध व उत्तरार्ध या दोन्ही भागांच्या, विशेषतः पूर्वार्धाच्या पुष्कळ पोथ्या मला पाहाण्यास मिळाल्या.

---

१८ पूर्वोक्त.

"थोरलें पुस्तक गेलेंयानंतरें गुरुकुळांत आदीसहीत लीळाचे तेरा पाठ जाले: अनोबाची सीक्ष्यें हीरांबीका: तेही अनोबासापासूनि लीळा घोकीलीया होतीया: मग हीराइसापासूनि त्याचां सीक्ष्यीं हरीबासी घोकीलीया होतीया: मग हरीबासी जया जया भीक्षुकासि लीळाचा घोक होता: तया तया मानलेया तिया लीळा पूसीलीया: त्या त्या वासना आन: हीराइसापासूनि घोकीला जो घोक: ऐसेयाचें अन्वयी लावूनि पुस्तक केलें: तो **हीरांबा पाठ:** ।। १ ।। अनोबासाचे सीक्ष्य नागनाथबास: तेही अनोबासापासूनि लीळा घोकीलीया होतीया: तेही आपूलेया सीक्ष्यासि कवि मालोबासासि घोकवीलीया: मग मालोबासी आणीका मानलेया आचार्यांचीं वासनांतरें मेळवूनि अपुलेया घोकेंसी अन्वयी पाहूनि पुस्तक केलें: तो **नागनाथ पाठ:** ।। २ ।। अनोबासाचे सीक्ष्य हीरण्यगर्भ: तेही अनोबासापासूनि लीळा घोकीलीया होतीया: तेही आपूलेया सीक्ष्यासी चक्रपाणीभटासि घोकवीलीया: चक्रपाणीभटाचे सीक्ष्य: एकदेव पंडीत: तयासी तेही लीळा घोकवीलीया: मग एकदेव पंडीतीं आणीका मानलेया आचार्यांची वासनांतरें मेळवूनि आपूलेंया घोकेंसी अन्वयी पाहूनि पूस्तक केलें: तो **चक्रपाणी पाठ:** ।। ३ ।। कवीश्वरांचे सीक्ष्य रामेश्वरबास: तेही कवीश्वरापासूनि लीळा घोकीलीया: आन अनोबासापासूनि लीळा घोकीलीया होतीया: तेही आपूलेया सीक्ष्यासि गोपाळबासासि घोकवीलीया: आन: गोपाळबासी आणीका मानलेया आचार्यांची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयी पाहूनि पुस्तक केलें: तो **रामेश्वरबा पाठ:** ।। ४ ।। कवीश्वराचे सीक्ष्य परसरामबास: तेही कवीश्वरापासूनि लीळा घोकीलीया:

**वाइंदेशकर पाठाच्या पोथ्या मात्र मला पाहायला मिळू शकल्या नाहीत. कै. महंत श्रीबाळकृष्णशास्त्री, माहूर, यांच्याजवळ या पाठाच्या पूर्वार्ध चरित्राच्या दोन पोथ्या होत्या. तो त्यांनी बाळबोध मराठीत लिप्यंतरित करूनही ठेवला होता. त्यांच्या आकस्मिक निधनानंतर त्यांचे काय झाले ते शोधूनही कळले नाही. धुळे येथील श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात कै. वि. ग. जावडेकर यांनी लिप्यंतरित करून ठेवलेली 'लीलासंवाद' या नावाची पोथीही वाइंदेशकरांच्या पूर्वार्ध पाठाची आहे. या पाठाचा उत्तरार्ध मी पुष्कळ शोधला. पण तो कोठेच मला मिळाला नाही. या पाठाची अपूर्ण-एकांक चरित्राची पोथी मला म. श्रीमुरलीधरशास्त्री यांच्याकडून मिळाली. वाइंदेशकर पाठाची ही पोथी सुंदरी लिपीत आहे. वाइंदेशकर पाठाच्या सर्वच पोथ्या सुंदरी लिपीत असतात.**

---

तेही आपूलेया सीक्ष्यांसि पेटे हरीबासासि घोकवीलीया : मग पेटे हरिबासी आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपुलेया घोकेंसी अन्वयी पाहूनि पुस्तक केलें : तो **परसराम पाठ :** ।। ५ ।। कवीश्वरबासाची धाडी नागाइसें : प्रज्ञावंते सीक्ष्येही होति : तेही कवीश्वरापासूनि लीळा घोकीलीया : तेही आपूलेया सीक्ष्यासी : मुनी राघोबासासि घोकवीलीया : मूनी राघोबासी आपूलेया सीक्ष्या मेयांबासासि घोकवीलीया : मेयांबासी आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें, मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयी पाहूनि पूस्तक केलें : तो **मूनीबा पाठ :** ।। ६ ।। मूनी राघोबासाचे सीक्ष्य नवगीन्हे रामदेव मूनी : तेही पूस्तक लीहीलें तोही भीन्न पाठ : । : तीये पाठी क्षेपक नीरूपणें पडीली असे : तो **मूनीबा पाठ :** तोचि **बाइंबां पाठ :** ।। ७ ।। मदळसाबाइसें तीये भटाची सीक्ष्यें : तेही भटापासूनि लीळा घोकीलीया होतीया : तेही आपूलेया सीक्ष्यासि वामदेव पंडीतासि घोकवीलीया होतीया : वामदेव पंडीती आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयी पाहूनि पूस्तक केलें : तो **मदळसा पाठ :** ।। ८ ।। भटांचे सीक्ष्य जायेदेव पंडीत : तेही भटापासूनि लीळा घोकीलीया : तेही आपूलेया सीक्ष्या नृसींहदेव पंडितासि घोकवीलीया : नृसींहदेव पंडीती आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलीया घोकेंसी अन्वयो पाहूनि पूस्तक केलें : तो **जायेदेव पाठ :** ।। ९ ।। जाखदेव पंडीत ते भटाचे सीक्ष्ये : तेही भटांपासूनि लीळा घोकीलीया : तेही आपूलेया सीक्ष्या नरहरीबासासि घोकवीलीया : नरहरीबासी आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसि अन्वयो पाहूनि पूस्तक केलें : तो **जाखोबा पाठ :** ।। १० ।। एल्हंभट ते भटांचे सीक्ष्य : तेही भटापासूनि लीळा घोकीलीया : तेही आपूलेया सीक्ष्यासी वैजदेव मूनीसी घोकवीलीया : वैजदेव मूनीबासी आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयो पाहूनि पूस्तक केलें : तो **एल्होबा पाठ :** ।। ११ ।। पंडीताची ब्राम्हणी हीराइसे : तेही भटापासूनि लीळा घोकीलीया : तेही आपूलेया पुत्रासी महेश्वर पंडीतासि घोकवीलीया : महेश्वर पंडीत ते बाइदेवबासाचे सीक्ष्य : महेश्वर पंडीती आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयो पाहूनि पुस्तक केलें : तो **हिराइ पाठ :** ।। १२ ।। कूमरें रेबाइसें तीये भटांची सीक्ष्ये : तेही भटांपासूनि लीळा घोकीलीया : त्याची महादाइसें : त्याचे मूनी कमळोबास : रेवाइसी मुनी कमळोबासासि घोकवीलीया : मुनी कमळोबासी आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयो पाहूनि पुस्तक केलें : तो **कुमार पाठ :** ।। १३ ।। भटांचे सीक्ष्ये उपाध्ये : त्याचे सीक्ष्ये कमळाइसे : तेही भटापासूनि लीळा घोकीलीया : पंडीत केशोबासांपासूनि नाती नागाइसापासूनि लीळा घोकीलीया : कमळाइसी आपूलेया सीक्ष्यासि अनंतदेव पंडीतासी घोकवीलीया : अनंतदेव पंडीती आणीका मानलेया आचार्याची वासनांतरें मेळवूनि आपूलेया घोकेंसी अन्वयो पाहूनि पूस्तक केलें : तो **अम्नाय पाठ :** ।। १४ ।। कमळाइसाची सीक्ष्ये हीराइसें : तेही कमळाइसापासूनि लीळा घोकीलीया : हीराइसी आपूलेया सीक्ष्यासी पाटकूळे मालोबासासी सांघीतलीया : तेही लीळा

तळेगावकर पाठाच्या निर्मितीविषयी पारिमांडल्य आम्नायाच्या 'अन्वयस्थळा'त पुढील उल्लेख आढळतो: नागदेवाचार्यांचे शिष्य आनोबास. 'आनोबासाची बाणाइसें: त्याचे हरीबास:...तया हरिबासाचे तळेगावकर दत्तोबास: तेही हीरंबा पाठ प्रधान करुनि परशरामबास: रामेश्वरबास: आणीकही आचार्ये: तयांची वासनांतरे एकवटुनि पुर्वार्ध चरित्रें: उत्तरार्ध चरित्रें: द्वापर चरित्रें: ऋद्धपुर चरित्रें अन्वयीं लाविलीं: सकळ चरित्राचीया आदि टाचलीया:' तळेगावकर पाठ तो हाच. त्याला आधारभूत असलेला प्रमाण पाठ हा 'हीरंबा' पाठ होय. हिला हिराइसाही म्हणत असावे. उपाध्ये हिराइसा व नागदेवाचार्य शिष्या, दामोदर पंडिताची ब्राम्हणी = पत्नी हिराइसा त्याहून ही वेगळी होय. ही हीरंबा आनोबासांची शिष्या होती. तिने तयार केलेल्या 'लीळाचरित्रा'च्या हीरंबा पाठाचा उल्लेख 'इतिहास प्रकरणा'तील पाठविवरणात अगदी प्रारंभीच आहे. या पाठाचा एक विशेष पारमांडल्य आम्नायाच्या 'वृद्धाचारा'त आलेला आहे. तो असा: 'वीनाएकबासीं केसोबासाचीया रत्नमालामाजि आधिक नीरूपण होते: तया नीरूपणाचे श्लोक हीरांबा पाठांमाजि ठाइं ठाइं लीहीले असत: जगदात्मा: सर्वकर्ता: जगदेश्वर: एवमादिक गोसावीयांची नावें अर्थवसें लीहीली असत: तेणे तो पाठ भीन्न जाला असे: ऐसे बागुड चाह्याबासाचे कृष्णोबास सांघति:' या हीरंबा पाठाच्या आधारे दत्तोबास तळेगावकर यांनी केलेल्या---तळेगावकर पाठाच्या या इतिहासावरून त्याच्या लेखन-कालाची कल्पना करता येते. नागदेवाचार्य>आनोबास>बाणाइसा>हरिबास>दत्तोबास तळेगावकर अशी ही गुरुपरंपरा आहे. नागदेवाचार्यांच्या मृत्यूनंतर (शके १२३०) प्रत्येक पिढीची स्थूल मानाने २० वर्षे मानली तर शके १३१० म्हणजे = इ.स. १३७८ च्या सुमारास हा पाठ तयार झाला असावा असे म्हणता येईल. वाइंदेशकर पाठाच्या निर्मिती व लेखनकालाविषयी अशी कोणतीच माहिती आज तरी देता येत नाही.

तळेगावकर पाठाची काही वैशिष्टये वर निर्देशिली आहेत. लीळांच्या मजकुरात व आकारात पिढीपाठ व तळेगावकर पाठ यात फारसा फरक नाही. वाइंदेशकर पाठात मात्र बराच फरक आढळतो. 'लीळाचरित्रा'च्या सर्व पाठांत हा अत्यंत विस्तृत पाठ आहे. बव्हंशी पिढीपाठातीलच माहिती पण ती फुगवून सांगितलेली आहे. दुसरे असे की, चक्रधरस्वामींच्या आयुष्यातील निरनिराळया काळासंबंधीचे शकसंवत्सरांचे उल्लेख, जे पिढीपाठाच्या मूळ लीळांमध्ये कोणत्याही स्वरूपात मुळीच आढळत नाहीत ते तळेगावकर पाठात व वाइंदेशकर पाठातही आढळतात. यावरूनही पिढीपाठाच्या तुलनेने हे दोन्ही पाठ निराळे वाटतात. कित्येक ठिकाणी माहितीतही अंतर आढळते. उदा: चक्रधरांच्या पुरस्वीकारा-संबंधी या दोन्ही पाठांची मते पिढीपाठाहून निराळी आहेत. प्रत्यक्ष द्वारावतीकार चांगदेवराउळांनी भरवसच्या प्रधानपुत्राचे पुर (=शरीर) स्वीकारले हे या दोन्ही पाठांना मान्य नाही. हिमालयात पूर्वी

---

लीहीलीया: त्यातेंही **हीराई पाठ** ऐसें म्हणति:।। १५।। ऐसें थोरलें पूस्तक गेलेयानंतरें मूखीचेनि घोकें लीळेंसी तेरा अन्वयो जाले: तेरा अन्वयोकारावेगळे आनीक लीळेचे पाठ:।: तेचि आइदेवबा:।: धाकूटे भाइदेवबा:।: काइदाये:।: बाल्हदाये:।: लिंगदेवबा:।: गोपाळबा:।: मेयांबा:।: रायदेव मूनी:।: मुरारीबा:।: धाकूटे लक्ष्मीधरबा:।: पेटे हरीबास:।: दायंबास:।: रूपदेव-बास:।: मेइदेवबा:।: बोचरी धानाइसें:।: धायाळें लुखाइसें:।: कानडी लूखाइसें:।: नामाइसें:।: लाखाइसें:।: नागाइसें:।: लुखाइसें:।: ळळीताइसें:।: धानाइसें: आन: शोधकार ओंकारबास: आन: भटांमागें भटाचया सीक्ष्याची नावें नाही आली: त्याची वासनांतरें: जया जया गुरूकूळासि आली: तयाची ओळखी: एक म्हणिजे: एकी वासना ऐसी जाणिजे:"

विद्यमान असलेल्या ईश्वरावताराने त्यागल्यामुळे तेथील विवरात पडून असलेले पुर, कामाख्येच्या निमित्ताने पुरत्याग केलेल्या ईश्वरावताराने स्वीकारले असे ते मानतात. त्यातही थोडा फरक आहे. या प्रश्नाची चर्चा मी माझ्या 'श्रीचक्रधरचरित्रा'त केलेली आहे. इतर पाठांपेक्षा वाइंदेशकर पाठात आढळणारी दुसरी अधिक माहिती अशी की, अळजपूर येथील रामदरण्याची गौरांबा नावाची मुलगी व तिच्याशी चक्रधरांनी केलेला दुसरा विवाह, ही एक नवीनच लीळा वाइंदेशकर पाठात आढळते. हे दोन्ही पाठ हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या मताप्रमाणे 'अप्रमाण' ठरत असल्यामुळे संपादनासाठी मी त्यांचा उपयोग केला नाही.

# ३

## गद्य पद्य ग्रंथांचे संपादन

'लीळाचरित्रा'च्या निर्मितीचा; पुनर्लेखनाचा व त्यामुळे निर्माण झालेल्या अनेक पाठांचा हा इतिहास लक्षात घेतला म्हणजे या ग्रंथाच्या संपादनाचे कार्य कसे व किती कठीण आहे याची कल्पना येईल. 'लीळाचरित्र' हा गद्यग्रंथ आहे. पद्यग्रंथापेक्षा गद्यग्रंथाच्या संपादनाचे काम अधिक गुंतागुंतीचे होते. पद्याची रचना बंदिस्त असते. ओवीबद्ध ग्रंथ असला तरी त्यातील प्रत्येक ओवीला चरणांचे, चरणांच्या शेवटी येणाऱ्या यमकांचे बंधन असते. त्यामुळे त्यात फारसा फरक होऊ शकत नाही. नकलनवीसाकडून होणारे अक्षरभ्रंश, पदभ्रंश, मात्राभ्रंश, बिंदुभ्रंश इत्यादीशिवाय क्वचित त्याने घातलेला एखादादुसरा अधिक शब्द, किंवा स्वतः तयार करून प्रक्षिप्त केलेल्या ओव्या, यांचीच चिकित्सा पद्यग्रंथाच्या संपादनात करावी लागते. गद्य हे पद्याप्रमाणे बंदिस्त नसते. त्याची रचना सैल असते. त्यामुळे त्यात शब्दांचे प्रक्षेप विशेष संभवतात. तशात, तो निवेदनपर कथाग्रंथ असला तर विचारायलाच नको. नकलनवीस स्वतःची बुद्धी चालवून त्या निवेदनात भर घालण्याचा आणि कथेला निराळे स्वरूप देण्याचा संभव अधिक असतो. याशिवाय अक्षरभ्रंशादिकासारखे त्याजकडून होणारे दोष निराळेच. यामुळेच पद्यग्रंथापेक्षा गद्यग्रंथाच्या संपादनाचे काम अधिक कठीण होते.

## 'ज्ञानेश्वरी' व 'लीळाचरित्र' : संपादनाचे तुलनात्मक निरीक्षण

'ज्ञानेश्वरी' आणि 'लीळाचरित्र' यांच्या संपादनकार्याचे तुलनात्मक निरीक्षण करून हा मुद्दा अधिक तपासून पाहू या. वस्तुतः 'ज्ञानेश्वरीची'ही मूळ संहिता नष्ट झालेली आहे. ज्ञानेश्वरांनी ज्या वेळी जिवंत समाधी घेतली त्या वेळी आपल्यासमोर 'ज्ञानेश्वरी'ची प्रत ठेवली होती[१९]. ती त्यांची मूळ प्रमाण प्रत असावी अशी कल्पना करणे चुकीचे होणार नाही. 'लीळाचरित्रा'चीही म्हाइंभटलिखित मूळ प्रत खालश्याच्या धाडीत नष्ट झाली. ज्ञानेश्वराबरोबर त्यांच्या 'ज्ञानेश्वरीची' मूळ प्रत नष्ट झाल्यावर काय झाले ? त्यांच्या शिष्यांनी त्यांना मुखोद्गत असलेली 'ज्ञानेश्वरी' पुन्हा लिहून काढली असा उल्लेख कुठेच नाही. यावरून असे अनुमान करण्याला हरकत नाही की, ज्ञानेश्वरांच्या विद्यमानीच त्यांच्या शिष्यांनी, सच्चिदानंदबाबांनी लिहिलेल्या 'ज्ञानेश्वरी'च्या मूळ प्रतीवरून एक किंवा अनेक प्रतिलिपी तयार केल्या असाव्या. त्या प्रतिलिपीवरून एक, तीवरून दुसरी अशा अनेक प्रतिलिपी तयार झाल्या. एकनाथकालापर्यंत अशा ज्या प्रतिलिपी तयार झाल्या त्या पाठपाठांतरानी अबद्ध तर होत्याच,

१९ 'जाऊनि ज्ञानेश्वर बैसले आसनावरी। पुढे ज्ञानेश्वरी ठेवियेली' : नामदेव, श्रीज्ञानेश्वर समाधि (चित्रशाळा प्रत), अभंग १२७.

शिवाय त्यांत नवीन ओव्या प्रक्षिप्त करून ठेवल्या होत्या. म्हणूनच एकनाथांना म्हणावे लागले की : 'ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओवी करील मराठी । तेणें अमृताच्या ताटीं । जाण नरोटी ठेविली[२०] ।। ' असे असले तरी या पाठपाठांतराचे स्वरूप मर्यादित असणार. त्यामुळेच एकनाथांना मूळ पाठ शुद्ध करून 'नरोटी' प्रमाणे अ-ज्ञानेश्वरीय ओव्या वेगळ्या काढून वगळता आल्या. म्हाइंभटांच्या 'लीळाचरित्रा'ची मूळ प्रत नष्ट झाल्यावर काय झाले ? मूळ प्रतीवरून तयार केलेल्या 'प्रतिलिपी' तर नव्हत्या. म्हणून हिराइसाला मुखपरंपरेने पाठ असलेल्या 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन झाले. ते होत असताना स्वामींची वचने व दृष्टांत, क्वचित त्यांच्या प्रकरणवशासहित वेगळे काढल्यामुळे मूळ ग्रंथ खंडित झाला. त्यामुळे म्हाइंभटांचा मूळ ग्रंथ जसाचा तसा पुनर्लिखित झाला असे म्हणता येत नाही. त्याचवेळी हिराइसा-प्रमाणेच इतर आम्नायांतील आचार्यांच्या शिष्यांनीही या ग्रंथाचे पुनर्लेखन केले. त्यात वाक्यांची भिन्न रचना, स्वामींच्या मुखीच्या वचनांची वासनांतरे, लीळांचे अनुक्रम इत्यादी अनेक बाबतीत भिन्नता दिसून आली. 'लीळाचरित्रा'चे अनेक पाठ निर्माण झाले, त्यात पुष्कळ प्रक्षेप घुसले. इतके की हरिबास व धाकुटे सोंगोबास यांना, हीराइसा पाठ म्हणजेच पिढीपाठ व नागनाथ पाठ यांखेरीज इतर पाठ अप्रमाण म्हणून घोषित करावे लागले. अशा स्थितीत 'लीळाचरित्रा'चे पुनःस्थापन करून अधिकृत संहिता तयार करणे किती व कसे कठीण आहे याची कल्पना येईल.

## सर्व पाठांच्या पोथ्या दुर्मिळ

यात आणखी एक अडचण अशी की, 'लीळाचरित्र' संपादनासाठी व त्याची अधिकृत संहिता तयार करण्यासाठी महानुभावांच्या सर्व मठांतील या ग्रंथाच्या सर्व पोथ्या पाहाणे अवश्य होते. पण अजूनही अनेक मठांतील महंत आपला ग्रंथसंग्रह माझ्यासारख्या महानुभावीयेतरांना दाखवण्यास तयार नाहीत. त्यामुळे मिळेल त्या साधनसामग्रीवर निर्वाह केल्याखेरीज गत्यंतर नाही. सर्व पोथ्या उपलब्ध झाल्या असत्या तर त्यांचे पाठ कोणते आहेत हे ठरविणे सुलभ झाले असते. उपलब्ध झालेल्या पोथ्या पाहिल्यावर एक गोष्ट लक्षात आली की, सामान्यतः प्रतलेखक आपण कोणत्या पाठाच्या पोथीची प्रतिलिपी करीत आहोत हे नमूद करीत नाही. त्यामुळे मिळालेली पोथी कोणत्या पाठाची आहे हे निश्चित सांगता येत नाही. मला मिळालेल्या उत्तरार्ध चरित्राच्या दोन पोथ्यांवर असा पाठनिर्देश आहे. पूर्वार्ध चरित्राच्या तीन पोथ्यांवर त्यांच्या मालकांनी म्हणजे कै. महंत श्रीगोपीराज यांनी 'पिढीपाठ' असे स्वतःचे मत नोंदलेले आहे. पण आतील मजकूर तौलनिक दृष्टीने तपासून पाहाता त्या एकाच पाठाच्या भिन्न प्रती असाव्यात असे दिसत नाही. पिढीपाठाचेही, हिराइसा, परशरामबास, गुजर सिवबास यांचे पाठ आहेत. त्यांपैकी हे कोणाचे ते ठरविता येत नाही. मुरारीमल्लबासांनी केलेल्या 'गुजरसिवबासा मागा' पिढीपाठाच्या दुसऱ्या शोधनीच्या, पूर्वार्ध व उत्तरार्ध चरित्राच्या मला प्रत्येकी दोनदोन प्रती मिळाल्या. या व अशा प्रकारच्या अनेक अडचणीतून मार्ग काढीतकाढीत प्रस्तुत संहिता मी सिद्ध केलेली आहे. तिचे स्वरूप स्पष्ट करण्यापूर्वी मी ज्या साधनसामग्रीचा उपयोग केला तिचे वर्णन प्रथम देतो.

## साधनसामग्री

पूर्वार्ध व उत्तरार्ध चरित्रांच्या संपादनासाठी मला सुमारे २५ पोथ्या मिळाल्या. त्यांपैकी अनेक पोथ्या शके १६०० च्या नंतरच्या आहेत. मी मनाशी असा संकल्प केलेला होता की प्रस्तुत संपादनासाठी

---

२० कुंटे, साखरे इ. संपादक : ज्ञानेश्वरी, १८ व्या अध्यायानंतरच्या एकनाथांच्या ओव्या.

शक्यतोवर शके १५०० पूर्वीच्या पोथ्यांचा उपयोग करावा. त्यामुळे बऱ्याच पोथ्या मला दूर ठेवाव्या लागल्या. अपवाद व अपरिहार्य परिस्थितीतच शके १५०० नंतरच्या काही पोथ्या निवडल्या. संपादनासाठी निवडलेल्या पोथ्यांचा तपशील पुढीलप्रमाणे :

## लीळाचरित्र : पूर्वार्ध

### अ. प्रत

पूर्वार्ध विभागाच्या संपादनासाठी मूळ प्रत म्हणून स्वीकारलेली ही पोथी होय. ती मला महंत श्रीमुरलीधरशास्त्री आराध्य यांच्यामार्फत मिळाली. हल्ली ही पोथी कोणाजवळ आहे ते सांगता येत नाही. तिचा सूक्ष्मपट मी काढून घेतला असून तो माझ्याजवळ आहे. पोथीत प्रथम द्वारावतीच्या लीळा असून त्यांनंतर 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध लिहिलेला आहे. पूर्वार्धाच्या शेवटी पुढील समाप्तिलेख आहे :

"एवं पुर्वार्धं लीळा समाप्त ।। सके १४६३ ।। पलव नाम सवंछरे कार्तीक सुध सप्तमि : त दीसीं पुस्तक लीखिते : लेखक पाठकयोः ।। यादृसं पुस्तकं दृष्ट्वा तादृसं लीखिते मया : ऐदि सुद्धमसुद्धं वा मम दोसो न लींप्यते ।। दामोदरसुतेन कृस्णेन पुस्तक लीखिते : ।। राज्यांचां पींपळगावीं पुस्तक लीहीलें : ।। * ।। "

यावरून शके १४६३, प्लव संवत्सर, कार्तिक शुद्ध सप्तमीला, राजाच्या पींपळगावी दामोदराचा सुत (शिष्य) कृष्ण, याने, दुसऱ्या कोणत्या तरी पोथीवरून नकललेली ही पोथी होय, हे दिसून येईल. या समाप्तिलेखात 'वार' दिलेला नाही. त्यामुळे तिथीचा उल्लेख तपासून पाहता येत नाही. गत शके १४६३ ला प्लव संवत्सर मात्र बरोबर येतो.

पूर्वार्ध लीळांनंतर याच पोथीवर श्रीकृष्णचरित्र (द्वापर लीळा) व श्रीदत्तात्रयचरित्र (सैह्याद्र लीळा) असून त्यानंतर काही प्रमेये लिहिलेली आहेत. प्रमेयांचा भाग मात्र अपूर्ण आहे.

### आ. प्रत

ही पोथी महंत श्रीमुरलीधरशास्त्री यांची असून तीत केवळ पूर्वार्ध चरित्रेच आलेली आहेत. पोथीच्या शेवटी—

"सके १५. . . सर्वधारी नाम संवछरे फालगुन मास शुध चतुर्थी वार सोमवासरे देगलुर प्रग्न सांगवी तेथ पुस्तक समाप्त । हस्ताक्षेर परंडकर आइदमुनीचे ।। "

असा समाप्तिलेख आहे. शक कालातील शेवटचे दोन आकडे लिहिलेले नाहीत. १५ या आकड्यावरून हा आकडा १५००–१५९९ च्या दरम्यानचा असला पाहिजे. सर्वधारी संवत्सर शके १५१० आणि १५७० ला येतो. शके १५१० च्या फाल्गुन शुद्ध चतुर्थीला शनिवार येतो ; तर शके १५७० च्या फाल्गुन शुद्ध चतुर्थीला, पोथीतील तिथिवाराच्या निर्देशाप्रमाणे बरोबर सोमवार येतो. तेव्हा शके १५७०, सर्वधारी संवत्सर, फाल्गुन शुद्ध चतुर्थी, हाच लेखनसमाप्तीचा काल होय. त्या दिवशी इंग्रजी तारीख ५ फेब्रुवारी १६४९ ही होती.

या पोथीतील मजकूर बव्हंशी 'अ.' प्रतीशी मिळताजुळता असला तरी तीत अधिक माहिती देणाऱ्या काही शोधीच्या लीळा आहेत. काही थोड्या ठिकाणी वचनांचाही निर्देश आहे. अधिक माहिती देणारी

ही पोथी असल्यामुळे संपादनार्थ तिचा उपयोग करून घेतला आहे. पोथी म. आराध्य यांची असल्यामुळे तिला 'आ.' प्रत असे संक्षिप्त नाव दिले आहे.

## रा. प्रत

ही पोथी संवत्सर (जिल्हा अहमदनगर) येथील महंत श्रीराजधरबाबा यांच्याकडून मिळाली. पोथीत एकांक नाही. पोथीचा आरंभ 'त्रियंबका न वचणें' या लीळेपासून होतो. येथून पुढचा संपूर्ण पूर्वार्ध भाग आलेला आहे. पोथीच्या समाप्तिलेखात 'शके १४९१, शुल्क संवत्सर, श्रावण अष्टमी, मंगळवार' असा लेखनकाल दिलेला आहे. गत शक १४९१ ला शुल्क संवत्सर आहे, पण पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे श्रावण शुद्ध अष्टमीला गुरुवार, तर वद्य अष्टमीला शुक्रवार येतो, मंगळवार नाही. अर्थात, तिथिवाराचा मेळ जमत नाही. स्थूल मानाने इंग्रजी पंचांगाप्रमाणे जुलै-ऑगस्ट १५६९ मध्ये या पोथीचे लेखन झाले असावे असे मानण्यास हरकत नाही. यातील लीळांचा अनुक्रम आणि पाठ मुरारीमल्लबासांच्या पिढी-पाठाच्या द्वितीय शोधनीशी बरोबर जुळतात. तेव्हा ही पिढीपाठाची पोथी होय यात शंका नाही. पोथी महंत राजधरबाबांची असल्यामुळे तिला 'रा.' प्रत म्हणून संबोधले आहे.

## मु. प्रत

ही पोथी मला श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयामधून मिळाली. पोथीच्या आरंभी श्रीकृष्णचरित्र (द्वापरीच्या लीळा) व श्रीदत्तात्रेयचरित्र (सैह्याद्र लीळा) आहेत (द्वारावतीच्या लीळा मात्र नाहीत). त्यानंतर 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध संपूर्ण असून शेवटी 'अज्ञात चरित्रे' अपूर्ण आहेत. अज्ञात चरित्राच्या १२३ लीळा त्यात आहेत. पूर्वार्ध चरित्राच्या शेवटी 'सीउबासामागां हे दुसरे शोधन पिढीपाठ पूर्वार्धा' चे एवढाच निर्देश आहे (पोथीचा लेखनकाल दिलेला नाही). अर्थात ही पोथी पिढी-पाठाची मुरारीमल्लबासांच्या शोधनीची आहे. म्हणूनच तिला 'मु.' प्रत असे संक्षिप्त नाव मी निश्चित केले आहे.

## भ. प्रत

पूर्वार्ध चरित्राची ही पोथी भगतराजबाबांची होय. म्हणून तिला 'भ.' प्रत म्हणून संबोधिले आहे. आरंभी 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध भाग संपूर्ण लिहिला असून त्यानंतर द्वारावतीच्या लीळा, सैह्याद्र लीळा आणि द्वापरीच्या लीळा असून त्यापुढे श्रीचक्रधरस्वामी निरनिराळ्या ठिकाणी किती दिवस राहिले याच्या नोंदी आहेत. त्यानंतर श्रीचक्रधर, गोविंदप्रभू इत्यादींच्या प्रयाणकालाचे शकसंवत्सर व तिथ्या लिहिल्या आहेत, आणि त्यापुढे—

> "सकू संवत्सरे १४८१ सीधार्थि संवत्सरे आस्वीन सूध १ रविवारे तदीसी चरीत्रें संपली आवाचां रांजणगावी ।। शुभं भवतु ।।"

असा समाप्तिलेख आहे. पुढे काही शोधीच्या लीळा व 'प्रश्नपरिहार' हे प्रकरण लिहिले आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे शके १४८१ सिद्धार्थ संवत्सरात अधिक आश्विन मास होता. त्याच्या शुद्ध प्रतिपदेला रविवार येत नाही, शनिवार येतो. निज आश्विन मासाच्या शुद्ध प्रतिपदेलाही रविवार येत नाही, सोमवार येतो. दोन्ही ठिकाणी एकेक दिवसाचाच फरक आहे. तो पिल्ले यांच्या मतानेही दुर्लक्ष करण्या-सारखा आहे. समाप्तिलेखात 'अधिक' आश्वीन असे न म्हणता नुसता 'आश्विन' महिना दिला आहे.

तेव्हा तो निज आश्विन मानणे योग्य होईल. सारांश, शके १४८१ मधील निज आश्विन मासाच्या शुद्ध प्रतिपदेला, रविवारी पोथीचे लेखन संपले. त्या दिवशी इंग्रजी तारीख २ ऑक्टोबर १५५९ ही होती.

गो. प्रत

ही पोथी मला श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालय, रिद्धपूर येथून मिळाली. पोथीत प्रारंभी एकांकासहित 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध संपूर्ण लिहिलेला असून त्यानंतर द्वापर लीळा, सैह्याद्र लीळा, द्वारावतीच्या लीळा व 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध आणि उत्तरार्ध यांतील लीळांच्या आद्या लिहिलेल्या आहेत. पूर्वार्ध चरित्रांच्या शेवटी——

"सके १४ सरावण वदि चौथी : वार सोमवार : तदीनी लीखीते : एथाप्रती लीखीते : मम दोस न लीपीते : सूध मां सूध ।।

असा समाप्तिलेख आहे. यात शकाचा उल्लेख अपूर्ण आहे, आणि संवत्सर मुळीच दिलेला नाही. त्यामुळे पुढे तिथिवार दिलेला असला तरी तो तपासून पाहाता येत नाही. तथापि 'सके १४' यावरून ही शकाच्या १५ व्या शतकात लिहिलेली पोथी असावी असे म्हणण्यास हरकत नाही.

$गो_{२}$ प्रत

ही पोथीसुद्धा श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयातूनच मिळाली. पोथीत आरंभी द्वापार लीळा, सैह्याद्र लीळा व द्वारावतीच्या लीळा असून त्यानंतर 'लीळाचरित्र : पूर्वार्ध' संपूर्ण आहे. शेवटी समाप्तिलेख आहे. पण त्यात लेखनशक दिलेला नाही. फक्त 'यादृशं पुस्तकं दृष्ट्वा——' इत्यादी श्लोक लिहिलेले आहेत. कालोल्लेख नसला तरी पोथी अत्यंत सुवाच्य व संपादनार्थ स्वीकारलेल्या 'अ.' प्रतीशी बव्हंशी मिळतीजुळती असल्यामुळे संपादनासाठी तिचा उपयोग करून घेतला आहे.

$गो_{३}$ प्रत

ही पोथीसुद्धा श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालय, रिद्धपूर येथून मिळाली. पोथीत आरंभी द्वापरीच्या लीळा (श्रीकृष्ण चरित्र) १२ ते ४२ असून नंतर सैह्याद्र लीळा १ ते ७ आहेत. नंतर 'लीळाचरित्र : पूर्वार्ध भाग', 'त्रीएंबका न वचणे' या लीळेपासून शेवटपर्यंत लिहिलेला आहे. अर्थात, यात एकांक लिहिलेला नाही. हा सर्व मजकूर एकटाकी असून सुवाच्य, वळणदार बारीक अक्षरांत लिहिलेला आहे. पूर्वार्धाच्या शेवटी 'एवं पुर्वार्ध समाप्त' एवढाच समाप्तिलेख आहे. पोथीचा लेखनकाल दिलेला नाही.

पूर्वार्धानंतर निराळ्या मोठ्या हस्ताक्षरांत 'विद्यामार्गीचा अर्थु' हे प्रकरण लिहिले आहे. त्याच्या शेवटी 'वारू मंगळ तीथी द्वादसी : तदीनी विद्यामार्गीचा अर्थू संपुर्ण :' असा समाप्तिलेख आहे. पण त्यामुळे पोथीच्या लेखनकालावर कोणताच प्रकाश पडत नाही.

माझ्या मते हा पाठ हिराइसाचा होय. त्यातील मजकूर व संपादनासाठी घेतलेल्या 'अ.' पोथीतील मजकूर बव्हंशी सारखा आहे. प्रस्तुत पोथीत काही शोधीच्या लीळा जास्त अंतर्भूत केलेल्या आहेत. एवढाच काय तो फरक.

बी. प्रत

ही पोथी महंत श्रीवर्धनस्थ बीडकर महानुभाव यांच्याकडून मला मिळाली. पोथीचा कागद जाड असून त्यावर लिहिलेला मजकूर ठळक अक्षरांत, वळणदार व सुवाच्य आहे. द्वारावतीकाराच्या

लीळांपासून 'लीळाचरित्रा'च्या पूर्वार्धाला सुरुवात झालेली आहे. पोथीत 'लीळाचरित्रा'चा पूर्वार्ध व उत्तरार्ध संपूर्ण असून त्यानंतर पूर्वार्ध व उत्तरार्धाची स्थाने (स्थान-पोथी) लिहिली आहे. शेवटी 'तीर्थमालिका' हे प्रकरण बाळबोध लिपीत लिहिलेले आहे. पोथीचा समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

"शतं षोडषवेदमेकं १६४१ शकानां विकारी मिदं नाम संवत्सराणां। दिने सोममासाधिकं पंचमीयां चरित्रामृतं शुद्ध पक्षे समाप्तं ।। १ ।। शके १६४१ विकारीनाम संवत्सरे आश्विन मासे शुल्क पक्षे तिथी पंचमी सोमवारी उत्तरा नक्षेत्री रितु.......ते दिवसी आषाढ शुद्ध बीजे पासौनि लिखनारंभ केला : आषाढ : श्रावण : भाद्रपद संपूर्ण : आनि अधिक मासाचो [पंच]मी शुद्ध पक्षपर्यंत तीनि मास पाच दिवसपर्यंत अद्यंते संपुर्ण जालें : नौगावीं गोदातीरी अवस्थान स्वामीयांचे नगरी [संपू]र्ण शुभमस्तु ।। लेखक पाठकयोः वाचिता विजया हो ।। * ।।"

यावरून प्रस्तुत पोथीचा लेखनकाल शके १६४१, विकारी नाम संवत्सर, आश्विन शुद्ध पंचमी, सोमवार,असा असल्याचे दिसून येईल. समाप्तिलेखात आरंभी जो संस्कृत श्लोक आहे त्यात 'मासाधिकं' शब्द योजला त्यावरून तो 'अधिक' महिना असावा असे स्पष्ट होते. पिल्ले यांच्या जंत्रीनुसार शके १६४१ मध्ये अधिक आश्विन मास होता. त्याच्या शुद्ध पंचमीला बरोबर सोमवार येतो. तेव्हा हा कालोल्लेख बरोबर आहे. त्या दिवशी इंग्रजी तारीख ६ सप्टेंबर १७१९ होती.

या पोथीतील पूर्वार्धाचा मजकूर आणि संपादनासाठी मूळ म्हणून स्वीकारलेल्या 'अ.' प्रतीतील मजकूर बव्हंशी सारखा आहे. 'गो.$_2$' व 'गो.$_3$' प्रतीत ज्या शोधीच्या लीळा म्हणून अंतर्भूत केल्या आहेत त्या प्रस्तुत 'बी.' प्रतीतही आहेत. प्रस्तुत 'बी.' प्रतीचा पाठ, हिराइसाचा असावा असे मला वाटते. याच पोथीत जो उत्तरार्ध लिहिलेला आहे त्याच्या आरंभी 'पाठ हिराइ ।। हिराइसें भटाची शिक्षें : पंडितांची ब्राम्हणी :' असे स्पष्ट लिहिले आहे. यावरून याच पोथीत प्रारंभी लिहिलेल्या पूर्वार्धाचाही पाठ याच हिराइसाचा असावा असे मानण्यास हरकत नाही. मुरारीमल्लबासांच्या दुसऱ्या शोधनीत हिराइसाचे म्हणून जे पाठभेद नमूद केले आहेत ते पाठ प्रस्तुत पोथीतील मूळ लीळांतच अंतर्भूत झालेले आहेत; ही गोष्टही सूचक आहे.

### ह. प्रत

ही पोथी ई. विद्याधरदादा महानुभाव, नवसारीकर यांच्याकडून मिळाली. अनुक्रमे (१) उत्तरार्ध चरित्रे ६०८; (२) अज्ञात लीळा ६२ ; (३) एकांकासहित पूर्वार्ध चरित्रे ५३३ ; त्यांत एकांक लीळा ९४ असून त्यानंतर 'त्रिएंबका न वचणे' ही लीळा आहे. एकांक व पुढील लीळांचे क्रमांक धावते आहेत ; (४) रिद्धपुर चरित्रे २७६ ; आणि (५) द्वारावती लीळा १०, हे ग्रंथ अनुक्रमे पोथीत लिहिलेले आहेत. पोथीत कोठेही लेखनकाल दिलेला नाही.

पोथीवर आरंभी 'हर्दमुनी पाठ निश्चित फक्त आद्यांच्या आकडा जुळत नाही :' असे कोणीतरी लिहून ठेवलेले आहे. या पोथीला 'ह.' प्रत संबोधले आहे ते याच कारणामुळे. संपादनासाठी घेतलेल्या 'अ.' प्रतीतील मजकूर व या पोथीतील मजकूर अनेक बाबतीत सारखा आहे. म्हणून तिची निवड केली आहे.

### पं. प्रत

प्रस्तुत पोथी ई. पंडितराज बीडकर, मुक्काम पंचाळेश्वर, यांची असून ती मला ई. ओंकार नागराज महानुभाव यांच्यामार्फत मिळाली. पोथीत (१) ऋद्धपुर चरित्र, ३१० ; (२) लीळाचरित्र :

पूर्वार्ध, ५२१; (३) अज्ञात चरित्रे, १२५; (४) द्वापरीची चरित्रे, ६५; (५) लीळाचरित्र : उत्तरार्ध, लीळा ५३५; (६) स्मृति २७५—हे स्मृतिस्थळ मात्र नव्हे; (७) दृष्टांतपाठ, दृष्टांत ११२; (८) सूत्रपाठ, हे ग्रंथ आहेत. पोथीच्या शेवटी समाप्तिलेख आहे तो पुढीलप्रमाणे :

"वडजंबा आधिष्टीते स्थान विख्याते भुवनत्रय माहाराजा आधिष्टितं नगदपुरं :।। १ ।। तत्र स्थाने महता च वासं कुर्वं मुनिस्वरं : नामाधि दामोधराख्या ग्रंथ च तेन लिखितं ।। २ ।। मार्गिस्वर मास सूक्ल पक्षे तिथी अष्टिमी वार बुध संपुर्ण : सकल्याण मंगळं नमोस्तु : दाएमुनि वाइंदेसकरू तेयाचे हास्तआक्षर ।। * ।। शक १४८९ क्षय नाम संवत्सरे मार्गिस्वर मासे शुक्ल पक्षे अष्टमी बुधिवार संपुर्णता : गांगद मुनि तयाची प्रती दामोधर लिखितं ।।"

यावरून असे दिसते की, नगदपुर येथे, गांगद मुनीच्या पोथीवरून दामोधर (=दाए) मुनि वाइंदेशकर याने शके १४८९, क्षय संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध अष्टमी, बुधवारी ही प्रतिलिपी लिहून पूर्ण केली.

पिल्ले यांच्या जंत्रीनुसार गत शक १४८८ (म्हणजे चालू शक १४८९) ला क्षय संवत्सर येतो. त्याच्या मार्गशीर्ष शुद्ध अष्टमीला बरोबर बुधवार येतो. गत शक १४८९ला प्रभव संवत्सर असून त्याच्या मार्गशीर्ष शुद्ध अष्टमीला रविवार येतो. अर्थात, हा समाप्तिलेख गत शक १४८८ चा आहे. लेखकाने गत शकाचा निर्देश न करता चालू शक १४८९ लिहिला आहे. प्राचीन लेखांत असा प्रकार अनेकदा झालेला आढळतो. तेव्हा प्रस्तुत पोथीचे लेखन गत शक १४८८, क्षय संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध अष्टमी, बुधवार रोजी पूर्ण झाले असेच मानले पाहिजे. त्या दिवशी इंग्रजी तारीख २० नोव्हेंबर, १५६६ ही होती.

प्रस्तुत प्रतिलिपी करणारा दाएमुनी वाइंदेशकर असला तरी यातील 'लीळाचरित्रा' चा पाठ वाइंदेशकराचा मात्र नाही. तो 'अ.' प्रतीशी बराच जुळता आहे. यात आलेली अज्ञात चरित्रे पिढीपाठाप्रमाणे नाहीत, स्मृतीही स्मृतिस्थळाहून वेगळ्या आहेत हे मात्र नमूद केले पाहिजे.

### ने. प्रत

वरील हस्तलिखितांशिवाय, ह. ना. नेने यांनी संपादन केलेल्या, 'लीळाचरित्र, एकांक, पूर्वार्ध भाग १, २ व ३' या मुद्रित प्रतींचाही संपादनासाठी उपयोग करून घेतला आहे.

## लीळाचरित्र : उत्तरार्ध

### अ. प्रत

उत्तरार्ध 'लीळाचरित्रा' ची ही पोथी होय. तिच्या आरंभीचे एक पान फाटलेले आहे. बाकीचा सर्व भाग सकळ लिपीत अत्यंत सुवाच्य हस्ताक्षरांत एकटाकी लिहिलेला आहे. उत्तरार्धानंतर एका संस्कृत श्लोकावरील मराठी ओवीबद्ध टीका बाळबोधीत, दुसऱ्या कोणाच्या तरी हस्ताक्षरात लिहिलेली असून त्यानंतर १८७ अज्ञात लीळा पुन्हा सकळ लिपीत लिहिलेल्या आहेत. शेवटची काही पाने फाटलेली असल्यामुळे अज्ञात लीळांचा हा भाग अपूर्ण आहे. उत्तरार्ध लीळा एकूण ५०४ असून त्यांच्या शेवटी पुढील समाप्तिलेख बाळबोध लिपीत लिहिलेला आहे :

"शुभं भवतु लेखकपाठकयोः वाचिता विजया हो ।। * ।। सके ।। १४७६ ।। आनंद नांव संवत्सरे ।। छ ।। स्रावण मासू वदि नवमी वारू मंगळवारू : तदिनी समाप्त ।। छ ।। शुभं

भवतु ।। तैल्याद्रक्षे जळाद्रक्षे रक्षे सिथिलबंधनं ।। मुर्खहस्तं न दातव्यं एवं वदति भारथ ।। * ।।
एथाप्रती लीक्षीत ।।"

या समाप्तिलेखाच्या आरंभीच्या ओळीतील 'लेखक' या शब्दातील 'ले' हे अक्षर पृष्ठमात्रा देऊन लिहिलेले आहे हे विशेष होय. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा समाप्तिलेख तिथिवारासह बरोबर आहे. या तिथीला इंग्रजी तारीख २१ ऑगस्ट १५५४ ही होती.

## य. प्रत

उत्तरार्ध चरित्राची ही पोथी मला महंत श्रीयक्षदेवबाबा श्रीप्रभाकरशास्त्री महानुभाव यांच्याकडून मिळाली. पोथीत आरंभापासून शेवटपर्यंत फक्त उत्तरार्ध चरित्रे लिहिलेली आहेत. 'भगतिउपावो निरूपणे' या बेलोपुर येथील लीळेनंतरच्या लीळा न लिहिताच लेखकाने पोथी संपविलेली आहे. शेवटी आलेला लेखनसमाप्तीचा कालोल्लेख पुढीलप्रमाणे :

"श्री शके १४९० : विभव नाम स्वछरे मास सुध पुस सूध बीजे मंगळू सुक्ल पक्षे तदीनी लीळा संपुर्ण : सुभं भवतु :"

लेखनात दोष आहेत. शके १४९० विभव संवत्सर, पौष शुद्ध द्वितीया, मंगळवार—लेखकाला अभिप्रेत आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे शक संवत्सर बरोबर आहेत. पण पौष शुद्ध द्वितीयेला मंगळवार येत नसून सोमवार येतो. हा एक दिवसाचा फरक दुर्लक्षिण्यासारखा आहे. या तिथीला इंग्रजी तारीख २० डिसेंबर १५६८ ही होती.

## गो. प्रत

उत्तरार्ध चरित्राची ही पोथी श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयातून मिळाली. म्हणून तिला 'गो.' प्रत असे संबोधिले आहे. पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून हस्ताक्षर मोठे सुवाच्य व एकटाकी आहे. आरंभापासून शेवटपर्यंत पोथीत उत्तरार्ध चरित्रे एकूण ५०३ लिहिलेली आहेत. शेवटी नोंदलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

"इती बेलोपूर संपूर्णमीती ।। यवं लीळा उत्तरार्ध चरीत्रे संपूर्ण भवति ।। छ ।। सूभं भवतु : लेखकपाठकयो ।। ० ।। श्री सके ।। १४९५ ।। श्रीमूख नाम संवछरे ।। भाद्रपद वद्य त्रीतीया : सोमदीने दावसे ग्रामे : मळे स्थाने लिळा उत्तरार्धचरीत्रे संपूर्णभीती ।।

पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा उल्लेख शकसंवत्सर व तिथिवारासुद्धा बरोबर आहे. शके १४९५, भाद्रपद वद्य तृतीया, सोमवारला इंग्रजी तारीख १४ सप्टेंबर १५७३ ही होती.

## मु. प्रत

ही पोथी श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयातून मिळाली. पोथीत आरंभी उत्तरार्ध चरित्रे ६९५ स्वच्छ हस्ताक्षरात सकळ लिपीत एकटाकी लिहिली असून त्याच्या शेवटी 'शिवुबासांमागां हें दुसरें शोधन पिढीपाठ उत्तरार्धाचें :' अशी नोंद आहे. अर्थात, ही मुरारीमल्लबासांच्या शोधनीची पिढीपाठाची पोथी होय. म्हणून तिला 'मु.' हे संक्षिप्त नाव दिले आहे.

पोथीत उत्तरार्ध लीळांनंतर 'उत्तरार्धीचा काळनेम' निर्देशिला असून त्यानंतर पुढील महत्त्वाची नोंद आहे. लीळा संख्येच्या दृष्टीने ती उपयुक्त आहे :

"एवं द्वापर लीळा ४८ ।। मातापुर लीळा ७ ।। पुर्वार्ध लीळा ६२३ ।। उत्तरार्ध लीळा ६९५ ।। अज्ञात लीळा १२५ : अज्ञात म्हणिजे गांवां नेमु नाहीं ।। ऋद्धिपुर लीळा ३३० ।। स्मृती २६१ ।। वृद्धाचार २३ ।। अवधीया लीळा १८३८ : द्वारावती स्वतंत्र नाहीं : आहे ते क्षेपक जाणावी ।। एवं सरवळ ।।"

या लीळासंख्येचा विचार पुढे स्वतंत्र रीतीने करू. लीळासंख्येच्या निर्देशानंतर 'उद्धरण' प्रकरणाचे निर्वचन केले असून नंतर पूर्वार्ध चरित्रातील एकांक भाग लिहिलेला आहे. शेवटी पोथीच्या लेखन-समाप्तीचा निर्देश पुढीलप्रमाणे केलेला आहे :

"शके १५७० वरखे सर्वधारी नावं संवत्सरें ।। तीथि कार्त्तिक शुद्ध बिज ।। घटिका १२ नक्षेत्र घटिका २२ सौभाग्य घटिका ११ तद्दीनी उत्तरार्ध रूप समाप्ती ।। परगाणा खेड समत ग्रामा नावं अष्टगावं ।। रविवार ।। तदीनी संपूर्ण शुभं भवतु ।। मांगल्यमस्तू ।। श्रीरस्तू ।। * ।। कोठी दामराजासूत वैकल्म जयौबांचे हस्ताक्षर ।।"

पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा समाप्तिलेख शकसंवत्सर व तिथिवारासुद्धा बरोबर आहे. त्या दिवशी इंग्रजी तारीख ८ ऑक्टोबर १६४८ ही होती.

## ही. प्रत

प्रस्तुत पोथी मला महंत श्रीमुरलीधरशास्त्री महानुभाव यांच्याकडून मिळाली. ही फार महत्त्वाची पोथी आहे. उत्तरार्ध चरित्रे संपूर्ण लिहिलेली आहेत. प्रारंभीच महत्त्वाचा उल्लेख आढळतो. तो असा :

"श्री परेशाय नमः ।। पाठ हीराइसांचा : हीरासें उपाधी सीक्षे कमळाइसांची ।।"

यावरून उपाध्ये आम्नायातील कमळाइसांची शिष्या हिराइसा हिचा हा पाठ आहे हे स्पष्ट दिसते. ही महत्त्वाची उपलब्धी होय. या पोथीत लीळांचा क्रम स्थानपरत्वे निरनिराळा दिला आहे. पोथीच्या शेवटी नेहमीप्रमाणे समाप्तिलेख आहे. पण त्यात लेखनकाल मात्र दिलेला नाही.

## बी. प्रत

'लीळाचरित्राच्या' पूर्वार्ध भागाच्या संपादनासाठी ज्या 'बी.' (बीडकर) प्रतीचा उपयोग केला आहे तीच ही पोथी होय. तिच्याविषयीची सविस्तर माहिती मागे पान ७८वर पाहावी. उत्तरार्ध लीळांच्या प्रारंभी—

"पाठ हिराइ ।। हिराइसें भटांची सीक्षे : पंडितांची ब्राह्मणी :" असा महत्त्वाचा उल्लेख आहे. त्यावरून या पोथीतील उत्तरार्ध चरित्राचा पाठ भटोबासांची शिष्या व दामोदर पंडिताची पत्नी जी हिराइसा तिने तयार केलेला हा पाठ आहे हे स्पष्ट दिसते. या पाठाची उपलब्धी महत्त्वाची होय. या पोथीचा लेखनकाल १६४१, विकारी संवत्सर, आश्विन शुद्ध पंचमी, सोमवार (इंग्रजी तारीख ६ सप्टेंबर १७१९) असल्याचे मागेच दाखविले आहे.

## ने. प्रत

वरील हस्तलिखितांशिवाय ह. ना. नेने यांनी संपादन केलेल्या 'लीळाचरित्र—उत्तरार्ध' या मुद्रित प्रतीचाही संपादनासाठी उपयोग केला आहे.

## अज्ञात : श्रीकृष्णचरित्र

सामान्यतः सैह्याद्र लीळा (श्रीदत्तात्रेय चरित्र), द्वापर लीळा (श्रीकृष्ण चरित्र) व द्वारावतीच्या लीळा (श्रीचक्रपाणी चरित्र) 'लीळाचरित्रा'च्या पूर्वार्धाच्या पोथ्यांत आढळतात. प्रस्तुत संपादणीत सैह्याद्र लीळा व द्वारावतीच्या लीळा ज्या ज्या ठिकाणी पुनःस्थापित केलेल्या आहेत त्या त्या ठिकाणी त्यांचा पाठ पूर्वार्ध चरित्राच्या संपादनाला घेतलेल्या 'अ.' प्रतीतील होय. अर्थात्, 'अज्ञात: श्रीकृष्ण चरित्रा' च्या संपादनासाठीही प्रमाण पाठ म्हणून स्वीकारलेली पोथी पूर्वार्ध चरित्राची 'अ.' प्रत होय. या चरित्रांच्या संपादनासाठी 'भ., मु. आणि पं.' या प्रती घेतल्या आहेत. त्यांची माहिती 'लीळाचरित्र: पूर्वार्ध' या सदराखाली पाहावी. याशिवाय आणखी एका पोथीचा उपयोग केला आहे. तिला 'ग.' हे नाव दिले आहे.

## अज्ञात लीळा

या विभागाच्या संपादनासाठी प्रमाण प्रत म्हणून 'मु.' प्रत स्वीकारली असून साह्यभूत म्हणून 'ना., पं. आणि ह्.' या पोथ्या घेतल्या आहेत. 'पं. आणि ह्.' पोथ्यांची माहिती 'लीळाचरित्र : पूर्वार्ध' या सदरात मागे दिली आहे. 'ना.' प्रतीचा तपशील पुढील प्रमाणे :

> "'ना.' प्रत मला महंत श्रीनागराज महानुभाव, औरंगाबाद येथून मिळाली. पोथीत आरंभी 'स्थानपोथी' असून नंतर प्रथम ४७ अज्ञात लीळा आहेत. नंतर पुन्हा प्रथमपासून एकूण १७२ अज्ञात लीळा आहेत. त्यात, अर्थातच आरंभीच्या ४७ लीळा पुर्नलिखित झाल्या आहेत. अज्ञात लीळांनंतर काही विचारपर प्रबंध आहेत. हस्ताक्षर अत्यंत स्वच्छ व सुंदर असून पोथीच्या शेवटी आलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :
>
> 'स्वस्ति श्री शके १५२३ ।। पल्लव नाम संवत्सरे वैशाख शुद्ध त्रयोदशी सोमदिने ऋद्धिपूर्या मंडळीक मुनिना लिखितमिदं पुस्तकं ।।*।।
>
> शके १५२३ ला प्लव संवत्सर बरोबर येतो. 'प्लव' चेच लेखन लेखकाने 'पल्लव' असे केले आहे.'"

## सूत्रपाठ व दृष्टांतपाठ

वचनांचे व दृष्टांतांचे पुनःस्थापन करताना 'सूत्रपाठ' व 'दृष्टांतपाठ' या दोन्ही ग्रंथांची 'पाठसमुदाया'तील हस्तलिखिते मी वापरली आहेत. 'पाठसमुदाया'च्या मला अनेक पोथ्या मिळाल्या. पण त्यांच्या शेवटी लेखनकाल दिलेले नाहीत. म्हणून स्वीकारलेल्या प्रतीचे सविस्तर वर्णन देता येत नाही. पूर्वार्ध व उत्तरार्ध संपादनासाठी स्वीकारलेल्या 'पं.' प्रतीत (प्रस्ता. पा. ७९ पाहा) 'सूत्रपाठ' व 'दृष्टांतपाठ' हे दोन्ही ग्रंथ आहेत. संपादनासाठी त्यांचा उपयोग करून घेतलेला आहे.

या हस्तलिखित पोथ्यांव्यतिरिक्त पुढील मुद्रित ग्रंथांचाही उपयोग करून घेतला आहे :

(१) श्रीपाठसमुदाय : संपादक : ओंकारदादा परंडेकर, महानुभाव, प्रकाशक : बाळकृष्ण दादा कानडे, सोलापूर, प्रकाशन शके १८२९ (इ. स. १९०७).

(२) दृष्टांतपाठ : संपादक : नी. ब. भवाळकर आणि ह. ना. नेने, प्रकाशक : ह. ना. नेने, नागपूर, प्रकाशन, जानेवारी १९३७.

(३) दृष्टांतपाठ : संपादक : शं. गो. तुळपुळे आणि कुमुदिनी घारपुरे, प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे प्रकाशन, जुलै १९६४.

## प्रकरणवश

वचनांचे पुनःस्थापन करताना विशेष उपयोगी पडलेल्या या ग्रंथाच्या मला तीन पोथ्या मिळाल्या. त्यातून अत्यंत सुवाच्य अक्षरांत लिहिलेली पोथी मी निवडली. या पोथीत 'प्रकरणवशा' शिवाय विद्यासार ग्रंथ व काही प्रमेये लिहिली आहेत. 'प्रकरणवश' ग्रंथाच्या शेवटी पुढील समाप्तिलेख आढळतो:

"एवं प्रकर्णे संपुर्ण शुभं भवेद् ।। ऐसी प्रकरणे धुंडुनि आनुक्रमे लीहीली असति: हे प्रकर्णे दाहा पाठा मिळुनि अन्वयो लावीला: एथाप्रती लीखीते: मम दोष न लीपीते: ।।

'प्रकरणवशा'च्या या समाप्तिलेखात लेखनकाल नाही. तो संपूर्ण पोथीच्या शेवटी पुढीलप्रमाणे आलेला आहे:

सके १६७९ भादृपद मासी अमांवसेचे दीवसीं सोमदीन नक्षेत्र उत्तरा: ।। वनवले बल्लळ: त्याहीचे शूत मुकुंदबा हस्ताक्षर: ।। बांकी स्थळीं पुस्तक संपूर्न ।।

या पोथीबरोबरच 'प्रकरणवश': संपादक : मा. का. पंजाबी, महानुभाव, प्रकाशक: किशोर प्रकाशन, अमरावती, प्रकाशन जानेवारी १९६८, या मुद्रित ग्रंथाचाही उपयोग करून घेतला आहे.

# ४

## संपादनाचे ध्येय : धोरण

म्हाइंभटांनी 'लीळाचरित्रा'ची संहिता सिद्ध केली त्या वेळी 'पूर्वार्ध' व 'उत्तरार्ध' असे त्याचे दोनच भाग होते हे आपण पाहिले. अर्थात, आज सैह्याद्रि चरित्रे, द्वापर चरित्रे व द्वारावती चरित्रे म्हणून जी निराळी आहेत ती आरंभी मूळ चरित्रातच अंतर्भूत असली पाहिजेत. तीच गोष्ट अज्ञात चरित्रांची. जे चरित्र (लीळा) स्वामींनी कोणत्या गावी व प्रसंगी सांगितले याची निश्चित माहिती नाही, ते अज्ञात चरित्र होय. मुरारीमल्लबासांनी अशी १४४ अज्ञात चरित्रे नमूद केली आहेत. ही चरित्रेसुद्धा मूळ 'लीळाचरित्रा'तच आरंभी अंतर्भूत असली पाहिजेत. हा सर्व किंवा यातील शक्य तितका भाग 'लीळाचरित्रा'च्या पूर्वार्धात किंवा उत्तरार्धात योग्य ठिकाणी पुनःस्थापित करणे, हे माझ्या संपादनाचे एक ध्येय होय. पण त्यापेक्षाही महत्त्वाचे ध्येय असे की, 'सूत्रपाठा'त अंतर्भूत असलेली स्वामींची सर्व वचने व 'दृष्टांतपाठा' तील सर्व दृष्टांत योग्य ठिकाणी पुनःस्थापित करणे. वचने व दृष्टांत 'लीळाचरित्रा'तून वेगळी काढून केसोबासांनी सूत्रपाठ व दृष्टांतपाठ तयार केले, हे आपण पाहिलेच आहे. अर्थात, ते म्हाइंभटांच्या 'लीळाचरित्रा'चे अविभाज्य भाग होत, यात शंका नाही. पण आज उपलब्ध असलेल्या 'लीळाचरित्रा'च्या कोणत्याही पाठात ती सर्व आढळत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे, म्हणूनच त्यांचे मूळ चरित्रात पुनःस्थापन करणे महत्त्वाचे ठरते. तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे पूर्वार्ध व उत्तरार्ध चरित्रांतील लीळांचे व्यवस्थापन. संपादनासाठी घेतलेल्या प्रमाण प्रतीपेक्षा इतर प्रतींत काही लीळा अधिक आढळतात, तर प्रमाण प्रतीत आढळणाऱ्या काही लीळा इतर प्रतींत आढळत नाहीत. मुरारीमल्लबासांची पिढीपाठाच्या दुसऱ्या शोधनीची प्रत व पाठ-समुदायात आढळणाऱ्या पूर्वार्ध व उत्तरार्ध लीळांच्या आदी यांच्या साह्याने, प्रस्तुत संहितेत त्या स्वीकारणे किंवा वगळणे आवश्यक होते. लीळांच्या व्यवस्थापनासंबंधीची दुसरी बाब अशी की, 'लीळाचरित्रा'च्या निरनिराळ्या पोथ्यांत लीळांचे अनुक्रम वेगवेगळे आढळतात. काही निश्चित

धोरणाने या लीळांचे अनुक्रम सुसंगत रीतीने लावणे व त्याप्रमाणे संहितेत त्यांची पुनर्रचना करणे आवश्यक वाटले. याबरोबरच प्रत्येक लीळेचे संपादन करताना इतर पोथ्यांत आढळणारे शब्दांचे व वाक्यांचे महत्त्वाचे पाठभेद नमूद करून कमीअधिक माहितीची नोंद करणे, हे नेहमीचे संपादकीय धोरण माझ्यासमोर होतेच. ही ध्येयधोरणे अमलात कशी आणली याचे निवेदन अभ्यासकांसमोर ठेवणे अवश्य आहे.

## सैह्याद्र लीळांचे पुनःस्थापन

सैह्याद्रीच्या म्हणजे श्रीदत्तात्रयाच्या एकूण सात लीळा आहेत. त्यांपैकी 'श्रीदत्तात्रयो मार्गादिमूळ निरोपण' ही पहिली लीळा प्रमाण प्रतीत व संपादनासाठी घेतलेल्या इतर प्रतींत पूर्वार्धाच्या अगदी आरंभी मुळातच आहे (पू. १ पाहा), म्हणून तिच्या पुनःस्थापनेचा प्रश्न उद्‌भवत नाही. 'सासार्जुना वरप्रदान' व 'परशरामा भेटी' या दोन लीळा 'प्रकरणवशा'च्या आधारे मी उत्तरार्धात घातल्या आहेत. उत्तरार्ध लीळा १४४ चा शेवट व त्यानंतरच घातलेल्या या दोन लीळा पाहाव्या, म्हणजे त्या योग्य ठिकाणी पुनःस्थापित झाल्याचे आढळून येईल. इतर चार लीळांपैकी 'अळर्का भेटि', 'एकवीरे भोगाअनुवादु' व 'एकवीरे प्रतीष्टा' (उत्त. ४४१, ४४२ व ४४३ पाहा). या तिन्ही लीळा स्वामींनी पैठण येथील गणपती मठातील अवस्थानात सांगितल्याचे त्या लीळांच्या आरंभीच निर्देशिलेले आहे, म्हणून त्या त्या ठिकाणी पुनःस्थापित केल्या आहेत. राहिलेली 'मेरूवाळां जळक्रीडा' (उत्त. ४४४) या लीळेतील आशयाचा संबंध त्यापूर्वीच्या लीळेच्या आशयाशी सुसंगत आहे, म्हणून ती तिच्या पुढे घातली आहे. अशा रीतीने सर्व सह्याद्री चरित्रांचे मूळ 'लीळाचरित्रा'त योग्य ठिकाणी पुनःस्थापन झाले आहे.

## द्वारावती लीळा : पुनःस्थापन

द्वारावतीच्या म्हणजे श्रीचक्रपाणी अवताराच्या एकूण सात लीळा चरित्राच्या पोथ्यांत असतात. त्याशिवाय 'सैह्याद्री व्याघ्रवेखें दरीसन' व 'सूर्पमार्जनी क्रीडा' या दोन लीळा सर्व पोथ्यांत पूर्वार्धाच्या आरंभीच आढळतात, तर काही पोथ्यांत 'रवळया गीतस्रवणीं निर्वंसु कथन' ही तिसरी लीळाही वरील दोन लीळांच्या नंतर आढळते. वस्तुतः ती येथे देण्याचे काही विशेष प्रयोजन नाही, तरी ती काहींनी येथे घातलेली आहे, हे लक्षात घेऊन द्वारावतीच्या सर्व म्हणजे वरील तीन व द्वारावती चरित्रात येणाऱ्या सात अशा एकूण दहा लीळा मी येथे दिल्या आहेत. त्यासंबंधीचे अधिक स्पष्टीकरण पूर्वार्ध लीळा ४ वरील टिपेत केलेले आहे, ते पाहावे.

'द्वापर लीळा' म्हणजे श्रीकृष्ण चरित्रातील सर्व लीळांचे मात्र वरील पद्धतीने मला पुनःस्थापन करता आले नाही. ह्या एकूण ४८ लीळा आहेत. त्यांपैकी १४ लीळांचे पुनःस्थापन मी योग्य ठिकाणी करू शकलो असे वाटते. इतर लीळांचा 'अज्ञात लीळा : श्रीकृष्णचरित्र' असा भाग कल्पून तो स्वतंत्रपणे दिला आहे (पा. ७३३ ते ७५० पाहा). कोणत्या लीळांचे कोणत्या ठिकाणी पुनःस्थापन केले आहे याचे स्पष्टीकरण 'अज्ञात लीळा : श्रीकृष्णचरित्र' या विभागाच्या आरंभीच टिपेत केलेले आहे ते पाहावे.

## अज्ञात चरित्रे

'अज्ञात चरित्रे' एकूण १४४ आहेत. मुरारीमल्लबासांच्या शोधनीतील अज्ञात चरित्रांपैकी जवळ-जवळ २० चरित्रे माझ्याजवळील ('मु.' प्रतखेरीजकरून) सर्व प्रतींत, पैठण येथील अवस्थानात

आहेत. मला वाटते, या पाठाच्या मते त्या लीळा स्वामींनी पैठण येथे असतानाच सांगितल्या असाव्यात. म्हणूनच त्या पाठकारांनी तेथे घातल्या आहेत. 'नेने' प्रतीतही त्या तेथेच आहेत. या अज्ञात लीळा असूनही नेने यांनी त्या पैठण येथील अवस्थानात 'घातल्या' म्हणून कित्येकांनी त्यांना दोष दिला आहे, तो योग्य नाही[21]? नेने यांनी स्वतःच्या मताने त्या तेथे घातल्या असे नाही. त्यांना मिळालेल्या पाठातच त्या त्या ठिकाणी आहेत. या पाठकारांचे मत मान्य करून मीही प्रमाण पोथीत या लीळा जेथे आहेत तेथेच ठेवल्या आहेत. राहिलेल्यांपैकी काही लीळांचे पुनःस्थापन करण्याचा प्रयत्न केला आहे. उदा: 'मंडळीका झोळी देणे' ही पूर्वार्ध २२० वी लीळा म्हणून दिली आहे. इतर सर्व लीळांचा 'अज्ञात' विभागात समावेश केला. मुरारीमल्लबासांच्या पाठातील 'अज्ञात' लीळा सोडून इतर अनेक अज्ञात लीळा 'ना., पं., ह.' इत्यादी प्रतींत आढळतात. त्यांतील मला स्वीकार्य वाटलेल्या काही अज्ञात लीळांचा मी या विभागात समावेश केला आहे. स्वामींच्या चरित्रातील अज्ञात लीळा फक्त १४४ आहेत. त्यांव्यतिरिक्त इतर अज्ञात लीळा प्रक्षिप्त होत असे सामान्यतः समजण्यात येते; पण मला ते बरोबर वाटत नाही. मुरारीमल्लबासांनीच पूर्वार्धात व उत्तरार्धात काही लीळा दिल्या आहेत. त्यावर 'ही लीळा एथ: एरवी अज्ञात:' असा अभिप्राय आहे. काहींनी वर दाखविल्याप्रमाणे, काही लीळा मूळ चरित्रात घातल्या आहेत, तर मुरारीमल्लबासांनी त्या अज्ञात मानल्या आहेत. तेव्हा अज्ञात लीळांची संख्या केवळ १४४ आहे असे मानण्याचे कारण नाही. संख्येने सोडवता येण्यासारखा हा प्रश्न नाही. १४४ व्यतिरिक्त इतर अनेक अज्ञात लीळा निश्चित आढळतात. याचे एक प्रमाण म्हणजे 'प्रकरणवशा'त येणाऱ्या अज्ञात लीळा.

## 'प्रकरणवशा'तील अज्ञात लीळा

प्रस्तुत संपादणीतील अज्ञात विभागातील 'प्रकरणवशा' तील अज्ञात लीळा हा महत्त्वाचा भाग होय. अज्ञात लीळांची संख्या केवळ १४४ मानली तर या सर्व लीळा प्रक्षिप्त मानाव्या लागतील. पण तशा त्या प्रक्षिप्त नाहीत. 'प्रकरणवश' हा महानुभाव पंथात प्रमाण ग्रंथ आहे. तेव्हा त्यात आलेल्या अज्ञात लीळांना प्रामाण्य आहे, हे ओघानेच आले. पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी की, या अज्ञात लीळांत स्वामींच्या वचनांचे 'प्रकरणवश' आहेत. ते प्रक्षिप्त मानले तर मग त्यांत आलेल्या वचनांचे 'प्रकरणवश' अन्यत्र शोधावे लागतील. आणि अन्यत्र, विशेषतः 'लीळाचरित्रा'त तर ही वचने नाहीत. मग स्वामींची आजच्या 'लीळाचरित्रा'त न आलेली पण 'प्रकरणवशा'तील अज्ञात लीळात आलेली वचनेही प्रक्षिप्त मानायची काय? सारांश, 'प्रकरणवशा'त आलेल्या, स्वामींच्या वचनांचा संदर्भ प्रकट करणाऱ्या या अज्ञात लीळा प्रमाण होत, असे मानणे आवश्यक आहे. अज्ञात लीळांच्या विभागातील हा भाग महत्त्वाचा होय असे मी म्हटले ते याचमुळे.

## वचनांचे पुनःस्थापन

संपादनाचे दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे 'सूत्रपाठा'त आलेल्या सर्व प्रकरणांतील वचनांचे व दृष्टांतांचे पुनःस्थापन होय. पैकी, वचनांच्या पुनःस्थापनाचे कार्य मी मुख्यत्वेकरून 'प्रकरणवशा'च्या साह्याने केलेले आहे. 'प्रकरणवश' ग्रंथाचा मुख्य हेतूच स्वामींचे प्रत्येक वचन त्यांनी कोठे, कोणत्या प्रसंगी व कोणाला उद्देशून म्हटले आहे, हे सांगण्याचा आहे. या ग्रंथामुळे वचने पुनःस्थापित करण्याचे

---

२१ माधवराज पंजाबी : संपादक : सातै रूप चरित्र, प्रस्तावना, पा. ७–१०.

माझे काम सुलभ झाले आहे. निर्देशिलेले प्रकरण 'लीळाचरित्रा'त असेल तर त्यात ते वचन बसवले आहे (उदा: उत्त. ४७६, ४७८, ४८० इत्यादी पाहा); नसेल तर 'प्रकरणवशा'त दिलेल्या प्रकरणाची स्वतंत्र लीळा दिली आहे (उदा: उत्त. ६२७ ते ६३७ पाहा). 'प्रकरणवशा'त काही वचनांचे दोन किंवा त्याहून अधिक प्रकरणवश दिले आहेत. याचा अर्थ असा की, स्वामींनी ते वचन दोन किंवा अधिक वेळा निरूपिले आहे. अशा ठिकाणी मीही 'लीळाचरित्रा'त ते अधिक ठिकाणी पुनःस्थापित केले आहे. काही वचने पुनःस्थापित करताना थोडी अडचण आली. याचे कारण 'प्रकरणवशा'च्या पोथीत, सूत्रपाठाच्या 'विचारमाळिका' प्रकरणातील १४४ ते १४८, १५२ ते १५९, १७० ते १७२, १८१ ते १९७ या वचनांचे प्रकरणवश आढळत नाहीत. अशा ठिकाणी त्या वचनाचा आशय लक्षात घेऊन, व्युत्पत्तिव्युत्पन्न महंतांशी चर्चा करून माझ्या मतानुसार मी ती वचने योग्य ठिकाणी पुनःस्थापित केली. अशा ज्या पुनःस्थापित वचनांना 'प्रकरणवशा'त आधार नाही तेथें टिपात केवळ 'सूत्रपाठा'चा आधार दिला आहे. अशा रीतीने पुनःस्थापित केलेल्या वचनांचे 'प्रकरणवशा'तील आधार तळटिपात नमूद केलेले आहेत.

## दृष्टांतांचे पुनःस्थापन

वचने पुनःस्थापित करण्यासाठी जसा 'प्रकरणवशा'चा आधार मिळाला त्याप्रमाणे 'दृष्टांत' पुनःस्थापित करण्यासाठी 'दृष्टांतस्थळा'चे मार्गदर्शन लाभले. प्रत्येक दृष्टांतावरील भाष्यानंतर तो दृष्टांत स्वामींनी कोणाला, कोठे व कोणत्या प्रसंगी सांगितला, यांविषयी निर्देश केला आहे. हे निर्देश म्हणजे दृष्टांतांचे प्रकरणवशच म्हटले पाहिजेत. 'दृष्टांतस्थळा'च्या मला अनेक पोथ्या पाहायला मिळाल्या. त्यांत एकाच दृष्टांताचे भिन्न भिन्न प्रकरणवश दिलेले आहेत. खुद्द 'दृष्टांतस्थळ'कर्त्यानेही आपल्या मते असलेला प्रकरणवश देऊन 'एकी वासना' म्हणून भिन्न मत नोंदवलेले आहे. अशा ठिकाणी माझ्या मते जो प्रकरणवश मला योग्य वाटला त्यात तो दृष्टांत मी पुनःस्थापित केला आहे. काही दृष्टांतमालिकेतील दोनदोन किंवा तीनतीन दृष्टांत, दृष्टांतस्थळकर्त्याने त्यांचे भिन्नभिन्न प्रकरणवश दिले असले तरी माझ्या मते ते सर्व दृष्टांत एकाच वेळी निरूपिले असले पाहिजेत, म्हणून मी ते एकाच प्रकरणात पुनःस्थापित केले आहेत. उदा: खाजेयाचा, अन्नाचा व अमृताचा दृष्टांत. पूर्वार्ध लीळा १४५ व उत्तरार्ध लीळा ४३२ मधील या दृष्टांतावरील टीपा पाहाव्या. तसेच उत्त. लीळा १८० मध्ये पुनःस्थापित केलेले 'वाळुकां'चे दृष्टांत व त्यांवरील टीपा पाहाव्यात. तिन्ही विरहिणींचे दृष्टांतही असेच एकाच लीळेत घातले आहेत (अज्ञात लीळा १४२ पाहा).

काही दृष्टांतांच्या प्रकरणांचे निर्देश मिळाले. पण त्या प्रकरणाच्या लीळाच विद्यमान 'लीळाचरित्रा'त आढळत नाहीत. अशा ठिकाणी त्या दृष्टांतांच्या प्रकरणाच्या स्वतंत्र लीळा तयार करून संहितेत त्या अंतर्भूत केल्या आहेत. उदा: कोलाचा (उत्त. २२), माळेकाराचा (उत्त. २१३), रूम्हणेयाचा (पूर्वार्ध लीळा ३१०) इत्यादी दृष्टांत पाहावे.

काही दृष्टांतांच्या पुनःस्थापनेच्या बाबतीत मतभेदाला जागा आहे, याची मला जाणीव आहे. ते दृष्टांत अधिक योग्य ठिकाणी पुनःस्थापित करणे शक्य आहे असे अभ्यासकांनी दाखविल्यास त्यांचा पुनर्विचार करण्यास मला आनंदच वाटेल.

## लीळांचे व्यवस्थापन : लीळासंख्येचा प्रश्न

लीळांचे व्यवस्थापन करताना लीळांच्या संख्येची बाब तितकीशी महत्त्वाची नाही. कोणत्या पोथीत पूर्वार्धात व उत्तरार्धात एकूण लीळा किती आहेत यापेक्षा कोणकोणत्या लीळा आहेत हे महत्त्वाचे आहे. याचे मुख्य कारण असे की, एखाद्या पोथीत असलेली एकच लीळा दुसऱ्या पोथीत तिचे दोन भाग करून लिहिली आहे. कित्येकदा तर एकच लीळा विभागून तिच्या स्वतंत्र अशा तीन तीन लीळा केल्या आहेत. मुरारीमल्लबासांच्या पिढीपाठाच्या शोधनीत असे फरक झाले आहेत. उदा : पूर्वार्ध 'अ.' प्रतीत 'झाडी रामद्रणेयां भेटि' ही एकच लीळा आहे. नेने-तुळपुळे प्रतीतही ती एकच आहे. पण 'मु.' प्रतीत 'झाडी रामदरणेयां भेटि' व 'तथा विनंतीस्वीकारें अळजपुरीं अवस्थान' अशा तिच्या दोन लीळा आहेत. 'अ.' प्रतीत 'सांतिबाइसां भेटि' या लीळेच्या 'मु.' प्रतीत 'सांतिबाइसां भेटि', 'तथा स्थिति' अशा दोन लीळा आहेत. उत्तरार्ध 'अ.' पोथीत पहिली लीळा 'खडकुलीए अवस्थान : भटां अनुसरण' अशी आहे, तर 'मु.' प्रतीत 'खडकुलीए अवस्थान' व 'भटां भेटि : अनुसरणस्वीकारू' अशा तिच्या दोन लीळा केल्या आहेत. 'अ.' प्रतीत दुसरी लीळा 'भटां रीधपुरा पाठवणें' अशी आहे. 'मु.' प्रतीत तिच्या 'तथा औदास्यस्वीकार : श्रीप्रभुसन्निधान', 'तथा बोलाउं पाठवणे' व 'तथा भेटि : क्षेमालिंगन' अशा तीन लीळा केल्या आहेत. इतर प्रतीतील एका लीळेच्या मुरारीमल्लबासांनी दोन किंवा तीन लीळा कशा केल्या हे यावरून दिसून येईल. त्यामुळे इतर प्रतीपेक्षा 'मु.' प्रतीतील लीळांची संख्या फार फुगली आहे. सारांश, पोथ्यातील लीळांच्या संख्येला अवास्तव महत्त्व देण्याची गरज नाही. त्या आशयाच्या लीळा प्रतीत अंतर्भूत झालेल्या आहेत किंवा नाही हे पाहिले म्हणजे पुरे.

## घटनानुषंगाने लीळांचे व्यवस्थापन

यापेक्षाही लीळाव्यवस्थापनाच्या दृष्टीने त्यांचा अनुक्रम व्यवस्थित लावणे अधिक महत्त्वाचे आहे. असा अनुक्रम माझ्या दृष्टीने व्यवस्थित लावण्याचा प्रयत्न मी केला आहे. उदा: उत्तरार्धाच्या आरंभी पहिली लीळा 'भटां अनुसरण' ही आहे. त्यानंतर 'अमुयगो.' या प्रतींत व 'ने.' प्रतीतही लागलीच 'भट रीधपुरा पाठवणे' ही लीळा आहे. भटांचे अनुसरण झाल्यानंतर त्यांना लागलीच रिद्धपुरला पाठविले, असा याचा अर्थ होतो. तसे असेल तर त्यानंतर भट खडकुलीला नसताना घडलेल्या काही लीळा यायला पाहिजे होत्या. पण या पोथ्यांतील लीळानुक्रमावरून तसे दिसत नाही. दुसरे असे की, रिद्धपूरला गेल्यानंतर भट तेथे महिनाभर तरी होते. त्यानंतर स्वामींनी त्यांना बोलावले. पण वरील पोथ्यांत 'भट रीधपुरा पाठवणे' याच लीळेत भटांना बोलाऊ पाठवणे, त्यांचे परत येणे व स्वामींची भेट होणे हा सर्व भाग घातला आहे. कालानुक्रमाच्या दृष्टीने हे बरोबर वाटत नाही. उपाध्ये हिराइसा व पंडितांची ब्राम्हणी हिराइसा या दोन्ही पाठांत भटांना रिधपूरला पाठविण्याची लीळा खडकुलीच्या शेवटी शेवटी घातली आहे. त्यानंतर भटांना बोलावणे, त्यांचे परत येणे इत्यादी स्वतंत्र लीळा करून घातल्या आहेत. हा अनुक्रम अधिक सुसंगत आहे. म्हणून या दोन्ही हिराइसा (हीबी.) पाठाच्या आधारे प्रमाण पोथीतील पहिल्या दोन लीळांची मी पुनर्रचना केली आहे (उत्त. १ व ६१ ते ६६ पाहा).

दुसरे एक उदाहरण देतो. स्वामी डोंबेग्रामला असताना महदाइसा वाराणसीला गेली. (उत्त. १५८; नेने व तुळपुळे प्रत, उत्त. १२७ 'महदाइसी वाराणसी गमनी निक्षेदु' पाहा). त्यानंतर ती वाराणसीहून परत आल्यासंबंधीच्या लीळा प्रमाण पोथीत व 'मु.' खेरीज इतर प्रतीत उदा: नेने-तुळपुळे प्रतीत

उत्त. ३४६, 'माइतेया हरी उपाहारगमनी भटां बाइसीं भेटि' यात आहे. अर्थात, डोंबेग्रामाहून वाराणसीला जाऊन ती परत येईपर्यंत ती स्वामींच्याजवळ नव्हती. तेव्हा या दरम्यान महदाइसा-संबंधीच्या लीळा अंतर्भूत होणे विसंगत ठरते. पण बहुतेक पोथ्यांत महदाइसा वाराणसीहून येण्यापूर्वी स्वामी प्रतिष्ठानला असताना तिच्या संबंधीच्या लीळा आलेल्या आहेत, ते सुसंगत नाही. मुरारी-मल्लबासांनी मात्र ही विसंगती काढून टाकली आहे. त्याप्रमाणे लीळांचे व्यवस्थापन करताना महदाइसानी वाराणसीला जाऊन परत येईपर्यंत तिच्यासंबंधीच्या लीळा येऊ दिल्या नाहीत. त्या लीळा पैठण येथे घडलेल्या आहेत हे मान्य करून त्या सर्व महदाइसा वाराणसीहून परत आल्यानंतर घातल्या आहेत.

आणखी एक उदाहरण देतो. नेने-तुळपुळे प्रतीच्या उत्तरार्धातील लीळा २८३, 'यंत्रासनपूर्वक महादेवो आश्रमाची पूजास्वीकार' आणि 'शास्त्रमठीं संन्यासियां वेधु' (लीळा ३६९) या दोन लीळा पाहा. दुसऱ्या म्हणजे लीळा ३६९ च्या शेवटी पुढील वाक्य आहे : 'ते महदाश्रमीं जाणीतलें : मग म्हणीतलें : "आतां आमुचा मार्गु हे उछेदिती : " मग एंत्रासन केलें : ' लीळा २८३ च्या आरंभी पुढील वाक्य आहे : 'माहादाश्रमीं म्हणीतलें : "हे चांगदेवराउळ गोसावी आमचा मार्गु उच्छेदिती : " म्हणौनि कामाक्षेचां देऊळीं रंगपूजा केली : एंत्रासन रचिलें : ' या वाक्यांचा परस्परसंबंध लक्षात घेतला म्हणजे असे स्पष्ट होते की, 'संन्यासीयां वेधु' या ३६९ व्या लीळेनंतर 'यंत्रासनपूर्वक पूजास्वीकारू' ही लीळा असली पाहिजे. पण बहुतेक पोथ्यांत व प्रमाण प्रतीतही यंत्रासनाची लीळा आधी असून 'संन्यासीयां वेधु'ही लीळा नंतर आहे.ही उघड उघड विसंगती आहे.ती काढून टाकण्यासाठी या लीळांचे पुनर्व्यवस्थापन होणे आवश्यक ठरते, तसे मी केले आहे (उत्त. ४६४ व ४६५ पाहा). लीळांच्या व्यवस्थापनांची ही काही उदाहरणे दिली आहेत. असे व्यवस्थापन प्रस्तुत संहितेत मी आवश्यक त्या ठिकाणी केले आहे.

## ५

## संहिता मुद्रणाचे स्पष्टीकरण

संपादनासाठी घेतलेल्या प्रमाण पोथीतील लीळा संपादन करून म्हणजे पाठांतरे तळटिपात नमूद करून छापलेली आहे. अशी पाठांतरे दाखविण्यासाठी लीळेतील त्या त्या शब्दांच्या शेवटी वरच्या भागावर अनुक्रमे आकडे घातले आहेत. त्या लीळेच्या टिपांतील त्या त्या आकड्याची टीप पाहिली म्हणजे पाठांतर कळेल. क्वचित संपादनाच्या स्पष्टीकरणासाठी टिपांचे आकडे घातले आहेत. उदा: पूर्वार्ध लीळा १. ही संपूर्ण लीळा सरळ अक्षरांत छापली आहे. याचा अर्थ असा की, ती संपूर्ण लीळा प्रमाण प्रतीतील लीळेप्रमाणे आहे. या लीळेच्या 'आदी'च्या शेवटच्या 'निरोपण' या शब्दाच्या शेवटी वरच्या भागावर १ आकडा घातला आहे. या लीळेच्या १ या टिपेत त्याविषयी संपादकीय स्पष्टीकरण आढळेल. लीळेच्या दुसऱ्या ओळीत 'आदि' या शब्दावर २ हा आकडा घातला आहे. टिपातील २ या टिपेत 'पं. आदिकारण.' असे पाठांतर नमूद केले आहे. याचा अर्थ असा की 'पं.' प्रतीतील या लीळेत प्रमाण पोथीतील 'आदि' या शब्दाऐवजी 'आदिकारण' हा शब्द आहे. तिसऱ्या ओळीत 'कृतयोगीं' या शब्दावर ३ हा आकडा घालून खाली टीप ३ मध्ये 'अबी. त्रेता°' असे नमूद केले आहे. या पाठां-तराचा अर्थ असा की प्रमाण पोथी 'अ.' व दुसरी पोथी 'बी.' या दोन्ही पोथ्यांमध्ये 'कृतयोगीं' या शब्दाऐवजी 'त्रेतायोगीं' असा पाठ आहे. यावरून हेही लक्षात येईल की संपादनार्थ घेतलेल्या 'अ.'

या प्रमाण पोथीतही 'त्रेतायोगीं' असाच पाठ आहे. पण तो चुकीचा वाटल्यामुळे इतर सर्व पोथ्यांत आढळणारा 'कृतयोगीं' हा पाठ मी स्वीकारून तो संहितेत घातला आहे.

यावरून आणखी एक गोष्ट लक्षात येईल की, शब्दाचे पाठांतर देताना क्वचित पाठांतराचा संपूर्ण शब्द न देता तो तोडून दिलेला आहे. या तोडलेल्या शब्द 'ापुढे' शिरोरेषेजवळ वर्तुळाकार चिन्ह दिले असले म्हणजे मूळ पाठातील त्या शब्दाचा पुढचा भाग तेथे वाचावा. उदा: वरील पाठांतरात 'त्रेता°' असे असल्यामुळे त्यापुढे मूळ पाठातील 'योगीं' हा शब्द वाचावा. हे वर्तुळाकार चिन्ह पाठांतरातील शब्दाच्या मागे असले तर मूळ पाठातील त्या पाठांतराच्या मागील शब्द वाचावा. उदा: पूर्वार्ध लीळा १८, टीप १ पाहा. तेथे '°कुडा' असे पाठांतर दिले आहे. या अर्धपाठांतराच्या मागे वर्तुळाकार चिन्ह दिले आहे. याचा अर्थ असा की त्या'पूर्वी' मूळ पाठातील शब्द वाचावा. म्हणजे प्रस्तुत पाठांतर 'जूतकुडा' असे वाचावे.

टीपात जास्तीची वाक्ये नमूद करतानाही हेच धोरण स्वीकारले आहे. उदा: पूर्वार्ध लीळा ३, टीप १६ पाहा. तेथे 'केले'या शब्दावर १६ हा टिपांक दिला आहे.खाली टिपेत '°एक महानुभाव म्हणति--' इत्यादी वाक्य दिले आहे. याचा अर्थ असा की, मुळातील 'केले' या शब्दा'पुढे' संबंधित प्रतीत ते वाक्य आहे. पूर्वार्ध लीळा ५, टीपांक २, ४ हीसुद्धा याच प्रकारची उदाहरणे आहेत. याच्या उलट, पूर्वार्ध लीळा १६ पाहा. तेथे पहिला शब्द '¹माहादाइसा--' असून त्याच्या आरंभी १ हा टिपांक दिला आहे. त्याचा हेतू असा की, त्या टिपेतील वाक्य, प्रस्तुत 'माहादाइसा' या शब्दापूर्वी संबंधित प्रतीत आले आहे. हे दाखवण्यासाठीच त्या टिपेतील वाक्यानंतर शेवटी वर्तुळाकार चिन्ह दिले आहे. त्याचा अर्थ असा की मुळातील टिपांकाच्या पूर्वी ते वाक्य आले आहे. काही ठिकाणी टिपात अन्य प्रतीतील एक किंवा अनेक वाक्ये उद्धृत केल्यावर शेवटी -- अशी आडवी रेघ दिली आहे. त्याचा अर्थ असा की त्यापुढील शब्द किंवा वाक्ये मूळ लीळेतील वाक्याप्रमाणेच आहेत. उदा: पूर्वार्ध लीळा ४७२, टीप ४ व ६; लीळा ४७४, टीप १ पाहा.

दोन तीन प्रतीतील एखादे वाक्य उद्धृत करताना त्या प्रतीतील एखाद्या प्रतीत एखाद्याच शब्दाचा भिन्न पाठ असला तर किंवा त्यात अधिक भाग असल्यास तो तेथेच कंसात नमूद केला आहे. उदा: पूर्वार्ध लीळा १८, टीप ३; लीळा २५, टीप ३; लीळा ३१, टीप ३ पाहा.

प्रमाण पोथीवरून लीळा संपादन करताना काही ठिकाणी माहितीच्या व संगतीच्या दृष्टीने काही शब्द किंवा वाक्ये इतर पोथ्यांतून स्वीकारून ती संहितेत घातली आहेत. असे शब्द किंवा वाक्ये तिरप्या अक्षरांत छापली आहेत. उदा : पूर्वार्ध लीळा १५ पाहा. पान ८, ओळ ७ मध्ये 'मग केसवापासिली मढीहुनि द्वारावतीए बीजें केलें : दुंडीराउळ सरिसे होते :' ही वाक्ये तिरप्या अक्षरांत छापली आहेत. याचा अर्थ असा की, मूळ प्रमाण पोथीत ही वाक्ये नाहीत. संपादकाच्या मते माहितीच्या व सुसंगतीच्या दृष्टीने ती तेथे आवश्यक आहेत. अन्य पोथ्यांत ती आढळतात, तेथून ती स्वीकारून येथे घातली आहेत. ती अन्य पोथ्यांतील वाक्ये आहेत हे स्पष्ट व्हावे म्हणूनच ती तिरप्या अक्षरांत छापली आहेत. अशा रीतीने तिरप्या अक्षरांत छापलेल्या शब्दांच्या किंवा वाक्यांतील शेवटच्या शब्दांवर टिपेचा अनुक्रमांक देऊन त्या अनुक्रमाच्या टिपेत तो शब्द, वाक्य किंवा वाक्ये कोणत्या पोथीतून घेतली आहेत ते नमूद केले आहे. उदा: उपरोक्त वाक्याच्या शेवटच्या शब्दावर ११ हा टीपक्रमांक आला आहे. खाली त्या क्रमांकाच्या टिपेत कंसात (आहबी.) अशी नोंद आहे. याचा अर्थ असा की ही वाक्ये संपादनार्थ स्वीकारलेल्या 'आ.,ह.,बी.' (प्रस्ता. पा. ७६, ७८ व ७९ पाहा) प्रतीत आहेत, तेथून ती

स्वीकारून संहितेत घातली आहेत. यावरून हे लक्षात येईल की, अन्य पोथ्यांतून आपल्या या संपादणीतील घेतलेले शब्द किंवा वाक्ये जशी तिरप्या अक्षरांत छापली आहेत त्याप्रमाणे ती वाक्ये ज्या पोथ्यांतून घेतली त्यांचे संक्षेप कंसात ( ) नमूद केले आहेत. टिपांत कंसात घातलेल्या संक्षेपांचे हे स्पष्टीकरण अभ्यासकांनी लक्षात ठेवावे.

प्रस्तुत संहितेच्या संपादनातील एक प्रमुख ध्येय असे की 'लीळाचरित्र'च्या विद्यमान पाठात न आढळणारी स्वामींची वचने व दृष्टांत योग्य ठिकाणी पुनःस्थापित करणे. 'प्रकरणवश' व 'दृष्टांत-स्थळ' या ग्रंथांच्या साह्याने हे मी केले आहे. प्रमाण पाठात न आढळणारी वचने व दृष्टांत समर्पक ठिकाणी पुनःस्थापित करताना तेही तिरप्या अक्षरांत छापले आहेत. उदाः पूर्वार्ध लीळा १४५ पाहा. पान ११०, ओळ १६ व १७ मध्ये 'प्रकरणवशा'च्या साह्याने 'द्वीधा शांभव : अष्टधा शाक्तेय . . .' इत्यादी 'विद्यामार्गा'तील काही वचने पुनःस्थापित केली आहेत. त्यांच्या शेवटच्या शब्दावर निर्दिष्ट केलेल्या टिपांकाच्या ८ च्या टिपेत, ती तेथे कोणत्या आधारे घातली आहेत याचे स्पष्टीकरण दिले आहे. त्याच लीळेत पुढे खाजेयाचा, अन्नाचा व अमृताचा असे तीन दृष्टांत पुनःस्थापित केले आहेत. तेही तिरप्या अक्षरांत छापून पूर्वी निर्दिष्ट केलेल्या पद्धतीप्रमाणे त्यांचे आधार व स्पष्टीकरण खाली तळटिपेत केले आहे. पूर्वार्ध लीळा १०८ मध्ये 'शब्दवेधिया रसाचा दृष्टांत' पुनःस्थापित केला आहे. तो तिरप्या अक्षरांत छापला आहे व त्याचा आधार व स्पष्टीकरण तळटिपेत केलेले आहे. मात्र ज्या ठिकाणी आधारग्रंथातून घेतलेला भाग लांब आहे तेथे, किंवा 'प्रकरणवशा'च्या अनेक भागांतून लीळेचा एखादा परिच्छेद फार मोठा झाला आहे तेथे तिरप्या अक्षरांचा उपयोग न करता तो सरळ अक्षरांत छापला आहे. पण तो मजकूर दुसरीकडून घेतलेला आहे हे दाखवण्यासाठी तो चौकटी कंसात घातला आहे. उदाः उत्तरार्ध लीळा १३३, पान ४२५ पाहा. एरवी प्रस्तुत संपादणीच्या मुद्रणात सामान्यतः पूर्वोल्लिखित पद्धतीचा स्वीकार केला आहे.

'सामान्यतः' असे म्हणण्याचे कारण की, प्रमाण प्रतीच्या मूळ पाठातच जेथे एखाद्या दृष्टांताचा उल्लेख केला आहे, तेथे तो दृष्टांत पुनःस्थापित करताना नेहमीच्या सरळ अक्षरांत छापला आहे. पण त्या दृष्टांताचा तो मजकूर प्रमाण पाठात नसून अन्य संबंधित ग्रंथांतून घेतला आहे हे दाखविण्यासाठी तो चौकटी कंसात घातला आहे. उदाः उत्तरार्ध लीळा १३३, पान ४२५ पाहा. या पानावर ओळ ३ मध्ये 'तेथ गोसावीं हस्तीचा द्रीष्टांतु निरूपिला :' असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणून हा दृष्टांत तिरप्या अक्षरांत न घालता सरळ अक्षरांत पण चौकटीच्या कंसात तेथे पुनःस्थापित केला आहे. उत्तरार्ध लीळा ३०३ मध्ये 'काकसूकराचा दृष्टांत', लीळा ४२९ मध्ये 'इशाळूवाचा दृष्टांत', लीळा ४३३ मध्ये 'साकरेचा दृष्टांत' इत्यादी, असेच सरळ अक्षरांत पण चौकटी कंसात पुनःस्थापित केले आहेत. काही ठिकाणी या पद्धतीचा अवलंब झालेला नाही. उदाः उत्तरार्ध लीळा ४३४ मध्ये 'डोळेयाचा दृष्टांत' तिरप्या अक्षरांत छापला गेला आहे. पण त्यावरून दृष्टांताचा उल्लेख मुळात असला तरी दृष्टांत मात्र अन्य ग्रंथांतून (दृष्टांतपाठातून) पुनःस्थापित केला आहे हे स्पष्ट दिसतेच. अन्य पाठातून व 'प्रकरणवशा'तून ज्या लीळा प्रस्तुत संपादणीच्या संहितेत अंतर्भूत केल्या आहेत, तसेच ज्यांचे प्रकरणवश सापडत नाहीत अशा दृष्टांतांच्या ज्या स्वतंत्र लीळा घातल्या आहेत त्याही चौकटी कंसात घातल्या आहेत. या लीळांच्या 'आदी' तारकांकित केल्या असून त्यांचे आधार व स्पष्टीकरण खाली तारकांकित टिपेत नमूद केले आहे. मूळ प्रमाण पाठात नसलेला मजकूर एक तर तिरप्या अक्षरांत दिला आहे किंवा तो चौकटीच्या कंसात घातला आहे हे यावरून दिसून येईल.

प्रमाण पाठात नसलेल्या काही लीळा अन्य प्रतीतून घेतल्या आहेत, काही प्रकरणवशातून घेतल्या आहेत, तर काही स्वतंत्रपणे सिद्ध करून घातल्या आहेत. अशा लीळांच्या 'आदि' तारकांकित करून त्या लीळांच्या तारकांकित टिपात त्यांचे आधार नमूद केले आहेत. अशा सर्व लीळा चौकटी कंसात छापल्या आहेत.

# ६

## म्हाइंभटांचे चरित्र[२२]

म्हाइंभट हे अहमदनगर जिल्ह्यातील सराळे या गावचे राहणारे. त्यांच्या पत्नीचे नाव देमाइसा. गणपती आपयो नावाच्या एका विद्वान पंडिताजवळ त्यांनी पाच शास्त्रांचा सांगोपांग अभ्यास केल्यावर 'प्रभाकर' नामक सहाव्या शास्त्राचा अभ्यास करण्याची त्यांना इच्छा झाली. पण महाराष्ट्रात या शास्त्राचा अभ्यास करता येत नव्हता. कारण, त्याच्या अभ्यासाने अभ्यासकाच्या अंगावर कोड फुटते किंवा त्याचा निर्वंश होतो, अशी समजूत त्या वेळी प्रचलित होती. म्हणून म्हाइंभट 'प्रभाकर' दर्शनाच्या अभ्यासासाठी तेलंगणातील विद्यानगरीला गेले. पूर्वपरीक्षा घेतल्यावाचून तेथील पंडित त्यांना शिकविण्यास तयार होईनात ; आणि ही परीक्षा काही सोपी नव्हती! एका देवतेच्या देवळात घंटा बांधलेली होती. हातात विडा घेऊन, डोळे मिटून, या घंटेला आपला स्पर्श होऊ न देता देवतेवर जो विडा वाहील तोच परीक्षेत उत्तीर्ण व्हायचा! या दिव्यातून म्हाइंभट तीन वेळा यशस्वी रीतीने पार पडले. त्यावरून त्यांच्या बुद्धिमत्तेविषयी तेथील पंडितांची खात्री झाली व त्यांनी त्यांना 'प्रभाकर' दर्शन शिकविले. याशिवाय आणखी इतर शास्त्रांचाही अभ्यास त्यांनी तेथे केला. या विद्याभ्यासामुळे व विशेषतः षट्शास्त्रप्रावीण्यामुळे प्रज्ञावंत म्हाइंभटांना गर्व चढला नसता तरच आश्चर्य! आपल्या बुद्धीच्या व विद्येच्या गर्वाने फुगून जाऊन ते आपल्या पायात तृणाची वाकी घालू लागले व दिवसाढवळ्या आपल्यासमोर दिवटी पाजळू लागले. हेतू हा की, इतर पंडित हे तृणाच्या वाकीप्रमाणे आपल्या पायाजवळ राहाण्याच्या लायकीचे असून आकाशातील सूर्य हा दिवसा पाजळलेल्या दिवटीप्रमाणे आपल्यासमोर निष्प्रभ आहे, हे इतरांच्या लक्षात यावे. अशा रीतीने विद्यासंपन्न पण गर्वाढ्य होऊन म्हाइंभट महाराष्ट्रात परत आले. त्यांनी अनेक पंडितांबरोबर वादविवाद करून त्यांना निरुत्तर केले. महाराष्ट्रातील पंडितांमध्ये, गणपती आपयो यांना थोडेफार काहीतरी येते, पण इतर पंडित तर अगदीच मंद आहेत, असे त्यांना वाटू लागले. हे पाहून गणपती आपयो एके दिवशी त्यांना म्हणाले की, डोंबेग्रामी असलेल्या श्रीचक्रधरांची आणि तुमची भेट झाली तर तुमच्या या विद्येचे चीज होईल. हे कळल्यानंतर, चक्रधरांशी वाद करण्याची म्हाइंभटांना तीव्र इच्छा झाली. पुढे लवकरच एके दिवशी गणपती आपयो डोंबेग्रामी असलेल्या श्रीचक्रधरांच्या दर्शनाला जाण्याला निघाले. त्या वेळी म्हाइंभटांना बरोबर घेऊन ते गेले. रस्त्याने जात असता, चक्रधरांशी कशा रीतीने वाद करायचा याचा विचार म्हाइंभट एकसारखा करीत होते. ते दोघे भामाठाणापाशी आल्यानंतर काही कामानिमित्त गणपती आपयो तेथेच राहिले; आणि तेथून डोंबेग्रामाकडे जाणाऱ्या पिंपळे वामन भटाबरोबर म्हाइंभट डोंबेग्रामाला गेले. गर्वाढ्यतेमुळे चक्रधराला साष्टांग प्रणिपात न करता त्यांनी केवळ कायाप्रणाम केला. तथापि, श्रीचक्रधरस्वामींच्या

२२ वि. भि. कोलते : श्रीगोविंदप्रभुचरित्र. प्रस्तावनेत आलेल्या म्हाइंभटांच्या चरित्रात आवश्यक ते बदल करून उद्धृत.

सन्निध्याचा परिणाम म्हाइंभटांवर झाल्याशिवाय राहिला नाही. स्वामींच्या दैवी प्रभावामुळे ते विङमूढ होऊन स्तब्ध राहिले. हे पाहून चक्रधरांनीच त्यांच्याशी वादाला सुरुवात केली. प्रथम मराठीत वाद चालू होता. पुढे म्हाइंभटांनी संस्कृतातून वाद घालायला सुरुवात केली. त्या वेळी अस्खलित व सुंदर संस्कृत भाषेत चक्रधर बोलू लागल्याचे पाहून म्हाइंभट आश्चर्यचकित झाले ! या वादात शेवटी म्हाइंभट निरुत्तर झाले. श्रीचक्रधरांवर व त्यांनी सांगितलेल्या श्रीगोविंदप्रभू अवतारावर ईश्वर म्हणून त्यांची श्रद्धा बसली. त्यांना बोध झाला. त्यानंतर स्वामींनी त्यांच्याजवळ ब्रह्मविद्येचे बरेच निरूपण केले. म्हाइंभटांनीही स्वामींना अनेक प्रश्न विचारून ज्ञान प्राप्त करून घेतले. सराळ्याला परतताना संसारातून निवृत्त होऊन चक्रधरांना अनुसरण्याचे विचार त्यांच्या डोक्यात घोळू लागले. (उत्त. १३३-१४२).

## पंथात प्रवेश : अनुसरण

अशा विचारातच म्हाइंभट घरी परतले. पुढे काही दिवसपर्यंत बाह्यतः प्रापंचिक कृत्ये ते करीत असत हे खरे, पण संसारनिवृत्तीचे विचार त्यांना काही केल्या सोडीनात. श्रीचक्रधरांचे अनुयायित्व स्वीकारण्याची तळमळ त्यांना एकसारखी लागली. अशा स्थितीत एका भावे द्वादशीच्या दिवशी शौचविधी आटोपून हातपाय धुण्यासाठी त्यांनी हातात मातीचे ढेकूळ घेतले व ते गंगेकडे गेले. वर पाणी पडताच हळूहळू विरघळणारे ते ढेकूळ पाहून मानवी जीविताच्या अशाश्वततेविषयीची त्यांची जाणीव उत्कटतेने जागृत झाली, आणि त्यांच्या निवृत्तिपर विचारांनी विशेष उचल खाल्ली. "सगळ्यांची व्यवस्था करून एका वर्षाने आपण निवृत्त व्हावे व अनुसरावे," असा विचार त्यांना सुचला. "पण त्यापूर्वीच आपला देह गेला तर ? बरे सहा महिन्यांनी, किंवा तीन महिन्यांनी, किंवा एक महिन्याने अनुसरलो तर ? पण त्यापूर्वीच आपण मृत्यू पावणार नाही कशावरून ?" म्हणून एका आठवड्याने निवृत्त होण्याचे त्यांनी ठरवले. पण तेवढ्यानेही म्हाइंभटांना समाधान झाले नाही. म्हणून दुसऱ्याच दिवशी निवृत्त होण्याचा त्यांनी बेत केला. पण दुसरा दिवस उजाडलेला दिसेलच हे तरी कशावरून ? कारण, या आयुष्याची शाश्वती काय ? मृत्यू केव्हा गाठेल हे कोण सांगू शकणार ? असे विचार मनात येताच म्हाइंभटांनी त्याच दिवशी अनुसरण्याचा विचार केला. तत्पूर्वी घरी जाऊन सगळी निरवानिरव करावी असे वाटले. पण तेही त्यांना पटले नाही. कारण, "घरी गेल्यावर आप्तेष्टांचा मोह पडून आपली वासना पालटणे शक्य आहे. छे छे ! त्यापेक्षा आताच गंगेवर जाऊन हातपाय धुऊन मार्गाला लागावे. पण गंगेवर जाण्याइतका वेळ तरी का घालवा ! कदाचित, गंगेवर जाताना एखादा सर्प आपणाला दंश करून आपला देह घेऊन जाईल. त्यापेक्षा ताबडतोब प्रपंचत्याग करून परमेश्वराला अनुसरणे बरे," असा विचार करून ते चालू लागले. चक्रधरांचे परिभ्रमण त्या वेळी त्याच विभागात होते. त्यांना अनुसरून त्यांचेच सेवादास्य करू लागलो तर कदाचित आपले आप्तेष्ट आपल्याला परत संसारात खेचण्याचा प्रयत्न करतील ; त्यापेक्षा त्यांच्यापासून दूर, परमेश्वरावतार म्हणून ज्या श्रीगोविंदप्रभूंचे नाव चक्रधरस्वामींनी सांगितले त्यांच्याकडेच जाऊन त्यांचे अनुसरण करणे अधिक चांगले, असा विचार म्हाइंभटांना सुचला. ते तसेच सरळ रिद्धपुरच्या मार्गे चालू लागले. रात्री एका गावी एका ब्राम्हणाच्या घरी ओसरीत निजले. दुसऱ्या दिवशी सकाळी पुन्हा चालू लागले. मार्गात एका ब्राम्हणाला आपली भारी किंमतीची पासोडी देऊन त्याचे घोंगडे त्यांनी घेतले. धोत्राचा एक भाग फाडून त्याची झोळी केली. भिक्षा मागितली. ती घेऊन गंगेवर भोजन करण्यासाठी गेले, तेव्हा धोत्राचा घामट वास व मिळालेली कदन्न भिक्षा, यामुळे इतकी घृणा निर्माण झाली की खाल्लेले अन्न ते ओकले. घरी परत

जावे, 'या सृष्टीत नाही, पुढील सृष्टीत अनुसरण करावे' असेही विचार त्यांच्या मनात आले. पण विवेकाने ते दूर करून म्हाइंभट रिद्धपूरच्या वाटेने पुन्हा चालू लागले. एके गावी भिक्षा केली त्या दिवशी घासभर अन्न पोटात गेले. दुसऱ्या दिवशी दोन घास गेले. अशा रीतीने घृणा जिंकून भिक्षान्नावर निर्वाह करीत करीत ते रिद्धपूरजवळील सिराळा गावी आले. मग 'पासवडीची पाटी' अकरा दामांना विकून एका दामाची दुरडी व दहा दामांचा गूळ घेतला. तो घेऊन ते रिद्धपूरला पोचले. वेशीजवळ एक मांग होता. त्याच्याजवळ श्रीप्रभूंची चौकशी केली. तो म्हणाला: 'ते आताच तिकोपाध्यांच्या घरी गेले:' मांग पाठीमोरा होताच, त्याने आपणाला देवाचा मार्ग दाखविला म्हणून म्हाइंभटांनी डोक्यावरील दुरडी उतरवून त्याला साष्टांग दंडवत घातले. दुरडी डोक्यावर घेऊन ते तिकोपाध्याचे घर विचारीत विचारीत तेथे गेले. ईश्वरावतार श्रीप्रभू यांना 'म्हाइंया येईल: तो गूळ आणील:' अशी अंतर्ज्ञानाने कल्पना होतीच. म्हाइंभटांनी श्रीप्रभूंसमोर गुळाची दुरडी ठेवली, साष्टांग दंडवते घातली आणि ते अनुसरले. श्रीप्रभूंच्या मठातील झाडणे पुसणे करून स्वयंपाकघरातील चुलीभानवस सारवून व राखपुंजा सांडून ते श्रीप्रभूंची सेवा करीत तेथे राहू लागले (उत्त. ५६४). म्हाइंभट हे अतिशय श्रीमंत होते. पण आता निवृत्त होऊन ते श्रीप्रभूंजवळ राहू लागले. आपल्या संपत्तीचा उपयोग ते श्रीप्रभूंच्या सेवादास्याप्रीत्यर्थ करू लागले. रिद्धपुरला श्रीप्रभूंकडे येणाऱ्याजाणाऱ्यांना रीतीभातीप्रमाणे शेलापागोटे किंवा चीरचोळी द्यायची असली म्हणजे ती म्हाइंभटच विकत आणीत असत (गोप्रच. ११२, १५२, १५३, २१३, २७२, २८३ वगैरे पाहा). रिद्धपुरला असताना ते सोन्याचांदीचा व्यापार करीत असावे असे दिसते (गोप्रच. २४९, ३०५). पण तो पैसा श्रीप्रभूंच्या सेवेला लावण्याच्या निमित्तानेच हा व्यापार होता. रिद्धपूर येथील गोविंदप्रभूंचा राजमढ व त्याभोवतालची जागा म्हाइंभटांनीच आपल्या पैशाने विकत घेऊन दिली होती.

## काही स्वभावविशेष

म्हाइंभट लहानपणापासून अभिमानी व गर्विष्ट होते. प्रथम त्यांना आपल्या विद्येचा गर्व होता; पुढे विरक्तीनंतर श्रीप्रभूंची सेवा करण्यासाठी 'आपण' पैसा देतो असा गर्व त्यांना वाटत असे. पण श्रीचक्रधरस्वामींनी जसा त्यांच्या विद्येचा गर्व नाहीसा केला तसाच श्रीगोविंदप्रभूंनी त्यांच्या सेवाद्रव्याचा गर्व नाहीसा केला (गोप्रच. २७१, २७२). चक्रधरांनी त्यांचा विद्येचा गर्व नाहीसा केल्यामुळे त्यांच्यासमोर त्यांची मान विनम्र होत असली तरी इतरांना मात्र ते तुच्छ लेखायचे. चक्रधरांच्या सेवेत असलेल्या नागदेवादिकांना ते 'सुंटदेव' समजत असत. त्यामुळे आरंभी नागदेवांना म्हाइंभट नमस्कारदेखील करीत नसत. पण याही बाबतीत चक्रधरांनी त्यांचा गर्व हरण केला. शंकराचार्यपिक्षाही नागदेव श्रेष्ठ असल्याची जाणीव म्हाइंभटांना झाली व तेव्हापासून ते नागदेवांना नमस्कार करू लागले (उत्त. १६८). त्यांनी स्वतःला एकदा 'योगभ्रष्ट' म्हणवून घेतले हा तरी त्यांच्या गर्वाढ्यतेचाच परिणाम नव्हे का? पण 'योगभ्रष्ट' "तवं माझीये दसेचा नव्हे: मां तुमचीये दसेचा काइ होइल?" (स्मृस्थ १९) असे नागदेवाचार्यांनी उत्तर दिल्यानंतर म्हाइंभटांना काय वाटले असेल याची कल्पना करावी. सारांश, म्हाइंभटांची पूर्वीची गर्वाढ्यता संसारनिवृत्तीनंतरदेखील पूर्णपणे नाहीशी झाली नव्हती.

अनुसरणानंतर त्यांची पत्नी देमाइसा ही त्यांच्याच सन्निध्यात राहात होती. श्रीगोविंदप्रभूचरित्रातील १९७ व १९८ आख्यायिकांत वर्णन केलेल्या प्रसंगावरून ही बाई विरक्त होती की आसक्त होती हे वाचकांनीच ठरवावे. तिच्या वर्तनामुळे म्हाइंभटांनी कोथळोबांवर जसा आक्षेप घेतला तसाच

एकदा गुरुकुळावर व विशेषतः महदाइसेवर घेतला होता. या दुसऱ्या प्रसंगी म्हाइंभटांच्या पिशवीतून देमाइसेने दोन आसू चोरून ते आपल्या चोळीत लपवून ठेवले होते. पण चतुर महदाइसेने तिची चोरी उघडकीस आणली (स्मृस्थ. पान १०२). गोप्रच. १४६व्या लीळेत या बाईच्या लबाडीची आणखी एक गोष्ट आलेली आहे.

श्रीगोविंदप्रभूंवर म्हाइंभटांची श्रद्धा मात्र अपूर्व होती; आणि म्हणूनच ते नेहमी त्यांच्या सेवेत निमग्न असायचे. "म्हाइंभटातें श्रीप्रभुदास्यावेगळे जो दाखवी तयांसि मी महावाक्य वाखाणिन:" (स्मृस्थ. २४७) असे नागदेवाचार्यांनी एकदा म्हटले होते, त्यावरून हीच गोष्ट दिसून येते. श्रीगोविंदप्रभूंच्या मृत्यूपर्यंत ते त्यांची सेवा करीत असत. मृत्यूनंतर त्यांना खांदा देणाऱ्या चौघांमध्ये म्हाइंभट एक होते. खास श्रीचक्रधरनिरूपित शास्त्रांमध्ये त्यांची फारशी गती नसावी (स्मृस्थ. ६८) ; तथापि, एकदंरीत त्यांचा अधिकार मोठा होता (स्मृस्थ. ६९ ; उत्त. ४८५) यात शंका नाही. इतराबरोबर वादविवाद करण्याचा प्रसंग येई त्या वेळी अनेकदा म्हाइंभटच वाद करायचे (गोप्रच. २७९ ; स्मृस्थ. १९२ वगैरे). अशा वादांच्या प्रसंगी ते संस्कृतातून बोलत असत (गोप्रच. २८०). एकदा तर यांच्या संस्कृत भाषणामुळेच यांची चोराच्या हातून सुटका झाली (स्मृस्थ. २०).

## म्हाइंभटांचे ग्रंथकर्तृत्व

या सर्व गोष्टींपेक्षा 'ग्रंथकार' म्हाइंभटांचे महत्त्व आपणाला विशेष आहे. म्हाइंभट हे स्वतः संस्कृत भाषेचे गाढे पंडित असूनही त्यांनी आपली बहुतेक रचना मराठी भाषेतून केली याबद्दल त्यांचे कितीही कौतुक केले तरी ते थोडेच होईल. आतापर्यंत उपलब्ध झालेल्या माहितीवरून तरी म्हाइंभट हे मराठीतील आद्य संशोधक व चरित्रकार म्हणून मानायला कोणतीच हरकत नाही. त्यांनी लिहिलेल्या चरित्रग्रंथांचे स्वरूप संकलनात्मक वाटले तरी गोळा केलेल्या आख्यायिका अन्वयी लावून, त्यातून सुसंबद्ध ग्रंथांची रचना केल्यामुळे त्यांना ग्रंथकर्तृत्वाचा मान देण्याला कोणतीही हरकत नाही. विशेषतः या चरित्रलेखनकार्यासाठी त्यांनी केलेले श्रम (मागे पा. ६१ पाहा) लक्षात घेतले म्हणजे त्यांच्या कार्याचे महत्त्व कळून येईल. श्रीचक्रधरस्वामींच्या आख्यायिका जेथेजेथे व ज्याच्याज्याच्याजवळ म्हणून सापडणे शक्य होते तेथेतेथे व त्याच्यात्याच्याजवळ जायला म्हाइंभटांनी कधी आळस केलेला नाही. "खेइभट कृषी करावेया जातिः त्यांसरीसे म्हाइंभटही जातिः खेइभट कृषीकर्म करीतिः आणि म्हाइंभट तयां मागांमागां गोसावीयाचीया लीळा पुसति : खेइभट सांघति : त्या म्हाइंभट नमस्करूनि घेति : मग भिक्षा करूनि जेवीति :" (स्मृस्थ. १४०). केवढी ही तळमळ आणि चरित्र संशोधनासाठी केवढा हा प्रचंड उद्योग! या प्रचंड उद्योगाला लागलेले मधुर फळ म्हणजे प्रस्तुत 'लीळाचरित्र' होय. श्रीप्रभूंच्या मृत्यूनंतर त्यांनी 'लीळाचरित्रा' प्रमाणेच 'ऋद्धिपुरचरित्रे' म्हणजे श्रीगोविंदप्रभूंचेही चरित्र लिहिले. या चरित्रग्रंथामुळे तेराव्या शतकातील मराठी भाषा, व्याकरण व वाङ्मय यांवरच नाही तर इतिहास, धर्म, समाज इत्यादिकांवरदेखील फार मोठा प्रकाश पडतो. या सर्वांचे श्रेय म्हाइंभटांकडेच द्यायला पाहिजे. सारांश, आद्य मराठी संशोधक म्हणून जशी म्हाइंभटांची कीर्ती अजरामर राहील तशीच आद्य चरित्रकार म्हणूनही राहील हे निर्विवाद होय.

## म्हाइंभटांचे काव्य : धवळ्यांचा उत्तरार्ध

म्हाइंभट केवळ गद्य लिहिणारे होते असे नाही, त्यांनी पद्यरचनादेखील केलेली आहे. महदाइसेच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या 'धवळ्यां'च्या उत्तरार्धाची रचना म्हाइंभट व लक्ष्मीधरभट यांनी केलेली

आहे (स्मृस्थ. १७४). 'धवळचां'चा हा उत्तरार्ध महदाइसेसाठी रचलेला असल्यामुळे तो तिच्याच नावाने ओळखला जाणे वाजवी आहे असे श्री. वा. ना. देशपांडे म्हणतात (आद्य. म. कव. प्रस्ता. ११). पण ते बरोबर नाही. काव्य कुणासाठीही लिहिलेले असो, ते ज्यांनी लिहिलेले असेल त्यांच्याचकडे त्याचे कर्तृत्व जाणे वाजवी ठरेल. म्हाइंभट व लक्ष्मीधरभट या दोघांपैकी, 'धवळचां'च्या उत्तरार्ध-रचनेचे बरेचसे श्रेय केवळ म्हाइंभटांचे असावे असे म्हणण्याला जागा आहे. कारण 'अन्वयस्थळा'च्या अनेक पोथ्यांतून 'धवळचां' चा उत्तरार्ध जसा म्हाइंभटांच्या नावावर निर्दिष्ट केला आहे तसा लक्ष्मीधरभटाच्या नावावर नाही. "आन धवळ म्हाइंभट संबंधुनि महदाइसातें सांघति तो श्रीगोविंद-प्रभुवरि गावविला :" असे हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त म्हटले आहे, तर "पंच श्लोक आणि धवळे करूनी : महदंबे लागूनी म्हणवीती :" (८३) असे कृष्णमुनीच्या 'अन्वय-स्थळा'त लिहिले आहे. यावरून 'धवळचां' चा उत्तरार्ध प्रामुख्याने म्हाइंभटांनी लिहिला असावा असे म्हणायला हरकत नाही.

## इतर पद्यरचना : जतीचा दशकु

'धवळचां'च्या उत्तरार्धाशिवाय इतर स्फुट पद्यरचना म्हाइंभटांनी केली आहे, पण ती फार थोडी आहे. 'चरणशरणपारं' इत्यादी पाच श्लोक व दहा मराठी आरत्या म्हाइंभटांच्या नावावर मोडतात. (हरिबास व सोंगोबास यांचे 'अन्वयस्थळ') या आरत्या 'जतीचा दशकु' म्हणून महानुभावीयांत प्रसिद्ध आहेत. या आरत्यांचे सगळेच चरण म्हाइंभटांनी रचले असे नाही, तर पूर्वीच्या आरत्यांत त्यांनी आपले काही चरण योजले म्हणून त्या त्यांच्या नावावर मोडतात. काही स्वतंत्र आरत्याही त्यांनी केलेल्या आहेत. त्यांनी केलेल्या आरत्यांची यादी हरिबास व सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'त पुढीलप्रमाणे दिली आहे :

"सकळा मंगळाची होए जइं वृष्टी : तिया माते ॥१॥
परम मंगळ जया : परम पावन जया ॥२॥
जएजएकारीं मंगळ उच्चारीं ॥३॥
परिएळी आरतिया उजळलिया ॥४॥
नारद तुंबर वीणा वाती ॥५॥
भुजंग जीणौनि आले मुरारी ॥६॥
परसरामें जो केला आचारी ॥७॥
जयाचि आवस्था तो पै भेटला ॥८॥
सकळ सिद्धान्ता अगोचरा ॥९॥
जए मंगळ मंगळा ॥१०॥
ऐसिया दाहा आरतिया."

या काव्यकर्तृत्वाविषयी एका पोथीतील वृद्धाचारात मला पुढील उल्लेख आढळला : "म्हाइंभटीं भटा विद्येमान श्रीप्रभुचां सन्निधानीं आर्तियाचा दशक केला : तेथ कांही सिद्धें पदें योजिली : कांही आपण गुंफिलीं : कोथोळोबासाचें नाव घातलें : तो गुरुकूळीं घोकिला : तो कवीश्वरबासीं टाचिला : तयाचिपरि श्रीप्रभुगोसावियाचां वियोगी म्हाइंभटी आपुली सामग्री इश्वरीं अर्पिली : म्हणौनि ते काइही

बंध न करितीचि : " यावरून श्रीप्रभूंच्या वियोगानंतर स्वतंत्र पद्यरचना म्हाइंभटांनी केली नसावी असे दिसते. वरील आरत्याशिवाय 'आजिचा दिन आम्हां सोनियाचा' ही आरती म्हाइंभटांच्या नावावर एका पोथीत असल्याचा उल्लेख श्री. वा. ना. देशपांडे यांनी 'स्मृतिस्थळा'च्या प्रस्तावनेत (पा. १५) केला आहे.

आपल्या आयुष्यातील शेवटचे दिवस म्हाइंभटांनी अटनविजनात घालविले. विरक्त वृत्तीने परमेश्वरस्मरण करीत अटनात असतानाच ते अत्यंत अशक्त झाले. आपला मृत्यूजवळ आला याची जाणीव त्यांना झाली. वाटेत त्यांना उमाइसा भेटली. तिला त्यांनी विनंती केली : " उमाइ : मला रिद्धपूरला घेऊन जाण्याची व्यवस्था कर :" उमाइसाने आपल्या जवळची मुदी गहाण टाकून भाड्याच्या पालखीत म्हाइंभटांना बसवले व त्यांना ती रिद्धपूरला घेऊन आली. या वेळी नागदेवाचार्य रिद्धपूरलाच होते. ते म्हाइंभटांना सामोरे आले. नागदेवाचार्यांचे चरण आपल्या हातांनी कवळून म्हाइंभट म्हणाले : "भटो : निडळावरि पावो ठेवा :" पण नागदेव म्हणाले : " निडळावरि श्रीचरणु तो गोसावियांचा किं :" म्हणून नागदेवांनी म्हाइंभटांच्या कपाळावर आपला हात ठेवला. काही दिवसांनंतर एक वेळ म्हाइंभट नागदेवाचार्यांना म्हणाले : " भटो मज देवो होईल ? " आपणाला असा प्रश्न म्हाइंभटांनी का विचारावा याचा नागदेव विचार करू लागले. ते स्तब्ध राहिलेले पाहून म्हाइंभटांना अत्यंत दुःख झाले आणि ते उद्गारले : " मी फार पापी आहे. मला कुठला देव होणार ! " तेव्हा नागदेवाचार्य म्हणाले : " म्हाइंभटो : तुम्हासि दोहीं देवांचें सन्निधान दास्य :—श्रीचक्रधरस्वामींनीदेखील तुमची फार प्रशंसा केली होती. तेव्हा तुम्हाला जर देव होणार नाही तर होणार कुणाला ?" हे उत्तर ऐकून म्हाइंभटांना समाधान वाटले. आपल्या अपराधांची सर्वांनी क्षमा करावी व मृत्यूनंतर श्रीगोविंद-प्रभूंना जेथे पुरले होते तेथेच जवळपास आपणाला पुरावे अशी प्रार्थना करून त्यांनी देह ठेवला (स्मृस्थ. १९८).

## ७

## चक्रधर चरित्र : पूर्ववृत्त

गुजरात प्रांतातील भरवस (भडोच) या गावी एक राजा राहात होता. त्याच्या प्रधानाचे नाव विशाळदेव. विशाळदेवाच्या पत्नीचे नाव माल्हाइसा. विशाळदेव व माल्हाइसा या दांपत्याला एक पुत्ररत्न झाले. त्याचे नाव हरिपाळदेव. हा हरिपाळदेव म्हणजे चक्रधराचा पूर्वावतार. हरिपाळदेव अत्यंत सुंदर व सर्वगुणसंपन्न होता. योग्य वेळी त्याचा विवाह झाला. त्याच्या पत्नीचे नाव कमळाइसा. तीसुद्धा त्याच्याप्रमाणेच रूपगुणसंपन्न होती. या संसारसुखात लोळत असताना हरपाळदेवाला कोणत्या रोगाने मृत्यू झाला ते सांगता येत नाही. पण हरिपाळदेव आजारी पडला व त्यातच त्याचा मृत्यू झाला. तिरडीवर बांधून त्याचे प्रेत स्मशानात नेण्यात आले. त्याच वेळी . . . .

त्याच वेळी द्वारावतीला दुसरे एक नाट्य घडत होते. द्वारावतीकार चांगदेवराउळ यांची योग-मार्गातील प्रसिद्धी ऐकून काउरळीची कामाख्या नावाची हटयोगिनी 'रतीचिया चाडा' त्यांच्याकडे गेली. पण ब्रम्हचर्याची प्रवृत्ती स्वीकारलेल्या द्वारावतीकारांनी तिला रती देण्याचे नाकारले. बळजबरीने ती त्यांच्या गुंफेत प्रवेश करू लागली. पण त्यांच्या योगसामर्थ्यामुळे तिला प्रवेश करता येईना. एक पाय गुंफेच्या आत व दुसरा पाय बाहेर, अशा स्थितीत ती सात दिवस अहोरात्र उभी होती. तिचा तो

आग्रह पाहून द्वारावतीकार चांगदेवराउळांनी योगसामर्थ्याने आपल्या शरीराचा त्याग केला. त्या शरीरातील त्यांचे अव्यक्त स्वरूप अवतार घेण्यासाठी नवीन शरीर शोधू लागले. तो त्याला स्मशानात आणलेले हरिपाळदेवाचे मृत शरीर दिसले. ईश्वरावतार द्वारावतीकार चांगदेवराउळ यांनी हरिपाळदेवाच्या त्या मृत शरीरात प्रवेश करून नवीन अवतार धारण केला. हाच चक्रधरावतार होय. हरिपाळदेव जिवंत झाला. त्यामुळे मातापिता, पत्नी कमळाइसा इत्यादिकांना झालेला आनंद काय वर्णन करावा ?

## द्यूतक्रीडा

हरिपाळदेवाचा सुखाचा संसार पुन्हा सुरू झाला. त्यांना एक मुलगाही झाला. काही काळ लोटल्यानंतर हरिपाळदेवाच्या आयुष्यात एक क्रांतिकारक घटना घडली. सर्वगुणसंपन्न हरिपाळदेव याने गोपाळमंत्राची दीक्षा घेतली होती. केव्हाही शपथ घ्यायची असली म्हणजे तो गोपाळाची म्हणजे श्रीकृष्णाची शपथ घेत असे. आपली स्वरूपसुंदर पत्नी कमळाइसा हिच्यावर त्याचे प्राणापलीकडे प्रेम होते. पण त्याला द्यूत खेळण्याचे व्यसन होते. हा त्याचा छंद केवळ राजवाड्यापुरताच मर्यादित राहिला नाही. गावातील जुव्वेबाजांच्या अड्ड्यावर जाऊनसुद्धा तो द्यूत खेळत असे. एके दिवशी तो तेथे जाऊन द्यूत खेळू लागला. एरवी तो नेहमी जिंकत असे, पण त्या दिवशी डावावर डाव हरू लागला. आपल्याजवळचे सर्व द्रव्य तो हरला. अंगावरील दागिने त्याने पणाला लावले, पण तेही तो हरला. नंतरचे डाव हरल्यानंतर जुव्वेबाजांनी म्हटले : "महाराज, आपले देणे घेणे पाहून पुढे खेळा." कारण हरिपाळदेवाने आपल्याजवळील सर्वस्व हरवले होते. इतकेच नाही तर जुव्वेबाजांचे पुष्कळ देणेही तो लागत होता. तरीही तो खेळत राहिला. राजवाड्यात परतण्याची वेळ झाली त्या वेळी जुव्वेबाजांनी म्हटले : "महाराज, आमचे देणे फेडल्याशिवाय आम्ही तुम्हाला जाऊ देणार नाही." हरिपाळदेव म्हणाला : "गड्यांनो, मी आण वाहतो की तुमचे देणे दिल्याशिवाय मी आज भोजन घेतले तर मला माझ्या गोपाळाची शपथ आहे. द्रव्याची व्यवस्था करण्यासाठी तरी मला जाऊ द्या." अड्ड्यावरील जुव्वेबाजांनी ते मान्य केले. हरिपाळदेव राजवाड्यात परत आला. आल्यासरशी आपल्या मंदिरात गेला. उशीर झाल्यामुळे कमळाइसा त्याची वाटच पाहात बसली होती. त्याला पाहताच तिने म्हटले : "आज इतका उशीर का ?" हरिपाळदेव म्हणाला : "कमळ, आज मी फार द्यूत खेळलो, आणि त्यात माझ्याजवळचे द्रव्य आणि अंगावरील दागिने हरलो, इतकेच नाही तर जुव्वेबाजांचे पुष्कळ देणे मला द्यायचे आहे. ते दिल्याशिवाय मी भोजन करणार नाही याबद्दल गोपाळाची आण मी त्यांच्याजवळ वाहिली आहे. हे बघ, तुझ्या अंगावरचे सर्व दागिने दे पाहू, म्हणजे मी त्यांचे देणे फेडून टाकीन." कमळाइसा म्हणाली : "स्वामी, हे दागिने मला माझ्या वडिलांनी केले आहेत. ते मी दिले तर बाबा माझ्यावर रागावणार नाहीत का ?" हरिपाळदेव म्हणाला : "अग, असं काय करतेस ? मी याच्या दुप्पट नवीन दागिने तुला करून देईन." कमळाइसा म्हणाली : "ते मला नकोत. मी हे दागिने देणार नाही." हरिपाळदेव म्हणाला : "तू दागिने देणार नाहीस तर तुला गोपाळाची शपथ आहे." कमळाइसानेही तितक्याच दृढ निश्चयाने उत्तर दिले की : "माझे हे दागिने मी तुम्हाला दिले, तर मलाही गोपाळकृष्णाची शपथ."

आपण जिच्यावर प्राणांहून अधिक प्रेम करतो त्या आपल्या पत्नीचे हे उत्तर ऐकून हरिपाळदेव अत्यंत विषण्ण झाला. न जेवताच तो पलंगावर पडून राहिला. त्याच्या आईने त्याची समजूत घातली,

पण तो उठला नाही. राजवाड्यातून परत आल्यानंतर विशाळदेवाला जेव्हा सर्व वृत्तांत समजला तेव्हा त्याने मुलाची समजूत घातली : "अरे, हे सर्व तुझेच नाही का ? देण्याची काय काळजी करतोस ?" असे म्हणून विशाळदेवाने जुव्वेकरांचे देणे देऊन टाकले. तेव्हा हरिपाळदेवाने भोजन केले.

## रामयात्रागमन

तथापि, या प्रसंगामुळे हरिपाळदेवाचे अंतःकरण प्रपंचातून उडाले. सर्वसंगपरित्याग करून निघून जावे, असे त्याच्या मनाने घेतले. रामयात्रेला जावे असा त्याने निश्चय केला. त्या वेळी गुर्जर आणि महाराष्ट्र यांच्यामध्ये युद्ध सुरू होते. या धामधुमीच्या काळात विशाळदेवाने हरिपाळदेवाला रामयात्रेला जाऊ देण्याचे नाकारले. पण त्याने आपला हट्ट सोडला नाही. एकेक दिवस एकेक पदार्थ वर्ज्य करून तो नाममात्र भोजन करू लागला. त्यामुळे त्याची मूर्ती अत्यंत क्षीण झाली. तेव्हा आईने विशाळदेवाला आग्रहाची विनंती केली की, "याला यात्रेला जाऊ द्या. युद्धप्रसंग चालू असल्यामुळे तुम्हाला कठीण वाटत असेल तर त्याच्याबरोबर सेवकांचा लवाजमा देऊन पाठवा." विशाळदेवाने ते मान्य केले. हरिपाळदेवाने सर्वांचा मूक अंतःकरणाने निरोप घेतला; आणि सेवकांचा लवाजमा बरोबर घेऊन तो रामयात्रेला निघाला. दरमजल, दरकूच करीत ते वाट चालू लागले. हरिपाळदेवाची विषण्णता दिवसेंदिवस अधिक वाढत होती. आपले कुशल वृत्त कळविण्याच्या निमित्ताने दररोज एकेका सेवकाला परत पाठविणे त्याने सुरू केले. मार्गक्रमण करीत करीत तो देऊळवाडा इथे येऊन पोचला. तेव्हा त्याच्याजवळ केवळ दोन सेवक राहिले होते. एके दिवशी रात्री त्यांचा डोळा लागलेला पाहून हरिपाळदेवाने आपली सर्व राजवस्त्रे व अलंकार तेथे काढून ठेवले; आणि केवळ दोन वस्त्रांनिशी तो तेथून बाहेर पडला. उदास अवस्थेत भ्रमण करीत करीत तो रिद्धपूरला जाऊन पोचला. तो तेथे त्याला काय दिसले ?

## श्रीप्रभूपासून शक्तिस्वीकार

तेथे रांधवणहाटात एक विरक्त पुरुष होते. त्यांनी एक अर्धे वस्त्र परिधान केले होते. त्याचा कासोटा मोकळा होता. बाकीचे अर्धे वस्त्र त्यांनी अंगावरून घेतले होते. त्यांच्या मिशा चांगल्या लांब असून दाढी बेंबीपर्यंत लोंबत होती. डोक्यावरील केशकलाप विखुरला होता. डावा डोळा किंचित मिटल्यासारखा दिसत होता. आकाशाकडे पाहून ते स्वतःशीच काही पुटपुटत आणि मधूनच हसत. त्यांच्या डाव्या हाताची करंगळी किंचित वाकडी होती. उजव्या हातात हलवायाच्या दुकानातील 'सेंगुळे बुडुडे' घेऊन ते अर्धवट चावीत आणि थूंकून टाकीत.

ती मूर्ती होती श्रीगोविंदप्रभूंची. त्यांचे दर्शन होताच हरिपाळदेवाने त्यांना कायाप्रणिपात केला. तेव्हा त्यांचे लक्ष त्यांच्याकडे गेले. दृष्टादृष्ट होताच हरिपाळदेवाने आपले दोन्ही हात जोडून त्यांना नमस्कार केला व त्यांचा जयजयकार केला. श्रीप्रभू आपल्या हातातील बुडुडे त्याच्याकडे फेकून एकदम उद्गारले : "आरे, घे घे म्हणे....घे ना म्हणे....आरे घे घे." ते बुडुडे झेलून, तो महाप्रसाद म्हणून हरिपाळदेवाने त्यांना पुन्हा नमस्कार केला. श्रीप्रभूंनी पुढे येऊन हरिपाळदेवाच्या मस्तकावर वरदहस्त ठेवला. त्या वेळी हरिपाळदेवाने श्रीप्रभूंपासून परावर या दोन्ही शक्तींचा स्वीकार केला. या शक्तीस्वीकारापूर्वी श्रीप्रभू हरिपाळदेवांना म्हणाले : "अरे, मेला जा.... चक्रा होय.... चक्रु होय म्हणे.... नव्हे म्हणे.... श्रीचक्रधरु होयचि म्हणे :" असे काही पाठात आहे. हाच श्रीचक्रधरांचा अवतार होय. श्रीप्रभूंपासून परावरशक्ती स्वीकारल्यानंतर हरिपाळदेवांचे श्रीचक्रधर झाले.

## पर्वतीक्रीडा : वयस्तंभिनी स्वीकार

श्रीप्रभूंचे दर्शन झाल्यानंतर चक्रधरांची विरक्तावस्था अधिक वाढली. ते उन्मनस्क झाले. अवस्थाभूत होऊन ते भ्रमण करू लागले. अमुकच वाटेने, अमुकच ठिकाणी जावे अशी मुळी त्यांची प्रवृत्तीच नव्हती. पाय नेतील तिकडे जायचे. अरण्यातून जाताना कधी त्यांचे वस्त्र काटयात गुंतून फाटून जायचे. मग उघडेच भ्रमण चालू व्हायचे. अंगावर काटयांचे ओरखडे जात. त्यातून रक्ताचे बिंदू निघत. ते तेथेच वाळायचे. त्यांच्या चाफेगौर मूर्तीवर सोन्यावरील माणकासारखे ते शोभून दिसत. चालताना त्यांचे वाऱ्याने उडत असलेले केस कधी काटयात गुंतत. पण ते सोडवण्याची प्रवृत्ती नाही. उलटचा वाऱ्याने ते सुटतील तेव्हा, किंवा जवळून जाणारा एखादा वाटसरू ते मोकळे करील तेव्हा ते पुन्हा चालू लागायचे. अशा रीतीने भ्रमण करीत करीत ते 'पर्वता'वर येऊन पोचले. या पर्वतावर स्वामी १२ वर्षे राहिले. तेथे असतानाच भर्तृहरीची पत्नी योगिनी मुक्ताबाईची भेट झाली. तिने अत्यंत प्रेमपूर्वक स्वामीचे चरणक्षालन व पूजाअर्चन केले. अशा उमनस्क स्थितीत भ्रमण करीत करीत एक बेळ ते कांति नगरीला पोचले. तेथे उधळीनाथ या नावाचे एक राजगुरु विद्यावंत राहात होते. त्यांच्याजवळ वयस्तंभिनी विद्या होती. तिच्यामुळे 'वळीत पळीत नैय : इयेसी सहश्रु वरीखे आयुक्ष :' ही विद्या स्वामींनी स्वीकारावी म्हणून उधळीनाथांनी विनंती केल्यावर स्वामींनी स्वीकारली. गुजराथच्या या राजकुमाराचे आधीच शरीर सुंदर, वर्ण चाफेगौर, मूर्ती सर्वावयवी सुंदर. वयस्तंभिनी विद्येच्या स्वीकारामुळे तिला आता अखंड तारुण्य प्राप्त झाले. त्यामुळे स्वामी अखेरपर्यंत २५-२६ वर्षांचे तरुण दिसत असत.

## आंध्रदेशी तेलिकारा भेटि

अवस्थाभूत स्थितीत ही सर्वांगसुंदर मूर्ती आंध्र प्रदेशात भ्रमण करीत असताना एके गावी पोचली. पहाट फुटायची होती. एका घराच्या अंगणात एक बाई झोपली होती. उन्मनस्क स्वामी तिच्याच बाजेवर पाठीशी पाठ लावून, तिचे पांघरूण अंगावर घेऊन झोपले. त्यामुळे उडालेला गहजब काय वर्णन करावा ! नदीवरून परत आलेल्या तिच्या पतीने, आपल्या पत्नीशेजारी झोपणाऱ्या या स्वामीचा शिरच्छेद करण्यासाठी खड्ग उपसले. स्वामींनी आपल्या निष्काम, विरक्त व प्रेमपूर्ण नजरेने त्याच्याकडे पाहिले मात्र, तोच त्याला, आपल्या घरी प्रत्यक्ष ईश्वरावतार आला असा साक्षात्कार होऊन त्याच्या हातातील खड्ग गळून पडले. त्याने स्वामींची पूजाअर्चा केली. स्वामी त्याच्याच घरी झोपले. रात्री त्यांना तहान लागली. पण आपल्या मौनपूर्ण विरक्तावस्थामुळे त्यांनी कुणाकडेही पाणी मागीतले- सुद्धा नाही. ते उठून तुंगभद्रा नदीवर पाणी पिण्यासाठी गेले. तुंगभद्रा तुडुंब भरून वाहात होती. काठावरील एका टेकाडावर बसून ओंजळीने ते पाणी पिऊ लागतात न लागतात तोच ते टेकाड खचले आणि स्वामी तुंगभद्रेच्या लाटा नेतील तिकडे गटांगळ्या खात वाहात जाऊ लागले. सकाळच्या प्रहरी तुंगभद्रेच्या लाटेने ते काठाला लागले. अशी त्यांची ही विरक्ती !

## भक्ता भेटि

स्वामींचे भ्रमण पुन्हा सुरू झाले. एके गावी ते पाणीपात्र भिक्षा मागत होते. एका ब्राम्हणाने त्यांना पाहिले. त्यांच्या अलौकिक तेजाने प्रभावित होऊन त्याने स्वामींना घरी नेले आणि ठेवून घेतले. आपल्या बहिणीला त्यांच्या सेवेसाठी ठेवले. एके दिवशी रात्री ती बहीण स्वामींचे चरणसंवाहन करीत असताना तिला निद्रा आली, आणि तिचे डोके स्वामींच्या चरणावर लीन झाले. ब्राम्हणाला

वाटले की, ही यांना प्रवृत्त करीत आहे. या भलत्याच संशयामुळे त्याने क्रोधसंतप्त होऊन आपले खड्ग उपसले. तो वार करणार एवढ्यात स्वामींनी कृपादृष्टीने त्याच्याकडे पाहिले, तोच त्याचा राग कुठच्या कुठे निघून गेला. त्या वेळी स्वामींनी त्याच्या ठिकाणी चार कळिकांचे प्रेम संचरले. तो स्वामींचा अनन्य भक्त बनला, इतका की,—

सर्वसंगपरित्याग करून तो स्वामींच्या बरोबर निघाला. एक वेळ एके गावी स्वामींनी त्यांना म्हटले : " भटो, हे पैला गावी असैल : मासा पाखा हे तुम्हां दर्शन देईल : " त्याप्रमाणे नदीच्या अलीकडील गावी भक्त राहिला व पलीकडील गावी स्वामी राहिले. पण भक्ताला स्वामींचा वेध इतका की दररोज त्यांच्या सुखस्वास्थ्याची चौकशी केल्याशिवाय त्याला राहवेना. स्वामी ज्या गावी राहिले होते त्या गावातील एक ब्राम्हण, भक्त ज्या गावी होता त्या गावी भिक्षा मागण्यासाठी येत असे. त्याच्याजवळ हा नेहमी चौकशी करायचा. एके दिवशी त्या भिक्षुकाला वाटले : " काइ पां ? स्त्रियांसी पुरुखांचा वेधु : पुरुखांसि स्त्रीयेचा वेधु : पुरुखांसि पुरुखांचा एसणा वेधु काइसा पां ? " असा विचार त्याच्या मनात येऊन त्याने खोटेच सांगितले की : " काय तुम्हाला माहीत नाही ? सर्पदंशाने त्यांचा मृत्यू झाला ! " भक्ताने त्रिवार तेच विचारले. भिक्षुकाने त्रिवार तेच उत्तर दिले. त्यासरशी भक्ताचा देह कोसळला आणि तो मृत्यू पावला. हे कळताच स्वामी दुःखित अंतःकरणाने त्या भिक्षुकाला म्हणाले : "आहा : ओखटें केलें : हां भटो : ऐसा सत्यहि अर्थो न बोलिजे : मां एसणें असत्य तुम्हांसि कैसें बोलविलें ? " स्वामींनी त्या भिक्षुकाला कुदळफावडे आणायला सांगून आपल्या भक्ताचा अंत्यसंस्कार केला आणि त्यांचे परिभ्रमण पुन्हा सुरू झाले.

## हंसाबेशी विवाह

भ्रमण करीत करीत स्वामी वरंगळला पोचले. तेथे एका श्रीमंत मल्लाने त्यांची पूजा करून त्यांना पाच हजारांची रत्ने जडलेला एक जोगवटा अर्पण केला. पण नंतरच्या परिभ्रमणात स्वामींनी तो एका ब्राम्हणाला देऊन टाकला. एका गावी घोड्यांची हेड घेऊन वरंगळला जाणारे काही हेडाऊ त्यांना भेटले. त्यांच्याबरोबर स्वामी पुन्हा वरंगळला आले. हेडाऊंच्या घोड्यांची खरेदीविक्री करीत असताना एका व्यापाऱ्याने त्यांना पाहिले. आपल्या मुलीला हा अनुरूप वर आहे असे पाहून त्याने स्वामींना म्हटले : " जी जी : मातें कन्यारत्न एक असे जी: मी तियां कारणे पाइं कापडें बांधौनि बहुत हिंडीनलां : परि तिये जोगा वरू कव्हणि ठाइं नाहीं जी : गोसावी होती : तरी ते माझें कन्यारत्न स्वीकारावें जी : " स्वामी म्हणाले : " यासि जातिकुळ नाहीं : " व्यापारी म्हणाला : " गोसावी ईश्वरु . . . . ईश्वरासि काइ जातिकुळ असे ? " तेव्हा स्वामी पुन्हा म्हणाले : " तरि एथ खुंटदावें नाहीं : " व्यापारी म्हणाला : " तेहि गोसावी जी : " स्वामी पुन्हा म्हणाले : " तरि यासि करावेया कांहींचि वीत नाही : " व्यापारी म्हणाला : " दोहींकडून वऱ्हाड आम्हीचि करुनि : " झाले, विवाह ठरला. गोधुळीचे लग्न झाले. सारे सोहळे झाले. स्वामी दुसऱ्यांदा विवाहबद्ध होऊन हंसाबेबरोबर संसार करू लागले.

असे असता, एके दिवशी हे दांपत्य माडीवर बसून सारीपाट खेळत होते. तेव्हा रस्त्यावरून एक विरक्त अवधूत जात होता. स्वामींची नजर त्याच्यावर गेली. त्यांची विरक्ती पुन्हा जागृत झाली. आणि ते उद्गारले : " ऐसेया होइजैल : " हंसाबा म्हणाली : " छे छे ! आपण असे कसे होणार ? " असे म्हणतम्हणतच मूर्च्छा येऊन ती एकदम खाली पडली. स्वामींनी तिला सावरले आणि म्हटले : "छे छे ! तुमतें सांडौनि कें जाइजैल ? हें तुमतें चाळवितांए कीं : " तथापि, स्वामींनी हंसाबेला

स्वरूपदर्शन विद्या संक्रमून तेथून ते निघून गेले. या विद्येमुळे, स्वामी आपल्याजवळच आहेत असा भास हंसाबेला आमरण होत होता.

## डाकरामी व्याघ्रविद्रावण: घोडाचूडीशिष्यांभेटि

हंसाबेला सोडून पुन्हा विरक्त वृत्तीने भ्रमण करीत करीत स्वामी डाकराम या गावी पोचले. त्या गावातील भीवेश्वराच्या देवळात रात्री एक वाघ नेहमी येऊन झोपायचा. आपल्या सिंहगर्जनेने स्वामींनी त्याला कायमचे पळवून लावले. तेथून निघाल्यानंतर एका तेली दांपत्याची आणि त्यांची भेट झाली. स्वामींनी दिलेल्या स्थितीमुळे ते दांपत्य 'झाडिमंडळीं देवो आणि देवी होऊनि वर्तते असाति:' असे की, एके दिवशी स्वामींजवळून ' मुगुटें मुड्डप झगटुनि ' ते गेले, पण स्वामींना त्यांनी ओळखलेही नाही. पुढील एका गावी एका मुलाला लागलेला ग्रह त्यांनी काढला. एक वेळ किष्किंध पर्वताकडून येताना वाटेत त्यांना घोडाचुडीचे शिष्य भेटले. त्यांच्याबरोबर मार्गक्रमण करीत असताना एके गावी ते शिष्य चाटणी करीत होते. तेव्हा एका बाईने कढतकढत आंबील त्यांच्या ओंजळीत टाकली. त्यामुळे संतप्त होऊन त्याने आपला हात वळणीला पुसला. लगेच तेथे आग लागली आणि अवघा गाव जळू लागला. तरी ते शिष्य हसतच होते. स्वामी त्यांना म्हणाले : " महात्मे हो : एसाणी भूर्तहिंसा केली परी तुम्हां खीणभरीहि घृणा नुपजे ? आणि वरी हासत असा ? आतां हे तुमचेनि सांघातें नैय : " असे म्हणून स्वामी त्यांना सोडून तडक रिद्धपूर येथे श्रीप्रभूंच्या भेटीला आले.

## भांडारेकारांची भेट

तेथील एक मातंग श्रीप्रभूंसाठी क्षेत्रखाजे आणि पाणी आणून ठेवीत असे. श्रीप्रभूंबरोबर त्यांचा प्रसाद म्हणून स्वामीही तो सेवन करीत. श्रीप्रभूंची भेट घेऊन नंतर स्वामींनी काही दिवस विंध्य पर्वतातील गोंडवाड्यात घालवले. येथून निघाल्यावर भ्रमण करीतकरीत एके दिवशी ते एका झाडाखाली बसले असताना पारध्यांचा होडेचा ससा भयभीत होऊन धावतधावत स्वामींच्या आश्रयार्थ आला. स्वामींनी त्याचे संरक्षण केले. तेथून निघून सेंदुर्जन, भोगराम (रामटेक), मनसीळ या मार्गाने ते भंडाऱ्याला येऊन पोचले. तेथे भांडारेकरांची व त्यांची भेट झाली. स्वामी पाणीपात्र भिक्षेसाठी दारासमोर गेले तेव्हा भांडारेकार आपल्या घराच्या ओसरीत बसून पोथी वाचताना काही संदर्भ पाहात होते. स्वामींनी म्हटले : "भटो : मागील फाकी पाहा :" हे ऐकताच भांडारेकरांनी बाहेर पाहिले स्वामींची आणि त्यांची नजरानजर झाली. त्यासरशी ' हा ईश्वरावतार असून आपला खरा हितकर्ता आहे ' अशी प्रतीती त्यांना आली, आणि ते तसेच घरदार सोडून स्वामींना अनुसरले व त्यांचे सेवादास्य करू लागले. भांडारेकरांच्या सेवादास्याची स्वामींनी पुढे आपल्या भक्तजनांसमोर अनेकदा प्रशंसा केली आहे. त्यांना बरोबर घेऊन स्वामी अळजपूरला व तेथून नांदेडला गेले. नांदेड येथे असताना भांडारेकारांना ' बाहिरती 'चा उपद्रव झाला. ते फार अशक्त झाले. स्वामींनी त्या वेळी त्यांची स्वत: शुश्रूषा केली. त्यांची बाहिरतीची घाण ते स्वत: काढून धूत असत. नांदेड येथेच भांडारेकारांचा मृत्यू झाला. विषण्ण अंत:करणाने त्यांचा अंत्यसंस्कार करून स्वामी पुन्हा एकाकी भ्रमण करू लागले. एखाद्या गावी त्यांनी गुराख्याबरोबर खेळ खेळावा. त्यांच्या गाई राखाव्या, कुठे द्यूत खेळावे, कधी वेठबिगार करावी, उकिरड्यात झोपावे. एक वेळ तर चोर म्हणून इतर चोरांबरोबर स्वामींनाही खोड्यात घातले. अधिकाऱ्यांनी स्वामींना ओळखले आणि त्यांचा खोडा काढायला सांगितले. पण आधी सांगाति ' म्हणून त्यांनी त्याचा खोडा काढायला सांगितले, नंतर आपला. आपल्याआधी आपल्या

सांगात्याचे सर्व सोपस्कार त्यांनी करवून घेतले. अशा लीळा करीतकरीत स्वामी लोणारला पोचले तेथे सिंघणाचा पुत्र कन्हरदेव यादव याने त्यांचे दर्शन घेतले. त्याने अर्पण केलेल्या आसूंच्या वाखारीकडे स्वामींनी ढुंकूनही पाहिले नाही. कन्हरदेव ती वाखारी तिथेच सोडून गेला. स्वामींनी ते द्रव्य खर्च करून तेथील कुमारेश्वराच्या देवळाची पौळी आणि धारेचा घाट बांधला. जाईच्या देवळाजवळ वाघिणीची पिले त्यांनी खेळवली.

## आंबजै येथे रामदेवाची भेट

ठिकठिकाणी अशा अनेक क्रीडा करीत ते झाडिमंडळात भ्रमण करीत असताना तेथे स्वारीवर आलेल्या रामदरण्याची व त्यांची भेट झाली. त्यांच्याबरोबर ते अळजपूरला गेले. तेथे असताना ते दररोज अंबिनाथाच्या देवळात दर्शनाला जात व अंबिनाथाला विडा अर्पण करीत. रामदरणा व त्याची आई स्वामींची अत्यंत भक्तीने पूजाअर्चा करीत. पण एके दिवशी त्यांच्यावरही उदास होऊन स्वामी तेथून निघाले. ते वडनेरला येऊन पोचले. तेथील उत्तरेश्वराच्या देवळात रात्री झोपले असताना त्यांच्या वक्षस्थळावर वरून दोन सर्प पडले. ते दोन्ही हातांनी धरून त्यांनी दूर फेकून दिले. मग ते जवळच्या आंबजै गावी गेले. तेथे रामदेवाची भेट झाली. रामदेवाने स्वामींच्या लीळाचमत्काराच्या कथा ऐकल्या-नंतर प्रत्यक्ष दर्शन होताच स्वामींवर ईश्वरावतार म्हणून त्याची श्रद्धा जडली. तथापि, तो देवताभक्तीत रममाण असे. असे दिसते की त्याने स्वामींजवळून एका देवतेची विद्या मागून घेतली. स्वामीनींही त्याला त्या देवतेची विद्या दिली. त्यामुळे प्राप्त झालेल्या सामर्थ्यामुळेच तो स्वतः श्रेष्ठ विद्यावंत म्हणून वावरू लागला. त्यामुळे पुढे त्याला अनेक शिष्य मिळाले. त्यात आबाइसा, महदाइसा, उमाइसा, नागदेव वगैरे प्रमुख होत. या सर्वांना स्वामींकडे आणण्याला रामदेवच निमित्त झाला होता. त्यामुळे स्वामींच्या चरित्रात त्याला विशेष महत्त्व आहे.

## मेहकरला अवस्थान

रामदेवाच्या भेटीनंतर स्वामी पातुरडी, आलेगाव, विसै, आंजन या मार्गाने मेहकरला येऊन पोचले. बाणेश्वराच्या मंदिरातील बोणेबाईच्या आग्रहाने ते तेथे काही दिवस राहिले. गोकुळा-ष्टमीच्या दिवशी बोणेबाईला देवकी मानून स्वामींनी स्वतः बालमूर्ती धारण केली व अशा रीतीने गोकुळाष्टमी साजरी केली. बोणेबाईबरोबर एक वेळ लोणारची यात्राही ते करून आले. नंतर तिच्याच आग्रहाने सिंहस्थयात्रेच्या निमित्ताने ते पैठणला जाऊन पोचले. पैठण येथे स्वामींच्या आयुष्यातील दुसरा एक महत्त्वाचा प्रसंग घडून आला.

## पैठण : बाइसांना प्रेमसंचार

पैठण येथे नागुबाई नावाची एक वृद्ध तपस्विनी होती. ती पयोव्रती होती. तिला आपल्या मार्गाचा, ज्ञानाचा व आचाराचा फार गर्व होता. बोणेबाईकडून स्वामींचे नाव व त्यांची लीळाचरित्रे ऐकल्यावर तिला त्यांच्या दर्शनाचा वेध लागला. दुसरे दिवशी मार्गात तिला एक अदृष्टपूर्व पुरुष दिसले. ती वेधली. बोणेबाईने ज्यांचे वर्णन केले ते हेच पुरुष असले पाहिजेत म्हणून तिने ओळखले व त्यांना ती आपल्या मठात घेऊन आली. पण आपल्या त्रिदोषामुळे तिने स्वामींना बसायला पायपुसणे दिले व जेऊ वाढले तेही दूधभोपळ्याच्या करवंटीत. दुसऱ्या दिवशी बोणेबाईबरोबर स्वामी त्र्यंबकाला जायला निघाले. त्यांनी जाऊ नये म्हणून नागुबाईनी पुष्कळ आग्रह केला. पण तो न ऐकता स्वामी निघाले. तथापि,

नदी ओलांडून जात असतानाच त्यांनी त्र्यंबकाला जाण्याचे रद्द केले. नागुबाईने त्यांना पुन्हा मठात आणले. त्या वेळीही बसायला पायपुसणे व भोजनाला दूधभोपळ्याची करवंटीच तिने स्वामींना दिली. तिसऱ्या दिवशी तिचे त्रिदोष नाहीसे केल्यावर स्वामींनी तिच्या दृष्टीला दृष्टी भिडवली व तिच्या ठिकाणी एका कळिकेचे प्रेम संचरले. त्यासरशी, आपल्या पूर्ववर्तनाबद्दल पश्चाताप होऊन, गडबडा लोळून ती स्वामींची क्षमा मागू लागली. ती त्यांची भक्त बनली व स्वामींचे सेवादास्य करू लागली. एकदोन दिवसानंतर त्यांची शिष्या हांसुबाई व शिष्य पांडा हेही स्वामींचे सेवक बनले. ही नागुबाई म्हणजे बाइसा. प्रेमसंचारानंतर ती सदैव स्वामींजवळ राहून त्यांचे सेवादास्य करी. स्वामींचा त्रिकाळ पूजावसर करी. स्वामींनीही आपली सर्व व्यवस्था करण्याचे काम सर्वस्वी बाइसांच्या स्वाधीन केले होते.

## पैठण येथील चरित्रे

पैठणला स्वामी सुमारे दहा महिने राहिले. त्यांचे वास्तव्य भोगनारायणाच्या देवळात होते. स्वामी म्हणजे प्रत्यक्ष श्रीचांगदेवराउळ ईश्वरावतार, नव्हे, श्रीकृष्णावतार होत, अशी त्यांची कीर्ती हळूहळू आसमंतात पसरली व त्यांच्या दर्शनार्थ दुरूनदुरून मंडळी येऊ लागली, आणि भक्तजनांचा परिवार गोळा होऊ लागला. देइभट, लखूबाइसा, उपाध्ये, सारंगपंडित, कास्ते हरिदेवपंडित, वामदेव, देमाइसा, महादेव पाठक, राघवदेव, गदोनायक, ब्रम्हचारीदेव, चांगदेव इत्यादिकांचा त्यात समावेश होता. यांत पुरुष होते, स्त्रिया होत्या, विद्वान होते, अविद्वान होते, महंत होते, त्यांचे शिष्य होते, लहान मुले होती, मुली होत्या. सर्व प्रकारच्या व्यक्ती त्यांच्याकडे वेधल्या जाऊ लागल्या. ग्रहे सारंगपाणीची भूतबाधा त्यांनी झाडली, भूतसृष्टी आपणाला वश आहे असे म्हणणाऱ्या वामदेवांना त्यांनी दाखविले की भूत-सृष्टी त्यांना वश नसून स्वामींना वश आहे. गोपाळमंत्राचे भेद निरूपण करताना कास्ते हरिदेव-पंडितांना त्यांनी सांगितले की :' एक भेदु तो कव्हणीच नेणे––रुक्मिणी देवी जाणे कां श्रीकृष्णचक्रवर्ती जाणती :' साहजिकच हरिदेव पंडिताच्या लक्षात आले की स्वामी श्रीकृष्णावतार असले पाहिजेत, एरवी त्यांना हे कसे ठाऊक असणार ? अशा लीळांमुळे त्यांची कीर्ती पसरू लागली. पुराणवक्ता सारंगपंडित त्यांच्याकडे वेधला गेला. स्वामींही त्याच्या घरी जाऊन त्याच्या लहान मुलीशी–धानाइसासी खेळत. एक वेळ तिची समजूत घालताना 'साळैचे घर मेणाचे ' ही प्रसिद्ध लोककथा स्वामींनी तिला सांगितली. देमाइसाला योग्य गुरू मिळेना. लखुबाइसांच्या सांगण्यावरून तिने स्वामींना आपले गुरू मानले. अशा रीतीने कालक्रमण केल्यावर स्वामी चांगदेवभटाला घेऊन रिद्धपूरला श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी जाऊन आले. आल्यावर त्यांनी वेरूळ येथे अवस्थान केले.

## वेरूळ

वेरूळजवळच सुप्रसिद्ध लेणी आहेत. त्यातील अनेक लेण्यांत स्वामी भक्तजनांसहित विहरणाला जात असत. स्वामी वेरूळ येथे असताना रामदेव दादोस आपल्या शिष्यांसहित स्वामींच्या भेटीला आले. स्वामींना 'कैसा अवसरू असे ' हे पाहण्यासाठी त्यांनी जानो उपाध्यांना पुढे पाठविले. उपाध्यांना स्वामी हे श्रीकृष्णावतार आहेत अशी प्रतीती आधीच आली होती. पण आपले गुरु रामदेव दादोस यांच्यावरही त्यांची तशीच बुद्धी होती. तेव्हा 'बटिका: महात्मा म्हणिजे आणीक जीव तैसा तो एक जीऊ ऐसे जाणीजे हो:' असे सांगून त्यांची रामदेवांवरील ईश्वरबुद्धी त्यांनी काढली. जीवदेवतांच्या भक्तीहून ईश्वरभक्ती श्रेष्ठ या स्वामींच्या तत्त्वज्ञानाच्या प्रतिपादनाचाच हा भाग होय. तथापि, देवतांच्या व

देवतासामर्थ्याच्या कथा सांगून त्यांचा अवमान न करण्याचाही उपदेश स्वामी आपल्या शिष्यांना करीत.

वेरूळ ही त्या वेळच्या महाराष्ट्राची राजधानी. देवगिरीच्या अगदी जवळ. स्वामी वेरूळला आले आहेत असे ऐकून राजधानीतील अनेक राजपुरुष त्यांच्या दर्शनाला येऊ लागले व त्यांच्याकडे वेधू लागले. रायाचे गुरु ब्रम्हसानु यांना भीती वाटली की, 'आतां हे रायातेंही आदिकरूनि वेधिती : पाहाटे राओ जाइल तरि यांचाचि होइल : ' म्हणून स्वामींचा काटा काढण्यासाठी त्याने आपल्या शिष्यांच्या कडून विषाने घोळलेल्या सुपारीच्या फोडी देऊन त्यांना मारण्याचा प्रयत्न केला. पण स्वामींनी तो आपल्या सामर्थ्याने हाणून पाडला. स्वामींच्या व त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसिद्धीची ही प्रतिक्रियाच होय. आपल्या दरबारातील राजपुरुषांकडून स्वामींची कीर्ती ऐकून महादेवरायही खरोखरच त्यांच्याकडे वेधला. त्यांचे दर्शन घेण्याची उत्कट इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली. तो स्वामींच्या दर्शनाला दुसऱ्या दिवशी पहाटे निघायचा होता. पण स्वामींच्या मनात त्याला दर्शन द्यायचे नव्हते. कारण, आपले दर्शन झाले तर महादेवराय राज्यत्याग करून आपला सेवक होऊन राहील याची त्यांना खात्री होती. राज्यधर्माच्या दृष्टीने असे व्हायला नको होते. म्हणून राजाचा, आपल्या दर्शनाला येण्याचा मनोदय कळताच स्वामींनी रात्रीच प्रस्थानाची तयारी करून वेरूळ सोडले व ते सिन्नरच्या मार्गाला लागले.

## सिन्नर : नागदेवाला दर्शन

स्वामींचे दर्शन होऊ शकले नाही म्हणून खिन्न झालेला महादेवराय तसाच माहिंबा ठाण्याकडे फिरतीवर गेला. परत येताना स्वामी सिन्नरला आहेत हे कळताच तो सिन्नरला आला. पण तेथेही आपले नाव लपवून स्वामींनी त्याला दर्शन दिले नाही. स्वामी सिन्नरला येण्यापूर्वी तिकडे रावसगावला एक प्रसंग घडला होता. माधवभटांची विधवा पत्नी आबाइसा ही आपली विधवा मुलगी उमाइसा व पुतणी महदाइसा यांना घेऊन रावसगावी गंगेच्या काठावर गुंफा बांधून राहात होती. त्यांनी रामदेव दादोस यांना आपले गुरू केले होते. एके दिवशी दादोस त्यांना भेटायला आले. गुंफेबाहेर त्यांच्या वहाणा होत्या. त्याच वेळी आबाइसाचा मधला मुलगा नागदेव तेथे आला. हा नागदेव फार व्यसनी होता. गुंफेबाहेर पुरुषाच्या वहाणा पाहून त्याला शंका आली. गुंफेत प्रवेश करून तो रागाने आबाइसाला बोलू लागला. आबाइसाने त्याची समजूत घातली व म्हटले : "या महात्म्याविषयी असे बोलू नकोस. ते फार चांगले आहेत. त्यांच्यापासून आम्हाला आनंद होतो." नागदेव म्हणाला : "का होणार नाही ? स्त्रियांना पुरुषांपासून आनंद होणारच. तुम्हाला जसा आनंद होतो तसा मला होईल ?" आबाइसा म्हणाली : "अवश्य होईल. मी त्यांना जेवायला सांगितले होते. जा, त्यांना बोलावून आण." नागदेव गेला, त्याने दादोसांना बोलावले व तेही कोणताही राग मनात न आणता आले. दोघेही एका पंक्तीत जेवले. नंतर दादोस गंगेवर गेले. आबाइसाच्या सांगण्यावरून नागदेवही त्यांच्याकडे गेला व त्यांच्यासमोर बसला. नागदेवाने विचारले : "तुमच्यापासून म्हणे आनंद होतो ?" दादोस म्हणाले : "आमच्यापासून आनंद होतो व होतही नाही. पण आमचे गुरु श्रीचांगदेवराउळ यांच्यापासून मात्र निश्चित होतोच." श्रीचांगदेवराउळांचे म्हणजे स्वामींचे नाव ऐकताच नागदेवाला स्थिती झाली. स्थिती भंगल्यानंतर त्याने विचारले : "तुम्ही आता कोठे जाता ?" दादोस म्हणाले : "आम्ही आमच्या गुरूच्या, दर्शनाला जात आहो." "सध्या ते कोठे आहेत ?" दादोस म्हणाले : "सिन्नरला." नागदेव म्हणाला : "मग त्यांच्या दर्शनासाठी तुमच्याबरोबर आम्हालाही घेऊन जा ना." दादोसांनी संमती दिली. यानंतर

नागदेवाने रामदेव दादोसांचे शिष्यत्व स्वीकारले. ते सर्वजण साडेगावाला आले, व तेथून आबाइसा, उमाइसा, महदाइसा, इत्यादी आपल्या शिष्यांसहित स्वामींच्या दर्शनासाठी दादोस सिन्नरला येऊन पोचले. दादोस आणि नागदेव पूजाद्रव्ये आणण्यासाठी बाजारात गेले, तेवढ्यात महदाइसा व उमाइसा उत्कंठेने स्वामींच्या दर्शनाला गेल्या. स्वामी भीलमठाच्या आंगणात वेढे करीत होते. त्यांचे सौंदर्य व ऐश्वर्य पाहून त्या वेधल्या. स्वामींनीही त्यांची आस्थापूर्वक चौकशी केली. महदाइसेकडे तर ते विशेष आकृष्ट झाले. त्यांनी तिला 'आपले' म्हटले. तेवढ्यात दादोस व नागदेव आले. त्यांनी स्वामींची पूजा करून दंडवते घातली. बाइसांनी स्वामींच्या तांबुळाचा प्रसाद इतरांबरोबर नागदेवालाही दिला. दादोसांनी तो न घेण्याचे आधीच सांगितले असताही नागदेवाने तो घेतला. त्यामुळे त्यांना स्थित्यानंद झाला. दादोसापासून होणाऱ्या आनंदापेक्षा स्वामींपासून झालेल्या स्थितीचा सुखविशेष आगळा असल्याचे नागदेवाने सांगताच "येथुनि तुम्हां स्थित्यंतर गा:" असा आशीर्वाद स्वामींनी दिला आणि तेव्हापासून नागदेवाच्या आयुष्यातील दुसरे स्थित्यंतर सुरू झाले.

## नाशिक : त्र्यंबकेश्वर

सिन्नरचा मुक्काम संपवून स्वामी नाशिकला व तेथून त्र्यंबकेश्वराला गेले. त्र्यंबकेश्वराला विडा अर्पण केला. तेथील मुक्कामात गंगाद्वाराजवळ कोळाई देवतेच्या बेंबीत डखल्याने बोट घालून तिचा अवमानपूर्वक शब्दांनी उपहास केल्याचे कळताच स्वामींनी त्याला उपदेश केला की : "ऐसें न म्हणिजे कीं गा डखलेया : देवतेसि निरोधु न कीजे कीं :" देवतादिकांचा अपमान न होऊ देण्याविषयी स्वामी किती सतर्क असत हे यावरून दिसून येते.

## बीड : प्रसेयाची ब्रह्म

त्र्यंबकेश्वराहून ते पुन्हा नाशकास आले. तेथून परिभ्रमण करीत, गोदातीरावरील अनेक गावी कमी-अधिक वेळ राहून, डोमेग्रामावरून ते बीडला येऊन पोचले. येथे परसनायक व पद्मनाभी हे दोन नवीन शिष्य त्यांना मिळाले. येथे असतानाच रामदेव दादोस आपल्याबरोबर नागदेव व इतर शिष्यपरिवार घेऊन स्वामींच्या भेटीला आले. प्रसंगोपात्त या भक्तजनांना स्वामींनी पुष्कळ निरूपण केले. एक वेळ ते महालक्ष्मीच्या देवळात गेले असताना छताला टांगलेले आंबे, केळी इत्यादी बेगडी फळे पाहिली आणि म्हटले : 'देखिलीं गा प्रसेयांचीं ब्रह्में ?" ती कशी ? तर शेणामातीची केलेली, पण वरून बेगड लावलेली. ज्यांना इतर लोक ब्रह्म मानतात त्या देवतांची फळेही अशीच, म्हणजे वरून चांगली पण आत शेणामातीनी भरलेली असतात, असेच स्वामींनी सुचविले.

## एळापूर : परमाणुभवदेव नामखंडन

बीडहून निघून स्वामी पाटवधा येथे आले. महदाइसाला बरोबर घेऊन नागदेव येथे स्वामींच्या दर्शनाला पुन्हा आले. नागदेवाप्रमाणे महदाइसाचीही स्वामींवरील श्रद्धा वाढू लागली. तिने पूजापूर्वक स्वामींना उपाहार अर्पण केला. नाना प्रकारचे प्रश्न विचारून ती स्वामीजवळून आपल्या शंकांचे निरसन करून घेऊ लागली. पाटवध्याचा मुक्काम हलवून स्वामी भिंगारहून काही दिवसांसाठी एळापूरला आले. येथे असताना स्वामींचा अन्य महात्म्याविषयीचा आदर, त्यांची अहिंसक वृत्ती, मठातील कडक शिस्त इत्यादींवर प्रकाश टाकणारा एक उद्‌बोधक प्रसंग घडला. तेथे परमाणुभवदेव नावाचे एक महात्मे होते. त्यांच्या शिष्याला पद्मनाभीदेवाने विचारले : " तुमच्या गुरूचा अनुभव काय

परमाणु एवढाच आहे ? " आपल्या शिष्याकडून हे कळताच परमाणुभवदेव संतापले. पद्मनाभी स्वामींच्या मठाकडे आला. तेव्हा अंतर्ज्ञानाने हा प्रसंग जाणवून स्वामींनी म्हटले :" बाइ : कवाडे घाला : याला आत येऊ देऊ नका : कारण हा एका प्राण्याचे अंतःकरण पोळून आला आहे :" पद्मनाभी स्फुंदूनस्फुंदून रडू लागला. बाइसाने मध्यस्थी केली. तेव्हा स्वामी म्हणाले : " शेणामातीने अंग चोपडून हा त्यांची क्षमा मागेल आणि ते आपणहून याला आमच्या स्वाधीन करतील तेव्हाच याला आम्ही पुन्हा येऊ देऊ :" पद्मनाभीने त्याप्रमाणे परमाणुभवदेवांची क्षमा मागितली. त्यांनी क्षमा केली. इतकेच नाही तर त्यांनी स्वतः पद्मनाभीबरोबर येऊन त्याला स्वामींच्या स्वाधीन केले.

## कानसे

एळापूरला काही दिवस राहून स्वामी कानसे येथे आले. येथे असताना नागदेवाला बरोबर घेऊन रामदेव दादोस स्वामींच्या दर्शनाला आले. नागदेवाला स्वामींच्या अधिकाधिक भेटी होऊ लागल्या तशी त्याची स्वामींवरील श्रद्धाही वाढू लागली. या वेळी तो स्वामींजवळ बरेच दिवस राहिला. स्वामी कानशाहून भडेगावला गेले, तेथेही तो त्यांच्याजवळ होता. नागदेवांबरोबर महदाइसाही होती. दादोसांनी निवारण केले तरीही महदाइसाने स्वामींना एक वस्त्र अर्पण केले. द्वारावतीला जाणाऱ्या यात्रेकरूंबरोबर महदाइसेनेही यात्रा करून यावे असे रामदेवाने तिला सुचवले. तिने स्वामींना विचारले तेव्हा स्वामी म्हणाले : " बाइ, श्रीकृष्णाची द्वारका समुद्रात बुडाली, आता तेथे काय आहे ? तीर्थ देवता अमोचक : परमेश्वरसन्निधात मोचक :" तरीही रामदेवाच्या आग्रहावरून ती द्वारावतीला जायला निघालीच. तेव्हा स्वामींनी सांगितले : " बाइ : जाताच आहा तर तेथील श्रीचांगदेवराउळांच्या गुंफा पाहून या :" महदाइसेबरोबर स्वामींनी उमाइसा व साधे यांनाही द्वारावतीला पाठवले.

## करंजखेड

भडेगावाहून स्वामी पाचोरामार्गे सेंदुर्णीला आले. आपल्या दर्शनासाठी येत असलेल्या देमाइसाचे त्यांनी स्वागत केले. तेथून चांगदेववरून येताना देमाइसाला श्रीकृष्णलीळा सांगत मार्गक्रमण करीत ते करंजखेडला येऊन पोचले. वात झालेल्या पानुनायकाचा वात त्यांनी झाडला. त्याला दीपनशक्ती दिली. स्वामी येथे असताना दादोस, आबाइसा व नागदेव स्वामींच्या दर्शनाला पुन्हा आले. या मुक्कामात एका वेळी स्वतः एकदम अदृश्य होऊन स्वामींनी नागदेवाला आपल्या ईश्वरी सामर्थ्याची प्रतीती दिली. स्वामींसाठी गुंफा तयार करताना झाडावर नागदेवाला एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर जाताना पाहून स्वामींनी त्याला ' वानरा ' हे नाव ठेवले. पुढे अनेकदा ते त्याला त्याच नावाने संबोधू लागले. येथे असतानाच स्वामींनी दाइंबाला देवताचक्रांची माहिती देऊन त्यांची व्यावृत्ती केली.

## हिवरळी

करंजखेडचे अवस्थान सपवून स्वामी हिवरळीला आले व तेथे ते बरेच दिवस राहिले. येथे असतानाच महदाइसा द्वारावतीहून परत येऊन स्वामींच्या दर्शनाला आली. द्वारावतीचा वृतांत निवेदन करीत असताना, द्वारावतीकार चांगदेवराउळ म्हणजे आपणच, असे स्वामींनी तिच्या प्रत्ययाला आणून दिले. स्वामींच्या सेवेत ती नेहमी असते, यामुळे ती वाया गेली, असे तिचे वडील वायनायक म्हणतात, असे तिने सांगताच स्वामींनी तिला परिसाचा दृष्टांत देऊन म्हटले : ' बाइ : तुमचेनि तेया

जे गोमटे ते काइ ते जाणत असति ? परमेश्वरपरायणाचेनि संबंधे सुख श्रेय ज्ञान इये तीन्ही होती : ” हिवरळीला असताना महदाइसेने दिवाळी सण साजरा केल्यावर स्वामींनी नागदेवाला व महदाइसेला श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी रिद्धपूरला पाठवले. त्यांच्याबरोबर हंसराज व दादोस हेही गेले.

हिवरळीहून भाटापुरी, रावसगाव, बोरी वगैरे ठिकाणी मुक्काम करीत स्वामी साडेगावला आले. येथे असताना स्वामींनी राणाइसाला ‘ पारतंत्र हा बंधु : स्वातंत्र्य हा मोक्षु : ’ या वचनाचे निरूपण केले. तेथून अनेक लहानमोठ्या गावी जाऊन भक्तजनांना दर्शन देत देत स्वामी पिंपळगावला गेले. तेथील विज्ञानेश्वराच्या देवळात त्यांनी विडा अर्पण केला. बळ्हेग्रामच्या गुंफेत नगरस्त्रियाबरोबर देवतांनीही त्यांना ओवाळले. मांडवखडकी आसन केल्यावर मांडव्य ऋषीची कथा त्यांनी सांगितली. नदी उतरून पंचाळेश्वर येथील श्रीदत्तात्रयप्रभूंच्या गुंफांचे दर्शन घेऊन भक्तजनांना त्या गुंफा दाखवल्या. तेथून गावोगावी प्रवास करीत ते सविता येथे नागनाथांच्या देवळात उतरले. त्याच वेळी देवगिरी येथे ‘ आमणदेयाचे डोळे काढिले : रामदेवो राज्यीं बैसला : ’ ही राज्यांतराची वार्ता अंतर्ज्ञानाने जाणून इंद्रभटाला त्यांनी अधिक चौकशीसाठी पाठविले. तेथून ते निघाले व जोगेश्वरीला येऊन पोचले.

## जोगेश्वरी : आउसां भेटि

येथे असताना स्वामींना एक नवीन शिष्या मिळाली. ‘ उपासनीयाची सून : नाथपंथी उपदेशु : चातुर्वर्णी भिक्षा : ’ करणाऱ्या आउसा नावाच्या जोगिणीने विंध्यवासिनीजवळ धरणे धरले होते. तेव्हा तिला दृष्टांत झाला की : “ गंगातीरासि जाए : मग तुज परीसु सीधैल : ” तशीच ती हिंडतहिंडत काउळगावला आली. शाळेत आपली मात्रा ठेवून गोदातीरावर हातपाय धूत असताना, जवळच जोगेश्वरीला असलेल्या श्रीचांगदेवराउळांचे गुणविशेष एका ब्राम्हणाने तिला सांगितले. तिच्या मनात स्वामींविषयी आवड निर्माण झाली. नदीच्या काठाकाठाने ती जोगेश्वरीला आली. आरोगणा संपवून स्वामी मागच्या अंगणात होते. आउसा त्यांच्याकडे वेधली व एकसारखी टक लावून पाहात राहिली. स्वामींनी विचारले : “ आउवे देवी : काइ पाहिजत असिजे ? ” ती म्हणाली : “ ज्या पुरुषाच्या दर्शनासाठी पृथ्वीपर्यटन केले त्यांना पाहात आहे : ” “ मग असे समोर येऊन पाहा ना : ” आउसा समोर जाऊन बसली. तिला स्थिती झाली. स्थिती भंगल्यावर स्वामी म्हणाले : “ आता बीढारासी जा : ” आउसा म्हणाली : “ ज्या पुरुषाच्या दर्शनासाठी पृथ्वीपर्यटन केले ते भेटल्यावर आता दुसरे बिढार कुठले ? आता या श्रीचरणांपाशीच माझे बिढार : ” स्वामींनी तिची मात्रा आणवली. तीत असलेल्या देवता, पितळेची जोगला देवीची मूर्ती व मोहवाचा कृष्ण यांचे पाण्यात विसर्जन करायला सांगितले. आउसा म्हणाली : “ सर्व देवतांचे विसर्जन कराल तर करा, पण या कृष्णाला बुडवू नका कारण हा मी वाट चुके तेव्हा मज वाट सांधे : ” स्वामी म्हणाले : “ आता साचोकार कृष्ण तुम्हाला वाट सांधैल : ” असे म्हणून तिच्याजवळील सर्व देवतांचे त्यांनी पाण्यात विसर्जन करायला लावले. तिच्या कानांतील मुद्रा स्वतः काढल्या. दोन वस्त्रे आणवून तिला महात्म्याचा वेष दिला. आउसा स्वामींना अनुसरली व त्यांची अखंड सेवा करीत त्यांच्या चरणांजवळ राहू लागली. या आउसाची स्त्रीपुरुषत्व बुद्धी आधीच नष्ट झाली होती. स्वतःला पुरुष समजूनच ती नेहमी बोलत असे. तिच्याजवळ डांगरेश नावाचा कुत्रा होता. तोही स्वामींचा भक्त बनला. स्वामींचा प्रसाद घेतल्याशिवाय तो कधी भोजन करीत नसे.

जोगेश्वरीला असतानाच रिद्धपूरहून नागदेव, महदाइसा व रामदेव दादोस परत आले. श्रीप्रभूंचा प्रसाद नमस्कारून घेतल्यावर स्वामींनी श्रीप्रभूंच्या सुखस्वास्थाची चौकशी केली व तेथील वृत्तांत विचारला. महदाइसेने दुःख करीत करीत तो सांगितला. स्वामींनी म्हटले : " बाइ, तुम्ही दुःख करीत आहात तर श्रीप्रभूंची सेवा सोडून परत आलाच का ?" महदाइसा म्हणाली : " जी जी : मी काही येत नव्हते, दादोसांनी परत आणले. " स्वामींनी विचारल्यावर दादोस म्हणाले : " जी जी : तेथे असताना ही श्रीप्रभूंची प्रवृत्ती भंगत असे, किडेमुंग्या मारीत असे, रात्री मठात निद्रा करीत असे. स्वामींनी मग महदाइसाला विचारले तेव्हा त्यांना कळले की हे सर्व श्रीप्रभूंच्या सेवेसाठीच होत असे. स्वामी म्हणाले : " श्रीप्रभूंची सेवा ते अदृष्ट सेवा : श्रीप्रभू करू देति : स्वीकरीती : ओखटे केले : ऐसे कीजे ? ऐसा प्राणिया धर्मापासौनि काढीजे ?"

## संगमेश्वर : नागदेवाला बोध

जोगेश्वरीहून स्वामी संगमेश्वरला गेले. रात्री सर्व निरवानिरव झाल्यावर स्वामींनी नागदेवाला बोलावून घेतले. प्रथम त्यांनाही स्वामींनी श्रीप्रभूंच्या लीळा विचारल्या. नागदेवांनी पाचसात लीळा सांगितल्या. मग स्वामींनी विचारले : "श्रीप्रभूवरि : एथ : आणि महात्मेयावरि कैसि बुधि ?" नागदेवाने म्हटले : " सारिखीचि " तेव्हा बाइसा संतापल्या, पण स्वामींनी त्यांना शांत केले. स्वामींनी नागदेवाला पुन्हा म्हटले : " श्रीप्रभूंच्या क्रीडा व रामदेवाचे वर्तन पाहिल्यावर त्यांत तुम्हाला काही वेगळेपणा आढळत नाही काय ?" नागदेवांनी पुष्कळ विचार केला, तेव्हा त्यांना प्रतीत झाले की श्रीप्रभूंच्या क्रीडा अगाध होत्या, तर रामदेव दादोसांचे वर्तन कुश्चित होते. स्वामींनी श्रीप्रभूंचे गुणवर्णन करून व युगधर्म, विद्यामार्गादिकाचे निरूपण करून 'परमेश्वरू एकु सोडविता' असे नागदेवांच्या प्रत्ययाला आणले. मग बिढारी पाठविले. सकाळी पुन्हा बोलावून घेतले व विचारले : " येथून गेल्यावर तुम्ही निजला होता काय ?" नागदेवांनी म्हटले : " मला निद्रा आली नाही. स्वामींनी काल जे निरूपण केले त्याचे मी चिंतन करीत होतो." स्वामींनी विचारले : " मग काही प्रत्ययाला आले ?" नागदेव म्हणाले : " होय. " यावर स्वामी म्हणाले : "आवांकेया ये तें घेइजे हो : तेतुकें आपुलें जावों नेदिजे : " यावर स्वामींनी जीवेश्वर विभागाचे पुन्हा निरूपण केले. तेव्हा नागदेवांन बोध झाला.

## खडकुली : भटां अनुसरण

त्यानंतर नागदेवांची रामदेवावरील श्रद्धा उडाली. स्वामींवरील श्रद्धा वाढली. आता हा आपणाला सोडून स्वामींचे शिष्यत्व स्वीकारणार, असे लक्षात येताच त्याला त्यापासून निवृत्त करण्याचा दादोसांनी पुष्कळ प्रयत्न केला. " हा व्यसनी असल्यामुळे स्वामींनी याला आपल्याजवळ राहू देऊ नये. स्वामींचे हा काही ऐकेल व दुसरीकडे बडबडेल." असे त्याने स्वामींना सांगितले. तेव्हा स्वामी म्हणाले : " तैसे एथ काइ गा असे ? मां पैन्हा जाऊनी भडभडैल : . . .आणि एथ राहील तयातें पाठवीजे ना : जाइल तयातें राहावीजे ना : " स्वामींना अनुसरावे अशी उत्कट तळमळ नागदेवांच्या ठिकाणी निर्माण झाली. दुसऱ्या दिवशी दादोस, आबाइसा इत्यादिकांबरोबर गावाला निघाल्यावर काही निमित्त काढून नागदेव स्वामींकडे परतले. स्वामींनी विचारले : " परत का आलात ? काही विसरलात ?" नागदेव म्हणाले : " नाही. पण मी स्वामींजवळ पाचसात दिवस राहीन म्हणतो." स्वामी म्हणाले : " तैसें एथ राहों नेदिजे : तुम्हा असों आवडैल तवं असाल : जाओं आवडैल तेव्हळि जाल : तैसें एथ राहों नेदिजे : एथौनि पाठविजैल

तेव्हळीं जावें : बोलावीजैल तेव्हळीं यावें : तैसें तरि एथ राहों दीजैल :" नागदेव विचार करू लागले. स्वामी चिपुळी वाजवून म्हणाले " चांग विचारा : निकें विचारा: सांघातु दूरि पावतु असे :" नागदेवांनी सारासार विचार करून स्वामींना अनुसरण्याचा निश्चय केला आणि भाखेंचे पोफळ देऊन स्वामींना ते अनुसरले. नागदेवांची पत्नी गंगाइसा, हिला उचकवून नागदेवाला स्वामीपासून दूर करण्याचा प्रयत्न रामदेवाने केला. पण स्वामींच्या सामर्थ्यामुळे तो यशस्वी झाला नाही.

नागदेवांची परीक्षा पाहण्यासाठीच की काय, काही दिवसांनी स्वामींनी त्यांना आपल्याजवळून जाण्याला सांगितले. तेव्हा ते अत्यंत दुःखी होऊन रिद्धपूरला गेले व स्वामींनी परत बोलविल्याच्या निरोपाची वाट पाहू लागले. तेथे आपल्या वियोगाने नागदेव अगदी मृत्युशय्येवर पडल्याचे कळल्यावर स्वामींनी त्यांना परत बोलाविले. ते परत आले. त्या वेळी स्वामी प्रतिष्ठानला होते. नागदेवांची भेट होताच स्वामींनी त्यांना आलिंगन दिले तेव्हा नागदेव स्फुंदूनस्फुंदून रडू लागले. स्वामी म्हणाले : " उगे असा गा वानरेया : दुःख न करा : आतां एथौनि तुमतें केव्हळाही न पठवीजे हो :"

खडकुलीला असताना स्वामींनी भक्तजनांबरोबर अनेक क्रीडा केल्या. आउसाच्या विनंतीवरून, साप चावून मेलेल्या माळचाला जिवंत केले. नागदेव आणि नाथोबा यांची शीतपीडा नाहीशी केली. मठाची राखण करीत असलेल्या आऊसाने, त्रास द्यायला आलेल्या पोरांना भिववले तेव्हा स्वामी म्हणाले : " ऐसें भए नुपवीजे की :" एके दिवशी एका कुत्र्याने नागदेवांची भिक्षेची झोळी नेली. दुसऱ्या दिवशी ते पुन्हा आले. आउसाने त्याला दगड मारला. तेव्हा स्वामींनी आपले डोके धरले. जणू तो दगड त्यांनाच लागला होता. ते आउसाला म्हणाले : " एयाची काए कव्हणी माए बहिणी असे : मां ते रांधौनि ठेवील ? आपुलें राखिजे : परि हाणिजे ना कीं :" आउसाने एक वेळ एक इंगळी मारली. स्वामींनी विचारले : " कां मारली ? " आउसा म्हणाली : "जी जी : हे एकाधेया प्राणियातें खाती :" स्वामी म्हणाले : " मां हा प्राणिया नव्हे ? तुम्हीं महात्मे कीं गा : तुम्हीं सर्व भूतां अभए देयावें कीं : " एके दिवशी इंद्रभटाला आपला फुटा प्रसाद म्हणून देऊन त्यांच्या पूजेचा विधी स्वामींनी सांगितला : " आधीं एथ पुष्प एक वाइजे : हें जैसें देखिलें तैसें आठवीजे : एथ नमस्कारू कीजे : सकृत सेवीजे : अति येत्न कीजे :"

## जोगेश्वरी: छिन्नपापी

खडकुलीहून प्रतिष्ठानमार्गे स्वामी जोगेश्वरीला गेले. तेथेही त्यांनी अशाच क्रीडा केल्या. जिव्हारोगाने पीडलेल्या माळिणीचे रक्षण केले. आपल्या दर्शनाला आलेल्या मातंगाला दिलेला प्रसादाचा लाडू त्यांनी व भक्तजनांनी सेवन केला. एक वेळ काही काम करून नागदेव परत आले. मार्गावर असलेल्या पंचाळेश्वराला मात्र ते गेले नाहीत. तेव्हा स्वामींनी सांगितले : " हें होतें तेथ जाइजे : एथिचिया संबंधा गेले तेतुले ओटेंगोटे आदिकरुनि तुम्हां नमस्करणीए कीं गा : "

छिन्नपापी येथे असताना स्थितीच्या भरात आउसाने स्वामींची स्तुती केली. " गोसावी कामधेनु : गोसावी कल्पतरू : गोसावी चिंतामणी :" तेव्हा स्वामी म्हणाले : " कामधेनु हें एकाचीए दारींचें ढोर : तैसा काइ परमेश्वरू ? कल्पतरू तो एकाचीए दारीचें झाड : तैसा काइ परमेश्वरू ? चींतामणि तो एकाचीए गळांचा मणि : तैसा काइ परमेश्वरू? कें अचिंत्यानंतशक्ति परमेश्वरू : आणि कें चिंतामणि कामधेनु ? " एके वेळी स्वामींचे निरूपण ऐकण्यासाठी अनेक स्त्रिया बसलेल्या पाहून सारंगपंडित मनात म्हणाले : " कैसीया गुलगुलीया सातसीया परवडी वेढुनि बैसलिया असति : आवघीया नेउनि

घालावीया तेलंग देसीं : मग कांडवावे कोदे : मग आपण असिजे गोसावीयांचां सन्निधानीं : " त्यांचे हे विचार जाणून स्वामींनी त्यांना शिक्षा केली व म्हटले : "हां गा : तुम्ही ऐसें म्हणा . . . . तरी धर्माचीया चाडा सातसीया परवडी एथ बाइंचि कां नसावे ? तुम्हीं काइ करावें असे एथ टोंग ? हां गा : तुमचे जीव : मग यांचीया काइ जीउलीया ? तुमतें आनु देवो राखता : आणि यातें काइ आनु देओ राखता ? एसें काइ एथ असे ? " यावरून धर्माच्या क्षेत्रात स्त्री-पुरुषांचा अधिकार समान आहे हा स्वामींचा विचार स्पष्ट दिसून येतो.

## डोंबेग्राम : म्हाइंभटां भेटि

छिन्नपापीहून स्वामी डोंबेग्रामला गेले. येथे असतांना घडलेला एक महत्त्वाचा प्रसंग म्हणजे म्हाइं-भटांची भेट व त्यांना झालेला बोध. या प्रस्तावनेत अन्यत्र आलेल्या म्हाइंभटांच्या चरित्रात हा प्रसंग विस्ताराने दिलेला असल्यामुळे येथे त्याची पुनरुक्ती करीत नाही. दादोसांच्या आग्रहावरून महदाइसेने वाराणसीच्या यात्रेला जाण्याचे ठरविले. ती दोघेही डोबेग्रामला आली. महदाइसेने स्वामींना विचारले तेव्हा स्वामी म्हणाले : " बाइ : तीर्थक्षेत्र अमोचक : सन्निधान मोचक : " व तिचा बेत त्यांनी मोडून काढला. पण दादोसांनी पुन्हा तिला तयार केले. स्वामींनी निरूपण करून तिचा बेत मोडून काढावा व रामदेव दादोसांनी तिला पुन्हा तयार करावे, असे दोनतीनदा झाले. शेवटी ती वाराणसीला गेलीच. स्वामींची आज्ञा उल्लंघून गेल्यामुळेच की काय, जाताना रस्त्यात तिला काळी बाहिरती लागली. वाराणसीला गेल्यानंतर तिला तेथे आगळे असे काही वाटले नाही. स्वामींच्या निरूपणाचा प्रत्यय आला. तिला पश्चात्ताप झाला. हे सर्व दादोसांमुळे झाल्यामुळे गंगेत स्नान करताना तिने दादोसाला तिलांजली वाहिली. अंतःकरणाने ती स्वामींना पूर्णपणे अनुसरली. वाराणसीहून परत येताना ती रिद्धपूरच्या मार्गे आली. तेथे नागदेव व बाइसा होती. त्यांच्याबरोबर ती स्वामींकडे आली. त्या वेळी स्वामींचा मुक्काम प्रतिष्ठान येथे होता.

एक वेळ स्वामींनी प्राधबाइसाला ईश्वरस्वरूपासंबंधी निरूपण केले. ते म्हणाले : "देओ पाखाणाचा नव्हे : देओ काष्टाचा नव्हे : देओ मातीचा नव्हे : देओ चीत्रीचा नव्हे : देओ पटीचा नव्हे : देओ धातुचा नव्हे : पाखाणाचा फुटैल : लाकडाचा मोडेल : मातीचा तो वीरैल : चित्रीचा तो पुसैल : पटीचा तो फाटैल : धातुचा तो झिजैल : देओ तो अछेद : अभेदु : अच्युतु : अलेख : "

डोबेग्रामहून निघाल्यावर स्वामी नेवाशाला काही दिवस राहून प्रतिष्ठानला जाण्याच्या हेतूने वाडेगावला जोगेश्वरीच्या देवळात आले. तितक्यात देवीसमोर कापण्यासाठी कुणी एक मेढरू घेऊन तेथे आला. तेव्हा स्वामींनी बाइसांना म्हटले : " बाइ : हे घेइन घेइन म्हणतीए : हा देइन देइन म्हणताए : एथौनि चाला : राजसे तामसे स्थानीं न बैसावें : " यावरून जेथे हिंसा होते तेथे महात्म्याने बसू देखील नये, हे स्वामींचे मत आणि त्यावरून त्यांची अहिंसक वृत्ती चांगली दिसून येते. ते तेथून तडक निघाले आणि ब्राम्हणीला एक रात्रभर राहून पैठण येथे येऊन पोचले. तेथील गणपती मठात त्यांनी अवस्थान केले.

## पैठण : स्वामींचे तत्त्वज्ञान

येथे असताना स्वामींनी आपल्या भक्तजनांबरोबर अनेक क्रीडा केल्या. बाइसा, भटोबास, आउसा हे तर त्यांच्या सन्निध्यात नेहमीच असत. याशिवाय रामदेव दादोस, सारंगपंडित, घाटे हरिभट, उपाध्ये,

माइते हरी, नाथोबा, अनो, इंद्रभट, गौराइसा, महदाइसा, उमाइसा, साधे, देमाइसा इत्यादी भक्तजन सतत दर्शनाला येत असत. त्यांच्याबरोबर अनेक लीळा घडल्या. त्यानिमित्ताने स्वामींनी केलेल्या निरूपणावरून त्यांचे आचारविचार उत्तम रीतीने प्रगट होत. स्वामींच्या मठात एरवीही, स्वामींच्या प्रवृत्तीनुसार नेहमीच निरूपण होत असे. त्यातून स्वामी आपले तत्त्वज्ञान व आचारधर्म समजावून सांगत. त्या निरूपणाचा भावार्थ असा की, जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर हे अनादि नित्य चार पदार्थ असून त्यांतील प्रपंच हा जड आहे, देवता नित्यबद्ध आहेत, जीव बद्धमुक्त, तर परमेश्वर नित्यमुक्त होय. प्रपंच जड असल्यामुळे त्याच्या मुक्तीचा प्रश्नच नाही. देवता नित्यबद्ध असल्यामुळे त्यांना मुक्ती मिळूच शकत नाही. जीव हा अनादिअविद्येने बद्ध असला तरी तो मुक्त होऊ शकतो. या मुक्तीसाठी त्याने झटले पाहिजे. ते कसे ? तर नित्यमुक्त परमेश्वराची भक्ती करून, देवतांच्या उपासनेने जीवाला मुक्ती मिळू शकत नाही. ज्या स्वतःच नित्यबद्ध असून मुक्तीला अपात्र आहेत त्या देवता जीवाला मुक्ती देणार कशा ? तथापि, ईश्वराच्या ठिकाणी असलेले सुख, सामर्थ्य, ऐश्वर्यादि गुण त्यांच्याही ठिकाणी असल्यामुळे जीव त्यांनाच ईश्वर मानतो, पण हे त्याचे अन्यथाज्ञान होय. देवतांची उपासना केल्याने त्यांची फळे जीवाला भोगायला मिळतात हे खरे, पण पुण्याचा साठा संपल्यानंतर जीवाचे तेथून पतन होते व त्याला पुन्हा मृत्युलोकात यावेच लागते. ' क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति.' सर्व देवतांची स्वामिनी जी चैतन्य माया तिचे फळ मोक्षतुल्य भासते, पण तेथूनही शेवटी पतन होतेच. वेदमार्गाच्या उपासनेमुळे चैतन्याची म्हणजे मायेचीच प्राप्ती होते. याउलट परमेश्वराच्या दास्यामुळे जेथून पुन्हा परत येणे नाही असे अच्युत पद प्राप्त होते. म्हणून जीवाने मोक्षप्राप्तीसाठी जीवदेवतांची उपासना न करता केवळ परमेश्वराची, म्हणजे सच्चिदानंदस्वरूप अशा परमेश्वरावताराचीच उपासना करावी. असे प्रमुख परमेश्वरावतार पाच आहेत. श्रीदत्तात्रय, श्रीकृष्ण, श्रीचांगदेवराउळ, श्रीगोविंदप्रभू व श्रीचक्रधर. यांतही विद्यमान कलियुगातील परावरदृश्या अवतार श्रीचक्रधर असल्यामुळे त्यांची भक्ती, त्यांचे ज्ञान त्यांचे सन्निधान व सेवादास्य विशेष महत्त्वाचे होय.

परमेश्वराच्या प्राप्तीचे उपाय दोन. एक भक्ती व दुसरा ज्ञान. जीवाच्या पूर्वसंचितानुसार त्याने परमेश्वराचे प्रेम जोडले असेल तर परमेश्वर त्याच्या ठिकाणी प्रेमाचा संचार करतात. हे प्रेम म्हणजेच भक्ती. हा संचार झाल्यानंतर परमेश्वराचे निरंतर सन्निध्य लाभून जीव मोक्षाला पोचतो. परमेश्वरापासून किंवा त्याच्या अधिकरणापासून परमेश्वराचे ज्ञान झाल्यावर ज्ञानियाला 'विकार विकल्प शून्य होऊन, स्वभावावर नियंत्रण ठेवून, परमेश्वराव्यतिरिक्त इतर कुणावरही अवलंबून न राहाता त्याचे स्मरण करीत जन्म क्षेपावा लागतो. मग पुढील जन्मात आपला संबंध देऊन परमेश्वर त्याला मोक्षाला पोचवितात. विकल्पाचे दोन प्रकार आहेत. जीवदेवतावर ईश्वरबुद्धी येणे हा एक. तो निर्माण होऊ नये म्हणून ज्ञानियाने देवतांच्या देवळात जाता कामा नये. देवताप्रीत्यर्थ होणाऱ्या कोणत्याही समारंभात भाग घेता कामा नये. त्यांच्या तीर्थक्षेत्रनाही जाऊ नये. विचिकित्सारूप विकल्प हा दुसरा प्रकार होय. हा श्रेष्ठ, तो कनिष्ठ, हा ब्राम्हण, तो महार अशा प्रकारची विषमतेची कल्पना मनात येऊ देणे हा विचिकित्सारूप विकल्प होय. विटाळचांडाळ पाळणे हाही विकल्पच होय. विटाळशी उमाइसाला स्वामींनी एकदा म्हटले : " बाइ : यें नवद्वारें : जैसा नाकीं सेंबुड ए : डोळेया चीपडीं एती : कानां मळू ए : तोंडा थुंका ए : गुह्यद्वारा मळ एति : तैसो हे एकि धातु स्रवे : मग निवर्त्ते : याचा विकल्प धरू नैए :" (उत्त.३८४).

## विरोधाचे वादळ

अशा प्रकारचे तत्त्वज्ञान व आचारधर्म स्वामी निरूपण करीत असत. त्यांच्याकडे येणाऱ्या विद्वान अविद्वान स्त्री-पुरुषांना तो पटे आणि ते त्यांच्या भजनी लागत. पण त्यामुळे प्रस्थापित देवताधर्माच्या पुरोहितांच्या मनात स्वामींविषयी विपरीत भावनाही निर्माण होत असत. एक वेळ स्वामी शास्त्रमठात गेले. तेथील वेदांत मार्गाचे अधिकारी संन्यासी महदाश्रम यांच्या शिष्यांना ते भेटले. वेदांताविषयी त्यांच्याशी चर्चा केली. तेव्हा ते स्वामींकडे वेधले गेले. त्यानंतर ती शिष्यमंडळी वारंवार स्वामींच्या दर्शनाला जाऊ लागली व त्यांचा प्रसाद म्हणून त्यांचे उच्छिष्ट तांबूल सेवन करू लागली. महदाश्रमाच्या हे लक्षात येताच त्याच्या मनात भीती उत्पन्न झाली. त्यांना वाटले "आता हे आमचा मार्ग उच्छेदिती :" म्हणून एके दिवशी रंगपूजेच्या निमित्ताने त्यांनी स्वामींना बोलावले. त्यांच्या आसनाखाली यंत्रासन उद्धारून तेथे देवता आव्हानिल्या. हेतू हा की, आसनावर बसताच खालील ऊर्ध्वमुख देवतांनी स्वामींचा बळी घ्यावा. स्वामींनी हे अंतर्ज्ञानाने जाणले. त्यांनी आसनाजवळ येताच पायाच्या आंगठ्याने आसन दूर केले, देवतांना अधोमुख केले व महदाश्रमाचा आपणाला बळी देण्याचा बेत हाणून पाडला. इतरही काही लोक स्वामींच्या विरुद्ध बोलू लागले. एक वेळ स्वामी गंगेवरील वाळवंटात विहरणाला गेले होते. त्यांची पाठ फिरताच तेथील ब्राम्हण म्हणाले : "हे चांगदेवराउळ गोसावी काइ जाणति ?" ते ऐकताच स्वामी एकदम परतून म्हणाले : "हे सकळ सास्त्राचा मतीतार्थ जाणे : जीवा-अविद्ये विभाग करू जाणे :" (उत्त. ४८२). भटोबास, महदाइसादिक मंडळी प्रथम रामदेवाच्या शिष्यवर्गात होती. पण रामदेवाचा त्याग करून ती आता स्वामींना अनुसरली असल्यामुळे तोही स्वामींच्या विरुद्ध बोलू लागला : "गोसावीं माझीं शिष्यें चाळविलीं असति :" स्वामींच्या दर्शनाला जाणाऱ्यांजवळ तो म्हणू लागला. "तेथे कां जाते असा ? तेथ काइ असे : तयातें एकि विद्या होती : ते आम्हां जाली : आता ते रीते ठेले : आतां तेथ काहींचि नाही :" (उत्त. ५१९, ५२०). एक वेळ सारंगपंडिताची पत्नी उमाइसा ही आपल्या नवऱ्याला कळू न देता रोटांचे वाण घेऊन स्वामींच्या दर्शनाला आली. यामुळे त्याच्या मनात स्वामींविषयी विकल्प निर्माण झाला. हेमाडपंडिताची नावडती पत्नी हीसुद्धा एक वेळ स्वामींच्या दर्शनाला आली. त्यांच्याजवळील चंदन तिने लावले. त्यामुळे हेमाडपंत तिच्याकडे आकृष्ट झाला. पण हे कारण कळताच त्याच्याही मनात विकल्प निर्माण होऊन तो स्वामींच्याविरुद्ध जळफळू लागला.

## गुंफेचा नागोबा : अवयवच्छेद

या विरोधात भर घालणाऱ्या काही गोष्टी स्वामींच्या आश्रमात घडल्या. पैठणहून स्वामी वृद्धासगम येथे गेले. तेव्हा आउसाच्या पाठीवर बसून ते नदी उतरले. तेथील आश्रमाजवळच्या स्मशानातील चिता विझवण्याला सांगितले तेव्हा आउसा भ्याली. तिची भीती घालवण्यासाठी स्वामींनी तिला नग्न होऊन स्मशानात बसण्यास सांगितले. दुसऱ्या दिवशीही आउसाला विवस्त्र होऊन एका मुनीला आलिंगन द्यायला लावले आणि तिला नग्न नृत्य करण्याला सांगितले. त्यामुळे स्वामींविषयी लोकांमध्ये विरोधाचे वादळ वाढले. याचा परिणाम असा झाला की, हेमाद्रीने शस्त्रधर पाठवून त्यांच्या गुंफेचा नागोबा केला. शस्त्रधर येताच 'मुनीए आले गा :' असे म्हणणाऱ्या व त्या शस्त्रधराशी, त्यांच्याचपैकी एकाचे शस्त्र घेऊन लढणाऱ्या भटोबासांना "माहात्मा काइ नव्हसी ? सांडि सांडि लोखंड" अशी आज्ञा करून त्यांना शस्त्रत्याग करायला लावणाऱ्या स्वामींची महात्मावृत्ती याप्रसंगी

चांगली प्रकट झाली. शस्त्रधरांनी स्वामींना पैठणला नेले. तेथे मुधादित्याच्या देवळात महाजनांनी स्वामींवर 'हे स्त्रियांचां ठाइ ऐसेनि ऐसे करिती :' असा आरोप ठेवून त्यांना शरीरावयवाच्या छेदाची शिक्षा दिली. स्वामींनी ती स्वीकारली. स्वामींच्या गुंफेचा नागोबा घेऊन परत जाणाऱ्या पाइकाकडून पैठणहून बाजारहाट घेऊन परत येणाऱ्या बाइसांना, 'स्वामींचा वध झाला' अशी खोटीच बातमी कळली. तेव्हा तिनें त्या क्षणी गंगेत उडी टाकून प्राणत्याग केला.

## अवयवस्वीकार

स्वामीजवळील भक्तांची आधीच पांगापांग झाली होती. अवयवछेदाच्या प्रसंगानंतर त्यांच्याजवळ भक्त भटोबास होते. त्यांना घेऊन स्वामी चापडगावला गेले. तेथे दुःख करीत असलेली आउसा भेटली. ही सर्व मंडळी जळगावला गेली. तेव्हा 'तुटकीया वाहाणा : फुटकी करवटी : फाटकें धोत्र : मोकळीया झींजीया :' असे दायंबा स्वामींचा शोध करीत तेथे आले व दुःख करू लागले. या सर्वांसह नागार्जुनावरून स्वामी आंबा येथे आले. तेथे घुइनायक भेटीला आले. अवयवछेदाचा वृत्तांत ऐकून ते म्हणाले : 'गोसावी ईश्वरू : ईश्वरी काइ छेदभेद असति : हे ईश्वरीची इछा म्हणा :' त्यांनी स्वामींची पूजा करून वस्त्रे अर्पण केली. स्वामींनी पुन्हा अवयव स्वीकार करावा म्हणून भटोबास आउसादिकांनी विनंती केली, तेव्हा स्वामी म्हणाले : "आवघेया देहामध्ये इतुला ऐसा आवेव उणा म्हणा : तुमचे उपकारक तरि तुम्हापासी असे :" "जी जी : आमचें उजळमुख करावें :" असा त्यांनी पुन्हा आग्रह केल्यावर स्वामींनी तीन दिवस एकांतात राहून अवयवस्वीकार केला. त्यांची ती बत्तीस लक्षणी सुंदर मूर्ती पाहून आउसाने म्हटले : "जी जी : एक सीस : मां काइसेन ओवाळील :"

असे असले तरी, महाराष्ट्रातील आपले अवतारकार्य संपले, आता आपला प्रयाणकाळ जवळ आला हे जाणून स्वामींनी निरवानिरव चालवली. त्यांनी आपल्या भक्तजनांना बोलावणी पाठवली. पण उपाध्ये तेवढे आले. रिद्धपूरहून म्हाइंभटही तातडीने आले. स्वामी आंबेखरवंडीहून एळीगावाकडे जात असताना त्यांची भेट झाली. आपल्या अनुसरणाचा वृत्तांत त्यांनी स्वामींना सांगितला. या व पुढील मुक्कामात म्हाइंभटांनी स्वामींजवळून तत्त्वज्ञान व आचारविषयक अनेक प्रश्नांची माहिती विचारून घेतली. भ्रमण करीत करीत भक्तजनांसहित स्वामी बेलापूरला येऊन पोचले.

## बेलोपूर : निरवानिरव

येथे असताना काही दिवसांनी स्वामींच्या सेवेसाठी द्रव्य आणण्याला म्हाइंभट सराळचाला निघून गेले. काही दिवसांनी महदाइसा स्वामींच्या भेटीला आली. स्वामींवर ओढवलेल्या प्रसंगाच्या निमित्ताने ती म्हणाली: "हा लोकु दुराराध्यो: ईश्वरपुरुष होती तेयातें त्रसवीताचि होए: देखों न सके:" आणि तिने ज्ञानांकुशाची कथा सांगितली : एका गावी ज्ञानांकुश नावाचे महात्मे होते. त्यांना पाहून गावातील स्त्रियांना त्यांच्याच सारखी मुले होऊ लागली. लोकांनी शंका घेतली की हे व्यभिचार करतात. शिक्षा म्हणून त्यांना खैरी जुंपण्याचे ठरवले. ज्ञानांकुश म्हणाले : 'शिक्षा करण्याआधी नीट चौकशी करा. परीक्षा घ्या.' पण लोकांनी ऐकले नाही. त्यांना खैरी जुंपले, पण बैल मुळी पुढे चालेनात. तेव्हा हे ईश्वर पुरुष आहेत याची खात्री होऊन लोकांनी त्यांना सोडून दिले." पैठणच्या महाजनांनी स्वामींवर ठेवलेल्या आरोपाच्या बाबतीतही खरा प्रकार असाच दिसतो.

बेलापूर येथील मुक्कामात भटोबास, म्हाइंभट, दाइंबा, महदाइसा इत्यादिकांनी स्वामींना अनेक आचारविचारविषयक प्रश्न विचारले. स्वामींनीही पुष्कळ निरूपण केले. भटोबास व महदाइसा

यांना असन्निधानधर्म शिकवला. महदाइसेच्या अवेळी येण्यावरून भटोबास एक वेळ तिला टाकून बोलले, तेव्हा स्वामींनी म्हटले : " तुम्हीं अच्युत गोत्र कीं गा : तुम्हां परस्परें परम प्रीति होआवी कीं गा वानरेया : आणि म्हातारी आतां तुम्हां लागे कीं गा : कव्हणाही अर्थी वंचिजे ना हो :" महदाइसेलाही भटोबासांविषयी त्यांनी सांगितले की : " बाइ : तुम्हीं यातें पुसिजे : हा पुरकर नागदेओ ऐसें न म्हणिजे हो : हा एथीचीया जवळिका आन जाला असे हो : "

## प्रयाण

अशी निरवानिरव चालली असतानाच ' आता रायाची दांडी एइल :' हे स्वामींनी जाणले. आणि त्याप्रमाणे खरोखरच एके दिवशी राजाकडून पालखी आली. तीत स्वामींना बसवून राजाकडे नेण्यात आले व नंतर राजाज्ञेवरून त्यांचा शिरच्छेद करण्यात आला. पण शिरच्छेद होताच धड व शिर एकत्र येऊन स्वामींचे पुनरुत्थान झाले व त्यांनी उज्जयिनीकडे प्रयाण केले.



# लीळाचरित्र : पूर्वार्ध

श्रीपरेसाए नमः ।।

## १ श्रीदत्तात्रयो मार्गादिमूळ निरोपण[१]

माहादाइसीं प्रष्णु केला : "जी जी : या मार्गासि कवण आदि ?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या मार्गासि श्रीदत्तात्रय प्रभु आदि[२] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दत्तात्रयप्रभु गोसावीं भोगभूमी कृतयोगीं[३] रीखीस्वराचां ठाइं अवतारू स्वीकरिला : अत्रि रीखि पिता : अनुसैया माता : मग त्रेतीं कर्मभूमीसि सैहाद्र पर्वतासि बीजें केलें :" गोसावीयांसि जीव उधरावेयाची प्रवृति : मग गोसावीयांसि तेथ अवस्थान जालें : मग राज्य करूं लागले : ।।

## २ सैहाद्रीं व्याघ्रवेखें दरीसन

[१]गोसावीयांसि जीव उधरावेयाची प्रवृति : मग फलेठानीं कन्हाडेया[२] ब्राह्मणाचां घरीं अवतारू स्वीकरिला : तो गर्भिचा अवतारू : श्रीचांगदेओराउळ गोसावी हें नावं

---

**१.** १ पिढीपाठात ही लीळा येथे नाही. **मु.** प्रतीत ती उत्तरार्धात (लीळा ४९८) आली आहे. ती अशी : 'माहादाइसीं पुसिलें : "जी जी : या मार्गासि कवणि आदि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या मार्गासि श्रीदत्तात्रयप्रभू आदिकारण : सैह्याद्रीं व्याघ्रवेखें श्रीदत्तात्रएप्रभूचें दर्शन श्रीचांगदेवोराउळासि जालें : तेथौनि तेहीं ज्ञानशक्ति स्वीकरीली : श्रीचांगदेवोराउळाचें दर्शन श्रीप्रभूसि जालें : तेथौनि तेहीं ज्ञान स्वीकरिलें : श्रीप्रभुपासौनि एथ : एथौनि तुम्हां आवघेयां :" म्हणौनि श्रीकरें दाखविलें : ।। हे लीळा **रामे.** ।। ४९८ ।।' २ **पं.** आदिकारण. ३ **अबी.** त्रेता°.

**२.** १ **अआपंहबी.** बेलोपुरीं महादाइसांप्रति पूर्वी : एकी वासना : पैठणीं म्हाइंभटांप्रति° : २ **अआगोगो,पंह.** या प्रतीत रामेश्वरबासाच्या वासनेप्रमाणे 'द्वारावतीये कन्हाडेया ब्राह्मणाचां घरीं अवतारू स्वीकरिला . . . . तेथ कीतीएक दीस राज्य केलें : मग फलेठाना बीजें केलें :' असा मजकूर आढळतो. परशरामबासाची वासना 'फलेठानीं' अशी आहे. तीच येथे स्वीकारली आहे. पिढीपाठातही तीच आहे.

स्वीकरिलें : जनकनायेकु पीता : जनकाइसें माता : मग तेथ केतीएक दीस राज्य केलें : ग्रहस्तधर्म स्वीकरिले : गोसावीयांसि सानेयाचि वेव्हाराची प्रवृति : मातापीता दोन्हीं अपरोक्ष जालीं : मातेयापीतेयाचें श्राध आलें : ब्राह्मणा क्षेणु देउनि आले : मग वोटेयावरि भूमिसएन : वांगनेमू : ब्रह्मचरीयें एं तीन्हीं स्वीकरिली[3] : श्राध केलें : अखवा लोकु जेवीला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : पहुड जाला : गोसावीयांची राणी पुफवंती जाली होती : तीयें ते दीसींचि न्हाली : मग वीडा घेउनि आलीं : वीडा वोळगविला : आणि रति मागों आदरीली : गोसावी रति नेदीति : तेहीं आग्रहो थोरू घेतला : गोसावीं बहुत नीराकरिलें : परि तीयें नीराकरितीचि ना : मग तेहीं म्हणीतलें : "रति नेदा तरि प्राणिया एकु वाट पाहातु असे : तेयाचा प्रतिवावो घडैल :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हुं : आतां काइ?" ऐसें म्हणौनि रति दीधली : मग गोसावीं उदास्य स्वीकरिलें : तेयाचें पोटीं अनुचीत घेतलें : मग केतुलयां एकां दीसां कार्तीक[4] मासा मातापुरा पव्हा नीगाला : मग गोसावीं तेण्हेंचि नीमीत्यें पव्हेयासरिसें बीजें केलें : पेणोवेणा पव्हा मातापूर पावला : आवघां[5] लोकीं पेणीसि मात्रास्नानें केलीं : तेहीं पेणीसि मात्रास्नान केलें : आवघा[6] लोकु घाटावरि नीगाला : तेही घाटावरि नीगाले : मेरूवाळां स्नान[7] जालें : आवघेनि[8] लोकें सर्वतीर्थीं स्नानें केलीं : तेहीं सर्वतीर्थीं स्नान केलें : आवघा[6] लोकु पर्वतावरि नीगाला : तेही पर्वतावरि नीगाले : गोसावी उत्रासंगें[9] धोत्र : खांदीं[10] मात्रा : मोकळे केसकळाप दोहो भागीं : स्याम श्रीमुर्ति : देवगीरीवरि बीजें करिताति : ऐसें जात असति तवं पर्वताचां अधोपरीं वेळुवाचीये[11] जाळीआंतुनि हाक देउनि वाघु नीगाला : जाळीआंतुनि श्रीदत्तात्रयप्रभू व्याघ्रवेखू धरूनि बीजें केलें : पुढां उभे ठाकले : हाक देउनि चपेट उचलुनि[12] श्रीमुगुटावरि चवडा ठेविला : श्रीमुखा श्रीमुख लाविलें : तेथ प्रकासु पडिला[13] : तेथौनि[14] पर आणि अवर एं दोन्हीं स्वीकरिलीं : पर आछादिलें : अवर प्रकटियें केलें : 'वाघु वाघु' म्हणौनि मागीलु लोकू मागां पळाला : पुढीलु लोकू पूढां पळाला[15] : मग श्रीदत्तात्रयप्रभू अद्रीस्य जाले : मग गोसावी

३ यापुढे 'श्राध केलें : . . . . रति दीधली' हा मजकूर **ह.** प्रतीत दिलेल्या एकी वासनेप्रमाणे घेतला आहे. **अआपंह.** प्रतीत तो पुढीलप्रमाणे आहे. 'तेया दीसीं गोसावीयांची राणी पुफवंती जाली होती : तीयें ते दीसींचि न्हाली : रतिचीया चाडा वीनवावेया आली : रति नेदिजे तरि प्रतिवावो लागैल ऐसे सास्त्र बोले : मग गोसावीं रति दीधली : मग गोसावीं उदास्य स्वीकरिलें : ब्राह्मणा आसन देयावें तें नेदितीचि : पिंडप्रदानें नेदितीचि : ब्राह्मणा उदीयाचि भुरि भोजन दीधलें : मग तेयाचें पोटीं अनुचीत घेतलें : . . . .' ४ **हगो.** कार्तिकीए पुनीवेकारणें. ५ **भ.** आघवेनि लोकें. **ह.** अखवेनि लोकें. ६ **भ.** आखवा. **ह.** अखवा. ७ **पं.** आसन. ८ **भ.** आखवेनि. **ह.** अखवेनि. ९ **पंह.** उतरा°. **भबी.** उत्तरा°. १० **हबी.** डावेया खांदावरि पांढरें घोंगडें : कटिप्रदेशाभवंतें वस्त्र गुंडिलें होतें. ११ **रावा.** करवंदीची जाळि. **एवा.** वासनीची जाळि. १२ **हबी.** उभारूनि तीं पाइं चालौनि. १३ **भगोह.** °तेथ दवडुनि अवतारू स्वीकरीला : तेथौनि . . . १४ **रावा.** तेथौनि अवर स्वीकरीलें. १५ **पं.** °लोकु म्हणे ब्राह्मण वाघें खादला : तेथ . . .

नगराआंतु बीजें करीति : पुडी करीति : मेरूआळां आरोगण करीति : देवदेवेस्वरीं पहुडु स्वीकरीति : ऐसें केतुले एक दीस श्रीचांगदेओराउळीं मातापुरीं राज्य केलें[१६] : मग वैसाखीयेसि द्वारावतीये पव्हा नीगाला : तेया लोकासरिसे[१७] श्रीचांगदेओराउळीं द्वारावतीएसि बीजें केलें : मग द्वारावतीये[१८] अवस्थान जालें : ।।

## ३ सूर्पमार्जनीं क्रीडा

माहादाइसांप्रति सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथिची क्रीडा ते ऐसी कीं : श्रीचांगदेवोराउळाचां उजवीये[१] श्रीकरीं सुप : डावीये[२] श्रीकरीं खरांटा : बीदी गोदरीया झाडीति : सुपीं पुंजे भरीति : [३]श्रीमुगुटावरि ठेवीति : नेउनि गोमतीमध्यें घालीति[४] : आणि खुदुखुदुकरि हांस्य करीति : ऐसें अनंतां दान देति[५] :" ।।

## ४ रवळेयां गीतस्रवणीं नीर्वंसु कथन[१]

रवळेन[२] कुंभारें गीतू केला : गोसावीयांसि गोमतीचां तिरीं गुंफा : तेथ आसन असे : तो तेथ आला : गोसावीयांपुढां गीतू म्हणीतला : तवं गोसावी उगेचि : मग तेणें पुसिलें : "जी जी : गीतू कैसा जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तूझा नीर्वंसू होए ऐसा जाला :" ।। *

१६ **पंभहबी.** °एक माहानुभाव म्हणति सा मास मातापुरीं राज्य केलें. १७ **एवा.** पव्हेयासरिसें. १८ **हबी.** °पाताळगुंफे.

**३.** १ **एवा. भ.** डावीये. २ **एवा.** उजवीये. **भ.** उजीवां. ३ **हबी.** मां मां म्हणौनि°. ४ **मु.** °सुपें मार्ग प्रकटे : खरांटेनि विद्या देति :।। ५ **आ.** सुपें हाणेति त्यासि मार्ग प्रकटति : खरांटेनि हाणेति त्यांसि विद्या : तथा मंत्रजात वीदीति प्रकटेति : अवधूतवेषें अतिउदास्यें क्रीडा करीति : (**आहबी.** ऐसें सवाए दोनि पाहार करीति : मग नगरामध्यें पाणीपात्रा बीजें करीति :) **आ.** सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ श्रीचांगदेवराउळीं अवधुतवेणें ऐसीया क्रीडा केलीया :" ।।

**४.** १ पिढीपाठाच्या **मु.** प्रतीत, तसेच **भगो**[१] या प्रतीत ही लीळा नाही. २ **आ.** एकु वी महदाइसीं रवळेयाचा अध्यात्मीचा गीतु आइकिला : तो गोसावीयांपुढां सांघीतिला : याउपरि गोसावीं हे गोष्टि सांघीतली : **आहबी.** "बाइ : रवळा तो कुंभारू : तो आध्यात्मी : तेणें आध्यात्मी गीतु केला : . . ."

*द्वारावतीकार श्रीचक्रपाणी यांच्या यापुढील दहा लीळा लीळाचरित्राच्या सर्व पोथ्यांत या ठिकाणी घेतलेल्या आढळत नाहीत. त्या 'द्वारावतीच्या लीळा' म्हणून स्वतंत्रपणे वेगळ्या संग्रहीत केलेल्या असतात. अवतारकालानुक्रमाच्या दृष्टीने माझ्या मते त्या या ठिकाणी घालण्यास हरकत नाही. सर्वज्ञांनी त्या कोणाला व कोठे सांगितल्या याचा स्पष्ट निर्देश कुठेही आढळत नाही. म्हणून एका दृष्टीने त्या 'अज्ञात' लीळाच आहेत. यापूर्वी आलेल्या 'सूर्पमार्जनी क्रीडा' व 'रवळेया गीतस्रवणीं नीर्वंसु कथन' या लीळाही वस्तुतः अज्ञात लीळाच आहेत. 'लीळाचरित्रा'च्या एकांक विभागातील अनेक लीळा 'अज्ञात लीळा'च आहेत. पण म्हाइंभटांनी कालानुक्रमाच्या दृष्टीने त्या लीळा त्या त्या ठिकाणी घातलेल्याच आहेत ना? त्याच दृष्टीने द्वारावतीकाराच्या पुढील दहा लीळा मी येथे घातल्या आहेत. या लीळा **अ** प्रतीतील 'द्वारावतीच्या लीळां'तून उद्धृत केल्या आहेत.

## ५ कऱ्हेकूचकीं आसन

[कव्हणी एकू ब्राम्हणू[१] द्वारावतीएसि नीगाला : तवं[२] काबा वाट घेतली : आवघें गेलें : बैलू गेला : बाइला भवरी तोंडीं[३] घातली होती : ते वांचली : द्वारावतीये सहश्रभोजन करीन म्हणौनि नीगाला होता : द्वारावती पावला[४] : सप्ततीर्थीया केलिया : एरी दीसीं ब्राम्हणां नीमंत्रण दिधलें : इतुलेनि तो म्हणों लागला : "वेचू नाहीं : वेचेंवीन काइ करूं?" मग ब्राम्हणीं भवरि दाखवीली : "वेचेंवीन गडबडुं नको :" तवं तेणें म्हणीतलें : "हे कैंची ?" "ना हे मीयां तोंडीं घातली होती : तरि वांचली :" "हो कां : तुं अन नीफजवि : मी गोसावीयांसि नीमंत्रण देईन :" तेया पुसीलें : "गोसावी कवण ?" "मां श्रीचांगदेओ-राउळासि :" "ना ते कोण ?" "ना ते कऱ्हेयाचीये करवडीमध्यें बैसले होते ते :" "मां तेया कैसी अक्षेत[५] द्याल ?" "ना ते पूरूख आहाति :" इतुकेन तो गेला : गोसावीयासि नीमंत्रण दीधलें : तीया अन नीफजवीलें : तेणें संध्यास्नान केलें : तवं गोसावीं बीजें केलें : तवं तेणें म्हणीतलें : "आधीं गोसावीयांसि आरोगणा देओं : मग एरांसि देओं :" गोसावीयांसि आसन रचीलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : श्रीचरणक्षाळण केलें : टीळा जाला : पातळीं वाढीलें : मग आरोगणा करूं लागले : अस्त्रीया म्हणीतलें : "जी जी : वाढूं ?" गोसावी उगेचि : "आंणि आंणि :" म्हणौनि वाढीति : ऐसें पांचांसेयांचें अन गोसावी जेवीले : तवं तीयां पोटीं भावीलें : "इतुकें अन एहींचि खादलें :" म्हणौनि : *आणि गोसावीं श्रीकरु आखूडिला*[६] : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : आणि गोसावीं बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "मग तीया पातळी काढीलीया : तवं पांचसें पातळी नीगालीया : मग तेणें ब्राह्मणें म्हणीतलें : "मर मर पापीणी[७] : ऐसें काइ केलें ? सहश्रा ब्राम्हणाचें अन एथचि देतो तरि यांचांचि ठाइं सहश्र ब्राम्हणां पूरतें[८] :॥]

## ६ वाराणसी जनु नेणें आणणें

[वाराणसी[१] अवघा पव्हा नीगाला : येकें दोघें राहीलीं : तीयें दुख करूं लागलीं : गोसावीयांतें म्हणति : "काइ करूं जी : अवघा पव्हा गेला : आम्हीं राहीलों :" गोसावीं

---

**५.** १ **ग.** वेव्हारा. २ **भग.** °वाटे काबे उठीले : तीहीं तीएं नागवीलीं. ३ **एवा.** वेणीये आंतु लपविली होती. ४ **भग.** °गावीचां म्हणीतलें : "यथ यक पुरुष असति : त्यांसि जेउं घाला : तुमचें सहश्रभोजन पावैल :" मग तेणें गोसावीयां आंवंतिलें : बाइलेसि नीरोपु दीधला : मग तीया पाकनिष्पति केली : तेयांसि बोलाउं पाठवीलें : तो गोसावीयांसि बोलाउं आला : तवं गोसावीयांसि कऱ्हे कंचुकीं आसन असे : मग तेणें श्रीचांगदेओराउळ गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि आसन घातलें : तवं तीया म्हणीतलें : "आवघेया गावांतु तुज ब्राह्मणु हाचि जोडला ?" चरणप्रक्षाळण जालें : गोसावीयापुढां पातळी ठेविली : ते मांडे घाली : तवं गोसावी वरण जेवीति : ते वरण घाली : तवं गोसावी भातु जेवीति : ऐसी वीरुध आरोगण जाली : मग बीजें केलें°. ५ **पं.** आखत. ६ **(पं.)**. ७ **भग.** °तुझा मनोर्थु असता तरि माझें सहश्रभोजन होतें :" ८ **अ.** पूरता.

**६.** १ **भग.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे : कव्हणी एकु वाराणसी जातु होता : तवं गोसावीं

म्हणीतलें : "आम्हीं तुमतें नेउनु :" जीए दीसीं पव्हा गेला : वाराणसी पावला : तीए दीसीं तीयें जनें नेलीं : तीयें अवघेन लोकें देखीलीं : तेयांतें पूसीलें : "तुम्हीं कै नीगालीति ?" "ना आजिचि नीगालों :" तेयां आश्चर्यें वाटलें : गोसावीं आजीचि नेलीं : एतुकेनि माघौतीं तेधवांचि आणीलीं : आवघेयां लोकां आश्चर्यें जालें : "आजीचि नेलीं : आजीचि आणीलीं :" आणि तीयें म्हणति : "गोसावी आम्हांसि वाराणसी भेटले :" गांवीचीं म्हणति : "गोसावी गांवीचि असति :" मग तेयांसि वीस्मो जाला : ।। ]

## ७ सारंगधराचा चांदोवा वीझवणें

[गोसावी आसनीं उपविष्ट असति : एकू दीस गावीचे माहाजन बैसले असति : तवं गोसावी हास्य करूनि[१] श्रीकर कुसकरीले : तवं काळे जाले : मग तेहीं पूसीलें : "जी जी : श्रीकर काळे कां जाले ?" गोसावीं म्हणीतलें[२] : "सारंगधरीचे भोपे सारंगधरासि आर्ति करीत होते : ते चांदोवेयासि आगी लागली : ते एथौनि वीझवीली :" तवं तेयांसि आश्चर्यें जालें : तोचि मासू : तोचि दीसू लीहुनि पाठवीला : तवं साचचि : मग तेहीं म्हणीतलें : "साच : तै गोसावी एथ होते :" ऐसा[३] वीस्मो जाला : ।। ]

## ८ सारंगधरा उचीष्ट बोनें सूववणें

[गोसावी[१] आसनीं उपविष्ट असति : जवळे कव्हणी बैसले असति : तेहीं पूसीलें : "हें काइ जी : उचीष्ट बोणें कैसें ?" गोसावीं म्हणीतलें : "सारंगधराचा भोपा : दीवा जात होता : ते वाति गेली : म्हणौनि बोटें आबूथीली : तो पोळला : तैसीचि तोंडीं आंगुळी सूदली : तैसेंचि सारंगधरा बोणें दाखवीलें :" तोचि मासू : तोचि दीसू लीखीत पाठवीलें : तवं साचचि[२] : तेयां आश्चर्यें जालें : ।। ]

## ९ श्राधग्रहीं आरोगण

[कव्हणां एकाचां घरीं श्राध होत होतें : तेथ गोसावी एती म्हणौनि नीर्वंडी केली : दारवठा घातला : गोसावीं तेथ उत्पवन करूनि बीजें केलें : खीरीचीं दोनि अळदीं नीवतें

---

तेयासि वारीलें : मग आवघा पव्हा गेला : (पूर्णिवेचां दीसीं—ग.) गोसावी तेयासि तेथ घेउनि गेले : आणि आणिले : आणि तीयें म्हणति . . .

७. १ **भग.** °टाळी पीटौनि उभे राहीले : श्रीकर काळे जाले. २ **पं.** °सारंगधरीचा भोपा वाति लाउं गेला : तवं . . . . ३ **भग.** मग तेयासि आश्चर्यवीस्मो जाला.

८. १ **भग.** प्रतीत 'श्रीमुखीं आंगुळी घालणें :' अशी आदि आहे. आरंभ पुढीलप्रमाणे : एकु दी गोसावीं श्रीमुखीं आंगुळी घातली : आणि हास्य केलें : तवं माहाजनीं म्हणीतलें : "जी जी : ऐसें काइ ?" गोसावीं म्हणीतलें : . . . (या उत्तरात सारंगधराला बोणे दाखविल्याचा उल्लेख नाही.) २ **भग.** °तीहीं म्हणीतलें : "ते दीसीं गोसावी यथ होते :"

घातलीं होतीं : तेथ आरोगणा केली : मग मूत्र केलें : तें सोनें रूपें जालें : मग तेथौनि बीजें केलें : ।। ]

## १० वसो जीववणें

[गावीं एकू वसो असे[१] : तो लींगावरीलें फुलें प्रतदीनीं खाए : तो एकू दीसू नीगतां सीरकला : तो सरला : ते देवतेसि पूजापूरस्कारू वर्जला : गोसावीयांसि गोमतीएचां तीरीं आसन असे : भोपे आणि माहाजन गोसावीयांपासि आले : दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : मग वीनवीलें : "जी जी : वसो देवतेवरीलें फुलें प्रतदीनीं खाए : आजि नीगतां सीरकला : तो सरला : देवतेसि पूजापूरस्कारू वर्जले जी :" मग गोसावी तेथ बीजें केलें : गोसावीं[२] खडेन सीतीला[३] : आणि उठीला : तो पौळीबाहीरि जाउनि पडीला : लोकांसि आश्चर्य जालें : ।। ]

## ११ चांपेल स्वीकारू

[नारायणाचां देउळीं दोनि घागरी करूनि चांपेलाच्या ठेवीलीया होतिया : तिया गोसावीं श्रीमुगुटावरी घेतलीया : वोतीलीया : तवं भोपां पूसीलें : "राउळो : एथ चांपेल होतें तें काइ केलें?" गोसावीं म्हणीतलें[१] : "एणें घेतलें :" म्हणौनि बोंबीएवरि[२] श्रीकरीचें बोट ठेवीलें आणि बोंबीएहुनि[३] चांपेल नीगालें : तेणें मागुती घागरी भरीलीया : तेयासि जालें : गांवीचेया लोकांसि जालें : आवघेयांसि आश्चर्यें जालें[४] : ।। ]

## १२ स्वानवछ प्रतेजणें

[गोसावी उभया हाटवटीया एत होते : तवं स्वान सरलें होतें : तें गोसावीं श्रीमूगुटावरि ठेवीलें : गावाबाहीरी प्रत्येजीलें : ।। ]

---

**१०.** १ **पं.** °वसो नासीआंतु बैसला : गुरउ उठउं लागला : तो नुठी : गांवीचेया लोकापुढें सांघीतलें : गांवीचा लोकु आला : उठउं लागला : तो नुठी : तेव्हळि गोसावीयांपुढें सांघीतलें : "जी जी तो नुठी : आतां काइ करूं जी : देवता स्परीसी राहिली :" गोसावीं खडा घेतला : हाणीतला : आणि उठीला : चौहाटावरि गेला : मग कोण जाणे काइ जाला : ।। २ **भ.** श्रीचरणीचेनि आंगुठेनकरूनि उठवीला : ३ **ग.** चिमिला.

**११.** १ **भ.** °"तें यणें लींगे घेतलें :" म्हणौनि लींगासि बोट लावीलें : तवं आवघें चांपेल नीगालें : ते देउळाचेन द्वारेहुनि नीगालें : मग तेयां आश्चर्यवीस्मो जाला : ।। २ **अ.** श्रीमुगुटावरि. ३ **अ.** श्रीमुगुटीहुनि. ४ **एवा.** वेव्हारेया एकाचीए घरीं चांपैलाचीया घागरी होतीया : तिया गोसावीं श्रीमुगुटावरि घेतलीया : तेहीं म्हणीतलें : "राउळो : ऐसें काइ केलें ?" म्हणौनि सांवडीलें घागरी भरलीया : मडकीं भरीली : लोकांसि पूरलें : आवघेयांसि आश्चर्यें जालें :

## १३ खीरभोजनीं वीस्मो

[ द्वारके[१] प्रदेसीं एकी गांवीं श्राध : बाइला खीरि नीवों घातली होति : नीवों घालीतां पोळली : आणि तोंडीं आंगुळीया घातलीया : गोसावीं हास्य करूनि श्रीमुखीं आंगुळी घातली : तें माहाजनीं पूसीलें : " राउळो : ऐसें काइ ? " गोसावीं म्हणीतलें : " बाइला खीरी नीवों घातली होती : ते पोळली :" माहाजनीं तोचि दीसू तोचि मासू लीहोनि पाठवीलें : तवं तिया बाइला म्हणीतलें : " साच : तेधवां श्रीचांगदेओराउळ गोसावी येथ होते :" आवघेयां आश्चर्य जालें :।। ]

## १४ कामाक्षा सूगरणी म्हणणें

[ एकू दीसू गावीचे माहाजन गोसावीयांपासि बैसले होते : तवं गोसावीं श्रीकरेंकरूनि टाळि वाइली : आणि उभे राहीले : श्रीमुखीं आंगुळी घातली : माहाजनीं पूसीलें : " राउळो : ऐसें काइ?" गोसावीं म्हणीतलें : "काउरळीची कामाक्षा अळजपूरीं वडे पूरीया तळीत होती : पूरी काढीतां पोळली : ते तोंडीं आंगुळी सूदली :" मग माहाजनीं तोचि दीसू तोचि मासू लीहुनि पाठवीलें : तवं कामाक्षा म्हणीतलें : " साच : हें तुम्हांपूढें कवणें सांघीतलें ?" " ना हे श्रीचांगदेओराउळीं सांघीतलें :" तीसि आश्चर्य जालें : *तिया म्हणीतलें[१] : " हो : ते दीसीं गोसावी एथ होते[१] :"* माहाजना आश्चर्य जालें : हे गोष्टि माहादाइसीं गोसावीयांपासि सांघीतली : ।। ]

## १५ श्रीप्रभू भेटि

माहादाइसांप्रति सर्वज्ञें म्हणीतलें : "रीधपुर प्रांतीं रीधपुरा आणि नांदिगावांमाझारि दीढा गाउवांचेनि मानें खेड[१] नावं गव्हाण : तेथ काणवां ब्राह्मणाचां ग्रहीं स्रीप्रभु गोसावीं गर्भीं अवतारू स्वीकरिला : मातें नावं नेमाइसें : पितेयां नावं आनंतनाएकू : गोसावियांचेया मातेयापितेया बहूतें[२] लेकरूवें जालीं : तीएं जीतीचि ना : मग निपटनेयांचे गोसावी जाले : मग तेहीं गुंडो ऐसें नावं ठेविलें[३] : गोसावियांची मातापीता अपरोक्षें जालीं : मग मामेनि माउसीया वाढवीलें : मग वरीखां सातांपांचांमध्यें[४] मूंजिबंधन जालें : मुंजिव्रत

---

**१३.** १ **भ.** यकू दीसू आवघे माहाजन गोसावीयांपासि बैसले होते : गोसावी हात झाडुनि उठीले : मग माहाजनीं म्हणीतलें : "राउळो ऐसें काइ ?" गोसावीं सांगीतलें : "काउरूळीची कामाक्षा क्षीरि नीववीति होती : ते पोळली :" मग तीहीं लीहुनि पाठवीलें : . . . .

**१४.** १ (ग.).

**१५.** १ **पंहबीआ.** खेडें. **रावा.** कांटसरें. **एवा.** कांटोपरें. **एवा.** धामने माउरें. २ **एवा.** सात. **एवा.** नव. ३ **आ.** °गोसावीयांसि साता वरुषाभीतरि व्रतबंध जाला : मग मातापीतरें अपरोक्षें जालीं : तैं म्हणीतलें : "बा : दगडगुंडे वाढेति ऐसा वाढ." म्हणौनि तेंचि नाम स्वीकरीलें : ४ **गो.** सातां.

केलेयां अनंतरें मग रीधपुरासि आणिले : तीको उपाध्ये : बोपदेओ उपाध्ये : माहादेओ उपाध्ये : हे तीघै भाउ : तेयांपासि वेद अभ्यासु घातले : गोसावीं अदभूत[५] सामग्री[६] स्वीकरिली[७] : गोसावियांसि नीमीखें ये तें आणिकासि देहें[८] नैये : गोसावियांसि देहें[८] ए तें आणिकासि मासें नैए : गोसावियांसि मासें ए तें आणिकासि वरीखें नैए : चुकि भुलि ते चाटेयांहीं सांगति : आणि उपाध्यांहीं सांघति : वरीखां बारांतेरांमध्यें[९] संन्यासू स्वीकरिला : कमळारण्य गुरू : गोसावीयां नावं वीबुधारण्य : ऐसें नावं स्वीकरिलें : *मग केसवापासिली मढीहुनि द्वारावतीए बीजें केलें : दुंडीराउळ*[१०] *सरिसे होते*[११] :

स्रीप्रभु गोसावियांसि गोमतीएचां तीरीं आसन जालें : पुढां दुंडीराउळ[१२] बैसले असति : दंडु रोविला : पुढां देवपटु देव मांडिले : स्रीचांगदेओराउळ गोसावीं बीदी-गोदरीया झाडुनि तेथ बीजें केलें : स्रीमुगुटीं सुप : श्रीकरीं खरांटा : गोमतीएमध्यें पुंजे नीक्षेपिले : स्रीप्रभूचां मुगुटीं सुप ठेविलें : वरि खरांटेयाचा घाओ दीधला : *तेथ श्रीप्रभु परावर स्वीकरिलें : अवर अछादिलें : पर प्रकटियें केलें*[१३] : दुंडीराउळ खराटेनि हाणीतले : तेयां मंत्रजात वीदीत सीधि प्रकटिली : दंडु मोडिला : गोमतीए आंतु घातला : देव देवपटु सुपीं भरूनि गोमतीएं आंतु नीक्षेपिले[१४] : सुपें हाणीतलेयां तेयां वीद्या होति : खरांटेनि हाणीतलेयां मार्ग प्रगटति[१५] : मग स्रीप्रभू मागुतें रीधपुरासि बीजें केलें :

नगरांआंतु पुडी करीति : बारवे अथवा देवाळां आरोगण करीति : परि झोळी धूआवेयाची प्रवृति नाहीं : ते आवघी अनरसेंकरूनि झोळी कुहीजली : ते फाटली : ते भिक्षा करितां अन खालि सांडे : आणि गोसावी तेथचि बैसौनि आरोगण करीति : लोकु म्हणे : "पुरुखांचां ठाइ तूर्य अवस्था असे :" एक नीद्रास्थान नाहीं : म्हणौनि अनिएत[१६] वासु म्हणीजे :" ।।

---

५ **आहगो.** अचाट. ६ **आह.** प्रज्ञा. ७ **गो.** °उपाध्ये धडा घालुनि नीगति : गोसावीयांसि येओं सरे. ८ **पंहबी.** दीसें. ९ **एवा.** सोळां वरीखांउपरि. **आनोबा.** °रीधपुरिचां बारवे केसवा दखिणीली मढीं—. **रावा.** °सासटिचां पींपळगावीं गंगेआंतु°. **एवा.** °द्वारावतीये°. १० **आहबी.** सुक्लभट. ११ **(आहबी.)**. १२ **एवा.** सुक्लभट. १३ **(गोमु.)**. १४ यापुढे 'ज्ञानशक्ति स्वीकरिली' असे **अआपंभहबी.** प्रतीत आहे. वर **गोमु.** प्रतीतील 'तेथ श्रीप्रभु परावर स्वीकरिलें' हा पाठ स्वीकारल्यामुळे हे वाक्य गाळले आहे. १५ **आ** प्रतीत यानंतर पुढील स्वतंत्र लीळा आहे. "**द्वारावतीये गुंफे अवस्थान** : सर्वज्ञें म्हणीतलें : " मग श्रीप्रभूसि श्रीचांगदेवराउळाचीये गुंफे अवस्थान जालें : केतुले एकु दी तेथ श्रीप्रभु राज्य केलें : नगरामध्यें पुडी करीति : कव्हणी हातावरि पाणी घालीति : तें भीतरि घेति : मग पुडी घालीति : तेथचि खाति : चाखति : दुंडीराउळ सरिसे असति : ते म्हणति : "राउळो : वीटाळ : वीटाळ :" तर्‍हीं घरोघरीं पुडी चाखैति : मग दुंडीराउळ तैसे देखौनि सांडोनि गेले : श्रीप्रभु राहाति : मग श्रीचांगदेवराउळीं श्रीप्रभूसि आपुलेनि श्रीकरें झोळी दिधली . . ." यानंतर झोळी कुजल्याचा वृत्तांत आहे. दुंडीराउळाऐवजी शुक्लभट बरोबर होते, एवढ्या फरकाने **गो.** प्रतीतही हा विटाळाचा वृत्तांत आलेला आहे. १६ **अ.** अन्यत्र.

## १६ कामाक्षानीमीत्यें पुरत्यागू

[१]माहादाइसें द्वारावतीएसि गेलीं होतीं. तीएं हीवरळीएसि भेटलीं : " जी जी : आम्हीं स्रीचांगदेओराउळा गोसावियांचीये गुंफे गेलों होतों : तेथ एक पुरूख बैसले होते : तेयांचीये[२] मुखींहूनि रूपेयाचीया सरीया : सरीया ऐसीया नीगति : तें तैसें काइ जी ?" "बाइ : ते तेयांची लाळ :" "जी : जी :" मीयां तेयांतें पुसिलें : "तुम्हांसि नावं काइ ?" " ना : माहादमुनि :" "तुम्हीं कोणाचे अनुग्रहीत ?" " ना : अनंतमुनिचे : " "तुमचे अनंतमुनि कोणाचे अनुग्रहीत ?" " ना : स्रीचांगदेओराउळा गोसावियांचे :" "तुम्हीं काइ म्हणा ?" "ना : अनंतु अनंतु ऐसें म्हणों :" "तुमचे अनंतमुनि काइ म्हणति ?" " ना : वीद्या आणि पुरूखू माहाराष्ट्रीं असति :" "श्रीचांगदेओराउळीं गोसावीं कोणी परी बीजें केलें : तें तूम्ही जाणा ?" "ना : तें आम्हीं नेणों[३] :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीचांगदेओराउळीं कोणी परी बीजें[४] केलें ऐसें ते केवि जाणति : *ते कव्हणीचि नेणति*[५] : तें तुम्हांसि एथौनि सांघिजैल :"

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काउरळीची कामाक्षा : ते हृटयोगिनी : तीया बहुत सीधसाधक[६] तपापासौनि ढाळिले[७] : ते पुरूखांची साब्दी प्रसीधि आइकौनि रतिचीया चाडा आली :" तेथ ब्रम्हचर्याची प्रवृति : स्रीचांगदेओराउळासि गुंफे आसन होतें : ते रतिचीया चाडा भीतरि एओं बैसली : तवं नैएवे[८] : मग वीनविलें : " जी जी : मज रति देयावी जी :" स्रीचांगदेवोराउळीं म्हणीतलें : " एथ ब्रम्हचर्याची प्रवृति : एथ स्रीदतात्र-प्रभूची आज्ञा असे : स्रीप्रभूची आज्ञा लंघुनि भीतरि एओं नैये :" एतुलेनि ते गुंफेचां

---

१६. १ **अआपंहबी.** हे गोष्टि गोसावीं हीवरळीएसि सांघीतली° (पुढे **पृ.** ४६३ पाहा). २ **आ.** तयाचियें उजवीये नाकपुडीयेहुनि सोनियाचीया सरिया नीगेति : डावीये नाकपुडीहुनि रूपीयाचीया सरीया ऐसीया नीगेति : **एवा.** °तोंडीहुनि : ते काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते तयाची लाळ : स्वास : उस्वास : ते तयाचीय देहीचीया देहधातु बध जालीया :" ३ यापुढे **पं.** प्रतीत पुढील मजकूर आहे : 'उमाइसें : महदाइसें : तीकवनाएकाचेया घरासि नीजावेया गेलीं : पानवैएवरि वृंदावनापासि नीजैलीं : उमाइसीं म्हणीतलें : "रूपै : तेहीं जें म्हणीतलें : विद्या आणि पुरुषु असति महाराष्टरीं : तरि विद्या ते ब्रह्मविद्या : आणि पुरुषु ते आमचे गोसावी :" आणि सवळेसीचि गोसावीयाचीया दरीसना आलीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैसा स्थानीं तैस्या तैस्या गोष्टी न कीजति की :" "जी जी : गोसावी केवि जाणति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणिजे हेतुधातुतव :" "जी जी : हेतुधातु ते कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणिजे तुम्हांआंतु उठीतांबैसतां :" एकी प्रसंगीं पुसिलें : "जी जी : आपण काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे प्रधानांचें कुमर :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाड : श्रीचांगदेवराउळीं कोणी परी बीजें केलें ऐसें ते केवि जाणती : . . ." ४ **रावा.** पुर त्यजिलें. ५ (**पभगोहबी.**) ६ **पंगो.** पुरुष. ७ **अहबी.** टाळिले. **एवा.** धाडिले. ८ **ह.** नएवेचि. °**एवा.** भीतरि ऐसा पाओ घालुं बैसली (**एवा.** रीगाली) तवं स्रीचांगदेवो राउळीं 'हां' म्हणौनि पाचारिली : एतुलेनि भीतरि पाओ न घलवेचि :°

द्वारीं सात अहोरात्रें उभींचि होतीं : एकु पाओ भीतरि : एकु बाहीरि : ऐसा तीचा आग्रहो देखौनि श्रीचांगदेओराउळीं योगअभ्यासें तें पुर त्येजिलें : आणि ते भीतरि आली : पाहे तवं पुर त्येजिलें : तीया म्हणीतलें : "पुरूख खेळीनले : ऐया रे : पुरूख कैसे हटीए ! पुरूखीं देह त्येजिलें : आणिकां पुरूखांतें हटें जींकों ए : तैसें यातें जींकों नैये : मां पुरूख सामर्थ्याचे !" ऐसें म्हणौनि नीगालीं : तेथिचां भोपीं[९] नीक्षेपु केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीचांगदेओराउळांसि मागुतें तें पुर स्वीकारावेयाची प्रवृति होती : परि तेहीं लाहो केला :"॥

## १७ पुरस्वीकारू

मग माहादाइसीं पुसिलें : "हा जी : तें पुर तेजिलें : मग श्रीचांगदेऊराउळीं कवणीकडे बीजें केलें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीये समैं भरवसीं गुजरातेचेया प्रधानपुत्राचें देह गेलें होतें : तें उठउनि स्वीकरिलें :" माहादाइसीं पुसिलें : "तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : प्रधानकुमरासि सातपांच दीस काहीं एकि रुजा जाली[१] : मग तेयांचें देह गेलें : माड केले : समसानासि आणिलें होतें : तें उठउनि स्वीकरिलें[२] : वस्त्र हालीनलें : वास पाहों लागले : 'आरे वास पाहातें :' आणि म्हणीतलें : 'कूमरू जीयाला जीयाला :'" म्हणौनि वाद्यें लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रधानु सीहाणा चतुरू : कुसळु : तेणें दृष्टीं देखतखेओ जाणीतलें : जें हा तो नव्हे : सीधांसाधकांचां[३] ठाइं प्रकायाप्रवेसु असे : तेहीं भोगाकारणें हें स्वीकरिलें : तैसाचि 'कुमरू जीयाला जीयाला' ऐसें म्हणौनि मंगळ वाद्यें वाजीनलीं : अवघेया नगरांतु गुढीया उभिलीया : पांचपालवीया आणिलीया : पांचपालवीं पंचामृतें न्हवण केलें[४] : बरवीं धुवटें वस्त्रें वेढिलीं : मग दांडीयेवरि आरोहण होउनि नगरामधुनि : कमळा नावं राणी : तेयांचेया आवारासि बीजें केलें : मंगळ तुरें वाजों लागलीं : तेथही पांचपालवीं न्हवण जालें : पाटु[५] पासवडिला : कमळाआउसासीं सेसु भरिली : प्रधानें बहुत वेचिलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तो प्रधानु : सीहाणा : चतुरू : कुसळु : तेणें म्हणीतलें : 'पुरूख जे होती ते राज्याचेनि अभिळाखें स्वीकरिती :' ऐसा प्रधानासि संदेहो : म्हणौनि तेणें बारां गाउवांचेनि मानें भवतें दरेदरकूटें : गिरीकपाटें : आडदरे : कोहंके : तळांमळां नइवाहाळां मढमढीया

---

९ **एवा.** श्रीचांगदेओराउळांचां सीक्षीं.

**१७.** १ **एवा.** उपनली. २ °**रावा.** उथानपींडू देयावेयाकारणें तोंड उघडिलें : तवं डोळे उघडिले. **आ.** °कवेस्वर म्हणति : नगरांतु नाहीं बाहीरी आणिलें : नगरवीसावा दीधला : उथानपींड देयावयाकारणें : आणि पुत्रमुख पाहावया म्हणौनि तोंड उघडुनि पाहीलें : तवं तेणें डोळे उघडीले : तेज फाकले : साजीव भाव आले : ते जाणवीले : ३ **एवा.** कंथडीनाथाचां. **एवा.** पुरुखांचां. ४ **एवा.** जालें. ५ **हबी.** सोवासीनि बैसौनि°.

देउळें : रानींवनीं : कव्हणीं देह ठेविलें असैल : म्हणौनि भवंतें चहूंकडे पाहावीलें : सोधवीलें : तवं तेथ काहीं नेदखतीचि : मग आपुलीए राणीयेकरवि ओव्हारीएतें कमळाउसांतें वीहरणीचीया खूणा पूसीवीलीया : 'मागीलासारीखें वर्तन कीं काहीं अनसारिखें?' तेहीं ओव्हारी कमळाआउसांतें पुसिलें : 'मागिलासारिखें वर्तन कीं काहीं अनसारिखें?' तेंहीं म्हणीतलें : 'मागिलाचि सारिखें :' मग प्रधानें बाळलेणें पुसविलें : कमळाराणीयां म्हणीतलें : 'तुमचें बाळलेणें कें आहे?' 'ना उगाणां आहे :' 'तरि काइ काइ आहे?' 'ना अमुकें अमुकें आहे :' खूण पुरली : एतूलेनि तेयांचा संदेहो नीवर्तला : मग भ्रांति फीटली :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ एथौनि तेयांचे सकळै[६] गुणधर्म स्वीकरिले : गोपाळमंत्री दीक्षा : गोपाळनी आण : राणीएचा पढीयाओ : जुआंचें वेसन : वय : रूप : गुण : उपगुण : बळ : प्राक्रमु : जाणीव : सेहाणीव : दाहाही गुण स्वीकरिले :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : प्रमेस्वरू सकळही देहधर्म जीवधर्म स्वीकरीति : " गोसावीयांपासौनि एकू पुत्रु जाला : तवं गोसावीं तेथ राज्य केलें : ।।

## १८ जुतक्रीडा[१]

गोसावीयांसि सारी जुं खेळावेयाची प्रवृति : मग गोसावी प्रतदीनीं जूआंठेयासि बीजें करीति : सारी जुं खेळावेयाचें वेसन स्वीकरीति : गोसावी प्रतदीनीं सारी जुं खेळति : जीतुकाही जीणा ए तीतुका दानासि देति : एकु दीं गोसावीं हारिची प्रवृति स्वीकरिली : बहुत जुं हारवीलें : मग पाउगीयें पायांवरि हात ठेउनि वीनवीलें : "जी जी : आंखू[२] पाहिजो : मग पुढारें खेळिजो जी :" गोसावीं[३] आंखू पाहिला : तवं बहुत हारविलें असे : "जी जी : देवा कीजो : मग पुढारें खेळिजो जी : जुइचें जुइं : भूइचें भूइं : आमचें देयावें : मग बीजें करावें :" मग गोसावीं हडपीयाजवळि होतें तें दीधलें : तवं न पुरे : तेव्हळि श्रीमुर्तीवऱ्हील अळंकारभूसणें दीधलीं : तऱ्हीं न पुरेचि : मग गोसावीं गुळुळा केला : वीडा घेतला : मग गोसावीं आवारासि बीजें केलें[४] : जुआरी दारवठावरि सरिसे आले : तेथ श्रीचरणांवरि माथा ठेवुनि मोचेयाचा पुडा धरिला : मग वीनवीलें : "जी जी : गोसावी भीतरि बीजें करिती : आणि ते आमतें धरिती : मां गोसावीयांतें कवणें बोलवावें? गोसावीयांतें कवणें वीनवावें? तरि आमचें देयावें : मग भीतरि बीजें करावें :" तेव्हळि गोसावीं म्हणीतलें : "हें तुमचें दीधलेयांवीन स्नान देपुजा करी : आरोगण करी तरी

---

६ **रावा.** चाऱ्ही . . . राणीयेचा पढीयाओ : जुआचें वेसन : गोपाळनी आण : गोपाळमंत्री दीक्षा : हे चाऱ्ही गुणधर्म स्वीकरिले :

१८. १ **अगो.** °क्रडा. **पंमबी.** द्यूतक्रीडा. २ **पंह.** आंकु. **बी.** अंक. ३ **भगो.** गोसावीं आंखाहारी पाहिलें : तव आंखू (**गो.** अर्थ) बहुत जाला. ४ °**आनोबा वासना** : तेथचि जुआरीं वीनवीलें : श्रीचरणावरि हातु ठेविला : " जी जी : आमुचें देयावें : मग बीजें करावें :"

गोपाळनी[५] आण :" येतुलेनि गोसावीं भीतरि बीजें केलें : तवं कमळा नावं राणी मंचकावरि बैसली होती : गोसावीयांतें बीजें करितां देखिलें : आणि झडकरि उठौनि उभीं ठेलीं : गोसावीयांसि मांचेयावरि आसन जालें : मग कमळाआउसीं म्हणीतलें : "हें काइ जी ? आझुनि गोसावियांसि गुळुळा नाहीं : वीडा नाहीं : आरोगणेसि उसीरू जाला : तो बडुवा कें गेला ?" तवं सर्वज्ञें म्हणीतलें :"एथौनि जुं बहुत हारविलें : तेयांचें दीधलेयांवांचौनि आरोगण कीजे तरि गोपाळनी आण वाइली असे : तुमचीं अळंकारभूसणें असति तीएं आरूतीं घेउनि या : मां तेयांचें फेडिजैल :" तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं आपुले अळंकार नेदूं : आम्हांसि बाबाचें कोपणें होइल :" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "देया : मां एथौनि तुम्हांसि दूणा अळंकारभूसणें कीजैल :" तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं आपुलें अळंकार नेदूं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमचे देइजति ना तरि गोपाळनी[६] आण :" तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं आपुले अळंकार देओं तरि आम्हांही गोपाळनी[६] आण :"

मग गोसावीं उदास्य स्वीकरिलें : गोसावीं उपरियेवरि बीजें केलें : माचेयावरि पहुडु स्वीकरिला : गोसावीयांचेया माता तेहीं मर्दनीया पाठविला : तो आला : वीनउं लागला : गोसावी पडदणी नेघति : मग उलंगीया पाठविला : तो वीनउं लागला : गोसावी वीनती न स्वीकरीति : *तेयातें म्हणीतलें : "क्षुधा नसे[७] :"* मग आपण आलीं : तीएं उठउं लागली : परि गोसावी उपहुडु न स्वीकरीति : मग कमळाआउसांतें पुसिलें : तीहीं म्हणीतलें : "आजि जुं खेळीनले : तेयांसि आपुला आवघा अळंकारू हारवीला : माझा अळंकारू मागत होते : तो मीं नेदींचि : तरि रूसले असति : आणि काइ ?" रायाची वोळग वीसर्जली : मग केतुलेया येका वेळा राउळीहुनि प्रधानु आला : तेणें एतक्षेणीं राणीएतें पुसिलें : "हरिपाळदेयासि[८] आरोगण जाली ?" ऐसें तो प्रतदीनीं पुसे : तवं तेहीं म्हणीतलें : "ना : नाहीं जाली :" तवं तेहीं म्हणीतलें : "कां नाहीं जाली ?" राणीयां तेयांपुढें अवघेचि मागील वृतांत सांघीतलें : प्रधानें आवघे वृतांत आइकिले : तैसाचि तो उपरीयेवरि आला : "कां गा बा : आझुइं आरोगण नाहीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि जुं हारविलें असे : तेयांतें म्हणीतलें असे : 'तुमचें दीधलेयांवीन आरोगण कीजे तरि गोपाळनी आन :'" मग तेणें म्हणीतलें :"तूमचें दीधलें : बा रे : हें आवघें तुझें नव्हे ? हें कोणालागि जोडिलें असे ? हें राज्य कोणाचें ? हें आवघें तुझें : नव्हे?" ऐसें म्हणौनि डावा हातु तळिं घालुनि उपंगळीये घेउनि उठविलें : मग[९] मांडीएवरि बैसौनि आवळिलें : पोटळिलें : स्त्रीमुख चुंबिलें : मग भांडारियाकरवि बाहीरवाहिरें तेथचि तेयांचीं पांचसें आसु फेडविलीया : मग गोसावीयांचें उदास्य परीहरलें : तीये दीसीं गोसावीयांसि मर्दने उसीरू लागला. मग गोसावीयांसि नसुधेन पाणीयें स्नान : देपुजा :

---

५ **भगोमु.** गोपाळन्ही. ६ **भगो.** गोपाळन्ही. ७ (**पंभगोहबी.**). ८ **अह.** हरिपाळदेया गोसावीयांसि.
९ **एवा.** °वांखारि आणुनि गोसावीयांचीये स्त्रीकरीं दीधली.

आरोगण प्रधानाचां आवारीं जाली : ते दीसीं गोसावीयांची पांति प्रधानासि जाली[१०] : आणि अवघेयांसि पांतीं जेवण जालें : गोसावीयांसि आरोगण जाली : परि कमळाआउसांवरील उदास्य न परीहरेचि : ।।

## १९ उदास्यस्वीकारू

तें निमीत्य करूनि गोसावीं उदास्य स्वीकरिलें : मग एकक् दीसु गोसावी येकक् पदार्थु वर्जीते जाले : गोसावीयांसि रामयात्रे बीजें करावेयाची प्रवृति : परि प्रधानु गोसावीयांतें न पठवी : मग येकू दीं मर्दनामादनें वर्जीलें : एकक् दीं एकक् पदार्थू वर्जीति : ऐसे अवघेचि पदार्थ वर्जीले : पुसति तरि गोसावी ऐसें म्हणति : " रामयात्रे जाउनि : मग आरोगुनि : " ऐसा गोसावी हळुहळु एकू दीं अलणी : अतेली : मग गोसावीं नसुधा अलणी ताकभातु आरोगण करीति : ऐसें गोसावीं राणीएवरि उदास्य स्वीकरिलें : ।।

## २० स्रीप्रभूभेटि

मग गोसावीयांची स्त्रीमूर्ति सावीयांचि संकीर्ण[१] जाली : मग गोसावीयांचीया माता प्रधानातें वीनवीलें : "कुमरू सावीयां संकीर्णु[२] जाला : तरि रामयात्रे पाठवीजे[३] ना कां : " तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं राजे : राजेयासि काइ केहीं जाणें[४] असे ? राजा प्रोहीतद्वारें क्रीया कीजे : ब्राह्मणातें पाठौनि : ते प्रोहीतद्वारें यात्रा करूनि येती :" तें[५] गोसावीयांसि मानेचि ना : मग गोसावीयांचिया माता म्हणीतलें : " *यासि रामयात्रेचा आग्रहो : तरि*[६] रामयात्रे पाठवीजे ना कां : " तवं तेणें म्हणीतलें : " सेजां सींगणदेओ राज्य करीतु असे : गुजरां आणि जाधवां दंद लागलें असे : ऐसांहीं जाणीतलें होइल तरि अन्यासें दंद हातां येइल : *मां कैसा पाठवावा*[७] ?" माता म्हणीतलें : " सडीए आइतीसीं पाठवावा : दो घाइं रजपुतांचीया परी : अनेत्र लोकु जाते तैसा हाही जाइल : " ऐसा गोसावीयांचीया माता रामयात्रे पाठवावेयाचा आग्रहो[८] घेतला : तेव्हळि प्रधानें आइति केली : गोसावीयांसि दांडी : १ : डोळीकार : २ : हडपी : ३ : बारी : ४ : सागळीया : ५ : चवरधरू : ६ : भांडारी : ७ : वेचकरू : ८ : सुआरू : ९ : बडुवा : १० : ऐसे दाही सरिसे दीधले : आणि ऐसी कोठी भरिली : अवघी आइति केली : मग गोसावी बीजें करितां तीनि वेळ माळवधाआंतु गेले : तीनि वेळ कमळाराणीएतें अवळोकिलें : परि तेयां काहीं उपजे[९]

---

१० **गोहबी.** °बापापुत्राचा न्यावो स्वीकरिला : प्रधानु वरिलां सीरां बैसवीला आणि—.

**२०.** १ **भ.** रोडैली. २ **गो.** कीलसू. **एवा.** रोडैला. ३ **अ.** पाठवा. ४ **हीपं.** जाओं एत. ५ येथून तो 'तेणें म्हणीतलें' पर्यंतची वाक्ये **पंभगो.** प्रतीत नाहीत. ६ (**ह.**). ७ (**आहबी.**). ८ **अ.** आग्रो. ९ **पं.** उमटे.

ना : मग बीजें केलें : तीनि वांकद्वारेंवरि माता बोळवीत आलीं : तीएं तेथ राहावीलीं : मग बीजें केलें : आपण प्रधानु येक[१०] पेणें बोळवीत आला : पाइकपरिवारू बहुतु सरिसा : तो तेथ राहावीला : दूस राहावीलें : दुसरां पेणां दांडी राहाविली : कमळाआउसांतें आणावेया म्हणौनि तीसरीये पेणां एकांतें राहाविलें : गोसावी आपुला देसु सांडीति तवंवऱ्हीं अवघेयांसि एओं दीधलें : मग गोसावी पेणेंप्रति एकएक राहावीत गेले : हडपु आणि सागळीया[११] ते दोघै न संडितीचि : मग हडपीयाचेया घोडयावरि आरोहण करूनि बीजें करीति : रात्रीं नीद्रा करीति : ते दोन्ही दोहींकडे : माझारि गोसावी : ऐसां एकू दीसु अवघे अळंकार प्रत्येजुनि : दोन्ही नीदसुरे सांडुनि[१२] : एक वस्त्र वेढिलें : एक प्रावरण केलें : ऐसें गोसावीं रीधपुरा बीजें केलें : मग ते रडति : दुख करीति : चहुंकडे पाहाति : मासा ऐसें चडफडीति : मग ते रामुवऱ्हीं गेले : मग आपुलेया गावां गेले : ।।

माहादाइसीं पुसिलें : "जी जी : तेयां काइ जालें[१३] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेयांसि महंत स्रेरासि[१४] जाली : " ।।

मग गोसावी उतरील दारवंठेनि : सवळेचीया पाहारा दीसा[१५] : परमेश्वरपुरासि आले : नगराआंतु बीजें केलें : रांधवन हाटीं श्रीप्रभूसीं दरीसन जालें : पुर्वपसीम दोन्ही वोळी : उतरदखीण दीघडीया : पसिमील वोळि पुर्वाभिमुख आमचे गोसावी : पुर्वीली वोळि पसिमामुख श्रीप्रभू : अर्धवस्त्र वेढिलें असे : अर्ध उतरासंगें प्रावरण केलें असे : मोकळा कासोटा : नाभिचुंबीत खाड : मोकळे केसकळाप : डावा श्रीनेत्रु अर्धोन्मीलितु[१६] : डावीये श्रीकरिची[१७] आंगुळी वांकट[१८] : आमचां गोसावीं[१९] श्रीप्रभूतें देखौनि कायाप्रणीत केलें : *आणि आपणेयां आपण क्षेमाळींगन[२०] दीधलें :* आणि आमचेया गोसावीयांतें देखौनि स्रीप्रभू म्हणीतलें : "ऐया माझा जाला म्हणे : आतां होये म्हणें : " श्रीप्रभूचां एकीं श्रीकरीं सेंगळें : एकीं श्रीकरीं बुडडें : चावीति थुंकीति : हास्य करीति : गगनाची वास पाहाति : आमचे गोसावी श्रीप्रभूची लीळा अवळोकीति : श्रीप्रभू आमचेयां गोसावीयांची

---

१० **पं.** पहिले पेणेवरि. ११ **पं.** बारी. १२ **अपंहबी.** °कव्हणी गाउनि गोसावीं बीजें केलें तें नेणिजे. **एवा.** अळजपुरीहुनि. **एवा.** देउळवाडांहुनि : तेथ वस्ति जाली : काजळेस्वरीं चौकीं दोहींकडे दोघै नीजैले होते : ते तैसे नीदसुरे सांडुनि. . . गोसावीं बीजें केलें : **आ.** (**एवा.** रानीहुनि : **एवा.** अळजपुरीहुनि : पींगळभैरवी वस्ति जाली :) १३ **ही.** °बाइ : ते दोघै सेवक अतिअवस्थाभुत होतसांते यातें सोधीत पुसत रामा गेले : तेथ यातें न देखतीचि : दुखक्रांत होतसांतें संवादले : एकें म्हणीतलें : "आतां गावां चाला : " तेणें म्हणीतलें : "माझा गोसावी जेथ भेटैल तेथ जाईन : " एक म्हणति : दौघै गेले. १४ **पंह.** श्रयरासी. **एवा.** गोमटें जालें. १५ **ही.** दीढा. १६ **अबी.** अर्धोन्मद्रीतु. **पंभ.** झाकिला. **मुगो.** लाविला. १७ **अबी.** °श्रीकरांगुळीयेजवळि. १८ **भमु.** दुणी. १९ **शो.** °जय केलें : तें श्रीप्रभु गोसावीं देखिलें आणि आपणयां आपण क्षेमाळींगम दीधलें : २० (**भहबी.**).

वास पाहाति : आणि गोसावी श्रीमुगुटु खोलवीति : श्रीप्रभूचां श्रीकरीं सेंगळें बुडडें होतें : *सेंगुळें आरोगुं सरलें होतें* : बुडडें *आरोगावें होतें*[२१] : तें श्रीप्रभू म्हणीतलें : "आरे : घे[२२] घे[२२] म्हणें : घे ना म्हणें: आरे घे घे[२२] :" म्हणौनि *प्रसादु करुनि*[२३] दीधलें : आमचां गोसावीं माहाप्रसादु म्हणौनि कायाप्रणीत करूनि दोहीं श्रीकरीं धरूनि नमस्करिलें : आणि श्रीप्रभू आमचेयां गोसावीयांचेया श्रीमुखावरि श्रीकरू ठेविला : तेथ आमचां गोसावीं ज्ञान-शक्ति स्वीकरिली : परावर-शक्ति स्वीकरिली : आमचां गोसावीं पूर्वीलेनि दारवंठेनि बीजें केलें : श्रीप्रभू माहाद्वारवरि बोळवीत आले : तेयां दीसीं तळेगावीं वस्ति जाली: ज्ञानाचें कार्य ऐसें : जें ज्ञानापाठीं वैराग्य उपजे: मग गोसावीं तेहीं स्वीकरिलें: ।।

## २१ अवस्थास्वीकारू[१]

मग गोसावीं अवस्था स्वीकरिली : श्रीमूर्तीवरि उदास्य स्वीकरिलें : गोसावीयांची घणीं पीटिली ऐसी श्रीमूर्ति : गोसावीयांसि वाटे जावेयाची प्रवृति तरि वाटे बीजें करीति : वाटे बीजें करावेयाची प्रवृति नाहीं तेव्हळि अरण्यामध्यें बीजें करीति : गोसावीयांचें वस्त्र कांटीयेसि गूंपे : तें फाटौनि[२] कांटीयांसींचि जाये : ऐसें अवघें वस्त्र फाटौनि कांटीयांसींचि लागे : मां उघडीयाचि श्रीमूर्ती बीजें करीति : गोसावीयांचां वाहेप्रदेसीं[३] कांटीयांचे ओरखंडे जाति : तेथ असुधाचे बींदु नीगति : ते श्रीमूर्तीवरि वाळति : जैसी कां माणिकें : मोतीयें : रत्नें खेवणिलीं असति : तैसीं बाहुप्रदेसीं मीरवति : जैसीं पन्हरेयावरि टीक ऐसीं मीरवति : गोसावीयांचे केसकळाप झाडीं गुंपति : ते गोसावीयांसि सोडवावेयाचि प्रवृति नाहीं : तवं गोसावी तैसेंचि उभे असति : मां वारेन उकलति तेव्हळि गोसावी बीजें करीति : कां कव्हणि एकाधा एकु वाटे जातु असे तो देखे : तो उगवी तेव्हळि गोसावी बीजें करीति : ऐसीया उघडीया श्रीमूर्ती खडेयांगोटेयांवरि पहुडु स्वीकरीति : ऐसीयापरी गोसावीं पर्वतासि बीजें केलें : ।।

## २२ पर्वतीं क्रीडा[१]

ऐसीया उघडीया श्रीमूर्ती खडेयांगोटेयांआंतु पहुडु स्वीकरीति : ऐसीयापरी गोसावीं पर्वतीं बारा वरीखें क्रीडा[१] केली : मग मुगुताबाइये गोसावीं भेटि दीधली : ।।

## २३ मुगताबाइये भेटी

गोसावीयांसि येकी ठाइं आसन जालें होतें : तवं मुगुताबाइया गोसावीयांतें देखिलें : आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागौनि वीनवीलें : "जी जी : माझी

---

२१ (गोपं.). २२ अहृ. ये. २३ (मु.).

**२१.** १ अहृ. उदास्य°. २ अ. फाळौनि. ३ अ. बाहीं°. हृ. बाहीये°.

**२२.** १ अ. कृडा.

पैन्हां प्राणकुटिका असे : तेथ गोसावीं बीजें करावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यासि तेथ बीजें करावेयाची प्रवृति : मां तेथ बीजें केलें :" मग गोसावीयांसि कुसासन[१] बैसों घातलें : जाउनि हें तेथ बैसलें : जटा सोडुनि श्रीचरण झाडिले : मग श्रीचरण प्रक्षाळण केलें : मग यासि बरवी वनपुष्पांची पुजा केली : मग दंडवत घालुनि : दोन्ही हात जोडुनि पुढां उभीं ठेलीं : मग म्हणीतलें : 'जी जी : माझेया तपाचें फळ आजि जालें जी :' 'तें कैसें बाइ ?' 'ना जी : *ऐसेया*[२] पुरूखांसीं दरीसन जालें जी :' 'ऐसें होए :' यासि कंदांमुळांफळांची आरोगण दीधली[३] :" गोसावीं माहादाइसातें म्हणीतलें : "बाइ : कैसी बाइ नीन्हां तापस ! आंगिची लोंव पाहाळीं गेली : हातांपायांचीं नखें चुंभळि वळलीं : माथांचीया जटा भूइंसी काढति : सेवाळैले[४] दांत : तीएं बैसति तरि तेयांचीया जटा भुइं पुंजा होति : उभीं ठाकति तरि तेयांचीया जटे भूइंसी काढति : बाइ : कैसी बाइ नीन्हां तापस !" ऐसें गोसावी माघुतें पुढारें तोखति : माहादाइसीं पुसिलें : "हां जी : तेयांचेया तपा कीतीसें वरीसें[५] भरलीं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ तेयांचेया तपासी : तेरासें वरीखां भरलीं आणि एणें तेथ बारा वरीखें राज्य केलें :" मग माहादाइसीं पूसिलें : "जी जी : तीएं तेथ असती तरि तेयांसि परावर्ण[६] काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयाचीये आंगीं रोमावळि निगाली असे : तेणें तेयांचें देह आछादौनि गेलें असे :"

हे गोष्टि गोसावी वीज्ञानेस्वरीचेया नींबाबुडि विष्णुभटांवरि सांघीतली : "बा : कैसा ब्राम्हणु तापसु[७] :"।।

---

**२३.** १ **पं.** कुसुमासन. **भ.** कुशदर्भाचें आसन. २ (**भपं.**). ३ **पं.** °लवंगाजाएफळांची मुखसुधि दीधली. ४ **अ.** सेवळैले. ५ **ह.** वरीखां. ६ **पंबी.** प्रावर्ण. ७ (पूर्वार्ध लीळा ५३३ पाहा.) **आ.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे आहे : **मुक्ताबाइये भेटि :।।** हे गोष्टि गोसावी वीज्ञानेस्वरीचीया नींबातळीं वीष्णुभटांउपरि बाइसांप्रति सांघीतली : गोसावीयांसि नींबातळीं आसन जालें : तंव जापीये वीष्णुभट गंगे संध्यास्नान करूनि येत होते : हातीं तांबवटी : तांबवटीए तुळसी : ऐसे वीज्ञानेस्वरा एत होते : गोसावीयांतें देखीलें : आणि साउमे आले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : गोसावीं श्रीकरें पाठि स्पर्सीली : "बाइ : ब्राह्मण कैसा तापसु : तीन्ही रीतु साधलीया असति :" बाइसीं म्हणीतलें : "हो बाबा : अवघी पाठि उन्हें कर्पली असे :" याउपरी सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइल तेही कैसी तापसी :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : ते कोण ?"

"बाइ : मुक्ताबाइ : वीक्रमाची राणी : भर्तौहरीची भाउजैइ : भर्तौहरि तयाचेया आवारा भीक्षे गेले : तंव तेहीं ताटीं आइती भीक्षा करूनि ठेविली होती : तीयें न्हातें होतीं : जैसा भर्तौहरीचा भीक्षा शब्द आइकीला तैसीचि चोखणि लावीतें उठीलीं : केसांची वीरगुंठी घातली : ताट घेउनि दीगांबरेनी नीगाली : ते वरतें न पाहात नीगाले : तीयें पाठीचि नीगाली : दारवठां बोल्हाराउळ होता : तो बारी : तो बाहीरि हातीं धरूनि नीगाली : तीएं दोघे भर्तौहरीचेया गुरूचीं उपदेसीयें : एकवीधा अवस्ता पातली : सर्वांगीं रोमा नीगाली : सर्वांगा तेचि आवेयेवा पांगरूण जाली : रोमा सर्वांगीं पाहाळी गेली :

## २४ बोल्हा बारीया स्तीती

बोल्हा तो बारी : तो कंदांमुळां[१] गेला होता : तेयांसि गोसावीयांचें दरीसन जालें : मग तो मुगुताबाइया बोळवीतु पाठवीला : तो बोळवीतु नीगाला : तेणें श्रीमूर्तिचे कांटे फेडिले : पोतुकें भीजवुनि श्रीमुर्तिचें असुध पुसिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बोल्हेया : आतां तुम्हीं राहा ना : मुगुताबाइ अवसरि करील : " राहिले : आणि गोसावीयांपासौनि तेयां स्तीति जाली : ।।

## २५. कांतीये श्रीचांगदेवोराउळांसीक्षां भेटि

गोसावीं दादोसांतें म्हणीतलें : "माहात्मे हो : तुम्हीं श्रीप्रभूचेया[१] दरीसना कां जा?" तवं दादोसीं म्हणीतलें : " ना जी : ते आमचे परमगुरू असति म्हणौनि जाओं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते वानरेयांचे परमगुरू : तुमचे परमगुरू ते कांतीयेसि असति : " माहादाइसीं पूसिलें : " ते कैसे जी ? " यावरि हे गोष्टि सांघीतली :

सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हें कांतीयेसि गेलें होतें : यांसि एकु कटिप्रदेसीं सुडा : एकु श्रीमुगुटावरि सुडा : ऐसें[२] दुर्गाचेनि परीसरें जात होतें : तवं द्वारावतीकारां श्रीचांग-देवोराउळां गोसावीयांचे अनुग्रहीत : उधळीनाथ : ते तेथ राजगुरू होउनि वर्तत असति : ते रायाचे गुरू : ते उपरीयेवरि बैसले असति : तेहीं यांतें उपरीयेवरौनि देखिलें[३] : मग आपुलेयां सीक्षांतें बोलावुं पाठविलें : सीक्ष आले : तेहीं यातें वीनवीलें : 'जी जी : रायाचे[४] गुरू : उधळीनाथ : तेहीं तुमतें बोलावुं पाठविलें असे जी : ' यांसि तेथ जावेयाची प्रवृति : मां तेयांची वीनवणी स्वीकरिली : मग हें तेथ गेलें : तवं ते डोल्हारेयावरि बैसले असति : यातें एतां देखौनि तेहीं म्हणीतलें : 'पुरूखा : ऐसा पींडु कां उपेखिला बापेया ?' म्हणौनि तेथौनीचि आपुलेनि सामर्थ्यें[५] वीद्या प्रभौं[६] आदरिली : परि प्रभवे[७] ना : मग पोटीं म्हणीतलें : 'ऐया रे : पुरूखु कैसा हटीया असे : ' मग ते[८] डोल्हारेयावरौनि उतरले : खालि बैसले : यासि आसन घातलें : हें जाउनि

---

जटै माथाचीया पाएघोळीया : हातींपाइचीं नखें चुंभळी वळलीं असति : तीये बैसति तरि तयाचीया जटै मागा पुंजा होति : . . . " यानंतर भेटीचा वृत्तांत सांगून झाल्यावर 'बाइसीं पुसिलें : " बाबा तयासि काइ दीधलें ? " " बाइ : तयासि देहवीद्या दीधली : बोल्हो तो सीध जाला : तीये करदळीवनीं असति : आणि हे तेथ बारा वरिखें होतें : ' " ।। १६ ।।

**२४.** १ **भ.** कर्दळीवना.

**२५.** १ **एवा.** परमेश्वरपुरा कां जा ? (उत्तरार्ध लीळा ४८८ पाहा.) २ **भ.** °नगरांतु पाणीपात्रा बीजें करीत होतें. ३ **पंभह** °आणि (**पं.** आपुलेया सीक्षांतें) म्हणीतलें : "(**पं.** देखिलें गा : ) ऐसा पींडु कैसा उपेखीला : " मग——. ४ **एवा.** आमचे. ५ **अ.** सामृथ्यें. ६ **हभपं.** संकर्मु. **एवा.** संक्रमु ७ **हभपं.** संकर्मे. **एवा.** संक्रमे. ८ **अपंह.** °सींहासनाखालुति उतरले : यातें सींहासनावरि बैसवीले.

तेथ बैसलें : तवं[९] केसकळाप तुटले : गवतकाडीया कूसळें रूतलीं : श्रीमुर्ती सर्वांगीं कांटेयांचे वोरखंडें : तेथ असुधबींदु वाळले : ते माणीकें झळाळीतें ऐसीं दीसताति : ऐसी श्रीमूर्ति देखौनि उधळीनाथें आपुलेनि हातें कांटेकुसळें वेंचुनि : वीरगंठि[१०] सोडुनि : नखवरि श्रीमुगुटु वींचरूनि : मागुती वीरगंठि[१०] घातली : मां धूतवस्त्रें[११] तीमुनि सर्वांगीचे असुधबींदु पुसिले : मग यातें हात जोडुनि वीनवीलें : 'जी जी[१२] : मातें वएस्तंबनी नावें वीद्या असे : ते स्वीकरिजो जी : तीएसि वळीतपळीत नैए : तीएसि सहश्रु वरीखें[१३] आउक्ष : ते गोसावीं स्वीकरावी जी :' तेव्हळि[१४] श्रीमुगुटाचेनि अनुकारें करूनि मानिलें : मग वीद्या स्वीकरिली : एतुकेनि ते वीद्या प्रभवली :"

मग माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावीं तेयांपासौनि वीद्या स्वीकरिली : तरि[१५] तेयांसि गोसावीं काइ दीधलें[१६] जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेयांची वीद्या अपरीपुर्ण[१७] होती : ते एथौनि स्वीकरूनि परीपूर्ण[१८] केली :"।।

## २६ अंध्रदेसीं तेलिकारां भेटि

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें अंध्रदेसीं होतें : एका गावां गेलें : तेलिकार एक सीवभगत : ते पाहातपटीं[१] उठीति : झुंझुरकां गंगेसि जाति : गुळुळा करीति : पाए धूति : टीळा लावीति : लींगपुजा करीति : धूपार्ती करीति : मग आपुला व्यापारू करूं लागति : एकु दीं पाहातपटींचि[२] उठीले : नदी गेले : तेयाची बाइल पासवडी हातींपाइं लाउनि[३] नीजैली होती : गोसावीं बीजें केलें : पासवडी उंच केली : तेयांचीए अस्त्रीएसवें पाठिसीं गोसावीं पहुडु स्वीकरिला : तीया म्हणीतलें : 'काइ मागुता आलासि ? रात्रि काइ गा वडीलि असे ?' सर्वज्ञें म्हणीतलें : 'हें उगेंचि :' तीयां म्हणीतलें : 'कां गा बोलसि ना ?' तवं तीचिया आंगा आंग लागलें : सकुमार : हींवं ऐसी श्रीमुर्ति लागली : तीचीये पाठिचेया प्रमाणुसि संबंधू दीधला : आणि ते गजबजुनि पासवडी सांडूनि[४] उभीं राहिलीं : 'हें काइ ओ आइ ? माझीये पाठिसीं कोण नेणों दादुला नीजैला असे :' ऐसें म्हणौनि उठिली : सेजासाइला : लोकु[५] मीनला : दारें कोणें भरलीं : एकें तेयांपुढें सांघों गेलीं : 'आगा :

---

९ 'तवं केसकळाप' येथपासून तो 'असुधबिंदु पुसिले' पर्यंतचा मजकूर **भपंगो.** प्रतीत नाही. १० **हबी.** वीरगुंठि. ११ **हबी.** धुवटें. १२ **रामे.** "जी जी : मातें द्रीढ पींड करी (°करणी) विद्या असे : तीया द्रीढु पींडु होए : ते—. १३ **पं.** वरीखां. १४ **एवा.** °ऐसा श्रीमुगुटु केला. १५ **एवा.** °तरि काइ ते रीते ठेले जी ?" १६ **भगो.** जालें. १७ **ह.** अपुरी. **पंबी.** अपूर्ण. १८ **हपंबी.** संपूर्ण. **भगो.** संपूर्ण जाली.

**२६.** १ **हबी.** पाहानपटीं. २ **भगोपंहबी.** पाहानपटींचि. ३ **ह.** गुंडौनि. ४ **बी.** झाडौनि ५ **अहबी.** °मणुसें मीळालीं. (**ह.** मीनलीं).

तुं काइ बैसला आहासि ? तुझीए बाइलेचीए पाठिसीं कोणु नेणों दादुला निजैला आहे :' तेणें म्हणीतलें : 'हो गा हो : तुम्हीं कां गा बोबातसा ? नीजों देया :' मग तेणें हातपाए धूतले : गुळुळा केला : तेया मलिनाथाची भक्ति : तेणें जैसी पुजा करावी तैसी करीतुचि होता : पुजा केली[६] : पुजा करूनि आला[७] : काखें[८] काढिली सुरी[९] : सरिसीं माणुसें : तवं आंतुबाहीरि लोकु दाटला असे : गोसावीं श्रीमुगुटीं[१०] श्रीचरणीं पासवडी लाउनि पहुडु स्वीकरिला असे : मग तेणें श्रीमुगुटावरील पासवडी ऐसी धरूनि आसुडिली : 'कवणु गा तुं ?' तवं श्रीमुख देखिलें : *हातिचें खर्ग गळौनि गेलें*[११] : आणि म्हणीतलें : 'ऐया लींगा : आजि लींगभेदु जाला होता : आरे : तुम्हीं अवघीं परतीं जा : माझेया घरा आजि माझा देओ आला : माझेया घरा माझा सोमनाथू आला : माझेया घरा माझा मलिनाथू आला : आजि माझें पुजितें लींग आलें :' मग तेणें अस्त्रीएतें म्हणीतलें : 'उठि उठि : ए आरूती : गोसावीयांचेया श्रीचरणां लाग :' मग ते आली : गोसावीयांसि दंडवत घातलें : मग तेणें तीएतें म्हणीतलें : 'आजि तुं जेतुकें[१२] पाक करूं जाणसि तेतुकेंहीं करि :' ऐसें म्हणौनि तो पुजाद्रव्यें आणुं हाटासि गेला : तवं हाटीं सरें देखिलीं : तीएं घेतलीं : पुजाद्रव्यें घेतलीं : सरें आणिलीं : गोसावीयांसि सरें वोळगविलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : *तैं सरांचे दीस*[१३] : मुठीएसणीं सरें कीं !" म्हणौनि ऐसी मुठि करूनि श्रीकराचा अनुकारू दाखवीला : गोसावीं दोनिच्यारि[१४] आरोगिलीं : मग गोसावीं गुळुळा केला : वीडा ओळगविला : मग गोसावीयांसि वोलणी दीधली : दोघीं गोसावीयांसि मर्दना दीधली : 'आमचा सोमनाथू :' म्हणौनि हरीखैजति : मग मर्दनामादनें जालें : मग धूतलीं वस्त्रें सलदिचीं काढिलीं : गोसावीयांसि ओळगविलीं : गोसावीयांसि आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसावीयांसि बरवी पुजा केली :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : तो तेली माणुसु पुजा करूं केवि जाणे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तो संप्रदाएकु : पुजा करूं जाणे :" मग ताट केलें : ताटीं बहुत ओळगविलें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग बाजसुपवती झाडिली : बाजेसुपवतीएवरि पहुडु जाला : मग तीएं आपण दोघें जेउं बैसलीं : तेयाचि ताटीं प्रसादु घेतला : घेउनि तोखतें-तोखतें जेवीति : 'ब्रम्हादीकां जे वस्तु दूर्लभ ते आजि आम्हांसि जालें :' ऐसें सुख अन्मोदितें दोघें जेविलीं : आंचवलीं : मग दुधातुपा वाटी भरिली : मग गोसावीयांचीए सेवे प्रव्रतलीं : श्रीचरण प्रक्षाळिलें : मग एकु श्रीचरण एकें घेतला : एकु श्रीचरण एकें घेतला : मग चरणसह्वान केलें : सागळ[१५] भरूनि उसीसेयाकडे खुंटीयेसि घातली : परि सांघों

---

६ **पंभगो.** °मग बुंथीआंतु खर्ग घालुनि आला. ७ **मु.** खांडें काढौनि. ८ **हबी.** काखेची. ९ **एवा.** अलग. १० **हबी.** °श्रीमुगुटापासौनि श्रीचरणवेन्हीं. ११ (**मु.**). १२ **गो.** °जेतुलें रांधुं जाणतासि तितुलें रांधि. १३ (**मु.**). १४ **एवा.** सातपांच. १५ **एवा.** करा उदका भरूनि ठेविला : **पं.** तांबकळसा पाणिएं भरूनि ठेविला :

वीसरलीं : मग आपण तेथचि श्रीचरणतळीं आंथरूनि नीजैली : गोसावीयांसि मध्याने एकी रात्रीं त्रीखेची प्रवृति जाली : मग पाहानपटींचि उठौनि गोसावीं तेयांचीं वस्त्रें ठेविलीं : आपुलीं वस्त्रें घेतलीं : मग तुंगभद्रेसि बीजें केलें : तुंगभद्रा पुरें जाति असे : माळथोंबावरौनि[१६] आंजुळि[१७] उदकपान करूं बैसले : तवं दरडि खचली : तेणें थोंब खचलें[१८] : *आणि श्रीमूर्ती झळंवली*[१९] : गोसावीं तेथचि जुंबड धरूनि उदकाआंतु बीजें केलें : गोसावी ऐलाडि बीजें करीति : पैलाडि बीजें करीति : मध्यें बीजें करीति : ऐसां दीसु नीगेतवं गोसावीं उदकाआंतु बीजें केलें : तवं एकी गाविचीं गोवळरूवें बोबाइलीं : 'माणुस रे माणुस पुरें आलें :' म्हणौनि अवघा लोकु पाहावेया आला[२०] : *सहजें श्रीमूर्ति जेथ थडिये लागली तेथ बीजें केलें*[२१] : श्रीमुर्ति झाडुनि तेयांकडे धावं घेतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैं तैसीचि प्रवृति होती : जें तान्हैलेयांहीं पाणी पीओं न मगिजे : आतां ऐसी प्रवृति : जें बळवंडेयां करवीत असिजे : घ्या घ्या बापें हो : वेगु करा :"

हे गोष्टि गोसावीं पंचाळेस्वरीं गुंफा करितां सांघीतली[२२] : ।।

## २७ चर्मकारां स्तीति

बीडाजवळि कव्हणी एकु गावु : तेथ गोसावीं बीजें केलें : पव्हेसि[१] गोसावीयांसि आसन जालें : चर्मकारू[२] आणि चर्मकारी[२] दोघें हाटासि गेलीं होतीं : हाटुनि[३] एतें होतीं : तवं चर्मकारू तान्हैला : तो पव्हेसि पाणी पेयावेयासि आला : तवं गोसावीयांतें बैसलेयां देखिलें : आला : दंडवत केलें : श्रीचरणां लागौनि गोसावीयांपासि पुढां बैसला[४] : पुडवांटुवा काढिला : पोफळफोडणेनि फोडी केलीया : गोसावीयांसि फोडी ओळगविलीया : आपण वीडीया करूनि[५] दीधलीया : तवं मागिलीकडौनि चामारि आली : तीसिहीं वीडा दीधला : आपणहीं घेतला : तवं तीया म्हणीतलें : "उठि गा : चाल जाओं : सांगातु गेला :" तेहीं म्हणीतलें : "नावेक पारूख :" मागुतें तीया म्हणीतलें : "उठि गा चाल : लोकू दूरि पावला : माणुसांची नीहारि[६] जाली : गोरूवें गावांकडे नीगालीं : वीळु जाला : कोण्हाकरवि[७] काइ धोंगडा हीरौं[८] पातासि? उठि गा चाल :" तेणें म्हणीतलें : "पारूख पारूख : नावेक :" ऐसे वेळां दोनि तीनि : तीया म्हणीतलें : *परि तो नुठिचि मागोतें तीयां म्हणीतलें*[९]: "हां गा : तरि काइ तुं नैयेसि?" "ना नैएं :" "तरी मी

---

१६ **हबी.** मोळथोंबा°. १७ **एवा.** गौमुखें. **एवा.** श्रीकरें. १८ **पं.** रीचवलें. १९ (**मु.**). २० **अहबी.** °तैसेंचि गोसावीं बाहीरि बीजें केलें : २१ (**मु.**). २२ (पूर्वार्ध लीळा ५५१ पाहा.)

**२७.** १ **प्रवा.** पव्हैपासि पींपळु होता : तेया पींपळातळि—. २ **भ.** चामारू आणि चाम्हारी. ३ **ह.** हाटींहुनि. ४ **एवा.** °मागिलाकडौनि तेयाची अस्त्री आली : तीएपासौनि पुडवाटुवा मागितला : ५ **अ.** करकरूं. ६ **हबी.** नेहारि. ७ **पंगो.** कोण्ही धोंगडा हीरैल. ८ **हबी.** हीरउं. ९ (**हबी.**).

जाओं?" "ना जाए :" पैलू ठावोवरि गेलीं : आणि मागौती आलीं : मग म्हणीतलें : "कां गा : तुं नैएसि : तरि फेडि माझीये माथांचा हातु[१०]:" तेहीं म्हणीतलें : "फेडिला : जाए :" तीयां म्हणीतलें : "तरि कवण साक्ष?" "ना हे राउळ[११] साक्ष :" तीया म्हणीतलें : "राउळो[१२]: तुम्हीं साक्ष?" गोसावीं श्रीमुगुटें[१३] अनुकारू केला : इतुकेनि ते नीगालीं : गोसावीं तांबोळ प्रत्यजुं आदरिलें : आणि तेण्हें दोन्ही हात ओडविले : श्रीमुखीचें तांबोळ घेतलें : तांबोळाचा प्रसादु घेतला : आणि तेयासि स्तीति जाली : तैसेंचि गोसावीं तेथौनि बीजें केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "ते खोलनायिकाचेया आंबेयासि आले : तेथ इस्वरपुरूख होउनि खेळत असति : इस्वरत्वें वर्तों लागला : तेयांतें इस्वरत्वें लोकु मानुं लागला : घरोघरीं न्हाणीति : उटीति : चंदनपुजा : धुपारतीया : मंगळारतीया : आडवाटी ठाणवै जेवण : बाजां सुपवतीयांवरि नीद्रा करीति : ऐसें सपुजीत *एकाचां घरीं जेउं बैसले[१४]* असति *सर्वांगीं चंदनाची भोरी : लल्हाटीं आडा : गळां पुष्पांचीया माळा : आरतीया निंबलोणें होतें असति[१४]* : तवं तेयांचीए गावींचा चाम्हारू हाटासि आला होता : तेणें म्हणीतलें : 'अमुका तमुका चामारू तो तुं नव्हसि?' तवं तेथ ब्राम्हण असति : तेहीं म्हणीतलें : 'हा कवणु?' तेणें म्हणीतलें : 'ना हा आमचीए गावीचा चामारू : आमचा गोतीया : *याचीं मायबापें यातें पाहातु असति[१५]* :' ब्राम्हणीं म्हणीतलें : 'ऐसे? ऐया रे : कैसा लोकु वीटाळिला :' ऐसे एरें आइकिलें : आणिकीं आइकिलें : ऐसें जगळदेयावींझदेयाचा ठावो पावले : जगळदेवो वींझदेवो ते तेथिचे अधीकारीये : तेयांपासी अवघे माहाजन आले : तेयांपुढें सांघीतलें : जें 'हा चामारू : एणें अवघा गावुं वीटाळिला : ऐसेयासि काइ कीजे?' मग तेहीं नीबंधकार ब्राम्हण बोलाविले : तेयांतें पुसिलें : 'हा चामारू : एणें अवघा गावुं वीटाळिला : तरि ऐसेयासि काइ कीजे?' मग तेहीं नीबंध काढिले : नीबंधीं पाहिलें : तवं नीबंधीं ऐसें नीगालें : जे 'हे चुनखडेयाआंतु दाटिजति :' तैसीचि तेहीं खांच खणविली : तेथ तेयांतें बैसविलें : वरि चुनखडे ताउनि घातले : तेयावरि पाखाला रीचवीलिया : केतुली एकि मांदी मीनली होती : तवं एकू हाटवटीएहुनि आला : तेणें ते मांदी देखिली : मग तेयांतें पुसिलें : 'हां गा : हे मांदी काइसी?' तेहीं म्हणीतलें : 'तुम्ही नेणा?' 'ना : नेणों :' 'ना एथें जे इस्वरपुरूखू होउनि खेळत होते ते चामार जाले : तेणें अवघा गावुं वीटाळिला : तो खडेयांआंतु बैसविला :' तेणें म्हणीतलें : 'आरे : खडेयांतु कैसें बैसवीलें? ते तवं हाटवटीये खेळत असति : जा पां पाहा :' मग आवघे हाटवटीएसि आले : तवं तैसेंचि सपुजीत खेळत असति : देखिले[१६] : सर्वांगीं चंदन : लल्हाटीं चंदनाचा आडा : गंधाक्षता :

---

१० **अ.** हाटू. ११ **एवा.** गोसावी. १२ **एवा.** देव हो. १३ **एवा.** °मानिलें. **अ.** गोसावीं अनुकारू ऐसा भ्रुभंगीं केला. **पं.** भ्रुभंगेनि मानिलें : ऐसा श्रीमुगुटु केला. १४ (**हपं.**). १५ (**हपंबी.**). १६ **अ.** °एकी वासना : पाखाला रीचउनि जवं एत असति तवं ते खेळत असति : हाटवटीएसि :

गळां गळदंडे : पुष्पांचीया माळा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "गळांचा गळदंडा आदिकरूनि कोमाइजेचि ना : ना पुजा वीखुरेची ना : मग ते आवघे अनुतापले : दंडवतें घातलीं : 'जी जी : आम्ही पापीए चांडाळु : तुम्हांसि आम्ही खस्ता केली :' मग ते तेथौनि नीगाले :"

मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : एसणें तेहीं तेयांसि केलें तरि तेयांसि काइ जालें?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ तेयाचा[१७] नीर्वंसु जाला :" ।।

## २८ जुतक्रीडा

कव्हणी एकु गावुं[१] : तेथ गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि कटिप्रदेसीं सुडा : श्रीमुगुटीं सुडा : ऐसें गोसावीं जुआंठेयासि[२] बीजें केलें : तवं ते कव्हणीचि गोसावीयांची वास न पाहाति : सर्वज्ञें म्हणीतलें :"धुरे एकी पवाडु आति[३]?" आणि तेहीं ऐसें पाहिलें : तेहीं म्हणीतलें : "एइजो जी : एइजो जी :" म्हणौनि अवघे परते सरले : *मध्यें पवाडु केला*[४] *:* बैसों घातलें : गोसावीयांसि आसन जालें : चौदानी जुं पडत असे : कडु[५] जागरू[५] : नादु : त्रेतीया : तीहीं गोसावीयांतें वीनवीलें : "घेइजो जी एक दान :" गोसावीं एक दान घेतलें : पाउगीयापासौनि[६] फेरू घेतला : गोसावी पुंजीएचें कवडें श्रीकरीं घेउनि ऐसें चोळिलें : तीहीं म्हणीतलें : "गोसावी जुआंरी होती !" खेळों लागले : अवघेयांसि जो पाणी पीओं सूए[७] तेणें गोसावीयांसि उदक ओळगविलें : गोसावीं उदक स्वीकरिलें : जो अवघेयांसि वीडा दे तेणें गोसावीयांसि वीडा ओळगविला : गोसावीं वीडा स्वीकरिला : मग गोसावीं वीळुवरि खेळु स्वीकरिला : गोसावीं जुं वीळुवरि खेळीनले : बहुत[८] जुं जींतलें : मा कुरूंगे[९] कुरूंगे कवडे नीवडीले : एर कवडे मग जीतुलाही जीणा जींकिला तेतुलाही गोसावी दानासि करीति : एक कवडे तांबोळ दे तेयासि देति : एक पाणी पाजी तेयासि देति : गंधवादी धूपी : मागतेयांसि देति : एकासि पवींत[१०] देति : मा पीवळें कुरूंगे कुरूंगे कवडे श्रीकरीं ऐसा पसाभरि घेउनि दोंदेंसीं धरूनि गोसावी रांधवणहाटा : उभीया हाटवटीया बीजें करीति : मां सोवणी : दुसी : वाणीए : भूसारी : तेली : तांबोळी : आपुलाले व्यापार करीत होते : तेयां श्रीमुर्ति अवळोकितां तेयांचे व्यापार तैसेचि राहिले : गोसावीयांसि बीजें करितां श्रीमुर्ति दीसेतवं पाहातचि राहिले : ऐसी गोसावीं अवघी हाटवटी वेधली : दृष्टि फांके तवं पाहातेंचि असति : ऐसें गोसावी रांधवणहाटें बीजें करीति : मां गोसावी एकाधी एकी रांधवणीतें म्हणति :

---

१७ **अहबी.** तेयाचेया वंशाचा. (**अ.** वंशासि). **एवा.** °तेयाचेया कुळासि क्षेओ जाला :"

**२८.** १ **रावा.** तेलंग देसिचें पाळें देवठणें. **आनोबावासना.** पाळें देवठणें पर्वतापासि. २ **भ.** जुवांठेयां. **गो.** जुहाटेयासि. ३ **अहबी.** होइल. ४ (**हबी.**). ५ **हबी.** कडु : जागडु : नाभित्रये : तथा नादत्रये. ६ **गो.** पारगियापासौनि पारगु घेतला. ७ **अ.** सुइ. ८ **एवा.** अवघें. ९ **भपं.** पीवळे कुरंगे कवडे. १० **ह.** पोवीतें.

"कवडा अंन[११] जोडे ओ ?" मग ते म्हणे : "एइजो जी : एइजो जी : भीतरि बीजें कीजो जी :" मग गोसावी भीतरि बीजें करीति म्हणौनि तीया बैसों घालीति : मां पसाभरि कवडे श्रीदोंदेंसीं धरिले असति : ते ऐसे टाकुनि माझघरीं[१२] घालीति : मग आसनीं बैसति : मा तीयें श्रीचरण प्रक्षाळीति : ओलणी देति : मां मर्दनामादनें होए : मग आपुलीं वस्त्रें वोळगवीति : चंदन ओळगवीति : लल्हाटीं चंदनाचा आडा रेखीति : पुजा होए : मग उंचा मोलाचें ताट करीति : मग गोसावीयांसि आरोगण होए : गुळुळा होए : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते आरोगण कवडेयासारिखी नव्हे : ते अनुरागासारिखी होए : परत्रबुधी आरोगण देति[१३] :" *मग गोसावी आरोगण करीतां तया अन्नासि रूप करीति : अमुकें अमुकेयासि पुरलें : अमुकेयासि अमुकें न पुरेचि : ऐसें रूप करीति : तेणें तयांसि सुख होए[१४] :* वीडा देति : मग बाजसुपवती आंथुरति : झाडीति : मा गोसावी तेथ पहुडु स्वीकरति : चरणसह्वान करीति : ते दीसीं तेयांसि वीकिरा[१५] थोरू होए : मग उदीयांचि गोसावी आपुलीं वस्त्रें वेढीति : तेयांचीं वस्त्रें ठेवीति : नावेक हींव फीटों देती : ओतपळीया पडति तवं हें तेथ नीजैलेंचि असे : तवं ते जुआरी याची वाट पाहाति : भाट : वीदावंत म्हणति : 'हां गा कालिची धुर आझुइं नैए ? कालिचा माहादानि[१६] आझुइं नैए ?' ऐसी अवघींचि याची वाट पाहाति : मग गोसावी नैकडे जाति : प्रस्त्रया बैसति : सोव्रा आच्मन करीति : हातपाए प्रक्षाळीति : गुळुळा करूनि तेथ बीजें करीति : मागुतें खेळति : जींकति : कुरूंगे कुरूंगे कवडे श्रीदोंदेसीं धरीति : एर अवघे गोसावी पवीत[१७] देति : मां तीए दीसीं आणीकी रांधवणीचेया घरा बीजें करीति : तीया यांसि तैसेंचि करीति : तवं तीएं अवघीं याची वाट पाहाति : म्हणति : 'कालिची धुर आझुइं नैए ?' मागुतें म्हणति : 'कालिचा माहादानि आझुइं नैए ?' ऐसें दोहीं ओळी जेतुकीं रांधवण घरें तेतुकेयां घरा एककु दीं आरोगण होए : तेतुके दीं अवस्थान जालें : ऐसेया आवघेया रांधवणहाटासि संबंधु दीधला :" ॥

## २९ भगता भेटि

*ओरंगळ प्रदेशीं*[१] एकी गावीं गोसावीयांसि अवस्थान[२] : गोसावी[३] नगराआंतु पाणि-पात्र केलें : तळां आरोगण केली : पाळीं पींपळ : तेथ आसन जालें : तवं ब्राम्हणु एक संध्यावंदनासि आले : संध्या केली : तवं गोसावीयांतें देखिलें : मग गोसावीयांसि दंडवत

---

११ **एवा.** जेवण. १२ **एवा.** वोसरीएवरि. १३ **हबी.** °गीन्हाइकबुधी नेदीति. १४ **(मु.)**. १५ **एवा.** लाभु. १६ **एवा.** जगदानि. १७ **ह.** पवीता. **बी.** पौंत.

**२९.** १ (मु.). २ **एवा. हबी.** °मग गोसावीं ओरंगळासि. ३ **एवा.** ब्राह्मणाचेया (**एवा.**) भगताचेया आवारासि पाणिपात्रासि बीजें केलें : तवं तेहीं वीनवीलें : "जी जी : गोसावी जवं ये नगरीं असति—. **एवा.** गोसावीयांसि गावांबाहीरि पींपळातळीं आसन : तेथ भेटि जाली : **एवा.** पाणीपात्रां

केलें : श्रीचरणासि लागले : मग म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांसि बीढार कोणी ठाइं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां कीजैल :" मग गोसावीयांसि आरोगणे वीनविलें : गोसावीयांसि बीजें करावेयाची प्रवृति : मां गोसावीं तेयांची वीनवणी स्वीकरिली : तेयाचेया घरासि बीजें केलें : तीहीं गोसावियांसि आसन घातलें : श्रीचरणप्रक्षाळण केलें : मग बहीणीतें तेणें म्हणीतलें : "ए ए : गोसावीयांसि दंडवत घाली :" तीएं दंडवतासि आलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : मग ताट केलें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग तेणें ब्राम्हणें[४] गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावी जवं एथ असती तवं गोसावीं एथचि आरोगण करावी : उपरीयेवरि पहुडु स्वीकरावा जी : माझी बहीणि गोसावीयांची सेवा करील :" गोसावीयांसि प्रवृति : गोसावीं तेयाची[५] वीनवणी स्वीकरिली : मां तेणें आपुलीए बहिणीतें म्हणीतलें : "आवो[६] : तुआं गोसावीयांची बरवी सेवासुस्रुका करावी :" मग उपरीयेवरि गोसावीयांसि अवस्थान जालें : पहुडु जाला : तेयांची बहीणि गोसावीयांची सेवासुस्रुका करीति : गोसावी तेथ राज्य करूं लागले : गोसावी उदीयांचि वीहरणा बीजें करीति : तवं तीए गोसावीयां-कारणें उपाहारू नीफजवीति : आसन घालुनि गोसावीयांची वाट पाहातें असति : मग गोसावी विहरणौनि बीजें करीति : आसनीं उपवीष्ट होति : तीयें गोसावीयांचे श्रीचरण प्रक्षाळीति : पुजा करीति : ताट करीति : आरोगण होए : गुळुळा होए : वीडा ओळगवीति : मां पहुडु होए : तीए झडकरी चरणसह्वान करीति : गोसावीयांसि नीद्रा ए : मग आपण जेवीति : ऐसें बहुत एक दीस राज्य केलें :

धाकुटीचि गोसावीयांची श्रीमुर्ति : धाकुटीचि ते बाइको : लोकाचां ठाइं अनकुळता : प्रतिकुळता : उदासीनता : ऐसें तीन्हीं ठाए गोसावीं स्वीकरिले : लोकें अन्यथाज्ञान भाउं आदरिलें : प्रतीकुळु लोकु तो काहीं काहीं जनअपवादु बोलों लागला : मग तो आइके : ऐसां तेयाचीं[७] सोइरींधाइरीं म्हणति : "हे गोसावी धाकुटे : हेही धाकुटी : एथ काहीं ऐसेंनि ऐसें असे :" तें हळुहळु तेणें[८] आइकिलें : मग तेयापुढां तेयाचेया तोंडावरि बोलति : तेणें म्हणीतलें : "हें साच कीं लटिकें ? आपुलां डोळां देखैन : तेधवां साच : आणि काइ :" म्हणौनि तेणें[८] पाहों आदरिलें : बहीणीतें म्हणीतलें : "सीदौरि करि हो : मी गावां एका जाइन :" म्हणौनि गावां गेला : मागौता आला : ऐसें म्हणौनि जाळारखें[९] पाहावेया राहिला : तवं गोसावीं पहुडु स्वीकरिला असे : तीए[१०] गोसावीयांचें चरण-सह्वान करितें होतीं : तैसींचि गोसावीयांसि नीद्रा आली : तीएं श्रीचरणांवरि माथा ठेउनि नीजैली होती : "हे नव्हे : काहीं उनखुन चुकली : मा हे रुसैले असति :

---

बीजें करितां बीदीसि भेटि जाली. ४ **अहबी.** भगतीं. ५ **अहबी.** भगताची. ६ **अहबी.** °माझें धन : तुझें आंग : तुवां . . . ७ **अहबी.** भगताचीं. ८ **अहबी.** भगतीं. ९ **अ.** जळारखें. **बी.** जळरेखें. **गो.** जाळारक्षेनसि. **ह.** जळांधरें. **प्रवा.** दादरेनहुनि. १० **मु.** ते बाइ पोटकळिया देत होती : तथा थापटीति

हे बुझावीत[११] असे[१२] : *गोसावी विनती स्वीकरीति ना : गोसावी ऐसें करिताति*[१३] *:* " ऐसें म्हणौनि खर्ग काढुनि आले : आणि गोसावीं श्रीमुगटावरीलु पदरू श्रीकरें ऐसा करूनि फेडिला : तेयातें कृपादृष्टी अवळोकुनि दुसरें *प्रेम*[१४] *:* उतम साधन होतें तें संचरीलें : *प्रेमसंचारमात्रें*[१५] वीकारू वीकल्पु : स्वभावो : तीन्ही उछेदौनि गेले : हातिचें खर्ग उसळौनि पऱ्हां पडिलें[१६] : मग तैसेंचि गोसावीं तेथौनि बीजें केलें : सरीसें भगतही नीगाले : ।।

ऐलाडि पैलाडि गावं : गोसावीं येका गावां बीजें केलें : एकी गावीं गोसावीं तेयांतें म्हणीतलें : "भटो[१७] : हें पैला गावीं असैल : *मासापाखा हें तुम्हां दर्शन देइल*[१८] *:* " "हो कां जी :" ऐसें म्हणौनि भगतातें राहाविलें : ते तीए गावीं राहीले : आपण गोसावीं तेया गावां बीजें केलें : तीए गावीं गोसावीयांसि अवस्थान जालें : तेथौनि भगताचेया गावांसि ब्राम्हणु एकु प्रतदीनीं कणवृतीसि ए : भगत तीए गाविची सीवंवऱ्हीं[१९] एति[२०] : मग तेयांतें पुसति : "हां भटो : यां गावीं एक पुरूख असति कीं ? गुजरूवेखू : गौरवर्ण श्रीमुर्ति : लंबकर्ण : वीसाळनेत्र : अजानबाहु : बतीसलक्षण : कटिप्रदेसीं एकु सुडा : श्रीमुगुटावरि एकु सुडा : श्रीकरीं आंजुळी पाणीपात्र : ऐसे गोसावी तीए गावीं राज्य करीत असति कीं ?" तो म्हणे : "हो असति :" "नीकेनि असति ?" "ना नीकेनि असति :" मग दुख करीति : "तेयां कैसा अवसरू असे ?" "ना ऐसा ऐसा असे :" ऐसें ते दीसवडि नीच पुसति : ऐसां एकु दीं तीं ब्राम्हणीं म्हणीतलें : "काइ पां : अस्त्रीयांसि पुरूखांचा वेधू : पुरूखांसि स्त्रीएचा[२१] वेधू : पुरूखांसि पुरूखांचा एसणा वेधू काइसा पां ?" एकु दीं भगतीं ब्राम्हणातें पुसिलें : तवं तेहीं तेयांतें म्हणीतलें : "तें तुम्ही नेणां ?" भगतीं म्हणीतलें : "कैसें ?" "ना तें ऐसेनि ऐसें वर्तलें : सर्पनीमीत्यें :" ऐसें उमटवीलें : भगतीं म्हणीतलें : "हां भटो : हें सत्य ?" "ना सत्य :" "सत्य ?" "ना सत्य :" "सत्य ?" "ना सत्य :" ऐसें त्रीसुधी पुसिलें : तेहीं त्रीसुधी तैसेंचि म्हणीतलें : आणि दडैकरि पडिले : देह वीसर्जलें : तेणें ब्राम्हणें म्हणीतलें : "आहा : मीयां ओखटें केलें :" ना म्हणौनि : तैसाचि तो ब्राम्हणु बिहाला : "आरे : ओखटें जालें : आतां काइ करीन ? " म्हणौनि गोसावीयांपासि सांघावेया आला : मां मागील वृतांत आवघे गोसावीयांपुढां सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आहा : ओखटें केलें : हां भटो : ऐसा सत्यहि

---

होती. **एवा.** °श्रीचरण तळहातीतें होती. ११ **मु.** प्रवर्तवीत. १२ **गो.** °प्रवर्तावेया. १३ **(हबी.).** १४ **मु.** °प्रेम उत्तम साधन—. **एवा.** प्रेम संचरीले. १५ **(हबी.).** १६ **एवा.** °गोसावीं म्हणीतलें : "काइ हो : जें म्हणौनि आलेति तें कां न करां ?" "जी जी : नेणेंचि जी : " म्हणौनि दंडवत घातलें. १७ **एवा.** भक्त हो. १८ **(मु.).** १९ **एवा.** नइवऱ्हीं. २० **एवा.** °मां तीए गावीचीए मोहरे बैसौनि याची वाट पाहाति : मग तो ब्राम्हण तेया गावां प्रतदीनी कणवृतीसि ए. . . . २१ **एवा.** स्त्रीएची आवडि.

अर्थु न बोलीजे : मां एसणें असत्य तुम्हांसि कैसें बोलवलें ? आणि आतां कवणी माएचां पोटीं रीगाल ?"॥

मग गोसावीं तेयांतें पुसिलें : "भटो : तुमतें कुदळीपाउडें असे ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी :" "जा : घेउनि या : " गेले : कुदळीपाउडें घेउनि आले : गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीं तेयांतें श्रीकरें स्परीसिलें : मां गोसावी तेयातें श्रीदोंदेंसीं धरुनि : आसन जालें : मग तेया ब्राम्हणाकरवि खांच खणविली : रीगौनि पाहिली : मग मानेकडे गोसावीं धरिलें : पायांकडे तेहीं ब्राम्हणीं धरिलें : मां भगताचा नीक्षेपु केला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यासि तेथ घडीभरि असवेंचि ना : मग हें तेथौनि नीगालें " : ॥

## ३० ओरंगलीं मालपुजा[१] स्वीकारू

एकु दीस आउसें जोगवटा घालुनि बैसलीं होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : येथही एकु जोगवटा होता :" आउसीं म्हणीतलें : "तो कैसा जी स्वामी जगन्नाथा[२] ?"

सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ओरंगला गेलें होतें : ओरंगलीं *सदर्थ*[२] मालु एकु : तेयाखालि पांचसें मालां : तेयातें पुत्रु नाहीं : तेयांसि सैंबनाथाची भगति : अव्हा चौरस तीनि गावें ओरंगल : माझि सैंभनाथाचें देउळ : तो दांडीए बैसला सैंभनाथासि जातु होता : हें मार्गें ऐसें जात होतें : तेणें यातें देखिलें : आणि दांडीए खालुता उतरला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला :" मग गोसावीयांतें म्हणीतलें : "माझा सैंभनाथु एथचि भेटला :" ऐसें म्हणौनि यातें वीनवीलें : "जी जी : गोसावीं माझेया आवारासि बीजें करावें जी :" गोसावीयांसि प्रवृति : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : *आपण पुढां पाइं चालतु*[३] : मागां गोसावीयांतें दांडीए बैसौनि आपुलेया आवारासि आणिलें : तेणें गोसावीयांसि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : श्रीचरणक्षाळण जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "मग यासि ओलणी दीधली :" मग आणीकु मालु मर्दना देयावेया आले : तवं तेणें तेयांतें म्हणीतलें : "सरा रे : तुम्ही एथ कें रीगाल ? एसणी[४] आटि काइ तुम्हांकारणें काढिली असे ? गोसावीयांसि मर्दना मीचि देइन : " मग आपण मर्दना दीधली : जेतुलीं मालवीद्येचीं अंगें तेतुलीं गोसावीयांचां ठाइं ओळगविलीं : गोसावी तीएतीए कळेसि[५] रूप करीति जाति : मग मादणें जालें : पुजाअवस्वरू जाला : धुपार्ती मंगळार्ती जाली : सैंबनाथाची भगति ते गोसावीयांचां ठाइं अर्पीली : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग दंडवत घालुनि यातें वीनवीलें : "जी जी : मज संपति असे : परि संतति नाहीं जी[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "होइल हो :" मग तेणें पोटींचि ऐसें म्हणीतलें : "जरि मज पुत्रु होइल तरि मी गोसावीयांचां ठाइं पांचां सहस्रां सोनेयांची पुजा करीन :" ऐसें

---

३०. १ **बीमु.** मल्लपुजा. २ (**मु.**). ३ (**पंह.**). ४ **एवा.** एतुले सायास काइ तुम्हांलागि केले ? ५ **एवा.** वीद्येसि. ६ **गोमु.** °मज पुत्र होइल तरि मी गोसावीयांसि

म्हणीतलें : गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावी एथ असती तवं गोसावीं एथचि आरोगण करावी जी : आणि देव्हारचौकीयेसि पहुडु करावा जी : माझी राणी गोसावीयांची सेवा करील जी :" गोसावीं मानिलें : देव्हारचौकीयेसि अवस्थान जालें : तेयाची राणी गोसावीयांची सेवा करी : गोसावी वीहरणौनि बीजें करीति : मां तीएं आसन रचीति : गोसावीयांसि आरोगण : गुळुळा : वीडा : पहुडू होए : चरणसह्वान करूनि मग तीएं जेवीति : उचीष्ट प्रसादु : चरणोदक : ऐसें प्रत्यहीं[७] करीति : मग तेयांसि तेणेंचि दीसें : मासें : वडिली राणीसि गर्भसंभूति जाली : *त्याउपरि दोघांहीं गोसावीयांची अधीक श्रद्धा जाली : गोसावीयांसि आधी आरोगण जालेयांवीन तयाची स्त्री जेवि ना : मग गोसावीही उसीरू न लविती*[८] : मां गोसावीं बीजें करूं आदरिलें : तेव्हळि तेणें वीनवीलें[९] : "जी जी : आपचार्ये[१०] होइल : मग गोसावीं बीजें करावें :" "हो कां :" म्हणौनि मानिलें : मग वीहरणौनि सकाळींचि बीजें करीति : गोसावीयांसि आरोगण होए : मग तीएं जेविति : ऐसें अपचारीएं जालें : मग गोसावीं बीजें करूं आदरिलें : मग तेणें वीनवीलें : "ना जी : आठांगुळें होइल : मग गोसावीं बीजें करावें :" तेंहीं गोसावीं मानिलें : ऐसां आठांगुळें जालें : मां गोसावीं बीजें करूं आदरिलें : "ना जी बारसें होइल : मग गोसावीं बीजें करावें जी :" तेंहीं गोसावीं मानिलें : ऐसां प्रसुति जाली : पुत्रु जाला : बारसें जालें : मग गोसावीं बीजें करूं आदरिलें : तेणें म्हणीतलें : "ना जी : गोसावीं उष्टवनवरि राहावें : उष्टवन होइल : मग गोसावीं बीजें करावें जी :" तेंहीं गोसावीं मानिलें : ऐसां उष्टवन जालें : मग गोसावीं बीजें करूं आदरिलें : "जी जी : गोसावीं चोळेंवरि राहावें जी :" तेंहीं गोसावीं मानिलें : ऐसां चोळें जालें : ऐसें पन्हरा मास तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : मग गोसावीं बीजें करूं आदरिलें : तेव्हळि तेणें वीनवीलें : "ना जी : मीयां गोसावीयांसि पांचा सहस्त्रां सोनेयांची पुजा करावी : ऐसा मनोर्थु केला जी : तरि मी गोसावीयांसि पुजा करीन : मग गोसावीं बीजें करावें जी :" मग तेणें वीचारिलें : "गोसावीयांसि काहीं लागे ना : गोसावी दाम काइ करिती ? माहात्मे : तरि गोसावीयांकारणें जोगवटा करूं[११] :" म्हणौनि पाटाउवांचा[१२] जोगवटा केला : तेयांसि ठीक : माणीकें : मोतीएं : रत्नें : पांचां सहस्त्रांचीं खीवणीलीं : मग यासि मर्दना : मादनें : पुजा : केली : वस्त्रें ओळगविलीं : आणि तो जोगवटा ओळगविला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग आरोगण : गुळुळा : वीडा ओळगविला[१३] : मग हें तेथौनि

---

पांचां सहश्रांची पूजा करीन." ७ **अ.** प्रत्याइं. **हबी.** प्रतदिनीं. ८ (**मु.**). ९ **मु.** °"जी जी मज पुत्र होए तवं राहावें :" गोसावीं मानिलें : मग पुत्र जालेयांनंतरें बीजें करूं आदरिलें : पुडतीं वीनवीलें : "जी जी : बारसें होए तवं राहावें"... १० **बी.** उपचार्ये. ११ **एवा.** °एक म्हणति : गोसावींचि उपावो सांघीतला : "सुताउवां पाटाउवांचा जोगवटा करा :° १२ **मु.** पाटसुताचा. **गो.** °पाटसूत आणीलें : मोतीयें माणीकें : सोनेयांचीया सरीया : ऐसा पांचां सहश्रांचा जोगवटा केला : १३ **हबी.** °ऐसी गोसावीयांचां ठाइं माहापुजा केली : मग मालें दोहीं हात जोडुनि म्हणीतलें :

नीगालें : आउसीं म्हणीतलें : "मग तो जोगवटा काइ केला : स्वामी जगनाथा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाटे एकु ब्राम्हणु भेटला : तो दीधला तेया ब्राम्हणासि :" "हें काइ जी स्वामी जगनाथा : एसना जोगवटा कैसा ब्राम्हणासि देवविला जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : तुम्हीं असतीति तरि तुम्हां देइजता[१४] :" ॥

## ३१ हेडाउवां भेटि

एकी गावीं गोसावीयांसि वस्ति जाली : उदैक गोसावीं वीहरणासि बीजें केलें : नदीचीए थडीए : वृक्षातळिं गोसावीयांसि आसन असे : तवं हेडाउ तेलंग देसौनि घोडेयांची हेड घेउनि वोरंगला जात होते : नदीचीए थडीए एउनि ते राहिले : दूसें मांडवीया घातलीया : घोडेयांचे लाहास दीधलें : द्वासनीं[१] बळीयाविलें : मग आपण नदीसि संध्यावंदनासि आले : तवं गोसावीयांतें राजकुमरांऐसें देखिलें : अवघेचि[२] गोसावीयांजवळि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : वीनतकंदर होउनि गोसावीयांजवळें[३] बैसले[४] : मग घोडेयांचीया गोष्टी करूं लागले : जातिसूध[५] घोडे ते ऐसेऐसे : सर्वज्ञें म्हणीतलें : "जातिसूध[५] घोडे ते काइ ऐसे ? ते ऐसे कीं :" मग गोसावीं तेयांसि घोडेयांची जाति दीपें नीरोपुं आदरिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "जातिसुधू घोडा एकु आति : तेयातें एकाधा एकु : सभेआंतुनि मागिलीकडुनि पासाळावरी[६] हरळेंकरूनि[७] ऐसा हाणे[८] : आणि[९] ऐसा रोहके[१०] दृष्टी तेयांकडे पाहे : दुसरीएकडुनि जरि हाणे तरि तेउताही रोहंके पाहे : तो आपुलें करणीए करीतुचि असे : परि तो घोडा तेयावरीली रोहंक दृष्टी फेडी ना : तो जेउतजेउता जाए तेउततेउतेंचि तो घोडा पाहे : ऐसा जातिसूधू घोडा एकु आति :" *गोसावीं तेयांचि घोडेयांतु दाखविला*[११] : तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं हें परिसोंचि नेणों : मां बोलौनि काइ जी ? जी जी : अस्वहृदए तें गोसावी जाणति : जी जी : याची आम्हीं सोएहीं नेणों : भाख नेणों : हें गोसावीं नीरोपावें : आणि गोसावींचि आइकावें :" मग अवघे हेडाउ आड पडिले : दंडवतें घातलीं : मग तेहीं गोसावीयातें वीनवीलें : "जी जी :

---

"जी जी : इतुले दीस मीयां गोसावीयांसि नीरोधु केला जी : आतां गोसावीयांसि असों आवडे तवं असावें जी : मां बीजें करूं आवडे तरि बीजें करावें जी :" म्हणौनि दंडवतें घातलीं. १४ **गो.** दीजता.

**३१.** १ **आ.** द्वासनीया बळकावीलीया. २ **हबी.** °आणि मुदलु हेडाउ गोसावीयांजवळि आला. ३ **हबी.** °मांडखूटी (**बी.** मांडीखूटी) घालुनि—. ४ **हबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्ही कटकैये कवणावरि चालिलेति ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्ही हेडाउ : वोरंगळा जात असों :" गोसावीं पुसीलें : "घोडे कव्हणी दीपीचे ?" "जी जी : एक सिगळ दीपीचे : येक मलबारी : पाटणीचे :" ऐसे जे जे दीपीचे तेया तेया दीपांचीं नावें सांघीतलीं :° ५ **अ.** जात्य अस्व. **बी.** जाति अस्व. ६ **ह.** पासाडा°. ७ **अ.** सीताळेनकरूनि. **ह.** सीताळनकरूनि. **भ.** खडेनि. ८ **एवा.** हाणिजे. **हबी.** चीमीजे. **अ.** चिमीं. **गो.** °तो हरळें ऐसा सींतोडिजे. ९ **गो.** तो एकडे ए : तरि एकडे पाहे : एकडे ए तरि एकडे पाहे : तेयावरील रोखु काहाडे ना. १० **ह.** रोहकें. **बी.** रोखें. ११ **(गो.)**

गोसावीं आमचेया दूसासि बीजें करावें जी : " गोसावीं मानिलें : मग तेयांचेया दूसासि बीजें केलें : तीहीं ओलणी दीधली : मर्दनामादणें जालें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले असति : ते अवघे ओळगे बैसले असति : मग तेहीं यांतें वीनवीलें : "जी जी : ओरंगल नगर बरवें जी : गोसावीं तेथ आम्हांसरिसें बीजें करावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें एथ पूर्वदृष्ट[१२] असे :" तीहीं म्हणीतलें: "जी जी : या घोडेयांची हेड घेउनि जात असों : गोसावी जरि हे घोडयांचिए हेडेसरीसें बीजें करिती तरि आम्हां लाभांचे लाभ होती जी :" गोसावीयां ओरंगला बीजें करावेयाची प्रवृति : मां गोसावीं तेयांची वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीयांसि तेहीं बरवीं लुगडीं ओळगविलीं : आंगीया ओळगविलीया : घोडा[१३] ओळगविला : गोसावी घोडेयावरि आरोहण होति : आणि तो कळविला[१४] ऐसा होए : ऐसा आवघेयां घोडेयां संबंधू दीधला : मा घोडेयाचीए हेडे हेचि समर्थ : ऐसें गोसावीं ओरंगला बीजें केलें :

तीनि गाउवें ओरंगल नगर : उदैक पलाणिवलाणि[१५] होए : घोडे पुढां नीगति : मा वाजंत्रें वाजति : मग गोसावी बीजें करीति : एकतु घोडा एकतु दीं ओळगवीति : ऐसें वोरंगला बीजें केलें : नगराबाहीरि[१६] दुसें पडिलीं : गोसावी हेडाउवांचे मुदल हेडाउ : आणि ते आवघे अनुखंगीत : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथिचेया रायाची वेवस्ता ऐसी : जें आधीं अवघे घोडे रायासि दाखवीजति : मग रायासि लागति ते राओ घे : मग गाविचे वाणीएवेव्हारे घेति :" मग गोसावीं अवघे घोडे रायापासि दाखवीले[१७] : राया लागति ते राएं घेतले : एर राणेराउतीं ठकठाकुरीं घेतले : मग गावीचे वाणीएवेव्हारे आले : तेयांसि जे लागति ते तेहीं घेतले : बाहीरिलाकडुनि जे एति तेयांपुढां काढूनिया घोडा दाखवीति : तवं दीठीतळि नैए : गोसावी मध्यावर्ती : मग गोसावी आंगीयाचीया बाहीया ऐसीया वरतीया करीति : आंगीचे पालव सरीसे करूनि ऐसें पोटेसीं[१८] खोवीति : मां घोडा गोसावी ऐसा करूनि दाखवीति : आणि घोडेयासि तेज ए : मां घोडा गगन कवळीतु दीसे : ते म्हणति : "ऐसी वस्तु आमचेया हातासि एइल :" गोसावी सत्यावर्ती[१९] : हातासन दावीति[२०] : हेडाउवांतें गोसावी म्हणति : "एक सहस्रा ओपा :" बाहीरिलाकडौनि जे आले असति तेयांतें म्हणति : "दों सहस्रीं घोडा :" ऐसें एरएरां घडवीति : बाहीरिलाकडौनि जे आले असति ते ऐसें म्हणति : जे[२१] "हा घोडा गोसावीं आम्हां दो

---

हबी. (एवा.) गोसावीं तेथचि करूनि दाखवीलें. १२ अ. पुर्वी दृष्ट. १३ एवा. अवेटू°. गो. जो कातरू अवेटू घोडा तो गोसावीयांसि बैसावेया देति. १४ अ. कळवला. १५ हबी. पालाणा-वालाणि. १६ एवा. नगरांतु सैंभनाथापासि. १७ हबी. °मग राएमंडळीक घोडे पाहावेया आले : तेहीं गोसावीयांचें लावण्य : सौंदर्य : सौभाग्य : औदार्य देखौनि वेधले : . . . मग रायें म्हणीतलें : "या घोडेयासि मोल करा :" हेडाउवीं म्हणीतलें : "हे घोडे राउळांचे : हे गोसावी जाणति :" . . . गोसावी हातासन करीति : "हा घोडा अमुकें लाहे : हा अमुकें लाहे :" मग रायासि लागति—. १८ ह. पाठीसीं. बी. दोंदेसीं. १९ ह. समर्थ. बी. सत्यार्थे : २० एवा. करीति. २१ पंबीअ. जो.

सहस्त्रीं[२२] टकां देति तरि आम्हांसि सवंगु ए :" आणि हेडाउ ऐसें म्हणति : "हा घोडा सहस्त्रा[२३] टकेया जरि वीके तरि आम्हांसि थोरू लाभू होए :" *ऐसें गोसावीयांसि हातासन होए[२४] :* पाठीं गोसावीं "दीढा सहस्त्रा ओपा :" म्हणति : मग गोसावी तो घोडा पन्हरासेंयां तेयां देति : मग बाहीरिलाकडुनि जे आले असति ते म्हणति : "हा घोडा आम्हां पांचांस्यां सवंगु दीधला : आमचीं पांचसें वांचलीं[२५] :" आणि हेडाउ म्हणति : "आमचीं पांचसें गोसावीं अधिकें केलीं : आम्हां पांचसें फळलीं :" ऐसें एरएरां सुखचि होए : ।।

## ३२ वीव्हावो स्वीकारू

मां ऐसांही जे हेड उरे ते गावीचे वेव्हारे घेति : ऐसां एक वेव्हारे घोडे घेयावेया आले[१] : तेहीं गोसावीयांतें देखिलें : गोसावीयांचें सौंदर्य : लावण्य : बरवेपण : चातुर्यता : कुसळता : हातासन देखौनि तोखले : आणि गोसावीयांसि दंडवत घातलें : मां गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मातें कन्यारत्न एक असे जी : मी तीयाकारणें पाइं कापडे[२] बांधौनि बहुत दीस हींडीनलां जी : परि तीएजोगा वरू[३] कव्हणी ठाइं नाहीं जी : गोसावी होति : तरि तें माझें कन्यारत्न स्वीकरावें जी : आपुली दासि करावी जी": सर्वज्ञें म्हणीतलें : "यांसि जातिकुळ नाहीं :" तीहीं म्हणीतलें : "गोसावी इस्वरू : गोसावीयांचां ठाइं काइ जातिकुळ पाहावें लागत असे ? इस्वरासि काइ जातिकुळ असे ? गोसावीचि जाति आणि गोसावीचि कुळ : गोसावी अकुळनाथांचा[४] नाथ कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि एथ खूंटुदावें नाहीं :" तीहीं म्हणीतलें : "तेंही गोसावीचि : जी जी : गोसावीचि खूंटु आणि गोसावीचि दावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि यांसि करावेया काहींचि वीत नाहीं : " तीहीं म्हणीतलें : "दोहींकडुनि वन्हाड आम्हींचि[५] करूनि :" तवं अवघे हेडाउ उभे ठेले : तीहीं म्हणीतलें : "जी जी : इतुलें धनवीत आमतें असे : आमचें तें गोसावीयांचें नव्हे? तें अवघें आम्हीं करूनि जी : गोसावी वीव्हावो अंगिकरूतु : मा द्रव्य लागेल तें आम्हीं वेचुनि :" मग गोसावीं मानिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : एथ सकळै असे हो : एथ एक यासि जातिकुळ असे हो : हे लाड सामक : " ऐसी साखा सांघीतली : तरि प्रमाण जालें[६] : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ सकळै असे हो : नाएको :" पाहाति तवं बरवें घटीत असे : मग तेणें वेव्हारेन वीनवीलें : "जी जी : मातें गोत्रिजें : बहुत कुटुंब असे : अस्त्रीया माणुसें : एथ एओं नैए : तरि ते कुटूंबें वरू देखावा : तरि गोसावीं तेयांसि दरीसन देयावें जी :" गोसावीं वीनती स्वीकरिली : मग गोसावीयांतें

---

२२ **पं.** दोस्यां. **भ.** दोसासीं. २३ **पं.** स्यां. **भ.** सास्यां. २४ (**पं.**). २५ **ह.** वांचवीलीं.

**३२.** १ **हपं.** °तेयांतु वेव्हारेया एकाचीए कन्येकारणें वरू पाहों गेले होते : तेयांसि कव्हणी परी (**ह.** ठाइं) घडेचि ना. २ **हबी.** पाटे. ३ **हबी.** °श्रृष्टीमध्यें नाहीं जी. ४ **पंबी.** अकुळी°. **गो.** अकुळनाथु. ५ **बीपंगो.** मीचि करीन (**गो.** सारीन) जी. ६ **हबी.** °तवं तेही लाड सामक.

हेडाउवीं श्रींघारीलें : मग गोसावीं हेडाउवांसहीत दांडीए[७] बैसौनि तेथ बीजें केलें : तीएं अवघींचि पाहावेया आलीं : तीहीं अवघांचि गोसावीयांतें देखौनि म्हणीतलें : "हे गोसावीयांचेया तळवेयासारिखी नव्हे : हे सदैवं हो : या आपुलें दैवं काढुनि घेतलें :" एकवंद[८] ऐसें जालें : जें हा[९] वरू होए : वीह्वावो प्रव्रतला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वेह्वारेयाची वासना ऐसी जें एथिचा कडु तो आम्हींचि करूनि : आणि हेडाउ ऐसें म्हणति : जें गोसांवियांचा कडु तो आम्हीं करूनि :" हेडाउवीं गोसावीयांचीए राणीए-कारणें अळंकारभूसणें केलीं : साडेसांखळीया आवघेंचि केलें : मग वेह्वारेनि आपुला कडु केला : आणि गोसावीयांचा कडु तो हेडाउवीं केला : मग गोसावीं वीह्वावो स्वीकरिला : *गोधुळीचें लग्न जालें*[१०] : च्याऱ्ही दी वीह्वावो जाला : साडेसांखळीया मुक्ष-करूनि अवघें वाइलें : जैसा द्वापरीं भीमकें जो सोहळा केला तैसाचि एथही जाला : मग हेडाउवीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : दांडी करूं : मग गोसांवी आणि गोसा-वीयांची राणी ऐसें गोसावीं आमचेया देसासि बीजें करावें जी :" वेह्वारेयाची वासना ऐसी : जें गोसावीं एथचि राहावें : तवं गोसावीयांसि तेउतें बीजें करावेयाची प्रवृति नाहीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें एथ राहील : तेउतें नैए :" मग हेडाउवीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : आम्हांसि बहुत दीस लागले : आमचीं कुटुंबें वाट पाहातें असतीं : तरि आम्हीं आपुलेया देसासि जाओं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : हें एथ असैल :" मग गोसावीं तेयांसि अनोज्ञा दीधली : मग ते आपुलेया देसासि नीगाले :

गोसावीयांसि उपरीएवरि अवस्थान जालें[११] : मग ते वेह्वारे भलेतेंहीं गोसावीयांतें पुसपुसों करीति : काहीं बाहीरिलाकडुनि वस्तु ए : मां ते वेह्वारे जे वस्तु घेति ते गोसा-वीयांतें पुसति : मग गोसावी घेया म्हणति तरि घेति : गोसावी नको म्हणति तरि नेघति : मा गोसावी घेया म्हणति तीए वस्तुपाठीं थोरू लाभू होए : तो लाभू देखे : गोसावी नको म्हणति ते वस्तु आणीक घेति : तीए वस्तुपाठीं तेयांसि हानि ए : ते हानि देखे : ऐसें भलतें गोसावीयांतें पुसपुसों करीति : ऐसें तेया वेह्वारेयासि बहुत द्रव्य जालें :॥

ऐसां असतां एकु दीसु[१२] गोसावी : आणि गोसावीयांची राणी उपरीएवरि बैसौनि दोघें सारीं खेळत असति[१२] : तवं अवधूतु एकु : माहात्मा अन्यमार्गी : *संसारेसीं पाठिमोरा जाला ऐसा*[१३] : मार्गें जात देखिला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां एथौनि ऐसेयां होइजैल :" म्हणौनि तेयांकडे ऐसा श्रीकरू करूनि दाविलें : " जी जी : गोसावी कैसें ऐसें होती ? " ऐसें आइकौनि मुर्छा[१४] एउनि[१५] दडकरि पडलीं : " हें काइ : हें काइ : "

---

७ **एवा.** सोकासनीं. ८ **गो.** एकवीध. **हबीपं.** एक वेळ. ९ **पं.** हाचि वरू होआवा. १० (**मु.**) **बी.** (**ही.**) गोधुळकेचें लग्न जालें. ११ **एवा.** मास सा. **एवा.** मास ११. १२ **एवा.** °गोसावी आसनीं उपविष्ट असति : तीयें गोसावीयातें वारा घालितें असति. (**एवा.** तीयें गोसावीयांतें वीजणा जाणवीतें होती.) १३ (**मुबीपं.**). १४ **एवा.** मुर्छाप्रपन्नें होउनि. १५ **अह.** परिपुर्ण.

म्हणौनि पडतपडतां गोसावीं वरिचांवरि धरिलीं[१६] : मग फुटेयाचेनि पदरें वारा घालुनि साउपी केलीं : आंगेसीं धरूनि झाडिलीं : सागळेचेनि उदकें नेत्र पुसिले : मग म्हणीतलें : "हें काइ : एथौनि ऐसेयां काइ होइजैल ? *तुमतें सांडौनि कें जाइजैल*[१७] : हें तुमतें चाळवीताएं[१८] कीं :" मग गोसांवीं बीजें केलें तेव्हळि तेयांसि सरूपदरीसन वीद्या संक्रमीली : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें[१९] : ॥

## ३३ डांकरामीं व्याघ्रवीद्रावण

गोसावीं[१] डांकरामीं बीजें केलें : गावां नावं डाक्रामु : देवते नावं भीवेस्वरू : तेया गावां गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि पाणिपात्र जालें : आरोगण जाली : मग गोसावी बीळिचां वेळीं *पहुडु स्वीकरावेया*[२] देउळासि बीजें करीत होते : तवं गांविचे लोक पारीं बैसले होते : तेहीं म्हणीतलें : "देव[३] हो : या देउळां नको जाओं : एथु वाघु एत असे :" गोसावीं आगाधचक्रव्रती : गोसावीं आइकिलें म्हणौनि येवं मागूतें पाहुनि बीजें केलेंचि : गोसावीयांसि चौकीं आसन जालें : पहुडु जाला : तवं मध्याने एकी रात्री वाघु आला : तेणें हाक दीधली : गोसावीं सींहनादु केला : तो पौळि उडौनि गेला : तें रान सांडौनि पळाला : *गोसावीयांसि पहुडु जाला : उपहुडु जाला*[४] : तवं उदीयांसीचि गांवीचा लोकु टाळ : घोळ : काहाळा : कांसौळीं : मादळ : वाजवीत : हाका बोंबा देतु आला : वाद्यांत्रें वाजवीतु : देवतेसि पुजा करावेया आला : नीच तेयांचा बोभाटु आइकौनि तो नीघे : ते दीसीं काहीं नीगतां देखतीचि ना : मग म्हणों लागले : "कालि जे देव आले : तेयांचेया आविसावरि बैसला असैल : म्हणौनि न नीगे[५] :" ऐसे भीतभीत दारवठेवरि आले : तवं गोसावीयांसि चौकीं आसन असे : "आरे : इस्वरपुरूख रे :" ऐसें म्हणौनि अवघे साउमे भीतरि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग यातें पुसिलें : *"जी जी : येथ वाघु आला होता कीं ?" "आला होता*[६] *:"* "जी जी तरि तो कैसेनि

---

१६ **मु.** °गोसावीं उपंगळिये घेउनि उठविलीं. १७ (**मु.**). **आ.** मग त्याउपरि अकरां दीसां एणें बीजें केलें : मग जेव्हळी हें तेथौनि निगालें तेव्हळी तयासि स्तीति संचरली : त्यातव तीयें यातें आपणेयापासि देखतचि असति : ॥ १८ **एवा.** झाकवीजत होतें कीं. **एवा.** हांसवीजत°. १९ **एवा.** माहादाइसीं पुसिलें : "जीएं सबदासरिसीं तेथ पडलीं : मा तीएं राहिलीं कैसीं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीएं यातें अखंड देखतचि असति :" त्यांचें नावं हंसाइसें. **पं.** "आणिजति तरि येती जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तियें पढियंती : आणि बरवी सकुमारें : सुर्याचें रस्म न साहे : आणिजति तरि तियें येति : परि एथ प्रवृत्ति नाहीं :"

**३३.** १ **आ.** हें भीवेडाकरासि गेलें होतें : गावां नावं डांकुली : देवते नाव डाकराम भीवेस्वरू. २ (**हबी.**). ३ **एवा.** माहात्मे हो . . .एथ वाघु असे . . .तवं वाघु चौकीं बैसला असे : . . . तेणें हांक दीधली : एथौनि सिंहनादु केला : वाघु बोबाउनि पौळि उडौनि पळाला : ह्यागिला : मुतिला : ४ (**एवा.**). ५ **एवा.** मग पौळीवरि चढौनि राणेन पाहिलें : तवं हें आसनीं बैसले देखिलें°. ६ (**शोध.**).

गेला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "यातें देखिलें : तेणें हाक दीधली : आणि एथौनि सींहनादु केला : तो हे पौळि उडौनि पळाला : ते हे नव्हे पौळि पडली असे : तो हें रान सांडौनि पळाला : तो आतां एथ नैए हो :" गोसावीं म्हणीतलें : "बाइ : तीए दीउनि तें स्थान नीरउपद्रव वसतें जालें[७] :" ।।

## ३४ तैल्यकारयुगमा स्तीती

गोसावीयांसि कटिप्रदेसीं सुडा : श्रीमुगुटप्रदेसीं सुडा : गोसावीं एका गावांसि बीजें केलें : गोसावी उभीया हाटवटीया बीजें करीत असति : दोहीं वोळीं तेलीयांचीं घरें : दोहीं ओळीं तेलिणी तेल वीकीती बैसलीया असति : त्यांतु एकीं गोसावीयांतें देखिलें : ते उठिली : *अवघा पसारा माथां घेतला*[१] : त्या येउनि यातें श्रीकरिं धरिलें : मग म्हणीतलें : "एइ गा बरवेया देवा : माझेया घरा जाओं[२] :" ऐसें म्हणौनि यातें श्रीकरीं धरूनि आपुलेया घरासि नेलें : उंबरेयापासि श्रीकरू सोडिले[३] : *पसारा उतरिला*[१] : आपण भीतरि जाउनि उतरडीकडे गेली : गोसावी दोन्हीं दारसंका दोहीं श्रीकरीं धरूनि उभे ठेले : तवं तेली घाणा खेटीत[४] होता : मग तेयातें गोसावीं म्हणीतलें : "आगा ए मेहरा : या तुझीया मेहरीं यातें कां बोलाविलें ?" तेणें ऐसें पाहिलें : आणि गोसावीयांतें देखिलें : पाहार सांडिली : घाणेयाखालुती उडी घातली : श्रीचरणांवरि माथा ठेविला : मग तेणें म्हणीतलें : "जी जी : मी तीळमारा तेली : ते माझेया पापा क्षेओ करावेया[५] कारणें बोलाविलें जी :" ऐसें म्हणौनि बाजसुपवती घातली : गोसावीयांसि आसन जालें : श्रीचरण प्रक्षाळिले[६] : मग तेणें आपुलीए स्त्रीएसि नीरोपु दीधला : "आजि जेतुकें तुं रांधुं जाणसि तेतुकें रांधि हो :" *मग तो श्रीचरणां लागौनी घाणा खेटुं गेला*[७] : ते सुप घेउनि उतरडीसि गहुं : तांदुळ : काढुं गेलीं : गोसावीं तीयेतें अवळोकिलें : आणि तेयातेंहि अवळोकिलें : आणि दोघांहि स्तीति जाली : एतुलेनि तेथौनि बीजें केलें : मग तीएं दोघें अद्यापि झाडिमंडळीं देओ आणि देवि होउनि वर्ततें[८] असति : हें[९] तेयांसि

---

७ **अआहबीपंगो.** मग वाराणसी माहादाइसें गेलीं होतीं : तो पव्हा तेया वाटा आला : लोकु म्हणे : "आधीं हें स्थान वोस होतें : वाघाभेण : मग साचोकारा रामु एथ आला : तो चौकीं आसन घालुनि बैसला : तैलागौनि हें स्थान वसतें जालें :" ऐसी गोष्टि माहादाइसीं एउनि गोसावीयां पुढां सांघीतली : त्याउपरि हे गोष्टि गोसावीं माहादाइसां पुढां सांघीतली :

**३४.** १ **(हबी.)**. २ **प्रवा.** "आगा बरवेया जोगीया : एइं : जावों माझेया घरा :" **पं.** °मग पसारा अवघा सांटवीला : पाटीए घातला : होइए घेतला : गोसावीयांतें पाळवीं धरिलें : ते पुढां : गोसावी मागां : ऐसें बीजें केलें : ३ **अ.** °आणि भीतरि गेलीं. ४ **एवा.** वाहाते. ५ **एवा.** होआवेया. ६ **मु.** °तो पासि बैसला : मग तयां दोघां वीद्यास्तीति जाली : ।। **शोध** °तीयेसि उपाहाराचा नीरोपु देउनि आपण चरण क्षाळण करूं लागला : आणि स्तीति जाली : ७ **(हबी.)**. ८ **एवा.** खेळतें. ९ **एवा.** हें तेया वाटां आलें.

भेटलें : मुगुटें मुडुप झगटुनि : परि यातें तीएं ओळखतीचि ना : ओळखिचाही पाडु नाही :

हे गोष्टि रावंसगावीं आबाइसां वाएनाएकाउपरि : संगमेस्वरीं सांघीतली : ।।

## ३५ पंचकुळ आचार्या ग्रहोनीवृति

गोसावी वीहरणस्थाना बीजें करिताति : दखिणेस्वराकडे : तवं सारस्वति भटीं गोसावीयांतें देखिलें : आणि आड पालौ करौनि गेले : तवं बाइसीं देखिलें : आणि म्हणीतलें : "हां बाबा : हा ब्राम्हणु : मागां बाबाचेया दरीसनासि ए : दंडवत करी : श्रीचरणां लागे : आतां बाबातें देखौनि आड पालउ करूनि[1] गेला : हें काइ बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयांकारणें[2] म्हेळीचेयापस्य सीक्षाचा अभिमानु थोरू :" मग यावरि पंचकौळ आचार्याची गोष्टि सांघीतली[3] : ।।

"पंचकौळ आचार्या एकु : तो पांचें कुळीं आचार्या : तेयाचा सीक्ष तो एकें आचारीएं[4] चाळविला : तेणें अभिमानें तेयांसि तेणें वीखप्रळयो केला : तेया पापास्तव ग्रहो जाला : जाउनि वेव्हारेया एकाचा पुत्रु : तेयाचां आंगीं संचरला : अवघेयां ग्रहोंचा[5] मुक्ष नाएकु : तो खांबीं सांकळीं आळिला असे : गांवोगांविचे गुणीए : जाणे[6] : मंत्रवादी जे एति : तो तेयांतें म्हणे : 'एणें मंत्रें : या झाडनीयां तुं मातें धाडिसी : एणें मंत्रें : या झाडनीयां मीं जाइन : एणें वोखदें मातें धाडिसी[7] :' आणि तो हात झाडुनि जाए : ऐसा तो काइसेनि कोण्हाचेनीहीं न वचे : मग एकु दीसु गोसावीं पाणीपात्रासि बीजें केलें : पाणीपात्र जालें : मां तेयांचेया दाराआड पऱ्हीवा होता : तो ठाओवरि गोसावीं बीजें केलें : पऱ्हीवा वोलांडीतचि नोलांडीतीचि : तो खांबीं आळिला होता : तेणें यातें देखिलें : आणि म्हणीतलें : "आगा : मातें सोडा कां गा : मां मी पैला गोसावीयांपाठीं जाइन :" तेहीं म्हणीतलें : "आरे : हा कहीं बोले ना : तो आतां बोलतु असे : तरि यातें सोडा ना कां : हा मातें सोडा ऐसें कहींचि न म्हणे :" मग तीहीं सोडिला : आणि तैसाचि गोसावीयांसरिसा नीगाला : सवें त्याचे बापभाउ : चुलते : माणुसांची मांदी : पुढें पुढें गोसावी जाति : गोसावीयां-मागें तो जाए : तेयामागें तेयाचा बाप : भाउ : चुलते : तेयामागें गांविची हाउळि : ऐसें गोसावीं नइसि[8] बीजें केलें : सीळेवरि श्रीचरणोदक घातलें : मग श्रीकरिचें पाणीपात्र घातलें : गोसावीयांसि आसन जालें : आरोगण करिताति : तवं ते आले : गोसावीयांतें तेणें उचीष्ट प्रसादु मागीतला : "जी जी : मज ताटप्रसादु देयावा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें "तुं कवणु ?" "जी जी : तें गोसावी जाणत असति कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि

---

**३५.** १ **पंभ.** वोडउनि. २ **एवा.** तेया बटिकाकारणें. **आ.** तेया बटिकाकारणें : तेव्हेळीं पद्मनाभी सरिसा होता. ३ (पुर्वार्ध लीळा २९६ पाहा.) **अ.** आचारीया°. ४ **एवा.** संन्यासीएं. ५ **बी.** ग्रहाचा. ६ **पहबो.** जाणे जोसी (ह. जोइसी). ७ **एवा.** फेडिसी. ८ **हबो.** तळेयासि

जाणीजत असिजे पां : तें तैसेंचि : परि एहीं अवघां जाणावें कीं :" म्हणौनि ऐसा श्रीकरू तेयांकडे दाविला : मग तेणें अवघें गोसावीयांपुढें सांघीतलें : "जी जी : मीं पंचकुळ आचार्या जी : माझे सीक्ष आणिकां आचार्यापासि गेले जी : तेयांसि मीयां अभिमानें वीखप्रळयो केला : तेया पापास्तव मी ग्रहो जालां जी : अवघेयां ग्रहोचा मुक्ष नाएकु : नो मी या वेव्हारेयाचेया पुत्रासि लागलां : गांवोगांविचे गुणिए : जाणें : जोइसी : मंत्रवादी : मातें फेडावया एति : तेयांतें मीं म्हणें : 'एणें मंत्रें तुं मातें फेडिसी' : तें मीं आधीचि म्हणौनि जाए : एतुकेनि ते हात झाडुनि जाति जी : गोसावी जरि मज प्रसादु देती तरि[९] मीं या ग्रहत्वापासौनि मुंचैन जी : आणि हा प्राणीया या दुखापासौनि मुंचैल जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो एथिचीए दृष्टीसमोर न राहे कीं :" "ना जी : मी अमकेयां ग्रहेयांसि[१०] मुक्ष नाएकु जी :" मग गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांसि आरोगण जाली : गोसावी तेथौनि उठीले : परतें सरौनि गुरूळा केला : उदक स्वीकरिलें : उदकासि वीनयोगु केला[११] : आणि तेणें बुडि सीतें उरलीं होतीं : तो एउनि ताटप्रसादु घेतला : सर्वज्ञें म्हणीतलें : "एयातें धरा गा : एऱ्हवीं आतां हा पडैल[१२] :" "ना जी : जैसा आला तैसा जाइल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें आतां याचां ठाइं नाहीं कीं :" कींकळी देउनि मुर्छीत पडिले : इतुकेनि पडतपडतां तेहीं उचलुनि घरासि नेला : *मग तीहीं गोसावीयांसि आवारासि नेलें : मर्दना जाली : मार्जनें जालें : पुजा केली : आरोगण जाली : मग*[१३] गोसावीं बीजें केलें[१४] : ।।

## ३६ घोडाचुडीसीक्षां सांगातु

गोसावी ऐसे खीखींदा पर्वताकडुनि[१] मार्गीं बीजें करिताति : तवं घोडाचुडीचे सीक्ष एक : ते उतरापथाकडुनि खीखींदा पर्वतासि जाताति : हें ऐसें दखिणापथाकडौनि एत होतें : मध्यें गोसावीयांसी भेटि जाली : मग तेणें गोसावीयांतें पुसिलें : "देव हो : कवणीकडौनि एत असा ? : कवणीकडे जात असा ?" गोसावीं श्रीमुगुटाचेनि अनुकारेंचि दाखविलें : "हें ऐसें उतरापथाकडे जाइल :" मग तेणें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं ऐसें दखीणपथा वीवेकदेसा खीखींदपर्वतासि बीजें करावें : तेथ वाळीसुग्रीवांचीं देउळें[२] बरवीं असति : तेथ अनेग सीधसाधक असति : तेथ आमचे गुरू घोडाचुडि असति : नीके नीके पुरूख असति : पुरूखांचें दरीसन होए : वरवीं वनें वनस्तळीया असति : तेथ घोडेया-एसणीं वानरें असेति जी : तरि गोसावीं तेथ बीजें करावें :" *गोसावीयांसि रसु भरला*[३] :

---

९ **मु.** °माझेया पापा निष्कृति होइल. १० **ह.** ग्रहोसि. **बो.** ग्रहांमध्यें. ११ **रावा.** °कवळु दीधला. **ही.** गोसावीं तयासि प्रसादु आरोगणस्थानीं सांडिला. १२ **एवा.** °मग तो कीकळि देउनि पळाला : नीगाला. १३ **(रावा.)**. १४ **अह.** °वरिचील काहींचि नैए : म्हेळीएचें **प्रमाण** : यावरि.

**३६.** १ **एवा.** °एका गावासि गोसावीं बीजें केलें : तवं°. २ **पं.** दुर्गे. ३ **(पंगो.)**.

गोसावीं[४] वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीं तेयांसरिसें बीजें केलें : गोसावीयासि[५] पाणीपात्र होए : ते गोसावीयांतें पुसौनि चाटणीये जाति : ऐसे केतुले एक दीस गोसावीं तेया सांघातें बीजें केलें : ।।

एकु दीसु एकी गावीं गोसावीयांसि पाणीपात्र जालें : वृक्षा[६] एका खालि गोसावीयांसि आसन जालें होतें : ते दीसीं ते गोसावीयांतें न पुसत चाटणी करूं गेले : तवं बाइला एकी तेयांचें सामृथ्य पाहिलें : चुलीवरि आंबीलि सीजत होती : ते कढतकढत[७] चाटुभरि आंबीलि[८] तेयांचां हातीं घातली : तेहीं चाटणी करूनि वळणी हातु पुसिले : आणि भडकरौनि उबाळा उठिला : ते आगि लागली : आणि अवघा गाउं जळों लागला : अवघा गाउं जळे तवं पाहात होते : मग ते हांसतहांसत गोसावीयांपासि आले : तीहीं म्हणीतलें : "देव हो : हा बोभाटु काइसा : नेणा[९]?" गोसावीं[१०] दृष्टीचेनि अनुकारें पुसिलें : तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं चाटणी करूं गेलों : तवं बाइला एकी आमचें सामृथ्य पाहिलें : चुलीवरि आंबीलि सीजत होती : कढतकढत आंबीलि खवंडाळीया आमचां हातीं घातली : आम्हीं चाटणी करूनि वळणी हात पुसिले : तेथ भडकरौनि उबाळा उठिला : तो हा गाउं जळतु असे : पाहा ना?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*माहात्मे हो*[११] : एसणी भूतहींसा केली[१२] परि तुम्हां खीणभरीही घृणा नुपजे : होए : आणि वरि हांसत असां? आतां हें तुमचेनि सांघातें नैए[१३] :" मग ते गोसावीयांसि वीसंबति ना : मग गोसावीं तेया नीदसुरेयां सांडुनि बीजें केलें : ।।

## ३७ दीन त्रीं श्रीप्रभूदरीसना गमन

मग गोसावीं तेयांचा सांगातु सांडुनि एकांकी बीजें केलें : रात्रिदेओ करूनि तीनि अहोरात्रें गोसावीं प्रमेस्वरपुरा बीजें केलें : ।।

## ३८ श्रीप्रभूभेटि

दाभवीहीरीकडौनि आमचां गोसावीं बीजें केलें : पैलीकडौनि श्रीप्रभू आपवीहीरेया-कडौनि खेळतखेळत बीजें केलें : पीवळतळौलियांमध्यें वेढे करीत होते : तेथ दोहीं देव

---

४ **एवा.** °मानिलें. ५ **मु.** गोसावी आधीं पाणिपात्र करीति : पाठीं ते चाटणी करीति : **पंगो.** गोसावी आपुलें पाणिपात्र करीती : तो आपुली चाटणी करी : ६ **एवा.** देउळीं एकी. ७ **एवा.** जळतजळत ८ **गो.** °खवंडळीया. ९ **एवा.** जाणा पां? १० **एवा.** °भृभंगीं पुसिलें. ११ (**मु.**) १२ **एवा.** एतुलेयां भूतांची खस्ता केली. **गो.** एतुलेयां भूतां उपद्रो जाला. **एवा.** °परि ऐसीही (**एवा.** येतुकीही. **एवा.** किमपीही.) घ्रूणा नाही. **मुबी.** °परि कैंसीही काहीं घ्रूणा नुपजेचि होए° १३ **एबा.** °पाउल न घलीं.

भेटि जाली : खालिली तळौलीचीए वाव्य[1] काठीं दोहीं देवां भेटि जाली : गोसावीं[2] आपणेयां आपण खेमाळींगन दीधलें[3] : न्मस्करिलें : मग श्रीप्रभूगोसावीयांसि पींवळ-तळौलीचीए पाळीसि आसन जालें : आमचेयां गोसावीयांसि श्रीप्रभूपुढां माडेखुंटीं आसन जालें : मां एरएरां[4] गोसावीं आपुलीया भासा[4] काइ बोलत होते तें नेणिजे : तें देओचि जाणति : मग श्रीप्रभूगोसावीं रीधपुरासी बीजें केलें : आमचे गोसावी अवळोकीत होते : श्रीप्रभुगोसावीं खेळु करीतकरीत बीजें केलें : जवं देखति तवं आमचे गोसावी पाळीवरौनि अवळोकीतचि होते : मग गोसावीं 'जयजये' करूनि नमस्करिलें : मग आमचां गोसावीं दाभवीहीरी बीजें केलें : मग मलिनाथीं : बहीरवीं : अवस्थान जालें : ।।

दर्भेस्वराचीए देउळीएं अवस्थान[5] : गोसावी पाणीपात्रासि बीजें करीति : उतरीली वेसिदारें नगराआंतु रीगति : पूर्वीले वेसिदारें नीगति : दर्भाळां घाटीं श्रीचरणेंकरि[6] : चीरेयावरि[7] उदक घालीति : श्रीकरिचें पाणीपात्र घालीति : आरोगण करीति : पाळीसि पींपळु : तेयातळिं आसन : वीळिचीए वेळे : तरि पसिमीलीकडे आसन : उदीयांचीए वेळे तरि पूर्वीलीकडे आसन : दीस स्याळे : ओतपळीए बैसति : बहीरवीं पहुडु होए : ।।

## ३९ खेत्रखाजें[1] आरोगण

मग आमचे गोसावी उदीयांचि श्रीप्रभूगोसावीयांसि सामोरें[2] बीजें करीति : श्रीप्रभू पैलीकडौनि बीजें करीति : एरएरां गोसावीयांसी पाळीसि आसन होए : श्रीप्रभू खेळु करीति : कदाचीत खेत्रासी बीजें करीति : मार्गीं मातांगें पानाची पातळि करूनि ठेविली : तीएवरि जीए वेळे जो पदार्थु ते दोणे भरूनि ठेविले असती : एकी दोनां हुरूडा : १ : एकी दोनां नीमुरू : २ : मग एकी दोणां ओंबीया : ३ : एकी दोणां चणेयांचे सोले : ४ : *एकीं दोणां घोळाणा*[3] : ५ : एकी दोनां तुरीचे सोले : ६ : एकी दोनां लांकांचे सोले : ७ : एकी दोणां वाटाणेयांचे सोले : ८ : एकी दोनां कोवळींकोवळीं

---

**३८.** १ **बी.** वाव्य कोणीं कांटी : तेथ—. २ **मु.** **(शोध)** श्रीप्रभु. ३ **हबीआ.** °मग दोहीं श्रीमूर्ति क्षेमाळींगन जालें : मग आमचां गोसावीं जए केलें : श्रीप्रभूचें रज वंदिलें : तवं ब्राह्मणु एकु वाटा जातु होता : तेणें म्हणीतलें : "हे तुम्हांसि काइ होति ?" आमचां गोसावीं म्हणीतलें : "हे आम्हांसि गुरू होति :" तवं श्रीप्रभुगोसावीं म्हणीतलें : "आवो : वीदीत करीताए म्हणे :" म्हणौनि थापां हाणीतलें : मग श्रीकरें श्रीकरू धरूनि तळौलीचीए पाळीवरि बीजें केलें : ४ **पं.** °एऱ्हाएऱ्हीं गोसावीं गोष्टि काइ आपुलीया भाखा स्वरूपनीर्वेचाचीया केलीया तें नेणीजे°. **गो.** °पाळी बैसौनि दोहीं देवीं काइ स्वरूपनीर्वेचू केला हें नेणीजे : ५ °बाइदेवोबा वासना. ६ **पंगो.** °करुनि. **हबी.** श्रीचरणीचेनि आंगुठेनकरूनि. ७ सीळेवरि. **आ.** लांबा चीरेयावरि.

**३९.** १ **बी.** सारंगो: क्षेत्रखाजें. २ **एवा.** पुढारें. ३ **(हबी.)**.

वाळुकें : ९ : एकी दोणां उंसांचीया पेरीयां : १० : एकी दोनां उदक भरूनि ठेविलें : ११ : ऐसें तो नीच ठेवी : वरि एकी पातळीया झांकी : श्रीप्रभूगोसावी बीजें करीति : श्रीप्रभू-गोसावी देखौनि चवकति : तेथ आसन होए : आरोगण होए : दोणांचें उदकपान करीति : मग ते दीसीं आमचेयां गोसावीयांसि प्रसादु होए : मग एरएरां दोहीं देवांचा प्रसादु तेया मातांगासि होए : एरी दीसीं तो दुणां दोणे ठेवी : ऐसे खेळतखेळत श्रीप्रभूगोसावीं दाभवीहीरीसि बीजें केलें : आमचां गोसावीं श्रीप्रभूचा खेळु पाहातपाहात बीजें केलें : दर्भाळां खेळु : "मेला जाए :" म्हणौनि घरोघरीं आरोगण करूनि मग दर्भेस्वरीं खेळु केला : मग श्रीप्रभू प्रमेस्वरपुरा बीजें केलें : पीवळतळौलीयावरि आमचे गोसावी बोळवीत आले : तेथ राहुनि भाळस्तळावरि श्रीकरू ठेवुनि जवं श्रीप्रभूगोसावी रीधपुराआंतु बीजें करीति तवंवे-हीं पाहाति : मग मागौतें दाभवीहीरी बीजें करीति : ऐसे आमचे गोसावी नीच श्रीप्रभूसि साउमे जाति : मागौतें बोळावीत जाति : ऐसी प्रतदीनीं एरएरां गोसावीयांसि पीवळतळौलीयांसि भेटि होए : कदाचीत एकाधीये वेळे श्रीप्रभूगोसावी बीजें न करीति : तीए दीसीं आमचे गोसावी बीजें न करीति : मग प्रमेस्वरपुराकडे भाळस्तळावरि श्रीकरू ठेवुनि पाहातचि असति : मग गोसावी मागौतें दाभवीहीरी बीजें करीति : मग एउनि दाभवीहीरीसि पाणीपात्र करीति : दर्भाळां सीळेवरि श्रीचरणें उदक घालीति : मां पाणीपात्र घालीति : आरोगण होए : दर्भेस्वरीं[४] उतरीलीकडे देउळीं दखिणामुख : तेथ अवस्थान : पहुडु होए : ऐसें वीस[५] दीस दाभवीहीरीं अवस्थान : दर्भेस्वरिचेया[६] बाळाणेयावरि आसन होए : ।।

## ४० रूपनाएकां भेटि

हे गोष्टि गोसावीं साधांप्रति जोगीस्वरीं सांघीतली[१] : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : मामेयांचां घरीं जेवाल कीं प्रमेस्वरपुरीं भीक्षा कराल ?" साधीं म्हणीतलें : "हां जी : गोसावीं मामेयांतें केवि जाणति ?" *यावरि हे गोष्टि सांघीतली :* ।।

गोसावीयांसि दर्भेस्वराचेया[२] बाळाणेयावरि आसन होतें : तवं रूपनाएकु आले : तीहीं गोसावीयांतें देखीलें : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : तेव्हळि रीगतां डावीये सोंडीएवरि आसन होतें : रूपनाएकें वीनवीलें : "जी जी : गोसावीं माझेया आवारा बीजें करावें जी : " गोसावीं मानिलें : वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांतें घोडेया वाउनी दाभवीहीरीहुनि आपुलेया गावांसि नेलें : मग काटसरेयासि[३] बीजें केलें : ओलणी दीधली : मग गोसावीयांसि मर्दनामादनें जालें : पुजा केली :

---

४ **प्रवा.** °मलिनाथीं बहिरवीं अवस्थान जालें. ५ **रावा.** बावीस. ६ **एवा.** °पूर्वीला.

**४०.** १ (उत्तरार्ध लीळा ७९ पाहा.) २ **एवा.** मलिनाथीचीए देउळीए आसन होतें. ३ **गो.** °रीधपुरासि : तेथ तेयाचें एक घर होतें.

साधीं म्हणीतलें : "हां जी : तो पुजा करूं केवि जाणे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते आगमीक : पुजा करूं जाणति :"

मग गोसावीयांसि ताट जालें : तदभावीं दुधातुपाभरूनि वाटी ताटावरि ठेविली : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : मग गोसावीं उदीयांचि बीजें केलें :।।

## ४१ वींझीं गोंडवडां[१] अवस्थान

एकु दीस माहादाइसें भीक्षा करूं गेलीं होतीं : तवं भूतानंदाची नाति ळळीताइसें आणि भवंतालीं लेकरूवें बैसलीं असति : तवं लेंकरूवांतें चींचकरंटां भातु रांधितां देखिला : तो चटपटां कढे : तीएं बुडि जाळु करितानि : तें देखौनि माहादाइसां वीस्मो जाला : आलीं : मां गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : मीं भीक्षा करूं गेलीएं : तवं लेंकरूवें चींचकरंटां भातु रांधितें होतीं : तें काइ जी ?" गोसावीं म्हणीतलें : "बाइ : आति :"

"हें पुर्वीं वींझीं गोंडवडां[१] होतें[२] : तेयां गोंडांसि याची प्रीति संचरलीं : तैं तीएं यांसि ऐसेंचि करीति : वेळुवाचें कांडें तोडुनि आणीति : वींधति : वींधौनि भीतरि तांदुळ घालीति : पाणीयांची सीर तीयेंचि जाणति : ऐसेंऐसें खणति : आणि बरवें नीर्झर[३] उदक नीगे : पाणी आणीति : तांदुळ आणि नीगुतेंचि पाणी वेळुवाचां कांडां घालीति : मागुती डांबीरि घालीति : वरि सेणेंमातीया बोंबीति : अग्नि पाडीति : मग अग्नीआंतु घालीति : मां होतें[४] पदन तीएंचि जाणति : मग काढीति : काढुनि[५] चीरीति : चीरूनि माउळीचेया[६] पानाची पातळि करीति : मां तेयांवरि नळांचा भातु घालीति : दोनि दोणे करीति : एकी दोणां आघाचा मधु घालीति : एकी दोणां पाणी घालीति : एकि पातळीया वरि झांकीति : मग गोसावी वीहरणासि बीजें करीति : ऐसें तीएं गोसावीयांची वाट पाहाति : यासि उसीरू लागे : मां यातें नेदखति : मां यातें कुवारीति[७] : याचीए गिवसनीए[८] रीगति : यातें झाडोझाडीं गीवसीति : 'देवनें देवनें :' 'कीलु कीलु' म्हणौनि बोलावीति : मग गोसावी बीजें करीति : मां यातें देखौनि हरीखैजति : दंडवतें घालीति : श्रीचरणां लागति : श्रीचरणांवरि माथा ठेवीति : श्रीचरणांवरि लोळति : मोमे देति : गाति : नाचति[९] : टाळीया वाति : नाना पुस्पें आणीति : गोसावीयांसि पुजा करीति : मग यासि आरोगण देति : ऐसें गोसावीयांसि नीच करीति : मग गोसावी तेथौनि बीजें करीति :" ।।

---

**४१.** १ **भगोहबीमु.** गोंडवाडां. २ **आ.** तेथ यासि बारा वरिषें अवस्थान जालें. ३ **अ.** नीर्झो. ४ **भ.** सीजतें. **पंगो.** सीजलें. ५ **मु.** पाएळें. ६ **एवा.** पोमिनीचेया. **बी.** माहाळंगीचीया. ७ **बी.** कुका करीति. ८ **अ.** गवसनीए. ९ **आ.** मोरवीसांचीया पीलीं वेठी नाचति : देवणे देवणे करीत गाति : पीलीं पसरौनि नाचति : . . . हडहडकरि हुका वाजवीति°.

## ४२ ससीकरक्षण

एकी गावीं गोसावीयांसि वस्ति जाली : वीहरणा बीजें केलें : वृक्षा एकाखालि गोसावीयांसि आसन जालें होतें[१] : दोहों पारधीयां होड पडली : 'जेयाचीं सुनीं ससा टाकी तो होड जीके :' दोहों पारधीं ससा सोडिला : रानीं दरादरकुटा नाहीं : ओहळखोहळ नाहीं : ऐसें समस्तळ भूमिका पाहिली[२] : ससा सोडिला : तेयासवें सुनीं लागली[३] : ससा पळतु जातु होता : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि गोसावीयांतें टाकुनि आला : सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : या :" म्हणौनि गोसावीं जानु उचलिली : तो एउनि गोसावीयांचीए जानुखालि रीगाला : श्रीमूर्ति अवळोकुं लागला : तवं मागीलाकडौनि सुणीयां आलीया : तीया पुढां उभीया राहिलीया : तीयामागिलाकडौनि पारधी आले : ते पुढां उभे राहिले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग तेहीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : ससा सोडावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा नेदिजे :" तेहीं म्हणीतलें : "हा होडेचा ससा : देयावा[४] जी : याकारणें[५] सुरीया काढणीयां होती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : एथ सरण आलेयां[६] काइ मरण असे[७]? " मग तीहीं श्रीमुखाची वास पाहिली : "जी जी : तरि हा गोसावीं राखिला :" ऐसें म्हणौनि ते नीगाले : मग नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : एं रानींवनीं असति : तृण खाति : नदीवाहाळाचीं उदकें पीति : यांतें तुम्ही कां गा मारा ? एं तुमचें काइ करीति ?" "जी जी तरि आजिलागौनि न मरूं : आणि काइ :" ऐसें म्हणौनि तेहीं दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग नीगाले : ते गेले : गोसावीं वरती जानु उचलीली : आणि तेयांतें अवळोकुनि सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : आतां जा :" आणि नीगाला[८] : ॥

## ४३ सेंदुरजनीं मासउपवासिनी स्तीति

गोसावीं गोपाळाचेया[१] देउळासि बीजें केलें : दारसाखांपासि[२] उभेयां ठाउनि दोन्ही दारसाका[३] श्रीकरें धरूनि भीतरि अवळोकिलें : तवं आवघीया मासोउपवासिनी बैसलीया असति : तेयांतें गोसावीं अवळोकिलें : गोसावीयांतें देखौनि तेयांआंतु एकि उठिली :

---

**४२.** १ **हबी. (प्रवा.)** °तवं गावीचा राओ ससेयांचीए पारधी नीगाला°. २ **हबी.** चापडी. **पं.** चापडे. ३ **बी.** लाविली. **ह.** सुनीयां लाविलीया. ४ **एवा.** सोडावा. ५ **एवा.** °काल पडैल जी. ६ **अ.** °यासि. ७ **मु.** °मागौतें सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : ए रानीं वनीं असति . . ." तीहीं म्हणीतलें : "जी जी : आजिलागौनि न मारूं" मग ते नीगाले : ८ **हबी. आ.** °बाइसीं पुसिलें : "बाबा : तें कवण नगर ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें पाळें" हें चरीत्र पंचाळेस्वरीं : अभियोगें ब्राह्मणु रक्षण : या प्रस्तावेयावरि बाइसांप्रति सांघीतली : ॥

**४३.** १ **एवा.** नाराएणाचेया. २ **भगोहबीमु.** दारसका°. **पं.** दारसखा°. ३ **भगोहबी.** दारसका.

श्रीचरणां लागलीं : श्रीमुखिचें तांबोळ मागीतलें[४] : "जी जी तांबोळ देयावें :" गोसावीं अनुकारेंचि दाखविलें : "या अवघीया देखत असति कीं :" "ना जी : तैसें काहीं नाहीं : याचें काइ ? गोसावीं देयावें[५] :" *गोसावीं गरुडाचेया साजेयापासि*[६] बीजें केलें : गरूडारा गोसावीयांसि आसन जालें : तेथ तांबोळासि तीया हातु ओडवीला : गोसावीं तांबोळ दीधलें : आणि तेयांसि स्तीति जाली : आणि आपुलां ठाइं जाउनि बैसलीं : मग गोसावीं बीजें केलें :॥

तें आपुलें कर्म वीसरलीं : तवं तीची परिचारका आली : तीएपुढां तेहीं सांघीतलें : "इयेचा मासोउपवासु भंगला : एक माहात्मे आले : तेयांचें उचीष्ट तांबोळ घेतलें[७] :" आणि तीए दीउनि भूलली ऐसी ठाकली : एकीं म्हणीतलें : "वायो ढळला :" एक म्हणति : "पीसें लागलें :" तवं धाकुटा भाउ आला : तो उचलुनि आपुलेया घरासि घेउनि गेला : देव्हारेयावरि बैसवीली : ऐसी बारा वरीखें *स्तीति भोगीत*[८] बैसली होती : *गोसावीयांसि आपणेयांपासि देखतीचि असे :* बारा वरीखां स्तीति भंगली : आणि एकसरी बोबाउनि उठिली : "नागवलीएं ओ : नागवलीएं ओ :" आणि दुख करूं लागली : तवं तेहीं म्हणीतलें : "आवो : कैसी नागवलीसि ?" "आतांचि गोसावी[९] होते : आतांचि गेले[१०] :" तेहीं म्हणीतलें : "तरि आम्हीं देखों ना ?" तीया म्हणीतलें : "तुम्हीं देखा ना : परि मीं देखें कीं : ते जरि पुरूख भेटती तरि माझें देह वांचैल : एऱ्हवीं देह त्येजीन :" तवं धाकुटा भाउ कणवाळु : तेहीं पुसिलें : "ते कैसे असति ?" "ना गौर श्रीमूर्ति : लंबकर्ण : वीसाळनेत्र : अजानबाहु[११] : डावीए भवैवरि कांदि : ऐसे असति :" मग धाकुटा भाउ नीगाला : तेयांसि बहीणि थोर पढीए[१२] : तवं गोसावीयांसि गावां-बाहीरि वृक्षा एका तळिं आसन असे : तवं तेणें गोसावीयांतें देखिलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग अवघी गोष्टि गोसावीयांपुढां सांघीतली : मां गोसावीं तेथ बीजें केलें : घरासि घेउनि आला : गोसावीयांसि तीया दंडवत घातलें : श्रीचरणां लागली[१३] : आणि मागुती स्तीति सुभर जाली : घरील क्रीया संबंधीं केली[१३] : मग तेहीं पुसिलें : "जी जी : आतां काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं उठवाल तेव्हळि उठिती :

---

४ **भगोहबी.** °आणि दोन्ही हात श्रीमुखीचेया तांबोळास वोडविले : ५ **अमु.** °म्हणौनि तांबोळ घेतलें : आणि स्तीति जाली : गोसावीं बीजें केलें : ६ (**हबी.**). ७ **एवा.** °आणिकीं मासोउपवासिनी तेयांचेया संबंधीयांपुढां सांघीतलें : "पुरुख एक आले : तेयाचिए श्रीमुखीचें तांबोळ घेतलें :". ८ (**हबी**). **प्रवा.** °तीएसि बारा वरीखें अन्नोदक नाहीं : **रावा.** °आपणपें काहीं जाणेना : तियेचे बापभाउ वायु म्हणौनि ओखदें करीति. ९ **एवा.** पुरुख. १० **एवा.** बीजें केलें. ११ **हबी.** °उंच कपोळें : आलोहीत श्रीचरण : वरिखा पंचवीसाची ऐसी वएसा : १२ **एवा.** °तीये प्रदेसीं गोसावी राज्य करीत होते : संबंधीं गोसावीयांतें गींवसुनि वीनवीलें : १३ **एवा.** °गोसावीयांसि मर्दनामादनें जालें : पुजा आरोगण जाली : पहुड जाला : चरण-संवाहन केलें : मग मागुती स्तीति जाली :

तुम्हीं बैसवाल तेव्हळि बैसती : तुम्हीं जेववाल तेव्हळि जेविती :" ऐसां गोसावीं तेयांसि एतुला वरू दीधला : मग गोसावीं बीजें केलें : बारा वरीखें तैसीचि स्तीति : एक म्हणति : अनोदकें नाहीं : ॥

## ४४ भोगरामीं अवस्थान

गोसावीयांसि खडकुली अवस्थान : तवं भोगरामिचीया बाइया : तेहीं गोसावीयांतें देखिलें : आणि तेहीं म्हणीतलें : "हे आमचे नगीनदेव मां :" तवं बाइसीं पुसिलें : "बाबा : नगीनदेव म्हणीजे काइ ?" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें :"बाइ : हें पूर्वी भोगरामीं होतें :" यावरि हे गोष्टि सांघीतली[१] :

भोगरामीं गोसावीयांसि ओटेयावरि अवस्थान : रामाचां देउळीं : *उदेयांचि गोसावी*[२] *आसनीं उपविष्ट असति*[३] : तवं बोणेबाइया *देवतेसि दंडवता*[३] आलीया : तेहीं[४] गोसावीयांतें देखिलें : दंडवत केलें : श्रीचरणां लागलीया : मग गोसावीयांतें पुसिलें[५] "बा: आपणेयांसि नावं काइ नगीनदेव[६] ?" गोसावीं श्रीमुगुटेंचि मानीलें : मग[७] तीया रामासि[८] गेलीया : पुजा केली : मग मागुतीया आलीया : गोसावीयांतें वीनवीलें : "बा नगीनदेव हो : आमचीये गुंफे बीजें करावें :" गोसावीयांसि बीजें करावेयाची प्रवृति : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीं तेयांचीये गुंफेसी बीजें केलें : आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तेहीं गोसावीयांसि आरोगण[९] दीधली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग तेहीं गोसावीयांतें वीनवीलें : "बा नगीनदेव हो : जवं एथ असिजैल तवं एथचि एउनि आरोगण करावी बा : उदीयां जैसें असे तैसें आरोगिजे बा : वीळिचां भीक्षा करूनि एउनि : बा जैसें असैल तैसें आरोगावें बा :" गोसावीं तेयांची वीनती स्वीकरिली : गुंफेसि

---

**४४.** १ (उत्तरार्ध लीळा २१ पाहा.) **आ.** प्रतीत आरंभीचा वृत्तांत पुढीलप्रमाणे आहे : "बाइ : हें पूर्वी भोगरामीं होतें : एकु दीं हें भोगरामासि गेलें : तेथ रामाचां देउळीं वोटेयावरि आसन जालें : मग नगरांतु पाणीपात्रासि बीजें केलें : मग आंबाळाचीए पुर्विले पाळिसि आरोगण जाली : मग कदाचीत कापुरवावीसि आरोगण होये : कदाचीत सेंदुरवावीसि आरोगण होये : भोगरामीं वोटेयावरि पहुड होए : एकु दीं राणेन यातें देखिलें : . . ." "प्रातःकाळीं मागुता आला : एथ पुजा केली : धुपार्ति मंगळार्ति केली : मग देवतेसि पुजा केली : मग येणें रामाचेया देउळासि दर्शनासि बीजें, केलें : एकाधा दीं लक्षमणाचां देउळीं दर्शन होए : कहीं हणमंताचां देउळीं दर्शन होए : एकाधा दीं सीतेचीये न्हाणीये बीजें करी : तेथ पश्चिमिली पाळी लींगाचां देउळीए आसन होए : कहीं आंबाळाचीये दक्षीणिली पाळी पसिमिलीकडे आसन होए : एकाधा दीं मा नरसींहीं आसन होए : एकाधा दीं धमरुषीचां देउळीं आसन होए : एकाधा दीं गुप्तरामीं आसन होए: एकाधा दीं गुप्तभैरवीं आसन होए : मग भोगरामीचेनि राणेन बोणेबाइयातें म्हणीतलें : "आवो आवो बोणेबाइ : ईश्वरू पुरुषु एक आले असति : काइ सांघों तयाचें लावण्य . . ." २ **एवा.** °सोंडीएवरि चरणचारी उभे असति :° ३ (**हबी.**). ४ **अ.** त्यें. ५ **गोह.** °"बाबा : आपणेयां नाव काइ ?" गोसावीयांसि मौनाची प्रवृत्ति : गोसावी उगेचि : मग तेहींचि म्हणीतलें°. ६ **ह.** मौनदेव. ७ **हबी.** मग तीया गोसावीयांचां ठाइं पुजा केली : मग भोगरामासि पुजा केली : मग तेहीं गोसावीयांतें वीनवीलें—. ८ **अ.** घरासि. ९ **हबीमु.** पाणिभाताची°.

आरोगण होए : कदाचीत पाणीपात्रा बीजें करीति : रामाचां देउळीं ओटेयावरि पहुडु होये : तेथिचे बडुवे[10] आधी गोसावीयांचेया श्रीचरणांवरि फुलें ठेवीति : धुपार्ती मंगळार्ती करीति : पाठीं देवतेसि पुजा करीति : धुपार्ती मंगळार्ती करीति : पाठीं हें गेलेयां उपरि एथिचेया अस्थानासि करीति[11] : ऐसें गोसावीं केतुले एक दीस तेथ राज्य केलें : मग गोसावीं तेथौनि मनसीळेसि बीजें केलें : ।।

## ४५ मनसीळे ब्राम्हणां स्तीति

हे गोष्टि गोसावीं लुखदेवोबावरि हीवरळीये सांघीतली[1] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ एथिचेया नामापासौनि वेधु : कां स्थानापासौनि वेधु :"

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ब्राम्हणु एकु वोटेयावरि एउनि बैसोनि अनुष्टान करूं बैसे कीं अनुष्टान करूं वीसरे : आणि सुखचि होए :" बडुवा[2] *वोटा उदकें सींपीला : तुळसी वाइली*[3] *:* ओटेयावरि पुस्प ठेउनि धुपार्ती मंगळार्ती केली : *वाधावणें केलें*[3] *:* पाठीं देवतेसि पुजा धुपार्ती मंगळार्ती केली : ब्राम्हणें बडुवांतें पुसिलें : 'तुम्हीं या वोटेयासि धुपार्ती मंगळार्ती करीत असा तें काइ?' तीहीं म्हणीतलें : 'एथ पुरुख एक होते : ते बरवे कैसे : सौंदरीयें लावण्यें आथिलें : ते येथ होते तवं तेयांसि करूं : ते गेले : तरि या ओटेयासि करूं :' तेहीं बडुवांतें पुसिलें : 'ते कवणीकडे गेले ?' 'ना ते मनसीळेकडे गेले :' तैसाचि तो मनसीळेसि आला :

तवं गोसावीयांसि तळेयाचीए पाळी आसन होतें : ब्राम्हणें एउनि गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागौनि पुढां बैसला : गोसावीं तेयातें पुसिलें : 'भटो : हें तुम्हां श्रुत कीं दृष्ट ?' 'ना जी : श्रुत जी : भोगरामिचां बडुवीं गोसावीयांचें बरवेपण : सौंदरीयें लावण्य सांघीतलें : तेयांतें मीयां पुसिलें : ते कवणीकडे गेले?' 'ना ते मनसीळेकडे गेले :' 'तैसाचि मीं एथ आलां जी :' आणि तेयांसि स्तीति जाली :" मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ४६ भांडारेकारां भेटि

मग गोसावीं तेथौनि भांडारेयासि बीजें केलें : गोसावीयांचां कटिप्रदेसीं सुडा : श्रीमुगुटीं सुडा[1] : गोसावीं भांडारेकारांचेया आवारासि पाणीपात्रासि बीजें केलें : *तया नावं नीळभट : ते काणव*[2] *:* तवं भांडारेकारांचीया ब्राम्हणीं भांडारेकारांलागि आंघोळी[3]

---

१० **एवा.** वीद्यार्थी. ११ °**एवा.** "बाइसीं पुसिलें : 'बाबें ऐसें तेथ कीती दीस राज्य केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वरिखें बारा :"

**४५.** १ (पूर्वार्धं लीळा ४७२ पाहा.) २ **एवा.** वीद्यार्थी. ३ (**हबी.**).

**४६.** १ **शो.** °श्रीकरीं पाणिपात्र. २ (**मु.**). ३ **भ.** °आळंदां. **गो.** °गंगाळीं.

पाणी सारिलें होतें : भांडारेकारांसि अभ्यंगाची आइति होत असे : भांडारेकारीं [४]उतरासंगें धोत्र घातलें असे[५] : ओसरीएवरि बैसौनि पोथी[६] वाचीत होते : तवं अर्थू अवगमे ना : तो अर्थू मागिलीए फाकीए असे : ते पुढील फाकी पाहात होते : तवं भांडारेकारांचेया ब्राम्हणीं गोसावीयांसि पाणीपात्र दीधलें : परि ते गोसावीयांची वास ऐसी धातीया[७] दृष्टी न पाहातीचि : मग गोसावीं साउमेयां बीजें करूनि म्हणीतलें : "भटो : मागीलि फाकी पाहा[८] :" आणि तेहीं गोसावीयांकडे प्रतौनि पाहिलें : आणि गोसावीयांतें देखिलें : मग पोटीं म्हणीतलें : "ज्ञातार होति : काळु रूसला : मां काळातें बुझाउं नीगाले : किं काळाचिवरि रूसले : ऐसें दीसताति : अवेव गळले असति : तेया वार लाविले असेति : भोजनअर्थीयां भोजन मीळे : *मां यां न मीळे*[९] : तरि माझे हीतक्ष होति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भांडारेकारां दरीसनासवें ज्ञानत्व : सुहृदत्व : हीतक्षत्व एं तीन्हीं उमटलीं :" ऐसें जाणीतलें : तैसेंचि गोसावीं बीजें केलें : तेही गोसावीयांसरिसे नीगाले : तेयांची ब्राम्हणि दारवठावरि आलीं : तेहीं म्हणीतलें : "काइ तुम्हीं कें नीगालेति? *तुम्हां पाणी सारिलें असे*[१०] :" गोसावीं एवं मागुती वास पाहीली : तेहीं[११] म्हणीतलें : "*हें इतुके दीस तुम्हांपासि होतें : आतां*[१०] जेयांचें तेयासवें नीगालें : तुम्हीं राहा :" आणि तीएं या सबदासरिसींचि राहिलीं : मग माहादाइसीं पुसिलें : "हां जी : तीएं राहाविलीं : आणि सबदासरिसीं राहिलीं कैसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीएं आज्ञाघरें कीं : तेयांची काढिली रेख नोलांडीति :" मग तैसेंचि गोसावीं देवकी तळेयासि बीजें केलें : डावेनि श्रीचरणें सीळेवरि उदक घातलें : श्रीकरिचें पाणीपात्र घातलें : भांडारेकार सोळा हातेया साउलेयाचें धोत्र : उतरासंगें नेसले होते : तें अर्ध फाडिलें : गोसावीयांसि आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : भांडारेकार पुढां मांडेखूटी घालुनि बैसले असति : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : भांडारेकारीं प्रसादु घेतला : मग पोटीं मनोर्थ करूं लागले : जें 'माझें गोसावियांचां ठाइं काहीं प्रवेसन नव्हेचि : मीं काहींचि घेउनि न नीगेंचि :' ऐसें दूख करीत बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "भांडारेकार हो : मनोर्थ करीत असा तो एथौनि सीधी नेइजैल हो :" भांडारेकारा दरीसनासरीसें ज्ञातुत्व : आप्तत्व : प्रतीति : तीन्हीं अवधारिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "भांडारेकार उठों बैसों जाणति : तैसें कोण्हीचि नेणति :" भांडारेकारां सोळा वरीसें सन्यधान : परि पुष्टिवीभाग कहीं देखिलाचि नाहीं[१२] : ॥

---

४ **ह.** अर्ध°. ५ **एवा.** °सोळा हातेया साउलयाची पडदनी घेतली असे. ६ **आ.** वेदाची पोथी. ७ **बी.** उधातीया. **एवा.** वरौतीया. ८ **रावा.** वाचा. **एवा.** म्हणा. **गो.** ओसारा. ९ (**हबी.**). १० (**मु.**). ११ **एवा.** सर्वज्ञें°. १२ **एवा.** °तेथ देउळीए वस्ती जाली : **एवा.** तेयाचि तळेयाचीए पाळी वडातळिं पुर्वीला आसन जालें : गोसावीयांपुढां ते माणेखूंटीया बैसले होते : तवं मातापीता आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : भांडारेकारातें म्हणीतलें : "चाला :" तवं तेहीं म्हणीतलें : "तुम्ही चाला :" आणि तीएं उगींचि गेलीं : मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : तीएं सबदासरिसीं कैसीं गेलीं ?" "बाइ : तीएं आज्ञाघरें :" ॥

## ४७ [१]भांडारेकारां स्तुति करावेया आनोज्ञा

भांडारेकारांची स्तुति गोसावीं सांघीतली[२] : भटांचीए स्तुतीवरि : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा : काहीं आपुलें कीं एथिचें ?" भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांचें कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचेंचि एथ काइ बोलावें असे ? स्तुति ऐसी भांडारेकारचि करूं जाणति :" भटीं म्हणीतलें : "तें कैसें जी ?"

सर्वज्ञें म्हणीतलें : "हें भांडारांहुनि नीगाले : भांडारेकार भीक्षा करीति : यांसि आरोगण देति : मग आपण उचीष्ट प्रसादु घेति : स्रेष्ट ठाओ तो पहुडावेया यांसि : एथची सेवा करीति : हें नीदवीजे[३] : मग आपण एकाधी एकी कोणटां : कां देउळाबाहीरि एकाधीए देउळी : तेथ नीद्रा करीति :" ऐसें भांडारेकारांसि सोळा वरीखें सन्यधान : गोसावी मार्गें बीजें करीति : एकी[१] गावीं गोसावीयांसि वस्ति जाली : भांडारेकार गोसावीयांकारणें सयनासन रचुं गेले : तवं भांडारेकारातें वींगुळीं खादलें : ते थोर दूख व्येथा हों लागली : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मातें वींगुळीं खादलें : तें मज थोरि दुख वेथा होताए जी : तरि मीं गोसावीयांची स्तुति करूं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "करा :" मां एथिची स्तुति करूं लागले[४] : मां जवंजवं स्तुति करीति तवंतवं दुखाची वेथा उणी[५] होए : ऐसी वींगुळि उतरली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग गोसावीं उदीयांचि तेथौनि बीजें केलें :।।

## ४८ अळजपुरीं अवस्थान ।। धानुबाइआवारीं भांडारेकारांची पुजा

तैसेंचि गोसावीं अळजपुरासि बीजें केलें : अळजपुरीं पींगळबहीरवीं[१] अवस्थान जालें : 'गोसावीयांसि मीं बरवी पुजा न करींचि :' ऐसें भांडारेकारांचां पोटीं उरलेंचि होतें : भांडारेकार तो अप्रतोखू भावीतचि असति : 'जें माझें काहीं गोसावियांचां ठाइं प्रवेसन नव्हेचि :' गोसावीं जाणौनि भांडारेकारांची वास पाहूनि म्हणीतलें : "भटो : तुम्हां करणीए एक असे :" भांडारेकारीं म्हणीतलें : "तें तरि गोसावी जाणति असति कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तूं उभा ठाकलासिचि पुरे : तें एथौनिचि तुमचें सीधी नेइजैल कीं :"

मां एकु दीं गोसावीं नीर्वाणे बीजें केलें : चौकीं[२] गोसावी उभे जाले : भांडारेकारातें सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : तुम्हीं ए देउळीं बैसा[३] : हें पैला देउळां जाइल :" नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी काही म्हणैल[४] तें कीजे हो : भटो :" ऐसें म्हणौनि गोसावीं नीर्वाणे-

---

४७. १ आ. माउदां. २ (उत्तरार्ध लीळा १६८ पाहा.) ३ भंह. नीजवीजे : आ. नदवीजे. बी. नीद्रा करी. ४ हवी. आदरीली. ५ मु. काढे :

४८. १ रावा. निर्वाणे मागिली बहिरवीं°. एवा. नदीपैलाडीली नीर्वाण बहीरवीं°. २ एवा. °नावेक गोसावीयांसि आसन जालें : ३ एवा. राहा. ४ मु. °तरि तेथ जाइजो हो :

मागिला वहीरवांचेया देउळा बीजें केलें : ते नीर्वाणेसि बैसले : धानाबाइ[५] ते पांचौळीची[६] राणी : तीएसि नीर्वाणेची भगति : ते नीर्वाणेसि दांडीए बैसौनि आलीं : ते भीतरि देउळाआंतु गेलीं : नीर्वाणेसि पुजा केली : काहीं ब्राम्हणा दीधलें : मग बाहीरि नीगालीं : तवं चौकीं भांडारेकारातें बैसलेयां देखिलें : तेयांसि न्मस्कारू केला[७] : मग म्हणीतलें : "आमचेया आवारासि बीजें करावें :" "हो कां :" म्हणौनि नीगाले : आपुलेया आवारा घेउनि गेलीं : तीयां तेयांसि पटिसाळे आसन घातलें : तेथ ते बैसले : मग तीयां ताट भरूनि पुजाद्रव्यें आणिलीं : बरवीं पुजा करूं आदरिलीं : तीहीं पुसिलें : "हें काइ ?" तीयां म्हणीतलें : "ना हें तुम्हांसि पूजा करूनि :" भांडारेकारीं म्हणीतलें : "हे पुजा आम्हांसि काइसी? हे पुजा आमचेयां गोसावीयांसि कीं :" धानाबाइया म्हणीतलें : "ऐसें : तुम्हांहीं आणीक एक गोसावी असति ?" भांडारेकारीं म्हणीतलें : "तरि काइ : आम्हांसि गोसावी असति :" धानाबाइया म्हणीतलें : "ते कवणी ठाइं असति ? सांघा : मां आम्हीं तेयांतें बोलाउनि[८] :" भांडारेकारें म्हणीतलें : "ते तुमचेया बोलावीलेयां नैएति : तेयांतें आम्हींचि बोलाउनि :" इतुकेनि भांडारेकार बोलवावेया गेले : मग गोसावीयांपुढें सांघीतलें : गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मां गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीयांतें बोलाउनि घेउनि आले : धानाबाइया गोसावीयांतें देखिलें : मग बरवें आसन केलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग धानाबाइया गोसावीयांलागि : तेयाहीहुनि उंचें[९] बरवीं पुजाद्रव्यें आणिलीं : ताट भरूनि गोसावीयांसि पुजा करूं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें यांचें कीं : हें यांचां हातीं देया : मां हे एथ पुजा करिती : मां एथौनि एथ स्वीकरिजैल :" "हो कां जी :" म्हणौनि तेहीं भांडारेकारांचां हातीं दीधलीं : मग तीएं देति भांडारेकारांचां हातीं : आणि म्हणति : "हा पदार्थू अमुकीए अवएवीं वोळगवा : हा अमुकीए अवेवीं ओळगवा :" मग भांडारेकार ते ते पदार्थ तीए तीए अवेवीं ओळगविती : ऐसी भांडारेकारीं गोसावीयांसि बरवी पुजा केली : मग तेयांलागौनि ताटभरूनि पुजाद्रव्यें आणिलीं : तेहीं म्हणीतलें : "हें काइ कराल ?" धानाइबाइया म्हणीतलें : "हे तुम्हांसि पुजा करूनि :" भांडारेकारीं म्हणीतलें : "हें तवं आमचां हातीं देया : मां आपुलीं होतीं[१०] गोसावीयांसि पुजा करूनि :" "हो कां :" म्हणौनि तेहीं तेयांहातीं दीधलीं : मां भांडारेकारीं गोसावीयांसि पुजा केली : ऐसीया दोन्हीं पुजा गोसावीयांचां ठाइं केलीया : मां भांडारेकारां थोरू परीतोखू जाला : मां आवघे अळंकार गोसावींचि फेडवीले : तेयांसि माघुतें धानाइबाइसि देओं आदरिलें : तीहीं नीराकारिलें : "हें काइ जी : इस्वरीं वाइलें तें मागौतें कैसें घेइजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं वाइलें यांसि : एथौनि एथ स्वीकरिलें : आतां एथौनि तुम्हांसि देइजत असिजे :" "ना जी : हें चंडीस[११] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जेया रायाचां

---

५ **पंहभगोमु.** धानुबाइ. **बी.** धानाइ. ६ **अह.** पंचकौळीची. ७ **बी(ही)** °गोसावीयांपासौनि स्थीति होय तैसीचि भांडारेकारापासौनि स्तीति जाली:° ८ **बी.** °दांडी डोळीकार पाठवुनि. ९ **पंगो.** उंचवडी आणीक पुजाद्रव्यें—. १० **ह.** जोडी. ११ **मु. (शो.)** चंडीस्व.

भांडारीं असे तेयांचें भांडार थोर होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचें होतें घेया :" म्हणौनि दीधलें : मग तेहीं घेतलें[१२] : तेणें नीर्वाणेचेया देउळा चुना पीटिला : पौळि केली : तीएं अस्तीकें : उदेसिलें द्रव्य भांडारीं न घलीतीचि : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : भांडारेकारांचेया खांदावरि श्रीकरू घालुनि सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : एथौनि तुमचें करणीए चरीतार्थ हो[१३] :"

## ४९ नांदीएडीं भावतीर्थी अवस्थान

मग गोसावीं तेथौनि नांदीएडासि बीजें केलें : नांदीएडीं भावतीर्थीं उतराअभीमुख नरसींहाचें देउळ : उतरदखीण दोनि ओटे : तेथ गोसावीयांसि रीगतां डावेया हाताकडे ओटा : तेया ओटेयावरि गोसावीयांसि आसन[१] : उजवीएकडे ओटा : तेथ भांडारेकार असति : भांडारेकार भीक्षेसि जाति : भीक्षा करूनि एति : गोसावीयांसि आरोगण देति :।।

## ५० पटिसाळनीमीत्यें भांडारेकारां सीक्षापण

एकु दीस भांडारेकार भीक्षेसि गेले होते[१] : तवं पटिसाळेसि लेंकरूवें[२] पढतें होतीं : तवं पटिसाळ पडत देखिली : भांडारेकारीं म्हणीतलें : "आरे आरे बटिकरें हो : उठा उठा : बाहीरि नीगा : पटिसाळ पडतीए :" ते अवघे उठिले : बाहीरि नीगाले : पैन्हां उभे राहिले : आणि तैसीचि पटिसाळ रीचवली[३] : आणि तेयांसि आस्चर्य जालें : ते आपुलालेया घरा गेले : तीहीं आपुलालीए घरीं सांघीतलें : "आजि आमतें एहीं माहात्मा[४] राखिलें : एन्हवीं आम्हांवरि पटिसाळ पडिती : सांघीतली : बाहीरि नीगालों : आणि पटिसाळ पडली :" मां घरोघरीं पाटपीढीं बैसों घालीति : पाए धूति : टीळे गंधाक्षेता करीति : माळा : तांबोळें : सोपस्कर भीक्षा घालीति : ऐसी बरवी भीक्षा घेउनि भांडारेकार आले : गोसावीयांसि नरसीहांचां चौकीं आसन : गोसावीं तेयांतें देखौनि श्रीमुगुटाचेनि[५] अनुकारें पुसिलें : तेहीं अवघा वृतांतु सांघीतला : "जी जी : मीं भीक्षेसि गेलां : तवं चाटे पटिसाळे पढत होते : मीयां म्हणीतलें : 'आरे : उठा उठा : पटिसाळ रीचवली[६] :' ऐसे आवघे बाहीरि उभे ठाकले : तवं पटिसाळ रीचवली : तेहीं

---

१२ **एवा.** भांडारीं घातलें. १३ **एवा.** एथ भांडारेकारांसि थोरू परीतोखू जाला. **हबी.** °हें चरीत्र गोसावीं बेलोपुरीं सांघीतलें : म्हाइंभटां करणीए प्रसंगीं. **मु.** हे गोष्टि गोसावीं बेलोपुरीं भटां करणीये प्रसंगें सांघितली. (उत्तरार्ध लीळा ५८४ पाहा.)

**४९.** १ **हबी.** अवस्थान. **मु.(शो.).** पहुडु होए.

**५०.** १ **रावा.** °नवी पटिसाळ वेव्हारेन एकें केली होती : तीयेसि उद्यापन नाहीं केलें : तीयेचि दीसीं देवता पटिसाळेवरि एकी उभीया : एकी खोबेंसीं झोंबती असति ऐसें भांडारेकारीं देखिलें : आणि पाहातची राहीले : तवं आंदोळावींदुळ केली : ते पडतां भांडारेकारीं देखिली : आणि म्हणीतलें : "आरे आरे : उठा... २ **अ.** चाटे—. **भ.** चाटे वैसले होते. **बी.** चाटेयाचीं°. ३ **एवा.** पडली. ४ **एवा.** गोसावीं. ५ **एवा.** श्रीनेत्राचिया खुणा. **गो.** भृभंगीं पुसिलें. ६ **पं.** रीचवैल.

घरोघरीं सांघीतलें : "एहीं आमतें राखिलें : जी जी : तीए मज पाटपीढीं बैसावेया घालीति : बरवी सोपस्कर भीक्षा सुति : टिळे गंधाक्षेता :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : ऐसेही केलेयां लोकु न भजे ? ऐसें न कीजे कीं : तुम्हां ऐसेंचि होइल : परि हें नव्हे :" तेव्हळि भांडारेकारीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : आजिलागौनि ऐसें मीं न करीं : मज हें न व्हावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न करां तरि नव्हे :" ।।

## ५१ भांडारेकारां देहअवसान

[1]भांडारेकारांसि बाहीरितीएचा[2] उपद्रो : ते बाहीरि जाति तरि गोसावी श्रीकरू देति : ते गोसावीयांचा श्रीकरू धरीति : मग गोसावी तेयांतें बाहीरि नेति : बाहीरूनि भीतरि आणीति : ऐसें तेयांचेया एरझारांचें दूख देखौनि मग गोसावी तेयांची सुस्रुका करीति : आपुलेनि श्रीकरें तेयांचीं वस्त्रें धूति : मागुतीं पांगुरवीति : बाहीरिती फेडिती : ऐसी तेयांची सुस्रुका करीति : गंधि सुटली : ते बडुवे आणि ब्राम्हण : नावेक ऐसी खंति करीति : आणि संन्यासी : तेथ जपत होते : ते खंति करीति : गोसावीं भांडारेकारातें खांदेसीं लाउनि गंगेपैलाडिलां नंदेस्वरां नेलें[3] : तेथ त्रीरात्रि अवस्थान जालें :

भांडारेकारां देहअवसानसमो मांडला : मग गोसावीं उसेया मांडी दीधली[4] : गोसावीं म्हणीतलें : "भटो[5] काळवंचना कां करा ना ?" "ना जी : मज हें सन्यधान : ऐसी उसीसें मांडी कैंची जी? होआवें काहीं तें आतांचि होआवें जी :" श्रीमुख अवळोकितां : मग देहअवसान जालें : बडुवांकरवि कुदळीपाउडें आणवीलें : खांच खणीतली : गोसावीं रीगौनि पाहिलें : डोइएकडे गोसावीं धरीलें : पायांकडे बडुआं धरिलें : मग ऐसा नीक्षेपु केला[6] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मग बाइ : यांसि तेथ नसवेंचि :" मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५२ गोपाळांतु खेळु

गोसावी मार्गे बीजें करितातिः तवं गोपाळ राणभेरीयांचा[1] खेळु खेळत होते : गोसावीं तेथ बीजें केलें : "हां गा गोपाळ हो : हें तुम्हांआंतु खेळों एओं ?" तीहीं म्हणीतलें : "या[2]

---

**५१.** १ **प्रवा.** भांडारेकारां सोळा वरीखें सन्यधान : भांडारेकारां असकति रूजा उपजली : बडुवें पथ्य आणीति : **एवा.** गोसावीचि आणीति : तेथचि देहावसान : तीएचि पाणिवठां जळप्रव्हावो : ।। २ **ही.** मळप्रवृतीचा उपद्रो जाला : देह थोर तुटलें. ३ **प्रवा.** °बडुइं भांडारेकार पाठकुळीए वाउनि दुसरेया नरसींह मढासि नेलें. ४ **एवा.** तेहींचि मागीतली. **ही.** भांडारेकारीं म्हणीतलें : "जी जी : मज उसीसां मांडी देयावी :" दिधली : आणि ते गोसावीयांचें श्रीमुख अवळोकीत होते°. ५ **एवा.** : "भटो काळवंचना एकि असे ते अंगिकराल ? मां द्वापरीचा आउक्ष देइजैल :" तेहीं म्हणीतलें : "जी : हें सन्निधान आणि हे मांडी उसीसया येइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अन्यत्र होइल : परी हें नव्हे :" "तरी पुरे जी : होआवें काहीं. . . . ६ **एवा.** जळप्रव्हाओ केला.

**५२.** १ **प्रवा.** पेणे(णु)वळघीयाचा. **अउबी.** वळघीयांचा. २ **एवा.** हो—. **बी.** येइजो जी.

कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें राणे होइल : तुम्ही भेरी होआ : " " जी जी : " गोसावीं तेयांतु खेळों आदरिलें : तवं[3] गोसावीयांचेया गडेयावरि पेणा आला : हें जाउनि तेयांचीये पाठीवरि बैसलें : आणि तेयांसि स्तीति जाली : पेणा[4] उतरला : परि तो पाठीवरौनि नुतरी : एरें म्हणीतलें : " हा रे : पेणा उतरला तरि तुं कां पाठीवरौनि नुतरसि ? " " आरे : माझीये पाठीं देओ बैसला : कीं मज सुख आनंदु होतु असे : " तवं एकें म्हणीतलें : "आगा देवा : माझीये पाठीवरि बैस कां : " आणि हें तेयाचीये पाठीवरि बैसलें : तेयासि सुखचि जालें : मां आणीकें म्हणीतलें : " माझीये पाठीवरि बैस कां : " म्हणौनि हाचि खेळु प्रवर्तला : ऐसें आघवीयांचीए पाठीवरि आरोहण केलें : आवघयांसि सुख आनंदु दीधला : मग गोसावीं बीजें करूं आदरिलें : गोपाळीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं आरोगण करावी : मग गोसावीं बीजें करावें : " मग आवघां मोटा सोडिलीया : गोपाळीं काला केला : " एइं गा देवा : जेउं : " आपुलालीये मोटेचा बरवा बरवा पदार्थु नीवडीला : मग गोसावीयांसि वोळगविला : गोसावीयांसि आरोगण जाली : अवघें गोसावीयांचीये पांती जेविले : मग[5] हें तेथौनि नीगालें :॥

मग ते एकमेकांप्रति सुखानंदु म्हणौनि अनुमोदों[6] लागले : एरू म्हणे : " आगा : माझीए पाठीवरि देवो बैसला : मां मज सुखानंदु काइ होए गा : " तवं मार्गें सन्यासी एक जात होते : तेहीं आइकिलें : मग तेहीं म्हणीतलें : " काइ पां आनंदु सुख ? तें हे केवि जाणति ? एं गोवळरूएं[7] : गोरूवें राखति : अनंदु[8] हे ब्रम्हवाचा : हा सबदु वीद्वांसाचा : हा सबदु हे गोवळें केवि जाणति ? " मग तेयांतें ते पुसति : " हा गा : गोवळे हो : सुखानंदु काइसा गा ? " तेहीं म्हणीतलें : "आगा : आम्हांआंतु देवो एकु आला : आमसीं खेळीनला : आमचीए पाठीवरि बैसला : तो जेयाचीये पाठीवरि बैसे तेया सुखानंदु होए : आम्हांआंतु जेविला : आम्हां सुखानंदु दीधला : मग गेला : " तेहीं पुसिलें : " तो देवो कवणीकडे गेला ? " "ना एणेंचि मार्गें जाताति : " तैसेचि ते तेणें मार्गें नीगाले : तवं एका वृक्षाखालि हें आसनीं बैसलें होतें : तीहीं एउनि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : आणि तेयां स्तीति जाली : सर्वज्ञें म्हणीतलें : " ते अद्यापि द्रावडदेसीं आचारीए[9] होउनि वर्तत असति : "॥

---

३ हीसा. खेळतां जयावरि डाइ ये तयाचीये पाठीवरि आरोहण करीति : तो सिमा पुरे परि तो पाठीवरूनि उतरी ना. ४ अ. पेन्हं. ह. पेणु. ५ बी.(ही.). मग उसीरू जाला : जया गावां बीजें करित होते तया न वचतीचि : आणीक आडगाउं होता तेथ बीजें केलें : ६ भ. अनुवादों. ७ अ. गोपाळरूएं. ८ गो. अनंदौ ब्राम्हणौ वाचू. ९ एवा. इस्वरत्वें वर्तत असति :

## ५३ गोपाळ चोंढीए लपवणें

एकी गावीं वीहीरि[१] एकीचिये रवणीवरि गोसावीयांसि आसन असे: तवं तेथ गोपाळ गाइ पाणीयांसि घेउनि आले : जो[२] ए तो घोंगडें[३] ठेवी : मोट ठेवी : डांग ठेवी : मोहरि ठेवी: पावा ठेवी: आणि वीहीरीआंतु[४] पव्हावेया रीगे : *तो अदृश्य होये : आणीक ये तोही अदृश्य होये*[५] : ऐसे अवघेचि वीहीरीआंतु पव्हावेया रीगाले : *ऐसे आवघे अदृश्य जाले*[५] : गाइ पाणी पीयालीया : गोठणीं बैसलीया : गोठणौनि राना गेलीया : रानौनि गावांतु आलीया : आपुलालेया घरा गेलीया : तवं गोपाळ गाइंसवें नाहीं : एकीं म्हणीतलें : "हा गा : गाइ आलीया : गोवळें नैएतीचि ?" मग एरू एरातें पुसे : "हा गा : तुमचा गोवळु आला ?" "ना : नाहीं आला :" "तरि चाला ना : गोवळांचीए सुधी जाओं :"

मग ते अवघेचि गोवळांचीए सुधी नीगाले : रानवरि हींडीले : परि गोवळे ते नेदखतीचि : आले : तवं वीहीरीचीये कांठीं डांगा : कांबळें : मोटा : मोहरी : पावे : वाहाणा देखौनि म्हणीतलें : "हो जी : एथ गोवळे होते कीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "होते मा :" "कें असति जी ?" गोसावीं ऐसें श्रीकरें वीहीरीकडे दाखविलें : मग तेहीं म्हणीतलें : "जी जी : तरि काइ देखिजति ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जें जेयाचें नावं तें घेउनि बोलावा : मां तो नीगैल :" मां जेयाचा जो गोपाळु : तो तेयाचें नावं घे[६] : 'सांयां :' 'मांयां :' 'कांयां :' *ऐसें म्हणति : आणि तो उदकाआंतौनि निगे*[५] : जो नीगे तो डांग घे : कांबळि घे : मोट घे : मोहरि पावा घे : वाहाणा घे : आणि धाव घे : ऐसे अवघेचि नीगाले : जो नीगे तेयांतें पुसति : "हां रे : तुं कोठें होतासि ?" तो म्हणे : "मीं या गोसावीयांपासि होतां :" ते म्हणति : "गोसावी तरि एथ बाहीरि असति :" ते म्हणति : "ना मां : गोसावी आम्हांपासि होते :" ऐसें अवघेयांतें पुसिलें :॥

मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : ते कवणी ठाइं होते ?" सर्वज्ञें म्हणीतलें :" ते देवते एकीचीये अवगळां होते[७] :"॥

## ५४ गोवारीयां ज्वरनीवृति

एकी गावीं[१] गोसावीयांसि देउळीं अवस्थान : गोवारी गोवारें राखावेया रानासि जाये: गोसावी वीहरणासि जाति : वीळचां गोसावी वीहरणुनि येति : तो गोवारें राखौनि ये :

---

**५३.** १ **अहबीपं.** एक म्हणति सोंडीयाची (**पं.** चोंढीयाची) वीहीरि : एक म्हणति रवणीयांची वीहीरि°. २ **पं.** तवं तेथ वीहीरीचीए थडीए कांबळें : पागोटीं : वाहाणा : डांगा : मोहरी : पावे : जाळिया ठेविलीया : ३ **एवा.** कांबळें. ४ **भंगो.** चोंढीएआंतु उडीया घालीति : ५ **(बी.)** ६ **ह.** 'सांयां' आणि तो नीगे : 'म्हांया' : आणि तो नीगे : 'कांयां' : आणि तो नीगे : **मु.** 'सांगया' म्हणति : आणि तो उदकांतुनि नीगे : आपुलें घे : मग जाए. ७ **मु.** धरिले होते. **एवा.** लपविले होते.

**५४.** १ **मु.** °म्हांतारी एकीचा पुत्र गोरूवें राखे : तेणेंसीं गोसावीयां पाडु प्रज्ञा आति. . . ऐसां

एतां जातां[२] तो गोसावीयांचेया दरीसनासि ए : दंडवत करी : श्रीचरणां लागे : कव्हणी वेळे यातें पाणीपात्रासि घेउनि जाए : कव्हणी एकी वेळे आरोगणे वीनवीलें : गोसावीयांपासि वीहरणीहुनि एउनि बैसे : ऐसी तेयासि सलगि पडली होती : ऐसां तेयांसि एकु दीं ज्वरू आला : तेयाची माता धावांधावि करूं लागलीं : तवं तेणें म्हणीतलें : "आओ : तुं ऐसें काइ करीतसि[३] ?" "तुज धावांधावि करीत असें रे बा :" तवं तेणें म्हणीतलें : "आओ : पैल जे गोसावी आहाति ते बोलावि : आणि मज सुख होइल :" मग तेयाची म्हातारी गोसावीयांपासि सांघावेया आलीं : "काइ करीन गा देवा :" ऐसें दुख करीत आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें देउळीं बैसलें होतें : एउनि यांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं :" मग म्हणीतलें : "जी जी : तुमचा सांगाती : मैत्रु : तेयासि ज्वरू आला कीं : आजीचि गोरूवें सुनीं गेलीं जी : गोवारें राखतें कोण्ही नाहीं : मागिला मासवडेयाचें आलें नाहीं जी : आणि पुढीलु मासवडा भरला जी : उदीयां ते आणीकु गोवारी उभा[४] करिती : ऐसा तोंडा आला घांसु काढला जी : आम्हीं दुबळीं : काइ खाउनि जी ? लेंकुरवाळी आतां काइ करूं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "मग हें तेथ गेलें : तेयांची पासवडी पांगरौनि तेयांचीये पाठिसीं जाउनि नीजैलें : एतुलेनि तेयांचा जरू गेला : तो एथ घेतला : तो न्हाला : जेविला : गोरूवांसांगातें गेला : मां एथ तीनि[५] दी जरू स्वीकरिला : तेयाचें पथ्यपाणी स्वीकरिलें[६] : मग जरू गेला : तीसरा दीं नीगों आदरिलें : तीएं यासि जावों नेदीति : मां हें तयांसीं भांडौनि नीगालें :" ॥

हे गोष्टि गोसावीं भूतानंदाप्रति सांघीतली : तेहीं आपुलीए नातिचा जरू घेतला : तीएतें खेळौं पाठवीलें[७] : ॥

## ५५ खीरारीयां नेत्रपतन

एकु गाओ कान्हरदेयाचा : एकु तेयाचेया साहाणीयांचा : तीए गावीं गोसावीयांसि अवस्थान : कान्हरदेयाचां[१] खीरारीं साहाणेयांचीए[२] गाविचेया साळिवनाआंतु *दाटुनि*[३] म्हैसीं सुदलीया[४] : तो अवघा गाउं धावणेयां नीगाला : तेयांसवें फुटेयाची तळसुती करूनि गोसावीहीं बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जैसें हें तेयांचें आठावेठीचें पाइक : तैसें हें तेया पुढेंपुढें धावें[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें सीष्टाइ करूं रीगालें :

---

तयासि ज्वरू आला :° २ **पंहबी.** °गोसावीयासि सांघातु जाला : मग तो—. ३ **अ.** करितसि. **भ.** करीतीसि. **पंह.** करीतेसि. ४ **हबी.** राहाविती जी : **पंगो.** राहाउं पाहातााति : ५ **प्रवा.** क्षेणु एकु जरू स्वीकरिला. ६ **एवा.** पथ्यासि तेयाचा घाटा स्वीकरिला : ७ **अ.** आदरिलें (उत्तरार्ध लीळा १९७ पाहा).

५५. १ **पंगो.** माहादेवोरायाचां. २ **गो.** भावकदेया हातिसाहणियांचा गाउ°. ३ (**पंगो.**). ४ °**एवा.** खीरारीयां आणिक गोवारीयां भांडण जालें : बहुता माहाजनांपासि गोवारी : आणिक कान्हरदेयाचा खीरारी : तो खीरारीएं गोवारी मारिला : जेयाचीएकडीलु तेयाही नावरे : एरांही नावरे : तो अवघा गाउ—. **मु.** खीरारीयां खीरारीयां भांडण जालें—. ५ **एवा.** °अवघेयांपुढें

कान्हरदेयाचे खीरारी सीष्टाइ न मनीति : तेयांआंतु एकु पुढां वाढीनला : तेणें म्हणीतलें : 'जा : आपुलेया समर्थासि सांघा :' ऐसां तेयाचा अधीकाओ देखौनि तो एथौनि चडकणा हाणीतला : थापेसरिसा डोळा[६] खालि पडिला :" सर्वज्ञें म्हणीतलें :"एथौनि डोळा[६] श्रीकरीं घेतला : आणि मागौता लाविला : श्रीमुखीं तांबोळ होतें तेयाची पींडि डोळां बांधली : इतुलेनि मागौता डोळा जैसा होता तैसा नीका जाला : तो म्हणे : 'गोसावीं हाणीतलें नाहीं : गोसावीं माझा डोळा दीधला :' मग सीष्टाइ मानिली : ते आपुलेया गावां गेले : मग तेथौनि बीजें केलें :" ।।

## ५६ कळावी बीरणें[१]: देवी वीकारज्ञान

नाथोबा घोगरगावां भीक्षेसि जाति : तेयाउपरी गोसावीं हे गोष्टि सांघीतली[२]: सर्वज्ञें म्हणीतलें : "आति : यातेंहीं देखौनि प्राणीयांसि वीखो भोगुं आवडे :"

गोसावीयांसि कटिप्रदेसीं एकु सुडा : श्रीमुगुटीं एकु सुडा : गोसावीं ठाकुरा एकाचेया आवारासि पाणीपात्रासि बीजें केलें : तवं तेयां ठाकुराची राणी न्हाली होती : न्हाउनि चौरंगावरि[३] बैसौनि केस वाळवीत होती : तीएजवळि बटीकि होती : तीया गोसावीयांतें देखिलें : आणि तीया बटिकीतें[४] म्हणीतलें : "पुस गे : या देवासि काइ देवी असे कीं नसे? देवीवीण देवासि गमे[५] केवि?" ऐसें म्हणौनि याकडे पाहे : तेवीचि हातिची कळावी बीरी[६] : गोसावीं श्रीकरीचेनि[७] आंगुठेयाचेनि नखेंकरुनि दाविलें : ऐसें वेळा एकि दोनि : मग तेया परिचारका गोसावीयांतें पुसिलें : "हो देव हो : तुम्हांसि देवि असे कीं नसे?" गोसावीं श्रीमुगुटें नीराकारिलें : मग तेथौनि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "यातेंहीं देखौनि प्राणीयांसि वीखो भोगुं आवडे :"।। *

## ५७ चोरू सांगाती सोडवणें

हे पुर्वी एळापुरीं देमाइसांप्रति : सारंगपंडितांउपरि सांघीतली[१] :

एकी गावीं गोसावीयांसि देउळीं आसन असे : तीए गावीं *घोडेयाकारणें वळघा जाला होता*[२] : अधीकारीयाची घोडी चोरीं नेलीं होती : तो एकु चोरू खोडां

---

हें तुटत (**एवा.** तुटले. **एवा.** वाढत) जाए : जैसा बाहयीचा पाइकु वीसुरा करूनि जाए. ६ **एवा.** नेत्र.

**५६.** १ **एवा.** बीरवणें. २ (उत्तरार्ध लीळा १०९ पाहा.) ३ **एवा.** मांचळीएवरि. ४ **अ.** परिचारकेतें. ५ **एवा.** असवे. ६ **पंबीभ.** बीरवी. ७ **अह.** श्रीचरणीचेया.

*या लीळेनंतर **अआभगोहपं** प्रतीत 'मृत्यपतीभार्ये विकारज्ञान' ही लीळा आहे. **मुबी** प्रतीत ती नाही; आणि तेच बरोबर आहे. या लीळेचा स्वामींच्या 'एकांक' चरित्राशी प्रत्यक्ष असा काहीही संबंध नाही. म्हणून मी ती गाळली आहे.

**५७.** १ (पूर्वार्ध लीळा १९१ पाहा.) २ (**पंगो.**). **एवा.** °वेन्हारेया एकाचां घरीं खाण पडिलें : चोरू रीगाला : तो धरिला : तो वेसिदारीं खोडां घातला होता—. **प्रवा.** गोसावी दीस मावळतां

घातला होता : तराळ भवनीएसि आले : तवं गोसावीयांसि खांडदेउळीएसि आसन असे : गोसावीयांतें देखिलें : "हा कोणु गा ?" गोसावीयांसि मौनाची प्रवृति : गोसावी उगेचि होते : तिहीं म्हणीतलें : "आरे : धरा धरा : हा तेयातें काढुं आला :" गोसावीयांतें धरिलें : गोसावीयांतें म्हणीतलें : "चाल गा :" गोसावीयांतें माणिकेयापासि आणिलें : "घालि घालि गा पाओ :" गोसावीं माणिकां श्रीचरणु घातला : गांविचे[3] खीळि आफळुं[4] बैसले : तवं हातु वरिचां वरि खीळिला राहिला : तो म्हणे : "आगा मज खीळि नाफळवे :" तवं एरू घे : ऐसें कवणाचेनही नाफळवे : मग अधीकार्यापुढें सांघों गेले : "तेया चोरातें आणीकु चोरू काढावेया आला : तो आम्हीं धरिला : तो आम्हीं खोडां घातला : खीळि आफळुं जातों तवं वरुतेंचि हात जाताती : परि खालुतें नैएति :" ऐसी अवघी वेवस्था सांघीतली : मग तो घोडेयावरि बैसोनि कळदीवीयांसीं[5] आला : तवं गोसावीयांचें सौंदरीए देखौनि म्हणीतलें : "हें काइ रे पापीये चांडाळ हो : ऐसें तुम्हां करवि कवणें करविलें ? हें काइ रे : गोसावीयांतें कैसें घातलें ?" घोडेयाखालुता उतरला : दंडवत घातलें : श्रीचरणासि लागला : गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी काढिजो जी : श्रीचरणु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं सांगाती :" "जी जी : एणें थोरू अन्याओ केला असे :" गोसावीं म्हणीतलें : "तरि न कढीं :" "खांडा[6] गा याची खीळी :" म्हणौनि वाढै बोलाउनि तेयाची खीळी खांडवीली[7] : मग गोसावीं श्रीचरणु काढिला : मग आवारा नेयावेया वीनवीलें : "जी जी : माझेया आवाराभीतरि चालिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं सांगाती :" *"जी : हा चोरू कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमचा चोरू : परि येथिचा सांघाती[8] :"* "चाला गा :" तो पुढां : गोसावी मागां : ऐसें गोसावीं भीतरि तेयाचेया आवारासि बीजें केलें : गोसावीयांसि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : सांगाती बैसवीला : गोसावियांचे श्रीचरण प्रक्षाळिले : तेयांचेहीं पाए धुतले : मग गोसावीयांसि पडदणी देओं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "आधी सांगाती :" मग तेयांसि दीधली : तेयांचें आंग उटिलें : मग गोसावीयांसि मर्दना जाली : पाणी सारिलें : "चालिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं सांगाती :" तेयां न्हाण जालें : मग गोसावीयांसि मादणें जालें : ताट केलें : "चालिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं सांगाती :" मग तेयांसिही वाढिलें : तेयांसि पांती जेवण जालें : वीडा आणिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं सांगाती :" गोसावीयांसि वीडा जाला : तेयांसि तांबोळ जालें :

---

गावांतु बीजें करिताति : गोसावीयांतें वेसिद्वारीं धरिलें : ३ **पं.** खीळी आदळावेया मोगरी घेतली : उचलिली : तवं°. ४ **गो.** आदळुं. ५ **अ.** कळि°. **एवा.** बंबाळदीवीयांसी. ६ **अ.** काहाडा. ७ **अ.** काहाडवीली. ८ (**हबी.**).

गोसावीयांलागि बाजसुपवती घातली : तेयालागि बाजुलें घातलें : गोसावीं पहुडु स्वीकरिला : तो नीजैला : ।।

मग मध्याने एकी रात्रीं तेणें चोरें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मीयां थोरू अन्यावो केला असे जी : गोसावी बीजें करिती आणि हे मातें मारिती : राखति ना : जी जी : तरि मीं जाओं[९] ?" गोसावीं तेयांसि अनोज्ञा दीधली : "जी जी : कवाडें घातलीं असति : तरि मीं कैसा जाओं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाठीसीं घडी[१०] बांधा : आणि[११] या वाटा नीगा : उतरा :" ऐसा गोसावीं उपाओ सांघीतला : मग तो गेला : मग तेहीं उदीयांचि पुसिलें : "जी जी : तो सांगाती कें ?" गोसावीं म्हणीतलें : "तो तेधवांचि गेला :" मां ते गोसावियांतें हासों लागलीं : "गोसावीं आपुला सांगाती पळविला :" मग गोसावीं आपुलीं वस्त्रें वेढिलीं : तेयाचीं ठेविलीं : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५८ अरणीं महीखरोखहरण

गोसावी मार्गें बीजें करिती : म्हैसा एकु अरणीं होता : तेया वाटा कोण्हाहीं जावों नैये : गोसावीयांतें लोकें वारिलें : "*देव हो : या वाटा न वचा : एथ अरण्यमहीखा असे : तो माणुसातें मारी*[१] :" परि गोसावीं नाइकतिया भासा बीजें केलें[२] : तवं पुढां म्हैसा रोखेंसीं आला[३] : दृष्टी अवळोकिला आणि रोखू होता तो गेला : आणि भूइं उंघतु उंघतु गेला : तेयांची कुमति हरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तेया वाटां आलें म्हणौनि तैलागौनि ते वाट वसती जाली : एऱ्हवीं उदास होती :" ।।

## ५९ वेठी जाणें

मोलकरीएं[१] देउळीं नीजैलीं[२] होतीं : गोसावी नासीसि पहुडले होते : तीएं उदीयांचि अवघीं वेठीसि चालवीलीं : तवं गोसावीयांसि देखिलें "आरे : आरे : एथ

---

९ **एवा.** पळों. १० **अ.** घेडी. **गो.** पासवडी. ११ **हबी.** °मागिले वाही दुर्ग उतरा. **गो.** °दुर्ग उतरा.

**५८.** १ (**मु.**). २ **एवा.** °मार्गीं कव्हणें एकें भेडवीलें : तेहीं गोसावीयांतें म्हणीतलें : "आहो माहात्मे हो : या वाटा नको जावो :" गोसावीं मागील वास पाहिली : आइकिलें : म्हणौनि नीगाले : **मुबी.** °मार्गीं चालतां वाणि पडिली : आणि म्हैसा आला—. ३ **अह.** °गोसावीं पळसु एकु आड करूनि म्हैसा ऐसा श्रीकरें (**आ.** धरुनि सींगीं) लोटला.

**५९.** १ **प्रवा.** गावीं एकी वृक्षा एकाखालि गोसावीयांसि आसन होतें : तवं गांविचा लोकु ठाकुराचां जनीं वेठी धरिला. **हे प्रवा** ।। **मु.** गोसावीं गावीं एकी पडवीए पहुडु स्वीकरिला : तेथचि काबाडी राहिली होती. २ **अ.** बैसलीं.

एकु लपाला असे :" गोसावीयांतेंहीं चालवीलें : तेहीं[३] आवघे मोलकै पांथैसि लाविले : चणेयाचीए पांथेसि : गोसावीयांसिही बैसवीलें : एराचीया पांथा चालति : गोसावीयांची पांथ राहिली : गोसावीं[४] कोरडा ऐसा टाहाळु पुढां ठेवीला : तवं एकु मुदलापासि सांघावेया गेला : तेयापुढां सांघीतलें : "अवघेयां मोलकैयाचीया पांथा चालताति : एका मोलकैयाची पांथ न चले :" मग मुदलु ठाकुरू सेतासि आला : गोसावीयांतें देखिलें : मग गोसावीयांपासि आला : "आरे आरे पापीए हो : हें कोणें रे पापीएं केलें ? ऐसें काइ केलें ? गोसावीयांतें कैसें आणिलें ?" घोडेयाखालुती उडी घातली : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : गोसावीयांतें वीनवीलें : रूंखा एका तळिं घेउनि आला : श्रीचरण प्रक्षाळण केलें : सेतीचें खाजें आणिलें : तें गोसावीयांसि ओळगविलें : मग तेयासि जेवण आलें : तेथ गोसावीयांसि आरोगण दीधली : मग गोसावीं बीजें केलें : ॥

## ६० द्विजगोरक्षण

एकी गावीं गोसावीयांसि अवस्थान जालें : गोसावीं पाणीपात्रासि ब्राम्हणा एकाचेया घरासि बीजें केलें : ब्राम्हणें म्हणीतलें : " मोटेधाटे : आडवेरूंद : उभेदीघ : भीक्षा[१] कां मागत असा ? कोण्हाचीया गाइ कां राखा ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें राखैल : परि याकरवि कव्हणी राखे ना :" तेहीं म्हणीतलें : "ना आम्हीं आपुलीया राखौनि[२] : मोटे दहींभातु सुनि : व्याळीए दुधभात घालुनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें[३] राखैल : परि दोहे ना : सोडील परि बांधे ना :" तेहीं म्हणीतलें : "आम्हींचि सोडुनि आणि आम्हींच दोहोनि :" गोसावीं मानिलें : मग तेहीं म्हणीतलें : "हो कां : तरि या ओटेयावरि राहा : आमचा गोवळु गेला : तेयाचां ठाइं तुम्हीं राहा :" मग तेयाची जाडि : वाहाणा : डांग : पागोटें : ऐसें गोसावीयांसि दीधलें : रात्रीं गोसावीयांसि दुधाभाताची आरोगण दीधली : इतुलेनि गोसावीं तेयांचीए दारीं ओटेयावरि पहुडु स्वीकरिला : उदैक गोसावीयांसि दहींभाताची मोट सुदली : गोसावीं गाइ सोडिलीया : गाइ रानासि नीगालीया : पुढां गोसावी : मागां गाइ : गोसावीयांसरिसा तोही अनुवर्जीत नीगाला : मग तो म्हणे : "कोण्हाचीए सेतीं रीगों नेदावीया : कोण्हाचीए मेरे चारावीया ना : बरवीया रानावरि घालावीया : वेळे उदकासि मेळवावीया : बरवी साउली मेळवावी :" मग तो राहिला :

---

३ **मु.** °अवघीं पांथा चीरलीया : एकि पांथ गोसावींहीं स्वीकरीली. ४ **मु.** °गव्हाचिया काडिया दोनि एकि घेउनि नीश्चळ बैसले असति :

**६०.** १ **मु.** (**ही. रावा.**) °पाणीपात्र करीत असा : ते एकाधीए एकाचीया गाइ कां राखा ना ? **गो.** भीख°. २ **पं.** राखउनि. **बी.** राखउं. ३ **गो.** हें राखों जाणे परि बांधों नेणें. . .हें सोडुं

गोसावी गाइ राना घेउनि गेले : रान पावले : आणि गोसावीयांसि खडका[४] येकावरि आसन जालें : भवंतीया गाइ श्रीमुर्ति अवळोकीति : आनंदु रोहंतीति बैसलीया असति : त्राहाटीति डोळे : त्राहाटीति पुस : ऐसीया बगटावरि बगट वाउनि श्रीमुर्ति अवळोकुं लागलीया : मग वीळिचांचीए अवसरीं गोसावी पुढां : मागां गाइ : मग गोसावीं वाडां गाइ घातलीया : मग गोसावीयांसि ओटेयावरि आसन जालें : तेहीं गाइ दोहिलीया : सवाया दुध दोहिलें : दहीं : लोणी : तुप बहूत हों लागलें : ऐसां थोर दूभों लागलीया : दोहतां दोहों हातां कांडार एति : मग गोसावीयांसि दुधभाताची आरोगण दिधली : मग तीएं आपुली ओरिसारि करूनि नीजैली : मग आंथूरणीं गोष्टी करूं लागलीया : 'आजि दुणा दुध जालें :' एकमेकां वीस्मो करूं लागलीं : जें 'आम्हांसि गोवळु नीका जोडला :' ऐसा गोसावी तेथ नीच बीजें करीति : आणि गाइ भवंतीया आनंदु रोवंतीति बैसति : ऐसा तीनि दी अनुवर्जीत जाए : गांविचे गोवळ तेयांपुढां सांघति : "ऐसा कवणु गा राहाविला असे ? त्रुण नाहीं : उदक नाहीं : नां साउली नाहीं : एका खडकावरि घालिते :" ऐसें दोनि दीसपरीएंत सांघीतलें : मग तेणें म्हणीतलें : " काइ पां : दुध तरि दुणा नीगताए : हें ऐसें काइ सांघताति ? *हे गोसावी असति आणि जाती : तारि कव्हणी ठाइं कव्हणा राना चारावेया नेत असति तें पाहों*[५] :" म्हणौनि तो तीसरां दीसीं पाहावेया राहिला : वृक्षा एकावरि : तवं जैसें गोपाळीं सांघीतलें तैसेंचि देखिलें : गोसावी आसनीं बैसले असति : भवंतीया गाइ आनंदु रोवंतितीति बैसलीया असति : "ऐये रे : सामान्य पुरूख नव्हति : साक्षात श्रीकृष्णु मां[६] :" मग एउनि ब्राम्हणीतें म्हणीतलें : "पैलु आमचीया गाइ राखे तो साक्षात श्रीकृष्णु : गोसावी एती : मां एकु पाओ तुं धरि : एकु पाओ मीं धरीन : मां गोसावीयांतें पुसों : 'तुम्हीं काइ ?' गोसावीं रानौनि बीजें केलें : वीळिचां गाइ वाडेयाआंतु घातलीया : आणि बाहीरवाहिरें बीजें केलें : ।।

## ६१ लोणारीं कुंडीं राजेयां दरीसन

गोसावियांसि लोणारीं कुंडीं बहीरवीं अवस्थान : रावो सोमवारीयेकारणे कुंडासि आला : सरिसा कोरवळीतें माहादेवो होता[१] : तेथिचेया[२] बडुवेयांतें पुसिलें : "एथ कव्हणि सीधसाधक असति ?" तवं कमळजैएचेनि बडुवेनि म्हणीतलें : "बहीरवासि एक पुरूख आले असति : काइ सांघों तेयांचें सौंदर्ये : काइ सांघों तयांचें चातुर्ये : काइ सांघों तयांचें

---

जाणें परि दोहों नेणें. ४ **एवा.** महुटळीएवरि. ५ **(रावा.)**. ६ °**एवा.** तेथचि वीनवीलें : "जी जी : मीयां गोसावीयांसि नीरोधु केला जी : मीं नेणेंचि : आतां गोसावीं बीजें करावें जी :" मग गोसावीं बीजें केलें.

**६१.** १ **पंगो.** माहादेओ रावो धाकुटा होए : तो सरीसा : हाति कोलू : **पं.(एवा.)** कान्हरदेवो लोणारासि आला : सरिसीं कुमरावळितें होतीं : माहादेवो : आमणदेवो तैं धाकुटे होते. २ **एवा.** रावो

इस्वर्ये : काइ सांघों तेयांचें उदार्ये :" ऐसा अनेगीं सबदीं गोसावीयांतें वीसेखुं लागला : तवं कान्हरदेयासि ऐसें जालें : ते पुरूख कवणी ठाइं भेटती[३] : तैसाचि कान्हरदेवो तारा-तीर्थासि आला : तवं गोसावीयांसि तारातीर्थि एका वडातळिं आसन असे[४] : सरीसा तो बडुवा असे : तेणें म्हणीतलें : " ते हे पुरूख : " तैसाचि कान्हरदेवो साउमा आला : हडपीयातें आसूंची वाखारि मागीतली[५] : ते पुढां ठेविलीं : दंडवत घातलें : भाटीं सासोलां म्हणीतलें : " घेया घेया : सींगणाचा कान्हु तुम्हां प्रसंन जाला : " तेव्हळि राएं म्हणीतलें : " सरा रे : यांसि रावो तैसा रंकु : सींगणाचा कान्हु तो तुम्हांसि कीं : " मग गोसावीं तेयांची[६] वास पाहिली : रायाचीही वास पाहिली : आणि भुइंची वास पाहिली : राएं म्हणीतलें : 'यांसि सोनें तैसी माती : *द्रव्यासि : पाखाणासि : मज सरीचि केली*[७] :' मग तेणें जवळि गुपैतैया राखणें घातलीं : नावेक गोसावी आसनीं उपवीष्ट होते : मग बीजें केलें : राखण होते ते आसुंची वाखारि घेउनि गेले : " राया : ते पुरूख आसुंची वाखारि नेघतीचि[८] :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तो रावो आस्थीकु : तें उदेसिलें द्रव्य भांडारी न घलीचि : मग तेणें द्रव्यें कुमारेस्वरिची पौळि केली : चुना सारिला[९] :" एक माहानुभाव म्हणति : धारेचा घाटु बांधला : ।।

## ६२ लांसिपीलीं खेळवणें

गोसावी मार्गें बीजें करीत होते : तवं जाळी[१] एकी लाहांसि वीयाली होती[२] : तेथ गोसावीं बीजें केलें : लाहांसि चारेया गेली होती : तीएचीं दोनि पीलीं होतीं : गोसावीं दोहीं काखां घातलीं : खेळवीताति : तवं लाहांसि आली : ते गोसावीयांकडे घुरघुरीत पाहे : डोळे रोहोकी : गोसावीं अवळोकिलें : तवं तियेचा रोखु निवर्त्तला[३] : मग ते जाळिचां तोंडीं सुनेयाचेयापरी मोळी °टेंकौनि बैसली : ते जीभवरि आपुलीं आवाळुवें ओंठ चाटुं लागली : गोसावीं नावेक खेळवीलीं : " सांवाळि वाइ : आपुलीं पीलीं घे : " म्हणौनि दोन्हीं तीकडे पुढां घातलीं : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : मग गोसावीयांतें देखे जवं तवं गोसावीयांतें पाहातीचि होती : ।।

---

कमळजैएसि आला : . . . राणयातें राएं पुसिलें : " राणे हो : एथ अपूर्व काइ ?" ३ °**एवा.** °राणेयातें पुसिलें : " ते पुरुखू कें असति ?" राणेनि म्हणीतलें : "हें नव्हति : कमळजैएचेया वडाखालि असति :" ४ **एवा.** °प्रदखिणा करितां तारातीर्थीं भेटि जाली. ५ **मु.** °आसुंचा पुंजा दर्शन केलें. ६ **एवा.** भुइंची. **एवा.** दगडाची. ७ **(आ.)**. ८ **ह.** °रायें म्हणीतलें : "हें द्रव्य भांडारीं घालुं नैए : हें चंडीस काइ करावें ? गोसावीयांतें पाहा पां : मग पुसों :". . . मग तीसरां दी कुमारेस्वराचां देउळीं भेटि जाली : रायें पुसिलें : " जी जी : हें द्रव्य काइ करूं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " कुमारेस्वराची पौळि करा : कमळजेचा मंडपु करा : उरलें द्रव्य तेणें चुना सारावा :" ९ **एवा.** कमळजैएचा मंडपु केला : . . . एक माहानुभाव म्हणति : धारेचा घाटु बांधला :

**६२.** १ **बी.** जाळीएसि. २ **प्रवा.** पीलीं पुढां सूनि बैसली होती. . ." ३ °**प्रवा.** मग ते—.

## ६३ ठाकुरभारीए पुत्रदान

गोसावीयांसि[१] वृक्षा एका तळिं आसन असे : तवं तेथ ठाकुरू एकु भेटला : तेणें वीळिचां गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया आवारासि गोसावीं बीजें करावें जी :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीयांसि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : श्रीचरण प्रक्षाळिले : मग गोसावीयांसि मादनेयालागि वीनवीलें : गोसावीयांसि पडदणी ओळगविली : मग मर्दनामादनें जालें : पुजाअवस्वरू जाला : ताट केलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : मग सेजारीं[२] माचेयावरि सुपवती घातली : तेथ पहुडु स्वीकरिला : मग तेणें ठाकुरें आपुली वडील राणी स्रींघारू करूनि पाठवीली : पुरूखांचें अमोघ वीर्ये म्हणौनि : श्रीचरण प्रक्षाळण केलें : मग फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि दीधलीया : मग श्रीचरण चुरूं[३] लागलीं : ऐसी नावेक सेवा केली : मग तिया[४] म्हणीतलें : "जी जी : मज पुत्रु होआवा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ प्रवृति नाहीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ आतां जा :" तैसीचि तीयां पाठवणी दीधली : तीएं आलीं[५] : मग अवघी व्येवस्ता तेयापुढां सांघीतली : मग तेणें म्हणीतलें : "एं[६] म्हातारी : गोसावीयांसि न मनतीचि :" मग तेणें आपुली धाकुटी राणी पाठवीली : "तुं जाए :" मग तीएं आलीं तेयांसि गोसावी भीतरि एओं नेदीतिचि : तीएचा एकु पाओ भीतरि : एकु पाओ उंबरेयाबाहीरि : गोसावीं तेयां बाहीरूनिचि पाठवणी दीधली : गोसावीं म्हणीतलें : "बाइ : जा : एथ काहीं करणें न लगे :" मग तीएं आलीं : मग तीया अवघी व्येवस्ता सांघीतली : मग आपण आला : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावी कां न स्वीकरीतीचि ? मी नीपुत्रीकू : मातें पुत्रु नाहीं : म्हणौनि पाठवीलीया : गोसावीं मज पुत्रदान देयावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि पुत्रु होइल हो :" तेणेंचि दीसें मासें[७] तेयांचीए वडीली अस्त्रीएसि[८] पुत्रु जाला : गर्भसंभूति होतीए समइं गोसावीं बीजें केलें : ।।

---

**६३.** १ **अहबीपं.** गोसावी ऐसें बीजें करीत होते : तवं ठाकुर एकु भेटला : वीनउनी आवारासि नेलें : **एवा.** ठाकुरा एकाचेया आवारासि गोसावीं पाणिपात्रासि बीजें केलें : ठाकुरें गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : "जी जी : एइजो जी :" म्हणौनि गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली—. २ **एवा.** देव्हारचौकीये. ३ **एवा.** थापटुं. ४ **अ.** तेयांसि. ५ **पंगो.** °तेणें पुसिलें : "कां काहीं जालें ?" (**पं.**) "ना नाहीं जालें :" तेणें म्हणीतलें : "एं म्हांतारी°. ६ **बी.** (**ही.**) "तुं वडिल म्हणौनि नाहीं :" ७ **अहबीभ.** °गोसावी तेयांचीए वडीली स्त्रीएसि (**ह.** राणीएसि) पुत्रु दीधला. ८ **गोपं.** राणीएसि.

## ६४ राएरीं पाणीपात्र : वामनपेदी मृत्यभार्या जीववणें

गोसावीं राएरासि पाणीपात्रासि बीजें केलें : गोसावीयांसि तेथ अवस्थान जालें[१] : गोसावी वामन पेदीचेया[२] आवारासि पाणीपात्रासि बीजें करीति : ऐसा वामन पेदीची[२] अस्त्री सरली : समसाना नेतां वामन पेदि[२] रडों लागला : "आहा : आतां काइ करीं ? आतां गोसावीयांसि पाणिपात्र कोण देइल ?" म्हणौनि दुख करी : पसेया[३] पाइलीचीं लेंकरूवें : तेयांचें काहीं न वटे : तो गोसावीयांचेया पाणिपात्रासीचि रडे : दुख करी : स्त्री[४] मसणासि आणिली : सरणावरि घालुं आदरिली : गोसावीयांसि पींपळातळि आसन असे : *गोसावीयांतें देखिलें*[५] : मग गोसावीयांपासि आला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : वामन पेदीं म्हणीतलें[६] : "जी जी : आतां काइ जी ? आतां गोसावीयांसि पाणीपात्र कोण सुइल ?" गोसावीयांसि कणवा उपनली[७] : 'सर्वज्ञें म्हणीतलें : "चाला :" गोसावीं तेथ बीजें केलें : उकड आसन जालें : श्रीकरें माथेयापासौनि पाएवरि स्परीसिलें : मग तेयांचा हातु श्रीकरें धरिला : आणि हनवटी ऐसि धरिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : उठा ना : तुम्हांसि एथ एक पाणीपात्र देणें असे :" इतुकेनि ते खडपडौनि उठिली : आपुलेया आवारासि आली : मग पाणीपात्राची आइति केली : गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं तेथ पाणीपात्रासि बीजें करावें" : गोसावीं बीजें केलें : तीएं पाणीपात्र घेउनि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें असें कीं :" आणि तीएं बीहालीं : मग वामन पेदीचां हातीं दीधलें : मग तीं गोसावीयांसि पाणीपात्र दीधलें : मग गोसावीं गंगेसि बीजें केलें[८] : ।।

## ६५ गोविंदस्वामी स्तीति

गोसावीयांसि नांदीएडीं अवस्थान जालें : गोसावीयांपासौनि एकां वेध होति : एकां स्तीति होति : ऐसें देखौनि विष्णुस्वामीं गोविंदस्वामीतें म्हणीतलें : "गोविंदा : एथ एक पुरूख आले[१] असति : तेयांपासि तुं जासी हो : तेयांपासौनि एकां वेध होताति : एकां स्तीति होताति : तेयांकडे वास न पाहावी : तेयांकडे वास पाहासी तरि वेधसी : तरि

---

**६४.** १ **हबी.** °वामन पेंधी नावें ब्राह्मण : तेयाचीए स्त्रीएसि नावं एल्हो : (**बी.** येल्हाइसें). २ **भमु.** वामन पेंदीं°. **हबी.** वामन पेंधीं°. ३ **एवा.** चोभेया. ४ **हबी.**(**एवा.**) 'स्त्री समसानासि आणिली : तीयें आवघीं समसानासि गेली : वामन पेंधी धार देवावेया गंगे घागरी भरूं आले : तवं गोसावीयांसि पींपळातळीं आसन असे°. ५ (**हबी.**). ६ **एवा.** "जी जी : देवकी दासी एल्हो होती : ते सरली जी : आतां गोसावीयांसि पाणीपात्र कोण देइल ?" ७ **हबीअ.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि तुमची ब्राम्हणी जीवउं ? " "हो कां जी :" गोसावीं तेथ बीजें केलें : श्रीचरणीचा आंगुठा लाविला : "बाइ : उठा ना :" ८ **एवा.** तेहीं म्हणीतलें : "जी जी : गोसावियांतें तेथ कैसें (**एवा.** काइसया) नेओं°. ९ **अ.** °दीस येकु : दीस कीती तें सांचीतलें नाहीं.

**६५.** १ **अ.** नागें.

कर्मासि मुंचसी हो :" ते आपुलेयां सीक्षांसि गोसावीयांकडे एओं नेदीति : *ते भावतीर्थासि एति : गोसावीयांकडे पाहाति ना*[२] : एकु[३] दीसीं गोसावीयांसि भावतीर्थीचेया पींपळातळिं आसन असे : एकु दीसीं गोसावीयांसि पाराआड आसन असे : *ते भावतीर्थासि आले : पाहों लागले*[२] : तवं तेहीं म्हणीतलें : "काइ पां आजि ते पुरूख देखें ना ? तरि काइ गेले ?" ऐसें म्हणौनि वास पाहिली : आणि पाराआडौनि दृष्टी दृष्टि मीनली : आणि वेधले : आणि आले : आणि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : आणि गोसावीयांपासौनि तेयां अस्तीति जाली : *भोगिली : भंगली*[४] : वीनतकंदर होउनि गोसावीयांपासि बैसले[५] : ऐसे नावेक बैसले होते : मग नीगाले : मग नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि जें तुम्हांसि जालें तें कव्हणापुढें न संगावें हो : वीष्णुस्वामि पुसती तरि म्हणावें : 'हें तुम्हांचिपासौनि :' तेयांपुढें सांगाल तरि हें तुम्हांसि दरीसन नेदीं हो :" मग ते गेले :॥

मग माहानावी आली[६] : वीष्णुस्वामि म्हणीतलें : "गोवींदा : जाए हो : पुस्तकें आणि : राएरौनि :" ते देहेंचि दोनि पाहार न भरतां पुस्तकें घेउनि आले : वीष्णुस्वामीसि आस्चर्ये जालें : मग ते आलेयां कर्म जें करावें तें अवघेंचि ठाकलें : *ते नीश्चळ बैसले असति : स्नान न करीति : देवपुजा न करीति : वीष्णुस्वामीसि नमस्कारू न करीति*[७] : मग वीष्णुस्वामी भकों लागले : "हें काइ जालें या गोवींदासि ? सांपें एथ ए ना : एथ उठी बैसे ना : देवासि बोणें आणी ना : सांपें उदासु जाला : ते नमस्कार काइ जाले ?" ऐसें भकों लागले :॥

एकु दीसु ते नीजैले होते : तवं तेयांचा नरसींहु तेयां दंडवतें घालुं लागला : तेणें पुसिलें : "तुम्हीं कवण ?" तेणें म्हणीतलें : "मीं नरसींहु :" आणि तो लवलवौनि उठिला : "हें काइ जालें : हें काइ जालें ? तुम्हीं कैसे मज दंडवतें घालीतसां ?" तवं तेणें म्हणीतलें : "तुं गोवींदाचीं दंडवतें इछितासि : तरि तेयांचीया वारीया मीं घालीतसें : गोवींदु केसना जाला असे : गोवींदु थोरू जाला असे ! थोराचा जाला असे !" सवळेंसीचि[८] उठीले[९] : गोवींदापासि आले : तवं ते स्तीति भोगीत असति : तवं तेयांसि दंडवतें घालुं लागले : तवं ते लवलवौनि उठिले : ते म्हणों लागले : "हें काइ जालें ? तुम्हीं कैसें दंडवतें मज घालीत असा ?" तेव्हळि तेहीं तेयांतें पुसिलें : "तुम्हांसि हें कव्हणापासौनि जालें ?" तेहीं म्हणीतलें : "हें तुम्हांचिपासौनि :" तेहीं म्हणीतलें : "हें आम्हांसीचि नाहीं :

---

२ **(एवा.)**. ३ **एवा.** एकु दीसीं गोवींदस्वामि गंगेकडे जात होते : तवं गोसावीयांतें देखिलें आणि गोसावीयांपासौनि तेयां स्तीति जाली : ४ **(ह.)**. ५ **बी. (ही.)**. मग ते निश्चळ बैसले असति : 'पापिया जी : पापिया जी : गोसावीयांसि भकें जी :' ऐसां ऐसां शब्दीं तेहीं अनुतापु केला : ६ **ह.** °मग नरसींहुअनुभवीं रायेरासि पाठवीलें : पुस्तकें आणावेया : ते देहेंचि आले गेले : मग तेयांसि आश्चर्ये जालें. ७ **(मु.)**. ८ **एवा.** °तैसेंचि उठुनि गोवींदापासि आले. ९ **एवा.** °"बोलावा बोलावा गोवींदु :" आले.

मग तुम्हांसि कैंचें ?" एतुलेनि ते अडले : तेव्हळि तेहीं ते अवघीचि वेवस्ता सांघीतली : "गोसावीयांपासौनि :" "तरि ते गोसावी कें असति ? आम्हांसि सांघा ना कां ?: तरि तेयांचें दरीसन मज करावें :" तेव्हळि ते दोघै गोसावीयांचेया दरीसना नीगाले : मग गोसावी तेयांसि दरीसन नेदितीचि : ।।

## ६६ वीष्णुभटां घुटकासीधीनीखेदु

माहादाइसें भीक्षें गेलीं असति : लोकु म्हणें : 'हे वीष्णुस्वामि इस्वरपुरूख[१] :' मग एउनि गोसावीयांपुढें गोष्टि सांघीतली : मग माहादाइसीं पुसिलें : "हां जी : हे वीष्णुस्वामि म्हणे इस्वरपुरूख[२] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : हा घुटिकासीधि जाणे : मुखीं घुटिका घाली आणि पौळी पागार उडे : लोकांचां दारीं उभा राहे : माळवधांतु कवाडां भीतींसीं लागौनि अवघी गोष्टि आइके : तेयातें अवघें देखे : आणि उदीयांचि तेयांपुढें सांघे : *सवळेचि तिए*[३] एति : आणि म्हणे : 'तुम्हीं रात्रीं अमुकींचि जेविलींति : अमुकींचि बोलिलींति : अमुकीया गोष्टी केलीया :' एतुकेनि तेयां आस्चर्य होए : एतुकेनि लोकु भजे : इस्वरत्वें मानी :" ।।

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : एकु दीं सोमवारीं परवणि[४] पडिली होती : दोहीं थडीयां लोकु दाटला होता : मग *लोकांसि आस्चर्य दाखवावें म्हणौनि*[५] तेहीं मुखीं घुटिका घातला : घालुनि गगनमार्गें जातां लोकें देखिला : म्हणति :'हें घेया : वीष्णुस्वामि गगनमार्गें स्वर्गीं जात असति :' म्हणौनि पाहों लागले : तवं वाहुंटुळि आली : तो नाकीं रजु रीगाला : ते सींक आली : तो सींकेसरिसा घुटिका पाणीयाआंतु पडिला : तोही पाणीयांतु पडिला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू पाणीयांतु पडिला म्हणौनि वांचला : खडकावरि पडता तरि हाडेंगुडें[६] नुरतीं : पाओ मोडला : परि मागिलीचि उपाधी लोकु माने : तेयातें भजे :" ।।

## ६७ आंब उचारू

गोसावीयांसि नांदीएडीं भावतीर्थीं आसन : देउळीं राणेनि पुसिलें[१] : "देव हो : ए गावीं वऱ्हाड जालें : तेथ तुम्हीं जेविलेति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हो :" "काइ काइ

---

६६. १ **एवा.** हा वीष्णुचा अवतारू : २ **एवा.** माहाविष्णुचा अवतारू. **बी.(ही.)** °भटीं पुसिलें : "हां जी : वीष्णुस्वामीसि येसणा उपाधि काइसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तयातें घुटिकासीद्धि आति : गगनमार्गें गति होय : आपुलिया सिक्षाचिया ठाया जाति : कडवसां राहाति : तेयांचें येकांतीचें बोलणें ऐकति : येरा दीसीं तयापुढें सांगति : 'तुं ब्राह्मणीसीं ऐसा बोललासि. . . . ३ **(पंह.)**. ४ **ह.** पर्वणी भरली होती. ५ **(बी.)**. ६ **अ.** °कुडें. **पंभगोह.** हाडगुड नुरतें.

६७. १ **भह.** °"आरोगण जाली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाहीं जाली :" "ये गावीं ब्राम्हणाचां घरीं वऱ्हाड (**एवा.** श्राध) तेथ जा :" गोसावीं बीजें केलें : आरोगण जाली : माघौतें बीजें

जेविलेति?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वर्णभातु[२]" : पुढारें आंब जवं सांघावें तवं पुरू आला : राणेन म्हणीतलें : "जी : चाला चाला : पुरू आला : " राणा पळौनि गेला : गोसावीयांवरौनि पुरू गेला : देउळ बुडालें : दीसां दों[३] पुरूं ओहटला : राणा आला[४] : देउळिचा पन्हा फेडिला : तवं गोसावीयांचा श्रीमुगुटु देखिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "राणे हो : आंब गोड जालें :" राणेयां वीस्मो जाला[५] : मग माहादाइसीं म्हणींतलें : "जी जी : ऐसे ते कोण होती ? ऐसे ते आमचेचि गोसावी होती :" गोसावीं मानिलें :।।

हे गोष्टि गोसावीं पवनगुरूउपरि सांघीतली[६] : आउसांप्रति : खडकुलीए :।।

## ६८ वऱ्हाडीक करणें

गोसावी मार्गें बीजें करिताति : तवं एकी गाविचें वऱ्हाड महुर्ताची वेळ होएतवं सेवतीएसि बैसले होते : गोसावीं तेयांतु बीजें केलें[१] : तेथ आसन जालें : मग तीएं तेयांसि साउमीं आलीं : गोसावीयांतें म्हणति : 'यांचे हे मान्य पुरूख :' म्हणौनि गोसावीयांसि आधीं टीळा लाविला : तांबोळें दीधलीं : मग एरां अवघेयांसि टीळे केले : तांबोळें दीधलीं: मग वऱ्हाडीयांतें घेउनि गेले : तेयांसरिसें गोसावीं बीजें केलें : जानवसा दीधला : तळी उचलिली : आधीं गोसावीयांचे श्रीचरण प्रक्षाळिले : वीडा ओळगविला : मग लगीन लागिलें[२] : मग जेवावेयाची आइति केली : ताटें केलीं : गोसावीयांसि धूरेसीरां ताट केलें : तेथ गोसावीयांसि आसन होए : आरोगण जाली : गुळुळा जाला : गोसावीयांसि वीडा ओळगविला : मग नवरा मुक्षकरूनि समस्तांसि वीडे दीधले : वऱ्हाडीयांतें मागुतें बोळवीत जाति : ते वऱ्हाडी : गोसावीं मागौतें देउळासि बीजें केलें : एक म्हणति : 'हे गोसावी यांचे मान्यपुरूख :' एर म्हणति : 'हे गोसावी यांचे मान्य पुरूख :' ऐसे च्यान्ही दीस उभयांचें वऱ्हाड जालें : चौथां[३] दीसीं नोवरेयासि नोवरीएसि साडे वाइले : मग[४]

---

केलें : तवं राणा आला : तेणें म्हणीतलें : "आरोगण जाली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाली :" "काइ काइ आरोगण जाली ?"... २ **हबी.** वडे : मांडे : पुरिया : अमृतफळें : खीरि : साकर. ३ **एवा.** सातां. ४ **भह.** °पाणी उपसीलें. ५ **हबी.** °लोकु आला होता : तेहीं म्हणीतलें : "गोसावी काइ म्हणताति ?... राणेनि म्हणीतलें : "गोसावी आरोगुनि आले होते : अवघे पदार्थ सांघीतलें : आंबा सांघावें तवं पूरू आला : ते गोसावी आतां सांघत असति :" मग तेयांसि आश्चर्य जालें : ६ (उत्तरार्ध लीळा ८१ पाहा).

**६८.** १ **रावा.** एकाचें वऱ्हाड जात होतें : गोसावी जाउनि तेयांसि मिळाले. २ **एवा.** °तीए गावीं देउळीं गोसावीयांसि अवस्थान जालें : च्यान्ही दीस जेयाचें वऱ्हाड ते तेया वऱ्हाडियांतें बोलाउं एति : वाटेसि जाउनि गोसावी वऱ्हाडियांसि मीळेति : गोसावीयांचें अगाधत्व देखौनि तेयासि आश्चर्य होए. ३ **मु.** चौथे दीसी एर म्हणति : 'एरांचे मानिये :' एर म्हणति : 'एरांचे मानिये :' ऐसेनि संभ्रमें एरएरीं वस्त्रें वाइलीं : मग तेथौनि बीजें केलें. ४ **मु.(ही.)**. °एरएरांतें म्हणति : "हे तुमचे मान्य : यांसि ऐसीं वस्त्रें वाओं एति ?" तवं एरीं म्हणीतलें : "हे तुमचे मान्य कीं :" तवं एरीं

तीहीं पुसिलें : "एं वस्त्रें तुमचेयां गोसावीयांजोगीं होति :" तेहीं म्हणीतलें : "आमचे कोण गोसावी ? आमचे ते अमुकेअमुके :" "तरि हे गोसावी कोणाचे ?" "ना हे आमचे नव्हति : हे तुमचे :" ते म्हणति : "हे आमचे नव्हति : हे तुमचे[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तुमचेंहीं नव्हे : ना यांचेंहीं नव्हे : हें[६] कव्हणाचेंही नव्हे :" ऐसें म्हणौनि बीजें करूं आदरिलें : *तवं तीहीं म्हणीतलें : "येइजो जी : येइजो जी : आम्हीं अवघीं गोसावीयांचीं[७] :"* मग तीहीं यातें राहाविलें : यासि लुगडीं वाइलीं : मग हें आपुलीं वस्त्रें घेउनि नीगाले : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ६९ सीधू रे सीधू म्हणणें

एकी गावीं ब्राम्हणा एकातें वऱ्हाड[१] : ओसरीएसि[२] वऱ्हाडीए अवघी : आणि वौहर बउलेयावरि बैसलें असे : तेथ गोसावीं बीजें केलें : मांडवाचां दारीं उभे जाले : आणि म्हणीतलें : "सीधू रे सीधू : परि सीधातें कोण्ही नेणे : नेदखे :" ओसरीए बैसले होते तेहीं म्हणीतलें : "नेणों कैसें ? हे नव्हे : आम्हीं जाणत असों : मां नेदखों कैसें ? देखत असों मां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि[३] बोलावा ना कां ?" परि ते उगेचि : मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "सीधू रे सीधू : परि सीधातें कोण्ही ओळखे ना :" तेहीं म्हणीतलें : "हें नव्हे : आम्हीं ओळखतसों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ओळखा तरि कां बोलावा ना कां ?" मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "सीधू रे सीधू : परि सीधातें कोण्ही जाणे ना :" ते म्हणति : "हे नव्हेति : आम्हीं जाणतों :" ऐसें बउलयावरील[४] उतरें करीती : तवं नोवरीएचा बापु घरांतु होता : तो बाहीरि नीगाला : तेणें म्हणीतलें : "हा नव्हें मीं देखतु असें : एइजो जी एइजो[५] :" म्हणौनि साउमा आला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : गोसावीयांसि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : चरणक्षाळण केलें : गोसावीयांसि आरोगणा दीधली : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ७० उकरडां पहुडु

गोसावीं पाणीपात्रासि बीजें केलें : तेह्वळि नीरक्षण केलें[१] : सुणी व्याली होती[२] : तें उकरडा उकरुनि कोहंक[३] केलें होतें : स्याळे दीस : सीत वाजत होतें : गोसावीं

---

म्हणीतलें : "आमचे नव्हति : आम्ही म्हणों तुमचें मान्य :" तैसेंचि एरही म्हणति. ५ **एवा.** °वडील. ६ **अ.** °ज्यांचे त्यांचे. ७ (**मु.**).

**६९.** १ **एवा.** मुंजि. २ **एवा.** °दोघचौघ बैसले होते : आणि वौहर. . . ३ **एवा.** या ऐसें म्हणा ना कां ? ४ **एवा.** ओसरीएवरील. ५ **गो.** °मी ओळखतें.

**७०.** १ **भगो.** °एकी उकरडां सुणेन कोहंकें केलें होतें. २ **अहबी.** °एक म्हणति कीट काढिलें (**गो.** खणितलें) होतें. ३ **अ.** कोंक.

विळिचां एउनि तेथ पहुडु स्वीकरिला : उदेयांचि सकाळि एकी बाइला आणुनि पुंजा : सेण : कडबाडें घातलीं : एकी आणुनि उन्ह राख घातली : सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : जवंजवं सोहमीसोहमी उन्ह राख लागे तवंतवं हें खरखरां[४] घोरे :” उब नीगाली : माणुसें मांदी मीळाली : तेथ उभीं ठेलीं : तीएं गोष्टी करूं लागलीं : आणि यासि चेओ आला : हें उठिलें : आणि श्रीमुर्ति झाडुनि धावं घेतली : लोकु उभा होता : तेहीं म्हणीतलें : ‘उकरडा माणुस वीयाला[५] : गावांसि अरीष्ट उठिलें : आतां सांतीक करूं या :’ म्हणौनि अवघा गाउं मीळाला : उकरडा खणीतला : अवघा फेडिला : सवानु केला : झाडिला : माडौ घातला : सडेसमार्जन : चौकरंगमाळिका भरिलीया : अवघीए गावीं कण मेळवीले : होमु केला : खीचु : पातीया : घुगरीया अवघा लोकु जेववीला : सेजीए गाउनि जोगी आणि जोगीणि एतें होतीं : तीएं गोसावीयांसि मार्गीं भेटलीं : तीहीं गोसावियांतें म्हणीतलें : “ माहात्मे[६] हो एया : जाओं : ये गावीं उकरडा माणुस व्याला : गावांसि अरिष्ट म्हणौनि सांति करिताति : तेथ[७] चाला भूगति करूं जाओं : ” ऐसें जोगीयें गोसावीयांतें म्हणीतलें : गोसावीं बीजें केलें : “ बाइ : हें तेथ पातळीए घालुनि जेविलें :” मग बीजें केलें :

हे गोष्टि गोसावीं आउसांप्रति प्रतेस्थानीं सांघीतली : ।।

## ७१ भगओ उदग्रहीणीकें उभयां जैत

भगओ म्हणिजेति सन्यासी : एका गावां गोसावीं बीजें केलें : तवं दोघा संन्यासियां[१] उघाणी होत होती : गोसावी सभ्य[२] जाले : तीहीं बोलों आदरिलें : एकु एकातें अडी : तो उगा राहे : गोसावीयांचेया मुखाची वास पाहे : आणि गोसावी म्हणति[३] : “ तें तुम्हीं जाणत असा कीं : तें तुम्हां एत असे कीं : तुमचें स्थळ[४] ऐसें कीं :” आणि तेयासि स्फुर्ति होए : एतुलेनि तो एरातें अडी : तेयांचें स्थळ नीउन होए : आणि गोसावी घेति : गोसावी म्हणति : “तें तुम्हीं जाणत असा कीं : तें तुम्हां एत असे कीं :” आणि तेयांसि स्फुर्ति होए : ऐसा एरू एरातें अडी : सर्वज्ञें म्हणीतलें : “ तुम्हां उभयां जयो[५] :” ऐसा गोसावीं उभयांसि जैत दीधलें : मग तेथौनि गोसावीं बीजें केलें : ।।

---

४ **ह.** घरघरां. ५ **एवा.** °बाइला उकरडेयावरि सेण राख घालुं आलीया : तवं गोसावी घोरताति : बाइलीं आपुलालीए वाडीं गोष्टी सांघीतलीया : जें उकरडा माणुस वीयाला : जवं लोकु पाहों आला तवं गोसावीं श्रीमुर्ति झाडुनि बीजें केलें : लोकासि आश्चर्य जालें : आरे उकरडा माणुस व्याला.... ६ **एवा.** देव हो चाला. ७ **एवा.** °जेउं चाला :

**७१.** १ **एवा.** °वेवादु लागला होता. **एवा.** (**ही.**) दोघीं उघाणी करूं आदरिली : गोसावियातें सभा केलें : २ **हमुगो.** सभा. ३ **एवा.** °प्रसादु ऐसें म्हणत असति कीं : इतुलेनि तयासि अपुर्व स्फुरे : **पंबी.** जेयाचें स्थळ निधर होए (अडे) तेयातें गोसावी म्हणति°. ४ **अ.** अस्थळ. **मु.** जेयाचें स्थळ नीधर होए तयातें गोसावी अवळोकीति : आणि तो बळिया घे : तवं एराचें स्थळ नीधर होए : ५ **अ.** जो.

## ७२ पराजीत मठपती प्रतीष्टा

मढीं[१] एक संन्यासी होते : तयांचे दोघ सीक्ष : एकु तेयांची सेवासुस्त्रुका करी : एकु[२] पढणेयाचा अभ्यासु करी : बहुतां एकां दीसां ते संन्यासी सरले : तेयां दोघां सीक्षां भांडण लागलें : एकु म्हणे : "हा मढु पुस्तकें माझीं :" एरू म्हणे : "जेयासि पुस्तकें वाचती तेयाचा मढु पुस्तकें :" ऐसां सभा केली : सभेपुढां सांघीतलें : सभा म्हणीतलें : "जेयासि पुस्तकें वाचती तेयाचा मढु हो :" म्हणौनि पुस्तकें आणिलीं : जे पढों नेणति तेयांचां हातीं दीधलीं : तवं तेयांसिन वचति : मग एरांचां हातीं दीधलीं : तेयां वाचलीं : इतुलेनि मढु पुस्तकें तेयांसि दीधली : एर दवडीले :।।

तेया गावांसि गोसावीं बीजें केलें : वृक्षातळिं गोसावीयांसि आसन जालें : तवं ते तेथ आलें : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग सांघों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुझें स्थळ जीतें असे मां ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी : मीं वाचुं नेणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं सभा करा : वाचुं रीगा : आणि वाचैल :" मग तेहीं सभा केली : पुस्तकें आणिलीं : हातीं दीधलीं : वाचुं लागले : इतुलेनि एकी टाळी पीटिली : मढु पुस्तकें तेयांसि दीधलीं : एर दवडीले : मग ते गोसावीयांसि आरोगण देति : ओटेयावरि पहुडु होए : मग गोसावी बीजें करूं रीगति : ते गोसावीयांसि बीजें करूं नेदीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें तेयांसी भांडौनि नीगाले :" ।।

## ७३ मार्गीं अधीकारियां भेटि

एकी गावीं गोसावीयांसि वस्ति जाली : गोसावीं पाणिपात्रासि बीजें केलें : मां पाणिपात्र जालें : गोसावीयांचां श्रीकरीं पाणिपात्र : गोसावी गावांबाहीरि गंगेसि[१] बीजें करीति होते : तवं मार्गीं अधीकारिया गाउं रीगावेया मार्गें जातु होता : तेयांचे राउतपाइक

---

**७२.** १ **मुबी.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे आहे : "गावी एकि संन्यासी एक दिग्विजयो करित आला : गांविचया संन्यासीयांसीं उघाणी केली : गांविचेनि संन्यासियें हारविलें : तयाचें मठापत्थ पुस्तक भांडार तया जालें : घाणा : मळा : वाड : वृत्ति हें आवघेंही तयासि जालें : मग गाविचेनि संन्यासियें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मठापथ्य गेलें : पुस्तकभांडार गेलें : " ऐसें दुख करित सांघीतलें : गोसावीं दोघांइं उघाणी लाविली : पुडती गांविचया संन्यासियांतें येरें निरुत्तर केलें : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें म्हणत असति कीं :" येतुलेनि तयांसि अपुर्व स्फुरे : ऐसेनि गांविचेनि संन्यासियें येर जिंतिलें : मग तयाचें माठापथ्य : पुस्तकभांडार : तयाचें तयासि जालें : मग तेहीं संन्यासीं आपुला वोटा संपादिला : गोसावीयांसि आरोगण देति :" २ **पंगो.** °एकें सास्त्र वाचीलें : मग तो हींडों गेला : गुरू सरले : सेवा करीत होता तेयासि मठप्रतेष्टा जाली : पुस्तकभांडार दीधलें : घाणा : मळा : सेवदान : सेत ऐसें दीधलें : हींडों गेला होता तो आला : (**गो.** दिग्जे करीत आला :) तेयाचें मठापत्य हीरों आदरिलें :

**७३.** १ **एवा.** °ऐसें बीजें करिताति : तवं°.

पुढें एत होते : तवं तेयाचेनि एकें राउतपाइकें[२] : गोसावीयांतें भालेयांचीया[३] बुढीया-करूनि[४] लोटिलें[५] : तेणेंकरूनि श्रीकरिचें पाणीपात्र सांडिलें : मग तेथचि गोसावीं आसनीं बैसौनि एकी श्रीकरें दोंदेंसीं पाणीपात्र धरिलें : उजवेनि श्रीकरें भूइंचीं सीतें वेंचीति : तवं मागिलाकडौनि तो अधीकारीया आला : तवं तेणें गोसावीयांतें सीतें वेंचितां देखौनि[६] दांडीएखालुती उडी घातली : दंडवत घातलें : श्रीचरणासि लागला : मग म्हणीतलें : "हें काइ रे पापीए हो : ऐसें कवणें केलें रे ? गोसावीयांतें कैसें लोटिलें ?" गोसावीयातें वीनउं लागला : "हें असों दीजो जी : गोसावीं माझेया बीढारा आरोगणे बीजें करावें जी :" गोसावी तेयांची वीनवणी न स्वीकरितीचि : मग तो सीतें वेंचुं लागला : सीतें वेंचिलीं : श्रीकरीं ओळगविलीं : मग तो गोसावीयांसि दंडवत करूनि नीगाला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : मग तेथौनि बीजें केलें : ।।

## ७४ झाडी रामद्रणेयां[१] भेटि

गोसावीं हे गोष्टि सवै उपरि[२] सांघीतली : भक्तिजनें सवैचीया गोष्टी सांगत होतीं : कोण्ही म्हणे : 'मज काइसेयाची सवे :' कोण्ही म्हणे : 'मज काइसेयाची सवे :' सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ एका झाडाची सवे होती : झाडि प्रदेसीं एकी गावीं असतां हें एका झाडाखालि असे[३] :" गोसावीयांसि तेया वृक्षाखालि अवस्थान असे : गोसावीं गावां-माजि पाणिपात्रासि बीजें केलें होतें : तवं तेया झाडाभवंता रामद्रणेयांचा पाळा[४] पडला : दुसें घातलीं : रामद्रणा कटकैए झाडीवरि जातु होता : गोसावीं नगराआंतु पाणिपात्र करूनि गंगेसि आरोगण केली : तवं झंजुरूकें जालें : ऐसें पीचडीएं मुडुपघसणी : घोडे-यांचेया लाहासांवरौनि : दूसाचेया तणीयांवरि श्रीचरण देउनि *सवेचीया झाडापासि*[५] बीजें केलें : झाडातळि आसन जालें : दूस हालीनलें : तवं तेथ होते तेहीं म्हणीतलें : "हा कोणु गा ? हा कोणु गा ? माणुस रे : माणुस रे :" म्हणौनि धावीनले : गोसावीयांसि मौनाची प्रवृति : गोसावी बोलति ना : वास पाहाति ना : अवघेया कटकाआंतु हाहाकारू जाला : आले तवं यातें आसनीं उपवीष्ट देखिलें[६] : एक धावंत रामद्रणेयांपुढें सांघों गेले : "कोण नेणों कटकाआंतु आला असे : तो बोले ना : वास पाहे ना : तो उगाचि नीवातु[७] वडातळि एउनि बैसला असे :" रामद्रणा दीवीयां पोतसुनि आला : तवं गोसावीयांतें देखिलें : "आरे : परते सरा : हे गोसावी :" दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया दूसासि गोसावीं बीजें करावें :" गोसावीं

---

२ **अ.** °पाहीकें. ३ **मु.** साबळाचिया° **एवा.** दांडीचेनि कोंभेंकरुनि लोटिलें. ४ **अह.** °श्रीकरावरि हाणौनि भातु सांडिला. ५ **मु.** परतें सारिलें. ६ **अह.** °घोडेयाखालुता उतरला.

**७४.** १ **गोबीमु.** रामदरणेयां. २ **मु.** ढोरेश्वरीं छर्दोबावरि. ३ **एवा.** बैसे. **एवा.** वसे. ४ **एवा.** मेलिकारू जाला. ५ **(पं.).** ६ **अह.** °दंडवत केलें : श्रीचरणां लागले. ७ **हमु.** नीवांतु.

वीनवणी स्वीकरिली : गोसावीं तेयांचेया दुसासि बीजें केलें : आसन जालें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : चरणप्रक्षाळण केलें : मग गोसावीयांसि पडदणी दीधली : तवं माल मर्दना देयावेया आला : तवं रामद्रणेनि म्हणीतलें : "सरा रे : येथ तुम्हीं कें रीगाल ? एसणी आटि काइ तुम्हाचिकारणें काढिली असे ?" मग आपणचि गोसावीयांसि मर्दना देओं लागला[८] : जवंजवं मर्दना दे तवंतवं पोटीं मनोर्थू करी : जें "ए[९] वेळेची कटकै परतती[१०] कां तरि मीं आपुलेया गावां गोसावीयातें नेतां :" तवं राजादेसु[११] नीगाला : जे 'कटकै नेतावी[१२] :' ऐसीं लीखितें आलीं : गोसावीयांसि मर्दना जाली : मादणें जालें : पुजा जाली : आरोगण जालें : गुळुळा जाला : फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि दीधलीया : गोसावीयांसि पहुडु जाला : मग लीखितें वाचिलीं : जें 'ए वेळेचीं कटकै परतावी[१३] :' रामद्रणा हरिखैला : तैसाचि तो गोसावीयांजवळा आला : "जी जी : रायाचीं लीखितें आलीं : जें कटकै प्रतावी[१२] :" रामद्रणा मग गोसावीयांतें वीनउं आदरिलें : "जी जी : अळजपुर नगर बरवें असे जी : सीधसाधकांजोगें : बरवें लाखारबन : बरवीं देउळें असति : बरवीं वनें वनस्तळीया असति : गोसावीं तेथ बीजें करावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें येथ पुर्वीं[१४] दृष्ट असे :" रामद्रणेनि म्हणीतलें : "तरि माझेया कुटंबासि[१५] दरीसन देयावें जी :" एथ बीजें करावेयाची प्रवृति : मग तेयाची वीनती स्वीकरिली : मग तेणें गोसावीयांसि गरूडु घोडा ओळगविला : वेगळें दूस ओळगविलें : हडपी : १ : सागळीया : २ : चवरूधरू : ३ : भोइ : ४ : मादुरी : ५ : सुआरू[१६] : ६ : बडुवा : ७ : वेचकरू : ८ : थापटें : ९ : मळिवटें : १० : ऐसें दाही जण गोसावीयांसि ओळगविले : मार्गीं गोसावी बीजें करीति : गरूडा घोडेया अस्तीति होए : गति क्षाळे : उभे राहिलेयांवांचौनि सरेचि ना : मग गोसावी एकाधी राजिकी गोष्टि सांघति : जें उभें राहिलेयांवांचौनि आइकोंचि नैए : रामद्रणा गोसावीयांतें पुसे : गोसावीं सांघति : तें साच होए : तवं घोडेयाची अस्तीति भंगे : मग गोसावी साउमें बीजें करीति[१७] : देउळवाडां[१८] काजळेस्वरामागां :

---

८ **रावा.** °रामद्रणेनि बीढारांतु मनोर्थू केला : गोसावीयांतें गावां जा म्हणे तरि कां जाती ? सवें या म्हणे तरि कां येती ? ए वेळेची कटकै प्रतती कां तरि गोसावीयांतें वीनउनि आपलेया नगरासि नेतां. ९ **पह.** पाउसाळा आला : (**अपंहगो.**) डोंगरा वेळु पडिला : (**गो.** वेलु पसरला) : ए वेळेची कटकै—. १० **एवा.** परते. **अहं.** प्रतती. **एवा.** नेतती. **एवा.** नेटती. **एवा.** मोडती. **गो.** नव्हती. ११ **एवा.** नीळे आले : **बी.** नळे आले : **एवा.** ज्वाळिया आलिया : **रावा.** तवं पानपटे नीळे धावणे आले : तेहीं म्हणीतलें : "राएं तुम्हांकरवि कटकै नेताविली असे : जेयावरि कटकै जावी तेहीं आम्हांलागि माहालु (**ह.** मालु) पाठवीला : तेयां आम्हां नीकें : नां जें तरि तुम्ही आपुलेया देसासि जा :" १२ **पं.** नेटावी. **बी.** नेणावी. १३ **एवा.** नेतावी. १४ **एवा.** पूर्वदृष्ट. १५ **एवा.** मातेसि. १६ **अह.** स्वारु. १७ **अहबी.** °ऐसें गोसावीं पेणोवेणा बीजें केलें. १८ **प्रवा.** °खेडीं मेलिकारु : वस्ति जाली. **एवा.** °काजळेस्वरा बीजें केलें. **अ.** °ऐसें गोसावीं पेणोवेणा बीजें केलें.

मेलिकारू जाला : मग अळजपुरा लीखितें पाठविलीं : जें 'अवघें नगर श्रींघारावें : अवघी आइति करावी : ' मग एरी दीसीं गोसावीं अळजपुरासि बीजें केलें : गोसावीयांसि नगराआंतु बीजें करावेया महूर्त नाहीं : महुर्ताची वेळ होए तवं[१९] नगरा पश्चिमे नीर्वाणेपासि बनाआंतु मेलिकारू जाला : दुसें दीधलीं : जवं महुर्त नीगे तवं रामद्रणेनि गावांआंतु नीरोपु पाठवीला : घरोघरीं सडेसंमार्जनें : चौकरंगमाळिका : गुढीयातोरणें मखरें उभिलीं : तेथ नगरिचा लोकु दरीसना आला : महुर्ताची वेळ जाली : मग एरी दीसीं गोसावीयांसि दांडीएवरि आरोहण जालें : रामद्रणा घोडां बैसला : गोसावीयांपुढां राउत पाइक : मग नगरांआंतु बीजें केलें : नगरबाइला ताटें घेउनि ओवाळुं एति : रामद्रणेयांसि भेटी ए : रामद्रणा गोसावीयांसि ओळगवी : गोसावी इकडीलांची भेटि इकडीलां देति : इकडीलांची भेटि इकडीलां देति[२०] : कव्हणी म्हणे : ' हे रामद्रणेयांचे गुरू : ' कव्हणी म्हणे : 'रामद्रणेयांचे जावाइ : ' गोसावी उभीया हाटवटीया भीतरि बीजें केलें : ओवाळणिया पडति : पुढें भाट पवाडे पढति : वाजंत्रांचा एक नादु : मग गोसावीयांसि सभामंडपीं सेस भरिली : तेथ रामद्रणेयांचीया राणीया ओवाळुं आलीया : माता आली : तेहीं श्रीचरणां तुळसी वाइलीया : तैलागौनि तोचि नेमु घेतला : मग गोसावीयांसि देव्हारचौकीएसि दुर्गाआंतु अवस्थान जालें : धानुबाइचा आणि रामद्रणेयांचा एकुचि आवारू : *दुर्गाआंतु दूसरां आवारीं : तेथ रामद्रणेयांची दुसरी राणी होती : तेथ गोसावी बीजें करीति*[२१] *:* गोसावीयांसि मर्दनामादणें होए : आरोगण होए : मग गोसावीं राज्यधर्म स्वीकरिले : ।।

हे गोष्टि गोसावीं रुद्रोबावरि[२२] सांघीतली : ।।

## ७५ अळजपुरीं अवस्थान : प्रतिदिनीं अंबिनाथा गमन

गोसावीयांसि मर्दनामादणें होए : पाटाउं पारावर्ण घेति : काढणी यां घोडा पालाणी[१] : गरूडा घोडेयावरि आसन होए : मग गोसावी अंबनाथासि बीजें करीति : दारवठां घोडेयाखालुतें उतरति : श्रीकरिची[२] चामाठी घोडेयाचां कानीं घालीति : तो स्तीतिसुख भोगीतु राहे : गोसावी भीतरि बीजें करीति : बारवे जळमांडवीए श्रीमुख प्रक्षाळीति : इतुलें ऐसें श्रीकर[३] श्रीचरण प्रक्षाळीति : मग अंबनाथापासि बीजें करीति : मांधानिचें उदक घेति : अंबिनाथावरि घालीति : श्रीकरें स्परीसति : हडपीयातें वीडा[४] मागौनि मांधानी तीमुनि अंबिनाथा वाति : मग गोसावी तीं दारामध्यें एकें दारें बाहीरि बीजें करीति : प्रदखिणा करीति : मग चौकीं आसन होए[५] : *तेथ वैस्णवांचें गाणें होत*

१९ **रावा.** °अष्टमाहासीधीपासि नगरापुर्वे बनाआंतु त्रीरात्रीं अवस्थान जालें. २० **एवा.** °एक म्हणति जेथिची तेथचि देति. २१ (नागाइसाची वासना). २२ **एवा.** छर्दोबावरी. (उत्त. ली. ४७० पाहा.)

**७५.** १ **हबी.** पालाणीति. २ **एवा.** श्रीकरीचा ताजना—. ३ **अह.** श्रीकरें. ४ **पं.** °मागति : मांधानीसि श्रीकरु घालुनि वीडा वीसूळीति (**गो.** धुति). ५ **मु.** °कदाचीत बाळाणेनिसीं टेकौनि

*असे तें आइकति*[६]: पुराण होत असे तरि पुराण आइकति : पेखणें होत असे तरि पेखणें अवळोकीति : मग त्यागु देति : मग बीजें करीति : मग घोडेयावरि आसन होए : कानिची चामाठी श्रीकरीं घेति : मग वेदिकेसि बीजें करीति : तेथ बकुळाचेया वृक्षापासि घोडा उभा करीति : वेदिकेसि ब्राह्मणापासि नावेक आसन होए : मग गरूडा घोडेयावरि आसन होए : मग आवाराभीतरि बीजें करीति[७] : देव्हारचोकीए मर्दना : मादणें : आरोगण होए : रामद्रणेयाची माता श्रीचरणां तुळसी वाए : मग जेवीति : गोसावीयांसि डोल्हारे-यावरि पहुडु होए : ॥

## ७६ चुनेजाति नीरोपण

एकु दीं गोसावीं अंबिनाथासि बीजें केलें : प्रदखिणेसि बीजें करिताति तवं चुनाडे[१] चुना उखरडीत होते : देउळाचीए नासीदखिणे गोसावी उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "हा चुना कां उखरडीत[२] असा ?" "ना जी : आणीकु बरवा चुना असे : तो सारूनि[३] :" "तेयापरीस वर हाचि नीका असे :" "ना जी : आणीकु बरवा जाला असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कैसा बरवा जाला असे ? जो करीत असा तो कवणी कवणी करणीचा[४] ?" ते जाणति तिया सांघीतलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "जाला चुना कैसे निजाणिजे ?" तीहीं सांघीतलें : मग तीहीं चुनेयांची दडपणी सांघीतली : "तेयापरीस वर हाचि नीका :" "जी जी : आमची चुनाडेयांची जाति : फेडी म्हणितलेयां फेडिजे : लावि म्हणितलेयां लाविजे :" मग गोसावीं चुनेयांचीया जाती नीरोपुं आदरिलीया[५]: अमुकीए जातिचे खडे : अमुकीए जातिचे कोळसे : अमुकाचि काळुपर्यंत भाजों देयावे : अमुकीएचि जातिचा तागु : अमुकाचि काथू : अमुकेचि उडीद : वांटिती परि : द्रव्य मेळवीती परि : कुहीजवीती परि : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "जाला चुना तो ऐसेनि जाणिजे : काढुनि सुणेयांपुढें उंडा करूनि ठेविजे : तें दहींभाताचा उंडा म्हणौनि डखकरि[६] घांसु घे : खाए : आणिका दुसरेया घांसाचि वास पाहे : यातें स्वानभखी[७] चुना जाला म्हणिजे : तो जाला चुना ऐसें जाणिजे :" मग तेहीं म्हणीतलें : "जी जी[८] : आम्ही परिसों नेणों : मग जाणौनि काइ ? हा गोसावीं नीरोपावा आणि गोसावींचि परिसावा : जी जी : हे आम्हीं भाखही नेणों जी :" तेहीं म्हणीतलें : "आम्हीं केवि जाणों जी : या आमुचीया जीणी जी : आम्हांकरवि

---

आसन होए. ६ (**हबी.**). ७ **मु.** ° गाविंचा लोकु गोसावीयांतें देखौनि ऐसें म्हणे : "रामदरणे-यातें लेंकि वाढत असे : म्हणौनि हे जावाइ करावेया आणिले असति.

**७६.** १ **पं.** चुनारे. २ **एवा.** फेडीत. ३ **एवा.** देउनि. ४ **हबी.** वर्णीचा. ५ **मु.** मग गोसावीं चुनेजाति निरोपिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "चुना तो ऐसा कीं : खडे ऐसें भाजावे : ऐसीं ऐसीं द्रव्यें होआवीं : ऐसी मर्दना होआवी : इतुके दीस कुहीजों द्यावा : मग ऐसा वाटावा : मग तो चुना सुनियापुढें घालिजे°. ६ **ह.** डककरि. ७ **ह.** स्वानभक्षि. **बी.** °भक्षीत. **पं.** °भक्षीतु ८ **एवा.** °हे आम्हीं भाखही नेणों जी.

करवीत असति तरि करीत असों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि यापरीस उचडीत असा तोचि नीका :" ॥

## ७७ उदास्यस्वीकारें वस्त्रपुजास्वीकारू

ऐसें दाहा मास गोसावियांसि अवस्थान जालें : एकु दीसीं रामद्रणेयांचा मनोर्थू[1] नेणों कैसा उणा जाला : गोसावीं राज्य सांडुनि उदास्य स्वीकरिलें : गोसावी उदीयांचि उठिले : अवघीं वस्त्रें ठेविलीं : पासवडेयाचें वस्त्र होतें तें प्रावर्ण केलें : मग लाखारबनाआंतु बीजें केलें : तवं उदीयांचि मर्दनीया आला : अवघे ओळगीए आले : तवं गोसावीयांतें देखतिचि ना : मग रामद्रणेयापासि सांघावेया गेले : 'गोसावीं उदास्य स्वीकरूनि बीजें केलें :' ऐसा बोभाटु जाला : रामद्रणेनि[2] चहुं वाटां राखणें घातलीं : दोघ दोघ : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जैसें काहीं तेयांचें काहीं घेउनि नीगालें :" तवं एकें गोसावीयांतें सोमनाथापासि लाखारबनाआंतु आंबेयांखालि देखिलें : एक धांवत रामद्रणेयापासि सांघावेया गेले : मग रामद्रणा तेथ धांवत आला : तवं गोसावीयांचेए ठाइं उदास्य थोर : गोसावीयांचीए दृष्टीपुढां रीगवें ना : रामद्रणा भीतभीत गोसावीयांतें वीनवावेया आला : दंडवत केलें : श्रीचरणां लागला : गोसावी वीनवणी न स्वीकरीति : मग गोसावीयांतें दुख करूनि आरोगणे वीनवीलें : गोसावीयांसि सोमनाथीं आरोगण जाली : तेथचि पहुडु जाला : मग तेणें दोघ दोघ राखण दृष्टीचीये आळवी घातलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे तेयांचें जैसें काहीं लागे तैसीं यासि गुपीतैया राखणें घातलीं :" एरी दीसीं मागुतें गोसावीयांतें वीनवावेया आला : गोसावी वीनवणी न स्वीकरितीचि : मग दुख करूनि गोसावीयांतें आरोगणेंचें वीनवीलें : तेथचि ताट घेउनि ये : मग सोमनाथीं आरोगण होए : तेथचि पहुडु होए : तीसरां दीसीं मागुता आला : तवं गोसावीयांची दृष्टी प्रसंन ऐसी देखिली : मग रामद्रणेनि गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : पुढां पाए मोडुनि बैसला : "जी जी : ऐसें काइ अव्हेरिलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जवळिपासि यातें बुढीचि[3] राखा : हें काइ तुमचें काहीं घेउनि आलें असें ?" तवं तेणें म्हणीतलें : "हें काइ जी : गोसावी आमचें सर्वस्व घेउनि आले असती :" मग गोसावीयांतें वीनउं लागला : परि गोसावी वीनवणी न स्वीकरितीचि : मग रामद्रणेनि म्हणीतलें : "जी जी : माझीए मातेसि तीनि दी उपवासु : गोसावीं तेथ बीजें करावें : मग माझी माता गोसावीयांचेया श्रीचरणां तुळसी वाइल : तीचें वर्त सुफळ होइल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "मागुतें तऱ्हीं तेंचि कीं :" रामद्रणेनि म्हणीतलें : "ना जी : अवघेयां दीसांचें एकें वेळें वाहाती : मग गोसावीयांसि जेउती प्रवृति तेउती बीजें करावें :" एतुलेनि गोसावीयांचें उदास्य प्रहरलें : मग गोसावीं वीनवणी स्वीकरिली[4] : हातें हातु धरूनि नगराआंतु बीजें केलें :

---

**७७.** १ **गोपंबी.** मनोधर्मु. २ **गोबीमु.** °भवंतें पाहों धाडिलें. ३ **बी.** बुद्धीचि. ४ **अपंहबी. (रावा.)**. °अवघेया दीसांची पुजा एके वेळें केली : मग अवघे सोमनाथासि आणिलें : लोहे गंगाळ :

भीतरि मर्दना : मादनें : पुजा जाली : मांजिठी त्रीवडि ओळगविली : रामद्रणेयांचीया माता श्रीचरणां तुळसी वाइलीया : तेयांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसें व्रत नेघिजे कीं : हें कव्हणीकडे जाइल तेव्हळि काइ करा ?" मग गोसावीयांसि ताट केलें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग रामद्रणेयांची माता तेहीं जेविलीं : मग रामद्रणेयांनि गोसावीयांतें बीनवीलें : "जी जी : मीयां गोसावीयांसि नीरोधू केला : आतां गोसावीयांसि प्रवृति तवं राहावें : जेव्हळि गोसावीयांसि बीजें करावेयाची प्रवृति उपजैल तेव्हळीचि बीजें करावें :" मग गोसावीयांसि देव्हारचौकीए वस्ति जाली : मग एरी दीसीं गोसावीं तेथौनि बीजें केलें :॥

## ७८ वडनरां कांटिवनीं[१] पोतुकी खेळु

कुकडेयापासि[२] तळें : तेथ चौं गाविचे गोपाळ गाइ पाणीयांसि घेउनि आले : गोसावीं तेथ बीजें केलें : तेथ गोपाळ बैसले असति : गोसावीयांसि कांटीएतळिं आसन जालें : मग गोसावीं त्रीवडि[३] होती ते फाडिली : एकु कटीप्रदेसीं सुडा : एकु श्रीमुगुटीं सुडा : एकु कौपीनु : एकु कडिदोरा : हें एतुलें वेगळें केलें : एरें पोतुकें केलीं : गोसावीं गोपाळांतें म्हणीतलें : "गोपाळ हो : हें दूसी होइल : तुम्ही ग्राहीकें होआ :" तीहीं म्हणीतलें : "जी जी : आमतें दाम[४] नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाबुळेचेयां सेंगाचे दामौटेयांचे[५] दाम करूं : चिंचोरेयांचीया आसु करा :" "हो कां जी :" मग ते चिंचोरे आणुं गेले : म्हणौनि दामिनीयांचे दाम केले : चिंचोरेयांचीया आसु केलीया : गोसावी दूसी जाले : पसारा घातला : तेयांचीये जाडीचा तडवा केला : तेयांचीये डांगेची आडदांडी केली : म्हणौनि श्रीकराचा अनुकारू दाखवीला : मग ते चिंचोरीया[६] घेउनि आले : गोसावी घडीया काढीति : दाखवीति : म्हणति : "पालवीं पाहा : प्रमाण पाहा :" तेयांसि हातासन करीति : मग ते वस्त्रें घेति : गोसावीयांसि दामणीयांचे दाम सारीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "हे दाढे[७] : कुडे : हे दूराही :" दाम देति ते मांडीए खाली घालीति : आसु सारीति : गोसावी चाळीति[८] : "हे वाटक[९] : हे फूटक : हे सोप[१०] :" ऐसीयापरी अवघीं वस्त्रें देति : ऐसें चिंचोरेयांदामोटेयांचे पुंजे जाले : मग गोपाळांतें म्हणीतलें : "तुम्हीं दूसी होआ : हें ग्राहीक होइल :" मग गोसावी ग्राहीक जाले : ते दूसी जाले : मग गोसावीं तेया अवघीयां वस्त्रांचीया घडीया घेतलीया : मग तेयासि मागुतेया दीधलीया :॥

---

मर्दना मादनें : पुजा : पाटाउ : त्रीवडि : आरोगण : रामद्रणेयांचीया माता तेथचि (**अनो.** पींगळबहीरवीं) श्रीचरणां तुळसी वाइलीया.

**७८.** १ **गो.** °कुकडां. २ **हबी.** काकडया°. ३ **गोमु.** दुटी. ४ **पंमु.** द्रव्य. ५ **बी.** दामठयाचे. **मु.** दामाणेयांचे. ६ **बीं.** चींचोके. ७ **पं.** हा प्रढा. ८ **बी.** वाळिति. ९ **मु.** निवडक. १० **मुगो.** सोपान. **गो.** °हे तुकभट.

## ७९ कांटीया सोंकरणें

मग गोसावीं तें वस्त्रें फाडुनि चिंधीया केलीया : दोरीया वळीलीया : गोफण केली : मग बाबुळेवरि उभे राहिले : मग गोसावी भेलवंडी वस्त्रें गुंडीति : आणि 'झा[१] भोरडीए' म्हणौनि[२] गोफणीति : ऐसीया अवघीया चीरटीया सांडिलीया : मग गोसावी खालि उतरले : मग गोपाळीं गोसावीयांसि आरोगणेचें वीनवीलें : "जी जी : गोसावीं आरोगण करावी : मग बीजें करावें :" मग वीनती स्वीकरिली : मग गोपाळीं आपुलालीया मोटा सोडिलीया : बरवा बरवा पदार्थू नीवडीला : तेयांची गोसावीयांसि आरोगण दीधली : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : वीळिचां गोपाळ आपुलेया गावां नीगाले : मग गोसावीं वीळिचां वडनेरेयासि बीजें केलें : ।।

## ८० वडनेरां वटेस्वरां बीजें करणें : लींगाचां देउळीं वस्ति

वीळिचां गोसावीं वटेस्वराचेया देउळासि नीद्रास्थानासि बीजें केलें : तवं राणा धूपार्ती करूनि नीगाला : राणेनि म्हणीतलें : "जी जी : एथ उपकरणें[१] असति : तीएं जाती : म्हणौनि देउळासि कुंचीटाळें[२] घातलें[३] असे : तुम्हीं पैलाडे देउळासि उतरेस्वराचेया नीद्रास्थानासि जा :" तेथ गोसावीं बीजें केलें : मग उतरेस्वराचां देउळीं गोसावीयांसि आसन जालें : पहुडू स्वीकरिला : राणा गावांआंतु गेला : जेविला : नीजैला : आणि मध्याने एकि रात्रीं आठवलें : "ते माहात्मे मीयां तेया देउळासि पाठवीले : तेथ दोनि सर्प असति[४] :" तैसाचि तो नीगाला : तवं वेसीसि कुंचीटाळें पडिलें : मग तो मागुता घरासि आला : च्याऱ्ही पाहार नीद्रा नाहीं : दुख करीतु नीजैला : चडफडीतु होता : "केधवां दीसु उगवैल : मां मीं केधवा जाइन :" ।।

## ८१ उतरेस्वरीं सर्पद्वये पतन

तवं ते सर्प रात्रीं दोन्हीं भांडीनले : ते गोसावीयांचेया वक्षेस्तळावरि पडिले : ते गोसावीं दोन्ही दोहीं श्रीकरीं धरिले : एकु एउता घातला : एकु एउता घातला : उदीयांचि झुंझुरूकां राणा आला : तवं गोसावी चौकीं आसनीं उपवीष्ट असति : मग तेणें गोसावी-यांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग तेणें म्हणीतलें : "जी जी : एथ सापु[१] असति तें मी गोसावीयांपुढां सांघों विसरलां : *मीं रात्रीं येत होतां तवं वेसीसि कुचिटाळें*[२]

---

७९. १ **गो.** थो. **बी.** फुर. **मु.** फु. **एवा.** ये. **एवा.** हो. २ **मु.** °कांटिवन सोंकरिलें.

८०. १ **अभ.** उपक्रणें. २ **भ.** टाळें बेगें घालीजताए. **गो.** टाळें बेगें कीजेते. ३ **पं.** घालीजताए. ४ **एवा.** °आतां जरि जाइन तरि वेसि पडली असे : केव्हळि केव्हळि पाहील : मग केव्हळि जाइन : ऐसें दुख करूं लागला.

८१. १ **अ.** सापु असे तो मी—. २ **पंभ.** कुलुप.

*घातलें होतें जी*[३] :" "गोसावीं श्रीकराचीया आंगुळीया ऐसा अनुकारू केला : श्रीमुखें म्हणीतलें : "एथ दोनि साप असति : ते रात्रीं भांडीनले : एथिचेया उरावरि[४] पडिले :" राणेनि म्हणीतलें : "जी जी : मग काइ केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "उरावरि पडे तेयासि काइ कीजे ? एकें[५] हातें एकु टाकिला : एकें हातें एकु टाकिला :" मग तेयासि आस्चर्य जालें : गोसावीं बीजें करूं आदरिलें : राणेनि पुसिलें : "जी जी : गोसावी कवणीकडे बीजें करिती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें अंबजैएकडे जाइल :" ।।

## ८२ अंबजैए रामदेवां भेटि : अस्तीति

उदीयांचि गोसावीं अंबजैएकडे वीहरणा बीजें केलें : रामदेव वटेस्वरीचे कठीये होउनि वर्तत[१] होते : वटेस्वरीची परिचरीया करीति : ते वटेस्वरासी आले : रामदेवांसि आणि राणेयांसि मैत्र : राणेनि म्हणीतलें : "रामा रामा : मागां जैसीया पुरूखांचीया गोष्टी आइकिजति[२] तैसे एथ इस्वरपुरूख आले होते[३] : काइ सांघों तेयांचें सौंदर्य : काइ सांघों तेयांचें लावण्य : काइ सांघों तेयांचें इस्वर्य : काइ सांघों तेयांचें सामृथ्य[४] : उतरेस्वरीं दोनि सर्प भांडीनले : उरावरि पडिले : एकें हातें एकु टाकीला : एकें हातें एकु टाकिला : ऐसे ते सामृथ्याचे :" रामदेवीं म्हणीतलें : "ते कवणीकडे[५] गेले ?" "ना : आंबजैएकडे जाउनि : म्हणीतलें : ते आतांचि आंबजैएकडे गेले :" मग रामदेव आंबजैएसि आले : तवं गोसावीयांसि वडाचीए पूर्वीली खांदीएवरि लोंबतां श्रीचरणीं आसन असे : एका श्रीचरणां दंडवत केलें : मग दूसरेयाकडे येउनि दूसरेया श्रीचरणां दंडवत केलें : गोसावी खांदीएवरौनि उतरले : तेयांचीए डोइएवरि पांढरें घोंगडें होतें : तें बैसावेया घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : देव पुढां बैसले : गोसावीं कृपादृष्टी अवळोकिलें : आणि गोसावीयांपासौनि तेयां स्तीति जाली : स्तीतिसुख भोगिलें : नावेक बैसले होते : मग स्तीति भंगली : मग[६] रामदेवीं गोसावीयांतें आरोगणें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : रामदेव दधिभातु घेउनि आले : मग रामदेवीं पासवडीएचें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : आरोगण करितां सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेया दधिभातेंसीं आलें होए तरि नीकें होए :" तवं तेयासी आठवलें : "जी जी : असे : परि मीं विसरलां जी :" मग परिवंटीं आलें खोविलें होतें : तें ओळगविलें : मग आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : जाडि आंथुरावेया घेतली : वटेस्वरीं पहुडु जाला[७] : ।।

---

३ (**पंभ.** हीराइसा वासना). ४ **एवा.** वक्षस्तळावरि. ५ **मु.** एणें हातें हा फेडिला : एणें हातें हा फेडिला.

**८२.** १ **अ.** व्रतत. २ **एवा.** आम्हीं करूं. ३ **भपंह.** असति. ४ **मु.** °म्हणौनि रात्रीची व्यवस्था सांघितली : रामदेवीं म्हणीतलें. . . ५ **एवा.** केउते. ६ **रावा.** °गोसावीयांतें वीनउनि वडणेरेयासि घेउनि आले : मर्दनामादणें जालें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला :. . . ७ **एवा.** °त्रीरात्रीं अवस्थान जालें.

## ८३ वासनीए लींगाचां देउळीं वस्ति

गोसावीं बीजें करूं आदरिलें : तवं[1] राणेनि पुसिलें : "जी जी : गोसावी कवणीकडे बीजें करीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जाइल ऐसें वासनीएकडे :" "जी जी : रामु पुसैल तरि काइ सांघों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वटिकातें ऐसें म्हणावें : दीसां दों एइल : मागुतें दरीसन देइजैल :" मग गोसावीं बीजें केलें : नगराआंतु पाणिपात्र करूनि गंगेसि आरोगण होए : लींगाचां देउळीं पहुडु होए[2] : मग मागौतें गोसावीं तेथौनि वडणेरेयासि बीजें केलें : ॥

## ८४ वडातळीं रामदेवां भेटि

वटेस्वरा दखिणीला वडातळिं आसन जालें[1] : तवं रामदेव सेतौनि एत होते : क्षेउर केलें होतें : दोनि वाळुकें हातीं होतीं : रामदेवीं गोसावीयांतें देखिलें : आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : दोन्हीं वाळुकें गोसावीयांचां श्रीकरीं ओळगविलीं : गोसावीयांपुढां बैसले : मग गोसावी भ्रूभंगीचीया खूणा पुसिलें : "तुम्हीं क्षेउर कां गा केलें ?" रामदेवीं म्हणीतलें : "जी जी : आमचे पीते ते भावरीए[2] : ते उदीम करूं देसाउरां गेले

---

**८३.** १ **अहबी.** °रामदेवीं वीनवीलें : "जी जी : मज पुनरपि दरीसन देयावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें वासनीए जाउनि येइल : मग देइल :" २ **एवा.** °दीस तीनि अवस्थान जालें : **मु.** °तेथ वसति जाली : **बी.** (**एवा.**) °गोसावीयांसि वंकनाथीं आसन जालें : तवं महिपाळ नायक गोसावीयांचया दर्शना आले : सरिसा पुत्रही आला : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ हो : तुम्हीं येथ असा ?" "हो जी : मी येथ असे : आलयांगेलयांची सेवा करीं : गये गेलां : वाराणसी गेलां : तुळापुरुषीं बैसलां : डांका डौर वाजवीले : परि माझिया पुत्रासि वाचा दे ऐसा कव्हणी नाहीं :" मग गोसावीं तयाचया पुत्रातें कृपादृष्टी अवळोकुनि म्हणितलें : "तुमचें नांव काइ ?" तेणें म्हणीतलें : "जी जी : माझें नावं सारंगो :" "तुमचया पितयाचें नाव काइ ?" "जी जी : महिपाळ नायक :" "तुमचया मातेचें नाव काइ ?" "जी जी : तिपुराइसें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भले हो : तुम्हीं आदि मध्य अवसान यें तिन्हीं जाणा (तथा : आठवलीं :) इतुकेन तो घरासि गेला : आणि आपुलीये मायेपुढां सांघों लागला : "आइ : मज वाचा जाली :" तवं तिया म्हणितलें : "बा : तुज कवणें वाचा दिधली ?" "ना देउळीं जे गोसावी आले असति : तेहीं :" इतुकेनि तिया सेवया सरवळीं काढिलीं : गोसावीयांकारणें उपाहारु निफजविला : आणि देउळासि घेउनि आली : गोसावीयांचें दर्सन जालें : मग तिया म्हणितलें : "जी जी : संसारीं जन्मलयाचें फळ आजि जालें : गोसावीं माझया पुत्रासि वाचा दिधली :" मग गोसावीयांसि तिया पूजा केली : आरोगण जाली : मग गोसावीं तयासि पाठवणी दिधली : (**एवा.** तें लिंगाचें देउळ : तेथ :) मग मागुतें गोसावीं वडनेरयासि बीजें केलें :

**८४.** १ **एवा.** गोसावी वासनीहुनि एताति तवं रामदेव माळेयावरि बैसौनि सेत राखताति : तेहीं गोसावीयांतें देखिलें : माळेयाखालुतें उतरले : आले : दंडवत घातलें :° **एवा.** गोसावीं वासनीहुनि एताति : तवं गुरुवें देखिलें : तेणें म्हणितलें : "गोसावी क्यें बीजें केलें होतें ? राम भवंतें पाहात होता :" तेणें दादोसापुढें सांघितलें : मग दादोस आले. २ **अ.** भवारीए. **बी.** भावर्ये.

होते : तयांसवें चोर लागले : ते मार्गीं एतां चोरीं उपद्रविले : ते वार्ता गावासि आली जी : तें मीं आचरतु असें : तेयांचें[३] जी सुतक : एऱ्हवीं मीं गोसावीयांसि दधिभातु आरोगण देतां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें एथ काहीं नाहीं :" मग गोसावीयांसि वाटां दधिभातु आणिला : सागळे उदक आणिलें : धोत्राचां पदरीं आलें बांधलें : तेथ वडातळिं गोसावीयांसि आरोगण जाली : मग वटेस्वरीं जाडि आंथुरिली : गोसावीं पहुडु स्वीकरिला : ।।

## ८५ रात्रीं गोपाळीं वसति : आरोगण

मग वीळचां रामदेवीं म्हणीतलें : "जी जी : तेयांचे क्रीयापार करितां उसीरू लागैल : तरि रात्रीं मज एथ एतां अवघड : वेसि[१] पडैल : मग एओं जाओं नैए : तरि गावांआंतु गोपाळाचें देउळ असे : तेथ गोसावीं बीजें करावें जी :" गोसावीं मानिलें : मग गावांआंतु बीजें केलें : रामदेवीं जाडी आणिली : गोसावियांसि आसन रचिलें : गोसावीं आसनीं उपवीष्ट जाले : मग रामदेवीं रात्रीं वाटां भातु : तांबीया दुधु : पापडू : तांबा[२] उदकाभरूनि आणिला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग जाडिचें सयेनासन रचिलें : गोसावीं पहुडु स्वीकरिला : उदैकं गोसावीं बीजें करूं आदरीलें : मग रामदेवीं म्हणीतलें : "जी जी : मीं[३] आचरतें तवं गोसावीं एथ राहावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें एथ न राहे :" मग गोसावीं बीजें केलें : रामदेव वडणेरेयाची सीवंवरि बोळावीत आले : मग रामदेवीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावीं कवणीकडे बीजें करिती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें मेहंकराकडे जाइल :" रामदेवीं वीनवीलें : "जी जी : मज गोसावी कवणी ठाइं पुनरपि दरिसन देति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वीसैएकडे देइजैल :" मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ८६ पातुरडीं[१] समसानवस्त्रनीखेदु

मग गोसावीं पातुरूडासि बीजें केलें : पातुरूडीं नइचीया थडियाथडिया बीजें करीत होते : तवं समसानीं माणुस जाळिलें होतें : तेयाचें वस्त्र गोसावीं श्रीचरणीचेनि आंगुठेनिकरूनि श्रीकरीं घेतलें : श्रीमुगुटावरि घातलें : सीआळे दीस : तें सीत वाजत असे : तेणें हातु[२] फूटत असे : तेथ आणिक अंत्यजु[३] एकु समसान राखतु होता : तो बोबाइला : "हां हां : आमचें राखीचें वस्त्र : दीसवडिचां[४] दीसवडि तुंचि नेसि देखों : सांडि सांडि :"

---

३ **मु.** "जी जी : आमतें दैविक पडलें.

**८५.** १ **अपंभहबी.** वेसीसि कुलुप पडते. २ **एवा.** गाडगा. ३ **मु.** °दीस च्यारि राहावें जी : सुतक सरैल : मग मीं गोसावीयांसरिसा एइन :"

**८६.** १ **भ.** पातुरीं. **गो.** पातौरीं. २ **भहबी.** हाड. ३ **एवा.** मातांगु. **बी.** माहार. **अ.** माणुस. **ह.** मांग अळगुनि°. **गो.** तवं अळगौनि मातांगु बोबाइला°. ४ **अ.** दीसवडिचें वस्त्र तुंचि. . .

म्हणौनि धावीनला : तो जवळा आला : आणि गोसावीं तें वस्त्र उकलुनि दाखवीलें : पाइलें तवं झील ऐसें देखिलें[५] : मग सांडिलें : मग तो ओळगौं लागला : पुढां ए : आड पडे : परि गोसावी मागुतें न स्वीकरितीचि : मग तीये दीसीं गोसावीयांसि वाळुकेस्वरीं वस्ति जाली : मग एरीं दीसीं गोसावीं बीजें केलें : ।।

## ८७ आलेगावीं[१] वस्ति ।।

## ८८ पव्हे रामदेवां भेटि

मग गोसावीयांसि वीसैएचीए[१] वाटेसि पव्है आसन जालें : तवं तेथ रामदेव पानें : पोफळें : घेउनि आले : गोसावीयांसी दरीसन जालें : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : पानेंपोफळें ओळगविलीं : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ८९ वीसैए ब्राम्हणाचे अन स्वीकारू

मग गोसावीं वीसैयेसि बीजें केलें : गावां पुर्वे तळें असे : तेया तळेयाचीये पसिमीली पाळी तीनि देउळें : माझारिलां लींगाचां देउळीं गोसावीयांसि आसन जालें : जवळे रामदेव उगेचि बैसले असति : काहीं स्फुरे ना : आपुलेयाहीं जेवणाची चींता नाहीं : आणि गोसावीयांचीये आरोगणेची चींता नाहीं : तवं देउळासि ब्राम्हणु एकु आला : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : "जी जी : माझेया आवारासि बीजें कीजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे भूकैले असति : यांतें घेउनि जा :" "हो कां जी :" मग ते तेयांतें आपुलेया घरासि घेउनि गेले : ओसरीवरि पाटु बैसों घातला : तांबीया भरूनि दीधला : परूसा गेले[१] : सोव्राअच्मन[२] केलें : ओसरीएवरि बैसौनि पाए धूतले : ब्राह्मणीतें म्हणीतलें : "यांसि वाढा हो :" तेहीं भीतरि ताट केलें : मग तेणें म्हणीतलें : "उठा : चाला : जेवा :" तवं रामदेवीं म्हणीतलें : "आधींचि मीं नेजवीं : माझां[३] धोव्रांचां पालवीं बांधौनि देया : मां मीं तेथ घेउनि जाइन : आधीं गोसावीयांसि आरोगण देइन : मग आम्हीं जेउनि :" मग तेहीं आधीकु वर्णभातु घातला : तेयांचां धोव्राचां पदरीं बांधिला : मग दादोस घेउनि आले : मग गोसावीयांसि

---

५ **एवा.** °जुर्ण वीर्सार्ण ऐसें वस्त्र होतें.

**८७.** १ **एवा.** °गोपाळीं. **एवा.** °लींगाचां देउळीं.

**८८.** १ **शोध.** वसैएचां घाटीं पव्हे°. **एवा.** वीषयीये जवळि पोखरणीचिये पश्र्चिमिली पाळी देउळ : तेथ आसन जालें°.

**८९.** १ **पं.** आचमन केलें. **गो.** असूचन केलें. २ **हृ.** सोव्रासन. **बी.** सोव्रार्चन. ३ **अहबी.** आमचीए झोळीएसि घाला.

आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग आपण जेविले : मग तेथचि लींगाचीए देउळीए पहुडु जाला : प्रभाते गोसावीं बीजें करूं आदरिलें : रामदेव गोसावीयांसरीसें नीगाले : गोसावीं दादोसांतें वीसैएचां प्रांतीं राहाविलें : मग दादोसीं गोसावीयांसि क्षेमाळींगन दीधलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : रामदेवीं म्हणीतलें : "जी जी : मज गोसावी पुनरपि दरीसन कोणी ठाइं देती?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें प्रतेस्थाना प्रांतीं :" मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ९० आंजने वस्ति

मग गोसावीं आंजनेसि बीजें केलें : गावां पश्चिमे तळें असे : तळेया पश्चिमे पुर्वामुख लींगाचें देउळ : तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : ।।

## ९१ मेहंकरीं बोणेबाइयां भेटि

मग गोसावीं एरीं दीसीं वीळिचांचां वेळीं मेहंकरासि बीजें केलें : गोसावीयांचां कटिप्रदेसीं सुडा : श्रीमुगुटीं सुडा : श्रीमुखीं तांबोळ : बाणेस्वराचां देउळीं जगतीचां पसीमीली दारवठां रीगतां डावेया हाता सोंडीएवरि[१] गोसावी चरणचारी उभे असति : बोणेबाइयां भेटि जाली[२] : भीक्षेसि जाति होतीया[३] : तवं गोसावीयांतें सोंडीएवरि उभेयां देखिलें : मग म्हणीतलें : "बाबा : कोणाचीये कुंसीसि होतासि ? बाबा : कोणाची कुंसि[४] उसासिली ? बाबा : ऐसी कोणि पापीणि वीसंवली ?" "हें उगेंचि :" मग गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : आपण कोणीकडौनि एइजत असिजे ?" गोसावीं ऐसें श्रीमुगुटाचेनि अनुकारें आंजनेकडे दाखविलें : "बाबा : आपण काइ वराडाकडुनि एइजत असिजे ?" गोसावीं श्रीमुगुटें मानिलें : "बाबा : आपणेयां नावं काइ ? :" "हें उगेंचि :" तवं[५] तिहींचि म्हणीतलें : "जी जी : तरि[६] आपणेयां नावं काइ मौन्यदेव ?" गोसावीं श्रीमुगुटाचेनि अनुकारें मानिलें : सारंगधरासि[७] पांच लाडु ओगाचें[८] फीटति : तो एकु लाडु भोपे बोणेबाइयांसि देति : तेहीं येकी वाटां लाडुवांची चुरि : साकर : तुप ओळगविलें : गोसावीयांसि आरोगण जाली : सागळ घेउनि आलीं : गूळुळा जाला : वीडा जाला : एरू प्रसादु तेहीं घेतला : मग बोणेबाइं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : आमचीए गुंफेसि बीजें करावें :" गोसावीं बीजें केलें : आसन

---

९१. १ **अ.** °लोंबतां श्रीचरणीं गोसावीयांसि आसन. २ **एवा.** °तीया बाणेश्वराचीया (**एवा.** सारंगधराचीया) बोणेबाइया : ३ **एवा.** सारंगधरूनि एति होतीया : ४ **बीमु.** °उसासुनि निगालासि ? ५ **अहबी.** °तेयाचीया कन्या म्हणीतलें : "हे मौन्यदेव गे :" "जी जी : तरि°. ६ **मु.** °आपण मौनदेवां होइजैल :" ७ **एवा.** तेयासि बोणेया लाडु एति : ८ **एवा.** वोघीचे.

घातलें : "हें जाउनि तेथ बैसलें :" मग बोणेबाइं म्हणीतलें : "बा मौन्यदेव हो : आम्हीं भीक्षा करूनि येउनि : तवं तुम्ही बीढार राखावें :" भीक्षा करूनि आलीं : गोसावीयांसि आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग बोणेबाइं गोसावीयांतें वीनवीलें : "बा मौनिदेव हो : *ये नगरीं जवं असाल तवं उदयां*[९] दूपाहारिची पाणीभाताची आरोगण करावी : वीळिचां भीक्षा करूनि : मग भीक्षेसि जैसें एइल तैसी आरोगण करावी : *कव्हणी लोकां न म्हणावे : आपुलेयां म्हणावें*[१०] *:*" तें गोसावीं मानिलें : मग बोणेबाइया जेविलीया : गोसावीं नीद्रास्थानासि बाणेस्वरासि बीजें केलें : तवं राणेनि म्हणीतलें : "जी जी : देवाचीं उपक्रणें असति : कुचीटाळें घातलें असे : तुम्हीं बहीरवांचेया देउळासि जा :" बहीरवांचेया देउळासि गोसावीं बीजें केलें : तेथ पहुडु स्वीकरिला : अवस्थान जालें :।।

## ९२ बहीरवीं अवस्थान : ज्वारी उपद्रो

बहीरवीं त्रीरात्रि अवस्थान जालें : मग गोसावीयांसि बहीरवीं पहुडु होए : उदीयांचि गोसावीं सारंगधराकडे वीहरणासि बीजें करीति : वीहरणौनि गुंफेसि बीजें करीति : मग दों पाहारां बोणेबाइया पाणीभाताची आरोगण देति : वीळिचां तरि तैसी देति : मग गोसावी बहीरवीं पहुडु स्वीकरीति : एकु दीसीं गोसावीं पहुडु स्वीकरिला होता : तवं माध्याने एकी रात्रीं जुआरीं जुं हारवीलें : ते तेथ आले[१] : गोसावीयांची सकुमार श्रीमुर्ति पांटसुत ऐसी देखौनि[२] श्रीकंठीं नखें घातलीं[३] : तवं गोसावीयांपासि काहीं देखतीचि ना: मग म्हणीतलें : "जी जी : गोसावीं आम्हांसि काहीं खावेया देयावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "यातें काइ असैल मां हें काइ देइल :" इतुलेनि ते गेले :।।

उदीयांसीचि गोसावीं वीहरणासि बीजें केलें : वीहरणौनि बोणेबाइयांचीए गुंफेसि बीजें केलें : आसन जालें : आरोगण करितां : तवं बोणेबाइं श्रीकंठिचीं नखें देखिलीं : "हां बाबा : श्रीकंठीं नखें : काइ जालें[४] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : 'हें उगेंचि :' तवं तेयांसि आन जालें : सामान स्त्री एकाधी एकी आली असैल : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ रात्रीं जुआरीयांचा उपद्रो जाला : ते भवंते हात घालीति : तीएं नखें लागलीं : ते यातें काहीं खावेया मागति : एणें म्हणीतलें : 'यातें काइ असैल : मां हें काइ देइल :' मग ते गेले :" यावरि[५] मौन्य भंगलें : मग बोणेबाइं म्हणीतलें : "बा : मौनिदेव हो :

---

९ (मु.). १० मु. (हीराइसें).

**९२.** १ **मु.** °तिहीं श्रीकंठु स्पर्शिला : तवं श्रीकंठीं नखें ओरखंडलीं : २ **ह.** °स्त्री म्हणौनि. **बी.** °आंधारीं स्त्री म्हणौनि. ३ **एवा.** रोविलीं. ४ **एवा.** "बा मौन्यदेव हो : हेओर खुंडे काइसे ?" ५ **प्रवा.** चोरीवरि.

हें घांटीए नख लागतें तरि पाणीएं दीवा पाजळता बा : आम्हीं राणेयातें म्हणौनि : मग तुम्हीं बाणेस्वरीं नीद्रा करावी :" ।।

## ९३ बाणेस्वरीं अवस्थान

बोणेबाइं बाणेस्वरिचेया राणेयातें[१] म्हणीतलें : "आमचे मौनिदेव बाणेस्वरीं नीजों देयावें :" तवं तेणें म्हणीतलें : "एथचीं उपक्रणें जाती कीं :" तवं बोणेबाइं म्हणीतलें : "उपक्रणें जाति तरि आम्हीं देउनि :" मग बाणेस्वरीं गोसावीयांसि मास दाहा अवस्थान जालें : गोसावी कवाडें घालीति : आगळ घालीति : मग पहुडु स्वीकरीति : ।।

## ९४ गुंफे चोरवीद्रावण

ऐसां एकु दीसु दाराठीयाहुनि[१] बोणेबाइयांचीए गुंफे चोरू रीगाला : भीतरि घांट ऐसा दीवा पाजळतु असे : तेणें आपुली जाडि आंगणीं पसरीली : बोणेबाइयांची वाटी : परीवंट : आणुनि तेथ घातलीं : गुंफेआंतुल पदार्थ आणुंआणुं तेथ घाली : बोणेबाइया देखति : परि बोलति ना : 'जरि कां हाणैल' म्हणौनि[२] : ऐसी तेणें अवघी मात्रा नेउनि तेथ घातली : तो बाहीरि नीगाला : मोट बांधों लागला : आणि बोणेबाइं कवाड घातलें : खीळि घातली : आणि बोबाइलीया : "धावां धावां बा मौन्यदेव हो : नागवलों : चोरू : चोरू :" आणि गोसावी[३] देउळाचां कोनटां उभे राहिले : इखीत खांखरैले[४] : तेणें मागीलि वास पाहिली : तवं याचे ठाए दोनि श्रीमुर्ति वाढीनली : चोरू बीहाला : आणि मोट सांडुनि पौळि उडौनि पळाला : गोसावीं साउमेयां बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ बाइ : कां बोबाता ? बाहीरि या : कवाड उघडा :" बोणेबाइं म्हणीतलें : "आओ : आमचे मौन्यदेव आले ओ : मौन्यदेव आले ओ :" कवाड उघडुनि बाहीरि आलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचें काइ काइ गेलें ?" "सर्वस्व गेलें : बा मौन्यदेव हो :" "बाइ : तरि हे मोट कोणाची ?" बाहीरि आली : मोट सोडुनि पाहिली : तवं अवघेंचि आहे : हरिखैली : "बा मौन्यदेव हो : अवघेंचि आहे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तरि हे जाडि कोणाची ?" "नेणों बा मौन्यदेव हो : हे जाडि चोराची :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि उपराटा चोरचि नागवला म्हणा :" आणि गोसावीं हांस्य केलें : तवं तीहीं म्हणीतलें : "आतां तो जाडिकारणें मागुता येइल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आतां तो नैए :" "बा मौनिदेवा : तो काइसेयासि बीहाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें एवढें एक वाढीनलें : तो तेयासि भीयाला : म्हणौनि मोट सांडुनि पळाला :" ।।

---

**९३.** १ **एवा.** बडुवातें.

**९४.** १ **पंहबी.** दारवठेयाहुनि. २ **एवा.** तो मारील म्हणौनि उगीयाचि होतीया. ३ **एवा.** °बाणेस्वराचीए सोंडीएवरि बीजें केलें : ४ **एवा.** आणि एव्हडी एकि श्रीमुर्ति वाढीनली. **एवा.** सासलु. (**एवा.** सांचोलु) आइकीला : आणि चोरु भीयाला :

## ९५ गोकुळअष्टमी पुजास्वीकारू

एकु[१] दीं गोसावीं उदीयांचि नीद्रास्थानुनि बोणेबाइयांचीए गुंफेसि बीजें केलें : तवं तीहीं आधिली दीसीं माती आणिली होती : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : आजि तुमतें लवडसवड मोटीसी ?" " बा : मौन्यदेव हो : आजि गोकुळाष्टमि :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तरि हे माती काइसी ?" " बा मौन्यदेव हो : तुम्हीं नेणा? आजि गोकुळाष्टमी : आजि श्रीकृष्ण जन्मले : याचा श्रीकृष्णु करूनि[२] : नंदु : एस्वदा : वसुदेओ : देवकी करूनि[२] : गोकुळ करूनि[२] बा : फुलवरा कीजे : व्रत कीजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णु तो काइ मातीएचा ? नंदु : एस्वदा : वसुदेओ : देवकी : तीएं काइ मातीएचीं ? गोकुळ काइ मातीएचें ? तीएं साचोकारीं माणुसें होतीं कीं : श्रीकृष्णु काइ मातीएचा होता ? हें होइल श्रीकृष्णु : तुम्हीं होआ देवकी देवी : एं व्रतस्तें होउनि एथ पुजा करिती : हे माती परती सांडा अवघी :" " हो कां बा मौन्यदेव हो :" माती परती सांडिली : मग गोसावीयांसि आरोगण दीधली : मग गोसावीं वीहरणासि बीजें केलें : ।।

तवं तेहीं सोजी काढिली : वळिवटें वळिलीं : कडकणे पहीलें केलें : पुरीया : घारीया : सोवाळी : सेंगळीं : बुडुडीं : ऐसा फुलउरा केला : तीए दीसीं गोसावीं सकाळींचि वीहरणौनि बीजें केलें : मग गोसावीं आपुलेनि श्रीकरें फुलौरा[३] बांधला : तीयें ओउंओउं देति : गोसावी बांधति : अवघी फळोवळि बांधली : अवघी आइति केली: मग वीळिचां गोसावीयांसि मर्दना : मादणें : आरोगण जाली : मग जेव्हडेया वेळा श्रीकृष्ण जन्मले तीए वेळे गोसावीं श्रीमुर्ति संकोचिली :गोसावीं कामाइसांचीए उसंगीए रीगाले[४] : श्रीमुर्तीवरि बाळकत्वाची प्रव्हा[५] जाली[६] : नागाइसीं तीहीं व्रतस्तें होउनि बरवी पुजा केली : कामाइसीं ऐसा वरता पालौ उपरतौनि दोहीं पदरीं माथा बांधला : खीरि रांधली : वाण दीधलें : गोसावीयांसि मर्दना : मादणें : पुजा : आरोगण येथ जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : तीएं उपवासु करितें होतीं : गोसावीं तेयांतें म्हणीतलें : " बाइ : तुम्हीं जेवा :" "जी जी : आजि गोकुळअष्टमि : मीं व्रत करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देवकीए देवीसि श्रीकृष्ण जन्मले तै काइ तीहीं उपवासु केला ? पेज तऱ्हीं प्यालीचि कीं :" मग तीएं गोसावीयांचीए पांतीसि जेविलीं : सवळेसीचि गोसावीं वीहरणा बीजें करूं आदरिलें : कामाइसीं म्हणीतलें : " बा मौन्यदेव हो : लवकरि या : मग हे तुमचीए पांती पारणें करील : " नागाइसें व्रतस्तें : तेहीं गोसावीयांसि पडदणी दीधली : मर्दना दीधली : मादणें जालें : पुजाअवसरू जाला : मग गोसावीयां आरोगण जाली : मग तेयांसि पांती पारणें जालें : ।।

---

**९५.** १ **प्रवा.** गोकुळ अष्टमीचां दीसीं बोणेबाइ मातीएचें गोकुळ करूं आदरिलें : तवं गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : उकड पासि बैसले : बोणेबाइयातें म्हणीतलें : " बाइ : ऐसें करितां काइ ?" बोणेबाइ म्हणीतलें : " बा मौन्यदेव हो : तुम्हीं नेणा ?—. २ **एवा.** कीजैल. ३ **भ.** पीठौरा. ४ **अआहबी.** °स्थनपान केलें. ५ **अ.** प्रव्हाए. **बी.** प्रभा. ६ **पंबी.** बाणली.

## ९६ सप्त घटां हातु लावणें

एकु दीस गोसावीं उदीयांसीचि वीहरणासि मार्कंडवीहीरीसि[१] बीजें केलें : रीगतां डावेया हाता सीळेवरि आसन जालें : मार्कंडवाडीएची बाइल एकि पाणीयांसि आलीं : तीया घागरि भरिली : गुडुघेयावरि ठेविली : मागांपुढां पाहिलें : तवं गोसावीयांतें सीळेवरि बैसलेयां देखिलें : मग गोसावीयांजवळि आलीं : "बा : नावेक हातु लावा हो :" गोसावीं उठौनि घागरी श्रीकरू लाविला आणि डोइएवरि ठेविली : आणि जाए : मागौतीं आलीं : घागरि भरिली : गुडुघेयावरि ठेविली : गोसावीयांपासि आलीं : "बा : नावेक घागरीसि हातु लावा कां :" गोसावी उठुनि श्रीकरू लावीति : डोइए ठेवीति : आणि जाए : मागौती ए : ऐसा सातां घागरीं श्रीकरू लावीला : तवं तीएचा ब्राम्हणु[२] वीहीरीसि संध्यावंदनासि आला : डोइए कडबेयांचा भारा असे : तो ठेविला : हातपाए धोआवेया म्हणौनि वीहीरीसि आला : तवं गोसावीयांतें आसनीं उपवीष्ट देखिलें : साउमा आला : दंडवत केलें : श्रीचरणां लागला : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया आवारासि बीजें करावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीं तेयांचेया आवारासि बीजें केलें : ओसरीएवरि आसन रचिलें : गोसावी उपवीष्ट जाले : मग तेणें ब्राम्हणीतें म्हणीतलें : "ए हो : गोसावीयांसि दंडवत करि :" मग ते आलीं : गोसावीयांतें तीया देखिलें : आणि म्हणीतलें : "आही : मी म्हणते कोण गोसावी ? एहीं[३] माझीया सातां घागरीं हातु लाविला :" तेणें म्हणीतलें : "पापीणी पापीणी : घालि घालि दंडवत : गोसावीयांकरवि कैसा हातु लाववीला ? " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "पुर्वीं देखिजे तें हेळवाटे[४] :" आणि मग गोसावीयांसि मर्दनामादणें केलें : पुजाअवस्वरू जाला : आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें :।।

## ९७ सामानअस्त्रीयां भेटि

गोसावी उदीयांचि उभीया हाटवटीया बीजें करीत होते : पुर्वपश्चीम हाटवटी : दखिणीली ओळीसि तेयांचीं घरें होतीं : गोसावीं वीहरणासि बीजें केलें : वीहरणौनि मागुतें गोसावी बीजें करिताति : तवं हाटवटीए दोघी सामानअस्त्रीया भेटलीया : एकीं गोसावियांतें देखिलें : सामोरी आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग तीयां गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया घरासि बीजें करावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग तेयांचेया घरासि बीजें केलें : माचेयावरि आसन जालें : श्रीचरण-प्रक्षाळण जालें : तीं गोसावीयांसि फोडी ओळगविलीया : मग वीडीया करूनि दीधलीया : तवं दुसरी आलीं : तीयां म्हणीतलें : "जी जी : मातें द्रव्य आपार[१] असे : परि वायां जात

---

**९६.** १ **एवा.** मार्त्तंड°. २ **मु.** भाताऱू. ३ **मुबी.** (**ही.**) गोसावियांकरवि मियां सातां हेळां श्रीकर लावविला. ४ **अ.** हाळवाटे.

**९७.** १ **एवा.** बहुसाल.

असे : तें भोगी ऐसा पुरूखू नाहीं जी :" गोसावीं एरिचेया तोंडाची वास पाहिली : तवं तीयां म्हणीतलें : "सर गे परती : *ऐसें काइ म्हणतासि*[२] : गोसावी माए : गोसावी बापु : गोसावीयांचें सेवादास्य कीजे :" "मा मा काइ म्हणत असे ?" आणि गोसावी मागुती एरीचेया तोंडाची वास पाहाति[३] : "जी जी : मातें द्रव्य आपार असे : परि वायां जातु असे :" आणि गोसावीं मागुती एरीचीया तोंडाची वास पाहिली : "सरओ परती : गोसावी माए : गोसावी बापु : गोसावीयांचें सेवादास्य कीजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "मा मा : काइ म्हणत असे ?" तवं एरीचे तोंडाची वास पाहाति : मागुती ते म्हणे : "जी जी : मातें द्रव्य बहुत असे : परि वायां जात असे :" तवं गोसावी एरीचेया तोंडाची वास पाहाति : तवं एरि म्हणे : "सर गे परती : गोसावी माए : गोसावी बापु : गोसावीयांचें सेवादास्य कीजे[३] :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं म्हणतसा तें होए : एं म्हणत असति तें नव्हे :" ।।

मग सर्वज्ञें[४] म्हणीतलें : "बाइ[५] : एकीसि ऐसा भाओ : एकाचा ऐसा भाओ :" म्हणौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "भावासि राओराणा नाहीं :" ।।

## ९८ महीकयुध्यनीवारण

एकु दीस गोसावी वीहरणौनि बीजें करिताति : तवं हाटवटीएसि म्हैसे[१] जुझत असति : तो अवघा लोकु माळवधांउपरीयांवरि : पटिसाळांवरि उभा ठाकौनि पाहातु होता : तवं गोसावी म्हैसेयाकडे बीजें करिताति : अवघा लोकु[२] बोबाइला : "आहो आहो माहात्मे हो : साउमे नको जाओं : म्हैसे[१] जुझत असति :" गोसावीं आगाध-चक्रवर्ति बीजें केलें : दोहींमध्यें उभे राहिले : एकासि अवळोकिलें : आणि तेयाचा रोखू हरला : आणि तो भूइं उंघतु उंघतु नीगाला : आणि गोसावीं एरातें अवळोकिलें : आणि तेयाचा रोखू गेला : आणि तो भूइं उंघतु उंघतु नीगाला[३] : अवघेया लोकासि आश्चर्यें जालें : लोकु म्हणे : "जी जी : आजि गोसावीं आमतें राखिलें : एऱ्हवीं हे आमतें नीपट मारिते जी :" मग गोसावीं गुंफेसि बीजें केलें : ।।

## ९९ सोमवारीये लोणारा जाणें

एकु दीं गोसावी उदीयांचि वीहरणा[१] बीजें करिताति : तवं बोणेबाइं गोसावीयांतें वीनवीलें : "बा मौन्यदेव हो : अवघा लोकु लोणारासि सोमवारीएसि जात असे : तरि

---

२ (मु.). ३ मु. °पुडतीं तीया तैसेंचि म्हणीतलें : एरीं तैसेंचि निराकरिलें : (ऐसें तीनि वेळ). ४ बी. °महदाइसाप्रति. ५ एवा. °एकाची ऐसी वासना : एकाची ऐसी वासना :" म्हणौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "वासनेचा प्रतिबंधु नाहीं :"

९८. १ अहबी. °जुझावेया वोथरले असति. २ अहबी. °गोसावीयांतें वारूं लागला—. ३ °एवा : गोसावीं दोन्ही दोहीं श्रीकरीं सींगीं धरिले : सींगीं धरूनि एकु ऐसा केला : एकु ऐसा केला : एतुलेनि दोहींचा रोखू हरिला : एतुलेनि ते भूइं उंघत उंघत नीगाले :

९९. १ पं. वीहरणौनि.

तुम्हीं चाला : जाओं :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : घेया मात्रा :" मग तेहीं मात्रा घेतली : गोसावीं उजूचि कुमारेस्वरा बीजें केलें : कुमारेस्वरीं आसन जालें : तेहीं गोसावियांजवळि मात्रा ठेविली : मग तीएं अष्टतीर्थीया करावेया गेलीया : गोसावी तेयांची मात्रा राखते राहिले : मग तीया अष्टतीर्थीया करूनि आलीया : मग तेहीं मात्रा घेतली : गोसावीं धारेसि बीजें केलें[२] : पटिसाळे आसन जालें : तेथ तेहीं मात्रा ठेविली : गोसावीं गौमुखीं स्त्रीचरणु घातला : मग तेहीं स्नानें केलीं : अवघेया लोका स्नानें जालीं : मग तीया कुंडासि प्रदखिणा करूनि आलीया : परीवंट बांधले : मात्रा घेतली : "बा मौन्यदेव हो : आतां गावांतु चाला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ चाला :" मग गावांतु गेलीया : दैत्यसुदनामागां वाव्य कोणीं मढु : तेथ बीढार केलें : बीढार पाहुनि गोसावीं मागौतें धारेसि बीजें केलें : आसन जालें : बोणेबाइं रंधन केलें : तेयांची धाकुटी बोणेबाइ आली : गोसावियांतें वीनउनि घेउनि गेली : मग गोसावीयांसि आसन घातलें : आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग त्या जेविलीया : रात्रीं दैत्यसुदनामागां वाव्य कोणीं मढु : तेथ गोसावियांसि पहुडू जाला : ।।

एरी दीसीं बोणेबाइया अष्टतीर्थीया करूनि आलीया : मग गोसावीं विहरणासि बीजें केलें : तीया दीसा हाटु : हाटवेळ होये तवं गोसावीं विहरणौनि बीजें केलें : दैत्यसुदनीं आसन जालें[३] : बोणेबाइं रंधनें केलीं : मग गोसावीयांतें वीनवावेया आलीया : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीं बीजें केलें : गोसावियांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : तेथ नावेक पहुडु जाला : उपहुडु जाला : मग तीया हाटाआंतु गेलीया : पानें पोफळें घेतलीं : दूणीची आंगी टोपरें सीविलें : उपाहानौ घेतलीया : तवं तेथ नावेक अवेळ जाली : मग तेहीं म्हणीतलें : "बा मौन्यदेव हो : चाला ना : अवघा लोकु नीगौनि गेला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ घेया मात्रा :" तेहीं मात्रा घेतली : मग गोसावीं मेहंकरासि बीजें केलें[४] : ।।

## १०० लोणारमार्गीं चोरूकुमति हरणें

मग गोसावीं अवळा वेळीं बीजें केलें : मार्गीं जातां गोसावीं नावेक स्रमु स्वीकरिला : सेरेयापासि[१] मार्गीं वीहीरि : तेथ पींपळु : तेयातळीं आसन जालें : चरणक्षाळण जालें : वीडा जाला : मग गोसावीं बीजें केलें : एणीएपरतें मार्गीं कांटीएतळीं आसन जालें : चरणक्षाळण जालें : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग गोसावीं बीजें केलें :

---

२ **पं.** °धारे गौमुखावरि सीळ होती : तीएवरि लोंबतां श्रीचरणीं आसन जालें : धारे गौमुखावरि श्रीचरणु घातला—. **प्रवा.** °गोसावीयांसि साजां आसन जालें : ३ **एवा.** °गावांतु वस्ति जेयाचीया वासना : दैत्यसुदनीं विहरणस्थान जालें. ४ **एवा.** गोसावीयांसि आरोगण जाली : पहुडु नाहीं : तैसेंचि बीजें केलें.

१००. १ **पं.** स्यारेयापासि.

गोसावी जुझमालाचेया देउळापासि पावले : पव्हेसि आसन जालें : श्रीचरणप्रक्षाळण जालें : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं बीजें केलें : तवं[२] पींपळापासि चोर देखिले : बोणेबाइ म्हणीतलें : "बा मौन्यदेव हो : चोर आले :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भेओं नको :" तवं ते सामोरे आले : तवं गोसावीयांतें देखिलें : "आरे : हे गोसावी रे गोसावी :" म्हणौनि जुहारू करूनि भवंताले उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा माहात्मे हो : जें होउनि आलेति तें कां कीजे ना ?" "ना जी : काइ गोसावीयांचां ठाइं कैसें करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें काइ पाहाता ? हें[३] आहे तें तुम्हीं घेया : हें भीक्षु माहात्मे : यांसि आणीक कव्हणी देइल :" "जी जी : हें गोसावीचि नेसावें आणि गोसावींचि पांगुरावें : जी जी : गोसावीं अवळा वेळीं कैसें बीजें केलें ? गोसावीयांसि सरिसें कोण्ही माणुस नाहीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : तुम्ही असा : नव्हे ? काइसी अवेळ ?" मग गोसावीं बोणेबाइयाकरवि वीडा देववीला : तीएं च्यारिच्यारि पानें : एकएक पोफळ देत होतीं : मग गोसावीं पुडवाटुवा झाडुनि तांबोळ दीधलें : मग तेथौनि गोसावीं बीजें केलें : ते गोसावीयांतें बोळवीत नीगाले : गोसावी तेयातें राहावीत होते : परि ते न र्‍हाति : तीहीं म्हणीतलें : "जी जी : आमचे पुढां आणीक असति : ते मांग ओखटे : ते गोसावीयांचां ठाइं उपद्रो[४] करिती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें एथ कव्हणी काहीं न करी :" मग गोसावीयां-सवेंचि आले : पुढां ते : मागां गोसावी : ते सौंदरासंगमाचीए लवणीसि होते : तेयां एरएरां खूण जाली : तवं तेहीं म्हणीतलें : "हे गोसावी रे गोसावी रे :" मग एरएरां तांबोळें जालीं : एरएर गोसावीयां सरिसेचि नीगाले : मान्हवडेयांसि वाट फांके : तवं बोळवीत आले : तेथौनि ते मान्हवडेयाकडे गेले : गोसावीं उजुचि बाणेस्वरासि बीजें केलें :।।

## १०१ सींहस्ता यात्रे जाणें

सींहस्तु आला : तो अवघा लोकु त्रीयेंबका सींहस्ता यात्रेसि नीगाला : बोणेबाइ गोसावियांतें वीनवीलें : "बा मौन्यदेव हो : अवघा लोकु त्रीयेंबका सींहस्ता यात्रेसि जातु असे : तरि तुम्हीं चाला : जाओं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ चाला[१] :" मग गोसावियांसि

---

२ **एवा.** °एणीए उतरीलु ओहळु : तेथौनि चोर नीगाले : **एवा.** गोसावी जुझमालाचेया देउळापासि पावले आणि पव्हेआंतुनि चोर नीगाले : बोणेबाइया बोबाइलीया : "धांवा धांवा बा मौन्यदेव हो : नागवलों : चोर : चोर :" गोसावीं म्हणीतलें : "बाइ : भ्या नको : पुढें होआ :" गोसावीं झडझडकरूनि तेयांपुढां बीजें केलें : "हें काइ ? हें काइ गा माहात्मे हो ?" आले : भवंताले उभे ठेले : "जुहारू देवा : जुहारू देवा :" तेहीं म्हणीतलें : "हें काइ जी ? गोसावीं उसीरू केला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्ही असा नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे काइ गा माहात्मे हो : जें होउनि आलेति तें कां करा ना ?"—. ३ **एवा.** दोनिच्यारि पांगुरणें असति तीएं तुम्हीं घेया : यासि कव्हणी आणिक देइल : हे नीस्फुर माहात्मे. ४ **एवा.** खस्ता.

**१०१. १ शोध.** °ते सीयाळे दीस—.

दुणीची[२] आंगी : टोपरें सीविलें : वाहाणा[३] बांधलीया : मग तेहीं कणीकितांदुळां पोतीं भरूं आदरिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काहीं घेओं नको : वाटेसि मीळैल :" *बोणेबाइं म्हणीतलें : "बा मौनदेया : साना गावीं वेसजु[४] न जोडे : तरि थोडेंबहुत तऱ्हीं घेओं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें पुढें जोडैल[५] :"* परि तेहीं *काहीं काहीं*[५] घेतलेंचि : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## १०२ नदी उपान्हौ त्यागु

मार्गीं बोणेबाइया मागां चालति : गोसावी पुढां एति : एकु दीं गोसावी मागां राहिले : गोसावी पेणी[१] पावले : पेणी[१] बोणेबाइया उतरौनि पैलाडि गेलीया : गोसावीं उपान्हौ *फेडूनि तेथचि*[२] प्रत्येजुनि बीजें केलें : *ऐसां मार्गीं चालतां*[२] बोणेबाइं माघुती वास पाहिली : तवं गोसावियांचां स्रीचरणीं उपान्हौ नाहीं : मग गोसावीयांतें पुसिलें : "बा मौन्यदेव हो : उपान्हौ काइ केलीया ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीया नदीचीए पैली थडीए राहिलीया :" *"कटकट बा : आम्हां पुढां सांघतेति कां तरि आम्हीं घेतों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जा : तीया तेथचि असति*[२] *:"* मग तिये मागौतीं गेलीं : उपाहान्हौ घेउनि धावंतें आलीं : गोसावियांचां श्रीचरणीं उपान्हौ ओळगविलीया : मग नदी देखति तेथ मागां राहाति : उपान्हौ घेति : *मग नदी उतरलेयां*[२] गोसावीयांचां स्रीचरणीं ओळगवीति : ऐसें प्रतीस्थानपर्यंत करीत आलीं : ।।

## १०३ मार्गीं प्रतदीनीं बोणें

गोसावी मार्गी बीजें करितां गाउं पावति : गावांबाहिरि[१] देउळीं आसन होए : तेथ पव्हा आपारू राहिला असे : तवं कव्हणी एकु लोकु गोसावियांचें सौंदर्य देखौनि : तांदुळ : कणीकि : तुप : दहीं : दूध : नारीएळें : पानें : पोफळें : आपार घेउनि एति[२] : गोसावीयांसि ओळगवीति : गोसावी म्हणति[३] : "बाइ : तुम्हांसि लागे तें घेया : एर माघौतें देया :" मग तीएं लागे तेंचि घेति : एर माघौतें पाठवीति[४] : बोणेबाइया उपाहारू नीफजवीति : मग गोसावीयांसि आरोगण होए : गुळुळा होए : वीडा ओळगवीति : मग आपण जेवीति : उदीयांसेया[५] गोसावीयांकारणें ठेवीति : मग बोणेबाइं म्हणीतलें : "बा मौन्यदेव हो : तुम्हां वारीतवारीत कणीकि तांदुळ घेतले : तें आम्हांसि ओझेंचि जालें बा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथौनि तुमतें वारिलें होतें कीं : कीं हें घेओं नकों : पुढें मीळैल :" ।।

---

२ **भ.** दुतळी. ३ **एवा.** उपानहौ. ४ **गो.** °मीळे न मीळे. **पं.** °माहांग. ५ (**मुबी.**).

**१०२.** १ **गो.** °सेदुर संगमापासि. २ (**मु.**).

**१०३.** १ **मु.** मग एकाधां देउळीं कां पडवीये आसन होए :—. २ **मु.** °ते अवघे बोणेबाइ बीढारा घेउनि जाति : ३ **मु.** °बाइ : अवघें वेचा : ठेवा ना : ४ **एवा.** देति. ५ **ह.** उदयांसीचिया. **गोबी.** उदेयांचीये.

## १०४ रावंसगावीं माहादेवो पाठकांचा पाणीभातु : बाबुळसेंगा आरोगण

मग रावंसगावां पव्हा गेला : गंगेचीए थडीए पव्हा राहिला : तो तीर्थाचा गावुं : तेथ गोसावीयांसि[१] आसन जालें : बोणेबाइं मात्रा ठेविली : स्नान करूनि आलीया : संप्रयोगू[२] होइल म्हणौनि आधिली दीसीं अवघेंचि वेचिलें : गोसावीयांलागि काहीं ठेवितीचि ना : म्हणौनि[३] लवकरि रंधन करूं रीगालीया : गोसावीं क्षुधा स्वीकरिली : गोसावीं सीधनाथासि माहादेवो पाठकांचीए गुंफेसि बीजें केलें : गोसावीं *दारसंका धरूनि*[४] ऐसें ओणवौनि पाहिलें : तवं माहादेवो पाठक गुंफेआंतु समोर बैसले होते : तेहीं गोसावीयांतें देखिलें : साउमे आले : "एइजो जी : एइजो जी :" म्हणौनि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांतें आपुलीए गुंफेआंतु घेउनि गेले : गोसावीयांसि आसन जालें : स्रीचरणप्रक्षाळन केलें : गोसावीयांसि पाणीभातु बाबुळसेंगा आरोगण दीधली : गुळुळा जाला : मग गोसावीयांसि तेथचि पहुडु जाला : बोणेबाइं रंधन केलें : धाकुटी बोणेबाइ गोसावीयांतें बोलावुनि घेउनि गेलीं : गोसावीयांसि आसन घातलें : "बा मौन्यदेव हो : आजि भूकैलेति : जेउं बैसा :" गोसावीयांसि स्रीमुखप्रक्षाळण : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : मग तीया जेविलीया : सीधनाथा वाव्य पव्ह उतरला होता : तेथ वस्ति जाली : ॥

## १०५ प्रतेस्थानीं बाइसां भेटि

मग तेथौनि प्रतेस्थानासि पव्हा आला : तेया पव्हया सांगातें गोसावीं प्रतेस्थानासि बीजें केलें : भोगावतीये चौकटीवरि[१] गोसावीयांसि लोंबतां स्रीचरणीं आसन जालें : बोणेबाइं मात्रास्नानें केलीं : अष्टतीर्थीया केलीया : मग मात्रा घेतली : मग गोसावीयांतें वीनवीलें : "बा मौन्यदेव हो : चाला गावांतु जाओं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ तुम्हीं जा : हें मागिलाकडौनि एइल :" "ना बा मौन्यदेव हो : हें नगर थोर : एथें हातें हातु न पविजे : तुम्हीं चुकाल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें[२] एइल ऐसें चोजवीत चोजवीत :"

मग तीएं पुढां गेलीं : बाइसांचीए गुंफेसि आलीं : बाइसांसि तेयांसि ओळखि होती : बाइसांसीं भेटि जाली : मग बाइसांपुढां गोसावीयांचे गुणवीसेख सांगों लागलीं : "आओ नागुबाइ : आम्हां सांघातें एक मौन्यदेव असति :" गोसावीयांचीया लीळा सांघों आदरिलीया : "काइ सांघों तेयांचें सौंदर्य : काइ सांघों तेयांचें लावण्य : काइ सांघों तेयांचें सामृथ्य :" ऐसीया गोसावीयांचीया आश्चर्याचीया गोष्टी सांघों लागलीं : चोरांची

---

**१०४.** १ **गो.** °सीधनाथीं. २ **ह.** संप्रगु. **मु.** तो गावो तीर्थाचा म्हणौनि बोणेबाइया सीदोरी न ठेवीतिचि. ३ **मु.** उसीर होइल म्हणौनि. ४ (**बो.**).

**१०५.** १ **एवा.** °खालि. **एवा.** सोंडीएवरि. **एवा.** खांबाचीए पटिसाळे पसिमीली सीरां—. २ **अहबी.** °मागिलीकडौनि पुसत पुसत एइल.

गोष्टि सांघीतली : म्हैसेयाची गोष्टि सांघीतली : इतुलेनि बाइसांसि वेधु संचरला : बाइसीं म्हणीतलें : "ते कवणी ठाइं असति ?" बोणेबाइं म्हणीतलें : "ना भोगावतीए राहिले असति :" मग बोणेबाइया छायागोपाळीं बीढार घेतलें : मग बाइसें भीक्षेसि गेलीं : भीक्षा करूनि आलीं : तांबवटीयेसि तुळसी होतीया : वामदेवांचीए[३] गुंफेसि नीगालीं : तवं[४] गोसावी भोगावतीचीए खांडीहुनि बीजें करिताति : गोसावीयांचां स्रीचरणीं उपान्हौ : स्रीमुगुटीं दुणीची आंगी श्रीकरेंकरूनि ऐसी पुढां धरिली असे : तवं[५] नरसींहांचीए पौळिपैलीकडे गोसावी पसीमिली वाटाचि बीजें करिताति[६]: तेथ बाइसांसि भेटि जाली : बाइसीं गोसावीयांतें देखिलें : आणि उभीं राहिलीं : बाइसीं म्हणीतलें : "हे पुरूख ए नगरीचे नव्हति : बोणेबाइं सांघीतले ते होती :" बाइसीं पुसिलें[७] : "आपण काइ मेहंकराकडूनि एइजत असिजे ?" गोसावीं श्रीमुगुटें मानिलें : "आपणेयां सांघातें काइ दोघी एकी बाइया असति ?" गोसावीं श्रीमुगुटें मानिलें : "आपणेयां नावं काइ मौनिदेव ?" पुडती गोसावीं स्रीमुगुटें मानिलें : "तरि चाला जाओं आमचीए गुंफेसि :" गोसावीं बीजें केलें : बाइसें पुढां : गोसावी मागां : बाइसीं पाएपुसणें ओटेया-खालि बैसावेया घातलें : गोसावीयांसि आसन जालें : *मग हंसुबाइतें म्हणीतलें : 'हंसुबाइ : माहात्मेयासि पाणिभातु देया :' दीधला : मग गोसावीयांसि*[८] दुधीकरंटां पाणीभाताची आरोगण जाली : मग बाइसें गोसावीयांतें पुसों लागलीं : "बा मौन्यदेव हो : आपण माहात्मेयां आपणांसि काइसा त्रीयंबकु ? हें प्रतीस्थान नगर बरवें : एथ पींपळेस्वरासारिखें तीर्थ : आपण येथ असावें : येथ आपुलेयां म्हणावें : कोण्ही लोकु न म्हणावें : येथ पाणीभातु घेयावा : भोगनाराएणीं नीद्रा करावी : आपणेयां काइ करावें असे त्रीएंबकु ? आपण राहिजे तेथचि त्रीएंबकु :" मग गोसावीं भोगनाराएणीं बीजें केलें : गोसावीयांलागि आंथुरावेया बाइसीं जाडी दीधली : मग गोसावीं पहुडु स्वीकरिला : ।। एकांकि ।।

## १०६ त्रीएंबका न वचणें

एरीकडे बोणेबाइं रंधनें केलीं : गोसावियांची मध्यानेकि[१] रात्रि वाट पाहिली : मग म्हणीतलें : "हें थोर नगर : मौन्यदेव चुकले : *पारि चुकती कीरूं ना*[२] *:* तरि कवणी ठाइं जेविले असती : आणि काइ :" *ऐसें व्यवस्तौनि*[२] आपण जेविलीया : मग उदीयांचि गोसावीं बाइसांचीए गुंफेसि बीजें केलें : बाइसीं कवाडाआड ओटेयाखालि पाएपुसणें बैसावेया

---

३ **एवा.** ब्रह्मचारीदेवाचीए. **एवा.** वाट पाहावेया नीगाली. ४ **हबी.** तवं वीळिचांचेया पाहारा एका भोगावतीएसि गोसावीं क्षेउर केलें : भोगावतीचीए खांडीहुनि——. ५ **मु.** तवं पार्वती सोमनाथापासि नृसिंहाचीये जगतीचां अग्नि कोनीं भेटि जाली. ६ **हबी.** °नृसिंहमठा आग्नि कोणीं सांकड ऐसी गोदरी : तेथ बाइसां भेटि जाली. ७ **मु.** "आपण कवणीकडौनि येइजत असिजे ?" गोसावीं श्रीमुगुटें खणा दीशा सांघितली : तवं बाइसीं म्हणीतलें : "ऐसें लोणार मेघंकराकडौनि ?" पुडती गोसावीं श्रीमुगुटें मानिलें : बाइसीं म्हणीतलें : "आमचीये मठीयेसि चाला :" ८ [**मुबी.** (**हीराइसें.**) ].

**१०६.** १ **मु.** रात्रीचां पाहारा एकु. २ (**मु.**).

घातलें : गोसावीयांसि आसन जालें : तवं सवंळेसीचि बोणेबाइया आलीया : बाइसांतें म्हणों लागलीया : "नागुबाइ नागुबाइ : आमचे मौन्यदेव नैएतीचि : *नीच रंधन होए : आणि एति : कालि न एतीचि : तारि काइ हें थोर नगर म्हणौनि*[२] चुकले : *पारि चुकति कीरू ऐसें नव्हति : तारि काइ कव्हणी जेवावेया नेले*[२] *?"* तवं बाइसीं म्हणीतलें : "ते पुरूख भलेतेथ असती : माहात्मे नव्हति ? जेथ गेले तेथिचेचि[३] :" ऐसें जवंजवं बाइसें म्हणति तवंतवं हंसराजु उंबरेयावरि बैसौनि भीतरि गोसावीयांकडे पाहाति : आणि तेयांकडे पाहाति : आणि मुर्खीमुर्खी हांसति : तवं तीया *उपान्हौ देखिलीया*[२] *:* सामोरीया आलीया : तवं तेहीं गोसावीयांतें देखिलें : *आणि बाइसांवारि धागाइली*[२] *:* "हें काइ ओ नागुबाइ : आमचे मौन्यदेव एथ असति : मा तरि तुं सांघसि ना ? आमचे मौन्यदेव तुम्हीं चाळ्वीले[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें: "बाइ हें एथ असे :" *मग गोसावीयांतें म्हणीतलें : "चाला चाला बा मौनदेया : सांगातु नीगाला*[२] *:"* मग तेहीं स्त्रीचरणीं उपान्हौ मेळवीलीया : गोसावीं म्हणीतलें: "बाइ चाला :" मग बाइसीं म्हणीतलें : "बा मौन्यदेव हो : एथ एइजे हो : हें बीढार आपुलें म्हणिजे हो : आमतें पडिताळिजे हो : कोण्ही लोकु न म्हणिजे हो :" मग गोसावीं बीजें केलें : पुढें बोणेबाइया : तेयां मागें गोसावी : गोसावीयां मागें बाइसें[५] : बाइसें गोसावीयांची व्यावृति करीति : "बा : आपण माहात्मेयां : आपणेयां काइसा त्रीयंबकु ? जेथचि माहात्मे तेथचि त्रीयंबकु : तेथचि सकळ तीर्थें : हें प्रतीस्थान नगर बरवें : पींपळेस्वरासारिखें तीर्थ : चक्रतीर्थ : ढोरेस्वरासारिखें तीर्थ : मुधादैत्यासारिखें तीर्थ :" ऐसी व्यावृति करितें लोणारखांडिवरि गेलीं : लोणारखांडीपासी राहिलीं : लोणार तीर्थी पव्हा उतरत होता : तेथ गुडघेयां इतुकेयां पाणीयांतु गोसावीं बीजें केलें : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आतां हें त्रीयेंबकासि नैए :" तवं बोणेबाइं म्हणीतलें : "कां बा नैया ? तुमचेनि आम्हांसि त्रीएंबकु होता : तीर्थ होतें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना बाइ : आतां हें नैए : यालागि इतुका ऐसा त्रीएंबकु एथचि आणा :" म्हणौनि गोसावीं मागुतें ऐलि थडीए बीजें केलें : मग धाकुटी बोणेंबाइ नागाइसें : तीएं ऐलि थडीएसि उपान्हौ घेउनि आलीं : गोसावीयांचां स्त्रीचरणीं ओळगविलीया : मग म्हणीतलें: "बा मौन्यदेव हो : आमचें ओखटेंगोमटें पोटीं सामविजे हो : *आम्ही येवों तवं एथचि असा : मग गावां जावों :" गोसावी उगेचि : मग तीया नीगालीया*[६] *:* मग[७] गोसावीं

---

३ **अहबी.** °जेथचि माहात्मे तेथचि तीर्थ : आणि माहात्मेयांसि काइसा त्रीएंबकु ?" ४ **मु.** °तवं बाइसीं म्हणीतलें : "हें काइ ओ : हे माहात्मे : यांसि काइसा त्रींबकु ? हे जेथ असति तेथचि तीर्थ :" तवं बोणेबाइ म्हणीतलें : "हे काइ ओ : तरि आम्हीं आपुलेयां मौनदेयांतें नीनुं ? चाला बा मौनदेया हो :" ५ (गोसावियांच्या मागें बाइसा त्यांना बोळवीत गेल्याचा वृत्तांत **मुभ.** प्रतीत नाही. त्या पाठांच्या मते बोणेबाईसह गोसावी गेल्यानंतर बाइसा आपल्या गुंफेतच राहिल्या होत्या.) या पोथीत आलेले मूळ पाठ **शोध.** म्हणून मुरारीमल्लवासाच्या पोथीत घेतले आहेत. याचा अर्थ असा की हा पाठ **मु.** पाठापूर्वीचा आहे. ६ (**मु.**). ७ **मु.** मग गोसावी देउळें मढ अवलोकीत अवलोकीत पाहारां दीढां एका बाइसांचीये गुंफेसि बीजें केलें : बाइसीं म्हणीतलें : "बा मौनदेया : राहिलेति कीं तें चांग केलें हो : आपण जेथ असिजे तेथचि तीर्थ :" म्हणौनि पाएपुसणें बैसावेया घातलें : "हांसुबाइ :

बाइसांकडे बीजें केलें : बाइसीं गोसावीयांतें प्रतलेयां देखिलें : तीएं लोणारखांडिचेया टेकावरि उभीं ठाउनि पाहातें होतीं : गोसावीयांतें देखिलें : आणि हरखैलीं : सामोरीं आलीं : "भलें केलें बा मौन्यदेव हो : राहिलेति : आपण माहात्मेयां : आपणयांसि काइसा त्रीएंबकु : जेथचि माहात्मे तेथचि त्रीएंबकु : हें प्रतीस्थान नगर बरवें : पींपळेस्वरू : ढोरेस्वरू : चक्रपाणि : केदारू : मुधादैत्यु : एथिचीं सकळै तीर्थें :" ऐसी व्यावृति करितें पुढां तीयें मागां गोसावी ऐसी गुंफेसि घेउनि आलीं : पाएपुसणें घेउनि बैसावेया घातलें : मग हंसराजें बाइसांसि पुजा केली : बाइसें गोसावीयांचिए दृष्टीसमोर बैसलीं : मग गोसावीयांसि पाणीभाताची आरोगण दीधली : *मग बाइसीं म्हणीतलें : "बा मौनदेया : आपण जवं ये नगरीं असिजैल तवं एथ पाणिभातु घेयावा : वीळिचां भीक्षा मागौनि तैसें जेवावें : भोगनाराएणीं नीद्रा करावीं : हें आपुलें ऐसें मानावें :" ऐसें पुडतीपुडती म्हणीतलें : गोसावीं मानिलें*[८] *:* मग भोगनाराएणि पहुडु स्वीकरिति : ।।

## १०७ बाइसां स्तीति

मग एरी दीसीं सवळेसीसि हंसराजें सडासंमार्जन केलें : चौकरंगमाळिका भरिलीया : मग आपुलें आणि बाइसांचें : दोन्हीं धोत्रें घेउनि गंगेसि गेलीं : धोत्रें धूतलीं : सुचीएमतें जालीं : सागळ भरूनि घेउनि आलीं : धोत्रें वाळों घातलीं : मग पूजाद्रव्यें मेळवीलीं : मग ओटेयावरि आसनावरि[१] आसन रचिलें : गोसावीं उदीयांसीचि[२] बाइसांचीए गुंफेसि बीजें केलें : पूर्वामुखें मोकळवाळिचें देउळ : तेथ बाइसांची गुंफा : ओटेयाखालि कवाडाआड दखिणिली भीतिसीं बाइसीं पाएपुसणें बैसावेया घातलें : गोसावीयांसि उतरामुखें आसन जालें : मग बाइसें : ओटेयावरि आसन : तेथ कानवडीं ऐसीं बैसलीं होतीं : मग बाइसांसि हंसराजें पुजा करूं आदरिली : गोसावीं बाइसांतें दृष्टीं अवळोकिलें : *दीठी दीठि मिळे*[३] आणि बाइसें ऐसीं[४] खालुती वास पाहाति : *गोसावियांची दृष्टि चेपे ना*[३] *:* मागुतें गोसावीं दृष्टीं अवळोकिलें : आणि मागुतीं तेहीं खालुती वाया दृष्टि केली : मागुतें गोसावीं अवळोकिलें : आणि तेहीं वरौती दृष्टि केली : आणि दृष्टी दृष्टि मीनली : आणि दृष्टी-सरिसें *उत्तम*[३] प्रेम संचरीलें : ऐसें वेज दीधलें : आणि वेज[५] घेतलें : आणि ऐसें आपणेयांतें ओटेयाखालुतें दडकरि स्रीचरणांवरि घातलें : "पापीणि बाबा : पापीणि बाबा : नेणेंचि : चुकलीएं बाबा : चांडाळि बाबा : सुळीं वळघलीएं होतीएं बाबा :" म्हणौनि श्रीचरणांवरि लोळणि घातली : ओटेयावरि झाडुनि बरवें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट

---

माहात्मेयांसि पाणिभातु देया :" तेहीं मागिलाचि परि दीधला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : मग बाइसीं म्हणीतलें : "बा मौनदेया : आपण जवं ए नगरीं असिजैल—. ८ (**मु.**).

**१०७.** १ **गो.** घडियावरि घडिया ऐसें आसन रचिलें. २ **मु.** पाहारा दीढां. ३ (**मु.**). ४ **हबी.** °खालुती दृष्टी केली. ५ **अ.** वेजें.

जाले : श्रीचरणप्रक्षाळण जालें : श्रीचरणोदक घेतलें : मग बरवीं पुजाद्रव्यें आणिकें आणिलीं : मग बरवा पुजाअवस्वरू केला : पालमांडां बरवा मंगळ दीवा उजळिला : स्तीतिमंतें जालीं : आठै सात्वीक प्रकटिले : पालमांडें थरारिलें : रोमांच दाटले : मग पालमंडें खालि ठेवुनि पांच दंडवतें घातलीं[६] : मग बाइसीं उतम तांदुळ वेळिले : सोजीची पोळी केली : ऐसा चोखटु उपाहारू नीफजविला : मग गोसावीयांसि पालमंडां आरोगण दीधली : मग बाइसीं गोसावीयांसि गुळुळा करूं घातला : मग गोसावीयांसि वीडा ओळगविला : मग तेथौनि बाइसें गोसावीयांचीए सेवेसि प्रवर्तली : मग प्रतदीनीं बाइसें तीन्हीं पुजाअवस्वर करीति : ऐसी गोसावीयांची सेवा करीति : गोसावीयांचां उचीष्टु प्रसादु घेति : मग बाइसें सोरठी जाडि : भोगनाराएणा नेति : भोगनाराएणीं जाडिचें सएनासन रचीति : गोसावी तेथ पहुडु स्वीकरिति : ।।

## १०८ हंसराजा स्तीति

हंसराजु तीएं भकों लागलीं : वामदेवां पांडेयापुढां सांगों लागलीं[१] : "आमचा पयोर्वतियांचा मार्गु या नागुबाइया नासिला : कवण नेणों माहात्मा[२] येकु गुंफेआंतु घातला असे : तेयासि पुजा करीति असे : तेयाचें पाएवणीं घेति असे : तेयाचें उचीष्ट घेति असे :" ऐसें नीच भकों लागलीं : मग एकु दीसीं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : इयें हांसुबाइसि काहीं कीजो कां : हे काहीं म्हणीएं व्यापारू करूं न लगे : आणि पांडयापासि[३] जाउनि काहीं भकति असे :" मग एकु दीसीं गोसावीयांसि ओटेयावरि आसन असे : तवं बाहीरिलाकडौनि हंसराजु गुंफेसि आलीं : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "हंसराजा : या :" आणि तेयां स्तीति जाली[४] : सुख जालें : *सर्वज्ञें बाइसांतें म्हणीतलें : " बाइ : जीवासि बोध आणि बोधशक्ति ते एथौनीचि कीं : कव्हणा एका माहात्मेयांचिये आधारीयेसि शब्दवेधीया रसु असे : तो वाटा जातु असे : रात्रीं नगरांतु तोवें तांबें घडत असे : रसातें स्पशौनि शब्दु ये : माघौता तेथचि विलया जाए : तोवें तांबें असे तें सोनें होए : तैसें परमेस्वराचेया शब्दापासौनि एका वेधु संचरति*[५] " हंसराजा स्तीति जाली : भोगिली : भंगली : मग तीएहीं गोसावीयांचें सेवादास्य करूं लागलीं : सागळ भरूनि आणीति : पुजा करूं लागति : ऐसी गोसावीयांची आवडि संचरली : ।।

---

६ **अगोपंबीमु.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "म्हांतारीएचां स्वरूपीं त्रीदोखू एकु होता : तो तीं दीसां एथौनि दरिसन : सन्यधान देउनि फेडिला : मग प्रेमकळिका एकि संचरिली :"

**१०८.** १ **मु.** °"हें काइ जालें सांपें नागुबाइसि : चळली काइ ? एसणा पयोव्रतियांचा मार्गु—. २ **भ.** दादुला. ३ **पं.** पांडेयापें. ४ **मु.** °आणि श्रीचरणांपासि लोळों लागलीं : "जी जी : मी पापीणि जी : मी गोसावीयांसि भकें : गोसावीयांची नींदा करीं :" मग तीएहीं गोसावीयांचें सेवादास्य करूं लागलीं : —. ५ (**दृपा.** ७ 'शब्दवेधिया रसाचा दृष्टांत'. ७ 'प्रतिष्टानीं बाइसाचिए प्रथम भेटीसि निरोपिला : हंसराजा स्तीति : ए लीळेवरि :'—**दृस्थ.**)

## १०९ पांडेया स्वप्नीं नामस्वीकारू

पांडे ते गोसावीयांवरि भकों लागले : "इतुके दी नागुबाइ चळली : आतां हांसुबाइही चळली : माहात्मे एक गुंफेआंतु घातले असति : तेयांसि पुजा करिते असति : तेयांचें पाएवणीं पीते असति : तेयांचें उचीष्ट खाते असति : आमचा पयोवर्तीयांचा मार्गु : अवघीयां मार्गासि वरीष्ट : आमचा पयोवर्तीयांचा मार्गु नासिला : तेयांसि बोलु लाविला : आतां सांघैन वामदेवांपुढें : मां यां माहात्मेयांतें बाहीरि घालवीन[1] :" ऐसें नीच भकति : *मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा पांडा भकत असे : काइ करूं ?" गोसावी उगेचि[2] :* तवं एकु दीं रात्रीं तेहीं[3] सपन देखिलें : दोघ जण आले : बाबरझांटि : गुंजावर्ण डोळे : खांदावरि मुदगल : ऐसें जमजूत आले : मग म्हणति : "आरे[4] : हे द्वारावतीकार श्रीचांगदेओराउळ : साक्षात ईस्वरू : यांतें तुं ऐसें कैसें रे म्हणतासि ?" म्हणौनि मुदगलवरि मारूं रीगति : तवं गोसावी आड रीगति : 'नको नको बापुडा मारूं : हा[5] तैसा नव्हे :' म्हणति : श्रीकरें वारीति : मागुतें ते म्हणति : "हां रे : हे द्वारावतीकार श्रीचांगदेओराउळ : गोसावी : साक्षातु ईस्वरू : यातें तुं ऐसें कैसें रे म्हणतासि ?" म्हणौनि ते मुदगलवरि मारूं रीगति : तवं गोसावी आड श्रीकर ओडवीति : ऐसे चाऱ्ही पाहार दुख भोगिलें : कासावीस केलें : उदीयांसीचि चेवो आला : उठिले : बाइसां बोबाओं लागले : "आओ नागुबाइ : आओ नागुबाइ : आओ हांसुबाइ : या कां ओ आरूतीया :" तवं बाइसीं म्हणीतलें : "जाए कां हांसुबाइ[6] : पांडा कां बोबातु असे ? उन्हवणीं तरि तापत असे :" तवं हंसुराजु गेलीं : तेयांतें म्हणीतलें : "आओ : तुं कां आलीसि ? आओ : नागुबाइतें धाडि कां ओ :" हंसराजु मागौतीं आलीं : "बाइ : पांडा तुमतें बोलाविताए :" मग बाइसें गेलीं : रात्रीचें वृतांतु सांगीतलें : "आओ नागुबाइ : हे गोसावी कवण ऐसें तुं जाणसि ना :" तवं बाइसीं म्हणीतलें : "ना नेणों :" "आओ : हे द्वारावतीकार श्रीचांगदेओराउळ गोसावी : आओ : गोसावी बोलावि कां ओ : मग मीं तेयां गोसावीयांसि दंडवत करीन[7] :" तवं बाइसें हरिखैलीं : सुख जालें : गोसावीयांतें बोलाउं आलीं : गोसावीयां भोगनाराएणीं आसन होतें : बाइसीं विनवीलें : "बाबा : पांडा बोलावीत असे तरि तेथ बीजें कीजो कां बाबा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ तेयाचीये नाथेचा बैलु : ऐसें तेयाचिया बोलविलयां येइल :" "ना बाबा : बीजें करावें :"

---

**१०९.** १ **पं.** घालिन. **ह.** घालुनि. २ **(पंबी.)**. ३ **मु.** तयांसि स्वप्न जाला. ४ **मु.** "हां रे : हे कवण पुरुषु नेणसि ? हे द्वारावतीकार श्रीचांगदेओ राउळ : नीच गोसावीयांसि तुं भकेसि : यांची तुं नींदा करिसी :" ५ **मु.** बापुडा नेणेचि (**शोध.** हा काइ जाणत असे ?) ६ **गो.** हांसाइ. ७ **अपं.** °बाइसीं हंसराजु बोलावुं पाठवीली : ब्रह्मचारिदेवाचीए गुंफेसि बोलवावेयासि गेली : "जी जी : बाइसें बोलावीतें असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ बाइसाचें काहीं लागे ? (**एवा.** "हें काइ बाइसांचीए नाथेचा बैलु ? मा जीकडेजीकडे नेइजैल तीकडेतीकडें हें जाइल :") आणि हंसराजु लाजिलीं : ऐसीं गेलीं : मग बाइसें हरिखैजतें हरिखैजतें गोसावीयापासि आलीं :—.

मग गोसावीं तयांचीए गुंफेसि बीजें केलें : तेयांची धाकुटीऐसी सांकड गूंफा होती : ते रुजाग्रस्तऐसे होते : उंबरेयाबाहीरि दोन्हीं स्रीचरण : ओटेयावरौनि सरळि घातली : श्रीचरणांवरि माथा ठेविला : मग ओटेयावरि बरवें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांचें श्रीचरणप्रक्षाळण केलें : चरणोदक घेतलें : मग अवघी गोष्टि गोसावीयांपुढां सांघीतली : "आओ नागुबाइ : हे द्वारावतीकार स्रीचांगदेवोराउळ गोसावी : एहीं आजि मातें राखिलें ओ : म्हणौनि वांचलां ओ : एऱ्हवीं मारितें :" तवं बाइसीं म्हणीतलें : "हां बाबा : बाबा नावं काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडा म्हणत असे तेंचि :" पांडेन वीनवीलें : "जी जी : मज दूधतुपेन मखता आपुला उचीष्ट प्रसादु पाठवावा : तें मज पथ्य : आणि श्रीचरणउदक तें मज उदक :" मग गोसावी दूधतुपेन मखता प्रसादु पाठवीति[८] : तैसेंचि दीसां दों चौं सरले[९] : ॥

## ११० भोगनाराएणीं माएधूआं भेटि

*गदोनायकाचियें ब्रह्मपुरीए माएधवांचें घर : तीया कहीं प्रयागीं स्नान करीति : तोचि देवो पाहाति : कहीं लोणारीं स्नान करीति : तोचि देवो पाहाति : कहीं पींपळेश्वरीं स्नान करीति : तोचि देवो पाहाति : आदीत्यवारीं भोगावतीयेसि महीमा : तीए दीसीं असिका लोकु भोगावतीएसि स्नान करी : ऐसां एकु आदित्यवारु आला[१] :* गोसावीयांसि भोगनाराएणाचीए पटिसाळेवरि आसन असे : तवं माएधुआ दोघी : तीया भोगावतीसि स्नाना जाती होतीया[२] : तवं लेंकीं गोसावीयांतें देखिलें : आणि माएतें म्हणीतलें : "चाल ओ : जाओं या देउळासि : हें देउळ कहीं देखिलेंचि नाहीं :" तैसीयाचि तीया भोगनाराएणासि आलीया : लेंकीं गोसावीयांतें देखिलें : सामोरी आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : श्रीमुर्ति पाहाति होती : माता भीतरि गेली : देवता पाहिली : आणि आलीं : *माता म्हणीतलें : "हां वो : देवो पाहावया आलीसि परि देवो पाहासीचि ना :" ते उगींचि होतीं : माता म्हणीतलें[१] :* "चाल गे जाओं :" लेंकि बैसलीं होतीं : ते नीरोधें उठिलीं : तैसाचि जरू आला : भोगावतीए गेलीया : स्नानें केलीं : मग घरासि आलीया : तैसीचि लेंकि नीजैलीं : तवं अवस्था प्रगटों सरली : माता पाहिलें : तवं *लेंकीसि देह जाए ऐसा*[१] जरू आला असे : मातेसि लेंकि थोर पढीए : ते[३] तीएसि धांवांधावि करूं लागलीं : माता पुसिलें : "आगे आइ : तुज काइ काढापाचन करूं ? काइ सीतपथ्य करूं ?" तवं तीयां

---

८ **मु.** मग पांडेही गोसावीयांचे जाले : ॥ ९ या लीळेनंतर **गो.** प्रतीत पुढील माहिती दिलेली आहे : "बाइसीं त्रीदोखू होता : वयवृधत्व : तपोनीवृतत्व : मार्गश्रेष्टत्व : बाइसांचेया गुरू नावं सूमृताबाइसें : वामदेव आणि सूमृताबाइसें यें दोघें गुरुभांवडें होतीं : पांडे : हंसराज यें दोघें बाइसांचीं गुरुभावांडें : ॥

**११०. १ (हबी.)**. २ **मु.** °तीहीं जातिये वेळे गोसावीयांतें दारवठेयांतुनि सन्मुख देखिलें : गेलीया : भोगावतीये स्नानें केलीं : तीयाचि वाटा मागौती आलिया : तवं लेकीं म्हणितलें. . . . ३ **मु.** काकुलती

म्हणीतलें : "आइ : मज काहीं करावें न लगे : भोगनाराएणीं जे पुरूख भेटले[४] तेयांतें आणिसी तरि माझें देह वांचैल : एऱ्हवीं जाइल :" "हो कां आइ :" मग माए भोगनाराएणासि आलीं : तवं गोसावीयांसि तेथचि आसन असे : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांपुढां अवघी गोष्टि सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काइ म्हणत असा ?" तीया म्हणीतलें : "जी जी : गोसावीं तेथ बीजें करावें जी :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मासळी असे : ते पाणियांतु वीतुवीतु जाए : मागौतें परतौनि तेयांतें दृष्टी पाहे : अमृत कळा असे ते संचरे : तयातव तींयें वाढति : तैसें परमेस्वराचियें दृष्टीपासौनि एका वेध संचरेति*[५] *:"* मग गोसावीं वीनवणी स्वीकरीली : तेथ बीजें केलें : तीयें उठिलीं : *गोसावीयांसि क्षेमाळींगन दीधलें*[६] *:* दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं[७] : मग तेहीं मातेतें म्हणीतलें : "आइ : तुं रांधि : गोसावीयांलागि बरवा उपाहारू नीफजवि : मीं गोसावीयांसि मर्दना देइन :" मग तेहीं गोसावीयांसि पडदणी दीधली : मर्दना दीधली : *जवंजवं मर्दना देति तवंतवं जरू काढे*[८] *:* मादणें जालें : पुजा जाली : आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा जाला : आपण[९] प्रसादू घेतला : मग गोसावी बाजेसुपवतीएवरि पहुडू स्वीकरिला : उपहुडु जाला : तेहीं चरणक्षाळण केलें : मग गोसावीं[१०] भोगनाराएणा बीजें केलें : ॥

## १११ ग्रहेसारंगपाणि भेटि : तथा ग्रहोनीवृति

ग्रहेसारंगपाणिभट ते बळ्हेग्रामिचे : दादोसां काहीं सोएरे होति : तयांसि ग्रहो लागला असे : तेयांचीया माता म्हणीतलें : "हा रामा : तुं काहीं जाणसि : तरि या सारंगपाणीचां आंगीं ग्रहो असे तो[१] फेडि कां :" दादोसीं म्हणीतलें : "माझेनि जाए ऐसेंहीं आथि : आणि न वचे ऐसेंहीं आथि : आमचेयां गोसावीयांपासौनि जाइलचि :" तवं तेहीं म्हणीतलें : "ते कवणी ठाइं असति ?" "ना ते प्रतेस्थानीं भोगनाराएणीं असति :" मग तैसींचि प्रतीस्थानासि आलीं : तेयांसरिसें सारंगपाणी : चांगदेवोभट आले : वीळिचां घडिया दों भोगनाराएणीं गोसावीयांसि आसन होतें : आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : दादोसीं दोनि आसुं दरीसनासि केलीया : मग गोसावीयांपुढें बैसले : मग गोसावीं पुसिलें : "बाइ : या नावं काइ ?" "जी जी : याचां आंगीं

---

करूं लागली. ४ **मुहबी.** °तयांचें मज दर्शन होइल तरि—. **पंगोगो**$_{१}$**,गो**$_{२}$ °ते भेटवीसि तरि. . . ५ (**दृपा.** ५. 'मासळीएचा दृष्टांत' 'माएधुवांप्रति भोगनाराएणीं निरोपिला : ' –**दृस्थ.**) ६ **मुरागो**$_{३}$ या प्रतीत हे वाक्य नाही. **हबी.** °तैसाचि अरधा ज्वरु गेला : ७ **मुरागो**$_{३}$ °आसन रचिलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : माता पुजाद्रव्यें आणिलीं : पाणी ठेविलें : उपहारु नीफजविला : दोघी मर्दना दीधली : मार्जनें जालें : येतुलेनि तीयेचा ज्वरु गेला. ८ (**गोगो**$_{१}$**,गो**$_{२}$). ९ **गो**$_{१}$**,गो**$_{२}$ लेकीं. **मुरागो.** तीयेचि ताटीं दोघीं जेउं बैसलीया : १० **गो**$_{२}$**,गो**$_{३}$ °आपुलेया नीजस्थानासि बीजें करूं आदरिलें : नीगतां समैं तीया दाटुनि क्षेमाळींगन दीधलें : तेणें जरुसेख होतें तें नीसेख गेलें : मग गोसावीं बीजें केलें : ॥

**१११.** १ **अ.** °जाए ऐसें काहीं करि कां.

ग्रहो असे म्हणौनि ग्रहेसारंगपाणिभट म्हणति :" मग तेहीं अवघी गोष्टि गोसावीयांपुढें सांघीतली : "जी जी : रामु आमचा सोएरा : मीयां म्हणीतलें : 'रामा : तुं जरि काहीं जाणसि तरि काहीं सारंगपाणीसि करि कां :' तवं एणें म्हणीतलें : 'माझेनि याचा ग्रहो जाए ऐसेंही आति : आणि न वचे ऐसेंही आति : आमचेया गोसावीयांचेनि दरीसनें जाइलचि :' *जी जी : तारि याचां आंगीं ग्रहो असे तो फेडिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें पाणिभातु असे ?" "हो बाबा : असे :" "तरिं तीन मुदा करुनि यातें ओवाळुनि सांडा*[२] *:"* तवं बाइसीं म्हणीतलें : "हां बाबा : हा बटीकु तरि सावदू ऐसा दीसतु असे : याचां आंगीं ग्रहो तरि काहीं देखिजे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एकी वारीया दोघ[३] असति : *एथचेया दर्शनासि एतां एवों न ये*[२] म्हणौनि[४] ते पैऱ्हां *महारवाडा*[५] बाबुळेसि राहिले असति :" मग गोसावीं पाणीभाताचीया दोनि मुदा करविलीया : तेयांतें ओवाळुनि जेया वाटा आलीं तीए वाटेसि ठेविलीया[६] : *मग तीहीं उपहारु निफजविला : गोसावीयांसि आरोगण जाली : मग तीं नीगालीं : नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जया वाटा आलीति तया वाटा नको जाओं : आणिकी वाटा जा :" तीहीं म्हणीतलें : "कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते वाट पाहातातिं*[२] *:* बाइ : दृष्ट वैर चुकवीजे :" मग तीएं आणिकी वाटा गेलीं : ।।

## ११२ देइभटां भेटि : स्तीति*

[एकु दीं भोगनाराएणीं देइभटां भेटि जालीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांपासि बैसले : आणि स्तीति जाली : भोगिली : भंगली : मग बीढारासि गेलें: ।।]

## ११३ लखुबाइसां भेटि*

[एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें भोगनारायेणीं आसन जालें : लखुबाइसें दर्शनासि आलीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : पासि बैसलीं : नावेक होतीं : मग गेलीं : ।। ]

## ११४ वामदेवांचिये गुंफे गमन*

[एकु दीं गोसावी वामदेवांचिये गुंफेसि बीजें केलें : तीहीं गोसावीयांतें देखीलें : "येइजो जी : येइजो जी :" म्हणौनि संभ्रमें साउमे आले : ओटेयावरि आसन रचिलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : थोरु मानु केला : तें देखौनि तयांचिया सीष्यां आश्चर्ये जालें :

---

२ (**मु.**). ३ **एवा.** तीघ. ४ **अहबी.** एथ आले म्हणौनि. **एवा.** हा एथ आला म्हणौनि. ५ (**हबी.**). ६ **अहबी.** °मग तीयांतें आणिकां वाटां पाठवीलें (**एवा.** तीया आपबुधीचि गेलिया :) मग तीएं आणिकीं वाटा गेलीं : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दृष्ट वैर चुकवावें :"

**११२.** [* **अआपंभगो.** प्रतीत ही लीळा नाही. इतर प्रतीत ती आढळते. पूर्वापरसंबंधाला आवश्यक म्हणून **मु.** प्रतीतून ती येथे घेतली आहे. ]

**११३.** *(**मु.** १९).

**११४.** *(**मु.** ८) **मु.** प्रतीत **शोध** म्हणून ही लीळा येथे घातली आहे. अन्य प्रतींत ती नाही.

ऐसें गोसावीं तयांचिये गुंफेसि भलतेधवां बीजें करिति : कव्हणी नमस्कारा ये तें आधीं गोसावीयांसि दंडवत करी : पाठीं तयांसि : मग ते आपुलीयां सीष्यांकरवि ऐसें आंधारीं आसन घालवीति : आपण समोर प्रकाशीं बैसति : आंधारीं पुजा करवीति : मग गोसावी बीढारा बीजें करिति : ।। ]

## ११५ सारंगपंडितां भेटि

*देइभटीं गोसावीयांचें बरवेंपण : चातुर्ये : सूंदर्ये : सारंगपंडितांपुढां सांघितलें : तीहीं पुसिलें : "ते कवणे ठाइं असति :" "ना भोगनारायेणीं असति :" गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरू जाला : श्रीकंठीं गळदंडा : आंगीयेचे मोकळे कसे*[१] *:* गोसावी भोगनाराएणाचीए[२] पौळीसी ओतपळी घेत होते : तेथ गोसावीयांसीं भेटि जाली[३] : सारंगपंडीत गदोआळीएसि गदोनाएकांचीए[४] मातेपुढां पुराण सांघों जात होते : सरीसे मोकानंद होते : सारंगपंडितीं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग पुसिलें : "जी जी : पुनरपि दरीसन कवणी ठाइं दीजैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें चासाकडे :" सारंगपंडीत गदोआळीयेसी पुराण सांघों गेले : पोथी सोडिली : दोनि[५] एक स्लोक वाखाणिले : आणि मागौती पोथी बांधली : तवं गदोनाएकाचीया माता म्हणीतलें : "आजि लवकरि पोथी बांधली ?" सारंगपंडितीं म्हणीतलें : "आजि पाहुणे आले असति : मज काहीं प्रयोजन असे :" म्हणौनि काखे पोथी घालुनि नीगाले : मोकानंदातें म्हणीतलें : "मोकानंदा : तुं घरासि जाए : उपाहाराची आइति करवावी :" आपण[६] चासाकडे गोसावीयांपासि आले : तवं चासीं गोसावीयांसि आसन असे : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग प्रस्णु केला : "जी जी : द्वापरीं श्रीकृस्णचक्रव्रतीपासौनि अक्रत्रीम अनंदू होए : तैसा[७] आतां कव्हणी ठाइं आथि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहिजे[८] : पुसिजे : चर्चिजे : मा आति तेथ आति :" मग गोसावीयांपासौनि तेयां स्तीति जाली : केतुला एकु काळ भोगिली : मग भंगली : मग सारंगपंडितीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया घरा गोसावीं

---

**११५.** १ (**मुहबी**.). २ **मु.** °अग्निकोनीं नगरपौळीबाहीरि खीडकीयेचिये सोंडियेवरि ओतपळी—. ३ **एवा.** गोसावी वीहरणासि बीजें करीत होते. . . तवं सास्त्रमढापुढां भेटि जाली : **प्रवा.** गोसावी वामदेवांचिये गुंफे बीजें करीत होते : तेथ भेटि जाली. ४ **मुरागो**₃ °गदोभांडारियाचेया घरा—. ५ **मु.** दाहा. ६ **पंगोगो**₁**गो**₂ °**रावा.** आपण तैसेंचि वांमदेवाचीए गुंफेसि आले : वांमदेवासि आणि गोसावीयांसि बोटेयावरि आसन असे : आधीं गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग वामदेवासि केलें : दुसरां दीसीं वामदेवीं म्हणीतलें : "चांगदेवराउळ एति तरि ओटेयाखालुते बैसों घालावें : कवाडा आड :" तवं गोसावी तेथ बीजें न करीतीचि : सारंगपंडीत तेथ गेले : ते पाहों लागले : "कालि एथ पुरुष होते ते कें हो ?" "ऐसे एथ कीती येताती :" तीं म्हणीतलें : "ना एतु भलतेतुके : तेहीं काइ करावें ? ते कें हो तें सांघा :" "ना तेयांसि बाहुल्यें चासाकडे खेळु :" मग चासापासि आले : ७ **एवा.** °अन्यत्र आति ?" ८ **रावा.** "एथ पाहिजे ते सकळै आति :"

बीजें करावें :" गोसावीं वीनती स्वीकरिली : मग गोसावीयांतें आपुलेयां आवारा घेउनि आले[९]: देव्हारचौकीएसि भीतरीलीकडे गोसावीयांसि आसन घातलें : गोसावीयांसि मर्दना देओं आदरीली : ओलणी तेल चीकसा आणिला : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "आतांचें तवं कपीलस्नान हों देया :" मग गोसावीयांसि चौरंगावरि आसन जालें : दों गंगाळीं पाणीं सारिलें : धुतलेया वस्त्राची चौरंगावरि घडी घातली : एकि गंगाळां आंगवसा तीमीति : श्रीमूर्ति परिमार्जिति : दुसरीये गंगाळीं आंगवसा धुति : ऐसें ऐसें कापड-मादणें जालें : कपीलस्नान जालें : सोनेयांचीया मेखा जेया श्रीखंडासि मारिलीया होतिया तें चंदन गोसावीयांसि सर्वांगीं वोळगवीलें : पूजा केली : धुपार्त्ती : मंगळार्त्ती केली : मग उमाइसांकरवि ताट करवीलें : गोसावीयांसि ताटावरि आसन जालें : आड लावणें लावीलें : सारंगपंडितासि मुकुंदासि ताट खालि : ऐसी गोसावीयांसि आरोगण जाली : सारंगपंडितासि प्रसादु जाला : उरला तो मोकानंदें घेतला : उमाइसीं [१०]मोकानंदातें म्हणीतलें : "हें काइ रे बा : मजलागि काहीं ठेवाचि ना ?" तेहीं म्हणीतलें : "काइ[११] करूं आइ : तुझेया वरैता माने ना :" मग उमाइसीं उसिटें सांडिलें होतें तेथिचीं सीतें वेंचिलीं : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीयांसि तेथचि पहुडू जाला : मग वीळिचांचां वेळीं गोसावीं बीजें केलें : तवं बाइसीं म्हणीतलें : "कें बीजें केलें होतें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पांडेयाचेया घरा :" "तरि मातें कां चुकवीलें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां न चुकविजे :" ।।

## ११६ तथा ज्वरनीवृति

एकु दीं गोसावी वाटा बीजें करीत होते : वैजनाथापासि आले : तवं देउळ करितां देखिलें : गोसावीं पुसिलें : "पांडेया : हें देउळ कवण करवीत असे गा ?" "जी जी : रायाची[१] राणी वैजाए : जी जी : ते ब्राह्मणा वृति[२] देति असे जी : सेत : घर : आंथूरण : बाज : म्हैसि : बटीकि : साटि आसु : ऐसी वृति देति असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं कां जा ना ?" तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं[३] काइ हो जी तेथ[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : न पुसत तुमचें नावं वैहें[५] लीहीती :" मग सारंगपंडीत[६] गेले : तवं मोटकीं वैजाराणी भद्रीं बैसलीं होतीं : सनमानु केला : बैसों घातलें : पुसिलें : "तुम्हीं कवण ?"

---

९ (यापुढील, स्नानाचा, पूजेचा व आरोगणेचा वृत्तांत फक्त **अ.** पोथीतच संक्षिप्तपणे आला आहे तो असा : °देव्हारचौकीये पटिसाळेवरि कापड मादणें जालें : पूजा जाली : भीतरि आरोगण जाली : हा वृत्तांत येथे **पंगोहबीमु.** प्रतींतून घेतला आहे.) १० **अहभ.** °उमाइसें स्परिसे होती. **बी.** उमाइसें अस्परिसें होती. ११. **एवा.** "तें मी काइ जाणें : तुझा वरैतु जाणे :"

**११६.** १ **गो.** माहदेयाची. २ **पं.** व्रीति. **बी.** वृत्ति. ३ **पं.** °आम्ही काइ बोलों जाणत असो जी मुर्ख ?" ४ **मुपंगोगो**$_1$**,गो**$_2$ °ते प्रक्षा पाहों पाहों देति असे. ५ **पंह.** वहीए. ६ **बीमु.** °कटका.

"ना आम्हीं पैठणकर सारंगपंडीत :" "लीहा गा याचें नावं :" परीक्षा[७] नव्हतां वैद्य[८] नावं लीहीलें[८] : *सासनीं जवं नावं पडावें*[९] तवं जरू आला : बीढारा आले : मोकानंदाकरवि दांडी भाडेनि करवीली : गावां आले : बाहीरवाहीरें गोसावीयांचेया दरीसनासि आले : भोगनाराएणासि आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग अवघी वेवस्ता सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "न्हा : जेवा : मां ज्वरू जाइल :" मग ते घरासि गेले : न्हाले : जेविले : मग ज्वरू गेला : मागौते[१०] गेले : *सासनीं नावं पडिलें*[९] *:* वृति दीधली : आसु एकी : म्हैसि : बटीकि : इतुकें घेउनि आले : घरासि गेले : न्हाले : जेविले : नीजैले : एरी दीसीं गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : केधवां आलेति गा ?" "जी जी : कालि आलां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ भेटों नैयाचि तें काइ ?" "जी जी : भागलां : न्हालां : जेविलां : तवं उसीरू जाला : मग नैएंचि जी : मग नीजैलां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडया : ज्वरू वाट पाहातु असे गा :" "जी जी : तो गेला कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो भोगिलेयावांचौनि[११] काइ जाइल ? तो भोगें क्षाळावा : तो काइ आतांचि कीं पाठीं :" "हो कां जी : तरि आतांचि एओ : *पैऱ्हां तऱ्हीं भोगावाचि कीं : तारि सन्निधानींचि भोगुं*[१२] *:*" मग आला : गोसावीयांचा उचीष्ट प्रसादु तेंचि पथ्य : चरणोदक तेंचि उन्हवणीं : बावीस[१३] दी जरू होता : मग गेला : मग गोसावीयांतें आपुलेया आवारा घेउनि गेला[१४] : गोसावीयांसि पडदणी दीधली : मर्दना जाली : मादनें जालें : मग उरलेया तेलांआंतु आणीक तेल घातलें : उरलेया चीकसेयांआंतु आणीक चीकसा घातला : उरलेया पाणीयांआंतु आणीक पाणी घातलें : तेणें आपण न्हाले : मग पुजाअवस्वरू· जाला : मग ताटें केलीं : आपण सीत घेउनि बैसले : गोसावीं अवघेयांसरिसें वाढवीलें : मग आरोगण जाली[१५] : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग बीढारासि बीजें केलें : ।।

## ११७ उपाध्यां भेटि

ग्रहसारंगपाणिभटांसांघातें चांगदेवोभट आले होते : गोसावीयांचेया दरीसनासि : ते मागौते गावांसि गेले : उदीयांसीचि गंगेसि गेले : तेथ उपाध्यांसि भेटले : मग तेहीं उपाध्यांतें म्हणीतलें : "जानो जानो[१] : आम्हीं जैसेयां पुरूखांचीया गोष्टी करूं तैसे पुरूखू प्रतेस्थाना आले असति[२] : चांगदेवोराउळ गोसावी साक्षात इस्वरपुरूख : काइ

---

७ अ. परक्षा. ८ **अहबी.** °बीढारा आले तवं जरू आला. ९ (**पंगो.**). १० **मु.** °परिबाहिरें कटका गेले. ११ **एवा.** °न वचे. **एवा.** काइसेनि जाइल ? १२ (**मु.**). १३ **एवा.** सतरा. १४ **शोध.** °बाइसें : हंसराज : गोसावी : ऐसें बीजें केलें : १५ **शोध.** °बाइसां : हंसराजां पांती जेवणें जालीं :

**११७.** १ **गोगो.** °मागां जैसेया पुरुषाचीया (**एवा.** महात्मेयाचीया) गोष्टी आइकीजति तैसे– : २ **मु.** °तीहीं म्हणीतलें : "तरि तयांचें दर्शन मज करि कां :" "हो कां :" "तरि तुं कै जासी ?"

सांघों तेयांचें सौंदर्य! काइ सांघों तेयांचें लावण्य! काइ सांघों तेयांचें इस्वर्य! काइ सांघों तेयांचें सामृथ्य! एसी? जाओं तेयांचेया दरीसना :" "*हो कां : तरि तुं कै जासी?*" "*ना पाहे*[३] *:*" तवं उपाधीं म्हणीतलें : "*मां पाहेचा दीस राहे*[३] *:* माझी पासवडी धों[४] घातली असे : ते एओं दे : मां जाओं :" तें नागदेवोभटीं आइकिलें : *पासवडी धुतली आली : रात्रीं दोरा घालताति : तवं लाहामाइसीं म्हणीतलें : "हा रे बा : येव्हडेया वेळा दोरा घालितासि : उदयांचि घालि कां :" तवं नागदेवोभटीं म्हणीतलें : "आवो*[३]*:* आतां हा उधळला : जाइल जोगीयांभवती कां पाठीं :" उदयांचि उठिले : गोसावीयांचेया दरीसना नीगाले : उपाधीं म्हणीतलें : "आइ[५] : सीदौरी घालि[६] :" लाहामाइसीं म्हणीतलें : "सीदौरी काइ करिसी?" "ऐसें पुससी तरि मीं एंचि ना :" "हो कां रे बा : तरि कैं एसी?" एइन दोंचौं दीसां :" सीदौरी घातली : मग गोसावीयांचेया दरीसनासि आले : ।।

गोसावीयांसि भोगनाराएणीं देउळाआंतु आसन होतें : भीतरि आले : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : आसनीं उपवीष्ट असति : *चांगदेवोभट : उपाध्ये : आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीं पुसिलें "हा कोण?" "जी जी : हा आमचा मैत्र :" दुपाहारीचा पुजाअवस्वरू बाइसीं केला : तव*[७] उपाधीं बाइसांतें पुस्प मागीतलें[८] : तेयाचीं पत्रें वेगळालीं केलीं : तांबवटीए द्रभा[९] होतीया : तीया घेतलीया : मग[१०] वेदिची रूचा म्हणीतलें : 'सहस्रसीर्सा : पुरूखा :' ऐसा मंत्र म्हणति : आणि पत्र .वाति : मग साष्टांगीं पुस्पाअर्चन केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीव जीवां अर्चन घडे : परि परमेस्वरअर्चन कहींचि न घडे :" आणि बाइसीं म्हणीतलें : "बाबा घडवीति तरि घडे :" ।।

## ११८ तथा तांबोळग्रहण

एकु दीसीं गोसावीयांसि वीळिचांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावीं वीडा घेतला होता : *तीहीं गावां जावयाचें पुसिलें : बाइसें राहावीतें होतीं : तवं न म्हातीचि : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : बाइसें म्हणतें असति तें कां कीजे ना?" "ना जी : गावीं अवसरि करिति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वींळिचां एकलेयां जावों जाणाल?" "जी जी : आम्हीं एकलेयां*

"ना पाहे :" "मां पाहेचां दीस राहे : माझी पासवडी धुतली येइल : मग परवां जावों :" तें नागदेवोभटीं आइकिलें? ३ (**मुहबी.**). ४ **पं.** खळुं. ५ **मु.** वोहिनी : **पं.** एक म्हणति भाउजैएतें सीदौरी मागितलीं. ६ **मु.** °मी गावां जाइन :" तवं लाहामाइसें दुख करूं लागलीं : इतुलेनि सीदोरी नेघतां नीगों आदरिलें : मग लाहामाइसीं म्हणीतलें : "आरे बा : कैं येसी?" चांगदेवोभटातें म्हणीतलें : "म्हण : हा दीसां दों येइल :" ७ (**मुरा.**). ८ **मु.** °अक्षता मागीतलीया : ९ **बी.** दर्भा. १० **मु.** °अपसव्य करूनि तीथिश्रवण केलें : मंत्र म्हणौनि पुजा केली :

*एथ अखंड यवों जावों :" गोसावीं म्हणीतलें : "तारि तुम्ही धीरवीर म्हणा[१] :"* उगाळु परित्येजितां उपाधीं आंजुळि ओडवीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : हें काइ कवण : ऐसें म्हणौनि नेणां : एथचें[२] उसिटें तांबोळ काइ म्हणौनि घेत असा ?" उपाधीं म्हणीतलें : "जी जी : आपुलेया भलेयाचीया चाडा :" "मां तुमचीं तीयें घरीं तुम्हांसि रीगों नेदिती कीं :" उपाधीं म्हणीतलें : "नेदिती तरि नेदिती : आणि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां[३] थाळावाटीयां जेउं न घलिती :" "न घलिती तरि न घलिती : आणि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीवैएपुढां जेउं वाढिती :" उपाधीं म्हणीतलें : "वाढिती तरि वाढिती : आणि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें गोत्राकुटंबावेगळें घालिती :" उपाधीं म्हणीतलें : "जी जी : घालिती तरि घालिती : आणि काइ जी[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें कां पां घेयावें ?" उपाधीं म्हणीतलें : "ना जी : तें आपुलेयां भलेयाचीया चाडा : आणि काइ जी :" तेहीं आपुलें भलेंचि नीर्वाहिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : तुमतें कव्हणींचि काहीं न म्हणे हो :" मां गोसावीं तेयांसि तांबोळ दीधलें[५] : तेयांची आंजुळि भरली : आपार घेतलें : तोंडभरूनि : उरलें तें पासवडीएचां पालवीं बांधलें : बाइसीं म्हणीतलें : "बटिका : पासवडी नासे ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आवडीसि काइ आवांका असे ?" ॥

## ११९ कास्तां हरीदेओ पंडीतां गोपाळमंत्रभेद नीरोपण

*चांगदेवीं[१] कास्त हरीदेओ पंडीत पुराणगीता आइकति : मग तेथचे संदेह पडति : ते येउनि गोसावीयांतें पुसति : एकु दीं[२]* गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावी वीहरणस्थानासि बीजें करावेयाची आइति करिताति : तवं तैसेचि कास्त हरीदेओ पंडीत आले : तैसेचि सपुजीत गोसावीं बाहीरि बीजें केलें : बाइसें जवं आसन घालीति तवं उपाधीं आपुली पासवडी उपरतौनि श्रीचरणांखालि घातली : "बैसिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : पासवडी मैळेल कीं गा :" "ना जी : माझी प्रसादाची होइल जी :" गोसावी पासवडीवरि उभे होते : तवं बाइसें जाडि घेउनि आलीं : आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : कास्त हरीदेओ पंडीत आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : पुढां बैसले : *हरिदेओ पंडितीं गीतेचा संदेहो पुसिला : पाठीं[२]* गोसावींचि प्रस्णु केला : "आपणेयासि कवणी ठाइं[३] परिचो[४] :" तवं तेहीं म्हणीतलें : "जी जी : गोपाळमंत्रीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "गोपाळमंत्रीं भेद कीती ?"

---

**११८.** १ (**मुहबी.**). २ **मुबीगो.** एथचेया उसिटेया तांबोळा हात ओडवीत असा तें काइ ? ३ **गो.** थाळा वाटीया वर्जिती. ४ **एवा.** °लोक तुमतें नष्टभ्रष्टां म्हणती. ५ **मु.** (**ही.**) °माळ दीधली.

**११९.** १ **मु.** माडीं बाळानीं. २ (**हबीमुरा.**). ३ **एवा.** आगमीं. ४ **अ.** प्रचयो. **बी.** परिचयो.

तीहीं म्हणीतलें : "दाहाएक[५] बोलिजे : परि आम्हीं एकदोनि जाणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "गोपाळमंत्रीचे काइ हेचि भेद ? गोपाळमंत्रीं सहस्रसंक्षा भेद[६] : परि एकू भेदू तो कव्हणीचि नेणे : रुक्मिणीदेवीप्रति श्रीकृष्णचक्रवर्ती निरूपिला : म्हणौनि रुक्मीणिदेवी जाणे : कां श्रीकृष्णचक्रवर्ती जाणति : आणिक कव्हणीचि नेणे :" *हारिदेवपंडितीं म्हणितलें : "जी : हें गोसावींचि जाणावें : आणि गोसावींचि निरूपावें : आम्हीं परीसों नेणों : मां निरूपूनि तें काइ[२] :"* यावरि 'आमचे गोसावी ते साक्षात श्रीकृस्ण चक्रवर्ति होति :' ऐसी उपाध्यांसि प्रतीति जाली : ।।

## १२० चांगदेवीं अवधुता तांबोळदान

एकु दीसीं *उदयांचा पूजाअवस्वर जालेयानंतरें*[१] गोसावीं चांगदेवासि[२] वीहरणासि बीजें केलें[३] : तवं[४] अवधुतु माडावरि बैसले होते : गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीयांसि उजिवेयाकडे आसन जालें : तो डोळे नुघडी : मग गोसावीं एकु श्रीकरू खांदावरि ठेविला : एकें श्रीकरें हनवटीएसि धरिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "कवणा पुरूखाकारणें[५] एसणें जन्म क्षेपीत असिजे बापेया ?" परि तो बोले ना : सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्ञानेंवीन वैराग्य काइ करावें बापेया ?" परि तो बोले ना : वास पाहेचि ना : मग गोसावीं तेयांचां तोंडीं आपुलेनि श्रीकरेंकरूनि फोडी घातलीया : वीडीया करूनि दीधलीया : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## १२१ पेखणीयां अवळोकणें

एकु दीसीं गोसावीं चांगदेवाचेया[१] देउळासि वीहरणासि बीजें केलें[२] : आडवांगीं न्हाणीएकडे[३] गोसावीयांसि आसन जालें : *तवं तेथ देउळीं देवाचीं पेखणाइतें पेखणें करावेया आलीं*[४] : नाचणी आवगावेया[५] तेउती आलीं : गोसावीयांतें देखिलें : आणि वेधलीं[६]: तींसि उसीरू लागला म्हणौनि आणीकि आली : त्याहीं गोसावीयांतें देखिलें : आणि तेहीं वेधली : काहाळीया आला : तोही वेधला : मादळी आला : तोही वेधला : एरएरें ऐसीं

---

**एवा.** परिक्षा. ५ **हबी.** दाहावीस. **एवा.** वीस एक. ६ **गो$_2$गो$_3$** °हे नव्हे श्रीकृष्णचक्रवर्ति : ऐसें श्रीकरीचेनि मणीकटें दाखवीलें : 'हा नव्हे एकु भेदु :' श्रीचरणीचेनि अनुकारें दाखवीला : 'हा नव्हे एकु भेदु :' डोळेयाचेनि अनुकारें दाखवीला : 'हा नव्हे एकु भेदु :' कर्णवीभागें दाखवीला : 'हा नव्हे एकु भेदु :' ऐसें दोनिच्यारि दाखवीले : सर्वज्ञें म्हणीतलें : "हे श्रीकृष्णचक्रवर्ति जाणति : कां रुक्मीणिदेवि जाणति : आणिके कोण्हींचि नेणति :"

**१२०.** १ (**हमु.**). २ **मु.** माडाचेया देउळासि. ३ **ह.** °माडाचेया बाळाणेयावरि गोसावीं आरोहण केलें. ४ **ह.** °तीसरां खणीं माडीपुर्विली बाळाणां पसीमाअभिमुख— **पं.** °मधिला बाळाणेयावरि मांडखुटी—. ५ **एवा.** दादुलेयाकारणें.

**१२१.** १ **मु.** माडाचेया. २ **मुहबी.** °तेथ उतरीली बाळाणां दक्षिणाभिमुख आसन जालें. ३ **एवा** साजां. ४ (**मुराहबी.**). ५ **मुरा.** कास घालावेया : **अभ.** नेसावेया. ६ **मुरा.** पाहातचि राहिलीं

अवघींचि आलीं : अवघींचि वेधलीं : अवघें पेखणें गोसावीयांपासि आलें : मग तेथचि[७] नाचों आदरिलें : *तवं गोसावीं म्हणीतलें : "तेथचि जा : मां हें तेथचि येइल[८] :"* मग गोसावीं चांगदेवाआंतु बीजें केलें : चौकीं आसन जालें : तेथ पेखणें जालें : पेखणें अवळोकिलें : *मांदळिया : काहाळीया : वंशकरू : चाकीकरू : आळतीकरू : जें जेयाचें अंग तें तो दाखवी : तेया अंगा गोसावी तोखति : तेणें तया सूख होए[९] :* नाचणी नाचती होती : ते ताळासि चुकली : तेव्हळि गोसावी मुर्खीं गदगदां हांसति : आणि तीयां जाणीतलें : "जी जी : जाणेंवीण कळा माळवलीया जी : जाणेंवीण कळा पोरटीया जालीया जी : आजि कळेचें माहेर भेटलें : गोसावी सकळ वीद्येचें माहेर :" *मग तीया गौस्फुरण केलें : आणि गोसावी तीएचिये कळेसि तोखले[१०] :* मग गोसावीं तेयांसि पुडवाटुवा रीचविला : तांबोळ दीधलें : पाठवणी दीधली : परि तेयांसि जाववे ना : मग गोसावीं बीजें केलें : नाचणी दरवठांवरि[११] आलीं : दखिणीली दारवठां गोसावीयांतें पदरीं धरिलें : "जी जी : माझेया बीढारा गोसावीं बीजें करावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें एकांचें नीमींत्रीलें[१२] असे :" मग गोसावीं भोगनाराएणासि बीजें केलें : ।।

## १२२ धाइ सलदीं लपवणें

उमाइसें धाकुटींचि बिजवरासि दीधली : तयांसि पहिलें लेंकरूं जालें : तियें लाजति[१] : एकु दीं गोसावीं सारंगपंडीताचेया आवारा बीजें केलें : उमाइसें लेंकरूं घेउनि बैसलीं होतीं : गोसावीयांतें देखिलें : आणि लाजिलीं : पुढां सलदु[२] होता : तेथ धानाइसें घातली : वरि लुगडें घातलें : गोसावीं लुगडें हालतां देखीलें : मग पुसिलें: "बाइ : हें काइ हालत असे ?" "जी जी : हें लेंकरूं :" गोसावीं म्हणीतलें : "बाइ: कडिये घेया: याचिया अमृतकळा शोखती :" इतुकेनि तयांची लाज फीटली : मग धानाइसें काढली[३] : ।।

## १२३ धानाइसांसीं कवडां खेळु

येकु दीसीं गोसावी सारंगपंडीतांचेया आवारासि बीजें केलें : तवं धानाइसें[१] ओसरीए-वरि कवडां खेळत होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "धाइ : यां : हें तुमसीं कवडां खेळैल:" "हो कां[२] :" गोसावीं[३] आपुले कवडे मांडिले : तीहीं आपुले मांडिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "या :" आणि गोसावीयांचे कवडे चालति : तीएं म्हणति : "या :" परि तेयांचे कवडे

---

७ **मु.** °खेळ मांडिला. **ह.** पेखणें करूं आदरिलें. ८ (**मुहबी.**). ९ (**मुराहबी.**). १० (**हबी.**). ११ **एवा.** दारवठां राखत होती. १२ **पंहबी.** नीमंत्रिलें. **मुरा.** आवतीलें.

**१२२.** १ **अपं.** °तीए पेटीएसि लपवीति : एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : लेकरूवांच्या अमृतकळा लोपती :" एतुकेनि तेयांची लाज फीटली : मग पेटीएहुनि काढिली : स्थानपानीं लाविली : २ **ह.** °पेटी होती : तेथ लपविली : वर सूप ठेविलें : पेटी हालत असे : (**एवा.** सूप हालत असे :) गोसावीं पुसिलें––. ३ **ह.** °थानीं लाविली :

**१२३.** १ **हबी** (**एवा.**) **रा.** धानाइसी काइसेयाची नेणों आळी घेतली : तवं सर्वज्ञें म्हणीतलें––. २ **रा. एवा.** °कवडे घेउनि आलीं. ३ **एवा.** °कवडेयावरि कवडे––.

न चलति : मग म्हणति : " आपण चालते कवडे घेतले : मज न[४] चलते कवडे दीधले : म्हणौनि पालटिति : गोसावीयांचे कवडे आपण घेति : आपुले गोसावीयांसि देति : मां माघौतें तैसेंचि केलें : माघौतें गोसावीयांचे कवडे चालति : तेयांचे न चलति : ऐसें गोसावीं वेळां तीनि केलें : ।।

## १२४ तथा आख्यायिका स्रवण

एकु दीं गोसावीं सारंगपंडीतांचेया आवारासि बीजें केलें : गोसावीयांसि ओलणी देओं आदरिली : आणि धानाइसीं गोसावीयांची श्रीमुर्ति उघडी[१] देखिली : आणि आग्रो घेतला : म्हणति[२] : "चांगदेओराउळातें जीया हळदीं उटिलें तीया हळदीं मातें उटावें :" ऐसा[३] थाया घेतला : काइसेनहीं बुझावे ना : तेयांसि काहीं म्हणीएं करूं नेदीति : उमाइसां धाकुटीएचि प्रव्हाइ[३] लेंकरूं जालें म्हणौनिया तीएं खेळउं सकति[४] : गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीं तेयांतें म्हणीतलें : "धाइ : या : हें तुम्हां काहाणी सांघैल :" सर्वज्ञें म्हणीतलें : " काउळेयाचें घर सेणाचें : साळैचें घर मेणाचें : पाउसु पडे : काउळेयाचें घर[५] वाहात जाए : साळैचें घर उरे : साळै आपुलेया घराआंतु रीगौनि म्हणे : 'काउळेया काउळेया : कानु कीं डोळा :' ऐसें तीनि वेळां उचारिलें : मग तो थाया वीसरली : ।।

## १२५ देओ साकरभातु आरोगण

गोसावीं सारंगपंडितांचेया घरा आरोगणेलागि बीजें केलें : *मर्दना जाली : माजणें जालें : पुजा केली*[१] *:* ताटें केलीं : गोसावीं ताटावरि बीजें केलें : आसन जालें : *उमाइसीं ताट वाढीलें : सारंगपंडितासि ठावो केला : मोकानंदें देव्हारचौकीये ताट घेउनि आले*[१] *:* साकर वाढिली होती : *उमाइसें पहीति मोकानंदाहातीं नेदीतिचि*[१] *:* गोसावी *भातावरि साकर घालुनि*[१] आरोगण करूं लागले : *तवं उमाइसें पहीति घेउनि*[१] *आलीं : गोसावीं ऐसी वरौती वास पाहिली*[२] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देओ साकरभातु जेवीतु असे :" उमाइसीं म्हणीतलें : "जी जी : मीं पहींति घालुं वीसरलीएं जी :" मग पहीति घातली : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : मग बीजें केलें : ।।

## १२६ धाइसि कास घालणें

[१]गोसावीं धाइसि कास घातली : सर्वज्ञें म्हणीतलें : "धाइ : कास कोणावरि घातली ?" तवं तेहीं म्हणीतलें : "जी जी : श्रीचांगदेओराउळा गोसावीयांवरि घातली :" मागौतें

४ **एवा.** बैसते कवडे–.

**१२४.** १ **राने.** गौरवर्ण. २ **नेराहबी.** °गोसावीयांची श्रीमूर्ति हळदी उटिली म्हणौनि गौर जाली तरि ते हळदी माझां आंगीं लावावी. ३ **एवा.** ऐसी आळि घेतली. ४ **ह.** °पराइं लेकरू जालें : म्हणौनि तीयें संकति. **रानेभगोबी.** प्रतीत हें वाक्य नाही. ५ **एवा.** वाहौनि. **राने.** °पुरें जाए.

**१२५.** १ (**रानेहबी.**). २ (**गोपं.**).

**१२६.** १ **हबीने.** प्रतीत या लीळेचा पूर्वार्ध पुढीलप्रमाणे : धानाइसें वडिलें जालीं : न्हाणीति :

सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रींघारू कोणाकारणें केला ?" " ना श्रीचांगदेओराउळां गोसावीयाकारणें :" तवं घरिचीं अवघीं हांसति : ।।

## १२७ देमाइसां भेटि

देमाइसें तीए पींपळगाविची : तीए पुराण आइकति : तवं पुराणीं[१] गुरूवांचौनि मुंचणें नाहीं : ऐसें आइकति : " तरि कवण गुरू करूं पां ?" अवघां वीचारिलें[२] : " ना एथ प्रतिस्थानीं वामदेव नावें वीक्षात आइकत असिजेति : ते गुरू करा :" ऐसा अवघां वीचारू केला : मग पानें पोफळें घेतलीं : मग प्रतिस्थानासि आलीं : तेयांचीए मढीएसि गेलीं : तवं ते काळे ढीवं[३] ऐसे : नागिवे बैसले आहाति : ते ऐसे देखिले : आणि म्हणीतलें : "आगे आइ : आम्हीं स्त्रीया : यांपासि उठुं नैए : यांपासि बोलों पुसों नैए : *दाउंमीरउं नैये*[४] *:* हे काइसे गुरू ?" म्हणौनि पानें पोफळें घेतलीं : आणि तैसींचि तीएं नीगालीं : तवं लखूबाइसें भेटलीं : तीहीं म्हणीतलें : " हें काइ देमाइसें : कें गेलीं होतींति ?" देमाइसीं म्हणीतलें : " ना आइ : गुरू करूं गेलीएं होतीएं : तवं ते नगीन देखिलें : मग नीगालीएं :" तवं लखूबाइसीं म्हणीतलें : " गुरू कराल तरि मीं दाखवीन : *जयाजवळि बैसों उठों ये : दाउंमीरउं ये: जेणें अवघेया संसाराची ली पुसे : जेणें संसारू तरिजे ऐसा गुरु मी दाखवीन*[५] *:*" " हो कां : चाला :" मग दोघी भोगनाराएणा आलीया : तवं गोसावीयांसि आसन असे : देखिलें : आणि नीवालीं : सुखीएं जालीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : पानें पोफळें आसनावरि ठेविलीं : नारीएळ दरीसना केलें : आणि पाठिमोरीं[६] बैसली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : गुरुदेवासि[७] पाठि देओं नैए : यासि सन्मुखां बैसिजे : ऐसी बैसा :" मग सन्मुखें बैसलीं : मग तेयांसि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : मग तीएं नीगालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ एओं आवडैल तेव्हळि यावें हो :" "जी जी : आतां एथचि एइन :" ।।

## १२८ माहादेवो पाठकां भेटि : स्तीति

माहादेओ पाठक ते पैठणीं साळेसि पढत असति : तेयांसि गोसावीयांसि भेटि जाली[१] : गोसावीयांपासौनि स्तीति जाली *: भोगिली : भंगली : मग गोसावीं जवळि बोलावीलें : आणि पुसिलें : " निकेन ?" "जी जी :" मग बाइसीं म्हणीतलें : "ऐसा कवण सदैव बोलिजे :*

---

उटिति : लेववीति : नेसवीति : बरवी कास घालीति : मग पुसति : " धाइ : हा शृंघारु कवणालागि ? °.

**१२७.** १ **हबीमुरा.** °ऐसें नीगालेंजें—. २ **ह.** अवघेया गोता कुटुंबाचेया चीता ऐसें आलें : ३ **गोमु.** ढेप. **रा.** ढूप. **हबी.** ढूम. ४ (**मुराहबी.**). ५ (**हबीगो.**). ६ **हबी.** आडवांगी. ७ **अपं.** °गुरु : देवता : पुरुषु यां तीघांही°. **ह.** गुरुदेवते°. **हीराइसे.** "बाइ : पुरुषाचीया भेटि जाइजे तरि सन्मुखां बैसिजे : राजा : गुरु : देवता : या तीहींसि पाठि देओं नये :"

**१२८.** १ **मु.** °ते काहीं वाचित होते : तेणें देह कृष जालें होते :

*बाबा आदर करूनि पुसताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हे एथिचे येजमान : एही येथें पुर्वी पाणीभात : बाबुळसेंगाची आरोगण दीधली :" मग ते दंडवत करुनि गेले*[२] : ।।

## १२९ राघवदेवां भेटि*

[राघवदेव[१] दोडविहिराहुनि पैठणासि आले : गोसावीयांसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गेले : ।।]

## १३० गदोनाएकां भेटि* ।।

## १३१ ब्रह्मचारीदेवां भेटि* ।।

## १३२ कवडींबा[१] गाएन श्रवण

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं सपुजीत चांगदेवासि[२] बीजें केलें : चौकीं गोसावीयांसि[३] आसन जालें : तवं कवडींबु[४] आला : गोसावीयांतें देखिलें : आणि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग *सीकारीं*[५] गाओं आदरिलें : "तुं[६] *गोसावी मीं पाइकु तुझा : हरिहरि वाचा उच्चारण : नयेन नीरीक्षण ध्यान : तुं एक हरी इतुलें देइं : आन न मागें कृपासींधु मुरारी*[७] *:*" ऐसा गीतु गाउनि श्रीचरणां लागौनि तो नीगाला : मग गोसावीं चांगदेवासि बीजें केलें : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा भगतु कैसें[८] मागतु असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भगतु आणि मागे[९] :" *मग गोसावीं चांगदेवा बीजें केलें : बाळानेयावारि आसन जालें : कवि डींभाचे सीकारे भीतरि गात होते : 'त्वमेव माता' या श्लोकावरील पदें गाइले : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : भक्त काइ म्हणत असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ना हे शब्द म्हणतु असे : एकां ऐसेंचि होउनि ठाके*[१०] *:"* ।।

२ (**बी.**). पूर्वार्ध ली. १०४ पाहा.

**१२९.** * ही लीळा **हबी.** प्रतीतून घेतली आहे.

१ **मु.** एकु दीं दोडवीहीरेकार राघवदेव आले°.

**१३०.** * 'गदोनाएका भेटि' आणि 'ब्रह्मचारिदेवा भेटि' या दोन्ही लीळा किंवा त्यांच्या आद्या संपादनासाठी घेतलेल्या पोथ्यांपैकी फक्त **मु.** प्रतीतच आढळतात. तथापि, पाठसमुदायांच्या सर्व पोथ्यांतील पूर्वार्धचरित्राच्या 'आद्या'त मात्र त्या आढळतात. म्हणून त्या आद्यांचा समावेश संहितेत केला आहे. या दोन लीळांशिवाय 'सारस्वतभटा भेटी' ही लीळा **मु.** प्रतीत आहे. पाठसमुदायातील चरित्राच्या आद्यात ती आढळत नसल्यामुळे तिचा अंतर्भाव केला नाही.

**१३१.** *१३० या लीळेवरील तळटीप पाहा.

**१३२.** १ **बीमु.** कवि डींभा. २ **मु.** माडासि. ३ **मु.** °देउळीं चौकीं. ४ **बीमु.** कवि डींभ. **भ.** कवडींभ रामदेव. ५ (**मुराहबी.**). ६ **गो.** "तुं गोसावी मी पाइकु तुझा : ऐसें जाणवीसी जरि : पुर्वापर आठवीसि : तरि वीनवणी अवधारि : ।। १ ।। धृ० ।। हरिहरि वाचा उच्चारण : नयेनीं नीरक्षेण : हृदइं एकु हरि :" ।। छ ।। ७ (**मुराहबी.**). ८ **मुराहबी.** काइ. ९ **गो.** °एकाधें एउनिचि ठाके : आणि बाइ : हा खड्डर्शनव्येता म्हणौनि मागतु असे :" **भ.** °मग तीहीं गोसावीयांतें वीनउनि घरासि नेलें : मर्दना : मादणें : पुजा : आरोगण जाली : पहुडु जाला : मग बीजें केलें :

१० (**प्रव.** विचार २३४).

## १३३ रवळो अध्यात्मगीत निषेध*

[ गोसावीयांसि भोगनाराएणीं अवस्थान : एक वेळ गोसावीं चांगदेवा वीहरणा बीजें केलें : तेथ माडावरि आसन जालें : तवं रवळो कुंभार : तो डफगाणें जाणे : पदें बांधे : तो गोसावीयांचीया दर्शनासि आपुलेया मेळेनसीं आला : मग आध्यात्म गावों लागला : उपनिषेधाचें रहस्य : जत पदीं बांधौनि गाइलें : यावरि बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हें ऐसें आध्यात्मरहस्य हा गीतीं गाताए : तरि हें यासि काइ गावों येताये म्हणौनि गात असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आत्मा आणि गीतीं गाइजे ? तेयातें कव्हणीचि नेणे कीं : मा तो कैसा वीदीत करावा ? हें ऐसें जो गाये तया वोखटें आति : देवतेचा क्षोभु होए :" ऐसें गोसावी बोलिले : आणि भीयाला : मग पुरें केलें : गोसावीं तेयासि तीनि दामेंसीं वीडा देववीला : मग तो गेला : ॥ ]

## १३४ वामदेवां भूतसृष्टि दाखवणें

एकु दीं गोसावी वीळिचेया वेळीं भोगावतीएकडे बीजें करिताति[1] : सरिसे वामदेव असति : आणि कोण्ही नसे[2] : गोसावी मार्गीचेया पींपळाचां पालवीं पुर्वीली उभे राहिले : मग वामदेवांतें पुसिलें : "आपणेयां काइ वैस्य[3] ?" "जी जी : भूतसृष्टि :" "पाओं : एथ दाखवा :" "हो कां जी :" मग ते[4] अह्वानुं लागले : तवं कोण्हीं नैएति : मग म्हणीतलें : "जी जी : तीयें न एति :" "कां न एति ?" "जी जी : एकें कोल्हापुरा गेलीं : एकें मातापुरा गेलीं[5] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "*आपणेया वैस्य तीयें बोलावीलेयां कैसीं न एति*[6] ? एथौनि बोलाविजतु ?" "हो कां जी :" आणि गोसावीं[7] फुटेयाचेनि पालवेंकरूनि ऐसीं बोलाविलीं : आणि एओं लागलीं : पहीलीया[8] दृष्टें तीएं आलीं : मग सूतें तीएं आलीं : मग सूतें नाहीं : दृष्टें नाहीं : तीएं आलीं : एकें[9] नसुधीं सीसाळें : *एकें नसुधीं धडें*[9] : एकांचे रक्तवटीयांएसणे डोळे : एकें खांखाळें : एकें वेंताळें : खाएगीळि करितें : वीक्राळा दाढा : आवाळुवें चाटीति : एक आवाळुं आकासीं : एक आवाळुं पाताळीं : एक ब्रह्मांड गीळील एसणें : ऐसीं देखिलीं : आणि भीयाले : भीउनि गोसावीयांचीए पाठिसीं रीगाले : "अपाहारिजो[10] जी : अपाहारिजो जी :" म्हणौनि गोसावीयांचेया[11] फुटेयाचीया पालवा पीळु घेतला : मग गोसावीं फुटेयाचेनि पालवेंकरूनि मागौतीं पाठवीलीं : इतुकेनि तीएं नीगालीं : सर्वज्ञें म्हणीतलें :

---

१३३. *(प्रव. विमा. ३२).

१३४. १ एवा. °वामदेव भोगावतीएकडौनि एत असति : ऐसी पींपळातळिं भेटि जाली. २ मु. °महाकाळीपूर्वे थडीये आश्राइत पींपळ. ३ एवा. वीदीत. ४ हगो. °नागिवे होउनि वस्त्र भवंडुं लागले. ५ मु. °एकें संभूसि ओळगे गेलीं. ६ (हगोपं.). ७ हगो. °फुटेयाचा पालौ ऐसा सव्यें (पं. अपसव्यें) भवंडिला : आणि एवों लागलीं. ८ मु. पहीलें. ९ पं. एकाचीं तोंडें : एकाचीं रींडें. १० पं. उपसंहारिजो. ११ एवा. °श्रीचरणां झोंबीनले.

"हें काइ गा : इतुकेयासीचि भीयालेति ? तुम्हां भूतसृष्टि वैस्य कीं : आणिकें दाखवीजती तरि काइ कराल ?" मग उगेचि राहिले : मग गोसावीं मठासि बीजें केलें[१२] : ।।

## १३५ वामदेवांचा नमस्कारु घेणें*

[मग तैलागौनि वामदेवां गोसावीयांवरि थोरि बुद्धि आली : अपार भाव करीति : नीत्य रात्रीं कांबळेयाचें कोंगतें घालौनि दर्शनासि येति : दंडवतें घालीति : श्रीचरणां लागति : प्रसाद घेति : मग जाति : ।। ]

## १३६ दाइंबा दुर्गावरि धावणें

एकु दीसीं *दायांबा गोसावीयांचेया दरूसना आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : आणि*[१] दाइंबासि स्तीति जाली : ते दुर्गावरि चरीयांचरीयां धावों लागले : *गावीचा लोकु अवघा पाहों ठेला : 'पडिले : पडिले :' म्हणति : पारि पडति ना*[१] : गाविचेया लोकांसि आश्चर्य जालें : लोकु म्हणों लागला : "हे ऐसे कवण पुरूख ?" तेयांतु एकीं म्हणीतलें : "हा श्रीचांगदेओराउळांचा पींसा :" मग गोसावीं तेथ बीजें केलें : दाइंबाएं गोसावीयांतें एतां देखिलें : आणि दुर्गावरौनि उतरले : गोसावीयांचेया श्रीचरणां लागले : मग तेयाची स्तीति भंगली : ।।

## १३७ अनुसरलेयाचा देओ निरूपण*

[प्रतिस्थानीं भोगनाराएणीं अवस्थान : एक वेळ बाइसीं पुसिलें : "बाबा : हे आवघे वेदवक्ते श्रीकृष्णचक्रवर्तीतें परमेश्वरु म्हणौनि मानीति : पुजीति : तरि या काहीं गोमटें आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति : बाइ :" "तें कवण बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे लोक श्रीकृष्णचक्रवर्त्तीतें मानिति : तेणें तया संपती जोडे : आव्हांतर मृत्यु चुके : देहांतीं आर्जिलेया फळा जाति : बाइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : देव काइ गुरुवाचा ? गुरव म्हणे : देव माझा : देवो तो गुरुवाचा नव्हे कीं बाइ : देव तो एथीचिया भक्ताचा : तैसा ठावो : बाइ : अनुसरलेयाचा देवो :" "हो कां जी :" ।। ]

---

१२ **मु.** °हे लीळा **रामे.** तथा स्वमति शोधें : एथ. **प्रवा.** गणपतिमठीं.

**१३५.** *ही लीळा **मु.** प्रतीतून येथे घेतली आहे. पाहा : **मु.** (**शोध**) एक वेळ उत्तरार्धी गणपति मठीं तयांसि गेलेयां भक्तजनीं पुसिलें : "जी जी : हे नीच एधवां कां येति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आपुलेयां शीष्यांतें चोरूनि एथ येति :" हे लीळा **रामे.** तथा स्वमति शोधें एथ : ।। **प्रवा.** गणपति मठीं : ।। १३४ व १३५ या लीळा उत्तरार्धातही येतात. तेथे मी त्या गाळल्या आहेत.

**१३६.** १ (ह.).

**१३७.** *(**प्रव. आमा.** २०२).

## १३८ चांगदेओभटाची वीनती स्वीकारू[१]

येकु दिसु गोसावीं बाइसांतें म्हणीतलें : " बाइ : हें परमेश्वरपुरा जाइल : आइति करा : " तें चांगदेओभटीं[२] आइकीलें : मग बाइसांतें म्हणीतलें : " बाइ : गोसावी परमेश्वरपुरा बीजें करीत असति : तरी मज आपणेयांसांघातें येओं देती : ऐसें पुसा कां ? " बाइसीं वीनवीलें : " बाबा : चांगो म्हणत असे : ' गोसावी परमेश्वरपुरा बीजें करीत असति : तरी आपणेयांसांघातें मज येओं देती ? ' " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें[३] हां बटिका ? " " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हां गावां जाणें असे : गावां जा : सणु करुनी या : मग गांवा जाओं : " ऐसेंचि उपाधीं चांगदेओभटाकरवि पुसवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " यासी[४] आळेंनीवणें असे : हा ना[५] : " *उपाधीं गोसावीयांसि श्रीमुखीचें तांबोळ मागीतलें : मग नीगाले : बाइसीं म्हणीतलें : " बटीका उसीरू जाला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तैसें हे धीरवीर असति[६] : "* ॥

## १३९ रीधपुरा प्रयाण

मग चांगदेओभट गावां गेले : सणु सारुनी आले : बाइसीं आइति केली : मग बाइसें : हंसराज : चांगदेओभट सरीसे नीगाले : मग गोसावीं परमेश्वरपुरा बीजें केलें : ॥

## १४० राहाटगावीं माहालखुमीए वस्ति

मग गोसावीं राहाटगावासि बीजें केलें : माहालखुमीएचां देउळीं दोंपाहारांचा : वीळिचांचा पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली[१] : वस्ति जाली : मग गोसावीं बीजें केलें : ॥

---

**१३८.** १ प्रस्तुत लीळा **अ.** प्रतीत फार संक्षिप्त आहे. म्हणून येथे **रा.** प्रतीतून उद्धृत केली आहे. २ **पंगोगो**$_2$ °आणि उपाधीं बाइसांतें म्हणीतलें : "आम्ही दोघै रीधपुरासि गोसावीयांसरिसे एउनि : " म्हणौनि दंडवतें घातलीं : बाइसीं गोसावीयांतें म्हणीतलें : "बाबा : चांगो आणि जानो रीधपुरासि एवों पाहात असति : बाबासवें : " गोसावीं उपाध्यातें म्हणीतले : "बाइ : हा नां–. ३ **हीराइसें.** °हां बटिका : परमेश्वरपुरा जातां कां वारिजैल ? गावां जा : सणु करा : पुसा : मग या : ४ **पंगोगो**$_2$ °यासि खूंटदावें असें. (**एवा.** सुईदोरा असे.). ५ **पंगो**$_2$ °बाइसीं म्हणीतलें : "बाबा : खूंटदावें म्हणिजे काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दावें म्हणिजे माएबापू : संबंधीएं : खूंट म्हणिजे अस्त्री : गळां दावें लागलेयां भलेतेउतेंहीं हींडों ए : तैचि खूंटी बांधलेयां भलतेउतें हींडों न ए : म्हणौनि हा नां : " ६ (**अ.**).

**१४०. १ गो**$_2$**गो**$_3$ °पहुडु जाला : मग चांगदेओभटातें सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : एथ नीजा : " मग चांगदेओभट तीए दीउनि गोसावीयांपुढां नीजति : ते परतेपरते होति : गोसावी श्रीकरें आरुतें करीति : पुढें सुति : वरि श्रीकरु घालीति : ऐसें प्रतदीनीं करीति : ॥

## १४१ कडेठणीं माहालखूमीए वस्ति

उदीयांचि गोसावीं कडेठणासि बीजें केलें : मार्गी[१] आसन जालें : गोसावीं[२] बाइसां-करवि सीळिका आणवीलीया : तवं सीळिका नाहीं : बोरि डीरैली होती : तीएं हातु-हातु कोंभ नीगाले होते : तीएं पयोवर्तीएं : तीएं तोडूं मोडुं भीति : तीएं भवंतीं भवंति : परि मोडीति ना : कव्हणासिं गोष्टी लावीति : ऐसीयापरी गमितें असति : तेवीचि तेया भवंतीं भवंति : सर्वज्ञें म्हणीतलें : "भलेतैं[३] कासीया भवंतीं भवंसी ? तऱ्हीं मोडुनि सीळीका आणिसी[४] कीं :" मग बाइसें हांसिली : मोडुनि सीळिका घेउनि आलीं : गोसावीयांचां श्रीकरीं ओळगविली : गोसावीं दंतध्वन[५] केलें : गुळुळा केला : बाइसीं अर्धपटु[६] टीळा केला : पुजा : धूपार्ती : मंगळार्ती केली : वीडा ओळगविला : मग गोसावीं बीजें केलें : ॥

## १४२ भीवंडाउवांचां[१] राजौरीं वस्ति ॥

## १४३ सेंदुर्जनीं ब्राह्मणां स्तीति

मग गोसावीं सेंदुर्जनासि बीजें केलें : गावां इसान्य पींपळातळिं[१] गोसावीयांसि आसन असे : तवं ब्राह्मणु एकु नागझरीएसि संध्यावंदन करावेया आला : संध्या-वंदन करीतु होता : तेणें गोसावीयांतें देखिलें : आला : दंडवत केलें : श्रीचरणां लागौनि पुढां बैसला : आणि तेयांसि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : स्तीति भोगुं सरली[२] : मग गोसावीयांतें[३] वीनवीलें : "जी जी : गोसावीं माझेया आवारासि बीजें करावें जी :" गोसावीं तेयांचेया आवारासि बीजें केलें : मर्दनामादणें जालें : पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : भगतिजनां पांति जाली : पहुडु : उपहुडु जाला : वीळिचां पुजाअवस्वरू जाला : मग एरी दीसीं गोसावीं उदीयांसीचि तेथौनि मेघंकरा बीजें केलें : तो ब्राह्मणु पींपळातळिं[४] ए : आणि तेथ गोसावीयांतें देखतुचि असे : ॥

---

**१४१.** १ **गो,गो,** गावां आग्न कोणीं मळा : तेथ वृक्षा एका तळीं गोसावीयांसि आसन जालें : तेथचि दुपाहाराची आरोगण जाली. . .पहुडु जाला : उपहुडु होउनि मग गावांआंतु महालक्ष्मीए वस्ति जाली : २ (सीळिका आणविण्याचा हा वृत्तांत फक्त **अहबी.** प्रतीतच आहे. **गो,गो,** प्रतीतही नाही.) ३ **हबी.** भलतैसेया भवंतीं भवाल : परि– ४ **बी.** आणालचि कीं. ५ **बी.** दंतधावन. ६ **बी.** अर्ध पौंड्र.

**१४२.** १ **मुबी.** भीम°.

**१४३.** १ **एवा.** गावासि उतरे वेसिदारीं वडु असे : तेया वडातळिं— २ **एवा.** सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : घरा जा ना :" मग तेणें– ३ **मुरा.** °आरोगणेलागि. ४ **एवा.** वडातळि.

## १४४ मेघंकरीं बाइसें हाटा गमन

मेघंकरासि गोसावीं बीजें केलें : गावांबाहिए प्रदेसीं गोसावीयांसि आसन जालें[१] : मग बाणेस्वरीं वस्ति जाली : चरणक्षाळण जालें : पहुडु जाला : तवं बाइसीं उपाहारू नीफजविला : मग गोसावीयांसि उपहुडु जाला : पुजा : आरोगण : गुळुळा : वीडा जाला : मागौता पहुडु जाला : पुढील गावं धाकुटें : म्हणौनि बाइसें मेहकराआंतु हाटवका[२] : काही वेसरू : घेयावेया गेलीं : वाणीयां एकाचेया पसारेयासि गेलीं : बाइसांतें देखौनि वाणीएं म्हणीतलें : " आइ : या : " म्हणौनि माची बैसों घातली : बाइसें बैसलीं : " बा : काहीं वेचु देया : " तेणें म्हणीतलें : " आइ : बैसा : नावेक राहा : यां ग्राहीकांतें पाठवीन[३] : मग तुम्हीं मागाल तें देइन : " तेयासि थोरू वीकरा जाला : बाइसें बैसलींचि होतीं : मग तेणें अवघीं ग्राहीकें पाठवीलीं[४] : मग बाइसांतें पुसिलें : " आइ : काए देओं तें सांघा ? " बाइसीं म्हणीतलें : " कणीकी दे : १ : तांदुळ : २ : तुप : ३ : हींगु : ४ : मीरीएं : ५ : जीरें : ६ : साकर : ७ : " ऐसा सोळां[५] दामांचा वेचु केला : बरवा सवंगु सुसासु[६] : हाटवका दीधला : बाइसें सोळा दाम देओं बैसलीं : तवं तेणें म्हणीतलें : " आइ : इतुकें माझें तुम्हीं आपुलेया उपेगा नेयावें[७] : " बाइसें आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : उसीरू कां लाविला ? " बाइसीं मागील अवघें वृतांत गोसावीयांपुढें सांघीतलें : " बाबा : मीं हाटासि गेलीएं : तवं तेणें वाणीएं मज माची बैसावेया घातली : आणि म्हणीतलें : 'आइ : मज ग्राहीकें पाठउं देया : मग मीं तुम्हांसि हाटवका देइन :' मग ग्राहीकें पाठवीलीं : मग बाबा : मज हाटवका दीधला : म्हणौनि उसीरू लागला : दाम देओं बैसलीएं परि तो नेघेचि : बाबा : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुम्हां[८] गेलेयां तुमचां ठाइं तेयांचें इतुलेंचि काइ बहुत ? " तवं बाइसीं म्हणीतलें : " मज ऐसें न व्हावें बाबा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि नव्हे[९] : आणि काइ बाइ : " मग वसति जाली[१०] : ॥

## १४५ वीसैए रामदेवीं कमळीं पुजा

'परमेस्वरपुरा गोसावीं बीजें करीत असति' ऐसें दादोसीं आइकिलें : गोसावीयांलागौनि वाटेसेया[१] काहीं संभौ मेळौनि मागिलाकडौनि टाकौनि घेउनि आले : तवं गोसावीं वस्ति[२]

---

**१४४.** १ अ. °कवणी ठाइं वस्ति जाली तें नेणिजे. **गो**₂ गावां उतरे नदीचीए थडीए अग्नीष्टीका : तेथ आसन जालें : मग सारंगधरासि वस्ति जाली : **एवा.** अग्नीष्टीके वस्ति जाली : तेथौनि मेहकरा हाटा गेली. २ **मु.** °वेचुं घेयावेया. **बी.** हाटवटावेसजु वेसौर°. **ह.** हाटवेचु घेयावेया. ३ **एवा.** बुझावीन. ४ **एवा.** बुझाविलीं. ५ **एवा.** आठां. ६ **हबी.** सुवासु. **गो.** सुलीसु. ७ **एवा.** °आणीक सोळा दाम बाइसांचां हातीं दीधले : बीढार पावति तवं बोळवीतु आला. ८ **मुरा.** °इतुलेंचि बहुत. **गो.** °पासौनि तेयांसि काइ येतुलेंचि बहु ? **पं.** °पाहुनि इतुकें काइ बहु ? ९ **एवा.** आजिलागौनि नव्हे. १० या लीळेनंतर **मु.** प्रतीत " **शोध :** एकांचेनि मतें अंजनीये वसति : " अशी स्वतंत्र नोंद आहे.

**१४५.** १ **हबीमु.** वाटेचें काही संबळ मेळउनि. २ **एवा.** वीसैए. **मु.** लींगाचेया देउळा.

देउळां बीजें केलें : देउळ पाहिलें : बाइसें तेथ उपाहारू करावेया राहिलीं : गोसावीं वीहरणा बीजें केलें : तळेयाचीए पसिमीली पाळीसि पींपळातळिं गोसावीयांसि आसन जालें : तवं तेथ देव आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीं क्षेमाळींगन दीधलें : देवीं वेचु आणिला तो पुढें ठेविला : तळेयाआंतु पव्हावेया रीगाले : तवं कमळें बरवीं देखिलीं : देवीं म्हणीतलें : "जी जी : मीं कमळांची पुजा गोसावीयांसि करूं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "करा :" "जी जी : तरि कमळें कैसीयापरी काढुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आंकुडीया करूनि काढा :" मग देवीं आंकुडीया करूनि कमळें तोडिलीं : मग कमळांचीं अंगदें केलीं : बाहुभुक्षणें केलीं : गळदंडे : हातसर : माळ : मुगुटमाळ केली : ऐसी बरवी गोसावीयांसि *लोहिवां कमळीं*[३] साष्टांग पुजा केली : स्रीखंडीं कमळें : मग रामदेवीं म्हणीतलें : "जी जी : मज कोळ पुरूखू[४] उधारूनि देयावा जी :" म्हणौनि रामदेवीं कमळाची पांकुळी गोसावीयांचां श्रीकरीं दीधली : गोसावीं कमळाचें पातें श्रीकरीं घेतलें : श्रीकरिचीया करांगुळिचेनि नखेंकरूनि उधारिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "देसकाळिचे आचारीये इतुलेयामध्यें[५] आचारीत्व करीत असति[६] : एऱ्हवीं[७] एथौनि देवताचक्र नीरोपितां पृथ्वीएसणी कडती आणि मेरूएसणी खडी न पुरे : परि देवताचक्र उधारूं न सरे :" *"जी जी : तरि सामान्याकारें निरोपिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "द्वीधा शांभव : अष्टधा शाक्तेय : सवालक्ष नवकोडी मृहान्नव : बाहात्तरि कोडी आन्तव : इतुकीया देवता एकीं ब्रह्मांडीं असति : ऐसीं अनंतें ब्रह्मांडें असति :" "होकां जी*[८] *:"* आणि मग गोसावीं उधारूनि रामदेवांसि दीधला : मग देवीं कागळीं उधारूनि तांब्रपात्रीं उधारिलें[७] *सर्वज्ञें म्हणीतलें : "खाजें खादलेयां क्षुधानिवृत्ति तरि होए : परि भूक न वचे : तथा तृप्ति नव्हे : अन्न जेविलेया भूक तरि जाये : अमरां नव्हीजे : अमृत पीजे तरि अमरां होइजे : तैसी इंद्रादिकांचीं फळें च्युतिमंतें आणि दुखरूपें : चैतन्यफळ मोक्षतुल्य तरि होए : पारि तेथ च्युति हा दोषु : तैसा मोक्षु नव्हे : मोक्षु जालेयां यातायात पारुखति*[९] *:"* मग गोसावीं देउळासि बीजें केलें : पुजा आरोगण : पहुडु उपहुडु जाला : वीळिचां पुजा जाली : उदीयांचि पुजाअवसरू जाला : मग बीजें केलें : रामदेव वीसैएहुनि परतले : ।।

---

**एवा.** सीद्धनाथाचिया देउळा. ३ (**हबीमु.**). ४ **मुबी.** कौळ°. **रा.** कुळ°. **ह.** काळ°. **गोपं.** कोळपुरुखू वीद्यामार्गु. ५ **मु.** इतुलेया ऐसेयामाजि सारीति. **प्रवा.** °लीहुनि दाखवीति. (**एवा.** संकळिति : **एवा.** संकळौनि देति :) ६ ही वाक्ये **मुरा.** प्रतीत नाहीत. ७ **पं.** °तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि देवताचक्र निरूपितां नीरोपुं न सरे : पृथ्वीएसणें कडीत : आणि मेरूएसणीं खडी लीहीतां न पुरे :" ८ (**प्रव. वि. २७०**). ९ (**दृपा.** २१, २२ व २३. खाजेयाचा, अन्नाचा व अमृताचा दृष्टांत 'दृष्टांतस्थळ' काराच्या मते यातील 'अन्नाचा दृष्टांत', 'रामदेवाप्रति वसैए निरूपिला :' या तिन्ही दृष्टांतांत उत्तरोत्तर क्रम आहे. तिन्ही मिळून एक वाक्य आहे असे स्पष्ट दिसते. म्हणून हे तिन्ही दृष्टांत येथे एकत्रित घातले आहेत. त्यावरील दार्ष्टांतिके माझ्या मते स्वामींची असावीत. म्हणून तीही अंतर्भूत केली आहेत.)

## १४६ आलेगावीं लींगाचां देउळीं[१] वस्ति ।।

## १४७ पातुरडीं वैजनाथीं[१] वस्ति ।।

## १४८ टाकळीए उतरेस्वरीं वस्ति ।।

## १४९ वेळुवनीं वस्ति ।।

## १५० लाखपुरीए लक्षणेस्वरीं[१] वस्ति ।।

## १५१ चांगदेओभटा खेळावेया परीखू

*गोसावी उदयांचां पाहारा एकु चालति : मग वसतीचां गावीं राहाति : गोसावी विहरणा बीजें कारीती : आसन होए[१] :* गोसावी चांगदेओभटातें खेळों पाठवीती : "बटीका : खेळों[२] जा" *अग्नीचा संबंधु तवंपर्यंत करावा : जैसा पैन्हा गेलेयां वात श्लेष्मे न बधीति[३] :* आणि खेळों जाति[४] : ।।

## १५२ मार्गी चांगदेओभटांतें जाडि पांगुरवणें

*चांगदेवोभटांतें गोसावीं आपणेयांपुढें[१] नीजवीति[२] :* रात्रीं गोसावीयांपासि नैजैले असति : *गोसावीयांसि पावो लागैल म्हणौनि ते परतेपरते सरति : गोसावी म्हणति : "बटिका : ऐसें आरुतें ठाका[३]" म्हणौनि दोहीं श्रीकरीं ऐसें धरूनि आरुतें आणिती[२] :* सीयाळे दीस : तें सीत वाजे : गोसावी जाडि पांगुरवीति[४] : ।।

## १५३ जाडि परित्यागु

सीयाळे दीस : उदीयांचि गोसावी बीजें करीति : बाइसें जाडीचा[१] कोंगता करूनि गोसावीयांचां श्रीमुगुटीं घालिती : मग गोसावी मार्गी बीजें करीति : उन्ह नीगे : सीत फीटे : मग गोसावी श्रीमुगुटु लववीति : परि : 'बाइ : घेया :' ऐसें न म्हणति : आणि गोसावी मागुतवाणी[२]: श्रीमुगुटेंचि झाडुनि : जाडि खालि परित्येजीति : चांगदेओभटांतें म्हणति : " बटिका : जाडि घेया :" मग चांगदेवओभट जाडी घेती : घडी करूनि खांदावरि घालती : ऐसें प्रतवस्ती : ।।

---

**१४६.** १ **मु.(प्रवा.)** गावामध्यें एल्हणेश्वराचें देउळ : तेथ वसति जाली : **एवा.** गोपाळीं.

**१४७.** १ **एवा.** वाळुकेश्वरीं.

**१५०.** १ **गो.** लखमेस्वरिं.

**१५१.** १ (**मु.**). २ **भ.** खेळा : जा : ३ (**दृपा.** ७५. 'अग्निसंबंधाचा दृष्टांत' "हा दृष्टांत गोसावीं चांगदेवोभटाप्रति सींगणापुरीं नीरोपीला"–**दृस्थ.**) ४ **रावा.** हे लीळा सींगणापुरीं.

**१५२.** १ **मु.** आपणयां सेजे. २ (**ह.**). ३ **एवा.** सरा. ४ **रावा.** हे लीळा टाकळीए मार्गी.

**१५३.** १ **पं.** जाडीचें कोंगतें. २ **पं.** °वाहाणी.

## १५४ सींगणापुरीं अवस्थान : कोडेस्वरीं घाटेया हरिभटा भेटि

तैसेंचि गोसावीं वीहरणासि बीजें केलें : कोडेस्वरीं चौकीं आसन जालें : घाटे हरीभट[१] गंगेहुनि[२] आले : हातीं तांबवटी[३] : तांबवटीए उदक : तुळसी : देवतेसि तर्पण करावेया : गोसावीयांतें देखौनि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : तांबटीए उदक होतें : तेणें उदकें श्रीचरण प्रक्षाळिले : तुळसी वाइलीया : साष्टांगीं तुळसींचें अर्चन केलें : गोसावीं तेयातें श्रीकरें स्पर्शिलें : आणि गोसावीयांपासौनि तेया स्तीति जाली : भोगिली भंगली : *सर्वज्ञें चांगदेवातें म्हणीतलें : "बटिका : जीवासि वेध आणि वेधशक्ति ते एथौनिचि कीं गा : कुकडी असे : तें आंडीं घाली : पीलीं होती : तेयांसि पाखवा दे अमृतकळा असे ते संचरे : तयातवं तीयें वाढति : तैसे परमेस्वराचिये स्पर्शातव एका वेधु संचरेति[४] :"* हरिभट केतुला एकु काळु स्तीति भोगिली : भंगली : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया आवारा गोसावीं बीजें करावें जी :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग बीजें केलें : मग घरासि घेउनि आले : गोसावीयांसि मर्दनामादणें जालें : पुजाअवस्वरू जाला : भगतिजनांसहीत : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला[५] : ।।

## १५५ बाइसें : हंसराज रीधपुरा पाठवणें

उदीयांचि उपहुडू जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आजि वांकीएचा हाटु : श्रीप्रभूलागौनि एकि आसुचें एक वस्त्र घेयावें : तुम्हीं : हंसराजु : प्रमेस्वरपुरासि पुढें जा : एथ अवस्वरू करा तैसाचि श्रीप्रभूचां ठाइं करावा : बहीरवीं बीढार करा : दूरूनि श्रीप्रभूची दृष्टिची सेवा करावी : बाइ : तुम्हीं परमेस्वरपुर पावा ना तवं हें मागिलाकडौनि एइल :" मग बाइसें : हंसराजु : नीगालीं : गोसावी कोडेस्वरूवरि बोळवीत[१] आले : बाइसें वांकीयेसि गेलीं : वस्त्र[२] घेतलें : मग रीधपुरा गेलीं : ।।

## १५६ चांगदेवभटां स्तीति

गोसावीं वीहरणासि बीजें केलें : कोडेस्वरीं चौकीं आसन जालें : चांगदेओभट बहीरवांचां देउळीं बैसले होते : हरिभट गोसावीयांतें बोलाउं आले : सवें तेयांची लेंकि आलीं : हरीभटीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं आरोगणेसि बीजें

---

**१५४.** १ **एवा.** °देवाचेया गाभारेयाआंतु जपत होते : देवतेसि तर्पण करूनि बाहीरि नीगाले : तवं गोसावीयांतें देखिलें : आले : दंडवत घातलें— २ **पंगो.** बाहीरिलीकडौनि. ३ **गो.** ताभाण. ४ (**दृपा.** ४. कुकडीएचा दृष्टांत. 'चांगदेवोभटांप्रति सींगणापुरीं'— **दृस्थ.**) ५ °**एवा.** गोसावी पदमेस्वरा न वचतां बाहीरवाहिरें कोंडस्वरा बीजें केलें : मागिलाचि परि स्तीति : हरिभटाचां घरीं आरोगण : यानंतरें पदमेस्वरीं अवस्थान :

**१५५.** १ **मु.** अनुवर्जन केलें. २ **एवा.** तळवेलीसि दों आसुंचें वस्त्र घेतलें :

करावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[1] : पैलीं देउळीं बटीकु बैसला असे : तो बोलावा :" तेया[2] देउळासि गेलीं : तवं तेयाचें आसन अंतरीक्ष उपमत[3] असे[4]: वरूतें जातें : खालुतें एतें : वरि कळसीं लागत असे : ऐसें उपमतां देखिलें : आणि तीयें भीयालीं : माघौतीं आलीं : "जी जी : ते[5] देउळाचां कळसकळसां धांवत असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथिचें नावं घेया : 'तुमतें एथौनि बोलावीलें असे :' ऐसें म्हणां :" माघौतीं गेलीं : आणि म्हणीतलें : "आहो भटो : तुमतें श्रीचांगदेओराउळ गोसावी बोलावीत असति :" आणि तेयांची स्तीति भंगली : मग गोसावीं[6] हरीदेओभटाचेया आवारासि बीजें केलें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग गोसावीयांसि तेथचि पहुडु जाला[7] : वीळिचांची आरोगण : पहुडु तेथचि होए : ।।

## १५७ खडखांबुलां खेळु

नीच चांगदेओभट भीक्षा करूनि एति : झोळी दृष्टभुत करीति : मग जेवीति : तीये दीसीं चांगदेओभट भीक्षा करूनि आले : झोळी काठीए घातली : काठी टेंकुनि ठेविली : आणि स्तीति जाली : तैसेचि खडखांबुलां खेळों लागले : एरा खांबाहुनि एरू खांबु सीवीति : च्यार्‍ही पाहार चहुं खांबांभवतें भवंत होते : ऐसी स्तीति भोगीत होते : तवं दीसु नीगाला : उदीयांचि[1] गोसावीं परश्रेया बीजें केलें : तैसेंचि देउळासि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : काइ गा खडखांबुलां खेळत असा ?" गोसावीयांतें देखिलें आणि स्तीति भंगली : आले : श्रीचरणां लागले : आसन घातलें : गोसावी आसनीं बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "*बटीका : कव्हणी एकी माता असे : ते लेंकुरुवातें नीजौनि कांडुं जाए : कां दळों जाए : मोटका पान्हा ए : आणि ते जाणे : तें भुकैलें असैल : मग एउनि तयासि स्तनपान दे*[2] *:*" मग पुसिलें : "बटिका : जेविलेति ?" "जी नाहीं :" "कां गा नाहीं ?" "जी जी : गोसावीयांसि झोळी दृष्टभूत करावी होती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा आरूती :" आणिली : गोसावीं अवळोकिली : तवं साधन काहीं आलें नाहीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : रूक्ष असे : *साधन काहीं नाहीं :* " "*जी जी :* " *सर्वज्ञें म्हणीतलें : "तरी एथ सांघाचि ना : एथ म्हणिजे हो*[3] *:* ऐसेयां सेवटीली घरीं एकाधा एकु ठाओ आपजविजे हो : बटीका : जेवा जा :" चांगदेओभटीं म्हणीतलें : "पाणी नाहीं जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं माहात्मे कीं गा : एकीं[4] गावीं जेविजे : एकी गावीं आंचवीजे :"।।

---

**१५६.** १ **एवा.** °जा–. २ **एवा.** हरिभट देउळा बोलाउं गेले. ३ **ह.** उपवत. ४ **बी.** °वरि कळसी लागत असे. ५ **पं.** °उडताति. ६ **मु.** °सींगणापुरा. ७ **ह.** °वीळिचां हरिभटां स्तीति जाली : भोगिली : भंगली : **मु.** वीळिचां मागौती तेयां स्तीति जाली : भोगिली : भंगली :

**१५७.** १ **गो**$_2$ सवळेचि : २ (**दृपा.** ३८ 'दूरस्थ मातेचा दृष्टांत.' 'सींगणापुरीं चांगदेवोभटां खडखांबुला प्रसंगीं निरोपिला'**–दृस्थ.**). ३ (**मुरा.**). ४ **एवा.** ऐली थडीये जेविजे : पैली थडिये आंचविजे.

## १५८ रात्रीं भीक्षानव्याळी करणें

ऐसें त्रीरात्रि कीं पंचरात्रि गोसावीयांसि अवस्थान जालें : दोपाहारांचा पुजाअवस्वरू : आरोगण : प्रत्येहीं हरीभटाचां घरीं होए : वीळचां चांगदेओभट[1] भीक्षा करीति : मग गोसावीयांसि व्याळी होए :॥

## १५९ वांकीए पांडेस्वरीं वस्ति ॥

## १६० थूगावीं रेमेस्वरीं[1] वस्ति*

[मग गोसावीं थुगावासि बीजें केलें : देउळीं वस्ति जाली : मग एरी दीसीं गोसावीं उदेयांचि देउळाउतरे परश्र्यासि बीजें केलें : मग परश्र्यो सारुनि उदका वीनीयोगु जाला : पुर्वीली दारवठां वडु : तेया वडातळि गोसावी नावेक उभे राहीले : जवं चांगदेओ-भट एति तवं : मग गोसावीं बीजें केलें : ॥]

## १६१ रामां लींगाचां देउळीं आसन ॥

## १६२ सांउरीं बाळसमुद्र अवळोकणें*

[साउरीं अड अवळोकुनि चहुं दीसां : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हा बाळसमुद्र मां :" मग नावे कतीएचि चौबारां आसन जालें : मग बीजें केलें : ॥]

## १६३ तळवेलीं लींगाचां देउळीं आसन ॥

## १६४ खैराळां उपान्हौत्यागु*

[गोसावी खैराळें पातले : गावां पैलाकडे आसन जालें : मग गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : तेथौनि गोसावीं नावेक पुढारें बीजें केलें : तवं साळेचा कळसु देखिला : मग उपाहानौ फेडिलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : हें देखिलें गा परमेस्वरपुर : साळेचा कळसु दीसतु असे : एथ श्रीप्रभू राज्य करीत असति :" म्हणौनि रीधपुर दाखविलें : ऐसें म्हणौनि दोन्ही श्रीकर जोडुनि जय केलें : आणि चांगदेओ-भटींहीं जय केलें : सर्वज्ञें म्हणीतलें[1] : "हें काइ गा बटिका : एथौनि जये केलें : आणि तुम्हींहीं जय केलें ? तुम्हां साष्टांग लाभे कीं : घाला घाला दंडवतें :" चांगदेओभटीं दंडवतें घातलीं : मग गोसावीं श्रीप्रभूची महीमा नीरोपीत बीजें केलें : ॥]

---

**१५८.** १ **एवा.** °तयांचां घरींहुनि दुधभातु आणीति : मग– **एवा.** हरिभट तेथचि आणीति : मग–

**१६०.** १ **हबीमुरा.** उर्वेस्वरीं. **गो.** उतरेस्वरिं. *(**गो$_2$ गो$_3$**).

**१६२.** *(**गो$_2$ गो$_3$**).

**१६४.** *(**गो$_2$गो$_3$**)

१ **मुरा.** ° "बटिका : एथौनि जैसेंचि कीजैल तैसेंचि तुम्हींहीं कराल ?––.

## १६५ रीधपुरीं श्रीप्रभुदरीसन

"ऐसे गा श्रीप्रभू :" ऐसें नीरोपण करीतकरीत माल्हणदेवीसि बीजें केलें : तवं श्रीप्रभूंचीं पाउलें देखिलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : देखिलें गा ? श्रीप्रभू आतांचि एथ बीजें केलें होतें : एं देखिलीं श्रीप्रभूचीं पाउलें ?" ऐसें म्हणीतलें : रज वंदिलें[1] : तेथ नावेक आसन जालें : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं बीजें केलें : ऐसें प्रमेस्वरपुर पावले :।।

बाइसीं श्रीप्रभूसि पुजा केली : श्रीप्रभू खेळावेया माल्हणदेवीकडे बीजें केलें : बाइसें[2] तळेयाचीए पाळी बहीरवींहुनि उभीं ठाकौनि गोसावीयांची वाट पाहातें होतीं : श्रीप्रभू माल्हणदेवीसीं खेळु करूनि अळंदीयासि बीजें केलें : मागिलीचिकडौनि गोसावी बीजें करीत असति : तवं बाइसीं गोसावीयांतें अळगौनि देखिलें : आणि हरिखैलीं : आणि तेथौनि धावं घेतली : गोसावीयां उजुचि आलीं : पावतपावतां गोसावीं[3] श्रीमुखें : श्रीकरें : श्रीनेत्रें : तीहीं काकु वारिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : राहा :" श्रीप्रभूकडे दाखवीलें : आणि बाइसें दृष्टीचिए आळिवे राहीलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीप्रभू कवणीकडे खेळु करीत असति ?" बाइसीं म्हणीतलें : " बाबा : हे नव्हति : बाबा अळंदीयांपासि खेळत असति :" मग तेथ बीजें केलें : दोहीं देवां दरीसन जालें : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : हें देखिलें गा श्रीप्रभू : " आणि चांगदेओभटीं दंडवत घातलें : गोसावीं चांगदेओभटांतें सांडुनि पुढां बीजें केलें : दोहीं अळंदीयांमाजि श्रीप्रभू वेढे करीताति : ऐली अळंदीएसि तरि दुरि : पैली अळंदीएसि तरि जवळि : एतुलेया मानीं दोहीं देवांसि भेटि जाली : गोसावीं पुष्टिवीभागीं क्षेमाळींगन दीधलें तें श्रीप्रभूसि न मनेचि : " मेला जाए[4] : आरे : सोडि सोडि म्हणें : आरे : सोडी ना म्हणें : " म्हणौनि कोपु नटले : आणि गोसावीं सोडिलें : श्रीप्रभू अधरकंपन केलें : दोन्ही श्रीचरण भूमी बुदबुदकरि आफळिले : दगडें[5] भूमि आफळली : आमचां गोसावीं श्रीचरणातळील रज घेतलें : तें श्रीमुगुटावरि घातलें : तैसेंचि श्रीप्रभूगोसावीं नगरामध्यें बीजें केलें : ।।

## १६६ मठीं रोटी आरोगण

मग पुढां श्रीप्रभू : मागां आमचे गोसावी : तेया मागें बाइसें : हंसराजु : चांगदेवोभट : आमचां गोसावीं खोलबुंथि घालुनि : श्रीमुर्ति आछादूनि : ऐसें मढाउत्तरीली गोदरीया बीजें केलें : श्रीप्रभू नावेक पाइरीयांसीं खेळु खेळति : नावेक कवाडेंसीं खेळु केला :

---

**१६५.** १ **हमु.** °आणि चांगदेओभट रज उकरूं बैसले : गोसावीं हास्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : हें ऐसें कर्मचिं करटें (**बी.** कवटें) भेदुनी गेलें असे : तुम्हीं काइ उकरीत असां ?" २ **हबी.** बाइसें : हंसराजु : ३ **मु.** °बाइसांतें श्रीकरें वारिलें : ४ **शोध.** "इं काइ रे :—. ५ **एवा.** श्रीप्रभुगोसावीं भूमीचें इटाळ घेउनि आफळिलें :

नावेक वीनाएकेंसीं[१] खेळु केला : मग मढांतु बीजें केलें[२] : आमचे गोसावी माहाद्वारीं रीगतां डावेया हाताचीए खातां[३] : कवाडाआड उभे राहिले : तवं सुतवणीयाचां[४] मढीं चाटे होते : तेहीं श्रीप्रभूतें पुसिलें : " राउळो : जेवाल ? " श्रीप्रभू म्हणीतलें : " मेला जाए : जेवावें म्हणें : नेजवावें म्हणें : मेला जाए : जेवील म्हणें : आओ : आणि आणि म्हणें : " म्हणौनि आसन जालें : मग तेहीं तेलरोटी[५] आणिली : त्रीपुरूखांचेया मढाउतरे : उंचमढापुर्वे : नींबापश्चिमे उखळी होती : तेथ तेल घातलें : रोटी[६] घातली : श्रीप्रभू चाविथूंकि[७] करीति : मग गगनाची वास पाहाति : ऐसें आरोगण करिताति : ते लीळा आमचे गोसावी कवाडाआडौनि पाहात होते : मग चाविथूंकि करूनि[८] श्रीप्रभू दोहीं मढीचीए सांदीसि बीजें केलें : आमचां गोसावीं तेथ बीजें केलें : उकड आसन जालें : गोसावी श्रीप्रभूचा प्रसादु आरोगण करिताति : तवं गोसावीयांचें आगाधत्व चाटां देखौनि: वाटीए[९] तुप : पालमंडां रोटीएचा मो : ऐसें घेउनि आले : मग म्हणीतलें : " स्वीकरिजो जी : स्वीकरिजो जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीप्रभू[१०] यांसि योग्य : मा हें अयोग्य : हें श्रीप्रभूचा प्रसादु घेत असे : " तवं उंचमढु उजिवा घालुनि श्रीप्रभू बीजें केलें : इस्वर्य प्रगटिलें : म्हणौनि चाटेयांची सुतबडवीती मोगरी होती ते श्रीकरीं घेउनि आले : " आवो मेला जाए : वीदीत करिताए म्हणे : " म्हणौनि गोसावीयांतें पुष्टिवीभागीं बुदबुदकरि[११] घाए दीधले : दोनि[१२] : हळु हळु : आणि बाइसें बोबाइलीं : " वडीलें बाबाएं धाकुटा बाबा मारिला : " तवं गोसावीं श्रीकरें : श्रीमुगुटें : श्रीनेत्रें : तीहीं काकु वारिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : उगीं असा : हे श्रीप्रभूची प्रवृति : या श्रीप्रभूचीया केळीक्रुडा कीं : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पुरे कीजो जी : पुरे कीजो जी : श्रीकरू दूखवैल : " आणि श्रीप्रभू श्रीकरिची खुंटाफळी[१३] सांडीली : मग म्हणीतलें : " मेला[१४] जाए जाए म्हणें : " म्हणौनि खूदूखूदूकरि हांस्य स्वीकरिलें : मग आमचां गोसावीं तैसेंचि बहीरवांचेया देउळासि बीजें केलें : श्रीप्रभू तीकोउपाध्यांचां नीरुत्य कोणुवरि आमचेयां गोसावीयांतें बोळवीत आले : तेथौनि तीकोउपाध्यांचेया आवारा बीजें केलें : आमचां गोसावीं बहीरवां बीजें केलें : तेथ दीस वीस अवस्थान जालें : ॥

---

**१६६. १ हबी.** दारवठाबाहीरिली°. २ **एवा.** आमचां गोसावीहीं मढांतु बीजें केलें: ३ **प्रवा.** °गरुडारेयापासि : **गो**$_{२}$ °तीए कोनटां लपु स्वीकरीला. ४ **मुरा.** उचमढीं. ५ **एवा.** रोटीएचीं करंटीं. **गो$_{२}$पं.** सीळी रोटी. ६ **एवा.** खपलें आणिलीं. ७ **भ.** चावीरिया थुंकीरिया केलीया. ८ **मुरा.** °उंचमढू सव्यें घालुनि बीजें केलें. ९ **एवा.** तुपाचा नळा. १० **प्रवा.** श्रीप्रभु यांसि अयोग्य : मां हें योग्य ? ११ **अरा.** दुबदुबकरि. १२ **मुरा.** तीनि. १३ **मुराहबीपं.** मोगरी. १४ **रामदेवमुनि** : " ऐया माझा : आतां होए म्हणे : मारूं दीधलें म्हणें : "

## १६७ श्रीप्रभूसि वस्त्रपुजा

एरां दीसीं उदीयांसीचि श्रीप्रभूसि बाइसीं मादणें केलें : तवं आमचे गोसावी आंगणीं चरणचारी उभे होते : श्रीप्रभूसि मादणें जालें : *गोसावीं श्रीप्रभुलागि बाइसांकरवि वांकिये वस्त्र घेवविलें होतें : गोसावीं बाइसांसि म्हणीतलें : "बाइ : तें वस्त्र आणा : आरुतें :" बाइसीं वस्त्र आणिलें[१] : गोसावीं वस्त्र उकलौनि नीरीया केलीया : श्रीप्रभूसि दरुसन केलें : आणि म्हणीतलें : "स्वीकरीजो जी[२] :"* तवं श्रीप्रभू कोपु स्वीकरिला : "आरे : उगा उगा म्हणे :" म्हणौनि थोरें श्रांतें नीराकरीलें : पटिसाळेवरि बीजें केलें : गोसावीं वस्त्र माघौतें आछादिलें : *बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : ठेवा : श्रीप्रभूसि प्रवृत्ति नाहीं[३] :"* मग श्रीप्रभूसि बाइसीं पुजाअवस्वरू केला : तवं आमचे गोसावी[४] उतरीला सीहाडेनसीं उभे होते : पुजाअवस्वरू अवळोकिला : मग गोसावीं बहीरवां बीजें केलें : मग बाइसीं श्रीप्रभूसि आरोगण दिधली : थाळां आरोगण : वाटीए तुप : वाटां कालण : ऐसी श्रीप्रभूसि आरोगण दीधली : प्रसादु उरला : तेथ बाइसीं आणीक अन प्रुढवीलें[५] : मग पालवा-तळि सूनि बहीरवांसि घेउनि आलीं : गोसावीयांसि आरोगण जाली : मग दोहीं देवांचा उरला प्रसादु तो बाइसां हंसुराजासि आणि चांगदेओभटांसि जाला : *गोसावीं श्रीप्रभूसि पूजा दोनि केलीया : दीस दोनि तीनि वस्त्र वोळगवीलें : तें श्रीप्रभु नीराकरीलें[३] :* ।।

गोसावी उदीयांचि परश्रेयासि आदीत्या वाव्य कोनींसि बीजें करीति : परश्रयो सारूनि एति : आदीत्या आणि बहीरवांमाजि उष्णोदका वीनीयोगु करीति : मग आदीत्याचेया उंबरवटावरि उकडचि आसन होए : गोसावी आपुलेनि श्रीकरें चरणक्षाळण करीति : श्रीमुख प्रक्षाळीति : गुळुळा करीति : पुजाअवस्वरू करूं नेदीति : मग गोसावी तैसेंचि तीकोउपाध्यांचेया आवारासि बीजें करीति : तेथ आसन होए : बाइसें श्रीप्रभूसि पुजाअवस्वरू करिति : तवं श्रीप्रभूची पुजा अवळोकीति : मग मागौतें गोसावी बहीरवां बीजें करीति : बाइसीं श्रीप्रभूसि आरोगण तैसीचि दीधली : मग उरला प्रसादू : तेयांआंतु आणीकु अन प्रुढवीति[५] : मग पालवें झांकुनि घेउनि एति : मग गोसावीयांसि आरोगण होए : उरला प्रसादु : तो बाइसां : हंसराजा : चांगदेवोभटांसि होए : ।।

मग तीसरां दीसीं तीकोउपाध्यांचेया आवारासि बीजें केलें : आसन जालें : श्रीप्रभूसि मादणें जालें[६]: मग बाइसीं श्रीप्रभूसि पुजा केली : गोसावीं पुजा अवळोकिली : मग तेया दीसीं गोसावीं श्रीप्रभू प्रसंन देखिले : *गोसावीं दक्षिणीले पटिसाळेवरि गुडघे*

---

**१६७. १ अपंभगो.** °मग गोसावीं ऐसें वस्त्र उघडें करूनि दाखवीलें. २ **(हमु.)**. ३ **(ह.)**. ४ **एवा.** गोसावीयांसि दूसरीए ओसरीएवरि उकड आसन असे. ५ **हपं.** प्रोढवीलें. ६ **मुहबी.** °पूर्वाभिमूख चौकी : तेथ दक्षीणीली पटिसाळेवरि बाइसीं आसन रचिलें : पूजा केली : तवं आमचे गोसावी उत्तरीली पटिसाळेचेनि सीहाडेनसीं उभे : मग पटिसाळेआंतु दक्षिणीले पटिसाळेसी दक्षिणाभिमूख उभे : मग वस्त्र ओळगवीतां दक्षिणीले पटिसाळेवरि गुडघे मोडूनि पश्चिमाभिमूख आसन :

*मोडूनि पश्चिमाभिमुख आसन केलें*[७] *:* मग वस्त्र उघडें करूनि दाखविलें : श्रीप्रभू प्रसंनताचि नीराकारिलें : "आरे : उगा उगा म्हणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्वीकरिजो जी :" आणि श्रीप्रभू उगेचि होते : मग गोसावीं वस्त्र उकलिलें : पुढील वस्त्र खांदेंसीं धरिलें : मग नेसवीलें : मग श्रीप्रभू नेसलें होतें तें वस्त्र बाइसांहातीं दीधलें : बाइसीं वस्त्र झाडिलें : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ बाइ : श्रीप्रभूचें वस्त्र कैसें झाडितें असा ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : रजें भरलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीप्रभूचें वस्त्र : आणिक रज : ऐसें कैसें म्हणतें असा ? हें रज श्रीप्रभूचें कीं : हें रज कैसें ? बाइ[८] एथिचा प्रमाणु तो ब्रह्मादीकां दुर्लभू कीं :" ॥

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीप्रभूसि मधूराअंबिळाची प्रवृति : *श्रीप्रभूचां ठाइं आन-आन अन्न करा : श्रीप्रभूसि माखान्न प्रिये*[९] *:* तरि वडेमुक्षकरूनि उपाहारू[१०] करा :" "हो कां जी बाबा[११] :" मग बाइसीं उपाहारू केला : श्रीप्रभूसि मर्दना मादणें जालें : पुजाअवस्वरू केला : तीको उपाध्यांचा थाळा : वाटी[१२] : ठाणवै : श्रीप्रभूसि आरोगण दीधली : थाळां आरोगण : वाटीए तुप : वाटां कालण : ऐसी आरोगण दीधली : प्रसादु उरला : तेथ बाइसीं आणीक अन प्रुढवीलें : पालवांआंतु झांकुनि बहीरवांचेया देउळां घेउनि आलीं : गोसावीयांसि आरोगण जाली : उरला प्रसादु तो बाइसां : हंसराजां : चांगदेवोभटां : जाला : ॥

## १६८ बहीरवीं श्रीप्रभूक्रुडा

प्रतदीनीं आमचे गोसावी तीकोउपाध्यांचेया आवारासि बीजें करीति : ते दीसीं बीजें न करीतीचि : एकु दीसीं गोसावीं आसनीं उपवीष्ट असति : तवं श्रीप्रभू खेळतखेळत बारवेहुनि बहीरवांसि बीजें केलें : बहीरवींहुनि केसवासि बीजें केलें : मां केसवीचीयां देउळीयांचीयां प्रतिमांसीं खेळु करूं आदरिला : तेयांचेया कानावरि आंगुळीया ठेवीति : नाकावरि ठेवीति : डोळेयांवरि ठेवीति : नीडळावरि ठेवीति : तेवीचि म्हणति : "हा कानु : हा कानु : हें नाकु : हे डोळे : हें तोंडु : हा नीडळु :" आणि म्हणति : "तुं देओ : मेला जाए म्हणें : तुं देओ नव्हसि म्हणें :" ऐसें अवघेयांचि प्रतीमांसीं खेळतखेळत बहीरवांचेया देउळा बीजें केलें : बाइसें गोसावीयांजवळि उभीं होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीप्रभू बीजें करीत असति : नावेक परतीं जा :" तीएं परतीं गेलीं[१] : आणि श्रीप्रभू तैसाचि खेळ बहीरवांचीया प्रतीमांसीं खेळतखेळत आले : तेयांचेया नाकावरि आंगुळी ठेविति

---

७ (**मुहबी.**). ८ **एवा.** बाइ : हे रज ब्रह्मादिकां दुर्लभ कीं. ९ (**मुराबीह.**). १० **गो**$_2$ स्वे उपाहारू. ११ **मुराबीह.** °मग बाइसें प्रतिदीनीं वडे करीति. १२ **गो**$_2$ वाटी : पडिघा ठाणवै.

**१६८.** १ **एवा.** नेत्र झांकौनि उगीचि होती : खेळु न भंगावा : **मु.** °गोसावी नेत्र झांकूनि उगी

कानावरि आंगुळी ठेवीति : डोळेयांवरि ठेवीति : नीडळावरि ठेवीति : तेवीचि म्हणति : "हा कानु : हा नाकु : हा डोळा : हा नीडळु :" आणि तेवीचि म्हणति : "तुं देओ : मेला जाए म्हणें : तुं देओ नव्हसि म्हणें :" ऐसा बहीरवांचीए प्रतिमांसीं खेळु करीतकरीत बीजें केलें : तवं आमचे गोसावी तैसेचि नीचळ बैसले असति : मग गोसावीयांजवळि आले : मग तेयांतेयां अवेवांवरि आंगुळी ठेउनि म्हणीतलें : "हा कानु : हा नाकु : हा डोळा : हा नीडळु : हें तोंड :" ऐसें म्हणौनि गोसावीयांचेया भाळस्तळावरि बोट ठेविलें : मग श्रीप्रभू म्हणीतलें : "हां ओ : तुं देओ म्हणें : नव्हे म्हणें : हा देओ होए म्हणें :" म्हणौनि गोसावीयांचेया श्रीमुगुटावरि हातु ठेविला : "हा देओ नव्हे म्हणें :" म्हणौनि बहीरवांकडे आंगुळी दाविली[2] : "हा देओ होए :" ऐसा देवें देओ प्रकासिला[3] : मग श्रीप्रभू नगराआंतु बीजें केलें : ।।

आमचेयां गोसावीयांसि दाहा[4] दीस अवस्थान जालें : मग तेथौनि बीजें करावेयाची प्रवृति : गोसावीं हंसराजु श्रीप्रभूचीए सेवे राहाविली : तेयांचीए हातीं अवघा वेचु दीधला[5] : तीं दीसांचा वेचु गोसावीं सवें घेतला : मग तेथौनि गोसावीं गंगातीरा बीजें केलें : ।।

## १६९ बेलौरां संकनाथीं[1] वस्ति ।।

## १७० सीराळां नागनाथीं वस्ति ।।

## १७१ टाकरखेडां वस्ति ।।

## १७२ आसुटीए द्रव्यकथन

मग सर्वज्ञें आसुटीएसि बीजें केलें : माहालखूमीचीए[1] देउळीं आसन जालें : गोसावीं तीं दीसांचा वेचु आणिला होता : तो सरला : बाइसांजवळि तीनि रूवे उरले होते : ते मागांचि सरले : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : वेचु सरला : काहीं वेचावेया नाहीं :" "बटीका : जा गा : सोळें[2] दामीं पोफळफोडणा गाहाणु ठेवा :" "हो कां जी :" बाइसीं म्हणीतलें : "बाबातें एकु पोफळफोडणा : रवणुभवनु : तो[3] बाबा गाहाणु ठेवीति : बाबा : हा पोफळफोडणा गाहाणु ठेवीजैल : मां बाबासि काइ माघौतें एथ एणें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

आसनीं उपविष्ट होते : खेळु न भंगावा म्हणौनि. २ **बाइदेवोबा वासना :** "आवो मेला जाए : हा देओ होए म्हणे :" म्हणौनि गोसावीयांची कांदी आंगुळिया दाखवीली (**एवा.** दाटिली). ३ **मु.** प्रसंसिला : **एवा.** ऐसी देवें देवाची प्रतीष्टा केली. ४ **एवा.** वीस. ५ **एवा.** वेचावेया दामु सोळा दीधले.

**१६९.** १ **रावा.** भीवेस्वरीं.

**१७२.** १ **एवा.** लेपाचां. २ **एवा.** सोळे दामीं गाहाणु ठेवा : आठां दामांचा वेचु आणा : आणि आठ दाम रोक आणा. ३ **भगो.** तो नावांनावां (**गो**$_2$ नखानखा) गाहाण ठेवावा ? **गो**$_2$ बाबातें

"बाइ : एथ प्रवृति असे तरि ए देवतेखालि[४] सात लोही एकें दांडें *द्रव्या भरिलिया*[५] आळिलीया असति : आळुमाळु माती ऐसी सारिजैल आणि दीसती : परि बाइ : एथ प्रवृति नाहीं :" मग चांगदेवोभट गेले : सोळें दामीं पोफळफोडणा वाणीयांपासि गाहाणु ठेविला : आठां दामांचा वेचु आणिला : आठ दाम रोकडे आणिले : मग बाइसीं उपाहारू नीफजविला : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : पहुडु उपहुडु जाला : पटिसाळेवरि गोसावी आसनीं बैसले असति : तवं तो देवतेसि वाणीया आला : तेणें गोसावीयांतें देखिलें : मग चांगदेवोभटांतें पुसिलें : "पोफळफोडणा गाहाण ठेविला तो या गोसावीयांचा ?" चांगदेवोभटीं म्हणीतलें : "होए : या गोसावीयांचा :" मग पीसवीएचे सोळा दाम काढिले : ते गोसावीयांपुढें ठेउनि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग पुसिलें : "जी जी : पोफळफोडणा गोसावीयांचा ?" गोसावीं मानिलें : "जी जी : आपुला आणुं धाडावा :" सर्वज्ञें[६] म्हणीतलें : "बटीका जा : पोफळफोडणा गाहाणु ठेविला असे : तो घेउनि या :" चांगदेवोभट गेले : पोफळफोडणा घेउनि आले[७] : ।।

## १७३ वांठवडां लाखमढीं वस्ति ।।

## १७४ मांगळौरीं वऱ्हारदेवीं वस्ति : चांगदेवोभटां खेळा अनुमोदन

तेथौनि गोसावीं मांगळौरा बीजें केलें : मांगळौरीं वऱ्हारदेवीं गोसावीयांसि वस्ति[१] जाली : मग बाइसीं श्रीचरण प्रक्षाळिले : मां गोसावीं चांगदेवोभटातें म्हणीतलें : "बटीका : खेळों जा :" तवं बाइसीं म्हणीतलें : "बटीका : तेवीचि बाबाचीं धोत्रें रूळलीं[२] असति : तीएं नेया : मा धूनि घेउनि या[३] :" नदी कृस्नघाटासि धोत्रें धुआवेया गेले : धोत्रें[४] बरवीं धुतलीं : ओपवीलीं : मागुतीं धुनि वाळतें घातलीं : मग वाळवंटीं पायांवरि ओलसरे मातीचीया दोनि देउळिया करीति : तेवीचि म्हणति : "हे श्रीगुंडमराउळांची गुंफा : हे श्रीचांगदेवोराउळांची गुंफा :" तेवीचि दोहीं देवांचें लवलवां नावं घेति[५] : म्हणति : "श्रीगुंडमराउळां गोसावीयांचे श्रीचरण सरण : श्रीचांगदेवोराउळां गोसावीयांचे श्रीचरण सरण :" मग लाहेंलाहें म्हणति : 'एरएरां गोसावीयांचे श्रीचरण सरण :' ऐसें लवलवां म्हणति : एरा देउळाकडे हात जोडीति : एरा देउळाकडे हात जोडीति : ऐसा खेळु खेळत असति : तवं बाइसीं उपाहारू नीफजविला : मग गोसावीयांसि उपहुडु जाला : आरोगण : गुळुळा : वीडा जाला : मागौता पहुडु जाला : उपहुडु जाला : मग[६]

---

मागेंपुढें पोफळफोडणाचि रवणभवोनु. ४ **एवा.** या लेपाखालि. ५ (**मु.**). ६ **एवा.** तेणें चांगदेवोभटातें म्हणीतलें : "भटो : तुम्ही——. ७ **गो.** °एक म्हणति : पीसवीस होता : तो ओळगवीला.

**१७४.** १ **एवा.** आसन जालें. **एवा.** उपेणें जालें. २ **ह.** तीमिलीं. ३ एकाचीया वासना : गोसावीयांचा बाहीरवासु तेहींच धुवावेया नेला. ४ **एवा** बाहीरवासु ताउनि ओपौनि वाळतु घातला. ५ **एवा.** उचारिति : **एवा.** आठवीति. ६ **एवा.** गोसावीं तेथ बीजें केलें.

बाइसीं म्हणीतलें : " बाबा : बटीकु बाबाचीं वस्त्रें धों गेला : तो उसीरू लाविला : आझुइं नैए :" मग गोसावीं तेथ बीजें केलें : तवं खेळत असति : गोसावी जाउनि पाठिसीं उभे जाले : आणि तेयांवरि साउली पडली : आणि तेहीं माघौतें प्रतौनि पाहिलें : तवं गोसावीयांतें देखिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बटीका : काइ खेळत असा ? श्रीप्रभूतें[७] आठवीत असा : तेवीचि यातें आठवीत असा ?" चांगदेवो भटीं म्हणीतलें : " जी जी :" तैसेचि उठिले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होए : ऐसें म्हणिजे हो : " ।।

## १७५ सेंदूर्जनीं ब्राह्मणा आभासु कथन

मग गोसावीं सेंदूर्जनासि बीजें केलें : गावांउतरे अग्ने[१] वडाखालि गोसावीयांसि आसन जालें : ते ब्राम्हण पींपळाखालि स्तीति भोगीत बैसले असति[२] : तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा पैलु तो ब्राह्मणु नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "होए बाइ :" बाइसीं म्हणीतलें : "या काइ जालें बाबा ? बाबातें देखिलेयांहीं परि बाबाजवळि नैए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तो यातें तेथचि देखत असे :" बाइसीं म्हणीतलें : " हें काइ बाबा ? बाबा तरि एथ असति : मां तो कैसा तेथ देखतु असे ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बोलाउं जाओं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बोलावा : जा :" बाइसें गेलीं : मग म्हणीतलें : " भटो : तुमतें बाबा बोलावीत असति :" तवं तेहीं म्हणीतलें : "बाइ : हे नव्हति गोसावी एथचि असति : आम्हीं गोसावीयांजवळिचि असों :" जेया पींपळातळिं[३] गोसावीयांतें देखौनि स्तीति जाली तेया पींपळातळिं[३] प्रतदींनिं एउनि बैसति : बाइसीं म्हणीतलें : "हे नव्हति भटो : बाबा पैन्हां असति : " तीहीं म्हणीतलें : "हे नव्हति गोसावी : गोसावीयांपासि असिजे :" बाइसें माघौतीं गोसावीयांपासि आलीं : मग गोसावीयांपुढां अवघी गोष्टि सांघीतली : "बाबा : तो नैए : म्हणते : 'हे नव्हति गोसावी उभे असति :' " सर्वज्ञें म्हणीतलें : "*बाइ : चातकु असे : तो गावोगावीं : देशोदेशीं : नदोनदीं बावी पोखरणी असति : परी तेथचें उदक न स्वीकरी : वरौति चांचु करुनि उदैलेया मेघाची वास पाहे : तो वरीषे तै तो स्वीकरी*[४] : बाइ : जा : तेयांचे खांद चुरा :" मग बाइसें गेलीं : तेयांचे खांद चुरिले[५] : आणि स्तीति भंगली : "हें काइ बाइ : गोसावी कें ? तुम्हीं केधवां आलींति ? " उठिला : बाइसां दंडवत घातलें : बाइसीं म्हणीतलें : "पैल नव्हति ? बाबा तुमतें बोलावीत असति : "

---

७ **एवा.** श्रीप्रभूचें नांव घेत असा : तेवींचि याचें नावं घेत असा ?

**१७५.** १ **मु.** वाव्ये वावरामध्यें : २ **रावा.** ऐला पींपळातळि गोसावीयांसि आसन होतें : ब्राम्हणु तो पैलां वडातळिं---. ३ **एवा.** वडातळिं. ४ ('चातकाचा दृष्टांत' ७१. 'सेंदुर्जनीचिया बाइयाप्रति : **एवा.** ब्राह्मणाप्रति निरोपिला'–**दृस्थ. एवा** : 'देमाइसाप्रति निरूपिला'.) ५ **हीराइसें :** °बाइसें

मग गोसावीयांतें देखिलें : आणि उठिला : मग आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले[६] : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया घरा बीजें करावें जी :" गोसावीं तेयाची वीनवणी स्वीकरिली : तेयांचेया घरा बीजें केलें : सडासंमार्जनें : चौकरंगमाळिका भरिलीया : गुढीयातोरणें उभिलीया : चरणक्षाळण केलें : मग मर्दनामादणें जालें : पुजा आरोगण जाली : टीळे लाविले : वीडा ओळगविला : पहुडु उपहुडू जाला : तेथचि गोसावीयांसि वस्ति जाली : मग उदैक गोसावीं डोडवीहरेयासि बीजें केलें : ।।

## १७६ डोडवीहीरां राघवदेवां भेटि

*पुर्वी भोगनाराएणीं राघवदेवासि भेटि जाली होती[१] :* डोडवीहीरेया[२] गोसावीं बीजें करीत असति : ऐसें राघोभटीं आइकिलें : मोहोउछावो केला : मग घरोघरीं संमार्जनें : चौकरंगमाळिका भरिलीया : गुढीया उभिलीया : माडवीं[३] *भागवत मेळवीले : मग*[४] मखरें करूनि गोसावीयां साउमे नीगाले[५] : परिएळीं पानें : पोफळें : फुलें : नानावीधें पुजाद्रव्यें : ऐसें गाजतवाजत[६] नाचत गोसावीयांसि साउमे आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : *गावा उत्तरें खडकाळिये पींपळु*[८] *:* तेथ गोसावीयांसि आसन जालें : तेथचि गोसावीयांसि बरवी पुजा केली : अवघेयांसि टीळेमाळा गंधाक्षता : तांबोळें : मग राघवदेवीं म्हणीतलें : "हें काइ गोमटदेव हो : अपत्यातें कहीं सांभाळा ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें नव्हे आलें :" राघवदेवीं म्हणीतलें : "नीकें केलें गोमटदेव हो : बरवें केलें गोमटदेव हो : आपुलेया अपत्यातें पडीताळिलें :" म्हणौनि राघवदेव गाति : नाचति : हरीखैजति : खेदखीन होति : श्रीचरणां मोमे[७] देति : ऐसेचि गांत : वांत : नाचत[८] : टाळकाहाळीं मादळीं गोसावीयांतें आपुलेया आवारा नेलें : गोसावीयांवरि जळमांडवी[९] धरिली : लोकु पुसे : "राघवदेव हो : हे कवण ?" ते गांत : वांत : नाचत : चालतचि असति : तेवीचि म्हणति : "हे गोमटदेव बा : हे गोमटदेव बा :" ऐसीयापरि गोसावीं तेयाचेया घरासि बीजें केलें : तेयातें दोनि चौकीया होतीया : मग देव्हारचौकी-एसि गोसावीयांसि आसन जालें : मर्दना जाली : मादणें जालें[१०] : सर्वांगीं चंदनाची पींजरि लाविली : गोसावीयांसि पुजा जाली : आरोगण सप्रवारी जाली : गुळुळा : वीडा जाला :

---

हनवटीएं धरूनि ऐसें गोसावीयांकडे दाखवीलें : . . .आणि—. ६ **एवा.** आणि मागौती स्तीति सुभर जाली : बाइसीं पुसिलें : "बाबा : काइ करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : याचें खांद रगडा :" रगडीले : आणि स्तीति भंगली.

**१७६.** १ (**हबी.**). पूर्वार्ध लीळा १२९ पाहा. २ **पंभगोगो.** सेंदुर्जनासि गोसावीं बीजें केलें. ३ **हबी.** मखरें मांडळी करूनि—. ४ (**मुराहबी.**). ५ **एवा.** दसमीची आइति केली होती. ६ **मुराबी.** गातवात. **गो.** गातवात नाचत बागडीं धरीत. ७ **अ.** मुमे. ८ **गो.** °बींबत. बागडीं धरीत. ९ **एवा.** चांदोवा धरिला. १० **मु.** (**शोध**). "मर्दनासमैं राघव भागवत परते गेलेयां बाइसीं पुसिलें : "बाबा : हे कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे राघव भागवत : वैष्णव : हे आणिकां वैष्णवांसारिखे

पहुडु तेथचि : गोसावीयांसि वस्ति जाली[११] : बोळवीत आले : बाइसीं पुसिलें : "बाबा हे कवण ?" "बाइ : हे दुंडीराउळांचे अनुग्रहीत :" मग एरीं दीसीं गोसावीं बीजें करूं आदरिलें : तवं राघोभटीं म्हणीतलें : "हें काइ जी गोमटदेव हो : आजीचि कैसें जाल ? आजि राहावें :" मग गोसावीयांतें तीए दीसीं राहाविलें : मग तेयां दीं माघौतीं गोसावीयांसि पुजा आरोगण जाली : दोनि दीस गोसावीयांसि देव्हारचौकीएसि वस्ति जाली : मग तीसरां दीसीं गोसावीं बीजें केलें[१२] : ॥

## १७७ फुलंबरीए[१] मढीं वस्ति

फुलंबरीए[१] गावांतु मढु असे : उतरामुख : तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : तवं[२] सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जाणा पां हा मढु कवणें केला ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : नेणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[३] : कव्हणी एकु ब्राह्मणु वाटा जातु होता[४] : तेणें थीलरीं एकीं सागळ भरिली : तें तो रसु म्हणौनि नेणे : तो एकां ब्राह्मणाचां घरीं उतरला : सागळ खुंटीएसि ठेविली : आपण गावांआंतु कणवृतीसि गेला : तवं खालि[५] ताट होतें : तेयावरि थेंब गळति : तें सुवर्ण जालें : तवं घरिचां घरधनी बाहीरीलाकडौनि आला : तेयासि ताटीं जेउं घातलें : तेणें पुसिलें : 'हें ताट कोणाचें ?' घरिचां म्हणीतलें : 'आमचें :' 'हें कोठें ठेविलें होतें ?' 'ना एथ सागळेखालि :' तेणें आणीक ताट ठेविलें : तवं तेंहीं सुवर्ण जालें : तेणें म्हणीतलें : 'हा सीधरसु होए :' एतुकेनि तो

---

नव्हेति : हे दुंडीराउळाचे अनुगृहीत : ॥ **शोध** : ॥ "बाबा : तरि हे काइ उपदेशीति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दुंडीराउळ ते शुक्लभट : ते श्रीप्रभूचे गुरु होउनि द्वारावतीये गेले : तेथ स्थीति जाली : श्रीचांगदेवराउळीं खराटेनि हाणितलें : इतुकेनि आधीं होतें तें भंगलें : मग तया मंत्रजात जेतुकें तेतुकें वीदीत जालें : मग दंड देवपट जे पुढां होती ते गोमतीये आंतु घातलीं : आणि नीगाले :" यावरि बाइसीं पुसिलें : "बाबा : तरि हे श्रीचांगदेवराउळाचे नातु होति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "होति : बाइ :"
११ अ. °उदैक गोसावीं तेथौनि बीजें केलें : ते गोसावीयांसि बोळवीत आले : [यापुढील वृत्तांत **अ.** पोथीत **एकी वासना** म्हणून दिला आहे. तो **पंभगोगो$_2$गो$_3$** या प्रतींतील संहितेत मुळातच असल्यामुळे (**एवा.** म्हणून नव्हे) येथे स्वीकारला आहे.] **मुहबी.** °एरी दी गोसावीयांतें राहावीत होते : परि गोसावी न ऱ्हातीचि. १२ या लीळेनंतर **हबी.** प्रतीत 'राजौरीं वस्ति' ही लीळा आहे. व त्यानंतर 'फुलंबरीए वस्ति' ही लीळा आहे. **बी.** प्रतीत पुढील मजकूर आहे. "**राजौरीं वस्ति** : गोसावीं भीमडाउवाचां राजौरीं बीजें केलें : गावांपुर्वे टेकावरि गणेशाचें देउळ : पूर्वाभिमुख : तेथ वसति जाली : ॥

**१७७.** १ अ. फूलउंबरीए. २ **अहबीपं.** °बाइसीं पुसिलें : "बाबा : हा मढु कवणें केला ?" सर्वज्ञें म्हणीतलें :—. ३ **गो$_2$गो$_3$** "बाइ : ब्राह्मणू एकू वेळणीएसि कणवृति करी : वोली भीक्षा मागे : तेणें वेव्हारू संजोगी : ऐसें तेणें द्रव्य जोडीलें : मग तेणें द्रव्यें हा मढु केला." ४ **गो$_2$गो$_3$** °वीहीरीआंतु संध्यावंदनासि रीगाला . . . संध्या केली : सागळ भरली तो सीधरसु म्हणौनि नेणे. ५ **गो$_2$गो$_3$** °ताट : थाळा : वाटी ठेविलें होतें. ते सागळ गळों लागली : थेंब भुइवरि पडति : ते तुसार

रसु ओतूनि घेतला : ते सागळ आणीकें पाणीएं भरिली : मग जेयाची सागळ तो आला[६] : सागळ घेउनि गेला : एतुकेनि तेणें रसें हे धातु वेधली : तेणें द्रव्यें हा मढु केला : बाइ[७] : " ।।

## १७८ गद्याणां वनदेवीं वस्ति

गद्याणा[१] गावां पश्चीमे टेंकावरि पुर्वामुखें वनदेवाचें देउळ : तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : ।।

## १७९ एळापुरीं राजवीहारीं अवस्थान

मग तेथौनि गोसावीं कटकावरौनि एळापूरा बीजें केलें : राजवीहारावरिचील वाट : तेथ गोसावी घाटु उतरले : लेणां राजवीहारीं अवस्थान जालें[१] : तेथ गोसावीयांसि माचेयावरि पुजाअवस्वरू होए : आरोगण होए : गुळुळा : वीडा होए : तेथचि माचेयावरि पहुडु उपहुडु होए : ऐसें तीन्हि अवसर माचेयावरि होति[२] : चांगदेवोभट एळापुरा-आंतौनि वेचु आणिती : राजवीहारीं दीस तीनि अवस्थान जालें : ।।

## १८० घोर सब्द श्रवण

एकु दीस रात्रीं बाइसें नीजैलीं होतीं : तवं वसो डरों लागले : बाइला लेकरूवांतें परियंदति[१] : भालुवा भूंकति : एकें एकांतें गोष्टी सांघतें असतीं : पाखीरूवांचे सब्द : ऐसे नाना सब्द बाइसें आइकति : आणि भीति : मग उदीयांचि बाइसीं गोसावीयांतें पुसिलें : " बाबा : घोर सबद आइकिजताति : वसो डरताति : भालुवा भूंकताति : बाइला लेकरूवां परियंदति[१] : एकें एकांसीं गोष्टी सांघतें असति : अनेक पाखीरूवांचे सबद आइकीजताति : ऐसां नाना सबदीं मज नीद्रा नैए बाबा : मीं भीति असें बाबा : ऐसें काइ? " सर्वज्ञें म्हणीतलें:

---

उसळउसळों तेयांचेया ताटाथाळेयासि लागति : तीए अवघीं सोनेयाचीं जालीं. ६ **गो₂गो₃** °सागळ काढीली : तवं धारुकें सोनेयाचें देखिलें : आणि तेणेंचि तो सुखीया जाला : मग तेणें तें धारुकें काढीलें : तांबेयाचें करुनि घातलें : मग तो गेला : मग तेणें द्रव्यें हा मढु केला. ७ या लीळेतील आख्याइका **मुरागो.** प्रतींत नाही.

**१७८.** १ **गो₂गो₃** मग गोसावीं गद्याणासि बीजें केलें : गावांआंतु सोमनाथाचें देउळ : तेथ बीजें केलें : तेथ चौकीं नावेक आसन जालें : मग तें रचमचेचें स्थान म्हणौनि मग वनदेवाचेया देउळासि बीजें केलें : चौकीं आसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें बळिपाचें देवत मां : " परि भगतजन उगेचि होते : तेथ वस्ति जाली : ।।

**१७९.** १ **गो₂गो₃** °बाइसीं पुसिलें : " बाबा : एं लेणीं कवणें केलीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एं कोकस वाढैएं (**एवा.** पाथरटें) केलीं : ". २ **अ.** °एक म्हणति तीएचि ओसरीए आरोगण होए.

**१८०.** १ (**भगो₂** प्रतीतील प्रस्तुत पाठ स्वीकारला आहे.) **अपंह.** परिएंदेति. **हवी.** पर्येंदेताति

" बाइ : हे एथिची देवता : स्वइछा वर्तति असे : " तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : तरि आणिकी ठाइं बीढारू कीजो : मीं भीति आहे बाबा : " तवं चांगदेवोभटीं म्हणीतलें : " हो बाइ : भीतां असिजे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भीतें असा ? " " हो बाबा : भीति असें : " मग चांगदेवोभटांतें गोसावीं बीढार पाहों पाठवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : जा : बीढार[२] पाहुनि या : " " हो कां जी : " ते गेले : चतुर्विधाचा[३] मढ पाहुनि आले : " जी जी : तीनि मढ असति : एकु गोसावीयांलागि : एकु बाइसांलागि : एकु रांधावेयालागि : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : बीढार पाहों जाणा गा : " इतुकेनि बाइसांकरवि मात्रा करविली : बाइसीं अवघी आइति केली : गोसावीयांसि तेथ त्रीरात्रि अवस्थान होतें : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : कुसुमेस्वरावरौनि : चक्रपाणीहूनि : एकवीरेहूनि : माहाकाळेहूनि : चतुर्वीधांचेया मढासि बीजें केलें : पाहातपाहात : मढु प्रतेयासि आला : मग चतुर्वीधाचां मढीं गोसावीयांसि मास दाहा अवस्थान जालें : ।।

## १८१ उपाधीयां भेटि

एकी दीसीं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : सांपें कव्हणी बाबाचीं भगतिजनें नैएति? मज अळसु लागतु असे : बाबा : " सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "बाइ : एती : पाणीभातु सांचा : " बाइसीं पाणीभातु सांचिला[२] : एकु दीसु गोसावीयांसि दोपाहारांचा पुजाअवस्वरू जाला : आरोगण : पहुडु : उपहुडु जाला : गोसावी सयेनासनींचि असति : दादोसमुक्ष बळ्हेग्रामिचे माहाजन कटका देवगीरीसि आले होते : काहीं राजव्यापारें : तवं तेथ तेहीं ऐसें आइकिलें : जें गोसावी एळापुरीं राज्य करिताति : मग तेहीं दादोसांपुढां सांघीतलें : दादोसीं आइकिलें : मग गोसावीयांचेया दरीसनालागौनि एळापुरासि अवघेचि आले : माहाकाळाचां देउळीं बीढार केलें : जापीए[३] वीस्णुभट : आणीकु एकु : ऐसे दोघ गावांतु पुजाद्रव्यें : पानें : पोफळें : आणुं पाठवीले : मग दादोसीं उपाध्यातें म्हणीतलें : " जानो : तुं जाए पां : जें गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे : ऐसें पाहुनि ए : " ऐसें म्हणौनि उपाध्यातें पाठवीले : उपाध्ये आले : तवं मढासि कवाडें घातलीं असति : मग उपाधीं कवाड ऐसें आंगुळीयाकरूनि टीबकारिलें[४] : बाइसीं म्हणीतलें : "कवाड कवण टीबकारीत[५] असे बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : चांगोसवें बटीकु आला होता : तो हा नव्हेल कीं? तेयांचेया सारीखा सबदु आइकीजतु असिजे : " तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : एसणेया वेळा कोण एइल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " पाहा पां : जा : " बाइसें आलीं : कवाड उघडीलें :

---

**मुरा.** परियें देताति. २ **अह.** चतुर्विधाचा मढ–. ३ **बी.** चतुर्वेदांचा. **मु.** चतुर्वेद्यांचा. **गो**[२] चतुर्विद्याचा.

**१८१.** १ **अहबी.** °बाइ : एथही अळसु लागत असे–. २ यापूर्वीचा हा प्रास्ताविक भाग फक्त **अहबी.** प्रतीतच आहे. ३ **बीपं.** जपीए. ४ **बी.** टिमकारिलें. **पं.** वाजवीलें. ५ **मु.** उघडवीत.

तवं उपाध्ये देखिले : "हें काइ बटीका : तुं केधवां आलासि?" "बाइ : आतांचि आलां :" उपाधीं बाइसां नमस्कारू[६] केला : बाइसें पुढें ह्रखैजतेंह्रखैजतें आलीं : गोसावीं पुसिलें : "बाइ[७] : कवण ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बाबा : आपण म्हणीतलें तोचि बाबा : बटीका ए : बाबासि दंडवत करि :" गोसावीयांसि भीतरि आसन होतें : उपाध्ये भीतरि आले : तवं आंधारू पडिला असे : उपाधीं ऐसा मनोर्थू केला : 'बाइसें वाति लाविती कां तरि मी गोसावीयांतें डोळां देखतां : गोसावीयांची श्रीमुर्ति पाहातां :' तवं गोसावीयांचीए श्रीमुर्तीवरि[८] भगकरि प्रकासु पडिला : मग देखों लागले : आले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : हें[९] काइ गा दीवेनि देखिजे ? हें आपणेयांतें दाखवी तेव्हळीच्चि देखिजे कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : तुमचा कुटंबपरीवारू नीकेनि असे कीं गा ?" "जी जी :" "माहाजन अवघे नीकेनि असति ?" "जी जी : असति[१०] :"

मग गोसावीं उपाध्यांतें म्हणीतलें : "बटीका : एथौनि तुम्हांसि काहीं गोमटें जालें : तें तुमचां ठाइं काहीं वर्ते ?" उपाधीं म्हणीतलें : "जी जी : वर्ते :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेंचि कैसें वर्ते ?" "जी जी : एकलेयां जाओं आवडे : पाहारखांडु बैसों आवडे : गोसावीयांतें आठौं आवडे : एकलेयां बैसलेयां गोसावीयांतें आठवीजे तवंतवं सुखचि होए जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यातें काइ म्हणा ?" उपाधीं म्हणीतलें : "जी जी : जेचि श्रीकृस्णचक्रवर्ती तेचि आमचे गोसावी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेंचि काइसेयातव ?" उपाधीं म्हणीतलें : "ना जी : गोसावीं भोगनाराएणीं कास्तां ह्रीदेओपंडीतांप्रति गोपाळमंत्रीं भेद नीरोपिले : ते मीयां कवाडाआडौनि आइकिले : 'तेयांतु एकु भेदु तो[११] श्रीकृस्णचक्रवती जाणति : कां रखुमीणि देवि जाणति : आणिक कव्हणीचि नेणे[१०] :' ऐसें सर्वज्ञें म्हणीतलें : यातव जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बटीकु काइ म्हणतु असे ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : दैवांचा भाग्याचा बाबा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे[१२] जें होए तें होए : तुमची बुधि तव नीकी[१३] : आपुलें[१४] जाओं नेदिजे हो :" ।।

## १८२ तथा ईश्वरप्रतीति पुसणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : माहात्मा तुमचां गावीं असे कीं ?" "जी जी : असे :" "माहात्मेयांतें सीक्षासुत्र वर्ते ?" "जी जी : वर्ते :" "तेथ तुम्हीं जा ?" "जी जी

---

पं. वाजवीत. ६ **एवा.** दंडवत केलें. ७. **शोध.** "बाइ : अभ्यागतें आलीं ?" ८ **मु.** श्रीमूर्त्तीपासूनि ९ **एवा.** "परमेश्वरू काइ गा अन्यप्रकाशकु : तो स्वयंप्रकाशकु कीं :" १० **एवा.** °"बटिका तुंचि आला असेसि कीं आणिक कव्हणी आले असेति ? ११ **एवा.** °श्रीकृष्णचक्रव्रतीं निरोपिले आणिक रखुमीणिदेवीं परिसीला : तेव्हळि आणीक कोण्हीचि नाहीं : ऐसें सर्वज्ञें म्हणीतलें : यातव : १२ **एवा.** हें श्रीकृष्णचक्रव्रती होए : कां जें होए तें होए : १३ **एवा.** °ना तुम्हीं तव नीके १४ **मु.** °ऐसी बुद्धि जावों नेदिजे.

**१८२.** १ **अहभगोगो**, सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मा नीका ना गा ?" "जी जी :" "कैसा नीका

जाओं : " गोसावीं पुसिलें : " बटिका : एथ आणि माहात्मेयांवरि तुम्हां कैसी बुधि[२] ? " उपाधीए उगेचि राहिले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ सारिखीचि ?" उपाधीं म्हणीतलें : " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि जैसी म्हणीतलें तैसी ? " " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : बटीकु काइ म्हणतु असे ?" बाइसें नावेक दुचीतें होतीं : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : दैवांचा भाग्याचा बाबा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ना : हा आतां आन एक म्हणतु असे :" बाइसीं म्हणीतलें : " काइ म्हणतु असे बाबा ?" " ना बाइ : एथौनि ऐसें पुसिलें : ' एथ आणि माहात्मेयांवरि तुम्हां कैसी बुधि ? ' ' ना सारिखीचि : ' ऐसें म्हणतु असे : " बाइसीं म्हणीतलें : " मर मर पोरा : तुझीए कीडडीए बांधें घागरा : मां मसणवरि जाए टुणुटुणु[३] करीत : माहात्मा काइसा खाडाचा ? काइसें तेयाचें आचारीत्व ? मसणाचें : बाबातें रडौनि वीद्या[४] मागीतली : बाबासि आणि रामासि सरि करीतु असे[५] ?" बाइसां गोसावीं कोपोंचि दीधलें : मग म्हणीतलें : " बाइ : उगीचि असा : सतेव[६] जीवांसि काइ जाणणें असे ? एथौनि जाणवीजे[७] तैचि जाणिजे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : देव[८] काइ अनेक असति ? देओ तो एकुचि कीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : माहात्मा म्हणिजे आणीक जीव तैसा तो एकु जीउ : ऐसें जाणिजे हो : माहात्मा एथिचा ऐसें मनिजे हो : " ऐसी इस्वरप्रतीति करूनि प्रत्या आणिलें : ।।

मग गोसावीं उपाध्यांतें पुसिलें : " बटीका : एकला तुंचि आलासि कीं आणिक कव्हणीं आले ?" उपाधीं म्हणीतलें : " ना जी : दादोस आले असति : १ : नागदेओ उपाध्य : २ : रांके[९] लखूमींद्रभट : ३ : बागडे वीस्णुभट : ४ : जापीए वीस्णुभट : ५ : आपदेओ भट : ६ : जनक नरसींहभट : ७ : पदकर नागदेओभट : ८ : भागवंत[१०] : ९ : रवळो : १० : नाथोबा : ११ : गतीए[११] कमळनाएकु : १२ : " ऐसीं नावें घेओंघेओं अवघेचि सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : तुमची वाट पाहात असती : " म्हणौनि ऐसें श्रीमुखिचें तांबोळ दीधलें : श्रीकंठिची माळ दीधली : आपुलेनि श्रीकरें टीळा लाविला : मग मागौतें म्हणीतलें : " आतां जा : ते तुमची वाट पाहात असती :" ।।

## १८३ आत्मतीर्थ प्रसंसा

सर्वज्ञें म्हणीतलें : " बटीका : तुमचां गावीं आत्मतीर्थ एक असे कीं ? " उपाधीं म्हणीतलें : " जी जी : असे : " " तेथ तुम्हीं जा ?" " ना जी : पंचपर्वीं जाओं : " सर्वज्ञें

---

जैसे हे तैसा ?" उपाधीं म्हणीतलें : " जी जी : " २ **एवा.** प्रतीति. ३ **एवा.** टुंटुं. ४ **एवा.** आचारीत्व. ५ **एवा.** तया समळी जीवासि आणि बाबासि ओ सरी घातली. ६ **एवा.** स्वसतां. ७ **अ.** जाणवीलेयांवांचौनि." ८ **एवा.** °देव काइ सारिखेचि ? ९ **पं.** लंके°. १० **एवा.** आनो. **पं.** आलो. ११ **ह. एवा.** गातक.

म्हणीतलें : " बटीका : तेथ प्रतीहीं जाइजे हो : बटीका : तें आणिका स्थावरा[१] तीर्थासारिखें तीर्थ नव्हे कि : तेथ साक्षात श्रीदत्तात्रप्रभूची प्रतीष्टा : तेथ तुम्ही नीच जाइजे हो[२] :" ।।

## १८४ देवां : सीक्षां भेटि

देवीं म्हणीतलें : " जानोएं उसीरू लाविला : " म्हणौनि कोपों लागले : मग अवघे दर्शनासि नीगाले : तवं उपाधीए वाटे एत भेटले : देवीं म्हणीतलें : " हें काइ जानो ? गेलासि तो गेलासीचि : तेथचि बैसौनि राहिलासि : मागुता सांघों नैएसीचि ?" उसीरू लाविला म्हणौनि उपाध्यांसि कोपों लागले : एरीं अवघां म्हणीतलें : " दादो : एयांसि तुम्हीं कां कोपत असां ? गोसावीयांचेया दरीसनासि जाइजे : मां गोसावीयांपासौनि काइ नीगों आवडत असे ?" उपाधीयांचीए तोंडीं तांबोळ : गळां माळ : टीळा : देखौनि तें दादोसां न मनेचि : ते अधीका कोपों लागले : तवं वीस्णुभटीं म्हणीतलें : " हें काइ दादो : तुम्हीं यातें कां कोपत असां ? गोसावीयांपासि गेलेयां मां काइ नीगों आवडत असे ?" मग अवघेचि आले : गोसावीं बाहीरि बीजें केलें : बाइसें जवं आसन आणीति तवं उपाधीं आपुली पासवडी बैसों घातली : सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : पासवडी मैळैल ना ?" उपाधीं म्हणीतलें : " ना जी : माझी प्रसादाची होइल : " तवं बाइसीं जाडि आणिली : आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : दादोसीं गोसावीयांतें जेथौनि देखिलें तेथौनि दंडवतें घातलीं : गोसावी आसनावरि उभे जाले : मग गोसावीं देवांसि क्षेमाळींगन दीधलें : एरां जेयांसि क्षेमाळींगन देओं आलें तेयांसि दीधलें : मग अवघेयांतें प्रूथकाकारें संभाखिलें[१] : मग गोसावीं पुसिलें : " माहात्मेयांसि काइ स्नानें भोजनें जालीं ?" " ना जी : स्नानें जालीं : परि भोजनें होआवीं असति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें पाणीभातु असे ?" बाइसीं म्हणीतलें : " हो बाबा : आसे : " रवळोकरवीं[२] खागरि भरूनि पाणीयां आणवीलें : सोंडी धुववीली : मग गोसावीं पुसिलें : " माहात्मेयांसि काइ पृथक[३] पात्र ?" देवीं म्हणीतलें : " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आतांचें तवं ऐसें हों देया : मग तुमचें तें काइ केहीं गेलें असे ?" बाइसीं भातु आणिला : सोंडीएवरि घातला : मग अवघेचि एकत्र बैसले : बाइसें पाणीभातु उपसोंउपसों देति : चांगदेओभट आणुंआणुं घालीति : गोसावीं प्रसादु केला : अवघे एकवट आपणेयापुढें जेववीले : अवघे जेउं लागले : देव एकीकडेचि[४] जेवीति : गोसावीं उपाधीयांतें ऐसें खूणावीलें : मग[५] तेहीं अवघे येकत्र केलें : मग अवघे

---

१८३. १ **एवा.** पार्थीवा—. २ **एवा.** °पंचाळेश्वरासि गेला होतासि ? हें तीये स्थानीं होतें तेथ जाइजे" (**हीराइसें** : तेथ प्रतिदीनीं जाइजे हो बटिका :")

१८४. १ **एवा.** पुसिलें. **अ.** °सपुर्व तें सपुर्वीपरी संबोखिलें : अपुर्वापरी अपुर्व तें संभाखिलें अवघेयांतें प्रतक्षाप्रतक्षा खेमवार्ता पुसिली. २ **अ.** रवळो कीं दादो तें नेणिजे. **रावा.** आपदेवें भागवत पाणीं आणीलें : **गो.** चांगदेओ भटाकरवि घागरि भरुनि आणवीली. ३ **अगोपं.** प्रतक्ष ४ **एवा.** एकीकडौनि. ५ **हबी.** मग उपाधीं देवापुढील भातु आपणेयांकडे घातला : आपणेयांपुढील तेयांकडे घातला : एकत्र केला.

जेविले : अवघेयां तांबोळें देववीलीं : मग बीढारासि पाठवीले : मग वीळिचांचेया पुजाअवस्वरासि अवघेचि आले : पुजाअवस्वरू पाहिला : मग अवघेचि बीढारासि गेले : उपाधीए राहिले : बाइसीं म्हणीतलें : "बटीका : तुझे अवघेचि गेले : तुं जासि ना : तें काइ ?" उपाधीं म्हणीतलें : "जाइन आणि काइ बाइ :" मागुतें बाइसीं म्हणीतलें : "बटीका : तुझे अवघेचि गेले : तुं न वचसीचि तें काइ ? बटीका : तुं कां राहिलासि ? तुं जाए : तुझे सांघाती तुझी वाट पाहात असति :" मग गोसावीं म्हणीतलें : "असों देया बाइ : हा एथचि राहील : चांगोसवें नीजैल :" मग उपाध्ये राहिले :।।

## १८५ द्रीढ पुरूख नाम करणें

एरी दीसीं अवघे उदीयांचेया पुजाअवस्वरासि आले : पुजाअवस्वरू जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हा पैलु मढु रीता असे : एथ बीढार घेउनि या :" "हो कां जी :" मग देवीं बीढार आणवीलें : दादोसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीयांतें वीळिचा उपाहारू मीं करीन जी :" गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग वीळिचांचेया वेळीं दादोसीं गावांआंतौनि कणीकि आणवीली[1] : मग रोटीया केलीया : दोहीं मढां-माझारिली सांदी उपाध्ये रोटीया भाजीत असति : तवं गोसावीं वीहरणौनि बीजें केलें[2] : ऐसें गोसावी तेथ बीजें केलें : गोसावीं दोहीं मढांमाझारि उभे जाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "मां रे : एसणीया[3] रोटीयाचि ?" "जी जी :" गोसावीं उपाध्यातें म्हणीतलें : "बटीका : एसणी रोटी आधीएकि टाके[4] ?" उपाधीं म्हणीतलें : "ना जी : आर्धीया काइ होइल जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरी काइ पाउणएकि टाकैल ?" "ना जी : पाउणा काइ होइल जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि काइ समग्र एकि ?" "ना जी : समग्रा काइ होइल जी ?" "तरि[5] कीती रोटी ? सवाएकि ?" "ना जी : दीढएकि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तरि तुम्हां द्रीढ पुरूख म्हणा :" ।।

## १८६ लेणां सायापुरूखू दाखवणें

गोसावीयांसि एकु दीं उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग वीहीरणासि बीजें केलें : एका लेणेयाचां चौकीं[1] आसन जालें : सवें चांगदेओभट : बाइसेंमुक्षकरूनि समस्तें भगतिजनें असति : भगतजन चौकावरि उभे ठाकति : आणि पुढीली भीती भव्य पुरूखू देखति : कमळांची[2] आंगी लेइ्ला : ऐसा पुरूखू देखति : चौकाखालि उभे

---

१८५. १ °**एवा.** कटकासि आले होते : तेथौनीचि कणीकि : तुप : आणिलें होतें. २ °**एवा.** लघुपरिश्रेयासि गोसावीं बीजें केलें : चांगदेवभटांचेया खांदावरि श्रीकरू : तयांचां हातीं सागळ : ऐसें गोसावी–. ३ **मु.** एव्हडीया. **बी.** एसणालीया. ४ **पंबी.** टाकैल ? **मु.** पुरे. **एवा.** खपे. **शोध.** "बटिका : हे रोटी काइ अर्धएक पुरे ? ५ **मुरा.** "तरि काइ सवाये ?" "ना जी : सवाये कां दीढ" **पं.** "ना जी : सवाया काइ होइल?" "तरि काइ दीढा एकी होइल ?" "जी जी दीढा होइल :"

१८६. १ **प्रवा.** कांटे वसै. **रावा.** राजवीहारू तेथ. २ **एवा.** चक्राची (**गो**$_2$ वय चक्राची.)

ठाकति : आणि नेदखति[३] : मग भगतिजनीं गोसावीयांतें पुसिलें : "हें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा छायापुरूखू गा : हा सीधाचा संकेतु गा : जेणें एं लेणीं केलीं तेणें पुरूखें[४] एथ आपुली छाया[५] नीक्षेपिली असे :"।।

## १८७ आगमसमो कथन

एकु दीं उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावीं माणिकेस्वराचेया[१] लेणेयासि वीहरणासि बीजें केलें : तीए लेणां वीवर : तेणें वीवरें गोसावीं बीजें केलें : बाइसीं म्हणीतलें : "हें काइ बाबा : *आपण कें जाइजत असिजे*[२] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीया नको बाइ :" मग पुढां गोसावी : मागां बाइसें : मग एरामागें एर : गोसावीयांचा फुटा बाइसीं धरिला : बाइसांचा पालउ भगतिजनीं धरिला : एरएरातें धरूनि : ऐसीं भगतिजनें अवघींचि कासे लागलीं : वीवरेंवीवरें गोसावी बीजें करिताति : तवं एकी ठाइं भगकरि उजीएडु पडिला : पुढां एकु घटु मांडिला असे : घटाभवंतीं डोइया[३] गुंडुंगुंडु बैसलीं असति : सर्वज्ञें भगतिजनातें म्हणीतलें : "उगीयांचि असा : काहीं बोलों नको :" म्हणौनि पुढारें बीजें केलें : बाइसीं पुसिलें : "बाबा : हें ऐसें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा यांचा[४] आगमसमो :" "बाबा : आगमसमो म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें: "बाइ : हा सीधसंकेतु[५] :" गोसावीं पुढारें बीजें केलें[६] तें वीवर इसाळुवाचां लेणां उसासलें : तेथ बाळाणें होतें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : चरणक्षाळण जालें : तवं एळापुर देखिलें : बाइसीं पुसिलें : "बाबा : हें कवण नगर ?" "बाइ : हें एळापुर[७] :" "हें काइ बाबा : इतुकी वाट[८] आलों आणि हें एळापुरचि :" "बाइ : हा अवघा डोंगरू दीढा गाउंवांचेनि मानें : अव्हा चौरासु पोकळु केला असे : एथिचा रीगावा नीगावा कव्हणीचि नेणे : जेणें केलें तो जाणे : कां एथौनि जाणिजे :"।।

---

आंगीटोपरें : खाड वींचरीतु : ऐसा—. ३ **पं.** °गोसावीं पुसिलें : "भागेया : ऐसें काइ गा ?" "जी जी : चक्रांची आंगी लेइला ऐसा पुरुषु जी :" "जा पां :" जाति तवं काहींच नेदखति : मागुतें गोसावीयापासि एति : आणि देखती : मग गोसावीयांतें पुसिलें—. ४ **एबा.** करितेनि पुरुषें°. ५ **गो$_2$गो$_3$** (**एवा.**) प्रतबींब नीक्षेपिलें असे.

**१८७.** १ **भ.** मरगजेचेया. **एवा.** एकां. २ (**बी.**). ३ **भपंगोगो$_2$** °बुंथि घालुंघालुं. ४ **बी.** (**हीराइसें.**) आगमियांचा आगमसमो वर्त्तत असे. ५ **एवा.** हा मुनींचा संकेतु. **गो$_2$गो$_3$** "बाइ : हे अष्टभैरवांची उपास्ति करीत असति : परि वरती वास न पाहाति :" ६ **गो$_2$गो$_3$** °तवं एक लेणें माहावीसाळ देखिलें : भवंती जाळारखी : (**गो$_3$** जाळारक्षी) : उजीएडु पडतु असे : तेथ बाळाणेंनसीं नावेक गोसावीयांसि आसन जालें : मग तेथौनि पुढारें बीजें केलें : तवं इसाळुवाचें लेणें उसासलें : तेथ खांबेसीं आसन जालें : ७ **गो$_2$गो$_3$** एळौर. ८ **मु.** भोये. **बी.** भुइ.

## १८८ चांगदेओभटां लेणां परीखू

गोसावीं वीहरणा एका लेणेयासि[१] बीजें केलें : *चांगदेओभटातें कांटिवसैये पाठवीलें*[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटीका : तुम्हीं पैला लेणेयां जा :" चांगदेओभट गेले : तवं[३] एरांचे पाए एरांकडे : एकांचीं रूंडें : एकांचीं मुखें टकमकां वास पाहातें : एकें वाजतें : कुंथतें : परीयेंदेतें[४] : एऱ्हवीं तरि जडें : परि चेतनें ऐसीं वाटति[५] : तैसें देखौनि भीयाले : ते माघौतें गोसावीयांपासि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा बटिका : गेलेति : मां काइ देखिलें ?" तेहीं जैसें देखिलें तैसी अवघी वेवस्ता गोसावीयांपासि सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलवीतेति तरि बोलती : साउमां मार्गु पुसतेति तरि सांघती : साउमे जातेति तरि आणीक आश्चर्यें देखतेति :"।।

## १८९ आपदेओभटां प्रल्हादवीद्या[१]नीखेदु

आपदेओभट[२] ऐसें एका लेणेयां[३] वस्त्रें धों गेले : वस्त्रें धूतलीं : वाळतें घातलीं : बैसले : तवं पुरूखु एकु आला : तो तेयां खांडेवरि घेओं लागला : जैसें पाणीयांतु खांडें वाहुनि जाए तैसें जाए : तवंतवं तेयांसि सुख होए : ऐसा उसीरू जाला : मग गोसावीयांपासि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीं पुसिलें : "उसीरू कां गा लाविला : भागेया ?" "जी जी : मी एका लेणेयासि[४] गेलां होतां : वस्त्रें धों : वस्त्रें धूनि वाळतें घातलीं : मग बैसलां : तवं पुरूखु एकु आला : तो मातें खांडेवरि घेओं लागला : खांडेवरि घे तवंतवं सुखचि होए : हां जी : तरि तें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते प्रल्हादाची[५] वीद्या गा :" "हां जी : तरि ते आम्हांसि जाली ?"

---

**१८८.** १ **गो**₂**गो**₃ (**प्रवा.** गोमटदेवाचेया लेणेयासि. **रावा.** अंनकैचेया लेणेयासि). २ (**मुराहबी.**). ३ **मुराहबी.** तवं आडवींतीडवीं पडिलीं देखीलीं : एकीकडे एकांचे पाये : एकीकडे एकांचीया डोइया : ऐसीं पासलीं पडिलीं असति : डोळे मीलमीलवीत : वोंठ फुलफुलवीति : ४ **बी.** पर्येंदेतें. **अ.** परूवंतें. **भ.** परिवंतें. **गो.** परुवंततें. ५ **गो**₂ (**बोचरीयां धानाइसाचीया वासना** : °तैसें देखीलें : आंणि साउमे गेले : तेयांतें पुसीलें : "तुम्हीं ऐसीं कवणें ?" "ना आम्हीं वीद्यावंतें :" "कोणी मार्गीचीं ?" "ना दीव्य मार्गीचीं :" "तेथचें अनुस्ठान कैसें ?" "ना तें तुम्हीं पुसौनि काइ कराल ?" तेव्हळि पुढारेंचि गेले : तवं पुढां सप्तपताळें लेणें देखीलें : तेथ मनुक्षें : स्त्रीयंचें : पसुअें प्रकासरूपें : त्यजोमय ऐसीं देखीलीं : आणि प्रतले : मग एउनि गोसावीयांपासि सांघीतलें : गोसावीं उगेचि आइकीलें : मग गोसावीं मढासि बीजें केलें :।।)

**१८९.** १ **पंभगो.** प्रार्धविद्या. २ **मुरा.** एकु दी गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं नागझरिये (**तथा** लेणेया एकासि) विहरणा बीजें केलें : गोसावीं आपदेवभटातें म्हणीतलें : "भटो : तुम्हीं पैला लेणिया जा :" "हो कां जी :" म्हणौनि गेले : तवं भव्य पुरुषु एकु : आंगी कमळांची ऐसी लेउनि आला : हातीं सुवर्णाचें खर्ग : तेणें खांदावरि आपदेवोभटातें हाणे तवंतवं तया सूखचि होए—. ३ **एवा.** नागझरीकडे. ४ **पं.** मी अनकैएसि°. ५ **पंभगो.** प्रार्धाची.

गोसावीं श्रीमुगुटु हालवीला : सर्वज्ञें म्हणीतलें : "ते[६] तुम्हां नव्हे : ते तुम्हां एथौनि[७] दीसे[८] :" ॥

## १९० सप्तदसकळानीक्षेदु

आपदेओभट[१] अणकैए धोत्रें धों गेले होते : धोत्रें धूनि वाळतें घातलीं : बैसले : आणि तेयां स्तीति जाली : आणि देखों लागले : तवं वरीखां सोळांची सोवासीनि एकि आली : खोडसवारिखी[२] : खळिचा साउला : खळिची चोळी : हातीं सोनेयांची[३] करे : तेयांचेया माथेयावरि धार घातली : तवंतवं तेयां सुखचि होए : *ऐसी स्तीती केतुला एकु काळु भोगिली : मग*[४] स्तीति भंगली : मग आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीं पुसिलें : "उसीरू कां गा लाविला भागेया ?" मग तेहीं मागील अवघें वृतांत गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : मीं अणकैए धोत्रें धों गेलां : धोत्रें धुतलीं : वाळतें घातलीं : बैसलां : तवं अस्त्री एकि आली : खळिचा साउला : खळिची चोळी : हातीं सोनेयांची करे : माझेया माथेयावरि धार घातली : तवंतवं मज सुखचि होए : हां जी : तरि ते काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते चंद्राची सतरावीं कळा गा[५] :" "हां जी : तरि ते आम्हांसि जाली ?" गोसावीं श्रीमुगुटु हालवीला : "ते तुम्हां नाहीं :" "हां जी : तरि ते काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते[६] एथौनि दीसे[७] : कां एथिचीया जवळीकां दीसे :" ॥

## १९१ सारंगपंडितां भेटि

सारंगपंडीत प्रतीष्ठानीहुनि[१] नीगाले : सवें मोकानंद : एकाइसें[२] : देमाइसें : घोडें[३] ऐसी गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : तीएं कटकावरौनि एतें होतीं : कटकीं[४] हाटांतुनि एताति : तवं ओलेयां पोफळांची रासि[५] देखिली : तीएं पोफळें घेतलीं : केळें वीकतें होतीं : तीएं केळें घेतलीं : आंबे घेतले : मोकानंदापासि दुरडीएसि दीधलीं : ऐसे नागझरीएसि आले : उतरले : सीळीया रोटीया होतीया : एकाइसीं[६] म्हणीतलें : "पंडितो :

---

६ **हीराइसें.** ते तुम्हां कां गा होइल ? ७ **एवा.** एथिचिया जवळीका. ८ **गोरा.** दाखवीली.

**१९०.** १ **मुराहबी.** एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं नागझरियेसि बीजें केलें : आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : तुम्ही पैलां लेणियांसि जा :" आपदेवोभट गेले : बैसले : (**मुरा.** तवं सोडषवरुषी स्त्री– **हबी.** °आणि स्तीति जाली : आणि देखों लागले : तवं वरीखा सोळांची–.) २ **बी.** षोडषवऋषी. ३ **मुराहबी.** सुवर्णाचा कळसु. **एवा.** सोनेयाचा करा. ४ (**हबी.**). ५ **हीराइसें.** °तुम्हावरि वरिखते होती. ६ **हीराइसें.** "ते तुम्हां कां गा होइल : ते तुम्हां एथौनि कीं गा :" ७ **एवा.** दीजैल.

**१९१.** १ **मुराहबी.** °देवगीरीसि काहीं आपुलेनि कार्ये (**हबी.** आपुलेया कार्यासि) आले : सवें देमाइसें. . .तवं गोसावीयांतें एळापुरीं आइकीलें : मग दर्शनासि आलीं. २ **हबी.** लखुबाइसें. ३ **हबी.** °उगाणेयाचा बैलु. ४ **मुराहबी.** तव महादेवोपुरघाटीं आंबे वानियेचे वीकत असति ते घेतले. ५ **ह.** वाखारी. ६ **मुराहबी.** देमाइसातें म्हणीतलें : "देमाइ : एथ जेउं. **एवा.** सारंगपंडितीं

एथ जेउं : मग गोसावीयांचेया दरीसनासि जाओं :" तवं देमाइसीं म्हणीतलें : " हें काइ एकाइ ? गोसावीयांचां आखरीं गोसावीयांसि नेभटतां कैसीं जेउं ? जेउं : मग कैसीं गोसावीयांचेया दरीसनासि जाओं ?" तवं एकाइसीं म्हणीतलें : " सरा ओ परतीं : पंडित भूकाळु : पीत करपैल : गोसावीयांचेया दरीसनासि ऐसांचि पुढां भूक सुनि जाओंनि तरि काइ बाइसें आम्हांसि लवकरि जेउं घालितें असति ?" मग देमाइसीं सारंगपंडितांतें म्हणीतलें :" हें काइ पंडितो : एथिचेया एथ जेउं : मां कैसे गोसावीयांचेया दरीसनासि जाओं ?" तवं सारंगपंडीतीं म्हणीतलें : " ना हें तैसें आमचेया गोसावीयांचां ठाइं काहीं नाहीं : तीनि[७] वेळ जेवावें : आणि दरीसनासि जावें : तुम्हीं गोसावीयांपुढें नको सांघों :" देमाइसीं म्हणीतलें : " हें काइ पंडितो : मा गोसावीयांपुढां काइ सांघावें लागत असे ? गोसावी काइ नेणति ?" तेहीं म्हणीतलें : " जाणति तें तैसेंचि : परि तुम्हीं नको सांघों :" मग आंघोळी केलीया : सीळीया[८] रोटीया होतीया : जेउं बैसले : रोटीयांचा[९] मो : केळें : तुप : आपण जेविलीं : रोटीयांचीं करंटें आणि केळांचीया साली देमाइसासि घातलीया : आपण लवलवकरि जेविले : आंचवले : वीडा घेतला : आवगु[१०] सरिसा केला : टोपरियाचिए बाले[११] दरीसनालागि आसु बांधली : " मोकानंदा चाल :" मोकानंदें दुरडी घेतली : दोघै नीगाले : सवें एकाइसें नीगालीं : देमाइसासि उसीरू लागला : रोटी चाविता : तवं आपण पुढां गेले : गोसावीयांसीं दरीसन जालें : पानें : पोफळें : केळें : आंबे : दीढ रोटी गोसावीयांसि दरीसनासि केली : आसु एकि दरीसनालागि आणिली होती : ते दरीसना न करितिचि : तवं देमाइसें आलीं : दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " देमतीए[१२] : तुम्हां उसीरू कां लागला ?" " जी जी[१३] : सारंगपंडितीं केळें घेतलीं : नागझरीए जेउं बैसले : मीयां म्हणीतलें : 'सारंगपंडितो : गोसावीयांचेया दरीसनासि जेउनि कैसीं जाल ?' तवं एहीं म्हणीतलें : 'ना तैसें आमचेयां गोसावीयांचां ठाइं हें काहीं नाहीं : तीनि वेळ जेवावें : आणि दरीसना जावें :' मग जेउं बैसले : रोटीयांचा मो : तुप : केळें : आपण घेतलीं : रोटीयांचीं सकलें आणि केळांचीया साली मज घातलीया : ते जी : केळांचीया साली रोटीयेचीं सकलें चावितां उसीरू जाला :" तवं सारंगपंडितीं आंगुळीया करूनि गळेयाकडे दाखवीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "*ऐसें तरि एथ उसिटी*

---

एकाइसातें म्हणीतलें. ७ **एवा.** पांच. ८ **मुरा.** रोटिया केलीया. ९ **एवा.** मउवा रोटीया आपण घेतलीया : देमाइसासि नीबर रोटी दीधली. **एवा.** आपण केळांचा मो : वाटां तुप घेतलें : देमाइसासि केळांची सालि दीधली. १० **मुराबी.** आंगीया केलीया. **ह.** आंगीया सरिसीया–. ११ **बी.** बागे. **ह.** बाहाले. १२ **हीराइसें.** °तुम्ही माघारीं तें काइ ? १३ **मुरा.** °रोटीयांचीं सकलें (**एवा.** खपले). चावेति ना जी : म्हणौनि उसीरू लागला :" " रोटिया काइसीया देमती ?" मग मागील अवघेंचि व्रीतांत सांघीतलें : तीये सांघति : तेवीचि सारंगपंडितांची वास पाहाति :

*रोटी दरिसना केली मा*[१४] *:* हां गा : आणिका जडा पार्थीवा तीर्था जाइजे : मग तीर्थउपवासु कीजे : तीर्थदेवता न पाहात नेजवीजे : तें नाहीं : मा सांगातुधर्मु तोही नाहीं : मागां एणेंहीं एकु सांगातुधर्मु अनुष्टिला : " यावरि गोसावी चोराची गोष्टि सांघीतली[१५] :।।

## १९२ सारंगपंडितांसीं पोफळी खेळु

मग गोसावी पोफळें पाहात होते : गोसावीं एक पोफळ श्रीकरीं घेतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : जाणा पां गा : हें पोफळ कैसें ? " तवं तेंहीं म्हणीतलें : " ना जी : नीकें[१] : हें नवीए रासिचीं निवडुनि घेतलीं : " *" एथौनि : हें नीकें[१] नव्हें : म्हणिजत असिजे :" " ना जी : हें नीकें[२] :"* गोसावीं एक पोफळ पोफळफोडणेनि[३] फोडिलें : तवं आंतु काळें[४] नीगालें : " हें काइ जी : नवी रासि आली होती : तेयांतु नीवडुनि मीयां घेतलीं : तरि एथ पाणी मेलें असैल : आणि काइ जी : " मग गोसावीं मागौतीं दोन्हीं सकलें मेळवीलीं : मग म्हणितलें : "पांडेया : जाणा पां गा : हें पोफळ कैसें असे ? " " ना जी : काळेंकुहीटि असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि नीकें म्हणिजत असिजे : " सारंगपंडितीं म्हणीतलें : " ना जी : आतां नीकें काइ होइल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " नीकें होए तरि तुमचीए डोइएचे जाए : ना तरि हें जाए :" म्हणौनि गोसावी टोपरेयाची बालेंआंतु आसु होती तीएकडे श्रीकरू केला : तीहीं म्हणीतलें : "हो कां जी : हें गोसावीयांचीचि नव्हे ?" म्हणौनि आणिलें : मग गोसावीं ऐसें करूनि दाखवीलें : तवं आंतु पीवळें ऐसें चोखट नीगालें[५] : गोसावीं टोपरेयांकडे श्रीकरू घालुनि टोपरेयाचीए बालेंआंतु आसु होती ते घेतली : बाइसांकडे टाकुनि घातली : " बाइ : हें घेया : एथिचेया उपेगासि नेया : " " जी जी : हे गोसावीयांचीचि आसु गोसावीं घेतली : मीयां अभिळाखू केला : " ।।

## १९३ तथा अंब्रग्रहण

सारंगपंडितीं आंबे गोसावीयांलागौनि आणिले होते : गोसावीयांसि ओळगविले होते : तेयांआंतुलु एकु आंबा श्रीकरीं घेतला : गोसावीं अवग्रहण[१] केला : मागुता तेथ ठेविला : मग बाइसीं अवघी आइति केली[२] : बाइसें पीळितें होतीं : तवं तेया आंबेया रसु

---

सारंगपंडीत गळेयाकडे आंगोळिया दाखवीति : १४ (**हबीभगोपं.**). १५ पूर्वार्ध (एकांक) लीळा ५७ पाहा.

**१९२.** १ **एवा.** चोखट. २ (**मुराह.**). **मुराबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "होड काइ ? " गोसावीं दृष्टीचीया खूणा आसु दाखवीली : **हीराइसें.** सर्वज्ञें म्हणीतलें : "होड काइ ? आसु जाए :" ३ **अगोहबीपं.** आंगुळीचीया चीकीया करुनि. (**बीगो.** चीपा करुनि. **पं.** चीपलाउनि. **ह.** चीकातीया करुनि). ४ **एवा.** ओखटें. ५ **मुरा.** °एतुलेनि ते क्षोभले ठेले : मग गोसावीं आसु आसुडुनि घेतली आणि बाइसांकडे टाकुनि घातली. (**एवा.** श्रीकरीचिया आंगोळिया टोपरें काढूनि बाइसांकडे घातलें :) सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ एकु उपाहारु करा : " **गो.** " बाइ : घेया : एथचेया उपयोगा नीया :"

**१९३.** १ **अ.** °ग्रासन. २ **एवा.** °मग दुरडी नेओं आदरिली : आंबे पीळावेया : गोसावीं म्हणीतलें :

न नीगे : मग बाइसीं पुसिलें : "हां बाबा : अवघेयां आंबेया[३] रसु नीगाले : या आंबेया रसु कां न नीगे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तो एथौनि स्वीकरिला होता :" "हें काइ बाबा : याचा[४] देटु नाचुकें[५] :" तैसेंचि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वीखया वीखो तो ऐसा भोगी : बाइ : कळियोगीं वीखो असे : परि वीखया नाहीं : *विखो भोगुं कव्हणीचि नेणे : जेउं कव्हणीचि नेणे : घांसु घेओं कव्हणीचि नेणे : कीतिया फोडी घेयावीया : वीडीया घेओं कव्हणीचि नेणे[६]" :* बाइसीं म्हणीतलें : "तरि हे राएमंडळीक : काइ बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : राएमंडळीक आदिकरूनि सकळै नीरोधपरीहारीए :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "नरवीर आति : परि वीखयवीर नाहीं : धर्मनष्ट आति : परि वीखयेनष्ट नाहीं : बाइ : वीखो भोगुं श्रीकृस्णचक्रवर्ती जाणति[६] : द्वापरीं वीखो होता : आणि वीखया होता :" ।।

## १९४ तथा श्रीप्रभू दाखवणें

एकु दीसु गोसावी श्रीप्रभूगोसावीयांची महीमा नीरोपीत होते : तवं सारंगपंडितीं म्हणीतलें : "जी जी : मज श्रीप्रभू दाखवावे :" "ते तेथ[१] कीं गा पांडेया :" "ना जी : गोसावी येथ दाखवीती तरि काइ नेदखीजे[२]? :" यावरि गोसावी उगेचि होते : मग वीळिचांचीए वेळीं गोसावीं एणकैयेकडे[३] बीजें केलें : मार्गीं सर्वज्ञें म्हणीतलें : "मघां[४] काइ म्हणत होतेति गा पांडेया ?" "जी जी[५] : श्रीप्रभू दाखवावे : ऐसें म्हणत होतां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि हे घेया[६] गा श्रीप्रभू : एणकैचें टेंक उतरत असति :" देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "चांग पाहा : मग दंडवत घाला :" तवं सावळी श्रीमुर्ति : नाभिचुंबीत खाड : *मोकळे केशकळापु : मोकळा कासोटा[७] :* उतरासंगें धोत्र : हांस्य करीत : टाळी वांत : गगनाची वास पाहाति : आपणेयां आपण बोलति : ऐसे एत देखिले : दंडवताचें मान जालें : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "घाला घाला दंडवतें :" मग दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : उठिले : तवं काहीं नेदखतीचि : मग गोसावीयांचेया श्रीचरणां लागले : ।।

---

"बाइ : हा आंबा नको नेओं (**एवा.** नेघा) : हा वेगळा करा : एथौनि ग्रहण केला असे :. . . (**गो.**) मग बाइसीं तो आंबा पिळिला : तवं रसु नाहीं° (**ह.** बाइसीं तो आंबा चोरूनि बीलबीला केला : देट नाचुकें : तैसेंचि पीळुं गेली तवं आंतुनि सूरकरि वारा नीगाला :. . . रसु नाहीं :° ३ **पं.** °आंतुनि फुसूकरि वारा नीगाला : भीतरि काहींचि नाही : जैसा काही नीपौंनि पुसौनि घेतला. ४ **बी.** या चाचु तरि तैसीचि असे. ५ **गो.** नासुकें. ६ (**अज्ञात. ना.** प्रत २२) **बी.** °कां कळियुगीं हे : **एवा.** काहीं काहीं इंद्रादिकांचां ठाइं असे.

**१९४.** १ **मुरा.** °गेलेयां होइल. २ **एवा.** नव्हे. ३ **एवा.** अनकैएकडे. ४ **मुरा.** मागां. **गो.** मगां. ५ **मुरा.** "ना जी : श्रीप्रभूतें गोसावी एथचि दाखवीति तरि काइ नव्हे ? ६ **मुरागोह.** पाहा. ७ (**मुरा.**)

मग सारंगपंडीत[८] वाराणसी गेले होते : तेथौनि एतांवेळीं रीधपुरासि आले : तेव्हळि एकाइसातें म्हणीतलें : "श्रीप्रभू मज तुम्हीं दाखउं नको : मींचि ओळखैन : कां मज एळापुरीं गोसावीं दाखवीले होते :" मग रायांगणीं श्रीप्रभू वेढे करीत असति : तेथ भेटि जाली : तेव्हळि स्लोकु एकु ओळगविला : 'हृदय भज परेसं :' ॥

## १९५ साळिवाहाना हटु नीरोपण

साळिवाहानु तो माहादेया रायाचा राउतु : तो गोसावीयांचेया दरीसनासि आला : "गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे ?" म्हणौनि कव्हणा एकातें पुसिलें : तेहीं म्हणीतलें : "ना गोसावीयांसि आरोगण होति असे :" मग बाहीरि पटिसाळे बैसला : नाडी फूंकुं लागला : तो नाडी फूंकुनि बैसे : नाडी फूंकौनि उठी : गोसावीयांसि आरोगण जाली : मग गोसावीं बाहीरि बीजें केलें : आसन जालें : तेणें दंडवत केलें : श्रीचरणां लागला : मग[१] गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : हटु जाणा ?" गोसावीं श्रीमुगुटें नीराकारिलें : "तरि गोसावी काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें नेणें :" मग गोसावीं तेयातें पुसिलें : "तुम्हीं जाणा ?" तीहीं म्हणीतलें : "तरि काइ जी : हटु तो आम्हींचि जाणों कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाओं : एथ बोला पां :" बोलों लागले : "जारकु : १ : पुरकु : २ : कुंभकु : ३ : त्राहाटकु : ४ : हटातळि वळीतपळीत धरे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसा जरि हटु तुम्हीं जाणा तरि हें ऐसें काइ ?" म्हणौनि श्रीकरिचीया आंगुळीया कानसुलां-कडे[२] दाखवीलें : तेंयांचीं[३] कानसुलें नावेक म्हांतारीं जालीं होतीं : तीहीं म्हणीतलें : "ना जी : हा आमचा अप्रेतनु[४] :" यावरि गोसावी उगेचि राहिले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हटु तो काइ ऐसा ? : हटु तो ऐसा कीं :" मग गोसावीं हटु नीरोपिला : "हटें वय स्थंबे : वळीतपळीत वैसा जीणे : मृत्य[५] जींपति : हटु अभ्यासीतांचि वळीत-पळीत धरे : मा अभ्यासी तेया काहीं म्हणावें असे :" साळिवाहानें म्हणीतलें : "जी जी : हें आम्हीं परीसों नेणों : मां बोलौनि काइ ? हें गोसावींचि बोलावें आणि गोसावींचि परिसावें[६] जी :" एतुलेनि तेयाचा गर्वु गेला : मग गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग नीगाला : ॥

## १९६ चरणवीहीरां डखलेयां सीक्षापण

एकु दीं डखले धोत्रें धुआवेया उपर कुंडीएसि गेले : धोत्रें धुनि चरणवीहीरेयावरौनि आले : तवं चरणवीहीरा देखिला : "काइ पां ? वरि पाणीं नाहीं : खालि पाणीं नाहीं :

---

८ **एवा.** °वाराणसी जातां रीधपुरासि आले.

**१९५.** १ **एवा.** °भक्तिजनातें पुसिलें : "हे कव्हणी हटु जाणति ?" (**गो.** "एथ कव्हणी हटु जाणति ?"). २ **एवा.** खाडाकडे. ३ **एवा.** तेयाचें खाड नावेक म्हांतारें जालें होतें. ४ **मुरा.** अप्रयेत्नु. ५ **एवा.** अपमृत्यू जींके. ६ **अ.** प्रीसावें.

मध्येंचि पाणीं काइसें ?" आणि म्हणति : "ए चरणवीहीरांचें उदक उपसिजे तरि जेतुकें काहीं तेतुकेंचि : ऐसें आइकिजे : तें साच कीं लटिकें ऐसें पाहों पां :" म्हणौनि पाणीं उपसों रीगाले : पाणीं उपसीतां दोहीं हातां कांडर आलें : घाटाखालि पाणीं उतरलें : तरि पाणीं तेतुकेंचि : मग भूकैले कोमाइले ऐसे गोसावीयांपासि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "उसीरू कां गा लाविला डखलेया[१] ?" "जी जी : मी चरणवीहीरेयासि गेलां होतां : तवं 'चरणवीहीरांचें पाणीं अनमीत म्हणति तें काइ साच ?' म्हणौनि उपसों बैसलां : घाटाखालि पाणीं उतरलें : दोहीं हातां कांडर आलें : परि पाणीं तें तैसेंचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसा[२] अंतु न पाहीजे कीं गा डखलेया :" ।।

## १९७ सुकररोखू हरण

एकु दीं गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं कान्हाळेयाकडें वीहरणासि बीजें केलें : माहादेराएं तें रान राखीचें राखिलें होतें : तेथौनि सोरू नीगाला : तो गोसावीयां उजुचि आला : "जी जी : सोरू आला :" म्हणौनि भगतिजन भीयाले : ते अवघे पळाले : गोसावी उभेचि : तवं[१] सोरू आला : गोसावीयांपासि उभा राहिला : गोसावीं ऐसा दृष्टी अवळोकिला : रोखू हरला : आणि तो भूइं उंघतुउंघतु ऐसा नीगौनि गेला : गोसावीयांसि जगतुकेचां देउळीं आसन जालें : मग भगतिजनें आलीं : *गोसावीयां सामोरें हों लाजति : सर्वज्ञें म्हणीतलें[२] :* "काइ गा बीहालेति ?" मग तीहीं म्हणीतलें : "काइ जी : आम्हीं पापीए : गोसावीयांतें सांडौनि गेलों : गोसावीयां असतां आम्हां काइसें भय ?" मग गोसावीं मढासि बीजें केलें : भगतिजनीं बाइसांपुढां सांघीतलें : बाइसीं म्हणीतलें : "पोरे हो : बाबातें कैसें सांडूनि गेलेति ? बाबा असतां तुम्हांसि काइ होत असे ?" बाइसां कोपों सरलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पळे तो काइ मागौता परतों न ल्हाए ? परतलें : पाहा नीकें :" मग बाइसीं म्हणीतलें : "पोरे हो : आजि पाणीएं दीवा पाजळला होता :"।।

## १९८ अदंडीनाथसामृथ्य कथन

एकु दीं गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं तेया मळेयासि वीहरणा बीजें केलें : तेथ आसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिला गा : हा अदंडिनाथाचा मळा :" भगतिजनीं म्हणीतलें : "जी जी : अदंडिनाथु म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें

---

१९६. १ **एवा.** भागेया. २ **एवा.** तीर्थाचा ऐसा— **एवा.** तीर्थ : देवता : पुरुखू यां तीहींचा अंतु न पाहिजे.

१९७. १ **बी.** °हुडुहुडुकरि— **ह.** °हुडुहुडुकरि पींजरि (**तथा.** कातरा) वाउनि. २ **(पं.)**.

म्हणीतलें : " अदंडिनाथ ते नाथपंथीचे माहात्मे : ते [१]डाक्रामांसि गेले होते : तेथ चौकीं बैसले होते : तवं तेथिचेनि वीद्यार्थीएं[२] म्हणीतलें : 'हें काइ देव हो : आमचेया देवासि नमस्कारू न करा तें काइ :' तवं अदंडीनाथें म्हणीतलें : 'तुमचेया देवासि आमचा नमस्कारू घेववे[३] ना :' तवं तेहीं म्हणीतलें : 'कैसा नेघवे[४] ? करा पां :' तीहीं म्हणीतलें : 'तुम्हीं अवघेचि मीळा : मग आम्हीं करूनि :' मग ते अवघेचि मीळाले : अदंडीनाथू उठिले : मग म्हणीतलें : 'जये देवा :' म्हणौनि दोन्हीं हात जोडिले : दंडवत घालुं आदरिलें : तवं लींग दोनि[५] भांग जालें : असुध वाहों लागलें : *मग अदंडिनाथें म्हणीतलें : 'न डारी न डारी[६] :'* मग तेणें जोगवटेयाचा[७] बंध घातला : मग तेथौनि नीगाले :

तवं वाटेसि गोरक्ष भेटले : तवं गोरक्षेन पुसिलें : 'काहांथी आव्यो ? काहां जाव्यो[८] ?' तवं तेणें म्हणीतलें : 'डांक्रामु भेदीया : अब सोरठी सोमनाथू भेदन जाओं :' तवं गोरक्षीं म्हणीतलें : 'आपु नाहीं भेदिया : मग परू काइ भेदैल ?' अदंडिनाथें म्हणीतलें : 'आपु नाहीं भेदिला[९] : ऐसें कैसेनि जाणिजे ?' तवं गोरखीं म्हणीतलें : 'देहावरि खर्ग घालिजे आणि पाणीयांतौनि नीगौनि जाए ऐसें जाए : दोनीं धडें तैसींचि : यातें आपुभेदीया ऐसें म्हणिजे :' मग अदंडिनाथें म्हणीतलें : 'हो कां :' मग गोरखीन स्वर्गुनि खर्ग इंद्राचें अव्हाणिलें : तें खळखळीत[१०] : धगधगीत ऐसें आलें : गोरखीं हातीं घेतलें : अदंडीतें पुसिलें : 'हाणसी कीं हाणों ?' तो उगाचि : मग गोरखीं म्हणीतलें : 'घे खांडें :' मग अदंडिनाथें खांडें घेतलें : गोरखीवरि घातलें : तें पाणीयांआंतौनि वाहुनि जाए तैसें गेलें : दोन्हीं धडें तैसींचि मागौतीं मीळालीं : गोरखीं म्हणीतलें : 'पुता : देह जालें : तें ऐसें जाणिजे :' मग अदंडिनाथें म्हणीतलें : 'आतां तुम्हीं घेया :' मग गोरखीं खांडें घेतलें अदंडिनाथावरि घातलें : तवं पाखाणीं खांडें लागे ऐसें लागे : तीडकीया उसळलीया : परि खांडें भेदे ना : मग गोरखीं म्हणीतलें : 'पिंडु काचा : घणाचां घाइं चुरू होइल :' देह करि जाए : तो वज्रओळिचा : गोरखि अमरओळिचा : दंडी[११] होती ते गेली : मग अदंडिनाथू हें नावं पातला : मग तेणें पुसिलें : 'जैसा तुझा पींडु जाला : तें साधन मज सांघावें :' मग गोरखी म्हणीतलें : 'तुं एळापुरासि जाए : तेथ खेपणीकीं वेदु उथापिला[१२] असे : तो स्थापावा[१३] : मग तेथ साधनीं रीगावें :'

---

१९८. १ **ह.** भीवे° **गो.** भीमे°. २ **एवा.** भोपा. **एवा.** ब्राम्हणें. ३ **एवा.** साहावे. ४ **एवा.** साहावे ना. ५ **बी.** तीनि. **ह.** तीं ठाइं उतटलें. ६ **(हबी.)**. ७ **गो**$_{२}$ वोडीणेयांचा. ८ **अपं.** कें जात असा ? ९ **हबी.** भेद्या : तुव कैसा जाणिवा ? १० **एवा.** खणखणीत. ११ **गो**$_{२}$**गो**$_{३}$ मग अदंडिनाथु नावं होतें तें सांडवीलें : मग दंडिनाथु नावं जालें : मग दंडिनाथें पुसिलें–. १२ **गो.** उच्छेदिला. १३ **गो.** °आणि तुझा पींडु होइल :" आणि तो साधनीं रीगाला : तो एळापुरासि आला.

मग ते एळापुरासि आले : हा[१४] रायाचीए राणीएचा आवघा मळा उपहतु जाला होता : तें एथ राहिले : ए मळांचें उलींग रायाचीए राणीएसि जाए : वीहीरीचें पाणीं आटलें होतें : मळांचीया अवधी पाणींएंवीण वाळलीया होतीया : तें पुरूख राहिले तीए दीउनि अवकाळीं अवधी सांसीनलीया : अवकाळीं फळांफूलांसि आलीया : वीहीरी पाणीएं बोसांडलीया : मळांचें उलींग रायाचीए राणीएसि जाए : तवं रायाचीए राणीएसि माळीणि उलींग[१५] घेउनि आलीं : तवं तीया राणीयां पुसिलें : 'हें काइ गे : जें[१६] नाहीं जीए काळीं तीएं फूलें : जें नाहीं जीए काळीं तीएं फळें कैचीं आणिलीं ?' तीया म्हणीतलें : 'ना आइ : अवघीया अवधी पाणींएंवीण वाळलीया होतीया : वीळिचां आमचेया मळेयासि पुरूख[१७] एक आले : ते आले आणि तीए दीउनि अवकाळीं अवघीया अवधी[१८] फळींफूलीं सांसीनलीया असति : वीहीरी तोंडें पाणीं सांडुं लागलीया : तीए दीउनि ऐसें होत असे :' राणीयां म्हणीतलें : 'तरि तेयां पुरूखांतें ऐसें पुस गे : जें रायाची राणी तुमचेया दरीसनासि एओ ?' तेया म्हणीतलें : 'हो कां :' ते गेली : तेयांतें पुसिलें : 'रायाची राणी तुमचेया दरीसनासि एओ ?' तीहीं म्हणीतलें : 'एती[१९] तरि एतु कां :' मग तीया माळिणी तीए राणीएपुढां सांघीतलें : 'ते पुरूख म्हणताति : एतील तरि एतु कां :' मग तैसीचि ते[२०] नीगालीं : पाइंचि : बटिकीचीए डोइए एकु परीएळु पुजाद्रव्यें : एकु अंनाचा : हातीं झारी : ऐसीं आलीं : तयांचे पाए धूतले : पुजा केली : जेउं वाढिलें : तांबोळ दीधलें : *मग म्हणे : 'मज उपदेसु देयावा :' दीधला*[२१] *:* मग बीढारासि नीगालीं : ऐसें प्रतदीनीं करी : मग आपण जेवी :

रावो क्षेपणीकांचा सीक्ष : तो तेयांची भगति करी : राणी अदंडिनाथाची भगति करी : तें क्षेपणीकांसि उमटलें : रावो तेयांसि दंडवतासि[२२] आला : तवं क्षेपणीकीं म्हणीतलें[२३] : 'राया : तुं आमची सेवा करीसि ते कपटें करीसि :' राएं म्हणीतलें : 'तें काइ ?' 'ना तुझां ठाइं दोनि भगती : तुझीए राणीएसि नाथपंथीचेया पुरूखांची भगति : आणि तुज आमची भगति : तुझी राणी आणिखां पुरूखांची सेवा करी : तुं आमसी सेवा करीसि :' क्षेपणीकीं म्हणीतलें : 'तुझी राणी मळां एक जोगी आले असति तेयांचेया ठाया जाति असे : तरि तुं वारीसि ना : तरि अस्त्रीपुरूखांचा एकु धर्मु होआवा कीं :' तवं राएं म्हणीतलें : 'तें मीं नेणें :' तैसाचि राओ राणीएचेया घरासि गेला : राएं राणीएतें पुसिलें : 'तुम्हीं[२४] म्हणें पुरूखांचेया दरीसना जातें असां ?' राणीयां म्हणीतलें :

---

१४ **गो$_2$गो$_3$** रायाचीए राणीएचा मळा आवघा खरांटला होता. १५ **एवा.** सेव घालुं गेली. १६ **एवा.** अवकाळीं अवधी फूलें फळें कैसीं ? १७ **एवा.** माहात्मे. १८ **गो$_2$गो$_3$** °फुलें फळें हातें आले. १९ **एवा.** एववैल. २० **रावा.** °दांडीए बैसौनि. २१ (**हबीगो$_2$गो$_3$**). २२ **रावा.** आवंतुं गेला. २३ **रावा.** ° "आम्हीं तुझें आवंतणें नेघों :" राएं म्हणीतलें : "कां नेघां ?" २४ "तुम्हीं नीच कें जात असां ?"

'जात असों मा : ना आमचे गुरू मळां असति : तेयांचेया दरीसना जात असों :' तवं राएं म्हणीतलें : 'तरि आतां तेथ न वचावें :' 'ना न वचें कैसी ?' 'तुम्हां आम्हां एकुचि मार्गु होआवा कीं : तुम्हीं तेयांचेया ठाया न वचावें :' 'ना न वचों कैसीं ? आम्हां तेयांचेया दरिसना गेलेयावांचौनि जेवण नाहीं : आम्हीं जाउनिचि :' 'तरि जाउनि पाहा पां :' म्हणौनि दारवठेयापासौनि दोहीं सुरूकणी मळावरि राउत पाइक खेडे-भालेयांसीं मारावेया राहाविले : ठाइं ठाइं राखणें घातलीं : चांगि नीर्वेडि केली : तवं तीया राणीयां माळिणींहातीं पुसों पाठवीलें : 'म्हणावें : आजि राएं नीर्वेडि केली : तरि मज दरीसनासि एओं एइल ? ऐसें पुसावें :' गेलीं : तीया माळिणीं पुरूखांपुढां सांघीतलें : तीहीं म्हणीतलें : 'एती तरि एओं एइल :' एतुकेनि ते राणी नीगालीं : बटिकीचीए डोइए ताट : हातीं तांबकळसा : ऐसीं नीगालीं : दारवठेयापासि आलीं : तवं दोहीं सुरूकणी मारावेया राखणें : राउत : पाइक : ठाइं ठाइं ठेविले असति : तेहीं राणीयेतें देखिलें : आणि तेयांची गतिमति क्षाळली : वाचा खीळिलीया : हातीएर उचलति ना : ते ठकले ऐसे राहिले : तीएं तेयांवरौनि गेलीं : दरीसन घेतलें : तेयांचे पाए धुतले : पुजा केली : जेउं वाढिलें : तांबोळ दीधलें : मग माघौतीं आलीं : मग राएं पुसिलें : 'आजि तुम्हीं तेयां पुरूखांचेया दरीसनासि न वचाचि तें काइ ?' तवं तेहीं म्हणीतलें : 'गेलों होतों मा : हें नव्हे आतांचि आलों :' 'मा कैसीं गेलींति ?' तेहीं म्हणीतलें : 'हा नव्हे अमुका अमुकीए ठाइं असे :' ऐसें अवघें सांघीतलें : मग राएं राखणाइत होते ते बोलाउं पाठवीले : मग तेयांसि कोपला : 'हां रे : हे गेलीं : तवं तुम्हीं उगेचि राहिलेति ?' 'ना राया : आम्हीं जातां देखिली : एतां देखिली : आमची वाचा खीळिली : गतिमति क्षाळली : हातीएर वरते उचलति ना :' एक म्हणति : 'देखों : परि आम्हां काहीं करवे ना : ठकले ऐसे राहिलों :' मग रायासि आस्चर्य जालें : राएं म्हणीतलें : 'पुरूख सामान्य नव्हेति :'

मग राएं क्षेपणीकांपुढें सांघीतलें : तीहीं म्हणीतलें : 'राणीएतें पुसा : तें आमसीं उघाणीं करिती ?' राएं राणीएतें पुसिलें : 'तुमचे गुरू आमचेयां गुरूसीं उघाणी करिती ?' राणीयां म्हणीतलें : 'करिती : परि मज पुसों देया :' मग राणीयां पुसिलें : तेहीं म्हणीतलें : 'हो करूनि : तुम्हीं बोलावाल तरि एउनि : राओ बोलावील तरि नैयों :' मग राएं राणीएतें पुसिलें : 'कां तुम्हीं तेयां पुरूखांतें पूसिलें ?' राणीयां म्हणीतलें : 'हो पुसिलें :' मग राएं सभामंडपीं सभा केली : बैसों घातलें : मग तेयांतें बोलाउं धाडिलें : ते नैएतीचि : क्षेपणीकीं म्हणीतलें : 'होए : भीयाले :' राणीयेसि अभीमानु चढला : 'जा : ऐसें म्हणा : तुमतें राणीयां बोलाविलें असे :' ऐसें सांघीतलें आणि आले : पाइं गजदंताचीया पाउवा घातलीया : ऐसे आले : क्षेपणीकीं पुसीलें : 'अवकाळीं अवधी फूलांफळांसि एति : वीहीरीसि उदकें बोसांडति : हें कार्य काइसेयाचें : काइसेयातव ?' अदंडिनाथें म्हणीतलें : 'हें वेदास्तव :' यावरि उघाणी प्रवर्तली : तवं

तेहीं म्हणीतलें : ' हें काइ वागजाळ म्हणा : सबदु जैसा नेइजे तैसा जाए : आम्हीं तुम्हीं सामृथ्यें भांडों :' अदंडिनाथें म्हणीतलें : 'हो कां :' क्षेपणीकीं म्हणीतलें : 'आमची कुपी स्वर्गा जाइल : स्वर्गिचें अमृत आणील :' अदंडिनाथें म्हणीतलें : 'आमची पाउ[२४] आणु नेदी :' ' हो कां :' मग तेहीं कुपी आणिली : पुढां ठेविली : मंत्रेकरूनि[२५] अव्हानिली : ते स्वर्गासि जात देखिली : स्वर्गुनि अमृत भरूनि मागौती एतां देखिली : आणि तेहीं डावीए पाउनि पाउ काढिली : पुढें ठेविली : अह्वानिली : ' भीडि भीडि ' म्हणौनि प्रहरिली : तें पाउ चालिली : मध्यें भेटि जाली : पाउ तीएसि ठसठस करूनि लागली : ते पाउवा कुपी फोडिली : ते तीनि कोरें जालीं : वरीलें कोर उपरकुंडीएसि पडिलें : मधील कोर चरणवीहिरां पडिलें : खालील कोर सीवाळां पडिलें : तीएं तीनि तीर्थें जालीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " भटाचारीया मागां अदंडिनाथें वेदु प्रतीष्टिला :" ।।

## १९९ तथा भीड भीड सबदु कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : " मग ते एथ पाताळगुंफेसि साधनीं रीगाले असति : राणीयां तेयांची प्रतीष्टा केली :" गोसावीं तेथ बीजें केलें : तेथ धाकुटीऐसी देउळी केली होती : गोसावीयांसि आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हे अदंडिनाथाची गुंफा गा : एथ अद्यापि ' भीडि भीडि ' ऐसा सबदु वर्ते : *एथ जोगी एति : ' भीड भीड ' ऐसा पुरुषाचा सब्दु आंतुलीकडौनि होए : मग जाती*[१] :" मग अवघीं भगतिजनें तीए देउळिएपासि आले : मग अवघे भगतिजन आइकों ठाकले : नीजौनि तेथ कानु टेकीति : तवं तेथ ' भीडि भीडि ' ऐसा सबदु नीगे : मग तीएं एउनि गोसावीयांपासि सांघति : सर्वज्ञें म्हणीतलें : " पुरूखें आपुलीं सक्ति नीक्षेपिली असे : तो अद्यापि ' भीडि भीडि ' ऐसा सबदु नीगे :" ऐसी हे लीळा : गोसावीं आउठे ठाइं सांघीतली : ।।

## २०० कुइरामा सीधि नीक्षेदु

एकु दीं वीळिचांचां वेळीं गोसावीं[१] चतुर्वीधांचेया[२] मढावरि बीजें केलें : सरिसे भक्तजन असति : तेया मढावरि चरणचारी उभे जाले : दीसा अवलोकीलीया : गोसावीं आपदेओभटांतें पुसिलें : " हां गा भागेया : हा कवणु कवणु गाउ गा ?" " हें इटखेडें : हें माटखेडें : हें लासौर : हें सीउर जी : जी जी : हें सीउर नांदत होतें जी : यासि सुवर्णाचे कळस : ए गावीं कुइराम एक माहात्मे असति : तें 'कुइकुइ' करीति : तेयांसि अनंता सीधी प्रगटति : जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कळीयोगीं वीद्या नाहीं : या रीधीसीधी तिया कैचीया गा ?" " ना जी : ते[३] कांबळेयाचीए[४] मोटे बांधौनि पाणियांतु घालीजति :

---

२४ **एवा.** कुंडी. **एवा.** कुपी. २५ **एवा.** कुपी अभीमंतुनि प्रहरिली.

**१९९.** १ (**हबी.**).

**२००.** १ **एवा.** अनकैएचेया टेकावरुनि–. २ **एवा.** गोमटदेवाचेया लेणेयासि बीजें केलें. ३ **एवा.** ते उदकावरि आसन घालुनि बैसति : आणि–. ४ **मुराह.** कांबळेयाची मोट बांधौनि पाणियांतु घालीति––.

आणि तरंगति जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें पवनाचें कार्ये गा :" "जी जी : ते सरकाळांची पालकी करीति : सराडेयाची दांडी करी घेति : केळिचेया पानाचा पडिवा करिति : तेथ आपण बैसति : आणि लेंकुरूवांचीए खांदीं जाति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " हेइं पवनाचें कार्ये गा :" "ना जी : ते देउळाआंतु कोंडिजति : तवं बाहीरि खेळतां देखिजति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें चेटकाचें कार्ये गा :" जवळि भागवंत होते : तीहीं म्हणीतलें : "आणि तेवीचि ते उर्धरेते :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तें कैसें गा भागेया ?" भागवंतीं म्हणीतलें : "जी जी : उर्ध रेत घेति आणि बाहीरें सांडीति : अर्ध घेति : उर्ध जारीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उर्धरेते ते काइ गा ऐसें ? उर्धरेते ते ऐसे कीं :" म्हणौनि गोसावीं सांगों आदरिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " उर्धरेते[५] होति : ते बींदुची जारणा जाणति : उर्ध रेत घेति : तें भीतरि जारीति : भीतरि एक देह होए : वरिला देहा छेदभेद न प्रव्हाति[६] : जैसें नारीएळ मुखें पाणी घे : तें वरौतें जाए : भीतरि आणीक देह होए : बाहीरील करंटें नीबर होए : तेया छेदभेद न प्रव्हाति :" "जी जी : तेयातें रीधीसीधी वोळगति :" यावरि गोसावीं हांस्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "कळीयोगीं वीद्या नाहीं : मां तंत्रजनीता रीधीसीधी तेया कैचीया ? *कळीयोगी विद्या तथा विद्यावंत असे तरि पुरुखु सृष्टिसंहारा समर्थ नव्हे*[७] ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "कळियुगीं विद्यावंत नाहीं : कळियुगीं आगम न वर्तेति : उत्तरापंथीं तंत्रशेषु वर्ते*[८] *:"* यावरि गोसावीं फागडा म्हणीतला : 'कर्म[९] करी तरी अंतरसार : कर्मे न तुटति भवपास हार[१०] : कर्म करितां गोरक्ष न दीसे : जेवि नारीएळीं पाणी पैसे :'।।

## २०१ वीद्यावंता भेटि

उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावी आसनीं बैसले असति : तवं वीद्यावंतु जोगीयाचेनि वेखें गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीं तेयांसि मानु केला : अर्धासन बैसों घातलें[१] : बाइसांकरवि तेयांचे पाए धुववीले : सागळेचेनि उदकें तेयां गुरूळा करूं घातला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें काहीं भातुकें असे ?" बाइसीं म्हणीतलें : "नाहीं बाबा :" मग डखले हाटवटीए पाठवीले : रांधवणहाटिचें खाजें आणवीलें : तेयांचें पात्र भरिलें : गोसावीं आपुलेनि श्रीकरें टीळा लाविला : माळ : तांबोळ दीधलें : मां गोसावी अनोज्ञा दीधली : एतुकेनि ते नीगाले : गोसावीं अनुवर्जनांचेनि अनुक्रण[२] केलें :

मग ते हाटाआंतु गेले : दोघी एकी सीमुरी मेळवीलीया : तेयांचेया खांदावरि हातु घालुनि : हातीं सुणेयांचा[३] जवटु : हाटाआंतु बोरगाजर : उळिकांदा : माइणीचीं मुळें :

---

५ **एवा.** सर्वज्ञें म्हणीतलें : "उर्धरेता तो गोरक्षु : कर्म करीतां न दीसे : जेवि नारीएळीं पाणी पैसे :" मग नारिएळाचें सांघीतलें. ६ **एवा.** प्रभवति. ७ (**शोध**). ८ (**प्रव. वि.** ९४-९६). ९ **बी.** कर्म करकर अंतरसार. **गो**$_2$ कर्मकरंतर अंतरसार. १० **हबी.** भवसंसार. **भ.** कर्में न तुटे भयसंसार.

**२०१.** १ **अहबी.** °एक म्हणति बाइसाकरवि—. २ **बी.** अनुकरण. ३ **एवा.** सुणेयांची जोडी.

पानेंपोफळें ऐसीं मागताति : तवं डखले हाटाआंतु गेले होते : तेहीं ऐसें मागतां देखिलें : बाइसीं डखलेयातें धाडिलें होतें : मग म्हणीतलें : "ऐसें गा आमचे गोसावी : ऐसेयासि मानु करीति :" ते हांसतहांसत आले : डखलां म्हणीतलें : "बाइ : ऐसे आमचे गोसावी : जेयासि मानु केला ते हाटवटीए ऐसे देखिले :" म्हणौनि अवघें सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा हांसत असा डखलेया?" "जी जी : गोसावीं जेयासि मानु केला : तेहीं दोघीएकी सीमुरी मेळवीलीया असति : तेयांचेया खांदावरि हातु घालुनि : हातीं सुणेयांचा जवटु : उळि : कांदा : गाजर : बोर : माइणीचीं मुळें ऐसे मागत असति जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते तेयांची लीळा कीं गा : ऐसें न म्हणिजे कीं गा डखलेया[४] : पुरूखीं क्षोभू उपजैल : मां[५] कें रीगिजैल ?" मग बाइसीं पुसिलें : "बाबा : हे कवण?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ हे द्वारावतीकारां श्रीचांगदेओराउळां गोसावीयांचे वीद्यावंत :" मग यावरि गोसावीं लुइपाइची गोष्टि सांघीतली : तेचि गोसावीं आउटें ठाइं सांघीतली : ।।

## २०२ लुइपाइउपदेशें जाळांधरा सीक्षापण[१]

सर्वज्ञें म्हणीतलें : "*लुइपाइ महात्मे ते मासदीयांचां घरीं असति : उकरडां असति : लुइ वेंचीति : खाति : कां वाडां लुइ वेंचीति : तोंडावरी गीवीगीवीकारि मासिया*[२] : राओ आणि प्रधानु वैह्याळीएसि नीगाले : ते मासदवाडेयाहुनि जात होते : तवं लुइपाइ उकरडेयावरि लुइया वेंचीत होते : प्रधानु तो साही दरीसनाची भगति करी : तवं राएं प्रधानातें म्हणीतलें : 'यासि नमस्कारू न करा तें काइ ?' तवं प्रधानें म्हणीतलें : 'हे बरवें करीत असति :' प्रधानु घोडेयाखालुता उतरला : लुइपाइसि न्मस्कारू केला : तवं राओ हांसिला : लुइपाइन म्हणीतलें : 'राया[३] : तुं हांसिलासि काइ तरि तुंचि हांसिलासि : हउं हांसों तरी ते रासुब हस्ती घोडा हांसे[४] :' तवं राएं म्हणीतलें : "हांस हांस बापुडा :" आणि हांसिला : एतुकेनि परीवारू हांसे : घोडे हांसति : ऐसें हांसें प्रवर्तलें : क्षेणा एका देह जाइल ऐसें जालें : मग प्रधानें म्हणीतलें : 'तुम्हीं तेया पुरुखांतें हांसलेसि म्हणौनि हें हांसें प्रवर्तलें :' रायें म्हणीतलें : 'तरि आतां यांसि काइ कीजे ?' तेणें म्हणीतलें : 'तेयां पुरुखांतें खेमावीजे :' 'तरि चाला जाओं : तयांसि आड पडों :' तवं प्रधानें पायांवरि माथा ठेविला : 'आतां कोपासि क्षेमा कीजो :' तेह्वळि तेहीं ते सक्ति आकर्खिली : मग राएं आणि प्रधानें पायांवरि माथा ठेविला : 'आतां आम्हांसि सीक्षा

---

४ **अ.** हांसिजे ना कीं गा डखलेया–. ५ **एवा.** मां काइ कराल.

**२०२.** १ हीच लीळा 'उत्तरार्धा'तही आढळते. **मु.** प्रतीत ती अज्ञात लीळांत घातलेली आहे. या सर्व पोथ्यांच्या साह्याने मी ती येथे संपादन केली आहे. २ (उत्त. **हीगो.**). ३ (उत्त. **हीगो.**). °इतिवार तुं हांस्या तरि तुंचि हांस्या : अब हउं हांसो तरि तोरा परिवारू हांसे :" ४ **अ.** °ऐसी एकी वासना : दुसरीया वासना : "राया : तुंचि हांसलासि तरि तुंचि हांसलासि हउं हासों तरि तोरा सकळै पाइकुपरीवारू घोडा हांसे :°.

देयावी :' तेहीं म्हणीतलें : 'जा क्षेउर करा : मडीची[५] खापरी घेया : नगरिची भीक्षा घेउनि या :' ते गेले : क्षौरें केलीं : भीक्षा करावी तवं लाजिले : राएं म्हणीतलें : 'मी राओ : तुं प्रधानु : एसणेयांचि वेळां भीक्षा कैसी करूं ? वीळु होइल : आणि भीक्षा करूं आणि काइ :' मग वीळु जाला : भीक्षा करूनि आले : पुढें खापरीया ठेविलीया : तवं लुइपाइं म्हणीतलें : 'एती बार तुम्हीं काहां गया होतेति ? सीधि बारा बरीख दूरि गइ :' मग तेहीं म्हणीतलें : 'आतां काइ जाओं ? बारां घडीयांची चुकि : बारा वरीखें गेलीं : अंतरलीं : आतां जरि जाउनि तरि अवघें जन्म वायांचि जाइल :' म्हणौनि दोघै सवें असों लागले : प्रधानु तो ब्राह्मणु : तो वीकलपीया : राओ तो वीखैया : मग तो पुरूखू तेथौनि नीगाला : ते दोघै सवें नीगाले : एके ठाइं तेहीं पुरुखीं मदिरापान केलें : तेथ कालळांचां घरीं प्रधानु गाहाण ठेविला एके ठाइं सामानस्त्रीएचां घरीं ते पुरुख वसीनले : रावो तो सामानअस्त्रीएचां घरीं गाहाण ठेविला : दोघै गाहाण ठेविले : ते पुरूख नीगौनि गेले : मग प्रधानु तो भाटी पोती : राओ तो सामानअस्त्रीएचां ग्रहीं पाणीं सांडी : भरूनि आणी : ऐसी तीएची बहूत दीस सुस्त्रुका करीत होते : तवं एकु दीसु पुरू आला : तो तीएचा पढीएंता पैलाडि राहिला : तवं ते अवस्थाभूत जाली : आफळसाफळ करूं लागली : ते राएं देखिली : मग राएं पुसिलें : 'आइ[६] : तुं ऐसी कां ?' तीया म्हणीतलें : 'एथिचा पढीएंता तो पैलाडि राहिला :' तवं राएं म्हणीतलें : 'तरि मीं तो आणुं जाओं ?' तीया म्हणीतलें : 'जाए :' मग तो आणुं गेला : उतपवन करूनि तेयाचेया घरासि गेला : तवं तो डोल्हारेयावरि बैसौनि आपुलीं लेंकरूवें लाडवीत होता : तवं राएं म्हणीतलें : 'हें काइ गा : तुं एथ : आइसि थोरि अवस्था :' 'मां मीं काइ करूं गा ? नदीसि पुरू आला : एकि आकासीं धार : एकि पाताळीं धार : मां मीं काइ करूं ? कैसेनि एओं ?' तवं राएं म्हणीतलें : 'चाल : मीं नेइन :' म्हणौनि खांदीं घेतला : पाणीयांतु उतपवन करूनि घेउनि आला : तवं तीयाहीउनि आणीक नीउन म्हणीएं दीधलें : तवं तीएचेनि पढीयेंतेनि पुसिलें : 'हा कवणु ?' तवं तीया म्हणीतलें : 'माहात्मे एक माझीए ठाइं उतरले होते : तेहीं हे गाहाण ठेविले :' तवं तेणें म्हणीतलें : 'ऐसें म्हणीएं याकरवि कैसें करवीतसि ? हे मातें पाठकुळीए वाउनि पाणीयांवरि चालत घेउनि आले :' एतुकेनि ते उठिलीं : तेयाचीया पायां पडलीं : हात जोडिले : 'आतां तुम्हीं जा :' तवं तेहीं म्हणीतलें : 'आमचे गुरू एती : तुमचें द्रव्य देती : मग आम्ही जाउनि :' तेहीं म्हणीतलें : 'तुमचे गुरू उतराइ : आतां तुम्हीं जा :' एतुकेनि तेयां सीधि जाली : मग तेथौनि नीगाले[७] : " ॥

---

५ **एवा.** कुंभाराचीए आवांची. ६ **गोपं.** माइ. ७ **एवा.** °गोसावी हे गोष्टि आज्ञाभंगावरि : **एवा.** प्रक्षाकारणे : **एवा.** क्षोभाकारणें सांघितली :

प्रधानु तो कालळांचां घरीं भाती पोती : एकु दीसु तीएं नीजैलीं होतीं : तवं मध्यानेकी रात्रीं तेयांचीए देहींहूनि प्रकासु नीगाला : तो अवघेया घराआंतु उजीएडु पडिला : भाटीएसि आगि लागली : म्हणौनि कालळें उठिलीं : तवं तो तेयाचीए देहिचा प्रकासु देखिला : एतुकेन तेहीं दंडवत केलें : हात जोडुनि वीनवीलें : "बा : आतां तुम्ही जा :" "तवं तेहीं म्हणीतलें : आमचे गुरू एती : तुमचें द्रव्य देती : मग आम्हीं जाउनि :" तेहीं म्हणीतलें : "तुमचे गुरू उतराइ : आतां तुम्ही जा :" एतुकेनि तेयांसि सीधि जाली : ।।

## २०३ ब्रह्मसानवीखस्थंब : वीखसक्तिस्वीकारू

गोसावीं आचाट वेधसक्ति स्वीकरिली : राजे तेतुकेही गोसावीयांचेया दरीसना एळापुरासि एति : साळिवाहानु : पाल्हाडांगीया : बोल्हाडांगीया : राणेराउत[१] : पाइक हे मुक्षकरूनि अवघे राजीक : आणीकुही गांविचा लोकु : एक माहादास्रमु आणि ब्रह्मसान हे वांचौनि एर अवघे दरीसना एति : दांडीया दांडी अडे : ऐसा लोकु एओं लागला : ब्रह्मसान ते रायाचे गुरू : ते फुलंबरीएसि[२] गेले होते : तेहीं तेथ गोसावीयांची प्रसीधि आइकौनि कटकासि आले : तवं कटकीचा लोकु अवघा गोसावीयांचेया दरीसनासि जाओं लागला : मग तीहीं म्हणीतलें : "आतां हे रायातेंहीं आदिकरूनि वेधिती : पाहाटे राओ जाइल तरि यांचाचि होइल :" म्हणौनि च्यान्हीं वीखें मेळउनि फोडी केलीया : वीखें घोळलीया : आपुलेयां सीक्षांहातीं पाठवीलीया : 'आधीं पुजा करावी : मग फोडी वोळगवावीया : मग तांबोळ देयावें :' ऐसा नीरोपु दीधला : मग ते एळापुरासि आले : तवं गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला होता : बाइसीं पटिसाळे आसन केलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तवं ते आले : गोसावीयांसि दरीसन जालें : तीहीं एउनि गोसावीयांसि पुजा केली : फोडी ओळगविलीया : गोसावीं श्रीकरीं घेतलीया : दृष्टी अवळोकिलीया : नीर्वीखा केलीया : मग श्रीमुखीं घातलीया : मग तीहीं वीडीया करूनि दीधलीया : मग ते नीगाले : दीस तीनि गेलेयां श्रीमुर्ति जैसीतैसीचि : मग ब्रह्मसानीं सीक्षातें पुसिलें : "तुम्हीं गेलेति : मां काइ केलें ?" तेहीं मागील वृतांत सांघीतलें : मग ब्रह्मसानीं म्हणीतलें : "इस्वरपुरूख होति : तेयांचीए दृष्टीपुढां वीख न राहे :"

मग तीहीं आपुलेयां सीक्षांतें म्हणीतलें : "आतां तुम्हीं जावें : मां आंधारीं आसन रचावें : पुजा करावी : आपुलेनि हातें फोडी श्रीमुखीं घालावीया :" मग ते आले : तवं गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला होता : भीतरि आंधारीं आसन रचिलें होतें : मां पुजा केली : मग आपुलेनि हातें फोडी श्रीमुखीं घातलीया : वीडीया करूनि दीधलीया : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तुमचें कार्य जालें : आतां तुम्हीं जा :" मग तीहीं म्हणीतलें : "ऐया रे : पुरूखीं जाणीतलें :" आणि इखीत कपोळीं स्वेदबींदू आले : नावेक श्रीमुर्ति

---

**२०३.** १ **गो₂गो₃** °दळवै कडु सांहांणे ठाकुर. २ **एवा.** °असति.

घामैली : श्रीमुर्तीवरि तापु ऐसा जाणवला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वाटें आणा :" बाइसीं वाटें आणिलें : तेथ उगाळु घातला : "बाइ : हें एकी ठाइं पुरा :" अवघा उगाळु हीरवा जाला : बाइसीं नेउनि एकांतीं पुरिलें : *मग तेया तांबोळावरि आणीकें तीनि तांबोळें गोसावीं घेतलीं*[3] : ऐसीं तीनि तांबोळें पुरवीलीं : तीसरेया तांबोळाची फोडि दाढेसि धरिली होती : ते आपदेवोभटां[4] दीधली : तेयां दाटुनि जरू आला : बाइसीं गोसावीयांतें एकांतीं पुसिलें : बाइसें थोरु गजबजीलीं : भेवों लागलीं : बाइसीं म्हणीतलें : "हें काइ बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एकाचें काइ एतुकें स्वीकरिजे ना ?" "तें काइ बाबा ?" "बाइ : हळाहळ : १ : काळकुट : २ : रगतसींगी : ३ : बछनागु : ४ : एकासि एक वीरूधीएं : एकासि[5] उपाओ कीजे तरि एक चढे : ऐसीं च्यान्हीं मेळवीलीं असति बाइ :" "तरि आतां काइ करावें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भेओं नको : आतांचि यासि काहीं नव्हे[6] : हें राळेमवणी कीं बाइ : खांबीं पुजा ते होआवी असे : एथौनि एकांतें नीमीत्य करूनि मग एथौनि बीजें कीजैल : बाइ : प्राणीया बहुत दीस जचतु असे : तरि काइ बाइ : तेयांचा उदीमु वायां जाओ ? तेयांचा मनोधर्मु एथौनि स्वीकरिला :" बाइसें भेओं लागलीं : "आतां काइ करूं बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ करावें तें न लगे : एकाची धावणी : तरि एकाची चढावणी : एकाचा उपचारू तवं येकाचा अपकारू :" बाइसें थोर गजबजिलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "ना बाइ : तरि तीनि दी एकांतु देयावा :" मग तैसेंचि गोसावीं मल्हारवसैएसि बीजें केलें : तेथ तीनि दी अवस्थान जालें : गोसावीयांचें अलोहीत नेत्र : श्रीमुर्तीवरि पांढरीया फोडीया ऐसीया आलीया देखौनि बाइसीं पुसिलें : "बाबा : आतां काइ करूं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दुधांतु सोजी[7] आळा :" मग बाइसीं दुधांतु सोजी[7] आळिली : गोसावीयांसि तीनि दी सोजीची[8] आरोगण जाली : मग मागौती जैसी श्रीमुर्ति तैसीचि : मग मढासि बीजें केलें :॥

## २०४ डखलेयां चांगदेवोभटांतें श्रीदत्तात्रयोप्रभूचेया दरीसना पाठवणें

मागौतें गोसावीयांसि चतुर्वीधांचां मढीं अवस्थान जालें : एकु दीं गोसावी श्रीदत्तात्रयोप्रभूची महीमा नीरोपीत होते[1] : तवं डखलां आणि चांगदेवोभटीं म्हणीतलें : "जी जी : आम्हां श्रीदत्तात्रयोप्रभूचें दरीसन होआवें[2] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें कां गा होइल ? तें[3] अमोघदर्शन कीं गा :" "ना जी : गोसावी करिती तरि होईल :" सर्वज्ञें

३ (**गो**$_{?}$). ४ **एवा.** चांगदेवोभटां. **एवा.** लखमींद्रभटां. ५ **ह.** एकाची धावणी तवं एकाची चढावणी : एकाचा उपचारू तवं एकाचा अपकारू. ६ **एवा.** सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसेंचि जाइल : बाइ : एथौनि एकांतें नीमीत्य कीजैल आणि या राष्ट्रासि बोलु लाविजैल : मग जाइजैल : कीं बाइ :". **एवा.** : बाइ भीया ना :—. ७ **एवा.** साकर. ८ **एवा.** नसुधेया दुधाची.

**२०४.** १ **हबी.** °जें श्रीदत्तात्रयप्रभूचेनि दर्शनमात्रेंचि प्राप्ति होए : ऐसें निरूपण जालें : तवं—. २ **एवा.** आम्ही जाउनि तरि होइल ? ३ **एवा.** तें नव्हे कीं.

म्हणीतलें : "श्रीदत्तात्रप्रभूचेया दरीसना जाल तरि होइल : श्रीदत्तात्रप्रभू तुम्हां भेटती : ऐसी प्रवृति असे : *कव्हणी एकि[४] वर्तेंवारि चाले : ते डावेयाकडे न पाहे : उजवीयाकडे[५] न पाहे : अपणेयांकडे न पाहे : सभेकडे न पाहे : ऐसी ते ऐले सेवटुनि पैला सेवटा जाए मग तिएसि[६] वर्त साधे : तिएसि[६] दाएपसाय होति : मा तोचि जारि डावेयाकडे पाहे : उजवीयाकडे[५] पाहे : आपणेयाकडे पाहे : सभेकडे पाहे : ते पडे : तीयेचें हाडगुड नुरे[७] :* आतां ऐसेंचि नीगा : पेणोवेणा[८] जावें : मार्गीं उपेणें न करावें : संबंधीयांचेयां गावां न वचावें : एकि भीक्षा नेघावी : ऐसीयापरी मातापुरा जावें : पहीलें घाटातळि सन्यास्याचेनि वेखें भेटती : ते तुमतें पुसती : 'तुम्हीं कें जाता ?' तुम्हीं म्हणाल : 'आम्हीं श्रीदत्तात्रप्रभूचेया दरीसना जातों :' 'श्रीदत्तात्रप्रभू ते आम्हींचि :' ऐसें म्हणती : परि ते नव्हति : दुसरेया घाटातळि ब्राह्मणाचेनि वेखें भेटती : ते म्हणती : 'आम्ही श्रीदत्तात्रयप्रभू :' परि ते नव्हति : घाटाचां माथां मेरूवाळेयाचीए पाळी[९] दारवठां गोंदळापुढें : चौडुका वाते : नीळिची आंगी : नीळिचाचि चळना : नीळिचें टोपरें : कवडेयांचें आभरण : ते म्हणती : 'आम्हीं श्रीदत्तात्रयोप्रभू नव्हों :' परि तेचि होती :" ऐसा गोसावीं तेयांसि वीधि वीहीला : "हो कां जी :" म्हणौनि गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग तैसेचि ते नीगाले : कटकाचीया वाटा : हाटांतुनि नीगाले : ते देवगीरीसि गेले : हाटाआंतु अवघे पदार्थ देखिले : गाठीया : मुदीया : कडदोरे : चोळीया : तोड : भातुकीं : खाजें : घेतलें : "गावांसि कोण्हा हातीं खाजें पाठउं ? सोएरेयांचा गाउं : ना गावांसि जाओं : उपरवाहीं देओं : मग नीगों : कोण जाणे : आतां कै एणें होइल : मा कै भेटौनि : तरि लेंकरूवांसि खाजें पाठउं :" म्हणौनि सोइरेयांचा[१०] गाउं वाटेसि होता : डाउवाडीयेसि गेले : ते उपरवाइयां भेटले : "धरा हो हें खाजें : आमचां घरीं देया :" तवं तेहीं म्हणीतलें : "तुम्हींचि कां साउमे नैया ?" "ना आम्हांसि गोसावीं वीधि वीहीला असे :" "ऐसेचि आंगणीं उभे ठाका : भेटा आणि जा : आणि काइ :" उभे ठाकले : भेटले : "बैसा बैसा :" म्हणौनि हातीं धरूनि बाजेवरि बैसवीलें : पाए धुतले : "आतां जेवा : मग जा :" मग पाणीं ठेविलें : उटिलें : न्हाणिले : जेविले : तवं वीळु जाला : मग राहिले : नीजैले : सवळेसीचि उठिले : मग नीगाले : तवं चांगदेवोभटीं म्हणीतलें : "हें काइ डखले हो : गोसावीं वरिलें तेंचि आम्हीं केलें : गोसावीं वीधि वीहीला तो आम्हीं भंगिला : आतां काइ दरीसन होइल ? आतां काइ गोसावी आम्हां भेटि देत असति ? आतां जाउनि काइ करूं ? आतां चाला माघौतें :" मग ते माघौतें गोसावीयांचेया दरीसनासि आले :

---

४ **एवा.** एकु. ५ **एवा.** जेवणीयाकडे. ६ **एवा.** तयासि. ७ (**दृपा.** ९२. 'वर्तेचा दृष्टांत' 'चांगदेओभटां एळापुरीं निरोपिला :'—**दृस्थ.**). ८ **एवा.** गाउनि गावां. ९ **एवा.** °पारधीयाचेनि वेखें भेटती—. १० **एवा.** तो एरेयांचा (**एवा.** लेकिचा) गाउ वाटेसि होता.

मग तेहीं अवघी वेवस्ता सांघीतली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीदत्तात्रप्रभूचें दरीसन तें अमोघ कीं गा : तें तुम्हांसि कां गा होइल : ऐसें कां गा घडैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*कव्हणी एकि माता असे ते आपुलेया लेंकुरुवासि पेंहें दे*[11] *तें डुळकी : माघौतें दे : ते डुळकी : माघौतें दे : तें डुळकी : माघौतें दे : तें डुळकी : मग सेजीया साइलीया म्हणति : "आवो : हे डुळकीताहे : तरि कां पाजितीएसि ?" ते म्हणे : "घेया आइ : आंतु तऱ्हीं लीतैल*[12] *:*" ॥

## २०५ संतोखा भेटि

एकु दीसु गोसावीं अनकैएचेया लेणेयांसि बीजें केलें : तेथ लींगाचें देउळ दखिणामुख असे : तेथ[1] जोगी माहात्मा एक बैसले होते: गोसावीं दोन्ही दारसंका धरूनि अवळोकिलें : गोसावीं पुसिलें : "माहात्मा : आपण एथ असिजे ?" तीहीं म्हणीतलें : "असों सुखें-संतोखें :" "ए नगरींचि भीक्षा कीजे ?" "कीजे सुखेंसंतोखें :" "एथ जेविजे ?" "जेउं सुखेंसंतोखें :" "एथ नीद्रा करा ?" "करूं सुखेंसंतोखें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि तुम्हां नावं संतोखू म्हणा :" आणि तेयांसि अस्तीति जाली : एतुकेनि गोसावीं तेथौनि बीजें केलें : तेहीं आपुलें आलजुल[2] होतें तें सांडिलें : जोगमार्गीची काठी : खापरी : मुद्रा : ऐसेनसीं गोसावीयांसरिसे नीगाले : मग ते[3] एतुकेनसीं गोसावीयां सरिसे असति : ॥

## २०६ तथा अभ्यासकरणीं सीक्षापण

संतोखू ऐसें माणिकेस्वराकडे[1] गेले होते : तीकडौनि एताति : तवं गाविचां जोगीं धरिले : "हें काइ रे : जोगु नाहीं : जुगुति नाहीं : सीक्षा नाहीं : आदेसु नाहीं : काठी खापरी : मुद्रा तरी आमची : आणि तुं गोसावीयांपासि राहिलासि :" तवं संतोखें म्हणीतलें : "कैसीं नाहीं जोगु जुगुति ? या पां रे मासीं अभ्यासु घालुं :" तवं तेहीं म्हणीतलें : "या घालुं :" एतुकेनि संतोखांसि स्तीति जाली : एतुकेनि : च्यान्हीं क्रणें प्रगटलीं : नाना परिचीं आसनें घालुं लागले : तवं संतोखाचें तें गोसावीयांचीए स्तीतिचें : ते घालीतचि होते : एर अडले : मग तीहीं म्हणीतलें : "आरे : साक्षातु गोरक्षी :"म्हणौनि घरासि घेउनि गेले : उटिले : न्हाणिले : जेउं सुदलें : रांधवणहाटिचे

---

११ **एवा.** पाणी. १२ (**दृपा.** ४४. 'डुळकैलेया बाळकाचा दृष्टांत'. 'डखलेया दत्तात्रदेवाचीए भेटीउपरि निरूपिला'—**दृस्थ**).

**२०५.** १ **अहबीपं.** °संतोख बैसले होते. २ **एवा.** आळिबन. ३ **मुरा.** °सन्निधानीं असों लागले.

**२०६.** १ **एवा.** °हाटाआंतु गेले होते : तवं एकीं माहात्मा म्हणीतलें : "आरे : आम्हां सीक्षा न करिसि : काहीं न करिसी :" तवं संतोखें म्हणीतलें : "या रे मासीं अभ्यासु घालुं."

पदार्थ आणिले : पात्र पुजिलें : तांबोळ दीधलें : टीळा गंधाक्षेता केलीया : पासवडी वाइली : सीक्षा केली : ।।

मग संतोखू गोसावीयांपासि आले : एतांचि गोसावीं दृष्टीचिकरूनि भ्रूभंगीं पुसिलें : तवं तेहीं पात्र पुढां ठेउनि अवघी गोष्टि गोसावीयांपुढां सांघीतली : "जी जी : मीं हाटाआंतु वाटे जात होतां : तवं एकीं माहात्मा मातें म्हणीतलें : 'आरे : तुं आम्हांसि सीक्षा न करीसि : आदेसु न करीसि : काहीं न करीसि :' तवं म्यां म्हणीतलें : 'ए पां रे मासीं अभ्यासु घालुं :' तेहीं म्हणीतलें : 'या घालुं :' ते घालुं लागले : माझें तें गोसावीयांचें : मीं घालीतु होतां : ते अडले : मग म्हणीतलें : 'गोरक्षू रे :' म्हणौनि तेहीं सीक्षा केली : गोरक्षू म्हणौनि माझें पात्र पुजिलें : ऐसें जी तेहीं केलें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तें तुमचें रहस्य कीं गा : आपुलें रहस्य आणिकाप्रति प्रगटीए न कीजे कीं गा : *मोदळा असे : तेयाचें घेतें द्वार सानें : सांडीतें द्वार थोर*[२] *:*" "जी जी : आजिलागौनि न करीं जी :" ।।

## २०७ तथा साडाक्रमुज्ञान

आणीक[१] एक माहात्मे गावांसि आले : तेहीं म्हणीतलें : "हा गोसावीयांपासि काइ असे ? काठी खापरी आमची : मुद्रा आमची :" तवं गांविचां जोगीं म्हणीतलें : "आम्हीं धरिले होते : तवं नानापरीचीं वीचीत्रें आसनें घालुं लागले :" मग म्हणीतलें : "हे साक्षातु गोरक्षू :" तवं तेहीं म्हणीतलें : "हा अभ्यासु जाला : तेयां साडाक्रमु पुसों :" म्हणौनि अवघेचि गोसावीयांपासि आले : मग तेहीं माहात्मां गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : या नावं संतोखू काइसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "संतोखा : हे तुमतें साडाक्रमु पुसताति :" "जी जी : पुसताति तरि पुसतु : आणि काइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुमची काठीखापरी[२] हीरती ना ? :" "जी जी : हीरती तरि हीरती : आणि काइ :" "तुमचीया जटै उपडीती :" "जी जी : उपडिती तरि उपडिती : आणि काइ[३] :" "तुमचीया मुद्रा हीरती ना :" "जी जी : हीरती तरि हीरतीं : आणि काइ जी :" "तुमतें तोंडिचां तोंडीं मारिती :" "जी जी : मारिती तरि मारिती : आणि काइ :" "तुमतें पाइं धरूनि

---

२ (**दृपा.** ४६. 'मोदळेयाचा दृष्टांत'. 'मार्तंडाप्रति पैठणीं : **एवा.** चांगदेवभटाप्रति एळापुरीं निरूपिला'—**दृस्थ.** वचनसंबंध लक्षात घेऊन मी तो येथे घातला आहे.)

**२०७. १ एवा.** एकु दी संतोखू हाटाआंतु गेले होते : तवं तेहीं माहात्मा म्हणीतलें : "तुम्हां नाव संतोखू काइसें ? तुमची काठी खापरी आमची : मुद्रा आमचीया : याची काठी खापरी हीरों :" ऐसें वेवादत गोसावीयांपासि आले—. **मुरा.** एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें पटिसाळेवरि आसन : तवं इंद्राइ नावें महात्मा गोसावीयांचेया दर्शनासि आले : आदेश केला. सीक्षा केली : बैसले : गोसावीयांतें पुसिलें : "हां जी : यांसि संतोष ऐसें नाव काइसें ?" २ **मुरा.** °कंथा. ३ **अ.** मीसीया उपडिती.

फरफरां काढिती :" "जी जी : काढिती तरि काढिती : आणि काइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "म्हणौनिचि संतोखू कीं : आतां सतेव संतोखू :" मग तेहीं माहात्मां म्हणीतलें : "जी जी : संतोखू नावं हें यासींचि साजे :" एतुकेनि तेहीं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले[४] : मग नीगाले : मग नीगतां तेहीं म्हणीतलें : "आमसीं साडाक्रमु घाला[५] :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तो तुम्हीं नेणा गा : चंद्राइ माहात्मा : तो साडाक्रमु जाणे :" इतुकेनि ते उगेचि नीगाले : ।।

## २०८ उपाध्यां म्हणीएं

बाइसीं[१] उपाध्यांतें म्हणीतलें : "बटीका : जाए पां : पत्रसाख घेउनि ए :" गेले : घेउनि आले : *"बटिका : जाए पां : तेल घउनि ए :" गेले : आणिलें[२] :* "बटीका : वीसरलीएं : सांबारू घेउनि ए हो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ जालें ए म्हांतारीएसि ? एक वेळ न पुरे : दोनि वेळ न पुरे : ऐसी[३] वीसुगी[४] लावा : मां उभाचि असैल :" उपाध्ये उगेचि राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां बटिका : जाल ?" "तरि काइ जी : बाइसांचें म्हणीएं तें गोसावीयांचेंचि कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा जा : बाइसें कोपती[५] :" ।।

## २०९ नागदेओभटां वेदुदान

*पदकर नागदेओभट[१] म्हणति : "मज संध्यातुल्य वेदु होए : ऐसें मीं गोसावीयांतें मागैन :" दरीसना येति आणि वीसरती : एकु दीं[२] :* नागदेओभट गोसावीयांचेया दरीसनासि आले : तवं गोसावी दानासि पुढारले : सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : काइ मागा :" "हो कां जी[३] : सबद संक्रमण : वेदध्वनि होआवी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "होइल हो :" एतुकेनि संक्रमणासहीत वेदू एओं लागला : गांवोगांविचे ब्राह्मण पद चुकति : ते तेयांतें पुसावेया एति : मग पदकर नागदेओभट हें नावं जालें : *अचाट सामग्री जाली : अखंड बोलताचि असति[२] :* उभीए गंगातटीं तेयांचीए परक्षे उतरे ऐसा ब्राह्मणुचि नाहीं : अर्थसहीत वेदू बोलति : ।।

---

४ **अ.** मागें यांसिही केलें–. ५ **पं.** सांघावा.

**२०८.** १ **भ.** बाइसीं उपाध्यातें हाटा पाठवीलें : एकु वेळ पाठवीलें : दोनि वेळ पाठवीलें : तीसरेनि माघौतें : मग सर्वज्ञें म्हणीतलें–. २ (**गो.**). ३ **एवा.** "बाइ : वीसकी आणा : मा एथ टेंका : मा ऐसाचि असैल : एके वेळें सांघों नैए ?" ४ **एवा.** वीचकी. **एवा.** वीसीकी. **गो**, वीसुकी. ५ **गो**, °मग उपाधी म्हणीतलें : "बाइ : सांघा :" बाइसीं म्हणीतलें : "नको बटिका : बाबा कोपत असति :" "ना बाइ : सांघा :" मग गेले : हाटवका बरवा सवंग घेउनि आले : बाइसाचां हातीं दीधला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आपुलें आवघें म्हणीयें एकेचि वेळें देइजे कीं :" "हो कां : बाबा :"

**२०९.** १ **भ.** नागदेवोभट ते बळ्हेग्रामिचे : **मु.** एकु दी नागदेओभट गोसावीयांचेया दर्शनासि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : जवळि बैसले : (**शोध:**) स्तीति जाली पोखली : ते कव्हणासि बोलेति ना : कुटुंबीचीं म्हणेति : पीसें लागलें : म्हणौनि औषध करीति : (**स्वमत**) केतुलेया एकां दीसां भंगली : मग नागदेवभट म्हणति : "मज संध्यातुल्य वेद होए–. २ (**मु.**). ३ **मु.** °मज संइताक्रमु यावा जी :"

मग गोसावीं बीजें केलेंयावरि तेहीं ऐसें सपन देखिलें : स्वप्नीं एउनि गोसावीं म्हणीतलें : "काइ आझुनि तुझी वडबड न सरे?" एतुकेनि ते उगेचि राहीले : मग ते कव्हणासींही बोलति ना : माहात्मे आमची जाति : तेयांसि सबद दोनि बोलति[४] : ।।

## २१० पारधि नीरोपणें

गोपाळपंडीत ते सारंगपंडितांचे मैत्र[१] : ते कटकिचे : ते सारंगपंडितांसवें गोसावीयांचेया दरीसनासि आले[२] : ठीटिकारें बैसले : मग गोसावीं पुसिलें : "आपणेया कवणा ठाइं परीच्यो?" "जी जी : मी पारधीचें[३] वगतृत्व जाणे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सास्त्राआधारू : कीं उबेणें?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सावजाचा यावा आणि धुरेचा लाठु बोला पां :" तवं तीं सावजाचा यावा बोलिला : धुरेचा लाठु बोलिला : परि कोण्ही रहस्य अभिनवे ना : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पारधि ते काइ इतुकीचि गा?" मग ते उगेचि राहिले : मग गोसावीं पारधि नीरोपुं आदरिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "जाड : वाड : कोड : कवतीक : जाड पारधि सोराची : हस्तीची[४] : वाड पारधि वाघाची : कोड पारधि हरणारोहीयांचीतळांची : मेदडांची : कवतीक पारधि ससेयाची : तीतीरांची : लावेयांची : मासेयाची : जाड पारधि कैसी जाणिजे?" मग गोसावीं सावजाचा यावा बोलों आदरिला : हूडुहूडुकरि सावज ए : तवं बाइसें मुक्षकरूनि अवघीं भगतिजनें मठाआंतु[५] पळों आदरिलें : राणेराउत होते[६] तेहीं पालखती मोडिलीया[७] : पळावेयाची आइति केली : मग गोसावीं तो रसु आखूडिला : मग गोसावीं धुरेचा लाठु बोलों आदरिला : ते राणाराउतांचे हात परजांवरि[८] पडिले : बाइसें मुक्षकरूनि अवघेयां भगतिजनां लाठु उपजला : मग तेहीं म्हणीतलें : "जी जी : हें आम्हीं परिसों नेणों : मां बोलौनि काइ जी? हें गोसावींचि नीरोपावें आणि गोसावींचि परिसावें :" ।।

## २११ बाइसांचेया देवां होणें

एकु दीं दोपाहारांचा पुजाअवस्वरू जाला : आरोगण : पहुडु जालेयाअनंतरें गोसावीं वीळिचांचां वेळीं मढाचीए जगतीआंतु भगतिजनासीं खेळु मांडिला : *पाटाउ*

---

४ **मु.** (**शोध.** कुटुंबाचीं म्हणति पीसें लागलें : तें एथ).

**२१०.** १ **मुहबी.** °ते रायाचे वक्ते : बरवें बोलों जाणति. २ **मुहबी.** सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : हे कोण?" "जी जी माझे मैत्र : हे शास्त्रवक्ते : हे बरवें बोलों जाणति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें काहीं ग्रंथाधार कीं उबेणें?" ३ **भगोपं.** पारधीवगतृत्व. ४ **हबी.** हस्तिसोराची. ५ **एवा.** मढामागां. ६ **हबी.** °तेतुलेयांसि लेणें फोडुनि जावें ऐसा भयानकु रसु अभिनवला. ७. **अ** मांडिलीया. ८ **हबी.** कडदंबेयावरि.

*पाग : काळीं*[१] *धारीं : ते उभी धाटिया वेढीली : आणि*[२] लाहानीसीवनी[३] खेळत होते : एरातें डवंचीति[४] : एरातें डवंचीति : उघडी श्रीमुर्ति : ऐसेयां बाइसें वीळिचांचेया पुजाअवस्वराची आइति करीति : तेवींचि म्हणति : "पुरे कीजो बाबा :" गोसावी उगेचि : नाइकतेया भाखा खेळत असति : तवं पुजाअवस्वरासि उसीरू जाला : आरोगणेसि उसीरू जाला : गोसावीं खेळों आदरिलें : बाइसीं वेळां दोनि म्हणीतलें : "बाबा : खेळु पुरों देइजो : पुजाअवस्वरासि उसीरू जाला :" परि गोसावीं खेळोंचि आदरिलें : मग बाइसें भगतिजनासि कोपलीं : बाइसीं म्हणीतलें : "आरे बटिकुरेंन्हो[५] : आतां खेळु पुरों देया ना : बाबासि उसीरू होतु असे :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरे गा आतां : बाइसें[६] कोपत असति : आतां एथौनि बाइसांचेया देवां होआवें लागैल :" पटिसाळे ओलणीएचीं[७] वस्त्रें घेतलीं : बाहिरिवासु होता तो घेतला : वेढिला फुटा प्रावर्ण केला : गोसावी ओटेयावरि आसनीं बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[८] : आतां तुमचेया देवां होआवें : आतां पुजा करा :" मग बाइसीं पुजा केली : धूपार्ती मंगळार्ती केली : आरोगण जाली : गोसावीयांसि पहुडु जाला : ।।

## २१२ संकरेस्वरीं बोणें कथन

एकु दीसु गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयांअनंतरें वीहरणासि संकरेस्वराचेया[१] लेणेयासि[१] बीजें केलें : बाइसीं[२] पुसिलें : "बाबा : या लेणेयांचा एसणा दारवठा काइसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ए देवतेसि हस्तीवरि बोणें ए गा[३] :"।।

## २१३ रीतुपें कथन

सारंगपंडीत[१] गोसावीयांचेया दरीसनासि आले : तेहीं दोनि फळें गोसावीयांसि ओळगविलीं : गोसावीं पुसिलें : "पांडेया : एं काइसेयाचीं फळें गा ? यां नावं काइ

---

**२११.** १ **एवा.** लोहिवा. २ (**मुराहबी.**). ३ **पं.** लानीसीवनी. **बीह.** लाहानीलपनी : **भगो.** लाणिलपणी. ४ **मु.** डवंचलीति. ५ **एवा.** पोरे हो. ६ **एवा.** बाइसांसि खंति एति असे. ७ **हबी.** वोलणियेवरि बहिर्वासु होता तो घेतला. ८ **एवा.** °या आतां : हें देवो जालें :"

**२१२.** १ **मु.** शंकर लेणियासि. २ **एवा.** गोसावीं पुसिलें : "जाणा पां गा : या लेणेयाचा एसणा दारवठा काइसा ?" "जी जी : नेणों :" ३ **एवा.** °खाडिएभरिची पुजा होए : प्रतदीनीं एसणा भोगु होए :"

**२१३.** १ **मु.** एक वेळ सारंगपंडित गोसावीयांचेया दर्शना नीगाले : तेव्हळि गदोनायकें पुसिलें : "सारंगपंडितो : सीध जात असा ?" "ना एळापुरीं गोसावीयाचीया दर्शना जात असों :" मग गदोनायकें दोनि फळे दीधलीं : "यें गोसावीयांसि दर्शन करावीं : आणि याचें नावं पुसावें :" "ना हो कां :" मग सारंगपंडीत—.

गा ?" "जी जी : याचें नावं नेणिजे : मागां माहादेओरायाचीए सभेसी आणिलीं होतीं : परि तेथ यांचें नावं नेणिजे : मग माहादेओराएं गदोभांडारीयासि दीधलीं : गदोभांडारीएं मज दीधलीं : मीयां गोसावीयांसि ओळगविलीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "यांचें नावं रीतुपें गा :" ॥

## २१४ माणिकेस्वरीं पेखणें चोरीं नेणें

एकु दीं गोसावीं माणिकेस्वरासि बीजें केलें : चौकीं आसन जालें : मग तैसेंचि वीवरापासि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि : गात : वात : पेखणें चोरीं नेलें :" वीवर दाखवीलें : ॥

## २१५ चांगदेओभटां स्मरण वोधान कथन

*परमेस्वरपुरुनि आलेयां चांगदेवोभट गावां गेले नाहीति : मग महाजनीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : चांगोसि बहुत दीस जाले : याची माता खंति करीत असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाटिका : जा : भेटौनि या :" "हो कां जी :" मग*[1] चांगदेओभट गावां नीगाले : गोसावी बोळवीत नीगाले : गोसावीं चांगदेओभटांचेया खांदावरि श्रीकरू घातला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : एथौनि तुम्हीं श्रीप्रभूचेया ठाया गेलेति : यासवें : श्रीप्रभूचीए ठाउनि यासवें सांगातें आलेति : आतां गावां जात असा : तरि[2] तुम्हीं यातें आठवाल ?" तवं चांगदेओभटीं म्हणीतलें : "तरि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : यातें आठवीजे हो : दाहा वीस वेळ तऱ्हीं आठवीजे हो : दाहावीस वेळ नाहीं तरि सातपांच वेळ आठवीजे : सातपांच वेळ नाहीं तरि दोनिच्यारि वेळ तऱ्हीं आठवीजे हो : दोनिच्यारि वेळ नाहीं तरि एकदोनि वेळ तऱ्हीं आठवीजे हो : परि वींझू[3] दीसु जाओं नेदिजे :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "पसु असे : ते आडीदरडी चरे : पोट भरे : मग एकी ठाइं बैसौनि रोवंती : तेणें तयाचीया सप्त धातु नीवती : तुष्टि होए : पुष्टि होए : बळ होए*[4] *:" सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : भींगुरुटी असे : ते कीटकीएतें पाहे : धरी : कांटा रोवी : मग नेउनि आपुलेया घरांतु घाली : दार लींपौनि जाए : एउनि माघौती मातें खाइल म्हणौनि भेणें तीएतें चींती : चिंतीतचिंतितां तीएसीहि पाख नीगति : तेही तीएसरिखीचि होए : तैसें ईस्वराचेया वीयोगातव ईस्वरातें चींतीतचींतितां ईस्वरासीरिखा होए*[5] *:"* ॥

---

**२१५.** १ (**मुराहबी.**). २ **मुरा.** °हें तुम्हां आठवैल ? ३ **मुरापंबीभ.** वंध्यु. **गो.** अवींधु. **ह.** अवींझु. ४ (**दृपा.** ४७. 'रोवंतलेया पशूचा दृष्टांत'. 'चांगदेवभटांप्रति स्मरणनिरूपणीं एळापुरीं निरूपिला :'—**दृस्थ.**) ५ (**दृपा.** ९६. 'भींगुरुटीएचा दृष्टांत'. 'चांगदेवभटांप्रति अनुवर्जनीं एळापुरीं निरूपिला :'—**दृस्थ.** स्वामींच्या दार्ष्टांतिकाचा भाग अंतर्भूत केला आहे.)

## २१६ तथा जळमांडवीए क्रीडा

*एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : उपाहारू सवें घेया : " " हो बाबा : " बाइसीं उपाहारू सवें घेतला : मग*[1] गोसावीं माणिकेस्वरासि वीहरणासि बीजें केलें : तेथ चौकीं आसन जालें : गोसावी घडी येकि परअवर नीरोपण केलें : मग वरि बीजें केलें : तेथ जळमांडवी खेळों आदरिली[2] : ऐसा पाहार दोनि खेळु प्रवर्तला : मग बाइसीं वीनवीलें : " बाबा : आतां खेळु पुरों देइजो : आरोगणें उसीरू जाला : " ऐसें बाइसीं त्रीसुधी म्हणीतलें : गोसावी नाइकति[3] : मग बाइसें भगतिजनांसि कोपलीं : " पोरें हो : आतां खेळु पुरों देया : बाबासि आरोगणें उसीरू जाला : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां खेळु पुरों देया गा : आतां बाइसांचेया[4] देवां होइजैल : " मग तीएचि पटिसाळेवरि गोसावीयांसि आसन रचिलें : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : मग पुजा आरोगण जाली : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## २१७ सांतिबाइसां भेटि

सांतिबाइसें तीएं वसमतीएसि[1] होतीं : तीया नावं माइंबाइसें[2] : तेयांचा वरैतु सरला : लेंकु फीटला : धन[3] होतें तें राउळें नेलें : वडील लेंकि एकाइसें : तेयांचे हात रीतले : धाकुटी लेंकि जसमाइसें : तेयां कांवरें[4] लागलें : वरैता नावडति : सासुसासुरेया नावडति[5] : देरा नावडति : तेहीं दवडिलीं : माइंबाइसीं आपणेयांपासि आणिलीं : ऐसीं माइंबाइसें थोर दुखीएं जालीं : द्वारावतीएसि लोकु नीगाला : माइंबाइसीं म्हणीतलें : " आतां द्वारावतीएसि जाइन : एकि पाठीसि बांधैन : एकि पोटेंसीं बांधैन : मां रीगैन समुद्रामध्यें[6] : " ऐसा द्वारावतीएसि पव्हा नीगाला : तेया पव्हेयासवें नीगालीं : तीएं प्रतीष्ठानासि आलीं : सारंगपंडीत सोएरे : तेयां भासे होति : तेयांसि भेटलीं : दुख करीति : ते अवघी गोष्टि तेयांपुढां सांघीतली : " आतां द्वारावतीएसि जाइन : एकि पोटेंसीं बांधैन : एकि पाठिसीं बांधैन : मग समुद्राआंतु रीगैन : " मग

---

**२१६.** १ (ह.). २ **गो**₂ °सर्वज्ञें म्हणीतलें : " या गा : जळकेळि खेळों : " मग गोसावीं उदकामध्यें बीजें केलें : आणि भगतजनातें सींपीलें : मग आवघेचि उठिले : उदकामध्यें रीगाले : मग जळकेळि खेळों लागले : तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : मींहीं एवों ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : या : " बाइसें गुडघेया इतुकेया पाणीयाआंतु रीगालीं : तवं नाथोबाएं वोढुनि आंतु नेली : तवं तीएं : बाबा : बाबा : करीत बोबाइली : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : उगे असा गा : " ऐसे पाहार दोनि अतिक्रमले : तवं गोसावी खेळतचि होते : मग बाइसीं वीनवीलें :--. ३ **भह.** °नाइकतेयाचि भाखा खेळतचि असति. ४ **गो.** बाइसांचा देवो.-.

**२१७.** १ **गो**₂ वांकुडीएसि. २ **पं.** मांबाइसें. **गो.** माल्हाइसें. **गो**₂ माणीकाइसें. **गो**₃ कामाइसें. ३ **पंगोगो**₂ कुळवाडि°. ४ **एवा.** अपसमारू लागला. ५ **मु.** न पढीयेति. ६ **एवा.** गोमतीएसि.

सारंगपंडितीं तेयांची दुखनीवृति केली : मग उदीयांचि नीगतां सारंगपंडितीं म्हणीतलें : "माइंबाइ : द्वारावतीए तुम्हीं जाल तरि एळापुरेंहूनि जा : तेथ आमचे गोसावी श्रीचांगदेओराउळ राज्य करीत असति : तेयांचें[७] दरीसन घेया : मग सामोरीं जा : मग तुमचें दूख जाइल : आणि यांचें कांवरें जाइल : मग द्वारावतीएसि जा :" तैसींचि नीगालीं : मग तीएं एळापुरासि आलीं : गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला[८] : गोसावीं वीहरणासि बीजें केलें : वीहरणींहुनि मागौतें मढासि बीजें केलें[९] : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : पुजाअवस्वराची आइति होति असे : गोसावीयांचीए ओळगेसि अवघे भगतिजन आले असति : ते पाटाउवें सुताउवें लेइले[१०] असति : अवघे गोसावीयांसारिखेचि दीसताति : कोणु गोसावी : ऐसां नोळखति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसीं या :" म्हणौनि श्रीकराचा अनुकारू दाखवीला : मग माइंबाइसें साउमीं आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : एकि आसु दरीसनासि केली : मग बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कोणीकडौनि एत असिजे ?" माइंबाइसीं म्हणीतलें : "जी जी : वसमतीएकडौनि :" मग अवघी गोष्टि गोसावीयांपुढें सांघीतली : "जी जी : भातारू सरला : पुत्रु सरला : धनकुळवाडि राउळिचीं नेलीं : वडिली लेंकिचे हात रीतले : धाकुटीएसि कांवरें लागलें : ते सासुरीचां आणुनि घातलीं : तेव्हळि मीं जी द्वारावतीएसि नीगालीएं : एकि पाठिसीं बांधैन : एकि पोटेसीं बांधैन : मग गोमतीएसि रीगैन : ऐसें म्हणौनि प्रतीष्टानासि आलीएं : तेथ भाचे सारंगपंडीत भेटले : तीहीं गोसावीयांपासि पाठवीलें : जी जी : माझेया पुत्राचे ऐसेचि हात : ऐसेचि डोळे : ऐसेंचि तोंड :" म्हणौनि दुख करूं लागलीं : "जी जी : बरवा होता : गुणाचा होता : गोसावीयांसारिखाचि होता :" ऐसे तेयाचे गुण अनमोदोंअनमोदों दुख करूं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दुख न कीजे : दुख म्हणिजे पाप : *दुखातव नरकं होति*[११] : सोनेंयाची फळी[१२] पोटेसीं बांधौनि उदकामध्यें रीगालेयां काइ तरिजैल बाइ? ते बुडळीलचि कीं[१३] : तैसें बाइ : दूख न कीजे कीं :" आणि तेयांचें दूख ऐसें नीरपौनि गेलें : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : बाइसीं चरणोदक दीधलें : तें आपुलेंहीं आणि तेयांचें जसुबाइसांवरि घातलें : मां पुजाअवस्वर जाला : तोहीं पाहिला : मग बाइसीं ताट केलें : गोसावीयांसि आरोगण जाली : तेयांसि प्रसादू दीधला : मग तीएं बीढारासि गेलीं :॥

वीळिचांचेया पुजाअवस्वरासि आलीं : मागौतें चरणोदक जसमाइसांसि पाजिलें : माथेयावरि घातलें : पुजाअवस्वरू पाहिला : मग बीढारासि गेलीं : उदीयांचि आलीं :

---

७ **गो.** तेयांसि भेटि घेया. ८ **एवा.** होत असे : ऐसां समइं दरीसन जालें. ९ **प्रवा.** °बाइसीं आसन केलें : गोसावी आसनीं बैसले : माइंबाइसीं नारीएळ आसु एक दरीसनां केली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मागें एकाइसें : पुढें जसमाइसें : ऐसीं बैसलीं : मग गोसावीयांपुढें अवघी गोष्टि सांघीतलीं :—. १० **एवा.** नेसले. ११ **(मुभ.)**. १२ **एवा.** प्रतीमा. **एवा.** सीरसाळेया पाखाणाची फळी°. १३ **एवा.** °रीगों नैए कीं : जऱ्हीं जाली सोनेयाची तऱ्ही ते बुडळीलचि (**एवा.** बुडवीलचि) कीं :"

सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : रात्रीं काहीं उपद्रो जाला ? ” “ ना जी : जी जी : देहांतु वीस वेळां ए : तीस वेळां ए : आजि तें नैएचि जी : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : तें आतां नैए हो : तें आतां गेलें हो बाइ : ” तेयांचें दुख गेलें : एरांचें कांवरें गेलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : द्वारावतीए पह्वा नीगाला : आतां तुम्हीं द्वारावतीए जा ना ? ” माइंबाइसीं म्हणीतलें : “ ना जी : आमची द्वारावती हेचि : आमचा कान्हैया एथचि भेटला जी : ” मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : आतां तुम्हीं यांतें सासुरेया बोळवा[१४] ना ? ” “ ना जी : हे दुहव : सासुसासुरेया नावडे : वरैता नावडे : देरांभावेयां नावडे : कोण्हाहीं पढीए ना : तीहीं दवडिलीं : आतां इतें तीएं पतकरीति ना : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ जा : आतां पढीएंती : पतकरिती : माझी वडील सुन आलीं म्हणौनि साउमीं एतीं : सडेसंमार्जन गुढीया उभिती : पाटु पासवडिती : दोघां सेस भरिती : आतां तीएं यांची वाट पाहातें असति : ” बीढारासि गेलीं : मग माइंबाइसीं एकाइसातें म्हणीतलें : “ एइ : तुं जाए कां जसुमाएतें बोळवीत : ” तवं एकाइसीं म्हणीतलें : “ हें काइ ओ : तुज गोसावीयांचां सन्यधानीं असों आवडे : मज काइ नावडे ? ” तीएं म्हणति : “ मज न वचवे : ” उदीयांचि दरीसनासि आलीं : सांघीतलें : “ जी जी : एइतें म्हणीतलें : ‘ जाए कां जसमाएतें बोळवीत : ’ हे म्हणे ‘ मज न वचवे : ’ ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : तुम्हीं जा बोळवीत : ” “ ना जी : मीं गोसावीयांचें सन्येधान सांडुनि न वचें : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : तुम्ही जा : जेंचि यां एथ असतां होइल तेंचि तुम्हां तेथ असतां होइल : *जैसी सय्यापाळना : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : कव्हणी एकि सैयापाळना असे : तीचीए सेजे कव्हणां रीगावा नाहीं : तीचीया देखोवेखीं सुद्रीही करी : तरि जेचि लोक तीएसि होति तेचि तीएसि होतीं*[१५] : ” “ *हो कां जी :* ” मग नीगालीं : तीएं पैठणासि गेलीं : बोळावा मागीतला : सारंगपंडिती चीरचोळी : तोडु : घोडें : जनु दीधला : मग गावांसि[१६] गेलीं : तवं तीएं वाट पाहातें होतीं : ‘ वडील सुन आली ’ म्हणौनि साउमीं आलीं : हरीखैलीं : तेयांतें घेउनि गेलीं : आदरू केला : गोसावीं सांघीतलें होतें तेतुकें तैसेंचि केलें : तेयांसि भांगार केलें : असों लागलीं : ॥

मग एकाइसीं म्हणीतलें : “ आतां मीं गावांसि जाइन : ” तवं तेहीं म्हणीतलें : “ जाल कैसीं ? आमची वाप[१७] धाइल : मां तुम्हांसि वस्त्र घेउनि : मग बोळवीत घालुनि : ” मग एकु दीसु माइंबाइसांसि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : तीएचि दीसीं तेथ एकाइसांसि जाली[१८] : एकाइसें देव्हारेयावरि बैसलीं होतीं : आणि तेयासि

---

१४ **एवा.** पाठवा. १५ (**दृपा.** ८५. ‘ शय्यापालनेचा दृष्टांत ’. ‘ एकाइसांप्रति जसमाइसांतें बोळवीतां : एळापुरीं निरूपिला : ’—**दृस्थ. एवा** : ‘ भटांप्रति बेलोपुरीं असन्निधानधर्मनिरोपणीं : ’— (उत्तरार्ध लीळा ५८५ पाहा.) १६ **गो$_2$** एरंडरसासि. १७ **हबी.** वाफ. **पं.** गव्हांची वाफ. **अ.** वप १८ **ह.** °एकाइसें जाउनि तेयाचेया देव्हारेयावरि बैसलीं . . . (**बी.**) आणि तैसीचि नीजैलीं

तेथ स्तीति जाली : आणि तीएं तैसींचि नीगालीं : तीएं म्हणों लागलीं : " इचें पीसें गेलें : तें इसि लागलें :" मग एकाइसीं म्हणीतलें : " मातें बोळवा[१९] :" तीएं म्हणति : " सेतासींवाराचे दीस : गहुंवांची पेरणीं : आम्हीं आराओं ना : राहा : मां साउलें घेउनि : मग बोळवीत[२०] एउनि :" तीएं न न्हातीचि : नीगालीं : ॥

गोसावीं सांतिबाइसांतें म्हणीतलें : " बाइ : तुमची एइ एति असे मा :" " हें काइ जी : माझीं लेकरूवें माझी काढिली रेघ नोलांडीति : मां एइ कैसी एइल ?" यावरि गोसावी उगेचि होते : पैठणाइतुकेयां आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमची एइ आलीं मा :" " ना जी : मीयां म्हणीतलें : 'एइ : मी एइन : कां नीरोपु पाठवीन : तेयावांचौनि नैयावें :'" मग जीए दीसीं एतील तीए दीसीं मागौतें सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमची एइ आलीं मा :" ऐसें गोसावीं त्रीसुधी म्हणीतलें : " हें काइ जी ? एइ कैसी एइल ? : ऐसेंचि गोसावीं तै तन्हीं म्हणीतलें : आतां तरि म्हणीतलें : माझी एइ माझी काढीली रेघ नोलांडी :" *सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : चंद्राचां रश्मीकरूनि सीळापाषाण*[२१] *नीवति : पारी द्रवति ना : तैसा सोमकांतु नव्हे : तो द्रवे*[२२] :" तवं एकाइसें एळापुर पातलीं : दारा आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हे नव्हे तुमची एइ आलीं :" तवं एकाइसें आलीं : आंगणीं उभीं ठेलीं : तीएं बाहीरि नीगालीं : तवं एकाइसें देखिलीं : " हें काइ गे एइ : एकली कैसी आलीसि ? मीं गोसावीयांतें मघांलागौनि उरोधीत असें : एइ : मीं गोसावीयांतें ऐसें म्हणें :" मागील अवघें सांघीतलें : स्तीति जाली : ते सांघीतली : " हो गे : ते दीसींचि मज स्तीति जाली : आइ : मीं देव्हारेयावरि बैसलीं होतीएं : मज स्तीति जाली : आणि मीं न पुसत आलीएं : तीएं म्हणति : 'इचें पीसें फीटलें : मां इसि लागलें :' ऐसें हांसों लागलीं[२३] :" ॥

## २१८ तथा बोरिबाबुळ सींपवणें

एकु दीसु गोसावीं ऐसें बाहीरि बीजें केलें : वीहीरीचिएकडे बोरिबाबुळ होती : माइंबाइसांतें सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : या : तुम्हीं मासुदीसु ओलीया पडदणीयां हे बोरिबाबुळ सींपा : मां तुमचीयां सातां जनमाचेया कर्माचें एथौनि हस्तउदक घेइजैल : मग तुम्हांसि सांतिनगरिचा पाटा दीजैल : तुम्हां सांतिबाइसें ऐसें नावं ठेविजैल :" तीं म्हणीतलें : " हो कां जी :" मग उदीयांचि उठिती : ओलीया पडदणीयां बोरिबाबुळ सींपिती : ऐसें मासुदीसु केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " देखिलें गा : म्हांतारीएचीं सातां जनमाचीं कर्में[१] जाळितांहीं परि न जळेति : *तें एथौनि जाळिलीं :*" म्हणौनि श्रीकरीं हस्तउदक घेतलें : ॥

---

१९ **मुबी.** बोळावा. २० **मुबी.** बोळावीत. २१ **रावा.** लतागुल्में. २२ (**दृपा.** ९. 'सोमकांताचा दृष्टांत'. 'सांताबाइसांप्रति एळापुरीं निरूपिला :'—**दृस्थ.**) २३ **गो**₂ °मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा जीउ आपणेयाचिकडे पाहे ऐसा दोखद्रीस्या कीं बाइ :" " जी जी :"

**२१८.** १ **एवा.** °एथौनि जाळितांहि परि न जळेति :" मग परमेश्वरपुरा पाठवीलें :

## २१९ तथा परमेश्वरपुरा पाठवणें

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं परमेस्वरपुरा जा :" "हो कां जी :" मग गोसावीं तेयांसि वीधि वीहीला : सर्वज्ञें म्हणीतलें : "गाउनि गावां जावें : उपेणें न करावें : संबंधा न वचावें : नवें वस्त्र नेनसावें[१] : येकि भीक्षा नेघावी : इंद्रीयार्थू रसु नेसवावा[२] : मीठाचेया खडेया साक्ष न ठकावें : श्रीप्रभूचे तीन्हीं पुजाअवस्वर पाहावे : श्रीप्रभूची दूरूनि सेवा करावी : श्रीप्रभूचा प्रसादू तीं बोटांआंतु सामावे इतुका घेयावा[३] : वायां जाइल तरि जाओं देयावें : परि तेथिची चीमुटी मीठही नेघावी[४] :" ऐसा वीधि वीहिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीप्रभू नीर्गुण ब्रह्म :" ।।

मग सांतिबाइसीं म्हणीतलें : "जी जी : माझी एइ गोसावीयांसि लागे हो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचीए एइसि एथौनि तल्हाताची साइली कीजैल :" तीयें उगींचि ठेलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "देमतीए : या आरुतीं :" आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचीए एइसि सांगातु देमतीएचा हो :" सांतिबाइसीं म्हणीतलें : "होए जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : तुम्ही एइसि सांगातु देयावा :" देमाइसीं सांगातु दीधला : मग तीहीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : मग तीएं परमेस्वरपुरासि नीगालीं : ।।

सांतिबाइसीं पुसिलें : "पैठणाहुनि जाओं जी? जी जी : इतुलें गोमटें होए तें सारंगपंडीतांचेनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जा : पांडेयासि भेटा : ते तुमचें नीमीत्य : बाइ : नीमीत्य मानिजे :" आणि इतुकेनि तीएं नीगालीं : पैठणासि गेलीं : सारंगपंडीतां भेटलीं : तीहीं अभ्यागता म्हणों आदरिलें : तवं तीहीं म्हणीतलें : "पांडेया : मज गोसावीं एकि भीक्षा वारिली असे :" मग दोंएकां घरां भीक्षेसि गेलीं : वरिचील भीक्षा तेयांची घेतली : तीएं पांती जेउं बैसलीं : तुप वाढुं आदरिलें : "पांडेया : मज गोसावीं इंद्रीयार्थरसु वारिला असे :" मग सारंगपंडितीं नवें वस्त्र देओं आदरिलें : सांतिबाइसीं म्हणीतलें : "पांडेया : मज गोसावीं नवें वस्त्र नेसों वारिलें असे :" तेव्हळि आधजुनीए[५] पासवडीएचें पाटुगें[६] दीधलें तें घेतलें : मग एरी दीसीं राहावीत होते : सांतिबाइसीं म्हणीतलें : "पांडेया : गोसावीं म्हणीतलें : 'उपेणें न करावें :' ऐसें वारिलें असे :" मग परमेस्वरपुरासि गेलीं : बहुत दी श्रीप्रभूची सेवा केली[७] : ।।

मग केतुलेयां एकां दीसां तेयांसि रूजा उपनली : एतुकेनि तेहीं तैसा मनोर्थू केला : जे ऐसां समै एइ एति कां : मग सर्वज्ञें एकाइसांतें म्हणीतलें : "बाइ : तुमचीए मातेसि

---

**२१९.** १ **भ.** नेनसीजे. **मुरागोबी.** न नेसावें. २ **मुबीगो.** न सेवावा. ३ **गो.** °एर वायां जाए तरि नेघावा. **पं.** एर वायां जाइल तरि जावों द्यावा. ४ **शोध.** तेथ लागे तेंचि बोणें करावें : तेथिचा पदार्थ घेइजे ना : ऐसांहीं उरे तरि उरों दीजे : तेथचें असणें तो कासियेचा वासु : ५ **पं.** आदजुनें°. ६ **बी.** पाटकें. ७ यापुढील वृत्तांत **मुरा.** प्रतीत येथे नाही. पुढे स्वतंत्र लीळेत आहे.

रूजा उपनली असे : तीएं तुमची वाट पाहातें असति : तुम्हीं जा : तेयातें म्हणावें : 'रूचेल तें जेवावें :' नेघती तरि ऐसें म्हणावें : येथौनि तुमतें घेयावें ऐसें म्हणीतलें असे :" एतुकेनि तीएं नीगालीं : रीधपुरासि आलीं : भेटि जाली : सांतिबाइसीं म्हणीतलें[८] : "एइ आलीसि ?" तीं म्हणीतलें : *"हो आइ : आलीएं :" "गोसावीं पाठवीलीसि कीं तुंचि आलीसि[९] ?"* "ना आइ : मातें गोसावीं पाठवीलें : आइ : तुज काइ रूचे तें गोसावीं सुववीलें असे :" सांतिबाइसीं म्हणीतलें : "एइ : मज श्रीचक्रधरूवांचौनि आणीक काहींचि न रूचे : जरि घेओं ए तरि मज गोसावीं कां वारिलें ? गोसावीयांसि माझी कणव : म्हणौनि वारिलें :" एतुकेनि तेयांचें देह गेलें : एतुकेनि तेयांचा संसकारू केला : मग एकाइसें तेयांचीया अस्ती घेउनि गोसावीयांपासि आलीं : ।।

गोसावी प्रतीष्टानीं राज्य करीत असति : पीठजैएचेया नींबातळि गोसावीयांसि आसन जालें होतें : तवं एकाइसें आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांपुढें अवघी वेवस्ता सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि म्हणीतलें तें म्हातारीएसि घडलें गा :" मग गोसावीं पुसिलें : "बाइ : पैल काइ ?" "जी जी : या आइचीया अस्ती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ कां आणिलीया ? अनेत्र मरे तेयाचीया अस्ती वाराणसी नेइजति : वाराणसी मरे तेयांचीया अस्ती कें नेइजति ? रीधपुर म्हणिजे कासीएचा वासु किं बाइ : तें आणिका जडा पार्थिवासारिखें न्हवें कीं बाइ : तेथिचीया अस्ती मा एथ आणि-जति ?" तवं सारंगपंडितीं म्हणीतलें : "जी जी : एं काइ जाणताति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "घाला पैलीं लोणारतीर्थीं :" ।।

## २२० आपदेओभटांतें[१] एनकैए पाठवणें

एकु[२] दीसीं गोसावीं आपदेओभटांतें म्हणीतलें : "भागेया : तुम्हीं अनकैए जा गा : तेथ बैसा : कव्हणीं काहीं देइल तें घेया :" "हो कां जी :" मग ते अनकैएसि गेले : बैसले : तवं एकु देवतेसि परीएळु घेउनि आला : देवतेसि परीएळु दाखवीला : मग आपदेओभटांतें म्हणीतलें : "भटो : घेया :" तेहीं घेतला : घेउनि आले : मग गोसावीयांपुढें

---

८ अ. °"तुं कां गे एइ : आलीसि?" ९ (**पंहबी.**).

**२२०.** १ **मुराहबीगो.** प्रतीत ही लीळा विष्णुभटासंबंधीची म्हणून वर्णन केलेली आहे. २ **मुराहबी.** विष्णुभट ते भलतयाची अप्राप्ति भावीति : एकु दी . . . गोसावीं अनकैये बीजें केलें : नावेक आसन जालें : मग बीढारासि बीजें केलें : विष्णुभटातें राहावीलें : सर्वज्ञें म्हणीतलें: "भटो : तुम्हीं एथ राहा :" "हो कां जी :" म्हणौनि तेथ राहीले : तवं देवतेसि परिएळु आला : तिहीं म्हणीतलें : "भटो घेयाल?" "हो कां :" म्हणौनि घेतला : तांबोटीए तुप घेतलें : आले : गोसावीयांसि दृष्टपूत केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं दीसवडि अनकैये जा : तुम्हां परियेळु येइल :" ।। (**हीराइसें.**) "तुमचें भवीश्य ऐसें : दीसवडि बैसाल तरि दीसवडि ऐसेंचि होइल :" "ना जी : मज ऐसें न व्हावें :" ।।

सांघीतलें : "जी जी : मज तरि आस आपेक्षा : नाहीं : मज गोसावीं तेथ कां पाठवीलें?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तुमचें भवीक्ष असे कीं गा : मा तुमचें भवीक्ष काइ केहीं गेलें असे ?" ।।

## २२१ रांकेयां लखूमींद्रभटां जीव्हामळप्रसादनीराकरण

एकु दीं गोसावीयांसि गुळुळा जाला : तवं बाइसीं जीह्वामळ सांडावेया लखूमींद्रभटां-हातीं दीधलें : ते पऱ्हां गेले : आणि तोंडीं लाविलें : आणि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें घेवों नैए कीं गा :" "जी जी : कां घेवों नैए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना घ्रुणा जऱ्हीं उपजे तरि वोखटें : ना घ्रुणा जऱ्हीं नुपजे तऱ्हि हाडगदलेयां पापां पुरश्चरण होए : जनु देखे तऱ्हि अपवादु भके : तरि दोखू : वोखटेयासि कारण होए : परि आणिकी वेळे ऐसें न करावें :" "जी जी :" ।।

## २२२ नाथोबाकरवि टीळाजानिवें पुरवणें

*गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावी एणकैए वेहरणा बीजें केलें : तेथ नावेक आसन जालें : जवळे नाथोबा[1] होते : गोसावीं नाथोबातें म्हणीतलें[2] :* "बटिका : तुम्हीं टीळा कां लावा ? जाणिवें कां घाला ?" "जी जी : भीक्षा यावेया कारणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि काइ टीळेयाजानिवेयावीन भीक्षा नैए ? जा पां : आजि टीळेयाजानिवेयावीन भीक्षा करा :" "मां आजि भीक्षा एइल कीं नैए ऐसें पाहा :" "हो कां : जी जी : तरि टीळाजानिवेयाचें काइ करूं?" सर्वज्ञें म्हणीतलें : "टीळाजानिवें पूरूनि एणकैए[3] बैसा :" "हो कां जी :" मग तेहीं टीळा जाणिवें पुरिलें : तेथ बैसले : गोसावीं बीढारा बीजें केलें[4] : ।।

नावेक बैसति आणि माघौते उठति : पाउलें दोनि चालति : आणि माघौते एति : तेथवरि जाति आणि माघौते एति : क्षेणु एकु बैसति : माघौते उठति : दीसाची वास पाहाति : माघौते तेथवरि एति : टीळेयाजानिवेयाची वास पाहाति : काढुं पाहाति : आणि दीसाकडे पाहाति : ऐसीया एरझारा करीति : तवं कोण्हातें एतां देखति ना : मग टीळा काढिला : जानिवें काढिलें : टीळा लाविला : जानिवें गळां घातलें : तवं एकु ब्राह्मणु परिएळु घेउनि आला : तेयातें म्हणीतलें : "भीक्षेसि नको जाओं : परिएळ देवतेसि

---

**२२२.** १ **रावा.** चांगदेवोभट. २ (हमुरा.). ३ **एवा.** एथचि तीसरा पाहारवेऱ्हीं बैसा. ४ **अ.** °तवं ब्राह्मणु एकु परीएळु घेउनि आला : तेणें म्हणीतलें : "भीक्षेसि नको जाओं : हा मीं परीएळु देवतेसि समर्पीन आणि तुम्हांसि देइन :" "हो कां :" म्हणौनि राहिले : तेणें देवतेसि परीएळु समर्पीला : आणि आणुनि तेयाचीए झोळीएसि घातला : तुप घेयावेया काहीं नाहीं : तेह्वळि तेणें म्हणीतलें : "हें वाटें घेउनि जा : मग घरासि आणुनि देया :" तें घेउनि आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि तुम्हीं कैसे गा म्हणा : जें टीळेयाजाणिवेयावीन भीक्षा नाहीं ?" ।।

दाखवीन[५] : मग तुम्हांसि देइन :" देवतेसि नीवदु दाविला[६] : मग तेयातें म्हणीतलें : "भटो : घेया :" *तेयांचीए झोळीए घातला : "तूप घेयावेया नाही :" "हे तांबवटी घेया :" तांबवटीए तुप घेतलें[७] :* मग घेउनि आले : मग गोसावीयांपुढां सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा : वेळवेळां टीळेयाजानिवेयांपासि कां जासि ? आणि काइ एकु उपवासु पडिला कीं दोनि उपवास पडिले ? हां गा नावेक तऱ्ही पाहातासि कां : मां काइ होतें तें पाह्मीजतें :" ।।

## २२३ मंडळीका झोळी देणें*

[गोसावीं नाथोबाकरवि टीळाजानिवें परित्यजविलें : मग ते आले : नाथोबायें गोसावीयांतें म्हणीतलें : "जी जी : मज भिक्षाविधी निरूपावा :" मग गोसावीं बाइसांसि झोळी मागितली : गोसावीं आपुलेनि श्रीकरें झोळीएसि गांठी दिधलीया : ते झोळी गोसावीं आपुलेनि श्रीकरें नाथोबांसि दिधली : *सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : एथौनि एझोळीएसि आणि तुम्हांसि प्रणएन कीजैल गा : हे तुम्हां लागे हो : देहपर्यंत प्रतिपाळिजे :" ऐसें म्हणौनि[१]* मग विधी विहिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : चातुर्वर्ण्यं चरेद् भैक्षं : या शास्त्रासि अनुसरीजे : घर न निवडीत भिक्षा कीजे : ओळखीतयाचेया घरा न वचावें : एकीकडूनि रीगिजे : एकीकडूनि नीगिजे : नगरांत कां पाल्रांत : नगरांत जालें आणि पाल्रांत नव्हे तरि आपजविजे :" नाथोबाएं म्हणीतलें : "जी जी : आपजवितां न मिळे तरि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना तरि खुंट गिळिजे :" *यावरि चांगदेओभेटीं पुसिलें : "जी जी : इंद्रियार्थ रससाधन सेविलेया काइ होए[२] ?"* सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : *कव्हणा एका रायाचा डींगरा असे : तो वोलिसाउला ने : तें उपसाहे : साखळें ने तें नुपसाहे : तथा साखळें ने तें उपसाहेचि : भांडार फोडौनि वाखारि ने तें नुपसाहे[३] : तैसें पुरुष आवडी साधन सेवी ते उपसाहाति : रस सेवी ते नुपसाहाति : तथा रसु उपसाहाति : परि मुख्य वीखो नुपसाहाति[४] :* "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले :" ।।]

## २२४ इंद्राइ महात्मेयां सांडाक्रमु अनुवादु*

[एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावी आसनीं बैसले असति : तवं इंद्राइ महात्मे आले : अदेशु केला : सीक्षा केली : बैसले : नावेक होते : मग

---

५ **एवा.** समर्पीन. ६ **एवा.** समर्पिला. ७ (**ह.**).

**२२३.** *(**प्रव.आ.** ८१-८७).

१ (**मु.** अज्ञातलीळा. १५. 'मंडळीका झोळी देणें :'). २ (**सं.**) पुढील दृष्टांताच्या आरंभापूर्वी 'जो जयां वीनटला असे : तथा हे वाक्य आढळते'. ३ (**दृपा.** ८१. 'डींगरेयाचा दृष्टांत.' 'चांगदेओभटां एळापुरीं निरूपिला :' –**दृस्थ**). ४ (हे दार्ष्टांतिक माझ्या मते स्वामींचे असावे म्हणून येथे घातले आहे.)

**२२४.** ***अ.** प्रतीत या ठिकाणी 'इंद्राइ सांडाक्रमु जाणणें' ही लीळा आहे. तिच्यातील मजकूर पूर्वी १६७ व्या लीळेत आलेला आहे. तो येथे पुनरुक्त असल्यामुळे रद्द करून त्याऐवजी **मु.** प्रतीतील प्रस्तुत लीळा स्वीकारली आहे.

नीगाले : बाइसीं म्हणीतलें : "जी जी : हे काइ जाणति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्राइ जोगी : सांडाक्रमु जाणति :" ॥ ]

## २२५ राजेया दरीसन स्वीकारू

गोसावीयांची प्रसीधि आइकौनि असके राणेराउत वेधले : ते प्रतदीनीं गोसावीयांचेया दरीसनासि एओं लागले : गोसावीयांचा पुजाअवस्वरू पाहाति : मग रायापासि जाति : एकु दीं राओ[1] *सभामंडपासि आला : तवं नावारूपाचा एकुही सभामंडपीं नाहीं : तवं कोपौनि महादेवरायें पुसिलें : "जो जीए ओळगेचा तो तीए ओळगे न देखों*[2] *:"* तवं पाल्हाडांगीया मुक्षकरूनि अवघे राणेरजपुत ओळगेसि आले : तवं माहादेओराएं पुसिलें : "हां गा : तुम्हीं अवघे कें जात असा ? तुमतें कीं मीं प्रसंन ऐसें देखत असें :" तीहीं म्हणीतलें : "राया : अचळ नाभि देसी तरि सांघौनि :" तवं राएं म्हणीतलें : "सांघा :" "ना एळापुरा एक पुरूख आले असति : तेयांचीया दरीसनासि जात असों : मग तुमचीए ओळगेसि एओं :" *रायें म्हणीतलें : "तेयां नावं काइ ?" "ना श्रीचांगदेवोराउळ गोसावी*[2] *:"* तीं गोसावीयांचे गुणवीसेख सांघीतले : इतुकेनि *वेधु संचरला*[1] *:* मग तेणें म्हणीतलें : "हां गा[3] : मां आमतें कां चुकवीता ? आमतें तेयाचेया दर्शना नेया :" तेहीं म्हणीतलें : "हो कां : ना तेयांतें पुसों देया : मग नेओं :" एरी दीसीं गोसावीयांचेया दरीसनासि आले : मग तें गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी[4] : माहादेओ राओ गोसावीयांचेया दरीसनासि एतु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एइल तरि एओ कां :" ॥

## २२६ राजेयागमनीं वार्त्ता

मग आइती केली : महादेओराओ गोसावीयांचेया दरीसना नीगाला : तवं पाटाचा हाति पडिला : तवं हातिसाहाणी सांघावेया आला : "पाटाचा हाति सरला : अपसगुणु जाला :" म्हणौनि राहीला : तैसेचि[1] एउनि गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : आजि माहादेओराओ गोसावीयांचेया दरीसनासि एतु होता : तवं हाति पडला : अपसगुणु जाला : म्हणौनि राहीला :" *गोसावी उगयांचि आइकीलें*[2] *:* माघौता नीगाला : तवं पाउसु आला : *ते राओ पाणिएं पीटौनि मागुता दुर्गीआंतु घातला*[3] *:* राहिला : तैसेंचि एउनि गोसावीयांपुढें सांघीतलें : *तेंहीं गोसावीं उगयांचि आइकीलें*[4] *:* ॥

---

**२२५.** १ **अपं.** °गुळुळा करीत होता : तवं पाल्हाडांगीया—. २ **(मुहबी.)**. ३ **मुरा.** °तरि आम्हांसि तयांचें दर्शन कराल ?" "हो कां :" तें पाल्हाडांगिया गोसावीयांसि सांघों आला : ४ **मुरा.** °तरि गोसावीयांचेया दर्शना रावो एवों ?" गोसावीं स्वीकरिलें : ॥

**२२६.** १ **मु.** °तैसाचि पाल्हाडांगिया गोसावीयांपासि आला : तेणें सांघीतलें :—. २ **(मु.) हबी.** °एकु दी मागौता रावो नीगाला : तवं आसनिचा घोडा पडिला : तो अपसकुनु जाला : म्हणौनि प्रतला: पाल्हाडांगीया आला : तो गोसावीयांपुढां सांघो लागला°. ३ **(हपं.)**. ४ **(मु.)**.

## २२७ राजेयागमनीं प्राएण

तीसरां दीसीं राएं म्हणीतलें : "आजि राज्य[१] जाओ : परि मीं गोसावीयांचेया दरीसनासि जाइनचि :" गोसावीं प्रश्रयासि बीजें केलें होते : प्रश्रयो सारूनि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : माहादेओराओ कैसे पात्र :" "बाबा : एइल तरि एओ कां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथिचें दरीसन होतखेंओं आपुलें सकळै राज्य एथ संपादील : आपण एथिचा काठीया कांबीया सेवकु होउनि व्रतैल :" बाइसीं म्हणीतलें : "तरि एओं कां नेदिजे बाबा? वर्तेल तरी[२] वर्त्तो कां : बाबा?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो[३] : मग तुम्हीं बोडिकीं कें रीगों लाहाल ?" "तरि असो परूता :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि आइति करा : आतां तो एथ दीसु काढील[४] :" मग गोसावीं बीजें केलें : माटखेडेयासि : तवं तो आला : ।।

## २२८ माटखेडां वसति

बाइसें उदकपात्र भरूं गेलीं : दहींकरिणीं दहीएं दूधें तुपें वीकावेया गेलीया होतीया : तैं ती लवकरि आलीया : तवं पाणिवठांचिया बाइला पुसों लागलीया : "हें काइ ओ : आजि लवकरि आलीयाति ?" तीं सांघीतलें : "ना राओ आजि पुरूखांचेया दरीसना एळापुरासि आला : तेथ कटक आलें : म्हणौनि आमचीं दहीएं दूधें तुपें तेथचि वीकलीं : म्हणौनि लवकरि आलों :" मग बाइसीं पुसिलें : "मग पुरूख भेटले ?" "ना नाहीं भेटले : लेणेंनि लेणें सोधिलें : परि नेभटतीचि :" बाइसीं एउनी गोसावीयांपुढें सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें :" बाइ : तें तुम्हांपुढें सांघीतलें कीं : दीसु एथ काढील[१] :"।।

## २२९ इटखेडां वस्ति ।।

## २३० लासौरीं जोगेस्वरीं वस्ति ।।

## २३१ घोगरगावीं[१] वस्ति ।।

## २३२ डोंबेग्रामीं वस्ति : दाइभागवंतांकरवि ओटा करवणें

दाइभागवंतीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मज जरू एतु[१] असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ ओटा करा : मग तुमचा जरू जाइल :" "हो कां जी :" तीहीं ओटा केला : मग तेयांचा जरू गेला : परि नीसेखू न वचेचि : ।।

---

**२२७.** १ अ. राजि. २ अ. °वर्त्तैल : काइ बाबा :" ३ **मु.** °परि तुम्हीं रीगों नल्हा :" (**हीराइसें.** पोरे हो : तुम्ही कडे पडाल कीं :") बाइसीं म्हणीतलें : "तरि नको बाबा :" ४ **मुराह.** नीनील.

**२२८.** १ **मु.** नीनील. **ह.** नीगैल.

**२३१.** १ **गोभ.** तागडेयाचां°.

**२३२.** १ **गो.** असतुचि.

## २३३ मार्गीं पोफळफोडणा गाहाण ठेवणें

गोसावीयांचा वेचु सरला : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : वेचु सरला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पोफळफोडणा गाहाणु ठेवा[१] : " पोफळफोडणा गाहाणु ठेविला : मग वेचु आणिला : तवं डखले पोटीं म्हणों लागले : " गावां जातां तरि गावीं बीटीया[२] दोनि असति तीया आणितां : तरि गोसावीयांचेया विनोगा जातीया : " ऐसा मनोर्थु करूं लागले : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा डखलेया : मनोर्थू राज्य करीत असिजे ? " " जी जी : मातें गावीं बीटीया दोनि असति : तीया आणितां तरि गोसावीयांचां ठाइं वेचावेया होतीया : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ प्रवृति नाहीं : एऱ्हवीं अवघी राहाटि सोनेयांची न कीजे ? " तवं तेहीं म्हणीतलें : " जी जी : कीजो जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरें हो : तरि तुम्हीं[३] उरों न ल्हा[४] : " ॥

## २३४ एरंडबन कथन

गोसावी मार्गीं बीजें करीत असति : तवं[१] *पुढां एके वोसे गावीं*[२] *:* बाइसीं दुरूनि एक एरंडाचें बन देखिलें : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : पैल केसणें आंबेयांचें बन दीसत असे : कवणीं गांवीचें ? " गोसावी उगेचि होते : नावेक जवळि पातले : आणि सर्वज्ञें म्हणीतलें[३] : " देखिलें गा डखलेया : बाइसांचें बन ? कैसें[४] सांसिनलें असे : " तवं डखलीं म्हणीतलें : " जी जी : बाइसांचीं आंबेयांचीं बनें तीएं ऐसींचि कीं : " डखले म्हणति : " बाइ बाइ : हा आंबा वाणिचा : हें देखिलें पैल केसणे आंबे लागले असति? " *ऐसें विपलाउं लागले*[५] *:* बाइसें म्हणति : " पोरा : बाबा पां म्हणेति : मा तुं कां म्हणौनि म्हणसि ? " ऐसे गोसावीं नावेक हांस्य केलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : " डखलेया : कव्हणी एकु वाटा जातु असे : तो दुरौनि वृक्षातें देखे : परि अमुकेयाचा वृक्षु ऐसें नेणे : नावेक साउमा जाए : मग म्हणे : हा अमुकेयाचा वृक्षु : परि तेयाचे असेख विसेख न देखे : तेयाखालि उभा ठाके : मग तेयाचे असेख विसेख देखे*[६] *: "* ॥

---

**२३३.** १ **एवा.** घाला. **मुराहबी.** °बाइसीं म्हणीतलें : " ऐसें कीती दीस कीजैल बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ जरी तैसी प्रवृत्ति होए तरि हे अवघी राहाटी—. २ **भ.** आसु. ३ **मुरा.** °नुरा. **ह.** °नासाल. ४ **हबीरा.** °पोफळफोडणा गाहाणु ठेवीला : वेचु आणीला : उपाहारू नीफजवीला : गोसावी आसनीं बैसले असति : तवं तो वाणीया आला : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग म्हणीतलें : " पोफळफोडणा तो याचि गोसावीयांचा ना हो ? " गोसावीयांचा ठाइं तेणें काहीं ओळगवीलें : " डखलेया या : मां पोफळफोडणा घेउनि या : " गेले : आणिला :

**२३४.** १ **ह.** °एके गावीं. २ **(मुराबी.).** ३ **प्रवा.** ° " बाइसांचें बन तें एरंडाचें कीं : " ४ **एवा.** °कैसे आंबेयाचे घड लागले असति : ५ **(मुरा.).** ६ **(वृपा.** १०२. 'दूरदृश्याचा दृष्टांत.' 'नागांबेवरि डखलेयासि एरंडबन प्रसंगीं निरूपिला : ' **–दृस्थ.)**

## २३५ श्रीनगर दाखवणें

गोसावी श्रीनगराजवळि पातले[१] : तेथौनि सीनरीचे कळस दाखवीले : हस्तींचे कींकाट आइकिले : घोडेयांचे हींस : नीसाणांचा नीनादू : माणुसांचा गजंबु ऐसा देखिला[२] : मग बाइसीं पुसिलें : "बाबा : हें नगर कवण?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें श्रीनगर :" ।।

## २३६ श्रीनगरीं भीलमठीं[१] अवस्थान

मग गोसावीं श्रीनगरासि बीजें केलें : तेथ भीलमठीं[१] मास दाहा अवस्थान जालें[२] : ।।

## २३७ राजेया प्रेक्षीत पुरुख स्वएंनामगोपन

माहादेओ राओ तैसाचि एळापुरावरौनि[१] : ठाणेयां महीबा[२] कटकैए गेला होता : तो एतएतां श्रीनगरावरौनि आला : तवं तेथ ऐसें आइकिलें : 'ना एळापुरीं जे पुरूख होते ते एथ असति :' मग पाल्हेयाडांगीयातें माहादेओराएं म्हणीतलें : "पाल्हेया : जाए पां पाहावेया :" पाल्हाडांगीया *अवघीं देउळें पाहुनि भीलमठासि आला : 'एथ काइ असति : हा धाकुटा मठु :' म्हणोनि*[३] भीलमठाचां दारवठां आपण राहिला : बटीकु[४] पाहावेया भीतरि साउमा पाठवीला[५] : गोसावीं जाडि पारावरण केली : गुजरू वेखू घेतला : गुजर दौंडि घेतली : पटिसाळेवरि खांबाआड उभे राहिले : तेण्हें गोसावीयातें पुसिलें: "एथ श्रीचांगदेओराउळ गोसावी असति कीं?" सर्वज्ञें म्हणीतलें[६] : "चांगदेओ-राउळ नेणों : ना बांगदेओराउळ नेणों : म्हांतारी एकि छे : ते गावांमाहिं भीक्ष मागण गै छे : यौ[७] सहौ छो :" इतुकेनि तो गेला : पाल्हेयापुढें सांघीतलें : "एथ चांगदेओराउळ नाहीं : एकु झांजणु असे : तेयासि गुजरू वेखू असे :" मग पाल्हाडांगीया गेला : रायापुढें सांघीतलें : "चांगदेओराउळ नाहीं : झांजणु एकु उभा असे :" मग राओ म्हणों लागला : "तै तऱ्हीं तेयां पुरूखांचें दरीसन नव्हेचि : आतांहीं तेयां पुरूखांचें दरीसन नव्हेचि :" मग तो गेला : ।।

---

**२३५.** १ **मुरा.** °तवं बाइसीं अडवांगानि (**रा.** अळगौनि) बरवे रूंख : बरवीं देउळें देखिलीं : मग पुसिलें—. २ **एवा.** °मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हें देखिलें श्रीनगर : "

**२३६.** १ **एवा.** भीलमढीं. २ **मु.** °हें रत्नमाळिके केसोबास : **शोध** : देवतेसि पूर्वे उत्तरामूख आसन होए :

**२३७.** १ **भ.** °ठाणें घालु माहीबा कटकै°. २ **पं.** महींबा. **गो.** माहींबाकडे. ३ (**मुराहबी.**). ४ **एवा.** जनु. ५ **मुराहबी.** °गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वर जाला : आरोगण जाली : पहुडु : उपहुडु करूनि मग सोरठी जाडि प्रावर्ण करूनि गोसावी मदळसेसीं उभे असति : **शोध** : बाइसें गावांतु गेली : एक म्हणति : भिक्षे गेली : ६ **मुरा.** °माथिमां इहां कोइ नथी (**एवा.** कांहीं नथी). **ह.** मातमां—. **बी.** माहातमां—. ७ **गो.** हउं इहारूही छें. **भ.** अरू हौं छो. **एवा.** हौं इहा छों.

## २३८ माहादाइसां : उमाइसां भेटि

आबैसाचा वडील पुत्रु सारंगपाणि : तो देसाउरासि गेला होता : तो वाटे एतां चोरीं उपद्रविला : तेणें दुखें[१] आबैसीं क्षेत्रसंन्यासु घेतला : रावंसगावीं मढी बांधली : जवळि माहादाइसें : उमाइसें : तेथ मासउपवास करीति : तवं तेथ देव आले : ते आबैसांसीं काहीं बरवें बोलेति : तेणें दादोसांपासौनि तेयांसि स्तीति जाली : तीएं दादोसांचीं सीक्षें जालीं : एकु दीस दादोस आबैसांचीए मढीएसि बैसले असति : बाहीरि वाहाणा उचा असति : काहीं बरवें बोलत असति : तवं तेथ भट पडिताळावेया आले : मोकळा कासोटा : आडवी वेणी : खांदावरि खांडें : ऐसे भट पटिसाळेवरि आले : तवं बाहीरि वाहाणा देखिलीया : ऐसें ओणवौनि खालुतें पाहाति : तवं दादोसांतें मढीएआंतु बैसलेयां देखति[२] : आणि वाहाणा खांडेनि सारिलीया : पौळीबाहीरि टाकिलीया : तीया दादोसीं सांडितां देखिलीया : आणि दादोस बीहाले : हळुचि उठिले : घोंगडें घेतलें : दंडु घेतला : कुमंडलु घेतला : बाहीरि गेले : वाहाणा पाहुनि घेतलीया : जाउनि तेयाचि मागिला वडातळिं बैसले : *महदाइसें उमाइसें तेयातें देखोनि पळालीं*[३] : भटीं म्हणीतलें[४] : "हें काइ आबै : माहात्मे काइसे? नीरोपण काइसें? दादुलेयाचा प्रवेसु एथ काइसा? हे रूपै धाकुटि : हे उमै धाकुटि : याचिकारणें तुआं एथ मढी बांधली?" तवं आबैसीं म्हणीतलें : "सर नागदेया : हें तुज काइ जालें? यां माहात्मेयांतें तुं जाणसि ना : हे नीके : यांपासौनि गोमटें : स्तीतिआनंदू होति :" भटीं म्हणीतलें[५] : "तरी काइ : पुरूखांपासौनि स्त्रीयांसि आनंदू होएचि कीं[६] : हे उमै धाकुटि : है रूपै धाकुटी : यांसि गोमटें होआवें कीं : एथ मढी याचिलागि बांधली?" तवं आबैसीं म्हणीतलें : "सर नागदेया : न बोल : न बोल तोंडें : तोंडें पाप नको घेओं : हे माहात्मे नीके : यांतें मीयां जेवावेया म्हणीतलें होतें : भाणेयावरौनि उठवीजे तरी आउक्ष भवीक्ष उणें होए : तेयां कारणें अन रांधीलें असे :" मग भटीं म्हणीतलें : "आतां बोलावीलेयां एती?" तवं आबैसीं म्हणीतलें : "एती :" भटीं म्हणीतलें : "आतां एती कां तरि माहात्मे होती : जाओं बोलाउं?" "ना जाए : बोलावि :" भटीं म्हणीतलें : "काइ म्हणों?" "ना आबाइसीं तुमतें बोलाविलें असे : ऐसें म्हणा :" भटीं म्हणीतलें : "आतां पाहों पां : माहात्मे होती तरि उगेचि एती :" भट गेले : तवं ते वडाखालि बैसले असति : देवांतें म्हणीतलें : "माहात्मे हो : चाला : तुमतें आबैसें बोलावीतें असति :" "हो कां : चाला :" दादोस उभे ठाकले : तवं भटीं

---

**२३८.** १ **मुराहभ.** °रावसगावीं भटीं गुंफा केली : तेथ तीयें राहीली : २ **मुराह.** देखिलें : आणि तमले. ३ (**मुराह.**). ४ **मुराह.** °नीकें करीतें असा हो आबै : याचि कारणें तुम्हीं एथें गुंफा केली कीं ? ५ **मुराह.** °होइल मा काइ . . . हे तरुणे धारे : याही तरूणिया धारीया : पुरुषापासौनि–. ६ **मुराह.** °आबाइसीं म्हणीतलें : "ऐसें कैसें म्हणत असेसि ?" "तरि मज हो कां : मग जाणों येइल :" आबाइसीं म्हणीतलें : "होइल :" "आतां बोलावीलेया येती ? –.

वाहाणा हातीं घेतलीया : दोघै नीगाले : मग भटीं म्हणीतलें : "माहात्मे होति : रागु नाहीं :" आले : मग दोघै पांती सांघातें जेविले : मग वीळिचांचां वेळीं दादोस गंगेकडे गेले : *आबाइसीं म्हणींतलें: "नागदेया : ऐसा दादोसाकडे जाए :" गेले : तवं ते बैसले असति : जाउनि तयाजवळि बैसले*[७] *:* मग भटीं पुसिलें : "हां हो : तुम्हांपासौनि म्हणे[८] आकृत्रीमु आनंदु होताए ?" दादोसीं म्हणीतलें : "आम्हांपासौनि होताए ऐसेंहीं आति : नव्हे ऐसेंहीं आति : आमचेया श्रीचांगदेओराउळा गोसावीयांपासौनि होएचि : ऐसें सर्वथा आति :" आणि भटां स्तीति जाली : स्तीति भोगीत होते : मग दादोसीं म्हणीतलें : "आतां चाला जाओं नागदेओ भटो :" आणि स्तीति भंगली : उठिले : दादोसांचें घोंगडें घेतलें : कमंडलु घेतला : बीढारा[९] आले : आबैसीं माहादाइसीं देखिलें आणि सुख जालें : भटा दादोसांची आवडि संचरली : मग वीळिचां दोघै पांती जेविले : मग भटीं पुसिलें : "तुम्हीं आतां कोठें जात असा ?" "ना मीं आपुलेयां गोसावीयांचेया दरीसना पर्वाकारणें : गुरूपासि जाइन :" "बा: तुमचे गुरू कें असति ?" "ना श्रीनगरीं असति :" "तरि आम्हीं एओं" "ना यां :" यावरि आबैसांसि थोर सुख जालें : भट दादोसांसि अनुश्रले : मग अवघींचि साडेगावांसि आलीं : मग दादोस गंगेकडे गेले : आबैसीं भटांतें पुसिलें : "माहात्मे कें गेले ?" भटीं म्हणीतलें : "गंगेसि गेले :" आबैसीं म्हणीतलें : "बोलावीसीचि ना : टीळा गंधाक्षेता कीजतीया : जाए : बोलाउनि घेउनि ए :" भट गेले[१०] : बोलाउनि घेउनि आले : टीळा गंधाक्षेता केलीया : मग अवघीं जेउं बैसलीं : दादोस गोसावीयांचेया दरीसना जात होते : तवं माहादाइसीं आबैसांतें म्हणीतलें : "आबै : म्हणा कां नागदेयातें : हा एइल तरि आम्हांसि गोसावीयांचें दरीसन होइल :" मग आबैसीं भटांतें म्हणीतलें : "नागदेया : दादोस आपुलेया गोसावीयांचेया दरीसनासि जात असति : तरि तुं एसी ? जाओं :" "ना हो कां : तरि आइति करा :" मग तेहीं आइति केली : *आबाइसें : उमाइसें : महदाइसें : भट : येल्हभट ऐसीं*[११] तीएं गोसावीयांचेया दरीसनासि नीगालीं : ।।

---

७ (**मुराहबी.**). ८ **पं.** °स्तीति आनंदु होताति? ९ **मुराह.** °येत असति : तवं भटीं पुसिलें : "तुमचे गोसावी कवणीकडे असति ?" "ना श्रीनगरीं असति :" "तरि तयांचिया दर्शनासि आमतें न्याल ?" "ना नेउनि :" "तुम्हीं कै जाल ?" "ना पर्वालागि जाउनि :" तवं भटीं म्हणीतलें : "आमचेया गावां या : मां तेथौनि जावों :" "हो कां :" "कै याल ?" "ना अमुका दीसीं येउनि :" ऐसा सोध जाला : भटीं म्हणीतलें : "आबाइसांतें घेउनि या हो :" "हो कां :" मग आबाइसें : उमाइसें : महदाइसें : दादोस ऐसी साडेगावासि आलीं : . . . १० **मुराह.** °पुढां बैसले : आणि स्तीति जाली :" एकाचेनि मतें रांवसगावीं जाली तेचि : मग दादोस बीढारा गेले : भटीं हातीं करवती घेतली : घोंगडें घेतलें : उमाइसीं म्हणीतलें : "रूपै : नागदेयासि दादोसापासूनि काही गोमटें जालें :" मग . . . गोसावीयांचेया दर्शना नीगालीं : ११ (**मुराह.**).

ऐसीं अवघीं श्रीनगरासि[१२] आलीं : एकी ठाइं[१३] बीढार केलें : दादोस आणि भट हाटाआंतु गेले : पानें : पोफळें : पुजाद्रव्यें घेतलीं : एतएतां दादोसीं म्हणीतलें : "नागदेया : आम्हीं गोसावीयांचें उचीष्ट[१४] घेउनि : आमचे गुरू म्हणौनि : परि तुआं नेघावें हो : गोसावी काइ म्हणौनि नेणिजे :" ऐसी मार्गीं एतां व्यावृति केली : तवं भटीं म्हणीतलें : "हो कां :" तवं माहादाइसीं[१५] म्हणीतलें : "उमै : दादोसांचे गुरू पैली देउळीं असति : चाल जाओं पाहों :" "चाला पां :" पांचपांच पोफळें घेतलीं : दोघी भीलमठासि आलीया : गोसावीयांसि दूपाहारिचा पुजाअवस्वरू जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : भीतरि आसनीं[१६] उपवीष्ट असति : आलीया : दोन्ही दारसाखा धरूनि भीतरि पाहिलें : *गोसावीयांतें देखिलें : आणि गोसावीयांचीं श्रीमूर्त्ति पाहातेंचि ठेलीं*[१७] : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या :" आलीया : आसनावरि पोफळें ठेविलीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीया : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कवणीकडौनि येतीया असति ?" "जी जी : रांवसगावांकडौनि :" "कवणीकडे जाइजतु असिजे ?" "जी जी : ऐसें त्रीएंबकाकडे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : रावंसगावीं माहादेओ पाठक नावं ब्राह्मणु असे कीं ?" "जी जी : असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नीकेनि असति ?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाल तै ऐसें म्हणावें : हें तुमतें पुसत होतें :" तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बाबा पुसे ऐसा कवणु ब्राह्मणु बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तो एथिचा एजमानु :" "तो कैसा बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें बोणेबाइयां सांगातें आलें : तैइं एथ पाणीभातु : बाबुळसेंगाची आरोगण दीधली :" मग माहादाइसें : उमाइसें दंडवत घालुनि नीगालीया : आबैसांपासि गेलीया : तवं दादोस हाटांआंतुनि आले : ।।

## २३९ देवां : भटां भेटि

मग देव : भट : आबैसें : माहादाइसें : उमाइसें : अवडळभट : एल्हंभट : ऐसीं अवघींचि गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : दादोस गोसावीयांतें जेथौनि देखति तेथौनि दंडवतीं एति : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीं दादोसांसि क्षेमाळींगन दीधलें : तीएं श्रीचरणां लागलीं : श्रीचरणां लागतां सर्वज्ञें माहादाइसांतें हळुचि म्हणीतलें : "त्रींबकबाइया एथचीयाचि मा :" तें गोसावी आणि तीएंचि जाणति : बैसौनि पानें : पोफळें : पुजाद्रव्यें आसनावरि ठेविलीं : मग बाइसीं फोडी केलीया : गोसावीयांसि फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि दीधलीया : सेवटीलीए वीडीए गोसावीं तांबोळ प्रत्येजुं आदरिलें : बाइसीं वाटां तांबोळ धरिलें : मग बाइसीं गोसावीयांचें

---

१२ **भ.** सींहनगरासि. १३ **मुरा.** भीलमठासेजे. **एवा.** भीलमढीए सेजे. १४ **भ.** उसीटें. १५ **मुराह.** उमाइसीं म्हणीतलें : "रूपै—. १६ **मुराह.** आंगणीं वेढे करीत असति : **एवा.** पटिसाळेवरि आसन असे. १७ (**मुराह.**).

तांबोळ अवघेयां भगतिजनां[1] दीधलें : तैसेंचि भटांसि दीधलें : दादोसीं *मागांचि भटांतें वारिलें होतें : "नागदेया : गोसावीं आमचे गुरू : म्हणौनि आम्हीं तांबूळ घेउनि तुवां नेघावें हो*[2] :" भटीं हातीं घेतलें : आणि वीचारिलें[3] : "जरि पुरूख होती तरि आम्हांसि गोमटें होइल : ना तरि आम्हीं केतीयांचीं उसिटीं खादलीं असति :" म्हणौनि घेतलें : आणि भटां स्तीति जाली : *भोगिली : मग केतुलेया एका वेळा भंगली :* मग गोसावीं भटांतें पुसिलें[4] : "माहात्मेयांपासौनि जालें तें तैसेंचि : कीं एथ काहीं सुखवीसेख आगळा असे ?" "जी जी : एथौनि सुखवीसेखू आगळा असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : एथौनि तुम्हां[5] स्तीत्यांतर[6] गा :" ॥

## २४० भटां स्ळेष्माहरणीं परीहासुनी सुककथन

भट गंगेकडे गेले होते : तीकडौनि एत होते : तवं गोसावीं वीहरणासि बीजें केलें : गोसावीं भटांतें पुसिलें : "कें गेले होतेति गा ?" "जी जी : स्ळेष्मा झाडुं गेला होतां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मेयांपासौनि जालें तेणें मुंगी[1] रांड नव्हे : मां तुमचा[2] स्ळेष्मा काइ झडैल[3] ? एतुका येकु गुणु जाला होता : तो एथिचीया स्तीती गेला : आम्हींचि केलें : ऐसेंचि होतें तेंहीं गेलें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां सुखस्तीति कवणापासौनि ?" "जी जी : दादोसांपासौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयांचेन आड गेलेयां तण न मोडे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते तुम्हां एथौनि स्तीति जाली : ते आतां प्रगटली :" ॥

## २४१ दवनीका पर्वी डखलेयां स्तीति

गोसावीयांसि तेथ दवणें पर्व जालें : पर्वाचां दीसीं गोसावीयांचां ठाइं सडेसंमार्जन चौकरंगमाळिका भरिलीया : *आवघां पानें : पोफळें : दवणा आणीला : आवघीं न्हालीं*[1] : गोसावीयांसि मर्दनामादणें जालें : पुजा जालीं : धूपार्ती : मंगळार्ती जाली : देवमुक्षकरूनि अवघीं भगतिजनें गोसावीयांचां ठाइं पर्व करीतें होतीं : डखले चांगदेओभट उगेचि दूख करीत बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "डखलेया : तुम्हीं एथ कां गा पर्व न करा ?" "जी जी : *मातें दवणा*[2] *नाहीं : यें दैवाचीं : यातें करावेया असे*[1] : मातें करावेया काहीं नाहीं

---

**२३९.** १ **मुराह.** °प्रसाद दीधला : २ (**मुराह.**). ३ **अपं.** म्हणीतलें : **गो.** जीवीं म्हणीतलें : ४ **मुराह.** °महात्मेयापासौनि सूखस्थीति आति :" "जी जी : सांपें कणु एक अधिक :" "ते नव्हे : हें स्तीत्यांतर गा :" ५ **अ.** °स्तीति जाली :" **पं.** °स्तीति जाली : ते आतां प्रगटली :" ६ **भगो.** प्रकटलें मां.

**२४०.** १ **एवा.** सीवनी. २ **अपं.** तुमचेनि. ३ यापुढील भाग **मुराह.** प्रतीत नाही. **अपंबीभगो.** प्रतीत आहे.

**२४१.** १ (**मुराह.**). २ **गो.** दवणावीडा.

जी : " गोसावीं[३] बाइसांकरवि दवणा देववीला : वीडा देववीला : मग तेहीं गोसावीयांसि दवणा वाइला : वीडा ओळगविला : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : आणि बैसले :।।

गोसावीं आधीं डखलेयांतें अवळोकिलें : आणि तेयां स्तीति जाली : जेयांतें अवळोकीति तेंयां स्तीति होए : ऐसीया अवघेयां स्तीती जालीया : एल्हंभटां नव्हेचि : तीहीं गोसावीयांतें म्हणीतलें : "जी जी : इतुकेयांआंतु मीचि एकु अवडळु ऐसा दीसतु असें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तरि तुम्हां नावं अवडळभट म्हणा :" आणि तेयां स्तीति जाली : मग अवघे भगतिजन स्तीति भोगुं लागले : तेंयां लावण्यअमृताची धवधणि घेत असति : आनंदें भरीत अन्मीख लोचनीं श्रीमुर्ति अवळोकीति असति :।।

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "डखलेया[४] : ऐसेंचि उगें असिजे ऐसा[५] कवणु धर्मु[६] गा?" तवं तेंहीं म्हणीतलें : "जी जी : उगेयांचि असिजे ऐसा एकु धर्मु असे : आणि काइ[७]?" सर्वज्ञें म्हणीतलें : "द्वीतु कीं अद्वीतु?" गोसावी द्वीत प्रतीष्टीति : ते अद्वीत प्रतीष्टीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "द्वीत तें प्रतक्षाकारें द्वीत असे गा :" आणि स्तीति भंगली : मग गोसावीयांसि सपरिवारीं आरोगण जालीं : गुळुळा जाला : वीडा जाला :।।

## २४२ डखलेयांसीं खेळु

एकु दीं गोसावीं वीहरणासि बीजें केलें : गांवां पश्चीमे पाटु असे : तेथ गोसावीं बीजें केलें : गोसावीं डखलेयांतें म्हणीतलें : "डखलेया : यांतें सीवाल?" गोसावी : एकमेकांतें सीवावें : ऐसा खेळु खेळत होते[१] : गोसावी पाटु उडति : आणि डखलेहीं उडति : गोसावी पाटु उडाले : आणि डखले उडों बैसले[२] : गोसावी डखलेयांतें ऐसें लोटिलें : तवं ते पाणीयांतु पडिले : तें पाणीं उसळलें : तेणें गोसावीयांची[३] श्रीमुर्ति सींतोडली : तवं दादोसीं म्हणीतलें : "डखलेया[४] : जो खेळु खेळत असा तेण्हें तुम्हीं नर्कासि जाल : *गोसावी ईश्वरू : गोसावीयांसि खेळु काइसा[५]?*" तवं डखलां म्हणीतलें : "दादो *: तुम्ही उगे कां नसा ? आम्हीं हांसीं खेळतों*[५] *:* आम्हीं काइसेया नर्का जाउनि?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यांसि कां गा कोपत असा ? हें एथौनिचि यांसि खेळों आवडत असे :" ।।

---

३ **मुराह.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आणा (**एवा.** वोपा) दवणा. **हीराइसें.** °म्हणितलें : "हें देइल : बाइ यांसि दवणा वोपा :" ४ **एवा.** °न बोलिजे ऐसा. ५ **मुराह.** °धर्मु (**एवा.** मोक्षमार्गु) आति?" ६ **हीराइसें.** मार्गु. ७ **मुराह.** °उघाणी प्रवर्त्तली : सर्वज्ञें म्हणीतलें : "तरी तुम्हीं माहात्मे म्हणां :" (**हीराइसें.** ऐसें म्हणां तरि तुम्हीं माहात्मे म्हणा :") आणि स्तीति भंगली :।।

**२४२.** १ **एवा.** °डखले चांगदेवोभट : एल्हंभट ऐसें अवघेचि खेळत होते. २ **अपं.** °ते पाणीयांतु पडिले. **मुराह.** °गोसावीं तेयातें बखलीलें : उडों नेदीतीचि : मागौतें उडों नीगाले : गोसावीं तेयातें परतेंचि लोटिले : ऐसा खेळु प्रवर्त्तला : आवघी श्रीमूर्ति पाणियें सींतोडली : ३ **एवा.** गोसावीयांचा फुटा सींतोडला : ४ **एवा.** "खेइभटो : ओखटें खेळत असां : एणें नर्का जाल :" ५ (**मुराह.**).

## २४३ तथा पादवेथा संबोखू

मागुतें खेळत होतें : तो भो[1] उडतां पाओ अवटळला[2] : तेणें तीडीकि नीगाली : *येतुलेनि खेळु पूरे केला*[3] : गोसावीं तैसेंचि बीढारासि बीजें केलें : नाराएणाचीए देउळी भीलमढांपुढें होती : तेथ डखले होते : तेथौनि कुंथति : परीवंति[4] : रात्रीं च्यान्ही पाहार वीवळत होते : वीळिचांचेया पुजाअवस्वरा नैएतीचि : सवळेचेया पुजाअवस्वरा नैएतीचि[5] : मग गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं बाहीरि बीजें केलें : डखलां गोसावीयांतें देखिलें : दंडवत केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा डखलेया ? रात्रीं तन्हीं एथिचेया पुजाअवस्वरा नैयाचि : आतां तन्हीं आतांचेया पुजा-अवस्वरा नैयाचि :" "जी जी : रात्रीं माझा पाओ दुखतु होता : मज नीद्रा नाहीं : तरि गोसावी मातें पडिताळुं नैएतीचि : ना कोण्हातें पाठवीतीचि ना : तरि मीं गोसावीयांवरि रूसलां असें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं माहात्मे कीं गा : महात्मेनि सकळै[6] भोगें नीमानावें कीं :"।।

## २४४ दाइंबा जवळीक कथन[1]

एकु दीसु दाइंबाएं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : इस्वरीं काइ अदए असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना नसे :" "तरि हें[2] वीस्वरूप भ्रमण तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना तें एथिचीया जवळीकावीण :" तेंहीं म्हणीतलें : "हें काइ जी ? तरि आम्हांसि[3] काइ नव्हे ? आम्हां इस्वरेंसीं जवळीक असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कर्मभूमिचीयां देवतांसि आणि तुम्हांसि केतुली जवळीक ? कर्मभूमिचीयां आणि अष्टदेवयोनीचेयां देवतांसि केतुली जवळीक ? अष्टदेवयोनीसि आणि अंत्राळीचेया गणगंधर्वांसि केतुली जवळीक ? अंत्राळिचेयां गणगंधर्वांसि आणि स्वर्गीचेयां इंद्रचंद्रादीकांसि केतुली जवळीक ?

---

**२४३.** १ **मुराहबी.** पाटु. २ **अ.** लचकला. ३ (**मु.**). ४ **हबी.** चुरवीति. ५ **मुराहबी.** °पस्यात पाहारीं गोसावीं प्रश्रया बीजें करिती : तवं ते पुढां देउळ होते : तेथ होते : गोसावीं (**एवा.** बाइसीं) म्हणीतलें : "डखलेया : सागळ घेया :" डखलां म्हणीतलें : "जी जी : मी गोसावीयांसीं रूसलां असें जी :" "कां गा रूसलेति ?" "जी जी : रात्री माझा पावो." ६ **अ.** आपलें दूख. **पं.** पातलें दूख.

**२४४.** १ लीच. उत्तरार्ध लीळा ४१९ पाहा. तेथेही याच आदीची लीळा आहे. उत्तरार्धाच्या काही पोथ्यांत प्रस्तुत लीळेतील 'कर्मभूमिचेया देवतासि आणि तुम्हांसि केतुली जवळीक'—इत्यादि भाग उत्तरार्धातील उपरोक्त लीळेत आढळतो. अर्थात, त्यांच्या मते ही लीळा उत्तरार्धीची असावी. पूर्वार्ध-संपादनासाठी घेतलेल्या **अगोबीपं** प्रतीत हा भाग येथेच आढळतो म्हणून ही लीळा मी येथे जशीची तशी ठेवलेली आहे. २ **पं.** °विश्व भ्रमणीं कां पडिलें ? **बी.** °विश्व भ्रमणातें कां पावलें ? ३ **पं.** °आम्हांसि काइ ईश्वरेंसीं जवळीक नाहीं ?"

इंद्रचंद्रादीकां आणि कवीळासवैकुंठिचेयां हरिहराब्रह्मादीकां केतुली जवळीक ? हरीहर-ब्रह्मादीकांसि आणि क्षीराबधीचेया सेखसैयासि केतुली जवळीक ? क्षीराबधीचेया सेखसैयासि आणि अष्टभैरवांसि केतुली जवळीक ? अष्टभैरवांसि आणि वीस्वरूपेसि केतुली जवळीक ? वीस्वरूपेसि आणि चैतन्यासि केतुली जवळीक ? मा चैतन्यापरू परमेस्वरू : तेयासी जवळीक होइल तरि होइल : आणि काइ गा भोजेया :" ।।

## २४५ गोंदेस्वरापुढें पदमेस्वरू कथन

एकु दीसीं गोसावीं गोंदेस्वराचेया देउळासि वीहरणासि वीजें केलें : भगतिजनासहीत : तेथ गोसावीयांसि[१] आसन जालें[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणा पां गा : या देउळापुढें देउळ कां ?" भगतिजनीं म्हणीतलें : "जी जी : नेणों : गोसावीं सांघावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा गोंदेस्वरू : हें मागां गोवींद नामें वेव्हारा तेणें केलें : पुढां[३] पदमेस्वरू : तेया नावं पदुमा : म्हांतारी एकीचा पुतु : तो आपुला घरीं न्हातु होता : हाटा जावयाचिया लवडसवडा लवकरि पाणीं सारवीलें : माथां भोगी[४] लावीतु होता : तवं भाउजै[५] : वहीलें पाणीं नाणीचि : तेणें म्हणीतलें : "हां ओ : डोइ खरकीटली[६] : वेगां पाणीं कां नाणीसि ? आवो वहीलें पाणी आणि" : तवं माता म्हणीतलें : "हो रे : लाहो[७] कां करितासि ? काइ गोंदेस्वरापुढें पदूमेस्वरू करिसी[८] ?" आणि तैसीचि तेणें डोइ बांधली[९] : आणि तो तैसाचि नीगाला : तेलंग देसासि गेला : बहुत द्रव्य जोडिलें : घेउनि आला : मग गोंदेस्वरापुढां पदूमेस्वरू केला : देउळ *करवीलें : उद्यापन जालें : मग मायेतें म्हणीतलें : "गोंदेस्वरापुढें पदुमेस्वरू केला : आतां मातें न्हाणीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे आभिमान कार्ये :" ते दोघै भावे मेहुणे :* ।।

---

**२४५.** १ **हबी.** °बाळाणेयावरि. २ **एवा.** °बाइसीं पुसिलें : "या देउळापुढें हें देउळ काइसें ?" ३ **एवा.** पदुमा नावें बटीकु. ४ **एवा.** चोखणी. ५ **एवा.** माता लवकरि पाणी—. ६ **पं.** खरकटैली. **गो.** खरकटली. ७ **एवा.** वेगु. ८ **एवा.** करिसील. ९ **एवा.** तैसीच्चि तेणें डोइ बांधली : वेव्हारेयाचें द्रव्य काढिलें : तागड सरिसें केलें : देसाउरासि गेला : कथिला बैल भरिले : देवता अभीमानु घेतला : तें रूपें जालें : तो गावांसि आला : ग्राहीक बोलावीलें : तवं तें रूपें देखिलें : तैसेंचि मागुते बैल भरिले : वाइले : तो मागुता तेथ गेला : तेयांतें म्हणीतलें : "आपुलें रूपें घेया : माझें कथील देया :" तेहीं म्हणीतलें : "आम्हीं दीधलें तें कथीलचि : हें तुमचेनि दैवें रूपें जालें : आतां आम्हीं घेउनि तरि मागुतें कथीलचि होईल :" ऐसें वीचारूनि : मग तेहीं म्हणीतलें : "तें तुंचि घे :" तो मागुता घेउनि आला : मग तेणें द्रव्यें हें देउळ केलें : मग माएतें (**एवा.** भाउजैते) म्हणीतलें : "गोंदेस्वरापुढें पदूमेस्वरू केला : आतां न्हाणि ओ :" मग तेणें माथा धुतला : तो भाचा : एरू मामा : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अभिमानु होआवा तो ऐसा होआवा :" ।।

## २४६ माहादाइसांतें राहावणें

*मग देवभट मुख्य अवघीचि गावां नीगाली*[१] *:* गोसावीं माहादाइसांतें म्हणीतलें : "बाइ : एथ[२] राहों आवडे : तरि राहा ना कां ?" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी: मज सांघातु नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[३] : वृधाबाइसां आणि तुम्हां सांघातु : एतेया-सरिसें एणें : जातेयासरिसें जाणें :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : जातां सांघातु नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि कोण्ही बोळवीत धाडिजैल :" मग माहादाइसीं म्हणीतलें : "ना जी : मजवीण घरिचें काहींचि चाले ना : घरिचें करण : सवरण मींचि करी : मजवीण घरिचें कवाड कोण्ही उघडी ना : ना जी : मी न व्हाएं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें जें करा तें एथिचें सेवादास्य करा : एथिचें सेवादास्य तुम्हीं असंसितें होतींति :" "ना जी : मज दादोसांवीण राहावे ना : जी जी : मीं न व्हाएं :" ।।

## २४७ नासिकीं अवस्थान : उदास्यस्वीकारें गंगा उतरणें

मग गोसावीं नासिकासि बीजें केलें : पंचवटिये रामनाथीं[१] दीस पांचसहा अवस्थान : पंचायेतनीं उदास्य स्वीकरिलें : गोसावीं भगतिजनातें म्हणीतलें : "तुम्हीं अवघे एथौनि जा गा : हें एकांकी असैल : एथिचीए प्रवृती वीखो हों जाणा ना : तुम्हां एथ असतां अनीष्टचि होत असे :" *भगतिजन उगेचि होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं न वचा तरि हेंचि जाइल*[२] *:"* तैसेंचि सौंदरासि[३] बीजें केलें : सौंदरीं नावेक गोसावीयांसि आसन जालें : मग तेथौनि गोसावीं घाटासि बीजें केलें : घाटीं देउळीएपासि उभे जाले[४] : मग उदकाआंतु बीजें केलें : सवेंचि बाइसें रीगालीं : बाइसीं गोसावीयांचा फूटा धरिला : बाइसांचा पालउ अवघां भगतजनीं धरिला : ऐसें गोसावीं उदकाआंतु बीजें केलें : बाइसांसि गळेया इतुकें पाणी जालें : बाइसें नावेक बुडकळों लागलीं : आणि 'बाबा बाबा :' ऐसें बोबावों लागलीं : गोसावीं मागील वास पाहिली : आणि म्हणीतलें : "यां बाइसां हातीं केंहीं जाओं न ल्हाइजे गा :" मग गोसावी परतले : गंगा उतरौनि चासासि आले : चासापासि नावेक उभे होते : मग कपाळेस्वरासि बीजें केलें : देउळी-एसि ओलीं वस्त्रें फेडिलीं : कोरडीं वस्त्रें वेढिलीं : *अवघीं भक्तजनें उगींचि बैसलीं : गोसावीयांचां ठाइं उदास्य देखीलें : पुढां रीगवे ना*[५] गोसावीं गुंफेसि नावेक पहुडू स्वीकरिला : मग उपहूडू स्वीकरिला : *बाइसीं आरोगणेलागि विनवीलें तवं*[५] सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ प्रतदीनीं करा तैसें कां न करां ?" "हो कां बाबा :" मग

---

**२४६.** १ (**मुरा.**). २ **अभ.** एथौनि. ३ **एवा.** "बाइ : तुम्हीं राहा : जरि तुम्हीं राहाल तरि वृद्धाबाइसें राहावीजति."

**२४७.** १ **एवा.** गुंफे. २ (**मुहबी.**) **भमु.** °मग गोसावीं उदकामध्यें बीजें केलें. ३ **बी.** सुंदरासि. ४ **प्रवा.** °गोसावीं तेथचि उदास्य स्वीकरिलें. ५ (**मुहबी.**).

कपाळेश्वरा आडवांगीं दक्षिणे गुंफा होती : तेथ बाइसीं पुजाअवस्वरू केला : ताका-भाताची आरोगण जाली : मग पंचवटियें गुंफे वस्ति जाली[६] : ।।

## २४८ सौंदर्यानुवादु*

[एकु दीं उदयांचा पूजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं सूंदरासि बीजें केलें : सवें बाइसे : डखले चांगदेवोभट : दाइंबा असति : दायंबायें म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांहूनि कव्हणी बरवें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "त्रेतीं सीता बरवी : द्वापरीं श्रीकृष्णचक्रवर्त्ति बरवे : कळीयुगीं हें बरवें :" मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : त्रेतीं सीता बाबायें वानीली : ते पतिव्रता कीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीसि व्येभिचारू घडला :" मग गोसावीं तीचि गोष्टि सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सकळ देवतांचा पळु पळु बरवेपण[१] काढीलें : मग सीता रचीली : ऐसी ते जनकतनया : तीचेया कानांतु गुढरला हस्ति सामाय : ऐसी ते षोडशवरुषी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्त्रीयांतु सीता बरवी : पुरुषांतु हें बरवें : देवतांतु सूंदरू बरवा :" मग गोसावीं बाइसांपुढें सूंदरू दाखवीला : सोनेयांचें जानीवें : सोनेयांचा कडीदोरा : सोनेयांची उतरी : सोनेयाचा मूगुटू : पाटाउ कास घातली असे : इतुकेनि बाइसें मानवलीं : "बाबा : कोणें भक्तें केली ?" "बाइ : हे सारंग माहालेनि केली :" ।। ]

## २४९ गोवर्धनीं गदाधरीं वस्ति[१] ।।

## २५० त्रीएंबकीं अवस्थान : वीडा वाणें

गोसावीं त्रीएंबकाचेया देउळासि बीजें केलें : मांधाणीं वीडा धूतला[१] : त्रीएंबकासि वीडा वाइला : जगतीआंतु वाव्यकोणा आश्राइत गुंफा : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : दीस पांच : ।।

## २५१ गंगाद्वारीं बडूवासि संबोखू

गोसावीं गंगाद्वारासि बीजें केलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : तवं गंगाद्वारासि डखले गेले : तेहीं धाकुटें कुंड उपसिलें[१] *कोळायेंचीये बोंबीहुनि पाणी नीगे : तेथ डखलां*

---

६ **प्रवा.** गुंफे औदास्य परिहरलें.

**२४८.** *प्रस्तुत लीळा **भह.** प्रतीतच आहे. अन्यत्र नाही. ती येथे सुसंगत असल्यामुळे भ. प्रतीवरून स्वीकारली आहे.

१ ह. तेज.

**२४९.** १ या लीळेनंतर **हबीभगोपं.** प्रतीत "आंजनेरी (बुधाची) वसैए वस्ति" अशी केवळ आदी आहे.

**२५०.** १ **पंगो.** वीसुळीला.

**२५१.** १ **अपंगो.** °देवतेचीए बोंबीवरि बोट ठेविलें : "खालीलीकडे तरि——.

*आंगुळी सूदली*[२] : "खालीलीकडे तरि गावं नेसि : माणुसें नेसि : गोरूवें नेसि : सेळीया नेसि : मेंढीया नेसि : सेतें नेसि : आतां माझें बोट ने पां :" तवं राणा आला : तो बोबाओं लागला : "माझें पाणी टाकिलें[३] :" तवं डखलां म्हणीतलें : "तुझें पाणीं काइसें? तुं गुरउ : तुं गौतमाचा काइ *दाइज*[४]? तुज गौतमु काइ होए : आणि आम्हांसि काइ नव्हे?" राणा तो गोसावीयांपासि आला[५] : गाऱ्हाणें दीधलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि याचें काहीं ए :" "जी जी : कव्हणी दीसीं दामु[६] ए : कव्हणी दीसीं सरू दामु ए :" गोसावीं बाइसांकरवि दामु देववीला : मग गोसावी डखलेयांसि कोपले : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न म्हणिजे[७] कीं गा डखलेया : देवतेसि नीरोधू[८] न कीजे कीं :" ।।

## २५२ ब्रह्मगीरीवरि गौतमाळां उदंबरें आरोगणें

गोसावीं ब्रह्मगीरीवरि बीजें केलें : गौतमाळेयाचीए पुर्वीली पाळीवरि[१] गोसावीयांसि आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एं उदंबरें वेंचा गा :" मग भगतिजनीं उदंबरें वेंचुनि बरवी रासि केली : मग गोसावीं *श्रीकरीं उंबर घेतलें*[२] : *आरोगिलें*[३] : प्रसादू केला : इतुकेनि अवघां भगतिजनीं तृप्तपर्येंत उदंबरें खादलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरे करा गा : पोटें दूखतीं :" मग न खातीचि[४] : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## २५३ गुपीतत्रीएंबका बीजें करणें

आदि त्रीएंबकीं नावेक आसन जालें : चरणक्षाळण जालें : टीळा वीडा जाला : मग[१] गोसावीं बीजें केलें : ।।

---

२ (**मुहबीभ.**). ३ **पं.** सांडिलें. ४ (**बी.**). ५ **हीराईसें.** °गोसावीयांसि नरसींहाचां देउळीं आसन असे. **एवा.** °गोसावी मढाचां द्वारीं वेढे करीत असति. ६ **पं.** पाउण दामु. **मुबी.** दामु एकु : रूके तीन मीळेति. ७ **पं.** कीजे. ८ **सूपा.** °होए :"

**२५२. १ मुराबीभ.** °उदुंबरु पीकला होता : तेथ आसन जालें : उंबरें पडिलीं होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें "कां गा महात्मे हो : पींडप्रदान वर्त्ते ना :" "हो कां जी :" मग भक्तजनीं—. २ **कानडी गोराईसें वासना.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "ब्रह्मगोळकु ऐसा असे :" **हीराइसें :** °सर्वज्ञें म्हणीतलें : "अफोडी उंबर खाइजे तें ऐसें :" म्हणौनि श्रीमुखीं उंबर घातलें : ३ (**मुराबीभ.**). ४ **बी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "यावरि चूळ दोनि दोनि पाणी घेया :" मग गोसावीं—.

**२५३. १ हबी.** °येतयेतां तिये मार्गीं सोंडियेवरि गोसावी उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा पैल देखिला समुद्रू : जळमळित पाणी दीसत असे :" आवघीं भक्तजनें पाहों लागलीं : बाइसीं म्हणीतलें : "हो बाबा : दीसत असे :" **पं.** °तेथौनि बाइसांसि समुदृ दाखवीला :

## २५४ गौतमाची भातौडि दाखवणें

तेथौनि एतएतां गोसावीं गौतमाचीया भातौडीया दाखवीलीया : सर्वज्ञें म्हणीतलें "या देखिलीया गा गौतमाचीया भातौडी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "दीहेंचि[1] साळि पेरी दीहेंचि सांवंगी[2] : मळी : देहेंचि आणी : देहेंचि अठ्यासीसहश्रां रीखेस्वरांसि जेउं सुए उरे भात तें एथ सांडवीति : तीया भातवडीया गा :" ।।

## २५५ तथा सीता देविचें कोथळेमोथळे दाखवणें

तेथौनि गोसावीं बीजें केलें : तवं पुढां सीतेचें कोथळें देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें "हें देखिले गा सीतेचे कोथळेमोथळे[1] :" ।।

## २५६ आंजनेरीं वसैए[1] वस्ति ।।

## २५७ नासिकीं पंचवटिये अवस्थान : दीस पांच : चांगदेओभटां पाठवणी

गोसावीयांसि रामनाथीं आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं अवघे एथौनि ज गा : हें एकांकी असैल : एथौनि म्हणीतलें तें न करा: एथिचीए प्रवृती वीखो होआ ना तरि तुम्हीं एथौनि जा :" परि भगतिजनें न वचति: गोसावीं चांगदेओभटातें म्हणीतलें "बटिका : तुम्हीं तऱ्हीं जा : तुम्हीं तऱ्हीं एथिचीए प्रवृती वीखो होआ : तुम्हीं आगंवलि काढा :" मग चांगदेओभटीं गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग नीगाले *बाइसीं म्हणीतलें : "तें कव्हणी न वचतीचि तरी यातें कां पाठवीजत असिजे बाबा?" गोसा उगेचि : मग ते गेले[2]:* सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ प्रतदीनीं करा : तैसें कां न करा? बाइसें कोमाइलीं ऐसीं बैसलीं होतीं : मग गोसावीयांसि पुजा केली : आरोगण दीधली :

मग एरी दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "*तुम्हीं कव्हणी न वचाचि : तरि चांगोयेंचि काइ केलें*[3] डखलेया : जा गा : तेयांतें बोलाउनि घेउनि या :" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें "हे जाडि घेया : जेथ राहाल तेथ जाडि बांधावी :" तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा तो बटीकु कालि गेला : हा आतां जाइल : मा तेणेंसीं कोणी ठाइं भेटि होइल?" सर्व म्हणीतलें : "बाइ : तरि याची एरझार काइ नीर्फळ जाइल? *बाइ : बापुडीं बटिं डोंगरेडोंगर गीवसीतें[4] असति : येथिचें दर्शन घेयावें : मग गावा जावें : ऐसा परिछेदु के असे*[2] :" इतुकेनि ते चांदौरीसि[5] गेले : अगीनीष्टीकेसि राहिले : आड जाडि बांधली

---

**२५४.** १ **हबी.** दिसेंचि. **गो.** देहेंचि. २ **बीगो.** साविंगी.

**२५५.** १ **पं.** मोदळे.

**२५६.** १ **हबी.** बुधाचीए वसैए.

**२५७.** १ **गो.** आगलि. **मुभ.** आदि होआ. २ (**मुराहबी.**). ३ **भ.** °वारेन पानरटें जा ऐसीं यातें सोधितें यतें असति : इतुकेनि ते—. ४ **एवा.** लंघीतें. ५ **अंपंगो.** चाटौरीसि.

तवं नाथोउपाध्ये बळहेग्रामौनि सीनरासि आले : भीलमढासि आले : तेथ संन्यासि राहिले होते : तेयांतें पुसिलें : "एथ गोसावी होते कीं ?" तेहीं म्हणीतलें : "काइ कराल ? गोसावीयांतें ब्रह्मवीद्या पुसाल तरि आम्हींचि सांघौनि : बापुडीं बटिकुरें कैसीं वेधीं लाविलीं असति :" तवं तेहीं म्हणीतलें : "आम्हीं काइ तुमतें ब्रह्मवीद्या पुसतु असों ? आम्हीं आपुलेयां गोसावीयांतें पुसत असों :" ऐसें तेहीं त्रीसुधीं पुसिलें : आणि संन्यासीं तैसेंचि त्रीसुधी म्हणीतलें : मग तेणें म्हणीतलें : "बापुडीं बटिकुरें कैसीं[६] वेधीं लाविलीं असति ! तरि आम्हांसि दंडवत करा : मग आम्हीं गोसावीयांतें सांघौनि :" *तीहीं म्हणितलें : "आधी सांघा : मग दंडवत करूनि :" "कैसीं गा बटकुरें आग्रहाचीं[७] :"* एतुकेनि तेहीं एकमेकांचेया तोंडाची वास पाहिली : "दंडवतासि जरि गोसावीयांतें सांघती तरि कां करा ना ?" मग तेहीं तेयांसि दंडवत केलें : एतुकेनि तेहीं सांघीतलें : "तुमचे गोसावी सत्रसींगाकडे गेले असति :" मग उपाधीं म्हणीतलें[८] : "चांदौरीं[९] जाओं : तेथ वस्त्रें ठेउं : फाटकीं वस्त्रें नेसों : मग सत्रसींगासि जाओं : मग आपुलेया गोसावीयांतें झाडोझाडीं गीवसुं :" मग चांदौरीसि[९] गेले : वेसीजवळि आले : तवं गोसावीयांची जाडि देखिली : "बांधली जाडि तरि गोसावीयांची : गोसावी काइ एथ आले असति ?" सामोरे आले : तवं डखले हांसतहांसत उठिले : "चाला चाला : मातें गोसावीं तुम्हां साउमेयां[१०] पाठवीलें :" मग उपाधीं पुसिलें : "डखलेया : गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असति ?" "ना हे नव्हे नासिकीं :" याउपरि डखलां म्हणीतलें : "ऐसे गा आमचे गोसावी : आपुलें इस्वरीए असौनि लोपीति : आमतें ऐसें कां न म्हणावें : 'अमुके एताति : तेयां साउमे जा :' ऐसें कां न म्हणावें ?" ।।

## २५८ उपाध्यां : नाथोबां भेटि

मग तैसेचि तीघै नासिकासि गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : डखलां म्हणीतलें : "जी जी : मीं आड जाडि बांधौनि आहे : तवं हे आले :" ऐसी अवघी गोष्टि सांघीतली[१] : मग उपाध्ये सांघों लागले : "जी जी : आम्हीं श्रीनगरासि आलों : भीलमढासि गेलों : तेथ संन्यासी होते : संन्यासीयांतें पुसिलें : 'एथ गोसावी असति कीं ?' तवं तेहीं म्हणीतलें : 'काइ कराल गोसावीयांतें ? ब्रह्मवीद्या तरि आम्हीं सांघौनि : ऐसीं बापुडीं बटिकुरें वेधीं लाविलीं असति :" ऐसें त्रीसुधी आम्हीं पुसिलें : तेही त्रीसुधी ऐसेंचि म्हणति : मग आम्हीं म्हणीतलें : 'आम्हीं काइ तुमतें ब्रह्मवीद्या पुसत असों ? आम्हीं आपुलेयां गोसावीयांतें पुसत असों :' मग तेहीं

---

६ **एवा.** चाळविलीं. ७ (**मुराहबी.**). ८ **मुराहबी.** "डोंगरासि जावों नये. ९ **अपंगो.** चाटौरी. **भ.** चांदवडा. १० **एवा.** बोलाउं.

**२५८.** १ **मुरा.** प्रतीत या पुढील वृत्तांत पुनरुक्त केलेला नाही. यापुढे °सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें बाइ — येथूनचा **भाग** आलेला आहे.

म्हणीतलें : 'तरि आम्हांसि दंडवत करा : मग आम्हीं गोसावीयांतें सांघौनि : ' मग आम्हीं एकमेकांची वास पाहिली : 'दंडवतासाटीं जरि गोसावीयांतें सांघती तरि करा ना कां ?' मग आम्हीं दंडवत केलें : मग तेहीं सांघीतलें : 'तुमचे गोसावी सत्रसींगाकडे गेले असति :' मग आम्हीं म्हणीतलें : 'चांदौरीसि[२] जांओं : वस्त्रें घेउं : फाटकीं वस्त्रें नेसों : मग सत्रसींगासि जाओं : मग आपुलेया गोसावीयांतें झाडोझाडीं गीवसुं :' मग चांदौरीसि आलों : तवं गोसावीयांची जाडि देखिली :" ऐसें उपाधीं अवघें सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें बाइ : बापुडीं बटिकुरें चाळवीलीं आहाति :" गोसावी मागौतें पुसति : " मग बटिका : भगवा काइ म्हणे ?" उपाध्ये मागौतें तैसेंचि गोसावीयापुढां सांघति : ऐसें त्रीसुधी पुसिलें आणि तेहीं त्रीसुधी हेंचि सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देखिलें कीं : बटिक यांतें पुसति : आणि भगवा आपुली ब्रह्मवीद्या नीरोपी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसी गा ब्रह्मवीद्या बापुडी : जे सुपीं सुनि वीकिजे : " ।।

## २५९ नाथोबाकेसदरिसनीं वीस्मो

*चांगदेवोभट भीक्षे गेले होते : तेयातें बाइला देखिलें होतें : मग नाथोबा गाउनि आले : उदयाचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं वीहरणा[१] बीजें केलें[२] :* गोसावीयांसि आंबेया तळि[३] आसन : नाथोबा गोसावीयांजवळि बैसले होते : तवं तेथ बाइला पाणीयासि आलीया होतीया : तेहीं नाथोबातें देखिलें : आणि म्हणीतलें : " हें काइ ओ माए : याची डोइ कालि भादरिली[४] होती : आजि इतुके केस कैंचे ?" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हे दोघै भाउ जावळांचे : सारिखेचि : तो कालि गावांसि गेला : हा आजि आला :" तेव्हळि तेयांचें अन्यथाज्ञान फीटलें : ।।

## २६० मार्गीं चौरंगी वीद्या नीरोपणें

अडगावां जातां मार्गीं पव्हे : तेथ गोसावीयांसि आसन जालें : मग पव्हेपुढां सेत होतें : तेथ गोसावी बीजें करिताति : तवं तेथ[१] बोरिचें[२] खोड पाल्हैलें होतें : तें गोसावीं देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें[३] : " हें देखिलें गा : हा तरि याचा स्वभाओ : ऐसें माणुसाचां ठाइं दीसे तरि

---

२ **अपंगो.** चाटौरीसि. **भ.** चांदवडा.

**२५९.** १ **प्रवा.** परिश्रया बीजें केलें : तेथ गोसावीयांजवळि नाथोबा असति°. २ (**मुराहबी.**). ३ **हबी.** °कपाळेश्वरा दक्षिणे : गुंफेसि पुर्वे : रामनाथा पश्चिमे : तेथ आंबा : तया तळीं--. ४ **भगो.** बोडिकी. **ह.** बोडिली.

**२६०.** १ **मुरा.** °पळसाचा वृक्ष देखिला : एक म्हणति : सालैचा : भवंतेभवंते बरवे कोंभ नीगाले असति. २ **एवा.** पळसाचें. ३ **एवा.** °हें देखिलें गा : चौरंगीची विद्या : याचा तरि स्वतसीद्ध स्वाभावीक गुण : (**अ.** हें सीधसांभवीकाचें ज्ञान : हेंचि पुरुषाचां ठाइं तरि आश्चर्यासि कारण होये :)"

चौरंगिची वीद्या जाली म्हणिजे[४] :" [ बाइसीं पुसिलें : " चौरंगीची वीद्या म्हणिजे काइ बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु राओ सत्रसींगातळिवटि राज्य करी : तेयांसि दोघीं राणीयां : वडिली राणीयेसि पुत्रु होता : तो रूपें स्वरूपू बरवा : तो सेजारीं एकला नीजैला होता : तवं धाकुटी राणी आली : तेयासि विखएवासना झोंबों लागली : तेणें म्हणीतलें : 'ते माए : तैसीचि तुं माए :' ऐसें तेणें नीराकरीलें : तीसि दैन्य जाली : मग तीया आपुलां सर्वांगीं नखें घातलीं : जाउनि सेजारीं नीजैली : तवं रावो पारधीहुनि आला : सेजाराआंतु गेला : तीएतें पुसिलें : 'तुं कां नीजैलीसि ?' तवं ते न बोले : रायें म्हणीतलें : 'सांगसि कां ना ?' 'ना काइ सांघों ? तुमचेनि पुत्रें ऐसेनि ऐसें केलें :' म्हणौनि नखें दाखवीलीं : तैसाचि रावो संभामंडपासि आला : तेयातें बोलाविलें : परिवारू बोलावीला : वीद्वांस बोलावीले : जाणते पुराणीक : ऐसे बोलावीले : तेयांपुढें सांघीतलें : 'तरि ऐसेयासि काइ कीजे ?' 'ना ऐसेयासि चौरंगु कीजे :' मग गावांबाहीरि चौरंगु करवीला : तवं तेया वाटा मछींद्रु[५] आला : तेणें तेयातें पुसिलें : 'पुता : हें ऐसें काइ ?' तेणें अवघें सांघीतलें : मग नेउनि कपाटीं सीळेतळि घातला : तेयातें म्हणीतलें : 'पुता : ए सीळेकडे पाहातुचि अस : आणिकीकडे पाहासी तरि हे सीळा तुजवरि पडैल : मीं ऐसा एतें हों[६] :' म्हणौनि नीगाला : गोपाळांतें म्हणीतलें : 'तुम्हीं मोटा जेवाल तेव्हळि याचीए तोंडीं कुरूंधनें पीळावें हो :' 'ना हो कां : हो :' मग तो नीगौनि गेला : मग बारा वरिखां तेयासि हातपाय नीगाले : मग तोही गेला : *तो चौरंगी सीधु बाइ*[७] :" ।। ]

## २६१ नाथोबा माहात्मेयां वीज्ञान कथन : पद्वे आरोगण

तेथौनि गोसावीं सामोरेयां बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथ आसन घाला :" " बाबा : एथ आसन कीजत असिजे : परि एथ पाणीं नाहीं :" गोसावीं उपाध्यातें म्हणीतलें : " बटिका : जा गा : सागळ भरूनि आणा :" उपाध्ये गेले : तवं पाणीं नाहीं : आले : " जी जी : एउती पाणीं नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : ऐसे ऐसे जा गा : ऐसें हान[१] होइल :" गेले : तवं[२] सरवरू भरला आहे : सागळ भरूनि आणिली : मग म्हणीतलें : " ऐसें गा आमचे गोसावी : आपुलें इस्वरीए[३] लोपीति :" उदक आणिलें : मग गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : गुळुळा जाला : पुजा आरोगण जाली : मग सर्वज्ञें

४ **भ.** °चौरंगी तो जाळांधीचा पुतृ : शक्तिकुमारू :" यावरि गोसावीं चौरंगीची गोष्टि सांघीतली : (या पुढील वृत्तांत **हआगो**,**गो**₃ प्रतीतून घेतला आहे.) ५ **आगो.** गौरक्षु. ६ **आ.** °मग मंत्र उपदेसीला : नीगाला :—. ७ (**आ.**).

**२६१.** १ **अबी.** ज्ञान. **रावा.** इकडे हान नसैल : बटिका पाहा पां : २ **मुरा.** °उदक देखीलें. **एवा.** सरे भरलीया असति. ३ **मुराबी.** ऐश्वर्य.

म्हणीतलें : "बाइ : एकि सीळीकि आणा :" ओली म्हणौनि तोडिमोडि न करिति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भवंती भवाल : परि सीळीका आणालचि कीं :"

*मग तेथौनि अडगावां बीजें केलें : गावासमिप पातले[४] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : तुम्हीं पुढिल गावां जा : तेथ भीक्षा करा : मां हे तुम्हां उदयां दर्शन देइल :" मग ते नीगाले[५] :* ।।

## २६२ अडगावीं लींगाचां देउळीं वस्ति ।।

## २६३ मार्गीं उपासन्यां स्तीति

अडगावींहुनि गोसावी मार्गें बीजें करिताति[१] : तवं पुढां वाटेसि उपासनीयां स्तीति जाली होती : तवं भगतिजनीं देखिलें : "हें काइ? हे तवं रीधपुरासि पाठवीले होते :" तवं ते म्हणति : "मार्गु काइ तुमचा ?" एउनि गोसावीयांपुढें धनुकाकारें उभे राहाति : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हे काइ सांभव ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सांभवीचा रश्मि होए तरि जीउ सकळैं आत्मत्वें नेदखे ? हा अणवीचा एकु रस्मि :" गोसावीं ऐसें भ्रूभंगें केलें : आणि मागुतें चालति : मागुतें एउनि गोसावीयांपुढें एतुकेया एका धनुकाकारें उभे राहाति : मागुतें गोसावी भ्रूभंगें ऐसें करीति : आणि मागुतें चालति : ऐसें वस्त्रें होतीं तो ठाओवऱ्हीं गेले : तेथ वस्त्रें वेढिलीं : आणि स्तीति भंगली : गोसावीयांपासि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा : तुमतें रीधपुरा पाठविलें होतें कीं ?" तेहीं म्हणीतलें : "हें नव्हे आतां जात असें :" ।।

## २६४ धाकुटां सुंकियाणां वस्ति ।।

## २६५ नीफाडे आत्मेयांरामां पयोवर्त देणें

तेथौनि गोसावीं नीफाडेसि बीजें केलें : कोंकणाएसि गोसावीयांसि नावेक आसन जालें : मग तेथौनि डखलेयांतें बीढार पाहों पाठवीलें : ते मढासि[१] गेले : तवं लींगाचीए देउळीए आत्मारामु बैसला होता : डखलेयांतें देखिलें : आणि ते बोबाओं लागले : "ऐसेयां पापीयां चांडाळांचेयां गावांसि गोसावी कें आले ?" *पुसिलें : "तुम्हीं कवण ?" डखलां सांघितलें : "आम्हीं श्रीचांगदेवोराउळा गोसावीयांचे[२] :" "मीं भुका आरोळीया*

---

४ **मुराहबी.** °उपाधीये आणि उपासनीये पुढीला गावा पाठवीले : सर्वज्ञें म्हणीतलें—. ५ (**मुरा.**).

**२६३. १ मुराहबी.** °तवं उपाध्ये उपासनिये साउमे आले : मग मार्गीं भेटि जाली : गोसावीयांतें देखिलें : आणि उपासनीयां स्तीति जाली : वस्त्रें सांडिलीं : मार्गीं पुढां चालतां मागौतें पाहाति : गोसावी श्रीमुगुटें 'चाला' म्हणति : आणि मागौतें गोसावीयांवरि चालौनि येति : आणि गोसावीं श्रीमुगुटें नीराकरीति : श्रीमुगुटें चालवीति : वाटेकडे दाखवीति : आणि पूढारें चालति : मग बाइसीं पुसिलें : "बाबा :—.

**२६५. १ मुराहबी.** नारायेणाचां°. २ (**मुराहबी.**).

देत *असे : मी पयोव्रती आत्मारामु*[३] *:* मज तीनि उपवास पडिले : परि कोण्ही पयोवर्त नेदीति[४] :" मग डखले मागुतें गोसावीयांपासि आले : मग तीहीं गोसावीयांपासि सांघीतलें : "जी जी : आत्मारामु भूका आरोळीया देतु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा डखलेया : आत्मारामु आणि भूका[५] आरोळीया[६] दे : हें अति वीरूध मा :" *मग गोसावीं नारायेणमढा बीजें केलें : मढाचिये पटिसाळे गोसावीयांसि आसन जालें : तवं तें गोसावीयांतें देखौनि अधिकाचि आरोळिया देवों लागले : गोसावीं बाइसातें पुसिलें : "बाइ : हे कवण ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हे वामदेवांचे प्रथम सीष्य आत्माराम*[७]*:"* मग सर्वज्ञें म्हणीतलें[८] : "माहात्मेयां पयोवर्त देया गा :" मग बाइसांतें मागौनि एकु दामु दीधला : तवं डखलां म्हणीतलें : "जी जी : यांसि पयोवर्त काइसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एऱ्हवीं बाइसां नीरोधु कीं गा[९] :" ।।

रामनाथीं आसन : संगमेस्वरीं आसन :।।

## २६६ मार्गी आरोगण

गोसावीं नीफाडेहुनि बीजें केलें : मार्गीं[१] पव्हे होती : तेथ पुजा आरोगण जाली : ।।

## २६७ नांदौरीं जळक्रिडा

गोसावीं नांदौरासि बीजें केलें[१] : *गोसावीयांसि जळक्रीडेची प्रवृत्ति : मध्यमेस्वरा अग्ने चास : तेथ बीजें केलें*[२] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : "या गा : या गा : हें तुम्हांसि सीवैल : तुम्हीं यातें सीवा :" "हो कां जी :" म्हणौनि जळक्रुडेसि पाणीयांतु[३] रीगाले : गोसावी : उपाध्ये : नाथोबा : डखले : *एरांतें डवंचलीति : एरांतें डवंचलीति :* ऐसी जळक्रुडा खेळत होते : *मग पव्हत पव्हत थडियाथडिया बीजें केलें*[२] *:* तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा :

---

३ (**मुरा.**). ४ **हबी.** °तें भुका आरोळीया देत असे :" ५ **भ.** मरे. ६ **मुरा.** आळुकिळु देति—. ७ (**मुराहबी.**). ८ **एवा.** गोसावीं बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : दामु एकु देउनि महात्मेयांसि पयोवर्त देया :" ९ **मुरा.** (**रावा.**) °गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वर जाला : आरोगण जाली : पहुड : उपहुडु होउनि गोसावी परिश्रया बीजें केलें : सरिसे डखले असति : गोसावीं परिश्रयो सारूनि मागौतें कोकणायें बीजें केलें : तेथ आसन जालें : डखले जाडि आणावेया पाठवीले : तिहीं बाइसांतें मागौनि जाडि आणिली : आसन रचिलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : डखलेयातें म्हणीतलें : "डखलेया : महात्मेयांसि पयोव्रत जालें ?" "जी जी : ते बोबातचि असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : बाइसांकरवि दुगाणीचें दुध : दुगाणीचें तुप देववा : एऱ्हवीं बाइसां नीरोधु कीं गा :" (**हीराइसें.** बाइसातें म्हणा : 'एका दामाचें दुध घेया : महात्मेया पयोव्रत देया :') मग डखले गेले : बाइसांपुढां सांघीतलें : मग बाइसीं तया पयोव्रत दीधलें : ।।

**२६६.** १ **मुरा.** °कांटिये तळीं आसन जालें.

**२६७.** १ **अगो.** °जळक्रीडे चासि : २ (**मुरा.**). ३ **मुरा.** गंगेआंतु.

खेळु पुरों देइजो : आरोगणेसि उसीरू जाला[४] :" तवं डखलां म्हणीतलें : " बाइ : गोसावी नैएति : तुम्हीं जा : आम्हीं आणि गोसावी ऐसे पव्हतपव्हत जाउनि : पैली गावीचि भीक्षा करूनि : मग गोसावीयांसि आरोगण देउनि : " तवं बाइसीं म्हणीतलें : "पोरा डखलेया : उगा अससि कीं नससि? बाबा : पुरे कीजो बाबा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां पुरे करा गा डखलेया : बाइसें सीणतें असति :" ।।

## २६८ नाथोबाची ग्रहोनीवृति

गोसावी[१] थडीएसि एउनि उभे राहिले : वस्त्रें वेढीत होते : दोहीं श्रीचरणांवरतें पाणीं होतें : तवं[२] सर्वज्ञें म्हणीतलें : " बोलावा गा मंडळीकातें[३] : मां ते आपुलेया पीतेयाचें एथ स्नान करीतिल : *ते ग्रहो जाले असति : ते एथौनि मुंचवीजत असिजे*[४] : " तवं उपाधीं म्हणीतलें : " पोरा : उठि उठि : तुझा पीता पुरूखोतमु होता : तो ग्रहो जाला असे : तेयातें गोसावी ग्रहत्वापासौनि मुचौं पाहात असति :" मग नाथोबा आले : गोसावीयांचेया श्रीचरणांपासि स्नान केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुमचे पीते ग्रहो जाले असति : ते ग्रहत्वापासौनि मुचवीले हो :" ।।

## २६९ मधिमेस्वरा वीडा वाणें

मधिमेस्वराचां चौकीं आसन जालें[१] : गोसावीं उपाध्यातें म्हणीतलें : " वटिका : मधिमेस्वरा वीडा वा गा : " " जी जी : " मग उपाधीं मध्यमेस्वरासि वीडा वाइला : गोसावीयांसि चौकीं पुजा जाली[२] : ।।

## २७० नांदौरीं आदीतीं वस्ति जाली ।।

## २७१ कांदळदीं[१] एल्हणेस्वरीं वस्ति ।।

## २७२ अग्नीष्टिके वस्ति ।।

---

४ **शोध.** °गोसावीं कौतुकेंचि म्हणीतलें : "बाइ : आतां हें न ये : आतां हें ऐसेंचि जाइल :" तवं तवं बाइसें एरी थडीया एरी थडिया बोबाति : " पुरे कीजो बाबा : " तवं डखलांहीं म्हणीतलें---.

**२६८.** १ **एवा.** °गंगेचां दोहीं फांटेयांचां संगमीं सीळातळावरि आसन जालें. २ **मुरा.** °गोसावीं नाथोबातें म्हणीतलें : " मंडळीका : बळ्हेग्रामीं ग्रहो बहुत : आपुलीया पीतयाचीये वारिचीए एकि बुडी अधिक द्या : (**हीराइसें :** एथ स्नान करा :). ३ **शोधु.** °बोलावीले : आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळिका : एथ एक स्नान करा गा : तुमचे पीते ग्रहो जाले असति : ते एथौनि मुंचवीजत असिजे :" तवं उपाधीं म्हणीतलें°. ४ (**मुरा.**).

**२६९.** १ **एवा.** गोसावीं मध्यमेस्वरा वीडा वाइला. २ **एवा.** °आदीत्यीं वसति जाली.

**२७१.** १ **गो.** कानळदीए.

## २७३ चासुमाणिकेस्वरीं लींगाचां देउळीं वस्ति

चासीं नावेक आसन जालें : माणिकेस्वरीं जगतीमध्यें लींगाचां देउळीं वस्ति जाली : माणिकेस्वरीं चौकीं आसन जालें : ।।

## २७४ सुरेगावीं आदीतीं वस्ति ।।

## २७५ सोनारीए आदीतीं वस्ति ।।

## २७६ सवंछरीं सींगेस्वरीं आसन : आदीतीं वस्ति: दूसरां सींगेस्वरीं आसन ।।

## २७७ कुंकुमठाणीं अग्नीष्टिके वस्ति

दामोदरा[1] बीजें करणें : तथा माड आवळोकणें : गोसावी माड ऐसें श्रीकरीं धरिलें आणि हालवीलें : ।।

## २७८ पुणतांबां[1] पाताळगुंफे वस्ति ।।

## २७९ नाउरीं कंटकेस्वरीं वस्ति

अग्नीष्टिके क्षेउर: गोसावीयांचें क्षेउर जालें होतें : तें अग्नीष्टिकेसि केलें : ।।

## २८० नाएगावीं दाइंबा भेटि

गावां पश्चिमेसि देउळीएसि गोसावीयांसि नावेक आसन जालें : तवं तेथ दाइंबा आले : गोसावीयांसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ।।

## २८१ पुनरपि पुणतांबां पाताळगुंफे अवस्थान

कारट मढासि बीजें केलें :। कामेस्वरा बीजें करणें :। वीस्वेस्वरा बीजें करणें :। जळसेनीं आसन :। साळकातीर्थी आसन* : [गोसावीं साळतीर्थासि बीजें केलें : पुढें खडकावरि आसन जालें : भक्तिजनीं पुसिलें : "जी जी : साळतीर्थ म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ एकु पींपळु होता : तेया पींपळासि साळोंकी गूपली होती : तीएची कोरडि जाली होती : तीचा एकु पावो : एकु पाखु एथ पडिला : तेया पूण्यास्तव तीसि ब्राह्मणाचां ठाइं जन्म जालें : त्यासि जात्यस्मरत्व[1] जालें : 'मीं अमुकी :' ऐसी मागील अवघी वेवस्ता सांघीतली : 'तीये पींपळीं अद्यापि कोरडि असे :' मग अवघा लोकु तेथ पाहावेया आला : तवं ते कोरडि तैसीचि देखिली : मग काढिली : तेथ घातली : मग तीएची एथ स्थापना केली : तें हें साळतीर्थ गा :" *कासेस्वरू : वीस्वेस्वरू : वारानसी : ऐसी लोकीं आक्षा प्रगटली : तें हें साळतीर्थ गा[2] :"* ।। ]

---

**२७७.** १ **रावा.** जलसैना.

**२७८.** १ **एवा.** पुणीवतांबा.

**२८१.** *[ या पुढील वृत्तांत **हबी.** प्रतीतून घेतला आहे. ]

१ **बी.** ज्योतिष स्मरत्व. २ **(ह.)**.

## २८२ ठाकुरउपद्रवीं हींगुणीए प्राएण

एकु दीसीं गोसावीं प्रश्नयासि बीजें केलें : तवं तेथ ठाकुरू मारूनि घातला होता : सर्वज्ञें म्हणीतलें : "हींसा वर्ते तीए स्थानीं माहात्मेयां असौं नैए :" गोसावीं तैसेंचि तेथौनि बाहीरवाहीरें बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा गा मंडळीका : बाइसांतें मात्रा घेउनि बोलावा :" गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## २८३ हींगुणीए वस्ति ।।

## २८४ पुर्णगावीं सोमनाथीं आसन : मढीं वस्ति ।।

## २८५ सांवखेडां सीधनाथीं वस्ति ।।

## २८६ वांजरगावीं मढीं वस्ति ।।

## २८७ जुना नागमठाणीं आदीतीं वस्ति ।।

## २८८ तपोवनीं माणिकेस्वरीं आसन ।। पुजा आरोगण जाली ।।

## २८९ खातिगावीं आदीतीं वस्ति : वामाचा उपहारू स्वीकारू

गोसावीयांसि आदीतीं आसन जालें : तवं[1] वामु आला : तेणें गोसावीयांतें आरोगणे वीनवीलें : "जी जी : माझेया आवारासि बीजें करावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथचि आणा :" मग तीहीं उपाहारू तेथचि आणिला : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि ताट जालें : गोसावीं ताटावरि बीजें केलें : बाइसीं दंडवत केलें : मां वामदेवेंहीं दंडवत केलें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : उरला प्रसादू भगतिजनासि जाला : ।।

## २९० भामाठाणीं अग्नीष्टिके वस्ति ।।

## २९१ रामनाथां मागां आसन : दाएभागवता ज्वरनीवृति : ओटा करवणें*

[एकु दीं मठीं दायंभागवतासि सीतज्वरु आला : तीहीं वीनवीलें : "जी जी : माझा ज्वरु फेडावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधीं एथ वोटा करावा : मग फेडीजैल :" "हो कां जी :" म्हणौनि वोटा केला : ज्वर फीटला[1] : ।।]

---

**२८९.** १ **हबी.** तेथ वामनु नावें ब्राह्मणु आला.

**२९१.** ***अ.** प्रतीत ही लीळा नाही. येथे ती **मुगोह.** प्रतीतून घेतली आहे. °हे लीळा **रामे.** उत्तरार्धीं अवस्थान तै : आणि तैचि दुसरां ज्वरीं चूना पीटवणें.

१ **ह.** (**सोधु.** घोगरगावीं वसति : १ : नेउरगावीं अग्नीष्टीके वसति : २ : त्रीपुरुखीं आसन : ३ : बागडीए वसति : ४ : जांबुगावीं सींगेस्वरीं वसति : ५ : माळापुरीं अग्नीष्टीके वसति : ६ : सुरेगावीं अग्नीष्टीकें वसति : ७ : ब्राह्मणीए वसति : ८ : काउळगावीं काळेस्वरीं वसति : ९ : देउळाणां अंचळेस्वरी वसति : १० : घोटणीं मळेगीरीं वसति : ११ : चापडगावीं वसति : १२ : खरौंडीं सीधनाथीं वसति : १३ : पींपळगावीं लींगाचां देउळीं वसति : १४ :

## २९२ डोंबेग्रामीं अवस्थान : दाइभागवंताकरवी ओटेया चुना पिटवणे

दाइभागवंतीं गोसावीयांतें म्हणीतलें : "जी जी : माझा जरू गेला : परि नीसेख न वचेचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "यां ओटेयासि चुना पीटा : मग जाइल :" "हो कां जी :" मग तेहीं ओटेयासि चुना पीटिला : मग नीसेख जरू गेला ।।

## २९३ दाइंबां डखलेयां पाठवणी ।।

## २९४ बीडीं आटवलीए माहालखूमीए अवस्थान

गोसावीं बीडीं माहालखूमीचेया देउळासि बीजें केलें : चौकीं नावेक[१] अवळोकीत उभे होते : देउळामागें प्रसनाएकाचीया गुंफा होतीया : तेउतें गोसावीं बीजें केलें : *गुंफेचीया दोन्ही दारसका धरूनि भीतारी अवळोकीलें : तवं प्रसनाएक गुंफेआंतु बैंसले असति*[२] : तवं तेहीं पुसिलें : "जी जी : काइ पाहिजत असिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बीढार पाहिजत असिजे :" "जी जी : एथ भीतरि बीढार कीजो जी : मीं एथ बाहीरि असैन :" *मग तीं आपुला परिग्रहो परता ठेवुनि गोसावीयांसि वोटा संपादिला*[३] *:* ते पटिसाळेवरि राहिले : गोसावीयांसि गुंफे मास च्यारि अवस्थान जालें :।।

## २९५ प्रसनाएकां भेटी : स्तीति

प्रसनाएक[१] पुढां बैसले होते : तेयांसि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : स्तीति भोगुं सरली : *मग परसनायक म्हणति : "गोसावीयांपासौनि आम्हां ब्रम्हवीत्पति जाली*[२] *:"* मग तेहीं गोसावीयांसि ओटेयावरि आसन रचीलें : चरणक्षाळण केलें : चरणोदक घेतलें : टीळागंधाक्षेता केलीया : रेमनाएकें[३] अपरपक्षीं वरवी दुटी वाइली होती : ते धूनि ठेविली होती : ते गोसावीयांसि ओळगविली : ।।

## २९६ पदूमनाभी भेटि : स्तीति

मग रेमनाएका : जोगनाएका : पदूमनाभी : सारस्वतिभटांपुढें : प्रसनाएकें सांघीतलें : जें गोसावी आले असति म्हणौनि : एतुकेनि ते अवघे गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसी भेटि जाली : नावेक बैसले होते : मग गोसावीं

---

**२९४.** १ **एवा.** °आसन जालें. २ (**मुराबी**|**ह.**). **मुराबीह.** °तीहीं म्हणीतलें : "एइजो जी :" म्हणौनि भीतरि बोलाविलें :—.

**२९५.** १ **अगो.** प्रसनाएका भेटतक्षेणीं गोसावीयांपासौनि—. २ (**मुराबी.**). ३ **मुरा.** °चातुर्मासीसि पासवडी आली होती : ते धौ लाउनि (**रा.** धुउ घालुनि) ठेविली होती.

तेयांसि पाठवणी दीधली[१] : *सारस्वतभटां भोगनारायेणाचां देउळीं दरीसन जालें होतें : म्हणौनि ते गोसावियांचेया दरीसनां येती : तेयासवें पदुमनाभीदेव येती : ते नावेक चळवळे : बाइसां कांही म्हणीयें करूं लागती : बाइसें म्हणति : " बटिका : येइजो हो : बाबा नीके :" मग एकलेयां एवों लागले[२] :* मग पदुमनाभीदेवासि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : मग पदुमनाभीदेव गोसावीयांचि पासी राहिले : गोसावीयांचें सेवादास्य करूं लागले : *मग सारस्वतभट दीहां येका आड येती : मग ते दीसा आठा येती : मग म्हणति : " मीं अमुकेया तमुकेयाचेया ठाया गेलां होतां : तो आरायेंचि ना[२] :"* गोसावीं वीहरणासि बीजें केलें : बनीं आसन जालें : पासीं पदुमनाभिदेव बैसले असति : तवं सारस्वतिभट गंगेकडौनि गावांकडे एताति : गोसावीयांतें देखिलें : आणि आडपालउ ओडउनि गोसावीयांवरौनि कानवडे गावांकडे नीगाले : तवं वाइसीं म्हणीतलें : *" बाबा : पैल सारस्वतभट नव्हति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " होति बाइ :" बाइसीं म्हणीतलें[२] :* "बाबा हा ब्राह्मणु आधीं बाबापासि ए : उठी बैसे : दंडवत करी : आतां आडपालउ ओडउनि कां जातु असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा बटीकु एथ राहिला म्हणौनि :" *तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : हा येथ असे : तरि यासी आडवे जावेया कारण काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें[२] :* "बाइ : हा याचा सीक्षू : यांसि सीक्षाचा अभीमानु वर्तत असे : तेयाचा तुम्हीं अतिसो न करावा हो : सीक्षाचा अभिमानु म्हेळीएचेयापस्य अधीकु :" याउपरि गोसावी पंचकौळ आचार्याची गोष्टि सांघीतली[३] : मग बाइसीं म्हणीतलें : "वटिका : तरि तुं एथें नै ये :" ।।

## २९७ पदूमनाभीचा उपाहारू : वस्त्रपुजा

मग पदूमनाभीं मोटका गोसावीयांचिपुरता उपाहारू नीफजविला : गोसावीयांसि वस्त्रपुजा केली : ।।

## २९८ रेमनाएकां अवसरूअनअवसरू कथन

*एक वेळ पद्मनाभिदेवी रेमनाएकापुढें गोसावीयांची प्रसंसा केली[१]* : रेमनाएकु गोसावीयांचेया दरीसनासि आले : तवं गोसावीयांसि भीतरि[२] मर्दना होति असे : भीतरि रेमनाएक आले : आणि पटिसाळेवरि उभे ठेले : कव्हणा एकातें पुसिलें : "गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे ?" तेहीं म्हणीतलें : "गोसावीयांसि मर्दना होत असे :" *" तरि गोसावीयांपुढां जाणावा कां : जें रेमनाएक आले असति :" तेहीं जाणवीले[३] :*

---

**२९६.** १ **अ.** °मग रेमनाएकु : जोगनाएकु : सारस्वतिभट नीगाले : पदुमनाभिदेव राहीले : तेयासि गोसावीयापासौनि स्तीति जाली. २ (**मुराहबी.**). ३ (मागे पूर्वार्ध लीळा ३५ पाहा).

**२९८.** १ (**मुराहबी.**). २ **एवा.** °पद्मनाभिदेव मर्दना देति असति. ३ (**हबी.**).

गोसावीयांसि जीए जाडीवरि मर्दना होत होती[४] तीएचि जाडीचें गोसावीं कोंगतें घेतलें : आणि वाहीरि बीजें केलें : *रेमनाएकें पुसीलें : "श्रीचांगदेवोराउळा गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे[१]?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ ऐसा अवस्वरू असे :" गोसावीं जाडी फेडौनि अवघी श्रीमुर्ति उघडौनि दाखवीली आणि मग रेमनाएकें म्हणीतलें : "जी जी : मीं अनअवस्वरीं आलां जी : मीयां गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे म्हणौनि सोधावें : मग मीयां यावें किं : तें नेणेंचि जी : आतां मर्दना हों दीजो : मीं मागौता एइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि[५] अवस्वरूअनअवस्वरू नाहीं हो :" ॥

*यावरि गोसावीं पद्मनाभीतें म्हणीतलें[६] : "कव्हणी एकु रावो[७] असे : तो ब्राह्मणासि वीतीपात दे : तयाचा दारवठा ब्राह्मण राखत असति : तो सारी खेळत असे : कां नीजैला असे : एकधा एकु उभगला म्हणे : 'फळें मोडैल : कां चेइल :' ऐसें म्हणौनि उभगला जाए : तवं फळें मोडे : कां चेए : तो आंघोळि स्नान देपूजा करी : ब्राह्मणासि वीतीपात दे : तो तेया लाभा चुके[८] :"* ॥

## २९९ कोले घाएखंडि दाखवणें

गोसावी वीहरणासि बीजें करीत होते : तवं राजगुरू[१] ऐसा गरूडीकडौनि सीक्षांसीं एतु होता : तवं गोसावीं ऐसा सराउवांचा अनुकारू केला : आणि तेणें जाणीतलें : आपुला कोलु गोसावीयांचां श्रीकरीं ओळगविला : आणि तेणें आपुलेया सीक्षाचा कोलु घेतला : गोसावीं[२] ऐसें कोलें करौनि परिजीलें : आणि तेणेंहीं परिजीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हाणा हाणा : नाएका :" ऐसें म्हणौनि गोसावीं तेयांसि[३] चौरंगीं घाओ केला : आणि गोसावीं कोलु ठेविला : आणि नीगाले : तेणें म्हणीतलें : "जी जी : एकु वेळु घाएखंडि दाखवीजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां न दाखविजे :" ऐसें तेणें त्रीसुधी म्हणीतलें : गोसावीं त्रीसुधी नीराकारिलें : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बापुडा वीनवीत असे : तरि कां दाखवीजे ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू प्राज्ञु असे : एकु वेळु दाखवीजैल आणि एइल[४] : आणि घायाघाया प्राणीयांतें ठेवील :" ॥

---

४ **पंभगो.** °तीएचि जाडी गोसावी परावर्ण केली : आणि. ५ **एवा.** अनवसरीं अवसरू हो :" ६ **(सं.)**. ७ **एवा.** वेव्हारा. ८ (**दृपा.** ५७ 'व्यतीपाताचा दृष्टांत' 'गोसावीं पद्मनाभीप्रति बीडीं निरूपिला :'–**दृस्थ.**)

**२९९.** १ **मुरा.** राजगुरू एकु आपुलीया सीष्यां सराउ देवों गेला होता : तो यत होता. २ **गोभ.** कोलु फडकरौनि प्रजीलें : ३ **मुरा.** °बदकरूनि. ४ **हीराइसें :** °कळौनि घेता : प्राणियांतें घतता.

## ३०० सुकीयां जोगनाएकां दूखा उपनीति

एकु दीसु गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : गोसावीयांसि चरणक्षाळण होत होतें : तवं सुकीया जोगनाएकु[1] आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : चरणउदक घेतलें : आणि माथा सींपिला : भीतरि घेतलें : "जी जी : नीवालां जी : जळत[2] होतां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : जळा[3] कां ?" "जी जी : *मी मीरजेकडील उभये मार्गीचा सुंकी*[4] : मीं तेलंग देसासि गेलां होतां : अवघीए मार्गीचें मज सुंक होतें : द्रव्य वहुत जोडिलें होतें जी : आतां देसासि जाउनि सोइरेयांधाइरेयांआंतु वेचुं : वेओवऱ्हाडें करूं : ऐसें म्हणौनि बैलु भरूनि घेऊनि एत होतां : मीं मागां राहिलां : जनु[5] होता तो बैलु घेउनि पळाला : तें द्रव्य गेलें : मग गावांसि आलां : गांठी[6] मुदी वीकुनि वडीलु पुत्रु पसारां[7] बैसवीला : तो सरला : मग तेंचि भांडवल धाकुटेयाचां हातीं देउनि पसारां बैसवीला : तवं तोही सरला : मग ब्राह्मणि सरली : तें दूख पडिलें : तेणें दूखें मीं जळतूचि असें : मग मीं देउळासि जाएं : देउळीं सुख नाहीं : पुराणासि जाएं : तवं तेथ सुख नाहीं : संतांमहंतांसंन्यास्यापासि[8] बैसें : तेथहीं सुख नाहीं : ऐसा जळतुचि असें जी : गोसावीयांपासि आलां तेव्हळीचि नीवालां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "द्रव्यसोखू : पुत्रसोखू : घरभंगु : एं तीन्हीं पुरूखासि असाहीएं कीं नाएका :" नावेक होता : मग गोसावीं पाठवणी दीधली : नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "नायको : एथ एओं आवडैल तरि एइजे हो :" तवं तेहीं म्हणीतलें : "तरि काइ जी : आतां मीं एथचि एइन :" मग नीगाले : ।।

## ३०१ बाइसीं माहात्मेयांची वाट पाहाणें

एकु दीसु बाइसीं गोसावीयांतें म्हणीतलें : "बाबा : सांपें कोण्हीं माहात्मे[1] नैएतीचि कीं : खंति[2] लागति असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैसेंचि एथ होत असे : हें एथ असे ऐसें कोण्ही जाणे ना : आजि पाहे एती बाइ : पाणीभातु सांचुनि ठेवा : " ।।

## ३०२ देवां : भटां भेटि

एकु दीसु देव आणि भट कांबखेडेयासि आले होते : तेथ भटीं पर्वाकारणें दोनि वस्त्रें वीणवीलीं : दामीं दों आगळें तें दादोसाकारणें वीणवीलें : दामीं दों उणें तें

---

**३००.** १ **ह.** °माहालक्षुमीचेया दरसना आले : गोसावीयांतें देखीलें : आणि सूख जालें. २ **मुराहबी.** माझे ताप गेले जी. ३ **मुराहबी.** ताप काइसे ? **शोध.** ऐसे काइसेन श्रमलेति नायको ? ४ (**मुराबी.**). ५ **एवा.** पाइकु. **मुराहबी.** तवं बडवेनि बैलु फांकिला. ६ **मुराहबी.** घरिचा वेलु (**मु.** वेस) वाकु वीकुनि. ७ **मुराहबी.** सोवनि हाटीं. ८ **पं.** संतामहंतांचेया दरीसनासि जाए.

**३०१.** १ **एवा.** बाबाचीं भक्तजनें. २ **एवा.** आळसु.

आपणेयांसि वीणवीलें : मग ते कांबखेडांहुनि बीडासि आले : वीळिचां हाटवटीएसि आले : तवं वीळिचांची गोदरी भरली देखिली : *दोहीं सुरकोनीं दिवे लागले असति*[१] : बरवीं पानें : पोफळें : केळें : नारीएळें : बरवीं फळें ऐसीं देखिलीं : तवं भटीं म्हणीतलें : "दादो : कैसीं बरवीं पानें : पोफळें : फूलें गोसावीयांजोगीं :" देवीं म्हणीतलें : "हो नागदेया : गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असती ऐसें जाणिजति ना : एऱ्हवीं घेतों :" मग ते येकी ठाइं वसिनले : उदीयांचि घाटासि[२] आले : भट धोत्रें धूत असति : देव उजाइ करीत असति : गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयांअनंतरें गोसावी आसनीं उपविष्ट असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : माहात्मेयांचेया ऐसी उजाइ कवण करीत असे ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : माहात्मा एथ काइ असैल ? बाबा : माहात्मा एथ नेणों केती असती :" गोसावीं प्रसनाएकाची दूटी प्रावर्ण केली असे : उपान्हौ[३] श्रीचरणीं घातलीया[४] : सामोरें खीडकीएपासि बीजें केलें : दोन्ही दारसका धरूनि उभे असति : गोसावीं *अवळोकिलें : तवं देवांभटांतें देखिलें : खांकिरिलें आणि*[१] इखीत हांस्य केलें : गोसावीयांचीए श्रीमुर्तिचेनि : आणि दूटीएचेनि : आणि सुर्याचेनि तेजें : ऐसा प्रकासु उदकाआंतु पडिला : आणि भटीं मागील वास पाहिली : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि म्हणीतलें : "दादो दादो : गोसावी गोसावी :" "*ना कें असति ?*" "*ना हे नव्हति*[१] :" तैसेचि देव धावीनले : गोसावीं पाइरीया दोनि उतरौनि सामोरेयां बीजें केलें : दादोसां क्षेमाळींगन[५] दीधलें : मागिलांकडौनि भटींहीं[६] क्षेमाळींगन दीधलें : गोसावीं[७] एकु श्रीकरू काढुनि भटांचीए पाठीवरि घातला : ऐसें दोघांइं क्षेमाळींगन दीधलें : मग गोसावीं बीढारासि बीजें केलें : देव म्हणों लागले : "नागदेया : कालि तुं म्हणत होतासि तें करि : जाए :" भटोबास पुजाद्रव्यें घेओं गेले : पानें : पोफळें : फूलें : केळें : पुजाद्रव्यें घेऊनि आले : चंदनाचीया गोळीया प्रतिलीया : मग गोसावीयांसि आडा रेखिला : पुजा केली : मग देवीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असति : ऐसें तीएं कोण्हीं अवघीं जाणति नां : तरि पर्वाकारणें तीएं एथचि बोलाउं ? मग एथचि गोसावीयांचां ठाइं पर्व करिती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा :" मग भटोबास पाठवीलें : *भट साडेगावा गेले : आबैसें : उमैसे : भट : ऐसीं बळ्हेग्रामा आले : तेथ उपाध्ये : चांगदेवोभट : गोंदो : सोभागें : दाइंबा : ऐसीं बीडासि पर्वाकारणें*

---

**३०२.** १ (**मुराहबी.**). २ **मुराहब्बी.** आटवलीये. ३ **भगो.** उपाहानौ. ४ **एवां.** °गोसावी खाली उतरले : आणि दादोसावरि साइली पडिली : मागुतें पाहीलें तवं गोसावी : "नागदेया : नागदेया : गोसावी :" ५ **भ.** खेंव. ६ **अ.** भटांही. ७ **मुरा.** °मागां ऐसा श्रीकर करूनि भटांतें पुढां आणिलें आणि खेंव दीधलें :

*आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : मग दादोसां भेटलीं : दादोसाचां बीढारीं राहिलीं*[८] : ।।

## ३०३ पर्वी पुजा

पर्वाचां दीसीं गोसावीयांचां ठाइं सडेसमार्जनें चौकरंगमाळिका : गोसावीयांसि मर्दनामादणें जालें : देवाचां बीढारीं उपाधीं सीदौरी ठेविली होती : ते आणावेया गेले : सीदौरी घेउनि आले : बाइसीं पुसिलें : "जानो : माहात्मेयांचेया बीढारा गेला होतासि ?" उपाधीं म्हणीतलें : "हो बाइ : गेलां होतां : माहात्मेयांचां ठाइं पर्व होत असे हो बाइ :" *तवं बाइसीं म्हणीतलें : "देखीलें कीं बाबा : या रामासि काइ जालें : एथींचां एथ बाबा असति : आणि आधीं आपुलां ठाइं पर्व केलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दोनिच्यारि भातवेळिती जालीं तरि पोरा जीवाचे माथेया डोळे जातां वेळुचि न लगे*[१] *:"* मग बाइसीं उपाधीतें पुसीलें : "माहात्मेयाचां ठाइं पर्व होत असे तरि तुं आलासि हें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : चांगो[२] आणि हे एथिचेचि कीं : हे तेथ कां जाती ?" मग बाइसीं : उपाधीं : चांगदेओभटीं : प्रसनाएकीं : पद्मनाभीं गोसावीयांचां ठाइं पर्व केलें : ।।

## ३०४ देवक्षाळीत वस्त्रस्वीकारू

देवीं आपणेयांसि पुजा करवीली : गळां मुठि एकि पवितेयां : सर्वांगीं चंदनाची भोरि : टीळा गंधाक्षेता : भटीं आपणेयांसि वस्त्र वीणवीलें होतें तें दादोसांसि वाइलें : देवांकारणें वीणवीलें होतें तें गोसावीयांकारणें ठेविलें : देवीं आपणेयांसि पवितें वाववीलें : मग दादोस सीष्यांसहीत नीगाले : गोसावीयांसि पवितें वावेया : वाटेसि म्हणीतलें : "नागदेया : तुझीए काखेसि काइ ?" "दादो : हें वस्त्र :" "वस्त्र काइसें ?" "ना तुम्हांकारणें वीणवीलें होतें तें गोसावीयांकारणें ठेविलें : आपणेयांकारणें जें वीणवीलें तें तुम्हांसि वाइलें :" दादोसीं म्हणीतलें : "मा तुज गोसावी काइ होति ? तुआं अवघें तें आम्हांसीचि करावें : आम्हीं गोसावीयांसि करावें कीं :" वाटेसीचि बैसले : आपणेयांसीचि वस्त्र वाववीलें : मग तेंचि वस्त्र गोसावीयांसि वावेया घेउनि गेले : गोसावीयांचेया ठायासि गेले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : पवितें वाइलें : तेंचि वस्त्र ओळगउं गेले : तवं गोसावीं डावेनि श्रीकरें नीराकारिलें : मग श्रीचरणांपासि घडी ठेविली : गोसावीं डावेन श्रीचरणीचेनि आंगुठेनि घडी ऐसी परती केली : देवीं

---

८ (मुराहबी.).

**३०३.** १ (**प्रव. आ.** १८०). २ **भगो.** चांगो हान हा हान हे येथिचे कीं.

ऐसें आडवेंतीडवें पाहिलें : आणि बाइसांसि पवितें वाइलें : दंडवत करूनि नीगाले : बीढारा गेले : ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरु इतुलेंही नेणे कोण कोणां वडील : जाणा पां गा : एणें आधीं बाइसांसि पवितें कां वाइलें ?" "ना[1] नेणोंचि जी : गोसावीं सांघावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं[2] अवघे यांसि वाल म्हणौनि :"

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : हें वस्त्र ओहळौनि[3] आणा गा : " तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : नवें वस्त्र ओहळवीलेयां वीसाइल ऐसें होइल : *काइसेया धुववावें बाबा : एकदोनि दीस तऱ्हीं नवें वस्त्र पांगुरिजो कां[4] :* " तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू आपुलें[5] उवेळें[6] एथ वाओं आला : एथ वाओं ए कीं नैए : ऐसें प्राणीयांसि वीधीअवीधीचें[7] " ज्ञान नाही : *काइ कारितां काइ होइल ऐसेंहीं नेणे[8] :* " मग तें वस्त्र ओहळुनि आले : मग गोसावीं प्रावर्ण केलें : ।।

## ३०५ एकादसीसि सोभागाकरवि केळें खाववणें

एकु दीसु *गोसावीयांसि दुपाहाराचा[1] पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : पहुडु : उपहुडु जालेयानंतरें गोसावी आसनीं उपविष्ट असति : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : केळें बहुतें सांचलीं असति : नासतीं : वेंचिजतु कां : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आणा आरौतीं : " आणीलीं : मग वांटे केले[2] :* गोसावीं सोभागांतें म्हणीतलें : "बाइ : केळें खाल ?" तवं सोभागीं म्हणीतलें : "जी जी : मज एकादसि : मीं न खाएं : " गोसावीं वृधाबाइसांतें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं केळें खाल ?" "जी जी : मज एकादसि : *आम्हां बारमासिया एकादसि[3] :* मीं न खाएं : " सर्वज्ञें म्हणीतलें : "मासउपवासिनीसि तरी काहीं म्हणोंचि नैए :" ऐसें अवघांचि नीराकरिलें[4] : नावेक जवं जालें तवं सोभागांसि भूक लागली : तीएं बाइसांपासि आलीं : तीएं म्हणों लागलीं : "बाइ : मातें गोसावीं म्हणीतलें होतें : 'केळें खाल ?' तवं मीयां म्हणीतलें : 'मज एकादसि :' आतां मज भूक थोर लागली असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एं काइ म्हणतें असति ?" तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हें ऐसें म्हणते : 'मघां मज गोसावी केळें देत होते : तेह्वळि मीं नेघेंचि : आतां मज भूक थोरि लागली असे :' ऐसें म्हणति असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या :" सोभागें आलीं :

---

**३०४.** १ **हीराइसें.** "ना जी : बाइसें वडीलें म्हणौनि : आणि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें नव्हे कीं गा : एणें बाइसाचां ठाइं वावें : मग तुम्हीं अवघा याचां ठाइं वावें : पोरु कवणु वडील ऐसेंहीं नेणे : " २ **अ.** तुम्हां अवघेयांसि वडील म्हणौनि : ३ **मुरा.** धुउनि. ४ (**मु.**). ५ **रावा.** आपुलीं आंगसीकें एथ वाओं आला :° ६ **पं.** वोवीळें. **एवा.** ओवीळें : ७ **रावा.** इष्टाअनिष्टाचे. ८ [**मु.** (**हीराइसें**)].

**३०५.** १ **ह.** उदेयाचा. २ (**मुराहबी.**). ३ (**मुरा.**). ४ **मुरा.** °मग सोभागातें म्हणीतलें :

गोसावीयांपासि बैसलीं : गोसावीं बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : केळें आणा : मग एथ सोलसोलुं देया :" गोसावीं आपुलीए मांडीएवरि तेयांचा माथा ठेविला : ऐसीं नीजैलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आ करा :" तेहीं आ केला[५] : गोसावीं ऐसें केळें दाखवीलें : आणि आपुलीए श्रीमुखीं सुदलें : मागौतें सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आ करा :" मग तेंही आ केला : *गोसावी म्हणति : "बाइ : केळें देया : " बाइसीं गोसावीयांचां श्रीकरीं केळें सोलुनि दीधलें : बाइसीं वाटां साकार घातलीं : तीए साकरेसीं केळें ऐसें घोळिलें*[५] : गोसावीं ऐसें केळें दाखवीलें : आणि आपुलां श्रीमुखीं सुदलें : आणि तेहीं मांडीएवरौनि माथा काढिला : "नां गे आइ : केळें आपण आरोगण करीत असिजे : आणि मातें आपण चाळवीत असिजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां न चळवीजे : आतां चाळवीजे : तरि माल्हुबाइची आण :" मग गोसावीं तेयांकरवि तृप्तपर्यंत केळें खाववीलीं : ।।

## ३०६ आबाइसां आप्तधर्मू नीरोपण

आबाइसें : उमाइसें : एका[१] ब्राह्मणाचेया घरासि नीद्रास्थानासि गेलीया : ते घरिचीं अवघींचि[२] जागरणासि गेलीं होतीं : मध्याने एकी रात्री भरली : आणि आबाइसांसि भूक लागली : तवं आबाइसें उठीलीं : *"उमै उमै : उठि :" उमैसें उठिलीं : मग म्हणीतलें : "उमै*[३] *:* इतुकीं मीयां एकवतें केलीं : एकादसी केलीया : परि ऐसी भूक कहीं लागली नाहीं :" मुठिभरि[४] भातु : दोनि चुळ आसानिचा कांजी घेतला : कुसकरूनि घांस दोनि घेतले : आणि पाठि घातली : *तवं क्षेणा एका उमाइसें उठिलीं : आणि म्हणीतलें : "आबै आबै : उठी :" उठिलीं : उमाइसीं म्हणीतलें : " इतुकीं एकवतें नखते मासोपवास केले : परि ऐसी भूक कहीं लागली नाहीं : " तेव्हळि मुठिभरि भातु : दोनि चुळ कांजी : पाणी घेतलें : मग पाठि घातली : तेयाहीं नीज आली*[३] *:* सवळेसीचि दोघी उठिलीया : गोसावीयांचेया दरीसनासि आलीया : तवं गोसावीयांसि गुळुळा होत होता : सर्वज्ञें म्हणीतलें : "पारणाइती बाइया आलीया मा :" "जी जी :" दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीया : तेव्हळि रात्रीची गोष्टि अवघी गोसावीयापुढें सांघीतली : "जी जी : अपुसीं आम्हीं तेयांचें घेतलें : तरि आम्हांसि काइ दोखु जाला?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैसां अवस्वरीं तेतुकें घेतां तेयां तेतुका दोखु नाहीं : प्राणापदीं पीडा समे इतुकें घेइजे :"।।

---

"सोभागे हो : या : हें तुम्हां केळें देइल :" तीयें आलीं : पासि बैसलीं–. ५ **मुराबी.** °गोसावी केळें सोलीति : वाटां साकर असे तेथ घांसु मीरवीति : तयांचेया तोंडाकडे दाखवीति : आणि श्रीमुखीं घालीति :

**३०६.** १ **एवा.** म्हांतारीए एकीचिया घरासि. २ **एवा.** म्हातारी. ३ (**भगोहबी.**). ४ **भ** मुठौडीभरि.

## ३०७ उमाइसां नीरे नीरोपण

उमाइसें ऐसीं खडकलीएकडे[1] अवकासा गेलीं होतीं : तवं[2] अमेध्यामध्यें कीवीं चुळुंबुळु करीत होते : ते उमाइसीं देखिले : मग म्हणताति : "ऐ रे : गोसावी नर्क नीरे नीरोपीति तैसे आणि काइ :" आलीं : मग बाइसांपुढां सांघों लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मासोपवासीएं काइ सांघतें असति ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हे ऐसी बाहीरि गेली होती :" ऐसी अवघी गोष्टि गोसावीयांपुढें सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जाणतेयासि एथचि नर्क :" ॥

## ३०८ आबैसां अनंतु नीरोपण

अनंतव्रताचां दीसीं[1] आबैसीं पाटसुताचा अनंतु केला : हवीक्षाअनाचा उपाहारू[2] निफजविला : बरवीं पुजाद्रव्यें आणिलीं : गोसावीयांसी बरवी साष्टांगीं पुजा केली : गोसावीयांचां श्रीचरणांवरि अनंतु ठेविला : गोसावीं श्रीकरीं घेतला आणि पुसिलें : "बाइ : हें काइ ?" आबैसीं *अवलोकिला : दोहीं श्रीकरीं दोन्हीं सेवट धरिले*[3] : आणि म्हणीतलें : "जी जी : हा अनंतु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अनंतु काइ सुताचा : सोळा तांथूंचा : चौदा गांठींचा ? यांसि एकु सेवटु इउती : एकु सेवटु इउती : बाइ : अनंतु काइ ऐसा ? अंतु नाहीं तो अनंतु : अनंतु तो अनंतु कीं[4] :" ॥

## ३०९ प्रसनाएका चांदोवा ब्रह्मकथन

एकु दीसु गोसावीं माहालखूमीचेया देउळीं बीजें केलें : सरिसें बाइसें : भट : प्रसनाएक मुख्यकरुनि भक्तजन असति : गोसावी चौकीं उभे ठेले : भीतरि अवळोकिलें : तवं तेथ चांदोवा बांधला होता[1] : तो देखिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रसेया[2] : यें तुमचीं ब्रह्में : गा :" "जी जी :" म्हणौनि उगेचि राहीले : बाइसीं पुसिलें : "तें कैसें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु क्षुधार्थी[3] देउळासि ये : तवं चांदोवां आंबेयासारिखे आंबे देखे : केळांसारिखीं केळें देखे : नार्येळासारिखीं नार्येळें देखे : जांबुळासारिखीं जांबुळें

---

**३०७.** १ **भगो.** खडका°. २ **मुराहबी.** तवं माणुस अवकासा बैसले होते : तयासि कीवीं पडिले असति : वरि पाउस पडिला : तेणें कश्मळ वाहोनि गेले : कींवियांचा पुंजा उरला : तेयातें मुंगीया तोडतोंडुं नेति होतिया : तें उमाइसीं देखिलें : आणि कांटाळैली : "नरक नरक ऐसें म्हणति ते एथचि मा".

**३०८.** १ **मुराहबी.** अनंताचां चतुर्दसीं आबैसीं भटाकरवि पाटसुताचा अनंतु करवीला. २ **मुराहबी.** गोसावीयांलागि उपाहारू नीफजवीला : आपणयालागि हविशान्न केलें : ३ **(हीराइसें.)**. ४ **मुराहबी.** °मग गोसावीयांसि ताट जालें : आरोगण करीतां आबाइसाचें हविक्षान पुसिलें : "बाइ : हें काइ ?" "जी जी : हें हविक्षान :" "आणा आरुतें :" आणिलें : प्रसादु केला : मग आरोगण जाली : गुळुळा : वीडा जाला : ॥

**३०९.** १ **हबी.** °गोसावीं वरौती वास पाहीली : तवं सेण : माती : लादी : हरियाळ : आणिकही : वर्त : ऐसीयाचीं फळें केलीं होतीं : २ **अभगो.** "देखिलीं गा प्रसेयाची **ब्रह्में :**" ३ **अभगो.** °पैलाकडौनि-

देखे[४] : तीयें तोडौनि खाओं बैसे तवं सेणमातीया तोंड भरे : ऐसीं गा प्रसेयाचीं ब्रह्में : मुर्ते आणि चुतिमंतें : " ।।

## ३१० रूम्हणेयाचा दृष्टांत कथन*

[यावरि गोसावीं भटांप्रति रूम्हणेयाचा दृष्टांत निरूपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एक दुधाचे गुणविसेख अन्मोदीत होते : तेथ जात्यंधु बैसला[१] होता : तेणें पुसिलें : 'हां गा : दूध तें कैसे ?' 'दूध तें पांढरें :' 'पांढरें तें कैसें ?' 'पांढरें तें बळ्हेसारीखें :' 'बळ्हे ते कैसी ?' 'बळ्हे ते रूम्हणेयासारीखी :' 'रूम्हणें तें कैसें ?' 'रूम्हणें तें ऐसें :' म्हणौनि हातु वांकुडा करूनि दाखविलें : एकु दीसीं तेणें रूम्हणें कोठां[२] देखिलें : हातु वांकुडा करूनि पाहीलें : 'दूध तें हें :' म्हणौनि पेवों लागला : हीरडीया फुटति : रगत नीगे : 'आरे : हें काइ करितासि ?' 'नां दूध पीतायें :' 'आरे : सांडि सांडि : हें रूम्हणें :' हीरडीया फुटति : रगत नीगे : परि न संडी : 'ना माझेनि बापें सांघितलें :' दुख होए परि न संडी : तैसें कव्हणी एक परमेश्वराचे गुणविसेख अन्मोदीत होते : तेथ कठीया बैसला होता : तेणें पुसिलें : 'हां गा : परमेश्वरू तो कैसा?' 'ना जैसा कैलासवैकुंठीचा ब्रह्मावीष्णुमहादेवो :' 'ब्रह्मा तो कैसा?' 'जैसा अयोध्येचा रामु :' 'रामु तो कैसा ?' मग द्वीभुज चतुर्भुज म्हणौनि प्रतिमा दाखवी : मग तो तेथ राहे : झाडी : सडासमार्जन करी : पालापाणी घाली : तेणें अधिका नरकचि होति : " ।।]

---

४ **अहबी.** °जो जेयाचा वर्त्तु तो तैसाचि सारिला असे : भीतरि सेणमाती : परि वानवतीचेनि ठकारें सजीवता आणिली असे : ते सारिखे देखौनि क्षुधार्थी खावों बैसे : तव°.

**३१०.** *(**दृपा.** ४१ रूंभणेयाचा दृष्टांत. हा दृष्टांत स्वामींनी कोणाला, कोठे व कोणत्या प्रसंगी निरूपिला याविषयी फार मतभेद आहेत. **दृष्टांतस्थळ**कर्त्याच्या मते तो 'आबाइसाप्रति त्रीकाळज्ञान निरूपितां' सांगितला. दुसऱ्या एका दृष्टांतटीकाकाराच्या मते तो 'लखुबाइसाप्रति प्रतिष्टानीं त्रीकाळ-ज्ञान निरूपितां' सांगितलेला आहे. 'विचारस्थळा'तील ९ व्या वचनावरील 'पक्षा'त 'रूंभणेयाचा लखुदेवोबा : द्विभुजा चतुर्भुजा' असा एक पक्ष आहे. त्यावरून हा दृष्टांत स्वामींनी 'लखुदेवोबा'ला निरूपिला, असे पक्षकाराचे मत दिसते. 'लीळाचरित्रा'त आबाइसा, लखुबाइसा व लखुदेवोबा यांच्या कोणत्याच प्रकरणात या दृष्टांताच्या आशयाची पार्श्वभूमी नाही. महंत श्री मुरलीधरशास्त्री आराध्य यांच्याजवळील 'दृष्टांतपाठा'च्या पोथीत, या दृष्टांताच्या शेवटी, हा दृष्टांत 'बीडीं प्रसनाएकावरि भटाप्रति माहालक्ष्मीएसि' निरूपिल्याचा निर्देश आहे. बीड येथील माहालक्ष्मीच्या देवळातील प्रसनाएकासंबंधीची लीळा लक्षात घेता, त्याच प्रसंगी हा दृष्टांत स्वामींनी निरूपिला असला पाहिजे, हे त्याच्या आशयावरून स्पष्ट दिसते. म्हणून, या दृष्टांताची स्वतंत्र लीळा करून मी तो येथे घातला आहे. 'विचारस्थळा'तील उपरोक्त पक्ष 'रूंभणेयाचा लखुदेवोबा : द्विभुजा चतुर्भुजा' यातील 'द्विभुजा चतुर्भुजा' या शब्दांवरून या दृष्टांतावरील दार्ष्टांतिक स्वामींचेच असावे हेही स्पष्ट होते. (कारण, दार्ष्टांतिकात हे शब्द आलेले आहेत.) म्हणून तेही अंतर्भूत केले आहे. १ **एवा.** आला. २ **एवा.** आंगणीं.

## ३११ चांगदेओभटां धोत्रा ज्ञानस्वरूप कथन

एकु दीसु चांगदेओभट गोसावीयांचीं धोत्रें धों गेले होते : गोसावीयांचीं धोत्रें धूतलीं : घडीया घातलीया : *तवं चाटे धोत्रे धुं आले : तींहीं म्हणीतलें : "आरे : यांसि चांगदेवोराउळांची आण घाला : आणि हे आमुचीं धोत्रें धुती :"* एतुलेनि[१] एक चाटा आला : तेणें म्हणीतलें : "भटो : माझें धोत्र धूवावें : धूआ नां तरि श्रीचांगदेओराउळा गोसावीयांची आण :" धूतलें : तवं दूसरा आला : तेणेंहीं तेंचि म्हणीतलें : ऐसीं आवघां चाटां आण घालुनि धोत्रें धूववीलीं : तवं दोनि पाहार जाले : भागले : भूकैले : मग गोसावीयांपासि आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : उसीरू कां लाविला ?" मग तीहीं अवघी गोष्टि गोसावीयांपुढें सांघीतलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा[१] : तुम्हां धोत्रें धूआवेया काइ काज ? तुम्हीं[२] एथ यावें कीं :" *"जी जी : आण घालिती :" सर्वज्ञें म्हणीतलें*[१] *:* "एथिचीए आणे हेंचि समर्थ कीं[३] :" ॥

## ३१२ आपदेओभटां नींबु माधुरीए करणें

*एकु दी गोसावी तीये पटिसाळेवारी बीजें केलें : सरिसे आपदेवोभटमुख्य भक्तजनें अवघींचि असति : पौळीसि नींबु होता : अर्ध बाहीरि : अर्ध आंतु*[१]*:* गुंफेवरि नींबाचीया डाहाळीया ऐसीया आलीया होतीया[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणा पां गा : हा नींबु कडु कीं गोडू ?" "ना जी कडू :" गोसावीं ऐसा दृष्टी अवळोकिला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां जाणा पां गा ?" तेहीं चाखिला : तवं गोडू जाला : "जी जी : हा गोडू असे मा :" अवघेयाचि भगतिजनीं ओरपओरपों खादलीया[३] : ॥

## ३१३ वीद्यावंता भेटि

*एकु दीं गोसावीयांसि उदयाचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावी आसनीं उपविष्ट असति : तवं*[१] वीद्यावंत एकु ब्राम्हणाचा वेषु धरूनि आले : *आंगी लेइले होतें : गोसावीयांसि दर्शन*

---

**३११.** १ (**मुराहबी.**). २ **हीराइसें.** °तुम्हीं तेयातें एथ घेउनि यावें कीं :" ३ **मुरा.** °यावरि गोसावीं श्रीउद्धवदेवां आज्ञाभंगाची गोष्टि सांघीतली. (तथापि, **मु.** प्रतीतीलच श्रीकृष्णचरित्रात 'उद्धवदेवा आज्ञाभंग भावो कथन' या लीळेच्या शेवटी 'ही लीळा गपणति मठीं लाडु पोतेयाचां प्रसंगीं सांघीतली' असे नमूद केले आहे. यथार्थतेने तेथेच ती शोभते. म्हणून येथे समाविष्ट केली नाही.

**३१२.** १ (**मुराहबी.**). २ **मुराहबी.** °गोसावीं नींबाचें पान तोडिलें : आपदेवोभटांसि दीधलें : "घेया गा भागेया :" तीहीं तें चाखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "भागेया : कैसें असे ?" "जी जी कडु असे :" अवळोकौनि दुसरें दीधलें : तीहीं तें चाखिलें : मागौतें सर्वज्ञें म्हणीतलें : "भागेया : कैसें असे गा ?" "जी जी : हें गोड असे :" इतुलेनि गोसावीं अवळोकुनि खांदीचि गोड केली. ३ **अपंभगोह** °या आंतु गोसावीं ऐसें सांघीतलें : 'आपुलीया वासना खाल तरि कडू : आमचीया वासना खाल तरि आवघेंचि गोड'.

**३१३.** १ (**मुराहबी.**).

*जालें*[१] *: तेयांसि गोसावीं मानु केला : गोसावी उभे ठाकले : अर्धासनीं बैसवीलें : बाइसांकरवि पाये धुववीले : गंधाक्षत करवीलें : भातुकें वाटां घातलें : तीहीं खादलें : गुळुळा केला : तांबुळ दीधलें : मग ते नीगाले : गोसावी उभयां ठाकौनि अनुकरण केलें*[१] *:* बाइसीं पुसिलें : "बाबा : ऐसा यांसि मानु केला : तरि हा कवणु ?" सर्वज्ञें ह्णीतलें : "बाइ : हे द्वारावतीकारां श्रीचांगदेओराउळा गोसावीयांचे अनुग्रहीत :" "बाबा : एक *एळापुरा आले : एक एथ आले*[१]: हे ऐसे केती एक असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे ऐसे बावन असति : एथौनि बावन पुरूखां वीद्यादान :" ।।

## ३१४ देवांप्रति गीरीकपाटें प्रसंसा

*पर्व जालें : बाइसें वाढावाढी करीतें असति :* पुजा जालेयाअनंतरें[१] रात्रीं गोसावीयांसि पटिसाळेवरि[२] आसन असे : *चांदणें पडिलें असे*[३] *:* तवं दादोस आले : श्रीचरणावरि पांच पोफळें ठेवीलीं : दंडवतें घालुं लागले : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मेयांसि काइ गा उदीयां ग्रामांतर[४] ?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "घाटावरि कीं गंगातीउरासि ?" "जी जी : गंगातीउरासि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां गंगातीउरचि होए : एं नवीं नवीं अग्रारें[५] : श्रधाधान[६] लोक : *ताटीं ठाणवैया*[७] *:* सरवळेयानाखलेयांचीया खीरी : वरि पंचधार साकर : वरि तुपाभरूनि वाटी : पाटपीढीं बैसावेया : सातपांच भातु वेळितीं: ऐसें तुम्हां गंगातीउरचि होए : घाटु तो कोणासि ? जे अदृष्टार्थीए तेयांसि कीं गा : बरवीं गीरीकपाटें : गव्हरें[८] : नीर्झरेंउदकें : बरवे वृक्षांचे मांदाडे : बरवीया मंजीष्टा साया : वरि संचरते चंद्ररस्मि: ऐसीं सुखें तीएं कवणासि ? जेयांचां हृदइं परमेस्वरू : तेयांसीचि कीं गा : तुम्हांसि गंगातीउरचि होए :" ।।

## ३१५ आबैसीं दीठि उतरणें

*माहालक्ष्मीयेसी पर्वणी एकि आली : तो लोकु अपारू देवतादरीसना आला : तेवीचि गोसावीयांची प्रसीधी आइकिली होती : ते गोसावीयांचें दरीसन सकळ लोकासी जालें : गोसावीं दीठिची प्रवृति स्वीकरीली*[१] *:* आबैसीं बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : गोसावीयांसि दीठि लागली असे : नेत्र आलोहीत जाले : श्रीमुख कोमाइलें :" सर्वज्ञें म्हणीतलें[२] : *"बाइ : वृधाबाइसें काइ म्हणत असति ?" "बाबा : ऐसें म्हणतें असति : बाबासि दृष्टि लागली : नेत्र आलोहीत जाले : श्रीमुख कोमाइलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हो*

---

**३१४.** १ (रा.). २ **एवा.** नोंबातळि. ३ (मुरा.). ४ **अगोह.** ग्रामव्र. **मुराभ.** गंतुकाम. ५ **गो.** अग्राहारें. मुह. अग्रारें. ६ अपंक्त. श्रधापर. **ह.** स्रधीसनी. ७ (पं.). ८ **अहमु.** गहीवरें. **रा.** गह्वरें.

**३१५.** १ (मुराहबी.). २ अ. °बाइ : ऐसें ना : बहुतें माणुसें आलीं होतीं. **प्रवा.** °बाइ : सांपें माणुसांची मांदी बहुत की :" **रावा.**° "बाइ : जनपद बहुत कीं :"

*बाइ : ऐसीं नाना वासनांचीं नव्हतीं माणुसें आलीं होतीं*[3] *:*" बाइसीं म्हणीतलें : "आबै : तुं दीठ उतरूं जाणसि ?" "हो बाइ : जाणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ए पुत्राची माता : एं दीठि उतरूं जाणति :" मग आबैसीं[4] साता घरिंची कुहीटि आणिली : मग गोसावीयांची दीठी उतरिली : मग गोसावीयांचें श्रीमुख जैसें होतें तैसेंचि जालें : ।।

## ३१६ सोभागें नाम करणें

*सोभागबाइसा नावें म्हांइबाइसें*[1] *: गोसावी आसनावरि बैसले असति : पुढां तीयें बैसलीं असति : परभत फाळ एसणें दांत : गोसावीयांची श्रीमूर्ति अवलोकितें असति*[2] *:* गोसावीं म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं आपुलेया वरैतासि पढीया ?" तेहीं म्हणीतलें : "तरि काइ जी : थोरि पढीए : आपण तेल जेवीति : मीं जेवीं तवं मज तुप घालीति : आपण ताक जेवीति : मज दही दूध वाढीति : आमतें एकि गाए होती : ते गाडुगाभरि दुधा दे : तें मीं जेउं बैसें : आणि मज वाढुं एति : 'पुरें पुरें म्हणें :' आणि आवघा गाडुगा रीचवीति :" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि तुम्हीं सोभागाचा गाडुगा म्हणा :" ऐसें गोसावीं प्रसादाचें नावं ठेविलें : *मग तैलागौनि तेयांतें 'सोभागें' एणें नावें बोलावीति*[3] *:* ।।

## ३१७ दाइंबा सोभागांतें हांसणें

दायांबा सोभागांतें हांसति : "ऐसें या : माझेया सोभागा : माझेया सोभूलेया : ऐसें या[1] माझेया सोगौरा : ऐसें या माझेया सोभागचेया गाडुगेया :" सोभागीं म्हणीतलें : "जी जी : या दायादादोतें वारिजो जी : हा मज हांसतु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सोभागें हो : काइ म्हणतु असे ?" "जी जी : ऐसें म्हणतु असे :" *म्हणौनि मागील सांघीतलें :* सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : उगे असा गा[2] :" "जी[3] जी : मज उगें नसवे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नसवे तरि एथौनि जा :" "जी जी : ऐसें वरि होववैल : *परि ना हांसणें अशक्य :*" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : म्हांतारी मरैल : तरि तुम्हीं काइ कराल ?" "जी जी : गोसावी काइ करिती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बापाभाउवां : माएबहीणी जें वौजे तें करीन :" "जी जी : पुत्रासि वौजे तें मीं करीन : *सोभाग मरैल तरी मीं सोभागाचें आंगुठे बांधैन : कीडडी करीन : खांदीं रींगैन : घडा फोडीन : सोभागाचा संस्कारू करीन*[4] *:* जी जी : तरि आतांचि करूं ?" गोसावीं इखीत हांस्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरू म्हांतारीएसि आतांचि मारूं पाहातु असे :"।।

---

३ (पं.). ४ **मुरा.** °हळदीची दीठि उतरली.

**३१६.** १ **अ.** आबाइसें. **एवा.** माइबाइसें. २ (**मुराहबी.**). ३ (**गो.**).

**३१७.** १ **पं.** ऐया. २ **मुरा.** °सोभागातें हांसा ना : ३ **रा.** "ना जी : हें आम्हां सक्ष (**मु.** शक्य) नव्हे. ४ (**मुरा.**).

## ३१८ भोजेया सरावीं चुकि

एकु दीसु गोसावीं वीहरणासि बीजें केलें : गरूडापासि आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : तुम्ही सराउं देओं जाणा गा ?" " तरि काइ जी : हें *काइ जाणावें असे ? काइ ब्रम्हवीद्या*[१] *?* मी सराउं देओं जाणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि एथ करूनि दाखवा पां :" " जी जी :" मग दाइंबाएं *सराडेयाचा कोलु केला*[२] : वस्त्रें ठेविलीं : गोसावीयांसि दंडवत करूनि : मग वळण घेउनि : परवडी दोनिच्यारि एकी दाखवीलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : " होए : परि एक चुकलेति गा :" " तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें " वेताळु[३] नमस्करूं चुकलेति :" दाइंबाएं म्हणीतलें : " जी जी : आम्ही वेताळु काइसेया नमस्करूनि ? आम्हीं आपुलेयां गोसावीयांतें नमस्करूनि :" मग तेहीं गोसावीयांसि दंडवत केलें : गोसावीं इक्षीत हांस्य केलें[४] : ।।

## ३१९ गोंदो माळ देणें

गोंदो ते बळ्हेग्रामिचे : पर्वाकारणें गोसावीयांचेया दरीसनासि आले होते : ते *अखंड म्हणति : "गोसावी आपुलीये गळांची माळ मज देतु कां :" ऐसा मनोरथ करीति : गोसावीयांसि उदेयाचा पुजाअवस्वर जालेयानंतरें आंगणीं आसन जालें : गोंदो आले : दंडवतें घातलीं श्रीचरणां लागले : मग*[१] ते गावांसि नीगाले : नीगतां गोसावीं तयांसि श्रीकंठिची माळ दीधली : श्रीमुखिचें तांबोळ दीधलें : मग नीगाले : *मग ते अवघेयां माळ दाखवीति : "मज गोसावीं माळ दीधली*[१] *:"* ।।

## ३२० तथा वखरीं चुकि

*एकु दीं उदयाचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं वीहरणा बनाकडे*[१] *गरूडाउत्तरे बीजें केलें : तवं कुणबी आउत वाहात असे*[२] : गोसावीं दायांबातें म्हणीतलें : " भोजेया : तुम्हीं वखरू वाहों जाणा गा ?" "तरि काइ जी : हें आम्हींचि जाणों जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि एथ दाखवा पां :" सराडेयाचा वखरू केला : दोरियांचे नाडे केले : आउत बरवें वाहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : " आउत बरवें वाहिलें गा : परि एक चुकलेति :" " तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वोसान[३] फेडूं चुकलेति[४] :"।।

## ३२१ पालीमैराळदेवीं वस्ति ।।

---

**३१८.** १ (**मुराबी.**). २ (**मुराहबी.**). ३ **मुराबी.** गरुडा नमस्कारू. **हीराइसें.** वेताळापुढें कोल ठेउनि वेताळासि नमस्कारू करूं वीसरलेति : ४ **रावा.** °हे लीळा बीडीं : **प्रवा** : अज्ञात स्थान.

**३१९.** १ (**मुराहबी.**).

**३२०.** १ **हबी.** °गावा दक्षिणे नैरुत्य कोनीं सेत : तेथ—. २ (**मुरा.**). ३ **अ.** उसान. **भ.** कूसाण. ४ **मुराहबी.** वीसरलेति.

## ३२२ पव्हे आसन : प्रातपुजा : आरोगण ।।

## ३२३ नींबां लींगाचां देउळीं वस्ति ।।

## ३२४ पाटवधां केदारीं गुंफे अवस्थान

मग गोसावीं पाटवधेयासि बीजें केलें : केदाराचेया देउळापुर्वे गुंफा : तेथ गोसावीयांसि मासु दीस[1] अवस्थान जालें : ।।

## ३२५ राहीया भेटि

गोसावीयांसि दोपाहारांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावी पटिसाळेवरि : सपुजीत आसनीं उपवीष्ट असति : गोसावीं कोरें वस्त्र पारावरण केलें असे : राहीयासि[1] केदारा देवाची भक्ति : तो देवतेसि आला होता : देवतेसि पुजा केली : मग प्रदक्षिणा करूं लागला : तवं गोसावीयांतें देखिलें : श्रीमुर्तीवरौनि फूटा खालुता ऐसा पडिला होता : राहीएं देखिलें : आणि गोसावीं मागुती श्रीमुर्ति पांगुरवीली[2] : राहीएं म्हणीतलें : "घालि गा देवा आंग उघडें : हों देइजो डोळेयां पारणें[3] :" *गोसावीं नावेक आंग उघडें घातलें : पुडुती वीनवीलें : "घालि गा देवा आंग उघडें : हो देइ डोळेयां पारणें :" नावेक आंग उघडें घातलें : पुडती वीनवीलें : "घालि गा देवा आंग उघडे : हों देइ डोळां पारणें :" मग आवघें आंग उघडें घातलें[4] :* मग साउमा आला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : जवळि बैसला : मग म्हणीतलें : "जी जी : गोसावी राओ होती कां देओ होती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें राओ नव्हे : ना देओ नव्हे : हे भीक्षु माहात्मे :" "ना गोसावीयांचें आंग सराउवांचें जी : मर्दनेचें आंग जी : मीयां माहात्मे बहुत देखिले : वामदेव : गुणाकारदेव : देवर्तदेव[5] : देखिले : तेयांचीं पाणीभाताचीं अंगें : भेंडीं जी : गोसावीयांचें आंग सराउवांचें जी : गोसावीयांतें कोण्हीं असैल जी ?" *"यातें कोण्ही नसे :"* *"ऐसें काइ होइल जी ?"* गोसावी उगेचि होते : "जी जी : मीयां वामदेव : गुणाकारदेव देखिले : मातें गोतमारी[6] नावं जाळें[7] होतें : तेहीं माझीए कानीं खडा लाविला : 'दुखवलासि कीं ?' 'ना : हो :' 'तैसीं तीएं दूखवताति :' म्हणौनि तें तेहीं मजकरवि सांडविलें[8] :" ।।

---

**३२४.** १ **एवा.** दीस वीस. **मुरा.** ऐसें पाखाआरुतें—.

**३२५.** १ **मुरा.** राहीनायकासि. २ **मु.** आछादिली. ३ **एवा. धणि. अपं.** °ऐसें तेणें तीनि वेळां म्हणीतलें : (**भ.** गोसावीं तीनि वेळां आंग उघडें टाकिलें :). ४ (**मुरागो.**). ५ **ह.** हयगर्वदेव. ६ **पंगो.** गोतमारें. ७ **भगोपं.** जाळ. **बी.** जालें : ८ **मुराबी.** °सगडीआंतु घालुनि जाळवीलें.

## ३२६ भटां : माहादाइसां भेटि

मग बीडींहूनि पर्व करूनि भट पाडळीएसि गेले : मग पर्वाचा सोहोळा माहादाइसांपुढां सांघीतला : तवं *तेणें तयांसि अपरीतोखू थोरू वाटला*[1] *:* तीएं दूख करूं लागलीं : भारीवसु घेओं लागलीं : तवं भटीं म्हणीतलें : " तरि चाला जाओं : मीं एइन[2] : " मग दोघे नीगालीं : तीएं बीडासि आलीं : तेथ गोसावीयांतें सोधिलें : तवं तेथ ऐसें आइकिलें : जे गोसावी पाटवधां राज्य करिताति : तैसींचि भटोबास : माहादाइसें : पाटवधेयासि आलीं : तवं गोसावियांसि तैसेंचि सपुजीत आसन असे : राहीया पुढां बैसला असे : माहादाइसें आलीं : तीएं गोसावीयांसि खेवं देउनि दूख करूं लागलीं : तवं राहीएं म्हणीतलें : " हा होएं कीं मीं राहीया : मीं जाणें कीं : " म्हणौनि बाहे आफळिली : "गोसावीयांची लेंकि होती : कां बहीणि होती : " *मग पुसिलें : " हां जी : यें गोसावीयांसि काइ होति ? "* सर्वज्ञें म्हणीतलें[3]: "यांतें कोण्ही नाहीं : एं काहीं नव्हति : " " हें काइ जी : तरि एं रडताति कैसीं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथिचीए सवेतव : सातपांच दी तुम्ही एथ याल : आणि तुम्हांहीं ऐसेंचि होइल : आणि तुम्हींहीं रडों[4] लागाल : " ।।

## ३२७ राहीयाकरवि दूध आणवणें

*नावां एकां माहादाइसीं म्हणीतलें : "राहिनायको : एका दामाचें आम्हांलागौनि व्याळींये दुध आणावें*[1] *: "* माहादाइसें राहीयाचां हातीं एका दामाचें कवडे देत होतीं : ते नेघति : " दूध आमचें : एर तुमचें : " तवं माहादाइसीं म्हणीतलें : " ऐसें ना : मा : मीं मीश्रीत क्रीया न करीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें कां गा करिता ? आतांचें तवं एं म्हणतें आहाति तें कां न करा ? मां तुमचें काइ केंहीं गेलें ? " " हो कां जी : " मग तेयांचेया कवडेयांचें दूध आणिलें : आपुलें तें वेगळें आणीलें : मग राहीएं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : मातें साकरी नावें म्हैसि असे : तीचा तांबीयाभरि दुधा मीं प्रतिदीनीं गोसावीयांलागि व्याळीकारणें आणीन : " गोसावीं मानीलें : मग राहीया पाठवणी जाली : रात्रीं *माहादाइसीं उपाहारू नीफजविला : मग गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वर जाला : व्याळी जाली : भटां माहादाइसां पांती जेवणें जालीं : मग गोसावीयांसि पहुडु जाला : भट माहादाइसें केदाराचां देउळीं नीजैलीं*[1] *:* ।।

---

**३२६.** १ (**मुरा.**). २ **पंहबी.** नेइन. ३ **हीराइसें.** ° "तुम्हीं काइ होआ ? " "हां जी : जैसे आम्हीं तैसीं ये ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसींचि : " ४ **एवा.** भेंकों.

**३२७.** १ (**मुराहबी.**).

## ३२८ माहादाइसांचीए पाठीवरि श्रीचरणु ठेवणें

माहादाइसें केदाराचां देउळीं नीजैलीं होतीं : पालथीं : आधिलां दीसीं बीडूनि[१] आउठ गावें आलीं होतीं : तीएं भागलीं : गोसावीं प्रश्नयासि बीजें केलें होतें : प्रश्नयो सारूनि उदका वीनीयोगु केला : मग गोसावीं तेथ बीजें केलें : जेथें दूखत होतें तेथ पाठीवरि श्रीचरणु ठेविला : माहादाइसीं म्हणीतलें : " मा : हा : एथचि ओ : एथचि ओ : कवणि दैवाची ओ : भाग्याची ओ : " ऐसें म्हणीतलें : ऐसें प्रतौनि पाहाति : तवं गोसावीं श्रीचरणु ठेविला असे : " हें काइ जी : गोसावीं कैसा श्रीचरणु ठेविला ? उतरिजो जी :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : राहा : थोर भागलीति : बाइ : आपुलेयाची श्रमलेयाची श्रमनिवृति कीजे*[२] *:"* मग माहादाइसें उठिलीं : श्रीचरणां लागलीं : आणि म्हणीतलें : " *नागदेया : उठि उठि : गोसावीं बीजें केलें असे :" भट उठिले : श्रीचरणां लागले*[३] *:* मग गोसावियांसि चौकीं आसन जालें : मग गोसावीं भटांतें म्हणीतलें : भटोवासांकरवि पाएवरि श्रमनिवृति करविली : ।।

## ३२९ माहादाइसांचा उपाहारू स्वीकारू

माहादाइसें गोसावीयांकारणें उपहाराचीए आइतीसिं आलीं होतीं : मग तें बाइ-सांचीये हातीं अवघी सामदि[१] दीधली[२] : गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन असे : बाइसें आणि माहादाइसें भीतरि व्यापारू करितें असति : बाइसें म्हणति : "तांदूळांची खीरि करूं : आणि वळिवट वेळुं : " माहादाइसें म्हणति : "वळिवटाची खीरि करूं : आणि तांदूळांचा भातु करूं : " बाइसीं म्हणीतलें : "तांदूळांची खीरि बाबासि आवडे : " माहादाइसीं म्हणीतलें : "हें काइ ओ जालें : गोसावी इस्वरू : इस्वरीं काइ आवडि नावडि असे ? वळिवटाची खीरि करूं : आणि तांदूळांचा भातु वेळुं : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एं म्हणत असति तें कां न करा ? मग तुमचें तें केंहीं गेलें असे ? " एतुकेनि माहादाइसें जीवीं पोळलीं : मग म्हणीतलें : "बाइ : आतां तुम्हीं जाणा तें करा :" उपाहारू नीफजविला : गोसावीं वीहरणासि वडातळि बीजें केलें : गोसावि-यांसि आरोगणेंची वेळ जाली : माहादाइसें[३] वीनवुं गेलीं : तेह्वळि गोसावीयांसि वडातळि आसन असे : आलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : "जी जी : उपाहारू नीफजविला : जी : आतां गोसावीं बीजें करावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचि आणा :" मग माहादाइसीं तेह्वळि उपाहारू तेथचि

---

**३२८.** १ **गो.** बीडौनि. **भमुरा.** बीडीहुनि. २ (**गो.**). ३ (**मुराहबी.**).

**३२९.** १ **ह.** सामधि. २ **मुराबी.** °"बाइ : गोसावीयांसि भक्तजनासहित उपाहारू करावा : गुळमीरियांचिया अंगारिका : तांदुळ वेळावे : सरवळीयांची खीरि करावी : " तवं बाइसीं म्हणीतलें : "तांदुळाची खीरि करू ?—. ३ **मुरा.** बाइसें.

नेला : मग माहादाइसीं गोसावीयांचें चरणक्षाळण केलें : पुजा केली : धुपार्ती केली : मंगळार्ती केली : मग माहादाइसीं गोसावीयांसि ताट केलें : गोसावीं ताटावरि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ बाइ : तांदूळांची खीरि केली ?" "जी जी :" "एं म्हणतें होतीं तें कां न कराचि ?" मग माहादाइसीं दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : "जी जी : मी नेणेंचि जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं म्हणतें होतींति तें तैसेंचि : इस्वरीं काइ आवडि नावडि असे ? परि एथिची प्रवृति ते बाइसें जाणति : एथ असिजे तवं बाइसें म्हणती तें कीजे हो :" "हो कां जी :" ।।

## ३३० माहादाइसें माहोउपवासें प्रस्णु करणें

*माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : मी मासोपवासू करीति होतीयें : पाखू यकू केला : आणि मज स्त्रीयांचा उपद्रो उठिला : वायनायकू आले : मातें गावां घेउनि गेले : पाखू दी मासोपवास करणें राहीले : तरि काइ मज दोखू जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : करितीति तरि फळ होतें : न करा तरि पापही नाहीं : पुण्यही नाहीं[1] :"* माहादाइसीं पुसिलें : "जी जी : माहोउपवासु[2] केलेयां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : उपवासु केलेयां *आत्मा पीडे*[3] : तेणें पाप होए : वर्त केलेयां पुण्य होए : उजवीजे तीए दीसीं देओब्राह्मणु केलेयां फळ होए :" ।।

## ३३१ तथा एकादसी प्रस्णु करणें

माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : एकादसी व्रत केलेयां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पाप होए आणि पुण्यहीं होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ उपवासु कीजे तेणें पाप होए : उजवीजे तेणें पुण्य होए :" *"एकादसि केलेयां व्रतचि केलें होए : परि एकादसि करूं कोण्हीचि नेणे : बाइ : दसमीचां दीसीं अलोणीं ताकभाताचें एकवत कीजे : भुमिसएन : ब्रह्मचर्य : वागनीमूं : पारणें तेंही अलणीं ताकभाताचें कीजे : पारणें तोंचि नीवारणें : ऐसें कीजे तैचि फळातें दे : दोघांचौघांपांती अन घालीजे : नाहीं तरि उपवासू केलेयां नरकाचि होति बाइ :" "जी जी[1] :"* ।।

"जी जी[2] : आम्हीं एकादसीचां दीसीं चोरूनि जेउं : आणि बारसिचां दीसीं पारणें करूं : भलेतैसें चोरूनि जेविलेयां तऱ्हीं लोकु जाणेचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सत्यार्थू प्रगटे :" "जी जी : लोकु तरि जाणे : एकादसिचां दीसीं दोनि वेळ जेविजे :

---

**३३०.** १ (भ.). २ **एवा.** मासोपवासु. ३ (**मुरा.**).

**३३१.** १ (गों$_2$गो$_3$). २ **मुरा.** °आम्हीं एकादसी करूं : न करूं : ऐसें कव्हणीचि नेणति : आणि एऱ्हीवीं तरि म्हणति : "यें एकादसी न करीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथार्थु. (**एवा.**

ऐसें लोकु जाणे : तरि लोकातें चोरूनि कां जेविजे ? लोकादेखत कां नेजवावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : स्त्रीपुरूखांचा[3] वेवहारू जगवीस्व जाणे : तरि काइ चोव्हटां बाजुलें घालुं एइल ? ते[4] घराचां कोणटां एकी सोइचि घालावें कीं : तैसें बाइ : तेहीं पां जाणीतलें : परि आपण तैसेंचि करावें कीं : एऱ्हवीं लोकु सेणवरि नेघे ?" एथ गोसावी संग्रहो वीहिला[5] : ।।

## ३३२ दायांबा जावाइ नीराकारणें

दायांबा[1] भीक्षेसि गेले होते : ते एका ब्राह्मणाचेया आवारासि गेले होते : *तयाचा जावाइ तयांचीए लेकीतें सांडुनि गेला होता : तो दायंबाचि सारिखा*[2] *:* तवं तेहीं म्हणीतलें : "आमचे जावाइ नव्हति ?" दाइंबाएं म्हणीतलें : "मी नव्हें :" ते म्हणति : "होए :" ते म्हणति : "नव्हें" मग तेहीं म्हणीतलें : "आगा : याची ब्राह्मणि बोलावा : मग ते ओळखैल :" मग तेहीं बाइल बोलाविली : "हां ओ : हा तुझा पति[3] होए ?" तवं तीया म्हणीतलें : "ना होए :" "तुम्हीं इतुले दीस आपुलीए ब्राह्मणितें सांडूनि गेले होतेति : तरि आतां[4] इतें घेउनि जा : *आम्ही कीती दीस संवसाळुनि*[5]*?"* इतुकेनि दायांबा उगेचि राहिले : तैसेंचि ते एऱ्हएऱ्हीं गोसावीयांपासि आले : "जी जी : हे आमचे जावाइ : इतुके दीस ब्राह्मणितें सांडूनि गेले होते : आतां नव्हों म्हणताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमची कोणि साखा ?" "जी जी : माध्यांजन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे कऱ्हाडे[6] : यांचे सासुरे पैठणीं असति : चांगदेविचे भोपे[7] : म्हणौनि हे तुमचे जावाइ नव्हति :" मग ते उगेचि नीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा : नीराकारिसीचि ना कैसा ? गळां लोढणें बांधते तरि काइ करितासि ?" दाइंबाएं म्हणीतलें : "जी मों काइ जी : हे असती आणि काइ जी :" गोसावीं म्हणीतलें : "पोरू यासीचि टेकला मां : " ।।

## ३३३ चींतनप्रस्णें राहीया पाठवणी

राहीया चौघांसीं गोसावीयांचेया दरीसनासि आला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग नावेक बैसले होते : गोसावी आसनीं नीश्चळ उगेचि होते : तवं राहीएं

---

सत्यार्थु) प्रकटें :" ३ **अ.** स्त्रीपुरुखांची वेवस्ता लोकु जाणे. ४ **मुरा.** °माजघरींचि घालावी कीं : ५ °वासनांतरे हे लीळा अज्ञात स्थानीं.

**३३२.** १ **मुराहबी.** पाटवधां वेव्हारे एक : तयाचेया घरा दायंबा भीक्षे जाति : ते सोपस्कर भीक्षा देति : तयाचा जावाइ तयाचीए लेकीतें सांडुनि गेला होता : तो दायंबाचि सारिखा : तयांतें देखौनि तीयें म्हणति : हा तोचि : म्हणौनि सोइरेयांधाइरेयांपुढां दाखवीति : तीयेंहीं म्हणति : हा तोचि : लेकीतें पुसति : ते म्हणे : "काइ तुम्हीं नेणा :" तेव्हळि तीहीं दायंबातें पाचारिले : "तुम्ही आमचे जावाइ—" : २ (**मुराहबीगो.**). ३ **पं.** वरैतु. ४ **मुराहबीगो.** °आपुली वस्तु सांभाळा. ५ (**भ.**). ६ **एवा.** रूगवेदी. ७ **भगो.** बडुवे. **आ.** वीद्यार्थी.

पुसिलें : "जी जी[१] : आपण काइ चींतिजत असिजे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें चींतित असें : जें तुम्हीं एथौनि केधवां केधवां नीगाल :" तवं ते ऐसें बुझले जें गोसावीयांसि आमचा नीरोधु जाला : एतुकेनि राहीएं म्हणीतलें : "उठा े उठा : आम्हीं लोणीएं न्हाउनि आलों असों : तेयाचा वासु गोसावीयांसि जातु असे : म्हणौनि गोसावीयांसि नीरोधु जाला : वोपडानि[२] एतु असे :" म्हणौनि ते अवघेचि उठिले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग नीगाले : ।।

## ३३४ पदूनाभिची वस्त्रपुजा ।।

## ३३५ सांकदीं[१] बाहीरीली बीजेस्वरीं वस्ति ।।

## ३३६ सवितडां साजां आसन

चौबारां आसन जालें : बाइसीं चरणक्षाळण केलें : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ३३७ घाटीं चांगदेओभटीं घोंगडें पतन

गोसावीं रामदरेयासि बीजें केलें : घाटीं[१] उभे जाले[२] : *तवं चांगदेओभट इकडेतीकडे पाहों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा बटिका पाहिजत असिजे?" "जी जी : घोंगडें :"* सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा बटिका : घोंगडें पाडिलें?" "ना जी : पडे ना :" "तरि काइ वीसरलेति?" "ना जी : वीसरें ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि काइ केलें?" "ना जी : खांदावरौनि नीसरलें :" गोसावीं इखीत हांस्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : पैला डोंगराबुडि पडलें असे : तें घेउनि या :" ते गेले : घेउनि आले : ।।

## ३३८ दाइंबा आसनीं नीक्षेदु

गुंफा[१] जवं झाडिजे तवं बाइसें चौकीं आसन घालुं गेलीं : तवं दायांबा स्तीतिवंत : चौकीं बैसले असति : बाइसीं म्हणीतलें : "पोरा : उठि : बाबासि आसन रचुं दे :"

---

**३३३.** १ **भ्र.** °आम्ही गोसावीयांतें चींतुं : गोसावी कोणातें चींतिति?" २ **गो.** बोपटानि. ह वीसडानि.

**३३५.** १ यापूर्वी **ह.** प्रतीत 'वांजरे नदी वडातळि आसन :' ही आदि आहे.

**३३७.** १ **एवा.** गुंफे पुर्वीली पाइरीयांवरि–. २ **भ.** °चांगदेवोभटांचां खांदि घोंगडें होतें : ते पडिलें : ते नेणति : गोसावीं (**एवा.** बाइसीं) म्हणीतलें : "बटीका : घोंगडें काइ केलें?" आणि ते गजबजीलें : "तरि काइ पाडीलें : कीं वीसरलेति?"°.

**३३८.** १ **मुरा.** दाइंबासि स्तीति जाली होती : ते पुढां गेले : गोसावीयांसि जेथ आसन रचावें तेथ

तवं दाइंबाएं म्हणीतलें : "एथचि आसन घालावें : मा पैऱ्हां कां घाला ना? तेथ काइ बोटें भोए खालावली असे :" *बाइसी घागरा बांधला*[२] *:* "हें काइ जालें या पोरासि? बाबासि कैसें आसन रचुं नेदीसि? बाबा : या पोरासि ऐसें काइ जालें? आसन कैसें रचुं नेदी?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[३] : तुमची म्हणौनि एणें भीड राखिली : आणिकाचें तरि टाकुनि सांडिता :" एतुकेनि स्तीति भंगली : मग उठिले : मग बाइसीं आसन रचिलें : गोसावीं आसनीं उपवीष्ट जाले : ।।

## ३३९ रामदरां गुंफे अवस्थान

मग बाइसें गेलीं : गुंफा झाडिली : सारविली : रंगमाळिका भरिलीया : मग गोसावीयांसि ओटेयावरि अवस्थान जालें : दीस वीस : ।।

## ३४० नदीधारे प्रदक्षणा

मग गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं[१] वीहरणासि बीजें केलें : धारेपासिली सीळेवरि आसन जालें : श्रीमुर्तीवरि धारेचे तुसार पडति : *तें माणुकूलीं खेवणीलीं ऐसे दीसति*[२] *:* गोसावीं बाइसांकरवि : भगतिजनाकरवि धारेसि प्रदक्षणा करविली : पुढें बाइसें : तेयांमागें चांगदेओभट : दायांबा : उपाध्ये : प्रसनाएकु : बाइसें नीसरति : आणि भगतिजनें हांसति : आणि गोसावी हांस्य करीति : ।।

## ३४१ प्रसनाएका भीक्षासौकरीए[१] श्रवण

*भक्तजन दीसवडि भिक्षे जाति : एक मात्रकोळीये : एक संवीतडेया*[२] *:* गोसावीं दायांवातें आणि प्रसनाएकातें जांबुखेडेयासि भीक्षेसि पाठवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "मठसौकरीएं[१] : उदकसौकरीएं[१] : भीक्षासौकरीएं[१] : पाहुनि या :" ऐसा नीरोपु दीधला : मग ते पाहावेया गेले : पाहिलें : तिन्हीं सौकरीएं[१] असति : प्रसनाएकु राहिले : *दाइंबातें म्हणीतलें : "तुम्हीं जा : गोसावीयांपुढें सांघा : तीन्हीं सौकरीएं असति*[३] *:* वरवें असे" तेहीं एउनि गोसावीयांपुढां तैसेंचि सांघीतलें : "जी जी : गोसावीयांतें बोलाउं पाठवीलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा गा : बोलाउनि घेउनि या : पोरू आपुलेया[४] अंसा[५] गेला :" मग बाइसीं

---

जाउनि घोंगडेयाची चौघडी घालौनि बैसले : बाइसीं म्हणीतलें :—. २ **(मुरा.)**. ३ **मुराहबी.** °एथिचें म्हणौनि आडोळीचि ना :—.

**३४०.** १ **मुराहबी.** °धारेचेया कुंडा—. २ **(भगो.)**. **मुराहबी.** ते सुवर्णाचे कण ऐसे दीसति°.

**३४१.** १ **बी.** °सौकर्यें. **पंभ.** °स्वकीर्ये. **गो.** °स्वकरीए. **मु.** °सौकर्यत्व. **एवा.** °स्वकर्यें. २. **(मुराहबी.)** **मुरा.** °दायंबा आणि परसनायक जांबखेड्या भीक्षे गेले : तवं तेथ भीक्षास्वकर्ये : उदकस्वकर्ये असे : मग परसनायकें म्हणीतलें : "दायिबा : आम्हीं एथ राहौनि : गोसावीं पुसती तरि ऐसें सांघावें : 'भीक्षास्वकर्य असे : मढीस्वकर्य असे : उदकस्वकर्य असे : जै गोसावी बीजें करिति ते दीसीं मज जाणवा : मग मी एइन :' एरी दीसीं दायांबा आले. ३ **(हबीगो.)**. ४ **मुरा.** °भगवेपणाचेया. ५ **एवा.** आंगा.

पुसिलें : "बाबा : आपुलेया अंसा गेला म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : चतुर्मासीकारणें संन्यासी गाउं पाहावेया[६] पाठवीति : पाहाति : आणि आपण तेथचि राहाति : सुकलभट असति : तेयांतें सांधावेया पाठवीति : पाठीं एर एति : तैसा पोरू आपलेया अंसासि गेला[७] :" मग तेयांतें भगतिजन घेउनि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें पाहावेया पाठवीलें : कीं राहावेया पाठवीलें ?" ऐसें गोसावी तेयांसि कोपले : ।।

## ३४२ मार्गी बाइसाआग्रहोनीवृति

गोसावीं रामदराहुनि बीजें केलें : मात्राकवळीएसि बीजें करिताति : तवं मार्गी वाट फांकली : तेथ गोसावी उभे राहिले : बाइसीं पुसिलें : "बाबा : हा मार्गु कवणा गावां जाइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा मार्गु जांबुखेडेयासि जाइल : आणि हा मार्गु मात्रकौळीएसि जाइल :" तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : जांबुखेडेयासि बीजें कीजो कां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ प्रवृति नाहीं :" तैसाचि तीहीं तीनि वेळ आग्रहो घेतला : तैसेंचि गोसावीं तीनि वेळ नीराकारिलें : चौथीए वेळे सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं जरि आग्रहो कराल तरि यातुलां एकां[१] होइजैल :" तेथ हरणें चरतें होतीं : तीएं श्रीकरेंकरूनि दाखवीलीं : *तवं दायंबायें म्हणीतलें : "बाइ : अवघेयांचीं सीसें कां नीवटाल*[२] ?" आणि बाइसें गजबजिलीं : मग बाइसीं म्हणीतलें : "नको नको बाबा : आतां मीं आग्रहो न करीं[३] :" ।।

## ३४३ मात्रकौळीए ब्राह्मणांघरीं मादणें : पुजा : आरोगण

गोसावीं मात्राकौळीए बीजें केलें : गोसावीं प्रसनाएकाची दुटी प्रावर्ण केली असे : ते *सूर्याचां रश्मीकरूनि*[१] ओडणासारिखी दीसत असे : भगतिजनाचीया काठीया भालेयांसारिखिया देखिलीया : सेतकरीं देखीलें : एतुकेनि लोकु भेओं लागला : "*आले आले ओरपेकार*[२] :" तेहीं वेसि घातली[३] : जुझाची आइति केली : मांदी वेसिदारीं मीनली : गोसावीं उपाध्यांतें पुढां पाठवीलें : उपाधीं म्हणीतलें : "तुम्हीं भेओं नको : *रामदरां श्रीचांगदेओराउळ गोसावी असति*[४] : ते एत आहाति :" *गोसावीं वेसिदारा बजिं केलें : गावींचां वेसि उघडीली*[४] : गोसावीयांसि[५] पटिसाळेसि आसन जालें : मग ते अवघे लोक आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग ब्राह्मणु एकु आला : तो

---

६ **अ.** बाहावेया. **७ मुरा.** °बोलाउं धाडीलें : वासुदेवो : म्हणौनि नीगाले : गोसावीयांपासि आले :

**३४२.** १ **हीराइसें.** °हरिणाचें देह घेइजैल : मग कवण म्हणौनि ओळखाल ? कवणा पाठीं धावाल ?"
२ **एवा.** लावाल. **मुरारीबासांची वासना** : "बाइ : उगी असा : अवघेयांचां मुळिं इळा कां घालाल ?"
३ **एवा.** °बाबा : आवघेयांची सवे कां लागली ?" जांबुखेडीं बाइसांचीं संबंधीयें होति :

**३४३.** १ **(मुराहबी.)**. २ **एवा.** पाइक. **एवा.** पुंड. **(मुराहबी.)**. ३ **भ.** वोणु मांडुनि राहीले : ४ **(भ.)**. ५ **भ.** (**एवा.** मदळा धरूनि गोसावी उभे होते.).

सोवणी : तेणें गोसावीयांतें वीनवीलें : आपुलेया आवारासि घेउनि गेला : पटिसाळेवरि आसन जालें : चरणक्षाळण जालें : मग वीळिचांचां वेळीं मर्दनामादणें जालें : पुजा आरोगण जाली : वस्ति जाली : मग उदीयांचि गोसावीं आसुटीएसि बीजें केलें ।।

## ३४४ आसुटीए हरिचंद्रीं वस्ति : विनायकीं क्षौर

गोसावीयांचें क्षौर जालें होतें : बाइसीं म्हाला[1] बोलावीला : मग गोसावीयांचें क्षौर[2] केलें[3] : तेयांसि एकु दामु दीधला : मग मर्दनामादणें जालें : मग तो म्हाला तेहीं हातीं आणिकाची सेवा न करीचि : देह्परीएंत ।।

## ३४५ सीराळां भीलेस्वरीं वस्ति ।।

## ३४६ वांकीए मढीं अवस्थान

मग गोसावीयांसि वांकीए मढीं अवस्थान जालें : ।।

## ३४७ चोरकुमति हरणें

[1]वीळिचांचां वेळीं वांकीएसि चोर आले : भगतिजनीं म्हणीतलें : "जी जी : माणुसें आलीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीया ना : भीतरि जा :" गोसावीं आंगणांसि बीजें केलें : तेथ उभे जाले : तवं चोर आले : तेहीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी रानाआंतु काइ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें भीक्षू माहात्में : महात्मे हो : या :" तेहीं म्हणीतलें : "ना जी : आम्हीं[2] गोसावीयांसि उपद्रो करूं आलों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं माहात्मे कीं गा : तुम्हीं माहात्मेयांसि उपद्रो कां कराल? दोनि एकें फाळुकीं असति : तीएं तुम्हीं घेउनि जा : हें भीक्षू माहात्में : यासि आणीकु कोण्हीं एकाधा देइल :" "ना जी : एं गोसावींचि पांगुरावीं :" जुहारू केला आणि नीगाले : ।।

## ३४८ जोगनाएका वीज्ञापनीं पदुमनाभी पाठवणीं

जोगनाएकु तें पदुमनाभिदेवांचे भाउ : ते पदुमनाभिदेवांतें थोरें आवेसें नेआवेया आले : पाइकु परीवारू बहुतु : ऐसा आला : गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू

---

**३४४.** १ **गो$_2$** उपाध्याकरवि°. **गोहबी.** माहाला. २ **गोपं.** क्षेउर. ३ **भ.** वीनायकाचां (**गो$_2$** चींतामणीचेया) साजां गोसावीयांसि क्षौर जालें : हरिचंद्रीं चौकीं मर्दना जाली : पुर्वीला दारवठेया उतरे मादणें जालें.

**३४७.** १ **मुराबी.** भक्तिजनें भीक्षे गेलीं होतीं : तीयें आलीं : तीहीं झाडाआंतु चोर देखीले : तवं चोर आले°. **भ.** तो गाउ वोसु : तें चोरांचें स्थान : वीळीचां चोर आले°. २ **मुरा.** °वोखटें हुनि आलों : सर्वज्ञें म्हणीतलें : "वोखटे यां कां होआवें?" "जी जी : हें रान : एथ नसावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ काइ असे ? मा काइसया नसावें ? फाळुकीं दोनि एक असति—.

जालेयाअनंतरें मग सपुजीत पटिसाळेवरि आसनीं उपवीष्ट असति : *बाइसीं देखिलें : ''बाबा : पाइक आले : '' ''भिया ना बाइ : याचा भाउ यातें नेयावेया येतु असे[1] :''* तवं पाइक पुढें आले : तेहीं गोसावीयांतें देखिलें : आणि म्हणीतलें : ''ऐया रें : गोसावी साक्षात मलिनाथु : साक्षात सोमनाथु : कैसा पापीएं लींगभेदू केला होता :'' ऐसें म्हणीतलें : जो ए तो गोसावीयांसि दंडवत करी : ओडणखांडें पालथें घाली : आणि बैसे : तवं जोगनाएकु आला : तेहीं दंडवत केलें : श्रीचरणां लागला : जवळि बैसले : ओखटें करूं आले ते कुमति हरिली : मग जोगनाएकें म्हणीतलें : '' जी जी : पदुमनाभीतें पाठवावें : याची माता ते थोरि रात्रिदीसु रडतें आहाति : अनउदक नेघति :'' सर्वज्ञें म्हणीतलें : ''हां गा : याते काइ एथौनि राहाविलें असे ? तुम्हीं यातें नेया ना कां :'' मग जोगनाएकें म्हणीतलें : '' पद्मनाभी : चाल : '' ''ना मीं नैएं : मातें काइ बांधौनि नेयाल ?'' मग सर्वज्ञें म्हणीतलें : ''आतांचा वेळु तवं जा : मग मागौते या :'' ''ना जी : मीं न वचें[2] : '' सर्वज्ञें म्हणीतलें : '' जा एथौनि तुमतें पाठवीजतें : '' मग पदुमनाभिदेव गेले[3] : ।।

## ३४९ उपासनीयां स्तीति

उपासनीए ते स्तीतिमंत : ते गोसावीं रातांजनासि भीक्षेसि पाठवीले : नागिवेचि भीक्षा करीति : एकु दीं एकि बाइल करडी[1] भाजीत होती : तें रांधनें घेउनि कुंपाआंतु घातलें : तो कुंपु जळों लागला : एकु दीं एकाचें मुसळ खांदीं घालौनि भीक्षेसि गेले : एकु दीं पाखालेया खूळिगा उचलौनि खांदीं घातला : तैसेचि भीक्षा करीति : एकु दीसु गांविचां वेसि घातली : ते मोडुनि घातली : एतुकेनि गाविचा लोकु भेओं लागला : भेणेंचि भीक्षा घालीति : ''आरे : देसासि पांडवें आलीं असति :'' गोसावीयांसि धर्मु म्हणति : बाइसांतें कोंती म्हणेति : उपासनीयांतें भीउं म्हणेति : दाइंबातें लकुळु म्हणेति : नाथोबातें साहादेओ म्हणेति : वांकीए पांडवें आलीं म्हणेती : ऐसी सात दी स्तीति होति : मग भंगली : ।।

## ३५० मीरडां रेमेस्वरीं वस्ति ।।

## ३५१ घोगरगावीं वस्ति ।।

## ३५२ मांडवगणीं सोधनाथीं वस्ति ।।

---

**३४८.** १ (हबी.). २ **मुरा.** °हा मातें नेइल कैसा ? ऐसें याचें बळ पाहों. ३ **मु.** °हे लीळा एथ : हीराइसें : भिगारप्रदेसीं.

**३४९.** १ **भपह.** करडै.

## ३५३ अर्णग्रामीं नागनाथीं अवस्थान : उपासनीयां लाठि घालणें

उपासनीयांसि मागांचि स्तीति जाली होती : ते एका गावांसि भीक्षेसि गेले होते : तेलीया एकाची लाठि खांदावरि घालुनि गोसावीयांचेया दरीसनासि आले : ते लाठि गोसावीयांवरि घालुं आले : तवं[1] बाइसें सामोरी जाउनि तोंडावरि थापा हाणीतला : लोटुनि घातला : लाठी पऱ्हां पडली : बाइसीं पुर्खार्थें म्हणीतलें : "मर मर पोरा : बाबावरि कैसा लाठि घालुं आलासि[2] ?" म्हणौनि घागरा बांधला : मग बाइसीं पुसिलें : "हां बाबा : बाबाचिपासौनि गोमटें आणि बाबावरि कैसा लाठि घालुं आला[3] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आदिमाहादेवी वीद्या : एकी वीद्या राजसा : एकी वीद्या तामसा : ऐसीया एकी विद्या आति जेथौनि होति तेथौनिचि प्रतिकुळां करावें ऐसी बुधि उपजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आदिमाहादेवी[4] एक माहात्मे होते : तेयांपासौनि एकांदोघां वीद्या जालीया : तेयांचीया स्त्रीयां म्हणीतलें : 'तुम्हांपासौनि दोघांचौघां वीद्या : आणि मज काहीं नाहीं : तरि तुम्हीं मज वीद्या देयावी :' तेणें म्हणीतलें[5] : 'हे वीद्या सांघों नैए : हे वीद्या जेयापासौनि होए तेयासीचि ओखटें करावें ऐसी बुधि उपजे : म्हणौनि हे वीद्या सांघों नैए : वीद्येतव आवेसु भरे : तेयातव ऐसी बुधि उपजे :' तेया म्हणीतलें : 'तुम्हांसि कैसें ओखटें करीन? मीं काइ नेणें ?' ऐसा तीया आग्रहो घेतला : तेव्हळि तेणें तीसि वीद्या सांघीतली : तीसि स्तीति जाली[6] : स्तीतीतव आवेसु भरला : आणि तेयाचेंचि खर्ग[7] घेउनि पाठीं लागली : एतुकेनि तेयातें वीदारिलें : वीदारूं सरलें : आवेसु गेला : मग रडों लागलीं : 'प्रीया : प्रीया :' करीत रडों लागलीं : तवं आश्रणीं[8] वाचा जाली : 'मीयां तुतें वारिलें कीं :' 'आतां तुम्हांवीन मज गमे ना : तुम्हांवीन माझें देह जाइल :' तेहीं म्हणीतलें[9] : 'आतां अवघे अवेव जेथिचे तेथ मेळवि: मग मी स्वीकरीन :' मग तीया अवघे अवेव मेळवीले : मग तेणें तें मागौतें स्वीकरिलें : देहेवीण असों सकति : ते वीदेहीए पुरूख :" ।।

## ३५४ देमती अद्रकत्वचाग्रहणीं सीक्षापण

बाइसीं देमाइसांकरवि आलें धुआवियाचें[1] म्हणीएं दीधलें[2] : आलें धुतां कोंडा पांणीएं वाहातु जातु होता : तो घेतला : 'पांणीभातेंसि जेवावेया होइल :' म्हणौनि गांठीं बांधला : आलीं : आलें बाइसांहातीं दीधलें : मग गोसावीयांसि दंडवत घातलें :

---

**३५३.** १ **मुरा.** °ते बाइसीं बखलीलें : २ **गो.** बैसलासि. ३ **गो.** बैसला. ४ **मुराहबीगो.** °महादेव. ५ **मुराबी.** °"आम्हीं तुम्हां वीद्या देउनि : परि तुम्हीं आमतें भक्षाल : नको :" ६ **मुराबी.** °तीया तयातें खादलें : ७ **गो.** काती. ८ **मुरा.** अंतरीक्ष वाचा. **एवा.** अशरीरीणि. ९ **मुराबी.** °अस्ती मागुतीया मेळवा.

**३५४.** १ **अपं.** सोलावेयाचें. २ **मुराहबी.** °बाइसीं म्हणीतलें : "देमाइसें : हें आलें धुनि आणा कां :

सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : गांठीसि[3] काइ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : हा कोंडा :" "कोंडा काइसा ?" "जी जी : बाइसें म्हणीयें दीधलें : तें मीयां आलें धूतलें : तो[4] कोंडा वाया जात होता : तो मीयां पाणींभातेंसीं होइल म्हणौनि घेतला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइसांतें पुसिलें ?" "ना जी : कोंडेयासाटीं बाइसांतें काइ पुसों[5]" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : एथिची सता ते बाइसांसि आथि : बाइसांतें पुसिलेयांवीण एथिचें काहीं करूं : घेओं नैए देमती : एथिचें तें देवस्व कीं : आणिकी देवतेचें देवस्व होए : मां एथिचें नव्हे देमती[6] ?" ।।

## ३५५ भींगारीं आदीतीं अवस्थान ।। लखूमदेव ग्रहवसे आसंनीधान

लखूमदेवांभाइदेवांची माता गोसावीयांचीया दरीसना आलीं : मग वीनवीलें : "जी जी : मज दोघ पुत्र असति : भाइदेवो तो नावेक वेडा : लखूमदेवो तो पींसा : तरि गोसावीयांचेया दरीसना आणुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि एथिचेया दरीसनासि आणा : मां वेडेयाचें वेडेपण जाइल : पीसेयाचें पीसेपण जाइल :" मग तीएं दोघांतें आणितें होतीं : तवं लखूमिदेव हातौनि नीष्टले : ते पळाले : दोघांचौघां आंडोरांकरवि धरविले : मागुतें आणितें होतीं : गोसावीयांपासि पावतपावतां पळाले : तैसीचि गोसावीं तेयांपाठीं धावं घेतली : तवं ते नाराएणाचेया देउळावरि वेघले[1] : नासीआंतु तोंड सीरिलें[2] : गोसावीं नासीवरि बीजें केलें: गोसावीं तेयांचीए पाठिसी बैसौनि म्हणीतलें: "तुं कोणु ?" तवं तेणें म्हणीतलें : "तुं कोणु ?" तो आपुलें तोंड न दखवीचि : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : लखूमदेव सन्मुख होते तरि तेयांचें पीसें फीटतें : भाइदेवांतें एथ असों देया : मग तेयांचें वेडेपण जाइल :" "हो कां जी :" ।।

## ३५६ भाइदेवांतें लघुनीती बोलावणें

*मग भाइदेवो ते गोसावीयांपासि राहिले : घरा न वचति : तेंथचि जेवीति : गोसावीयांपासि[1] निजति[2] :* रात्रीं भाइदेवांसि लघुनीति[3] लागली : आणि म्हणति : "मुनिदेव हो : मुतुं ?" तवं बाइसें म्हणति : "बटिका : उठि[4] :" ते नुठीति : माघौतें म्हणति : "मुनिदेव हो : मुतुं ?" मागौतीं बाइसें म्हणति : "बटिका : उठि :" आणि ते उगेचि

---

बाबालागि साकवती करीन :" गेली : °धुतलें. ३ **एवा.** पालवीं. ४ **अपं.** ते त्वचा वाया जात होती ते मीयां. . . .घेतली". ५ **मुरा.** पुसावें असे. ६ **मुराहबी :** "वरि वायां जावो : परि अनुज्ञात एथिचें काहीं घेवों न ये :"

**३५५.** १ **एवा.** वळघलें. २ गो. सूदलें.

**३५६.** १ **मुराहबी.** बाइसांपुढां. २ (**भ.**). ३ **गोबी.** लघुसंका. **भ.** वाटवनी. ४ **मुराहबी.** °तुतें मीं घेउनि जाइन" ते उंहुं म्हणौनि नुठीति.

राहाति : मग गोसावी तेयांसि लघुनीतीसि[५] नेति : गोसावी दोहीं श्रीकरीं धरीति : ते[६] उगेचि वाटवनी करीति : तेणें गोसावीयांचे श्रीचरण सींतोडति : मग गोसावी तेयांतें आपणेयां पुढें नीजवीति : बाइसें गोसावीयांचे श्रीचरण पुसीति : ।।

## ३५७ भाइदेवांचीं बदरिकाफळें आरोगण

भाइदेव ते उदीयांचि मळेया जाति : तेथ बोरें वेंचीति[१] : चाखति : कडूवेंकडूवें तीएं आपण खाति : गोडेंगोडें तीएं आंगीचीया बाहीया[२] भरिति : आणि गोसावीयांपुढां रीचवीति : "मुनिदेव हो : बोरें खा : मीयां तुम्हांकारणें आणिलीं : गोडें असति :" बाइसें म्हणति : "पोरा : उसिटीं बोरें बाबालागि कैसीं आणिलीं?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : उसिटीं ऐसा यासि काइ भावो असे ? इयें गोडें म्हणौनि हा घेउनि आला असे :" *एकदोनि आरोगीति : एरें बाइसांहातीं देति[३] :* "घेया : एथिचेया उपयोगा नेया[४] :" मग बाइसें तेयांची साकवती करूनि गोसावीयांचां ताटीं ओळगवीति : ।।

## ३५८ तथा चणा आरोगण

भाइदेव ते गावांआंतु जाति : तेथ चणेयांचीं पेवें नीगति : तेया पेवाचीए पाळी बैसौनि गोरेगोरे[१] चणे ते गोसावीयांलागौनि वेंचीति[२] : काळेकाळे ते आपण खाति : दोन्ही बाहीया भरूनि घेउनि एति : गोसावीयांपुढां रीचवीति : "मुनिदेव हो : *मीयां तुम्हांलागि चणे आणिले[३] :* चणे गोड आहाति : खा[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ घेआ : एथिचेया उपयोगा नेया :" मग बाइसें तेयांची साकवती करीति : अरधे ढांकाणें करीति : अरधे सांबारीवं करीति : मग गोसावीयांचां ताटीं ओळगवीले : ।।

## ३५९ देमाइसां ज्ञान : भक्ति : वैराग्य नीरोपणें*

[एकु दीं[१] देमाइसें पुराण आइकों गेलीं होतीं : पुराण आइकौनि मग गोसावीयांपासि आलीं : "जी जी : आजि पुराणीं ऐसें नीगालें : जें ज्ञान : भग्ति : वैराग्य : संसारमोचकें :

---

५ भ. वाटवनीयां. ६ **भ.** °गोसावीयांचेया श्रीचरणांमाजि उभे राहुनि मूतीति.

**३५७.** १ **मुरा.** °गोडेंगोडें बोरें चाखचाखों वोंटिये घालीति. २ **भ.** वाखोरां. ३ (**मुरा.**). ४ **हबी.** °बाइसीं घेतलीं : फोडुनि सोधिलीं : आंठोळिया वेगळिया केलीया : मग मीठमीरीयें हींगु लाउनि कुसंबीरि केली.

**३५८.** १ **मुरा.** पांढरे पांढरे. २ भ. °अंगीयेचे वाखोरे भरीले. ३ (**मुरा.**). ४ **मुरा.** °पुढां पुजा करुनी वोळगवीले :

**३५९.** ***अमुराबीह.** प्रतीत ही लीळा संक्षिप्त आहे. ह्या सर्व पोथ्या आणि विशेषत : **भगो.** प्रतीच्या साह्याने ही लीळा पुन:स्थापित केली आहे.

१ **रावा.** °तांदुळ सडीतां देमाइसीं पुसीलें : "जी जी : गोसावी वीहरणासि बीजें करीताति : तरि ईश्वरीं काइ वैराग्य करावें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती ज्ञान : भग्ति : वैराग्य°.

तें साच जी ?" "हो बाइ : साच :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : ज्ञान : भग्ति : वैराग्य : एकें मोचकें : एकें अमोचकें : तीएं तें केवि जाणति : तें एथौनि तुम्हांसि सांगीजति :" "तें केवि ?" "ना इतरीचीं तीयें अमोचकें : एथचीं तीयें मोचकें : एथचींहीं एकें अमोचकें :" "तीएं कैसीं ?" "ना अन्यथाज्ञान संचरलें : युक्तित्रय : तेणें ज्ञान अमोचक जालें : अभीळाखू लोभू संचरला : तेणें भक्ति अमोचक जाली : प्रीती वीखो संचरला : तेणें वैराग्य अमोचक जालें : म्हणौनि एकें मोचकें : एकें अमोचकें :" "तरि मोचकें तीयें कैसीं ?" "ना हे इतुले दोख नाहीं : तीयें मोचकें होति : परि ज्ञान : भक्ति : वैराग्य वाढवीलीयां वाढेति : धाडीलीयां जाति :" "तीयें कैसीं ?" "ना श्रवण : मनन : मथन : एणें ज्ञान वाढे :" "तें कैसें ?" ना "धर्में : ज्ञातावीरक्तापासौनि श्रवण होए : मग मनोर्थु वीतर्कीत मनन करी : मग बोधुपूर्वक अनुसरलेनि पुरुषेंसीं मथन करी : तेणें ज्ञान वाढे :" "तरि जाए कवणी परी ?" "ना अव्हेरण : अन्यकथन : वीपरीत बुधी : एणें ज्ञान जाए :" "तें कैसें ?" "ना जवळीकेचेनि : अथवा भेटलेया : वीतपाताचेन दृष्टांतें :" "ना अपराअतीत वस्तु जाणीजे : सकळां अपरांअतीत वस्तु एकि आति : ते जाणीजे यातें ज्ञान बोलीजे : सकळ संपती तीया असंपती : परमेश्वरु जीवाची संपती : यातें भग्ति बोलीजे : सकळ वीखैयाची अनावडि : जीवासि ईश्वरींचि आवडि : यातें वैराग्य बोलीजे : याचि त्रीगुणातें बोधु ऐसें बोलीजे : हें मोचक बाइ : अमोचकें तीए अपरींचीं : ज्ञान : भग्ति : वैराग्य : इयें तीन्हीं एके काळीं न होति : बाइ : ज्ञानापसि प्रेम उत्तम :" ॥]

## ३६० देमाइसां प्रतीति पंथू नीरोपण

एकु दीं देमाइसें स्नान करावेया नइकडे जात होतीं[१] : तवं नइकडौनि दोघी ब्राह्मणी बाइया एत होतीया : खांदीं पडदणीयां : हातीं तांबीए : गोष्टी करीत एत होतीया : एकीं एकीतें म्हणीतलें : "आइ : पुराणीं ऐसें म्हणति : जें गुरुवीण संसारू तरिजे ना : मुंचिजे ना : गुरूवीण संसाराची ली पुसे ना : तरि गुरू केला : आतां स्वर्गा जाइजो : अथवा नर्का जाइजो :" *तवं देमाइसीं जीवीं म्हणीतलें : "आमतें आमचे गोसावी असति*[२] *:"* तें एउनि देमाइसीं गोसावीयांपुढें सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "*देमती : गुरु वीस्वासु म्हैसेयाचा*[२] *: देमती :* हा प्रतीति पंथू कीं देमती :" "एरू तो वीस्वास पंथू :" देमाइसीं म्हणीतलें : "कैसा प्रतीति पंथू जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं

---

**३६०.** १ **गो₃गो₃** °तेथ भाचा भेटला (**एवा.** ओळखीचे भेटले :) तेहीं म्हणीतलें : "आम्हीं गुरु केले आहाति : आता°. २ (**गो₃**).

अस्त्री असा : आणि एथौनि म्हणिजैल : 'जा तुम्हीं पुरूखू :' आणि[३] तें देमती ऐसें एउनीचि ठाकैल : जैसी पाखाणीची रेघ : *हा प्रतीति पंथु देमती :* " ।।

## ३६१ तथा वीस्वासु पंथ नीरोपण

"तरि वीस्वास पंथू तो कैसा जी?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणीं[१] एक माहात्मे असति : ते आपुलेयां सीक्षांसि घोकवीति : तें एकासि नैए : एतुकेनि तेहीं म्हणीतलें : 'जाए : तुं म्हैसा :' *तेणें तें वीस्वासें घेतलें*[२] *:* 'ऐसें तरि मीं म्हैसा : आणि काइ :' म्हणौनि ऐसें आपुलां ठाइं योजिलें[३] : बाहीरिवाडी जाउनि आला : आंगणीं उभा ठाकला : तेहीं म्हणीतलें : 'एसि नां कां गा भीतरि?' तेणें म्हणीतलें : 'माझीं सींगें अडति ना :' *'तुज सींगें असति?' 'तरि काइ :' तुम्हीं म्हणीतलें : 'तुं म्हैसा :' तेणें म्हणीतलें : 'येणें हाचि शब्द धरीला :' मग म्हणीतलें :* 'ऐसीं कानवडी करूनि ए :' ऐसी वांकुडी मान करूनि आला : तेहीं माथेयावरि हातु ठेविला : 'तुं म्हैसा नव्हसि हो :' 'हो कां : आणि काइ :' " ।।

## ३६२ उपाध्यां वीस्णुभटां भेटि : तथा पंचम वेदूउचारू

एकु दीं गोसावीं भींगारदेवीकडिली वेसी बीजें केलें : भींगारदेवीसि आसन जालें : तवं उपाध्ये वीस्णुभट आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमचें कुटंबपरिवारू नीकेनि असे?" "जी जी :" मग गोसावीं तेयांतें कृपादृष्टी अवळोकिलें : आणि तेयां स्तीति जाली : तैसेंचि गोसावी बीढारासि बीजें करिताति : तवं वेसिदारीं गाढउ[१] भुंकीनला : आणि[२] तेहीं भुंकों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : ऐसें काइ?" "जी जी : हा पंचम वेदू :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पंचम वेदू तो काइ ऐसा? *गाढवाचिया सारिखें भुंकिजे*[३] *?*" एतुकेनि तेयांची स्तीति भंगली : ।।

## ३६३ जेउरमार्गीं बाइसां आग्रहोनीवृति

मग भींगारूनि नीगाले : गोसावी बीजें करिताति : पुढें वाट फांकली : तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा मार्गु कोणा गावां जाइल?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा मार्गु

---

३ **हीराइसें.** °ते यथार्थें ऐसें होउनि ठाकैल : **ह.** °तें एथौनि एथार्थुचि होउनि ठाकैल. **बी.** तें तैसेंचि घेउनि ठाकाल.

**३६१.** १ **बी.** कव्हणी एका महात्मेयातें एकु उपदेश मागे : तेणें म्हणीतलें : "जाए : तुं म्हैसा :" तेणें अध्यासु वाढवीला : एकु दीं जेउं गेला : वाकुडी मान करुनि भीतरि रिगाला : तेहीं पुसिलें : "हें ऐसें काइ?... २ (**भगो.**). ३ **गो.**[२] °मग तो दुर्वांकुर चरे : पाडरुआंआंतु चरे : कराडी आंग घासे : पाणीयांआंतु बैसे : फुं फुं करीतु स्वासु घाली : मग तो आचार्यें एकें आंवंतीला : तेयाचेया घरासि जेवावेया गेला : वांकुडी मान करुनि घराआंतु रीगाला : मग तेणें आचार्यें पुसीलें–.

**३६२.** १ **भ.** गाढौ. २ **भ.** विष्णुभटीं तैसाचि भुंकु केला. ३ (**मुरा.**).

जेउरासि जाइल : आणि हा मार्गु पापवीनासनासि जाइल :" *जेउरीं बाइसांचीं संबंधीएं होतीं*[1] *:* बाइसीं म्हणीतलें : "बाबा : तरि जेउरासि बीजें कीजो कां :" "बाइ : तेथ जावेया एथ प्रवृति नाहीं :" "ना बाबा : या गावां जावें : तें या गावां बीजें कीजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आग्रहो न करा :" "ना बाबा : बीजें कीजोचि :" आणि गोसावी अदृष्ट जाले : बाइसें देखतीचि ना : आणि मुर्छा एउनि पडली : 'बाबा : बाबा :' करीते[1] : तैसेंचि गोसावी दृष्ट *जाले : आणि बाइसांतें हनवटि धरूनि* सावधें सचेतनें करूनि उठवीलीं : "*हें काइ बाइ : हें काइ बाइ ?*" म्हणौ*नि थोरलेनि* शब्दें *म्हणीतलें : डोळे पारिमार्जिले*[2] *:* बाइसीं पुसिलें : "बाबा : आपण कोणी ठाइं होते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ए रींगणीखालि होतें :" "बाबा आजि बीजें करीते तरि आम्हीं काइ करितों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आग्रहो न कीजे : अस्त्रीयांचां स्वरूपीं आग्रहो एकु आति : जैसा लखुमीएसि होता :" "तो कैसा बाबा ?" मग यावरी गोसावी खीराबधिची गोष्टि सांघीतली :॥

सर्वज्ञें म्हणीतलें : "क्षीराब्धीचि देवता वीश्रमली होती : लक्ष्मी पाए तळ्हातिति होती : तवं तेणें ऐसा मुगुटु तुकीला :" लक्ष्मीयां पूसिलें : "तुम्हीं मुगुटु कां तुकीला ?" "नां भूमंडळि कंदर्पकोडि[3] श्रीकृष्णचक्रव्रति अवत्रले असेति : तेयांचें सौंदर्य देखौनि आश्चर्यें तुकीला :" तवं लक्ष्मीयां म्हणीतलें : "ते काइ तुम्हांहीपस्य बरवे ?" तेहीं म्हणीतलें : "तेयांचेया[4] श्रीचरणाचेया नखाचें इतुकें आमचां ठाइं बरवेपण नाहीं : आणि काइ :" यावरि लक्षुमीयां म्हणीतलें :"तरि ते मीयां देखावे : आणि काइ :" ऐसें म्हणौनि अग्रहो घेतला : तेव्हळि देवता द्वारावतिचेया ब्राम्हणाचीं लेकुरूवें घेउनि नेओं लागला : लेकरूं उपजे आणि सरे[5] : तो ब्राम्हणु महाद्वारासि जाए : दारवठां बोभाए : 'हे राए अधर्मसीळ : याचां ठाइं अधर्मू वर्तत असे : म्हणौनि माझी प्रजा वाढे ना : मी तरी काहीं अधर्मु करीं ना :' ऐसा साहावेया[6] लेंकरूवाचीये वेळे : तेथ अर्जूनू आला होता : तेणें म्हणीतलें : 'तुं कां ब्राम्हणा बोबातासि ?' 'तुं काइ पूसतसी ? हा श्रीकृष्णु नूपसे : हा बळभद्र न पूसे : मां तुं काइ पूसतसि ?' 'नां[7] मीं अर्जुनु : गांजीवां धनुकाचा :' तेव्हळि तेणें आपूली आवघी वेवस्था सांघीतली : "*माझीं सा लेंकरुवें नेलीं : सातवेंही नेइजैल : तरि तुं राखसी ?*" *अर्जुनदेवीं म्हणीतलें*[8] *:* 'तरी मी राखैन :' 'तुं काइ राखसील ?' 'ना मीं राखैन :' 'न रखसि तरी काइ ?' 'तरि मीं अग्निप्रवेसू करीन :' 'तववरि तुं कोठें ?' 'नां तववरि मीं येथचि असैन :' नीच ब्राम्हण दुखेंसीं जाये : ते दीसीं हरीखैला गेला : ब्राम्हणीं म्हणीतलें : 'आजि लेंकरूं

---

**३६३.** १ (**हबी.**). २ (**मुराहबी.**). ३ (**भग.**). ४ **भग.** मी तेयाचेया श्रीचरणीचेया आंगुठेयाचेया नखासारिखा नव्हे :" ५ **ग.** अदृश्य होए. ६ **पंभग.** सातवेया. ७ **एवा.** "ना मी अर्जुनु : जेयाचें गांजीवं धनूक". ८ (**भग.**).

सरलें : तुम्हीं ऐसें काइ हरिखता ?' तेव्हळि आवघी वेवस्था तीयेपूढें सांघीतली : तेव्हळि तेही हरखैली : प्रसूतीसमैं अर्जूनातें बोलाउं गेला : अर्जूनु आला : अर्जुनें सस्त्रा-अस्त्रीं घर पंजरीलें[९] : *खीळणि केली*[८] : गुणीं बाणु लाउनि उभा राहीला : ते वेळे लेंकरूं[१०] उपजतखेओं अदृस्य जालें : आणि तो ब्राम्हणु दारासि आला : 'मर मर अर्जुना : येणें अर्जुन होआवे नसि : जाळि[११] तुझें अर्जुनपण : हे जाळी[११] तुझी प्रतज्ञा : हें जाळी[११] तुझें गांजीवं धनूक : हें वेळोवेळां पुत्रमुख देखें : ये वेळे पुत्रमुख न देखेंचि :' अर्जुनें म्हणीतलें : 'भटो : कोपत असा कां ? मीयां प्रतज्ञा घेतली असे कीं :' 'काइसी तुझी प्रतज्ञा : तुहीं मरतासि : मां तीये कोंतीयेचेनि दुखें मीं कें रीघैन :' 'नां भटो : मज सूधी करूं द्या :' *अर्जुनासि स्वर्ग मृत्यू पाताळीं तीहीं लोकीं गमन*[१२] : तैसाचि अर्जुनु स्वर्गासि गेला : स्वर्गि पाहीलें : तंवं तेथ नाहीं : आठाहीं लोकपाळांचेया ठायासि गेला : तेयांतें पुसीलें : 'तुम्हीं लेकरूंवें आणीलीं ?' तेहीं म्हणीतलें : 'आम्हीं नाहीं आणीलीं : असति तरी पाहा पां[१३] :' तैसाचि अर्जुनू आला : आणि सरण[१४] रेखलें : मग श्रीकृष्णचक्रव्रतीतें पुसों गेला : 'जी जी : मी अग्नप्रवेसु करीन :' श्रीकृष्णचक्रवीतिन म्हणीतलें : 'कां करिसी ?' 'मी प्रज्ञाहतु जालां :' श्रीकृष्णचक्रवती म्हणीतलें : 'सुधी केली ?' 'जी जी केली :' तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'आतां चाल जाओं : आम्हीं तुम्हीं सुधी करूं : सुधी नव्हेचि तरी करा : आणि काइ ? चोरा-चांडाळा दसरात्री : पंचरात्री : ऐसें :' तैसेंचि : श्रीकृष्णचक्रव्रती : अर्जुनदेव नीगाले : लोकालोकपर्वतवेन्हीं अर्थेसीं[१५] बीजें केलें : तेथ अर्थु[१६] राहावीला : तेथौनि साउमे चर्णचारी बीजें केलें : पुढें अंधकारू : तेथ सूद्रसेनाचेनि उजीयेडें बीजें केलें : साउमें तेज तें अर्जुनाचेनि साहावे ना : तेथ श्रीकृष्णचक्रव्रती पूढें : सुदर्सन मागें : माझारि अर्जुनु : ऐसें बीजें केलें : साउमीं सुवर्णाची[१७] भूमी : तेथ बीजें केलें : तेथ सेखसैया साउमां आला : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : मांचेयावरी आसन जालें : केंसीं श्रीचरण झाडीले : *मोतीयामाणीकांची*[१२] पूजा केली : *कनकाचां परिएळीं रत्नाचां दीपीं वोवाळिलें*[१२] : अस्तुति केली : मग लेंकरूंवें आणीलीं : श्रीचरणांवरि घातलीं : हात जोडुनि पुढां उभा ठाकला : मग म्हणीतलें : 'जी जी : एहीं आग्रहो घेतला म्हणौनि मीयां यें आणीलीं :' तैसेंचि श्रीकृष्णचक्रव्रती लेंकरूंवेंसी नीगाले : लखुमियेसि वेधु लागला : लखुमीं सरीसी नीगाली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रती श्रीमुगुटावरि श्रीकरू ठेउनी तेयातें राहावीतें जाले : अर्जूनें म्हणीतलें : 'जी जी : यें सरीसीं येतें असति तरि येओं कां दीजे ना ?' तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'हां गा : जेयाचेया ठायासि जाइजे तेयाचीया काइ

---

९ **भ.** सेइलें. १०. **पं.** °पोटांतुनि नेलें. **भ.** °वरिचांवरि नेलें. ११ **भग.** जळो जळो. १२ (**भग.**). १३ **ग.** °तयाचि परी पाताळीं पाहीलें : तवं तेथही नाही. १४ **एवा.** काष्टे रेखिलीं. १५ **भग.** रथेसी. १६ **भग.** रथु. १७ **एवा.** कास्मीराची.

आबुलीया नेइजति ?' तैसेंचि श्रीकृष्णचक्रवती बीजें केलें : *मागौतें स्वर्ग उतरतां श्रीकृष्णचक्रवर्तिन अर्जुनातें म्हणीतलें : 'अर्जुना : ए पाइरीवारि पाओं नको देओं : पाइरी चुकवी :' 'हो कां जी :' मग*[१८] बाळकेसीं द्वारावतिएसि आले : ब्राम्हणु सुखीया केला : ब्राम्हणांबाळकां भेटि जाली : मग बळभद्रदेवातें[१९] म्हणीतलें : 'आम्हां सुधि नव्हेचि : तुम्हांहीस्तव सुधि नव्हेचि : हा होये एकू अर्जुनु : सुधि करूनि लेंकरूवें घेउनि आला :'" ।।

तेव्हळि बाइसीं पूसिलें : "जी जी : तीयें श्रीकृस्णचक्रवतीसरिसीं नीगालीं तरि तेया सेखसैयासि क्षोभु नुपजेचि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेयाचां ठाइं वीकारू नाहीं : ते अवक्रीय वस्तु :" तवं मागिलाकडौनि उपाध्ये आले : बाइसें मागेंमागें कोमाइलीं ऐसीं जाताति : उपाधीं पुसिलें : "बाइ : आजि तुम्हीं मागेंचि काइ ?" बाइसीं म्हणीतलें: "बटिका : काइ सांघों ?" उपाधीं म्हणीतलें : "काइ बाइ ?" मग बाइसीं अवघी गोष्टि सांघीतली : "तैसें बटिका : आजि पाणीएं दीवा पाजळला होता : आजि बाबा बीजें करिता तरि काइ करितों ?" तवं उपाधीं म्हणीतलें : "ऐसा आग्रहो कां करिता ?" मग बाइसीं म्हणीतलें : "आतां न करीं बटिका :" ।।

## ३६४ पींपळगावीं घोळाणा आरोगणें

पींपळगावीं[१] मळां आसन जालें : चरणक्षाळण जालें : तवं तेथ चणा[२] खूडाणा जाला होता : गोसावीं उपाध्यांतें म्हणीतलें : " बटिका : घोळाणेयालागौनि पैल चणा घेउनि या गा : " उपाध्ये गेले : चणा खुडुनि आणिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : बोरें आणा गा : " उपाध्ये गेले[३] : मळेनिमळा हींडीनले : तवं काहीं बोरें नाहीं : आले : "जी जी : मीं अवघे मळे हींडीनलां : परि काहीं बोरें नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : ऐसें ऐसें जा पां गा :" गेले : तवं बोरांचें रनखणें[४] पडिलें असे : वेंचिलीं : घेउनि आले : गोसावीं बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : घोळाणा करा[५] :" तीये दीसीं बाइसें भगतिजनें भीक्षा करूनि आलीं : तीये दीसीं गोसावीयांसि भीक्षांनाची आरोगण दीधली : घोळाणा ओळगविला : सर्वज्ञें म्हणीतलें : "घोळाणामुक्षकरूनि भीक्षाअंन वाढा :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : मग गोसावीं तैसेंचि बीजें केलें : पापवीनासनासि : ।।

---

१८ (मुपं.). १९ **भ.** ब्राम्हणातें म्हणीतलें : "लेंकरुवें अर्जूनें आणीलीं :"

**३६४.** १ **हीराइसें**. पींपळगावांसरियां नागपूर. **एवा.** नागापुरि गव्हण : तेथ°. २ **भ.** चणा घोळाणेंयां जाला असे. ३ **भ.** °तवं ते बोरी आंब कीडौरी : उपाध्ये आले : गोसावीयांपुढां सांघीतलें : गोसावीं म्हणीतलें : "पैले बोरीचीं बोरें गोडे गोडे : घेया :". ४ **गो.** रवंखळें **ह.** श्रवण. **बी.** सारवण. ५ भ. °बाइसाकरवि घोळाणा करवीला : आलें : मीरीयें : हींगु : मीठ : नींबूवें पीळवीलीं : बरवा घोळाणा केला :

## ३६५ पापवीनासनीं आसन

मग गोसावीं पापवीनासनासि बीजें केलें : नावेक चौकीं आसन जालें : चरण-क्षाळण जालें : टीळा लाविला : वीडा जाला : मग गोसावीं बीजें केलें : कपाटासि *धार अवलोकीली : धारे आसन*[1] : ।।

## ३६६ कपाटीं माहात्मा बोलवणें

गोसावी वामौरीचेनि मार्गें बीजें करिताति : तवं तेथ कपाटीं माहात्मे एकु बैसले होते : तेयांतें सर्वज्ञें म्हणीतलें : " आपण एथ असिजे ? या नगरा भीक्षा कीजे ? " परि ते बोलति ना : वास[1] पाहाति ना : सर्वज्ञें म्हणीतलें : " देखिलें गा : कें रीगौनि ठेला असे : ऐसा जरि एथिचा होए तरि आन लेख लाहे :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " दांत असति तेथ चणे नाहीं : चणे असति तेथ दांत नाहीं : " ।।

## ३६७ वामौरीं दखिणेस्वरीं अवस्थान

तेथौनि गोसावीं वामौरिए दखिणेस्वरासि बीजें केलें[1] : बाइसें देउळ झाडावेया गेलीं : तवं मसक बहुत देखिले : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : एथ मसक बहुत असति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : गावांआंतौनि वीसदेओ आणा : आणि या नींबकाडिया वेंचा : आणि कवाड घालौनि धूं करा : आणि हे अवघे मसक जाती : " मग बाइसीं तैसेंचि केलें : मग भीतरि झाडिलें : चौकीं आसन रचिलें : तवं गोसावीयांसि पींपळातळि आसन जालें : गोसावीं भीतरि बीजें केलें : आसनीं उपवीष्ट जाले : तेथ अवस्थान जालें[2] : ।।

## ३६८ मळेसंदी माहात्मेयां वैराग्यकथन

एकु दीं गोसावी वीहरणासि बीजें करिताति : तवं दोहों मळेयांचीए संदीआंतु माहात्मा[1] एकु उघडाचि उभा असे : लखलख[2] करीत हीवं वाजत असे : तवं बाइसीं[3] म्हणीतलें : " बाबा : कैसा वीरग्तु : उघडाचि आहे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[4] :

---

**३६५.** १ (**मुराभगो.**). **गो**₂ धारेसि गौमूखापुर्वे आसन जालें : श्रीचरण दोन्हीं धारेसि घातले : मग कुंडाआंतु लोंवत श्रीचरण घातले : आणि कृपादृष्टी धार कुंड अळोकीलें : मग चौकीं नावेक आसन जालें :

**३६६.** १ **मुराबीभगो.** टकमका वास पाहाति :

**३६७.** १ **मुराबी.** °दक्षिणेस्वरीं नावेक आसन जालें : तवं मसक खावों लागले : एतुलेनि गोसावीं बाहीरि बीजें केलें : मग भक्तजनाकरवि . . . धुं करवीला. २ **मुरा.** °दीस तीन.

**३६८.** १ **हगो**₂ अवधुतु. २ **गो.** कणकण. ३ **एवा.** उपाध्यीं. ४ **मुरा.** °काइ म्हणत असा ? (**एवा.** बटिका : काइ°) "जी जी : कैसा वीरक्त :" सर्वज्ञें म्हणीतलें : "याचि लागि"

याचि कारणें :" तवं बाइसीं म्हणीतलें : *"याचि कारणें म्हणिजे काइ बाबा ?"* *सर्वज्ञें म्हणीतलें[5] : बाइ : "कीर्तिलागि : कां वीखयांलागि : यक सतेव वैराग्य :"* बाइसीं *म्हणीतलें : "हां बाबा : यासि वीखो कोण घालील ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ :* हे ऐसें *दीसत असति कीं : परि नगर पुर पाटणीं हे हातें हातु न पविजाति[6] :"* "ते कैसें बाबा ?" "बाइ : नगरांतुनि एक एति : ते यांतें हातीं धरूनि घेउनि जाति : उटीति : न्हाणीति : पाटाउवें सुताउवें वेढीति : बोट रूपेतवं आंगीं चंदन लावीति : तुपेंभातें जेउं सुति : आंथुरणाबाजेवरि नीजवीति : एरी दीसीं मागौतें तैसेंचि उघडेचि बैसले असति : तवं आणीक एक एति : ते घेउनि जाति : म्हणौनि हें वैराग्य तें वीखयांचि कारणें[7] : एक वैराग्य तें कीर्तीकारणें : सतेव वैराग्य तें दुर्लभ कीं बाइ :"।।

## ३६९ सोनैए वनदेवी वस्ति*

[मग गोसावीं सौनैये बीजें केलें : वनदेवाचेया देउळाआंतु चौकीं उभे राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें बळीपाचें देवत मां :" मग चौकीं आसन जालें : चरण-क्षाळण जालें : पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : तेथ वस्ति जाली : ।।]

## ३७० कानडी भालुगावीं त्रीपुरूखीं अवस्थान

सीधनाथीं आसन : गोसावीयांसि दोंपाहारांचा पुजाअवस्वरू त्रीपुरूखीं होए : बहिरवीं आरोगण पहुडू होए : ।।

## ३७१ गांगापुरीं वस्ति ।।

## ३७२ मार्गीं पदुमनाभी भेटि : धांदलमोक्षकथन

मार्गीं पदुमदेव भेटले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमची मातापीता : जोगनाएकु नीकेनि असति ?" "जी जी :" "मां तुम्हीं कैसेयापरी आलेति ?" "जी जी : तीएं मज नीगों नेदीति : दारवठां राखणें घातलिं : बाहिरें नीगों नेदितीचि : तेधवां जी[1] : *भाउजैया चर्येंसि सोल लावीली : ओहोणिचेया खांदावरूनि दुर्ग वेंघला : मग सोलां उतरलां जी[2] :"* मग[3] ते जीवीं म्हणों लागले : "ऐसीं पापीएं मज गोसावीयांपासि असों नेदीति : एथचें

---

५ **मुरा.** °तुम्ही म्हणत असा याचि लागि" तर्‍ही नुमटे : "जी जी : याचि लागि म्हणजे काइ ?°. ६ (**भ.**). ७ **हबी.** °ज्ञानेंवीण वैराग्य तें काइ करावें : °.

**३६९.** ***अ.** प्रतीत केवळ आदि आहे. सविस्तर लीळा **गो₁गो₂** प्रतीतून घेतली आहे.

**३७२.** १ **अ.** °मी दुर्ग उडौनि आलां. २ (**मुरागोगो₂**). ३ **मुरा.** मार्गीं बीजें करितां पद्मनाभी मनोर्थु केला : जें घरिचीं अवघींचि गोसावीयांचीं होतीं कां तरि मी गोसावीयांपासि असें लाहातां—.

सेवादास्य मी करीन तैसेंचि तीएंही करीतु कां :" सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "बटिका : मनोर्थ कीजताति ?" "जी जी :" बाइसीं म्हणीतलें : "वटिका : आतांचि आलासि : आणि आतांचि मनोर्थ काइसेयाचे गा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू धांदल-मोक्षासि जाओं पाह्मत असे :" "तें कैसें बाबा ?"

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : धांदलु एकु कुणबी होता : तो दुबळा : तेयाचेया सेतासि स्वर्गीहुनि इंद्राचा हाति[५] चरावेया ए : तयाची तुरि[६] खाउनि जाए[७] : एकु दीसु तेणें देहा तुरि पांहिली : तवं अवघी खादली देखिली : एतुकेनि तो जागों राहिला : तवं तो हाति एतां देखिला[८] : हातीं डांग घेउनि धावीनला : एकें हातें पुंस धरिलें : एकु घाओ दीधला : तैसाचि तो हाति उपवला : तेयातें स्वर्गासि घेउनि गेला : तवं इंद्रमुक्षकरूनि इंद्रसभा बैसली असे[९] : 'चोरां दीधलें तुमचें म्हैसरूं : माझें आवघें सेत खादलें[१०] :' तेहीं म्हणीतलें[११] : 'तुझें कीती खादलें ? तें आम्हीं देउनि : तुं बोबाओं नको : तुं आपुली जाडि पसरि[१२] :' तेणें आपुली जाडि पसरिली : तेहीं सोनें घातलें : मोटु वांधली : मग तेणें म्हणीतलें : 'आतां मीं जाओं कैसा ?' तेहीं म्हणीतलें : 'आलासि कैसा ?' 'ना म्हैसरूवाचें पुंस धरूनि आलां :' मग तेहीं म्हणीतलें : 'या म्हैसरूवाचीए पाठीवरि मोट ठेवि : आणि तुं याचें पुंस धरि : आणि जाए : परि आपुलां सेतीं आमचें म्हैसरूं चरों देयावें हो :' 'ना हो कां :' तें तो द्रव्य घेउनि आला : मग तेयाचां घरीं संपति जाली : तुपेंभातें जेउं लागला : तांबोळें घेओं लागला : ऐसा असों लागला[१३] : तवं सेजींसाइलीं म्हणों लागलीं : 'सांपें धांदल दादो अनसारिखा दीसतु असे :' ऐसें एकीं म्हांतारीयां पुसिलें : 'हां धांदल दादो : सांपें तुज खावेयापेयावेया आपार ऐसें जालें : सेताकडे जासि ना : तें काइ ? ऐसी उव काइसी ?' तवं तेणें म्हणीतलें : 'आओ : तुम्हांपुढें काइ सांघों ?' मग तेणें अवघी गोष्टि सांघीतली : मग तींहीं म्हणीतलें :

४ **मुराहबी.** °"बाइ : यापासील जाडि घेया :" "कां बाबा ?" "तयां अवघेयां एथची बुधि होए कां : मग मी एथ असों लाहीन : ऐसें म्हणतु असे : तया बुद्धि काइ याचेनि होइल ? तेया बुद्धि काइसी ? तेया इतुलीया ऐसीया आसू होआवीया : आणि हा होआवा : तीयें एथचीया बुधी काइ करिती : बाइ धांदलाचीया परी पोरू सकुटुंबी मोक्षा जावों पातु असे :" ५ **मुराहबीभ.** ऐरावति. ६ **मुराहबीभ.** तयाचें पळ्हें. ७ **मुराहबीभ.** °तो दीसवडि पळ्हें चरौनि कोणाचें ढोर जात असे पां : म्हणौनि राखों ठेला : ८ **मुराहबीभ.** °हें जयाचें म्हैसरू तयाचेया घरा नेवों : म्हणौनि पूंस धरिलें : तो उपवला. ९ **मुराहबीभ.** "हें म्हैसरूं वीका ना कां ? चोरां कां देया ना ? माझें अवघें सेत–. १० **एवा.** माझी अवघी तुरी खादली. **मुराहबीभ.** °आतां मी दावो काइसेन फेडीं ?" ११ **मुराहबीभ.** °तुझीये सेतीं कीती होए ?" "ना बीटी दोनि होति" . . . . . १२ **मुराहबीभ.** °तुझेनि नेववें तीतुकें ने :" १३ **मुराहबीभ.** °मागौतें सेत पीकलें : पळ्हें वेचावेया जालें : मोलकैयें बोलावीलीं : पळ्हें वेचीतां एकीं पुसीलें : "हां गा : धांदुलदादो : तुंतें खावेया कैसेनि जालें ?" तेणें मागिल अवघें सांघीतलें :

'हो कां : तरि आमतें घेउनि जासी ?' 'हो कां : मज सांघातें वीळीचां सेंतासि या : मग मीं नेइन :' मग तिएं सेतासि गेलीं : तवं तो हाती आला : आणि तेणें पुंसीं धरिला : तेयाचें कढिवें तेहीं धरिलें : एरें एराचें धरिलें : ऐसी माळ जाली[१४] : एतुकेनि तेणें हाति डांगा पाठीवरि हाणीतला : आणि तो उपवला : ऐसीं गगनमार्गें जाताति : तैसी[१५] गगनमार्गें जातु कां : तवं म्हांतारीया एकीं पुसिलें : 'हां धांदल दादो : तेथ दामाचा कापुसु कीती ?' 'ना इतुका :' म्हणौनि हात[१६] पसरिले : हातिचें पुंस सुटलें : आणि अवघींचि पडलीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्वर्गीं काइ तेणें कापुसु देखिला होता ? परि लटिकेयातव तीएं अवघीं पडलीं : आत्महत्येसि कारण जालीं : म्हणौनि लटिकें न बोलावें : तैसें वाइ : पोरू धांदलमोक्षासि जाओं पाहातु असे :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : कोवळें इंद्रवण असे : ते तोडिजे तन्हीं तुटे : तेंचि देंटीं नीबर जालेयां तोडीजे तन्हिं न तुटे : ऐसाहीं जारि तोडीजे तन्हि मुळेसीं वेलि हातासि ए : तैसा उभयजरठु निरूपणाचेनि आक्रोशेंकरूनि भीक्षा करविजे तारि अवीघेसींचि उठी[१७]"* ।।

## ३७३ फूलसरां वस्ति ।।

## ३७४ एळापुरीं अवस्थान*

[ मग गोसावीं एळापुरा बीजें केलें : चतुर्विधाचां मढीं अवस्थान जालें : दीस पन्हरा : ।। ]

## ३७५ प्रमाणअनुभव नामकरणीं पदुमनाभी सीक्षापण

*परमाणुभवदेव ते उपाधीस्थुळ : येकी आसूचें तांबोळ येका वीडेयासि लागे[१] :* पदुमनाभि ते नागझरीएकडे धोत्रें धों गेले होते : तवं तेथें प्रमाणअनुभवदेवांचे सीक्ष आले होते : तेयांतें पदुमनाभि पुसिलें : "तुमचेया गुरू नावं काइ ?" तेहीं म्हणीतलें : "ना प्रमाणअनुभवदेव :" तवं पदुमनाभीं म्हणीतलें : "तुमचेया गुरूचा अनुभव तो काइ प्रमाणुचि इतुका ?" तेहीं जाउनि आपुलेया गुरूपुढां सांघीतलें : तवं ते क्षोभले : पदुमनाभिदेव तैसेचि बोढारासि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू भीतरि रीगों नेदा : कवाडें घाला :" तवं बाइसीं म्हणीतलें : "कां बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

१४ **एवा.** लाविली. १५ **गो**$_2$ °उगींचि जाती तरि जाती : तवं$_5$—. १६ **एवा.** वाव. १७ (**दृपा.** ३५. 'इंद्रवणाचा दृष्टांत' 'पद्मनाभीसि धांदलमोक्ष प्रकरणी निरूपिला'—**दृस्थ.**).

**३७४.** *(रा.).

**३७५.** १ (**मुराहबी.**). **मुराहबी.** °तेयाचेया बीढारा पदुमनाभिदेव गेले : तेहीं मानु केला : बैसों घातलें : तयांतें पुसिलें : "तुम्हां नावं काइ ?" "ना आम्हां नावं परमाणुभवदेव :" मग व्याकरणीचेनि सुत्रें नकारा नुकारा भेदु नाहीं म्हणौनि तेयांचें नावं खंडीलें : "तुमचा अनुभउ काइ परमाणु येतुका ?" तेहीं म्हणीतलें : "घाला घाला बाहीरी–."

"बाइ : पोरू प्राणीयाचें चैतन्य पोळुनि आला असे[२] : आतां एथौनि याचें मुख न पाहीजे :" बाइसीं कवाडें घातलीं : एतुकेनि ते रडों लागले : बाइसांसि अनुकंपा उपनली : "बाबा : बापुडा बटीकु कीउलवाणा रडते : एओं दीजो बाबा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सेणेंमातीया आंग माखौनि तेयासि आड पडावें : मग ते होउनि एथ नीरोविति[३] तेव्हळि यासि रीगों दीजैल :" मग बाइसीं म्हणीतलें : "पोरा : बाबा म्हणताति तें करि जाए :" मग तेणें सेणेंमातीया आंग माखौनि तेयांसि आड पडिले : तेहीं पुसिलें : "हे कोण ?" तवं तेयाचां सीक्षीं म्हणीतलें : "मघां मातें जेहीं पुसिलें : ते :" ऐसें सांघीतलें : तवं ते अधीक क्षोभले : मग तेयांसि अनुकंपा उपनली : मग तेहीं उठवीलें : मग पदुमनाभी म्हणीतलें : "आतां तुम्हीं होउनि नीरोवाल तरि गोसावी रीगों देती : एऱ्हवीं नेदीति :" *तीहीं म्हणीतलें : "ऐसे गा ते श्रीचांगदेओराउळ नीके : तेयांचां ठाइं ऐसें काइ असे ?" धुतलें[४] :* मग तेहीं गोसावीयांपासि आणिलें : "जी जी : आतां[५] राहों देइजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तुमचे होते असती हो :" "जी जी :" मग नीरोविलें : ।।

## ३७६ हातनौरीं नरसींहीं वस्ति ।।

## ३७७ कानरडे ब्राह्मणग्रहीं द्राक्षघडु स्परिसणें

गोसावीं कानरडेसि बीजें केलें : मळां आसन जालें : दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु : उपहुडु जाला : तवं ब्राह्मणु एकु आला : तो गोसावीयांतें घेउनि आपुलेया आवारासि गेला : गोसावीयांसि[१] मर्दना जाली : मादणेंयासि बीजें केलें : आणि उभे जाले : द्राक्षीचा माडौ होता : द्राक्षाचे घड लोंबत होते : तवं घडासि श्रीमुगुटु लागला : आणि गोसावीं श्रीकरीं स्पर्सीला : मग गोसावीयांसि पुजा जाली : मग तेहीं ताटीं घालुनि एक घडु गोसावीयांसि ओळगविला : गोसावीं काहीं प्रसादु केला : मग गोसावीयांसि ताट केलें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : मग गोसावीयांसि तेथ भगतिजनासहीत वस्ति जाली : ।।

---

२ **मुराहबी.** °बाइ : परमाणुभवांचेया ठाया गेला : तीहीं एथीचा म्हणौनि मानु केला : तेयातें म्हणीतलें : 'प्रमाणुयेतुला अनुभउ म्हणौनि परमाणुभव म्हणीजे :' तीहीं बाहीरा घातला°. ३ **मुराहबी.** °तेयातें म्हणों : 'आमचा होता : आपणापासीं असों देया तरि–. ४ (**मुराहबी.**). ५ **मुराहबी.** °हे आमचे होते असों देयावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा तुमचा होता येथौनि स्वीकरीजतु असे :"

**३७७.** १ **मुराबी.** °मर्दना : मादणें : पुजा : आरोगण जाली : रात्रीं चांदिणें पडिलें होतें : दारीं द्राक्षीचा माडौ होता : द्राक्षाचे घड लोंबत होते : रात्रीं वेढे करितां गोसावीं द्राक्षिघड स्पर्शिला : मग तेथ वसति जाली : ।।

## ३७८ साएगव्हाणीं वस्ति ।।

## ३७९ वागुळीए वस्ति ।।

## ३८० कानसे मळां देवां : सीक्षां भेटि

गोसावीं कानसेसि बीजें केलें : गावा दक्षीणे मळा : तेथ आसन जालें : तवं बाइसीं म्हणीतलें : " हें काइ बाबा : आजि उदीयांसीचि काइ राहाविजते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : मागें पानरटा[1] उडे ऐसीं उडतें एताति : " *दादोस बीडीहुनि गेलेयां कीतीएकां दीसा श्रीप्रभूचेया दर्शना गेले होते : तेथौनि मागौते आमचेया गोसावीयांचेया दर्शना नीगाले : नीगतां*[2] रीधपुरीं देवीं श्रीप्रभूतें पुसिलें : " जी जी : श्रीचांगदेओराउळां गोसावीयांसि मज कवणी ठाइं भेटि ? " श्रीप्रभूनि म्हणीतलें : " आओ मेला जाए : कानडीभालुगावांसि जाए म्हणें : " तैसेचि नीगाले : ते गोसावीयांपासि नैएतीचि[3] : वडनेरेयावरौनि वेवदेयासि गेले : मां एल्हाइसें आंगणीं आंबिलीचा डेरा खरवडीतें होतीं : तींहीं पुसिलें : " दादो : तुम्हीं कें जाता ? " दादोसीं म्हणीतलें : " ना मीं श्रीचांगदेओराउळां गोसावीयांचेयां दरीसनासि जातु असें : " एतुकेनि तेयां स्तीति जाली : तीएं डेरेयाआंतु डोइ भवंडीति : दादोसीं डेरा फोडिला : आणि स्तीति भंगली : मग तेहीं म्हणीतलें : " हो कां : दादो : मातें नेसी ?" " ना हो : चाला : " मग तीएं दोघें रावंसगावांसि आलीं : माहादाइसें : उमाइसें भेटलीं : तेहीं पुसिलें : " दादो : कें जात असा ? " " *ना मी श्रीचांगदेओराउळ गोसावीयांचेया दर्सना जातें असें*[4] *:* " तवं तेहीं म्हणीतलें : " आम्हीं एउनि : " तैसींचि चौघें साडेगावांसि आलीं : तेथ गौराइसीं इंद्रभटीं म्हणीतलें : " आम्हींहीं एउनि : " काको[4] : सारंगपंडीत : सामको : ऐसीं अवघीं कानडीभालुगावांसि आलीं : तेथ गांविचेयांतें पुसिलें : "एथ श्रीचांगदेओराउळ गोसावी आले असति ? " तेहीं म्हणीतलें : " हें नव्हे एळापुरासि बीजें केलें असे : " तैसेचि ते एळापुरासि आले : तेथ सोधिलें : तवं तेहीं

---

**३८०.** १ **गो.** पानरटेंऐसीं°. २ (**मु. शोध : स्वमति**). ३ **मुराबी.** °ते चारठाणेयां आले : तेथ माहादाइसें : साधें होती : तेयांचीए वोसरीएवरि बैसले : श्रीप्रभूची महीमा नीरोपुं लागले : साधीं म्हणीतलें : " पींसें पींसें राउळ ते ?" " हो वो : पींसे पींसे राउळ ते : " तैसीचि स्तीति जाली : **एवा.** साधें डेरा खरवडीतें होती : तीहीं पुसीलें : "रामा : कवणीकडुनि एत अससि ? " " ना ऋद्धिपूरूनि : " " काइ करूं गेला होतासि ? " " ना श्रीगुंडमराउळां गोसावीयांचेया दर्शना : " " गुंडमराउळ ते कवण ? लेकरूवांपाठीं धांवति : पींसे पींसे ते ?" "होये वो ते : " आणि डेरेयांतु डोइ सुनि : " होये वो ते : होये वो ते : " म्हणौनि स्तीति जाली : **ह.** °गुंडमराउळ ते कवण ? लेकरूवांपाठी धांवति : पींसे पींसे ते ? " " होये वो ते : " "आतां कें जातासि ?". " ना श्रीचांगदेवोराउळ गोसावीयांचां दरीसना जातु असे : " आणि तैसीचि तेयां स्तीति जाली°. ४ **गो.** मार्कंड : सामको : सोभागें : आवधी.

म्हणीतलें : " गोसावीं कनरडेसि बीजें केलें : " तैसेचि ते कनरडेसि आले : तेथही सोधिलें : तवं गोसावीं साएगव्हाणासि बीजें केलें : तैसेचि ते साएगव्हाणासि आले : साएगव्हाणीं पुसिलें : तेहीं म्हणीतलें : " हे नव्हे गोसावीं वागुळीएसि कालि बीजें केलें : " वागुळीए वस्ति जाली : तवं देवीं आणि माहादाइसीं म्हणीतलें : " आजि जेधवां गोसावी भेटती तेधवां अंन : गोसावीयांचें चरणउदक तें उदक : प्रसादु तें अंन : " एरातें म्हणीतलें[5] " तुम्हीं अवघीं हळुहळु या : आम्हीं आजी जाउनि : " देव माहादाइसें नीगालीं :

तीएं कानसेसमीप आलीं : तवं दोघे जोगी आणि जोगीणि गोसावीयांतें वानितें-वानितें जाताति : जोगीणि म्हणीतलें : " देवा देवा : कैसा पुरूखू : साक्षांतु गोरक्षू ! " " हो देवी : " तें दादोसीं आइकिलें : मग देवीं पुसिलें : " कोणातें वानिता ? " तेहीं म्हणीतलें : " काइ सांघों ? कानसेचां मळां एकु पुरूख असति : ते साक्षात देओ : साक्षात गोरक्षु : ऐसें लावण्य : सौंदरीए देखिलेंचि नाहीं : *इतुकीं देसदेसाउरें : नगरें : पुरें : पाटणें हींडीनलों : पारि ऐसे पुरूख नेदखों*[6] *:* " तवं माहादाइसीं म्हणीतलें : " दादो : ते आमचेचि गोसावी होती : " *मग म्हणीतलें : " आमचीं मागिलेकडे एतें असति : तयांपुढें सांघावें : तुमचे गोसावी पुढील गांवीं मळां असति*[7] : " आणि तैसींचि तीएं हरखैजतें-हरखैजतें आलीं : तवं गोसावीयांतें देखिलें : जेथौनि देवीं गोसावीयांतें देखिलें तेथौनि दंडवतेंसि आले : श्रीचरणां लागले : देवांसि गोसावीं क्षेमाळींगन दीधलें : बैसले : मग गोसावीं पुसिलें : "कोण कोण एतें असति ? " देवीं अवघेयांचीं नावें सांघीतलीं : उपाधीयांतें : चांगदेओभटातें साउमेयां पाठवीलें : अवघेयांसि गोसावीयांचें दरीसन जालें : श्रीमूर्ति अवळोकितें बैसलि असति : *गोसावीं पुसिलें : " तुमचीं आवघीं आलीं : कीं कोण्हीं मागां असे ? " " जी जी : सोभाग मागें असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें ? सोभाग आले ? " गोसावीं हरीखू स्वीकरीला : सर्वज्ञें म्हणीतलें : " मार्कंडा जा : सोभागातें पाठकुळीये घालुनी आणां : " मार्कंड गेले : आणिलीं : बैसलीं*[7]*:* एल्हाइसें मागिलीकडौनि आलीं : *बाइसीं चरणक्षाळण केलें आवघेयां चरणोदक प्रसाददान केलें : आवघेयां तांबोळ प्रसाददान केलें : एल्हाइसीं तांबोळ हातीं घेतलें : एल्हाइसीं म्हणीतलें : " काको घेइल तरी मीं घेइन : " काकोसीं भीतारी घेतलें : मग एल्हाइसीं घेतलें*[7] तीएं वेधिलीं : तीएं उभींचि श्रीमूर्ति अवळोकितेंचि राहिलीं : डोइएचें पोतें गळेयासि आलें[8] : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांचीए गळांचें पोतें फेडा : यांसि उदक पाजा : यांचा माथा सींपा : " मग बाइसीं तैसेंचि केलें : मग तीएंहीं बैसलीं : *पोतें सोडीतां बाइसीं म्हणीतले : " बाबा : हें ऐसें काइ ? " सर्वज्ञें*

---

५ **मुराबी.** °जयासि टाकैल तीहीं यावें : नटकें तरि तीहीं हळुहळु यावें : आम्हीं आजि गोसावीयांतें देखौनि : "°. ६ (**गो**$_2$). ७ (**मुराबी.**). ८ **मुराबी.** °दादोसीं म्हणीतलें : "एल्होचीये गळांचें पोतें घेया : एल्हो गोसावीयांसि नमस्कारु करील :

*म्हणीतलें : " बाइ : तीर्थ : देवता : पुरुखू : एं तीन्हीं जीवातें आपलवीति : तीर्थ जैसी वाराणसी : देवता जैसी सारंगधरू : आणि पुरुखू जैसें हें : आणि काइ : " एल्हाइसें दंडवत न करीतिचि : गोसावीं श्रीचरणु साउमा नेउनि आंगुठा नीडळीं लाविला : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : यें तुम्हांसि काइ होति ? " " जी जी : संबंधीयें[९] : " मग गोसावीं एरांतें अवळोकूनि आबैसातें पुसीलें : " बाइ : यें कवणें[१०] ? " " जी जी : यें अवडळांची माता : हे अवडळांची लेकी : हा अवडळांचा जावाइ : " ऐसें यें अवडळीं लावीलीं[११] : ।।*

## ३८१ दमनीका स्वीकारें एल्हाइसां साधें नामकरण*

[मग देवीं एल्हाइसें आंघोळी धाडिलीं : देवीं वीहीरी दाखवीली : " येल्हो : स्नान करी : जाये : " गेलीं : आंघोळी केली : माळीयातें म्हणीतलें : " आलेया : काहीं वावेया दे कां : " तवं काहीं नाहीं : दवणेयांचे वापे पाणीयें भरीले असति : " घेया जा : " घेतला : तेथचि वोहळीला : घेउनी आलीं : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : दवणां गळतु समुळीं वाइला : पुजा केली : पुढां उभीं राहीलीं : दोन्ही हात जोडुनी म्हणीतलें : " जी जी : संसारीं जन्मलेयाचें फळ आजि जालें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें कैसें ? " " जी जी : जैसे तुम्हीं देखीलेति : " " ऐसें होए : "

तवं बाइसें आलीं : तवं श्रीमुर्तिवरि दवणी थीपतु असे : " ऐसें कोणें वो केलें बाबासि ? " " म्हणौनि सवीया दीघलीया : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांसि कां कोपतें असा ? यें वराडीची साधें कीं : " एथ गोसावीं साधें नावं ठेविलें : ।। ]

## ३८२ गणपति ठाकूरा भेटि*

[गणपति ठाकुरू तो कटकीचा : तो एकु दीं गोसावीयांचेया दर्शना आला : गोसावीयांसि उदेयाचा पुजाअवस्वर जालेयानंतरें गोसावी वीहरणासि बीजें करिताति : तवं मढादक्षिणे भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " केव्हळि आलेति ? " " जी जी : आतांचि आलां : नारीएळ दर्सना केलें : मग गोसावीं प्रमाणूअनुभवदेवांचीए गुंफेसि बीजें केलें : " एइजो जी : एइजो जी : " म्हणौनि साउमे आले : दंडवत घातलें : पटिसाळेवरि आसन रचीलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग तेहीं उदक आणीलें : श्रीचरण प्रक्षाळीले : वीडा वोळगवीला : नावेक तेथचि आसन जालें : मग गणपति ठाकुरासि पाठवणी दीधली : मग वीहरणासि बीजें न करीतीचि : मढासि बीजें केलें : ।। ]

---

९ **एवा.** चुलती. १० **एवा.** "बाइ : यें किं अपुर्वे ?" ११ (**भ.**).

**३८१.** * ही लीळा **अ.** प्रतीत नाहीं. **मुरा.** प्रतींतून येथे घेतली आहे.

**३८२.** * ही लीळा **गो,गो**$_{२}$ प्रतीतून घेतली आहे. अन्यत्र ती आढळत नाही.

## ३८३ सामको मदळसा नाम करणें

गोसावीं सामकोतें म्हणीतलें : "हें काइ बाइ : इतुलेयां दुरि कैसीं आलींति ?" "जी जी : आपुलेया गोमटेयाचि कारणें आलीएं जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं आलीति : मा एं कां आलीं ?" "जी जी : तीएं आपुलेया गोमटेयाकारणें आलीं :" गौराया[1] गोसावीयांकारणें पाइं चींधीया बांधलीया : वाहाणा वर्जिलीया : माथांचें न्हाण वर्जिलें : तेल : तुप : दहीं : दुध वर्जीलें : बरवीं अंनें वर्जीलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ए धाकुटधाकुटीं एथिचेया दरीसनासि आलीं : मां एथिचें पीसें एक असे : तें लागैल तेह्ळि काइ कराल ?" "जी जी लागो कां[2] : तरि एं दैवांचीं : भाग्याचीं :" "ऐसें तरि तुम्हीं मदळसा म्हणा :"।।

## ३८४ इंद्रभटातें सुखस्वास्ति पुसणें

गोसावीं इंद्रभटांतें म्हणीतलें : "तुम्हां सुखस्वास्ति कोणापासौनि ?" इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : दादोसापासौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तुम्हां माहात्मेयांपासौनि : तरि तुम्हीं एथिचेया दरीसनासि आलेति तें काइ ?" "ना जी : द्वापरीं श्रीकृस्णचक्रवर्तिपासौनि[1] अकृत्रिमु आनंदु आति : तैसाचि आमचेया गोसावीयांपासौनि आति : म्हणौनि धर्माचेया चाडा आलां जी[2] :" "धर्माचेया चाडा आलेति : तरि यातें कां आणिलें ?" तवं तेहीं म्हणीतलें[3] : "धर्मे च : अर्थे च : कामे च : मोक्षे च एतुलां अर्थीं स्त्री वंचुं नैए : म्हणौनि आणिलीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "परम मोचक काइ असे गा ?" "ना जी : तरि आपुलेया गोमटेयासि आली : आणि काइ जी :" मग बाइसीं श्रीमुखिचें तांबोळ अवघेयांसि दीधलें : ।।

## ३८५ ब्राह्मणा अभ्यार्थनी त्यातें जेउं पाठवणें

ब्राह्मणु[1] एकु गोसावीयांपासि आला : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : मग तेणें ब्राह्मणें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझेया आवारासि बीजें करावें :" सर्वज्ञें

---

**३८३.** १ **एवा.** गौराइसीं. २ **गो.** °तरि यें आवघींचि गोसावीयांचीं होतीं : देवाचीं–.

**३८४.** १ **शोध.** °नरां : पशुवां : तीर्यंचा—. २ **मुराबी.** °आनंदु तो ब्रह्मणोरुपिणी. ३ **मुराबी.** "धर्मे च अर्थे च कामे च नातिचरितव्या : नातिचरामि : ऐसें म्हणीतलें असे कीं :" गोसावीं म्हणीतलें : "परि मोक्षेच नाहीं कीं ?"

**३८५.** १ **मुरा.** मग माहादाइसीं गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनती स्वीकरीली : माहादाइसें उपाहारू नीफजउं लागलीं : तवं गावांतुनि ब्राह्मणु एकु आला : दंडवतें घातलीं: श्रीचरणां लागला : गोसावीयांसि वीनउं आदरीलें : "जी जी : माझेया घरा गोसावीं बीजें करावें :" गोसावीं म्हणीतलें : "हें देखीलें : रंधन वर्त्तत असे :" "जी जी : तरि माहात्मेयातें धाडावें :" गोसावीं

म्हणीतलें : " आजि एकादसी : तुम्हीं नावेक राहुनि यावें : आतां हेंनैए : मग एइल :" " जी जी : तरि यां अवघेयांतें पाठवावें :" मग देव : इंद्रभट : काको : मार्कंड : उपाध्ये : चांगदेओभट : उपासनीए : पदुमनाभि : ऐसे अवघेचि पाठवीले[२] : " जी जी : बाइयांतें पाठवीजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : " यांसि आजि एकादसी :" " जी जी : आजिची एकादसी मजकारणें मोडावी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " यांसि मोडणें नाहीं : एं मासउपवासीएं :" मग गोसावीं देवांतेंचि पाठवीलें : आणि माहादाइसीं जीवीं म्हणीतलें : " गोसावी दादोसांतें राहावीतु कां : मां यांसि गोसावीयांची पांति होइल :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : काइ लुखलुख[३] वर्तत असे ?" *म्हणौनि श्रीकरें ऐसें केलें : गोसावीं दादोसातें म्हणीतलें : "माहात्मे हो : तुम्हीं राहा[४] :"* मग देव राहिले तवं माहादाइसीं उपाहारू नीफजविला : मग गोसावीयांसि दूपाहारिचा पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : देवांसि पांति जाली : ।।

## ३८६ रात्रीं ब्राह्मणाघरीं पुजा आरोगण

मग वीळीचांचां वेळीं तो ब्राह्मणु आला : गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीं नगराआंतु बीजें केलें : तेणें ब्राह्मणें सडासमार्जनें केलीं : चौकरंगमाळिका भरिलीया : गुढिया उभिलीया : रूइचेया डेंसेयांचें[१] तोरण बांधलें : आंगणीं बाजसुपवती घातली : तेयावरि बाइसीं आसन रचिलें : मग गोसावीयांतें तेथ आसन जालें : तेयांची[२] ब्राह्मणि गोसावीयांचे श्रीचरण प्रक्षाळावेया तांबीया भरूनि उदका घेउनि आलीं : तीएचीए हातीचा तांबीया बाइसीं घेतला : मग बाइसें गोसावीयांचें श्रीचरणप्रक्षाळण करूं लागलीं : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : राहा[३] : आजि एथचेया येजमाना करूं देया :" मग तेहीं गोसावीयांचें श्रीचरणप्रक्षाळण केलें : चरणउदकें घराचे च्यान्ही कोनटे सींपिले : कोठा सींपिला : बाइसीं म्हणीतलें : " बाबासि बहुत दीस माजणें नाहीं : चोखणी करा : पाणीं ठेवा :" तेहीं चोखणी केली : पाणीं[४] ठेविलें : बाइसीं गोसावियांतें माजणेयांलागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांसि[५] ओलणी दीधली : ओसरीएवरि आसन घातलें : आड कानवडा लाविला : पदुमनाभिदेव गोसावियांसि मर्दना देत असति : दादोसीं म्हणीतलें : " एल्हो : जाए पां पाहे : गोसावियांसि कैसा अवस्वरू असे ?" साधें आलीं : तवं

म्हणीतलें : " जा गा :" २ **भ.** गोसावीं भक्तजन पाठउं आदरीलें : तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : सदर्थाचें लेंकरूं लोकांचेया घरा कैसें जेउं जाइल ? बटिकातें राहावावें :" म्हणौनि पद्मनाभिदेव राहावीलें : ३ **मुरा.** °लुकलुकीतें. ४ (**मुरा.**).

**३८६.** १ **भगो.** ठेसेयाचें. **बी.** देठयाचें. २ **गोह.** तो ब्राम्हणू . . . घेउनि आला. ३ **मुरा.** °एथचीं येजमानें धुती. ४ **मुराबी.** पाणी ठेविलें होतें तेथचि आणिक रीचवीलें. ५ **गो**[२] °मर्दना

बाइसें गोसावीयांचें आंगीटोपरें लेउनि आंगणीं[६] वेढे करीत असति : साधें ' गोसावी ' म्हणौनि बाइसांसि दंडवत करूं बैसलीं : " एल्हो : मीं : बाबा ओसरीएवरि असति : " ऐसीं साधें आलीं : कानवडा[७] उघडूनि गोसावीयांतें पाहातें असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ साधें हो : देओ पाहिजत असिजे ? " " जी जी : " " या : देओ एथ असे : " तैसींचि साधें गोसावीयांपासि आलीं : दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं मर्दना देओं जाणा ? " साधीं म्हणीतलें " ना जी : मर्दना देओं नेणें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि वरैतातें कोण उटी ? " " ना जी : आमतें चाटें[८] बहुत असति : ते आंगें उटिति : " " तरि लेंकरूवांतें कोण उटी ? " " ना जी : तीएं तैसींचि गोरसीजति[९] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मां तें गोरसणें[१०] एथ दाखवा पां : " " हो कां जी : " म्हणौनि परतीं गेलीं : गुडघेयांवरता कासोटा[११] दीधला : ऐसाचि मोकळा पालउ : ऐसींचि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : आपुली मांडी परपुरूखा देखों नेदिजे कीं : " गोसावीं कासोटा फेडवीला : एकी नीरीचा कासोटा देववीला : श्रीकरेंकरूनि पालउ खोविला : *सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुमतें बळ असे तेतुलेंही एथ दाखवा[१२] : "* मग तेहीं चीकसा घेतला : गोसावीयांचां श्रीकरीं लाविला : श्रीचरणीं लाविला : तळीलु वरि : वरीलु तळि : ऐसा श्रीचरणु उटिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : आतां पुरों देया : तुमचेया[१३] वारीया पदुमनाभि उटील : " मग पदुमनाभिदेवीं मर्दना दीधली : तीएं गोसावीयांजवळि बैसलीं होतीं : मळीया पडति तेयांचा गोळा करीति : मग गोसावियांसि मर्दना जाली : तेहीं मळीयांचा गोळा भीतरि घेतला : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ साधें हो ? " " जी जी : प्रसादू घेतला : " मग गोसावीयांसि चौरंगावरि आसन जालें : गोसावीयांचां श्रीमुगुटीं चोखणी ओळगविली : पदुमनाभिदेव गाडू ढाळिति : बाइसें श्रीमुगुटु चोखिति : श्रीमुर्ति प्रक्षाळिति : गोसावियांसि मादणें जालें : बाइसें वस्त्रें आणुं गेलीं : गोसावी उभे जाले : पदुमनाभि गाडू ढाळीत असति : तवं[१४] साधीं पुष्टिवीभागीं आंजुळी ओडवीली : तें पाणी भीतरि घेतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ साधें हो : बाइसांसि भीया ना ? " तेहीं म्हणीतलें : " इतुलेयासीचि काइ जी : " मग बाइसें वस्त्र घेउनि आलीं : साधें परतीं गेलीं : मग उदक घेतलें : गोसावीं वस्त्रें वेढिलीं : मग गोसावीयांसि भीतरि आसन जालें : मग गोसावीयांसि चंदनाचा आडा रेखिला : मग पुजा जाली : धूपार्ती केली : मंगळार्ती केली : मग गोसावीयांसि ताट जालें :

---

देयावेया आंगवसा पडदणी वोळगवीली. ६ **गोगो.** °बैसलीं होतीं. ७ **ह.** आधीं लावणें उचलौनि पाहिलें. ८ **भ.** नायकवडि. **मुरा.** °नाएका वागंडु°. **गोगो.** °दाळदीगोवळे उटीति. ९ **मुरा.** परिवसजति **बी.** परिसजति. १० **मुरा.** परिवसणें. ११ **भ.** कासोडा. १२ (**हीराइसें.**). १३ **मुराबी.** तुमची होती– **ह.** तुमचें होतें–. १४ **गोगो.** बाइसें जवं वस्त्रें आणुं गेलीं तवं

गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : साधीं बाइसांतें प्रसादू मागितला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : साधांसि तीं बोटांमध्यें सामावे इतुका प्रसादू देया :" मग साधीं प्रसादू घेतला : मग गोसावीं तेयांसि पाठवणी दीधली : गोसावीं म्हणीतलें : "साधें हो : आतां बीढारा जा : रात्रि वडील जाली : पद्मनाभी : साधांतें बोळवीत जा :" मग साधें बीढारासि गेलीं : ।।

मग दादोसीं म्हणीतलें : "हें काइ एल्हो : तुतें मीयां गोसावीयांचा अवस्वरू पाहों पाठवीलें कीं : मा सांघों कैसीं नैयाचि ?" साधीं म्हणीतलें : "काइ सांघावें असे ? गोसावीयांसि पुजाअवस्वरू होइल ऐसें काइ नेणा ? गोसावीयांसि मर्दना जाली : मादणें जालें : पुजाअवस्वरू जाला : धूपार्ती मंगळार्ती जाली : आरोगण जाली : गुळुळा जाला : मज प्रसादू दीधला : मग मी आलीएं :" तें दादोसांसि न मनेचि : ।।

## ३८७ मार्गीं ब्राह्मणा अनुवर्जनीं वरप्रदान

उदीयांचि गोसावीयांसि उपहुडु जाला : गोसावीं प्रश्रयासि बीजें केलें : उदकासि वीनीयोगु जाला : मग तेहीं आसन रचिलें : गोसावीयांसि श्रीमुखप्रक्षाळण जालें : चरणक्षाळण जालें : धूपार्ती मंगळार्ती जाली : चंदनाचा आडा रेखिला : तेयावरि दहीयांचा टीळा केला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : तो ब्राह्मणु बोळवीतु नीगाला[१] : सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : एथ काहीं मागा :" "जी जी : मज[२] कोठेया कोनीं सुनांचेनि हातें ताकआंबीलि देयावी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : कर्मवसें जीवु सकळही पावे : एक वांचौनि : हें कर्मवसेंचि होइल : आणीख काहीं मागा :" "ना जी : मज हेंचि देयावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : आणीक काहीं मागा :" "ना जी : मज हेंचि देयावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "दीजैल :" "जी जी : दाइं माझीया सेताचीया पाटीया धरीलीया असति : तीया सुटावीया :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीयाहीं कर्मवसेंचि सुटती :" इतुकेनि तेयांतें राहावीलें होतें : तो राहे ना : आपुलेया सेताचीया पाटीया दोहों सुरकनीचीया दाखवीलीया : सीवंवरि बोळवीत आला : मग गोसावीं राहाविला : ।।

बाइसीं म्हणीतलें : "या ब्राह्मणासि ऐसें काइ जालें ? बाबा म्हणति : 'भटो आणीक काहीं मागा' : कीं तेणें त्रीसुधी तेंचि मागीतलें[३] :" सर्वज्ञें[४] म्हणीतलें : "बाइ : यासि जाली तेया साळीयाची परि :" बाइसीं पुसिलें : "बाबा[५] : साळीयाची परि कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकु साळी : तो वेंवार्थीया : तो सांतेसि जाए[६] : अवघा हा

---

साधीं दोहीं श्रीचरणामधील उदक घेतलें°.

**३८७.** १ **भ.** °सेतें पावला : आणि गोसावीयांपुढें सांगों लागला : "जी जी : हें माझें कामत : य माझीया पटीया : दाइंभाइं कर्दिलीया असति :" गोसावी तेथ उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो यथ काहीं मागा—. २ **गो.** °धुवांपुतीं : सूनाहातीं कोठेयाचां कोनीं—. ३ **मुराहबी.** °यावी गोसावीं वेवाचा दृष्टांतु नीरूपीला. ४ **एवा.** गौराइसीं. ५ **एवा.** गौराइ. ६ **भ.** मार्गीं कल्पवृक्ष असे

हींडीनला : परि वेंव न मीळति : मग गावांसि नीगाला : तवं मार्गी वृक्षू देखिला : साउली म्हणौनि वीसांवला : तो कल्पवृक्षू म्हणौनि नेणे : तेयाखालि उताणा नीजैला : वरुती वास पाहे तवं बरवीया सरळीया खांदीया देखिलीया : मग म्हणीतलें : 'याचें कैसें बरवें वेवं होइल :'" तवं सरकरि[7] वेवं पडिलें : तें काखे सुनि नीगाला : तवं तेणें कल्पवृक्षें म्हणीतलें : "आगा आगा साळीया : माग : मीं तुज प्रसंन जालां : तुं मागसी तें मीं देइन :" तवं तेणें म्हणीतलें : "तुं कोणु ?" "ना मीं कल्पवृक्षू गा :" "प्रसंन जालासि तरि मोडीए खोडीए आणीक वेवं दे :" *आणि आणीक वेवं खालि पडिलें : तें घेतलें : आणि नीगाला*[8] : सर्वज्ञें म्हणीतलें : "कल्पवृक्षातें पावोनि काइ वेवं मागावें ? पाटाउंवांसुताउंवांचीया घडीया मागावीया कीं : ना तरि सुष्टें फळें मागावीं कीं : मा तेणें वेवंचि मागीतलें : तैसा इस्वरू प्रसंन जालेयां काइ जीवें हेंचि[9] मागावें : इस्वराचें प्रेम मागावें की[10] :" ॥

## ३८८ मार्गी कामधेनु नामपुर्वक भीक्षान आरोगण

वांकी वडजीएपासि वडातळि[1] गोसावीयांसि आसन जालें : बाइसें : माहादाइसें : भीक्षेसि गेलीं : अवघीं भगतिजनें भीक्षेसि गेलीं : बारसिचां दीसीं एका ब्राह्मणासि मुंजि जाली : तेहीं वडे : मांडे : घारीया : पुरीया : चौवनी : लाडू : तीळवे[2] : तांदूळाचा भातू : ऐसी भीक्षा दीधली : घेउनि आलीं : गोसावीं एतां देखिलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आलीया गा एथिचीया[3] कामधेनुं :" गोसावीयांसि झोळीया दृष्टभूता[4] केलीया : अवघीं भगतिजनें आलीं : झोळीया दृष्टभूता[4] केलीया : मग गोसावीयांसि दोंपाहारांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजनां पांति[5] जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग नावेक पहूडू जाला : उपहूडू जाला : मग गोसावीं वीळिचांचां वेळीं भडेगावांसि बीजें केलें : ॥

---

साउली म्हणौनि वीसांवे°. ७ **भ.** टपकरि. ८ (**भ.**) **एवा.** °कल्पवृक्षातें पावौनि–. ९ **गो₂** ताकआंबीलचि मागावी ? १० **एवा.** °यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें म्हणा बाइ : तरि तुम्हीं दृष्टांत देवों जाणत असा : ['दृष्टांतपाठा'त हा 'वेवाचा दृष्टांत' (११) पुढीलप्रमाणे आहे : "कव्हणी एकु साळी हाटा वेवं घेयावेया जाए : हाटवेळ नव्हे : म्हणौनि वृक्षा एकातळि नीजे : वरुतें पाहे तवं सरळ डाळ खांदी देखे : मग म्हणे : 'याचे कैसें बरवें वेंवं होइल :' तवं वेंवं पडे : वेंवं घे : खांदावरि घालुनि नीगे : मग तो म्हणे : 'आगा : मीं कल्पवृक्ष : प्रसंन जालां : माग :'' तरि मोडीएखोडीए आणीक वेंवंचि दे :'" **एकी वासना** : हा दृष्टांत गौराइसीं दीधला.]

**३८८.** १ **एवा.** गोसावी भडेगाउवां जातां मार्गी कव्हणी एकु गाउ : तेथ वृक्षा एका तळी––. **मुराहबी.** गोसावीयांसि मार्गी बीजें करीतां नदी होती : तेथ गोसावीयांसि आसन जालें : ऐलाडि पैलाडि गावं : पैलाडीला गावी महदाइसें : उमाइसें भीक्षे गेलीं : २ **मुराहबी.** °अमृतफळें : भातु : सेवैया : सरवळी वेळुनि सूदलीं : लाडु : तीळवे : साकवती रांधुनि सूदली. ३ **मुराहबी.** माहात्मेयांचीया. ४ **मुराहबी.** दृष्टपूता. ५ **एवा.** जेवणें.

## ३८९ भडेगावीं सीवाळां अवस्थान*

[मग वीळीचां वेळी गोसावीं भडेगावां बीजें केलें : सीवाळां अवस्थान जालें : दीस तीन : ।। ]

## ३९० सीमुगां सींपणें

सीमुगेयाचेया[१] पाडिवेयाचां दीसीं[२] गोसावीं नगरामध्यें बीजें केलें : कांसार-आळीएसि : तवं मार्गीं होळी होती : तेथ गोसावी उभे राहिले : श्रीचरणाचेनि आंगुठेनि : "हो जे रे : हो जे रे :" म्हणौनि राख उधळिली[३] : नावेक एसें सींपणें जालें : मग गोसावीं[४] वसैएसि बीजें केलें : ।।

## ३९१ वसैए अवस्थान : इंद्रभटां वसैनीक्षेदू

वसैएआंतु गोसावीं बीजें केलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : बाइसीं चरणक्षाळण केलें : मग गोसावीं इंद्रभटातें म्हणीतलें : "हां गा इंद्रया : हस्ती वेझ घेओं आलेयांहीं परि परि ब्राह्मणा वसैएआंतु रीगों नैए : ऐसें तुमचें सास्त्र बोले :" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "मां तुम्हीं कैसे आलेति?" "ना जी : आम्हीं आपुलेयां गोसावीयां-सरिसे आलों जी :" "हां गा : दस अवतारां आंतुलि हे एकि देवता होए : नव्हे?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "ऐसा गा भटाचारीया : आपुलेनि अभीमानें देवता दूखीली : वैरियांचा देओ जाला तरि काइ दगडें हाणौनि फोडावा? हां गा इंद्रया : देवतेसि आणि आबूखा घालिजे?" इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : भटाचारीया नव्हे : तो सुना : जेउतेतेंउतें भुंकतुचि गेला[२] :"

*महदाइसीं पुसिलें : "जी जी : भटाचार्यें एसणा अभिमानु कां केला जी?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तया वेदांतिचें एथावत कर्मज्ञान : करणीयांअकरणीयांचें : एणें अभिमानें :" "जी जी : तेणें इतुकें केलें : देवतेसि आबुखा घातला : माझा हा प्रश्नू कीं : सरलेयाचें मीष करूनि इतुके कढैआंतु घातले : ते अनीमीत हींसा जाली : ऐसें तो नेणे जी?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू जीवू सकळही आपुलें वोखटे गोमटें जाणे : परि जाणौनिचि*

---

**३८९.** ***अ.** प्रतीत केवळ 'आदि' आहे. **मुरा.** प्रतींतून ही लीळा येथे घेतली आहे.

**३९०.** १ **मुराहबी.** सीवाळें रचमचेचें स्थान : म्हणौनि गोसावीं वसैए बीजें केलें. २ **मुराहबी.** °उदीयांचि कासारवाडांहुनि बीजें केलें. ३ **बी.** °माहात्मे म्हणति "नको :" तवं देवावरि राख उधळिली : ऐसे सर्वज्ञें म्हणीतलें : "हा नको गा : पैल नको गा :" आणि येरयेरांतें राखाभरी : गोसावी खुदखुदा हास्य करीति : श्रीमूर्तीचीं आठै आंगे हालति : ऐसें पाहार एक सींपणें प्रवर्त्तलें–. ४ **गो.**$_{२}$ °गावाआंतु वसै : तेथ बीजें केलें.

**३९१.** १ **मुराहबी.** °भटाचार्यें आपुलेया शास्त्राचेनि बळें देवतेसि आबखा घातला–. २ **गो.**$_{१}$**गो.**$_{३}$ °इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : दस अवतारामधील देवता ते कोणि जी?" सर्वज्ञें म्हणीतलें :

*री : तें तेणें जाणौनिचि केलें : तेणें तो तत्काळ नरका गेला म्हणौनि बाइ : जाणतेयापसि रि नेणता चांगु : जैसा वोलेयापसि कोरडा चांगु : " " हो कां जी : " म्हणौनि महदाइसें गींचि राहिलीं[3] :* ॥

नरसीहं आठामधील देवता गा :" "जी जी :" ३ (**प्रव. वि.** १६५-६६ 'अज्ञात' चरित्रातील लीळेचे स्थान या **प्रव.** मध्ये भडेगाव दिलेले आहे. म्हणून ती येथे घातली आहे. हीच लीळा ळेगावकर आम्नायाच्या एका पूर्वार्धचरित्राच्या पोथीतील 'अज्ञात चरित्रा'त पुढीलप्रमाणे आहे :

**भटाचार्या कर्मस्वरूप ज्ञान**

ईश्वरासि प्रात:पुजाअवस्वर जाला : अनवसरीं अवसर दीधला : मग ईश्वरें कोन्हा एका प्रकरणानंतरें हे गोष्टि महदंबेप्रति सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "पोर जीव आपुलें ओखटें गोमटें" हें प्रकरण : महदांबा म्हणीतलें : "जी जी : जाणौनिचि ओखटें करी तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "क्षेपणीकीं वेदीचें सार काढौनि आपुला मार्ग प्रतीष्टीला : वेदमार्ग अप्रतीष्ट केला : कर्ममार्ग खंडीति : मग भटाचार्यासि आणि क्षेपणीकांसि वादु प्रवर्तला :" भटाचार्यें म्हणीतलें : "पणु करा :" क्षेपणीकीं म्हणीतलें : "हो कां :" क्षेपणीकीं म्हणीतलें : "आम्हीं तुमतें नीरोतर केलें तरि काइ कराल ?" भटाचारीं म्हणीतलें : "तरि तुमचा सीष्य होयें : तुम्हीं नीरोतर जालेति तरि काइ करा ?" क्षेपणीकीं म्हणीतलें : "तुम्हीं म्हणाल तें अंगीकरूं :" भटाचार्यें म्हणीतलें : "हें निश्चीत कीं?" "हो अन्यथा नाहीं :" "हो कां : तरि तुम्ही तैल्यतप्त कढैसि रीगावें :" ऐसेंचि खंडपरें घेतलीं : यदनंतरें राया विद्येमानें खवणापुरीयेसि वादु प्रवर्तला : मग आक्षेपपरीहारीं : प्रश्नेचां उत्कर्षता : तर्कीचेनि प्राकर्मे भटाचार्यातें नीरोतर केलें : भटाचार्यातें म्हणीतलें : "परीहारू करा :" "ना : यासि उतर नाहीं :" क्षेपणीकीं म्हणीतलें : "तरि पणु अंगीकरा :" "हो कां :" मग भटाचार्यें क्षेपणीकाचा अनुग्रहो अंगिकरिला : सीष्यत्वें वर्तति : त्यांचा शास्त्राभ्यासू करीतां वेदावेगळें कांहींचि न देखति : भटाचार्यें म्हणीतलें : "वेदाव्यतीरीक्त तवं आणीक नाहीं :" मग भटाचार्यें आपणेयांसि ज्वराचें मीखांतर घेतलें : नमस्कारा जावें तें न वचति : बीढारींचि असति : सीष्य क्षेपणीकाच्या नमस्कारा जाति : क्षेपणीकीं पुसीलें : "सांपें आचार्ये देखों ना : तें काइ ?" तेहीं म्हणीतलें : "साधारण ऐसें अताप्य उपजलें असे :" दीवसां सातांपांचांनंतरें भटाचार्यें सीष्यातें म्हणीतलें : "आजि क्षेपणीकांतें ऐसें म्हणा : अजि आचार्ये निवर्तले : तरि काइ कर्तव्य तें सांघा :" क्षेपणीकीं वीचारुनि सांघीतलें : "तुम्हीं वेदीक क्रीया आचरा :" येउनि भटाचार्याप्रति ऐसेंचि सांघीतलें : यदनंतरें म्हणीतलें : "हा होये कीं मी भटाचार्या ! आतां क्षेपणीकु मजपासौनि कोठे जाती ?" म्हणौनि बाहे आफळिली : मग वादेंसीं क्षेपणीकांपासि आले : क्षेपणीकातें म्हणीतलें : "तुम्हीं म्हणा वेद लटिका : तत्संबंधीक कर्मकर्मांतरें तें तुमचें अवघेंचि लटकें : ऐसें म्हणा : तरि वेदीक कर्म आचरा : ऐसें तुम्हीं सांघीतलें : तरि वेद कैसा लटका ? वेद सत्य पुरुष यो : "म्हणौनि कर्मप्रतीष्टा केली : क्षेपणीक नीरोतर केले : तेव्हळि म्हणीतलें : "आतां कढैसि रीगा :" अठरा रीगाले : यदनंतरें गुरुद्रोहो घडला म्हणौनि प्रस्तावा मानिला : "ऐसें म्यां काइ केलें : गुरुद्रोहो कैसा घडला : आतां याचें प्राश्चीत घेउं :" म्हणौनि कर्मवीपाकीं पाहीलें : तेथ ऐसें नीगालें: यासि गोरांजन प्राश्चीत : तेव्हेळीं आउठ हात गोवराची बौली : आपणेयावरि शयन केलें : यथोक्त विधी आंगुठा पेटवीला : ऐसें कर्पतकर्पत शरीर जळिनलें : यदनंतरें सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भटाचार्या ऐसें जाणे आमुकेया कर्मास्तव अमुकें पाप होये : त्यासि प्राश्चीत अमुकेंचि : ऐसें इथुमेव पुर्वमीमांसेचें ज्ञान जाणे : परि स्वनिष्ट परनीष्ट : दोन्हीं हींसा घडलीया :" यदनंतरें देवें हींसाज्ञान नीरोपीलें : ॥

## ३९२ गारि बुजवणें

वसैएसि बीजें केलें[१] : तवं सीमुगां : खेळां तेंथ वसैएपुढां गारि केली होती : ते मार्गी होती : तीयावाहीं एओं जाओं नैए : तें एतांजातां अवघड : रात्रीं प्रश्रयासि बीजें करितां अवघड : गोसावीं तीए गारीपासि उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें रामाचें वानरसैन्य जरि प्रगटे तरि हे गारि बुजे[२] :" मां सबदु माहादाइसांचीए कानीं पडला : मग माहादाइसीं म्हणीतलें : "दादो दादो : गोसावी ऐसें म्हणत असति :" "जरि रामाचें वानरसैन्य प्रगटे तरि हे गारि बुजे :" देवीं म्हणीतलें : "या गा : या गा :" म्हणौनि अवघींचि उठिलीं : गारि बुजिली[३] : ।।

## ३९३ अनंताचे सुड आइकवणें

इंद्रभटीं गोसावीयांसि उपाहारासि वीनवीलें : मग गोसावीं वीहरणासि सीवाळेयासि बीजें केलें : सरिसे इंद्रभट : तेंथ चौकीं आसन जालें : तवं[१] दोघ भागवंत[२] आलें[३] : तेहीं गोसावीयांसि अनंताचे दोनि सुड ओळगविले : मग गोसावी तेयांसि इंद्रभटाकरवि दोनि दाम देववीलें : मग ते तोखत गेलें : ।।

## ३९४ इंद्रभटां स्तीति : नाम करणें

तेथचि नागदेवोभटा[१] गोसावीयांपासौनि स्तीति जाली : ते सीवाळांचि बैसले होते : गोसावीं बीढारासि बीजें केलें : माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी नागदेवोभट देखिजति ना?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : इंद्रेयासि[२] इंद्रीएद्वारें आंकु स्तीति संचारू :" म्हणौनि श्रीकराचा अनुकारू दाखविला : माहादाइसीं म्हणीतलें "मी तेयांतें बोलाउं जाओं?" "बाइ : जा :" मग तीएं सीवाळेयासि आलीं : त नागदेवोभटांतें माहादाइसीं म्हणीतलें : "हें काइ नागदेवोभटो : गोसावीयां आरोगणेसि उसीरू जाला : तुम्हीं आझुनी कैसे बैसले आहा?" तवं नागदेवोभट म्हणीतलें : "काइ करूं रूपै : पाएचि गेले :" माहादाइसीं म्हणीतलें : "उठि : जाओं :

---

३९२. १ **भगोगो$_2$मुरा.** °गोसावीयांसि बीजें करीतां मार्गीं गारी होती. २ **एवा.** °तें दे (**एवा.** बाइसीं) आइकीलें–. ३ **गो$_2$** तवं गोसावीं उभां श्रीचरणी होते : मग वीहरणासि बीजें करीतीचि : वसैएसि बीजें केलें : ते आवघी श्रीमूर्ती मातीया फुपुवां भरली होती : मग बाइ पालवेंकरुनि श्रीमूर्ती प्रमार्जीली : मग पडदणी वोळगवीली : मर्दना : मादणें जालें : पुजा आरोग जाली : वीडा जाला : ।।

३९३. १ **ह.** °अनंतु नावें वैष्णउ : तेयाचे सीकार : ऐसे गोसावीयांचेया दरूसनासि आले. २ **रा** वैष्णव. ३ **मुराहबी.** °तिहीं गोसावीयांचां ठाइं अवसरु केला : अनंताचे दोनि सुड आइकीले :°.

३९४. १ **अपं.** इंद्रभटा. २ **मुराहबी.** तयासि इंद्राची अंकुशमुद्रा जाली असे.

ते उठुं गेले : तवं उठवे ना : मग तेहीं आंगेंसीं धरूनि घेउनि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें[३] : "इंद्रेया : या : काइ गा : इंद्रेया : इंद्राची अंकुसमुद्रा वर्तति असे ?" "जी : जी[४] :" मग दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांसि पुजा जाली : धूपार्ती मंगळार्ती जाली : मग गोसावीयांचीए सपांती भगतिजनासहीत जेवणें जालीं : मग तेयांची स्तीति भंगली : *येथ गोसावीं नागदेवभटां 'इंद्रया' हें प्रसादाचें नावं ठेविलें*[५] : ॥

## ३९५ तथा तांबोळ ग्रहण

एकु दीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : तवं इंद्रोबा आले : गोसावीयांचेया तांबोळा आंजुळि ओडवीली : सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "एथिचें तांबोळ घेयावें ऐसा वीधि कीं भावो ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : भावो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भावासि काइ गा रावो राणा असे ? *भावो व्यभिचारिया*[२] :" मग गोसावीं तेयांसि तांबोळ दीधलें : ॥

## ३९६ तथा श्रीचरणां तुळसी वाणें

गोसावीयांसि आरोगण जाली : ऐसां आसनीं उपवीष्ट असति : सोभागें भीक्षा करूनि आलीं : गोसावीयांसि झोळी दृष्टभूत[१] केली : गोसावी प्रसाद करीत असति : गोसावीं डावा श्रीकरू झोळीएखालि घातला : कृपादृष्टी अवळोकिली : गोसावी प्रसादु करीत असति : तवं इंद्रभट गोसावीयांचेया श्रीचरणां तुळसी वावेया आले : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा इंद्रेया : देओ पाहिजतु असिजे ?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देओ ऐसा असे :" "जी जी : देओ तो ऐसाचि बरवा कीं :" मग गोसावीं श्रीकरिचीया आंगुळीया झोळीएसि पुसिलीया : मग[२] तेहीं झोळी परती केली : मग इंद्रभटीं गोसावीयांचे श्रीचरण सींपिले : श्रीचरणां तुळसी वाइलीया : साष्टांगीं तुळसी वाइलीया : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : तवं सोभागें दूख करूं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "सोभागें हो : जेवा ना कां ?" "जी जी : जेवीन आणि काइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा झोळी :" मग गोसावीं मागौता प्रसादू केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया : आतां जेवा जा :" मग तीएं जेउं गेलीं : ॥

---

३ **पं.** इंद्रेयाचेया काइ मां–. **अ.** °इंद्रयांचीं एं काइ मा : इंद्रेयां : इंद्रेया : अंकुसमुद्रा व्रतति आहाति. **पं.** इंद्रेयाचेया काइ मां इंद्रीयां आंकुसमुद्रा वर्तत आहाति. **मुराहबी.** एथिचे यजमान आले मां. ४ **मुराहबी.** एतुलेनि स्तीति भंगली : मग दंडवत केलें° **एवा.** 'इंद्रेया' एतुलेनि स्तीति भंगली–. ५ (**शोध.**).

**३९५.** १ **मुराहबी.** °एथचें तांबुळ घेयावें ऐसा काइ वीधि ?" "नेणें जी :" "तरि काइ सास्त्र ?" "नेणें जी :" तरी कां घेत असा ?" "जीजी : भावें". २ (**प्रव. वि.** ५२, ५३).

**३९६.** १ **मुराहबी.** दृष्टपूत. २ **मुराहबी.** मग तीयें परतीं गेलीं.

## ३९७ गौराइ पंचराणेयांचा सुक्ष नाएकु म्हणणें

गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : पहुडु जाला : मग गोसावी आसनीं[1] उपवीष्ट असति : तवं गौराइसें गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : दारवठेनसीं[2] उभीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : बाहीरि कोण आलें असे ?" बाइसी पाहिलें : " बाबा : कवण आले असैल[3] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पंचराणेयांचा मुक्ष नाएकु आला असैल :" बाइसें गेलीं : तवं गौराइसें उभीं असति : बाइसीं म्हणीतलें : " बटिगी : भीतरि ए : बाबासि दंडवत करि : " मग तीए भीतरि आलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांपासि बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[4] : तुम्हीं एथिचेया दरीसनासि आलींति तरि एथिचेया अवस्वरा केधवांहीं नैया : तें काइ ?" "जी जी : मातें बीढार राखावेया ठेवीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं बीढार राखावेया आलींति कीं एथिचेया दरीसनासि आलींति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें कीं बाइ : एथिचेया दरीसनाचीया चाडा यांसि अंनाचें व्रत : न्हाणाचें व्रत : वाहाणाचें व्रत : आदिकरौनि व्रत : बाइ : माथांचा जारू[5] नाहीं वाळला : ए दसे एहीं काइ हें करावें ? ए दसे एहीं खावें : जेवावें : लेयावें : नेसावें : मा ऐसें यांकरवि बीढार राखवीति : मग आपण एथ कोरडीं एति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तीएं नीगती तवं आपणचि एउनि पुढें उभेयां ठाकावें : मग तीएं आपुलेया बीढारासि भलेतें करितु : आपण एथिचेया अवसरा न चुकिजे हो :" ।।

## ३९८ गौराइनीद्राप्रसंगं इंद्रभटों सीक्षापण

मग तीएं गोसावीयांचेया तीहीं पुजाअवस्वरासि येती : एकु दीसु तीएं गोसावीयांचेया वीळिचांचेया पुजाअवस्वरासि आलीं : खांबाआड बैसलीं : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : पाहारू एकु नीरोपण जालें : तवं गौराइसां नीद्रा आली : मग गोसावीं भगतिजनासि पाठवणी दीधली : तीएं अवघींचि बीढारासि गेलीं : मग गोसावीयांसि व्याळी जाली : बाइसीं फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहा पां बाइ : भीतरि कवण असे ?" बाइसीं पाहिलें : तवं नेदखति : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : कोण्ही नसे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : इंद्रयाची जाया असे : " बाइसें गेलीं : तवं खांबाआड नीजैली असति : बाइसीं म्हणीतलें : " बटिकी : उठि : तुझीं अवघीं बीढारासि गेलीं : तुं नैजैलीसि कैसी ?" मग तीएं उठिलीं : गोसावीयांसि दंडवत

---

**३९७.** १ **मुराहभगो.** सएनासनीं. २ **मुराहबी.** दारवंडेंसीं. ३ **पंभगो.** असे. ४ **मुराहबी.** "बाइ : तीएं अवघीं एथचेया दर्शना (तथा अवसरा) आलीं होतीं : तुम्हीं न याचि तें काइ ? ५ **गोमुरा.** °नवळे.

केलें : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांतें बोळवीतें जा : " बाइसें बोळवीत गेलीं[१] : तेयांसि नीरोविलीं : ।।

रात्रीं इंद्रभट गौराइसांसि कोपों लागले : चीमोरे घेति : इसाळु केला : उदीयांचि गोसावीयांचेया पुजाअवस्वरासि आले : अवघीं भक्तिजनें आलीं : गौराइसें आलीं : कोमाइलींदुमाइलीं ऐसीं गोसावीं देखिलीं : गोसावीं इंद्रभटांतें म्हणीतलें : " हां गा इंद्रेया[२] : मुक्तीची चाड आणि खुंटुदावें सांभाळणें : " ऐसें कोपले : गौराइसांसि ऐसें जालें जें गोसावीं माझा कैवारू घेतला : आणि इंद्रभटासि ऐसें जालें : जें गोसावीं माझें अनुचीत सांडवीलें : ।।

## ३९९ स्त्रीसुळवेथानीवृति : तथा तांबोळदान

ब्राह्मणा एकाची स्त्री : ते वसैएपुढीलु पींपळु सींपावेया ए : तेंव्हळि गोसावीयांतें देखे : गोसावी वीहरणासि बीजें करीति : तेह्वळि तीएं गोसावीयांतें झळकतां देखति : तेयांसि गोसावीयांचेया दरीसनाची अवस्था[१] थोरि उपनली : माहादाइसें तेयांचेया घरासि भीक्षे जाति : तीएं माहादाइसांसि बैसों घालीति : सोपस्कर भीक्षा देति[२] : एकु दीसु माहादाइसांतें तेहीं म्हणीतलें : " आइ : तुमचेया गोसावीयांचें दरीसन मज कैसेनि होइल ? माझा वरैतु दुरळु : " माहादाइसीं पुसिलें : " तुज काहीं रूजा असे ? " तीहीं म्हणीतलें : " हो आइ : मज सुळवेथेची सवे असे : " " तरि तेयाचें[३] मीस करि : " मग तेहीं सुळवेथेचें[४] मीस घेतलें : मग तो तेयांसि धांवणी[५] करूं लागला : तवं तो काइसेनहीं न समे : मग तीं म्हणीतलें : " माझा सुळु तै जाइल : वसैए जे गोसावी असति तयांचेया दरीसना नेआल तरि माझा सुळु जाइल : " मग तेहीं म्हणीतलें : " हो कां : " मग ते हाटवटीएसि गेले : पानें पोफळें घेउनि आले : नारीएळ घेतलें : तेहीं तें नारीएळ सुपवतीचां दुणवंगीं ठेविलें : आधीएकि वाट पावलीं : आणि म्हणीतलें : " पाहा कां : तें नारीएळ मीं वीसरलीएं : " ते नारीएळ आणुं गेले : तीएं वहीलीं गोसावीयांचेया दरीसनासि गेलीं : गोसावीयांसि उजवीएकडे पटिसाळेवरि आसन असे[६] :

---

**३९८.** १ **मुराहबी.** °गोसावीं सांघातें पद्मनाभिदेवही पाठवीले. २ **अपं.** °मोक्षाचीया चाडा एथिचेया दरीसना एइजे : आणि खुंटदावें सांभाळिजे :

**३९९.** १ **एवा.** चाड. २ **मुराहबी.** °येकु दीसु तीयेसि सुळु उठीला : माहादाइसें भिक्षे गेलीं : तवं तीएसि उठवे ना : माहादाइसीं म्हणीतलें : " तुं यैसी कां ? " " ना मज सुळु उठिला असे : " " तुझा सुळु आमंचेया गोसावीयांचेया दरीसनें जाइल : " " वसैए असति ते गोसावी ? " " ना हो : " " तेयांचेया दरीसना मीं आधींचि येवों पाहे : परि माझा वरैतु दुरळु : " माहादाइसीं म्हणीतलें : " तुं पडि घे : " तीया पडि घेतली : तेयांसी ते धावणी करू लागले : तवं ते काइसेनहीं समे ना–. ३ **अ.** तेयाचा बाहाणा घे. ४ **अ.** सुळवेथेचा बाहाणा घेतला. ५ **अ.** धांवाधावि. ६ **मुराहबी.** तीया गोसावीयांसि

गोसावीयांसि तेहीं बाहीया पसरूनि खेवं[7] दीधलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांपुढें श्रीमुख पाहातें बैसलीं : तवं ते नारीएळ घेउनि आले : पानें : पोफळें : नारीएळ : गोसावीयांसि दरसना केलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयां जवळे बैसले : मग गोसावीयां पुढां सांघों लागले : "जी जी : मीयां बहुतें ओखदें केलीं : बहुत धांवणी केली : परि काइसेनहीं सुळु न वचेचि :" मग इहीं म्हणीतलें : "मातें गोसावीयांचेया दरीसना नेया : मग माझा सुळु जाइल :" गोसावी उगेचि आइकत होते : मग गोसावीयांसि दंडवत करूनि नीगालीं : ते पुढारे जाले : आणि तीएं मागौतीं गोसावीयांपासि आलीं : श्रीमुखिचेया तांबोळा आंजुळि ओडवीली : गोसावीं तांबोळ दीधलें : तीं तोंडीं घातलें : आणि नीगालीं : मग गोसावीं तेयांसि वरू दीधला : "बाइ : आतां[8] हा तुमतें न बधी[9] हो :" मग तीया बाइया माहादाइसांतें म्हणीतलें : "आइ : एक पकवांन माझें गोसावीयांलागि[10] नीच नेयावें हो :" माहादाइसें नीच घेउनि एति : ।।

## ४०० देव नीवारित माहादाइ वस्त्रपुजास्वीकारू

माहादाइसांसि गोसावीयांसि वस्त्र ओळगवावें ऐसा मनोर्थू जाला : मग भटोबासांतें[1] म्हणीतलें : "नागदेया : एक वस्त्र मज घेउनि दे कां :" तवं तेहीं म्हणीतलें : "मातें काइ म्हणतें असा ? दादोसातें म्हणा :" मग माहादाइसीं दादोसातें म्हणीतलें : "दादो : मज एक वस्त्र घेउनि देया कां :" तवं दादोसीं म्हणीतलें : "काइ कराल वस्त्र ?" "ना गोसावीयांलागि :" दादोसीं म्हणीतलें : "केतुलेयाचें वस्त्र घेयाल ?" तवं माहादाइसीं म्हणीतलें : "मातें सोळा दाम असति : तेयाचें एक वस्त्र घेउनि देया :" "आंहीं[2] : काइसे सोळा दाम ? मां तेयां सोळां दामांचें वस्त्र काइ एइल ? तें काइ गोसावीयांसि[3] पांगुरों जावें असे ? दीस च्यारि पांगुरती : आणि भलेतेयासि ओपुनि फेडिती : मां तेयां सोळां दामांचा उपाहारू करा कां :" इतुकेनि माहादाइसें उगींचि राहिलीं : मग गोसावीयांतें वीनवीलें[4] : "जी जी : मज गोसावीयांचां ठाइं वस्त्र वोळगवावें ऐसा मनोर्थू जाला : तें नागदेयातें म्हणीतलें : 'नागदेया : मज एक वस्त्र घेउनि देया कां :' तवं तेहीं म्हणीतलें : 'मातें काइ म्हणतें असा ? दादोसातें म्हणा :' मग दादोसातें म्हणीतलें : 'दादो : मज एक वस्त्र घेउनि देया कां :' तवं दादोसीं म्हणीतलें : 'काइ कराल वस्त्र ?' 'ना गोसावीयांचां ठाइं वोळगवीन :' दादोसीं म्हणीतलें : 'केतुलेयाचें वस्त्र घेयाल ?' 'ना मातें सोळा

---

दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागली : गोसावीयांपासि बैसलीं. ७ **गो.** क्षेमाळींगन. ८ **मुराहबी.** आद्यप्रवृती. ९ **अगो**$_2$ बंधी. १० **गो**$_2$ प्रतदिनीं ताट°.

**४००.** १ **भगोमुराहबी.** नागदेवोभटातें. २ **भगो.** इसि. **पं.** इही. ३ **मुराहबीभगो.** गोसावी पांगुरूं जावों असति. ४ **अपं.** °तवं गोसावीं वस्त्र सांघीतलें.

दाम असति : तेयाचें एक वस्त्र घेउनि देया :' दादोसीं म्हणीतलें : 'आंहीं : काइ ते सोळा दाम? मां तेया सोळा दामांचें वस्त्र काइ एइल? तें काइ गोसावीयांसि पांगुरों जावें असे? दीस च्यारि पांगुरती : आणि भलेतेयासि ओपुनि फेडीती : मां तेयां सोळा दामांचा उपाहारू करा का :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ: माहात्मा म्हणतु असे तें कां करा ना?" "ना जी : मीं गोसावीयांचां ठाइं वस्त्रचि ओळगवीन : मा गोसावी दीस च्यारि पांगुरतु अथवा भलेतेयासि देउनि फेडीतु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[५] : तें तुमचेनचि होइल : जा पां ऐसी ऐसी : मां कोण्ह एक साहीयांतें करितील :" मग तेयांसि पाठवीलें : मग तीएं तिए बाइएचेया घरासि गेलीं : तीतें म्हणीतलें : "हां ओ : तुझा भाउ दूसी : तरि आम्हांसि एक वस्त्र घेउनि देइल?" तीया म्हणीतलें : "आइ : तेयांसि एओं देया : मां पुसैन :" तवं तो आला : तेयातें म्हणीतलें : "हां रे बा : तुतें जें गाहाणाउ वस्त्र असे तें यां आइसांसि ओपि कां :" तेणें तें वस्त्र सोडिलें : माहादाइसांसि दीधलें : तेहीं तेयांसि सोळा दाम दीधले : तें एकी आसुचें वस्त्र : परि तेणें सोळें दामीं दीधलें : तें वस्त्र घेउनि आलीं : गोसावीयांपुरता उपाहारू केला : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : धूपार्ती मंगळार्ती जाली : तें वस्त्र ओळगविलें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीयांसि पहुडु जाला : उपहुडू जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : तवं दादोस गोसावीयांचीए ओळगेसि आले : गोसावीं फुटेयाचा पदरू तेयांकडे घातला : सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहा पां गा माहात्मे हो : हें वस्त्र काइ लाहे?" दादोसीं म्हणीतलें : "जी जी : सोळा दाम लाहे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सोळें दामीं आणुन देयाल? बाइ: देया सोळा दाम :" "जी जी : तरि पाउण दोनि लाहे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाउणा आंसु आणुनि देयाल? बाइ : देया पाउण आसु :" "जी जी : तरि एकि आसु लाहे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि एकी आसु आणुनि देयाल? बाइ : देया एकि आसु :" "जी जी : तरि नेणें[६] :" मग गोसावीं फूटेयाचा पदरू आसूडिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें वस्त्र[७] आन एक लाहे :" मग तें वस्त्र गोसावीं सा मास पांगुरले : मग आंगी केली : मग ते आंगी लेइले : मग जेव्हळि भट माहादाइसें रीधपुरासि पाठवीलीं : तेधवां गोसावीं माहादाइसांतें पुसिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचें वस्त्र हें सा मास पांगुरलें : मग आंगी सीविली : मग आंगी लेइलें : आतां हें[८] तोंडी आंगी वानरेसांसि देइजे :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : देइजो जी :" मग ते आंगी भटोबासांसि दीधली : मग माहादाइसांसि सुख जालें : ।।

## ४०१ साधां पुजाकरणीं बाइसीं कोपणें

साधें स्नानासि गेलीं : तवं तेथ रींगणीचीं[१] फूलें देखिलीं : तीएं घेउनि आलीं : गोसावीयांसि आरोगण जाली : पहुडु जाला असे : तवं तेथ साधें आलीं : तीहीं

५ **मुराहबी.** °इतुलेचि तुम्हांस्तव नव्हे? ६ **मुराहबी.** °माहादाइसें उगींचि पाहातें असति.
७ **अपं.** °अमोलीक. ८ **अ.** °तोडी आंगी.

**४०१.** १ **मुराहबीभगो.** त्रीसंदीचीं.

गोसावीयांचेया श्रीचरणां फूलें वाइलीं : जानुवरि वाइलीं : वक्षस्तळावरि वाइलीं : श्रीमुख उघडूनि श्रीमुगुटावरि वाइलीं : तवं बाइसें वाहीरिलाकडौनि आलीं : तेहीं देखिलें : "ऐसी ओ कवणें पुजा केली?" म्हणौनि घागरा बांधला : "श्रीचरणाचेयाकडे काइ देओ नव्हे? मा श्रीमुगुटाचेयाकडे होए?" तवं गोसावीं उपहुडु स्वीकरिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांसि कां कोपतें असा? ए काइ जाणतें असति? एं जरि जाणति तरि ऐसें कां करीति? आणि अनअवस्वरीं कां एति?" तवं साधांसि अधीक दूख जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : दूख[२] न करा : तुम्हीं काइ जाणतें : असा? जरि जाणा तरि ऐसें काइ कराल : आणि अनअवस्वरीं कां याल[३]?" म्हणौनि तयांचें दूख फेडिलें :।।

## ४०२ माहादाइसां द्वारावतीए जाणें*

गोसांवियांसि भडेगावीं सेवाळां अवस्थान : कटक देवगीरीकडील लोकू द्वारावतीये जात होता : मग दादोसीं[१] म्हणीतलें : "रूपै : हे कटक देवगीरीकडीलु लोकू : हा आपुला द्वारावतीये जातु असे : तरि यांसरिसीं द्वारावतीये जा ना :" "ना दादो : काहीं संवळ नाहीं :" "संवळ काहीं मेळवीन :" "तरि गोसावीयांतें पूसों :" म्हणौनि गोसावीयांतें पूसों आलीं : "जी जी : कटक देवगीरीकडील लोकू : हा आपुला द्वारावतीयेसि जातु असे : तरि यांसरिसी द्वारावतीयेसि जाओं?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीर्थदेवता अमोचक : परमेश्वरसन्यधान मोचक :" सर्वज्ञें म्हणीतलें : "साटि लक्ष नीज कूमरां : सपन कोडी यादवां : प्रभासे आटलीया : गोपिका भीलीं हरिलीया : द्वारावती पाणीयांआंतु बूडाली : *धर्में वज्रू राज्यीं बैसवीला : तो खुररवीं[२] गेला : मग परीक्षीतमुख्य[३]* कव्हणी एक कळियौगिचें राए : तेहीं श्रीकृस्णचक्रव्रतीचा पणतु म्हणौनि जाणीतला : मग तेहीं आपूले घोडे दीधले : आपूले हस्ति दीधले : द्रव्य देउनि *मागौता वज्र राज्यीं बैसवीला[३] :* राज्यासि सेस भरिली : मग तेणें आपूलिया परी समूद्राचां कांठीं एकि द्वारावती केली : एकि पासाणाची प्रतिमा केली : तीसि लोकू जातु असे : आतां तेथ काइ असे? *बाइ ते द्वारावती नव्हे : तो श्रीकृष्ण नव्हे : ते वज्राची प्रतीष्टा[४] :"* मग हें अवघें दादोसीं मोडिलें : *द्वारावतीये जावे : ऐसे महदाइसाचीया प्रत्या आणिले : मग महदाइसें द्वारावतीयेसि नीगालीं : नीगतां[५]* सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथ जाते

---

२ **मुराहबी.** भेओं नको : तुम्हीं जाणा ना कीं°. ३ **मुराहबी.** °मग ऐसें साधीं आपुलें अनुचीत्त देखीलें : मी अनवसरीं आलीयें ना : मग गोसावीं तयाचें दुख दोचौं वेळीं संभाखूनि फेडिलें.

**४०२.** * येथील मूळ लीळेऐवजी याच पोथीतील श्रीकृष्णचरित्रातील 'वज्रप्रतिष्ठा' ही ४० वी लीळा येथे घेतली आहे. मूळ लीळेतील काही वाक्ये योग्य ठिकाणी घातली आहेत. १ **अपं.** °महदाइसें द्वारावतीए जावेया उस्तंबिली : (**भ.** उथाविलें :). २ **पं.** खूरूदवों. ३ (**पंग.**). ४ (**भग.**). ५ (**ग.**).

असा : तरि तेय श्रीचांगदेओराउळांचीया पाताळगुंफा असति : तीया पाहा हो :" तीहीं म्हणीतलें : " जी जी : " मग गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : मग तीएं नीगालीं : ।।

## ४०३ उमाइसांतें सर्वे धाडणें

उमाइसांतें सर्वज्ञें म्हणीतलें : " मासउपवासीए हो[१] : तुमचीं सांघातीएं द्वारावतीएसि जातें असति : तरि तुम्हीं कां न वचा ?" "जी जी : मीं न वचें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां एथौनि पाठवीतां न वचा : पाठीं रडतें जाल : " परि तीएं न वचतीचि : पाठीं नीद्रास्थानासि गेलीं : रात्रीं रडों लागलीं : 'दोघी मासउपवास करूं : दोघी भीक्षा करूं : ' ऐसें आठउंआठउं रडों लागलीं : उदीयांचि एउनि गोसावीयांपुढें सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : तेधवांचि म्हणीतलें : कीं पाठीं रडतें पाठीं लागाल : " "जी जी : मीं जाइन[२] : " मग गोसावी तेयांसि सांगातु लाविला : मग तीएं पाठवीलीं : ।।

## ४०४ साधांतें द्वारावतीए पाठवणें

गोसावीं साधांतें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं द्वारावतीए जा : " तेहीं म्हणीतलें : " जी जी : मज संबळ[१] नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि संवळ[१] देइजैल : " " जी जी : मज पाए नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि पाए देइजती : " तेहीं म्हणीतलें : " जी जी : मीं न वचें[२] : " गोसावी उगेचि राहिले : ।।

## ४०५ द्वारावतीए नीक्षेदपुर्वक काको स्तीति

काको[१] द्वारावतीए जावेया[२] आले : " जी जी : मीं द्वारावतीए जाइन : " गोसावीं तेयाथें दृष्टी अवळोकिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बैसा[३] ऐसे नावेक : " "*जी जी : मज सांघातु नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं भीक्षु : तुम्हां सांघातु काइसा ? पुरुखाचिया ठाया जाइजे तरि तेथचें काहीं गोमटें घेउनि नीगीजे*[४] *:* " " ना जी : मीं जाइन : " मग गोसावी उभे ठाकले : हात धरिले : ते प्रमाण[५] म्हणौनि बैसवीले : आणि तेयां स्तीति जाली : आणि देखों लागले : सुवर्णाची द्वारावती : गोसावी यादवांसहीत सींहासनीं उपवीष्ट असति : ऐसें अवघें देखिलें : " देखिला कृष्णु[६] : देखिला कृष्णु[६] : " ऐसें म्हणौनि टाळी वांति : स्तीति भोगुं सरली : मग सर्वज्ञें म्हणीतलें :

---

**४०३.** १ **मुराहबी.** °द्वारावतीए न वचा ? २ **शोध.** °सर्वज्ञें म्हणीतलें : मासोपवासीयें हो : आतां तुम्हासि एथौनि पाठवीजत असिजे : " "हो कां जी : " मग गोसावीं—.

**४०४.** १ **गो.** बळ. २ **पं.** माझी द्वारावती एथचि असे.

**४०५.** १ **मु.** (**शोध** : काको ते अन्यमहात्मावेषें असति :) **पंहरा.** काकोस. २ **पं.** °अवघीए आइतिसीं. ३ **मुराहबी.** आजिचा दीसु राहा पां. ४ (**मुराहबीभगो.**). ५ **मु.** मागील प्रमाण उगारूनि बैसवीले. **भ.** ब्राम्हण. ६ **पं.** कृष्णां.

"भटो : आतां जा : सांघातु दूरि जाइल : " तीहीं म्हणीतलें : "आतां कें जाइन जी ? साचोकारी द्वारावती ते मीयां एथचि देखिली : " मग तेहीं आपुली मात्रा गोसावीयांपुढें ठेविली : देव[७] होते ते पाणीयांतु घातले : नक्षेत्रमाळा : उपकणें होतीं तीएं वीकुनि गोसावीं आपुलां ठाइं उपाहारू करवीला : मग गोसावीयांचां ठाइं राहिले : ।।

## ४०६ पदूमनाभी क्षौर नीराकरण

एकु दीं गोसावीयांसि क्षौर[१] होत असे : तवं पदुमनाभिदेव गोसावीयांतें वीनउं लागले : "जी जी : मीं क्षौर करीन : " म्हणौनि आंगणीं चौंडकाऐसे उडति : ऐसे नाचों लागले : आणि गौराइसें भीतरि दुख करितें होतीं : 'क्षौर कीजे : गोसावीयांचां ठाइं अनुसरिजे : ' ऐसें म्हणौनि दूख करितें होतीं : मग गोसावीयांतें बाइसीं वीनवीलें : "बाबा : बटीकु क्षौर करीन म्हणतु असे : तरि[२] कां करूं दीजे ना ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरू पोकळु : घाला वाहीरी : हा काइ क्षौर करील ? यांसि दांडीए बैसौनि : आडासनीं पाओ घालौनि : वाखारि झेलावी असे : भीतरि वर्तत असे तें साच : " मग गोसावी तेयांसि क्षौर करूं नेदितीचि : ।।

## ४०७ साधां मोदक विपलाणें

एकु दीं इंद्रभटीं साधातें म्हणीतलें : "एल्हो : मज लाडू करूनि दे कां : मग मी गोसावीयांचां ठाइं ओळगवीन : " तीहीं म्हणीतलें : "हो कां : " मग तेहीं गहुं : गुळ तेल : मीरीएं : ऐसे च्याऱ्ही ठाए आणुनि दीधले : मग साधीं सोजी काढीली : सेव केली : तळिली : चुलीवरि पाकु ठेविला : तवं भीक्षाअवस्वरू लोटला : तेहीं म्हणीतलें "हा पांकु जवं होइल तवं मीं दोंचौं घरां भीक्षे जाउनि येइन : " मग तीए भीक्षेसि गेलीं : तवं तेयां तेथ नावेक उसीरू लागला : तवं पांकु लांघला : आलीं : मग लाडु वांधले : मग दृडीए[१] घालुनि गोसावीयांलागि इंद्रभट घेउनि आले : रात्रीं बाइसें गोसावीयांचां ठाइं ओळगवावेया फोडूं बैसली : तवं तो काइसेनहीं न फूटे : मग उदीयांचि गोसावीयांचेया पुजाअवस्वरासि साधें आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बहुती सुगरणी देखिलीया : परि[२] सातपांच मुसळें मेळौनि लाडु फोडिजे[३] ऐसी सुगरणि कोण्ही नाहीं देखिली : " तवं साधीं म्हणीतलें : "ना जी : तें जालें ऐंसें : चुलीवरि पाकु ठेविला : तवं भीक्षाअवस्वरू जाला : म्हणौनि दोंचौं घरासि गेलीएं : तवं मज उसीरू लागला

---

७ **मुराहबी.** देव : गाठिया : ब्राम्हणा एका दीधलीया : नक्षेत्रमाळा—.

**४०६.** १ **पंगो.** क्षेउर. २ **मुराहबीगो.** तरि करूं दीजो कां :

**४०७.** १ **भगोमुरा.** दुरडीए. २ **बी.** परि कोण्ही सुगरणीचे लाडु सातपांच मुसळें मेळउ फोडिले नाही. ३ **मुरा.** फोडीले.

आणि पांकु लांघला : म्हणौनि कठीनु जाला : " सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " वहुती सुगरणी देखिलीया : परि चुलीवरि पांकु ठेउनि भीक्षेसि जाये ऐसी कव्हणीं सुगरणि नाहीं देखिली : " गोसावीं हांस्य केलें[५] : ।।

## ४०८ माहात्मानामपुर्वक कुमारी खाजें देववणें

गोसावीयांसि उजवीएकडे वसैएसि पटिसाळेवरि[१] आसन असे[२] : कुमारि एकि करा घेउनि पाणी वाहे : वसैएचें द्वार पावे : आणि उभी राहे : आणि गोसावीयांतें पाहे : आणि गोसावीं आपणेयां आपण[३] खेवं देति : आणि म्हणति[४] : " हुं : " आणि जाए : ऐसें वेळां दोनि केलें : मागौति तीसरीए वेळे आलीं : वसैएचिए द्वारापासि उभी राहिली : गोसावीयांतें पाहों लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : या : एथ एक खेवं देया : " ऐसें म्हणौनि आपणेयां आपण खेवं दीधलें : आपणेयांपासि बैसवीली : आधीं[५] खाजें वांटिलें होतें : तेधवां तेहीं एरझारा करितें होतीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें खाजें असे कीं : तें आणा : " बाइसें गेलीं : तीएं थोडेंचि घेउनि आलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : माहात्मेयांसरिसें आणा : " बाइसीं म्हणीतलें : " बावा : माहात्मेयांसरिसें कैसें इसि ? " तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[६] : एथ तुम्हीं काइ होआ : मां एं एथ काइ नव्हति ? " मग बाइसीं अवघेयांसरिसें खाजें आणिलें : मग गोसावीं आपुलेनि श्रीकरें जेयांसि दीजे तेयांसि दीधलें : मग तीहीं भातुकें खादलें : मग पाणी येओं सुदलें : तांबोळ दीधलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मां : आतां जा : " मग तीएं गेलीं : ।।

## ४०९ पांचौरां वस्ति ।।

## ४१० सेंदूरणीं गोपाळीं अवस्थान

मग गोसावीं सेंदूरूणीसि बीजें केलें : तेथ गावादखिणे गोपाळाचें देउळ : पुर्वामुख : तेथ गोसावीयांसि दीस वीस[१] अवस्थान जालें[२] : ।।

---

४ **मुराहबीगो.** °तरि सावया वीशेष–. ५ **गो.** °इंद्रभट दीसवडी आन आन रांधवीति.

४०८. १ **मुराहबी.** आंगणीं. २ **मुराहबी.** °गोसावी खाजें वाटीत होते : कीं वांटिलें होते तें नेणिजे : बाहुल्यें प्रस्तुतींचि. ३ **मुराहबीपं.** आपें आप. ४ **पं.** °तुं जाए. ५ **अगो.** साधीं. ६ **मुराहबी.** तुम्हां आवघेयां हें काइ होए : यां काइ हें नव्हे ?

४१०. १ **एवा.** पन्हरा दीस. **गो**$_{२}$ पाखु दी. २ **गो**$_{२}$**(एवा.)** °सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हे देखिली श्रीकृष्णचक्रवर्तीची मूर्ती : हे सोनेसळेया फुटेयाची कास असे : मेघस्याम :" मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा बाबा : श्रीकृष्णचक्रवर्ती ऐसे होते :" म्हणौनि दंडवत करूं बैसली : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : अवघा पाखाणाची मूर्ती : एथ काइ असे ? " मग उगीचि राहिली ।।

## ४११ पदुमनाभीयाचनीं चणकपक्वान आरोगणें

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं वीहरणासि बीजें केलें : वीहरणस्थान सारूनि मागुतें बीढारासि बीजें करितां मार्गीं पदुमनाभिदेवातें म्हणीतलें : “ बटिका : चणा आपजवावा[१] : मां एथ एकु उपाहारू करा : ” “ जी जी :” म्हणौनि नीगाले : तेथ चणा सांवगतु होता : वावरीं कडपें होतीं : ते तेया सेतकरीयापासि गेले : तेयांतें म्हणीतलें : “ आम्हांसि काहीं चणा देयावा : ” तेणें तेयांचेया तोंडाची वास पाहिली : नीका संभावनीकु ऐसा देखौनि म्हणीतलें : “ तुम्हां लागे तो घेया जा : ” ते गेले : चणा[२] बांधला : तवं तो कुणबी आला : *तेणें म्हणीतलें : “ ऐसा काइ नेयाल : ” मग*[३] तेणें तो चणा रगडिला : *उपणिला*[३] : मोट बांधौनि डोइए ठेविली : ते गोसावीयांपासि घेउनि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : “ अर्ध चणे वीका : वीकुनि तुप घेया : आधेयाची ढीडरीं करा : ” मग तेहीं अर्ध चणे वीकिले : तेयांचें तुप घेतलें : आधेयाचीं ढीडरीं करूं आदरीलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : “ आपणचि डाळि करावी : आपणचि वाटावी : आपणचि ढीडरीं करावीं : पुसों लाभे[४] : परि करूं न लभे : ” मग तेहीं सोंडीएवरि चणे भरडिले[५] : तवं बाइसें आलीं : तीहीं म्हणीतलें : “ बटिका : ऐसें काइ करीतु अससि ? ” *तेहीं म्हणीतलें : “बाइ : गोसावीं मातें म्हणीतलें : ‘आपणचि करावें :’ तरि मीं डाळि करीत असें*[६] *: ”* बाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : “ बाबा : मी बाबापुरतीं आंजुळीभरी डाळिचीं ढीडरीं *वेगळीं*[७] करूं ? ” गोसावीं मानिलें : मग बाइसीं तेयांतुल चणे घेतले : भरडिले : डाळि भीजों घातली : वाटिली : मग बाइसीं गोसावीयांपुरतीं ढीडरीं केलीं : पदुमनाभिदेव बाइसांतें पुसपुसों करीति : बाइसें सांघतें जाति : ऐसें ऐसें सांघते जाति : तैसें तैसें ते करित जाति : बाइसांतें वेसरू मागति : मग ढीडरीं केलीं : मग गोसावीयांसि वीळिचांचा पुजाअवस्वरू जाला : धूपार्ती मंगळार्ती जाली : मग गोसावीयांसि ताट केलें : गोसावीयांसि[८] आरोगण जाली : भगतिजनां पांति जाली : गुळुळा वीडा जाला : ॥

## ४१२ पदुमनाभी पाठवणी

गौराइसें तीएं पदुमनाभिदेवांची माता : तीएं आंबडीहुनि[१] दांडीए बैसौनि पदुमनाभीसि नेयावेया आलीं : गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन असे : तेहीं गोसावीयांसि

---

**४११.** १ **मुराहबी.** मागा. २ **गो**₂ थोरला चणेयाचा भारा——. **मुराहबी.** चणा वोली घालुनि आणिला : रगडवीला : उपणवीला :°. ३ (**गो**₂). ४ **गो**₂ °हे प्रमाण——. ५ **एवा.** °वाटीत होतें : तें देमाइसीं देखिलें : देमाइसीं म्हणीतलें : “दे : मीं करीन : ” देमाइसीं ढीडरीं केलीं : थोडे ऐसे चणे वीकवीले : तांदुळ घेतले : तुप घेतलें : उपाहारू नीफजवीला : मग गोसावीयांसि पूजा केली. ६ (**पं.**). ७ (**मुराहबी.**). ८ **गो**₂ गोसावी आरोगण करीत असति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : बटिकाचें एथ ढीडरें वाढा. ” बाइसीं ढीडरें वाढीलें : मग गोसावी आरोगण करिताति : सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : ढीडरें नीकें जालें——.

**४१२.** १ **पं.** बीडींहुनि.

काइ दरीसनासि केलें तें नेणिजे : काइ उपाहारू केला तो नेणिजे : आलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : रामनाएकु[२] होता तो सरला : जोगनाएकासि कुळवाडि आवरे ना : तरि गोसावीं पदुमनाभितें पाठवावें : " सर्वज्ञें म्हणीतलें : *" तुमचा पदुमनाभी येथौनि बोलावीला ?"* " ना जी :" *" तरि काइ येथीचां कोण्हीं बोलावीला ?"* " ना जी :" *" तरि न्या ना कां आपुला पदुमनाभी : हा येथे असावा ऐसी काहीं चाड पडीली असे ?"* " ना जी : *गोसावीयापासी असे म्हणौनि आणि काइ*[३] :" " वटिका जा :" **पद्मनाभीदेवी म्हणीतलें :** *" यें मातें कैसेनि पां नेती : ऐसें यांचें पाहों पां :"* *सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां तवं जाए पां*[३] :" म्हणौनि पाठवीलें : आणि ते उगेचि गेले : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : बाबाएं म्हणीतलें तें साच जालें : " ॥

## ४१३ देमाइसां : लखूबाइसां भेटि

देमाइसें : लखूबाइसें गोसावीयांचेया दरीसनासि एत होतीं : गोसावी. कवणी ठाइं राज्य करीत असति ऐसें नेणिजे : ऐसीया हींडतें सेंदूरणीसि आलींया : ऐली थडीएसि भीक्षा केली : नदीसि जेविलीया : ऐली थडीएसि नीद्रा करावेया आलीया : मग गोसावीयांसि वीळिचांचा पुजाअवस्वरू जाला : व्याळी जाली : बाइसीं फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति : सर्वज्ञें म्हणीतलें[१] : " मार्कंडा : *या आरुतें : ऐसेंऐसें जा*[२] : तुम्हीं कवडां दूध फोकरा जा :" मार्कंडीं म्हणीतलें : " जी जी :" म्हणौनि नीगाले : मार्गीं वीचारूं लागले : ' काइ पां गोसावीयांसि व्याळी तरि जाली : आतां दूध काइसेयालागि ?' ऐसें वीचारीत वीचारीत गेले : ' कवडां दूध जोडे ओ : कवडां दूध जोडे ओ :' म्हणौनि फोकरूं लागले : तवं देमाइसीं आइकिलें : मग म्हणीतलें : " लखूबाइ : मार्कंडाचेयासारिखा सबदू :" तवं लखूबाइसीं म्हणीतलें : " हो देमाए :" मग देमाइसें साउमीं गेलीं : देमाइसीं पाचारिलें : " हा कोणु मार्कंडा ?" " ना ओ :" मग देमाइसीं पुसिलें : " गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असति ?" " ना हे नव्हति गोसावी गोपाळीं राज्य करिताति : चाला चाला : तुमतें गोसावीं बोलाउं पाठवीलें :" मार्कंडीं म्हणीतलें : " ऐसे आमचे गोसावी : आपुलें इस्वरीए जाणों नेदीति : या ऐसें कां न म्हणावें : 'अमुकी तमुकीं आलीं असति : तेयांतें बोलावा जा :' " मग एरएरें गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांपुढें अवघें सांचों लागलीं : " जी जी : या गावांसि आलों : अमुकीए ठाइं भीक्षा केली : अमुकीए ठाइं जेविलों : नीद्रा करावेया ऐलाडि

---

२ **गो.** रेइनाएकु. ३ (**मुराहबी.**).

**४१३.** १ **अपं.** मंडळीका : मार्तंडा. २ (**मुराहबी.**).

आलों : तवं मार्कंडु भेटला : मग गोसावीयांचेया दरीसनासि आलों :" ऐसें अवघेंचि सांघीतलें :।।

## ४१४ उपाध्यां वीस्णुभटां भेटि

गोसावी[1] करंजखेडीं राज्य करिताति : ऐसें तेहीं भडेगावीं परिसिलें : मग ते पर्वाकारणें[2] गोसावीयांपासि एत असति : ऐसे सेंदुरजणींसि आले : वीस्णुभट बिढारासि गेले : उपाध्ये हाटवटीएसि कणीकि घेओं गेले : तवं तेथ तेयातें म्हणीतलें : "तुम्हीं[3] काइ गोसावीयांचेया दरीसनासि नीगालेति ?" उपाधीं म्हणीतलें : "गोसावी कोण? " "ना हें नव्हे गोपाळींचां देउळीं एक गोसावी राहिले असति :" तैसेचि ते नीगाले : बीढारीं वीस्णुभटांतें म्हणीतलें : "तुम्हीं काइ गोसावीयांचेया दरीसना जात असा ? " वीस्णुभटीं म्हणीतलें : "गोसावी कोण हो ?" "ना एथ एक गोसावी गोपाळाचेया देउळासि आले असति :" ते तेथौनीचि नीगाले : बीढारीं नीरोपु ठेविला : "आमचे कोण्ही एती : तेयातें ऐसें म्हणावें : 'आम्हीं गोसावीयांचेया दरीसनासि गेलों' ऐसें सांघावें :" तैसेचि ते नीगाले : दोघांसि वाटे भेटि जाली : सांघातें गोसावीयांचेया दरीसनासि गेले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग गोसावीं पुसिलें : "हें एथ असे ऐसें कवणी ठाइं आइकिलें ?" *उपाधीं म्हणीतलें : "जी जी : मीयां हाटवटीएसी आइकीलें :" वीष्णुभटांतें पुसीलें : "तुम्हीं कोणे ठाइं आइकीलें ?" "जी जी : मीयां बीढारीं आइकीलें*[4] *:"* ऐसें एरएरीं अवघें गोसावीयांपुढें सांघीतलें :।।

## ४१५ उपाध्ये : प्रसनाएकु रोधपुरासि पाठवणें

एकु दीं गोसावी श्रीप्रभूची महीमा नीरोपीत होते : तवं प्रसनाएकासि ऐसें उपजलें : जें श्रीप्रभूचेया दरीसनासि जाइजे : उपाध्ये आणि प्रसनाएकु : दोघै बाहीरि गेले : तवं प्रसनाएकें उपाध्यातें म्हणीतलें : "जानो : मीं श्रीप्रभूचेया दरीसनासि जाइन : तुं एसील ? जाओं : तुज श्रीप्रभूचें दरीसन होइल[1] :" तेहीं म्हणीतलें : "ना गोसावीयांतें वीनवावें : गोसावी पाठवीती तरि मीं एइन :" मग दोघै गोसावीयांपासि आले : प्रसनाएकें गोसावीयांपासि सांघीतलें : "जी जी : जानोतें मीयां म्हणीतलें : 'जानो : मीं श्रीप्रभूचेया दरीसनासि जाइन : तरि तुं एसील ? जाओं :' तवं जानोनि म्हणीतलें : 'ना गोसावीयांतें विनवा :' मा गोसावी पाठवीती तरि मीं एइन :" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

**४१४.** १ (**मु. शोध**) उपाध्ये आणि वीष्णुभट हे मागां सन्निधानीहुनि कवणीये ठाउनि गेले होते हे नेणिजे : मग मागौते गोसावीयांचेया दर्शना नीगाले. **रा.** उपाधी वीष्णुभटीं गोसावीयातें येरंडवलीएकडे आइकीलें : २ **मु.** दवणे पर्वालागि. ३ **मुराहबी.** तुम्हीं काइ गोसावीयांचे ?" "गोसावी कोण ?"°. ४ (**मुराहबी.**).

**४१५.** १ **मुराहबी.** नाहीं.

" हो गा बटिका ? " " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें[२]: " प्रमेस्वरपुरासि जातां एथौनि कां गा वारिजैल ? प्रमेस्वरपुरा जाओं म्हणे तेया केसणें गोमटें : मा तीया मोहोरा उभा ठाके तेयां केसणें गोमटें : मा प्रमेस्वरपुरा जातां पाउलापाउला गोमटें कीं गा :" मग गोसावीं पुसिलें : " कैसे जाल ? " "जी जी : गोसावीयांचां ठाइं पर्व करूनि : मग जाउनि :" मग तेहीं गोसावीयांचां ठाइं पर्व केलें : मग तेहीं दोघीं वीचारू केला : प्रसनाएकु म्हणों लागले : "लोणारावरौनि जाओं : कमळजैएचें दरीसन होइल : धारेचें स्नान होइल : तेथौनि मेह्करीं सारंगधराचें दरीसन होइल : तैसेंचि श्रीप्रभूचेया दरीसनासि जाओं :" उपाध्ये म्हणति : " उजुचि चांगदेवावरूनि श्रीप्रभुचेया दरीसनासि जाओं :" ऐसे दोघै वीचारीति : गोसावीयांचेया दरीसनासि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "सांघातीयांसि एथचि वीसंवादू मा : " उपाधीं गोसावीयांपुढें सांघीतलें : "जी जी : प्रसनाएकु ऐसें म्हणति : जें लोणारावरौनि जाओं : वरजेचें स्नान होइल : आणि सारंगधराचें दरीसन होइल : मग तैसेचि श्रीप्रभूचेया दरीसनासि जाओं : आणि मियां म्हणीतलें : उजुचि चांगदेवावरौनि जाओं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एक आले : ते कीर्तितें करूनि गेले : आतां तेथ काइ असे ? कें व्रजेचें[३] स्नान : सारंगधराचें दरीसन : आणि कें श्रीप्रभूचें दरीसन ? कें तें : कें हें ?" मग गोसावीं तेयांसि वीधि वीहिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसेंयांचि नीगावें : पेणोवेणां जावें : उपेणें न करावें : वाडुवेळु श्रीप्रभूचेया श्रीचरणावरि माथा[४] नेठवावा : सन्मुख न बैसावें : मौनें बैसावें : श्रीप्रभूसि नीरोधू न करावा : पाठवीती तेह्वळीचि जावें : देवतेसि नीरोधू होए ऐसी सेवा न कीजे कीं गा : " मग ते दोघै नीगाले : ते चांगदेवासि आले : तवं तेथ संन्यासीयांसि परीखानीमंत्रण : आंबेभोजन मांडलें असे : एरएरां नीमंत्रण दीधलें : एकाचें जेविलें : जेउं सरलें : आणिखीं उदीयांचि आखत लाविली : उपाधीयांसि आखत लाविली : आणि उपाधीं म्हणीतलें : " हें काइ प्रसनाएको : सर्वज्ञें म्हणीतलें : 'पेणोवेणां जावें : उपेणें न करावें : तरि तुम्हीं राहात असा कैसें?' " प्रसनाएकीं म्हणीतलें : " राहे : आंबेयाची सराए तवं घेओं : मग श्रीप्रभूचें दरीसन तें काइ केंहीं जात असे ?" मग तो दिसु राहिले : जेवण जालें : एरी दीसीं मागुतें नीमंत्रण देओं आदरिलें : उपाधीं म्हणीतलें : " तुम्हीं राहाल तरि राहा : मीं जाइन : " प्रसनाएकु राहिले : उपाध्ये नीगाले : ते अळजपुरासि आले : दामाचे पांच[५] आंबे घेतले : तेथौनि देहेंचि श्रीप्रभूचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि तीकोउपाध्याचीए ओसरीएवरि आसन असे : तवं उपाधीए आले : गोसावीयांपुढें आंबे ठेविले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांपुढें उभे होते : गोसावी श्रीकरीं

---

२ **मुराहबी.** °तुम्हीं परमेश्वरपुरा जाल आणि एथौनि वारिजैल? परमेश्वरपुरा जावो म्हणे: तेणें मार्गें नीगे: एकुएकु पाउल घाली तेया केसणें गोमटें: ३ **पंगोभ.** वरजेचें. ४ **मुराहबी.** °ठेउनि नमस्कारु न करावा. ५ **रावा.** दाहा.

आंबा घेति : मध्येंचि आरोगीति : गोसावी म्हणति : " मेला जाए : गोडू आहे म्हणें[६] : " दोंदावरि रसु गळे : खाड माखे : ते पुसीति : ऐसे ते आंबे आरोगिले : मग गोसावीं श्रीचरणीचेनि आंगुठेनि करूनि उपाध्यांसि देओं आदरिलें : " आओ मेला जाए : घे घे म्हणें : आरे : घे ना म्हणें : आरे : घे ना म्हणें : " तें उपाधीयांसि उमटे ना : मग तीकोउपाध्यांची कन्या तेथ उभी होती : तीया म्हणीतलें : " भटो : गोसावी तुम्हांसि प्रसादू देत असति : तो घेया : " मग तेहीं माहाप्रसादू म्हणौनि घेतला : आंबे[७] घेतले : श्रीप्रभूनि म्हणीतलें : " मेला जाए : साळे जाए ना म्हणें : सापु खाए ना म्हणें : ऐसाचि एइल तो खाइल म्हणें : " तें उपाध्यांसि उमटे ना : तवं सापु आला : तेयातें देखौनि वासरूं बुजालें : " मेला जाए : आला परि खाएचि ना : " मग गोसावीं मागौतें म्हणीतलें : "आओ मेला जाए : साळेसि जाए : जाए ना म्हणें : आतां एइल तो खाइल म्हणें : आओ मेला जाए : साळेसि जाए ना म्हणें : " तेयांसि उमटे ना : तेथ तीको-उपाध्यांची कन्या होती : तीया म्हणीतलें : "तुमतें गोसावी साळेसि पाठवीताति : " उपाध्ये साळेसि गेले[८] : त्रीरात्री श्रीप्रभूचां सन्यधानीं होते : मग दंडवत घालुनि नीगाले : ।।

## ४१६ देमाइसां : लखूबाइसां पाठवणी

*लखुबाइसें : देमाइसें सेंदुर्णीसि सन्निधानीं होतीं : तेथ तयांसि आणि बाइसांसि काहीं तुडपुड जाली होती : मग गोसावीं सेंदुर्णीहुनि बीजें करूं आदरीलें : तेव्हळीं आधी*[१] गोसावीं देमाइसांतें : लखूबाइसांतें पुढें गावांसि पाठवीलें : *मागिलाकडौनि*[२] वीळिचांचां वेळीं गोसावीं तेयांचेया गावांसि बीजें केलें : एका वृक्षातळि गोसावीयांसि आसन जालें : एका वृक्षातळि तीएं होतीं : लखूबाइसीं गोसावीयांतें देखिलें : देमाइसांपुढें सांघीतलें : " देमाइ : गोसावीं बीजें केलें : चाला जाओं गोसावीयांचेया दरीसनासि : " तवं देमाइसीं म्हणीतलें : " ना गे आइ : मीं नैएं : जाइजैल : आणि बाइसें वीसारूंचि लागती : तुम्हीं जा : मीं नैएं : " तेहीं म्हणीतलें : " तुम्हीं नैया तरि नैया : परि मीं जाइन : " तीएं गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : आणि बाइसें वीसारूंचि लागलीं : इतुकेनि तीएं तैसींचि नीगालीं : एउनि देमाइसांपुढें सांघों लागलीं : " तुम्हीं म्हणीतलें तेंचि जालें : तेथ जवं उभीं ठेलीएं तवं बाइसें वीसारूं लागलीं : तुम्हीं नैयाचि तें बरवें केलें : " मग गोसावीं बाइसांची दृष्टि चुकौनि तेथ[३] बीजें केलें : तवं देमाइसीं गोसावीयांसि आसन रचिलें :

---

६ **राहबी.** °आडवा आंबा आरोगीति : ऐसे पांचै आंबे कणुकणु चाखीले : " मेला जाए : घे घे ना म्हणें—. ७ **राबी.** ते उपाधीं घेतले. ८ **हबी.** (**शोध.** °मग बारवेसि गेले : सिळी रोटी होती : ते रोटीतेल जेवीले : आणि प्रसादाचे आंबे खादले : मग वीळिचांचिये वेळे मागौतें दर्शनासि आले :

**४१६.** १ (**मु. शोध.**). २ (**मुराहबी.**). ३ **मुराहबी.** तेयाचेया बीढारा.

दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीया : गोसावीयांजवळि बैसलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती[४] यें येथिचेया दरीसनासि आलीं : तुम्हीं नैयाचि तें काइ ?" तवं देमाइसीं म्हणीतलें[५] : "ना जी : एइजैल : आणि बाइसें वीसारूंचि लागती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि[६] होआवी ओढाळा गोरूवाची वाणी कीं : बाइ[७] : कव्हणीं एकु सेतकरी आपुली वर्ल्हें[८] राखत असे : ओढाळु गुरूं[९] असे : ते थैक थैक म्हणतां एं : घांसु घेउनि जाए : तेयासि घांसु तवं फावें[१०] कीं : तैसें होआवें कीं देमती :" मग गोसावी तेयांतें बीढारासि घेउनि आले : बाइसीं म्हणीतलें : "बाबा यांसि राहों दीधलें : आतां काहीं म्हणों नैए :" म्हणौनि तेयांसि स्नेहचि करीति : ।।

## ४१७ चांगदेवीं[१] अवस्थान

मग तेथौनि गोसावीं चांगदेवासि[२] बीजें केलें : चांगदेवीं जगतीआंतुलीं[३] मढीं अवस्थान जालें : ।।

## ४१८ चींचखेडकरां रामदेवाचा अवस्वरू आइकणें

एकु दीसु गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जायालेअनंतरें गोसावीं वीहरणासि बीजें केलें : गोसावी सोरठीए[१] जाडिची आंगीटोपरें लेउनि चांगदेविचां दखिणिली दारवठां पुर्वीलीए सोंडीएवरि दखीणामुख गोसावी उभे असति : तवं चींचखेडकर रामदेव आले : तेयां नावं कवडींबु : कवडींबु रामदेव ते गंगेकडौनि गात वात गावांतुनि उभीया हाटवटीया आपुलीया सीक्षांसीं एत असति : तवं गोसावीयांतें सोंडीएवरि उभेयां देखिलें : आणि धावंत पुढां आले : हातीं चीत्रीवं काठी होती : ते गोसावीयांसि ओळगविली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग ते काठी श्रीकरीं धरूनि गोसावी त्रीभंगी उभे असति : मग तेहीं जति केली : मग ते मागौतें सरौनि हातीं टाळु आळवनीं घेउनि : श्रृतीकार[२] सरिसे केले : मग तेहीं गोसावीयांसि जति ओळगविली : 'संकुचक्र सांडौनी हातीं डांग घेतली : हातीएरू गोवळीया ।। ऐसा गोवळु गोसावी माझा गोरूवें राखे : गोपाळवेखें ।। आलीएं परि गोवळु ऐसा नावडे : मायामानवीया जाले ।। रामेयांसि स्वामी नोळखे कव्हणी : आलीएं ।। ' ऐसी जति तेणें गोसावीयांसि ओळगविली[३] :

---

४ **अपंभ.** बाइ : ५ **मुराहबी.** ° "जी जी : बाइसांहातीं येवों नये : ६ **मुराहबी.** "देमती : वोढावा गोरुवाची परी तुम्हां होआवी : ७ **मुराहबी.** °माळेयावरि जो असे तो थै थै म्हणे : तें तवं एकु घांसु घेचि : तो तवं फळे कीं : तैसें होआवें देमती : ८ **एवा.** वल्हाटें. ९ **पं.** गोरुव. **भ.** गोरूं. १० **एवा.** फळे. **ह.** पळे.

**४१७.** १ **मुबी.** चांगदेवोपुरीये. २ **मुबी.** चांगदेवोपुरीएसि. ३ **रावा.** जगतीबाहीर जगतीचां नृत्यकोणीं मढौलीए पंचरात्रि अवस्थान जालें.

**४१८.** १ **मुराहबी.** स्याळियेचें आंगीटोपरें लेउनि–. २ **पं.** सीकार. ३ **मुराहबी.** गोसावी म्हणीतलें :

मग गोसावीं तेयांसि पुडवाटुवा : झाडूनि तांबोळ दीधलें : स्याळीएचें[४] आंगीटोपरें दीधलें : ते टोपरें डोइएं घालुनि नावेक नाचीनले : मग गोसावीं तेयांसि पाठवणी दीधली : मग ते नीगाले : *बाइसीं पुसले : " बाबा : हा कवणु ? " गोसावीं म्हणीतले : " रामदेव कविडींभु*[५] *: "* बाइसीं म्हणीतलें : " बाबा भागवतु[६] कैसा नीका :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा आणीकां भागवतांसारिखा[७] नव्हे : हा सलोलु :" मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ४१९ तापीतटीं मार्कंडा देवता दाखवणें

मग तैसेंचि गोसावीं वीहरणासि बीजें केलें : तापीतटीं गोसावीयांसि आसन असे : गोसावीयांजवळि मार्कंड बैसले असति : तेयांसि स्तीति जाली : आणि देखों लागले : 'गोसावी तापीआंतु बीजें केलें : हातीं मार्कंड[१] धरिले : ऐसें उदकाआंतु बीजें केलें : देवता साउमीया आलीया : गोसावीयांसि दंडवतें केलीं : श्रीचरणां लागलीया : आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : माथांचां केसीं श्रीचरण झाडिले : कनकाचां परीएळीं : रत्नाचीया जोती : दीप ऐसीया गोसावीयांसि ओवाळणीं केली : स्तुति केली : मग मागौतें गोसावीं बीजें केलें : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : ' आणि मार्कंडीं[२] ऐसा वीस्मो केला : बाइसीं पुसिलें : " काइ मार्कंडा ? " मग मार्कंडीं बाइसांपुढें अवघीचि गोष्टि सांघीतली : मग बाइसीं म्हणीतलें[३] : "बाबा : मातें कां चुकवीलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा एथिचीए स्तीतीतव देखतु असे[४] : " मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।। *चतुर्मुखीं आसन :* ।। *भीतारि चौकीं आसन :* ।।

## ४२० मार्गीं व्याघ्र पाठीं एणें

मग गोसावीं चांगदेवावरौनि सावळदेवाकडे बीजें केलें : एकु दीं गोसावी मार्गीं बीजें करिताति : तवं व्याघ्रें गोसावीयांतें देखिलें : आणि तेयासि स्तीति जाली : तो साउमा आला : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बाबा : वाघु वाघु :" म्हणौनि भगतिजनें भीयालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भीया नको : हा कोण्हाचें काहीं न करी :" गोसावीं बीजें केलें : तो पाठोवाठीं एओं लागला : गोसावी एका गांविचा आखरू पातले :

---

"आतां पूरे :" वारिलें : ४ **मुराहबी.** पींवळी आंगी : टोपरें : गळदंडा दीधला. ५ (**मुराहबी.**). ६ **भमुराहबी.** भक्त. ७ **भमुराहबी.** भक्ता°.

**४१९.** १ **पंमुराहबी.** मार्कंडातें. **एवा.** मार्त्तंडातें. २ **मुराहबी.** आंगुस्ती दीधली : ऐसाऐसा–. ३ **मुराहबी.** " °बाबा : मार्त्तंडु काइ म्हणतु असे ?" गोसावीं म्हणीतलें : " बाइ : यातेंचि पूसा :" " बाबा आपण कें गेलेयां होतेयां ?" " हें कें गेलें होतें ? हें येथचि होतें : नव्हे ? बाइ : यासि ऐसी बुद्धी :" ४ **गोपाळबा वासना :** गोसावीं साचें उदकाआंतु बीजें केलें : बाइसीं देखीलें : तो आभासु पालुखा केला :

आणि उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : आतां खेळा[१] :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा कोण्हाचें काहीं न करी : तरि एओं नेदिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा कोण्हाचें काहीं न करी : परि लोकु यासि उपद्रो करील कीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मां आतां जा :" मग ते नीगाले :॥

## ४२१ तुरंगमारोहणीं देमतीप्रति श्रीकृस्णलीळाकथन

एरी दीसीं गोसावी सावळदेवासि बीजें करिताति : आधिली दीसीं बाइसीं मार्कंडातें म्हणीतलें : "भास्करा : तुं सावळदेवासि जाए : दायांपुढें सांघावें : बाबा एतु असे : अवघी आइती करावी : घोडेनसीं बाबासि सामोरेयां यावें :" "हो कां" म्हणौनि मार्कंड सावळदेवासि गेले : बाइसांचे भाचे दाइनाएकु : तेयापुढें सांघीतलें : "आहो : गोसावी एताति :" तेहीं घरीं सडेसमार्जनें करवीलीं : चौकरंगमाळिका भरवीलीया : गुढीया उभिलीया : आपण घोडेनसीं गोसावीयांसि साउमे आले : मार्गीं गोसावीयांसि दरीसन जालें : गोसावीयांतें देखिलें आणि घोडेयाखालुते उतरले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : घोडेयावरि[१] आरोहण होइजे जी :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांसि घोडेयावरि आरोहण जालें : पुढें भगतिजन : मागिलाकडे गोसावी : गोसावीयांचें घोडें वारिकें : गोसावीं मागील वास पाहिली : तवं मागिलीकडे देमाइसें एतें असति : तीएं गोसावीयांतें टाकुनि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : या[२] :" म्हणौनि श्रीकरें पासाळाचा[३] अनुकारु दाखवीला : देमाइसीं म्हणीतलें[४] : "जालें नव्हे जी :" म्हणौनि पासाळावरि[३] हातु ठेविला : याउपरि[५] सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : श्रीकृस्णचक्रव्रति कुबजीयेचेया भुवनासि बीजें केलें : सरिसे उधवदेव : तीहीं दोनि आसनें बैसावेया घातलीं : एका आसनावरि श्रीकृस्णचक्रव्रती बैसले : श्रीउधवदेवातें म्हणीतलें : 'बैसा श्रीउधवदेवा :' आणि उधवदेव खालि बैसले : आसनावरि हातु ठेविला : *तेथ तेहीं स्वामिसेवकु भावो जाणविला : आणि तेथचीये प्रवृत्ती विखो जाले*[६] : तैसें केलें देमती : तुम्हीं *एथ स्वामिसेवकु भावो जाणविला : आणि*[६] एथिचीए प्रवृती वीखो जालीति : आणि तेथिचीए प्रवृती उधवदेव वीखो जाले :" *यावरि बाइसीं म्हणीतले : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्ती : आणि श्रीउद्धवदेवासि श्रीयापुर्वक् आळवीति : तें काइ बाबा ?' श्रीकृष्णचक्रवर्तीपस्य अणुभरहि उणे नाहीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भक्ताची थोरी देवोचि जाणे*[७] :" ।।

---

**४२०.** १ **मुराहबी.** राहिजो. **शोध.** "लोकु देखैल : आतां राहीजो माहात्मा :"

**४२१.** १ **मुराहबी.** °बैसावें जी : २ **मुराहबी.** °घोडेया बैसा. ३ **मु.** पासाडा°. ४ **मुराहबी.** "हो कां जी :" ५ **मुराहबी.** °गोसावीं कुब्जीका भुवना बीजें केलें : ते गोष्टि सांघीतली : तैसें केलें°. ६ (**ग.**). ७ (**प्रव. वि.** १३७; **भग.** श्रीकृष्णचरित्र ४).

## ४२२ सावळदेवीं आटवलीए अवस्थान

मग तैंसेंचि गोसावीं सावळदेवासि बीजें केलें[१] : सावळदेवा दखिणे आटवली : तेथ गोसावीयांसि दीस वीस अवस्थान जालें : पश्चीमे खीडकीयेहूनि : पउळीबाहिरीलि वाव्य कोणीं तेयांचा आवारू : तेथ गोसावीयांसि प्रतदीनीं आरोगण : पुजा होए : गावांदखिणें नैचिए थडिए दोहीं वाहाळांमधि देवता असे : तेथ गोसावी वीहरणासि बीजें करिति[२] : ।।

## ४२३ वालसेंगे म्हाळसी वस्ति

तेथौनि गोसावीं वालसेंगेसि बीजें केलें : गावां नृत्य कोणीं म्हाळसीचें देउळ : पुर्वामुख : तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : एरी दीसीं उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावी आंगीटोपरें लेउनि आंगणीं उभे ठेले[१] : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां पैला देउळासि जाइजैल :" तैसेंचि गोसावीं तपोवनासि बीजें केलें : ।।

## ४२४ तपोवनीं साइंदेवां भेटि : मासुरूळीं अवस्थान

गोसावीं तपोवनासि बीजें केलें : पुर्वामुख सीधनाथाचें देउळ : तेथ नावेक आसन जालें : तें रचमचेचें स्थान : म्हणौनि गोसावीं तेथौनि बीजें केलें : देउळादखिणे पुर्वाभिमुख जगतीआंतु लींगाचें देउळ : तेथ गोसावीयांसि आसन जालें : तवं सांइदेव दांडीए बैसौनि देउळासि आले : तेयांसि सीधनाथाची भगति : चौकीं आपुली वस्त्रें ठेविलीं : कौपीनु केला : घागरि घेउनि पाणी वाहिलें : सडा घातला : देवतेसि स्तपन[१] केलें : पुजा केली : प्रदखिणा करावेया आले : तवं तेथ गोसावीयातें देखिलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांतें[२] वीनवीलें : *"जी जी : माझेया आवारासि गोसावीं बीजें करावें जी[३] :"* गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग तेहीं गोसावीयांसि दांडी ओळगविली : गोसावीं दांडीएवरि आरोहण केलें : ते ओडणखांडें घेउनी पुढां खोलत नीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं घोडेयावरि बैसा :" तीहीं म्हणीतलें : "जी जी : मीं गोसावीयांपुढें चालैन[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि हें उतरैल :" मग घोडेयावरि बैसले : मग गोसावीं मासुरुळासि बीजें केलें : देव्हारचौकीएसि

---

**४२२.** १ **मुराहबी.** °सावंळदेवा दक्षिणे भीतरीलीकडे जगतीसीं पुर्वपश्चिम पटिसाळ होती : पश्चिमीली सीरां एका खणाची गुंफा पूर्वामूख : तेथ अवस्थान जालें : **शोध.** गावां अग्ने बदरीखीया एकु आंबा : तयातळीं विहरण : २ **एवा.** °प्रतदीनीं दाइनाएकाचें ताट ए : **एवा.** एकु दीं दाइनाएकें वस्त्रपूजा केली.

**४२३.** १ **मुराहबी.** °मग तपोवन अवळोकीलें सर्वज्ञें म्हणीतलें :—

**४२४.** १ **मुहबीपंगो.** तर्पण. २ **मु.** °गावांतु नेयावेया—. ३ (**गो**$_2$). ४ **भ.** खोलैन.

मासु एकु[५] अवस्थान जालें : तेयातें ब्राह्मणाचें एक भानवस होतें : तेथ भगतिजनालागि अंन नीफजे[६] : तेयांचां भानवसीं गोसावीयांलागि उपाहारु होए : गावांपुर्वे वीहीरि : वीहीरीपुर्वे आंबा : तेथ गोसावी वीहरणासि बीजें करीति : ।।

## ४२५ पींपळगावीं गोवर्धनीं वस्ति

तेथौनि गोसावीं बीजें केलें : पींपळगावीं गोवर्धनीं वस्ति जाली : ।।

## ४२६ भोगवर्धनीं[१] रामीं वस्ति

तेथौनि गोसावीं भोगवर्धनासि बीजें केलें : रामनाथाचें देउळ : तेथ गोसावीयांसि वस्ती जाली : ।।

## ४२७ सेलवडे बामेस्वरीं वस्ति

सेलवडेसि गोसावीं बीजें केलें : गावां वाव्य कोणीं बामेस्वराचें देउळ : पुर्वाभिमुख : पुढां बारव असे : तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : ।।

## ४२८ आणवां बनीं अवस्थान

गोसावीं तेथौनि आनवेयासि बीजें केलें : गावांउतरे बन : तेथ गुढरू आंबा : तेथ गोसावीयांसि दीस पन्हरा अवस्थान जालें : ।।

## ४२९ प्रतदीनीं बनकरआंब्र भेटि

उदीयांचि बनकर पाटासि हातपाए धुआवेया एति : हातुपाए धूति : पांचपांच[१] आंबे प्रतदीनीं गोसावीयांसि दरीसनां करीति : ।।

## ४३० उपाध्यां भेटि

ऐसे आंबे बहूत सांचले : एकु दीसीं बाइसीं म्हणीतलें : “बाबा : आंबे बहूत सांचले : काइ करूं ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : द्रिढपुरुख एती : तेह्वळीं[१] आंबेयां वेचु होइल :” तवं उपाधीए प्रमेस्वरपुरुनि आले : गोसावीं क्षेमाळींगन दीधलें : तीहीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांपुढें सांघों आदरिलें : नीगाले तेथौनि श्रीप्रभूचीए भेटिपर्यंत सांघीतलें : ‘श्रीप्रभूनि आंबेयांचा प्रसादू दीधला :’ ऐसें गोसावीयांपुढें

---

५ एवा. मासु दीसु. ६ अ. नीफजवीलें.

४२६. १ अ. भोकरवर्धनीं. मु. भोगोवर्धनीं.

४२९. १ एवा. दाहादाहा.

४३०. १ एवा. तरी.

सांघीतलें : याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : " नेणिजे श्रीप्रभूची प्रवृति[२] : कवणी वेळे कवणा जीवां काइ देती :" मग[३] गोसावीं बाइसांसि नीरोपु दीधला : मग गोसावीयांसि बाइसीं मांडे केले : आंबे पीळिले : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं आपुलीए पांती बाइसांकरवि तेयांसि वाढवीलें : मध्यें बाइसांकरवि आंबे देववीति[४] : वेळवेळां रसु वाढवीति : ऐसें गोसावीं तृप्तपर्यंत तेयांकरवि आंबे खाववीले[५] : ।।

## ४३१ देमतीप्रति अंब्रग्रासु दरीसन

गोसावीयांसि जेया आंबेयातळि अवस्थान असे तो गुढरु आंबा : तेयांचे आंबे खालि लोंबति : गोसावीं देमाइसांतें म्हणीतलें : "देमती[१] : ऐसेयांचि नीजावें : आणि ऐसेयांचि आंबे तोंडीं घालावे :" ऐसें गोसावीं दाखवीलें : ।।

## ४३२ संसारमोचकु अंब्र कथन

एकु दीसु गोसावी वीहरणासि बीजें करीत असति : तवं एका आंबेयाचे आंबे वरि तैसेचि असति : आणि खालि तैसेचि असति : ते देखौनि भगतिजनीं पुसिलें : "जी जी : हे अवघेचि आंबे काढिजत असिजति[१] : या आंबेयाचे आंबे कोण्ही काह्याडी[२] ना : तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा संसारमोचकु आंबा :" "जी जी : संसारमोचकु म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे[३] आंबे खाए तेयासि जरु ए :" मग भगतिजनीं बनकरातें पुसिलें : "हां गा : हे अवघे आंबे उतरिता : या आंबेयाचे आंबे उतरां ना तें काइ ?" तेहीं म्हणीतलें : "हे आंबे जो खाए तेयासि जरु ए : याचे आंबे पाखिरूवेंहीं न खाति :" "तरि हे काइ कीजति ?" "ना मीठामहुरीयांतु दाटीजति : मग एरी वरिखीचे एरी वरिखीं खाओं एति :" मग तेयांसि साच जालें : ।।

## ४३३ देमती झोळी धूतां सीक्षापण

एकु दीसु देमाइसें झोळी धूआवेया पाटासि आलीं : अंन उरलें होतें तें पाणियांतु पुंजा केलें : मागिलीकडौनि गोसावीं तेथ बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "देमति : हें[१] अंन कोणें सांडिलें ?" "जी जी : उरलें होतें : तें मीयां पाणियांतु पुंजा केलें : खाती

---

२ **एवा.** लीळा. ३ **मुराहबी.** °मग गोसावीं बाइसांकरवि मांडे करवीले : आंबे पीळवीले : गोसावीं आपुलीए पांती जेववीले : रसु घालवीति : साखर घालवीति : प्रसादु देति : ऐसी पांति जाली—. ४ **पं.** तेयासि आपुलीए ताटीचा रसु वाढीति—. ५ **मुराहबी.** °सराए केली.

**४३१.** १ **मुराहबी.** "देमती : ऐसें नीजावें : आ करावा : लवकरि (**एवा.** लपकरि) आंबा तोंडीं रीगैल :"

**४३२.** १ **एवा.** आहाति. २ **एवा.** वेची ना. ३ **मुराहबी.** "हा आंबा खाइजे : आणि संसारापासौनि मुचिजे :"

**४३३.** १ **मुराहबी.** "हें कोणें गा केलें ?" "जी जी : देमाइसीं झोळी धुतली :" सर्वज्ञें म्हणीतलें :

बापुडे मासे :" सर्वज्ञें म्हणीतलें: " देमती : जैसे मासे तैसीं तुम्हीं: एथौनि तुमची थोरी[२] सांधिजैल तरि तुमचे डोळे माथेया जाती : *एथौनि तुमचे दोष बाहिरि घालिजेति तरि पोरे हो : पोटीं सुरी सों सों मराल*[३] *:"* ऐसें गोसावीं तेयांसि सीक्षापण केलें : ।।

## ४३४ देमाइसांतें स्वइछा राहावणें

*येकु दीसु*[१] *बाइसां आणि देमाइसां भांडण जालें : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : या दवडावीया : भांडति असति :" मग उदेयांचि देमाइसें गोसावीयांचेया पुजाअवसरा आली : पुजाअवसरू जाला : मग देमाइसांतें गोसावीं पाठउं आदरीलें*[२] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : देमती[३] तुमचा मासु दीसु भरला : आतां तुम्हीं राहा : भावे परिअटण करा : मग *देमाइसीं वोवीया म्हणीतलीया*[२] *:* " पाउलें म्हणीतलें न करीति हरी : कवणी परी जाओं आम्हीं[४] ।। तुझां श्रीचरणीं वीळासलें[५] मन : काइसेया कान्हां पाठवीसी ।। तुझेनि वेधें असों संभ्रमीतें : नीर्वीकारा जोगीयाचें कैसें नीष्टूर ओ चीत।। पाउलें म्हणीतलें न करीति आतां : काइसेया कान्हां पाठवीसी ।। " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती[६] आतां तुम्हीं आपुलीया स्वइछा राहावें : आपुलीया स्वइच्छा जावें[७] : " ।।

## ४३५ एकाइसांकरवि वाटी धूववणें

गोसावी चारनेरासि बीजें करीत असति : ऐसां मार्गीं कव्हणी एकी ठाइं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : देमाइसें आणि एकाइसें[१] दोघी जेविलीया : एकाइसें[१] देमाइसांवरि वाटी सांडूनि उठिलीं : गेलीं : देमाइसें तेयांची वाटी धूआवेया घेउनि नीगों बैसलीं : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती देमती : हे वाटी ठेवा :" गोसावीं एकाइसांतें[२] म्हणीतलें : "बाइ : या : आपुली वाटी नेया : तुमचा ताटकढा तो बाहिरि गेला असे :" मग तीएं आपुली वाटी घेउनि नीगालीं : तीए दीउनि देमाइसांसि वाटी धों नेदीति[३] : ।।

## ४३६ मार्गीं देमाइसांकरवि जाडि ठेवणें

एकु दीसु गोसावी मार्गें बीजें करीत असति : तवं देमाइसांचीए डोइए एकाइसांची[१] जाडि देखिली : गोसावीं देमाइसांतें पुसिलें : "देमती : हे जाडि कोणाची ?" तीहीं

---

"देमति : ऐसें कां केलें ?" "जी जी : खाती बापुडे मासे :"°. २ **मुराहबी.** महिमा. ३ (**प्रव.** वि.२४६).

**४३४.** १ **अपंगो.** सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : तुमचा मासु दीसु भरला : आतां तुम्ही राहा : भावे (**पंगो.** वीभागें) परिअटण करा :" मग तेहीं म्हणीतलें° "पाउलें—. २ (**मु.**). ३ **ही.** °तुम्हीं येथौनि जा :" देमाइसीं वोवीया—. ४ **अ.** आतां. ५ **एवा. रंगलें.** ६ **राहबी.** °तुम्हां मासु दीसां असों दीजैल : **हीराइसें.** °आतां तुम्हां स्वइछा असावेया अनुज्ञा हो :" ७ **रावा.** हे लीळा एथ. **प्रवा.** गणपति मढीं.

**४३५.** १ **मुराहबी.** लखुबाइसें. २ **मुराहबी.** लखुबाइसातें. ३ **रावा.** हे लीळा येथ. **प्रवा.** अज्ञात.

**४३६.** १ **मुराहबी.** लखुबाइसाची.

म्हणीतलें : "जी जी : हे एकाइसांची[१] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : हे जाडि ठेवा एथ : तुम्हीं चाला :" तीहीं जाडि ठेविली : आपण पुढां गेलीं : तवं मागिलाकडौनि एकाइसें[२] आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[३] : हे आतां आपुली जाडि घेया : तुमचा कडिवाळा तो पुढां गेला असे :" मग तीहीं आपुली जाडि घेतली : तीए दीउनि एकाइसें[२] आपुली जाडि देमाइसांसि वाहों नेदीति[३] :॥

## ४३७ चारनेरीं मार्कंडा रोगनासा उपाए कथन

गोसावीं चारनेरासि बीजें केलें : पुर्वाभिमुख लींगाचें देउळ : तेयाचां आंगणीं पींपळ : तेंथ गोसावीयांसि आसन जालें : बाइसें गोसावीयांसि अखंड म्हणति : "अवघेयांसि वावा काहीं करिताति : परि मार्कंडेयासि काहीं न करीति[१] : तो अखंड नोकीतु असे :" तीया दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "मार्कंडा : भीक्षा करा : भीक्षा मागौनि या : एथ अठरा[२] घांस संपादा : मग तुमचे अठरा[२] रोग[३] पींपळीं बांधिजती :" "हो कां जी :" म्हणौनि तेहीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : *श्रीकरें[४] झोळी दीधली[५]* : मग ते गावांतु गेले : ते आपुलीए मामीचेया घरासि गेले : तेहीं पाए धूतले : उटिले : न्हाणिले : उन्हतीन्ह जेउं सुदलें : मग नीजैले : भीक्षाअवस्वरी उठिले : "मामी : तुमतें काहीं भातु असे तरि घेउनि[६] या" तेहीं म्हणीतलें : "भातु काइ कराल ?" मार्कंडीं म्हणीतलें : "तुम्हांसि काइ तेण्हें ? आणा पां :" तेहीं म्हणीतलें : "सांघा ना कां : काइ गोसावी आले असति ?" "ना हो :" "कटकटा मार्कंडा : गोसावी आले ऐसें सांघतेति तरि मीं गोसावीयां- कारणें उपाहारू करितीएं :" तवं मार्कंडीं म्हणीतलें : "तैसें आमचेयां गोसावीयांपासि काहीं न लगे : भातु आणा :" तीहीं[७] सीळीया भाताचीया ढेंपा तेयांचीए झोळीएसि घातलीया : ते गोसावीयांपासि घेउनि आले : गोसावीयांसि झोळी दृष्टभूत[८] केली : गोसावीं श्रीकरीं घेउनि[६] अवळोकिली : मग म्हणीतलें : "हा मार्कंडा : हा भातु एकीचि घरिचा ?" "ना जी : गावीं एकचि पेव नीगालें : तें सारिखेंचि जोन्हळे : तो अवघां घरीं सारिखाचि भातु :" एयाउपरि बाइसीं म्हणीतलें : "काइ बाबा : एथ काइ याची माएबहीणि असे : मग ते घालील ? बापुडें उदास भीक्षा करूनि आलें :" गोसावी उगेचि राहिले : तवं तीएं मागिलाकडौनि *ताक : मीठ : साकवतीय ऐसे घेउनि[९]* आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ :

---

२ **मुराहबी.** लखुबाइसें. ३ **मुराहबी.** "बाइ : जाडि वाहावे ना तरि एकु कडिवाळु कां करा ना ?" **रावा.** °हे लीळा येथ. **प्रवा.** अज्ञात.

**४३७.** १ **गो.** °अखंड ठणकारीतें असति. २ **एवा.** आठ. ३ **एवा.** °धाडीजति. ४ **शोध.** आपुलेनि श्रीकरें झोळीएसि गांठी दीधलीया. ५ (**मुराहबी.**). ६ **गो.** घेउनु. ७ **मुराहबी.** °भातु रांधिला : झोळी भरिली. ८ **मुराहबी.** दृष्टपूत. ९ (**भमुराहबी.**).

तुमचा भातु नीकीए वेळेसि पातला :" " जी जी : मार्कंडू सांघेचि ना जी : मार्कंडू आला : तेयाचे पाए धूतले : उटिला : न्हाणिला : जेविला : नीजैला : उठिला : मग म्हणीतलें : 'मामी तुमतें इतुका ऐसा भातु असे तरि आणा :' मीयां म्हणीतलें : 'भातु काइ कराल ?' 'ना काहीं प्रयोजन असे' : 'तरि सांघा ना कां ? काइसेयालागि ? तरि काइ गोसावीं बीजें केलें असे ?' 'ना हो :'" इतुकेनि गोसावीं वाइसांची वास पाहिली : *सर्वज्ञें म्हणीतले : " बाइ : ऐसा असे तुमचा मार्त्तंडु*[10] *:* " मग बाइसीं घागरा बांधला : " पोरा : मीं तुजकारणें बाबातें उरोधीत असें :" सर्वज्ञें म्हणीतलें[11] : " बाइ : यासि कां कोपतें असां ? याचे रोग न वचावे असति : ते कां जाती ? प्राणीया आपुलें हीताहीत नेणे : आवेयाचें दीवेया कां एइल ? खांडीएचें उंडीए कां एइल ? पाइलीएचें पसेया कां एइल ?" ॥

## ४३८ करंजखेडीं पानुनाएकहाटघरीं अवस्थान

तेथौनि गोसावीं करंजखेडासि बीजें केलें : नगरासमीप इसान्य कोनीं पैलाडि वृक्षा एका तळि गोसावीयांसि आसन जालें[1] : बाइसें गावांआंतु बीढार पाहावेया पाठवीलीं : *बाइसीं म्हणीतलें : "यथ बीढार कोणातें मीळे*[2] *?"* तवं कव्हणी एकीं म्हणीतलें : " पानुनाएकाचें हाटघर असे : तें मागा :" मग बाइसें तेयांचेया घरासि गेलीं : बाइसीं *तेयांचीए ब्राम्हणीतें*[3] म्हणीतलें : " बाइ : तुमतें[4] हाटघर असे : तें आमचेयां बाबासि बीढार देयाल ?" तेहीं म्हणीतलें : " बाइ : तेथ देवता असे : ते वसों नेदी :" तवं बाइसीं म्हणीतलें : " तुम्हीं तवं देया पां : आमचेयां बाबाचां ठाइं तैसें काहीं नाहीं :" बीढार दीधलें : बाइसीं गोसावीयांपुढें सांघीतलें : मग गोसावीं हाटघरासि बीजें केलें : पुर्वपश्चीम हाटवटी : हाटवटीएचां पश्चीमीली सीरां : उतरीली ओळी घर : तेथ गोसावीयांसि दोनि मास अवस्थान जालें : दखिणीलेनि दारें गोसावीं बीजें केलें : दखिणील दार[5] गोसावीं बुजवीलें : उतरीलेनि दारेंहूनि[6] गोसावी तेथ राज्य करीति : ॥

## ४३९ पानुनाएका वाता उपनीति

बाइसें भीक्षेसि जाति तेधवां पानुनाएकाचेया घरा भीक्षे जाति : गोसावी तेयां घरीं राहिले आणि तेयांसि आश्चर्ये[1] जालें : बाइसें तेयाचेया आवारा भीक्षेसि जाति : तीएं बाइसांसि पाट बैसों घालीति : सोपस्कर भीक्षा देति : एकु दीसीं बाइसीं पुसिलें :

---

१० (**मुराहबी.**). ११ **मुराहबी.** "एथौनि म्हणीतलें तें करितेति तरि तुमचे रोग धाडिजते : मार्त्तंडा : इतुले दीस आपुले हीताहीत नेणा : परि ऐसें कां होइल ? पसेयाचें पाइलीये कां येइल ?"

**४३८.** १ **मुराहबी.** °पाउसु थोरू येत होता. २ (**भ.**). ३ (**हबी.**). ४ **अपंगो.** तुमचें. ५ **गोभ.** हाटदार. ६ **अपं.** °प्रवृतु करीति : गोसावी तेथ—.

**४३९.** १ **रागो.** आहाचर्ये.

"हां ओ : घरधनी दिसति ना ?" "ना आइ : ते तीनि वरिखें वायें[२] कोडिमोडि करूनि घातले असति :" तवं बाइसीं म्हणीतलें : "आमचेया बाबाचेया दरिसना एतु कां[३] : आणि तेयांचा वायो जाइल :" तेयांचीया ब्राह्मणीं तेयांपुढें सांघीतलें : "आमचां हाटघरीं जे पुरूख राहिले असति तेयांचीं आइसें आलीं होतीं :" तेहीं म्हणीतलें : "आमचेया बाबाचेया दरीसना एतु कां : मां तेयांचा वायो[४] जाइल :" मग गोसावीयांचेया दरीसनासि आले : दोनि आंगीया लेइले : डौंडि माथां : तेयावरि पासवडी पांगुरले : पासवडीएवरि जाडिचें कोंगतें : ऐसे गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें[५] : "काइ नाएको : वाएं खस्तिलेति[६] ना ?" "जी जी : आजि तोनि वरिखें वाएं कोडिमोडि करूनि घातलें असे : एतुलाही वारा न साहे : एकि उसिसां सगडी : एकि पाइतां सगडी : एतुकीं पारावणें :" मग नावेक बैसले होते : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एकि[७] आंगी फेडा : आणि जाडि फेडा :" तेहीं म्हणीतलें : "जी जी : आंगी फेडिजैल तरि फेडिजो : परि जाडि नको जी : जाडीवीन न गमे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तवं फेडा होए : न गमे तरि घाला :" मग तेहीं जाडि फेडिली : आंगी फेडिली : मग बीढारासि गेले : च्यार्‍ही पाहार नीद्रा सुखेंचि केली : मग उदीयांचि गोसावीयांचेया दरीसनासि आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : रात्रीं काहीं उपद्रो जाला ?" "जी जी : सुखेंचि नीद्रा आली :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि दुसरी आंगी फेडावी : आणीकि सगडी फेडावी :" तवं तेहीं म्हणीतलें : "जी जी आंगी फेडिजैल तरि फेडिजो जी : परि सगडी नको जी : सगडीयावीन न गमे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तवं फेडा होए : मां न गमे तरि घालुं एइल :" मग तेहीं आंगी फेडिली : एकि सगडी फेडिली : घरासि गेले : च्यार्‍ही पाहार सुखेंचि नीद्रा केली : उदीयांचि गोसावीयांचेया दरिसनासि आले : गोसावीं पुसिलें : "नाएको : रात्रीं काहीं उपद्रो जाला ?" "जी जी : उपद्रो काहींचि नाहीं : सुखें नीद्रा आली :" मग तीसरां दीसीं गोसावी दूसरी सगडी आणि डौंडि फेडवीली : "जी जी : डौंडि फेडिजैल तरि फेडिजो जी : परि सगडी नको जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतांची तवं फेडा होए : मग न गमे तरि घालुं एइल :" "मग तेहीं डौंडि आणि सगडी फेडिली : घरासि गेले : च्यार्‍ही पाहार सुखें नीद्रा आली : उदीयांचि गोसावीयांचेया दरिसनासि आले :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : रात्रीं काहीं उपद्रो जाला ?" "जी जी : काहीं उपद्रो

२ **गो.** वायोन. **मुराह.** वातें. ३ **ह.** °गोसावी रोग प्रमाण जाणति : रोगु धाडीति–. ४ **मुराह.** वातु. ५ **मुराहबी.** °नायको : तुमचां देहीं रुजा असे ?" "हो जी :" "काइ असे ?" "जी जी : वातु असे : आजि तीनि°. ६ **पंगो.** कष्टलेति : **एवा.** कष्टी केलेति. ७ **मुराहबी.** "आजि सगडीया नको जाळुं :" तीहीं म्हणीतलें : "मज न गमे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उपद्रो उपजैल तरी घाला :" मग तीहीं सगडीया फेडिलीया. . . .सर्वज्ञें म्हणीतलें : "कालि सगडीया न घलाचि तरि काहीं उपद्रो उठिला ?" "जी जी : काहींचि नाहीं : सुखेंचि निद्रा आली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि जाडि

नाही : च्यान्ही पाहार सुखें नीद्रा आली :" मग[८] ते पासवडी पांगुरौनि धोत्र नेसौनि गोसावीयांचेया दरीसनासि आले : मग नगराआंतु हींडति : गावीं गावींचा लोकु म्हणे : "हाटघरा जे पुरूख आले असति : तेहीं कैसा पानुनाएकु[९] उपचारिले :" मग ते कामतु पडिताळावेया जाति : तेयांचे दाळद्री म्हणति : "हा कोणें गा ऐसा उपचारिला? या हातीं काहीं खाओं न ल्हाओं :" ऐसा गोसावीं तेयांचा वायो फेडिला :।।

## ४४० पानुनाएका उपाहारीं दीपनसक्ति देणें

एकु दीं गोसावीं पानुनाएकातें पुसिलें : "तुम्हांसि पुर्वीं कोण अन रूचे ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : मज उडीदान थोर रूचे :" गोसावीं म्हणीतलें : "*कोरडे वडे : आंबांतील वडेमुख्यकरुनि*[१] एथ एकु उपाहारू करा :" तेहीं म्हणीतलें : "जी जी :" मग तेहीं उपाहारू नीफजविला : पुजाद्रव्यें मेळवीलीं : मग तेहीं गोसावीयांलागि उपाहारू आणिला : मग गोसावीयांसि पुजा जाली : धूपार्ती मंगळार्ती जाली : मग गोसावीयांसि ताट केलें : भगतिजना ठाए जाले : तेयालागौनि तींवरिखां तांदूळांचें सीत आणिलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें काइ ?" "जी जी : हें नायकालागि सीत आणीलें*[२] *:"* सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें आसों देया : भगतिजनासरिसें[३] वाढा :" *बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बाधील :" सर्वज्ञें म्हणीतलें : "न बधी*[२] *:"* मग बाइसीं अवघेयांसरिसें वाढिलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजना जेवणें जालीं : पानुनाएक तृप्तपर्यंत जेविले : मग गोसावीयांसि गुळुळा वीडा जाला : मग ते बीढारासि गेले : रात्रीं ब्राह्मणीतें म्हणीतलें : "आजि सदन जेविलों असों : काहीं उपद्रो होइल : तरी वीसदेयासि[४] सेणि लाउनि पुरि हो :" ऐसा नीरोपु दीधला : मग ते नीजैले : मध्याने एकी रात्रीं तेयांसि भूक लागली : आणि ते उठिले : ब्राह्मणीतें म्हणीतलें : "उठि हो : वाति लावि :" तीएं भ्यालीं : वाति लाविली : मग तीं पुसिलें : "काहीं उपद्रो जाला ?" तेहीं म्हणीतलें : "कां पां : मज थोरि भूक लागली असे : थोरि पीडा होति असे : काहीं अन असे ?" तेहीं म्हणीतलें : "अन अवघेंचि पाळलें : वडे असति : तुप असे :" "हो कां : तरि घेउनि ए :" मग ते मागौते वडे[५] तुप जेविले : तृप्तपर्यंत जेविले : आंचवले : तांबोळ घेतलें : मग नीजैले : उदीयांचि गोसावीयांचेया दरीसनासि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको[६] : रात्रीसि काहीं उपद्रो जाला ?" तेहीं म्हणीतलें : "काइ सांघों जी :" मग तेहीं म्हणीतलें : "जी जी : एथौनि जेउनि गेलां : नीजतां ब्राह्मणीतें वीसदेओ पुरूनि

---

नको पांगुरों—. ८ **मुराहबी.** मग ते पासवडी पांगुरेति : पाग बांधति : कदाचीत आंगी लेति : मग गोसावीयांचेया दर्शना येति. ९ **मुराहबी.** उजरिला.

**४४०.** १ **अ.** °वडेप्रधान करूनि... २ (**मुराहबी.**). ३ **मुराहबी.** अवघेयां सारीखें वाढा. ४ **मुराहबीभगो.** °तरि वीसदेओ दडपुनि ठेवि हो :" ५ **प्रवा.** आंबिचे वडे. **रावा.** कोरे वडे. ६ **मुराहबी.** °रात्रीं तुमतें काहीं बाधीचि ना कीं ?" तीहीं म्हणीतलें°.

ठेवि हो :" ऐसें अवघेचि सांघीतलें : "वडे तृप्तपर्यंत जेविलां :" ऐसें अवघेंचि सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां कैसें असे ?" जी जी : आतां जेवावें जेवावें ऐसें होत असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि आतां तैसेंचि कीजे :" गोसावीं तेयांसि दीपनसक्ति दीधली : ।।

## ४४१ देवां : भटां : आबैसां भेटि

देव[1] भडेगाउनि गावांसि गेले : गाउनि मागौतें ऋंजखेडासि आले : गोसावीयांसि दरीसन जालें : ।।

## ४४२ सीतळानंदु नाम करणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पूजाअवस्वर जालेयानंतरें गोसावीं सेंदुराळेयासि वीहरणासि बीजें केलें : तळेयाचीए पाळीवरि नृत्यकोणीं आसन जालें : तवं पानुनाएकु कामतु पडिताळावेया गेले होते : तेहीं तेथ आइकिलें : सेतकरीं सांघीतलें : 'गोसावीं सेंदूराळेयासि बीजें केलें :' मग ते गोसावीयांपासि आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांपुढें पालखति घालुनि बैसले : भटोबास गोसावीयांसि कमळीं पुजा करावेया म्हणौनि कमळें तोडावेया रीगाले : गोसावीं भटोबासांकडे डोळा घातला : भटीं पानुनाएकातें पालखती[1] धरूनि ओढिलें : ते बोबाइले : "जी जी : मज सीतळ उदक न साहे :" तवं भटीं ओढुनि उदकाआंतु नेलें : आणि ते पव्हों लागले : जवंजवं पव्हति तवंतवं सुख : आनंदु होए : गोसावी बोलावीति : परि ते नैएति : मग ते वाडवेळा नीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : एथौनि बोलावितांहीं नैया तें काइ ?" "ना जी : जवंजवं सीतळ[2] लागे : तवंतवं मज सुख : आनंदु होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तरि तुम्हां नावं सीतळानंदु म्हणा :" मग गोसावीयांसि बाइसीं कमळांची पुजा केली : गोसावीयांसि तेथ आरोगण जाली : तेथचि नावेक पहुडु जाला : मग वीळिचां गोसावीं बीजें केलें : ।।

## ४४३ आबैसां मयोरलेखनी म्हणणें

एकु दीसीं गोसावीं आबैसांतें[1] पुसिलें : "बाइ : तुम्हीं चीत्र पाडूं जाणा ?" तवं आवाइसीं म्हणीतलें : "जी जी : मीं चीत्र पाडूं नेणें जी : मीं मोरें लेहों जाणें जी :" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि एथ दीसवडिचीं दोनिदोनि मोरें लेहा :" "हो कां जी :" मग

---

**४४१.** १ **मु.** एकु दी देव : भट : इंद्रभट : आबाइसें : गौराइसें : ऐसीं गोसावीयांचेंया दर्शना पवितेयाचिया पर्वाकारणें आलीं : गोसावीयांसि भेटि जाली : दंडवतें घातलीं : श्रीचरणा लागले : मग गोसावीयांचां सन्निधानीं असों लागलीं : ।।

**४४२.** १ **मुराहबीगो.** पालवीं. **एवा.** हातीं. २ **मुराहबी.** हींव ऐसें पाणी.

**४४३.** १ **मुराहबी.** °म्हणीतलें : "बाइ : एथ तुम्हीं दीसवडि दोनि मोरें लीहा : मासुदीसु :

आबैसीं वान मेळवीलें : मग तीएं दीसवडिचीं दोनिदोनि मोरें लेहति[२] : गोसावी वीहरणौनि बीजें करिजति : मोर अवळोकीति : गोसावी म्हणति : "बाइ : याचा पांखू नीका नव्हेचि : याची चांचू नीकी नव्हेचि : याचा पावो नीका नव्हेचि :" ऐसी गोसावी चुकि सांघति : मग तीएं येरी दीसीं बरवीं लीहीति : एक उणें लेहति तरि गोसावी म्हणति : "बाइ : एथिचें एक मोर तुम्हीं लागा :" एकाधा वेळु आगळें लेहति : तरि आबैसें गोसावीयांतें म्हणति : "जी जी : एक मोर गोसावी माझे लागति :" ऐसीया तीहीं च्यारि भींती मोरां भरिलीया : ।।

## ४४४ भटां होडे अदृस्य होणें

रामतीर्थाकडे गोसावीं वीहरणासि बीजें केलें होतें : तेथौनि गोसावी बीढारासि बीजें करिती : मार्गीं चालतां भटांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें जैसे उठितें तैसें उठिता : हें जैसें बैसतें तैसे बैसता : तरि हें जैसें नीगैल तैसें तुम्हीं यातें टाकाल[१] ?" तवं भटोबासीं म्हणीतलें : "जी जी" : सर्वज्ञें म्हणीतलें[२] : "टाकाल कीरूं : चळबळे दीसत असा :" मग *गोसावीं बाहीरवासु खोवीला : आंगी खोवीली : आंगीचीया बाहीया वरुती केलीया : धांवीनलें[३] :* गोसावीं गजगती बीजें केलें : भटोबासीं ओलि काखे सुदलीं : *धोत्र वरुतें खोवीलें[४] :* गोसावीयांपाठीं धांवीनले : गोसावी हातावीहीती[५] पुढे बीजें करीति : भट मागिलाकडौनि गोसावीयांतें टाकीत जाति : परि गोसावी न टकति : गोसावी ओहळु पातले : भट गोसावीयांतें सीवों गेले : आणि गोसावी अदृस्य जाले : भट गोसावीयांतें पाहों लागले : तवं गोसावीयांतें नेदखतिचि[६] : मग गोसावी प्रगट जाले : मग भटीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावी कवणी ठाइं होतें?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ए रींगणीए तळि होतें :" मग भटोबासांसि[७] आश्चर्ये[८] जालें : मग गोसावीं बीढारासि बीजें केलें : ।।

## ४४५ वानरा नाम करणें

एकु दीं गोसावीं रामनाथासि वीहरणासि बीजें केलें : तेथ गोसावीयांसि गुंफा करावेयाची प्रवृति जाली : रामनाथा उतरे[१] पौळीआंतु इसान्य[२] कोना आश्राइत गोसावीं

---

२ **एवा.** लीहीति :

**४४४.** १ **गो.** °हीराइसें म्हणति : हां गा : हें ऐसें नीगे तरि तुम्ही यातें ओडगाल ? **मुराहबी.** हें धावैल तरी टाकाल ? २ **मुराहबी.** °वानरेस चळबळे दीसताति : हे टाकीति :" ३ **(मुराहबी.).** ४ **(गो.).** ५ **मुहबीभगो.** हातावीती. ६ **मुराहबी.** °आणि बाइसें पडिलीं : मग गोसावी प्रकट जाले : तवं बाइसें पडिलीं देखिलीं : गोसावीं बाइसातें हातीं धरूनि उठवीलें : सावधें जालीं : मग पुसिलें : "बाबा : आपण कें गेलेयां होतेयां ?"°. ७ **मुराहबी.** °बाइसां भटां—. ८ **गो.** आहाचर्य.

**४४५.** १ **रावा.** °दक्षिणे. **मुराहबी.** °वाव्ये पौळीभीतरि गुंफा करवीली. २ **रावा.** अग्न

गुंफा करविली : भींती घातलीया : धाबें करावेया भट पींपळावरि फाटा[3] मोडावेया वेघले[4] : तेयाचि पींपळातळि गोसावीयांसि आसन : भट एकु फाटा धरीति : खालीलु फांटा कोरडा : तो पाएं मोडीति : ऐसें ए डाहाळीएचें पैली डाहाळीए जाति : परि पडति ना[5] : तें गोसावीं देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरू डाहाळीहूनि डाहाळीएसि जाते : परि पडे ना[6] : बाइ : कैसें वानर ऐसें दीसत असे :" तीए दीउनि गोसावी भटोबासांतें 'वानरा' ऐसें म्हणति : मग ते गोसावीं गुंफा करविली : तेथ गोसावीयांसि आसन जालें : गुळुळा जाला : तेथ आरोगण जाली : गुळुळा जाला : तेथचि पहूडू जाला : मग वीळिचां गोसावीं बीजें केलें : ।।

## ४४६ प्रकासदेवांचीए गुंफेसि बीजें करणें

एकु[1] दीसु गोसावीं प्रकासदेवांचीए गुंफेसि बीजें केलें : गावांसि उतरे नए : नइउतरे पैलाडि पुर्वामुख देउळ : देउळाचीए जगतीआंतु गुंफा : प्रकासदेवांची : प्रकासदेव ते आपुलेयां सीक्षांसहीत गावांतु गेले होते : गोसावीं तेयांचीए गुंफेसि बीजें केलें : गोसावीं गुंफा उघडिली[2] : गोसावीयांसि भीतरि ओटेयावरि आसन जालें : गोसावीं चरणक्षाळण करविलें : साहानेवरि चंदन होतें : तेयाचा गोसावीं आपणेयांसि आडा रेखवीला : सुकली ऐसी माळ होती : ते गोसावीं गळां घातली : अक्षेता लाविलीया[3] : सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहा पाहा बाइ : पाणीभातु असे ?" बाइसीं पाहिलें : तवं असे : मग गोसावीयांसि पाणीभाताची आरोगण जाली : गुळुळा जाला : सुकलीं ऐसीं पानें होतीं : घोंटी ऐसी फोडि[4] होती : तेयाचा गोसावी वीडा घेतला : मग गोसावीं गुंफा बांधवीली : मग गोसावीं बीजें केलें : ।।

मार्गीं प्रकासदेव एतां देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : यांसि नमस्कारू करा गा :" भटीं म्हणीतलें[5] : "जी जी : हे आमचेयां गोसावीयांसि करिती तरि आम्हीं यांसि करूनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : यांसि मानुअभिमानु असे : मा एथ काइ तैसें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "उपाधि मानिजे :" मग गोसावीयांसि दरीसन जालें : प्रकासदेवीं गोसावीयांसि दंडवत घातलें : भगतजनीं प्रकासदेवां नमस्कारू केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तुमचीए गुंफेसि गेलें होतें : गुंफा उघडिली :

---

कोणासमीप गोसावीं—. ३ **गो₂** कोरडीं सलें. ४ **एवा.** वळघले. ५ **होराइसें.** बाइसीं म्हणीतलें : "बाबा : नागदेवो डाहाळीहुनि डाहाळीये कैसा जात असे : परि पडे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कैसा वानरऐसा दीसत असे :" ६ **अपं.** °बाइसीं म्हणीतलें : "बाबा : कैसें वानर ऐसें—.

**४४६.** १ **मु.** (**स्वमति : शोध**) प्रकाशदेव ते अन्य महात्मे : ते करंजखेडीं असति : तयांचा तेथ उपाधि होता° : ।। २ **मुरागो.** उघडवीली. ३ **मुराहबी.** °बाइसांकरवि पाणीभातु पाहावीला. ४ **गो.** पोफळें. ५ **मुराहबी.** °यांचे जरी आम्हांसि करिती तरी आम्हीं यांसि करूनि :

भीतरि ओटेयावरि आसन जालें : चरणक्षाळण जालें : तुमचें चंदन होतें तें लाविलें : तो हा नव्हे टीळा? या नव्हति तुमचीया अक्षता लाविलीया? तुमचा पाणीभातु आरोगण केला : हा नव्हे वीडा घेतला असे?" गोसावी प्रकासदेवां पुढां सांघत जाति : प्रकासदेव तोखत जाति : "जी जी : क्रीतकृत[६] केलां : सुखीयां केलां :" ऐसे सबदाप्रति तोखत जाती : मग प्रकासदेवीं सीक्षांतें म्हणीतलें : "देखिली गा कैसी नीराअभिमान वस्तु :" मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## ४४७ देवांकरवि जाडि तुणवणें

एकु दीसु देवीं गोसावीयांतें वीनवीलें होतें : "जी जी : मज गोसावीयांपासौनि वीद्या जाली होती : ते सांपें पातळ जाली :" ऐसें गोसावीयांतें वीनवीलें : तेधवां गोसावीयांसि पींपळातळि आसन जालें असे : बाइसांकरवि जाडि आणवीली : पुर्वीं उंदिरीं[१] खादली होती : ते गोसावीं श्रीकरीं घेतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : हे जाडि मासुदीसु वृक्षमुळीए तीनि पाहार तुणावी : तीसरां पाहारीं भीक्षा करावी : नदी जेवावें : देउळीं नीद्रा करावी : जवंजवं हे जाडि सांदैल तवंतवं तुमची वीद्या सांदैल :" "जी जी :" म्हणौनि घेतली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग नीगाले : ते सांवखेडेयासि गेले : एल्हंभटाचेया डोल्हारेयावरि बैसौनि जाडी तुणीति : तीएं न्हाणीति : उटीति : ताटांठाणवैयां तुपींतांदुळीं[२] जेवुं सुति : बाजेसुपवतीएवरि नीजति : ऐसी मासुदीसु जाडि तुणिली : मग गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीं तेयांसि क्षेमाळींगन दीधलें : तीं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले[३] : जाडि बाइसांहातीं दीधली : मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा बाबा : जाडि कैसी सांदिली : जैसी जाणवे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जाडि सांदिली : परि वीद्या न संदेचि :" *"तें कां बाबा?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा महात्मा विजना जातां जैसा काहीं खळिये बैसावेया नेइजताए[४] :"* देवीं म्हणीतलें : "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें[५] : "हां गा : तुमतें एथौनि ऐसेयां म्हणीतलें? 'एल्हंभटांचां घरीं डोल्हारेयावरि बैसौनि जाडि तुणावी? ताटींठानवैयां तुपींतांदुळीं जेवावें? बाजेसुपवतीएवरि नीजावें?' ऐसें तुमतें म्हणीतलें होतें? एथौनि तुमतें ऐसें म्हणीतलें होतें कीं : 'तीनि पाहार वृक्षातळि जाडि तुणावी : तीसरां पाहारीं भीक्षा करावी : नदी जेवावें : देउळीं नीद्रा करावी :' ऐसें तुमतें म्हणीतलें होतें कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आज्ञुनी तऱ्हीं करा : जरि कराल तरि द्वापरिचा सहश्रृ : वरिखां आउक्ष होइल : अतीत अनागत व्रतमान : त्रीकाळ ज्ञान होईल : राए इस्वरत्वें

६ **मुरागो.** कृत्याकृत्य. **ह.** क्रीत्याक्रीत्य. **भबी.** कृतार्थ.

**४४७.** १ **एवा.** वोळिंबां. **एवा.** धुइं. २ **मुरा.** तुपींभातीं. ३ **मुराहबी.** जाडि पुढां ठेविली : बाइसीं जाडी हातीं घेउनि पाहिली : "**बाबा बाबा**—. ४ (**प्रव. आमा.** १८८). ५ **मुराहबी.** °एथौनि म्हणीतलें तें काइ तुम्हीं केलें? **येथौनि तुम्हां** सावखेडेया धाडीलें? येल्हंभटांचां घरीं उष्णोदकें

मानिती :" तवं देव उगेचि होते : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें कां होइल ? पोरासि आपेयाचां परिवरीं पाए पसरूनि मरावें असे : तें कां चुकैल ? पसेयाचें[६] पाइलीए कां येइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : *"कव्हणी एकु जळमांडविएचें रोप पांणियांआंतु घाली : वारेयाचेनि योगेंकरूनि तेयाचां मुळीं रज बैसे : तेथ आणिक बेंचाड[७] उठी : तेयाचां मुळीं : आणिक रज बैसे : तेथ आणिक बेंचाड उठी : ऐसी आवघी विहीरी जळमांडवीया भरे : तेथ उदक असे[८] ऐसी बुधिही नाहीं : मग एकु दीस भीतरि रीगौनि : उपसौनि कवळीवरि बाहीरि घाली : हातासि कांडर एति : बाहीया भरति : रगत ए : परि उपसवेना : तैसें धर्ममीखें संचरली अवीद्या असेखा धर्माचा अभावो करी[९]"* :॥

## ४४८ प्रकासदेवां गर्वा अनुवादू

एकु दीसु भटोबास नदीसि धोत्रें धों गेले होते : तवं प्रकासदेव भेटले[१] : भटोबासांतें म्हणीतलें : "नागदेया : तुआं संसारू सांडिला हें नीकें केलें : तरि पुससी काहीं ? बोलता असे परि पुसता नाहीं[२] : हें नव्हे आचार्या नावें कांकण बांधलें असे :" भटोबास गोसावीयांपासि आले[३] : गोसावीयांपुढां सांघों लागले : "जी जी : मीं नदीसि गेलां होतां :" ऐसी अवघी गोष्टि सांघीतली : "हें नव्हे आचार्या नावें कांकण बांधलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "अज्ञानाचेनि प्रसादें काइ एक न बोलावें गा ? अज्ञानाचेनि प्रसादें हा जनु सुखीया होउनि असे गा :" *मग तेणें मंत्र तया उपदेशिला : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "कान्ह अधिक वृत्तितव गेला : गुरुपासि अधिकवृत्ति न वर्तावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : गुरुबुद्धि : देवताबुद्धि : विशिष्टबुद्धि[४] :"* ॥

## ४४९ पाठकत्यागु परिहासु

एकु दीसु गोसावीं रामनाथाकडे वीहरणासि बीजें केलें होतें : रामनाथा उतरे पौळीबाहीरि आंबे होते : तेथ गोसावीयांसि आंबेयाखालि आसन जालें असे : पाठक गोसावीयांचेया दरीसनासि आले[१] : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले :

---

स्नान : आडवाटी : ठाणवीं जेवण : डोल्हारेयावरि बैसौनि जाडि तुणा : येथौनि काइ तुम्हां हें म्हणीतलें ? तुमतें येथौनि म्हणीतलें कीं. . . . . . . . . . जरि करितेति तरि तुमची विद्या सांदती : द्वापरीचे सहश्र वरुषें आयुष्य होतें : अतीत : अनागत : वर्तमान : त्रीकाळ ज्ञान होतें : राये ईश्वरत्वें मानिते. ६ **एवा.** नीउचाचें तें°. ७ **एवा.** बेंचाळ. ८ **एवा.** °ऐसा भावोही नाहीं. ९ (**दृपा.** '९० जळमांडवीएचा दृष्टांत'. 'रामदेवाचीये जाडियेचां प्रसंगाउपरि निरूपिला' –**दृस्थ.**)॥

**४४८.** १ **मुराहबी.** °गुंफे घेउनि गेले. २ **मुराहबी.** एन्हवीं आचार्या नावें––. ३ **मुराहबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "केउते गेले होतेति ?" "जी जी : प्रकाशदेवाचीये गुंफेसि : ते ऐसें म्हणति जी : 'आचार्या नावें कांकण बांधलें असे : ब्रह्मवीद्या सांघता असे परि पुसता नाही :'" म्हणौनि अवघें सांघीतलें : ४ (**प्रव. वि.** १७८).

**४४९.** १ **मु.** °सवें उगाणेयाचा बैलु : ब्राह्मणि : ऐसे गोसावीयांचां दर्शना आले.

मग गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : नैयाइकीं[2] ऐसें म्हणीतलें : जें सकळै गुरूसि अर्पावें : चीत : वीत : काया : एं तीन्हीं इस्वरासि अर्पावीं : " ऐसें म्हणौनि गोसावीयां-जवळि आपुली ब्राह्मणि बैसवीली : जवळि कांठाळ ठेविली : कांठाळेसि बैलु बांधला : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां एथिचें होतें तुम्हीं घेया : " " जी जी : नैयाइकीं ऐसेंचि म्हणीतलें : ' गुरू म्हणति तेंचि कीजे : ' " ' माहाप्रसादु ' म्हणौनि मागौतें घेतलें : याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : " तल्हातीचीया पाणीयां बोटें थाउं तैसा पाठेयांचा त्यागु मा : " एतुकेनि ते घेउनि गेले[3] : मग गोसावीं बीढारासि बीजें केलें : ।।

## ४५० भट इंद्रभट कटकां पाठवणें

इंद्रभट[1] कटका दानासि[2] नीगाले : गोसावीं भटांतें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं जा : " तवं भटीं म्हणीतलें : " जी जी : मीं काइ जाउनि करूं ? मी नसुधा सुंटदेओ : काहीं सास्त्र नेणें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : जेंचि यांसि देती तेंचि तुम्हांसि देती : तुमतें मुक्ष पीतरीया करिती : " मग भट आणि इंद्रभट कटकासि गेले : माहादेओ-रायाचें[3] श्राध होत होतें : तेयांचे भट मुक्ष पीतरीए केले : मग तेहीं तेयांसि तीस तीस आसु दीधलीया[4] : ।।

## ४५१ प्रकासदेवा नीर्गमनीं सींके वीस्मो

गोसावीयांचेया दरीसनासि माहात्मे एक आले : नावेक गोसावीयांपासि बैसले होते : मग नीगाले : ते परते गेले : आणि गोसावीयांसि सींक आली : सर्वज्ञें म्हणीतलें[1] : " आपुलें घाएंचि माहात्मेपण गेलें होतें[2] : " ।।

## ४५२ वर्मस्पर्शे नरक निरूपण *

[ करंजखेडीं अवस्थान : एक वेळ भट लखुबाइसातें आपुलें रुणाचें द्रव्य मागत होते : म्हणौनि भांडण जालें : मग भटीं म्हणीतलें : " लखुबाइ : तुं भली नीकी होउनि ऐसें

---

२ **गो.** नैयाइक दर्शनीं. **एवा.** नीत्यवाइकीं. ३ **गो.** नीगाले.

**४५०.** १ **मुरा.** एकु दी कटकीं महादेवरायाचें (**मु.** महादेवरायातें) श्राध : ब्राह्मण दानासि नीगाले : गोसावीं भटोबासां इंद्रभटातें म्हणीतलें : " वानरेया : इंद्रेया : कटका जा : माहादेया रायाचें (**मु.** महादेरायातें) श्राध : " तीहीं म्हणीतलें : " जी जी : आम्ही मुर्ख सुंठदेव : काहीं शास्त्र नेणों : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि धाडिजत असिजे कीं : " २ **हबी.** गोदानासि. ३ **मु.** महादेवरायातें. ४ **मु.** °मग हीवरळीये गोसावीयांचेया दर्शना आले :

**४५१.** १ **मुरा.** ° " मारे (**रा.** मारी.) घायेंचि माहात्मेपण गेलें होतें मां : " २ **भ.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " सींक : जांभै : आपानवायू : नीद्रा या चहुंचें नीरूधन करी तो माहात्मा : "

**४५२.** * (**प्रव. आ.** १७३).

काइ करितासी ? आमुचें आम्हांसि कां नेदीसी ? " तवं लखुबाइसीं म्हणीतलें : " हो गा हो : तुं बहुत भला नीका अससी : विधवा ब्राह्मणी तुजहातीं नुरेति : मां एर काइ सोडीसी ? " म्हणौनि ऐसा भटाचा वर्मस्पर्श केला : तें आवघे भक्तिजनें आणि गोसावी आइकताती : तेणें भट दैनावले : मग लखुबाइसां गोसावीं म्हणीतलें : " बाइ : जें जेयाचें असैल तें तेणें दयावें : हें तव साच : मां वर्मस्पर्श काइसया करिता ? वर्मस्पर्शे नरक : वर्मस्पर्शापसि वर शिरच्छेदु चांगु : " " हो कां जी : मी चुकलीएं : " म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

## ४५३ भटांलखूबाइसां भांडण

एकु दीसु लखूबाइसें झाडितें होतीं : दादोस आंगणीं उभे होते : तवं दादोसांवरि रजु गेला : भटीं म्हणीतलें : " हें काइ लखूबाइ : दादोसांवरि रजु गेला : काइ डोळां देखसि ना ? " तवं लखूबाइसीं म्हणीतलें : " आधीं तुं काइ : मां तुझे दादोस काइ : " " कैसें[१] मीं काइ : मां माझे दादोस काइ ? माझेया दादोसांचा केसु पडे तेथ माझें सीर[२] पडे : " लखूबाइसीं म्हणीतलें : " पडों[३] देया : " ऐसें गोसावीं आइकिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " हें काइ गा वानरेया[५] : हो कां नावडतीचा परि रायाचीए जांघे-मांडीचा जाला कीं : तो रायासि नावडे : राया नावडतीचा कुमरू : परि एरांसि जयजय सबदीं बोलवावाचि लागे कीं : " ऐसें भटांसि गोसावी कोपले : *भटीं म्हणीतलें : " ना जी जी : हे भलतें भलतें बोले : मी इयेसी आजिलागौनि न बोलें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एकी कोठाचे बैल भांडति झुंझेति : परि कुसीसीं कुस लाउनि बैसेति : तैसा ठावो : म्हणौनि तुम्हीं तैसीया होइजो कां : " " हो कां जी[६] : "* ।।

## ४५४ दाइंबाप्रति पाटनीयां सारिखावांटनीयां कथन

जै गोसावीयांसि भोगनाराएणीं अवस्थान असे : गोसावी चांगदेवासि वीहरणासि बीजें करीति : दाइंबा गोसावीयांतें देखौनि म्हणति : " आम्हींहीं बरवे आणि गोसावीहीं बरवे : " ऐसें जीवीं म्हणति : गोसावीयांतें देखौनि आडवेआडवे जाति : एकाधा वेळु वीडीया मोडीत जाति : एकाधा वेळु सुरंग मीरवीत जाति : मग एळापुरीं तेयांसि स्तीति जाली होती : मग ते करंजखेडासि आले : गोसावीयांचेया दरीसनासि आले :

---

**४५३.** १ **मुराहबीभगो.** कैसे माझे दादोस काइ ? माझेया दादोसाचा°. २ **हबी.** सीस. **भ.** धड. ३ **बी.** पडों दे ऐसें परतें. **भ.(एवा.)** " मा ऐसा अवघाचि पसरसि ना कां : " **मुरा.** जाये : असीका पडसी ना कां : ४ **भ.** °हां गा : तुम्हीं यांतें ऐसें कैसें म्हणां ? इयें यथिचीं कीं : तुम्ही माहात्मेयाचे : हो कां गा नावडतीचा°. ५ **मुरा.** जऱ्हीं नावडतीएचा जाला : तऱ्हीं कोणें बोटें दाउं नये : कां ? तो रायाचीए जांघेचा जाला कीं : ६ (**प्रव. आमा.** १९१).

गोसावी[1] तें मागील ओखटें[2] काढीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजा काइ भोजा : भोजा यातें देखौनि आडवाआडवा जाए :" दाइंबा म्हणति : "जी जी : हें तै कीं :" एकाधा वेळु गोसावी म्हणति : "भोजा काइ भोजा : यातें देखौनि सुरंगु मीरवीत जाए :" दाइंबा म्हणति : "जी जी : हें तै कीं :" मागौतें गोसावी एकाधा वेळु म्हणति : "भोजा काइ भोजा : यातें देखौनि वीडीया मोडीत जाए :" दाइंबा म्हणति : "जी जी : हें तै कीं :" एकु दीसु *दायंबासि स्तीति जाली होती : ते पैलीकडौनि द्रूलतें येतें असते*[3] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजा काइ भोजा : भोजेयासि आजि-कालि माथां ब्रह्मांड लागत असे :" तीहीं म्हणीतलें : "जी जी : *गोसावीयांचेनि प्रसादें :*" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें नव्हे कीं : पाटनीयां[4] एकी सारीखीवांटनीयां[5] : बेगडही पीवळें आणि सोनेंहीं पीवळें : दूधहीं पांढरें आणि ताकही पांढरें : वालुही लोहिवा आणि पतंगुही लोहिवा : सोनेंहीं पीवळें आणि पीतळही पीवळी :" दाइंबाए म्हणीतलें : "जी जी : तरि तें आम्हांसि जालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जालें म्हणत असा तें नव्हे :" "जी जी : तरि तें नीरोपिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ पोरू बहूतां दीसां लाधला :" मग गोसावी दायांबाप्रति अन्यव्यावृति पुडूती नीरोपिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : *कर्मभूमीचिया* देवता *होति : परि परमेस्वरू नव्हेति : अष्टौदेवयोनि* देवता *होति : परि परमेस्वरू नव्हति : अंतराळीचे गणगंधर्व* देवता *होति : परि परमेस्वरू नव्हति : स्वर्गीचे इंद्रचंद्रादीक* देवता *होति : परि परमेस्वरू नव्हति :* कैळास-*वैकुंठीचे हरिहरब्रम्हादिक* देवता *होती : परि परमेस्वरू नव्हति :* क्षीराब्धीचा *शेषशायी* देवता *होए : परि परमेस्वरू नव्हे : अष्टभैरव* देवता *होती : परि परमेस्वरू नव्हति : विस्वरूप* देवता *होए : परि परमेस्वर नव्हे : चैतन्य* देवता *होए : परि परमेस्वरू नव्हे : चैतन्यापर परमेस्वरू*[6] *:*" *यावरि* बहुत *निरोपण जालें : सर्वज्ञें म्हणीतलें :* "*कव्हणी एकी माता असे : तिएचीया लेंकुरवासि भूक नाहीं : मांद्य पडिलें असे : म्हणौनि ते हीरडेयाबेहाडेयाचा गुळुळा दे : मग तेयासि भूक लागे : मांद्य फीटे : मग स्तनपान दे : तैसें परमेस्वरू* जीवासि *आर्ति उपजौनि ज्ञान देति :" मग दायंबासि* बोधु *जाला*[7] *:* ।।

---

**४५४.** १ **मुराहबीभ.** गोसावी तेयांचें मागील काढीति. २ **गो.** ओढें. ३ (**मुरा.**). ४ **मुराहबी.** येकी पाटणीयां : येकी सारीख वाटणीयां. ५ **एवा.** सारीख°. सारिखें°. ६ (**सूत्रपाठ**). ७ (**दृपा.** ३९. ('हीरडेयाबेहाडेयाचा दृष्टांत'—**दृस्थ.**कारांच्या मते 'महदाइसांप्रति पैठणीं हस्तिभंगावरि निरूपिला :' (उत्तरार्ध लीळा ३१८ पाहा.) दृष्टांतपाठावरील काही टीकाकारांनी तो 'बाइसांसि' निरूपिल्याचे नमूद केले आहे. पूर्वार्धाच्या राजधर प्रतीत 'दाइंबाप्रति पाटनीयां सारिखवाटनियां' या प्रस्तुत लीळेच्या शेवटी 'यावरि गोसावीं हीरडेयाबेहाडेयाचा दृष्टांत निरूपिला' असे म्हटले आहे. प्रस्तुत प्रकरण व दृष्टांताचा आशय लक्षात घेता मला हेच मत मान्य करावेसे वाटते. म्हणून हा दृष्टांत येथे घेतला आहे.)

## ४५५ इंद्रेया पवितें देणें

आबैसें : गौराइसें : इंद्रोबायें गोसावीयांचां ठाइं पवितें पर्व केलें : मग गावां नीगाले : वाटे गौराइसांचें पोट उदैलें[1] : आबैसीं म्हणीतलें : " इंद्रभटो : गोसावीयांपासि जा : पोट दुखतें ऐसें सांघा : गोसावीयांतें काहीं मागा : " मग गोसावीयांपासि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : " कें[2] गा आलेति ?" ते लाजिले : गोसावीं इखीत हास्य केलें : इंद्रभटीं वीनवीलें : " जी जी : पोट दुखत असे म्हणौनि आबाइसीं पाठवीलें असे : " गोसावीं श्रीकंठिचें पवितें दीधलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " पवितें पोटेंसीं बांधावें : गाउं पावा तवं असों देयावें : गाउं पावलेयावरि सोडावें : " तैसेंचि तेहीं केलें : गौराइसांचां पोटीं बांधलें : गाउं पावले : आणि सोडिलें : आणि तेयांसि प्रसुति जाली : ।।

## ४५६ रामतीर्थीं वस्ति

गोसावीं तेथौनि बीजें केलें : रामनाथीं वस्ति जाली : ।।

## ४५७ दाभाडीए वस्ति ।।

## ४५८ हीवरळीए राजमढीं अवस्थान[1]

तेथौनि गोसावीं हीवरळीएसि बीजें केलें : मढीं अवस्थान जालें : ।।

## ४५९ वनदेवीं देवां : सीक्षां भेटि

गोसावीं उदीयांचि तेथौनि बीजें केलें : ग्रामांतरासि : वनदेवाकडे गोसावीं बीजें करीत असति : मार्गीं दादोसीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : मीं गावांतु सीदोरी[1] आणुं जाइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : हें आलें ऐसें कोण्हाप्रति न संगावें हो : " " हो कां जी : " मग दादोस तीकवनाएकाचेया घरासि गेले : तवं आबैसें उमाइसें आलीं होतीं : तेयांसि देव भेटले : *तेयांसि खेवं दीधलें : " दादो : बैसा : " म्हणौनि बैसों घातलें : पाय धुतले*[2] : मग पुसिलें : " दादो : तुम्हीं आलेति : तरि काइ गोसावीं बीजें केलें असे ?" ते हांसति : परि सांघति ना : माघौतें म्हणति : " दादो : सांघा ना कां : " माघौतें ते हांसति : परि सांघति ना : मग आबैसीं म्हणीतलें : " उमाए : हे जाती आणि यां मागेंमागें जाओं : गोसावीं बीजें केलें असे : " मग दादोसीं उमाइसांतें

---

**४५५.** १ **मु.** उठिलें. **हबी.** दुखों लागलें. २ **एवा.** कां.

**४५८.** १ **मुराहबीभगो.** वस्ति. हीवरळीपूर्वी व दाभाडीनंतर **हबीभ.** प्रतीत 'राजौरीं वस्ति' अशी आदि आहे.

**४५९.** १ **एवा.** वाहाणा सांदुं. २ (**मुराहबीभ.**).

म्हणीतलें : " उमाए : तुमतें काहीं सीदोरी असे तरि घाला : " तेहीं म्हणीतलें : " भातु असे : " दादोसीं म्हणीतलें : " घाला : " तेहीं दहींभातु घातला : लोणिचें घातलें : तें घेउनि गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीं आधीं वनदेवाआंतु बीजें केलें : मग मढावरि बीजें केलें : देव आणि आबैसें : उमाइसें मढावरि आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीं पुसिलें : " बाइ : हें आलें ऐसें काइ माहात्मेनि सांघीतलें ?" तेहीं म्हणीतलें : " ना जी : दादोसांतें पुसिलें : ' दादो : तुम्हीं आलेति : तरि काइ गोसावीं बीजें केलें असे ?' हे हांसति : परि सांघति ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हांसणें हेंहीं एक सांघणेंचि कीं : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " अभ्यागतें आलीं कीं : आतां ग्रामांतर न कीजे : " ऐसें म्हणौनि गोसावी खालुते उतरले : लींगाची पुर्वाभिमुख देउळी : तेथ आसन जालें : गोसावीयांसि पुजा जाली : आरोगण जाली : पहूडु जाला : वीळिचांचां वेळीं गोसावीं राजमढासि बीजें केलें : तेथ अवस्थान मास दोनि जालें : ।।

## ४६० बाइसीं वनदेओ पुसणें

गोसावीं वनदेवासि वीहरणासि बीजें केलें : नासीसि उतरीलीकडे गोसावी उभे राहिले : *तेथ तीनि लींगें होतीं*[१] : तीएं अवळोकीत होते[२] : बाइसीं पुसिलें : " बाबा : एं तीनि लींगें काइसीं[३] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एकु हीवंजु कोळी : एकु बळीपु गौळी : हीवंजु कोळी तो माहादेवाचा अवतारू : बळीपु गौळी तो जीउ : तेयां दोघां मैत्र : ते दोघै पारधी जाति : पारधि करीति : मग जेवीति : एकु दीसीं पारधीसि गेले : पारधि केली : आले : ते जेउं बैसले : तवं बळीपेन[४] म्हणीतलें : ' हीवंजा : आजि मीं तुजसरिसा जेउं एइन : ' तवं हीवंजें म्हणीतलें : ' मजसरिसा कैसा जेवीसी ? मीं कोळी : तुं गौळी : ' तेणें म्हणीतलें : ' ना : मी तुजसरिसा जेवीन : ' ' हो कां : ऐसांहीं जरि माझा सबदु उरोधीसि ना तरि मजसरिसा जेवि : माझा सबदु उरोधिसी तरि मीं जाइन हो : ' ' ना हो कां : ' तेणें मानिलें : मग दोघै एकी ठाइं जेउं बैसले : जेविले : मागौतें एकु दीसु पारधीसि गेले : पारधि करूनि आले : हीवंजें तीनि भाग केले : तेथ गुपीत वेखें पार्वती होती : बळिपेनि[४] म्हणीतलें : ' हा वांटा कोणासि ? ' तवं हीवंजें म्हणीतलें : ' हा तुज : हा मज : हा आपणेयांसि : ' तेणें म्हणीतलें : ' हा तुज : हा मज : हा आपणेयांसि तो कोणासि ?' मागुतें तेणें म्हणीतलें : ' हा तुज : हा मज : हा आपणेयांसि : ' मागुतें बळिपेनि म्हणीतलें : ' हा तुज : हा मज : हा अपणेयांसि तो कोणासि ?' ' जाए कोळी तें कोळीचि : मासाकारणें अळुकें ' ऐसें म्हणीतलें आणि अदृष्ट जाला : बळिपासि[५] अवस्था प्रगटली : ' हींवजा

---

४६०. १ (एवा.). २ हबी. °मग मढासि बीजें केलें : तेथ बाइसीं पुसिलें :—. ३ भगोहबी. °सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा वनदेवो : " " जी जी : वनदेओ म्हणिजे काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें—. ४ एवा. बळियेपें. ५ मुराह. बळियेपासि.

कोळीया : दांगटा कोळीया : ' ऐसें म्हणौनि झाडां खेवें दे : ऐसीया नव अवस्था प्रगटलिया : झाडा एका तळि नीजैला : डोळेयांचे ठाए भवों लागले : दाहावी अवस्था प्रगटावी तवं देवता प्रसंन जाली : 'बळीएपा : हें काइ?' तेणें म्हणीतलें : 'तुं कोणु?' 'मीं हींवजु कोळी :' " 'हो कां :' म्हणौनि बळिपें तेयाचीए गळां हात घातले : 'बळिपा गौळिया : माग : प्रसंन जालां :' तेणें म्हणीतलें : 'मीयां आणि तुआं ऐसेयांचि असावें :' "*बाइ : म्हणौनि यें तीन्ही लीगें*[६] : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तो भगतु होए : परि ते देवता नव्हे : जें तेयासि दीजे तें तीतें नाहीं[७] :" ।।

## ४६१ वाएनाएका भेटि

वाइनाएकु उमाइसांसि भेटावेया आले : एकु पाओ धूतला : एकु धुवावा असे : उमाइसीं म्हणीतलें : "रूपैचे गुरू श्रीचांगदेओराउळ गोसावी आले असति :" आणि वाएनाएकें म्हणीतलें : "रूपैचे गुरू श्रीचांगदेओराउळ गोसावी आले असति :" तैसीचि तेयां स्तीति जाली : पाओ आसुडिला आणि तैसेचि नीगाले : हाटवटीएसि गेले : पानें पोफळें[१] घेतलीं : गोसावीयांसि दरीसना एत असति : धोत्रीं आवघें घेतलें असें : धोत्र वरुतें गेलें असे : लोकु पुसे : "हें काइ वाएनाएको?" "ना : रूपैचे गुरू श्रीचांगदेओराउळ गोसावी आले असति : तेयांसि भेटों जात असों :" संभ्रमें धोत्र वरुतें[२] करीति : तैसेचि गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि पुर्वीलीकडे पटिसाळेसि आसन असे : ते संभ्रमेंचि आडचि गोसावीयांसि उजुचि एत होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : ऐसे या पां :" मग पाइरीयांवरौनि आले : पानें पोफळें गोसावीयांसि दरीसनासि केलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांपासि[३] बैसले : पालखती बैसले : मग म्हणों लागले : "जी जी : रूपै गोसावीयांचे गुण सांघे : ते तोकडे : गोसावीयांचां ठाइं दीसत असति ते बहुत जी : सांघेति तीए सांघों नेणति जी : सांघौनि नासीति जी :" मग गोसावीं तेयांतें पुसिलें : "नाएको : तुम्हां नावं काइ?" तीहीं म्हणितलें : "जी जी : मातें वामनु : वामनु ऐसें म्हणति : वायां वायां ऐसें म्हणति :" सर्वज्ञें म्हणितलें : "ऐसें तरि तुम्हां नावं वामनाचार्यों[४] म्हणा :" "जी जी : रूपै अखंड गोसावीयांची वाट पाहे : गोसावी कवणीं ठाइं राज्य करीत असति ऐसें जाणे ना : तरि तीतें बोलाउं धाडुं?" सर्वज्ञें म्हणीतलें : "धाडा :" मग तीहीं मोलकरी[५] धाडिला : ।।

---

६ (गो.). ७ **अज्ञात. ना.** °कां नुरउनि आपणपें उमटविलें : नीर्वाळा पाहीला ".

**४६१. १ भ.** °वोंटीए घेतलीं : कासोटा सूटला. २ **अ.** व्रतें. ३ **गो.** पालखती घालुनु. ४ **एवा.** वामनाचार्ये. ५ **मुरा.** मोलकै करुनि.

## ४६२ माहादाइसां भेटि

तो मोलकरी माहादाइसांसि भेटला : माहादाइसीं[१] गोसावीयांतें आइकिलें : मग मोलकरी करुनि एतें होतीं : एरएरां भेटि जाली : माहादाइसीं पुसिलें : "आलेया : तुं कें जात अससि ?" तेणें म्हणीतलें : "पाडळी नावें गाउं : तेथ जातु असें :" "कां जातु अससि[२] ?" "वाएनाएकु : तेयांची लेंकि रूपाइसें : तेयांतें बोलाउं जातु असे :" "कां ?" "ना तेयांचे गुरू आले असति :" "चाल[३] : तीएं आम्हींचि :" एरू *मोलकै मागौता पाठवीला : तयाचीए हातीं पोतें दीधलें : आणि नीगाली*[४] : माहादाइसें गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : गोसावीयांसि उजवीएकडे पटिसाळेवरि आसन असे : माहादाइसांसि गोसावीं बैसलेयांचि क्षेमाळींगन दीधलें[५] : माहादाइसीं दंडवत घातलें : श्रीचरणांसि लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : गोसावीयांपुढें वाटे मोलकरी भेटला ते गोष्टि सांघीतली : याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हांसि कैसेनि स्फुरलें ?" ।।

## ४६३ अवतारू प्रतिभिज्ञा करणें

"[१]जी जी : गोसावीं म्हणीतलें होतें : 'बाइ : द्वारावतीये जाता तरि तेथ : श्रीचांगदेओराउळांची गुंफा स्थानें पाहावीं[२] :' जी जी : तरि मीं तेथ गेलीएं होतीएं : तेथ पुरूख एक बैसले होते जी : तेयांचीए तोंडीहूनि कीं रूपेयांचीया सरीया सरीया ऐसीया[३] पडत होतीया जी : तरि तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते तेयांची लाळ :" "जी जी : मीयां[४] तेयांतें पुसिलें : 'आपणेयां नावं काइ ?' तीहीं म्हणीतलें : 'आम्हां नावं माहाद मुनि :' 'आपण[५] कवणांचेयां अनुग्रहीतां ?' तेहीं म्हणीतलें : 'आम्हीं अनंत मुनिचे :' 'ते कोणाचे अनुग्रहीत ?' 'ना ते श्रीचांगदेओराउळा गोसावीयांचे अनुग्रहीत :' 'श्रीचांगदेओराउळीं गोसावीं कवणी परी बीजें केलें : तें तुम्ही जाणा ?' 'ना तें आम्हीं नेणों :' 'तरि तुमचे अनंत मुनि काइ म्हणति ?' 'ना माहाराष्ट्रीं[६] पुरूख आणि विद्या असे[७] : ऐसें म्हणति :' 'तुम्हीं काइ म्हणा ?' तीहीं म्हणीतलें :

---

**४६२.** १ **मु.** महदाइसें द्वारावतीयेहुनि पाडळीयेसि आली : परि गोसावी कवणे ठाइं राज्य करीत असति ऐसें चोजवलें नाहीं : मग आइकीलें : जें गोसावी हीवरळीये राज्य करीत असति : मग एक मोलकै करूनि—. २ **भरा.** तेणें म्हणीतलें : "वायनायकू : वायनायकू : तेयांची लेंकि रूपाइसें : रूपाइसें : तेयातें बोलाउं जातु असें :°. ३ **मुरा.** चाला. ४ (**मुरा.**). ५ **गो.** देधलें.

**४६३.** १ **मुरा.** पुर्वीं माहादाइसीं पुसीलें होतें : "हां जी : गोसावी कव्हणाचे पुत्र ?" **सर्वज्ञें** म्हणीतलें : "हें गुजराते प्रधानाचे कुमर :" मग द्वारावतीये जाउनि आली : येकु दीसु पुसीलें :—. २ **एवा.** पडिताळावीं : ३ **एवा.** नीगती जी : ४ **भ.** म्यां. ५ **अपंहबी.** आपण कवणाचे (**एवा.** कोणाचे) अनुग्रहीत ? ६ **पंगो.** माहाराष्टरीं. ७ **भ.** °ते वीद्या तेचि ब्रह्मवीद्या.

'आम्हीं अनंतु अनंतु ऐसें म्हणों :' याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीचांगदेओराउळीं कवणी परी[८] बीजें केलें तें ते केवि जाणति ? तें कव्हणीचि नेणे : ते तुम्हांसि एथौनि सांघिजैल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काउरळीची कामाक्षा : ते हटयोगीनि : पुरुखांची प्रसीधी आइकौनि रतिचीया चाडा आली[९] : श्रीचांगदेओराउळीं म्हणीतलें : 'एथ श्रीदत्तात्रप्रभूची आज्ञा असे :' ते लंघुनि भीतरि एववे ना : ऐसीं सात अहोरात्रें गुंफेचां द्वारीं उभीं होतीं : तेथ ब्रह्मचर्याची प्रवृति : तीचा आग्रहो देखौनि श्रीचांगदेओ-राउळीं तें पुर त्येजिलें : ते समैं गुजरातेचेया प्रधानकुमराचें देह गेलें होतें : तें उठवीलें : तेंचि मागुतें उठवावेयाची प्रवृति होती : परि भोपां नीक्षेपिलें :" हे आधील गोष्टि गोसावीं माहादाइसांप्रति येथ सांघीतली[१०] : माहादाइसां 'द्वारावतीकारू गोसावी तेचि आमचे गोसावी' ऐसें उमटलें : मग रात्रीसि बीढारा नीद्रा करावेयासि आली : वृंदावनावरि बैसलीं : आबैसांतें म्हणीतलें : "आबै आबै : द्वारावतीकार गोसावी तेचि आमचे गोसावी :" ऐसी अवघी गोष्टि सांघीतली[११] : मग उदीयांचि गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : तेयांतें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैसां स्थानीं तैसीया तैसीया गोष्टी तिया न कीजति किं[१२] :" माहादाइसीं म्हणीतलें : "हां जी : ते गोसावी केवि जाणति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणिजे ऐसें हेतुधातुतव :" "हां जी : हेतुधातु काइसेनि जाणिजे ?" "जाणिजे ऐसें तुम्हां उठितां बैसतां :" मग माहादाइसांसि वीस्मो जाला : माहादाइसीं म्हणीतलें : "आबै : आम्हीं रात्रीं जें बोलिलों तें गोसावीं जाणीतलें :" मग आबैसांसि विस्मो जाला : ।।

## ४६४ तथा उपाहारूस्वीकारू

माहादाइसीं गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग माहादाइसीं वडेप्रधानकरूनि उपाहारू नीफजविला : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि ताट जालें : भगतिजनां अवघेयां ठाए जाले : गोसावीं[१] अवघेयां ठायांकडे अवळोकिलें : माहादाइसीं अवघेयां ठाइं वडे वाढिले : आपुलां ठाइं न वढितीचि[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "यां अवघेयां ठाइं वडा असे : एथ नाहीं : तें काइ ?" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : मीं द्वारावतीए गेलीएं होतीएं : तेथ मज सुळु उपनला : तीए दीउनि[३] मज उडीदान न साहे :" मग गोसावीं आपुलीए ठाइचा वडा तेथ वाढिला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : अवघेयां भगतिजना जेवणें जालीं : गुळुळा जाला : तीए दीउनि माहादाइसांसि उडीदान[४] साहे : ।।

८ **प्रवा.** °पुर त्येजिलें. ९ **अ (एवा.).** °तेथ श्रीप्रभूची आज्ञा : ते लंघुनि भीतरि जानवे ना : ऐसीं सात अहोरात्रें—. १० (मागे पूर्वार्ध लीळा १७ पाहा). ११ **मुरा.** °तेया सूख जालें. १२ **रा.** °हें तुमचें रहस्य : मां आपुलें रहस्य तें आणिकांप्रति प्रकटीजे ना कीं :"

**४६४.** १ **पं.** °अवघे ठाए पडिताळिले. २ **गोह.** नव्हढीतीचि. ३ **गो.** देउनि. ४ **मुरा.** वडा.

## ४६५ आपलो भेटि

आपलोएं जुं हारवीलें : जुआरीं बोकणा बांधला : मग ते घरासि आले : *तवं घरिचीं आवघींचि कोपलीं*[१] : तेयांचीया माता म्हणीतलें : "जाए कां ऐसा : *जैसा आबैसांचा नागदेओ गेला*[१] : जैसी रूपै श्रीचांगदेओराउळा गोसावीयांपासि गेली तैसा तुंहीं जाए कां :" तैसीचि तेयां स्तीति जाली : आणि तैसेचि ते नीगाले : ते अहोरात्रें गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला असे : सर्वांगीं चंदन : चंदनाचा आडा : श्रीकंठीं माळ : गोसावी पुर्वीली सोंडीएवरि उभे असति : आपलोएं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : माहादाइसीं काउरवाउरें देखौनि पुसों आदरिलें[२] : "कां रे बा तुं ऐसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आधीं यांसि पाणी पेओं सुआ : मग पुसा : हे[३] नए ओलांडीति परि पाणी न पीएति :" माहदाइसीं उदक आणिलें : ते न पीएति : ते म्हणति : "मीं गोसावीयांचें चरणोदक-वांचौनि न पीएं :" गोसावीयांसि सोंडीएवरि आसन जालें : माहादाइसीं चरणक्षाळण केलें : मग पीयाले : मग माहादाइसांपुढां सांघों आदरिलें : "मी जुं खेळीनलां : मज बोकणा बांधला : मग घरासि गेलां : मग बाइयां म्हणीतलें : 'जाए जाए ऐसा : जैसी रूपै गेली : *जैसा आबैचा नागदेओ गेला*[१] : श्रीचांगदेओराउळापासि : तैसा तुं जाए :' आणि मज स्तीति जाली : आणि नीगालां : तो अहोरात्रें आलां :" ।।

## ४६६ उमाइसांचा उपाहारू स्वीकारू

[१]उमाइसीं गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : दसमिचा दीसीं वीनवीलें : रात्रीं अस्परीसें[२] जालीं : उदीयांचि गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : अळगौनि दंडवत घातलें[३] : गोसावीयांपुढां सांघों लागलीं : "जी जी : मीयां गोसावीयांलागि उपाहारू आपुलां हातीं नीफजवावा : गोसावीयांसि पुजा करावी : आरोगण देयावी : तें मज दैव नाहीं जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पैन्हांचें पैन्हां असिजे : धूआं डोळे भरिजति[४] : तेयापरिस ऐसें असिजे तें ओखटें ? वृधावाइसें उपाहारू नीफजवीती : वानरेस प्रोहीतद्वारें एथ पुजा

---

**४६५.** १ (**पंहबी.**). २ **मुरा.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा जुं खेळीनला : जुं हारवीलें : याची माता कोपली :" माहादाइसें भीयालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें काहीं नाहीं : हा तान्हैला असे : भुकैला असे : पाणि पेवों सुआ : पाठि गोष्टि पुसा : बाइ : पुर्वीं हेंहीं जुं खेळें : हें जुं जीतें : पर हारवीं ना :" मग याउपरि गोसावीं द्यूतक्रीडेची गोष्टी सांघीतली : ३ **पंगो.** हे माएसि लाजति : परि—. **बी.** हे छायेसि जाति परि—.

**४६६.** १ **मुरा.** उमाइसें मासोपवास करावेयाची आइती करीतें होती : सर्वज्ञें म्हणीतलें : "मासोपवासीं बैसतां ब्राह्मणातें जेउं सुइजे :" मग उमाइसीं—. २ **मु.** नास्पर्शीयें. **पंभगोह.** स्परीसें. **बी.** स्पर्शे. ३ **मुरा.** °आबैसापुढें दुख करूं लागली : गोसावीं आबैसातें बोलावीलें : "बाइ : मासउपवासीयें काइ म्हणतें असति ?" उमाइसें गोसावीयांपुढां—. ४ **मुरा.** °हें नीकें : मा

करिति : एथौनि तुमची पुजा स्वीकरिजैल :" मग गोसावीयांसि विहरणासि जावेयाची प्रवृति होती : ते भंगली : गोसावी न वचतीचि : मग उमाइसें प्रधान करूनि गोसावीं नीरोपण केलें : तवं आबैसीं उपाहारू नीफजविला : मग भटोबासीं गोसावीयांसि पुजा केली : गोसावीयांसि ताट केलें : भगतिजनासि ठाए केले : गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजना जेवणें जालीं : उमाइसां पांती जेवण जालें : गोसावीयांसि वीडा जाला : आसनीं उपवीष्ट असति : उमाइसीं श्रीमुखिचें तांबोळ मागीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काम्य[५] व्रत[६] : एथिचा वीधि ऐसा नव्हे : तुम्हां उचीष्ट तांबोळ खाओं नैए[७] :" मग उमाइसीं चुळीं पाणी घेतलें : मग म्हणीतलें : "जी जी : मीं गोसावीयांचां ठाइं मासोउपवासासि बैसेन :" तवं बाइसीं म्हणीतलें : "काइ ओ जालें *या रांडांसि*[८] : पुहीयांनि[९] घाणातेनि तोंडेंसीं बाबापासि उपवाससातरीया ? पैऱ्हां जाए : उपवास करि[१०] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्ही रावंसगावांसि जा : मग हे तुम्हांसि दरीसन तेथ देइल : तुम्हीं यातें ओळखाल ?" "जी जी : आम्हीं आपुलेयां गोसावीयांतें समुद्राचां प्रांतीं ओळखौनि :" मग तीएं एकादसिचां दीसीं गावां गेलीं : ।।

## ४६७ माहादाइसां श्रमनीवृति करावेया अनोज्ञा[१]

[१]गोसावीयांसि वृंदावन करावेयाची प्रवृति : *सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ वृंदावन करावें :" तवं एकीं भक्तजनीं म्हणीतलें*[२] : "तुळसीया वृंदावन करूं जाणे : *तो टेंभुरणीये असे*[२] :" ऐसें गोसावीयांपुढें सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरा : तेयातें बोलावा जा :" भटोबास तेयांतें बोलवावेया टेंभूरूणीसि गेले : तुळसीयातें म्हणीतलें : "तुमतें गोसावीं वृंदावन करावेया बोलाविलें असें :" तीहीं म्हणीतलें : "आमचां घरीं श्राध : पाहिचा[३] दीसु राहा : मां जाओं :" भटीं म्हणीतलें : "तुम्हीं पाहीं या : मीं आजि जाइन :" तैसेचि भट वीळुनि मागुते आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : उठितां म्हणीतलें : "जी जी : ते उदीयां एती :" तैसेचि भट[४] लींगाचीए देउळीएसि गेले : तेथ पाठि घातली : माहादाइसें तेयांचीए पाठीवरी पाए देत होतीं : तवं गोसावीं लघुपरीहारासि बीजें केलें : माहादाइसीं गोसावीयांतें देखिलें : आणि बीहालीं : गोसावीयांचेयां श्रीचरणांसि लागलीं : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : नागदेओ भागला असे : तरि याची पाठि मज

---

याजवळीके असीजे तें वोखटें ?" ५ **गो.** कामीकें. ६ **एवा.** वर्त. ७ **गो.** °मग भटोबासांकरवि पानें देववीलीं. ८ (**हबी.**). ९ **मुरागो.** पुहानि. **पंहबी.** पोहानि. १० **भ.** °बाबापासि माणूसें यती : मांदी यइल°.

**४६७.** १ यापूर्वी **मु.** प्रतीत पुढील '**स्वमति शोध**' आहे. '**भटां भेटि** : स्वमति शोध : भट : इंद्रभट गोसावीं करंजखेडींहुनि कटका दानासि पाठवीले : मग भट हीवंरळीयेसि आले : गोसावीयांसि भेटि जाली :' २ (**मुराहबी.**). ३ **मुराह.** आजिचा. ४ **मुरा.** °नारायेणाचेया देउळा——

रगडूं एइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आपुलेया भागलेयाची श्रमनीवृति कीजे[5] : *एकत्र खानपान कीजे*[6] *:*" आणि मग गोसावीयांसि तेथ आसन जालें : दीवा लाविला : गोसावीं माहादाइसांकरवि भटांची श्रमनीवृति करविली : ।।

## ४६८ तुळसीया आंगुळीवेथा हरणें

एरि दीसीं तुळसीया आला : वृंदावन करूं लागले : *भगतजनें दगड आणुंआणुं देति*[1] *:* चीरा उचलीतां आंगुळीएवरि पडला : तेणें[2] तेयांसि मुर्छा आली : ऐसीं भगतजनें बोबाइलीं : गोसावीयांसि पटिसाळेवरि[3] आसन असे : गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीं श्रीकरें तेयातें स्परीसिलें : पीक घातली : तांबोळ बांधलें : मग सावद जाले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां व्यापारू पारूखों देया गा :" मग गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन जालें : मग ते बैसले : तुळसीएं वृंदावनाचे तीनि खण तीं दीसां नीर्वाळिले[4] : ।।

## ४६९ जोगीवेखें मनभूली कृडा

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं माहालखूमीएचीया देउळासि बीजें केलें : एक मढादखिणे : एक मढापुर्वे माहालखूमीएचें देउळ : तेथ गोसावीं बीजें केलें : चौकीं गोसावीयांसि आसन जालें : तेथ जोगीयाची गळकंथा : खापरी : काठी : *आधारी*[1] *:* होति[2] : ते गोसावीं देखिली : गोसावीं चौकीं वस्त्रें ठेविलीं : ते गळकंथा लेइले : वीभूती श्रीमुख माखिलें : श्रीकरीं काठी : खापरी घेतली : आणि गोसावी[3] उभे ठाकले : मग *गोसावीं फागडा म्हणीतला*[4] *:* "कर धरीत खर्पर : भीक्षापात्र : भस्मवीधूळीत वीलसीत गात्र : नीत्य चळीत चीत[5] : मंद मंद मनसा वीगळीत[6] : परमानंद : मनभूली रे मनभूली रे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आधीलि माहात्मे एणें वचनें भीक्षा मागति :" *इतुलेनि गोसावीं टाळी लाउं आदरीली*[7] *:* मग बाइसें बेहों लागलीं : "फेडिजो बाबा : फेडिजो बाबा :" ऐसें म्हणीतलें : मग तें गोसावीं फेडिलें : आपुलीं वस्त्रें पारावर्ण केलीं : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

---

५ **एवा.** करूं ए. ६ (**प्रव. आ.** १३१).

**४६८.** १ (**गो.**). २ **गो.** °आंगुळी दुखवली : भक्तजन बोबाइले : गोसावीं तेथ बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा तुळसीया : दुखवलेति ?" "नाहीं जी :" ३ **मुरा.** पाटसरेयावरि. ४ **गो.** °गोसावी वेढे करितां तेथ बीजें करीति :

**४६९.** १ (**मुराहबीगो.**) **हबी.** °आधारी : कडासन होतें : २ **भ.** °तो गावांतु गेला होता. ३ **एवा.** कडासनावरि आसन जालें. ४ (**पंगोहबी.**). ५ **एवा.** चलचीत. ६ **पं.** °स्मरीत. **ह.** विलसीत. ७ (**भ.**).

## ४७० माहादाइसेंविवादें तीकवनाएका जैत

[1]तीकवनाएकाचां घरीं श्राध : गोसावीयांतें उपाहारालागि वीनविलें : गोसावीयांसि उदीयांचा[2] पुजाअवस्वरू जाला : *गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : दोपाहाराचा पुजाअवस्वरू जाला : धुपार्ती मंगळार्ती जाली*[3] : आरोगणेसि उसीरू जाला : "आझुइं ताट कैसें नैये :" म्हणौनि माहादाइसें आलीं : "हें काइ तीकवनाएको : गोसावीयांसि आरोगणेसि उसीरू जाला : आझुइं कैसें ताट नेया ना ?" तीकवनाएकें म्हणीतलें : "ब्राह्मणांसि संकल्पु देओं : मग गोसावीयांलागि ताट नेओं :" *महदाइसीं म्हणीतलें : "आधीं[4] तुझे ब्राह्मण जेविती : मग गोसावीयांसी ताट नेसी[5] ?"* माहादाइसें भीतरि गेलीं : गोसावीयांलागि ताट ओगरिलें : घेउनि आलीं : गोसावीयांसि आरोगण जाली : मग ताट घेउनि आलीं : तीकवनाएकें म्हणीतलें : "रूपै : ताट भीतरि नको नेओं : बाहीरि ठेवा :" माहादाइसीं म्हणीतलें : "तें कां ?" "ना हे सतसारावें असे :" "सतसारावें कां ?" "ना गोसावीं आरोगण केली असैल म्हणौनि :" "मा गोसावीं आरोगण केलीं : तरि सतसारावें कां ? "ना गोसावी काइ म्हणौनि ऐसें नेणिजे :" माहादाइसीं म्हणीतलें : "कैसें गोसावी काइ ऐसें म्हणौनि नेणिजे ? गोसावी इस्वरू आति आणि काइ :" "होए होए : घेया : गोसावी इस्वरू होती : परि काइ म्हणौनि नेणिजेति :" ऐसीं दोनि वेळ उरोधिलीं : मग माहादाइसें ताट ठेवुनि आलीं : उदीयांचि ते गोसावीयांचेया दरीसनासि आले : भावें दंडवत घातलें : श्रीचरणांसि लागले : माहादाइसीं हळूचि म्हणीतलें : "घेइ तुझेया भावाचें काइ घेओं :" मग तीकवनाएकें गोसावीयांपुढें आवघेंचि सांघीतलें : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नाएकु म्हणत असति तें तैसेंचि : हें ब्राह्मण कीं क्षेत्री : कीं वैस्य कीं सुद्र : कीं काइ ऐसें कव्हणी जाणे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : आणि तीकवनाएका जैत आलें : ।।

## ४७१ भटविवादें तीकवनाएका जैत

भट आणि तीकवनाएकु धोत्रें धों गेले होते : भटोबासीं तीकवनाएकीं धोत्रें धूतलीं : मग सीधनाथाकडे नीगाले : तीकवनाएकीं म्हणीतलें : "नागदेया नागदेया : आमचे गोसावी साक्षातु सीधनाथू :" भटोबासीं म्हणीतलें[1] : "ब्रह्मादीकां नीसरबोंडी : तेथ तुझा सीधनाथू कें[2] रीगैल ?" तीकवनाएकें म्हणीतलें : "हें तुं म्हणतासि कीं गोसावी ?"

---

४७०. १ मु. (**स्वमति शोधः**). तीकवनायक ते वायेनायकाचे जावाइ : माहादाइसां वडील बहीण उमाइसें : तयांचे भातार : एल्हाइसांचे पीते : ते नीच गोसावीयांचां दर्शना येति : २ **गो.** सवळेंचा. ३ (**गो.**). ४ **गो.** °ब्राह्मणासी संकल्पीसी मग नेसी ? **हबी.** °ब्राह्मणासी संकल्पु देयाल : मग....नेयाल ? ५ (**मुराभ.**).

४७१. १ **पंह.** °कट तुझेया सीधनाथासि :—. २ **मुरा.** कोणे ठाइं लागे.

भटोबासीं म्हणीतलें : "ना : गोसावी :" तीकवनाएकीं म्हणीतलें : "जरि गोसावी ऐसें म्हणति तरि मीं डोइ बोडूनि धोत्र फाडूनि उतरापंथें जाएं :" तैसेंचि गोसावीयांपासि गेले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग तीकवनाएकु गोसावीयांपुढें सांघों लागले : "जी जी : मीयां नागदेयातें ऐसें म्हणीतलें : 'नागदेया : गोसावी साक्षातु सीधनाथू :' नागदेओ म्हणे : 'ब्रह्मादीकां नीसरबोंडी : तेथ तुझा सीधनाथू कें रीगैल ?' मीयां म्हणीतलें : 'हें काइ तुं म्हणतासि कीं गोसावीं ?' म्हणे 'गोसावी :' तरि जी : गोसावी काइ ऐसें सांघावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं म्हणत असा तेंचि :" यावरि तीकवनाएकें वाहे आफळिली : "हा होएं कीं मीं तीकवदेओ :" दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग नीगाले : भटीं पुसिलें : "जी जी : गोसावी सीधनाथू कैसे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ब्राह्मणु साभिमानी असे : डोइ बोडूनि : धोत्र फाडुनि उतरापथे जाए तें नीकें : कीं हें नावेक सीधनाथू होए तें नीकें ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं यातें म्हणा : 'ब्रह्मादीकां नीसरबोडी : तेथ तुझा सीधनाथु कोठे लागे :' ऐसें सांघावें नाहीं : दोहीं ओठां टाळें घालावें : तुम्ही म्हणा 'ब्रह्मादिकां नीसरबोडी :' तें तैसेंचि : परि जाणौनि नेणे तो सदैवु : जैसा व्यवहारा धन असौनि आपणेयां धन नाहीं म्हणे तैसा ठावो*[३] *:"* [सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु धातुर्वादी असे : तो रण सोधुं जाए : रण पडीलें असे : तो एकाचीये कानीं काडी घाली : ते एरी कानीं रीगे : तें सांडी : आणि काचीए कानीं काडी घाली : ते तोंडुनि नीगे : तेंही सांडी : आणीकाचीए कानीं काडी घाली : ते भीतरि जाए : ते घे :" "हो कां जी :"] *

*भटीं पुसिलें : "जी जी : तारि गोसावीयाचें महत्व आणि नाम कवणाप्रति बोलावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "झाडितां झडेना : तोडितां तुटेना : तेयाप्रति बोलावें :" "हो कां जी*[३] *:"* ।।

## ४७२ लुखदेओबा भेटि

[१]लुखदेओबा कटकासि गोदानालागि गेले होते : तेथौनि करंजाळेयासि आले[२] : सामकोसांसि भेटले[३] : न्हाले : जेविले : रात्रीं नीजैले असति : तेवढेया वेळा अवघेयांचीयाचि गोष्टी पुसों आदरिलीया : तेयावरि भटोवासांतें पुसिलें : "सांपें आबैचेया

---

३ (**प्रव. आमा.** १९८, १९९). *[**दृपा.** ४५. कपाळपरीक्षेचा दृष्टांत. 'रामदेवाप्रति पैठणी : **एवा.** भक्तिजनाप्रति'—**दृस्य.** तथापि, रामदेवासंबंधीच्या लीळात कोठेंच हा दृष्टांत समाधानकारक रीतीने बसत नाही. एका पोथीत या दृष्टांताचा सूत्रसंबंध 'जाणौनि तेणे तो सदैव' या वचनाशी (**आमा.** १९९) निर्दिष्ट केला आहे. प्रकरणवशात या वचनाचा प्रकरणवश प्रस्तुत लीळा होय. म्हणून हा दृष्टांत येथे स्थापित केला आहे.

**४७२.** १ **मु.** (**स्वमति शोध :**). लखुदेवोबा ते भटांचे माउसभाउ : ते आबाइसांची बहीणि गांगाइसें तयांचे पूत्र°. २ **मु.** (**स्वमति शोध :**). °तेथ आबाइसांची बहीणि सामकोसें होती—. ३ **मुराहबी.**

नागदेयाचीं ढांढाळें काहीं आइकिजति ना ?" सामकोसीं म्हणीतलें : " हां रे बा : तें तुं नेणसि ? तेणें तें अवघेंचि सांडिलें : तो श्रीचांगदेओराउळा गोसावीयांपासि राहिला असे : " आणि तेयां स्तीति जाली : तेहीं पुसिलें : " ते कवणी ठाइं असति ? " तेहीं म्हणीतलें : " हींवरळीए असति[४] : " तैसेचि पाहारा रात्रीं नीगाले : ते पाहानपटींचि हींवरळीएसि आले : दारवठेयापासि उभे असति : तवं भट हाटवटीएसि जावेया नीगाले : तवं दारवठां भेटले : " हें काइ लुखदेया : तुं केधवां आलासि ? " " मीं आतांचि आलां : " भटोबासीं पुसिलें : " काहीं गोसावीयांसि दरीसन करावेया असे ? " तेहीं म्हणीतलें : " ना हो : " तैसेचि दोघै हाटासि गेले : पानें पोफळें घेतलीं : गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि उजवीएकडे पटिसाळेवरि आसन असे : लुखदेओबाएं गोसावीयांतें देखिलें : आणि स्तीति अधीक भरली : *हातासि कांपु आला*[५] : पानें पोफळें गोसावीयांपुढें दरीसना केलीं : तीएं वीखूरलीं : भटीं गोसावीयांपुढें सरिसीं केलीं : लुखदेओबा गोसावीयांजवळे बैसले : नावेक होते : स्तीति भंगली : मग गोसावीं पुसिलें : " हें तुम्हांसि श्रुत कीं दृष्ट ?" तीहीं म्हणीतलें : " जी जी : श्रुत : " याउपरि लुखदेओबाएं मागील अवघी गोष्टि सांघीतली : याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : " आति : ऐसें हें एथिचेया नामापासौनि होए : कां स्थानापासौनि होए : " बाइसीं पुसिलें : " बाबा : स्थानापासौनि होए तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें पुर्वीं भोगरामीं होतें : तेथिचा बडूवा एथ आर्ती करी : हें गेलें : मग एथिचेया स्थानासि करी : तेया ओटेयावरि एकु ब्राह्मणु बैसला : आणि तेयासि स्तीति जाली : बडूवा आला : तेणें आधीं आर्ती ओटेयासि केली : पुस्प घातलें : पाठीं भीतरि देवतेसि आर्ती केली : तेणें ब्राम्हणें म्हणीतलें : ' हे कवणासि आर्ती करीत असा ?' तेणें म्हणीतलें : ' एथ पुरूख एक होते : तेयांसि करूं : ते गेले : मग तेयांचेया स्थानासि करूं : ' तेणें पुसिलें : ' ते कवणीकडे गेले ? ' ' ना मनसीळेकडे गेले : ' तैसेचि ते नीगाले : तवं[६] तळेयाचीए पाळीं आसन असे : तो ब्राम्हणु आला : दंडवत केलें : श्रीचरणां लागला : आणि तेया अधीक स्तीति जाली : " सर्वज्ञें म्हणीतलें[७] : " ऐसीया एकी भूमी असति : मोटका बीयांसि आणि भूमीसि मेळापकू कीजे आणि घुमरीसीं उठी : एकी *तनधैलिया भूमी : आंतुबाहीरी तनें दाटलीया असति : तिया नांगरीजति : वाहींजति : दुणीजति : कांसीया परतीया सांडीजति : झाडें फेडीजति : घाते वाफे*[८] पेरिजति : मग पीकति : *ना तैसीचि जरि पेरिजति तरि न पीकति*[८] : एकी तेयां बीहीं न नीगे[९] : "।।

---

°पाए धूत असति : तेधवां लखुदेवोबासीं सामकोसातें पुसिलें : " हां आइ : सांपें आबैचेया—. ४ **मुराहबी.** °तैसाचि पाओ आसुडिला : एकु पाओ धुवावा होता : तैसेचि पाहारा रात्रीं—. ५ (**मुरा.**). ६ **एवा.** °मनसीळेचां द्वारीं—. ७ **मुरा.** °ऐसीं एकें सुक्षेत्रें आति : येकिदोनि वाहीया जाति : भुइंबींयां मेळापकु होए : आणि भार आतौनि पीकति : (**एवा** : घुमरीसि उठिति :) येकें बरडें नागरवेन्हीं उलथीजति : वापे घाते पेरीजति : किं तेथ बीं न नीगे : तैसे एक अधीकारीये असति : " ८ (**पंहबी.**). ९ (पाहा **दृपा.** २८ ' तनधैलिया वावराचा दृष्टांत.' ' लखुदेवोबाप्रति निरूपिला ' —**दृस्थ.**)

## ४७३ तथा उपाहारूस्वीकारू

लुखदेओबाएं भटांतें पुसिलें : "नागदेया[१] : मीं गोसावीयांचां ठाइं उपाहारू करीन :" भटीं म्हणीतलें : "तुतें काइ असे ?" "ना मीं कटकासि गेलां होतां : तेथ मज तीनि आसु आणि च्यारि दाम आले : तरि दोनि दाम वेचले : तीनि आसु आणि दोनि दाम असति :" "हो कां : तरि गोसावीयांलागि बरवें वस्त्र घे : आणि गोसावीयांचि-पुरूता उपाहारू करी :" म्हणौनि : तेहीं म्हणीतलें : "हो कां :" मग गोसावीयांलागि बरवें वस्त्र घेतलें : गोसावीयांपुरता उपाहारू नीफजविला : गोसावीयांसि पुजा केली : वस्त्र ओळगविलें : गोसावीयांसि आरोगण जाली : वीडा जाला : आसनीं उपवीष्ट असति : मग गोसावीं लुखदेओबातें पुसिलें : "हें तुम्हांसीचि स्फुरलें : कीं कव्हणीं स्फुरविलें[२] ?" "जी जी : मीयां नागदेयांतें पुसिलें : 'नागदेया : मीं गोसावीयांचां ठाइं उपाहारू करीन :' नागदेयानि पुसिलें : 'तुतें काइ असे ?' 'ना : मातें तीनि आसु आणि दोनि दाम असति :' तेणें म्हणीतलें : 'गोसावीयांलागि बरवें वस्त्र घेयावें : आणि गोसावीयांचि पुरता उपाहारू करि :' 'हो कां :' म्हणौनि केला जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आप्ताचें वाक्य लाभे[३] :" ।।

## ४७४ तथा पुण्यमहात्मे नामकरण

गोसावीयांसि क्षौर जालें : मग गोसावीं मठाभीतरि बीजें केलें : तवं लुखदेओबा डोइ तीमुनि क्षौर[१] करवीत असति : गोसावीं बाहीरि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा : तुम्हीं काइ क्षौर करवीत असा ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी : कटका देवगीरीसि गेलां होतां : तेथिचे डोहरवणीएं[२] : मोचवणीएं पीयालां : तरि तीर्था जाइजे : मग क्षौर करवीजे : तरि गोसावीयांचां ठाइं सकळ तीर्थें : तरि एथ क्षौर करवीतें[३] जी :" सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "तें कां ?" "ना जी : तें आपुलेया पुण्या :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तरि तुम्हीं पुण्य माहात्मे म्हणां :" ।।

---

**४७३.** १ **मुरा.** °गोसावीयांकारणें वस्त्र घेवों ?" २ **गो.** करवीलें. ३ **भराह.** लागे. **हबो.** °**एबा.** स्नेहाचां ठाइं उचीत स्फुरे.

**४७४.** १ **मुरा.** °करवीलें : भीतरी गोसावीयांपासि गेले : . . . . गोसावीं तेयातें देखीलें : मग म्हणीतलें : "हा हो : माहात्मे जालेति : मां क्षौर करवीलें : सांघा सांघा : क्षौर कां करवीलें ?" ऐसें वेळां दोनिच्यारि म्हणीतलें : (**सोधु** : "हे काइ हो ?" मग कानसुलें दाखवीलें :) तीहीं म्हणीतलें——. २ **गो.** ढोरवणीएं. ३ **भगो.** करीतें. **ह.** करवीतजाए. **बी.** करवीत असे. ४ **मुरा.**. °"बाइ : ऐसेयां नावं काइ ठेवावें ? क्षौर केलेयां माहात्मे जाले :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा ठेवीति तें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं क्षौर केलें : तरि तुम्हीं पुण्य माहात्मे म्हणां :"

## ४७५ संबंधु वंद्य निरूपण*

[[1]हिवरळीए अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : परमेश्वरू आणि परमेश्वराचा संबंध या दोहींची उपासना एकीचि कीं भिन्न असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भिन्न असे : " " जी जी : ते कैसी जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : परमेश्वरु भज्य : संबंधु वंद्य :" "हो कां जी : तरि संबंधु वंद्य तो कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जीया प्रसन्नता परमेश्वरू सकळ जीवातें रक्षिता उद्धरिता होये : सकळ जीवातें एके वेळे आपुलेया प्रतीती दृश्य होए : जैसें मालखांडा श्रीकृष्णचक्रवर्ती सकळ लोकीं देखीलें : आणि जिया प्रसन्नता परमेश्वरू सर्व देवताचक्राचा सोधक : बोधक : द्रावक : प्रकासक होये : म्हणौनि : प्रसन्नता ऐसा एकु धर्मु परमेश्वरींचि आति : जेथ जेथ प्रसन्नता स्फुरे तो संबंधु व्यक्त : व्यक्ते संबंधीं अव्यक्त प्रसन्नता परमेश्वरू निक्षेपिती : मग आपुला संबंधु देति : म्हणौनि संबंधु वंद्य :" " हो कां जी : "।।]

## ४७६ काचराळां तीकवनाएकाचा उपाहारू स्वीकारू

तीकवनाएकें गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं वीहरणासि काचराळेयाकडे बीजें केलें[1] : तवं तीकवनाएकु मढासि उपाहारू घेउनि आले : सरिसा पुतु होता : गोसावीयांतें पुसिलें : "गोसावीं कवणीकडे बीजें केलें असे ?" तीहीं म्हणीतलें : "गोसावीं काचराळेयासि बीजें केलें :" *ते अनसारिखे जाले : आणि*[2] तीकवनाएकें म्हणीतलें : "माहात्मेयातें काइ लटिकें बोलिजे ?" तैसाचि उपाहारू काचराळेयासि घेउनि आले : गोसावीयांसि *तपोवनीचां देउळीं*[2] चौकीं आसन असे : गोसावीयांतें देखिलें : आणि म्हणीतलें : "माहात्मेयांतें काइ लटिकें बोलिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ नाएको : श्रमलेति ?" "जी जी : अवघा श्रमु गेला : थोर श्रमलां होतां : तो अवघाचि श्रमु गेला :" गोसावीं तेयांचीए डोइएची पांटी उतरिली : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि ताट जालें : भगतिजना पांति जाली : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : पहूडू जाला : मग वीळिचां तीकवनाएकु गावांसि गेले : गोसावीयांसि तेथ वस्ति जाली : *उदीयांचि हिवरळीये बीजें केलें*[2] : ।।

## ४७७ माहादाइसां परीसु दृष्टांत कथन

वाइनाएकु म्हणति : "रूपै वायां गेली :" माहादाइसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी :" वाएनाएकु ऐसें म्हणति : "रूपै वायां गेली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ :

---

**४७५.** *(**प्रव. आमा.** १३६, १३७). १ हिराइ पाठ°.

**४७६.** १ **मु.** (**स्वमति शोध** : °हीवरळीये नैरुत्यें दक्षिणे आश्राइत : करंजाळें गव्हाण : क्रोशा तीचेनि मानें तया उत्तरे वाव्ये आश्राइत तळें : तया नावं काचराळें : तेंचि तपोवन :). २ (**मुरा.**).

तुम्हीं तेयांचेया अवघेया वेव्हारा[1] उपेगा न वचा तरि म्हणति आणि काइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचेनि[2] जें तेयां गोमटें : तें काइ बाइ ते जाणत असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु माहात्मा : तेयांचीए आधारीए परीसु असे : दारीं थीकटेंथीकटें[3] पाणीं पडत असे : ब्राह्मणां एकाचेया घरा वस्ती गेला : बाइला वस्ति पवाडू केला[4] : ओसरीएवरि बैसों घातलें : पाए धूतले : तांबीया भरूनि दीधला : तवं वीळिचांचां वेळीं ब्राह्मणु[5] डोइए[6] वानीएराची पेंडी ऐसा घेउनि आला : आंगणीं घातली : बाइ : तीएं दुबळीं ब्राह्मणें : तेयातें गाए एकि दुभे : गाए दूहिली : ढासुलें[7] रांधिलें : लोणीयाचा कवडा होता : तो कीडकीडवीला[8] : दोघांइं जेउं वाढिलें : सुकलीं ऐसीं पानें : घोंटी ऐसी फोडि होती : तांबोळ दीधलें : तुटकी ऐसी बाज होती : तीएवरि वाकळ आंथुरिली : तेथ नीजैला : पाए धूतले : लोणीएं पाए चोपडिले : एतुकेनि तो आभारैला : तेणें म्हणीतलें : 'तुमतें[9] जेतुकीं लोखंडें असति तेतुकींहीं माझीए बाजेखालि ठेवा :' लोखंडें बाजेखालि ठेविलीं : पासु : फाळु : तुता : कुऱ्हाडि : इळा : मध्याने एकी रात्रीं तो माहात्मा उठिला : आवघेयासि परीसु लाविला : आपण नीगौनि गेला : पाहातपटीचि[10] तो ब्राह्मणु उठिला : लोखंडें घेउनि सेतासि गेला : वखरूं जुंतला : तवं पासु वांकली : तुतेंनकरूनि माती[11] फेडुं बैसला : तवं तुता वांकला : मग नागरू जुंतला : तवं फाळु वांकला : कुऱ्हाडी पालवीया फेडूं[12] बैसला तवं कुऱ्हाडि वांकली : इळा[13] लाउं बैसला : तवं इळा वांकला : *ऐसा नीधावला*[14] : मग म्हणीतलें : 'कैसें माहातुमेनि आमसीं[15] कुजांतर[16] केलें : *माझीं आवघीं आउतें नासीलीं*[17] : माझेया कुटुंबाचां मुळीं इळा घातला[18] : माझा[19] एककु दीहाडा[20] सोनेयाचा जातु आहे :' ऐसें म्हणौनि बांधौनि घेउनि आला : आंगणीं दडैकरी घातलीं : मग म्हणीतलें : 'पापीणी पापीणी : कवणासि बीढार देओं बैसलीसि ? माहात्मेनि आमसीं कुजांत्र केलें : माझेया कुटुंबाचां मुळीं इळा घातला : माझा[19] एकु येकु दीहाडा[20] सोनेयांचा जातुए :' तवं नावेक वीवळलें : तवं खपटी[21] एकि उचडली होती : तीया झळझळीत देखिली : मग साउमी आली : मग तीया म्हणीतलें : 'तुमचेया कुटुंबाचां मुळीं इळा घातला कीं तुमचेया दळीद्राचां मुळीं इळा घातला ?' ऐसें म्हणौनि भीतरि घेउनि गेली :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : परीसीं लोहो लाविजे : तेणेंकरूनि गंधि काळिमा*

---

**४७७.** १ **हबी.** वीखएवेव्हारा. २ **एवा.** एथौनि. ३ **भ.** तीटतेंतीटतें. **गो.** थीगीटेंथीगीटें. **हबी.** थुइथुइ. ४ **गो.** °ओटा झाडीला : पाटू बैसों घातला. ५ **हबी.** तो घरिचा धनी. ६ **गोहबी.** खांदीं. ७ **भ.** ढांचलें. **हबी.** राळेयाचें ढासलें. (**बी.** ढाचलें). ८ **गोबी.** कढवीला. ९ **अभ.** तुमचां घरीं. १० **गोबी.** पाहानपटी. ११ **गोबी.** ओसान. १२ **गो.** तोडुं. १३ **गोहबी.** इळेनकरूनु गवत घेओं बैसला. १४ (**हबी.**). १५ **हबी.** माझेया लोखंडासी. १६ **गो.** कौटाळ. १७ (**गो.**). १८ **हबी.** °घातवाफ गेली : तोंडा घासु आला. १९ **गो.** माझी एकीएकी घडी सोनेयाची जाति असे. २० **भ.** देहाडा. २१ **अ.** खपरी उपटी.

*कठिणपण जाए : तेंज वर्ण ए : मग कनक ऐसें नावं होए : परि आणिकातें वेधी हें नैये[२२]: तैसीं बाइ : तुमचेंनि तेयां जालें तें ते काइ जाणत असति[२३]?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : परमेश्वरपरायणाचेनि संबंधें सुख : श्रेय : ज्ञान : इयें तीन्हीं होति[२४] :"* ॥

## ४७८ एल्हाइ मठावरि वाणें

माहादाइसें गोसावीयांचेया दरीसनासि नीगालीं : एल्हाइसीं म्हणीतलें : "आइ: राहा हो : मीं गोसावीयांचेया दरीसनासि एइन :" माहादाइसें राहिलीं : तीएं परवंटें साउलें नेसलीं होतीं : *तें उजू नेसली*[१] *:* माहादाइसीं पुसिलें : "हां एल्हो : तूं ऐसी कवणालागि वेठतासि[२]?" "मीं श्रीचांगदेओराउळां गोसावीयांलागि वेठत[३] असें :" माहादाइसें तोखलीं : सुख जालें : उचलीलीं : आळंगीलीं[४] : मग गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : गोसावीं मठावरि भगतिजनासहीत बीजें केलें : *पाठिलाकडुनि महदाइसें वोळघलीं*[५] : एल्हाइसें भवतीं भवति : "जी जी : मीं वरि एइन[६]:" इतुकेनि गोसावीं फुटेयाचा पदरू घातला : दसीया काहीं हातीं लागलीया : काहीं न लगतीचि : आणि गोसावीं फुटा वरि केला : तैसींचि वरि आलीं : आणि माहादाइसांसि आश्चर्यें[७] जालें : "हें काइ जी : काहीं दसीया आंगुळीयां[८] लागलीया : काहीं नाहीं : आणि कैसी जी वरिं आली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आर्तिकरूनि धरिली एथिची दसीचि पुरे :" ॥

## ४७९ भटांकरवि क्षौर करवणें

गोसावी भटांकरवि पुर्वि क्षौर करवीत होते : भटोबास तेधवां क्षौर न करितीचि : एकु दीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : गोसावीयांचां श्रीकंठीं उ डसली होती : गोसावीं श्रीकरें उ ऐसी दाखवीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा : कें बीढार घेतलें असे[१] : एथ सकेसीयांचा उपद्रो असे :" तें भटोबासां उमटेचि ना : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : क्षौर करा गा :" भट उगेचि होते : मग गोसावी उभे ठाकले : दोहीं श्रीकरीचीया वाहीया वरतीया केलीया : गोसावीं मानेवरि श्रीचरणु ठेविला : श्रीकरें वेणी धरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा गा सूरू[२] : आतां तुझा कवणु राखैल[३]?" भटीं

---

२२ (**दृपा.** ११०. परीसाचा दृष्टांत. 'महदाइसांप्रति हीवरळीये निरूपिला'—**दृस्थ.**). २३ (**हबी.**). २४ (**प्रव. आमा.** १२०).

**४७८.** १ (**पंगो.**). २ **गो.** नेसतासि. ३ **गो.** नेसत. ४ **अ.** आवळीली. ५ (**मुरा.**). **हबी.** °एल्हाइ नावेक आंगें स्थुळ होती म्हणौनि तेयांसि न वेंघवेंचि. ६ **मुरा.** °मग गोसावी पूर्वीली सेवटीहुनि पश्चिम कोनटावेन्हीं बीजें केलें : येल्हाइसें तो शब्द म्हणतें चालौनि कोनटावेन्हीं गेलीं : तेथ गोसावीं फुटेयाचा पालौ घातला—. ७ **गो.** आहाचर्य. ८ **अ.** नखीं. **हबी.** हातीं.

**४७९.** १ **मुरा.** °भटोबासीं म्हणीतलें : "जी जी :" गोसावीयांचा हेतु भटां नुमटेचि : मग गोसावीं ते उ वस्त्रीं घालुनि सांडवीली : २ **अपं.** वस्त्रा. ३ **हबी.** °भटीं म्हणीतलें : "जी जी : माझा श्रीचक्रधरू राखैल :" आणि सोडीले : भटीं म्हणीतलें : "जी जी : मी क्षौर करीन—.

म्हणीतलें : "जी जी : क्षौर करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां असों देया : तुम्हां परमेस्वरपुरा जावें असे : तेथौनि या : मग क्षौर करा :" ।।

## ४८० माहादाइसीं माहात्मेयां दीवाळी सणु करवणें

माहादाइसीं वीनवीलें : "जी जी : मी गोसावीयांचां ठाइं दीवाळी सणु करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मेयांसहीतु करा : तुमतें असे तें तुम्हीं करा : न पुरे तें बाइसांतें मागा :" "हो कां जी :" मग सांजवळे[१] माहादाइसीं पाणीयांची[२] सामग्री केली : चीकसा : तेल : उमाइसांचां घरूनि आणिला : मग प्रातकाळीं[३] गोसावीयांसि उपहूडू जाला : गोसावीयांसि आसन रचिलें : भगतिजनां पाट पासवडिले : जोन्हळेयांचा[४] चौकु भरिला : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : भगतिजन गोसावीयांसेजे बैसले : माहादाइसीं गोसावीयांसि ओवाळणी केली : भगतिजन ओवाळिलें : गोसावीयांसि वीडा ओळगविला : भगतिजनासि तांबोळें दीधलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "तांबोळ घेया गा :" मग गोसावीं माहादाइसांसि तांबोळ दीधलें : गोसावीयांसि मर्दना दीधली : उरलेया चीकसेयाआंतु आणीकु चीकसा घातला : तो भगतिजनांसि दीधला : भगतिजनीं एकमेकांचीं आंगें उटिलीं : गोसावीयांचां श्रीमुगुटीं तेल ओळगविलें : उरलें तेल : तेया आंतु आणीक तेल घातलें : ऐसें भगतिजनासि दीधलें : एकमेकांचे माथे माखिले : मग गोसावीयांसि सोंडीएवरि आसन जालें : श्रीमुगुटीं भोगी ओळगविली : श्रीमुगुटिचेया पीळयाआंतु आणीक भोगी घातली : ऐसी भगतिजनासि दीधली : भगतिजनांचे माथे माखिले : मग गोसावीयांसि मादणें जालें : माहादाइसें गाडु ढाळीति : बाइसें श्रीमुगुटु चोखीति : श्रीमुर्ति प्रक्षाळीति : भगतिजन सोंडिएतळि रीगौनि[५] गोसावीयांचेनि उदकें न्हाले : सेवटीं श्रीमुगुटावरि गाडु ढाळीति : गोसावी श्रीकर दोन्हीं श्रीमुगुटावरि ठेवीति : दोहीं कोंपरिचेंनि पाणीएं भगतिजन न्हाति : ऐसें गोसावीयांसि मादणें जालें : मागौतें गोसावीं वहुतें पाणिएं न्हाणवीलें : भगतिजन : मग माहादाइसीं आक्षेवाणें आणिलें : गोसावीयांसि ओवाळिलें : मग गोसावीं वस्त्रें वेढिलीं : आसनीं उपवीष्ट जाले : चंदनाचा आडा रेखिला : मग गोसावीयांसि ओवाळणी जाली : भगतिजन ओवाळिले : मग दीसु निगाला : बाइसीं आपुला नीमस्तु[६] पुजाअवस्वरू केला : मग गोसावीं वीहरणासि बीजें केलें[७] : माहादाइसीं उपाहारु नीफजविला : गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि ताट जालें : भगतिजनांसि ठाए जाले : मग माहादाइसीं ओवाळिलें : गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजनासि जेवणें

---

**४८०.** १ **भ.** सांजवेळे. २ **पं.** °भरोवरि सामग्री—. ३ **मुरा.** थोरे पाहानपटीं. ४ **गो.** जोन्हळेयाची सेस भरीली. ५ **भ.** रीगरीगों. ६ **गो.** नेमस्तु. ७ **हबी.** °सीधनाथाचेया देउळासि : चौकीं आसन जालें : भक्ताप्रति निरूपण केलें : तवं माहादाइसीं—.

जालीं : गुळुळा वीडा जाला : ऐसा गोसावीयांसि भगतिजनासहीतु दीवाळी सणु जाला :।।

## ४८१ भट : माहादाइसें रीधपुरा पाठवणें

बीजेचां दीसीं माहादाइसें : हंसराजु : भटोबास : देव : रीधपुरासि पाठवीलीं : गोसावीं माहादाइसां आणि हंसराजा सांघातु लाविला : माहादाइसांसि वीधि वीहीला : "माहातुमेयां सांघातें यावें नाहीं : माहातुमेयां सांघातें जावें नाहीं[१] : भीतरि नीद्रा न करावी : श्रीप्रभूची प्रवृति न भंगावी :" तैसींचि माहादाइसें बाहीरि नीगालीं : गोसावीं हंसराजातें बोलावीलें : "हंसराजा या :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एं एथिचेया प्रवृति[२] एकत्र उठिती : बैसती : झणें काहीं आनौनि[३] आन घेया[४] हो : या सकरडीया गाइ असति :" माहादाइसें आपुलां जीवीं म्हणों लागलीं : "गोसावी काहीं वीसेख नीरोपु हंसराजा देत असति :" तैसीचि हंसराजु आलीं : दूख करूं लागलीं : माहादाइसीं पुसिलें : "हांसाइसें : गोसावीं काइ नीरोपु दीधला?" "काइसा नीरोपु आइ? माझी प्रकृति दोखजरूप[५] : म्हणौनि गोसावीं तुमचा परीहारु दीधला :" सर्वज्ञें म्हणीतलें तें अवघें सांघीतलें : मग भटां आणि माहादाइसां बहुत सूख[६] जालें : "गोसावीयांसि आमची कणव असे :" हा निरोपु गोसावी अनुवर्जीत नीगाले तेथ दीधला :।।

## ४८२ माहादाइसावस्त्राची आंगी भटां देणें

गोसावीं माहादाइसांतें म्हणीतलें : "हें तुमचें वस्त्र सा मासु पांगुरलें : मग आंगी सीवली : आंगी लेइलें : आतां हे आंगी वानरेसा दीजो[१]?" मग माहादाइसीं म्हणीतलें : "दीजो कां : जी :" माहादाइसां सुख जालें : मग गोसावीं भटोबासांसि आंगी दीधली : मग रीधपुरा नीगाले :।।

## ४८३ एल्हाइ भाउबीज करणें

माहादाइसें[१] : भट : रीधपुरासि नीगालीं : गोसावी तेयांतें अनुवर्जीत नीगाले : गोसावीं बाइसांकरवि ग्रामांतराची आइति करवीली : गोसावीयांतें अवघीं राहाउं लागलीं : गोसावी कोण्हाचेनहीं न ऱ्हातिचि : गोसावीयांसि बीजें करावेयाची प्रवृति :

---

**४८१.** १ **पं.** °उठावें ना : बैसावें ना. २ **पं.** प्रीती. ३ **पं.** आने आन. ४ **एवा.** घेयाल. ५ **पंगो.** सदोख. ६ **अ.** खंति जाली.

**४८२.** १ **एवा.** देवों.

**४८३.** १ **मुरा.** येल्हाइसें माहादाइसातें बोळउनी आलीं : गोसावीयांसि गावां नीगावेयाची प्रवृत्ति : गोसावीं बाइसांकरवि आइती करवीली : गोसावीयातें आवघीं राहावीतें होतीं : परि गोसावीयांसि नीगावेयाची प्रवृति : माहादाइसीं येल्हाइसातें म्हणीतलें होतें : "येल्हो : तुं गोसावीयांतें राहावीजसु :"



मग माहादाइसीं एल्हाइसांतें म्हणीतलें : "एल्हो : तुं गोसावीयांतें राहावि : ऐसें म्हण : 'जी जी : मीं गोसावीयांचां ठाइं भाउबीज करीन :'" मग तीएं गोसावीयांपासि आलीं : फूटेयासि पीळा घातला[२]: "जी जी : आजि गोसावीं राहावें : मीं गोसावीयांचां ठाइं भाउबीज करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें काइ असे ?" "मातें च्यारि दाम असति : तेयाचे मीं गोसावीयांलागौनि लाडु करीन :" गोसावीं तेयांची वीनवणी स्वीकरिली : मग माहादाइसें : भट : प्रमेस्वरपुरासि नीगालीं : ।।

मग गोसावीं तेयांसि वीधि वीहिला : "आपणचि गहुं दळावे : आपणचि सोजी काढावी : आपणचि सेव वळावी : आपणचि सेव तळावी : आपणचि लाडु बांधावे : दाखौं[३] लाभे : परि करूं न लभे :" "हो कां जी :" म्हणौनि तेहीं मानिलें : जें जें करीति तें तें दाखवीतें[४] जाति : तैसे लाडु बांधले : दूरडीए घालुनि : पालवें झांकुनि : घेउनि आलीं : गोसावीयांपुढें दूरडी ठेविली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग बाइसीं हात पाहिलें : तवं दोन्ही हात[५] कुंकुऐसे जाले असति : बाइसीं म्हणीतलें : "बाबा बाबा : बटिकीचे दोन्ही हात कुंकुऐसे जाले असति :" गोसावीं तेयांचेया हातावरि श्रीमुखिची पीक घातली : तेयांकरवि दोन्ही हात मसवीले[६] : इतुकेनि जाळु नीवरतला : हींवं ऐसे जाले : *मग ते लाडु गोसावीं आपुलेया वीनयोगा नेले*[७] : ।।

## ४८४ स्थानपरा देवता कथन

[१]गोसावीं हींवरळीएहुनि तीजेचां दीसीं बीजें केलें : भाटपुरीये मार्गीं वीहीरीपुर्वे गोसावी उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथील देवता इए स्थानिची गा[२] :" ।।

---

मग येल्हाइसीं गोसावीयांतें वीनवीलें—. २ **भ.** घेतला. ३ **भ.** दाउं. **मुबी.** पुसों. ४ **भ.** दावीतें. ५ **मुरा.** °फोडीं भरले असति : ६ **मुराभ.** घासवीले. **गो.** चोळवीले. ७ (**मुरा.**).

**४८४.** १ **मुरा.** काचराळीया मार्गीं बारव असे : तेथ करंजखेडीची देवता आली होती : गोसावी तीये वीहीरीपुर्वे उभे राहीले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तीये स्थानीची देवता एथें आलीया : ते एथे असे :" २ या लीळेपूर्वी **भ.** प्रतीत "हींसेनीमीत्यें बीजें करणें :" ही लीळा आलेली आहे. ती अन्य कोणत्याच प्रतीत नसल्यामुळे प्रक्षिप्त असावी असे वाटते. 'लीळाचरित्रा' च्या काही पोथ्यांत, मूळ चरित्रात नव्हे, तर शेवटी काही पानांवर स्वतंत्रपणे सुटी लिहिलेली आढळते. त्यावरून ती प्रक्षिप्त असावी हा समज दृढ होतो. ही लीळा पुढीलप्रमाणे :

**हींसेनीमीत्यें बीजें करणें**

यकू दीसू गोसावीयांसि पश्चात पाहारीं उपहूडू जाला : मग म्हणीतलें : "**बाइ :** आजि या नगराबाहीर बीजें कीजैल :" बाइसीं म्हणीतलें : "तें कां बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "**बाइ :** आजि खांडे माहानांवि : नगरामध्यें घरोघरीं हींसा वर्त्तैल : हींसा वर्ते तैसां स्थानीं महात्मेयां असों न ये : देवता नगरामध्यें वीचरों न ल्हाति जवं हें नगरामध्यें असैल :" बाइसीं म्हणीतलें : "तें कां बाबा?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : रात्रीं यथ देवतांची वीनंती आली होती :" मग यथौनि

## ४८५ मार्गी वेधें भारद्वाजा गमन

तेथौनि गोसावीं बीजें केलें : खवणापुरिए उतरमार्गीं कांटिएंतळि आसन जालें : बाइसें आणि नाथोवा भीक्षेसि पाठवीलीं : गोसावीयांजवळि लुखदेओबा होते : बाइसें आणि नाथोबा भीक्षा करुनि आलीं : दृष्टभूत[१] झोळीया केलीया : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

भारद्वाजु[२] गोसावीयांपुढां बैसला होता : गोसावीं बीजें केलें : आणि उडौनि पुढां बैसला : सर्वज्ञें म्हणीतलें : "पुण्य माहात्मे हो : हें पाखिरूं[३] कवणी ठाउनि एत असे : ऐसें तुम्हीं जाणत असां ?" "जी जी[४] : जेथ गोसावीयांसि आसन तेथौनि एत असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाखिरूवें तरि पाखिरूवें : गोरूवें तरि गोरूवें : माणुसें तरि माणुसें : यातें देखति आणि पाठिसी येओंचि लागति : हें काइ पां ?" तेया उपरि ते उगेचि होते : *सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : आतां जा :" आणि नीगौनि गेले*[५] : ।।

---

म्हणीतलें : "तुम्हीं नगरांतु या : हें बाहीरि जाइल :" यावरि यकांकिची लीळा सांघीतली : घोडाचूडि सीक्षांची : मग म्हणीतलें : "बाइ : मात्रा करा :" मग बाइसीं मात्रा केली : वीसदेवो घेतला : मग गोसावी गावांपसीमे चौवारी नांवं वीहीरि : तेथ बीजें केलें : वरिली रवणिवरि उभे राहीले : बाइसीं आंतुली रवणिवरि आसन घातलें : गोसावीं आसनीं उपविष्ट जाले : तवं वीहीरि-आंतुनि देवता नीगालीया : गोसावीयांपासि आलीया : श्रीचरणां लागलीया : माथाचां केसीं श्रीचरण झाडिले : गोसावीयांसि अनोज्ञा मागीतली : मग नगरांतु गेलीया : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा गजंबू काइसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : देवतांचा :" "हां बाबा : तरि काहीं देखीजति नां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीया आपणेयांतें देखों नेदीति कीं : " मग बाइसीं वीसदेवो पेटवीला : उष्णोदक तावीलें : गोसावीयांसि गुळुळा जाला : बाइसीं श्रीचरणप्रक्षाळण केलें : उर्धपुंड्र टीळा केला : पूजा केली : धुपार्ती मंगळार्ती जाली : फोडि वोळगवीलीया : वीडिया करूनि दीधलीया : तवं तीकवनायकू आले : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांसि उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : दों पाहारां उपाहारू घेउनि आले : बाइसीं पूजा-अवस्वराची आइति केली : तीकवनायकें पूजाअवस्वरू केला : धुपार्ती मंगळार्ती जाली : मग गोसावीयांसि ताट केलें : भक्तिजनां ठाय केले : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : सकर्पूर वीडा वोळगवीला : मग गोसावीं तेयांसि पाठवणी दीधली : तीकवनायकू भाजनें घेउनि नीगाले : मग गोसावीं नीश्चळ आसन स्वीकरीलें : भक्तिजनें नीश्चळें बैसलीं : दीसू माळवेतवं गोसावी तेथ होते : मग वीळचां वेळीं वीहीरीदक्षीणे परश्रयासि बीजें केलें : परश्रयो सारीला : उदका विनयोगु करूनि मग म्हणीतलें : "बाइ : आतां चाला : देवतांचा भोगसमयो जाला :" मग नगरांतु बीजें करीताति तवं तीया वीहीरीचीया देवता नगरांतु आलीया : वेसिदारीं भेटि जाली : श्रीचरणां लागलीया : माथाचां केसीं श्रीचरण झाडिले : मग तीया गेलीया : मग गोसावीं राजमढासि बीजें केलें : रात्रीचा पूजाअवस्वरू जाला : व्याळी जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावी वेढे करूं लागले : तवं बाइसीं सयनासन रचिलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : नावेक नीरूपण जालें : मग पहूडू स्वीकरीला : ।।

**४८५.** १ **गोभमुरा.** दृष्टपूता. २ **मुरा.** °कांटियेवरि. **एवा.** °मार्गीं. ३ **मुरा.** °कवणीए ठाइंचे ऐसें तुम्हीं जाणां ?" ४ **मुरा.** °तीए कांटीएचें. ५ (**हबी.**).

## ४८६ भाटापुरीए वस्ति ।। लुखदेओबा : नाथोबा भिक्षे पाठवणें

तेथौनि गोसावीं भाटापुरीए बीजें केलें : माहालक्षुमीएचां देउळीं आसन जालें : तेथौनि गोसावीं लुखदेओबा आणि नाथोवा भीक्षेसि पाठवीले : सर्वज्ञें म्हणीतलें : "पुण्यमाहात्मे हो : भीक्षा घेओं जाणिजे हो :" ते भीक्षेसि गेले : भीक्षा करूनि आले : दृष्टभूता[1] झोळीया केलीया : *नाथोबाएं अवघें वेगळें वेगळें घेतलें होतें*[2] : सर्वज्ञें म्हणीतलें : "पुण्यमाहात्मे हो : भीक्षा घेओं नेणाचि :" मग वाइसीं पुजा केली : मग वाइसीं पदार्थ नीवडिले : वीळिचांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि आरोगण जाली : मग गोसावीयांसि सारंगधरिं वस्ति जाली : पहुडु जाला : ।।

## ४८७ मनोर्थज्ञानें लुखदेओबा पाठवणी

तेथौनि गोसावीं पस्यातपाहारीं बीजें केलें : गावां दखिणे मळा : तेथ धावां आसन जालें : लुखदेओबाएं रात्रीं मनोर्थू केला : "वहूत दीस लागले : गावां जावें : तेयां काहीं वरो घालावी : निश्चेंतै[1] करावी : मग यावें :" गोसावीयांसि धावां आसन असें : दंतध्वन[2] करीत असति : एकि श्रीकरीं सीळीक घेतली : मग म्हणीतलें : "काइ पुण्यमाहात्मे हो : काइ कुटंबचींता वर्तत असे?" तेहीं म्हणीतलें : "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वहूत दीस लागले ना?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "गावां जावें : वरो घालावी : निश्चेंतै करावी : मग यावें?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि ऐसें कीजे :" मग गोसावीयांसि गुळुळा जाला : पुजाअवस्वरू जाला : मग तेहीं दंडवत घातले : श्रीचरणां लागले : मग नीगाले : ।।

## ४८८ एरमलीं आसन

मग तेथौनि गोसावीं बीजें केलें : एरमलीं[1] आसन[2] जालें : ।।

## ४८९ ढांकेफळीं वस्ति जाली ।।

## ४९० अनअनोज्ञात मंडळीका जाणें

तेथौनि गोसावीं बीजें केलें : मार्गीं *माणीकदंडा आरुतें*[1] नाथोवाएं म्हणीतलें : "वाइ : घेया पोतें : मीं जाइन :" वाइसीं म्हणीतलें : "हें काइ नाथो : कैसा जासी? एथ वावा

---

**४८६.** १ **मुराहबीभगो.** दृष्टपूता. २ (**शोध.**).

**४८७.** १ **गो.** नीश्चींती. **भ.** नीश्चंतै. **पंरा.** नीचैंती. २ **गो.** °धवन. **पंभमुरा.** °धावन.

**४८८.** १ **मुरा.** अहीरमलीं. २ **मुरा.** वस्ति जाली.

**४९०.** १ (**मु.**).

एकला : मीं एकली : कैसा जासी? *कोण्ही भगतजन एवों दे : मग जाए*[2] *:* " इतुकेया एका गेले : आणि मागुतें ते म्हणति : "बाइ : घेया पोतें : मीं जाइन[3] :" बाइसीं म्हणीतलें : "हें काइ नाथो : कैसा जासी? एथ बाबा एकला : मी एकली : ऐसा कैसा जासी?" मागुतें तेहीं म्हणीतलें : "बाइ : पोतें घेया : मी जाइन :" बाइसीं म्हणीतलें : " बाबा : नाथोतें काहीं म्हणीजो ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा मंडळीका : बाइसें म्हणतें असति तें कां करा ना? " ते उगेचि होते : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : माहात्मेयां नीरोधु न कीजे कीं : बाइ : *पडाळीं गाए बांधली असे : तीयवारि गळे : चरों जाए तवं तोंडा चीखलु ए : बुडि पाइं कीवीं कोरीति : पावो झाडी तरि मागां खांबीं लागे : झडेंवारेन पीटे : ऐसें घरिंचा गोसावी देखौनि म्हणे : 'बापुडी गाए पीडिली :' म्हणौनि माळवधाचां खांबीं बांधे : खडु घाली : खडु चरे : पाणी पाजी : कांटाळा सांडी : मग रीगतेयानीगतेयातें देखौनि बुजे : तो म्हणे : 'सोडा : एऱ्हवीं माळवधाचा खांबु पाडील :' म्हणौनि सोडी : ते माघौती जाउनि तयांतुचि रीगे*[4] : तैसें बाइ : यांसि जें उठिलें[5] : असें तें यांतें नेलयावांचौनी न सोडी :" तैसेंचि तेहीं पोतें : जाडी : सागळ : मार्गीं ठेविलें : आणि जावों लागले : बाइसीं जाडीं : सागळ : पोतें घेतलें : पुडवाटुवा घेतला[6] : ।।

## ४९१ मार्गीं माणीकदंडीं आसन

गोसावीयांसि माणीकदंडीं[1] आसन जालें : बाइसीं चरणक्षाळण केलें : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

---

२ (**पंहबी.**). ३ **मुरा.** सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बटिका काइ म्हणतु असे?" "बाबा गावां जाइन म्हणतु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा मंडळीका—. ४ (**दृपा.** ४९. पडाळीए गाइचा दृष्टांत ' नाथोबावरी माणिकदंडीं निरूपिला.'—**दृस्थ.**). ५ **मुरा.** उपनलें. **पंहबी.** भरलें. ६ **पं.** °यावरि गोसावी धर्मदर्पहरणाची गोष्टी सांघीतली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : धर्मासि ऐसा गर्वू होता जें सेवकुही मींचि : भगतुही मींचि : ऐसें होतें :" मग एकु दीसू श्रीकृष्णें म्हणीतलें : "धर्मा : चाला वैहाळिएसि जाओं :" तेहीं म्हणीतलें : "हो कां जी :" मग दोघै एकलेयांचि बीजें केलें : मार्गिं ब्रीजें करीती तवं धर्मासि ऐसें जालें : 'या श्रीकृष्णासि वोखटें कीजे : हा मुगुटु आपुलीए माथां घालिजे : हा ब्रीदाचा तोडरू आपुलां पाइं घालीजे :' ऐसें आवांकीतु जातातिः मग ते भुमीका सांडीली : आणि आड पडले : 'पापिया पापिया जी :' श्रीकृष्णें म्हणीतलें : 'काइ जालें धर्मा ? ' तेहीं म्हणीतलें : 'या श्रीकृष्णासि वोखटें कीजे : मग हा श्रीमुगुटु आपुलीए माथां घालीजे : हा ब्रीदाचा तोडरू आपुलीए पाइं घालीजे : ऐसें मज जालें जी :' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'धर्मा : ऐसीया एकी भुमीका आहाति गा : राजसा : तामसा : सात्त्वीका असति :' मग तेयांसि गर्वु होता तो गेला :" (**पं.** प्रत श्रीच. लीळा ४०) या लीळेच्या शेवटीं : 'नाथोबाएं पोतें सांडिलें याउपरि गोसावी हे लीळा सांघीतली :' असे म्हटले आहे. ही लीळा श्रीकृष्णचरित्राच्या अधिकृत ४६ लीळांच्या बाहेरची असल्यामुळे संहितेत न स्वीकारता तळटीपेत दिली आहे.

**४९१.** १ **मुरा.** °पींपळातळीं. नावेक°. **हीराइसें.** °सेतात कांटीएतळीं नावेक°.

## ४९२ वाएनाएका भेटि

वाएनाएकु सकुटंबी रावंसगावां नीगाले : कामाइसां आठांगुळें : म्हणौनि उजु वाटा गाडा नेला[१] : ते आपुले कामत पडिताळीत एत होते : तवं तेथ[२] गोसावी आसनीं असति : देखिलें : आले : आणि गोसावीयांतें दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग म्हणीतलें : "हें काइ जी : गोसावी एकलेचि? गोसावीयांजवळि कोण्हीं भगतिजन नाहीं?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा न्हवे आतांचि मंडळीकु नीगाला :" मग वाएनाएकें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : रावंसगावो बरवा : तेथ बरवें सीधनाथाचें देउळ असे : तरि तेंथें बीजें करावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ पुर्वदृष्ट असे :" "जी जी : तरि गोसावी कवणीकडे बीजें करिती?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें तपोवना : नींबगावांसि जाइल :" मग तेहीं वीनवीलें : "जी जी : गोसावीं रावंसगावांसि बीजें करावें : माझेया कुटुंबासि दरीसन देआवें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : ।।

## ४९३ रावंसगावीं सीधनाथीं : संगमेस्वरीं वस्ति ।। आबाइसां : उमाइसां भेटि

मग वाएनाएकें जाडि : पुडवाटुवा : सागळ : पोतें : ऐसें घेतलें : गोसावी गजगती बीजें करीति : वाएनाएकु मागां टाकीत एति : बाइसें मागां राहिलीं : गोसावीं संगमे-स्वरासि बीजें केलें : वाएनाएकें ओटेयावरि जाडिचें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : वाएनाएकु गोसावीयांपुढां पाए मोडुनि[१] खालि बैसले असति[२] : तवं आबाइसें[३] वाति लावावेया आलीं : वाति लाउनि गेलीं : मग उमाइसांपुढां सांघों लागलीं : "उमै : उमै : या वाएनाएकासि काइ जालें? बाइलि एकि आणिली असे : ते ओटेयावरि बैसवीली असे : आपण खालि बैसला असे : म्हांतारेपणौनि[४] याचें न पारूखे :" ऐसें सांघौनि आबाइसें आंगणीं उभीं असति : तवं बाइसें आलीं आणि मागीलीकडौनि तेयांचे डोळे झांकिले : आबाइसीं म्हणीतलें : "हें काइ पां : एथ मासीं रळी करी ऐसें[५] कोण्हीं नाहीं :" ऐसें म्हणौनि बाइसांचे हात परवंसिले : तवं बाइसांचीया आंगुळीया[६] हात ओळखिले : मग म्हणीतलें : *"हात तरी बाइसांचे*[७] *:* हें कोण? बाइ?" आणि बाइसीं हात सोडिले : मग आबाइसीं म्हणीतलें : "हें काइ बाइ : तुम्हीं आलीति : तरि गोसावी कें[८]?" बाइसीं म्हणीतलें : "हा नव्हे बाबा : एथ आसनीं असे :" तैसीचि आबाइसें दूख करूं लागलीं : मग उमाइसांपुढां सांघीतलें : तेयांतें आधिली दीसीं जइंती

---

**४९२.** १ **अ.** गेला. **पं.** लावीला. **हबी.** नीगाला. २ **मुरा.** °गोसावीयांतें पींपळातळीं बैसलेयां देखीलें.

**४९३.** १ **मुरा.** घुंगट घालुनि. २ **मुरा.** °तवं बाइसें आलीं : मागौती बाइसें दारा गेलीं : तवं आबाइसें—. ३ **मु.** वीसदेयालागि. ४ **पंगो.** म्हांतारे जाले : परि—. **हबी.** म्हांतारपण जालें परि—. ५ **पं.** °कोण असे पां? ६ **पंहबी.** °सरळीया. ७ (**हबी.**). ८ **अ.** काइ.

जाली होती : पानें पोफळें घेउनि गोसावीयांचेया दर्सनासि आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीं आबाइसांतें म्हणीतलें : "हें काइ बाइ : तुम्हीं म्हणा यातें समुद्राचां प्रांतीं ओळखौनि : तरि मुडूपें मुडूप झगटुनि गेलींति तरि यातें नोळखाचि ?" मा तेहीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी ओळखविती तरिचि ओळखीजेती :" यावरि गोसावीं तैल्यकारयुग्मा स्तीति : हे गोष्टि सांघीतली[९] : मग आबाइसीं गोसावीयांचे श्रीचरणक्षाळण केलें : चरणउदक आबाइसीं घेतलें : उमाइसें घेओं बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं मासउपवासीए : तूम्हां अगळी उदक घेऔ नैए :" मग तेहीं आपुलीए घागरिचें गाळिलें उदक आणिलें : तेणें चरणक्षाळण केलें : मग तेहीं चरणोदक घेतलें : उरलें तें तेहीं आपुलीए केळीए घातलें : मग गोसावीं गुंफेसि बीजें केलें :।।

## ४९४ गुंफे आरोगण

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग आबाइसीं गोसावीयांलागि उपाहारू करावेयालागि तांदूळ काढिले[१] : तवं वाएनाएकें म्हणीतलें : "आबै : मीयां गोसावीयांतें आधींचि उपाहारालागि वीनवीलें असे :" मग वाएनाएकु उपाहारू घेउनि आले : वाएनाएका हातीं ताट : जावाया हातीं तुपाची वाटी[२] : तो दारवठां उभा राहिला वाएनाएकु ताट घेउनि आले : गुंफेसि ठेविलें : मग तेयांचीए हातिची वाटी घेउनि आले मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## ४९५ पाहातां मादणें

मग बाइसीं सांजवेळेचि आबाइसांतें म्हणीतलें : "बाबासि बहुत दीस मादणें नाहीं तरि[१] पाणीं ठेवा :" मग आबाइसीं पाणीं ठेविलें : चोखणी केली : गोसावीयांते मादणेयांलागि वीनवीलें[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आतां ना : पाहानपटीं करा :" मग गोसावीयांसि पहुडु जाला : मग मध्यानी एकी रात्रीं उठिलीं : पाणी ठेउं : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : रात्रि वडील असे :" इतुकेनि तीएं नीजैली[३] : मग गोसावी पस्यांत पाहारीं परश्रयासि बीजें केलें : तेहीं वाति लाविली : पाणीं ठेविलें : गोसावी बीजें केलें : गोसावीयांसि ओलणी दीधली : गोसावीयांसि मर्दना जाली : मादणें जालें गोसावीं वस्त्रें वेढिलीं : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तवं वीवळलें :।।

---

९ मागे पूर्वार्ध लीळा. ३४ पाहा.

**४९४.** १ **मुरा.** सडीले. २ **हबी.** °आंबाचा गाडुगा.

**४९५.** १ **मुरा.** °चोखणी पाणीयांची आइती करा : मग आबाइसीं पाणीया डेरा भरिला पाणी ठेविलें—. २ **मुरा.** °पडदणी ओळगउं आदरीली : ३ **मुरा.** °वेळा दोनि उठीली : गोसाव नीराकारिलेंचि : मग पाहातां उठिलीं : वाति लाविली—.

## ४९६ कामाइ अष्टमंगळा नाम करणें

वाएनाएकु सकुटंबी गोसावीयांचेया दरीसनासि आले : सांकड गुंफा : ते एकु पाओ भीतरि : एकु पाओ बाहीरी : ऐसे उभे ठेले : एकाचीए हातीं वीडा देति : ते गोसावीयांसि वीडा दर्सन करीति : वाएनाएकु म्हणति : "जी जी : हा अमुका दंडवत करी :" तो श्रीचरणां लागे : मग तो परता नीगे : *मागुता आणिकाचां हातीं वीडा देति : ते गोसावीयांसि दर्शन करीति : "जी जी : हे अमुके :" ऐसीं आवघींचि आलीं : आणि आवघेयां दर्शन जालें*[1] *:* मग[2] कामाइसें आलीं : तीं गोसावीयांसि वीडा दर्सना केला : दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीं तेयांची श्रीकरें पाठि स्परीसिली : "अष्टमंगळा[3] बाइसें तीएं यें ?" वाएनाएकें म्हणीतलें : "जी जी : *मज दर्शन जालें तरि यां अवघेयां होआवें कीं*[4] *:*" मग तीं गोसावीयांचेया श्रीचरणीचेया आंगुठेयाचें नख देखिलें : तीए पाहातचि होतीं : मग कामाइसें नीगालीं : ऐसें आवघेयांसि दर्सन जालें : वाएनाएकाचीए घरिची परचारक दारवठेनसीं लागौनि गोसावीयांची श्रीमुर्ति पाहातचि होती : मग तीं आवघीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : आणि नीगालीं : मग तीं आवघीं घरासि गेलीं[5] : ।।

गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं सिधनाथासि बीजें केलें : गोसावीं बाहीरीली दोन्ही दारवंडां[6] श्रीकरीं धरूनि भीतरि अवळोकिलें : भीतरि मास-उपवासीनी बैसलीया होतीया : गोसावीं तेथौनि बीजें केलें : मागिला[7] वडातळि गोसावी नावेक चरणचारी उभे होते : ओतीं उतारू नाहीं : मग गोसावीं ओतु वरि[8] उतरले : रामनाथीं नरसीहीं अवस्थान जालें : दीस नव : ।।

## ४९७ ओतीं उमाइसांसि आस्वासन

गोसावीयांसि रामनाथाचेया वडातळि आसन असे : उमाइसें ओतापैलाडि उभीं ठाकलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : गोसावीं थडीए साउमेयां बीजें केलें : उमाइसीं वीनवीलें : "जी जी : मीं गोसावीयांजवळि एइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि या म्हणिजैल तरि एओं एइल : परि तुम्ही व्रतस्तें : तुम्हांसि सीवालंघन[1] करूं नैए :" उमाइसीं

---

**४९६.** १. (**हबी.**). २. **मु.** °तयांची जाया. ३ **मुराहबी.** अष्टमांगळच. ४ (**मुरा.**). ५ **भ.** (**सोधु** : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : इतुकेयांतु यथीचें दरीसन कोणांसि जालें ? " बाइसीं म्हणीतलें : "बाबा : आवघेया वायनायकाचेया कुटुंबासि जालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैसें नव्हे :" "तरि बाबा : कैसें होय ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दारवंडेसीं बाइ उभी होती तीयसि जालें :" तेयां नावं मैळाइसें :). ६ **अ.** दारवठां. **हबी.** दारसंका. ७ **भ.** खीडकीयां°. ८ **मुरा.** ओता वरीलीकडे.

**४९७.** १ **पंभगोमुराहबी.** सीमालंघन. **एवा.** सीमा अतिक्रमुं न ये.

म्हणीतलें : "जी जी[२] : काळदासभट काइ नेणों : काइ नेणों बोलत असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बोलिजे ऐसें एथ काइ असे ?" "ना जी : काइ नेणों : काइ नेणों बोलत असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आपणेयां नीवारे तरि नीवारिजे[३] : नाहीं तरि स्थानपालटु कीजे : कां कानीं आंगुळीया सुइजति :" ।।

## ४९८ काळदासभटां तांबोळग्रहण

गोसावीयांसि रामनाथिचेया वडातळि आसन[१] : एकादसिचां दीसीं काळिदासभट गोसावीयांचेया दर्सनासि आले : *सरिसे नातु मुंजिये भानु आले*[२] : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : *तांबोळ परित्येजितां तिहीं*[२] गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मज तांबोळ देयावें :" म्हणौनि आंजुळि ओडवीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचें तांबोळ घेइजे ऐसा काइ धर्मु ?" मग तेहीं म्हणीतलें : "जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः। केनापि देवेन हृदिस्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ।।" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे आवघे ऐसे[३] असति कीं :" म्हणौनि श्रीकरें दाखवीलें : तेहीं म्हणीतलें : "मां काइ जी : असति तरि असति : आणि काइ जी[४] : तांबोळ गुरूचें : माता : पीता : देवता : यांचें घेओं ए : *स्वधर्मपीडामवचिन्त्ययोयं मत्पापशुद्ध्यर्थमिह प्रवृत्तः । नोचेत्क्षमामप्यहमस्य कुर्यामतः कृतघ्नो वद कीदृशोऽन्यः* :" ।। म्हणौनि घेतलें : तैसीचि तेयां स्तीति जाली : मग गोसावीं मढासि बीजें केलें : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीयांसि ताट जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांसि जेउं वाढा[५] :" तीं म्हणीतलें : "मज एकादसी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांसि तुपें माखूनि पोळी देया :" बाइसीं तेयांसि तुपें माखूनि पोळी दीधली : ते तेहीं घेतली : ते इंद्रभटांचे आधिली घरिचे पुत्र : काळदासभटाचे नातु : तेयां नावं भाइदेव : ।।

## ४९९ वैजो भ्रुंगी नामकरण

वैजोबाएं[१] पुरीं आपुलीए सेतिचीं वाळुकें तोडिलीं[२] : डेरां घालुनि : गंगेआंतु घेउनि आले : रामनाथाचां ओतीं डेरा[३] घातला : मग खांदावरि डेरा[३] घेउनि आले :

---

२ **मुरा.** °ब्राह्मणु भकतु असे जी :" **हबी.** °हे ब्राह्मण काहीं काहीं बडबडीति :" **हीराइसें.** °हे महादेव पाठक काइ नेणों बोलत असति :" ३ **रावा.** °नाइकवें तरि कानीं आंगुळीया सुइजति.

**४९८.** १ **हबी.** °काळिदासभटाचा लेकु डाळिदासभट : सरिसा मुंजिया भानु : ऐसे आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : बैसले : तांबोळासी हात वोडवीले––. २ (**मुरा.**). ३ **पंगो.** सास्त्रमढीं. ४ **मुरा.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि एकादशी कीं :" "जी जी : गुरुचें––. **रावा.** स्वधर्मपीडा म्हणौनि श्लोकु म्हणितला : ५ **मुरा.** °बाइसीं म्हणीतलें : "बाबा : भातु नाहीं :" मग मुंजीयासि तुपपोळी दीधली.

**४९९.** १ **मुरा.** वैजोबाचा गाउं पुर : तेथ तीहीं वाळुकें––. **हबी.** पुर गाउ भटोबासाचें : तेथ वैजोबाए वाळुकें––. २ **गो.** °गंगेआंतु घालौनि घेउनि आले : **एवा.** °येकु डेरा पीकलेयां वाळूकां भरीला : येकु हीरवेया वाळूकां भरीला : ऐसे दोनि डेरे वाळूकां भरुनि : पुरु उतरौनि : गंगेचेनि मध्यें घेउनि आले वोति लाविले. ३ **एवा.** डेरे.

गोसावीयांसि रामनाथाचां चौकीं आसन असे : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : बटीकुरू पातळु ऐसा दीसतु असे : परि कीती ओझें घेउनि आला : माजु मोडैल ऐसा दीसतु असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ[४] : तो माहादेवाचा भ्रींगि : हा एथिचा भ्रींगि : " डेरा उतरिला : गोसावीयांपुढां वाळुकें पुंजा केली : बाइसीं[५] कोवळींकोवळीं वाळुकें नीवडूं आदरिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : राहा : एं वाळुकें नीवडूं नको : वाळुकें जारसें : पीकलीं : कोवळीं : ऐसे अवघेयां वांटे करविले : अवघेयांसि वाळुकें दीधलीं : तवं राणा आला : गोसावीयांचा भागु तो राणेयांसि देववीला : बाइसीं गोसावीयांलागि च्यारि ऐसीं वाळुकें कोवळीं नीवडिलीं :।।

## ५०० स्त्रीये काळस्फोटव्येथा हरण

गोसावीयांसि रात्रीं नरसीहीं पहुडु असे : ळळताइसें[१] नावं बाइ : तीए तेथिचीं कठीएं : तेयांसि काळस्फोटु नीगाला : तीएं रात्रीं वीवळों लागलीं : " धावं गा देवा : राख गा देवा : पोसि गा देवा : पोसीसि ना तरि मारि गा देवा : " ऐसीं च्यार्‍ही पाहार वीवळों लागलीं : पस्यात पाहारीं गोसावीं परश्र्यासि बीजें केलें : परश्र्यो सारूनि गोसावीं तेयांपासि बीजें केलें : सरिसीं वाइसें : तीएं[२] आधी गुंफेआंतु : आधी गुंफेबाहीरि : ऐसीं होतीं : गोसावीं तो फोडु अवळोकिला : श्रीचरणीचा आंगुठा लावीला आणि फुटला : वरि पीक घातली : आणि तेयांची व्येथा होती ते हरली : तेयांसि नीद्रा आली : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : फोडु तरि सानाचि : परि च्यार्‍ही पाहार वीवळत होतीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : हा काळस्फोटु : हें जरि नावेक न वचतें तरि तेयांचें देह जातें[३] : " ।।

## ५०१ उमाइवीज्ञापनें उपाहारू स्वीकारू

एकादसिचां दीसीं उमाइसांतें वैजोबा घोडेया वावुनि गोसावीयांचेया दरीसना घेउनि आले[१] : गोसावीयांचें दर्सन जालें : उमाइसीं गावां जावेया गोसावीयांतें वीनवीलें : गोसावी वीनवणी न स्वीकरतीचि : मग गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें तेथ नैएं : भ्रींगीहातीं एथचि उपाहारू पाठवा : " मग तीएं साडेगावांसि

४ **एवा.** °माहादेवाचां ठाइं दोनि गण : येका नांव भ्रींगी : तरि हा येथिचा भ्रींगी. ५ **गो.** हीरवीं : पींकली : कोवळीं : बाइसें गोसावीयांलागि नीवडुं बैसली :

**५००.** १ **पंराहबी.** ललिताइसें. २ **हबी.** ललिताइसें तीयें बाहीरी बैसली असति : तल्हातीं. (**एवा.** तळवां) पीक घातली : दुख काढिलें : ३ **एवा. हबी.** गोसावीं एकलेयांचि बीजें केलें : गोसावीं परिश्रयो सारुनि तेयांची व्येथा हरूनि मढा बीजें केलें : मग बाइसीं पुसिलें : " हा बाबा : एवढा वेळु ते वाइल वीवळत होती : आतां उगीचि राहिली : तरि काइ सरली : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें नावेक न वचतें तरि तेयांचें देह जातें : "

**५०१.** १ **हबी.** (**एवा.** सरीसें आवाइसें होतीं :)

गेलीं : बारसिचां दीसीं वैजोबाहातीं दुरडीए उपाहारू पाठवीला : मढासि घेउनि आले : गोसावीयांसि पुजा आरोगण जाली[२] : ।।

## ५०२ उमाइ दरीसना एणें

एरी दीसीं उमाइसें गोसावीयांचेया दरीसनासि[१] आलीं : गोसावीयांसि वडातळि आसन असे : बाइसीं एतां देखिलें : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : मासोउपवासीनि नव्हे : लांवं : बाबा : कैसी पोट बांधौनि एत असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ बाइ : एं येथिचेया दर्सना एतें असति : मां यांसि सवीया कैसीं देतें असा ?" मग तीएं आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : गोसावीयांचां श्रीकरीं नींबु होतें : तेयांसि ऐसा मनोर्थू जाला[२] : 'हें नींबुं गोसावी मज देतु कां :' मग गोसावीं नींबु तेयांसि दीधलें : मग तीएं गावांसि नीगालीं : ।।

## ५०३ सोभागांचा उपाहारू स्वीकारू

सोभागबाइसांची बहीणि भूगावीं[१] होती : तीहीं सोभागबाइसांतें म्हणीतलें : "माइबाइ : गोसावीयांतें उपाहारालागि वीनवि कां : मग मज गोसावीयांचें दर्सन होइल :" मग तीएं गोसावीयां जवळि आलीं : गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग तेहीं उपाहारू नीफजविला : रात्रीं रांधितां : कणीकि कांडितां : तेणें ब्राम्हणें[२] आइकिलें : उदीयांचि तो ब्राह्मणु धोत्रें धूआवेया नीगाला : तवं[३] तो पाटैलु *हुडेयावरीं*[४] बैसला असे : तेणें पुसिलें : "तुमचां घरीं रात्रीं रांधिकांडि थोर ऐसी होत होती :" तेहीं म्हणीतलें : "आमचीए आकडसासुवेचे[५] गुरू आंवतिले असति : तेयांलागि[६] रांधिजत होतें :" तेणें म्हणीतलें : "तुमचीए आकड-सासुवेचे गुरू जाले : आतां तुमचीए ब्राह्मणिचे गुरू होती :" ऐसें भकों लागला : मग तेणें एउनि घरीं सांघीतलें : तेहीं म्हणीतलें : "असो देया[७] :" मग सोभागबाइसें गोसावी-यांतें वीनवावेया आलीं : वीनवणी स्वीकरिली : गोसावीं बीजें केलें : पाउलें च्यारि गेले : पौळीचेया अग्न कोणापासि उभे राहिले[८] : तेथौनि नगर अवळोकिलें : आणि म्हणीतलें : "बाइ जा : आतां हें नैए : यालागि एथचि उपाहारू घेउनि या :" तीएं दूख करितें गेलीं : तेयांपुढें सांघीतलें : मग तीएं दूख करूं लागलीं : "यां

---

२ **एवा.** वैजोबासि श्रींगी नावं तेथ ठेवीलें.

**५०२.** १ **मु.** °पोट बांधौनि—. २ **मु.** उपन्नला.

**५०३.** १ **गोहबी.** भोगावीं. २ **अभगो.** पाटैलें. **मु.** गावाचेनि अधिकार्यें. ३ **बी.** °तो गावीचा पाटीलु. ४ (**मुराबी.**) ह. दुर्गावरि उभा असे. ५ **मुराभगोपंहबी.** आकडसासुचे. ६ **हबी.** °पाहुणरु करीत असों. ७ **हबी.** °परतें. ८ **हब.** °नगर अवळोकिलें : आणि म्हणीतलें—.

पापीयांचेया गावां गोसावी काइसेया बीजें करिती ?" मग सोभागबाइसें गोसावीयांलागि उपाहारू घेउनि आलीं : गोसावीयांसि वीळिचेयांचां पाहारीं एका आरोगण जाली : बाइसें गोसावीयांतें व्याळीएंलागि वीनवीतें होती : व्याळी न करितीचि : ।।

## ५०४ पाडिवां प्रयाण

गोसावीं पाडिवेयाचां दीसीं उदैक बीजें केलें : देवताभूवनीं गोसावीयांसि प्रातपुजा जाली : आरोगण जाली : पहुडु जाला : गोसावीं दूपाहारीं बीजें केलें : ।।

## ५०५ बोरीए राणाइसां : लाखाइसां भेटि

बोरीएमध्यें लाखाइसां राणाइसां गोसावीयांसि दर्सन जालें : बोरी उतरौनि थडीएसि डावेया हाता कांटीएतळि गोसावीयांसि आसन जालें : *तेहीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीया : बैसलीया : गोसावीं क्षेमवार्ता पुसों आदरीली : लाखाइसीं अवघी क्षेमवार्ता सांघीतली*[1] *:* मग गोसावीयांपुढां लाखाइसीं सांघीतलें : "जी जी : *बळ्हेग्रामूनि नीगालों*[2] *:* एहीं नेमु घेतला : गोसावीयांचें चरणोदकवांचौनि न पीएं :" मग बाइसीं गोसावीयांसि चरणक्षाळण केलें : बाइसें चरणोदक पीओं सुतें होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेयांची आधीं टाळु[3] सींपा :" मग बाइसीं तेयांची टाळु सींपिली : मग तेयांसि चरणोदक पीओं सुदलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसा नेमु न कीजे कीं : हें पां[4] केउतेंहीं जाए तेव्हळि काइ ?" मग तेहीं थापडेयांची दूरडी गोसावीयांपुढां ठेविली : गोसावीं श्रीकरेंकरूनि[5] पांटीएचा पदरू फेडिला : श्रीकरीं थापडा घेतला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ बाइ : बळ्हेग्रामिचें पक्वान ?" "ना जी : काइसें पक्वान ? हें लांकांचें थापडें :" मग गोसावीं करांगुळीचेनि नखेंकरूनि बुडूडा उचडिला : श्रीमुखीं घातला : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५०६ साडेगावीं मैराळदेवीं वस्ति

मग गोसावीं साडेगावांसि बीजें केलें : मैराळदेवीं डावीएकडे पटिसाळेवरि आसन जालें : जाडिचा कानवडा बांधला : गौराइसें अग्रोदका[1] गेलीं होतीं : तवं जाडिचा कानवडा देखिला : तेहीं म्हणीतलें : "गोसावीयांचीए जाडीसारिखी जाडि : तरि काइ गोसावीं बीजें केलें असैल ?" ऐसें म्हणौनि आलीं : तवं गोसावीयांतें देखिलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीं पुसिलें : "बाइ : इंद्रा गावीं असे ?" "ना जी : गावीं नसति :" "तरि अग्रोदक कोणालागि ?" "जी जी : कांकोचेया देवांलागि[2] :"

---

**५०५.** १ (**हबी.**). २ (**मुरा.**). ३ **मुराभह.** मूर्द्धंनि. ४ **मुरा.** विपायें. ५ **गो.** श्रीकरीचेनि नखांगुळेंकरुनि.

**५०६.** १ **एवा.** पींपळु सींपों. २ **हबी :** °सर्वज्ञें म्हणीतलें : "हें आलें ऐसें कव्हणापुढां न संगावें हो

तैसींचि तीएं बीढारासि आलीं : आबाइसांउमाइसांपुढां सांघीतलें : आबाइसें उमाइसें गोसावीयांचेया दरीसनासि आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग लाखाइसांआबाइसां खेवांखेवि जाली : *आबाइसीं पुसिलें : "लाखाइसें : तुम्हीं केधवां आलींति ?" तीहीं म्हणीतले : "आजि आलों[३] :"* तीएं प्रीतिसोइरीं[४] : मग गोसावीयांजवळि बैसलीं : गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग तीएं लाखाइसांतें बीढारा घेउनि गेलीं : ।।

## ५०७ राणाइसां स्वतंत्रीएधर्म नीरोपण

*लाखाइसांतें आबाइसीं नेलें : राणाइसें बीढारीं राहीलीं : लाखाइसें आपुलीया संबंधीयाचां घरीं न्हालीं : जेविलीं[१] :* मग राणाइसें भूकैलीं : सीदोरीएची वास पाहाति : आणि तेयांची वाट पाहाति : आणि गोसावीयांचेया श्रीमुखाकडे पाहाति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जेवा ना कां ?" "ना जी : लाखाइसें एती : मग जेउं वाढिती : तेयांची आणि माझी सीदोरी एकी[२] ठाइं असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : स्वातंत्रीय हा मोक्षू : प्रतंत्रीय हा बंधू :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं काइ करा ?" "जी जी : बापु धानि[३] मागे : तेयाची वरो होए : मीं धानि मागें : तेयाचें तेलमीठ[४] होए : कांतें तेयांचें धडौतपण होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "धानि[३] न मगिजे : कांतिजे ना : भीक्षा मागिजे :" "ना जी : तरि धडौतपणासि काइ करूं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सुडे मागिजेति : मग आपुलें अंग झाके ऐसें कीजे : आंचळे बहिर्वासु न नेसीजेति :" तवं राणाइसीं म्हणीतलें : "जी जी : मागितलेयां कवण देइल[५]?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पृथ्वीएसणें रवण असे : आणि इस्वराएसणी देवता असे : मा चींधीचीरकुटी नेणों कैचि[६] मीळैल कीं : तुम्हां काइ दैन्य असे ?" मग दीसु मावळतां लाखाइसें आलीं : तेहीं पुसिलें : "राणाइ : तुं जेविलीसि ?" "तुम्हांवीण कैसी जेवीन ?" मग तीहीं सीदोरी सोडिली : आंबीलभातु घालुं आदरिला : गोसावीं पुसिलें : "बाइ : हें काइ ?" "जी जी : हा दहींभातु :" मागुतें पुसिलें : "हें काइ बाइ ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : हा आंबीलभातु[७] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा वाढा[८] : हा नको :" यावरि बाइसीं लाखाइसांतें म्हणीतलें : "आपण तेथ जेउनि आलींति : इसि आंबीलभातु वाढीतीसि ? नको वाढुं : हें बाबाचीए पांतीसि जेवील :" मग तेयांसि गोसावीं दहींभातु जेओं सूववीला : मग वीळिचां आबाइसांचा उपाहारू

---

बाइ :" (**बी.** °गौराइसीं म्हणीतलें : "जी जी :" ३ (**मुराहबी.**). ४ **पं.** व्रत°. **मुराहबी.** वृति°.

**५०७.** १ (**हबी.**) २ **गोबी.** एकवट असे. ३ **पंहबीगो.** धान्य. ४ **अ.** लोण. ५ "बाइ तुम्ही काइ करा"– येथपासून तो "तुम्हां काइ दैन्य असे" येथपर्यंतचा भाग **मुरा.** प्रतीतील या लीळेत नाही. तेथे तो "राणाइसां भीक्षाविधि निरूपण" या लीळेत आरंभी घेतलेला आहे. ६ **अह.** कोणचि मीळवील (**एवा. मीळैल**) कीं. ७ **अभ.** दहींभातु. **एवा.** वर्णभातु. ८ **पंगो.** बांधा.

आला : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : गोसावीयांसि आरोगण जाली : गोसावीयांसि तेथचि पहुडु जाला : ।।

## ५०८ डोणी उतरणें

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं गंगेचीए थडीए बीजें केलें : डोणीपासि उभे राहिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "डोणि[1] घाला[2] गा :" तेहीं म्हणीतलें : "जी जी : डोणीसि माहाजनीं आण वाइली असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें भीक्षू माहात्मे : यांसि काइसी आण?" सर्वज्ञें म्हणीतलें : "घाला[2] डोणि :" "ना जी : आम्हां आवलुं नैए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "या : हें तुम्हां आवलुं लागैल :" मग तेहीं डोणि घातली : गोसावीं फुटेयाची तळसुती केली : गोसावी डोणीवरि बैसले[3] : बाइसें बैसलीं : लाखाइसें बैसलीं तवं नावेक डोणि पर्ती गेली : मग गोसावीं राणाइसां श्रीकरू देउनि बैसवीलीं : मग श्रीकरीं आवला घेउनि डोणि आवलिली : गोसावीं उजुचि नेली : मग तेयांसि वीस्मो जाला : "हें काइ : ऐसी दोणि कोण्हीचि आवलुं[4] नेणे जी : आम्हींहीं नेणों जी :" मग तेहीं आवलें घेतलें : डोणि कडै लाविली : मग गोसावी उतरले : बाइसें उतरलीं : लाखाइसें उतरली तवं डोणि नावेक परती गेली : मग गोसावीं श्रीकरू देउनि राणाइसें उतरिलीं तवं बाइसें कोपलीं : "हें काइ ओ जालें रांडेसि : मगां तरि मगां बाबाचा श्रीकरू धरूनि बैसलीं : आतां तरि आतां बाबाचा श्रीकरू धरूनि उतरलीं : बाबाचा श्रीकरू दूखवला :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांसि कां कोपतें असा? हें यांसीचि करूं आवडत असे[5] :"* मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : पुरापासि[6] सेत : तेथ कांटीतळि आसन जालें : बैजोबा आले : श्रीचरणां लागले : वाळुकें दर्सनासि केलीं : ।।

## ५०९ पापवीनासनीं अवस्थान : अवधूता भेटि : स्तीति

तैसेंचि गोसावीं पापवीनासनासि[1] बीजें केलें : अवधूतु घागरीसीं उदकासि नीगाला : दारवठां[2] पींपळातळि गोसावीयांसि दर्सन जालें : गोसावीयांपासौनि तेयां स्तीति जाली[3] : स्तीति जाली : तीएं दीसौनि गोसावीयांचे जाले : सेवादास्य करूं लागले : पापवीनासनीं गोसावीयांसि तीरात्रि अवस्थान जालें : ।।

---

**५०८.** १ **मुराहबी.** "डोणि कां गा सुआ ना?" २ **मुराहबी.** सुआ. ३ **मुराहबी.** उभे राहीले. ४ **अभगो.** नेओं. ५ (**मुराहबी.**). ६ **एवा.** पुरीं टेंकावरि गोसावीयांसि आसन जालें.

**५०९.** १ **मुह.** देउळासि. २ **एवा.** भीतरि आंगणीं दर्सन जालें. ३ **हबी.** °आणि घागरि ठेविली. आंगणीं भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागला : अनुसरले : गोसावीयांचें सेवादास्य करूं लागले :

## ५१० राणाइसां भीक्षावीधि नीरोपणें

गोसावीं नाथोबातें म्हणीतलें : "मंडळीका : यांतें भीक्षेसि नेया गा :" गोसावीं श्रीकरें तेयांसि झोळी दीधली कीं नाहीं ऐसें नेणिजे[१] : मीरेगावांसि भीक्षेसि गेलीं[२]: तेयांसि भीक्षेसि मांडे : पोळी : ढीडरें : भाकरी : दीवसें : वर्णभातु : खीरि : साकवतीया : भीक्षा करूनि गोसावीयांपासि आले : गोसावीयांसि दृष्टभूत झोळी केली : गोसावीं डावा श्रीकरू खालि घालौनि ऐसी उचलिली : मग अवळोकिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : इतुकीं अनें काइ एकी घरीं नीफजति[३] ?" तेहीं म्हणीतलें : " ना जी : इतुकीं काइ नीफजती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भीक्षा राज्य वाइ : " ।।

## ५११ चोरूकुमति हरणें

रात्रीं चोर एत होते : तो बाइसीं गजंबु[१] आइकिला : बाइसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : "बाबा चोर आले :" गोसावीं वाहीरि बीजें केलें : पींपळाचेया पारावरि गोसावी उभे राहिले : मग गोसावीं खांकलिले[२] : तीहीं म्हणीतलें : "एथ माणुसांचा चाहाळु असे :" तैसेचि ते गंगेचीया थडीयाथडीया गेले : उदीयांचि[३] वैजोबाचे सासुरे[४] भाइदेव गोसावीयांचेया दरीसनासि आले : ते चोरांतु[५] होते : तेहीं म्हणीतलें : "जी जी : रात्रीं एथ माणुसें आलीं होतीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आलीं होतीं :" "जी जी : गोसावीयांचां ठाइं काहीं उपद्रो जाला ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "काहीं नाहीं :" मग तीहीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं एथ नसावें : हें चोरांचें खागें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नसिजे तैसें एथ काइ असे ?" "ना जी : गोसावीं एथ नसावें : मीरेगावीं गावांआंतु नागनाथाचें देउळ असे : तेथ गोसावीं बीजें करावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : " ।।

---

५१०. १ **मुरा.** प्रतीत या लीळेची 'आदि' "राणाइ झोळीदानपुर्वक भीक्षाविधी निरूपण" अशी असून तिचा आरंभ पुढीलप्रमाणें : (मागे पूर्वार्ध लीळा ५०७, तळटीप ६ पाहा). "मग गोसावीं राणाइसातें पुसिलें : "बाइ : तुम्हीं काइ करा ?" "जी जी : धान्य मागों : कांतों : बापु सेतवडीया मागे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : धान्य कां मागां ?" "ना जी : वरोलागि :" "कांता कां ?" "ना जी : तेलमीठ होए : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कांतिजे ना : धान्य न मागिजे : भीक्षा कीजे : भीक्षा नीकी :" तीहीं म्हणीतलें : "वस्त्रकापड होए जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पृथ्वीएसणे रवण : ईश्वराएसणी देवता असे : मा चिंधीचीरकुटी नेणों कैंचि मीळैल कीं :" मग गोसावीं झोळीए गांठि घातलीया : तयाचां हातीं दीधली : सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका यातें सांघातें भीक्षे नेया :—. २ **भ.** नेली. ३ **मुरा.** °पाहा पां : नाना पक्वान्नें" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीक्षा राज्य बाइ :"

५११. १ **अ.** गजमु. **ह.** सांसलु. **बी.** सांचलु. २ **पंभगो.** खांकरीले. **हबी.** खांकरीति. ३ **हबी.** घुइनायक आले : ते वैजोबाचे सासुरे. ४ **अ.** सोइरे. **भ.** ससुरे. ५ **गो.** चोरासरीसे.

## ५१२ मीरेगावीं नागनाथीं वस्ति

वीळिचांचां वेळीं गोसावीं मीरेगावांसि बीजें केलें : नागनाथीं गोसावीयांसि वस्ति जाली :।।

## ५१३ संगमेस्वरीं अवस्थान

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : संगमेस्वरीं पंचरात्रि अवस्थान जालें : मलिनाथाचीए देउळीए पुजा आरोगण होए :।।

## ५१४ क्षुद्रा नदी स्वेतु बांधणें

बाइसें नांदौरासि भीक्षेसि जाति : क्षुद्रानदीसि[१] चीखलु होता : तेथ बाइसें माखलीं : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं क्षुद्रानदीसि बीजें केलें : *सारिसें अवधूत असति*[२] *:* गोसावीं[३] मेघवणीए पागेचा धाटा घेतला : फुटेयाची[४] तळसुती केली : गोसावी तेथ उभे राहुनि अवधूताकरवि सांडोवा वांधवीत असति : तवं उपाध्ये[५] आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : तेथ उपाध्यां भेटि जाली :।।

साडेगाउनि काळदासभट उपाहारू घेउनि आले : गोसावीं तेयांतें एतां देखिलें : मग म्हणीतलें : "आतां एथ अभ्यागतें[६] आलीं : पुरों देया गा व्यापारू : आतां माहात्मेयां होआवें लागैल :" मग गोसावीं वस्त्रांपासि बीजें केलें : गोसावीं बाहीरवासु वेढिला : फुटेयाची बुंथि घातली : गोसावीं भोजनतेयाकडे बीजें केलें : पुढें काळदासभट : मागां गौराइसांचीएं डोइएं आंबिचेयां वडेयांचें मडकें : गोसावीयांतें देखिलें आणि श्रीमुर्ति पांतें एतें असति : वरतीया दृष्टी : तेणें दूचिती जालीं : आणि आडखूळलीं : आंबाचें मडकें फूटलें : तैसेंचि वडे भरूनि घेउनि आलीं : गोसावीं कपाटासि बीजें केलें : तीएं आलीं : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : श्रीचरण पक्षाळिले : टीळा जाला : बाइसीं पुजाअवस्वरू केला : मग गोसावीयांसि बाइसीं ताट केलें : भक्तिजनांसि ठाए केले : गोसावीं पुसिलें : "बाइ : पैल काइ ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी : आंबीचें मडकें : गौराइसें आडखूळलीं : तें फूटलें : तरि[७] सांडलें : तरि गोसावीयांसि कैसें वाढुं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा :" मग तेहीं गोसावीयांचां ताटीं वडा ओळगविला : आवघेयां भगतिजनाचां ठाइं वाढिला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : पहुडू जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "*आतां एथ अभ्यागतें आलीं : हें तवं अरण्य*[८] *:* हें आपण आतां नंदापुरा[९] जाइजैल :" तैसेंचि गोसावीं बीजें केलें :।।

---

**५१४.** १ **अगो.** क्षौद्रा°. २ (**मुरा.**). ३ **मुरा.** °पाटाउवें पागेची उभे धाटि केली : ते पागभूमीका काळी : धारी लोहीवी : तथा मेघवणी. **हबी.** पाटाउंवा पाग काळिया धारियाची : तीयेतें मेघवर्णी म्हणितलें : तिये पागेचा उभेया धाटिया : धाटा केला होता. ४ **मुरा.** तळपाची तळशूधि केली. ५ **पं.** आपदेवोभट. ६ **अभ.** भक्तजनें. ७ **पं.** °आंब—. **मुरा.** तरि सांडलें गोसावीयांसि—. ८ (**गोमुरा.**). ९ **गोपंह.** नांदौरासि.

## ५१५ तीरीं श्रीक्रुस्णवेधप्रसंसा

अवघीं भगतिजनें उजु वाटा पाठवीलीं : गोसावीं उपाध्यांचा हातु धरूनि गंगेचेनि तीरें बीजें केलें : गोसावीयांचीए श्रीमुर्तिची साउली उदकावरि[१] पडली : तेणें तळील[२] जीएं जळचरें तीएं वरि आलीं : गोसावीयांची श्रीमुर्ति पांतें असति : गोसावीं उपाध्यांतें म्हणीतलें : " वटिका : काइ एं काइ पांतें असति ?" ते उगेचि होते : सर्वज्ञें म्हणीतलें : " द्वापरीं श्रीक्रुस्णचक्रवर्ती एमुनेचेनि तीरें बीजें करीति : मग तळ घेउनि जीएं जळचरें असति तीएं वरतीं एउनि श्रीमुर्तितें पाहाति : ऐसे गा ते वेधाचार्ये[३] :" तेहीं म्हणीतलें : " जी जी : ऐसें गोसावीं सांघीतलें : तें काइ तेथिचें नातें आपुलें सांघीतलें ?" परि ते जाण न्हवतीचि :॥

## ५१६ नांदौरीं आदीतीं अवस्थान

मग गोसावीं नांदौरासि बीजें केलें : आदीतीं पाखू दीस अवस्थान जालें :॥

## ५१७ सामकोपुत्रत्वस्वीकारें आरोगण

सामकोचा पुत्रु सरला होता : तो तेयांसि[१] स्वपनीं आला : तेणें म्हणीतलें : "आइ : मज जेउं सुइ कां :" तेहीं म्हणीतलें : "काइ जेउं सुं[२] रे वा ?" तेणें म्हणीतलें : "दधिभातु सुइ[३] :" तें आवाइसांपुढां सांघीतलें : आबैसीं म्हणीतलें : " गोसावीयांसि आरोगण दे :" इतुलेनि गोसावीयांपासि[४] आलीं : आबैसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : सामकोनि स्वपन देखिलें : यांचा पुत्रु सरला होता : तो यांसि स्वप्नीं आला : 'आइ : मज दधिभातु जेउं सुइ कां :' एहीं देखिलें जी : तरि एं गोसावीयांसि आरोगण देती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि काइ वाइ : तुमचेयां पुत्रां होआवें[५] ?" "हें काइ जी ? गोसावी कैसे पुत्र ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें नव्हे : तुम्हीं म्हणतें असा :" मग तेहीं दधिभातुपुर्वक गोसावीयांसि आरोगण दीधली[६] :॥

## ५१८ राणाइपीते उपाहारूस्वीकारू

गोसावीयांलागि राणाइसें आणि राणाइसाचे पीते : ते उपाहारू घेउनि आले[१] : गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांसि पुजाअवस्वरू

---

**५१५.** १ **मुरा.** उदकामाजि. **हबी.** उदकाआंतु. २ **गोपंहबी.** तळ घेउनि जीएं जळचरें होतीं तीएं—. ३ यापुढील भाग **मुराहबीभ.** प्रतीत नाही.

**५१७.** १ **मुरा.** °करजाळां—. २ **एवा.** सों. ३ **मुरा.** °मग ते साडेगावांसि आलीं. ४ **मुरा.** °नांदौरा—. ५ **पंगो.** °लागैल ? ६ **गो.** °मग गोसावीं आपूलेया पूत्राची गोष्टी सांघीतली. **मुरा** °गोसावीयांसि ताट केलें : दधिभातु उन्हें तापला आला : तो ओळगवीतीचि ना : आरोगण करित गोसावीं पुसिलें : "बाइ : हें काइ ?" "जी जी : हा दधिभातु उन्हें तापला होता : तो कीं नासल जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आणा :" मग तीहीं वाढीला : गोसावीं प्रसादु केला :॥

**५१८.** १ **मुरा.** °गोसावीयांसि पींपळदरडीये आसन होतें : तेथ भेटि जाली.

जाला : मग गोसावीयांसि ताट ओळगविलें : *राणाइसीं भीक्षान झांकौनि ठेवीलें होतें : तें गोसावीं अवळोकिलें*[२] : गोसावीं पुसिलें : "बाइ : हें काइ ?" "जी जी : हें भीक्षान : मीयां आपणेयांलागि आणिलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा आरूतें :" गोसावीयांचां ताटीं ओळगविलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें भीक्षान कीं : मा हें पवीत्रांचें पवित्र कीं : एथौनि याची थोरी जरि सांघिजैल तरि तुम्हीं क्षोभाल :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : ।।

## ५१९ काळदासभटां मध्यमोद्घाटनीक्षेद्रू

काळदासभट पींपळदरडी[१] स्तीति भोगीत बैसले असति : गोसावीं बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "काळदासभटो[२]: बैसले असा ?" "जी जी : असों सुष्मनेचां मुखीं : *तपतटाकीं : त्रीकूट स्थानीं : मध्यमोदघाटीं होतों*[३] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथिचीं कार्यें काइ तीएं ऐसीं व्रतति[४] ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी : तीएं काहीं देखों ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि कैसें असा सुष्मनेचां मुखीं : *तपतटाकीं : त्रीकूट स्थानीं : मध्यमोदघाटीं*[३] ?" तैसीचि स्तीति भंगलि : उठिले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ।।

## ५२० तथा पैसुन्यें स्तीत्याधिक्य

काळदासभट[१] गोसावीयांजवळे आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळे बैसले असति : तेयांची लेंकि हातरीतीनि[२] : धाकुटी : ते बाइसांसि काहीं व्यापारू करूं लागे : मग बाइसीं म्हणीतलें : "बटिकी : बाबा नीके : बाबाचें दास्य कीजे : बाबाजवळिके राहे[३] : बाबापासौनि तुज काहीं गोमटें होइल :" ऐसें बाइसें म्हणति : तीहीं रात्रीं बीढारीं काळदासभटांपुढां सांघीतलें : "बा : मातें बाइसें ऐसें म्हणति : 'बटिकी : बाबाजवळि राहे कां : बाबा नीका : बाबाचें दास्य करि : बाबापासौनि काहीं गोमटें होइल :' "आणि तेयां स्तीति जाली : आणि म्हणों लागले : "आणि काइ ? कां राहावीति ना ? देखिलीसि : *धारेंधाकुटी : गोरीगोमटी*[४] : तरि कां राहावीति ना ? यां माहात्मेयांतें ऐसेंचि :" ऐसें जवंजवं पैसुन्य बोलति तवंतवं सुखचि होए : मग स्तीति भंगली : उदीयांचि गोसावीयांचेया दर्सनासि आले : गोसावीयांसि गुळुळा होत असे : जवळिके इंद्रभट बैसले असति : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले :

---

२ (**हबी.**).

**५१९.** १ **मुरा.** नीवात बैसले असति. २ **मुरा.** "काइ भटो : कवणी ठाइं असा ?" "जी जी : सुखमनेचां मुखीं असो :" "सुखमनेचीं कार्यें काइ ऐसीं ?" ३ (**पंभगो.**). ४ **पंभगो.** वर्तति.

**५२०.** १ **मुरा.** काळिदासभटां स्तीति जाली : आणि पैशून्य बोलों लागले : जवंजवं पैशून्य बोलति तवंतवं स्तीति होए : सूखचि होए : उदयांचि गोसावीयांचेया दर्शना आले—. २ **पंभगोहबी.** हातरीती. ३ **हबी.** °तुं मीं बाबापासि असों—. ४ (**गोहबी.**). **अभ.** तरुणी : धाकुटी : तरि कां—.

आणि इंद्रभटांपुढां सांघों लागले : "काइ इंद्रभटो[५] : द्वापरीं[६] श्रीकृष्णचक्रव्रति आराधिलेयां मुगुति देति : कां वीरोधिलेयां देति : तैसेचि आमचे गोसावी आराधीलेयां मुगुति देति : आणि वीरोधिलेयां मुगुति देति :" गोसावी उगेचि होते : इंद्रभट उगेचि होते[७] : ।।

## ५२१ नंदेस्वरीं दादेया भेटि*

[नंदेस्वरीं दादा रांगवळी[१] रेखीत होता : तवं गोसावीं तेथ बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ भटो : रंगमाळिका[२] सुत असा ?" भेटि जाली : श्रीचरणां लागला : ।।]

## ५२२ गौरवावीए जोगेस्वरीसि वस्ति

तेथौनि गोसावीं गौरवावीएसि बीजें केलें : जोगेस्वरीसि वस्ति जाली : गोसावीयांसि उजवीएकडे पटिसाळेसि चरणक्षाळण जालें : भीतरि चौकीं पुजाअवस्वरू होए : ।।

## ५२३ पीसाचीकानीर्गमनीं प्रतिउतर देणें

उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावी आंगीटोपरें लेउनि बैसले असति : तवं पीसाचीका आली : *हातीं वनें*[१] : देवतेपासि गेली : *देवतेचिये डोइवारि वनें ठेविलें*[१] : दीवेयाचेनि[२] तेलें तोंड माखिलें : डोइ उजु केली : दिवेयाचें काजळ : तें डोळां सुदलें : देवतेचें सेंदूर कपाळीं लाविलें : नीर्माल्लु डोइए खोविला : आणि ऐसी फूरूकटैजे[३] : खोबैजे : आणि म्हणे : "माहात्मे[४] हो : तुम्हां सांघातें एइन : देया पोतें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : पोतें ओपा :" तैसेंचि गोसावीं बीजें केलें : पुढांपुढां जाति आणि मागौति उभीं राहाति : आणि ऐसी खोबैजति : फुरूकटैजति : पुढेंपुढें जाति आणि मागुतीं उभीं राहाति : मागुतीं फुरुकटैजति : खोबैजति : ऐसी आधी एकि वाट पातलीं : आणि म्हणीतलें : "माहात्मे हो : आतां मीं नैएं : घेया पोतें : मीयां तुमतें चाळविलें[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कोणें कोणांतें[६] चाळविलें : तुम्हींचि मरतें आलींति : आतां तुम्हींचि मरतें जाल :" इतुकेनि ते राहिली : ।।

---

५ **मुराहबी.** °आमचे गोसावीं साक्षात श्रीकृष्णचक्रवर्ती—. ६ **गो.** द्वारावतीये. ७ °एक म्हणति : "हेचि स्तीति मागां जाली : वेसिद्वारीं कव्हणी भगतिजन भेटले : तेयांपुढां इंद्रभट सांघों लागले : ।।

**५२१.** ***अपंहबी.** प्रतीत ही लीळा नाही. येथे **भ.** प्रतीतून घेतली आहे.
१ **मुराभ.** °रांगवळीया भरीत होता. २ **मुराह.** रांगवळीया भरीत असा ?

**५२३.** १ **(मुरा.)**. २ **हबी.** टौळीचेनि. ३ **अ.** फूरूकैजे. **मुरा.** मसकैजे. ४ **मुरा.** देवन्हो : तुमतें बोळवीत एइन. ५ **मुरा.** झाकवीलें. **पं.** झकवीलें. ६ **मुरा.** °झाकवीलें तें जाणिजैल कीं.

## ५२४ पींपळगावीं मळां आरोगण

गोसावीं पींपळगावासि बीजें केलें : मळां पींपळातळि आसन जालें : ते दीसीं बारसि : वाइसें मुक्षकरूनि सकळ भक्तिजनें भीक्षेसि गेलीं : भीक्षा करूनि आलीं : वाइसीं गोसावीयांसि पुजाअवस्वरू केला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजना जेवणें जालीं : गोसावीयांसि गुळुळा वीडा जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५२५ खांबगव्हाणीं धाबां पहुडु : आरोगण

गोसावीं खांबगव्हाणासि बीजें केलें : धाबां पहुडु जाला : उपहुडु जाला : तवं डोणि[१] न रीगे : मग गोसावीयांसि तेथ आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : जा : डोणि रीगत पाहा :" उपाध्ये गेले[२] : ते टेकावरि बैसौनि डोणि रीगत पाहात होते : डोणि रीगाली : इतुलेनि सांघों आले : गोसावीयांपुढां सांघीतलें : गोसावीं बीजें केलें : गोसावी डोणीं बैसले : बाइसें भगतिजनें बैसलीं : डोणि तेहीं आवलिली : मध्यें पातली : आणि तेहीं तागा लाउनि मध्यें डोणि थीर केली : ऐसी कळा गोसावीयांसि दाखवीली : पैलाडि डोणि गेली : गोसावी उतरले : आवघीं भगतिजनें उतरलीं : मग गोसावी[३] बाइसांपासिल पुडवाटुवा आपुलेनि श्रीकरें तेयांचीए ओटीएसि झाडुनि घातला : ।।

## ५२६ श्रीपुरीं[१] ताएस्वरीं आसन

मग गोसावीं ताएस्वरासि बीजें केलें : *गंगेचीये थडीये उत्तरामुख विस्तीर्ण तायेश्वराचें देउळ : तेथ*[२] चौकीं नावेक आसन जालें : तैसेंचि गोसावीं नांदीयाचेया साजेयावरौनि बीजें केलें : ।।

## ५२७ पानेस्वरीं वस्ति

गोसावीं पानेस्वरासि बीजें केलें : *गावां पश्चिमे टेंकावरि वीस्तीर्ण पानेश्वराचें देउळ : तेथ*[१] चौकाचां नृत्य कोणीं ओटा : तेथ गोसावीयांसि वाइसीं पुजाअवस्वरू केला :

---

**५२५.** १ **अगो.** प्रतीत 'डोणि' हा शब्द या लीळेत सर्वत्र **दोणि** असा लिहिला आहे : येथे **डोणि** हा पाठ स्वीकारला आहे. २ **मुरा.** °पाहोनि आले : "जी जी : डोणि पैलाडि गेली :" मग गोसावीयांसि तेथ आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पुडती गोसावीं उपाध्यातें म्हणीतलें : "बटिका : डोणि पाहा : जा :" उपाध्ये गेले—. ३ **गोपं.** गोसावीं बाइसांतें पुडवाटवा मागीतला : गोसावी उचीतासि आले : आपुलेनि श्रीकरें तेयांचा मूदलु : तेयांचीए ओटीये रीचवीला :

**५२६.** १ **गो.** सीरोपूरीं. २ (मु.).

**५२७.** १ (मु.).

मग बाइसीं तांदुळ वेळिले : दूध[२] आणिलें : मग गोसावीयांतें व्याळीएलागि वीनवीलें : गोसावीयांसि व्याळीए प्रवृति नाहीं : बाइसीं भातांतु दूध घातलें : ताकाचें बोट[३] लाविलें : दहींकरंबा केला : गोसावीयांसि ओटेयावरि पहुडु जाला : ।।

## ५२८ घाणदरीए प्रातपुजा : आरोगण

गोसावीं प्रश्रयासि बीजें केलें : तेथौनि तैसेंचि गोसावीं घाणदरीसि बीजें केलें : गोसावी नावेक घाणेयापासि उभे ठाकले : घाणा अवळोकिला[१] : मग गोसावीयांसि देउळीं रीगतां डावेया हाता आसन जालें : गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जाला : मग आरोगण जाली : गुळुळा वीडा जाला : नावेक पहुडु जाला : ।।

## ५२९ डोंबुलां[१] कांटीएंतळि आसन

गोसावीं तेथौनि डोंबुलेयासि[२] बीजें केलें : डोंबुलां[१] कांटीएंतळि आसन जालें : चरणक्षाळण जालें : गुळुळा : वीडा जाला : ।।

## ५३० पींपळगावीं सोमनाथीं आसन

तेथौनि गोसावीं बीजें केलें : पींपळगावीं सोमनाथीं डावीएकडे[१] आसन जालें[२] : सीरपुरुनि उपाध्यांकरवि पानें आणवीलीं : तै सीरपुरीं हाटु भरे : सोमनाथीं गोसावीयांसि उपाध्ये एतितवं आसन जालें : गुळुळा : वीडा जाला : ।।

## ५३१ माहाजनां भेटि

तेथौनि गोसावीं आपेगावांसि बीजें केलें : माहाद्वारीं माहाजनांसि भेटि जाली : माहाद्वारीं[१] माहाजन बैसले होते : गोसावीयांतें देखिलें आणि आवघेचि उभे राहिले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ।।

## ५३२ वीज्ञानेस्वरा वीडा वाणें

मग गोसावीं वीज्ञानेस्वरासि बीजें केलें : पटिसाळेवरि गोसावीयांसि पसीमामुख[१] आसन जालें : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : गुळुळा जाला : मग गोसावीं भीतरि बीजें

---

२ **गो.** दुधा. **हबी.** उपाध्याकरवि°. ३ **हबी.** वीरजन घातलें.

**५२८.** १ **हबी.** घाणेयासि डावेया हाता देउळी :

**५२९.** १ **गोमुराबी.** डोंबलां. २ **गोमुराबी.** डोंबलेयासि.

**५३०.** १ **एवा.** उजवीकडे. २ **प्रवा.** °राक्षसभूवना उपाध्यातें पानें आणुं पाठवीलें.

**५३१.** १ **मुरा.** वेसीपासि.

**५३२.** १ **एवा.** दक्षीणामुख.

केलें : चौकीं आंगीटोपरें फेडिलें[२] : मग गोसावीं फूटा प्रावर्ण करूनि भीतरि बीजें केलें : मांधानीचें उदक घेउनि लींगासि स्तपण[३] केलें : गोसावीं उपाध्यांतें वीडा मागीतला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : वीडे दया :" मग तेहीं साधारणें ऐसीं पानें : सानें[४] ऐसें पोफळ : ऐसें देओं बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा देववीडा देत असा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा नको : चोखटु आणा :" मग तेहीं बरविं पानें : बरवें[५] पोफळ : ऐसा वीडा दीधला : गोसावीं माधाणीं वीसुळिला : लींगासि वीडा वाइला : मग दोहीं श्रीकरीं लींग धरिलें : मग गोसावीं बाहीरि बीजें केलें : नासीपासि आडदांडी होती : तेथ गोसावी उभे होते : मग उपाधीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : देववीडा म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु[६] देवतेसि जाए : हडपीयातें[७] म्हणे : 'आरे : वीडा दे[८] :' तो चोखें पानें : बरवें पोफळ : ऐसी दे : तो म्हणे : 'आरे : देववीडा देइ : देववीडा दे :' मग तो काळीं ऐसीं पानें : घोटें ऐसें पोफळ : ऐसा दे : मग तें तो देवतेसि वाये :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो[९] देवतेतें नाडी : मा देवतां कोणें कामें गा नाराए :" तैसेंचि गोसावीं देउळ सवीयें[१०] घालुनि बीजें केलें : देउळिचीया दारवंडा[११] श्रीकरें धरूनि भीतरि अवळोकिलें : ।।

## ५३३ नींबातळि वीस्णुभटां भेटि

तैसेंचि गोसावीं बीजें केलें : *जगतीबाहीरी टेंकाखालि पश्चिमे थडीयें*[१] पींपळु असे : तेयाचां वाव्य पालवीं परता ऐसा नींबु होता : तेथ आसन : तवं वीस्णुभट गंगेकडौनि वीज्ञानेस्वरासि जात असति : हातीं तांबवटीए[२] तूळसी : तवं गोसावीयांतें देखिलें : मग गोसावीयांकडे आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीं श्रीकरें स्परीसिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : ब्राह्मणु कैसा तापसु[३] ! ऐसी पाठि करपौनि गेली :" मग गोसावीयांचे श्रीचरण उदकें सींचन केलें : तुळसी वाइलीया : मग ते नीगाले : विष्णुभटीं[४] म्हणीतलें : "माहाजनांपुढां सांघावें : गोसावीं बीजें केलें असे :" तैसेचि ते नीगाले : माहाजन माहालक्ष्मीएचां देउळीं बैसले होते : तवं वीस्णुभटीं[५] म्हणीतलें : "आगा : काइ बैसले असा ? उठा उठा : गोसावीं बीजें केलें असे :" तेहीं म्हणीतलें : "कोणी ठाइं ?" "ना वीज्ञानेस्वरिचेया नींबातळि असति :" तैसेचि ते उठिले : आपुलेया घरासि गेले : जें जेयांतें असे तें तेणें दरीसनालागि घेतलें : गावीं घरोघरीं सडेसमार्जनें

२ **पंगोहबी.** ठेविलें. ३ **पंहबी.** तर्पण. **मुरा.** स्तर्पण. ४ **पंगो.** सानीं ऐसीं पोफळें. ५ **पंगो.** बरवीं पोफळें. ६ **मुरा.** °सदर्थु. ७ **अ.** हडपातें. ८ **पं.** देवपोफळ दे. ९ **मुरा.** ते देवतेतें वंचीती. १० **पंगोमुरा.** सव्यें. ११ **अ.** दारवठा. **हबी.** दारसंका.

**५३३.** १ (**मु.**). २ **हबी.** तांभाण : ३ **पंगो.** °म्हणौनि श्रीकरें स्परीसु केला : तयाची पाठि उन्हें करपौनि गेली होती. ४ **अपं.** उपाधीं. ५ **एवा.** उपाधीं.

केलीं : चौकरंगमाळिका भरिलीया : घरोघरीं गुढीया उभिलीया : वेसिद्वारीं तोरण बांधलें : ऐसें नगर श्रींघारुनि मग दरीसनासि नीगाले : गोसावीयांसि दरीसन जालें : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांसि जें जेयांतें होतें तें तेणें दर्सना केलें : *मग बैसले : श्रीमूर्ति अवळोकीत : गोसावीं तेयातें प्रतक्षाकारें पुसीलें : ऐसा अनुकारू*[६] *:* मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं बळ्हेग्रामासि बीजें करावें : तेथ सत्यादेवीचें देउळ असे : बरवी गुंफा असे : तेथ गोसावीं बीजें करावें :" उपाध्यांची वास पाहिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां बटिका ?" "तरि काइ जी : गोसावीं तेथ बीजें करावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : ।।

## ५३४ बळ्हेग्रामीं गुंफे ओवाळणी : अवस्थान

गोसावीं तेथौनि बीजें केलें : सरिसे भक्तजन : गोसावी उपाध्यांचेया खांदावरि श्रीकरू घालुनि वरि भक्तजनीं चांदोवा धरिला असे : ऐसें गोसावीं बळ्हेग्रामासि बीजें केलें : गुंफेसि उजवीएकडे पटिसाळेवरि गोसावीयांसि आसन जालें : तवं लाखाइसें आपुलीं सुन[१] आरतीसीं गोसावीयांतें ओवाळावेया पाठवीली : गोसावीयांतें ओवाळिलें : तेयांतें एतां देखिलें : आणि एरी घरीचीया स्त्रीया[२] ओवाळावेया आलीया : गोसावी आसनिचा वीडा तेयांचेयां थाळां घालीति[३] : गोसावीयांतें ओवाळीति : असकेया गावांतु एकीसि गोसावीयांचें दर्सन नव्हेचि : तीचा भातारू तीसि एओं नेदीचि[४] : *सत्यादेवी-चिए न्हाणिचेया कोनटेयापासौनि उपाध्ये : नाथोबा : गोसावीयांचा पुजाअवस्वरू पाहात होते : तवं नगरीचिया आवघीया सोवासीनी गोसावीयांतें ओवाळुं आलीया : श्रींघार करुनु : तेयां-मध्यें सीरोवेरी देवताही आलीया : खळींवं साउले : खळीचीया चोळीया : कनकाचे परीएळ : रत्नाचे दीप : ऐसीया सीरोवीरीं उपाध्ये नाथोबा देखति : नाथोबा उपाध्यातें पुसति : "हे अमुकेयाची सून : हे कोणी बाइल ? हे गावीं अपूर्व बाइल :" उपाध्ये म्हणति : "मी नेणें"* ऐसी पाहारू रात्रि गोसावीयांसि ओवाळणी जाली : मग माहाजनां पाठवणी दीधली : ।।

## ५३५ उपाध्यां नाथोबा दृष्टांतद्वारें संबोखू

उपाध्ये आणि नाथोवा सत्यादेविचेया न्हाणीचेया कोनटेयापासौनि गोसावीयांचा अवस्वरू पाहात होते : ते एउनि गोसावीयांजवळि बैसले : *तेहीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : मध्यें सीरोवीरीं अपूर्वा बाइला कोणी ? गावींचीया तरि आम्हीं ओळखतसों :"* सर्वज्ञ

---

६ (**गो.**).

**५३४.** १ **मुरा.** °श्रींघारूनि. २ **मुरा.** °आक्षेवाणेंनसि वोवाळीति. ३ **मुराहबी.** °येरांचा वीडा येरां देति. ४ **मुरा.** (**एवा.**) °पाहार रात्रीं सभा घनदाट बैसली : दाटनी जाली : वीळीचां गोपाळ आले : उपाध्ये आणि नाथोबा सत्यादेवीचिये न्हाणीयेचेया कोनटेयापासौनि गोसावीयांचा अवस्वरू पाहात होते. मग मांदी देखौनि गोसावी सभेसि पाठवणी दीधली : ५ (**पंगोभ.**).

*म्हणीतलें : " तीया देवता गा : यथ ओवाळावेया आलीया होतीया गा : " मग तेयांसि आश्चर्य[1] जालें :* गोसावीं दोन्ही श्रीचरण दोघांचीए मांडीएवरि घातले : ते श्रीचरण रगडूं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : तुम्हां नीरोधू जाला ? " तेहीं म्हणीतलें : "जी जी : काइसा नीरोधू ? काहीं नाहीं : गोसावीयांचा अवस्वरू पाहात होतों : " बाइसीं म्हणीतलें : "वटिका : बाबाएं कैसा अवघेयांसि अवस्वरू दीधला : " तीहीं म्हणीतलें : " हो बाइ : आम्हीं[2] पाहात होतों : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " रायासि[3] मंडळीकांचीया ओळगा होति : मग धाकुटे[4] असति : ते परते जाति : मंडळीक जाती : मग एति : मग तेचि मा तेचि : मग[5] तेहींचि घेणें देणें : " *म्हणौनि उपाध्ये : नाथोबा संबोखीलें[6] :* ।।

## ५३६ लाखाइसाचा उपहारू स्वीकारू

मग बाइसीं गोसावीयांसि पुजाअवस्वरू केला : तवं लाखाइसांचा उपाहारू आला : गोसावीयांसि व्याळी जाली : गुळुळा : वीडा जाला : गोसावीयांसि सयेनासन जालें : पहुडु जाला : ।।

## ५३७ राणाइ वेसी पाओ लावणें

गोसावी सएनासनिं असति[1]: तवं राणाइसें आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एवढेयां वेळा आलींति ? बीहां ना ? " " ना जी काइसेयासि बीहों[2] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि वेसी पाओ लाउनि या पां : " आणि तीएं गेलीं : वेसीसि पाओ लाविला : तवं बाबरझांटि : गुंजावर्ण डोळे : खांदावरि मुदगलु[3] : माहाप्रचंडू[4] : ऐसा पुरुषु[5] देखिला : आणि बीहालीं : तैसींचि गोसावीयांपासि आलीं : गोसावीयांपुढां सांघों लागलीं : "जी जी : मीं तेथ गेलीएं[6] तवं : बाबरझांटि : गुंजावर्ण डोळे : खांदावरि मुदगलु[3] : माहाप्रचंडू[7] : ऐसा पुरुषु देखीला : हां जी : तरि तो कोनु ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[8] : तो ब्रह्मनाथू : एथिचीए ओळगेसि आला असे : " ।।

## ५३८ राखसेया हटें नमस्कारू स्वीकारू

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावी सत्यादेविचां आंगणीं उभे असति : अवघे माहाजन गोसावीयांसि दंडवत करीति : राखसे रामदेव ते न करीति :

---

**५३५.** १ (**पंगोभ.**). २ **हबी.** °आळगौनि. ३ **मुरा.** " रायाचिये ओळगे राणेमंडळीक एति : ओळग भरे : आंगाजवळीकेचे धाकुटे परते सरेति : मग ओळग वीसर्जे : मग तेचि मां तेचि : " ४ **हबी.** सेवक. ५ **एवा.** मग तेहींच घेपे. तेहींचि देपे गा : ६ (**हबी.**).

**५३७.** १ **हबी.** °मोटकाचि पहुडु जाला : तवं—. २ **भगो.** भीयों. **ह.** भेइन. **बी.** भीन. **मुरा.** भीउनि. ३ **मुरा.** आगळ. **एवा.** लोहाचा मुदगलु. ४ **पं.** °प्रबतु. ५ (**भ.**). ६ **अ.** गेलीं. ७ **पं.** °प्रबतु. **गो.** °परभतु. ८ **एवा.** " बाइ : ते ग्रामदेवता : एथिचीए ओळगेसि आली असे : "

ते गोसावीयांजवळि उभे असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "लंकनाथा[१] : तुम्हीं एथ नमस्कारू न करा तें काइ ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं[२] माहादेवासि करूं : कां माहादेओ दाखवी तेयांसि करूं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "लंकनाथा : एथौनि तुमचा नमस्कारू एकु घेणें आति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं आपुला माहादेओ ओळखा ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कैसा असे ?" तेहीं म्हणीतलें : "कर्पौरगौरू[३] : व्रीखभवाहान[४] : अर्धांगीं पार्वती : पंचवगतृ : त्रीनेत्रु[५] : खटवांगकपाळ[६] : पींगटा जटै : वाघांबरपहीरण[७] : त्रीसुळु : डबुरू : ऐसा असे जी :" गोसावीं वरती वास पाहिली : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "हा घेया गा तुमचा माहादेओ :" मग तेहीं पाहिलें : गगनमार्गें एतु देखिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "चांग पाहा :" मग तेहीं चांग पाहिलें : मग दंडवत घातलें : उठीती तवं नेदखति[८] : मग गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : "जी जी : गोसावीचि माहादेओ :" तीं उठुनि गोसावीयांसि दंडवत करीति : "दसानना[९] एया : लंकनाथा एया :" *ऐसीं नावें ठेविलीं*[१०] : ।।

## ५३९ जोमाइ नृत्य दीपन सक्ति देणें

गोसावीयांपासि भक्तिजनें रूचीअरूचीचिया गोष्टी करितें होतीं[१] : तवं जोमाइसीं म्हणीतलें : "जी जी : मज लांकांचें ढीडरें रूचे : परि पचे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा गा : कऱ्हाडबाइयांचां घरूनि लांकांचीं दोनि ढीडरीं घेउनि या :" दोनि ढीडरीं घेउनि आलीं : तवं एकीं म्हणीतलें : "जी जी : यातें जाखीराचा देव्हारा असे[२] : सुपलीया असति : गाओं जाणति : नाचों जाणति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें नाचण एथ दाखवावें :" तेहीं म्हणीतलें : "जी जी : मी सुपलीयावीण नाचों नेणें :" मग गोसावीं एकांचां घरूनि सुपलीया आणवीलीया : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : घांसु घेयावा : गावें नाचावें : सुपलीया वाजवावीया : एथिची वास पाहावी :" तवं तीएं घांसु घेओं जाति तवं गाणें ठाके : गाओं जाति तवं सुपली वाजवणें ठाके : ऐसें एकएक ठाकत जाए : गोसावी म्हणति : "हो घांसु ठेला : हो गाणें ठेलें :" ऐसी गोसावी चुकी सांघत जाति : तोंडेंहूनि सापन[३] नीगे : गोसावी म्हणति : "मा मा : *नीकें मा*[४] :" ऐसे तोखति : हांस्य करीति : ऐसी गोसावीं लीळा केली : मग तीए देउनि तेयांसि लांकांचें अन पचे : ।।

---

**५३८.** १ **मुरा.** °"एथ एहीं आवघां नमस्कारू केला——. २ **मुरागो.** °कव्हणांहीं नमस्कारू न करूं——. ३ **मुरापंगो.** कर्पूर°. ४ **भ.** वृषभवाहान. **गोह.** व्रीखभवहन. **बी.** वृषभवहन. ५ **पं.** °डौर. ६ **हबी.** खडांग°. **अ.** खटग°. ७ **मुरा.** °प्रावर्ण. ८ **अ.** न देखति. ९ **अ.** दसाभना. १० **(मु.)**.

**५३९.** १ **मुरा.** °गोसावीं अवघेयातें पुसिलें : मग जोमाइसातें म्हणीतलें : "बाइ : तुम्हां काइ रुचे ?" तवं——. २ **मुरा.** °यें सुपलीया नाचों जाणति. ३ **पं.** ससु. **गो.** फेसु. ४ **(हबी.)**.

## ५४० कामाइ पंचनामकरण

कामाइसें तीएं राणाइसांची बहीणि: आवेयाऐसी[१] डोइ: इउलेऐसे[२] कान[३] : वेखंडऐसे दांत : मुडबाह्याची[४] चोळी[५] : ऐसी गोसावीयांचेया दर्सनासि आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : गोसावीं पुसिलें : "वाइ : तुम्हां नावं काइ?" "जी जी : मज काउं काउं ऐसें म्हणति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काउ : काविणी : कामाक्षा : कावसेना : कावीणीदेविचें[६] खेळवणें[७] :" ऐसीं गोसावीं पांच नावें ठेविलीं : ।।

## ५४१ चाटेयां अह्वानीं अगाधत्व नीरूपणें

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें गोसावीं सत्यादेवीचेया देउळासि बीजें केलें : सरिसे उपाध्ये असति : दोन्ही दारवंडा श्रीकरीं धरूनि भीतरि अवळोकिलें : तवं भीतरि चाटुरुवें पढतें होतीं : तेहीं म्हणीतलें : "चांगदेओ राउळो या : चांगदेओ राउळो या :" गोसावीं तैसेंचि[१] बीजें केलें : मग *मार्गीं*[२] उपाधीं म्हणीतलें : "जी जी : कैसे माहाजनाचे मुल मातले असति : 'चांगदेओ राउळो या : चांगदेओ राउळो या :' उठावें : गोसावीयांसि दंडवत करावें : श्रीचरणां लागावें : तें नाहीं :" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें नेणों काइ येक तें तुम्हांसि कीं : यांसि काइ? हें अगाधांचें अगाध[३]:" सर्वज्ञें म्हणीतलें : "*कव्हणी एकु डोहाचीये थडियें बैसला असे : तेथ*[४] कव्हणी एक वेडसु वेडसु *ये : तो*[५] उदकाचेनि[६] स्वछ नीर्मळपणें आंतुल खडेखूपटें[६] आहाच[७] देखे : मग *आंगीची बाहे वरौति सारूनि*[४] हातु घाली : तवं हातें न पवे : मग पाओ घाली : तवं पाएंहीं न पवे : मग[८] अवघें[९] फेडूनि : पडदणी घेउनि : आंतु रीगौनि बुडकळी दे : तवं तेणेंहीं न पवे : मग डोहाचीए थडीए बैसला असे : तो म्हणे : 'आगा : हे अक्षोभ उदक : तुं भलतेहीं करि पां : जरि पावसि :' *तैसें हें आगाधाचें आगाध कीं गा*[१०] :" ।।

## ५४२ मांडवखडकीं आसन : तथा मांडवी कथा नीरोपण*

[एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरू जालेयानंतरें गोसावीं वीहरणासि मांडवखडकासि बीजें केलें : तेथ आसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें मांडव रीखीचें

---

**५४०.** १ **हबी.** फुरसैली ऐसी. २ **गो.** वेउले°. ३ **मुरा.** केश. ४ **गो.** मडतुराबाहीयांची. **मुरा.** मुडियां°. ५ **हबी.** °काळि मसिऐसीं तानवडे. ६ **गो.** कावदेवीचें. ७ **रा.** खेळणें. **ह.** क्षेवणें.

**५४१.** १ **पंगो.** °भीतरि. २ (**मुरा.**). ३ **पंमुरा.** °यावरि गोसावीं खडेयाखुपटयाचा दृष्टांतु नीरोपीला. ४ (**दृपा.** १५. खडेयाखुबटेयाचा दृष्टांत). ५ **दृपा.** °उदकाचें स्वछ निर्मळपण देखौनि. ६ **भ.** °खुबटे. ७ **दृपा.** असळग. ८ **दृपा.** °पडदनी घेउनी बुडी दे : ९ **गो.** आवघीं वस्त्रें. १० (**गोह.**) **बी.** °हे आगाधाचें आगाध गा :" हाच दृष्टांत पुढे उत्तरार्ध ४६ या लीळेत आलेला आहे.

**५४२.** ***अमुराबीह.** प्रतीत 'मांडवखडकीं आसन : मांडवीकथा निरोपण' अशी आदि असून तेथे 'गोसावीं मांडव रीखीची कथा निरोपिली' एवढाच उल्लेख आहे. कथा नाही. येथे या कथेची ही

खडक गा : एथ तो तपअनूष्ठान करी :" मग वाइसीं म्हणीतलें : "बाबा : मांडव रीखी म्हणिजे काइ ?" यावरि गोसावीं मांडव रीखीची कथा सांघीतली :

सर्वज्ञें म्हणीतलें : "मांडव रीखि तो अठयासीसहश्रा रीखीआंतुल : तो एथ तप करी : ते एकु दीं तेयाचीए वस्त्रीं उ नीगाली : तेणें कांटेनि टोचुनि सुळी दीधली : तेया पापातव मग तोही सुळी दीधला :"

सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : चोरीं गावीं एका खाण घेतलें[1] : मागु पडीला : ते मागें-मागेंचि आले : तवं चोरीं एकदोनि पदार्थ तेयापुढें ठेवीले : आणि ते नीगौनि गेले : तवं मागु आला : मोसु तेयापासि देखीला : आणि चोरु म्हणौनि धरीलें : "दीहा एथ असति : आणि रात्रीं खाणे घालीति : तो आपण वाटा घेतला : तेयातें नीणौनि दीधलें :" म्हणौनि धरुनि नेलें : ते मागीला पापातव सुळी दीधलें :" ।। ]

## ५४३ सांडल्याकौंडल्याआख्यायिका कथन*

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या गावां नावं पुर्वी सत्यापुर : मग बळ्हेग्रामु जाला :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बळ्हेग्रामू काइसेयातव जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मांडव रीखि एथ तप अनुष्ठानीं बैसला होता : तवं माथेयावरौनि बळ्हे गेली : तेया वीष्टि केली : ते तेयाचीए डोइएवरि पडीली : तेहीं ते हातेंकरुनि पाहीलें : तवं वीष्टि देखीली : आणि वरुती वास पाहीली : तवं वळ्हे जात देखीली : ते श्रापुनि खालि पाडीली : तो बळ्हेग्रामू जाला :"

एकु दी मांडव रीखि भीक्षेसि गेला : ते सांडल्या आणि कौंडल्या तीया दोघी बहीणी : कौंडल्या ते वनीं तप करी : सांडल्या ते घरवात चाळी : ते पतिव्रता : एकु दीं आपुलेया पतीतें न्हाणीति होती : तवं तीए वनीं अग्नी लागली : कौंडल्या ते कष्टीनी : जळवे ना : ते जळैल म्हणौनि तीया आपुलेया पतीतें न्हाणीतां भवंती धार दीधली : परि तो उगाचि होता : एकु दीं नीजैला होता : सांडल्या ते पाए तळ्हातीति होती : तवं मांडव रीखि भीक्षेसी आला : तीया म्हणीतलें : "नावेक चालावें :" तें तेणें तीची वास रोखें पाहीली : आणि तीया म्हणीतलें : "वास पाहातां : मी नव्हे काइ वळ्हे : मां श्रापुनी खालि पाडीसी :" तेणें मनीं वीचारीलें : "हे पतीव्रता होए : इसि श्रापु न चले :" मग गेला :

---

लीळा **आगो,गो₂** प्रतीतून घेतली आहे.

१ (**प्रवा** : °घोडा काढीला : तो आणूनि तेयांपासि दीधला : आपण नीगौनि गेले : तवं मागीलाकडौनि धांवणें आले : तवं घोडा देखीला : आणि तेयांतेंहीं देखीलें : मग धरूनि घेउनि गेले : तेयांचें आवघें आंग खरडैलें होतें : घोरपडेंचेयाऐसें जालें होतें : एकु म्हणति "हे ऐसें काइ करीती ? हे रीखेस्वरू :" परि मागीला पापातव सुळी दीधलें : ।।)

**५४३.** *ही लीळा **आगो, गो₂** प्रतीतून घेतली आहे. **अमुराबीह**. प्रतीत ती नाही. मांडव्य ऋषीशीच तिचा संबंध असल्यामुळे मूळ 'लीळाचरित्रा'त ती असावी.

तवं तीचेनि भातारें पुसीलें : "तुं कोणेसीं बोलीलीसि ?" तीया म्हणीतलें : "ना कोण्हेसीं नाहीं :" "ना हें सांघ : तैं तरि तैं धार दीधली : आजि तरि आजि कोणेसीं बोलीलीसि :" मग तीया आवघी गत कथा सांघीतली : मग तेणें म्हणीतलें : "तीचेया तपाहोउनि तुझें पतिव्रतपण काइ थोर ?" तीया म्हणीतलें : "होइल : आणि काइ ?" मग तो तेया वनासि पाहावेया गेला : तवं आवघें रान जळीनलें असे : तीया धार दीधली तीतुकें वांचलें : मग तेयांसि पतिव्रता ऐसें उमटलें : आणि थोरी आली : तो आवघेया लोकाप्रति सांघे : जें 'हे पतिव्रता' ऐसें : ।। ]

## ५४४ डोणि[1] उतरौनि पंचाळेस्वरीं अवस्थान

तेथौनि गोसावीं बीजें केलें : पींवळदरडिवरिलीकडे ओतापासि डोणीसि[2] गोसावी बैसले : बाइसें मुक्षकरूनि अवघीं भगतिजनें बैसलीं : गोसावी गंगा उतरले : नावेक[3] रोकडां आसन जालें : पंचाळेस्वरीं पंचरात्रि अवस्थान : पुढीली लींगाचीए देउळीये पुजाअवस्वरू : आरोगण होए : ।।

## ५४५ श्रीदत्तात्रप्रभूचें गुंफास्थान दाखवणें

गोसावी दोणि उतरले : तैसेंचि श्रीदत्तात्रप्रभूचेया गुंफास्थानासि बीजें केलें : गोसावी तेथ उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा श्रीदत्तात्रप्रभूचें गुंफास्थान :" *मग गोसावीं तीर अवलोकीलें : सर्वज्ञें म्हणीतलें[1] : "हें तीर[2]* श्रीदत्तात्रप्रभूचां चरणीं चरणांकीत *घाला घाला दंडवतें :" मग बाइसें मुख्यकरुनि समस्तीं भक्तजनीं दंडवतें घातलीं : गोसावीं दोहीं श्रीकरीं जय केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ प्रतिदिनीं आद्यापि श्रीदत्तात्रयप्रभु पाणिपात्र करुनि आरोगण करीताति : एथ श्रीप्रभूसीं श्रीदत्तात्रयप्रभूचें दर्शन जालें : एथचि दोहीं देवां एकत्र क्रीडा :" म्हणौनि गोसावीं श्रीकरें गंगेमध्यें तें स्थान दाखवीलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरू भज्य : संबंधु वंद्य : वस्तुसंबंधें शक्तिनिक्षेप :" भक्तिजनीं जाउनि तें स्थान नमस्करिलें : गोसावीं तेथौनिचि जय केलें : म्हणौनि श्रीकरें दाखवीलें : मग पंचाळेश्वरांतु बीजें केलें[1] : ।।*

## ५४६ जोमाइचा उपाहारू

जोमाइसांची माता वेसाइसें[1] : *तीयें दादोसासि काहीं सोइरी होती[2] :* तेहीं दादोसांतें म्हणीतलें : "रामा : ए जोमाइचीं लेंकरूवें जीति ना : तरि तुझेनि काहीं

---

**५४४.** १ **अ.** दोणि. २ **अ.** दोनीसि. ३ बोचिरीं धानाइसांचीया वासना°.

**५४५.** १ (**मुरा.**). २ (**मुरा.**) **अपंभगो.** स्थान.

**५४६.** १ **हवी.** लाहामाइसें. २ (**गोहवी.**).

होइल[३] तरि काहीं करि कां :" दादोसीं म्हणीतलें : "माझेनि होए ऐसेंहीं आति : नव्हे ऐसेंहीं आति : आमचेया गोसावीयांचेया दरीसना जा : मां होइलचि :" "*ना तुमचे गोसावी कवणी ठाइं असति ?*" "*ना पंचाळेस्वरीं*[४] *:*" मग तीएं गोसावीयांचेया दरीसना पंचाळेस्वरासि आलीं[५] : गोसावीयांसि[६] रीगतां उजवीया हाता वेदिका : तेथ आसन : गोसावीयांपुढां अग्नीष्टिका[७] असे : तीएं आलीं : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं[८] : गोसावीं तेयांची पाठि श्रीकरें स्परीसिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ वाइ : लेंकरूवीं सीणवीलींति[९] ?" मग वेसाइसें सांघों लागलीं : "जी जी : मीयां रामातें म्हणीतलें : 'रामा : ए जोमाइचीं लेंकरूवें जीति ना : तरि तुझेनि काहीं होइल[३] तरि करि कां :' तो म्हणे : 'माझेनि होए ऐसेंहीं आति : नव्हे ऐसेंहीं आति : गोसावीयांचेया दरीसना जा : मां होइल :'" गोसावीं उगेयांचि आइकिलें : तेहीं गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीयांलागि उपाहारू आणिला : गोसावीयांसि आरोगण दीधली : गुळुळा : वीडा जाला[१०] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : हांडीए उरलें असे तें अन तुम्हीं जेवा :" मग तेयांसि तीनि लेंकरूवें जालीं : तीएं जीयालीं : *प्रसरामबासाचे पीते*[११] *: यकि चुलते : यकि आत*[१२] *:* ।।

## ५४७ उपाध्यां भेटि

तीएचि वेदिकेसि गोसावीयांसि आसन असे : गोसावीयांपुढां सगडी असे : तेधवां उपाध्यांसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ।।

## ५४८ द्रव्यनीक्षेपु कथन

नींबाचां[१] पस्चिमीली पालवीं आंगणीं गोसावीयांसि आसन : जवळे भक्तजन असति[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "या नींबातळि[३] नवघट द्रव्या असति : चोडा[४] रायाचीया बरें बैसलिया : तें एथचि पुरिलें :" ।।

---

३ **गो.** होववैल. ४ (**हबी.**). ५ **हबी** °तेसणेयांचि वेळां भेटि होए : वोतु पावतां : दंडवत घातलें—. ६ **मु.** °उदयांचां वेळीं उत्तरीला सीहाडेयाकडे आसन : ७ **मुगो.** सगडी. ८ **मु.** नारिएळ दर्शना केलें : बैसलीं : गोसावीं नारिएळ श्रीकरीं घेतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा ?" "जी जी : फळ एक :" ९ **मु.** श्रमलीति ना ? १० **मु.** °मग मडकीं वोपीतां गोसावीं बाइसांतें म्हणीतलें : "नावं नावं अवघां ठाइ राखा :" मग बाइसीं कणुकणु अवघां मडकां राखीलें :—. ११ **मु.** °तया नावं खेइदेवपंडित : १२ (**गोमुहबी.**).

**५४८.** १ **गो.** पींपळा पसिमीली—. **मु.** गोसावीयांसि पुढीला पारावरि आसन असे. २ **मु.** °गोसावी पौळीचेया कोनटेयाकडे दाखवीलें : "एथें एका रायाचे नवघट द्रव्या असति :" ।। ३ **गो.** पींपळातळि. ४ **गो.** चूडा (**भ.** चोड. **ह.** चौडा) रायाची बरीं बैसली :°.

## ५४९ वीस्वनाथदेवां धातु कथन

गोसावीं[१] वीहरणासि बीजें केलें : पींपळाचीए दक्षिणीली पालवीं गोसावीयांसि आसन असे : वीस्वनाथदेव ते नाथपंथी माहात्मे : गंगेकडौनि गावांकडे जात होते : गोसावीयांतें देखिलें आणि जवळि आले : तेहीं गोसावीयांतें पुसिलें : "आपण पीवळी दांडी करूं[२] जाणिजे ?" गोसावीं श्रीमुगुटें नीराकारिलें : "तरि पांढरी दांडी करूं[२] जाणिजे ?" गोसावीं श्रीमुगुटें नीराकारिलें : मग तो गेला : मग नाथोबाएं पुसिलें : "जी जी : पीवळी दांडी म्हणिजे काइ ? पांढरी दांडी म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*तांबेयाचें*[२] सोनें कीजे तेयांतें पीवळी दांडी म्हणिजे : *कथिलाचें*[२] रूपें कीजे तेयांतें पांढरी दांडी म्हणिजे :" "जी जी : हें कैसेनि कीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें[३] काइ करावें असे ? आणा पैलु सेणाचा पो : आणि तांवतौली : *तुमचीये पानवैयेवारी झाड आहे : तें आणा*[४] : मां एथौनि करूनि दाखवीजैल :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो[५] : तुम्हीं नासाल :" म्हणौनि न करितीचि : ।।

## ५५० पुस्चळीके अभीयोगें ब्राह्मणु रक्षणें

गोसावीयांसि पींपळातळि[१] बुढेंसीं आसन असे : अनंतदेव ते आपेगाविचे : तेयांसि पुस्चळकैचा[२] अह्वलाओ[३] आला : तेयांतें मारावेया राखत होते : तैसेचि ते धावीनले : तेहीं गोसावीयांतें देखिलें : गोसावीयां उजुचि आले : आणि गंगेआंतु घातलें : ते आवघे गंगावेऱ्हीं तेयापाठीं लागले : अनंतदेव गोसावीयांपासि आले[४] : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : नावेक होते : मग गोसावीं पुसिलें : "भटो : तुमतें कुदळीपाउडें असे तरि आणा : जा :" तेहीं म्हणीतलें : "असे जी : परि मज पुस्चळकैचा[२] अह्वलाओ[३] आला असे : ते मातें[५] मारावेया आले जी : गोसावीयां जवळा आलां म्हणौनि वाचलां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : आतां तुमचें कोण्ही काहीं न करी :" तैसेचि ते आले : *तेयां आवघेयांवरौनि घरा गेले : तीं म्हणीतलें : "हा रे : हा जरि तैसा होए तरि मागुता ए*[६] : " माता म्हणीतलें : "का रे बा : तुं आलासि ? तुंतें मारावेया धावीनले :" तेहीं म्हणीतलें : "तुं भी नको : माझें कोण्ही काहीं न करी :" तैसेचि ते कुदळीपाउडें घेउनि आले : तवं पारिचे आवघे बोलों लागले : "हा रे : तुआं देखिलें ?" तो म्हणे :

---

५४९. १ **मुरा.** गोसावीं जखीणीचिये देउळीं बीजें केलें : आसन जालें : २ (**गोमुराहबी.**). ३ **मुरा.** "एथ काइ सायास ?—. ४ (**गो.**). ५ **मुरागो.** °मग हें तुम्हां नाहीं :" नाथोबायें म्हणीतलें : "जी जी : आम्हांतें चाड नाहीं :"

५५०. १ **मु.** °उभे असति. २ **अ.** पुश्चळीकेचा. **रा.** पुश्चळकीचा. **मु.** प्रथम दोषाचा. ३ **मु.** अभियोगु. **बी.** आळ. ४ **मुरा.** °येतुलेनि तयांची रोखबुधि गेली. ५ **मु.** °मारिती" : सर्वज्ञें म्हणीतलें : "न मरीति :" ६ (**भगोहबी.**).

"मज एणें सांघीतलें : ऐसें एरीं एरां सांघीतलें : ऐसें लटिकें जालें : ओखटें जालें होतें : ब्राह्मणु[७] कपाळीं बैसला होता :" मग ते कुदळीपाउडें घेउनि आले : गोसावीयां जवळे आले : गोसावीयांपुढें अवघें सांघीतलें : तेयांची माता : तेयां हातीं गोसावीयापुरता उपाहारू पाठवीला : ।।

## ५५१ गंगातटीं गुंफा करवणें

गोसावी पींपळाचीए पुर्विली पालवीं आसनीं उपवीष्ट असति कीं उभे असति तें नेणिजे : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ गुंफा करा गा :" बाइसीं म्हणीतलें : "बाबासि काइ एथ असावें ठेलें असे ? बापुडीं बटिकुरें काइसेयां वीचंबीजतें[१] असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तैं[२] एथ ऐसीचि प्रवृति होती : जें तान्हैलेयां पाणी पेओं न मगिजे : आतां एथ ऐसी प्रवृति जें गुंफा केलेयांवांचौनि आरोगण न कीजे :" येयाउपरि अंध्रदेसिचीया तेलीकाराची गोष्टि सांघीतली[३] : सांघों सरली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया घेया बापेया : वेगु करा :" भक्तिजनीं कुदळीपाउडें घेउनि गुंफा केली :

मग बाइसीं गावांआंतुनी डेरा आणिला : पाणीं ठेविलें : गोसावीयांसि गुंफे मर्दना जाली : मादणें जालें : गोसावीयांचेया मादणेयाचें उदक गंगेसि मीनलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ स्नान करा गा :" धारेचें उदक कुंडासि मीनलें : संपुर्ण सोमवारी वर्तति असे : गोसावीं तेथ बीजें केलें: "काइ गा अभ्रितस्नानें होतें असति ?" "जी जी :" ऐसें दायांबा सांघति : मग गोसावीयांसि आरोगण जाली : पहूडू जाला : उपहूडू जाला : मग भक्तिजन भीक्षेसि पाठवीले : तेथचि अवधूताचेया खांदावरि आरोहण केलें : गोसावीं भोजनतेयासि बीजें केलें : गोसावीयांसि भोजनतां आसन जालें : ।।

## ५५२ भोजनतां सुक्रदरिसनीं जोतीकप्रसंसा

मग अवघीं भगतिजनें तेथ भीक्षा करूंकरूं आलीं : झोळीया दृष्टभुता केलीया : गोसावीयांसि तेथ आरोगण जाली : भगतिजनां जेवणें जालीं : धूळिरा समे तवं गोसावीयांसि नावेक आसन जालें : तवं सुक्र नीगाला : बाइसीं पुसिलें : "बा बा : हें कवण नक्षेत्र ?" सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "बाइ : बटिकातें पुसा :" बाइसीं पुसिलें : "बटिका : हें कोण नक्षेत्र ?" तेहीं म्हणीतलें : "बाइ : हा सुक्र :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : सुक्र ऐसें काइसेन जाणिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जोतिकातव जाणिजे :" "जोतिकातव

७ **गो.** ब्रम्हकपाळ लागलें होतें.

**५५१.** १ **अगो.** वीचंबावीं. **मुरा.** सीणवीजतें असति. २ **एवा.** पुर्वी. ३ मागे पूर्वार्ध लीळा २६ पाहा. **गोभ.** अवभ्रित. **पंबी.** अभुरी.

**५५२.** १ **पंगो.** °बटिका : हें नक्षत्र कवण ऐसें तुम्हीं जाणा गा ?" "जी जी : हा सुक्र :"

कैसा[2] जाणिजे बाबा ?" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "गर्गाचार्यें आपुलेया पुत्राकरवि जोतिकास्तव एकु जन्म व्रतविलें[3]: तेणें सात जन्में व्रतिलीं[4] : सातवें जन्म तें कुष्टीयाचें देखिलें : आणि तो मुर्छा येउनि पडिला :" तेणें म्हणीतलें : "हें काइ ?" उठवीला : सावधु केला : मग तेणें म्हणीतलें : "ताता : मजकरवि तुम्हीं एक जन्म व्रतवीलें : तीएं मीयां पुढिलें सात जन्म व्रतिलीं : सातवें जन्म कुष्टीयाचें देखिलें : आणि मज मुर्छना आली :" तेहीं म्हणीतलें : " तुज इतुकेया जावेया कार्य काइ? तुजकरवि एक जन्म व्रतवीलें : तूवां सात जन्में कां व्रतिलीं ?" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "लोकिचा ब्रह्मवीदु : अवघेयां आचार्यां अग्रणी[5] होउनि व्रतत होता : पहीली आंगुळी पडे : समादीमध्यें सात देहें वीसर्जीलीं : एसणीए सामग्रीयेचा : एसणीया सामृथ्याचा : सेवटीं गगनीं नक्षेत्र होउनि ठेला :" पंचाळेस्वरीं[6] अवस्थान दीस पांच : ।।

## ५५३ बळ्हेग्रामीं गुंफे वसति*

मग गोसावीं बळ्हेग्रामासि बीजें केलें : वीळीचां गुंफे वसति जाली : [ गोसावीं बीजें केलें ऐसें कोण्ही नेणेति : उदयांचि भक्तजनें रीगतांनीगतां माहाजनीं देखीलीं : तैसेचि गोसावीयांचेया दरीसनासि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग माहाजनीं म्हणीतलें : "हें काइ जी : गोसावीं केव्हळि बीजें केलें ऐसें आम्हीं नेणोंचि : गोसावीयांचेया रात्रीचेया पुजाअवस्वरा चुकलों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मा तो ऐसाचि कीं गा : जो आलेयांही कोण्हीचि नेणे : गेलेयांही कोण्हीचि नेणे :" मग गोसावी-यांसि उदयांचा पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं बीजें केलें : ] ।।

## ५५४ हीरणापुरीएसि गोवर्धनीं वस्ति

गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयांअनंतरें गोसावी आंगणीं उभे ठाकौनि आंगीटोपरें वेढीत[1] असति : उपाध्याचीया माता म्हणीतलें : "अवघां गोसावीयांचां ठाइं उपाहारू केला : तै आमचा उपाहारू नव्हेचि : तरि आतां जा कां : गोसावीयांतें उपाहारालागि वीनवा :" तवं नागदेव उपाध्ये म्हणति : " जानो कां न म्हणे ?" ते म्हणति : "हा कां न म्हणे ?" ऐसें एरेंएर गोसावीयांचेया दरीसनासि आले : नागदेवो उपाध्यांसि मनभंगु[2] जाला : गोसावीयांतें वीनववे ना : मग उपाधीं वीनवीलें : "जी जी :

---

२ **पं.** काइसेनि. **भ.** कैसेनि. **मुरा.** °गगनीचें कैसेनि जाणिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्योतीषशास्त्रातव हा ठावोव्यन्हीं जाणिजे :" याउपरि—. ३ **मुराहबीपंगो.** वर्त्तवीलें. ४ **मुराहबीपंगो.** वर्त्तिलीं. ५ **मुराहबीपंगो.** अग्रगण्य. ६ **रावा.** खडकलीएसि.

**५५३.** ***अमुरा.** प्रतीत या लीळेची 'आदि' आणि पहिली दोन वाक्येच आहेत. त्यापुढील चौकोनी कंसातील सविस्तर लीळेचा भाग **भहबी.** प्रतींतून घेतला आहे.

**५५४.** १ **गोपंहबी.** करीत. **मुरा.** लेत. २ **भगोहबी.** सरभंगु. **पंमुरा.** स्वरभंगु.

नागदेवो उपाध्ये गोसावीयांतें उपाहारालागि वीनवावेया आले असति :" गोसावीं तेयांची वास पाहिली : मग म्हणीतलें : "हां बटो ?" तेहीं म्हणीतलें : "तरि काइ जी : गोसावीं आजि राहावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें ग्रामांतर करीत असे : हीरणापुरीए[३] उपाहारू घेउनि या :" तैसेंचि गोसावीं हीरणापुरीएसि[३] बीजें केलें : गोवर्धनीं चौकी आसन जालें : तवं उपाहारू घेउनि आले : बाइसें गोसावीयांसि चरणक्षाळण करूं बैसलीं : "बाइ : राहा : एथिचे एजमान करीती :" मग नागदेवो उपाधीं गोसावीयांचें चरणक्षाळण केलें : गोसावीयांसि पुजाअवस्वर जाला : ताट जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यां काहीं वाढा :" तवं नागदेवो उपाधीं म्हणीतलें : "मज आइसांसि तुळसी वावीया असति :" जानो उपाधीं म्हणीतलें : "मी जेवीन : मज वाढा :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गोसावीयांसि गुळुळा : वीडा जाला : मग नागदेवो उपाधीं भाजनें आणिलीं होतीं तीएं घेउनि आले : ।।

## ५५५ ब्राह्मणां ग्रहस्तधर्म नीरोपणें

माहाजन आवघे माहालक्ष्मीएचां देउळीं बैसले होते : तवं नागदेवो उपाध्ये गोसावीयांपासौनि[१] आले : भाजनें घेउनि : तेयांतें पुसिलें : "गोसावी[२] कोणी ठाइं राज्य करीत असति ?" तेहीं म्हणीतलें : "गोसावी गोवर्धनीं असति :" "चाला : जाओं : गोसावीयांतें काहीं पुसों :" म्हणौनि गोसावीयांपासि आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : तेह्वळि गोसावीयांसि आंगणीं आसन असे : गोसावीयांजवळि बैसले : गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : आम्हांसि गोसावीं सन्यासधर्म नीरूपावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "*तुम्हांसि काइ सन्यासधर्मे प्रयोजन*[३] ? जें होउनि असां तेंचि[४] कां पुसा ना ?" तेहीं म्हणीतलें : "हो कां जी : तरि ग्रहस्तधर्म नीरूपिजतु :" त्याउपरि गोसावीं तेयांसि ग्रहस्तधर्म नीरूपीले : मग तेहीं म्हणीतलें : "जी जी : ग्रहस्तधर्म जरि ऐसे तरि सन्यासधर्म ते कैसे असती[५] ? तेयांची आम्हीं सोएही नेणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एसनालीं फळें तीएं काइ एन्हवींचि बापेया ?" मग तेहीं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग ते नीगाले : तवं जानो उपाध्ये बळ्हेग्रामौनि गोसावीयांचेया दरीसनासि एत असति : तवं माहाजन वाटे तोखों लागले : "श्रीचांगदेवोराउळ गोसावी साक्षात वंकनाथू :" एक म्हणति : "सत्य[६] मा : श्रीचांगदेवोराउळ गोसावी काइ तें तुं जाणसि :" ऐसे ते तोखत जात होते : तें उपाधीं आइकिलें : गोसावीयांपुढां सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तें तेयांचें पर कीं गा : तेयापरतें तेयां काहीं जाणनें असे ?" ।।

---

३ **भगो.** हीरण्यापुरीए. **मुराहबी.** हीरण्यपुरीए. **पं.** हीरडपुरीए.

**५५५.** १ **मुरा.** °एतां देखीलें. २ **मुरा.** गोसावीयांतें कैसा अवसरू असे ? "ना गोसावी आसनीं उपविष्ट असति :" ३ **(गोमुरा.)**. ४ **मुरा.** तेथिचें काहीं पुसा ना ? ५ **मुरा.** °हे सावयाचि अवघड जी :. ६ **पं.** सत्यादेवि माय :°.

## ५५६ आकलगव्हाणीं[1] प्रातपुजा आरोगण

तेथ गोसावीयांसि वस्ति जाली : गोसावीं उदीयांचि प्रश्रयासि बीजें केलें : प्रश्रयो सारूनि गोसावीं आकलगव्हाणा[1] बीजें केलें : ब्रह्मनाथाचां[2] देउळीं गोसावीयांसि आसन जालें : गोसावीयांसि प्रातपुजा जाली : आरोगण जाली : वीडा जाला : मग गोसावीं तेथौनि वीझुगेयांसि बीजें केलें :।।

## ५५७ वींझुगां[1] आदीतीं अवस्थान

वींझुगां आदीत्याचां देउळीं गोसावी उभे राहिले : चरणचारी[2] : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ ओटा कीजैल ते ह्वळि बैसिजैल :" बाइसीं म्हणीतलें : "बाबाचें काइ : केव्हळि ओटा कीजैल ? मग तो ओला ओटा : तेयावरि कैसेयां बैसिजैल ?" गोसावी उगेचि होते : तवं भगतिजनीं म्हणीतलें : "गोसावीयांसि ओटा करावेयाची प्रवृति : चाला गा चाला :" म्हणौनि उठिले : उदकपात्रें भरूनि आणिलीं : मातीचा पल्हो केला : तीथरा[3] इटांचा ओटा केला : वरि कोरडी माती घातली : तेयावरि आसन रचिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां ऐसीयांचि बैसिजैल :" मग गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तेथ गोसावीयांसि अवस्थान दीस वीस जालें :।।

## ५५८ अवधूताची ब्रह्मप्रकासिका कथन

अवधूतु आदित्याचेया आणि माहालश्मीचेया देउळामध्यें[1] : आदित्याचेया कोणटेया-समीप : ब्रह्मप्रकासिका भाजीत होता : गोसावीं तेथ बीजें केलें : एकु घाणा भाजुनि चुरूनि ठेविला असे : एकु भाजीतु असेति : एकु हीरवा असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा ब्रह्मप्रकासिका[2] ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी[3] :" गोसावी उकड आसनीं होउनि : गोसावी श्रीकरिचीए करांगुळिचेनि नखें घेउनि श्रीमुखीं घातली : इंद्रभटासी तेला पाठवीलें : हातीं तेलाचें कोंढलें[4] : ते गोसावीयांजवळे आले : तें नख गोसावीं तेयाचां मुखीं झाडिलें : आणि तेया स्तीति जाली : तैसेंचि[5] तेल घेउनि आले : गोसावीयां-जवळि बैसले :।।

---

**५५६.** १ **पंह.** अगल°. **मुरागो.** आंगल°. **भ.** आंगले. २ **हबी.** ब्राम्हणांग्रहीं गोसावीयांसि–.

**५५७.** १ **पं.** वींझुगां पींपळगावीं–. २ **मुरा.** ° बाइसीं आसन घालौनि म्हणीतलें : "बाबा : एथ आसनीं बैसिजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ ओटा होइल तेव्हळि–. ३ **मुरा.** तीथरांचा उगाचि (**एवा.** उंच) ओटा केला.

**५५८.** १ **हबी.** दोहीं देउळांचीए संदीसि. **मुरा.** आदित्याचिये देउळामागे महालक्षमीये येतां संदि : तेथ. २ **गो.** °भाजीत असा ?" ३ **मुरा.** °मग गोसावीयांसि उकड आसन जालें : श्रीकरीं चीमुटि घेउनि तळ्हातीं घातली : मग करांगुळीचेन नखें श्रीमुखीं घातलीं : सरिसें इंद्रभट होते : गोसावीं इंद्रभटासि प्रसाद दीधला : आणि तया स्तीति जाली : ४ **गो.** गाडुगें. ५ **हबी.** °स्तीतिपुर्वक.

## ५५९ इंद्रभटा स्तीति

मग[१] गोसावीयांसि आरोगण जाली : गोसावीं तें पालमांडें इंद्रभटांकडे घातलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : इंद्रभटासि[२] पुर्ण[३] करा :" बाइसीं आणीक वाढिलें : ते जेविले : आंचवले : तैसेंचि स्तीतिमंत होउनि तीनि दीस गोसावीयांजवळि बैसले होते : तीसरां दीसीं नावेक स्तीति पातळ जाली : सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : वाइसीं म्हणीएं दीधलें तें तुम्हीं केलें ?" "तरि काइ जी : हें नव्हे आतांचि[४] करूनि आलां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेया बोला तीनि दीस जाले :" म्हणौनि आंगुळीएच्या अनुकारू दाखवीला : गोसावी तेयांचे देव श्रीकरीं घेउनि म्हणीतलें : "इंद्रेया : हे तुमचे देव तीनि दीस स्परीस[५] असति : तरि हे कव्हणाइं दीजतु[६] ?" "जी जी : दीजतु[६] तरि मजचि दीजतु[६] :" मग गोसावी तेयांसि दीधले : आणि तेयांची स्तीति भंगली : ।

## ५६० ब्राह्मणां स्तीति

गोसावीयांसि ओटेयावरि आसन असे : नवगाविचा[१] ब्राह्मणु[२] देवतेसि आला दारापासि आला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ भटो : देवतेसि आलेति ?" तीहीं म्हणीतलें : "जी जी :" तैसीचि तेयां स्तीति जाली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले गोसावीयापासि नावेक बैसले होते : मग नीगाले : ॥

## ५६१ तथा कुमारीभोजनें स्तीतिहरण

मग घरासि[१] गेले : स्नान करूं बैसलेति : तवं स्नानवीधि वीसरति : तर्पण करूं बैसले तवं तर्पणवीधि वीसरले : देवपुजा[२] करूं बैसले : तवं देवपुजावीधि वीसरले : खटुकर्म जीये वेळे करूं बैसति तें तीए वेळे वीसरति : आणि पोळति[३] : "ऐसें मज काइ जालें ? मग तेहीं आपुलेयां सोइरेयांपुढें[४] सांघीतलें : तेहीं म्हणीतलें : "तुं काइ विंझुगेयासि गेल होतासि ?" तेहीं म्हणीतलें : "हो :" तेहीं म्हणीतलें : "हें तेयांचि गोसावीयांपासौ जालें : आतां जाए : तेयांतेंचि वीनवि : मग तेयांचेनि जाइल :" मग ते गोसावीयांजव एत असति : गोसावीयांसि ओटेयावरि आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ब्राह्

---

५५९. १ मुरा. बाइसीं तेला धाडीलें : तेल आणिलें : बैसले : तवं स्तीति सुभर जाली : ते तीन होती : गोसावीयांसि आरोगण होए : आणि पाल तयांइउतें लोटीति : मग म्हणति : "बाइ : पूर्ण करा :" मग बाइसें आणीक वाढीति : मग ते जेवीति : आंन्चवति : ऐसें स्तीतिमंत होउनि गोसावी जवळि तीन दीस बैसले होते : २ पंगोहबी. इंद्रेयासि. ३ मुरा. पूडीरा. ४ बी. °जात जी :" ५ मुरा. अस्नाइ. एवा. साधारण. ६ गो. देइजति.

५६०. १ पंगो. नाएगाविचा. २ मुरा. °सवळेचेया पाहुणा एका : हबी. °उदीयासींचि.

५६१. १ हबी. बीढारीं. २ पंगोह. देपुजा. ३ मुरा. °घरिचीं म्हणति : "यांसि लागलें :" ते म्हणति : "ऐसें मज—. ४ मुरा. सोइरेयां : इष्टामीत्रापुढें.

स्तीति घालुं एत असे :" बाइसीं म्हणीतलें : "हें काइ बाबा : स्तीति घालुं कैसी एत असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा नव्हे आला :" तैसेचि ते आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांपासि बैसले : मग वीनवीलें : "मज गोसावीयांपासौनि जालें असे तें माझें जावें[५] :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "हें हों जाणे : परि जाओं नेणें :" "ना जी : माझें जावें[६] :"* सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : काहीं असुख होत असे ?" "ना जी : असुख तरि काहीं न्हवे : सुखचि होत असे : परि हें माझें जावें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "सुख जीवासि प्रधान कीं :" "ना जी : हें माझें जावें : माझें खटुकर्म राहात असे[७] :"* सर्वज्ञें म्हणीतलें : "तीघीं[८] कुमारीं जेऊं सुआ : मग हें जाइल :" गोसावीं हवीक्षान जेउं सुववीलें : इतुकेनी तेयांची स्तीति भंगली : ।।

## ५६२ सनीधी सर्पा देहावसान

गोसावीयांसि ओटेयावरि आसन असे : भगतिजन आवघे जवळि बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "परते सरा गा : प्राणीया एकु एथिचेया दरीसना एतु असे[१] :" भगतिजन परते जाले : इतुकेनि सर्पु गोसावीयां जवळा आला : दोनि[२] वेळ वरतीया फडें[३] गोसावीयांतें न्मस्करिलें[४] : आणि तैसेंचि देह ठेविलें[५] : सर्वज्ञें म्हणीतलें : "यातें बाहीरि घाला गा :" भक्तिजनीं म्हणीतलें : "जी जी : हा मौळैला[६] असे : खाए ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जें खाए तें याचां ठाइं नाहीं :" मग तेहीं काठीयाकरूनि कुपावरि घातला :

ब्राह्मणाचीया दोघी बाइया देवतेसि आलीया होतीया : तेहीं रीगतांहीं सर्पातें देखिलें : आणि सांडितांहीं देखिलें : मग तेहीं म्हणीतलें : "हें काइ लाघव कीं हरिमेखळ ?" तवं एरीं म्हणीतलें : "उदेयांचि[७] ऐसेंचि असैल तरि साच :" उदेयांचि मागौतीया देवतेसि आलीया : तवं सर्पु कुंपावरि तैसाचि असे : मग तेहीं म्हणीतलें : "हें लाघवहीं नव्हे : हरिमेखळही न्हवे : हें साच :" मग तीया देवतेसि आलीया : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : हें लाघव कीं हरिमेखळ ?" तेयांसि वीस्मो जाला : "आम्हीं पैन्हां बोलिलों : तें एहीं जाणीतलें :" ऐसा वीस्मो होउनि[८] गेलीया : ।।

## ५६३ मार्कंड पंचाळेस्वरा पाठवणें

मार्कंड ऐसें म्हणति[१] : "मज गोसावीयांपासौनि काहीं नाहीं : मीं रीता :" बाइसें ऐसींचि म्हणति : "वटिका : तुं कैसा रीता ?" एकु दीसु सर्वज्ञें म्हणीतलें : "मार्कंडा :

---

५ **एवा.** फीटावें जी : ६ (**पंहबी.**). ७ (**पंगोहबी.**). ८ **गोमुरा.** एथिचेया तीघी. **एवा.** पांचां.

**५६२.** १ **मुरा.** °तवं सर्पु येकु गोसावीयांचेया दर्सनां आला : भगतजन परते सरले—. २ **हबी.** तीनि. **पंगो.** दोनि तीनि. ३ **पंमुरा.** °करुनि. ४ **मुरा.** °मग पुटी वळली : आणि तेणें तैसेंचि—. ५ **एवा.** सांडिलें. ६ **भगोरा.** मौवाळला. **ह.** मौळला. ७ **बी.** पाहे. ८ **पंगो.** करुनि. **हबी.** करीत.

**५६३.** १ **हबी.** ° "गोसावी कोण्हासि कांहीं करिति : कोण्हासि कांहीं करिति : मज—.

तुम्हीं पंचाळेस्वरासि जा : तुम्हीं तीनि पाहार वीजन करावें : तीसरां पाहारीं भीक्षा करावी : गंगे जेवावें : देउळीं नीद्रा करावी : मौन्यें असावें[2] : तीसरां दीसीं यावें :" "हो कां जी :" मग तेहीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग पंचाळेस्वरासि गेले : तीनि पाहार वीजन केलें : तीसरां पाहारीं भीक्षा केली : गंगे जेविले : पंचाळेस्वराचेया देउळा नीद्रा करावेया गेले : रात्रीं बैसले असति : तवं खळिचें[3] साउलें : खळिचीया चोळीया : हातीं[4] तांवकळस : ऐसीया देवतेसि आलीया : दारापुढें[5] उभीया ठाकलीया : एरि म्हणे : "चाल गे भीतरि :" "ना जाओं नैए : ना थोरे राउळिचे असति :" मग ते म्हणे : "चालसि ना कां गे भीतरि?" "ना जाओं नैए : मुदलां राउळांचे असति :" ऐसें मागुतें पुढारें म्हणति : नावेक होतीया : मग गेलीया : दूसरा दीसीं मागुतें तेहीं तैसेंचि केलें : रात्रीं देउळीं बैसले असति : तवं मागुतीया आलीया : दारापासि उभीया ठाकलीया : एरि म्हणे : "चालसि ना कां गे भीतरि ?" "ना जाओं नैए : मुदलां राउळांचे असति :" ऐसें तीनि वेळ म्हणीतलें : मग मार्कंडीं म्हणीतलें : "येथ कोणी ठाइं याल : कालि तरि कालि आलीयाति : आजि तरि आजि आलीयाति : तुम्हीं कोणीं जाल कीं न वचा :" आणि तीया अदृश्य जालीया : वाहीरि एउनि पाहाति तवं तीया न देखति : आणि बीहाले : उदेयांचि नीगाले : ते गोसावीयांचेया दरीसनासि आले : गोसावीयांपुढां अवघें सांघीतलें : मग म्हणीतलें : "हां जी : तीया कोणी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीया[6] ब्रह्मांडिचीया देवता गा : तुमचीए ओळगेसि आलीया असतीया[7] :" *सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं म्हणा आम्हीं रीते :" ते उगेचि राहिले[8]* : ।।

## ५६४ लाखाइसां राणाइसां भेटि

गोसावीयांचेया दरीसनासि लाखाइसें : राणाइसें आलीं : गोसावीं लाखाइसांसि[1] क्षेमाळींगन दीधलें : राणाइसांसि नेदितीचि : तीहीं गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : *वीळीचांचा पुजाअवस्वरू जालेयानंतरें*[2] मग तीएं माहालक्ष्मीचेया देउळासि नीद्रास्थानासि गेलीं : लाखाइसें नीजैलीं असति : राणाइसें दूख करितें बैसलीं असति : "लाखाइसें सदैव : गोसावीं तेयांसि क्षेमाळींगन दीधलें : मज काइसेंया देती ?" ऐसें दूख करितें *च्यान्ही पाहार*[3] बैसलीं असति : गोसावीं पस्यांत पाहारीं प्रश्रेयासि बीजें केलें : तैसेंचि तेयापासि बीजें केलें : तीएं पटिसाळेवरि बैसलीं होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ :

---

२ **मुरा.** °त्रीरात्र असा : मग **एथचेया** दर्शना या :" ३ **अ.** खळीचीं साउलीं. ४ **मुरा.** हातीं सोनियांचे परिएळ : रत्नाचे दीप : ओवाळुं येति : ५ **पंगो.** दारवठेंनसीं. **हबी.** दारसंकेसीं. ६ **शोध.** अष्टमाहासीद्धी. ७ **गो.** °तुम्हीं मौन्यें असतेति तरि तुम्हांसि जें देतीया तें देतीया :" **शोध.** "तुम्ही मौन्य न भंगतेति तरि आश्चर्यें देखतेति :" ८ (**मुरा.**).

**५६४.** १ **शोध.** °बैसलेयांचि. २ (**गो.**). ३ (**भ.**).

या : " म्हणौनि दोन्हीं श्रीकर पसरिले : तेयासि क्षेमाळिंगन दीधलें : गोसावीं आळींगन देओं सरलें तवं लाखाइसें उठिलीं : " काइ राणुबाइ : गोसावीं बीजें केलें तरि सांघसि ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें नव्हे बाइ : हें आतांचि आलें :" गोसावीं तैसेंचि बीजें केलें : ।।

## ५६५ अनुचरप्रक्षाकरणीं पींगळे प्रसंसा

गोसावीयांसि मध्याने एकी रात्रीं उपहुडु जाला : गोसावीं बाहीरि बीजें केलें : अवधूतू बाहीरि कवणी ठाइं नीजैलें असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ कवण गा जागलीए[१] असति ?" अवधूतीं म्हणीतलें : "जी जी : मीं असें :" म्हणौनि उठिले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले[२] : गोसावीं तेथौनि[३] बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ कवण गा जागलीए[४] असति ?" अवधूतीं म्हणीतलें : " जी जी : एथ बाम्हणीएं[५] बाम्हणीएं[५] असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा जा :" अवधूत गेले : तेयांतें बोलाउनि घेउनि आले : इंद्रभटांतें म्हणीतलें : " इंद्रेया : एथौनि[६] कव्हणा एका ठाया पाठवीजैल[७] तरि जाल ? " तीहीं म्हणीतलें : " जी जी : एवढेयां वेळा गोसावी कें पाठवीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हा न्हवे :" मार्कंडातें म्हणीतलें : " मार्कंडा : एथौनि कव्हणा एका ठाया पाठवीजाल तरि जाल ?" " जी जी : गोसावी पाठवीती तरि कां न वचें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हाही न्हवे :" मग गोसावीं अडापासि बीजें केलें : तेथ दोनि नींब होते : सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ कोण गा जागिले असति ?" तवं पींगळे होते : ते गजवजिले[८] : एरा नींबावरौनि एरा नींबावरि गेले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हापरीस[९] वरि एं पाखिरूवें चांगें : एथिचीए प्रवृतीसि वीखो जालीं : जातेति तरि आस्चर्ये एक देखतेति :" गोसावीं देउळासि बीजें केलें : ।।

## ५६६ ब्राम्हणाचा दधिभातु आरोगणें

उदीयांचा पुजाअवस्वरू जालेयाअनंतरें माहालक्ष्मीचीया पुढीली टेंकि गोसावीयांसि आसन असे : ब्राह्मणु एकु गोसावीयांचेया दरीसनासि आला : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांथें वीनवीलें : "*जी जी : मीं गोसावीयांसि दधिभातु आणीन :" गोसावीं वीनवणी स्वीकारिली : नौगावा[१] गेले : दधिभातु घेउनि आले : गोसावीयांसि*[२] दधिभाताची आरोगण दीधली : ।।

---

**५६५.** १ **अ.** जागेले. **प.** नीजैले. **गो.** ठाणातरी. २ **मुरा.** सरीसे नीगाले. ३ **गो.** °पटीसाळेकडे. **मुरा.** वनदेवासी. ४ **गो.** ठाणातरी. ५ **मुरा.** बाम्हण. ६ **मुरा.** °तुमतें एव्हडेया वेळा म्हणीया धाडीजैल तरि जाल ?" ७ **पंभ.** पाठवीजाल. ८ **मु.** गिजिबिजिले. **रा.** गीजबजीले. ९ **भ.** तुम्हांपासाव. **हबी.** तुम्हांपसि.

**५६६.** १ **बी.** गावांतु गेला. दधिभातु घेउनि आला. २ (**हबी.**).

## ५६७ इंद्रभटां भयनीवृति

गोसावीयांसि एकु दीसु रात्रीचा पुजाअवस्वर जाला : आरोगण जाली : गुळुळा : वीडा जाला : मग गोसावी आंगणीं इंद्रभटाचा हातु धरूनि वेढे करीत असति : चांदिणें पडत[१] होतें : सर्वज्ञें म्हणीतलें : " चांदिणें[२] नीकें ना गा : " तेहीं म्हणीतलें : " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एवढेया वेळा ग्रामांतर[३] कीजे तरि[४] काइ ? " तेहीं म्हणीतलें : "जी जी : कीजे तरि कीजे : आणि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं बीहा ना कीं : " तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं गोसावीयां सांघातें असतां काइसेया बीहूनि[५] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइसांकरवि आइति करवा : " ते गेले : बाइसांकरवि आइति करवीली : गोसावीं बीजें केलें : विझुगा पातले : *इंद्रेचेया खांदावरि श्रीकरू घातला[६] :* आणि म्हणीतलें : " इंद्रया : तैसौनि तैसें व्रततें[७] तें हें स्थान गा : " ऐसें म्हणौनि गोसावीं आंगुळी तेयांचीए बोबीए टेंकिली : तेहीं म्हणीतलें : " जी जी : " " एथ दीहाचि माणुसें मारिजति : " तैसाचि चंद्रमा माळवला : *गोसावी माउंगावां-ऐलीकडैल वोतु पावले[८] :* आणि इंद्रभट बीहों लागले : थरथरा कांपति वोतामध्यें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बीहा ना गा इंद्रेया : ए माउंगावीं सुणीं भुंकतें असति : " ।।

## ५६८ नीकळंकीं[१] वस्ति

तैसेंचि गोसावीं नीकळंकासि[२] बीजें केलें : वाति जात होती : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[३] : वाति जाओं नेदा : डोचें[४] तुप घालां : " बाइसें[५] पुढां गेलीं : वाति आवथिली[६] : डोचें तुप घातलें : मग गोसावीयांसि ओटेयावरि आसन रचिलें : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीयांसि पहुडु जाला : ।।

## ५६९ प्रातकाळीं इंद्रभटां सीक्षापण

गोसावीं पस्यांत[१] पाहारीं प्रश्नयासि बीजें केलें : प्रश्नयो सारूनि जगतीभीतरि अग्न कोणीं उतराभिमुख देउळी : तेथ गोसावीयांसि आसन जालें : गोसावीयांसि दंतध्वन[२] होत असे : तवं इंद्रभट गंगेकडौनि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रया : रात्रीं तरि रात्रीं देवतेसि[३] नमस्कारू न कराचि : आतां तरि आतां नमस्कारू न कराचि : तें काइ ?"

---

**५६७.** १ **गोमुरा.** पडिलें. २ **मुरा.** " कैसें चांदिणें नीर्मळ शुभ्र : " ३ **अ.** ग्रामंत्र. ४ **मुरा.** °भीया ना कीं ?" इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीयापासि असतां–. ५ **गो.** भीउनु. ६ **मुरा.** आपेगावा°. ७ **पंभगोमुरा.** वर्ततें. ८ (**भ.**).

**५६८.** १ **मुबी.** निष्कळंकीं. **ह.** नीहकळंकी. २ **मुबी.** निष्कळंकासि. **ह.** नीहकळंकासि. ३ **हबी.** इंद्रेया : **मुरा.** °वाति आबथा. ४ **भ.** डोइचें. ५ **हबी.** इंद्रभट पुढां गेले. ६ **मुराह.** आबुथीली.

**५६९.** १ **भ.** पश्चात. २ **पंहबीमुरा.** दंतधावन. ३ **हबी.** एथिचीये देवतेसि.

"जी जी : वीसरलां[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो[५] : आपुला माहात्मा देखौनि[६] वीसराल ?" "जी जी[७] : ते गोसावीयांचे : तेयांतें कैसें वीसरौनि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें होए :" ।।

## ५७० मंडळीका टीळा तीथीवारू नीमु

भगतिजन *संध्या करूनि*[१] *:* गंगेकडौनि आले : *परि टीळे न लवीतीचि*[१] *:* गोसावीयांपासि बैसले होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "टीळे लाविजति कीं गा : हें गंगातीर :" मग गोसावीं नाथोबासि वीधि वीहिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : तुम्हीं[२] यांसि टीळा पुरवावा : आणि एथ तीथिवारू जाणवावा :" तेहीं तेधवांचि टीळा उगाळिला : तीहीं टीळे लाविले : *गोसावीयांपुढां तीथिवारू जाणविला : मग ते दीसवडि तैसेंचि करिति*[१] *:* मग गोसावीयांसि चौकीं पुजाअवस्वर : ।।

## ५७१ वडवाळीए अवधूताकरवि भीक्षा करवणें

तेथौनि गोसावीं वडवाळीएसि बीजें केलें : *अग्निष्टीके नावेक आसन जालें : मग बहीरवाचां धांबां वसति जाली*[१] *:* वडवाळीए ऐलीकडिला नींबापासि[२] गोसावी चरणचारी उभे राहिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : अवधूतु भीक्षा करूनि आणील तें तुम्हीं जेवाल गा ?" "जी जी : गोसावी काइ[३]?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जेवील :" "जी जी : तरि आम्हीं गोसावीयांचा प्रसादू घेउनि :" मग गोसावीं अवधूतातें म्हणीतलें : "अवधूता : साळेसि जा : आवांचें पात्र करा : नगरामध्यें ऐसी भीक्षा करा :" श्रीकराचा अनुकारू : "ब्राह्मणीएं बहुत असति :" "जी जी : तें मी[४] जाणत असें :" तैसेचि ते गेले : आपुलें आवरण[५] घेतलें[६] : आवांचें खापर घेतलें : नगरामध्यें भीक्षा करूनि आले : गोसावीं गंगेचीए थडीए बीजें केलें : ओताऐलाडि देउळ : तेथ गोसावीं इंद्रभटातें म्हणीतलें[७] : "इंद्रेया : अवधूताचीए भीक्षेचें अन जेवाल : तरि आपुली इटीमीटी सारूनि[८] या :" "जी जी :" म्हणौनि गेले : गोसावीयांसि मळां आसन जालें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वर : अवधूत भीक्षा करूनि आले : गोसावीयांपुढां पात्र ठेविलें : गोसावीं अवळोकिलें : भीक्षेसि आंबीलि : भातु : दीवसीं :

---

४ **अभगो.** वीसरलों. ५ **हबी.** °ऐसें आपुलेया महंतासि होय तरि न करा? "जी जी : ते आमचेया महंतासि कैसें न करूं?" ६ **मुरा.** देखों. ७ **पं.** °गोसावीयांतें कैसें वीसरौनि.

**५७०.** १ (**मुरा.**). २ **मुरा.** °तुम्हीं नीच यां अवघेयां टीळा उगाळुनि देयावा : आणि एथ तीथिवारू सांघावा :"

**५७१.** १ (**हबी.**). २ **एवा.** नींबातळिं. ३ **गोहबी.** °करीती ? ४ **ह.** जाणतें. ५ **पंमुरा.** आभरण. ६ **गो.** केलें. ७ **मुरा.** "भीक्षान्नाचिया हेतु : इंद्रेया आपुली उगमुग कां सारा ना ?" ८ **एवा.** सारूं जा.

भाकरी : तुरी : लोणसणें[९] : गोसावीं अवळोकिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें[१०] : "एक वीसरलेति गा :" "जी जी : आतां आणुं जाओं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें तेह्ळीचि कीं गा :" बाइसें नीवडूं लागलीं : गोसावीं वारिलें : मग बाहीरवासु आणवीला : बाइसांकरवि काला करविला : बाइसीं मीठ घातलें : मग आवघेयां वांटे केले : मां गोसावीयांचां ताटीं अर्धू वांटा ओळगविला : अर्धू ठेविला : अवघेयां भक्तिजनां वाढिलें : गोसावीं प्रसादू केला : अवघेयां प्रसादू दीधला : आधीं आवघां प्रसादू घेतला : मग जेउं लागले : इंद्रभट प्रसादें घांसु माखीति : मग जेवीति : ऐसें जेवितां प्रसादू सरला : मग उगेचि होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : जेवा ना कां गा ?" "जी जी : प्रसादू सरला :" गोसावीं इखीत हांस्य केलें : गोसावीयांसि आरोगण जाली : मग पालमांडें[११] तेयांकडे घातलें : मग पालमांडां[१२] घांसु घोळीति : मग जेवीति : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : पहूडु जाला : उपहूडू जाला : गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५७२ मार्गीं गोपाळभोजन दाखवणें

गोसावी[१] तें सेत पातले[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : हे कुसंबी तीखी घेया गा :" घेववीली : चणेयांवरि घोळवीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आसन घाला : मां एथौनि तुम्हांसि गोपाळभोजन दाखवीजैल : हें पुर्वीं गोपाळांतु होतें :" बाइसीं आसन घातलें : गोसावी आसनीं बैसले : गोसावीयांसि एकी मांडखुटीएवरि आसन जालें : एकु श्रीचरणु उकडु : डावीए श्रीकरीं काला[३] : उजवीए श्रीकरिचीयां आंगुळीयांचीए[४] सांदी कुसंबीए तीखीएचें ढेंसे धरिले : गोसावी आंगुठेंनि घांसु घेति : तैसाचि कुसंबीए तीखीएचा घांसु घेति : आणि गोपाळांचेनि अनुकारें च्यार्‍हीं दीसा पाहांति : ऐसी गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : पुढीलीए पव्हैएसि नावेक आसन जालें : ।।

## ५७३ पैठणीं त्रीपुरुखीं वस्ति : काको कपाट दुखनीवृति

तेथौनि गोसावीयांसि पैठणीं त्रीपुरुखीं वस्ति[१] जाली : *गोसावीं रात्रीं बीजें केलें : तवं देउळीची वाती जाति होति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वाति आवथा : डोचें तुप*

---

९ **गो.** लोणिचें. १० **मुरा.** "अवधुता : मीठ असे ?" "ना जी : मीठ मागों वीसरलां : आतां आणुं जावो ?" ११ **गो.** पालीमांडें. **भ.** पालमंडें. १२ **गो.** पालीमांडां. **भ.** पालमंडां.

**५७२.** १ **हबी.** गोसावीं बीजें केलें : मार्गीं सेत होतें : तेथ चणा होता : तो गोसावीं अवळोकिला : मग उपाध्यांतें म्हणीतलें : "बटिका : ए कुसुंबीए तीखीएचे ढेसे घेया गा : आणि चणेयावरि ऐसें ऐसें घोळा." २ **भ.** पावले. **पंगो.** देखिलें. **एवा.** मार्गीं बीजें करीतां अपार कुसुंबी तीखी : ऐसें सेत देखिलें. ३ **गो.** घोळाणा. ४ **भ.** आंगुठांचीए.

**५७३.** १ **रावा.** त्रीरात्री अवस्थान जालें :

*घाला :" बाइसें भीतारि गेलीं : वाति आबुथिली : डोचें तुप घातलें : गोसावीयांसि आसन जालें*[२]*:* बाइसांचेनि[३] आंगें कवाड झगटलें तें काकोचीए[४] पाठीवरि पडिलें : काकोसि[५] मुर्छना आली : 'काकोवरि कपाट पडिलें :' म्हणौनि भक्तिजनें धावीनलीं[६] : गोसावीं तेथ बीजें केलें : "*काइ भटो : दुखवलेति*[२] *?*" तेयांची पाठि श्रीकरें स्परीसिली : दुख होतें तें फेडिलें[७] : ।।

## ५७४ पींपळवाडीए अग्नीष्टिके वस्ति : माहादेओ पाठकां भेटि

मग तेथौनि पींपळवाडीएसि बीजें केलें : अग्नीष्टिके वस्ति जाली : बाइसीं इंद्रबा-करवि तेल आणवीलें : मग वाति लाविली : दीसु माळवलेयाउपरि[१] : माहादेओ पाठक गावांतु जात होते : तवं[२] अग्नीष्टिके वाति देखिली : " वाति काइसी पां ? " म्हणौनि साउमे आले : टेंक[३] वेघतां पोटीं धाप[४] माए ना : धांपत[५] आले : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि आडचि[६] एओं बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : हळु या : ब्रह्माची हांडी फुटैल : " गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें आपणेंयां श्रृत कीं दृष्ट ? " " जी जी : दृष्ट : " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोगनाराएणीं कीं ? " " जी जी : " " तै आपण[७] काहीं वाचिजत[८] होतेयां ? " " जी जी : " " तैं[९] देह कृस्य[१०] होतें कीं ? " " जी जी : " "*तरि एसणी पुष्टि काइसी*[११] *?*" "जी जी : जैलागौनि गोसावीयांपासौनि काहीं गोमटें जालें : तैलागौनि देह स्थुळ जालें : आणि उन्ह न साहे जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें येथौनि एसणें गोमटें तरि एथिचेया दरीसना न या तें काइ ? " " जी जी : गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असति : ऐसें मी जाणें ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हे ऐसें प्रतीस्थाना प्रांतींचि असे मा : " तवं वेसिरखा बोबाइला : गोसावीं तैसीचि तेयां पाठवणी दीधली : तेहीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : गोसावीं मज उदेयां दरीसन देयावें : " गोसावीं वीनवणी स्वीकरिली : ते नीगाले : ।।

## ५७५ बाबुळवनीं माहादेओ पाठकांचा उपाहारू स्वीकारू

रात्रीं गोसावीयांसि तेथ वस्ति जाली : उदीयांचि गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : गोसावी उभे ठाकौनि आंगीटोपरें वेढीत[१] असति : तवं ते आले : गोसावीयांसि दंडवत

---

२ (**मुरा.**). ३ **मुरा.** काको भीतरि होते कांबळेनसीं तो वाता कांबळेयानां सीरकला : तें कवाड पडीलें : ४ **गोपह.** काकोसाचीए. ५ **गोपह.** काकोसासि. ६ **हबी.** बोंबाइलीं. ७ **मुरा.** नीवर्त्तलें. (अज्ञात लीळा. काकोस वचन स्वीकारू : पाहा).

**५७४.** १ **अपंमु.** मावळलेया–. २ **गो.** °सुवाणाहुनि. **एवा.** भक्तिजनें देखीलीं. ३ **मुरा.** टेंक वेंघले. पाउटणीयां दोनि वेंघतां–. ४ **हबी.** स्वासु. ५ **भगो.** हांवत. **हबी.** लाहांकत. ६ **हबी.** उजुचि : ७ **मुरा.** °कींचीत होतेयां ?" ८ **पं.** वाचीत. **हबी.** पढत. ९ **हबी.** °तुम्हीं धाकुटे होतेति. १० **गो.** कीलस. ११ (**मुरा.**).

**५७५.** १ **पं.** करीत.

घातलें : श्रीचरणां लागले[२] : मग गोसावीयांतें उपाहारालागि[३] विनउं आदरिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें बाबुळगावांसि नीगालें : मागिलीकडौनि तुम्ही उपाहारू घेउनि या :" "जी जी : मज उन्ह न साहे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "साहों आदरिजे तरि साहील :" मग नाथोबा आणि मार्कंड राहाविले : गोसावीं बाबुळवनासि[४] बीजें केलें : बाबुळवनीं[५] गोसावीयांसि आसन जालें : ते उपाहारू घेउनि आले : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : भक्तिजनांसि पांती जेवणें जालीं : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : ब्रह्मनाथीं पहूडू जाला : ।।

## ५७६ संविता[१] नागनाथीं वस्ति : इंद्रेया राज्यंतरसोधनीं परीक्षू

गोसावीयांसि उपहूडू जाला : गोसावीं संवितेयासि[२] बीजें केलें : माहादेवो पाठक गावांसि गेले : गोसावीयांसि नागनाथीं चौकीं आसन जालें : बाइसीं इंद्रबातें तेल आणुं पाठवीलें : गोसावीं बाहीरि बीजें केलें : उतरीलीए सोंडीएवरि उभे असति : तवं इंद्रबा तेल घेउनि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : नगराआंतु काइ मातु वार्ते[३] गा?" "जी जी : काहीं नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कैसें काहीं नाहीं? एसणें राज्यांतर जालें[४] : आंमणदेयाचे डोळे काढिले : रामदेओ राजीं बैसला : एं न्हवति घाएळें[५] जातें असति :" म्हणौनि खाटारे दाखवीले : "जा : सोधा जा :" ते गेले : सोधुनि आले : मग गोसावीयांपुढां सांघीतलें : *"साच जी : लोकु घरावारी वेधौनि पाहातु असे[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं महात्मे कीं गा : महात्मेनि राज्यवार्ता : देसवार्ता : द्वंद्वपट अवघे शोधिजे : मग तेथ राहिजे कीं : तेथ जें सात्विक स्थान तें सेवावें :" "हो कां जी : तरि आजिलागौनि गोसावीयांची आज्ञा प्रतिपाळन करूनि : आणि काइ :" म्हणौनि श्रीचरणां लागले : तवं महदाइसीं मढु झाडीला : मग गोसावीं मढांतु बीजें केलें[७] :* ।।

## ५७७ नागनाथीं वस्ति : जोगेस्वरीए प्रयाण

मग गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरू जाला : पहूडू जाला : गोसावी पस्यांत[१] पाहारीं प्रश्रयासि बीजें केलें : रवणीएवरि गुळुळा जाला : चरणक्षाळण जालें : चौकीं पुजाअवस्वरू जाला : मग गोसावीं जोगेस्वरीसि बीजें केलें : ।।

---

२ **हबी.** "जी जी : गोसावीं आजि राहावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें—. ३ **गोमुरा.** °वीनवीलें. ४ **गो.** बाम्हणगावासि. ५ **गो.** बाम्हणगावीं गोसावीयांसि वडातळीं आसन जालें.

**५७६.** १ **मुरा.** सेंवंतां. २ **मुरा.** सेवंतेयासि. ३ **मुराभ.** मातुवार्ती. ४ **मुरा.** °रामदेवोराओ राजीं बैसला : आमणदेओ खाली उतरला : देवगीरी पालटिली : (**हीराइसें.** हा नव्हे लोकु पळतु असे :). ५ **पंभहबी.** घायाळे. ६ (**मुरा.**). ७ (**प्रव. आमा.** १३५).

**५७७.** १ **भ.** पश्चात.

## ५७८ जोगेस्वरीसि अवस्थान : स्थान प्रसंसा

गोसावीं जोगेस्वरिचेया देउळासि बीजें केलें : चौकिचीया दोन्ही दारवंडा[१] धरूनि भीतरि अवळोकिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "कैसें स्थान सत्वस्त[२]: एथ जो अनुष्टान करी तेयासि अनुष्टानसीधि होइल :" *मग गुंफे अवस्थान जालें : मास एक*[३] *:* ।।

## ५७९ उमाइसां अवडळभटां भेटि

उमाइसें आणि अवडळभट गोसावीयांचेया दरीसनासि नीगालीं : *एके पेणेनि मागिलाकडौनि शोधितें एतें असति*[१] *:* तीएं प्रतीस्थानासि आलीं : तेथ लखूबाइसें भेटलीं : तेयांतें पुसिलें : "गोसावी कवणी ठाइं राज्य करीत असति?" तेहीं म्हणीतलें : "पींपळवाडीए कालि बीजें केलें : मीं बोळवीत गेलीएं होतीएं :" तैसींचि तीए पींपळवाडीएसि आलीं : माहादेओ पाठकांतें पुसिलें : तेहीं म्हणीतलें : "बाबुळवनीं गोसावीयांसि आरोगण जाली : ब्रह्मनाथीं पहूडू जाला : गोसावीं सवितेयासि[२] बीजें केलें : हा न्हवे मीं बोळउनि आलां :" तीएं दीसीं तीएं भागलीं : *न टकेंचि*[१] *:* तीएं पींपळवाडीएसि राहिलीं : उदेयांचि सवितेयासि[२] आलीं[३] : राणेयांतें पुसिलें : राणेनि सांघीतलें : "गोसावीयांसि एथ वस्ति जाली : उदेयांचि गोसावीं जोगेस्वरीसि बीजें केलें :" फोडी देखिलीया : तीया उमाइसीं घेतिलीया : "ऐसीया सुरंगा : सुगंधा : आणि सुपरीमळा : तरि आमचेयां गोसावीयांचेया होती :" मग राणेयातें पुसिलें : "गुळुळा कोणी ठाइं जाला?" तेणें सांघीतलें : "गोसावीयांसि गुळुळा एथ *रवणीएवरि*[४] जाला : चौकीं पुजाअवस्वरू जाला :" तैसींचि तीए जोगेस्वरीसि आलीं : तवं भगतिजन गुंफा चोखट करीत असति : गोसावीयांसि जोगेस्वरिचीए देउळाचीए पटिसाळे आसन उतरामुख : तेथ उमाइसां अवडळभटां दरीसन जालें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांपुढां मागील आवघें सांघीतलें : "अमुकीए गाउनि अमुकेया गावां आलीं[५] :" तें उमाइसीं म्हणीतलें : "जी जी : मीयां सुरंगा : सुगंधा आणि सुपरीमळा फोडी देखिलीया : मीयां म्हणीतलें : 'ऐसीया[६] जीया तीया आमचेया गोसावीयांचीयाचि :'" म्हणौनि घेतलीया : गोसावीं मानिलीया : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : मासोउपवासीनी कैसी भावाळु[७] :"।।

---

**५७८.** १ **गो.** दारसखा. **पंभहबी.** दारसका. २ **मुराहबी.** सदीप. ३ **हीराइसें.** दीसा वीसाचें अनुमान. (**मु.**).

**५७९.** १ (**मुरा.**). २ **मुरा.** सेंवंतेयासि. ३ **मुरा.** °नागनाथाचेया गुरूवातें पुसीलें : गुरूवें सांघीतलें : "एथ गोसावीयांसि वसति जाली : एथ गुळुळा केला : हें नव्हे गोसावीं आतांचि बीजें केलें :" उमाइसीं पाहीलें तवं तांबुळ सांडलें देखिलें : फोडी वेचूनि प्रसादु घेतला : "ऐसीया सुरंगा तरि—. ४ (**गो.**) **हबी.** सोंडीएवरि. ५ **भगो.** आलों. ६ **पंगो.** °बरवीया. ७ **हबी.** भावाळीनि.

## ५८० गुंफे अवस्थान

मग गोसावीयांसि गुंफे अवस्थान जालें : दीसां वीसांचें अनुमान : गुंफा पडिसाळेसि उतरे : सेवटीं एकी खणिची गुंफा : एका खणाचें पुढील आंगण : *गुंफेआंतु दखीणीली भीतीसी ओटा : अर्धबाहीरी : एकु पटिसाळेवरी ओटा : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें*[१] : ।।

## ५८१ तथा उमाइ पाणीभाता म्हणीएं

गुंफेसि गोसावीयांसि आसन असें : गोसावीं उमाइसांतें म्हणीतलें : "बाइ : मासोउपवासीनी जीया होती : तीया देउळीं[१] मासुदीसु सडासमार्जन : चौकरंगमाळिका भरिति : देवतेसि गुळभेलीएचा नीवदू दाखवीती : तीएं[२] तुम्हीं एथ मासुदीस सडासंमार्जन करावें : चौकरंगमाळिका भरावीया : एथ पाणीभाताची आरोगण देयावी : बाइसांतें पुसावें : बाइसें म्हणती तैसें करावें :" तीहीं म्हणीतलें : "हो कां जी :" मग बाइसांसांघातें उमाइसें काउळगावीं भीक्षेसि जाति : चोखटु भातु वेगळा घेति : एरि भीक्षा वेगळि घेति : मग बीढारा एति[३] : मग भातु धुति : तीनि वेळ उदकांतु झोळी चुभळीति : मग नवां मडकां घालीति : पाणी घालीति : तोंड गुंडूनि ठेवीति : उदेयांचि एकी झोळीए भातु नीथळत ठेवीति : नीतळतें पाणी वाघारीति : दाटा[४] भातवनीयांची कढी करीति : मग गोसावी वीहरणौनि बीजें करीति : गोसावीयांसि पुजाअवस्वरू होए : पहीलें[५] पाणीभाताचा तुपभातु[६] करीति : ऐसी आरोगण होए : मग पाणीभातु कालण आरोगण होए : ऐसी कीती एक दीस आरोगण होए : ।।

## ५८२ तथा उमाइसें ढीडरें सुगरणि प्रसंसा

ऐसी कीती एक दीस गोसावीयांसि आरोगण दीधली : एकु दीं उमाइसीं म्हणीतलें : "नीच गोसावीयांसि पाणीभाताची आरोगण : काहीं अनसारिखें[१] नाहीं :" म्हणौनि जोन्हळे आपजवीले : एसी आपजवीलीया : सोंडीएवरि[२] वाटिले : बाइसांतें वेसरू[३] मागीतला : मग सापण करूनि ठेविलें : भीडें नाहीं : "आतां काइसेयावरि करूं :" चीपा मेळवीलीया : तीथरी केली : तेयावरि चीप ठेविली : तेलाचा बोळा दीधला : ढीडरें[४] घातलें : उलथुं[५] बैसलीं तवं तें मोडलें : तवं नावेक दुख करूं लागलीं : दुसरा

---

**५८०.** १ (**गो.**).

**५८१.** १ **मुराहबी.** देवद्वारीं. २ **मुरा.** तरि तुम्हीं येथ मासुदीसु पाणीभातु करा : माहातुमे भातु आणिती. ३ **मुरा.** °माहात्मे भीक्षा करूनि येति : तोही चोखट भातु घेति : मग भातु धुति—. ४ **हबी.** नीतळ. ५ **पं.** पहिलें पाणीभाताची आरोगण होए : पाठीं तुपभातकढीएची आरोगण होए : मग पाणीभातु कालण—. ६ **मुरा.** °आणि कढी ऐसी—.

**५८२.** १ **भगोमुरा.** आनारीसें. २ **ह.** पाटेसरैयावरि. **बी.** पाटसरेयावरि. ३ **भ.** वेसवरू. **पंगो.** सांबारू. ४ **हबी.** सापण. **पंगोमुरा.** धीडरें. ५ **हबी.** उचडुं.

बोळा दीधला : ढीडरें[४] घातलें तवं उठिलें[५] : आणि हरीखैलीं : ऐसीं आवघीं ढीडरीं केलीं : गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : ताट केलें : तेथ ढीडरें[७] ओळगविलें होतें : गोसावीं पुसिलें : "बाइ : हें ढीडरें कैचें ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हें मासोउपवासीनीं केलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ढीडरें[७] नीकें जालें :" उमाइसीं म्हणीतलें : "ढीडरें[७] काइसें जी : इएं एसौलें :" "एसौलें म्हणिजति काइ बाइ ?" "जी जी : एसी घालुनि कीजति तीएं एसौलें : उडीदजोन्हळेयांचीं ढीडरीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ढीडरीं नीकीं जालीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मासो-उपवासीनी सुगरीणि असति : तुमचेया उपयोगा जाती :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## ५८३ उमाइ प्रातकाळप्रसंसा

उमाइसें आणि अवडळभट : लींगाचां देउळीं नीजैलीं होतीं : गोसावीं प्रश्रयो सारूनि बीजें केलें : तवं अवडळभट बैसले असति : उमाइसें नीजैलीं असति : तवं अवडळभटीं म्हणीतलें : " उमै उमै : उठि : गोसावीं बीजें केलें असे :" *अवडळभटीं आसन रचीलें : गोसावी आसनी उपवीष्ट जाले[१] :* उमाइसें उठिलीं : तीहीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "धाएतवं खाइजे : पाहे तवं नीजिजे : तैसें[२] न्हविजे कीं बाइ : पस्यांत[३] पाहारीं उठिजे : हा सारस्वत काळु : देवता हृदयासि ए :" मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## ५८४ आउसां भेटि : स्तीति

आउसें वींझासीनीसि धरणें बैसलीं होतीं : तेथ स्वप्नु[१] जाला[२]: "गंगातीरासि जाएं : मग तुज परीसु सीधैल :" तैसीचि तीएं *हींडतेंहीडतें गंगातीरा*[३] काउळगावांसि आलीं : उदेयांचि गोरक्ष फोकरिला : साळेसि बीढार ठेविलें : जवळे डांगुरेस बैसवीले : आपण गंगेचेया घाटा हातपाए धुआवेया आलीं : एकु पाओ धुतला : एकु पाओ धुआवा असे : तवं ब्राह्मणु धानि[४] मागौनि जोगेस्वरीकडौनि घाटासि आला : तेणें पुसिलें : " हां आइ : तुम्हीं काइ श्रीचांगदेओराउळा गोसावीयांचीं ?" "हे रे : श्रीचांगदेओराउळ गोसावी कवण रे ?" "तें काइ आइ : तुम्हीं नेणा ?" "नेणों[५] रे :" मग तेहीं गोसावीयांचे गुणवीसेख सांघीतले : "*तारि तुम्हीं गोसावीयांचेया दर्शना जा :" आणि आउसां आवडी उपनली*[३] : "हे रे : ते कोणी ठाइं असती रे ?" "ना : जोगेस्वरीसि असति :" "जोगेस्वरि ते कवणि ?"

---

६ **हबी.** उचडलें. ७ **पंगोमुरा.** धीढरें.

**५८३.** १ (**गो.**). २ **गो.** ऐसेयां न व्हावें कीं बाइ : ३ **भ.** पश्चात.

**५८४.** १ **अपं.** सपन. २ **अपंगो.** जालें. ३ (**मुरा.**). ४ **पंगोमुराहबी.** धान्य. ५ **पंमुरा.** नेणें.

"ना पैला रूंख दीसताति ते :" "तरि कोणी वाटा जाइजे ?" "ना थडियाथडियाचि जा :" तैसींचि जोगेस्वरीसि आलीं : दारवठां उमाइसांतें पुसिलें : "है रे : पुरूखासि कैसा अवस्वरू असे ?" तेहीं म्हणीतलें : "पुरूखासि आरोगण होति असे :" तैसींचि जोगेस्वरीचीए सोंडीएवरि बैसलीं : राणेयांसि गोष्टी करूं लागलीं : उमाइसीं म्हणीतलें : "जोगीणि कैसी चरबट : गोसावीयांचें[6] दरीसन होए तरि नीकें :" तवं गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : गोसावीयांसि बाइसीं फोडी ओळगविलीया : गोसावी मागिली पटिसाळेसि वेढे करीत असति : बाइसें वीडीया ओळगवितें असति : तवं आउसें दोहीं देउळांमाझारूनि गोसावीयांतें पाहातें असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "आउवादेवी : काइ पाहिजत असिजे ?" "पृथ्वीपलेटन केलें जेयां पुरूखांलागि तेयांतें पाहिजत असिजे जी स्वामी जगंनाथा :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेयां येउनि पाहिजतु :" आणि तीयें साउमीं आलीं*[8] : सर्वज्ञें म्हणीतलें : "आउवादेवी[7]: बैसों आवडे तरि बैसा :" बैसली[8] : आणि तेयां स्तीति जाली : पांचहीं करणें प्रगटलीं : भाटि[9] : उजाइ : पवन उजाइ : हासळी ऋमु[10] : सींगणी नादु : ऐसीं करणें प्रगटलीं : अंतरक्ष[11] आसन उडे[12] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ आसन घाला :" गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तीएं नावेक स्तीति भोगिली : मग स्तीति भंगली : बैसोनि स्तीति भोगिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आउवादेवी[7] : आतां बीढारासि जा :" आउसीं म्हणीतलें : "पृथ्वींपलेटन केलें : उकरडे पुंजे भूरकसितां[13] जन्म गेलें : वींझाया सांघीतलें : 'तूं गंगातीरासि जाए : मग तूज परीसु सीधैल :' तो मज परीसु सीधला : आतां कें जाइजैल जी स्वामी जगंनाथा ? आतां या श्रीचरणांचि पासि बीढार :" मग गोसावीं तेयांचें बीढार पुसिलें : तेहीं सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : जा : यांची मात्रा घेउनि या :" नाथोबा गेले : तेयांची मात्रा घेउनि आले : सरिसे डांगुरेस आले : गोसावीयांपासि मात्रा ठेविली : आउसीं गोसावीयांचां श्रीकरीं भाताचें पात्र[14] ओळगविलें : सीक्षा केली : गोसावीं प्रसादु केला : अवघेयां भगतिजनां दीधला : डांगुरेसासि दीधला : सर्वज्ञें म्हणीतलें : "मासोउपवासनीं‌एं हो : प्रसादु घेयाल : कीं आवळा घेयाल ?" तेहीं म्हणीतलें : "जी जी : मी प्रसादाचा आवळा घेइन :" गोसावीं तेयांसि आवळा दीधला : तेयांउपरि आउसीं म्हणीतलें : "हें रे : यां श्रीचरणां[15] प्रसादें तुझें आझुइं न फिटे ?" मग गोसावीं

---

६ **पंभमुरा.** °यांसि. ७ **भगोहबी.** आउवेदेवी. ८ **मुरा.** °गोसावीयातें पाहातें असति : मग गोसावीं नावायेकां भीतरि बीजें केलें : ओटेयावरि आसन जालें : आउवेंही आलीं : आउसीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : पुढां बैसलीं : गोसावीं अवलोकिलीं : आणि आउसां स्तीति जाली : ९ **मुरा.** भाटिउजाइ : १० **अभ.** °कर्मु. **मुरागो.** °करण. ११ **पं.** अंतराक्ष. **मुरा.** अंतरीक्ष. १२ **पं.** उपवे. **गोहबी.** उपमे. १३ **अ.** भुरखसीतां : **भ.** भरकसीतां. १४ **अ.** पाणिपात्र. १५ **पंगोमुरा.** श्रीचरणाचेनि.

बाइसांकरवि मात्रा पाहाविली : तवं तीनि दाम नीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे एथिचेया उपयोगा[१६] नेया :" देवतें नीगालीं तीएं : सर्वज्ञें म्हणीतलें : "एं पव्हवा :" "ना जी : आवघीं पव्हवीजती तरि पव्हवीजतु : परि रीरीए पीतळेची जोगला देवि आणि तीतरीया[१७] मौहुआचा[१८] कृष्णेया तो नको जी स्वामी जगंनाथा :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "एंहीं पव्हवा : जी जी :" आवघीं पव्हवीजती तरि पव्हवीजतु : परि तीतरेया महुवाचा क्रीस्णीयां हा नको पव्हउं जी :"* सर्वज्ञें म्हणीतलें : "तो कां ना नाएका ?" "ना जी : तो मजपुढां वाट चुकें तेथ मज वाट सांघे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां साचोकारा क्रस्णेया तो तुम्हां वाट सांघैल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हाही पव्हवा :" तेयांचीए मात्रेसि गहुं : चणे : जोन्हळे होते : तेयांचा गोसावीं सपरिवारू उपाहारू करवीला : गोसावीं आपुलेनि श्रीकरें तेयांचीए कानिचीया मुद्रा[१९] फेडिलीया : बाइसांकरवि दोनि वस्त्रें आणवीलीं : वस्त्रें नेसवीलीं : ब्राह्मणि माहात्मी केली : मग बाइसीं गोसावीयांपुरता उपाहारू नीवडुनि चोखटु केला : एरांचीं दीवसीं केलीं : तेल आणिलें : गोसावीयांसि सपरिवारीं आरोगण जाली : पात्र श्रीकरीं ओळगविलें : सीक्षा केली : गोसांवीयांसि अक्षता ओळगावावेयाकारणें बाइसीं तांदूळ भीजों घातले होते : ते आउसीं चुबकरि हातु घालुनि घेतले : तवं उमाइसीं[२०] म्हणीतलें : "हें काइ ओ जालें जोगिणीसि : बाबाचीए आरोगणेचे तांदुळ घेतले : कसमळ हात घातले :" तवं आउसीं म्हणीतलें : "हें रे : यां पायां प्रसादें आह्मुइं तुझें चोखमैळें न फीटे : ।।

## ५८५ भटां : माहादाइसां : देवां भेटि

गोसावीयांसि दूपाहारिची आरोगण जाली : गुळुळा जाला : बाइसीं फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति : गोसावीयांसि भीतरिली भींतिसी समोर उतराभिमुख आसन असे : तवं[१] परमेस्वरपुरिचीं कापडीएं देव : भट : महादाइसें : आंगणीं उभीं ठेलीं : गुंफेचां : गोसावीं देखिलें : आणि टाळी वाउनि म्हणीतलें : "हें काइ : परमेस्वरपुरिचीं कापडीएं आलीं मा :" तैसेंचि गुंफेचीया आंगणासि बीजें केलें : गोसावीं आवघेयां क्षेमाळींगन दीधलें : तीहीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांसि भीतरि[२] ओटेयावरि आसन जालें : गोसावीयांजवळि बैसलीं : गोसावीं अनुकरौनि[३] म्हणीतलें : "श्रीप्रभू नीकेनि राज्य करीत असति[४] ?" "जी जी : नीकेनि राज्य करीत

---

१६ **पं.** उपेगा. १७ **पंभगो.** तीतरेया. १८ **पंगो.** महुआचा. **भ.** मौहाचा. १९ **अ.** मुद्रीका. २० **पंगोमुरा.** बाइसीं.

**५८५.** १ **गोहबी.** °देव : भट : महदाइसें : (**हबी.** हंसराजू) रीधपूरीहुनि आलीं : गोसावीं देखीलीं—. २ **गो.** °तयाचि. ३ **गोहबी.** °क्षेमवार्ता पुसिली. ४ **गो.** °श्रीप्रभूचे भक्तजन नीकेन राज्य करीत

असति :" मग दोन्हीं पोटळीया प्रसादाचीया : लाडुवांचीया आणिलीया होतीया : तीया गोसावीयांचां श्रीकरीं ओळगविलीया : गोसावीं श्रीकरीं घेउनि न्मस्करिलीया : मग सोडुनि प्रसादू केला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यां लाडूवां गुळु[५] पुरला : यां न पुरेचि :" "हो जी : ऐसेंचि तेहीं गोसावीं जाणीतलें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो[६] : तेथ नेणिजे ऐसें काहीं असे ? तेथ सकळै जाणौनि नेणिजे कीं : *तेथिचें सकळही तें तेथिचेयाचि प्रवृत्ति[७] :*" मग माहादाइसें उगींचि गोसावीयांजवळि बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथ गेलींति : मग काइ करा ?" माहादाइसीं सांघों आदरिलें :

"जी जी : तेथ गेलों : एकु दीसु गोसावी नगरामध्यें खेळावेया बीजें करीत होते : तवं मीयां म्हणीतलें : 'जी जी : आजि गोसावी खेळावेया बीजें न करावें : मीं गोसावीयांसि ढीडरें ओळगवीन :' श्रीप्रभुगोसावीं म्हणीतलें : 'मेली जाए : ढीडरें[८] देइल म्हणे :' म्हणौनि गोसावी हरीखू स्वीकरूनि आसनीं उपवीष्ट जाले : मीयां ढीडरें केलें : वाटीए तुप घातलें : गोसावीयांचां श्रीकरीं ढीडरें ओळगविलें : गोसावीं ऐसें अवळोकिलें आणि म्हणीतलें : 'आवो मेली जाए म्हणे : हा आहिता म्हणें : ढीडरें न्हवे म्हणें : आओ : ढीडरें दे म्हणें :' म्हणौनि गोसावीं खालि घातलें : जी जी : मीयां ढीडरें घेतलें : मागुतें श्रीकरीं ओळगविलें : मीयां म्हणीतलें : 'जी जी : आमतें गंगातीरीं ढीडरें म्हणिजे : तुमतें वराडीं आहिता ऐसें म्हणिजे : जी जी : हें ढीडरेंचि जी :' म्हणौनि मागुतें श्रीकरीं ओळगविलें : गोसावीं ऐसें अवळोकिलें : 'आवो मेली जाए : ढीडरें हें न्हवे म्हणें : आहिता : आवो : ढीडरें दे' म्हणौनि मागुतें खालि घातलें : तेह्वळि मीं बीहालीएं जी[९] : फूलसोजी होती ते दूधाआंतु कालवीली : आंतु साकर घातली[१०] : तुपाचा बोळा दीधला : वरि संखाक्रुत घातलें : वरि एळामीरींयांची पुडी घातली : मग गोसावीयांचां श्रीकरीं ओळगवीलें : गोसावीं ऐसें अवळोकिलें : मग म्हणीतलें : 'ऐया माझा : आतां होए म्हणें : ढीडरें दीधलें म्हणें :' मग गोसावीं आरोगण केली :" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेधवां श्रीप्रभूची प्रवृति भंगलीचि होती : मां तें तुम्हां कैसेनि स्फुरलें[११] ?"

"जी जी : एकु दीं गोसावीयांलागौनि अमृतफळें केलीं : तीएं गोसावीयांसि रुचलीं : रात्रीं व्याळीएलागि ठेविलीं : गोसावीयांसि ताट केलें : अमृतफळ ओळगविलें : अमृतफळें वोलीं : ते सीयाळे दीस : तीएं हीवं ऐसीं जालीं होतीं : गोसावीयांसि उस्णाची प्रवृति : श्रीप्रभु म्हणीतलें : 'मेली जाए : तावि म्हणें :' जी जी : गेलीएं : तो पापड उन्ह करूनि ओळगविला : मागुतें श्रीप्रभु म्हणीतलें : 'मेली जाए : तावि म्हणें : तावी ना म्हणें :' *जी जी : गेलीएं : वाटीएं तूप उन्ह करूनि ठेविलें : मागुतें श्रीप्रभु म्हणीतलें : 'मेली जाए :*

---

असति ?" ५ **मुरा.** पाकु. ६ **एवा.** °तेथ काहीं नेणणें असे ? ७ (**प्रव. वि.** २१५). ८ **गो.** धीढरें.
९ **गो.** °गजबजीलींयें जी : १० **ह.** °तावीए. **बी.** °तावीसि. ११ **एवा.** संचरलें.

*तावि म्हणें*[१२] *:* ' तें मी बीहालीएं जी : तवं श्रीप्रभु म्हणीतलें : 'आवो : काह्या काह्या भीतीए[१३]?' म्हणौनि श्रीकरीं अमृतफळ मोडूनि दाखवीलें : जी जी : मग मीयां[१४] वेळणीएसि इंगळ[१५] घातले : वस्त्र घालुनि अमृतफळ उन्ह् करीं : मग गोसावीयांसि ओळगवीं : मग गोसावीं आरोगण केली जी : " ।।

"जी जी : गोसावीयांसि बहुत दीस मादणें नाहीं जी : गोसावीयांचा श्रीमुगुटु फूरुसैला होता : जी जी : मीं गेलीएं : गोसावीयांचां श्रीमुगुटीं न पुसत तेंल ओळगविलें : आणि गोसावीं कोपु स्वीकरिला : गोसावीयांचा अधरू कांपीनला : 'हें काइ : माहादी फेंदी[१६] : दांडेवरि सीस लावावें म्हणें : ओणां घालावें म्हणें : ' तैसेंचि गोसावीं बीजें केलें : सरिसी मींहीं गेलीएं : तवं नागदेवातें म्हणीतलें : 'चुलीखालील उबाळा आखूडि[१७] हो : ' तवं दारवठां दादोस भेटले : 'रूपै रूपै : ओखटें करीतें असा : *गोसावीयांची प्रवृति भंगीतें असा*[१८] *:* जेणें नर्का जा कां : तेंचि करितें असा : ' मीयां म्हणीतलें : 'दादो : उगे असा हो : फाटकां पाओ नको सों : ' तैसेंचि गोसावीं टोंकणेयांचेया आवारासि बीजें केलें : ओसरीएवरि[१९] उकड आसन जालें : गोसावीयांचेया भाळप्रदेसावरि जें तेल ए तें गोसावी दारवंडेसि[२०] पुसिति : मीयां वीनवीलें : 'जी जी : मीं पुसुं ?' 'आओ मेली जाए : उगी उगी म्हणें : ' गोसावीं कोपु स्वीकरिला होता : *मागौतें वीनवीलें : 'जी जी : मीं पुसुं ?' 'आवों : उगी उगी म्हणें : ' तीसरीए वेळे*[२१] मग गोसावीं प्रसंना दृष्टी अवळोकिलें : मग मीयां श्रीमुगुटावरि हातु ठेविला : आणि गोसावीयांसि समस्तळ आसन जालें : तेयांतें जाडि मागीतली : गोसावीयांसि आसन जालें : तेथ तेहीं डेराभरि पाणीयां ठेविला : भटांतें म्हणीतलें : 'नागदेया चुली उबाळा सुय जाए : ' *टोकणेयांची स्त्री तीहीं वाटीभरि तेला दीधली*[२२] *:* मग जी : गोसावीयांचां श्रीमुगुटीं तेल ओळगविलें : व्रीगूंठि[२३] घातली : मग जी : गोसावीयांचे श्रीचरण उटिलें : मग जी : गोसावी एकु एकु श्रीचरणु दोनि दोनि वेळ देति : " आणि माहादाइसां दुख उपजे : सांघति तवंतवं दूख करीति : याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : ऐसें दूख करीत असा तरि तेथौनि कां आलींति ?" "जी जी : मीं काइ एति होतीएं ? मातें दादोसीं आणिलें : ऐसांहीं न एं : मग नागदेयाकरवि म्हणवीलें : " गोसावीं दादोसांची वास पाहिली : *सर्वज्ञें म्हणीतलें : "हां माहात्मे हो ?" तवं*[२४] दादोसीं म्हणीतलें : "जी जी : मां एं तेथ असौनि काइ धड करितें होतीं ? श्रीप्रभूची प्रवृति भंगीति : देहाचे[२५] लक्ष दाहा एक कीडीया मुंगीया मारीति : भीतरि नीद्रा करीति : " याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : भीतरि नीद्रा

१२ (**पं.**). १३. **पंगो.** भीतासि. १४ **गो.** मीयां चोखटे वस्त्रीं घातलीं : नीवयावरि सेकौनि ओळगवीलीं. १५ **हबी.** नीवे. १६ **पं.** पेंधी. १७ **गोहबी.** काहाडि. १८ (**गोहबी.**). १९ **गो.** उंबरेयावरि. २० **गो.** भीतीसी. २१ (**गोहबी.**). २२ (**गो.**). २३ **बी.** विरगुंठी. २४ (**मुरागो.**). २५ **मुरा.** दीहाचि. **हबी.** दीसवडी.

कां करा ?" माहादाइसें बीहालीं : गोसावीं[२६] वारिलें होतें : मग[२७] सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथ काहीं करण होतें ?" "जी जी :" "*तें काइ ?*" "*जी जी*[२८] : गोसावीयांसि उदरव्यथेची प्रवृति : गोसावी[२९] दोन्ही श्रीकर जोतीवरि दावीति : मग दोंदावरि ठेवीति : *आणि म्हणति : 'आवो : होए होए म्हणें : एथचि वो : एथ असे*[३०] : ' मग मीं सगडी[३१] घालीं : हात सेकी : मग गोसावीयांचेया दोंदावरि ठेवीं : गोसावी 'हाए :' म्हणौनि स्वीकरीति : गोसावीयांसि त्रीखेची[३२] प्रवृति तरि उदक ओळगवीं : उघडी श्रीमुर्ति ठाके तरि पांगुरवीं :" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ उदरव्येथा काइसी पां ?" म्हणौनि चींता स्वीकरिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथिचें तें सकळै तेथचियाचि प्रवृती :" ॥

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : देहाचिया लक्ष[३३] दाहा कीडीया मुंगीया कां मारा ?" "ना जी : कीडीया मुंगीया काइसेया मारीन ? गोसावी तेया वाटा बीजें करीति : ते गोसावीयांचां श्रीचरणीं खडेगोटे रूपति : म्हणौनि मीं बीदीगोदरीया झाडीं : सडा घालीं : चौकरंगमाळिका भरीं :" तवं दादोसीं म्हणीतलें : "गोसावी तेउतें काइ बीजें करीत असति ? गोसावी आनौतेंचि बीजें करीति : यांचीया रंगमाळिका तीया आनौतीयाचि :" "ना जी : तें एकु दीसु गोसावीं *चुकौनी*[३४] सांदीहुनि बीजें केलें : मग मीयां एरी दीसीं दोहीं सांदी लीगटौनि[३५] सडा घातला : गोसावीं बीजें केलें : सरिसा नागदेओ होता : गोसावी *रंगमाळिका चुकौनी*[३४] आणिकीकडे बीजें करावेया आवांकीत होते : *तवं संदी नाहीं*[३४] : तें भटांची वास पाहिली आणि नागदेनि[३६] म्हणीतलें : 'जी जी :' ऐसे आमचे गोसावी[३७] सुख देति : आणि गोसावीं हास्य स्वीकरूनि बीजें केलें :"

याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीप्रभूची सेवा आणि हींसा ? केसवनाएकाचा पऱ्हीवा जंतु[३८] भरला असे : श्रीप्रभू तीया वाटा बीजें केलें : श्रीप्रभूसि गंधि एइल म्हणौनि कव्हणी एकु उपसे : मग श्रीप्रभू तेया वाटा बीजें करीतु अथवा न करीतु : परि ते श्रीप्रभूचीचि सेवा केली होए कीं : साक्षात करचरणवंत ब्रह्म : जीहीं बीदीगोदरीया क्रीडा तेथची सेवा : आणि हींसा ? श्रीप्रभूची सेवा ते अदृष्टसेवा : प्राणीयांसि करूं आवडे[३९] : *श्रीप्रभु करूं देति : स्वीकरीति*[४०] : ओखटें केलें : ऐसें कीजे ? ऐसा प्राणीया धर्मापासौनि काढिजे ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "वासरूं तान्हैलें होतें : तें पाणियाची वोल देखौनि*

---

२६ **गो.** °नीगतां. २७ **गो.** पाठीं गोसावींचि मुख केलें : सर्वज्ञें म्हणीतलें—. २८ (**मुरा.**). २९ **हबी.** गोसावी वातिकडे ऐसा श्रीकरु दाखवीति (**एवा.** करीति :) आणि उदरावरि ठेवीति. ३० (**हबी.**). **गो.** आवो हाये हाये म्हणे. ३१ **गो.** सगडीये नीवे घालीं. ३२ **भमुरा.** तृषेची. ३३ **पंगो.** लख. ३४ (**गो.**). ३५ **अभं.** °कडौनि. ३६. **हबी.** मीयां. ३७. **हबीगो.** °कणवाळु :" आणि—. ३८ **पं.** जंतीं. ३९ **गोहबी.** °श्रीप्रभूसि देओं आवडे : आहा : वोखटें केलें°. ४० (**मुरा.**).

*अडाभवंतें भवे : वाटा लाडु जातु होता : ' बापुडी वासी तान्हैली ' म्हणौनि चहुं पाइं धरुनि आडांतु घातली : ते जीवें जाए : तयासि नरक होति*[४१] *:" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ सेवकासि अविधि नाहीं : तुम्ही भीओं नका : " " हो कां जी*[४२] *: "* ऐसें गोसावीं दादोसांसि सीक्षापण केलें : ।।

## ५८६ मार्गी देवता अनुवर्जन : माहादाइसां प्रकासदर्सन

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें अरण्य : अभ्यागतें आलों : आतां नगरामध्यें जाइजैल : बाइ : आइति करा : " बाइसीं आइति केली : मग गोसावीं बाइसांसाघातें आवघीं भगतिजनें पुढें पाठवीलीं : माहादाइसें मागां आइति करीतें होतीं : नावेक उसीरू लागला : गोसावीं माहादाइसांतें म्हणीतलें : " बाइ : तुम्हीं पुढें चाला : मागील वास नको पाहों : " माहादाइसें पुढां चालतें असेति : गोसावी मागां : माहादाइसीं म्हणीतलें : " गोसावीं मातें कां पां वारिलें ? " म्हणौनि मागील वास पाहिली : गोसावीयांमागां होळीएएसना गगनचुंबीतु प्रकासु देखिला : मग गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : गोसावीं मागील वास न पाहावी म्हणीतलें : तें मीयां मागील वास पाहिली : तो मीयां होळीए-येसना गगनचुंबीतु प्रकासु देखिला : हां जी : तरि तें काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तीए स्थानीची देवता : एथिचें[१] अनुवर्जन करीत एत होती : तुम्हीं माघौतें पाहिलें : ते तेथचि राहिली : एऱ्हवीं हें स्थानवऱ्ही एती : " ।।

## ५८७ संगमेस्वरीं आसन : लुडी क्रीडा

मग गोसावीं संगमेस्वरासि बीजें केलें : चौकिचेया[१] दारवठेयाचीए आडदांडीएपासि ब्राह्मणु[२] भेटला : तेणें गोसावीयांसि माहुळींग ओळगविलें : चौकीं आसन जालें : गोसावीं[३] प्रसादू केला : मग ' लुडि रे लुडि ' म्हणौनि बाइसांकडे घातलें : बाइसें खाओं लागलीं : गोसावीं भटांची वास पाहिली : डोळा घातला : आणि भटीं बाइसांचा हातु तळि हाणीतला : आणि वरि झेलुनि घेतलें : मग भट[४] खाओं लागले : मग गोसावीं इंद्रभटांतें म्हणीतलें : " इंद्रेया : तुम्हीं लटलेति[५] गा ? " मग इंद्रभटीं भटांचीए हातिचें झौंबौनि घेतलें : मग इंद्रभट[६] खाओं लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा इंद्रेया : सापें तुम्हीहीं लंड जालेति मां : " " जी जी : मा गोसावीं लुडि घातली[७] कीं : " ।।

---

४१ (**दृपा.** १८ लाडाचीए बासीचा दृष्टांत. 'देवाप्रति. **एवा.** देवावरि निरूपिला ' –**दृस्थ.**).
४२ (**प्रव. आ.** २७९).

**५८६.** १ **मुरा.** तुमतें अनुवर्जीत एति होती.

**५८७.** १ **गो.** बाहीरीला मंडपाचां दारवठां कवणें एकें ब्राम्हणें . . . माहाळूंग वोळगवीलें. २ **मुरा.** राणा. ३ **गो.** °नखेंकरुनि लुडुनि प्रसादु केला. ४ **हृ.** °लुडि खाति. ५ **अ.** चुकलेति. **मुरा.** लुटलेति. ६ **हबी.** °लुडौनि. ७ **भमुरा.** लट. **गोहबी.** लुड. ८ **अ.** केली.

## ५८८ गुंफे वस्ति : उमाइसें बीढारा पाठवणें

मग गोसावीं वाव्य कोणिचीए गुंफेसि बीजें केलें : गोसावीयांसि रात्रीं पुजाअवस्वर जालेयाअनंतरें दादोस : माहादाइसें : भट : एरी गुंफेसि नीद्रास्थाना नीगालीं[१] : उमाइसें[२] बाहीरि भीतरि नीगों लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : *बांधली गाए असे : ते सुटावेयालागौनि खुंटाभवंती भवे : तेणें तिएचा गळा अधिकाचि आवळे : जेणें बीरडे लावीलें तो सोडी तै सूटे : कां तीये जातीचें लेंकरूं सोडी तै सूटे*[३] : बाइ : तुम्हींही बीढारासि जा : कळपिची गाए कळपींचि मीळे : " ।।

## ५८९ भटां इस्वरप्रतीति करणें

उमाइसातें बीढारा पाठवीलेयानंतरें मग गोसावीयांसि आरोगण जाली : बाइसीं फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति : गोसावीं बाइसांपासौनि श्रीकरीं पानें घेतलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : प्रमेस्वरपुरूनि[१] नागदेवो नावं[२] ब्राह्मणु आला असे : तेयातें बोलावा : जा : " बाइसें आलीं : " रामा : परमेस्वरपुरौनि[१] नागदेओ नावं[२] ब्राह्मणु आला असे : तेयातें बाबा बोलावीत असति : " दादोसीं म्हणीतलें : " जाए पां नागदेया : तुतें गोसावी[३] बोलावीत असति : " तैसेचि भट आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : वीनतकंदर होउनि गोसावीयांजवळे बैसले : मग गोसावीं पुसिलें : " काइ गा : परमेस्वरपुर देखिलें ?" " जी जी : " " श्रीप्रभु देखीले ?" " जी जी : " " श्रीप्रभूचीया लीळा क्रीडा देखिलीया ?" " जी जी : " " तीया एथ सांघा पां : " " जी जी : मा तीया काइ सांघों जाणीजत असिजे ?" " तें कीरूं तैसेंचि : परि तन्ही : " मग अनुभविचीया सांघों आदरिलीया : " जी जी : गोसावी उदीयांचि उठीति : वेढे करीति : मग आपवीहिरेया बीजें करीति : मार्गीं गुढेसीं खेळु करीति : पांचपींपळीयांसीं खेळु करीति : आपवीहीरां खेळु करीति : मग गोसावी नगरामध्यें बीजें करीति : घरोघरीं बीजें करीति : श्रीकरीं उतरडी उतरीति : साकपाक चाखति : मागुतीया रचीति : ' मेली जाए : ऐसें न्हवे : ' म्हणौनि मागुतीया उतरीति : मागुतीया रचीति : ऐसें अवळोकीति : मग म्हणति : ' ऐया माझा : आतां होए म्हणें[४] : ' मार्गीं बोजें करीत असति : *गगनाची वास पाहाति : टाळी वाति*[५] : आणि खदखदकरि हांस्य करीति : " ऐसीया अनुभविचीया सातपांच सांघीतलीया :

---

५८८. १ **अपंभ.** आलीं. २ **मुरा.** आंतुबाहीरि रीगतां देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें---. ३ (**दृपा.** १९. बांधलीए गाइचा दृष्टांत. 'उमाइसाप्रति : . कळपींची गाए कळपीं : ये लीळेवरि संगमेश्वरीं निरूपिला : ' --**दृस्थ.**).

५८९. १ **गो.** °पुरुनु. २ **मुरागो.** नांवें. ३ **मुराहबी.** °कां बोलावीत असति. **गो.** °काइसेया-लागि---. ४ **हबी.** °म्हणौनि आपणेयां आपण साक्ष करीति : ५ (**गो.**).

गोसावीं अनुकरौनि आइकिलिया : मग म्हणीतलें : " श्रीप्रभूवरि : एथ : माहात्मेयावरि कैसी बुधि[६] ?" "जी जी : सारिखी :" याउपरि बाइसीं म्हणीतलें : " मर पोरा : तुझां[७] मडां वांधें घागरा : तुझीए कीडडी बांधें घागरा : जो मसनवरि जाए बोवात : बाबासि आणि माहात्मेयासि ओ सरि केली : रडौनि बाबातें आचारीत्व[८] मागीतलें : तेयासि आणि बाबासि सरि केली :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : राहा : पुर्वी तुम्हींचि एथ काइ केलें ? पाएपुसणें[९] बैसों न घलाचि ? दूधिकरंटां पाणीभातु[१०] नेदाचि ?" "नको बाबा : नको बाबा :" म्हणौनि ऐसे हात ओडवीति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : सतेव काइ जीवासि जाणणें असे : एथौनि जाणवीजे तै जाणिजे : *जीवाचां माथां अनादिअविद्या असे*[११] :" सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीप्रभूचीया केळिक्रीडा देखिलीया आणि माहात्मेयाचीया[१२] चेष्टा देखिलीया : ऐसें एन्हेंएन्ह वीचारितां तवं काहीं अनसारिखे न दीसेचि होए ?" मग भट वीचारूं लागले : तवं गोसावीयांचीया अगाध लीळा देखिति : आणि दादोसांचीया कुचीत चेष्टा देखति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीप्रभू ते आत्मारामु : श्रीप्रभू ते नीर्गुण[१३] ब्रह्म : श्रीप्रभू ते नीत्यमुक्त वस्तु : *आणि महात्मा तो एक जीव : जैसें आणीकी जीव : जीवु विषमु : परमेस्वर समु*[१४] : जीव आणि बांधावे : आणि सोडावे : ऐसेयां जीवांतें श्रीप्रभू मोकलीति[१५] तैचि जीव मुंचति[१६] कीं : *बाइ : जीव जीवां काइ होति ? परमेस्वरू एकु सोडविता*[१७] : श्रीप्रभू जे लीळा क्रीडति तेधवां कव्हणाइं जीवां क्षणुपरीएंत अनुकरवेही ना :" ऐसें गोसावीं नीरूपण केलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणा एका अंताचीए सवडी वज्रकीटकी लागली असे : ते आगीं जाळितां जळे ना : पाणिये बुडे ना : शस्त्रें छेदे ना : घणवारी पीटितां परि मरे ना : सांडसवारी तोडीतां परि तुटे ना : कव्हणीचि रोगु नेणे : अधिका दुःखचि होए : एकाधा एकु रोगु जाणे परि उपावो नेणे : एकाधा उपावो जाणे तरि रोगु नेणे : एकाधा एकु जाणता ये : तो रोगुही जाणे आणि उपावोही जाणे : तो तयातें अपये पाजी : तेणें तें चरफडौनि मरे*[१८] :" ऐसें गोसावीं निरूपण केलें : *आणि पांच प्रकर्णे निरूपिलीं*[१९] : मग भटांतें बीढारा पाठवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बीढारा जा : माहात्मा वाट पाहात असैल :" तैसेंचि भटीं गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग बीढारासि गेले : ॥

---

६ **गोमुरा.** प्रतीती. ७ **एवा.** तुझां कीडडीये बांधें घागरा—. ८ **गोमुरा.** आचार्यत्व. ९ **मुरापंभअ.** °बैसावेया घातलें. १० **मुरा.** °घातला. ११ **(प्रव. विमा.** ३४). १२ **मुरा.** माहात्मेयाचें चेष्टीत देखीलें—. १३ **गो.** अवक्रीय. १४ **(प्रव. विमा.** ३५). १५ **गो.** सोडवीति. १६ **गो.** सुटति. १७ **(प्रव विमा.** ३७, ३८). १८ (**'दृपा.** २०. वज्रकीटकीयेचा दृष्टांत' 'भटांप्रति खडकुलीए निरोपिला '—**दृस्थ.** खडकुली येथील लीळांत हा दृष्टांत बसत नाही. येथे तो चपखल बसतो. म्हणून येथे पुनःस्थापित केला आहे). १९ (**प्रव.** नव प्रकरणाचा प्रकरणवश : 'सावखेडा पूर्वार्ध : भटां ईश्वरप्रतीति करणें :' ही पाच प्रकरणे या ग्रंथात पुढीलप्रमाणे अन्यत्र आली आहेत. **अन्यव्यावृत्ति** (पूर्वार्ध लीळा ४५४) ; **युगधर्म** (उत्तरार्ध लीळा ४५८) ; **विद्यामार्ग** (उत्तरार्ध लीळा ५०५) ;

तवं दादोस नीजैले असति : भट वाहीरि बैसले : गोसावीयांसि पहुडु जाला : पस्यांत[२०] पाहारीं उपहुडु जाला : प्रश्र्यासि बीजें केलें : प्रश्र्यो सारूनि गोसावीयांसि भीतरि आसन जालें : बाइसांतें म्हणीतलें : " बाइ : जा : रात्रिचा ब्राह्मणु बोलावा[२१] : " बाइसें गेलीं : तवं भट वाहीरि बैसले असति : बाइसीं म्हणीतलें : " नागदेया : तूतें बाबा बोलावीत असति : " तैसेचि भट आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : वीनतकंदर होउनि गोसावीयांजवळे बैसले : गोसावीं पुसिलें : " एथौनि गेलेति : माहात्मा काइ म्हणे ?" " जी जी : मी गेलां तवं दादोस नीजैले होते : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हींहीं जाउनि नीजैलेति ?" " ना जी : मज नीद्रा नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कां गा ? काहीं दसकमसकाचा उपद्रो होता ?" " ना जी : तें नाहीं : गोसावीं निरोपिलें तें आंवांकीत होतां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आवांकेया एत असे ?" " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आंवांकेया ए तें घेइजे हो : तेतुकें आपुलें जाओं नेदिजे : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एक हरियांची खाणि खणति : खणतखणतां खांब राखति : वोदरे तेथ टेका सुति : तयासि षटकोणि हिरा सांपडे : एकासि हीरेकणी सांपडे : एकु नसुधा रीगे : नीगे : एकावरि* दरड पड[२२] *: "* म्हणौनि गोसावीं मागौतें रात्रिचें नीरूपण केलें : राजीवेश्वर विभाग निरोपिला : मग भटोबासांसि बोधू जाला : ।।

## ५९० आबैयो रंगमाळिका प्रमार्जणें

मग गोसावीयांसि उदीयांचा पुजाअवस्वर जालेयाअनंतरें गोसावीं आंगीटोपरें लेउनि संगमेस्वरासि बीजें केलें : तवं आबैयो[१] : 'रंगमाळिका भरावेया : मग जोगेस्वरीसि गोसावीयांतें वीनवावेया जावें : म्हणौनि पाहानपटींचि[२] येउनि देउळीं ओटेयावरि ओणवीओणवी रंगमाळिका भरितें असति : गोसावी चौकीं उभे ठेले : फुटेयाची खोलबुंथि घातली : फुटेयाचा[३] पदरू लोंबता धरिला[४] : आणि बीजें केलें : तेयांचीया रंगमाळिका नावेक पुसिलीया : आणि तेहीं फुटेयाचा पदरू वरुता धरिला : "पालौ आखूडा बा : " म्हणौनि स्वरांत[५] केलें : मग गोसावीं संगमेस्वराचेया दारापासि बीजें केलें : दोहीं श्रीकरीं दारवंडा धरिलीया : भीतरि अवळोकिलें : माघुती गोसावीं अधीकि खोलबुंथि घातली : अधीकु फुटेयाचा पालौ[६] गोसावीं लोंवता धरिला : आणि बीजें केलें : तीया अवघीयाचि रंगमाळिका पुसिलीया : आणि म्हणीतलें : "हें काइ ओ माए :

संहार (उत्तरार्ध लीळा ३१३); आणि संसरण (उत्तरार्ध लीळा १४१). पुनरुक्ती होऊ नये म्हणून, व या लीळेची वाङ्मयीन कलात्मकता कायम राहावी म्हणून ती येथे उद्धृत केली नाहीत.)
२० **भ.** पश्चात. २१ **एवा.** °मागीलाचि सब्दु. २२ (**दृपा.** हीरेखणियाचा दृष्टांत. 'सावखेडा— 'संगमेश्वरी' भटांप्रति निरूपिला : **एवा.** महादाइसांप्रति' —**दृस्थ.** नेने संपादित **दृपा.** पान ६६ पहा).

**५९०.** १ **मु.** (**स्वमति शोध.** यें कवण आबयो तें नेणिजे : एके म्हणति : तीये स्थानीची कठीयें :). २ **ह.** पाहातपटींचि. ३ **गोमुरा.** °सूरंगु रूळतु धरीला : गोसावीं भीतरि बीजें केलें. ४ **हबी.** घातला. ५ **मुरा.** श्रांतें म्हणीतलें. **ह.** का स्वरांतु बोलीली. **भ.** श्रांत केलें. **पं.** सर केलें. ६ **एवा.** सूरंगु.

देसकाळिचेयां देंटीयांचीया वरुतीयाचि वासा[७] : खालुतें तें पाहाणेंचि नाहीं :" तैसेंचि गोसावी बाहीरीली चौकीं उभे राहिले : श्रीमुख उघडीलें : मग म्हणीतलें : "हें काइ वाइ : हें उचलौनि तुमचेया ठायासि आलें : मां तोंडें तोंड जाणतां[८] यांसि सवीया कैसीया देतें असा? मा काइ उचललिं माणिकें हळुवें?" तैसेंचि तीएं आलीं : श्रीचरणां लागलीं : मग म्हणीतलें : "जी जी : गोसावीं एथ बीजें केलें : ऐसें मीं जाणें ना जी : मीयां एथ रंगमाळिका भरावीया : मग गोसावीयांतें जोगेस्वरीसि उपाहारालागि वीनवावेया जावें : तवं गोसावींचि बीजें केलें : जी जी : आजिचां दीस गोसावीं राहावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें तुमचीए चतुर्सीवेसि[९] उभें न न्हाएं :" गोसावीं बीजें केलें : तीएं गोसावीयांतें वीनवीतें नीगालीं : गोसावीं तेयांतें आंगुळीए धरिलें : मग गोसावी दारवठांचीया आवघीया पाइरीया उतरौनि हातां दों कां उभे राहिले : वीनवणी स्वीकरिली : मग म्हणीतलें : "आतां हें खडकलीएसि नीगालें : तेथ उपाहारू घेउनि या :" तैसींचि तीएं श्रीचरणांसि लागलीं[१०]: मग नीगालीं : ।।

## ५९१ उपाध्यां भेटि

पुढिला[१] खडकावरि उपाध्यांसि भेटि जाली : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीं कपाटासि बीजें केलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : हुरडेयाचे काटाळे गोसावीयांसि दरीसन केले : हुरडेयाचे कणु दोनि सांडले[२] होते : ते वेंचुनि गोसावीं प्रसादू केला : तेथ गोसावीं उपाध्यांकरवि हुरडा भाजवीला : तवं गोसावीयांसि तेथ आसन असे : मग आवघीं भगतिजनें गोसावीं एरी[३] वाटा खडकलीएसि पाठवीलीं : गोसावीं मेघवणीए पागेचा धाटा केला : अवधूताचेया खांदावरी आरोहण केलें : मग सीवन[४] उतरले : घाटीं खांदावरौनि उतरले : वस्त्रें वेढिलीं : मग संगमेस्वरासि बीजें केलें : तेथ[५] चौकीं नावेक आसन जालें : मग तेथौनि गोसावीं थडीयाथडीया कपाटें[६] पाहातपाहात खडकलीएसि बीजें केलें : तेथ अवस्थान जालें : गोसावीयांसि आसन जालें : मग बाइसीं वरवा हुरडा चोखटु केला : वाटां घातला : साकर घातली : गोसावीयांसि ओळगविला : गोसावीं प्रसादू केला : आवघेयां भगतिजनासि दीधला : गोसावीं हुरडा आरोगिला : गुळुळा केला : वीडा ओळगविला : ।।

## ५९२ आबैयापुरिकाभोजनीं संतोखू

तवं काउळगाविचे वीस्णुभटदेव गोसावीयांलागि उपाहारू घेउनि आले : गोसावीयांसि पुजाअवस्वर जालेयाअनंतरें ताट जालें : गोसावीयांसि आरोगण जाली : बाइसीं

---

७ **पंगोमुराहबी.** माना. ८ **हबी.** जाणौनि. ९ **अ.** चतुसींवेसि. १० **मुरा.** (**एवा.**) °पालवीं धरूनि म्हणीतलें : "जी जी : उपसाहावें जी :" मग नीगालीं.

**५९१.** १ **मुरा.** तवं उपाध्ये विष्णुभट आले—. **एवा.** पौळीचेया नृत्य कोनटेयापासि—. २ **पं.** झडले. ३ **गोहबीमुरा.** उजू. ४ **मुरा.** संगम. ५ **एवा.** एरी देउळीए उतरामुखें—. ६ **गो.** मढमंडप.

फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति : तवं आबैया पुरीया तुप[१]: ऐसा उपाहारू घेउनि एतें असति : तवं लखूबाइसें भेटलीं : लखूबाइसांतें पुसिलें : "गोसावीयांसि कैसा अवस्वरू असे?" तेहीं म्हणीतलें : "गोसावीयांसि पुजाअवस्वर जालेया-अनंतरें काउळगांविचेया वीस्णुभटांदेवांचा उपाहारू आला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : बाइसीं फोडी ओळगविलीया : वीडीया करूनि देतें असति :" तवं तीएं दुख करितें आलीं : "मी पापीणि : माझें गोसावीयांचेया[२] वीनीयोगा काइसेया जाइल?" ऐसें दुख करितें आलीं : गोसावीं देखिलें : आणि भाळप्रदेसावरि श्रीकरू ठेविला : "हें काइ बाइ : उसीरू लाविला? एथ आतिसो[३] क्षुधा लागली असे : हें[४] तुमची वाट पाहात असे : वाढा ना :" "जी जी : मी काइ तें नेणें? गोसावी मातें काइसेयालागि चाळवीत असति? काउळगाविचेयां वीस्णुदेवांचा उपाहारू आला : गोसावीयांसि आतांचि आरोगण जाली[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें पाणीभातु असे?" "हो बाबा असे :" "तरि आणा :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा म्हणत असति तें कां न करीसि? बाबा म्हणति तें करि :" मग तीं गोसावीयांसि ताट केलें : वाटीए तुप घातलें : कानवटी फेडुनि दोनि[६] पुरीया ओळगविलीया : गोसावीं आरोगण केली : मग म्हणीतलें : "बाइ : वाढा :" "ना जी : गोसावीयांची श्रीमंत सकुमार आरोगण : गोसावीयांसि नीरोधू[७] होइल जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें पाणीभातु असे?" "हो बावा असे :" "तरि आणा :" बाइसें म्हणति : "कां ओ : बाबा म्हणत असति तें कां न करीसि? बाबा म्हणत असति तें करि :" मागुती तेहीं कानवटि फेडूनि आणीक पुरी वाढिली : ते गोसावीं आरोगण केली : मागुतें म्हणीतलें : "बाइ : वाढा :" "ना जी : गोसावीयांची श्रीमंत सकुमार आरोगण : गोसावीयांसि नीरोधू होइल जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें पाणीभातु असे?" "हो बाबा असे :" "तरि आणा :" बाइसें म्हणति : "कां ओ : बाबा म्हणति तें कां न करीसि? बावा म्हणत असति तें करि :" मागुती कानवटी फेडूनि एकि पुरी वाढिली : गोसावीं आरोगण केली : मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ वाढा :" "ना जी : पुरें जी :" म्हणौनि गोसावीयांचे दोन्ही श्रीचरण धरिले : गोसावीं च्यारि[८] पुरीया आरोगिलीया : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग वाइसीं म्हणीतलें : "बाबा एकि पुरी कानवटि फेडुनि आरोगण करीति : कां मांडा तरि कानवटि फेडूनि दीढु आरोगण करीति : तें बाबाएं आरोगण केलेयावरि : तुझीया च्यारि पुरीया आरोगण केलीया :" तीएं तोखों लागलीं : "*गोसावीं माए : गोसावी बापु : गोसावी सुखदानि*[९] : गोसावी मातें नीववीलें : सुख दीधलें :" ॥

---

**५९२.** १ **रावा.** °काहीं वळवट. २ **हबी.** °ठाइं काइसेया प्रवेसन होइल?" ३ **पंभगो.** अतिसेंसीं. **हबी.** °क्षुधार्थी जालें असे. ४ **हबी.** °नीडळावरि बाहे ठेउनि---. ५ **गो.** °या नव्हेति वीडिया करूनि देतें असति. ६ **एवा.** एकि पुरी ओळगवीली. ७ **गो.** संकोचू. ८ **एवा.** तीनि. ९ (**हबी.**).

# लीळाचरित्र : उत्तरार्ध

श्रीपरेशाय नम:

## १ खडकुलीए अवस्थान : भटां अनुसरण

संगमेस्वरीं[१] भटांसि ईश्वरप्रतीति केली : तेणें भटांसि गोसावीयांची आवडि अपार संचरली : म्हणौनि दादोस भटांतें कांबखेडेयासि घेउनि गेले : पाउण मासू कांबखेडां होते : मग गोसावीयांपासि आले : तवं भटांसि गोसावीयांची अधीक आवडि संचरली : मग आबैसातें दादोसीं म्हणीतलें : "आबै : हा नागदेवो गोसावीयांपासि राहों पाहातु असे : परि[२] खांडाखापरा मूचला ऐसें जाणावें :" मग आबैसीं भटांतें पाचारिलें : "हां नागदेया : तुं म्हणे गोसावीयांपासि राहों पाहातु असस‍ि ?" "ना मा : कोण म्हणताए ? मीयां लखुदेयाकरवि[३] एका आउताचे बैल घेववीले असति : लोहो : लोहंकरू घेववीला असे : आणि माझें तुम्हीं जाणतें असा : मी भलेतो[४] अर्थु न वीचारीत न करीं :" मग आबैसाचेनिहीं नव्हे ऐसें देखिलें : मग दादोसीं म्हणीतलें : "आतां गोसावियांतेंचि वीनउं ना कां ?" मग एकु दीसू दादोसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मज एकांतु देयावा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ कवणु गा लोकांतु असे ?" "ना जी : मज एकांतु देयावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "*विकल्पु स्फुरे तो अर्थु न कीजे*[५] *:* अळोंचुपाळंचू न कीजे : वोठांतरें नीगैल तें देसांतरें जाइल :" "ना जी : मज एकांतु देयावा :" "घेया घोंगडें : सागळ :" दादोसीं सागळ घोंगडें घेतलें : मग गोसावीं पहीले गुंफेपूर्वे बीजें केलें : पाठीं गुंफेपश्चमे बीजें केलें : तेथ आसन जालें : मग दादोसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : हा नागदेवो गोसावीं आपणयांपासि राहों नेदावा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो कां गा ?" "जी जी :

---

१. १ **य.** भटांसि प्रतीति जालेयावरि दादोसांचें लागलेपण काढलें : गोसावियांचें लागलेपण जालें : मग दादोस–. **ही.** संगमेश्वरीं ईश्वरप्रतीति केली तेणें भटांसि गोसावीयांची–. २ **य.** तरि. ३ **य.** °वाहीवेलागि–. ४ **य.** कव्हणी. ५ (**प्रव. आ.** १६९).

हा नीका नव्हे : हा अनेगां धांडाळांचा असे : हा गोसावीयांचें कांहीं आइकैल : आणि पैन्हां जाउनि भडभडैल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें एथ काइ गा असे : मा पैरा जाउनि भडभडैल ? तैसें एथ काइ असे ?" "ना जी : तैसें एथ काइ असैल ? पर गोसावीयांचें यासि काइ चळों ठेलें असे ?" "न चळों कां गा[६] : एथची जवळीक करील तें तवं याचें गोमटें केंहीं न वचे : मां पैन्हा जाउनि एणें कोळिणी घरवात खडाइली तरि काइ ? तैसें हा कां गा करील ? एथचीया जवळीका काइ ऐसा अनसारिखा नव्हे ? आणि एथिचें पैन्हां जाउनि कां भडभडैल ? आणि एथ राहील तेयातें पाठवीजे ना : जाइल तेयातें राहावीजे ना :" ऐसें गोसावीं नीरूपीलें : इतुकेनि दादोस उगेचि राहिले : मग गोसावीं बीढारासि बीजें केलें : ।।

मग गोसावीयांसि वीळिचांचा पूजाअवस्वरू जाला : दादोसीं पांच पोफळें आसनावरि ठेविलीं : सेंभरि दंडवतें घातलीं : मग उदयांचां पूजाअवस्वरीं दादोसीं आसनावरि एक पोफळ ठेविलें : एक[७] दंडवत घातलें : मग नीगाले : मागुतवाउलीं जवं गोसावीयांची श्रीमूर्ति दीसेतवं जाति : आवघीं नीगालीं : आबैसें : उमाइसें : माहादाइसें : भट : पैल ठावोवरि गेले : मग भटीं म्हणीतलें : "आबै : नावेक पोतें घेया हो : मी अवकासा[८] जाइन[९] : तुम्हीं चाला : मज पारूखों नको :" तैसेंचि भट गोसावीयांपासि आले : गोसावीयांसि पटिसाळेवरि रीगतां डावेया हाता पूर्वामूख आसन असे : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा आलेति ? कांहीं वीसरलेति ?" "ना जी :" "तरि कां आलेति ?" "ना जी : मी गोसावीयांपासि सातपांच दीस राहीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें एथ राहों नेदिजे[१०] कीं गा : तुम्हां असों आवडैल तंव असाल : जाओं आवडैल तेव्हळि जाल : तैसें एथ राहों नेदिजे कीं गा : एथौनि पाठविजैल तेव्हळि जावें : एथौनि बोलाविजैल तेव्हळि यावें : तैसें तरि एथ राहों दीजैल :" मग भट वीचारूं लागले : घराकडील : दादोसांकडील वीचारीति : आणि गोसावी म्हणति : "भटो : चांग वीचारा : नीकें वीचारा : सांघातु दुरी पावतु असे :" मग गोसावीयांकडील वीचारीति : "वरिखा एका तऱ्हीं अनुसरावें : सां मासां तऱ्हीं अनुसरावें : मां तै गोसावी आपणयांपासि राहों देती कीं नेदीति हें नेणिजे :" ऐसें वीचारीति : तवं गोसावी उगेचि राहाति : मोटकें दादोसांकडील वीचारीति : घराकडील वीचारीति : आणि गोसावी चीपुळी वाति : "चांग वीचारा : नीकें वीचारा : सांघातु दुरि पावतु असे :" ऐसें त्रीसुधी गोसावीं म्हणीतलें : मग भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी जवं असों देती

६ मुळात हे वाक्य 'सोधु' म्हणून घातलेले आहे. ते पूर्वसंदर्भाला धरून असल्यामुळे संहितेत समाविष्ट केले आहे. **य.** प्रतीत ते मुळातच समाविष्ट आहे. ७ **ही.** पांच दंडवतें घातलीं. ८ **य.** उवाया. ९ °एकी वासना : मी गोसावियांपासि सातपांच दीस राहीन. १० **य.** न लभे.

तवं असैन : पाठवीती तेव्हळि जाइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : आणा पोफळ : सुतीए काळीं जें बोलिजे तें देहपर्यंत प्रतिपाळिजे : देया भाकेचें[11] पोफळ : " मग भटीं पोफळ दीधलें : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांपासि भट अनुसरले :

[ मग गोसावीं निरूपण केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : स्वदेशसंबंधु त्याज्य : स्वग्रामसंबंधु त्याज्य : संबंधियांचा संबंधु तो विशेषता त्याज्य : संबंधीं अधिकारू नाहीं : संबंधीं विकारू : विकारीं रसू : रसीं अभिमुख : सेवा : निवृत्ति : नावडतु नावडतु सेवी तेंचि आवडौनि ठाके : मग सांडितांहीं न संडे : ऐसा विखो वापुडा जो सेवितसांतां आपुलेया मोहरा न करी ? विषयसंबंधमात्रें जीवु काइ गा जातु असे ? परि सेवितसांतां तिए एकीं गडदरा घाली जेथ काइसेनहीं उसंत नाहीं[12] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : ब्रह्मचारी घोडा असे : तो अवचटें सुटे : घोडीएसि लागे : रावो व्याहाळीए वाहीरि नीगे : " मग म्हणे : " हां रे : हा मागीलां पाइं नीवळु कां ? " मग तो म्हणे : " अभए देसी तरि सांघैन : " " नां सांघ : " मग तो म्हणे : " हा घोडीएसि लागला : " मग तो रावो म्हणे : " यासि वोल्हावण करि : दुणा खान लोण दे : " " तें तो करी : मग तो मागौता बळासि ए : पर राजवाहाकू नव्हे : तोचि मागौता सुटे तरि बळासि न ए[13] : " यावरि बाइसीं पुसिलें : " बाबा : संबंध आणि विखो सेविलेयां नर्क होति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पुरुषु जेतुलजेतुली विषयसेवा करी तेतुलतेतुला धर्मीं नीवळ जाए : " बाइसीं पुसिलें : " बाबा : विखो काइ पाप ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पाप तरि नव्हे : परि धर्मापासौनि ऐसा नीपौंनि काढी : " म्हणौनि[14] तल्हातावरिल पाणी दुसरेनि तल्हातें नीपौंनि काढीजे ऐसा दोहीं श्रीकराचा अनुकारू दाखवील।[15] : ।। ]

## २ भटां झोळी देणें*

[ मग येरी दीसीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं परावर निरूपण केलें : मग दुपाहाराचा पुजाअवस्वरु होउनि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु : उपहुडु होउनि गोसावी आसनीं उपविष्ट असति : तवं भटीं म्हणीतलें : " जी जी : मीं भिक्षेसि जाइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसे होये : बाइ : आणा पां

---

११ **एवा.** साखेचें. १२ (**प्रव. आ.** १–६). १३ तुरंगमाचा दृष्टांत (७७) 'गोसावीं भटाप्रति खडकुलीए निरूपिला : (**एवा.** दायंबाप्रति डोमेग्रामीं :)—**दृस्थ.**' १४ **एवा.** °श्रीकरीचिया उजवीया आंगोठेयाजवळील आंगुळी श्रीकरें निर्पुनी दाखविली. **एवा.** °माखली आंगोळी दुसरीया हाताचेनि मुष्टीचेनि नीपौंनि काढीजे तैसा आंगोळीए मुष्टीचा अनुकारु दाखविला. (आचारबंद. पा. ४०). १५ (**प्रव. आ.** ७ व ८)या लीळेनंतर **अमुयगो.** प्रतीत 'तथा भट रीधपुरा पाठवणें' ही लीळा आहे. **बीहो.** प्रतीनुसार ती व तीत अंतर्भूत असलेल्या संबद्ध लीळा पुढे घातल्या आहेत. (पुढे लीळा ६१, ६२ व ६५ पाहा.)

२. *या लीळेचा पूर्वार्ध येथे **बीहो.** प्रतींतून घेतला आहे.

झोळी :" बाइसें आपुली जुनी देतें होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हे नको : आणीक देया :" मग बाइसीं आणीक झोळी आणिली : गोसावीं आपुलां श्रीकरीं घेतली : गांठी दिधलिया : मग भटांसि दिधली : *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हांसि आणि ये झोळीयसि लग्न गा : इयसीं उपवास पडों नेदावा : हा विधी देहावधी प्रतिपाळिजे :* " भटीं म्हणीतलें : *" जी जी : भीक्षा करीतां कव्हणी केदारू एणें सब्दें भीक्षा मागे : कोण्ही सीधनाथु म्हणे : कोण्ही नाराएणु एणें सब्दें भीक्षा करीति : तरि आम्हीं*[1] काइ म्हणावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी काहीं म्हणे : कव्हणी काहीं म्हणे : आपण काहीं एक म्हणावें :" भटीं म्हणीतलें : " भिक्षा द्या ऐसें म्हणों जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होये : जेंचि मागिजे तेंचि म्हणिजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " निर्धूम नगर जालयां भिक्षेसि रिगिजे : तीसरां पाहारीं भिक्षा कीजे :" *चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्ष्यम् : या शास्त्रासि अनुसरिजे : घर न निवडीत भीक्षा कीजे*[1] *:* तोरण मंडळाचेया घरा न वचावें : सारविला उंबरा देखौनि साउमेयां न वचावें : वोळखितयाचेया घरा न वचावें : येकीकडौनि रिगिजे : एकीकडौनि निगिजे : नगरांतु कां पात्रांतु : नगरांतु जालें आणि पात्रांतु नव्हेचि तरि आपजवीजे । नातरि खुंट गिळीजे : भिक्षा मागौनि नदीतिरीं भोजन कीजे : क्षुधा निवृत्ति कीजे :" ।। ]

[ भटीं पुसिलें : " जी जी : भिक्षेचें कैसें लक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " निर्हेतुक भिक्षा :" " जी जी : हेतु तो कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " धर्मोऽभिमानः दाक्षिण्यं स्नेहं कार्यं भयावहः । उपकारोऽनुकंपाच राभस्यं नव हेतवः ।। " भटीं म्हणीतलें : " जी जी : कल्पित अकल्पित भिक्षा अवघी निर्हेतुकचि कीं : " गोसावीं मानिलें[2] : भटीं पुसिलें : " जी जी : अभ्यागत आलेयां आपणेयांतें काही नसे तरि तया काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : आपणेयांतें काहीं असे तरि तैसें कीजे : नां तरि आपणयांसांगातें भिक्षे नेइजे[3] :"]

## ३ भटां भिक्षाधर्मनिरूपण*

[ गोसावीयांसि खडकुलीए अवस्थान : एकु दीसीं भटीं पुसिलें : " जी जी : हे परसनाएक भिक्षाकाळीं टिळाजानिवें अंगीकरौनि भिक्षा मागेति : हा कवण धर्मु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : अन्यधर्म विकल्परूप :" " जी जी : याचें कैसें लक्षण असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " अपेक्षापूर्वक अन्यधर्माचा अंगिकारू : यातें विकल्पु बोलिजे :" " हो कां जी :" भटीं पुसिलें : " जी जी : पुरुषु परमेश्वरआज्ञा अतिक्रमुनि वेव्हारीं मरे तयाचे ज्ञानसाह्य काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : परमेश्वरआज्ञा अतिक्रमीलेयां माया बोधु हरी :" " हो कां जी :" भटीं म्हणीतलें :

---

१ (प्रव. आ. ८१–८३). २ (प्रव. आमा. २०३). ३ (आमा. १५८)

३. * (प्रव. आमा. १७३–१७७).

"जी जी : एथीचिया वेषधारणा पुरुषासि किंपर्यंत उरी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देहपर्यंत पुरुषु उरलाचि असे :" "हो कां जी : तरि उरला पुरुषु कैसा जाणावा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : असेतवं करी : पडेतवं धावे : एणें उरला ऐसें उमटे :" "हो कां जी :" तंव इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी निरूपितातिः सशिखं वपनं कुर्यात् : हें तवं आम्हांसि नव्हवे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : हें तुम्हीं कराल तरि होइल कीं गा :" इंद्रभटीं म्हणीतलें : "जी जी : हा गोसावीयांचा वर सुफळ होआवा जी :" गोसावीं मानिलें : ।। ]

## ४ लुखदेवोबा भेटि

लुखदेवोबासि गोसावीयांसीं दरीसन जालें : *गोसावीयांसि खडकावरि दक्षिणामूख आसन असे : तवं लुखदेवोबा आले*[१] : पांच पोफळें दरिसना केलीं : दोनि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग बैसले[२] : [३]सर्वज्ञें म्हणीतलें : "पुण्य माहात्मे हो : या : तुम्हीं नीकेन असा ?" "जी : नीकेनि असों :" "तुमचा कुटुंबपरिवारू नीकेनि असे ?" "जी : असे :" नावेक होते : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ५ आपलो भेटि*

[गोसावीयांसि प्रातःपूजा जाली : भगतजना अवस्वरू देताति : ऐसां समैं आपलो आले : पानें पोफळें आसनावरि ठेविलीं : साष्टांग दंडवत घातलें : नमस्कारू केला : गोसावीं पूसिलें : "तुम्हीं नीकेनि असा ?" "जी जी : असों :" "तुमचे पीते वामनाचार्ये नीकेन असति ?" "जी जी : नीकेनि असति :" नावेक होते : मग गोसावीं बीजें केलें : ।। ]

## ६ भोजया इंद्रवणी

दाइंबासि खरुज जाली होती : गोसावीयांसि मादनें जालें : दाइंबा गाडू ढाळिति : बाइसें श्रीमुकुटु चोखाळीति : बाइसें वस्त्रें आणुं गेलीं : मग दाइंबा गाडू न ढळीति : मां पाणीं उरलें होतें : मग दायांबा आंग धों लागलें : मग म्हणति : "जाए इंद्रा : हें सुख तुज नाहीं :" ऐसें म्हणत आंग धुतलें : मग गोसावीयांसि जेधवां मादनें होय तेव्हळि गोसावी म्हणती : "बाइ : भोजेयासि इंद्रवणीं ठेवा :" मग बाइसें पाणीं ठेवीतिः ।।

---

४. १ सोध. २ अय. प्रतीत 'बैसले' यानंतर 'मग असों लागले' हे वाक्य आहे. ३ (आनोबासा-चीया वासना°.).

५. *अ. प्रतीत 'आपलोसी गोसावीयांचें दरीसन जालें' एवढाच मजकूर आहे. ही लीळा येथे गो. प्रतीतून घेतली आहे. य. "एकु दी आपलो गोसावीयांचे दर्सना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले गोसावीयापासि बैसले : मग गोसावीयांपासी असों लागले :"

## ७ नीरसें विरसें अन्नें अनुवादु*

[एक वेळ भट मातीकाम करीतां भुकैले : मग गुंफेमाजि आले : बाइसांसि जेउं मागीतलें : बाइसीं म्हणीतलें : " नागदेया : पाणिभातु असे : परि वहुत पीडला असे : तो तुज न गीळे : नावेक राहे : रंधन जालेयां मग तुज जेवुं घालीन : " इतुकेनि भट नीगों बैसले : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " हे काइ गा वानरेया : तुम्हीं महात्मे कीं गा : महात्मेनि नीरसें विरसें अन्नें सेवीजेति : रेंदया चेंदया दरु भरीजे : मा न जेवित जाता कैसें ?" "हो कां जी :" म्हणौनि बाइसांतें वाढुनि मागीतलें : धनवर जेवीले : मग भटीं म्हणीतलें : " जी जी : कव्हणी एके वेळे विळु विळु अन्न सेवीजे तेतुकेंही सामावें : आणि कव्हणी एके वेळे नसे तरि अल्पेंचि कुठे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जेव्हढी पीसवी कीजे तेवढी होये : " ।। ]

## ८ आपलो चणकभोजनीं भटां घ्रणानिरासु

नवीं अघारें[१] : मा चणेचि पीकति : चणेचि भीक्षे एति : भटोबास मातिकाम करीत होते : मातिकाम करूं सरलें : आणि आले : पात्रभरि[२] गणगां उरलें[३] होतें : तें घेतलें : जेऊं बैसले : "आपलोया[४] : ए जेऊं :" दोघै जेउं लागले : गोसावीयांसि सहज भीतरिला ओटेयावरि आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसेयां चनेयांसीं तेल होए कां तरि निकें : बाइ : तुमतें तेल आहे ?" बाइसीं कोढुलें आणिलें : तवं तेल नांहीं : मग म्हणीतलें : "नांहीं बावा :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : टौळांचें तेल घेया गा :" भटोबास उठिले : टोळें *तेलां*[५] भरलें होतें तें घेतलें : भटोबास कालौनि जेउं लागले : आपलोयें घांसु घेतला : आणि उळळलें[६] : आणि नीगाले : ते पैन्हां जाउंनि ओकुंनि[७] आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा तुम्हां पीडा जाली ?" "जी जी : घांसु घें नां तवं उळळलें[६] जी :" मग : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसीं ऐसीं अंनें वानरेसां साहात्मकें[८] कीं गा : तुम्हीं माहात्मे कीं गा : तुम्हां घ्रणात्यागु होआवा कीं " : ।।

## ९ आउ घरटीकरणीं स्तोति : आवेसु

एककु दीं घरटी करावेयाची आवघेयांची पाळी : तीये दीसीं आउसांची पाळी : गोसावीयांसि आरोगणा जाली : मग गोसावीं पहुडु स्वीकरीला : आउसीं पाळीये[१]

---

७. *(प्रव. आ. १११–११२).

८. १ **गो.** अग्रारें. **य.** अग्राहारें. २ **गो.** पालिमांडेभरि. ३ **य.** उपसीले. ४ **गोने.** प्रतींत 'लुखदेया' हे नाव आहे. पुढील संदर्भावरून ते 'आपलोया' असे पाहिजे हे स्पष्ट होते. **यमु.** प्रतींत 'भट आणि आपलो जेउं बैसले' असे स्पष्ट आहे. ५ (**गोमु.**). ६ **गोमु.** इसळलें. ७ **यमु.** वांति करौनि : गुळुळा करुनि. ८ **यमु.** वानरेयांसीचि स्यां गेलीं (**मु.** गेलें) कीं **शो.** साधलीं कीं.

९. १ **य.** दारीं. **बी.** दारापासि.

आंथुरण घातलें : मग भळळो[२] करूं बैसलीं : गांवीचेया चाटेयांचे आंडोर मीनले : "चाला रे : जाऊं भेडऊं : ये रानीं राहातातिः चेंदा खाति : यांचेनि काइ होववैल ?" तिये दीसीं सांवखेडाचा[३] हाटु : चाटां रोटिया भाजिलीया होतीया : ते इंगळ खापरें[४] भरुंनि घेउनि आले : ढगावरुनि इंगळ घालूं लागले : मग भदी[५] रीचवीली : आणि आउसें चेइलीं : गेलीं : साउलें फेडिलें[६] : "खांइन रे खांइन रे :" म्हणौनि धांवीनलीं आणि : ते भीयाले : आणि पळाले : भळळो हा सबदु कांनीं पडतुचि गेला : येकांचे गुडघे फुटले : एक पडिले : एकां जर आले : गोसावीं गजंवासरीसें बाहीरि बीजें केलें : "हें काइ नाएका : 'खांइन रे : खांइन रे :' म्हणौनि धांवींनलींति : तुम्हीं काइ लांवं ? एकाधा एकु सळौनि पडे : तेव्हळी काइ करा ? ऐसें भय नुपजवीजे कीं नाएका :"॥

उदेयाचां पूजावसरां यल्हंभट आले : मग तें तेहीं तेथौनि आइकीलें होतें : मग तें गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : रात्रीं एथ कांहीं उपद्रो जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जाला : ऐसें म्हणति : 'यें रानीं असति : चेंदा खाति : यांचेनि काइ होववैल :' यें ऐसीं उघडीं नागवीं दिसतें असति : परि यांची वास कव्हणांहीं पाहों नये : यांही एकु अभिमानियें आति : तें जरि क्षोभलें होइल तरि मां काइ करीति ?" मग तें भीयाले : "न क्षोभतां येसणें जालें : जरि क्षोभतें तरि काइ होतें :"॥

## १० सर्पदस्ट माळी रक्षणें

वाडेगांविंचा[१] माळी सर्पें खादला[२] : वीख उतरीत होते तें नुतरेचि[३] : तो सरला : येकीं[४] म्हणीतलें : "हां रे : खडकुलीये जे पुरुष[५] असति ते आपणेयांतें ईश्वर पुरुष म्हणवीत असति : तेथ नेउंनि घाला : मां सामृथ्य[६] असैल तरि राखती :" मग निंबें गुंडुनि आणुनि गुंफे वरिलीकडे घातला : भटोबास आणि लुखदेओबास भीक्षेसि नीगाले : मग तेयांतें देखौनि भटोबासीं म्हणीतलें : "देख लुखदेया : गोसावी यातें कैसा राखताति :" ते भीक्षेसि गेले : तवं आउसें बाहीरी जातें होतीं : तवं तेयाचिया स्त्रीया म्हणीतलें : "हो आइ : गोसावीयांतें वीनवा कां : सापें खादला असे माळी : गोसावीं जीववावा : चोभेया पाइलीचीं लेंकरुवें : मूंगियांचां धवीं आगि लागली : काइ करीन आइ ?" म्हणौनि रडों लागली : आउसां अनुकुंपा उपजली : गोसांवीयांजवळि आलीं : "जी जी :

---

२ **ने.** भळोळो. **मु.** डळळो करूनि. **मु.** डळो डळो करूनि. ३ **यगोमु.** सांगवखेडाचा. ४ **य.** भदां. ५ **गो.** भणदी. ६ **यमु.** सांडिलें.

**१०.** १ **यमु.** सांवखेडाचा. २ **यमु.** तयासि पान लागलें. ३ **यमु.** ते दाटि कव्हणाही गारुडियास्तव नुठीचि. ४ **यमु.** गावीचेया महाजनांतु दुष्टचातुष्ट होते : ते म्हणेति. ५ **यमु.** येल्हंभटाचे गुरू : ६ **यमुगो.** सामर्थ्य.

स्वामी जगंनाथा : बापुडा माळी सर्पें खादला : तो एथ घातला असे : बापुडी माळींणि दुख करीति आहे : 'चोभेया पाइलियेचीं लेंकुरवें : मुंगीयांचां धवीं आगि लागली' म्हणते जी : तरि स्वामी जगंनाथें राखावा जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "पैल वाटी घेउंनि या : " चरणक्षाळण करविलें[७] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तोंडावरि सींपा : उरावरि सींपा : पाठी सींपा : " ऐसा विधि विहीला : "हइ सोडि रे : " तिया सोडिला : आउसीं तीं ठांइं सींपिला : पाठीं सींपिली[८] : आणि जीयाला : वास पाहों लागला : आणि आउसें आलीं : "जी जी स्वामी जगंनाथा : बापुडें प्रेत जीआलें जी : वास पांताए : परि उठवे ना : तरि स्वामी जगंनाथें तेथ बीजें करावें : " गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावी उठिले श्रीचरणीं उपाहानौ घातलीया : तेथ बीजें केलें[९] : कृपाद्रुष्टी अवळोकीला : आणि उठिला : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : तेयाचीया स्त्रीया दंडवतें घातलीं : मग गोसावीं गुंफे बीजें केलें : *सरीसा तो आला : तयाचीं तयासरीसीं आलीं*[१०] : माळी जीवविला : म्हणौनि आवघा गांवींचा लोकु आला : भटोवास भीक्षा करूंनि आले. तयांचां संबंधीं म्हणीतलें : "जी जी : रात्रीं कांहीं तेलातुपाची वाति लागैल[११] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें एथ कांहीं न लगे : " मग रात्रीचा पूजावसर जाला : आरोगणा जाली : वाइसाकरवी तयांसि जेउं घालवीलें : मग उदीयां आपुलेया घरा गेला : आवघेयां लोकां आस्चर्ये जालें : मग एकाधा वेळु तेयांचें पोट फुगे : मां तेथ तेणें गोसावीयांतें वीनविलें : "जी जी : एकाधा वेळु माझें पोट फुगे : " सर्वज्ञें म्हणीतलें : "व्यामु कीजे : व्यामे वायु तुटे : " मग तो भलेते[१२] नव्हाळी आधीं गोसावीयांलागौनि घेउंनि ये : मग वीकी : ।।

## ११ पर्वी[१] दाइंबा प्रमादवचनीं सीक्षापन

गोसावीयांसि खडकलिये अवस्थान : दाइंबायें गोसावीयांपूढां ऐसी पैजा घेतली होती : 'भोजा पर्वालागौनि न पवे तरि न वर्ते ऐसें जाणा :' तवं दाइंबा बारसीचें पारणें करुनि बळ्हेग्रामुनि निगाले : दिवेलावणीं[२] प्रतिस्थानांसि आले : सासुरवाडीसि गेले : तेयांसि भेटले[३] : हाटीं पानें पोफळें घेतलीं : मग निगाले : ते उजु वाटा[४] मध्याने रात्रीं सांगवखेडेया आले : तवं तराळ जागे घालिताति : तराळीं पाचारिलें :

---

७ **शो.** °ताकभात कुसकरविला : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका ताकभाताचा रसु तोंडीं घाला : " ८ **शो.** अन्नरसु तोंडीं घातला. ९ **यमु.** °तयाभवतीं माणुसें होतीं : तयातें आउसीं म्हणीतलें : "हां रे : परतीं सरा रे : " ऐसीं वलंघैलीं : तीयें परतीं सरलीं : १० (**यमु.**). ११ **यमु.** "रात्रीं कांहीं दीपवतीकारणें तुप लागैल". १२ **यमु.** नव्हाळीयेची फळोवळि आणि : पूजेलागि फुलें आणि : ऐसी भगतिकरी :

११. १ **मु.** दवणे°. २ **एवा.** सकाळीं. ३ **एवा.** तेथ निजैले. **बीही.** नावेक निजैले : तें बारसीं तेरसु जाला. ४ **अ.** अव्हाटां.

“कोण गा ?” दाइंबायें म्हणीतलें : “आम्हीं :” “तुम्हीं कोण ?” “आम्हीं गोसावीयांचें[५] :” तराळीं पुसिलें : “गोसावी कवणीं ठांइं राज्य करीत असति ?” दाइंबायें म्हणीतलें : “खडकलिये :” तवं तराळीं म्हणीतलें : “ना : गोसावी जोगेस्वरीसि राज्य करीत असति :” आणि तैसेचि दाइंबा जोगेस्वरीसि नीगाले : वाटा जातातिः तवं धुपें देखिलें : “काइ पां चोरु ? तरि खळिची पासवडी काइसी ? तरि काइ देवता ? देवता तरि आमचें काइ[६] करुं सके ? ” तैसेचि वीचारीत साउमे आले : तवं धुपें देखिलें : मग म्हणीतलें : “माणुसें भें भें म्हणती तें ऐसें :” मग जोगेस्वरी आले : दोहीं देउळीं गोसावीयांतें पाहीलें : पटिसाळे : गुंफे पाहीलें : न देखतीचि : मग म्हणीतलें : “आतां निद्रा करूं : मग उदीयां गोसावीयांचेया दरीसनां जांवों : दों गांउवां[७] असतु : अथवा चौं गांउवां[८] असतु : निजैले : सकाळीं काउळगांवां जावें तरि दारवठे घातले असति : मग उदेयां काउळगांवां गेले : तवं वीस्णुदेव गोसावीयांचेया दरीसनां जावेयाची आइति करीताति : गाडां उपाहाराची आइति[८] : दाइंबासीं भेटि जाली : दाइंबायें म्हणीतलें : “गोसावी कवणीं ठांइं राज्य करीत आहाति ?” विस्णुभटीं म्हणीतलें : “गोसावी खडकुलिए राज्य करीत आहाति : हें नव्हे आम्हीं दरीसनां जावेयाचि आइति करीत असों[९] : राहा : मां सांघातें जावों :” दाइंबायें म्हणीतलें : “नां : मीं जांइंन :” तैसेचि दाइंबा खडकुलीएसि आले : तवं गोसावीयांसि बाहीरीली पटिसाळेवरि रीगतां डावेया हाता आसन असे : गोसावीयांसि दंतधावन[१०] होत असे : दाइंबायें दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीं सीळीक ऐसी धरीली : मग म्हणीतलें : “काइ गा भोजेया : पाहाटावीलें मां :” दाइंबायें म्हणीतलें : “जी जी : मीं रात्रींचि[११] आलां : तवं तराळें मातें पाचारिलें : ‘तुम्हीं कोण हो ?’ मियां म्हणीतलें : ‘आम्हीं गोसावीयांचें :’ ‘गोसावी कवणी ठांइं राज्य करीताति ?’ मीयां म्हणीतलें : ‘खडकुलीएसि :’ तेहीं म्हणीतलें : ‘नां : जोगेस्वरीसि :’ तैसाचि मीं जोगेस्वरीसि गेलां : तवं मध्यें धुपें देखिलें : ‘काइं पां चोरु ? तरि खळींव[१२] पासवडि काइसी ? तरि काइ देवता ? देवता तरि आमचें काइ करुं सके ?’ ऐसें म्हणत आलां : तवं तें धुपें : माणुसें भें भें म्हणति तें ऐसें :” मग सर्वज्ञें म्हणीतलें : “भोजेयासि कव्हणाचा पाडु नाहीं :” मग पुढील आवघें दाइंबायें सांघितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : तुमतें पाणीभातु आसे ? ” “हो बाबा : आसे :” “तरि भोजा भुकैला आहे : जेउं वाढा :” दाइंबायें म्हणीतलें : “ना जी : मीं गोसावीयांचां ठांइं पर्व करीन : मग जेवीन :” सर्वज्ञें म्हणीतलें : “तैसें एथ कांहीं नाहीं : स्वस्थे चित्ते बुद्धयः संभवंति :” मग दाइंबायें नावेक पाणीभातु घेतला : गोसावीयांसि उदयांचा पूजाअवसरु जाला : तवं वीस्णुभटांचा उपाहारु आला :

५ **यमु.** श्री चांगदेवराउळा°. ६ **गो.** °कांहीं करू न सके. ७ **नेमु.** गांवां. ८ **अ.** °करीताति.
९ **अ.** आहों. १० **अगो.** दंतध्वन. ११ **यमु.** कालींचि. १२ **गोमुने.** खळीची.

पांटिया भीतरि ठेवीलिया : मग बाइसीं गोसावीयांसि मर्दना दिधली : मादनें जालें : मग पूजावसरु जाला : *बाइसीं गोसावीयांसि दवणा वाइला*[१३] दाइंबायें गोसावीयांसि दवना वाइला : भगतजनीं वाइला : धुपार्ती : मंगळार्ती जाली : ताट जालें : भगतजना ठाए जाले : मग गोसावीं ताटापासि बीजें केलें : आसनीं उपविष्ट जाले : मग गोसावीयांसि आरोगण जाली : भक्तीजना पांति जेवणें जालीं : गोसावीयांसि गुळळा जाला : बाइसीं वीडा वोळगवीला : बाइसीं सैनासन रचीलें : मग गोसावीयांसी पहुडु जाला : उपहुडु जाला : ।।

आणि दाइंबा अवसरु पाहातचि होते : गेले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावियांजवळी बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा भोजेया : सकार्य[१४] असे ?" "जी जी : मीं गांवां जाइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि कैसे गा गांवां जाल ? आजि भूतचतुर्दसु : भूतें[१५] सैरा वीचरताति : गांवोगांवीं बळी दीजति आहाति :" दाइंबायें म्हणीतलें : "जी जी : आम्हीं गोसावीयांचे : मां आम्हां काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयांचांहीं ठांइं येकें सामर्थ्यें आहाति : तीयें तऱ्हीं एथौनिचि सीधी नेइजति कीं गा : सतरा वेळ श्रीकृष्ण चक्रवती जरासंदु पळवीला : अठराविए वेळे पाठिवरण[१६] करीते जाले कीं[१७] : आणिकीं देवतीं दीधले वरू ते तऱ्हीं एथौनिचि सीधी

---

१३ (हीमु.). १४ **एवा.** सकाज. **यमु.** सापेक्षे ऐसें दीसत असां. १५ **एवा.** देवता. १६ **यगो.** °वर्ण. १७ **मु.** °यावरि गोसावी जरासंदाची गोष्टि सांघीतली. ही लीळा **पं.** प्रतीतील श्रीकृष्णचरित्रात पुढीलप्रमाणे सविस्तर आलेली आहे :

**जरासंदा पाठिवर्ण :** गोसावीयांसि खडकुलीए अवस्थान : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : आजि भुतचतुर्दसू गा : भुतें सैरावैरा वीचरतें : असति गा :" तीहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं गोसावीयांचे : आम्हांसि काइ करीति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आणिकीं देवतीं दीधले वर ते तऱ्हीं एथौनिचि सीधी नेयावे कीं गा :" तेहीं म्हणीतलें : "जी जी : ते कैसे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : कंसू जरासंदाचा बहीनवी : तेणें दुखें कैवारें आवेसौनि सतरा वेळ चालौनि आला : तो श्रीकृष्णचक्रवर्त्ती सतरा वेळ प्राभवीला : भंगिला : एस न एचि : म्हणौनि उपराठे पाए : खालती डोइ : घांसी धुळि खादली : ऐसें तप करौनि माहादेवो तोखवीला : माहादेवें म्हणीतलें : 'माग : प्रसंन जालां :' तेणें म्हणीतलें : 'रामुकृष्ण मीयां जींतावे :' माहादेवें म्हणीतलें : 'ते जिंतवति नां : ते अजींत : ते भुपति जींतावे :' तेणें म्हणीतलें : 'तरि काइ प्रसंन जालेति ? एसें तऱ्हीं यावें :' 'हो कां : एइल : जा :' माहादेवें श्रीकृष्णचक्रवर्तीतें वीनवीलें : 'आम्हीं प्रसंन जालों असों : तें तुम्हीं सीधी न्यावें : मचकुंद चक्रवर्तीसि मोक्षु द्यावा : आणि जरासंदासि पाठिवर्ण करावें : जी :' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'हो कां : कीजैल :' मग अठरावीए वेळे पाठिवर्ण केलें : तवं काळिवाहानु पाठीं लागला : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्तीं भुइरासि बीजें केलें : पीथांबर फुटा मचकूंदातें पांगूरवीला : आपण खांबाआड राहीले : तवं काळिवाहानु पाठोवाठीं आला : काळिवहनें म्हणीतलें : 'एथें एउनि नीजैलासि : आतां तुझा कवण राखैल :' म्हणौनि पांपरा हाणीतला : तवं नीद्राभंगु जाला : मचकुंद उठीला : दृष्टीसवेंचि काळिवनाचें भस्म जालें : तेणें म्हणीतलें : 'हें काइ

नेइजति कीं गा :" यावरि दाइंबें म्हणीतलें : "जी जी : गांवीं श्राध : ब्राह्मणा क्षेणु देउनि आलां असें : तरि मज गेलेयांबाहीरि न सरे :" मग गोसावीं श्रीमुखिचें तांबुळ[१८] दीधलें : श्रीकंठिचा गळदंडा दीधला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मार्गीं कांहीं आश्चर्यें देखिजे तरि पांहों न ठकीजे : मार्गु न संडिजे : प्रमाद चुकविजे : *आणि आपणेया प्रमादु होए ऐसा जेथ विकल्पु स्फुरे तो अर्थु न कीजे*[१९] : मग ते निगाले : पैठणा परते[२०] गेले : तेथ मार्गीं दोघदोघै बोलति : आइकति : उभे ठाकुंनि आइकुं पांति : आणि नाइकति : ऐसा वीझुगां पातले : तवं माहालक्ष्मींचा[२१] देउळीं 'घें दें आणि घालीं :' ऐसे सब्द हों लागले : कोण्हीं दीव्यमार्गिची[२२]' आलीं असेति[२३] : कां[२४] कोण्हीं वस्तुकारें[२५] उतरलीं असति : 'जाओं : च्यान्ही पाहार यांपासीं वसों : मग उदेयांचि गांवां जांओं :' म्हणौनि माहालक्ष्मींचां[२६] कोणटांवरि आले : आणि आठवलें : सर्वज्ञें म्हणीतलें होतें : 'मार्गु न संडिजे :' तैसेचि परतले : तवं पर्वति[२७] काळी घोडे सेळी में में करीत नीगाली : तेयांचिया टांका चेंपीति : आणि दाइंबा उभे राहाति : "तुम्हीं कां वांयांचि श्रमतें असा : तुम्हीं राहा नां कां : आम्हीं तरि गोसावीयांचे[२८] :" ऐसें म्हणति : आणि नावेक राहे : माघौती टांका चेंपीति ये : माघौतें म्हणति : माघौती राहे : माघौती ये : ऐसी तो अडुवेन्हीं आली : आणि अडामध्यें घातलें : दाइंबा बळ्हेग्रामा आले : श्राध केलें : मग गोसावीयांचेया दरिसनां आले : मग वीझुगांचें आवघें सांघितलें : "हा जी : तें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीया देवता गा : तयांतें भुगुति होत होती[२९] : तया

---

पां ? भस्म जाला हा कवण पां ?' आणि परिमळबाहाकातु फुटा पाहे तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ती देखीले : आणि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : मग म्हणीतलें : 'जी जी : माहादेवो प्रसंन जाला होता : तें आजि साच जालें जी :' मग प्राप्तीसि नेला : जैसा कापुरु तैसें जालें गा भोजेया :" ।। (**पं.** ३७) ।। याच संबंधात **पं.** प्रतीत पुढील लीळा अधिक आली आहे.

**मुचकुंद चक्रवर्ती मोक्षु देणें :** मचकुंद चक्रवर्त्तीन तप करौनि माहादेओ तोखवीला : प्रसंन केला : महादेवें म्हणीतलें : 'माग : प्रसंन जालां :' तेणें म्हणीतलें : 'प्रसंन जालाति तरि मज मोक्षु देयावा :' माहादेवें म्हणीतलें : 'आमचां ठाइं मोक्षु नाहीं : मोक्षु होए ऐसा उपाओ सांघैन : हें त्रेत जाइल : सात लक्ष द्वापर जाइल : मग आठवां लक्षीं रामकृष्णु अवतरती : ते तुज मोक्षु देती :' तेणें म्हणीतलें : 'त्रेतचि कै जाइल : मां द्वापरही कै जाइल : मां कै अवतरती : मां कै मोक्षु होइल ?' म्हणौनि उस्वासू घातला : तवं माहादेवें म्हणीतलें : 'भेवों नको : तें सत्य : आम्हीं देउनु : जाए : पैला भोइरीं नीद्रा करि : तुझी नीद्रा जो भंगील तो भस्म होइल : दुसरा जो देखसी तोचि रामकृष्णु ऐसें जाणावें :' मग भुयारासि गेला : नीजैला : ।। (**पं.** श्रीकृष्णचरित्र ३६).

१८ **यगो.** तांबोळ. १९ (**प्रव. आचार.** १६८–१६९). २० **ही.** °पर्यंत गेले : तेथ दीसु माळवला : तवं पुढे°. २१ **गो.** °लखूमीचां. २२ **य.** आगमिके. २३ **अयगोने.** °जाओं राहों म्हणौनि निगाले : एकी वासना : २४ (**ही.**). २५ **ही.** वाटाउवें. २६ **गो.** °लखूमीचां. २७ **गो.** परबति. **ने.** प्रबति. **मु.** परबत. **य.** परभति. २८ **यमु.** श्रीचांगदेवराउळा°. २९ **एवा.** तो तयातें भूतसमुह

समया वरपडा होये तयातें तीया घेति : तुम्हीं निकें केलें : जें प्रमादु चुकवीला : *एथौनि तुमतें पाठवीलें*[२४] म्हणौनि चुकलेति : आणिकातें तरि तीया घेतीया : ''

*सर्वज्ञें म्हणीतलें : ''भोजेया : कव्हणी एकु जगाचा दंदीया : तेयातें मारीति म्हणौनि भेण त्रसला सदर्थी बळियाची पाठि रीगे : मग तेयाची वास कव्हणांही पांहों नेह : ते तेयातें राखत असति : तो म्हणायां धाडी तेव्हळिं आपुले आंगरखे सरीसे दे : ना तोचिंहोउनिं बाहीरा जाए*[३०] *तरि सुरीवरि*[३१] *घेतिं : पोट फाडुनिं दगड भरीतिं*[३२] *: ''* ।।

## १२ आपलो अनुसरण*

[१]आपलो गोसावीयांसरीसे उठीति : गोसावीयासरीसे बैसति : तें देखौनि माहादाइसां सुख होए : मग एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : '' वाइ हें हरडभरड[२] कीं दीस च्यारि एक[३] : मग हें एक होतें : ऐसें आठवैलही ना : '' आणि माहदाइसीं गोसावीयांचे श्रीचरण धरूनि म्हणीतलें : '' जी जी : ऐसें यांसि[४] न व्हावें : '' सर्वज्ञें म्हणीतलें : '' सेवटीं सेवटीं होइल : '' *मग गोसावीं बीजें केलेंयांवरि तेंचि तयासि जालें*[५] *:* ।।

## १३ माहादाइनीवारीत स्त्रिये केळदान

गोसावीयांचेया दरिसनां नेणों कोणें केळेंबोरें आणिलीं होतीं : गोसावीयांचेया दरिसनां बाइल एकी आली होती : तीसि गोसावीं केळेंबोरें दीधलीं : तीयें निगालीं : तवं माहदाइसें भेटलीं : '' हें ओटीए काइ ? '' '' आइ : मज गोसावीं केळेंबोरें दीधलीं : '' तवं माहदाइसीं म्हणीतलें : '' तुं सदैव : तुज गोसावीं केळेंबोरें दीधलीं : '' मग माहदाइसें गोसावीयांपासि आलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : '' वाइ : तुम्हांसि केळें

---

(**ने.** भगती समो. **गो.** भूत समो. **ही.** भूत समहो.) होत होता. ३० **एवा.** नीगे°. ३१. **रावा.** अलगवरि. **एवा.** खांडेवरि. ३२ (**दृपा.** ७४. दंदीयाचा दृष्टांत. 'हा दृष्टांत गोसावीं दायंबाप्रति सेळीए उपरि खडकुली नीरोपीला : '—**दृस्थ**).

**१२.** *ही लीळा **गोयमु.** प्रतीत 'आपलो भेटि' (उत्तरार्ध लीळा ५ पाहा). या लीळेनंतर लागलीच आली आहे.

१ **यमु.** मग आपलोसि थोर गोसावीयांचा ठाइं लागलेपण जालें :—. २ **य.** हारडिभारड. **गो.** °भेरडि. ३ **यमु.** 'आतां एथ एसणी हरडभरड करीतु असे : ' ४ **यमु.** बापुडेयासि. ५ (**मु.**) यानंतर **अगोय.** प्रतींत पुढील मजकूर आहे. तोच मजकूर **स्मृस्थ** २३ मध्ये आहे. तेथेच तो योग्य असल्यामुळे संहितेत स्वीकारला नाही.

'ते राहाण घालिति : घरीं देव्हारा करिति : महदाइसें तयांतें पडिताळावेया आलीं : घराआंतु रीगों बैसलीं : तवं समोर देवतें देखिलीं : आणि मग 'श्रीचक्रधरु' म्हणौनि निगालीं : हें नाम कानीं पडिलें : आणि ते गेले : देवतें पांटींए घातलीं : आणि आवघीं पाणियांतु घालुनि आले : मग महदाइसें भटोबासांपासि घेउनि आलीं : मग तयांसि बोधु जाला : मग अनुसरले : ।। '

बोरें[१] दीजतु ?" "ना जी : आम्हीं काइ करुनि केळेंबोरें ? आम्हांसि आमचे गोसावीचि होतु :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तयांसि केळेंबोरेंचि बहुतें :" ।।

## १४ रात्रीं वीहरणीं[१] वोंबीया आरोगण

एकु दीं[२] गोसावीयांसि रात्रीचा पूजावसर जालेयानंतरें गोसावीं गंगेपैलाडि सेत तेथ *वीहरणा*[२] बीजें केलें : घडी[३] एकि चंद्रमा असे : ओंबीया देखीलीया : आणि भटोबासीं म्हणीतलें : " ओंबीया जालीया असति : घेओं ?" गोसावी उगेचि : मागौतें म्हणीतलें : "जी जी : ओंबीया जालीया असति : घेओं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जालीया नाहींति कीं गा :" "जी जी : जालीया असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " घेया :" भटोबास घेओं लागले : *सर्वज्ञें म्हणीतलें : " चीरूनि[४] घेया गा " भट वोंबीया चीरूनि[४] घेओं लागले*[५] : गोसावीं पुढारें बीजें केलें : माळेयावरि वळघले[६] : मग श्रीकरीं गोफण घेतली : " झा[७] भोरडीए :" म्हणौनि सोंकरिलें : दोनि एकी भेलवंडिया घातलीया : तवं चंद्रमा मावळला[८] : आणि गोसावीं बीजें केलें : कोह्रींकें[९] पातले : आणि वारा सुटला : तें थोर वावधण सुटलें : गोसावीयांसि कोह्रींकीं[१०] आसन जालें : लखूदेवोबायें गोसावीयां आड पासवडी धरिली : तवं भटोबास बोवाओं लागले : " लुखदेया लुखदेया :" लुखदेवोबायें सादु[११] दीधला : " नागदेया : ए : गोसावी एथ असति :" भटोबास आले : तवं वावधन नांवेक समलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " कां गा : ओंबीया भाजा नां ?" " जी जी : वीसदेओ[१२] नांहीं :" " जा गुंफेहुनि घेउंनि या : हा घेया पैलु दीवा दीसतु असे :" मग भटोबास गेले : वीसदेओ[१२] घेउनि आले : भटोबासांसरिसीं आउसें आलीं : *गोसावीयांसि मर्गजेसि आसन जालें असे : आउसें आलीं*[१३] : गोसावीयांचीं श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : एथौनि मर्गजा बोलविजैल तरि बोलैल ?" आउसीं म्हणीतलें : "बोलैल आणि काइ जी दर्भा[१४] : पर गोसावी भीति : मातें माहावीद्या नांव मंत्रु असे : गोसावीयांचिए श्रीमुगुटीं सेंडी नाहीं : एन्हविं मीं गांठि देतियें :" गोसावी उगेचि राहीले : भटोबास ओंबीया भाजौनि घेउनि आले : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : येथौनि नाएकातें ऐसें म्हणीतलें : 'नाएका : येथौनि मर्गजा बोलवीजैल तरि बोलैल ?' : तवं नाएकु ऐसें म्हणति : 'बोलविजैल आणि काइ : दर्भा परि गोसावी

---

**१३.** १ **एवा.** फळें.

**१४.** १ **यमुने.** वीहारीं. **गो.** वेह्राळीं. २ (**यमु.**). ३ **यनेंही.** धनवाटि. **गोमुबी.** धनुवाटी. ४ **यमुहीबी.** चीरचीरूं. ५ (**यगोनेमु.**). ६ **अगो.** बीजें केलें. ७ **यमुने.** भा. **गो.** था. **बी.** हा. ८ **यमुबीने.** माळवला. ९ **गो.** कोहंकें. **नें.** कोहकें. १० **गो.** कोहंकीं. **ने.** कोहकीं. ११ **अ.** सबदु. १२ **नें.** वैसदेवो. १३ (**गोनेंही.**). १४ **नें.** ईदर्श°. (हे वाचन चुकीचे आहे.). **यगोमु.** द्रीभा. तळेगावकर पाठात हे वाक्य पुढीलप्रमाणे आहे : 'ए भद्रेसि काए : सुखेंचि बौलैल : परी–' मूळ शब्द येथेही 'भद्रा' असावा काय ?

भीती : मातें माहाविद्या नांव मंत्रु असे : गोसावीयांचां श्रीमुगुटीं सेंडी नाहीं : एऱ्हवि गांठि देतियें[१५] :' " तवं भटोबासीं म्हणीतलें : " ढोरे राख वो आउवे : जेया देवाचेनि जडें पार्थिवें वेधति : बोलति : तो बोलणेयासि भील[१६] ? " " नेणेंचि रे बा नागणां : " मग गोसावीं गुंफेसि बीजें केलें : बाइसीं ओंबीया चोखटा केलीया[१७] : वाटां घातलीया : साकर घातली : गोसावीयांसि ओळगवीलीया : गोसावीं प्रसादु केला : आवघेयां भगतजनां दीधलिया : गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : मग गोसावीयांसि पहुडु जाला : ।।

## १५ अनुचरचोरीकृत उळा आरोगण

भटोवास आणि नाथोबास वाडेगांवा भीक्षेसि जात होते : तवं मार्गीं सेतीं चणेयांचीं कडपें[१] देखिलीं : वल्हे घातली असे : नाथोबायें म्हणीतलें : " नागदेया : कैसा बरवा उळयाजोगा चणा : " भटोबासीं म्हणीतलें : " गोसावीयांतें पुसों : मां आणों : " भीक्षा करुनि आले : *दंडवतें घातलीं श्रीचरणां लागले*[२]: मग गोसावीयांसि द्रिष्टपुता झोळीया केलीया : मग गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : कैसा बरवा उळेयाजोगा चणा असे जी : इतुका ऐसा आणुं ? " गोसावी उगेचि : मागुतें गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : कैसा बरवा माहुळंगला चणा उळेयाजोगा आहे : इतुका ऐसा आणुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एतुका ऐसा आणां : वरीलु नेघावा : तळीलु नेघावा : " " हो कां जी : " म्हणौनि *भट : नाथोबा : मार्कंड ऐसे*[३] तीघे नीगाले : वरिलें कडपें ठेविलीं : माझारिला[४] कडपांचे भारे बांधले : भटीं आणि नाथोबायें मार्कंडासि वाइला : भटोबायें नाथोसि वाएला : भटोबायें आपणेयांआपण वाउनि[५] घेतला : आणि गुंफेचां आंगणीं दडकरि भारे घातले : भटोबास तेयाचि भारेया ओटंगले[६] : आणि गोसावीं बाहीरि बीजें केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा : इतुका चणांचि : तुमचेनि मागमागें ते एति : चोर म्हणौनि वांधिजा[७] : तेव्हळि काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसे गा जीव : जीवाचा वागारा नावेक ढिला करों न ये : जरि केला तरि आनौनि आन करितां वेळुचि न लगे : हो[८] आतां काइ ? एथौनीचि म्हणीतलें : पैऱ्हां जा : मरगजेसि भाजा : मागु मोडा :" मागुते भारे वाइले : भटोवासीं म्हणीतलें : " आउ : नावेक वीसदेओ घेउनि या कां : " " नां रे बा नागणां : मीं नैयें : " भटोबासीं म्हणीतलें : " आतां उळेया वारीयां धुळि खाये : " भटोबासीं *एकीं हातीं*[९] वीसदेओ घेतला : उळा भाजिला : मागु मोडिला :

---

१५ **एवा.** घालितीएं. १६ **गोही.** बीहील. १७ **गोने.** °कोंवळीया कोंवळीया नीवडीलीया.

१५. १ **एवा.** वांकलें. २ (**यगोमुने.**). ३ (**मु.**). ४ **अयगोनें.** तळिला. **हीं.** माझारिला. **मु.** मधिला. ५ **यमुने.** उचलुनि. ६ **यमु.** °भारेयातें टेकुनि विसांवा घेतला : ७ **यमु.** बांधिजाल. **हीबी.** धरिजाल. **एवा.** मारिजा. ८ **यगोहीबी.** हुं. **ने.** उं. ९ (**यगोनेमुबी.**).

मग उळेया कोंहोंकें भरिलीं : मग गोसावीयांसि वीळिचांचा पूजावसरु जाला : मग बाइसीं बरवा उळा नीवडिला : गोसावीयांसि ओळगविला : गोसावीं प्रसादु केला : मग भटोबासांकरवि दोनिदोनि आंजुळि आवघेयांसि देववीला : भटोबास देओं लागले : आउसां नेदीति : आउसीं म्हणीतलें : " नागदेया : मज उळा दे : " हळुचि भटोबासीं म्हणीतलें : " उळेया वारियां धुळि खाए : मघां तरि वीसदेवो नांणिसीचि : " आउसीं म्हणीतलें : " जी जी : देखिला हा नागदेओ : मज उळा नेदी : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " काए म्हणाताए*[१०] *?* " " आउ : धुळि खाए : म्हणताए : " " तोकडीचि ऐसी ? " " तरि काइ स्वामीं जगंनाथा : आपण काए बहुतीं खाववीजताए : " " ओपा गा वानरेया नाएकासि उळा : " भटोबास गेले : तो थोडा ऐसा घातला : " जी : हा नागदेओ आवघेयां-सरीसा उळा नेदी : " " ओपा गा वानरेया : नाएकासि आवघेयांसरिसा उळा : " मग भटोबासीं आवघेयांसरीसा उळा दीधला : गोसावीं उळा आरोगण केला : गुळळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं पहुडु स्वीकरिला : पस्यात पाहारीं परश्रेया बीजें केलें : परश्रयो सारुनि उदका विनियोगु केला : मग गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " कां गा : जातीं घालिजेति नां ? " " जी जी : " भटोबासीं आवघेयां उळा दीधला : आवघे खांओं लागले : भटोबास दोहों हातीं रगडीति[११] : आणि पसाभरि तोंडीं घालीति : नाथोबा एकेकु दोंदों खाति : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेसांचें जातें पसेप्रमांण : मंडळिकाचें जातें गिरगुटीये[१२] : " ऐसा उळा खादला : मग गोसावीयांसि उदेयाचा पूजावसरु जालेयांनंतरें गोसावीयांसि बाहीरिले पटिसाळेवरि आसन असे : गोसावीयांचेया दरीसनां एल्हंभट आले असति : ते बैसले असति : भगतजन मातीकाम करीत असति : आणि पांणीं पीति : वानरेयाचें[१३] : गोसावीं एल्हंभटांतें म्हणीतलें : " माहात्मे उदेयासिचि पांणीं पीताति : थोरलालीं पोटें : हें काइ पां ? " " जी जी : रुखीं[१४] अंनें खाताति : व्यापारु करितां भागताति : तेणें ताहान लागताए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कीं कांहीं वीकृतिचेष्टा ? " " ना : वीकृतिचेष्टा करावेया कारण काइ ? " गोसावी भगतजनांची वास पाहाति : आणि : हास्य करीति : ।।

## १६ भट : नाथोबा : सीतपीडानीवृति

भटोबास आणि नाथोबा भीक्षा करुनि आले : गंगे जेवावेया गेले : जेविले : आणि हींव[१] वाजों लागलें : ते कांपत आले : " जी जी : हींव[१] वाजताए जी : " म्हणौनि दांत

---

१० (**यगोने.**). ११ **अ.** कुसकरीति. १२ **गो.** °गोटीए. **ने.** °गटीए. १३ **गोनेमु.** °साचें. १४ **गो.** रूखांनें. **हीबीने.** रूक्षान्नें.

**१६. १ यगोने.** सी. **मुहीबी.** सीत.

खटखटों लागलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा : एवंपर्यंत हीवचि[१] ? हीरा गा यांचीं फाळुकीं : वा यांतें ढगा : " दोघांचीं पांगुरणें हीरतलीं : ढगा वाइलें : नावेक होते : आणि जाळु सुटला : आणि बोबांओं लागले : " जाळु सुटला जी : जाळु सुटला जी : " नावेक होते : मग गोसावीं बोलाविलें : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " कां गा : सीं नीवर्तलें ? " *" जी जी : नीवर्तलें*[२] *:* पर जाळु[३] सुटला जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा पोहा : " तेणें पांणियें वाहियें दाघु[४] निवर्तला : पर अंतर-दाघु[४] निवर्ते ना : " जी जी : बाहीये दाघु[४] निवर्तला पर अंतर दाघु[४] न निवर्ते : " मग गोसांवीं वांनरीयांचें पाणीं पाजवीलें[५] : मग तोहीं जाळु निवर्तला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें आहाचपण न कीजे कीं गा : " मग भटोबासासि तो जाळु देहपर्यंत होता : सीयाळेयां दीसां एकतळेन वस्त्रेंसीं असति : उन्हाळेयां[६] दीसां सर्वांगीं चंदन लाविजे[७] : चंदनें पाए तळ्हातिजति[८] : ।।

## १७ इंद्रोबा वीधानपूर्वक फुटा प्रसाददान

इंद्रोबा कटका[१] गेले होते : तेथ खरूज लागली : मग गावां आले : गांवीं तेल केलें : मग म्हणीतलें : " गोसावीयांचेया दरीसनां जावों : तेथचि तेल लाउं : " मग गोसावी-यांचेया दरीसनां आले : गोसावीयांसि दरीसन जालें : ।।

एकु दीं गोसावीयांसि उदयाचा पूजावस्वरु जालेयानंतरें[२] ते आंगीं तेल लाउंनि गुंफेपुढिलां खडकावरि बैसौनि ओतपळी घेताति : गोसावीयांसि वाहीरिले पटिसाळेवरि आसन असे : गोसावीं तयांतें *कृपादृष्टीं*[३] अवळोकिलें : आणि म्हणीतलें : " बाइ : परमेस्वर-पुरुनि वस्त्र आलें असे तें आंणा आरूतें : " बाइसें गेलीं : वस्त्र आणिलें : गोसावीयांचां श्रीकरीं ओळगवीलें : गोसावीं दोहीं श्रीकरीं घेतलें : नमस्करिलें : श्रीमुगुटावरि ठेवीलें : उकलीलें : उजवी बुंथि घातली : येरीवाहाणि[४] करुनि डावी बुंथि घातलीं : उजवी पालखति घातली : डावी पालखति घातली : मग दुणें केलें : चौगुणें केलें : मग या श्रीचरणांवरि ठेविलें : एयां श्रीचरणांवरि ठेविलें[५] : *एया डावेया गुडघेयाखालि घातलें : उजवेया गुडघेयाखालि घातलें*[६] : ए जानुवरि ठेविलें : इए जानुवरि ठेविलें : या कोंपराचिये सांदीं घातलें : एया कोंपराचिये संदीं घातलें : इये कक्षावळीखालि[७] घातलें

---

२ (**गोही.**). ३ **शो.** तापु आला असे. ४ **यगोनेबी.** डागु. ५ **यगोने.** पीववीलें. ६ **अगो** सीयाळेयां. ७ **बीहीने.** लावीति. ८ **बीहीने.** तळ्हातीति.

**१७.** १ **य.** ठाणेया. २ **एवा.** °वीळिचिया पाहारा एका आंग धुनि खडकावरि—. ३ **बीही** ४ **गोने.** येरीवाणी. **हा.** येरीवाही. उकलुनि. **यमु.** °उपरतौनि. ५ °**एवा.** ठेविलें नाहीं. **बीही** °मग आवधेयां अवेवाचा संबंधु दीधला : मग नमस्कारिलें : श्रीमुगुटीं धरीला : नमस्करीला तेवीचि इंद्रभटाची वास पाहाति. ६ (**यगोमुने.**). ७ **गो.** काखावळी° **यमु.** काखेतळि धरिलें

इये कक्षावळीखालि[७] घातलें : *ऐसें हृदइं धारीलें*[८] : ए कर्णयुगळीं[९] धरिलें : इये कर्णयुगळीं[९] धरिलें : मग नमस्करिलें : एकेका[१०] अवेवाचा संबंधु देति : तेवीचि तेयाची[११] वास पाहाति : बाइसीं म्हणीतलें : "जी जी : ऐसें काइ पाहीजताए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "असे कांहीं :" "जी जी : इंद्रेयातें पाहीजताए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "होइल आणि काइ[१२] : " "जी जी : इंद्रेयासि फुटा प्रसाददान दीजैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेंहीं[१३] वर्तैल :" "जी जी : तरि बोलाउं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा :" आणि भटोबासीं म्हणीतलें : "धांवा : धांवा इंद्रभटो : तुम्हांसि गोसावी फुटा प्रसाद दान देताति :" इंद्रभट आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : वीनतकंदर होउनि गोसावीयांजवळि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रेया : हें वस्त्र काइ : आणि हें वस्त्र कैसें : ऐसें तुम्हीं जाणां गा ?" "नां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि श्रीप्रभूचेया ठाया गेलें : *तेथचा सेवासंबंधु पातलें*[१४] : तेथौनि एथ आलें : *एथचा सेवासंबंधु पातलें*[१४] : ऐसें हें वस्त्र तुम्हां दीजैल तरि तुम्हीं काइ कराल ?" "जी जी : तेंहीं गोसावीचि सांघावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें देवपूजा असे ?" "जी जी : असे :" "तरि आधीं एथ पुष्प एक वाइजे : हें जैसें देखिलें तैसें आठवीजे : एथ नमस्कारू कीजे : सकृत सेवीजे : अति येत्न कीजे :" ।।

## १८ भटमुक्ष अनोज्ञाकृत सांडोवा बांधवणें

गोसावीं भगतजनासहीत खडकाळीए[१] बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ सांडोवा बांधिजैल : मग पैलाडि जाइजैल[२] :" भगतजनीं म्हणीतलें : "जी जी : एथ काइसेनि सांडोवा बांधवैल ? हें जळांत पाणीं : एथ पाओ थारे ना :" मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ सांडोवा बांधिजैल : मग पैलाडि जाइजैल[२] :" मागुतें भगतजनीं म्हणीतलें : "जी जी : एथ काइसेनि सांडोवा बांधवैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ सांडोवा न बंधवे तरि तुम्हीं आवघे एथौनि जा :" "हो कां जी : हें होववैल :" आणि[३] आवघे ढगाकडे[४] गेले : भट[५] म्हणीयां गेले होते : ते पैलाकडौनि आले : भट गोसावीयांपासि आले : "जी जी : गोसावी एकले ? आवघे भगतजन कें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि ऐसें म्हणीतलें : 'एथ सांडोवा बांधा गा : मग पैलाडि जाइजैल :' ते म्हणति : 'एथ काइसेनि सांडोवा बांधवैल : हें जळांत पाणीं : एथ पाओ न थारे :' एथौनि ऐसें म्हणीतलें : 'तरि

---

८ (**यमु.**). ९ **अ.** करण°. **यमु.** मुडुपावरि. १० **यगोमु.** ऐसा अष्टांग संबंधु देति. ११ **यमुहीबी.** इंद्रभटाची. १२ **गोने.** होइल कांहीं. १३ **गोने.** ऐसेंचि. **हीबी.** देइजैल आणि काइ गा : १४ (**यगोमुहीबी.**).

**१८.** १ **यगो.** खडकापासि. **ने.** °वरि. २ **हीबी.** °बीजें कीजैल. ३ **यमु.** म्हणौनि गेले : ते ऐलाडि संगमेस्वरीं राहीले. ४ **हीबी.** ढगाआड. ५ **यमु.** °कोणा नेणों व्यापारा गेले होते.

तुम्हीं आवघे एथौनि जा : ' तें तेयां होववलें : " भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : मीं सांडोवा बांधों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि तुं एथिचिए प्रवृती वीखो होसी : आणि काइ : " मग भट कांहीं दगडगुंडे मेळउं लागले : मग गोसावी प्रसंन्न देखिले : मग भटोबासीं गोसावीयांतें म्हणीतलें : " जी जी : मीं ते आपणेयां वीरजे[६] बोलाउं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बोलावा :" भटोबासीं अवघे देखिले : मग भट तयापासि गेले : भटीं तेयातें म्हणीतलें : " हें काइ गा : तुम्हीं आवघे एथ काइ ? गोसावीयांतें सांडौनि कैसे आलेति ?" " काइ करूं नागदेया : गोसावी जळांत पाणीं तेथ सांडोवा बांधवीताति : आम्हीं म्हणीतलें : 'एथ काइसेनि जी सांडोवा बांधवैल ?' गोसावीं म्हणीतलें : 'तरि तुम्हीं आवघे एथौनि जा :' मग आम्हीं आलों : " भटोबासीं म्हणीतलें : " हां गा : बांधते काइ तुम्हीं ? तुम्हीं[७] होचि म्हणावें : मां करीतें तें नेणों कोण : मीं सांडोवा बांधैन : मज तुम्हीं विरजे लागा : " मग आले : गोसावीयांसि दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : भटोबासीं म्हणीतलें : " तुम्हीं आवघे दगड आणा : मीं सांडोवा बांधैन : कां मीं दगड आणींन : तुम्हीं सांडोवा बांधा : " " नां नागदेया : आम्हीं दगड आणुनि : तुं सांडोवा बांध : " मग आवघे दगड आणिति : भटोवास सांडोवा बांधति : *दगड भटाहातीं देति : भट बुडि देति : दगड बैसवीति[८]* : पहीली पाएरी बांधतां[९] भटोबासांचें तोंड बुचकळलें : ऐसा पाहारु दी व्यापारू होए : ऐसा तीं दीसीं तीं पाएरियांचा सांडोवा बांधला : तीसरां दीसीं सीळ एकि आवघे लोटीत होते : तें काइंसेनहीं सीळ न लोटे : गोसावीयांसि तया खडकावरि आसन असे : गोसावीं राणाइसांतें म्हणीतलें : " बाइ : कासोटा देया : मग बैसा : माघौतें हात टेंका : दोहीं पाइं सीळ लोटा : " तीहीं तैसेंचि केलें : आणि जेथ सीळ पडावी[१०] तेथ जाउनि खटकरि बैसली : आणि तयां आवघेयां वीस्मो जाला : मग भटोबासीं म्हणीतलें : " होए गा : करितें नेणों कोण असे : हे आम्हां आवघेयां लोटितां न लोटे : मां बाइचेनि लोटे : " ऐसा सांडोवा बांधला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां ऐसेयांचि पैलाडि जाइजैल : " म्हणौनि गोसावीं पैलाडि बीजें केलें[११] : ।।

---

**हीबी.** म्हणिया गेले होते. ६ **यमु.** °लागावेया. **ने.** °सहायक. ७ **यमु.** आपण आदि होइजे : मां करीतें–. ८ (**यमु.**). ९ **यमु.** °भटासि थोर सायास जाले. **एवा.** मांडतां. १० **मु.** बैसावी. **हीभटीं** जेथ आवांकीली होती तेथ–. ११ ही लीळा **अगोहीबी.** या पोथ्यांत **ने.** प्रतीप्रमाणेच आहे. **भट** म्हणियाहून आल्यावर त्यांची प्रथम भक्तजनाशी भेट झाली. त्यांच्याकडून त्यांना सांडोव्याचा वृत्तांत कळला. मग ते स्वामीपाशी गेल्यावर 'गोसावी एकले? भक्त जन कें?' असे विचारण्याचे कारण नव्हते. **यमु.** प्रतींत मात्र भट बाहेरून आल्यावर प्रथम स्वामीपाशी गेले. त्यांना एकटे पाहून 'भक्त जन कें?' असा प्रश्न त्यांनी विचारला व त्यांना स्वामीजवळूनच प्रथम सांडोव्याचा वृत्तांत कळला, असे वर्णन आहे. तेच सुसंगत असल्यामुळे **यमु.** पोथ्यांतील कथनानुसार तो येथे फिरवून घेतला आहे.

## १९ भटोबासातें स्वानमुखें[१] खीरि खाववणें

बाइसीं अवकण निवडौनि बरवी तांदुळांची खीरि रांधिली : गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळळा जाला : वीडा ओळगवीला : *खीरि उरली होती ते बाइसीं झांकुनि ठेविली : गोसावीयांसि*[२] पहुडु जाला : उपहुडु जाला : मग बाइसें बाहीरि गेलीं : भटोबास एरी गुंफेहुनि गोसावीयांपासि आले : गोसावीं *खीरीकडे*[२] अवळोकिलें : " हें पैल काइ गा वानरेया ? " " जी जी : हे खीरि : " सर्वज्ञें म्हणीतलें : " घेया : " " हें काइ जी ? गोसावीयांचे आरोगणेची खीरि मीं कैसी खाओं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " घेया : एथौनि म्हणिजत[३] आहे[४] : परि ऐसी ओरपत ओरपत घेया[५] :" मग भटोबासीं भरणुकें कानोडें केलें : मग स्वानाचेया ऐसी खीरि खादली : मग तोंड पुसौनि उगेचि बैसले : तवं बाइसें आलीं : ऐसें पाहाति तवं *मडकें कानवडें*[२] देखिलें : " कटकट बाबा आवघी खीरि सुनेनि खादली : माणुस खातें तरि ठाइं ठाकती : " सर्वज्ञें म्हणीतलें : " माणुस खातें : मां तुम्हां हातीं उरतें[६] कैसें ?" " तरि काइ बाबा : माणुसेंचि खादली[७] : कीं काइ सुनेनि खादली ? " " हो वाइ : काळीए डोइचा भलंड[८] दारवठां लागला[९] होता : " म्हणौनि भटोबासाची वास पाहीली : " हें काइ पोरा : तुवां खीरि खादली[१०] : " म्हणौनि कोपुं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ वाइ : तुम्हीं एव्हडा वेळु ऐसें म्हणां : 'कोण्हीं मानुस खातें तरि ठाइं ठाकती :' तरि आतां कोपत असा कां ? " " तरि काइ बाबा : एणें काइ खीरि खावी ? " सर्वज्ञें म्हणीतलें " तरि काइ हा मानुस नव्हे ?" ।।

## २० भुतानंदाकरवि पुरीया खाववणें

भुतानंदासि सात जणी लेंकी : एकि लेंकि सांगवखेडां[१] होती : तीचां घरीं रांधणेया वरिली पुरीया करवीलीया : दुरडीए पुरीया घातलीया : वेढीयें[२] तुप ऐसें घेउंनि आलीं : गोसावीयांसि बाहीरिले पटिसाळेसि आसन असे : दुरडी गोसावीयांपुढां टेविली : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " भुतानंदा : उभीयां पुरीया खा[३] : तेवींचि मरगजेसि वांकुलीया[४] दाखवा : " " हो कां जी : " आणि *स्तीति जाली*[५] : पुरी घेतली : कोढळेयांतु बुडुकुळली[६] : आणि खाओं लागलीं[७] : मरगजेसि

---

१९. १ **यमुने.** भटां स्वानमीखें°. २ (**यमु.**). ३ **नेगो.** म्हणीजताए. ४ **यमुहीबी.** असिजे. ५ **शोध.** 'नां जी : बाइसें कोपती :' सर्वज्ञें म्हणीतलें : 'सुनेन खादली ऐसा मागु करा :' ६ **गोने.** जीतें. **यमुही.** जेवों लाहातें. ७ **यने.** °नीकी कीं. सुणां खादली नीकी ? ८ **य.** लांवडा. ९ **नेही.** रीगाला. १० **शोध.** °बाबाचीये आरोगणेंची खीरि तुं खावों कैसी सकीनलासि : तुझां मडां बांधें घागरा : जो जाये मसणवेन्ही वाजत :'

२०. १ **हीबीमुने.** सावखेडां. २ **अ.** वाटीये. ३ **यमु.** °एथिची वास पाहा. ४ **गो.** वांकोलीया. ५ (**शोध.**). ६ **यगोने.** चुभळीली. **हीबी.** घुबकळीली. ७ **मु.** °गोसावीयांची वास पाहाति.

वांकुलीयां[४] वाति : ऐसीया आवघीया पुरीया खादलीया : सेवटीलु घांसु हातीं होता : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ भुतानंदा : तुम्हीं श्रेष्टें : संभावितें[८] : उभीयां पुरीया कैसी खातें असा ? तेवींचि देवतें वांकुलीया[४] दावीतें असा ? हें देखत असे : हा आवघा लोकु देखतु असे : " आणि स्तोति भंगली : आणि लाजीलीं : भीतरि गेलीं : मग दुख करूं लागलीं : मग बाइसीं तेयांतें संबोखिलें : ।।

## २१ रामीचीयां बाइयां पुर्वप्रतीभीज्ञा करणें

रामीचीया बाइया त्रीयंबका गेलीया : त्रीयंबकींहुनि[१] साउंखेडेया आलीया : एकां ब्राह्मणाचीए ओसरीए बीढार केलें[२] : तीं ब्राह्मणीं पुसिलें[३] : " आइ : तुम्हीं चांगदेओ राउळांची ?" " ना बाइ[४] : चांगदेओ राउळ कोण ?" " नां आइ : खडकुलीए एक पुरुष[५] असति : काइ सांघों तेयांचें लावण्य : सौंदर्य : सामर्थ्य[६] : तेयांचें दरीसन तुम्हीं घेया : " तयांसि चतुर पाहार नीद्रा नैएचि : *दीवसू केव्हाळि नीगैल ऐसें जालें*[७] : उदेयांचि दरीसनांसि आलीया : गोसावीं तेयांतें एतां देखिलें : आणि म्हणीतलें : " एथचीं एयमानें एथें[८] कें ? " तें बाइसीं म्हणीतलें[९] : " बाबा : एजमानें म्हणीजति काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पुर्वी हें रामीं होतें : तैं एथ पाणीभाताची आरोगणा देति : तैं हें दीगांबर होतें : तैं एथ मौन्य होतें : तैं यातें ' नग्नदेओ ' ' नग्नदेओ ' ऐसें म्हणति : आतां एहीं सातेंपांचें मीळौनि याचा देओ केला असे : " " जी जी : देओ तो काइ करावा असे? तो सदासर्वदा कीं : " आमचे नग्नदेओ म्हणौनि दंडवतें केलीं : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांसि आपत्नुत्व बाइसांहीं पस्य : गोसावी तेयांसि आपत्नुत्व करीति : गोसावीयांचिय पांतीं जेवण : मग गोसावीयांचां ठाइं एकु बरवा उपाहारू केला : मग गोसावीयांसि संप्रधारु करीति : गोसावीयांसि बरवें एक वस्त्र ओळगवीलें : मास एकु गोसावीयांचां संन्निधानीं होतीं : मग नीगालीं : निगतां सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : परमेस्वरपुरेंहुंनि जा : श्रीप्रभूचें दरीसन घेया : " " हो कां जी : " परमेस्वरपुरा गेलीं : श्रीप्रभूगोसावीयांसीं दरीसन जालें : तेथ एकु उपाहारू केला : एक वस्त्र ओळगविलें : मग रामांसि गेलीं : ।।

---

८ **हीगो.** संभावीकें. **ने.** सुभावनिकें.

**२१.** १ **हीबीय.** °कुनि. **गो.** °कौनि. २ **हीबीने.** घेतलें. ३ **अ.** म्हणीतलें. ४ **अ.** आइ. ५ **गोहीबी.** पुरुख. ६ **गोहीने.** या पोथ्यांत हे वाक्य नाही. ७ (**गोहीबीने.**) ८ **एवा.** °आलीं मां ". ९ **एवा.** आपणचि सांघीतलें : तेहीं ( =रामीच्या बायांनी ) गोसावीयालागौनि पुसिलें " एजमानें कैसीं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें रामीं होतें : पुर्वी भोगरामीं होतें : हें तुमचे मढीएसि ए : तैं एया पाणीभातु देया : . . . . . . . ."

## २२ कोलाचा दृष्टांत निरूपणें*

[देव गोसावीयांचेया दर्सना आले : मग एकु दीस गोसावीं सीक्षापीले : मग देवीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांचेया दर्शना एइजे तै गोसावी सीक्षापीती : परि सीक्षांसि कहींचि मान न करीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कोलु ठेवा : मां कीजैल :" "जी जी : कोलु म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु आचार्या असे : तो आपुलेया सीक्षासि सराउं दे : सराउं देतां चुके तेथ कोलें हाणे : म्हेळीएची सवि दे : तेयासि घाएखंडि ए : एकाधा एकु त्रसला जाए : दीसां सातांपांचां माघौता ए : तो कढीवांची पासौडी बैसों घाली : 'या : राणे हो बैसा : कां[१] पांयां पाउल होत असे :' तैसें ईश्वरसंन्निधानीं असतां सारिरें : मानसीकें दुखें साहाति ते ईश्वराचेया पदा योग्य होति : न साहाति ते नव्हति[२] :" ।।]

## २३ सारंगपंडितां भेटी : भए प्रश्नू करणें :

सीमगेयाकारणें सारंगपंडीत गोसावीयांचेया दरिसना आले : उगाणेयांचा बैलु : *जवाळि घोडे*[१] *:* आवघीए सणीचां[२] आइतिसीं आले : तें दीसीं पुर्णीव : गोसावीयांसि दरीसन जालें : वीळिचांचा पुजावसरू जाला : *सर्वांगीं चंदन लाविलें : ऐसा बरवा पूजावसरू जाला : आरोगणा जाली : तयांसि पांती भोजन जालें*[३] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : तुम्हीं सपरिग्रही असा : हें *तवं अरण्यवासी*[३] *:* तुम्हीं गांवांतु बीढार करा :" "जी जी : गोसावी परमेश्वरू[३] : गोसावी असतां आम्हांसि काइसें भए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "या देखतां हाटाचीएं चोहटां तोंडीचां[४] तोंडीं थापवेऱ्हीं[५] मारिजाल तरि हें नव्हें परमेस्वरू : तरि काइ इतुलेयाचि पुरुतें इस्वरू[६] म्हणां :" "हो कां जी :" मग सारंगपंडित गांवांतु गेले : एल्हंभटांचां घरीं बीढार केलें : मग वीळिचां गोसावीं नाथोबाकरवि होळीयाकारणें सेणी वेंचवीलीया[७] : उपाध्यांकरवीं गोसावीं होळीए प्रतिष्टा[८] करवीली :

---

**२२.** *'कोलाचा दृष्टांत' (५८). 'पाठसमुदायां'च्या मी पाहिलेल्या सर्व पोथ्यांत हा दृष्टांत त्याच्या प्रकरणवशासहित येथे उध्दृत केल्याप्रमाणे आलेला आहे. **नेने** प्रतीत या दृष्टांताच्या आरंभी 'सुखसाधनें देव न पवीजे कीं नाएका' हे सूत्र आहे. ते 'पाठसमुदाया'च्या पोथीत मला आढळले नाही. त्यात या दृष्टांताचा प्रकरणवश दिलेला असल्यामुळे, 'स्वतंत्र लीळा म्हणून त्याचा अंतर्भाव या ठिकाणी केलेला आहे. **दृस्थ.**काराच्या मते हा दृष्टांत 'एकाइसा प्रति खडकुलीए निरूपिला.' **नेने** यांनी तो 'खडकुली येथे रामदेवास' सांगितल्याचे नमूद केले आहे. (**ने. दृपा.** पा. ९४). इतर दोन पोथ्यांतही मला हाच उल्लेख आढळला. म्हणून 'खडकुली' येथे ही लीळा योग्य ठिकाणी घेतली आहे.

१. **पं.** कांहीं. २ माझ्या मते हे दार्ष्टांतिक स्वामींचे आहे. म्हणून येथे अंतर्भूत केले आहे.

**२३. १ (यमु.).** २ **यमु.** उपाहाराचीए. ३ **(यमु.).** ४ **अ.** तोंडीं ५ **ने.** पापरवरि. ६ **अ.** इस्वर्य. **गोने.** ऐश्वर्य. ७ **अ.** होळी वेंचवीली (**ने.** रचवीली. **गो.** रेववीली). ८ **अ.** प्रदक्षणा.

सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचा विधि हा जाणे :" मग उपाधीं जीए वेळे होळी लावावी तीए वेळे होळी लाविली : मग बाइसांतें मांडा मागीतला : तो बांधला : नैवेद्य[९] दाखवीला : मग गोसावीं तेथ बीजें केलें : होळीए प्रदक्षणा केली : गोसावीं फुटयाचे दोन्ही पालव श्रीमुगुटावरि घातले होते : *सर्वांगीं चंदनाची भोरी केली होती*[१०] : प्रदक्षणा करितां[११] चंदन दीसे : नावेक गोसावी उभे होते : मग बीजें केलें : गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळळा जाला : वीडा वोळगवीला : मग पहुडु जाला : ।।

## २४ सीमुगां सारंगपंडितांचें सींपणें

उदेयांचि सारंगपंडीत पूजाअवस्वराचिए आइतिसीं आले : सरीयांचें चंदन उगाळिलें : गोसावीयांसि सर्वांगीं ओळगवीलें : गोसावीयांसि पूजाअवस्वरू जाला : मग भगतजनां चंदनाचे टीळे लावीले : तांबोळें दीधलीं : मग गोसावीं मेघवणें[१] पागेचा धाटा घेतला : फुटेयाचे दोन्ही पालव श्रीमुगूटावरि घातले : गोसावीयांसि सेंदुर ओळगवीलें : कापुरु : कस्तुरि : पानें : पोफळें : फुलें : मग गोसावीं होळिएपासि बीजें केलें : गोसावीं स्रीचरणी-चेनि आंगुठेनि 'होजे रे : होजे रे :' म्हणौनि राख उधळिली : आणि सींपणें प्रवर्तलें : सारंगपंडीत आंगीया लेउनि आले होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : पांडा नोको गा :" तें भटांसि उमटलें : मग भगतजनीं तेयांवरि घातलें : राख माती चीखलु : ऐसा पाहारू एकु सींपणें जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां पुरें कीजो गा :" मग गोसावीं बीढारा बीजें केलें : ।।

मग[२] गोसावीयांसि मर्दना जाली : मादनें जालें : गोसावीयांसि नाहातां उरलें तेल : तया तेलाआंतु आणीक तेल घातलें : भगतजनीं आणीकु चीकसा घातला : मग गंगें न्हाले : ।।

## २५ तथा पासवडी प्रसाददान

सारंगपंडीतीं दोनि पासवडीया आणिलीया होतीया : आपणेयांलागौनि जे पासवडी आणिली होती तीचें गोसावीयांलागौनि आसन रचिलें : मग प्रसादाची करुनि पांगुरावी : एकि दुटी गोसावीयांलागौनि आणीली होती : ते गोसावीयांलागौनि वोळगवीली : गोसावीयांसि बरवी पूजा केली[१] : मग बाइसीं ताटें केलीं : मग गोसावीं

---

९ **गोनेही.** नीवेदु. १० **(यमु.)**. ११ **हीबी.** °सर्वांगीं चंदन मीरवे : तें भक्तिजनें पाहातचि होती—.

**२४.** १ **गो.** °वणीए. **हीने** °वर्णीए. २ या परिच्छेदातील वाक्ये पोथ्यांत पुढील लीळेच्या आरंभी आहेत. संगती राखण्यासाठी मी ती येथे घातली आहेत.

**२५.** १ **यमु.** प्रतीत '...... मग बाइसीं ताटें केलीं' यापूर्वीचा मजकूर पुढीलप्रमाणे : "सारंगपंडीतीं बाइसांकरवि उपाहारू नीफजविला होता : आवघे पदार्थ आणुनि दीधले होते : तो

तार्टे पडिताळावेया बीजें केलें : सारंगपंडितीं आसनीची पासवडी घेतली : *पांगुरले*[२] मग गोसावीं बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : एथिची पासवडी कां घेतली ? " " जी जी : मीयां दोनि पासवडीया घेतलीया : एकि पासवडी गोसावीयांसि ओळगवीली : एकि मीयां प्रसादाची करुनि पांगुरावी जी : तरि मीं हे प्रसादाची करुनि पांगुरलां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " प्रसादु तो काइ ऐसा ? देओ दे तो प्रसादु कीं : एथौनि प्रसंन्न होउनि दीजे तो प्रसादु : देया पासवडी : " सारंगपंडितीं पासवडी ठेविली : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथची पासवडी असे ते आणां आरुती : " बाइसीं पासवडी गोसावीयांची राती पांगुरती दुटी तीहुनि उंच : ते दुटी गोसावी सारंगपंडितांसि दीधली : ॥

## २६ रामदेवां स्नानप्रसंगें सीक्षांसि[१] कोपणें

तवं दादोस पांती जेवावेया आले : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मेयांसि उष्णोदकें स्नान जालें कीं सीतळोदकें : " " जी जी : सीतळोदकें : " " इयें इतुलीं असतां तऱ्हीं तुमचें सीतळोदक न चुके : " दादोसां सुख जालें : 'गोसावीं माझा कैवारु घेतला : ' सीक्षां ऐसें जालें : 'गोसावी आम्हां कोपले : ' मग गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळळा जाला : वीडा ओळगवीला : भगतजनां जेवणें जालीं : ॥

## २७ लाहिभटां[१] टीळातांबोळ साहावणें

सीमुगेयाचां दीसीं गांवीचे[२] माहाजन टीळे तांबोळें ऐसें गोसावीयांचेया दरीसना आले : लाहिभटां टीळा नाहीं : तांबोळ नाहीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हां टीळातांबोळ नाहीं तें काइ ? " " जी जी : मी टीळा लावीं तरि कपाळ दुखे : तांबोळ घें तरि वांति सुटे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया[३] : यांसि टीळा लावा : तांबोळ देया : " " जी जी : मज टीळा न साहे जी : कपाळ दुखैल जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तवं लाउं देया : होए : मग न साहे तरि नोको : " भटोबासीं टीळा लावीला : तांबोळ देओं आदरिलें[४] : " जी जी : तांबोळ नको जी : एणें मज वांति सुटैल जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां

---

बाइसीं उपाहारू नीफजविला : सारंगपंडीतीं दोनि पासवडीया आणिलीया : एकि हीनि : एकि उंच : हीन ते प्रसादाची करूनि पांगुरावी : उंच ते गोसावीयांसि ओळगवावी : मग गोसावीयांसि पूजा करूं आदरीली : पासवडीएचें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : बरवी पूजा केली : ते उंच पासवडी गोसावीयांसि ओळगवीली : धुपार्ती : मंगळार्ती : दंडवतें घातलीं : मग बाइसीं ताट केलें : . . . . . . " २ (**गोने.**).

**२६.** १ **गोने.** प्रतीत या लीळेची 'आदि' 'देव करीत पर्व' अशी आहे. पण यात पर्वप्रसंगाचे वर्णन नाही. **हीबी.** प्रतीत 'देव स्नान करीत सीक्षांसि कोपणें' अशी आदी आहे त्यातील 'सीक्षांसि' हा शब्द येथे घेतला आहे.

**२७.** १ **मु.** मांइदेभटां. २ **हीबी.** सावखेडाचे. ३ **एवा.** नाथोबातें म्हणीतलें. ४ **हीबीगो.** वैसले.

तवं घेया होए : मग[५] वांति सुटैल तरि नोको : " तांबोळ घेतलें : तीये दीउनि[६] तांबोळ टीळा साहिला : ।।

## २८ लाहिभटां प्रश्नें बीढारनीक्षेदु[१]

लाहिभटीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : मज गोसावीं कांहीं निरूपावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " आहे तें विसरा : " " जी जी : असे नां कां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : बीढारावरि काइ बीढार असे ? " लाहिभटीं[२] म्हणीतलें : " कां नसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : कव्हणी एके म्हांतारीएचें बीढार असे : तेथ नित्यमंता रायाचें बीढार ए : पर तेयांहीं तीयेतें नीणुं[३] नैए : नां ते वेवस्था नव्हे[४] : " *तवं आबाइसीं म्हणीतलें : " तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : अनंतु सामाये तेथ आणिकु न सामाये : आणिकु सामाये तेथ अनंतु न सामाये : कां अनंतु तो अनंतु की : " " हो कां जी[५] : "* ।।

## २९ दैवाद्य मार्गु निरुपण

गोसावीयांचेया दरीसनां वीद्वांस[१] एक आले : तीहीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : गोसावीं आम्हांसि कांहीं निरूपावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " दैवाद्य भाओ निरोपुं कीं पुरुषादि भाओ नीरोपुं ? *पुरुषाद्य मार्ग अनंतु : दैवाद्य मार्ग तो एकु[२] :* " तें तेयां कांहीं उमटेचि नां : ते उगेचि राहिले : *यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " आद्यंतीं दैव : मध्यें पुरुषु[३] :* " ।।

*गोसावीयांसि निरोपणाची प्रवृत्ति : म्हणौनि निरोपुं लागले : भट कव्हणा एका व्यापारा नीगों बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : हें निरोपण घोका : " भटीं म्हणीतलें : " जी जी : हें घोकिलेंचि असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं म्हणत असा तें तैसेंचि : परि तुम्हीं महात्मे कीं गा : महात्मेनि दुना पथ्य घेइजे : " " हो कां जी : " म्हणौनि आइकीलें : मग नीगाले[४] :* ।।

---

५ **गो.** मां. ६. अ. तें देउनि.

**२८.** १ **हीनेमु.** निषेधु. **गोय.** नीखेदु. **मु.** प्रतीत 'लाहिभट' या ऐवजी 'माइदेवोभट' याच्या नावाने ही लीळा आहे. २ **पं.** बाइसीं म्हणीतलें : "बाबा : बीढार म्हणिजे काइ ?"—. ३ **ने.** नाणूं. 'नीणुं' हाच पाठ योग्य 'निणणें = नेणे, बाहेर काढणे.' **नरुस्व.** ४०६ पाहा. ४ **पं.** °तैसीं देवतांचीं अधिष्टानें असति : तेथ ज्ञान देवों नए : कां ? जें बीढारावरि बीढार नाहीं : " मग ते उगेचि राहीले : ।। **हीबी.** °मग ते उगेचि राहीले : ।। ५ (**प्रव.** आचार. ३३).

**२९.** १ **यमु.** सावखेडांचे (**य.** सांगव°) कमळनाभि नाव माहात्मे—. २ (**प्रव.** विमा. १४९). ३ (**प्रव.** वि. ११६). ४ (**प्रव.** आमा. २५५).

## ३० गुणकार्य निरूपण

गोसावीयांचेया दरीसनां वीद्वांस एक[१] आले : तीहीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : गोसावीं आम्हां कांहीं गुणकार्ये निरुपावें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " रजतममीश्रीत सत्व निरोपुं : कीं सत्वमीश्रीत तम निरोपुं : कीं तममीश्रीत रज निरोपुं : कीं रजस्तममीश्रीत सत्व निरोपुं ? " ते[२] तेयां कांहीं उमटेचि नां : ते उगेचि होते : ।।

## ३१ गांगाइसां भेटी

गांगाइसें दादोसीं अस्तभावीली[१] : " जा नां कां तेथ : गोसावी तेयांतें पाठवीती : " गांगाइसीं एकु मोलकरी[२] केला : मग आलीं : कडीए महेस्वरपंडित : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागलीं : तवं भटोबासांतें देखिलें[३] : आणि सवीया देओं लागलीं : " जळो जळो ऐसियां पुरुषाचें जीआलें : ते पुरुष आझुनीं कां जीताति : जेयांचियां बाइला अंन्न नांहीं : [४]वस्त्र नांहीं : तेयां लाज नांहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[५] : तुम्हीं यांसि कां सवीया देतें असा ? एहीं काए ओखटें केलें ? आझुइं[६] हातीं-पाइं जीवितें[७] असा[८] : पांचां सोवासीनिमाजि सरतें असा : हा जें करीत होता तेणें याचें कणींस तैंचि जातें : एथिचा जाला म्हणौनि वांचलें : " " मां जातें[९] कां जी : तरि एकु दीं हातपाए पीटौनि नीसुरुसी[१०] होतिएं[११] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हां[१२] : " ।।

## ३२ तथा मृत्य भट दाखवणें

मग गोसावीयांसि पूजावस्वरु जाला : आरोगणा जाली : गुळळा जाला : वीडा जाला : गोसावीयासि पहुडु जाला : भगतजन जेउनि एरी गुंफे वीसंवले : बाइसांकरवि गोसावीं गांगाइसांसि जेउं वाढवीलें : महेस्वर पंडीतांहीं वाढवीलें : गोसावीयांसि उपहुडु जाला : आवघे भगतजन गोसावीयांजवळि आले : आणि भटोबासांसि स्तीति जाली : ते खोडवळले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं आवघे आलेति : वानरा कां गा नैए ? " " जी जी : तो नीजेला असे : " सर्वज्ञें *गंगाइसातें*[१] म्हणीतलें : " बाइ :

---

३०. १ **यमु.** दोघ. २ या ऐवजी **यमु.** प्रतीत पुढील वाक्य आहे " ऐसें निरूपिलें. आणि क्षोभले : ते उगेचि राहिले.

३१. १ **य.** उस्तभवीली. **गो.** उभवीली. **मुपं.** उस्तंभवीली. **हीबी.** चन्हावीली तथा चेष्टवीली. **ने.** अस्तभा° उस्थापीली (**ड.** पाठ). २ **यमु.** मोलकै. ३ **यमु.**° " जी जी : बाप भाउ कोण्हीं नाहीं : बरो नाहीं : वस्त्र नाही : दुभतें नाहीं लेकरूंवांसि जी : " मग सवीया देओं लागली ......"
४ **ही.** वरोनाही°. ५ **एवा.** बाइ : **बी.** भेंकत असा कां ? तुम्हां काइ ओखटें होत असे ? ६ **गो.** अधुइं. **मु.** अधोइं. ७ **यगोमुने.** जेविते. ८ **यमु.** °चोळीतानवडें लेत असा. ९ **शोध.** मरते. १० **हीबी.** नीसुरें. **पं.** नीसुरू. ११ **हीने.** मग गोसाबी उगेचि राहिले. १२ **गो.** हुं.

३२. १ (**यगोमुने.**).

जा पां बोलावा :" गांगाइसें गेलीं : दारापासि उभीं राहिलीं : "आइकतां ? उठा : तुमतें गोसावी बोलावीताति :" नुठीति : मग थोरें[२] म्हणीतलें : तर्‍हीं नुठीति : मग भीतरि गेलीं : हातु लावीला : तवं आंग खोडवळलें असे : आणि हातपाए पीटुनि रडों लागलीं : गोसावीं वाहीरि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ वाइ : तुम्हीं एव्हढा वेळु ऐसें म्हणां : 'मरता तरि निकें होतें : ' तरि आतां रडतें असा कां ?" "हें काइ जी : असिलेंयाचि नीकें कीं जी : आझुइं[३] हातीं पायें जेवीत[४] असें : पांचां सोवासिनीमाजि सरत[५] असें : काइ करीन[६] जी : धन नाहीं : बापु नाहीं : भाउ नाहीं : वैजोवा वरो न घली : लेंकरुवां दुभतें नाहीं : एकें गाडुगेनि म्यां कीती दी वावरावें जी ?:" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ आतां हें असें नव्हे ?:" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया वानरेया : उठा :" आणि भटोवास उठिले : मग गोसावीयांसि वीळिचांचा पूजावस्वर जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : यांतें गांवांतु घेउनि जा : तेथ निद्रा करा :" भटोबास घेउनि गेले : एकी ओसरीवरि तेयांतें नीजवीलें : एकी ओसरीवरि आपण नीजैले : गोसावीयांचेया परश्रेयाची वेळ जाली : आणि गांगाइसांतें म्हणीतलें : "तुं उदेयां ए हो : मी पुढां जाइन :" भटोबास पुढां आले : परश्रयस्थानीं भेटि जाली : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि जयालागि पाठविलेति तें नव्हेचि गा :" "जी जी :" मग उदेयां गांगाइसें आलीं : गोसावीयांसि पूजावस्वरू जाला : गोसावीं सींपा बोलाविला : वाहीरवासाचीया दोनि चोळीया आणि महेस्वरपंडितां आंगी कापवीली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वांनरेया : यांतें गांवां घेउनि जा : यांसि सीदोरी देववा : यांचें यांसि देववा : यांलागि घर करा : आणि यें म्हणतील तें करा : प्राणिया एकु वाट पाहातु असे गा[७] :" "हो कां जी :" मग भटोबास तयांतें गांवां घेऊनि गेले :।।

## ३३ भटां आश्रमु प्रष्णु करणें

गांवां गेले : पेवं काढीलें : अर्ध वरो तेयां घातली : अर्ध वरो घरीं घातली : दुभतें वांटिलें : सेनीचा कलवडु होता तो सरीसा लींपिला : तेयांवरि इलरें[१] घातलें[२] : मग पींपळगांवीचेनि वेसदारेंहुनि आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा : घर केलें ?:" "जी जी : घर केलें : परि कळसाचें केलें[३] :" बाइसीं पुसिलें : "बाबा : कळसाचें म्हणिजे काइ ?:" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरु

२ **गो.** °सबदें. **हीबी.** सब्दें बोबाइली. ३ **यगोने.** अधुइं. **मु.** आधोइं. ४ **हीने.** जेविजत असिजे. ५ **ही.** सरिजत असिजे. **बी.** सरत असिजे. ६ **गोमु.** करीं. **ही.** करूं. ७ हे वाक्य **मु.** प्रतीत नाही.

**३३.** १ **मु.** वीरलें. **ने.** इरलें. २ **यमु.** °वरि घडगी घातली : वरो घातली. ३ **मुय.** (**एवा.**) "जी जी कलवडु सरिसा लींपीला : वरि इलरें घातलें : वरि कांटोपोरा घातला : कलवडी सींकें . . . . . . **य.** मग भटीं पुसिलें : "हां जी. मज नीरोपु दीधला : म्हणती तें करा : तें काइ जी ?"

इलरें घालुनि आला : वरि कांठपुरा घातला :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पींपळगावां-वरुनि आलासि : देमती पडिताळिली ?:" "नाहीं जी : मज गांवांतु रीगणें नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचेया संबंधा गेले तेतुले ओटेगोटे आदिकरुनि तुम्हां नमस्करीयें[४] कीं गा : मां एसनीं देमती कैसी डावलीली[५] ?:" ऐसें गोसावी[६] कोपले : *भटीं म्हणीतलें : "ना जी : मज गावांतु जावेयाचा निरोध म्हणौनि नाहीं गेलां : मां डावलुं काइसिया ?:" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : आपुले सकळही नीरोध परिहरौनि एथींचेया संबंधीयांचेया संबंधा जाइजे : मग तो म्हणे ते कीजे :" भटीं म्हणीतलें : "हो कां जी : चुकलां :" म्हणौनि श्रीचरणां लागले[७] :"* ॥

## ३४ ग्रहेसारंगपाणी मृतीका[१] वाहावणें[२]

एकु दीं गोसावीयांचां ठाइं मातीकाम होत असे : तवं ग्रहेसारंगपाणी गोसावीयांचेया दरीसना आले : ते पालखति घालुनि गोसावीयांजवळे वैसले असति : गोसावीं भटां डोळा घातला : आणि भटोवासीं पालखति[३] धरुनि आसुडिले : "उठि : माती वाहे : काइ बैसला असति?" आणि 'श्रीनाथु[४]' म्हणौनि उटीले : भट पेंड देति : आणि 'श्रीनाथु[४]' म्हणौनि घेति : आणि 'श्रीनाथु[४]' म्हणौनि घालीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "जऱ्हीं नाथु[४] स्मरिसी तऱ्हीं इतुकी माती वाहासी :" ऐसी आवघी माती वाहीली[५] :॥

## ३५ पांगुळवेखें भटीं स्तुति करणें

भटोबास[१] गंगे जेवीले : आणि भटोबासीं राखेचे टीळे लावीले : पाइं पाटे वांधीले : मग अळाप पांगुळाचेया ऐसे करीति : "आगा ए श्रीचक्रधरा राया : दुरध्यानी[२] ब्राम्हणु नीळे वृक्ष : पांढरीं देउळें क्रमुनि[३] आलां : पांगुळां पाए देसी : आंधळेयां डोळे देसी : मुंकेयां वाचा देसी : बहीरेयां कान देसी : अपक्षां पांख देसी : ऐसी तुझी कीर्ति आइकौनि आलां श्रीचक्रधरा राया :" ऐसे अळाप[४] करीत आले: गोसावीयांजवळे मांडखुटि[५] घालुनि बैसले : अळाप करूं लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरे भटो पुरे :" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

सर्वज्ञें म्हणीतलें : "प्राणीया एकु वाट पाहातु असे : वैराग्यदेओ होइल :" ४ **हीबीपंने.** नमस्करणीएं. ५ **पंने.** °एथचा संबंधु नमस्करीजे : बंदीजे : सेवीजे : कीं गा. ६ **हीबी.** °भटांसि वीहीलें. ७ (**प्रव. आ.** १८७).

**३४.** १ **गोने.** °पींड. २ **मुहीबीय.** प्रतीत ही लीळा येथे नाही. **पं.** प्रतीत 'हे लीळा डोंबेग्रामीं' असे नमूद केले आहे. ३ **ने.** पासवडिए. ४ **गो.** श्रीजगनाथु. ५ **गो.** वाहावीली. **प्रवा.** °हे लीळा डोंबेग्रामींचि.

**३५.** १ हा आरंभीचा भाग **यमु.** प्रतीत पुढीलप्रमाणे : 'एकु दी मातीकाम जालेया नंतरें भट गंगे गेले : आंग धुतले : टीळे टोळे केले : पांगुळाचें अवगले—.' २ **अगो.** दुरुनि. ३ **अहीबी.** कर्मुनि ४ **यमु.** °स्तुती. ५ **अ.** °कुटि. **यमुने.** मांडेखूटि.

" बाइ : ऐसिया पांगुळासि काइ दीजे ? " बाइसीं म्हणीतलें : " बाबा[६] : आपुलें सेवादास्य दीजे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि वानरेसां काइ एक नेदावें[७] ? परि पोरा जीवा वीज्ञान देओं[८] नैए :" तवं आउसीं म्हणीतलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : सेवाही नागदेयासि आणि दास्यही नागदेयाचें : तरि आम्हीं काइ करावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " दासोहं न पुरे नाएका : *कव्हणी एकु फुटाणेकारू असे : तो चणेयांसि बोल दे : भीजति : मग एकि वाळु घाली : ते फेडी : दुसरी वाळु घाली : तेही फेडी : तीसरी वाळु घाली : तेही फेडी : हीरवटानि आणि कठीणत्व हे दोन्ही दोख जाति : सुरे मृदत्व हे गुण एति : कंचुकवत टरल होए : मग गुळेसीं भक्षावेया योग्य होए[९] : तैसें परमेश्वरू जीवाचीं मळकर्में फेडौनि योग्य करीति[१०] :* " ।।

## ३६ भटां गोवींददेहत्यागु दाखवणें

गौराइसांचां आंगीं कांहीं रुजा होती : तीयें तीए कपाटीं असति : तें[१] कपाट तयांवरि पडिलें : 'गोवींदावरि कपाट पडिलें' म्हणौनि भगतजनें बोबाइलीं : गोसावीं तेथ ब्रीजें केलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : तवं भटोबास आले : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : या ना : गोवींदें कैसा देहत्यागु केला असे तो पाहा : " " काइ पाहावा असे जी : गोवींदासारिखा भीक्षु : गोसावीयांचें संनिधान : दैवाची : भाग्याची : " ऐसें म्हणति : परि भीतरि न वचतीचि : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें नव्हे : साउमे या[२] : " मग *भीतरी गेले : मेकों लागले*[३] : गोसावीं तयांकरवि धुववीलीं : टीळा लावविला : श्रीमुखीचें तांबोळ तयांचां मुखीं घातलें : श्रीकंठीचा गळदंडा गळां घातला : *सर्वज्ञें म्हणीतलें : " मोट बांधा : दोनि साळग्राम घाला : आणि जळप्रवाहो करा*[३] : " मग भटोबासीं मोट बांधली : दोनि साळग्राम घातले : मग डोहांतु घातलीं : ।।

## ३७ मार्कंडा पडदणीं प्रकास दर्सन

मार्कंड[१] व्यापारु करीत होते : तयांची आंगुळी रगडली : ते बाइसांतें चींधी मागावेया गेले : " बाइ : माझी आंगुळी रगडली : कोरभरि चींधी देया कां : " बाइसीं म्हणीतलें : " मीं नारायें[२] : जाए मार्कंडा : पाहुनि घे जाए :" मार्कंड गेले : ते कांहीं आणीक देखतीचि ना : तेहीं गोसावीयांची पडदनीं देखिली : ते फाळिली : तवं प्रकासु देखिला : आणि

६ **शोध.** बाबाचेया प्रत्या ये तें दीजे. ७ **ने.** नेदवे. **गोहीबो.** नेदीजे. ८ **एवा.** नीरोपुं. ९ (**दृपा.** ६६ फुटाणेकाराचा दृष्टांत 'गोसावीं आउसाप्रति खडकुलीए निरोपिला :'—**दृस्थ.**). १० पुढील दृष्टांतावरील हे दार्ष्टांतिक मी येथे घातले आहे. माझ्या मते ते स्वामींचेच होय.

**३६.** १ **यमु.** तयावरि भींति पडली. तीयें सरली (**य.** मेली). २ **यमुने.** °साउमे जाले. ३ (**हीने.**).

**३७.** १ **पं.** मार्कंड गौराइसांचीए गुंफेवे दगड काढीत होते : ते काढीतां आंगुळी दुखवली : ते बाइसांतें—. २ **यमुने.***

सुख होए : जवंजवं फाळीत तवंतवं सुख होए : ऐसी आवघी पडदनी फाळिली : आणि भीयाले : एकि चींधी आंगुळीए बांधली : एरि पडदनीं गोळा करुनि पऱ्हीवां दाटिली : बाइसें व्यापारु करुं सरलीं : गोसावीयांसि मादनें देयावेया पडदनीं पाहों बैसलीं : तवं देखति ना : मग गोसावीयांतें म्हणीतलें : "हां बाबा : पडदनी काइ जाली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पैल घेया :" काढिली तवं आवघीया चींधीया असति : "हां बाबा : हे पडदणीं कवणें फाडिली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मार्कंडातें पुसा :" "हां मार्कंडा : हे पडदणीं कां फाडिली ?" "नाही मां : *कोण म्हणताए ?" बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हा नाहीं म्हणताए*[3] *:"* सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा आरुता :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां मार्कंडा : हे पडदणी कां फाडिली ?" "जी जी : माझी आंगुळी रगडली : बाइसांतें चींधी मागावेया गेलां : 'बाइ : माझी आंगुळी रगडली : कोरभरि चींधी देया :' बाइसीं म्हणीतलें : 'मीं आरायें ना : पाहुनि घे जाए :' पांहों गेलां : तवं कांहीं देखेंचि नां : ते पडदणीं देखिली : फाळुं बैसलां : तवं प्रकासु देखिला : जवंजवं फाळीं तवंतवं प्रकासु निगे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "केतुलें एक सामर्थ्य देखिलें : मां पुरे न कीजे[१] ? मां आवघी पडदणी कां फाडिली ? हां गा तुम्हीं म्हणां आम्हीं रीते : आम्हां कांहीचि नाहीं : एथौनि जडां पदार्थी[४] जरि ऐसें : तरि तुम्हीं कैसें रीतें ? एथौनि तुम्हीं केसने जाले असा : ऐसें कांहीं नेणां होए :" ॥

## ३८ तथा प्रमाणनीराकरण

एकु दीं गोसावीयांसि खडकावरि आसन असे : मार्कंड गोसावीयांपासि बैसले असति : गोसावी मार्कंडातें पुसत होते[१] : "*सर्वज्ञें म्हणीतलें : तुम्ही एथ सदा लटकें बोलता गा :" मार्कंडीं म्हणीतलें : "जी जी : मी गोसावीयांसि काइसेया लटकें बोलैन ?" सर्वज्ञें म्हणीतलें*[२] *:* "ऐसें तरि प्रमाण करीसि ?" "हो जी :" ते वाडेगांवां गेले[३] : लटीकें बोलत होते : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : घाला पां या पांणीयांतु हातु :" "हो कां जी" म्हणौनि हातु घालुं बैसले : पाणीयांतु हातु घालितां : आणि हातु गोसावीं *वरिचां*[४] वरीचि श्रीकरें धरिला : *सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : पाणी म्हणौनि हातु घालितासि परि इतुका जळौनि जाता तेव्हाळि काइ करितेति ?" ते उगेचि राहीलें*[४] *:* मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचा मार्कंड ऐसा असे : एथ अनृत्य बोलतु असे : आणि प्रमाण करीत असे :" यावरि बाइसीं वागरा बांधला : *सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : एथ हांसतांहीं लटिकें न बोलिजे हों*[५] *:"* ॥

३ (**मुने.**). ४ **पंगोने.** पार्थिवा.

**३८.** १ **मु.** °ते आना गावां गेले : आणि आणिकीकडे गेलां ऐसें सांघीतलें : ऐसें लटिकें बोलिले : २ (**हीबीने.**). ३ पं. °भुतानंदाची एकि लेकि वाडेगांवीं वरखेडां असे : तीचेया घरा गेले : तीयां न्हाणिले : जेविले : मग आले : आना गांवा गेला : आणि आणिका गावाचें नाव घेतलें : ४ (**हीबीने.**). ५ (**प्रव. आ. १९०**).

## ३९ निरूपितां भटां ईश्वरअप्राप्ति करणें

एकु दीं गोसावीं भटोबासांतें निरूपण केलें : 'देओ[१] काइसेनहीं न पवीजे :' ऐसें निरूपण केलें : *भटीं म्हणीतलें : "तें कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु जीवु कर्मचांडाळ : एकु कृतघ्न : एकु प्रतारक : एकु वंचक : एकु विश्वासघातकी : एकु मातृद्रोही : एकु गुरुद्रोही : एकु मार्गद्रोही : एकु गोत्रद्रोही : एकु स्वामीद्रोही : एकु परमेश्वरद्रोही : यावेगळे कव्हणीचि न दिसती : मा ऐसे जीव असति : म्हणौनि देओ काइसेनहीं न पवीजे :" निरूपण प्रवेसन जालें : मग भटीं विचारीलें : "एहीं दोषीं वेगळा करुनि कव्हणी न दीसे : आणि माझां ठाइं हे दोष असति : तरि आतां काइ कीजे[२] ?"* मग भटोबास गुंफेमागां बैसौनि दुख करीताति : तेथ गोसावीं बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा रडत असा ?" "जी जी : देओ काइसेनहीं न पवीजे : तरि काइ करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : काइ रडिनलेयां परमेश्वरू होइल ? घेया पां एणें खडकेसीं कपाळ : जरि तो होए : तो जेयापरी होआवा तेयाचि परी होइल कीं गा[३] : *रडिजे ना कीं गा : धीरवीरां होआवें[४] :" भटीं म्हणीतलें : "जी जी : तें कवणी परी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : ऐसा असो कां गा : हिंसा : अन्यधर्म : विखो न सेवी : मग आनंदाचें सुख भोगित कीं जाइल :" भटीं : म्हणीतलें : "जी जी : इतुले दोष असति : मां कैसा पावैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : एकाचें केतुलें एक आनिष्ट उपसाहाति : एकातें केतुलेया एका अंतरायातें जनी : परि उद्धरे मा उद्धरेचि : आणि एथ जो ननुसरे तो कहींचि नुद्धरे मा नुद्धरेचि[५] :"* [सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : गावां खाती ए : तो कामठा घाली[६] : मग आवघे गावीचे खांडीं : सुरिया नीसवीति : कव्हणा एकाचीए संदीसवडी सुरी पडली असे : ते घेउनि ए : तो म्हणे : "हे सुरी लाउनि देया :" तो हातीं घे : ऐसी पाहे : ऐसी पाहे : मग म्हणे : "हे सुरी रायासि योग्य :" तो म्हणे : "हे आवघी खतेन खादली असे : आगीआंतु घालीजैल तरि जळौनि जाइल : इचे दाम च्यारि घेया : मां मीं इचे इळेखिळे करीन :" तो दाम च्यारि घेउनि जाए : तो ताट वेगळें करी : परजु वेगळा करी : ताट ताटांतु घाली : परजु परजांतु घाली[७] : तो विळवेन्हीं म्हणीयें करी : परि दृष्टि तीयेचिवरि असे : मग आगीआंतु घाली : तेणेंकरुनि एक खते झाडी : तावी : पीटी : उजरी : तेणेंकरुनि एक खते झाडी : खरसाहाणे लावी : तेणेंकरुनि एक खते झाडी : तेलसाहाणे लावी : तेणेंकरुनि एक खते झाडी : तुपसाहाणे लावी : तेणेंकरुनि एक खते झाडी : मग[८] आपुलीया परी एकु परजु वाए : मग ते सुरी रायासि भेटी करी : मग

---

**३९.** १ **यही.** परमेश्वरू. २ (**प्रव. आ.** २०९). ३ **हीने.** °ऐसें चर्चीजे : पूसीजे : मग अनुष्टीजे: तें होइल कीं :" ४ (**प्रव. आमा.** २२२). ५ (**प्रव. आ.** २०९). ६ **एवा.** गावीचे आवघे मिळौनि तेयाकरवि कामठा घालवीति. ७ **एवा.** °ऐसी वीतंडौनि सांडी. ८ **एवा.** मग तोचि

रावो तयासि दावो पसावो दे : मग तो रावो बैसला असे तेव्हळि पुढां ठेवी : चाले तेव्हळि हातीं धरी : जेवी तेव्हळि मांडीएवरि ठेवी : नीजे तेव्हळि आडवांगी[९] घाली : ऐसा तीएसि केव्हळांहीं विसंबे[१०] ना : तैसें वानरेया : परमेश्वरू जीवासि बोधदातुत्व देउनि च्यान्हीं ज्ञानें निर्वाळुनि प्राप्ती ईश्वरस्वरूपीं मेळवीति[११] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " सौंदणीआंतु वस्त्र चुरिजे : धुइजे : वोपविजे[१२] तेलखार दीजे : मग तांतु फुटे : डोळेयाचा मळू लागे ऐसें होय : मग जे बींबे दीजे तें ठाके[१३] : " ऐसें गोसावीं संबोखीलें : ॥]

तवं देमाइसीं म्हणीतलें : " हां जी : देओ तरि काइसेनहीं न पवीजे : तरि वायांचि कां चेंदा खावा? सुखें असावें कां नां आपुलेयां वापांभाउआंचां घरीं तुपभातु खाउनियां ?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : जोन्हळे नाहीं तरि काइ पेवीं अमेध्यु घालुं एइल ? अन्न नाहीं तरि काइ वीख खाओं एइल[१४] ?"॥

## ४० आउ जखीणित्व नीक्षेदु

या निरुपणावरि आउसीं म्हणीतलें : " जी जी स्वामी जगंनाथा : देओ जरि काइ-सेनहीं न पवीजे : तरि मातें चोहोटांची[१] जखीणि कीजो जी : मां[२] आखतकवडी[३] घेउनि असैन जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " देखिलें गा वानरेया : पोरी आउ चोहोटांची जखीणि होउनि : मग मेंढे बोकड खाओं पाहाति असे : " " हो कां जी स्वामी जगंनाथा : तरि नको जी : " ॥

## ४१ तथा कुंडलनि उकलली म्हणणें

एकु दीं नाथोबा गोसावीयांजवळि बैसले असति : आणि स्तीति जाली : आणि हाक दीधली : सर्वज्ञें म्हणीतलें : " हाक कां गा दीधली ? " " जी जी : कुंडलनि उकलली : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कुंडलनि उकले तरि काइ हाक[१] दीजे ?" आणि स्तीति भंगली : ॥

## ४२ तथा धोतर फाडौनि जाणें

एकु दीं नाथोबा गोसावीयांजवळी बैसले असति : आणि स्तीति जाली : धोत्र फाडिलें : गोसावीयांचे दोन्हीं श्रीचरण माथेयावरि ठेवीले : आणि म्हणीतलें : " जाइजतु असे

परजु वाए. ९ **एवा.** आड. **एवा.** आडासनीं. १० **एवा.** वीसरे. ११ (**दृपा.** ४०. 'सुरीएचा दृष्टांत'. 'भटांप्रति खडकुलीए' **—दृस्थ**). १२ **एवा.** वोपीजे. १३ (**दृपा.** १०९. 'उखारलेया वस्त्राचा दृष्टांत'. 'भटांप्रति खडकुलीए निरोपिला' **—दृस्थ**). १४ **बो.** °प्रमाणे च्यांरि. **हीपं.** °तन्हीं होत सातां हेंचि करीतां होइल कीं :

**४०.** १ **यमु.** हाटींची. २ **य.** आखतकवडीया घालीति. ३ **एवा.** आखतवेरि. **ही.** आखतवनि पाहुनि.

**४१.** १ **य.** बोंबलिजे.

गा श्रीचक्रधरा राया : " आणि धांव घेतली : आणि आउसेंहीं धांवीनलीं : " काइसेया रे बा नाथोबा जासी ? राहीं रे बा : डोइए धरीं[१] तरि सेंडी नाहीं : कासे[२] धरीं[१] तरि कुपीनु[३] नाहीं : राहीं रे बा नाथो : " म्हणौनि पैल ठाओवेन्हीं गेलीं : ते गेले आणि गंगेआंतु रीगाले : " या गा पोहों[४]: वांयां गेलेति गा " म्हणौनि बोबाति : नावेक होते : मग स्तीति भंगली : आले : मग धोत्र घेतलें : तवं आवघें चींधीया जालें असे : मग गेले : कांटा आणिला : मग सीउं बैसले : तवं दाइंबायें म्हणीतलें : " मघां फाळिलें[५] कां ? मां आतां सीवीतुसि[६] कां ? आतां कांटीया नेस : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तेव्हळि काइ हा होता ? " मग धोत्र सीविलें : मग पात्र घेतलें : पाणिभाताचेया मडकेयापासि बैसले : पाणिभाता पात्र भरिलें : जेउं गेले : तवं दाइंबायें म्हणीतलें : " तेधवा तरि ' या गा : या गा : वायां गेलेति गा : ' म्हणौनि बोबातु होतासि : आतां तरि उगाचि जेवीतुसि[६]: आतां कांहीं बोलावीसि नां : " ।।

## ४३ नाथोबा स्तितीअधीनत्व निषेधु*

[एकु दीं नाथोबा गोसावीयांजवळि बैसले असति : आणि स्तीति जाली : बाइसीं नाथोबातें म्हणीतलें : " नाथो : चुलीकडे पाहे : " आणि नाथोबाएं चुलिएं पाय सुदले : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : एणें चुलीएं पाय सुदले : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : वृत्तीअधीन न होआवें : स्तितीअधीन न होआवें : " आणि स्तीति भंगली : ।। ]

## ४४ कामाइ सोवासीनि म्हणणें

सीमुगेयाचां दीसीं गोसावी सीमुगा[१] खेळत असति : कामाइसें तीयें राणाइसांची[२] बहीणि : तीयें मैळकें ऐसें साउलें नेसलीं असति : मुडबाहीयांची चोळी : मैळका ऐसा तोंडु : आवेया ऐसी डोइ : तेयांवरि मळणें घातलें असे : वीरळ दांत वेखंडले : तांबोळ घेतलें असे : तें बाहीर निगत असे : ऐसीं गोसावीयांसरीसीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " इतुकेयांमध्यें सोवासिनि बाइ मिरवे गा : " ।।

## ४५ सारंगपंडितां कार्यनीक्षेदु

सारंगपंडित गांवां गेले होते : तैंचि गोसावीयांचिया दरीसना आले : दरीसन जालें : आणि तैसेचि नीगों बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : तुम्हीं जेया कार्या जाओं

---

**४२.** १ **गोने.** धरितीएं. २ **हीने.** कासोटां. **य.** कासोडां. ३ **ही.** कासोटा. ४ **गोने.** पव्हो. **य.** पव्हावेया. ५ **अ.** धांवीनलासि. ६ **गोने.** °तोसि.

**४३.** * (**प्रव. आ.** ५७).

**४४.** १ **ने.** सींपणें. २ **गो.** रामा°.

पाहात असा : परि तीयें माणिकें दुरि असति गा : " ऐसें सर्वज्ञें म्हणीतलें : मग ते काए गेले कीं नाहीं गेले तें नेणिजे : ।।

## ४६ आउसां आगाधत्व निरुपण

एकु दीं गोसावी आउसांसि कांहीं निरुपण करीत होते : त्यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " हें आगाधाचें आगाध : " यावरि गोसावीं खडेयाखूबटेयाचा द्रीष्टान्तु निरुपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु डोहाचीये थडिये बैसला असे : तेथ कव्हणी एकु वेडसु वेडसु ये : तो उदकाचें स्वच्छ निर्मळपण देखौनि आंतुल खडेखूबटे आसळग देखे : आंगीयेची बाहे वरौती सारुनि हातु घाली : हातें न पवे : मग पावो घाली : पायें न पवे : मग पडदनी घेउनि बुडी दे : तेणेंहीं न पवे : " मग थडीये बैसला असे तो म्हणे : " आगा : हे अक्षोभ्य उदक : तुं भलतेंहीं करि पां जरि पावसि : हें *आगाधाचें आगाध*[१] *:* " ।।

## ४७ खेइगोइत्यागुप्रसंसा

खेइगोइ *तीया वीधवा*[१] *:* तेयांतें द्रव्य अपार : पाउणा लक्षाची देपूजा[२] : वान्हीयारे[३] दाम आणिति : तेचि सांटवीति : आपार दुबतें[४] : मग गोसावीयांसि अनुसरलीं : कवाड अडकुनि आलीं : सुनीं रीगालीं : तेहीं तुपाचिया घागरी : दुधाचिया घागरी उलंडिलीया : तें दारेंहुनि तुप निगालें : तेयांचें वान्हीयारे[३] देसाउरिहुनि आले : मग तेयांचा भासा[५] सांघावेयालागि आला : " तुमचे वान्हीयारे आले असति : तुमचें आवघें वायां जात असे : आपुलें सांभाळा[६] : या[६] : " मग तेहीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : एथ कांहीं लागैल तरि आणुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ कांहीं न लगे : " मग खेमाइसीं म्हणीतलें : आपुलेया भासेयातें[७] : " तुम्हीं जाणा तें करा : " *सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु मळत्यागीया : एकु अनिष्टत्यागिया : एकु स्वतेव जाए तेव्हळीं सांडी*[८] *:* " मग काइसेया एकावरि[९] सर्वज्ञें म्हणीतलें[१०] : " त्यागु[९] जैसा खेइगोइचा : "।।

## ४८ भटां पोळीयाभोजनीं संतोखू

एकु दीं[१] भटोबासांतें तुप : पोळीया आणि चणेयांचि[२] दाळि ऐसें जेवावेयाचा मनोर्थु जाला : बाइसें कणिक तीमितें होतीं : गोसावीयांचिये आरोगणेलागि : सर्वज्ञें

---

**४६.** १ (**दृपा.** १५. ह्याच दृष्टांत पूर्वार्ध ४७१ मध्ये आला आहे.)

**४७.** १ (**हीबी.**). २ **हीमुबी.** देवपुजा. ३ **मुने.** वानिहारें. **गो.** वानिएरें वेव्हारे. **हीबी.** पांतिकर. ४ **यगोमुने.** दुभतें. ५ **एवा.** मामा. **हीबी.** प्रोहीतु. ६ **एवा.** सांभाळावें. ७ **य.** भाउवातें. ८ (**पं. प्रव. आ.** २४९). ९ **हीबी.** प्रस्तावेया उपरि. १० **यमु.** कोन्ही सप्तांग राज्य सांडी : यका दुधिकरटें न संडे : त्यागु जैसा——.

**४८.** १ (**यगोने.**). २ **ने.** चणेयांचिए डाळिचें वरण.

म्हणीतलें : " बाइ : आणिक कणीक असे ? " वाइसीं म्हणीतलें : " हो वावा असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि आणिक तीमां : " " हो कां बाबा : " बाइसीं पोळीया केलीया : गोसावीं चणेयांचीये दाळिचें वरण करवीलें[३] : मग गोसावीयांसि दुपाहाराचा पुजावस्वरु जाला : गोसावीयांसि ताट जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जेवा : या गा : " " नां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " या : येथौनि म्हणीजताए : " " हो कां जी : " मग बाइसांकरवि गोसावीं वाढवीलें : पोळीया : चणेयांचीये दाळिचें वरण : तुप : ऐसें तृप्तपरीयंत जेविले[४] : मग भटोबास मागां अखंड आठवीति : ।।

## ४९ लखुबाइसां प्रश्नें देओ उदेवो म्हणणें[१]

एकु दीं लखुबाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी[२] : यें बाइसें अखंड तम तम करितेंचि असति : हें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : स्वभावासि काइ नासु असे ? " " हें काइ जी : गोसावीयांचेनि कैसा नाहीं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " देओ असे तो उदेओ[३] कीजे[४] : " ।।

## ५० आउसां स्वानहननीं सीक्षापण

आधिलें दीसीं भटोबासांची झोळी सुनेनि नेली होती : एरी दीसीं माघौतें आलें : तीए दीसीं आउसांची पाळी : बीढार राखावेयाची : आलें : आणि आउसीं दगडें हाणीतलें : आणि तें केंकाइलें : आणि गोसावीं श्रीमुगुटु धरिला : आणि म्हणीतलें : " नाएका : हें सुनें कां हाणीतलें ? " " जी जी : स्वामी जगंनाथा : कालि नागदेयाची झोळी नेली : आजि माघौतें आलें : पडकैलें[१] म्हणौनि हाणीतलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एयाची काए कव्हणी माएबहीणि असे मां ते रांधौनि ठेवील ? मां तेथ जाउनि हें खाइल ? आपुलें राखिजे : परि हाणिजे नां कीं : " " जी जी : स्वामी जगंनाथा: सुनें हाणितलेयां आपण स्रीमुगुटु धरिला : तरि आपण काइ व्यापकां[२] होइजैल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " होइजैल मां काइ नाएका : " " तरि नेणेंचि स्वामी जगंनाथा : " ।।

## ५१ आउ वींगुळीवधीं सीक्षापण

एकु दीं वींगुळि गुंफेसि नीगाली : ते आउसीं मारिली : नांगीए धरूनि बाहीरि टाकावेया नीगालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : हे वींगुळि कां मारिली ? " " जी जी :

---

३ **यने.** रांधवीलें. ४ **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : आणीक वाढा ; " " ना जी ; मज तृप्त जालें : " सर्वज्ञें म्हणीतलें " तृप्त होए : परि वासनानीवृति नव्हे कीं गा : " " ना जी : जाली : "

**४९.** १ **गोने.** करणें. २ **य.** °गोसावियांचा व्यापारीं असतां : बाइसांचें तम आझुइं न वचे ? ३ **हीबी.** अदेवो. ४ **गोने.** कीजो.

**५०.** १ (**हीबी.**). २ **गोने.** सर्वव्यापकां.

स्वामी जगंनाथा : एकाधेया[१] प्राणियातें खाती : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मां : हा प्राणिया नव्हे ? तुम्हीं माहात्मे कीं : तुम्हीं[२] सर्व भुतां अभय देयावें कीं : " ।।

## ५२ भवीक्ष नगर कथन

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पूजावसर जालेयानंतरें गोसावीं वीहरणा[१] तेया ढगाकडे बीजें केलें : तेथ गोसावी उभे राहिले : पसीमे अवळोकिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "काळेंकरुनि एथ नगर वस्तें होइल[२] : परि वसे ना : " तैसेंचि जालें : ।।

## ५३ भटां विषयव्यवहार निरुपण*

[खडकुलीए[१] अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : एथिचे बोधवंत विषयवेव्हारा-पासौनि कां नुजडेति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " ईश्वरीं जीवु निल्लळ होति : जैसें तैसें विषयवेव्हारीं निल्लळ नव्हेति : जीवु दृष्टार्थीया म्हणौनि : " " हो कां जी : "

भटीं पुसिलें : " जी जी : अनुसरला पुरुष काइसेनि धर्मापासौनि जाए तें बलवत्तर सांगावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : पुरुषु सवेतव जाए : म्हणौनि एकला विजया : " " हो कां जी : " भटीं म्हणीतलें : " महात्मेनि निरालंबी काळ कैसेया परी क्षेपावा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " नित्याटन करावें : ग्रामे एकरात्र : नगरे पंचरात्र : " भटीं म्हणीतलें : " जी जी : एक रात्र पात्रांत सरे तो ग्राम : पंचरात्र पात्रांत सरे तें नगर : ऐसें होए ? " गोसावीं मानिलें : ।। ]

## ५४ तथा अटण निरूपण*

[गोसावीयांसि[१] खडकुलीए अवस्थान : एक वेळ भटीं पुसिलें : " जी जी : आटन करितां पुरुषें गावासमीप केव्हेळीं मोहरावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " दी मीळणीं गांवाचां कडिसरां टेकावें : " " हो कां जी : "।। ]

## ५५ ज्ञातविरक्तभेद कथन*

[गोसावीयांसि[१] खडकुलीए अवस्थान : भटीं पुसीलें : " जी जी : ज्ञातविरक्त कैसेनि ओळखावा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एकु शास्त्र जाणौनि बोले : एकु नेणौनि बोले : " ।। ]

**५१.** १ **गोने.** °एका. २ **यगो.** तुम्ही सर्व भूतीं दया मानिजे कीं. **रामे.** तुमतें सर्व भूतीं देवो कीं.

**५२.** १ **ने.** उपाहारा. २ **हीबी.** °मग तैसेंचि जाइल : जैसें गंधर्वनगर : " ।।

**५३.** *(**प्रव. आमा.** १२९–१३३).
१ कानडी लुखाइसें°.

**५४.** *(**प्रव. आमा.** २३८).
१ गोपाळबा°.

**५५.** *(**प्रव. आमा.** ११८).
१ नागनाथबा°.

## ५६ खरूज खाजवी ना तो विरक्त*

[खडकुलीए अवस्थान : दायंवासी खरूज जाली होती : ते बहुत खाजवीत होते : तें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : खरूज खाजवावी नाहीं : खरूज खाजवी ना तो विरक्त : " मग दायंवाएं म्हणीतलें : " जी जी : हे खरूज न खाजवी ऐसा कव्हणी देखों ना : पारासरें खाजवीली : विश्वामित्रें खाजवीली : ते तपापासौनि गेले : मां आमचा कवण पाड ? " ऐसें म्हणौनि मागुते खाजउं लागले : मग गोसावीं इखीत हास्य केलें : ।।]

## ५७ स्मशानवस्त्र अनुवादु*

[गोसावीयांसि खडकुलीये अवस्थान : एक वेळ नाथोबासीं पुसीलें : " जी जी : स्मसानीचें वस्त्र महात्मेयांसि घेवों ए ? " गोसावीं मानिलें : यावरि नाथोबायें म्हणीतलें : " जी जी : तरि आजिलागौनि ऐसेंचि करूं : आणि काइ : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " मसनीचें वस्त्र घेपे : परि पोरे हो : ऐसें नव्हे कीं तेयाचीचि वाट पाहाल : जें कव्हणी एकु मरो कां : तरि कव्हणा एकातें हात च्यारि सुडा मागीजे : मग तयाची झोळी : उदकशोधनें : कौपीन : जें आपणेयां लागे ते कीजे : " " हो कां जी : "

यावरि भटीं विनवीलें : " जी जी : मज नसुधी वोढकौपीन न साहे : तरि म्यां काइ करावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तरि हात दोनि सुडा वेढीजे : दों माजि झोळी : कौपीन : सोधनें : सुडा कीजे : आणीक दोनि हात आपजवीजे : तो पांगुरीजे : " भटीं म्हणीतलें : " जी जी : तरि आंथुरणाचें कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जेंचि आंथरूण तेंचि पांगरूण : " " हो कां जी : " ।।]

## ५८ आचार्या नरक अनुवादु*

[गोसावीयांसि[1] खडकुलीए अवस्थान : एक वेळ गोसावीयांचिया दर्शना नृसींहारण्ये संन्यासी आले होते : गोसावीयांजवळि भट होते : तेहीं म्हणीतलें : " जी जी : पुर्वी क्षेपणीकीं वेद उत्थापिले होते : ते भटाचार्यें प्रतीष्टिले : आणि आठरा क्षेपणीक कढैमाजि घातले : तैपासौनि वेदमार्गु चालता जाला : ऐसे ते पुण्यपावन आचार्ये : " म्हणौनि तोखुं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " आचार्या नरक : " तेहीं म्हणीतलें :

५६. *(प्रव. आ. २६६).

५७. *(प्रव. आ. ११६–११८).

५८. *(प्रव. वि. १५७).

१ कमळाइसें°.

" जी जी : ते कां ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हिंसा पाप : पापातव नरक : म्हणौनि : " इतुलेनि ते उगेचि राहिले : ।। ]

## ५९ संदेहत्रुटि अनुवादु*

[ खडकुलीए[1] अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : अनुसरलेनि पुरुषें प्रमादियासि संदेह पुसावा कीं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " सामान्यस्त्रीसदनस्थितापासौनि संदेहत्रुटि करूं ये : मां एरापासौनि हें काइ म्हणावें असे ? एकु वैराग्यें उकिरडां लोळे : उष्टा-वळीयेचीं सीतें वेची : परि पडिलीये म्हैसी प्रमाण नेणे : एकु हस्तीचां गजस्कंधीं जाए : कनकदंडीं विजयमान : परि परधर्मु तो तेयातेंचि पुसावा कीं : " ।। ]

## ६० नामाचे दाहा ठाए : तथा पंचकृष्ण निरूपण*

[ खडकुलीए अवस्थान : एक वेळे सारस्वत काळीं गोसावीयांतें भटीं विनवीलें : " जी जी : चिंतनविधी निरूपिजो जी : मां मीं गोसावीयांतें चिंतीन : मातें पुजावेया भजावेया काहीं नाहीं : मियां परमेश्वरू काइसेनि पुजावा : भजावा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : देव तो आंतरगाम्ये : तो काइसेनि पुजावा भजावा न लगे : तो स्मरणें : चिंतनें : आठवणें : मननें : कीर्त्तनें पुज्य : भज्य कीं गा : परमेश्वरू प्रत्येहीं आठवावा : " भटीं म्हणीतलें : " जी जी : कवणी परी परमेश्वरातें आठवावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एथीचें नाम आठवावें : पांचा गुणनामीं त्रीकाळ स्मरण कीजे : पांचवें तें नीरंतर स्मरिजे : तेणें दाहा ठाए होति : " मग गोसावीं ते दाहा ठाए निरोपीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : नामें वेध : १ : नामें बोध : २ : नामें अनुसरण : ३ : नामें स्मरण : ४ : नाम सकळही निरोध परिहारी : ५ : नाम वाजत वारा धरी : ६ : नाम पडतें आकाश धरी : ७ : नाम एतें विघ्न सारी : ८ : नाम साह्यातें करी : ९ : नाम प्राप्तीतें करी : १० : " ।।

मग भटीं पुसिलें : " जी जी : पांच नामें तिएं कवणें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तिएं ऐसीं गा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " द्वापरीं श्रीकृष्णचक्रवर्ती गोसावियांचे चरण शरण : १ : सैहाद्रीं श्रीदत्तात्रेयप्रभु गोसावीयांचे चरण शरण : २ : द्वारावतीए श्रीचांगदेवोराउळ गोसावीयांचे चरण शरण : ३ : ऋद्धिपुरीं श्रीगुंडमराउळ गोसावीयांचे चरण शरण : ४ : प्रतिष्ठानीं श्रीचांगदेवोराउळ[1] गोसावीयांचे चरण शरण : ५ : ।। यापरी परमेश्वरातें कव्हणी वेळे विसरावें नाहीं : तुम्हां शयनासनीं भोजनीं परमेश्वरू होआवा कीं गा :

---

**५९.** ***(प्रव. वि. १४६).**
१ आम्नाए पाठ°.

**६०.** *(**प्रव.** नामाचे दाहा ठाए : तथा पंचकृष्ण निरूपण. प्रकरणवशाचा शेवटचा भाग).
१ **एवा.** श्रीचक्रधर°.

कव्हणी ठाइं काहीं आश्चर्य देखिजे : आइकिजे : परि पाहावेया आव्हाटिजे ना : ऐसांहीं विघ्न आलेयां एथीचें नाम आठवावें : " " हो कां जी : " ऐसा गोसावीं पंचकृष्ण निरूपिला : ।।]

## ६१ भट रीधपुरा पाठवणें

*भटांसि गोसावियांची थोरी आवडि जाली : घडीभरि सांडुं न सकति*[१] *:* एकु दीं गोसावीयांसि बाहीरीली पटिसाळेवरि[२] आसन असे : भटोबास म्हणीयां[३] जात होते : आणि *एकसरें गोसावी उदास जाले*[४] : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं एथौनि जा गा : " भटोबास ऐसेचि राहीले : दुख करुनि म्हणीतलें : " जी जी : कें जावों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तें एथौनि केवि जाणिजे ? एथौनि[५] तवं जा पां : " भटोबास दुख करूं लागले : मग बाइसीं म्हणीतलें : " हां बावा : बापुडा नागदेवो कैसें दुख करीतु असे : तरि कां पाठवीत असीजे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा एथीचेन पाठवीला न वचे तरि यातें नेणों कोण येक तीए एकी ठांइं नेउनि घालील जैसी एथची सुधिही न लभे : " भट भीआले : मग वीचारूं लागले : " घर तरि अवीद्या : दादोस तरि अनिष्ट : तरि गोसावीं श्रीप्रभूचा अवतारू सांघीतला असे तेथ जाओं : " मग भटीं म्हणीतलें : " जी जी : तरि मी परमेश्वरपुरा[६] जाइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होए : वेव्हारीची बुधि परमार्थी उपयोगा जाये : " इतुकेन गोसावीयांचें उदास्य परीहरलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आतांचें तवं जा : मग मासा एका या[७] : " ।।

[भटीं म्हणीतलें : " जी जी : श्रीप्रभूचीया दर्शना जाइजताए : तरि तेथ कवण-कवणातें वंदावें तथा वानावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जेथ जाइजे तेयांतेंचि वंदिजे : जेयातेंचि वंदिजे तेयांतेंचि वानिजे : " " हो कां जी[८] : " भटीं म्हणीतलें : " जी जी : दृष्टालागि परमेश्वरातें वंदिजे वानिजे : तेणें काइ अदृष्ट साधे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " दृष्टें अदृष्ट न साधे : दृष्टें दृष्टचि साधे : जैसा भाव तैसा देव : " " हो कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एथीचें नामस्मरण कीजे : आणि श्रीप्रभूचीया केळी लीळा पाहावीया : " यावरि भटीं पुसिलें : " जी जी : कवणें नामें स्मरावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीचांगदेओराउळ गोसावीयांचे चरण शरण : " ऐसें विहिलें[९] : ।।]

मग भटीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग परमेश्वरपुरासि गेले : ।।

---

**६१. १ (यमु.) हीबी.** भट आपुलेया सेवादास्यासि तोखति : जें आवघें चळीत गोसावीयांचें मज लागलें म्हणा. ऐसें आंतरासि आलें. जैसें उद्धवदेवासि : मग एकु दी—. २ **गो.** वोटेयावरि. ३ **य.** मातीकाम करीत होते. ४ **(यमु.)**. ५ **यमु.** आवडे तेथ जा. ६ **यमु.** रीद्धपुरा. ७ **सोध.** °नीगतां समै सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरपुरीं असावें : द्रीष्टीचेनि मानें श्रीप्रभूचीया केळी क्रीडा पाहावीया : तीसरेया पाहारीं भीक्षा करावी : बारवे भोजन करावें : केशवीं नीद्रा करावी : एथचें नाम आठवावें : " ८ **(प्रव. आमा.** १९४, १९५). ९ **(प्रव.** शेवटचा परिच्छेद).

## ६२ भटां बोलाउं पाठवणें

भट परमेश्वरपुरीं असति : श्रीप्रभूचीया लीळा पाहाति : भीक्षा करीति : केसवविहीरि जेवीति : *कां*[१] वारवे जेवीति : केसवीं नीद्रा करीति : मग परमेश्वरपुरुनि गोसावीयांचेया दरीसनां भगतजनें आलीं : तेयांतें गोसावीं श्रीप्रभूतें पुसिलें : "श्रीप्रभु नीकेन राज्य करीति ?" "जी जी : नीकेन राज्य करीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ नागदेओ नांव ब्राम्हणु असे ?" "जी जी : असे :" "कैसिया परी असे ?" "जी : ऐसे आंगुळीं दी लेखीतु असे :" मग आणीकें भगतजनें गोसावीयांपासौनि परमेश्वरपुरासि गेलीं : तेयां हातीं गोसावीं सांघौनि पाठवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ नागदेओ नावं ब्राम्हणु असे : तेयापुढें ऐसें सांघावें : 'एथौनि बोलावीलेयांवांचौनि नैयावें :'" तीयें परमेश्वरपुरा गेलीं : भटोबासातें म्हणीतलें : "भटो : तुमतें गोसावीं ऐसें म्हणीतलें : 'एथचेया बोलावीलेयांवांचौनि नैयावें :'" आणि भटोबासांसि दुख जालें : "मजवीण गोसावीयांचें काइ न सरे ? मातें गोसावी काइसेया बोलाउं पाठवीती ?" मग भटोबास[२] अंन न खाति : देह थोर तुटलें : मग आणिकें भगतजनें परमेश्वरपुरुनि आमचेयां गोसावीयांपासि आलीं : तेयांतें श्रीप्रभूखेमवार्ता पुसिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीप्रभू नीकेनि राज्य करीत असति ?" "जी जी : नीकेनि राज्य करीत असति :" मग म्हणीतलें : "तेथ नागदेओ नावं ब्राम्हणु असे कीं ?" "जी जी : असे :" "कैसेया परी असे ?" "काइसी परि जी ? आजिचें पाहेचें बोलणें :" मग आणिकें भगतजनें गेलीं : तेयांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ नागदेओ नांव ब्राम्हणु असे : तेयांतें ऐसें म्हणावें : 'एथौनि तुम्हां बोलावीलें असे : हें तुम्हां उतावेळ जालें असे : वस्तीचेयां नीगावें : *प्रतिस्थानासि यावें : हा निरोपु आधीं सांघावा : मग श्रीप्रभूचें दर्शन घेयावें*[३] :'" मग तीयें परमेश्वरपुरा गेलीं : मग भटोबासांतें म्हणीतलें : "भटो : तुम्हां गोसावीं नीरोपु पाठवीला असे :" आणि[३] भटोबास धांकीनले : 'काइ गोसावी मातें एथौनिहीं पाठविति ?' "काइ निरोपु पाठवीला ?" "तुमतें गोसावीं बोलाउं पाठवीलें असे : गोसावी म्हणति : 'हें तुम्हां उतावेळ जालें असे : तुम्हीं वस्तीचेयां नीगावें : *प्रतिस्थानासि यावें :'" आणि भट हरिखैले*[३] : तैसेचि भटोबासीं श्रीप्रभुगोसावीयांसि दंडवतें घातलीं[४] : *श्रीचरणां लागले*[५] : "*जी जी : मातें गोसावीं बोलाउं पाठवीलें : तरि जावों ?" "आवो मेला जाये जाये म्हणें :" मग दंडवत करुनि नीगालें : बेलौरां वस्ति जाली : मार्गीं भीक्षा मागति : ते उभेयांचि खाति : नीद्रा ये तरि पारंबी धरुनि उभेयाचि नीद्रा भांजीति : ऐसे राहाटगांवासि आले : तवं गोसावीयांसि गणपति मठीं अवस्थान*[६] : ॥

---

**६२.** १ (**मु.**). २ **यमु.** भटोबासां अंन न खवे. ३ (**यमुने.**). ४ **अगोयमुने.** °आणि नीगाले. ५ (**यही.**). ६ (**हीबी.**).

## ६३ सवितां नागनाथीं वस्ति ।।

## ६४ पिंपळवाडिये अग्निष्टिके वस्ति ।।

## ६५ प्रतिष्टानीं गणपति मठीं अवस्थान : चासीं भटां भेटि

गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरू जालेयानंतरें गोसावीं चासाकडे वीहरणा बीजें केलें : चासीं आसन जालें : भटोबास राहाटगांवींचीया वाटा आले : गोसावीयांतें देखिलें : आणि गोसावीयांकडे आले : गोसावीं साउमेयां[1] बीजें केलें : भटोबासीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : आणि दुख करूं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " उगे असा गा वानरेया : एथ खेव देया : हें तुम्हां उतावीळ जालें : " मग उठिले : गोसावीयांसि खेमाळींगन दीधलें : गोसावीयांसि आसन जालें : पुढां भटोबास बैसले : लेंकरूं फुंजे ऐसें फुंजों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " उगे असा गा वानरेया : दुख न करा : आतां एथौनि तुमतें केव्हांहीं न पठवीजे हो : " म्हणौनि पाठीवरि श्रीकरू घातला : ।।

[ सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : कव्हणी एकु राओ असे : तो राज्यभ्रष्ट होए : तयाचा पाइकु परिवारू : कव्हणी कव्हणातें वोळगे : कव्हणी कव्हणातें वोळगे : सींदे राणे ते सींहासनावांचौनि कव्हणातें वोळगति ना : कव्हणातें जयजय[2] सब्दीं बोलावीति ना : कव्हणाचें दीधलें नेघति : कव्हणाचेया हातातळीं हातु नोडवीति : एकी परिचें उद्यमु मात्र करुनि आपुलेया कुटुंबाचा निर्वाहो करुनि असति : मग तो राओ मागुता आपुलां राजीं बैसे : तयाचा पाइकु परिवारू मागुता तयापासि आला : एकु दीसु तो सींहासनीं बैसला होता : तेणें ऐसें पाहीलें : ऐसें पाहीलें : " मग म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं आवघेचि आलेति : आमचे सींदे राणे ते देखीजति ना : ते कें असति ? " मग ते सांगति : " ते कव्हणातें ओळगति ना : कव्हणातें जयजय[2] सब्दीं बोलावीति ना : कव्हणाचेया हातातळीं हातु वोडवीति ना : एकी परिचें उद्यम मात्र करूनि आपुलेया कुटुंबाचा निर्वाहो करूनि असति : " मग तो रावो दांडी डोळिकार पाठउनि तयातें आणुं धाडी : आपण सर्वदळेंसीं साउमा जाए : तयातें गाजतवाजत घेउनि ये : मग अर्ध राज्य देउनि आपणयां समान करी[3] : " ।।

६५. १ अ. साउमें. ने. सामोरें. २ **एवा.** जयजयीं. ३ (**दृपा.** ७२. सींदे राणेयाचा दृष्टांत. 'हा दृष्टांतु गोसावीं भटाप्रति ऋद्धपुरीहुनि आलेयां । एके वेळीं एळापुरीं विष्णुभटांप्रति नीरोपीला :' **—वृस्थ** : 'हा दृष्टांत भटाप्रति प्रतिष्ठानीं चासीं ऋद्धिपुरीहुनि आलेयां : । **एवा.** एळापुरीं विष्णु भटाप्रति '**—श्रीमुख दृष्टांत प्रकरण ७२**).

सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : कव्हणी एकि दुहुवा असे : ते वाडिचां वाडीं कडवली असे : गांविचां गावीं तीएचे सदर्थ बापभाउ असति : ते नेओं एति : पर ते न वचे : ते म्हणे : " तुमचीं पाटाउवें सुताउवें नेसतां मज असलाग्यता : " ऐसें म्हणौनि राहे : मग केतुलेया एका दीसां तेणें मळीण : रोडकी : दुखीस्त देखीली : मग अनुकुंपा उपनली : संबंधु दीधला : गर्भसंभुति जाली : पुतू जाला : मग ते तयाचेया आवघेयाची गोसावीणि जाली[४] : " ॥ ]

## ६६ भट श्रांत विसांवा*

[ सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वानरेश श्रमले असति : यांसि पाणी ठेवा : " बाइसीं म्हणीतलें : " हो बाबा : " मग गोसावीयांसि मर्दना मादणें जालें : भटांसि आंग धों घातलें : भटांचा श्रमु जायेतवं गोसावी प्रतेस्थानीं राहिले : मग गोसावीं अनुक्रमें जोगेस्वरीसी बीजें केलें : ॥ ]

## ६७ जोगेस्वरीं अवस्थान

मग गोसावीयांसि जोगेस्वरीये अवस्थान जालें : उतरदक्षीण पटिसाळ : उतरीले सेवटीं दुसरीया खणाची उतरामुख गुंफा केली होती : पुढील खणु : तेया खणांचें आंगण : दक्षीणिली भींतीसीं : मध्यें पूर्वपसीम ओटा : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : ॥

## ६८ भट पुर्वपटिप्रसंसा

गोसावीं भटोबासांतें प्रतिष्ठानां[१] वस्त्रें घेओं पाठवीलें : गोसावीं आंगी टोपरें[२] उपाहानौ देओं आदरीलें : भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : गोसावीयांचें कैसें नेसावें[३] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया : वेव्हारु तो वेव्हारेंचि सीधी जाए कीं गा :" मग गोसावीयांची आंगी टोपरें घेतलें : उपाहानौ घेतलीया : मग गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग ते तीन्हीं ठाए काखे सुनि गांवांचां आखरुवरि गेले : मग तेथ आंगी टोपरें लेइले : पाइं उपाहानौ घातलीया : मग हाटामध्यें गेले : पहीलें जे पासवडी घेत होते ते नावेक घनवील्हन[४] होती : तैं सीआळे दीस : भटोबासांतें घन[५] घेयावेयाची वासना :

---

४ (**दृपा.** ८४. दुर्भगेचा दृष्टांत. 'हा दृष्टांतु गोसावीं भटाप्रति प्रतिष्टानीं चासीं भेटिप्रसंगीं निरोपिला: एक म्हणति माहादाइसांप्रति बेलोपुरी पहीलीए भेटी निरोपिला : ' **–श्रीमुख दृष्टांत प्रकरण ८४**).

६६. *ही लीळा येथे **ही.** प्रतीतून घेतली आहे. **बी.** प्रतीतील 'भटांची शिक्षे : पंडितांची ब्राम्हणी' **हिराइसें.** यांच्या प्रतीतही ही लीळा येथे आहे.

६८. १ **मु.** निधिवासेया. २ **गोने.** °फुटा बाहीरवासू. **होबी.** °बाहीरवासू. ३ **मु.** ल्यावें. **य.** घयावें. **होबीगो.** " जी जी : मीं गोसावीयांचें पांगुरें ना : " ४ **यमु.** घनायाची. ५ **यमु.** घनवील्हन.

मग आणिक सघन पासवडी घेतली : मग गांवांबाहीरि आले : ते तीन्हीं ठाए काखे सुदले : मग गोसावीयांचेया गांवां जोगेस्वरीसि[६] आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांजवळि बैसले[७]: गोसावीयांचां श्रीकरीं पासवडी ओळगवीली : गोसावी अवळोकिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आधीं पासवडी घेत होतासि तेचि कां नेघसीचि ? " " जी जी : ते नावेक पातळ देखिली : म्हणौनि नेघेंचि : " सर्वज्ञें म्हणीतलें[८] : " ते नीकी होती : ते घनवील्हन : हे पाखाळीं नुतरे : " आउसीं म्हणीतलें : " जी जी स्वामी जगंनाथा : आपण दुरील देखीजताए : दुरील आइकीजताए : तरि काइ स्वामी जगंनाथा : आपण सर्वज्ञ होइजैल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " होइजैल मां काइ नाएका : " ।।

## ६९ भट राक्षसभुवनां पाठवणें

गोसावीं भटोवासातें राक्षसभुवनां काइसेया म्हणीयां पाठवीलें तें नेणिजे : ते म्हणीयें करुनि पंचाळेस्वरावरुनि आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा पंचाळेस्वरावरुनि आलासि ? " " जी जी : " " पंचाळेस्वरासि गेला होतासि ? " " नाहीं जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें होतें तेथ जाइजे[१] : एथिचेया संबंधा गेले तेतुले ओटेगोटे आदिकरुनि तुम्हां नमस्करणीए कीं गा : "।।

## ७० एकाइ भगत[१] परीहासु

गोसावीयांसि वाहीरिलेया पाटसरेयावरि[२] आसन असे : *भटमुक्षकरुनि आवघीं भक्तिजनें इटा वाहातें असति*[३] : गोसावीयांजवळि एकाइसें : देमाइसें असति : गोसावीं देमाइसातें म्हणीतलें : " देमती : हें राओ[४] होइल : तरि तुम्हीं काए होआल ?" देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : मी उचीताचा पाइकु होइन : " एकाइसातें म्हणीतलें : " वाइ : हें देओ होइल : तरि तुम्हीं काइ होआल ? " " जी जी : मीं भगतु होइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि वानरेस ऐसीया इटा माती वाहावीती : " तवं एकाइसीं म्हणीतलें : " जी जी : तरि मीं सेजां गांवीं असैन : " मग गोसावी उगेचि होते : तवं भटोवास आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : सांपें भगतु एकु आला असे गा : " " जी जी : तो कैसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि देमतीतें ऐसें म्हणीतलें : ' देमती

---

६ **ने.** खडकलिएसि. ७ **हीयोने.** °गोसावीयांपुढें वस्त्रें ठेविलीं . . . . . . मग भटोवासीं सांघितलें: " जी जी : पहिलें वस्त्र घेत होतां जें घनपातळ : बरवे नव्हे. सर्वज्ञें म्हणीतलें . . . . . " हा वृत्तांत पुढे आउसाने केलेल्या प्रश्नाविरुद्ध आहे. म्हणून अस्वीकार्य. ८ **हीबीगो.** तीयेंचि बरवीं होती : धुनयासि बरवीं नीगतीं.

**६९.** १ **अ.** °आणि तेचि वासना लळिताइसांची : ओटेयागोटेयांचें प्रमाण यावरि.

**७०.** १ **हीबीमुने.** भक्ति. २ **ही.** पटसाळे. **गो.** ओटेयावरि. ३ **(यमु.)**. ४ **यमु.** देओ.

हें राओ[४] होइल : तरि तुम्हीं काए होआल?' यें म्हणति : 'मीं उचिताचा पाइकु होइन :' यांतें म्हणीतलें : 'बाइ : हें देओ होइल : तरि तुम्हीं काइ होआल ?' यें म्हणति : 'मीं भगतु होइन :' मग एथौनि ऐसें म्हणीतलें : 'तरि वानरेस ऐसीया इटा माती वाहावीती :' तवं इयें म्हणति : 'आम्हीं सेजां गांवीं असौनि :' " मग भटोबासीं म्हणीतलें : " तरि काइ जी : यांची भगती ते सेजांचि गांवींहुनि कीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : भगतु आणि सेजां गांवीं ? परमेश्वरू भक्ताचा आत्मा : कुडीसि आत्मेयांवीण असणें नाहीं : तैसें भक्तासि परमेश्वरेंवीण असणें[५] नाहीं : भक्त आणि सेजां गांवीं असे ? "।।

## ७१ इंद्रोउपाहारीं तीवाडिभार्ये फळदान देणें

इंद्रोबायें सांगवखेडां तीवाडीचां[१] घरीं उपाहारु निफजवीला : तेयाचीए ब्राम्हणीचीए डोइएवरि पांटी ठेविली : तीयें पूढें आलीं : तवं दारवठेयापासि गोसावी लघुपरीहारा[२] जात भेटले : " वावा : नावेकु पांटीए हातु लावा हो :" गोसावीं श्रीकरु लाविला : पांटी उतरिली : मग तेहीं पुसिलें : " चांगदेओराउळा कैसा अवसरु असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां ऐसेचि गेले : आतां ऐसेचि येती :" तैसेंचि गोसावीं लघुपरीहारा बीजें केलें : लघुपरीहारु सारुनि गुंफे बीजें केलें : तवं मागिलाकडौनि तीवाडी आणि इंद्रभट आले : ते तीयांचीये डोइए मागुती पांटी ठेविली : मग आले : इंद्रभटीं तीवाडीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : तीयें उगींचि : तीवाडीं म्हणीतलें : " गोसावीयांसि दंडवतें घालि :" "*काणे गोसावी ?*" "*नां हें :*" *तीहीं म्हणीतलें*[३] : " काइ मघां मीयां यांकरवि पांटीए हातु लाववीला ?" " पापीणीं पापीणीं : गोसावीयांकरवि कैसा हातु लाववीला ? घालि घालि दंडवत :" मग तीहीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांसि आरोगणा जाली : वाइसीं प्रसादु अवघेयां दीधला : तयांहीं देओं गेलीं : तवं तीयें म्हणति : " मज परपुरुखाचें उसीटें घेणें नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ राहा :" गोसावीयांसि कोणें नेणों केळें दरीसनां केलीं होतीं : मग ते फणीं गोसावीं आपुलेनि श्रीकरें दीधलीं : तेही नेघतें होतीं : मग तीवाडीं इंद्रभटीं म्हणीतलें : " घेया : गोसावी प्रसादु देताति :" मग घेतलीं : ।।

## ७२ मातांगमोदकप्रसाददान

मातांग तीघ जोगेस्वरी आले : दारवठां उभे राहिले : दोघीं[१] कळसां जोहारु केला : मग तीं म्हणीतलें : " चाल गा जाओं :" " नां गा : मीं हें देवत पाहीलेयांवीण नैयें :"

---

५ **एवा.** उरणें.

७१. १ **यमु.** एल्हंभटाचां. २ **यमुहीने.** °परिश्रया. ३ (**यमु.**).

७२. १ **अ.** दोहीं.

मग ते नीगाले : तो राहिला : आउसें वाहीरि निगालीं : मग तेणें आउसांतें म्हणीतलें : " आइ : गोसावीयांपुढें ऐसें सांघा : वाहीरीलु पाइकु आला असे : तो ऐसें म्हणतु असें : ' हें देवत पाहीलेयांवांचौनि न[२] वचें[२] : ' *आउसें गेलीं : जी जी स्वामी जगंनाथा : वाहीरीलु पाइकु आला असे : तो ऐसें म्हणत असे : ' हें देवत पाहलेयावांचौनि न वचे[३] : '* " गोसावीं बाइसांतें लाडु मागीतला : सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : लाडु तेयासि देया : ऐसें म्हणां : ' एथौनि पाठवीला[४] असे : ' " आउसें आलीं : तवं तो उभा असे : तेयासि लाडु दीधला : " जाए रे : चक्रस्वामीं तुज पाठवणीं दीधली : " तेणें म्हणीतलें : " नां आइ : हें देवत पाहीलेयांवीण जाणें नाहीं : " तो तेयाचा सबदु आइकतीचि नां : मागुतीं आलीं : तवं तो उभाचि असे : " हां रे : तुं जासि नां कां रे ? तुज चक्रस्वामीं पाठवणी दीधली : " " नां आइ : मज हें देवत पाहीलेयांवांचौनि जाणें नाहीं : " आउसीं गोसावीयांपासि सांघीतलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : तो म्हणताए : ' हें देवत पाहीलेयांवीण न[२] वचें[२] : ' " मग गोसावीं बीजें केलें : दारवठेयापासि गोसावी उभे राहीले : तेणें लाडु गोसावीयांचेया श्रीचरणांपासि ठेवीला : मग दंडवत केलें : मग निगाला : गोसावीं पटिसाळेवरि बीजें केलें : मग म्हणीतलें : " कां गा प्रसादुवादीए हो : प्रसादु घेयाल ? " " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुपाभाता हातु कवण नोडवी ? सुताउवां पाटाउवां कवण हातु नोडवी ? हें[५] इतुकीए बोर्डीआंतु रीगे[६] : मग तेथिचा माहाप्रसादु म्हणौनि घेइजे : तो प्रसादु कीं : हा काइ घेयावा असे ? " मग तो लाडु गोसावीं आवघेयांसि वांटिला[७] : ।।

## ७३ मंडळीका सेणीं नागीणि दरीसनीं सीक्षापण

नाथोवा गोसावीयांचेया उदेयाचा पूजाअवस्वरा चुकति : म्हणौनि पाहातपटींचि[१] सेणीं जाति : एकु दीं पाहातपटींचि[१] सेणीं गेले : सेणीं घेउनि आले : तवं वाहीरीलेया पाटसरेयावरि[२] गोसावीयांसि आसन असे : गोसावी दंतधवन[३] करीताति : सेणीं रीचविलीया : तवं पोपटाआंतुनि[४] पद्मनागीणि नीगाली : आणि बीहाले : गोसावीं सीळीख ऐसी[५] धरीली : मग म्हणीतलें : " काइ गा मंडळिका ? " " जी जी :

---

२ **हीबी.** जाणें नाहीं. ३ (**यगोहीबीने.**). ४ **मु.** पाठवीला असेसि. **यगोहीने.** पाठवीलें° बाइसांना मागून मातंगासाठी स्वामींनी लाडू पाठवला, असा वृत्तांत **पं.** प्रतीत नाही. गोसावी बाहेर आल्यावर मातंगाने आपल्या जवळचे दोन लाडू त्यांच्या चरणावर ठेवले, असा वृत्तांत तेथे आहे. ५ **अ.** ए. ६ **अ.** रीगीजे. ७ **पं.** °मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वीकारवीकल्पसून्यता होआवी कीं गा " ।।

**७३.** १ **यमुहीबीने.** पाहान°. **पं.** पानपटेचि. २ **य.** °सारेयावरि. **गो.** पाटोसारैयावरि. ३ **य.** °धावन. **हीगो.** °ध्वन. **मुने.** °धावति. ४ **ही.** पोपडेया°. ५ **मु.** उभी.

नागीणि आली :" "हें काइ गा मंडळिका : हे खाती तरि एथ बोलु लागता कीं[६] एथचा व्यापारु तो पुढां[७] पाहोंपाहों कीजे कीं[८] :" ।।

## ७४ तथा सेणीं वेंचितां भेडवणें

मग गोसावीयांसि दुपाहारीचा पूजाअवस्वरु होए : आरोगणा होए : गुळळा वीडा होए : पहुडु होए : मग नाथोबा सेणीं जाति : एकु दीं गोसावीयांसि पहुडु जाला : आणि ते सेणीं गेले : गोसावीं लवकरि उपहुडु स्वीकरिला : मग गोसावीं जाडीचें[१] घोंगतें[२] घातलें[३] : श्रीकरीं डांग घेतली : बीजें केलें : तवं तेहीं[४] मोट बांधली : उचलीत होते : इतुलीया वेळा गोसावीं तेथ बीजें केलें[५]: "मोटेया मोटेया : सांडि सेणीं : हें राखीचें रान : नीच एसि : सेणीं नेसि : फाळुकें हीरैन :" ऐसें गोसावी बोबाति : आणि श्रीमुगुटाभवंती डांग भवंडीति[६]: आणि नाथोबा बीहाले[७]: मोट सोडिली : सेणीं रीचवावियां[८] तवं गोसावीयांतें ओळखिलें : मग गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा मंडळीका : बीहालेति ?" "जी जी :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : इतुलेया वेळां चोरु मारुं[९] न कढिजे[१०] : मग तुम्हीं सेणीं कैसे आलेति ? एतुलेया वेळा ऐसा व्यापारु न कीजे हो : अवळ : सवळ : दुपाहारि : या तीन्हीं वेळा पुरुषें चुकवावीया :" मग तेयांसहीत गोसावीं गुंफे बीजें केलें : ।।

## ७५ जिव्हारोग माळिणि रक्षणें

काउळगांवीचिए[१] माळिणीसि जीव्हारोगु जाला : ते आणुनि एकवीरेचां देउळीं घातली : साधें तेया देउळां गेलीं : तवं तोंडाबाहीरि जीभ नीगाली असे : माकोडे मुंगीया लागलीया आहाति : साधीं देखिलें : आणि गोसावीयांपासि आलीं : "जी जी : वापुडीए माळीणीची जीभ एव्हडी तोंडाबाहीरि नीगाली असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ म्हणत असा साधें हो ?" मागुतें तैसेंचि सांगति : परि वीनववे ना : सर्वज्ञें म्हणीतलें : "आणा पैल[२] वाटी[३] :" *साधीं वाटी आणीली*[४] : गोसावीं वाटीएं पीक घातली : "जा : एकुएकु थेंबु तीचीए जीव्हेवरि घाला :" मग गेलीं : एकेकु थेंबु

---

६ **हीबी.** °काइ करूं जी : मीं अवसरासि चुकतों म्हणौनि सकाळीचि गेलां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : तुम्हां सदा अवसरूचि कीं : परि एथचा व्यापरू—. ७ **यमु.** एथ. ८ **पं.** °आवडी गेलेति म्हणौनि चुकलेति : आणिकातें तरि खाति ; " "जी जी :"

**७४.** १ **अ.** जाडि. २ **यमुपं.** कोंगतें. **ने.** कोंगटें. ३ **अ.** घेतलें. ४ **यमु.** °सेणी वेचिलीया. ५ **यमु.** °हा कोण गा सेणी वेचताए ? सांडि सांडि सेणीं—. ६ **यमु.** °आणि वहिले चालीले (**ने.** चालेति). ७ **यमु.** आणि मोट सांडुनि पळाले. ८ **ने.** रीचवलीया. ९ **यही.** मारावया. १० **य.** काढीजे.

**७५.** १ **य.** सांगवखेडांचीए. २ **ने.** °आरूती. ३ **य.** तांबटी. ४ (**य.**).

तीचीए जीव्हेवरि घालीति : आणि आवघी जीभ आंतु गेली : जीआली : वास पांहों लागली : परि बोलवे[५] ना : मग मागुतीं गोसावीयांपासि आलीं : " जी जी : बापुडी माळिणी जीआली जी : जीभ आवघी आंतु गेली : बापुडें प्रेत वास पाहाताए जी : पर बोलवे ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ म्हणता साधें हो ? " मागुतें तैसेंचि म्हणति : सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : पाणिभातु[६] असे ? " " हो जी : असे : " " आणा आरुता : " तीं वाटां घालुनि पाणिभातु[६] आणिला : " कुसकरा : " कुसकरिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : इतुकाइतुका तीचां तोंडीं घाला : " मग आलीं : इतुकाइतुका तीचां तोंडीं घातला : मग सावध जाली : मग आपुलेनि आंगेंसीं लाउनि घेउनि आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांसि रात्रिचा पूजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळळा जाला : वीडा उ॰ळगविला : गोसावीं बाइसांकरवि तेयांसि जेउं वाढवीलें : मग उदीयांचि तीयेचीं संबंधीयें तेयांतें पाहावेया आलीं : तवं तेथ नेदखति[७] : ' काइ सावजें नेली: ' म्हणौनि भवंती लोळणि[८] पाहों लागलीं : ते लोळणि[८] काहीं देखति ना : मग गोसावीयांपासि आलीं : तवं तेथ बैसलीं आहाति : मग तयांसि आश्चर्ये जालें : आवघीए गांवीं आश्चर्ये जालें : गोसावीं मेली माळीणि जीववीली[९] : ।।

## ७६ मुर्तिअवळोकनीं राउतां विस्मो

राउत एक[१] जोगेस्वरीचेया देउळा आले : तवं गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन असे : गोसावीयांची श्रीमुर्ति अवळोकीत होते : मग निगाले : तवं चालवे ना : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हां प्रतिस्थानां जाणें असे : तरि यांसांघातें जाल ? " " जी जी : मज यांसांघातें चालवे ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : हे तुम्हां पारुखत जाति : " " हो कां जी : " मग साधीं दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग निगालीं : ते मार्गें जात असति : आणि उभे ठाकति : आणि म्हणति : " मां मां : देखिलें गा कैसे गोसावी वरवे : वहुत राजकुमर देखिले : परि ऐसें सौंदर्ये कव्हणी ठाइं नाहीं : वह्या[२] घालीजति[३] राउळीं : आबुलीया घालीजति माहीएरीं : मग असीजे यां गोसावीयांचां ठाइं : " ऐसें तोखति : तवं तवं साधें टाकीति : ऐसें प्रत्यस्थानपरीयंत तोखत गेले : मग साधें मागुतीं गोसावीयांचेया दरीसनां आलीं : मग तयांचे सवद गोसावीयांपूढां सांघीतले : ।।

---

५ **य.** उठवे. ६ **य.** ताकभातु. ७ **यगोने.** न देखति. ८ **गो.** लोपनियां. ९ **यगोहीने.** राखिली. **पं.** °ते जवं जीयाली तवं गोसावी जेथ असति तेथ नवी नव्हाळीली घेऊनि जाए:

**७६.** १ **य.** दोघे. २ **हीने.** वहीया. ३ **य.** मागीजति.

## ७७ गंगोतरणीं साधीं नांम उचारणें

साधें : लाहामाइसें : रत्नमाणिकें : गोसावीयांचेया दरीसनां आलीं : गोसावीयांसि दरीसन जालें : साधें गोसावीयांसि कांहीं बोलों पवाडतीचि नां : लवकरि काउळगांवां निद्रास्थानांसि गेलीं : ब्राम्हणा एकाचीए ओसरीए निद्रा केली : साधें मध्याने[१] एकी रात्रीसि उठीली : " आइ : चालसिना : गोसावीयांचेया दरीसनां जांओं : " " एल्हो : एधवांचि कैसीं जाओं : रात्रि वडील असे : " मागौतीं निजति : माघौतीं उठीति : मागौतीं म्हणति : " आइ : उठीसि नां : गोसायांवीचेया दरीसनां जांओं : " " एल्हो : एधवांचि कैसीं जाओं : निज : रात्रि वडील असे : " नावेक उगीं होतीं : तवं[२] सुप्रभाते आक्षेपें आलीं : " आइ : चालसि ना : जांओं : " " एल्हो : मीं एव्हढेया वेळा नैयें : तुं जाए : " " हो कां " म्हणौनि उठिलीं[३] : परवंटु बांधला : निगालीं तवं उतारू चुकलीं : तीयें डोहाआंतु[४] उतरों बैसलीं : तवं पाणीं बहुत जालें : नावेक तेयाहीहुनि आगळें जालें : गळेयाइतुकें जालें : आणि बोबाइलीं : " राखिजो जी श्रीचांगदेवराउळो : गोसावीयांची एल्हो दासि गेली जी : " ऐसें बोबाओं लागलीं : गोसावीं प्रश्रेया गंगेकडे बीजें केलें होतें : तेथौनि गोसावी खांकरले : आणि जैसीं कव्हणीं उचलौनि थडीये आणिलीं ऐसीं आलीं : सामोरीं आलीं : तवं गोसावी परश्रेया बैसले असति : तैसींचि आलीं : दोहोंकडौनि दोहीं श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ साधें हो : बाइसांसि भीया ना ? " उगींचि नीगालीं : सामोरीं जाति तवं बाइसें पुढां सागळ घेउनि उभीं आहाति : बाइसीं म्हणीतलें : " एल्हो : एउतें बाबें बीजें केलें असे कीं : " नाइकतेया[५] भाखा उगींचि नीगालीं : मग गोसावीं उदका वीनयोगु करुनि गुंफे बीजें केलें : साधें आलीं : मग मागुतीं बाइसां देखतां गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग बाइसांकरवि साधांसि आणिक वस्त्र देववीलें : मग साधें तें वस्त्र नेसलीं : ।।

## ७८ पटिसाळे वाउनि साधां पाणिपात्र देणें

ते दीसीं बारसि : मग गोसावीं साधांतें म्हणीतलें : " साधें हो : नाएकू भिक्षा करुनि एइल तें पारणें कराल : कीं वानरा भिक्षा करुनि एइल तें पारणें कराल ? " तेहीं म्हणीतलें : " आउ भिक्षा करुनि एइल तें पारणें न करीं : हे जोगीण : हे चातुर्वर्णी भिक्षा करीते : नागदेओ भिक्षा करुनि एइल तें पारणें करीन : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुमतें अभ्यागतें आलीं असति : भिक्षा करुनि साधां पारणें करुं सुआ : "

---

७७. १ य. मध्यमे. २ ही. तीसरे आक्षेपें उठीली : आइ—. य. तवं सुक्र प्रभातीया आला : " आइ—. ३ य. पाहानपटेचि°. ४ यहीने. °रीगाली. ५ अ. नाए(ऐ)कतेया.

" हो कां जी : " मग भटोबासीं भिक्षा केली : साधां पारणें करुं सुदलें : गोसावीयांसि दुपाहारीचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : ॥

मग गोसावीं विळिचीया आदपाहारा[1] एका : पटिसाळेवरि बीजें केलें : आवघीं भगतजनें गेलीं : साधीं म्हणीतलें : " जी जी : मींहीं एइन : " मग गोसावीं दखिणीला कोनांकडे[2] बीजें केलें : तेथ स्त्रीकरु घातला : तयांचां हातीं कांहीं नखें लागलीं : कांहीं न लगतींचि : आणि गोसावीं वरतां स्त्रीकरु केला : आणि स्त्रीकरासरीसीं पटिसाळेवरि आलीं : आणि तेयां आश्चर्य जालें : " हें काइ जी : कांहीं नखें लागलीं : कांहीं न लगतीति : आणि मीं वरि कैसी आलीयें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : जीव ऐसे अधोमुख असति : परमेश्वरु ऐसें वरिपडौनि पाहात असति : एकाधा एकु ऐसी वरौती वास पाहील तेयातें ऐसेंचि काढीजैल : " ॥

मग गोसावी पटिसाळेवरि खेळु करीत असति : गोसावीयांसि सकाळि आरोगण जाली होती : मग बाइसीं वीनवीलें : " बाबा : आजि सकाळि आरोगण जाली होती : तरि आतां आरोगणे बीजें कीजो ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथचि घेउनि या : मग एथौनि साधां जोगीयांसि पाणिपात्र दीजैल : " मग बाइसें तेथचि घेउनि आलीं : कोरुका होता[3] : *तो वेंचला*[4] : कोरुका नाहीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वीनाएकामागां[5] मार्कंडाची कोरकेयांची झोळी असे : ते आणा : " मग तो कोरुका आणीला : गोसावीयांसि ताट केलें : वर्ण : तुप : पोळी : गोसावीयांजवळि साधें बैसलीं : *सर्वज्ञें म्हणीतलें : " साधे हो : या : हें तुम्हां पाणिपात्र देइल*[6] *: "* एकु घासु स्त्रीमुखीं घालीति : एकु तयांचां हातीं घालीति : ऐसी कोरकेयांची आरोगणा जाली : मग वर्णभातु : कढी : एकु घांसु गोसावी घेति : एकु तयांचां हातीं घालीति : गोसावी कढीं साकवती घालीति : तवं उगींचि असति : मग गोसावी कढी साकवती घालीति : मग घांसु घेति : ऐसी कढीसाकवतीची आरोगणा जाली : मग ताकभातु : गोसावी एकु घांसु ताकभाताचा स्त्रीमुखीं घालीति : एकु तयांचां हातीं घालीति : साकवती घालीति : तवं उगींचि असति : मग गोसावी साकवती घालीति : मग घांसु घेति : मग भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : एल्होसि ताकपातसेंवीण[7] गमेचि[8] ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " न गमो[9] कां गा : काइ चुळा एका ताकाकारणें प्राणीयें आपुला धर्मू सांडावा ? साधें हो : तुम्हांसि तक्रापाना[10] अनोज्ञा : सीं : बीं : चुळु : चीमुटि : यां चहुंमध्यें न गमे तरि एकु ठाओ आपजवीजे : त्रसों नेदीजे : त्रसला सांतां जीउ वीखयां सरण जाइल : देसाचां

---

७८. १ **यगोही.** अर्धं°. २ **गोहीने.** कोनटयाकडे. ३ **अगो.** एकीवासना : कोरुका नाहीं. ४ **(हीबी.)**. ५ **य.** नारायणा°. ६ **(य.)**. ७ **गो.** ताकपातसेनवीन. **ही.** तक्रपत्रसाखेवीन. **ने.** ताकभातें°. ८ **पं.** गीळेचि. ९ **यने.** गमो. **पं.** नीगळों कां. १० **यने.** तक्रपात्रा. **गो.** तक्र पत्र.

सेवटां जाउनि : सर्वाधमत्व ब्राम्हणत्व स्वीकरील :" *यावारि भटीं म्हणीतलें : "जी जी : हें साधनचतुष्टयें : हें आपणेयां आपण आपजविलेयां एक अनिष्ट आति : तारि हें अनिष्ट कैसें सेवावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें*[११] *:* "अल्पें अनीष्टें बहुत अनीष्ट परीहरे तरि परीहरीजे[१२] :" ऐसें गोसावीं नीरुपण केलें : मग गोसावीयांसि गुळळा जाला : साधें आंचवलीं : मग बाइसीं गोसावीयांसि फोडी ऊळगवीलीया : गोसावीं फोडी स्रीमुखीं घातलीया : अरधीया[१३] काढौनि साधां दीधलीया : बाइसें वीडीया करुनि देति : गोसावी अर्ध[१३] वीडी स्रीमुखीं घालीति : अर्ध[१३] तयां देति : गोसावी पाउण वीडी तयां देति : चतुर्थांसु आपण घेति : पाउण आपण घेति : चतुर्थांसु तेयां देति : ऐसी आरोगण : तांबोळ जालें : ।।

## ७९ साधां क्रीमि ब्रह्मवीद नीरुपण

मग गोसावी तीएचि पटिसाळेवरि वेढे करुं लागले : गोसावी उभे राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : हें देखिलें पैल प्रत्यस्थान : वारानसीसामान्य[१] नगर : एथ तुम्हीं असा : मां हें तुम्हां पाखापाखा[२] भेटैल :" "ना जी : मज एथ भिक्षा न करवे : तेथिचीं उंचेंखालें टेंकें : मज वेंघवेति नां : मीं रीधौरां असैन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें होए साधें हो : परमेश्वरपुरीं असाल : श्रीप्रभुचां स्थानीं : जेथिचे क्रीमी ब्रम्हवीद : *क्रमीतें ब्रह्मा कीजे ऐसी श्रीप्रभूची लीळा : नेणिजे श्रीप्रभूची लीळा : कव्हणी वेळीं कव्हणां जीवा काइ देति*[३] *:* साधे हो : परमेश्वरपुरीं भिक्षा करुनि जेवाल कीं मामेयांचां घरीं जेवाल ?" "ना जी : मीं भिक्षा करुनि जेवीन :" "ऐसें होए : भिक्षा करुनि जेविजे : मामेयांचां घरीं नेजवीजे :" "जी जी : गोसावी केवि जाणति मामयांतें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते एथचे एजमान :" "जी जी : एजमान कैसे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें दाभविहीरी होतें : यातें घोडेया घालौनि[४] घेउनि गेले : एथ पूजा केली : ते आगमीक : पूजा करुं जाणति : दुधातुपाची आरोगण दीधली :" मग साधीं पुसिलें : "जी जी : क्रीमि ब्रम्हवीद कैसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "केसवनाएकाचा परिव्हा जंतु भरला असे : तया वाटा श्रीप्रभू बीजें करीति : मग एकाधेया एकावरि श्रीचरणु ठेवीति : कां कृपाकटाक्ष झळके : मग क्रीमि असे तो ब्रम्हवीदु होए :" ऐसें निरुपिलें : मग म्हणीतलें : "जी जी : कैसेयां पाविजैल ?" मग गोसावी एकें श्रीकरें मानें धरिलें : एकें बाहुटीए[५] : आणि म्हणीतलें : "ऐसें जाइजैल : आणि ऐसेयाचि पाविजैल :" म्हणौनि गोसावीं ऐला सेवटाहुनि पैला सेवटा वहीलें बीजें केलें : *मग तियें रिधपुरासि गेलीं*[६] *:* ।।

---

**हीबी.** तक्रपत्रसाके. ११ **(प्रव. आ.** १०८). १२ **पंने.** °वीषयां साक्ष न ठकीजे : कोमळज्ञानीं वीखो विघ्न : १३ **गोने.** आधीया. **गो.** आधी.

७९. १ **बीगोयने.** समान. २ **एवा.** मासामासा. **हीबी.** आठा पाखा सांभाळील. ३ **(प्रव. वि.** २१३–१४). ४ **यगोपंने.** वाउनि. **हीबी.** बैसौनि. ५ **गो.** बाहोटीए. **ने.** बाहुवटिए. ६. **(हीबी.)**.

## ८० जाखुबाइ वेख परीहासु

*सावंखेडाची*[१] जाखुबाइ तीएं स्वक्रीये[२] : गोसावीयांचेया दरीसना आलीं : गोसावीयांसि दरीसन जालें : *गोसावीं पाठवणीं दीधली : तीहीं म्हणीतलें*[१] : " जी जी : मीं गोसावीयांपासि राहीन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसियांसि एथ राहों नेदिजे : " " जी जी : तरि देखों इयें अवघीं असति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " इयें काइ मानुसें ? इयें मरणांसि धरणें बैसलीं असति : " " जी जी : मींहीं ऐसीचि असैन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि इयें ऐसीं इटामाती वाहावीती : " *म्हणौनि श्रीकराचेनि अनुकारें माथेयाकडे दाखवीलें : तीहीं मानलें*[१] : " जी जी : वाहीन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुमचा साउला मैळैल : तुमची चोळी मैळैल : तुमचा माथा मैळैल[३] : तुमची नखें मोडती[४] : " " जी जी : मोडती तरि मोडती : आणि काइ : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि ऐसें करावें लागैल : " " जी जी : करीन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि एथ राहों नेदीजे : " *येतुलेनि भियालीं : मग गेलीं*[१] : ।।

## ८१ आउ पवनुगुरु उपाहासु

गोसावी गंगेआंतु वहीलें बीजें करिताति : आउसें सरिसीं धांवताति : " जी जी स्वामीं जगंनाथा : हळु[१] चालिजो जी : पवनु तुटैल : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : पवनु काइ चालतां तुटैल ? तुमचे गुरु होते : ते हेंदरे[२] : *कांहीं जाणति ना : पवनाचीं कार्यें तीयें काइ ऐसीं ? पवनाचीं कार्यें तीयें ऐसीं कीं*[३] : " *म्हणौनि मुंजीयाची गोष्टि सांघीतली*[४] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे एक देउळीं बैसले असति : तीये गांवीचीया ब्राम्हणाचेया पुत्राची मुंजि : तो अवघा गांउ आवंतिला : मग देउळासि आले : तवं ते माहात्मे बैसले असति : तयां माहात्मेयांतेंहीं आवंतीलें : तयांतें म्हणीतलें : ' आइत होइल आणि बोलाउंनि : ' ते गेले : तैसीचि गांवां पळणि जाली : तेहीं माहात्मां कवाडें घातलीं : काष्टी[५] लाविली : तो गांवु ओसु जाला : मागुता बहुतांकां दीसां वसता जाला : मुंजीया तो म्हातारा जाला : तेया देउळावरि टेंक जालें : तेणें म्हणीतलें : ' माझी मुंजी जाली[६] तें एथ देउळ होतें : ' खणति तवं देउळ निगालें : कवाडें उघडिलीं : तवं ते बैसले असति : काष्टीचे तवीली : मग तेहीं माहात्मां म्हणीतलें : आइत जाली ? ' ' नां हो : ' मग दुधभातु जेउं सुदलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पवनु तो काइ ऐसा ? पवनु तो ऐसा[७] : " ।।

---

८०. १ (यमु.). २ **गो.** सवक्रीएं. **ने.** सक्रीयें. ३ **रामे.** रूळैल. ४ **पं.** °तुमचा श्रूंघारू भांसळैल.

८१. १ **यमु.** ढाळें. २ **शोध.** वाल्हदाए. ३ **रामे.** °म्हणौनि नांदिएडीं आंबोचार सांघीतला. ४ **(यमु.)**. ५ **ही.** कासुटी. **एवा.** टाळी. ६ **एवा.** बांधली. ७ पूर्वार्ध लीळा २६ पाहा.

## ८२ आउ इटाप्रसंगीं सीक्षापण

गोसावीयांचा ठाइं मातिकाम होत असे : भगतजनें इटामाती वाहातें असति : पैलाकडौनि आउसें आलीं : *तेहीं म्हणीतलें : "हा रे नागदया : इटा वाहातां तुम्हीं काइ देखिलें असे*[1] ? है रे : अग्नि : ब्राम्हणु : साक्ष करुनि जीया हातीं लाविलीया : *तेयांतें सांडीलें*[1] : तेयाचेनि पापें कें रीगाल रे ? काइ खाल इया इटामातीया ?" भटोबासीं म्हणीतलें : "ढोरें राखा हो आउये : हें दास्य कें करुं लाभे ?" ऐसें म्हणौनि गोसावीयांपासि आलीं : गोसावीयांसि बाहीरीला पाटसरेयावरि आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "वरिलाचा[2] हाकारा आला होइल तेव्हळि अग्नि : ब्राम्हणु साक्ष करुनि जीया हातीं लावीलीया तीया काइ राखों सकति नाएका ?" "जी जी स्वामीं जगंनाथा : तरि का आपण राखिजैल ?" "तरि काइ नाएका :" "तरि नेणेंचि जी स्वामीं जगंनाथा : तरि स्वामीं जगंनाथाचें दास्य राखैल :" म्हणौनि आपणहीं इटामाती वाहों लागलीं : ।।

## ८३ पौळि सीळा वाणें[1]

एकु दीं गोसावीयांसि मादनें[2] करावेया : सीळ पौळीबाहीरी होति : ते आवघे भगतजन वात होते : ते उचले ना : गोसावीं लघुपरश्रेया बीजें केलें : लघुप्रस्रयो सारुनि तेथ बीजें केलें : तवं सीळ उचले आणि माघौती पडे : गोसावीं श्रीचरणीचा आंगुठा सीळेसि टेंकीला : हातु लावीला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "मा मा :" आणि सीळ मादनेंस्थानीं[3] निरुती[4] पडली : मग तीए सीळेवरि गोसावीयांसि मादनें होए : ।।

## ८४ दाइंबाप्रति गंगा द्रीष्टान्तु निरोपणें

दाइंबासि आउसांवरि भाओ[1] नाहीं : मग एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजया : हे गंगा कवणें आणिली गा ?" "जी जी : गौतमें आणिली :" "हां गा : कोणे ठाउनि आणिली ?" "जी जी : कोण्हीं म्हणे : महेसाचिए मुगटौनि : कोण्हीं म्हणे : वीष्णुचीए ठाउनि[2] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : पाणीं हें तेंचि ?" "नां जी : त्यें कैचें ? तें निगौनि गेलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेणेंचि मार्गें जें आलें उदक तें जरि लोकाचेया हाडगदलेया पापा पुरश्चरण करीत असे : तरि इतुलेयांही संबंधापुरती आउ नव्हे ? इचा तुम्हीं वीटाळु मानां[3] ?" ।।

---

८२. १ (यमु.). २ **एवा.** बाहीरिलाचा.

८३. १ अ. लावणें. २ **गो.** माजनें. **मु.** मार्जनें. ३ **गो.** माजनें°. **यमु.** न्हाणीएसि. ४ **यमु.** नीगुती.

८४. १ **हीबोने.** बुधि. २ **हीबी.** चरणीहुनि. ३ **हीबी.** °तेहीं म्हणींतलें : "हो कां जी :" मग तीये दीउनि दाइंबा आउसातें मानीति. **पं.** °हे जोगिणि म्हणां : इएं एथौनि आन जालीं असति : हां गा : जीउ काइ गा जोगी ? कीं माहारू ? कीं ब्राह्मणु ? जीवु तो सूधु : चोखटु : केवलं :

## ८५ नाथोबा पदींपदीं नीधान कथन

रात्रि एकु दीं गोसावीं प्रश्नेया बीजें केलें : सरीसे नाथोबा असति : तवं प्रकासाचे जाळ देखों लागले : मग गोसावीयांतें म्हणीतलें : "जी जी : हे जाळ काइसे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "यें[1] निधानें गा :" "जी जी : इतुकीं कैसीं नीधानें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "इयें ऐसीं पाउलपाउला असति गा[2] :" ।।

## ८६ इंद्रियार्थरसव्यतिरिक्त अन्नप्रशंसा*

[गोसावीं[1] जोगेश्वरीं साधांतें म्हणीतलें : "साधें हो : भीक्षा करूनि घेइजे : परि कव्हणाचें न जेवावें :" तें भटीं आइकिलें होतें : म्हणौनि भट भिक्षा मागती : जेवीती : मातीकाम करीती : आणि भूक लागे : परि उगेचि असति : तें जाणौनि एकु दीं गोसावीं भटातें म्हणीतलें : "वानरेया : पाणीभात जेवा : मग व्यापारा :" भटीं म्हणीतलें : "ना जी : व्यापारूनि मग भिक्षाभोजन करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें कां गा ?" "ना जी : तें गोसावीं वारिलें असे कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : इंद्रियार्थरसुव्यतिरिक्त अन्नीं काइ गा दोषु असे ?" "ना जी : तरि गोसावीं कां निषेधिलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें निरालंबीसि :" "हो कां जी :" ।।]

## ८७ छींनपापीं गुंफे अवस्थान*

मग गोसावीं छींनपापासि बीजें केलें : तेथें एकी गुंफा होती : पुर्वामुख : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : ।।

---

आणि हा विकल्पु प्रेतदेहा कारण :" ऐसें निरूपण केलें : मग दाइंबासि आउसांवरि बुधि भाओ आला : ।।

८५. १ **हीबी.** °एथिचीं—. २ **हीबी.** °"जी जी : तरि दीसति ना ?" सर्वज्ञें म्हणितलें : "पायाळासि दीसति गा :" **एवा.** "एथिचीए जवळिके दीसति गा :"

८६. *(**प्रव. आमा. २१०**).
१ **बाइदेवोबा**°.

८७. ***हीबी.** प्रतीत जोगेश्वरीहून छिन्नपाप येथे येताना 'घटसीधनाथीं वसति ।। नींबा मठीवस्ति ।। पेहेरा संगमीं वाळुजादेवीं वसति ।। सुरेगावीं बसति ।। घोगरगावीं सीधनाथी वस्ती ।।' असा क्रम आहे. मग छिन्नपाप. **पं.** प्रतीत जोगेश्वरीहून निघाल्यावर 'ब्राह्मणीए वसति' ही आदि असून तेथील लीळा पुढीलप्रमाणे दिली आहे. 'गोसावीं बाम्हणीएसि बीजें केलें तवं कमळनाएकु भेटले : तेहीं दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग वीनवीलें : "जी जी : माझेया घरासि गोसावीं बीजें करावें जी :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : बीजें केलें : पटिसाळेवरि आसन जालें : ब्राह्मणीतें म्हणींतलें : "हे काइ ? एया : गोसावीयांसि दंडवत करि :" ते आली : गोसावीयासि दंडवत केलें : श्रीचरणां लागली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पुत्री सीणलीति ?" म्हणौनि पाठीवरि

## ८८ गुंफा करवणें

मग दुसरी भगतजनांलागि गुंफा नाहीं : मग दुसरी गुंफा गोसावीं करविली : *बादाठाणीहुनि पींपळे वामनभटीं दळवाडें आणिलें*[१] *:* तें पाहार दीसु मातीकाम होए : मग गोसावी पुरे करवीति : एकु दीं गारि आधिलां दीं ओलुनि[२] ठेवीली होती : पूजाअवस्वरु जालेयावरि व्यापारु करावेया गेले : तवं अवघी गारि मुंगीयां भरली होती : गोसावीयांपुढां सांगावेया गेले : "जी जी : अवघी गारि मुंगीयां भरली असे : तरि काए करुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें स्थान सांडा : आणिकीए ठाइं गारि करा : येथचि सेवा ते भुतां अवीरोधें करावी कीं गा :" मग आणिकीए स्थानीं गारि केली : ।।

## ८९ भटां उदरवेथानिवृति

एकु दीं मातिकाम होत होतें : तवं भटोबासांचें पोट उदैलें[१] : तें भटोबासीं पाठि निंवातळीं घातली असे : मातिकाम राहीलें : गोसावीं वाहीरि बीजें केलें : तवं मातिकाम राहीलें असे : "हां गा : व्यापारु कां राहीला ?" "जी जी : नागदेयाचें पोट दुखताए :" गोसावीं तेथ बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वांनरेया : व्यापारु काइ गा राहीला ?" "काइ करीं जी : माझें पोट दुखताए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुं न करीसि तरि हे आवघे न करीति कीं :" "काए करीं जी : माझें पोट दुखों राहावीजो : मां मीं करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि तुझें पोट दुखों राहावीजैल तरि कीती गुंडे वाहासी ?" भटोबास थोडे म्हणति : गोसावी बहुत म्हणति : *सर्वज्ञें म्हणीतलें : "ना बावीसां गुंडेयांची सीष्टाइ*[२] *:"* ऐसां बावीसां गुंडां ठी जाली : भटोबासीं मानिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आणिसि ना गा :" "जी जी : माझें पोट दुखों राहावीजो नां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "करुं आदरि पां[३] : मां पातलें कर्म एथौनि धरिजैल :" दुखेंसीं उठिले : गेले : पोटेंसीं गुंडा धरिला : आणुनि घातला : तवं नावेक राहालें : ऐसें बावीस गुंडे वाहीले : तवं निसेख राहीलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : "विधी अविधी परिहरे*[४] *:"*

*यावरि भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीयांसि जो अनुसरे तयासि देहीक निरोध न बाधिती कीं : जैसा मज सुळ उठिला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वान्‍रेया : अनुसरलेयातें निरोध न बधिती*[५] *:"* ।।

---

स्पर्शीलें : "जनी जी : न सीणें जी : गोसावीयांसि दरीसन जालें : आता सुखीनि होइन जी :" मग मर्दना मादणें जालें : पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : तेथ वसति जाली : तोचि दीसू : तेचि नक्षेत्र : तीसि पुत्रू जाला : तो साता आउक्षी जाला : ।। '

८८. १ **(यमु.)**. २ **गो.** वोलौनि. **मु.** वोलउनि.

८९. १ **होमुनें.** उठिलें. २ **(यमु.)**. ३ **ही. एवा.** °मां पातलें दुख भोगें एथौनि निमानिजैल. **(एवा.** °धाडिजैल**)**. ४ **(पं. प्रव. आ.** २४५**)**. ५ **(प्रव. आमा.** १९६**)**.

## ९० पींपळे वामनभटखीरिभोजनीं भटां वीस्मो

पींपळे वामनदेव गोसावीयांलागि उपाहारु घेउनि आले : गोसावीयांसि पूजाअवस्वरु जाला : गोसावीं सपरीवारीं आरोगण केली : गोसावीयांसि गुळळा जाला : वीडा ओळगविला : मग भगतजन आंचवले : भटोवास आंचउनि गोसावीयांजवळे बैसले असति : वामनदेव गांवां निगाले : आपुलीं भाजनें मागीतलीं : अवघीं दीधलीं : वाटेभरि खीरि उरली होती : ते काइसां[१] फेडावेया नाहीं : मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हे खीरि काइसां फेडुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ठेवा वानरेसांपुढें :" भटोबासीं म्हणीतलें : "हें काइ जी : मज उदका[२] प्राश्रमु[३] नाहीं : मां मज इतुली खीरि काइसेनि खाववैल[४] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया : एथौनि म्हणीजताए : *भरलेया गाडेया काइ सुप जड[५] ?* घांसु घेया : आणि एथिची वास पाहा :" "हो कां जी :" बाइसीं वाटें पुढां ठेविलें : जेवीति : घांसु घेति : आणि गोसावीयांची वास पाहाति : ऐसे जेवीत असति : आणि एकसरीं वाटेयाचां बुढीं खटकरि नखें लागलीं : आणि भटोबासांतें विस्मो जाला : "हें काइ जी : पुढारी इतुकी खीरि जेविलां : आणि मीं आपणेयां प्रमाण[६] नेणेंचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा : इतुली खीरि जेविलासि : आणि आपणेयां प्रमाण[७] कैसा नेणसि ? *आणिकी इतुलीचि असती तरि तेही जेवीतासि[८]* " ॥

## ९१ स्त्रीपानाळव्यथा बाइसां कोपणें

गोसावीयांचेया दरीसनां स्त्री एकि आली[१] : तेयांतें एतां देखिलें : आणि गोसावीं लवकरि बाहीरि बीजें केलें : तो गोसावीयांचां श्रीमुगुटीं दारवंडु[२] लागला : आणि बाइसीं म्हणीतलें : "हें काइ वो जालें यां रांडांसि : बाबाचा श्रीमुगुटु दुखवला :" ऐसीया सवीया दीधलीया : देतां सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : *तुम्हीं सवीया कैसीया देतें असां[३] ?* प्राणीयें एथ आलेयां जळतां जावें : तरि नीवावें तें कोठें ?" मग गोसावीं तेयां नावेकु अवस्वरु दीधला : मग पाठवणी दीधली : ॥

## ९२ रेइनाएका ज्वरुनिवृति

*रेइनाइक ते डोंबेग्रामीचे आधीकारीये : ते अखंड गोसावीयांचेया दर्शना येति :* एकु दीं[१] रेइनाएका ज्वरु आला : नव लंघनें पडिलीं : *नव दीस जाले[२] :* परि ज्वरू न वचे[३] :

---

९०. १ **यमुहीने.** कांहीं. २ **यमु.** सीता. ३ **मुने.** पराश्रमु. ४ **गोने.** जेववैल. ५ **हीबी. पं.** ६ **गो.** परिवाण. ७ **य.** परीवाण. **मु.** परिमान. **गो.** प्रवाण. **अ.** परिण. ८ **हीबी. एवा.**

९१. १ **यमु.** घोगरगावीचीया दोघी स्त्रीया गोसावीयांचेया दर्सना आलीया. २ **यमु.** पनाळ. ३ (**यमुपं.**).

९२. १ (**मु.**). २ (**यमु.**). ३ **यमु.** °पुत्रा नागनाएकातें म्हणीतलें : "गोसावीयांचें चरणोदक

मग नागोबा तयांचे पुत्र : ते गोरुवें बोळवावेया निगाले : मग म्हणीतलें : "गोसावीयांचेया दरीसनां जाओं : मग चरणोदक आणुं :" म्हणौनि वाखतीए तांबीया घातला : गोरुवें बोळवुनि गोसावीयांचेया दरीसनां आले : गोसावीयांसि छींनस्तळीएवरि[४] आसन असे : दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : गोसावीयांतें देखिलें : आणि वीनउं वीसरले : मग सर्वज्ञें म्हणीतलें[५] : "सांपें नाएकु एथ दीसे ना ?" "जी जी : तयां थोरि असकति असे : नव लंघनें पडिलीं असति :" नावेक होते : मग निगाले : तवं वाखतीए तांबीया असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें वाखतीए काइ ?" "जी जी : हा तांबीया : चरणोदक नेयावेयालागौनि आणिला : तें मागों वीसरलां जी : तरि चरणोदक देयावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एणें काइ होइल ?" "जी जी : एणेंचि होइल :" मग बाइसीं वीनवीलें : "बाबा : ओपीजो बापुडेयासि चरणोदक :" मग बाइसीं चरणक्षाळण केलें : चरणोदक तांबीयां भरिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तयांसि भीतरि देयावें : आंग सींपावें : उरैल तें ठेवावें : उदीयां आंगीं पाणीं सुआल : तयांतु घालावें : आणि नाएकातें ऐसें म्हणावें : "एथचिया दरीसनां बोलावीलें असे :" "मां जी : तयांसि कानीं प्रतवे ना[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें करा पां :" बाइसीं म्हणीतलें : "बाबा म्हणत असति तें करि पां :" मग ते निगाले : तवं रेइनाएक बोबाओं लागले : "नागदेओ कें ? काइ मज उबगला ?" तवं ते गेले : "हां रे बा : कें गेला होतासि ? काइ मज उबगलासि ?" "ना : मीं गोसावीयांचेया दरीसनां गेलां होतां :" "कटकट : मजपुढें सांगतासि तरि मीं चरणोदक आणवितां :" "मीयां चरणोदक आणिलें असे :" "तरि माझेया ज्वराचें वीनवीतासि कां ?" "ना वीनवीलें : गोसावीं म्हणीतलें : हें चरणोदक भीतरि घेयावें : आणि आंग सींपावें : उरैल तें ठेवावें : उदीयां आंगीं पांणीं सुआल : तयांतु घालावें : नाएकातें ऐसें म्हणावें : जें एथिचेया दरीसनां बोलावीलें असें[७] :" "मां तुं ऐसें न म्हणसीचि : मज कांनी न परतवे :" "गोसावी म्हणति : 'ऐसें करा :'" मग तयां चरणोदक धाएवरि पेओं सुदलें : प्यालें : आणि अंतरज्वरु समला : आंग सींपिलें : तेणें वरीलु तापु काढला : उरलें तें तोंड बांधौनि बाजेबुडि ठेविलें : उदेयां आंगीं पांणीं सुदलें : तयांतु घातलें : उपाहाराची आइत करविली : मग आपण गोसावीयांचेया दरीसनां निगाले : वेसीदाराबाहीरि[८] आले : तवं डोंबाएचें देउळ देखिलें : डोंबाइ कुळदेवता : 'तरि जाओं दंडवता :' म्हणौनि तेउते अव्हांटले[९] : आणि न चलवे : तेव्हळि दोघांचेया खांदावरि हात घालुनि

आणि : मग माझा जरू जाइल :" ते चरणोदकालागि येति आणि विसरेति : ४ **हीय.** सींहस्थळी°. ५ **गोने.** पुसिलें. ६ **अ.** प्रते ना. **मु.** परतवे ना. **ने.** का नीपर्तवेना. ७ **यमु.** °ना : मज कानीं प्रतवे (**मु.** परतवे) ना : मां दरीसनां कैसा जायें ?" "ना जाल तरी जाववैल : गोसावी म्हणति ऐसें करा. ८ **अ.** पासि. ९ **ही.** मोहोरले.

दुखरूप[१०] गेले : वीडा वाइला : दंडवत घातलें : मग गोसावीयांचेया मोहरा निगाले : आणि हात काढिले[११] : गोसावीयांसि सींहस्तळीवरि[१२] आसन असे : गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ नाएको : ज्वरें पीडलेती ?" "जी जी : तैचि गोसावीयांतें वीनवीतां तरि इतुले दीस काइसेया बीचंबतां[१३] ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : एथींची मोहरचि पुरे :" तवं भटीं म्हणीतलें : "जी जी : वेषाचेनि नवसीए रोग : ज्वर : विघ्नें उपशमति ऐसें काहीं आति ?" गोसावीं मानिलें : भटीं पुसिलें : "जी जी : एथींचिया वेशा कवण कवण वर्ण : कवण कवण अवर्ण ? कवणी स्त्रिया कवण पुरुष अधिकारी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : हिंसा विकल्पातें नाश्राये तो जीवु सर्वाधिकार्यी :" "हो कां जी[१४] :"* रेइनाएक नावेक गोसावीयांपासि बैसले होते : मग बाइसांतें म्हणीतलें : "बाइ : गोसावीयातें गुंफे जावेयाचें वीनवावें[१५] : मीयां नागदेयाकरवि उपाहारू आणवीला असे :" आणि बाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनती स्वीकरीली : गोसावीं गुंफे बीजें केलें : गोसावीयांसि पूजाअवस्वरू जाला : तवं नागोबा उपाहारू घेउनि आले : रेइनाएकालागौनि[१६] जुनेयां[१७] तांदुळांचें सीत आणिलें : गोसावीयांसि ताट केलें : भगतजनां ठाए केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें पैल काइ ?" "जी जी : नाएकालागौनि सीत आणिलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यां आवघेयांसरीसें वाढा :" *तेहीं म्हणीतलें : "जी जी : मज बाधील :" सर्वज्ञें म्हणीतलें : "न बधीजे[१८] :"* मग तयांहीं आवघेयांसरीसें वाढिलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : आवघे भगतजन आंचवले : मग नागदेओ भाजनें घेउनि निगाले : मग नीगतां गोसावीं तयांतें म्हणीतलें : "वीळिचां नाएकालागौनि घोडें आणावें :" "जी जी :" मग तीं वीळिचां घोडें आणिलें : मग रेइनाएकें गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं डोबेग्रामासि बीजें करावें : तेथ बरवें तीनि मठ असति : तेथ गोसावीं बीजें करावें : मज एथ गोसावीयांचीए सेवे एववे ना :" मग गोसावीं वीनती स्वीकरीली : मग रेइनाएक निगाले :॥

## ९३ पंच मोदक स्वीकारु

एकु दीसीं गोसावीयांचिया दरीसनां घोगरगांविचीया बाइया आलीया : तयांचे गुरु ते सरालां[१] असति : तयां नांव नरसींहारंण्य[२] : तेयांचीए भेटी जाति : तेवींचि

१० **यमु.** दुखें. **गो.** दुखपर. ११ **यमुहीबीने.** सोडिले. **य.** °चालों लागले. **मु.** °चालों आलें. १२ **यमुगोने.** छीन्नस्थळीं°. १३ **हीबी.** पीडतां. १४ (**प्रव. आमा.** १७७–१७८). १५ **हीबीगोने.** वीनवा कां. १६ **गो.** °पथ्यालागि. १७ **ही.** °तांदुळाचीं पथें आणिलीं. **बी.** °तांदुळाचें पथ्य——. १८ (**यमु.**).

९३. १ **य.** सरले. २ **हीबी.** नरसींह भारथी. **यमु.** नरसींहानुभव.

गोसावीयांचेया दरीसनां एति : मग एकु दीसीं आपुलेया गुरुलागि लाडु केले : मग लेकीं[३] म्हणीतलें : " हां गे : श्रीचांगदेओराउळांचेया दरीसनां जाउनि : तरि तेयांलागौनि थोरले पांच लाडु[४] करुं : " मग गोसावीयांलागौनि थोरले पांच लाडु केले : आपुलेया गुरुलागौनि दुरडीभरि[५] लाडुआं केलीं : मग गोसावीयांचेया दरीसनां आलीया : गोसावीयांतें देखिलें : आणि अवघे लाडु दरीसनां करावे ऐसें उपजलें : मग आवघे लाडु गोसावीयांसि दरीसन केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें आवघे लाडु नेघें : हें आपुले पांचै लाडु घेइल : येर जयांचे तेयांलागौनि घेउनि जा : " मग गोसावीं आपुले पांचै लाडु वरील घेतले : " एया : आम्हीं पैन्हां लाडु केले[६] म्हणीतलें तें गोसावीं येथ[३] जाणीतलें : " ऐसें तया आश्चर्यें जालें : ।।

मग ते लाडु घेउनि सरालेया आली : ते बाहीरि बैसले होते : तयांपुढें ते लाडु ठेवीले : मग मागील गोष्टि आवघी तयापुढें सांघीतली : मग तेहीं म्हणीतलें : " ऐसियां तुम्ही : तरि जा तेयांचिपासि : " म्हणौनि पांपरा दुरडी हाणीतली : ते आवघे लाडु सांडले : आणि आपण भीतरि गेले : तीं आवघे लाडु भरिले : मग लेंकीं म्हणीतलें : " चाल गे जाओं : एथ काइ असे ? " मग लाडु घेउनि गोसावीयांचेया दरीसनां आलीया : एकें म्हणति : ते लाडु तयांचां सीक्षीं घेतले : मग गोसावीयांपासि आलीया[७] : एकें म्हणति : तीया खेइगोइ : एकें म्हणति : तीया नव्हति : ।।

## ९४ नाथोबाकरवि तांदुळजा खूडवणें

गोसावीयांसि उदेयाचा पूजाअवस्वरू जालेयानंतरें गुंफे दक्षिणे सेत : तेउतें गोसावीं वीहरणां बीजें केलें : सरीसे नाथोबा असति : तवं तेथ बरवा कोंवळा तांदुळजा असे : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : हा तांदुळजा घेया गा : " नाथोबायें तांदुळजा खुडिला : गोसावीं गुंफे बीजें केलें : नाथोबायें तांदुळजा बाइसांहातीं दीधला : बाइसीं बरवा रांधिला : गोसावीयांसि पूजावस्वरु जाला : मग बाइसीं गोसावीयांसि ताट केलें : गोसावीयांसि[१] तो तांदुळिजा रुचला ऐसें नाथोबायें देखिलें : मग एरीं दीं न पुसत आणिला : बाइसांचां हातीं दीधला : बाइसीं बरवा रांधिला : मग गोसावीयांचां ताटीं ओळगवीला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा तांदुळजा कैचा[२] ? " " बाबा : हा नाथोनि आणिला : " तेही तेथ उभे असति : " बाइ : हा फेडा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : हा तांदुळिजा काइ एथौनि आणवीला ? " " ना जी : " " तरि काइ बाइसीं आणवीला ? " " ना जी : " " तरि कोणें आणवीला ? " " जी जी[३] : हा

३ (**हीबीपं.**). ४ **गो.** साखरलाडु. ५ **हीने.** °लाडु केले. ६ **(यमुनेही.)**. ७ **पं.** राहिलीया : अनुसरलीया :—.

**९४.** १ **यमु.** °आरोगण करीतां ते भाजी रुचली. २ **यमु.** कोणें आणिला ? ३ **यमु.** °कालि

मीयांचि आणिला :" सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : एथचा व्यापारु तो एथ पुसपुसों कीजे कीं[४] :" ।। *यावरि गोसावीं कीर्तिकठियाचा दृष्टांत निरूपिला*[५] : [ सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु कठीया असे : तो भोगस्थानाची सुश्रषा करी : झाडी : सडासंमार्जन करी : तें देखौनि गांवीचि म्हणति : ' कठीए हो : निकें करीत असा : बरवें करीत असा :' तें आइकौनि दीसवडिचां दीसवडि हातुहातु चढवी : तेयासि देवता आपुलें फळ नेदीचि : तेयासि कीर्तिचेंचि फळ जालें : तैसें अनुसरलेनि पुरुषें कीर्तिपर क्रिया कव्हणीचि न करावी :" ।। ]

## ९५ आउस्तुतिकरणीं गणपति आपयो कोपणें

आउसें[१] सरालेया गेलीं होतीं[२] : तें गणपति आपैयोयें म्हणीतलें : " हांआउ : आम्हांसि गोसावीयांचें दरीसन करा कां :" " नां रे[३] : चक्रस्वामिचां ठांइं मानमान्यता नाहीं : अव्हानवीसर्जन नाहीं : तेथ रायारंका सरि :" " नां आउ : काइ करावी असे मानुमान्यता ? काए करावें असे अव्हानवीसर्जन ? पुरुषाचें दरीसनचि पुरे :" " हो कां रे : तरि चाला :" मग गोसावीयांचेया दरीसनां आले : गोसावीयांसि सींहंनारायणाचीए आंगणीं गरुडाचीए पाठिसीं पुर्वामुख आसन असे : आले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग गोसावीं अव्हान केलें : अपारु मानुमान्यता केली : मग गोसावीयांजवळे बैसले : मग गोसावी नावेक होते : मग गंगेकडे बीजें केलें : तयांसि[४] मान्यता देखिली : आणि आउसां स्तीति जाली : सींहंनाराएणाचां दारवठां बाबुळ[५] होती : तीएवरि वळघली : आणि म्हणति : " गोसावी कामधेनु : गोसावी कल्पतरु : गोसावी चींतामणि :" ते म्हणति : " ऐसें होए : आउवोदेवी :" तवं गोसावीं बीजें केलें : दारवठां उभे राहीले : मग म्हणीतलें : " हें काइ भटो : तुम्हीं वीद्वांस : कांहीं सास्त्र जाणां : हे आउ स्त्रीमनुक्ष : इयें काइ स्तुति करितें असति : तुम्हीं काइ तोखत असा ? कामधेनु तें एकांचीए दारींचें ढोर : तैसा काइ परमेश्वरु ? कल्पतरु तो एकाचीए दारीचें झाड : तैसा काइ परमेश्वरु ? चींतामणि तो एकांचीए गळांचा मणि : तैसा काइ परमेश्वरु[६] ? कें अचिंत्यानंतशक्ति परमेश्वरु : आणि कें चिंतामणि कामधेनु ? करा गा यांसि तें :" ऐसें म्हणीतलें आणि आउसांची स्तीति भंगली : " जी जी स्वामीं जगंनाथा : राजमान्यु[७]

---

गोसावीयांसि रुचला म्हणौनि आणिला. ४ **यमु.** °मग ताटीचा फेडवीला. **एवा.** हीरवाचि सांडविला. ५ (**दृपा.** ९५. कीर्तिकठियाचा दृष्टांत. 'नाथोबावरि तांदुळजयाचीए भाजीएवरि छिन्नपापी गुंफेसि निरोपिला '—**दृस्थ.**)

**९५.** १ **य.** °रुसौनि. २ **यमु.** °मग गणपति आपयोपुढें गोसावीयांचीया गोष्टी सांघति : गुण अनमोदीत आश्चर्य बोलति : गणपति आपयो म्हणितलें : " तरी मी गोसावीयांचीया दर्सन येवों ? " ३ **यमु.** " ना रे बा : ते आगाध असति :—. ४ **गोने.** तयांची. ५ **यमु.** कांटी. ६ **एवा.** तैसें काइ हें ? ७ **अगोय.** राज्यमानु.

ब्राह्मणु जी : कीजैल तें मजचि कीजो :" म्हणौनि उतरलीं : मग : श्रीचरणां लागलीं : ।।

## ९६ भट नाथोबा पूरप्रवीष्ट[1] मंडळीकू रक्षणें

एकू दीं गोसावीयांसि उदेयाचा पूजाअवस्वरू जालेयानंतरें गोसावीं वीहरणां बीजें केलें : गंगेचीए थडीएवरि : भांडेभेदनांसरीयां उभे राहीले : दोहीं पात्रांसरीसीं गंगा जात असे : सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा वानरेया : मंडळीका : तुम्हीं एव्हढां पुरीं पैलाडि जाल गा ?" " जी जी[2] :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि रीगा :" तीं पांगुरणें ठेवीलीं : दोघीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : दोघै रीगाले : थडी पावतपावतां गोसावीं बोलावीलें : " मंडळिका मंडळिका : वानरेया वानरेया :" म्हणौनि फूटेनि बोलावीलें : आणि दोघै परतले : मध्यु पावले : आणि नाथोवा लागले वाहों : आणि वाइसें[3] लागलीं बोबांओं : "जी जी : देवीका कींकरु मंडळीकु वाहवला जी :" आणि गोसावीं थडीया-थडीया बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " एथचि गा मंडळिका : एथचि गा मंडळिका :" म्हणौनि गोसावीं फुटा भवंडिला : आणि नाथोबायें थांव[4] घेतलें : तवं गुडुघेया इतुकें पाणीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : मंडळीकातें कासे लाउनि घेउनि या :" भटोवास गेले : कासे लाउनि घेउनि आले : मग दोघै गोसावीयांचेया स्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा मंडळिका : भागलेति ? " ऐसें गोसावीं संबोखिलें : ।।

## ९७ पुरप्रवीष्ट स्त्री तारणें

देइगांविची वाइल अखंड पींपळु सींपावेया ए : ते अखंड गोसावीयांतें देखे : मग एकू दीसीं गोसावीयांसि सींनस्तळीवरि[1] आसन असे : ते वाइल[2] पींपळु सींपावेया आलीं : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि तांबिया गंगेसि सांडिला : आणि गंगेआंतु घातलें : तीयें गंगेआंतु एओं लागलीं : आवघा लोकु थडीचा होता तो बोवांओं लागला : बाइल पूरें गेलीं : म्हणौनि : एक तेयांचेयां संबंधीयां सांघों गेले : तवं वाइसीं म्हणीतलें : "हा वावा : हे वाइल कैसी बुडे नां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : हे एथिचीया दरीसनाचीया चाडा एती असैल[3] तरि तीएतें नेणों कोणचि तारील :" मग तीयें आलीं : गोसावीयांसि दंडवत केलें : स्रीचरणां लागलीं : तवं मागीलीकडौनि तेयांचे दीर[4] भावे आले : तयां आस्चर्य जालें : तीं गोसावीयांसि दंडवते घातलीं : स्रीचरणां लागले : मग

---

९६. १ **यगो**. पव्हणी. **अ.** प्रविष्टी. २ **गो.** °गोसावी म्हणति तरि रीगौनि. **ने.** °जाउनि. ३ **गो.** भगतजनें. **यमु.** भक्तिजनें. ४ **गो.** थावो घेतला. **ने.** ठावो. **यमु.** °तव खडक लागला : गुडघेया°.
९७. १ **प्रवा.** वरिले थडिये. **अ.** सींहंनस्तळी°. २ **मु.** बाइको. ३ **हीबीगोपं.** असे. ४ **गोयमुपंने.** देर.

तीयें नीगालीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "यांसी सांगडि बांधा : कासे लावा :" "जी जी : इयें आलीं तैसींचि कां न वचावी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ ऐसें[५] एओं ए : तैसें[६] जाओं नैए :" मग तैसें तेयांतें घेउनि गेले : ।।

## ९८ आउ फुटाक्षेपणीं जळघोखु निवारणें

एकू दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वीहरणां बीजें केलें : पींडापासि आसन असे : गोसावी नीरूपण करीत असति : खळाळु वाजतु असे : तेणें निरुपण कांही प्रवेसन नव्हे : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : या खळाळाहातीं नीरूपण प्रवेसन नव्हे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : हा फुटा आड[१] घाला :" आउसें गेलीं : तयां फुटा आड[२] घातला : आणि वाजतु होता तो राहीला : निरुपणावसान जालें : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : जा : तो फुटा घेउनि या :" आउसें गेलीं : फुटा घेउनि आलीं : आणि वाजों लागला : आणि भगतजनीं म्हणीतलें : "हें काइ जी : एव्हढा वेळु कांहीं वाजे ना : आतां कैसा वाजतु असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें आउएचें सामर्थ्य गा :" आउसीं म्हणीतलें : "आउचें काइ सामर्थ्य होइल ? हें स्वामि जगंनाथाचें सामर्थ्य :" मग गोसावीं गुंफे बीजें केलें : ।।

## ९९ आउपींडउपाहारुस्वीकारु

एकु दीं सोमवारी जाली : तो सोमवारीये अपारू लोकु आला असे : आउसें बाहीरि नीगालीं : गंगेकडे गेलीं : तवं कोण्हीं आंघोळी करिताति[१] : कोण्हीं पींडप्रदानें करिताति : ऐसें आउसीं देखिलें : आणि आउसां ऐसें भरलें : 'लेंकीही मींचि : लेंकुही मींचि : वापुडीं पीतरें लुलातें[२] असती :' मग एका ब्राह्मणापासि आलीं : "हे रे : पींड पाडिसी रे ?" "हो आइ :" मग गोसावीं दीधला बाहीरवासु तो तेयां ब्राह्मणासि दीधला[३] : मग तेयाकरविं पींड पाडवीतें असति : तवं भटोबास गंगेकडे गेले : तवं देखिलें[४] : आणि भटोबास आले : "जी जी : देखिलें ए आउयेचें करण : गोसावीं जो दीधला बाहीरवासु : तो कीं एका ब्राम्हणासि दीधला : तेयांकरवि पींडु पाडवीत असे[५] :" ऐसें भटोबासा सांगों सरलें : तवं आपण लवकरि[६] आलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ नाएका : तुम्हीं दीखीतांची कंन्या : उपासनीयांची सुन : नाथपंथीं उपदेसु[७] : तेणें कांहीं तुमचेयां

---

५ **गो.** ऐसेयां. **हीबीपं.** जैसें. ६ **गो.** तैसेयां.

**९८.** १ **अगोहीबीने.** तेयावरि पसरौनि—. २ **अगोहीबीने.** तेयावरि फुटा पसरौनि°.

**९९.** १ **ने.** कोणी तर्पणें करित असेति. २ **यगो.** लुलुवातें. ३ **यमु.** आउसीं कणीक आणिली. ४ **य.** °जवळि गेले : मग आउसीं म्हणितलें : "आरे बा नागदेया : बापुडेयांसि कोण्हीं देतीं नाहीं : चक्रस्वामीपुढें न संगे :" भटोबास गोसावीयांपासि आले°. ५ **यमु.** °आपण नावें सांघतें असति : ६ **हीबीगो.** लवकरूनि. **ने.** लवलव करूनि. ७ **यमु.** °चातुर्वर्णीं भीक्षा.

पीतरांसि नव्हेचि : वर एथिचें दरीसन : तेणेंहीं नव्हेचि : मां आतां एणें होइल ? करावें ऐसें उपजे तरि एथचि करूं नैए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जा : एकु दामु ओपा : वाहीरवासु मागौनि आणा : " भटोबास गेले : तया ब्राम्हणा एकु दामु दीधला : बाहीरवासु घेउनि आले : ॥

मग एकु दीसीं भटोबास देइगांवा गोसावीयांचीं वस्त्रें आणावेया नीगाले[८] : तवं आउसीं म्हणीतलें : " जी जी : स्वामीं जगंनाथा : नागदेयाकरवि मातें पैलाडि घालविजो : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया[९] : नाएकातें पैलाडि घाला गा : " " हो कां जी : " मग भटोबासीं आउसांतें पैलाडि घातलें : " आउ : तुं पुढां एसी तरि मातें पारुख : आणि मीं पुढां एइन तरि तुतें पारुखैन : " आउसें नाथोकोरोचां छत्रासि गेलीं : आउसीं म्हणीतलें : " है रे : भातु असे ? " " आउ : सीळा असे : " " घेउनि ए रे : " तेहीं सीळिया भाताचीया ढेंपा आणिलीया : आउसीं बाहीरिवासु पसरीला : " आणीकु भातु आणि रे : " आणिकु भातु आणिला : " कांहीं महीं आणि रे : " तीं महीं[१०] आणिलें : लोणिचें मागितलें : गांवांआंतुही दहीं मागीतलें : दहीभातु कालवीला : मोट बांधौनि घेउनि आलीं : तवं भटोबास पुढां आले : तवं गंगे पाणीं चढत असे : " चाल चाल आऊ : गंगे पाणीं चढलें : " दोघें रीगालीं[११] : मध्यु पातलें : आणि थाओ नाहीं : आणि[१२] भटोवासीं म्हणीतलें : " आउ : सांडि सांडि भातु : वाहावलों : " " हो कां रे बा नागणां : " आउसीं मोट खालि[१३] घातली : दांतें पदरु[१४] धरीला : पैलु ठाओवरि गेलीं : तवं थाओ लागला : भटोबासीं म्हणीतलें : " कटकट आउ : गोसावीयांचा वाहीरवासु गेला : इतुका दहींभातु गेला : " " न वचे वा नागणां : " " कें आहे ? " " हा घे : " म्हणौनि काढिला : मग गोसावीयांपासि आलीं : गोसावीयांसि सींहनस्तळीवरि[१५] आसन असे : आलीं : आणि गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग भटोबासीं मागील गंगेचें गोसावीयांपुढां सांघीतलें : गोसावीं आइकीलें : गोसावीयांपुढें मोट ठेविली होती[१६] : मग गोसावीं उभेयां ठाकौनि उपासनीयांकरवि तयांचे पींड करविले : मग तीं आवघेयांचे पींड केले : मां ते तैसेचि बैसति : मंत्र म्हणति : मग आधीं गोसावीयांचां ताटीं तैसाचि ओळगवीला : मग आवघेयां तैसेचि दीधले : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आउवेचें पींडप्रदान एथौनि चरीतार्थ गा[१७] : " ॥

---

८ **अने**. गेले. ९ **यमु**. °तुम्हांसि काइ पैलाडि व्यापारू असे ?" "हो जी : लुगडीं आणुं जावें असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : "लुगडीं आणुं जाल तरी——. १० **यमुगोपं**. °दहीं घातलें. ११ **यमु**. °तेहीं कास धरिली. १२ **यमु**. °भटोबास वाहवले. १३ **यमु**. उदकांतु. १४ **यमुने**. पालौ. १५ **एवा**. पींडापासि. १६ **यमु**. सर्वज्ञें म्हणीतलें : "पींडप्रदान कां वर्त्ते ना : " मग बाइसीं मोट सोडिली : आवघेयांचे गोळे केले : मग गोसावीयांपुढें एक गोळा ठेविला : एकेकु गोळा आवघेयापुढें ठेविला. १७ **एवा**. °बाइसांकरवि पींड करवीले : बाइसाकरवि देववीले.

## १०० देवद्रोणीं देवतापूजा स्वीकारु

एकु दीं गोसावीयांसि दुपाहारिचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु जाला : उपहुडु जाला[१] : मग गोसावीं भगतजनांतें राहावीलें : मग एकलेयांचि देवद्रोणीं बीजें केलें : गोसावी तेथ उभे राहिले : तवं[२] देवता नीगालीया : खळीचे साउले : खळिचीया चोळीया : हातीं कनकाचे परीयेळ : वरि रत्नांचे दीप : ऐसीया आलीया : चंद्रदेव ते भामांठाणीं[३] पढति : तयां सात वार : जे दीसीं तयांसि वार नाहीं तें दीसीं ते गोसावीयांचेया दरीसनांसि एति : तें येताति तवं गोसावीयांतें बीजें करीतां देखिलें : आले : गोसावीयांसि पूजा होत असे : आणि भियाले : ते एका ढगाआड[४] राहीले : गोसावीयांसि तेहीं पूजा केली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : मग गोसावीं तयांसि पाठवणी दीधली : मग गोसावीं बीजें केलें : चंद्रदेव आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतले : " हें काइ चंद्रेया : तुम्हीं केधवां आलेति ? " " जी जी : मीं आतांचि आलां : " " काइ देखिलें ? " " जी जी : येथौनि देवता निगालीया : तीं गोसावीयांसि पूजा केली : मग तीया गोसावीयांचेया श्रीचरणां लागलीया : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइसें पुसती तरि नोको सांगों : " " हो कां जी : " मग गोसावीं गुंफेसि बीजें केलें : तवं ते हांसों लागले : बाइसीं म्हणीतलें : " हां चंद्रेया : हांसतासि कां ?" मग *तेहीं*[५] आवघी लीळा बाइसांपुढां सांगीतली : *बाइसीं म्हणीतलें : " हां बाबा : मज कां चुकवीलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथौनि आतां तुमतें केधवांहीं न चुकवीजे हो*[६] " ।।

## १०१ भांडेभेदनीं भीक्षांन आरोगण

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें : मग वाइसातें सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : आजि कांहीं करुं[१] नको : आजि माहात्मेयांचें[२] भीक्षांन भोजन कीजैल : " " हो कां वावा : " ते दीसीं वारसि : भगतजन[३] आवघे भीक्षा करावेया गेले : दोघ एक भगतजन आले : आणि गोसावीं भांडेभेदनां बीजें केलें : तयावरि गोसावीयांसि आसन जालें : भगतजन एति : गोसावीयांसि द्रीष्टपुता[४] झोळिया करीति : वाइसें गुंफेहुनि नीगतां हळुचि माहादाइसां निरोपु दीधला : " रुपै : मातें वावा निवारिलें आहे : भिक्षेसि काइ एइल ? मग वावासि काइ आरोगण होइल ? तरि तुं च्यारि तांदुळ वेळुनि घेउनि ये : " " हो कां : " माहादाइसीं वरवे तांदुळ वेळुनि : बुंथीआंतु

---

**१००.** १ **एवा.** °गोसावीं वीहरणा पींडापासि बीजें केलें—. २ **यमु.** °उदकांतुनि दोनि देवता—. ३ **यमु.** बादाठाणीं. ४ **ने.** खडका°. ५ **एवा.** गोसावीं. ६ **(गोहीवी.)**.

**१०१.** १ **यमु.** तांदुळ वेळुं. २ **यमु.** भीक्षुकांचें भीक्षान्न स्वीकरीजैल. ३ **य.** भक्तिजन. **ने.** भक्त°. ४ **यमुगोने.** दृष्टपूता. **ही.** दृष्टिपूता.

झांकुनि घेउनि एतें असति : गोसावीं चीमेनि[5] हाणीतलें : माहादाइसीं म्हणीतलें : "काइ लागे भांडेयासि :" म्हणौनि भओं[6] लागलीं : हाणितलेयासरीसें भरणुकें ठीकरीया जालें : आवघा भातु सांडला : बाइसीं म्हणीतलें : "कटकट बाबा : आवघा भातु वांयां गेला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें वारिलें कीं ? अखंड तुमचेंचि होआवें ? यांचें एथ केधवांहीं न व्हावें ? तरि एहीं काइ मरावें[7] ?" "काइ बाबा : भीक्षे काइ एइल : मां बाबासि काइ आरोगण होइल : म्हणौनि मीयां च्यारि तांदुळ वेळवीले : बाबा : इतुका भातु वांयां गेला :" मग आवघे भगतजन भीक्षा करुनि आले : गोसावीयांसि द्रीष्टिपुता झोळीया केलीया : बाइसांहातीं दीधलीया : बाइसीं धडु पदार्थु गोसावीयांलागौनि नीवडीला : गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनीं सीळांतळांवरि अनें[8] घातलीं : गोसावी आरोगण करीति : तेवीचि भाळप्रदेसावरि स्रीकरु ठेवीति : "हा पैलु कोणु गा : भाताचेया टेंकाआडु झीळिमीळीतु दीसतु असे ?" "हा देविका दासु वानरा :" मागुता भाळप्रदेसावरि स्रीकरु ठेवीति : आणि म्हणति : "हा पैलु भाताचेया टेंकाआड : झीळिमीळीतु दीसतु असे कोणु गा ?" "जी जी : देवीका कींकरु मंडळीकु :" ऐसे वीनोद करीत गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला[9] : *मग गोसावीं गुंफेसि बीजें केलें[10] :* ॥

## १०२ सारंगपंडितां स्त्रीअधिकारु निरुपण

एकु दीं गोसावीयांसि सीहंनस्तळीवरि[1] आसन असे : तवं सारंगपंडीत गोसावीयांचेया दरीसनां आले : तवं गोसावीयांतें वेढाळुनि[2] भवंतीया बाइया बैसलीया असति : गोसावी निरुपण करितातिः ऐसें सारंगपंडितीं देखिलें : आणि म्हणीतलें[3] : "कैसीया गुलुगुलीया[4] : सातसीया परवडी वेढुनि[5] बैसलीया असति : आवघीया नेउनि घालावीया[6] तेलंग देसीं : मग कांडवावें[7] कोदें[8] : मग आपण असीजे गोसावीयांचां संनिधानीं :" ऐसें पोटीं म्हणत साउमे आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "यासि करा गा तें :" "जी जी : मींचि आपणेयांसि करीन :" ते जैसे वस्त्रेंसीं गोसावीयांचेया दरीसनांसि आले तैसे जाउनि पाणियांतु बैसले : वाडुवेळु जाला : मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : वाडुवेळु पांडा उदकाआंतु बैसला असे : तरि आतां बोलाविजो ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें

५ **यमु.** चीमयाचेनि (**य.** चिमेयाचेनि) खडेनि. **हीबीने.** चीमखडेनि. ६ **यमु.** पाहों. **अ.** भेओं. ७ **एवा.** करावें. ८ **यमु.** अन्नें. ९ **अगोने.** °**एवा.** दुसरी लीळा भीन्न. **यमु.** रास्यांतराची ते यथचि लीळा. १० (**यमुनेहीबी.**).

**१०२.** १ **यमु.** पींडावरि. **गोने.** छीनस्तळी°. २ **यमु.** वेंटाळुनि. ३ **एवा.** मनोरथु केला. ४ **यमु.** गुलगीया. **गो.** गुळुलीया. **बी.** गालगुलीया. ५ **अ.** घेउनि. ६ **यमुनेही.** घालीजति. ७ **यमुनेही.** कांडवीजति. ८ **हीबी.** कोदेभातु. **पं.** कोदेभातें.

तोचि जाणत असे : " मग तेया दंडाचें मान जालें : मग ते आले : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं ऐसें म्हणां : कैसीया गुलुगुलीया : सातसीया परवडी वेढुनि बैसलीया असति : आवघीया नेउनि घालीवीजति तेलंग देसीं : मग कांडवीजति कोदे[८] : मग आपण एथ असीजे : धर्माचीया चाडा सातसीया परवडी एथ बाइंचि[९] कां नसावें ? तुम्हीं काइ करावें असा एथ टोंग[१०] ? हां गा : तुमचे जीव : मग यांचीया काइ जीउलीया ? तुमतें आनु देओ राखता : आणि यांतें काइ आनु देओ राखता ? ऐसें काइ एथ असे ? " ऐसें गोसावी कोपले[११] : ।।

## १०३ गोविंदधावणीं सारंगपंडितीं स्तुति करणें

एकु दीं गोसावीयांसि उदेयाचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वीहरणां बीजें केलें : सरीसें भगतजन असति : गोसावीयांसि रामनाथाचिए पटिसाळेवरि आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें[१] : " या लखुमेयांसीं कोण्हीं धांवतां पुरैल गा ?" तवं सत्यादेवीचा गोंदो गोसावीयांचेया दरीसनां आला होता : तेणें म्हणीतलें : " जी जी : मीं पुरैन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुं न पुरेसी[२] गा : " " नां जी : मीं पुरैन[३] : " मग गोसावीं सींहं-नाराएणाचां कोणटां : आणि[४] आपण : ऐसा भो केला : दोघै धांवींनले : दोघै कोनटा सीउनि गोसावीयांकडे एत होते : तवं गोंदोचां पाइं खडा कसकरला : तो पडिला : 'गोंदो पडिला :' म्हणौनि भगतजन बोवाइले : गोसावीं धांवत तेथ बीजें केलें : गोसावीयांवरि चांदोबा धरिला : ते उठवीले : गुडघां दुखवले : तेथ गोसावीं पीक घातली : सावध जाले : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुमतें म्हणीतलें कीं या लुखदेयासीं न पुरसी ? एथौनि वारिलें तें न कीजे कीं गा : " मग गोसावीं सारंगपंडितांची वास पाहीली : सारंगपंडितीं म्हणीतलें : " जी जी : द्वापरीं सरपंजरीं पडिलेया भीक्षमांतें श्रीकृष्णचक्रवती यादवांसहीत पडिताळावेया बीजें केलें : पालव छत्रें : वरि गंगावनें चवरें ढळति : मग तो जैसा अवस्वरु मीरवला तैसा हा अवस्वरु मीरवतु असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा पांडेया : पांडीत्य कीजताए ?" " नां जी एथार्थु : " मग गोसावीं *गुंफेसि* बीजें केलें : ।।

---

९ **यमु.** एहींचि. १० **यमु.** टोंगळां. ११ **एवा.** निरूपिलें.

**१०३.** १ **यमु.** °तुम्हांआंतु लखुमुदेयासीं धावंतां उपकरे ऐसा कोण्ही असे ?" **भागवतवासना** लखुमयासीं होडा धांवे ऐसा कोण्ही नाहीं ? " **वाल्हदाये :** लखुमेयांसीं होडा धांवे ऐसा कवण असे ? २ **गो.** नुपकरसि. ३ **गो.** उपकरैन. ४ **पं.** आंगिएचा भो. ५ **गो.** भीक्ष्मातें. **य.** भीक्षमदेयाते **मुबीपं.** भीष्मातें.

## १०४ खेइगोइ भेटि[१]

तीयें[२] जैसींचि गोसावीयांचेया दरीसनां आलीं : तैसींचि राहिलीं :॥

## १०५ ताकवताची भाजी रांधवणें

एकु दीं[१] गोसावीयांलागौनि कोणें नेणों कोंवळा ताकवतु आणिला : मग तो गोसावीं निसीला[२] : गोसावी तीं ठाइं मोडीति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आधण ठेवा : हींगु लावा :" बाइसीं आधण ठेविलें : हींगु घातला : आधाण तापलें : मग गोसावीं ताकवतु घातला[३] : बाइसीं मीठ घातलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आणिक मीठ घाला : पुर्ण लोण करा :" मग बाइसीं आणीक मीठ घातलें : आणि बाइसीं दाखवीला : "बाबा : सीजला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नावेक सीजों देया :" मग नावेक सीजला : मग उतरिला : मग गोसावीं उतरितां तेल घातलें : मग गोसावी सींहस्तळीवरि[४] बीजें केलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : गोसावीं तेथचि भाजी आणवीली : "बाइ : एथचि भाजी आणा :" बाइसीं भाजी आणिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा : ताटें काढिजति नां ?" "जी जी :" मग भगतजनीं पाखाणाचीया तळिया अपणेयां जेवावेया केलीया होतीया : तीया काढिलीया : तीयांवरि अंनें घातलीं : वरि नीवणीं केलीं : *भटीं भातु चुरूनि निवणें केलें*[५] : मग गोसावी तीनि चुळ पाणीं घालीति : आणि करांगुळीया भाजी घालीति : *तवं अवघेया भक्तजनाची नीवणीं गळिनलीं : पाणी सांडलें : भटाचें न गळेचि*[६] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आवघेयांचीं नीवणीं खोंकरें : वानरेसांचें नीवणें नीगळ :" मग भगतजन तृप्तिपर्यंत जेवीले : तीयें भाजीयेची रुचि तेचि जाणति :॥

## १०६ भटां पातलेपण अनुवादु

एकु दीं गोसावीयांचीया दरीसनां ब्राम्हणु एकु आला : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : नावेक गोसावीयांपासि बैसला होता : मग गोसावीं तेयासि

---

**१०४.** १ **हीबी.** 'खेइगोइ भेटि : सी(छी)नपापीं असे ॥ २ **पं.** खेइगोइ तीया घोगरगांवीचीया : तीया गोसावीयांचेया दर्शनां आलीया : . . . . . तैसीयाचि राहिलीया : अनुसरलीया : ॥

**१०५.** १ **यमु.** °गोसावीं बाइसातें म्हणीतलें : "बाइ : भाजी रांधा : चाकवतु आणा :" "हो कां बाबा" मग बाइसीं बरवा कोवळा चाकवतु आणिला : **मु. शोध.** उदेयाचा पूजावसरू जालेयानंतरें पैलाडिला वडाचां पालवीं गोसावियांसि आसन असे. तवं टाकळीयाची माळीणि देइगावीं वीकावेया नेति होती : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि पाटी उतरीली. . .बरवा कोवळा चाकवतु दर्शना केला. २ **य.** बाइसें नीसीतें होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें नां : टाहाळु तीं ठाइं करा : मग बाइसीं नीसिला : तीं ठाइं मोडीला : **पं.** नीसवीला. ३ **गो.** घालवीला. **य.** हींगु घालवीला. ४ **गोने.** छीन्न°. ५ **(हीबीमुपं.)**. ६ **(मु.)**.

पाठवणी दीधली : ते निगतां आपार दुख करूं लागले : मागुतें गोसावीयांतें पुसति : मागुतें पुसति : मग निगाले : मग भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : यांसि ऐसें दुख उपजताए : आम्हां कां नुपजे जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " यांसि पातलेपण नाहीं : तुम्हांसि पातलेपण असे : " ऐसें सांघीतलें : ।।

## १०७ पंचगंगा अनुवादु

देइगांवींचा[1] एकु ब्राम्हणु : तयांतें पांच कंन्या : तीया पांचै वीधवा : म्हणौनि तेयांतें ' पांचरांडा आला : पांचरांडा गेला[2] : ' ऐसें म्हणति : तेणें तो ब्राम्हणु जळे : मग तो एकु दीं गोसावीयांचेया दरीसनां आला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : तुमचिया पंचगंगा निकेनि असति ? " " जी जी : निवालां जी : ऐसें मातें कव्हणी न म्हणे जी : मातें ' पांचरांडा ' वांचौनि आळवीति ना जी : " मग आले : दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : मग नावेक गोसावीयांपासि बैसले होते : मग गोसावीं पाठवणीं दीधली : ।।

## १०८ मंडळीकु विज्ञापनें स्त्रीए भेटि

नाथोबा घोगरगांवां भिक्षा करावेया जाति : बाइ[1] एकि ते म्हणे : " हां बावा : गोसावीयांतें विनवा कां : मीं गोसावीयांचेया दरीसनां एओं ? " " हो कां : मीं आजि गोसावीयांतें वीनवीन : " गोसावीयांजवळे एति : आणि वीनउं वीसरति : एरी दीं मागुतें भिक्षे जाति : " कां बावा : वीनवीलें ? " " नां : मीं वीसरलां : मां आजि वीनवीन : " मागुतें वीसरति : " कां बावा : वीनवीलें ? " " नां : मीं वीसरलां : " मग तीयां पालवीं गांठि घातली : मग गोसावीयांजवळे आले : गोसावीयांसि द्रीष्टपुत झोळी केली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा मंडळिका : हे पालवीं गांठि काइसी गा ? " मग आठवलें : " हो जी : हे एकि बाइल : जी जी : ते[2] मातें म्हणे : ' बावा : गोसावीयांतें वीनवा कां : मीं गोसावीयांचेया दरीसनां एओं ? ' तें जी मीं वीसरें : मग आजि पालवीं गांठि दीधली : तों आजि वीसरलां : जी जी : तरि जाओं : तीएतें बोलाओं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका[3] : तें साच करावें लागैल : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : " मग नाथोबा तयांतें बोलाउनि आले[4] : तयांतें सीहंनाराएणांचीए निरुत्य कोणटां उभें केलें : आपण गोसावीयांजवळे आले : मग गोसावीं स्त्रीचरणीं उपान्हौ घातलीया : मग

---

१०७. १ **यमु.** घोगरगावीचा. **एवा.** वाडेगावीचा. २ **अने.** आला.

१०८. १ **गोपंने.** बाइल. **होबी.** बाइको. २ **यमुहीबीपंगो.** °नीच. **ने.** °नित्य. ३ **यमुने.** °बोलिलेति तें–. ४ **यमु.**. . .बोलाअुं गेले : गोसावीयांसि सीहंनारायणीं आसन असे : वोळग दाटली असे : घेउनि आले : तवं वोळग देखिली : मग सीहनाराएणामागां बैसवीली : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी ते स्त्री दर्सना आली असे : तरि तेथ बीजें करावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें :

गोसावीं तीए बाइएपासि बीजें करितां : नाथोबाचेया खांदावरि श्रीकरु घालुनि बीजें करुं आदरिलें : तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : नाथोतें कां नेइजत आहे ? यातें राहावीजो ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : मंडळीकु एथिचा अवेवु कीं : एथ याचा काइ निरोधु असे ?" तेथ बीजें केलें : नाथोबा आन्हांचि[५] राहीले : गोसावीं तयांतें हणवटीए धरिलें[६] : नावेक होते : आणि म्हणीतलें : " बाइ : कांहीं आति ?" " जी जी : निवालीयें जी : " मग पाठवणीं दीधली : मग गोसावीं बीजें केलें : मग नाथोवातें म्हणीतलें : " मंडळिका : तुम्हीं कां गा नैयाचि ? तुमचा काइ एथ निरोधु असे ? तुम्हीं एथचा अवेवु कीं : " मग गोसावी तयां पाठवणीं देउनि आले : मग बाइसीं म्हणीतलें : " हें काइ बावा : लवकरि बीजें केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : विखयानंदु होता : तो निवर्तला : मग परमानंदु प्रगटला : बाइ : *ईश्वरीं विखयप्रेम तें दुर्लभु*[७] *:* " *सर्वज्ञें म्हणीतलें :* " *बाइ : कव्हणी एकि वीरहीणी असे : तीएचा पति देशाउरा जाए : मग तीएसि आणिकें काइसेनहीं सुखासि नैए : तयाचें आंगीटोपरें : पुड्डवाटुवा : कां तयाचीए ठाउनि कव्हणी ए : तेंणे सुखासि ए*[८] *: एकी आफ़ळ साफळ करी : एकीचेनि नावें तो विखोचि नव्हे : तीएसि चंदन तैसा चीखलु : अन्न तैसी माती :* " ॥

*यावरि नाथोबाएं म्हणीतलें :* " *जी जी : मी या बाइलेचेया घरा नीच भीक्षे जाएं : तवं इएचा वरैतु मज बरवी भीक्षा घालवी : तेयांसि मी कांहीं बरवें बोलें : नीरोपण करीं : तया जें मागिजे तें दे : परि उचीत काळीं नेदी : आणि इएसि कांहीं न बोलें : परि इएतें मागीजे तें उचीत काळीं तेव्हेळीचि दे :* " *सर्वज्ञें म्हणीतलें :* " *मंडळीका : पुरुषांपसि स्त्रिया स्नेहाळुवा :* " " *हो कां जी*[९] *:* " ॥

## १०९ मंडळीका भीक्षानएनों स्त्री-विकारु कथन

नाथोवा देइगांवां[१] भीक्षेसि जाति : एका घरा जाति : ते बाइल कवाड घाली : मग भीक्षा घेउनि ए : कोण्हीं ए : मग भीक्षा घाली : तवंपरियंत तेयांसीं गोष्टी लावी[२] : ऐसें नीच तेया घरा जाति : मग एकु दीं गेले : तया कवाड घातलें : हातीं भीक्षा : तयांसीं गोष्टी करीत आहे : तवं तयांचा भातारु वाहीरिलाकडौनि आला : मग तया भीक्षा घातली : मग नाथोबा गोसावीयांचेया दरीसनां आले : द्रीष्टपुत झोळी केली :

---

"हें काइ तुमचीए नाथेचा बैलु ? मग बोलाविलेयां येइल ?" ते उगेचि राहिले : मग वोळग वीसर्जली (**एवा.** पाठवीली.) सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीकें म्हणितलें तें करावें लागैल : " मग गोसावीं श्रीचरणीं उपान्हौ घातलीया—. ५ **गोने.** ऐन्हांचि. ६ **एवा.** °क्षेमाळींगन दीधलें. ७. (**पं. प्रव.** वि. १३५). ८ (**दृपा.** ८७. विरहिणीचा दृष्टांत, 'घोगरगावीचीय बाइयेवरि छिन्नपापी निरूपिला :' —**दृस्थ.** माझ्या मते तिन्ही विरहिणींचे दृष्टांत एकाच वेळी दिलेले आहेत. ते तिन्ही मिळून एक सूत्रबद्ध विचार व्यक्त होतो. म्हणून इतर विरहिणींचेही दृष्टांत (क्रम ८८ व ८९) मी येथे घातले आहेत.). ९ (**प्रव. विमा.** १२८).

**१०९. १ यमु.** घोगरगावां. २ **अ.** करी.

सर्वज्ञें म्हणीतलें : " उसीरु कां केला गा मंडळिका ?" " जी जी : मीं एका घरां भीक्षेसि जाएं : तीये घरिची बाइल[३] आधीं कवाड घाली : मग भीक्षा घेउनि ए : गोष्टी लावी : मग कोण्हीं ए तेव्हळि भीक्षा घाली : जी जी : तवं मीं गेलां : तीया कवाड घातलें हातीं भिक्षा : मजसीं गोष्टि लाविली : तवं वाहीरिलीकडुनि तीएचा वरैतु आला : मग आधीं कवाड उघडीलें : मग भीक्षा घातली : म्हणौनि मज उसीरु जाला जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरा : *जेणें संबंधें विकारु उपजे तेयाचा असंबंधु कीजे*[४] : मां तुं तेया घरा भीक्षा करूं कां जासि ?" " जी जी : ते[५] वेळणी एकि भीक्षा घाली : म्हणौनि जाएं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " आति : यातेंहीं देखौनि एका वीकारू भोगुं आवडे : " मग कळावी बीरवणें याची[६] गोष्टि सांघीतली[७] : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकि अस्त्री तीएचा वरैतु[८] सरला : ते दुख करीत होती : मागां[९] जेणेसीं गेली होती तो पडिताळावेया आला : *तेयांतें देखिलें : आणि पालज सरिसा केला : सरला तेयाचें काहींचि न वटे*[१०] आपण तेयातें एतां देखिलें : आणि हावभावीं आपलवली : एवं परीएंत वीकारु माजवीता गा :" ॥

## ११० भोजेया संकतुळसी अनुवादु

एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया[१] : एथौनि तुम्हां संकतुळसी दीसताति गा :" आणि दाएंबायें म्हणीतलें : " हें काइ जी : मज भोजेयासि कैसीया संकतुळसी लागती ?" सर्वज्ञें म्हणीतलें[२]: " तरि एथौनि लटिकें बोलीजताए ?" मग गोसावीं बीजें केलेया उपरि चांगदेविचे बडुवे सरले : मग तीहीं तीया वृतिसि दायंबा बैसवीले : मग दायंबा चांगदेवालागौनि[३] संकीं उदक तुळसी घेउनि जाति : *भक्तजनें भेटौं जाति : ते हांसेति*[४] " हें काइ दायंबा ?" " हें मज गोसावीं वीहीलें : " तयांचीए ब्राम्हणी नांव पोमाइसें तीयें भीक्षा मागावेया जाति : तयांतें म्हणति : " भीक्षा काइसेया मागतें असा ? काइ गोसावीं भीक्षा मागवीली आहे ? तरि काइ वीसरलेति ?" ॥

## १११ दायंबा स्त्रीनोमीत्य दुख करणें

एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजा मरता तरि नीकें होतें[१] :" तवं बाइसीं म्हणीतलें " तरि काइ बाबा : बापुडा भोजा मरैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजा न मरे : जें मरावें तें मरैल : भोजा जायेनिमित्यें थोर दुखीया होइल : मग भोजेयासि पुनसंबंधन[२] होइल

---

३ **यमु.** °ते बाइल पुसे : " देव हो : तुम्हांसि देवी असे ? देवी कां न करा ? देवीवीण गमे कैसे जी ?" ४ (**प्रव. आ.** १३). ५ **य.** °पाठीं एतुला ऐसा भातु घाली : " ६ **हीबीपं.** हे. ७ (पूर्वार्ध लीळा ५६ पाहा). ८ **आपंहगो.** पति. ९ **अपं.** मग. १० (**अपंह.**).

**११०.** १ **यमु.** °संखतुळसी एत असे. २ **यमु.** °तुम्ही चांगदेवीचेया भोपेयाचे जावाइ " मग ते असन्निधानी चांगदेवीचे बडुवे जाले. ३ **यमु.** °संखतुळसी—. ४ (**यमु.**).

**१११.** १ **एवा.** होइल. २ **हीबी.** दुसरा संबंधु. **मुगोपं.** पुन:संधान.

तेथ दोघ पुत्र होतील :" मग तेयां तैसेंचि जालें : *दायंबा स्त्रीएचेनि थोर दुखी जाले : मग गोसावीयांपासि आले : गोसावीं निरूपण केलें : तवं दायंबाएं पुसिलें : "जी जी : विखो सेवितां पाप नव्हे : तरि धर्मापासौनि निपैंनि कां काढे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : स्त्री म्हणिजे मत्त द्रव्यांचा रावो गा : आणिकें द्रव्यें सेविलयां माजवीति : स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी : म्हणौनि चित्रींची स्त्री न पाहावी : स्त्रीचेनि नावें ठकारही न पाहावा : पाहिलेयां माजवी :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले*[3] : मग दायंबासि दुसरी ब्राम्हणी पोमाइसें जालीं : ।।

## ११२ भोजेया आधड तरु निरूपण

गोसावीयांसि उदेयाचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें : गोसावीं वीहरणां बीजें केलें : सरीसें दायंबामुक्षकरुनि भगतजन : गोसावी सीहंस्तळीए[1] पसीमे : तेया ढगापासि उभे राहीले : तवं अधोपरीं वृक्षु एकु नीगाला होता : तो वारेनिकरुनि आंदोळत असे : गोसावीं अवळोकिला : मग म्हणीतलें[2] : "भोजेया : एथ अनुसरा गा : ननुसरा[3] तरि ऐसेया अधोपरीचेयां वृक्षां होइजैल : मग अनंत काळ दुःख भोगिजतचि असीजैल :" परी ते[4] काहीं न बोलतीचि : ।।

## ११३ दायंबा सीखासुत्रत्यागु अनुवादु

गोसावीयांसि उदेयाचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वीहरणां बीजें केलें : सीहंस्तळीवरि आसन असे : गोसावीयांजवळे दायंबा बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : सीकासूत्रत्यागु करा गा : एथ अनुसरा :" दायंबायें म्हणीतलें : "जी जी : मज[1] इंद्रीया एकाचा निरोधु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो एथौनि धरिजैल[2] :" यावरि गोसावीं ब्रम्हचार्या घोडेयाचा द्रीष्टान्तु निरुपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "ब्रम्हचारी घोडे असति : ते काइ गा मरत असति ? नीरोध साहिलेया अधिका बळ होएः तुष्टि होए : पुष्टि होए : *तैसें*[3] विखो न सेवी तरि जीवु काइ गा मरत असे ? निरोध साहिलेया अधीक योग्यता होए : दक्षता होए[4] :" *दायंबायें म्हणीतलें : "ना जी : मज इंद्रियार्थेविन न गमे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं वासनेचा परिछेदु करा : मां गमैल : परिछेदीं प्रवर्तलेयाचे सकळहि नीरोध नेणों कोणाचि निरपौनि फेडी :" यावरि* दायंबायें म्हणीतलें :

---

३ (**प्रव. आ.** ९–१०).

**११२.** १ **य.** छींह°. २ **य.** "भोजया परमेश्वरेंवीण जीवासि ऐसीं अनंतें दुखें असति :" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कैसा अवघडीं नीगाला असे ? वारेन कैसें दुख होत असे ? तोडुं नए :" सर्वज्ञें म्हणीतलें :— ३ **एवा.** एथ अनुसरा ना—. ४ **पं.** °ननुसरतीचि.

**११३.** १ **रावा.** °इंद्रियार्थेवीण न गमे. २ **एवा.** काढिजैल : धाडिजैल. ३ **रावा.** °इंद्रियार्थेवीन. **एवा.** °वीखयेंविन. ४ (**दृपा.** ७८. ब्रह्मचारी घोडेयाचा दृष्टांत. यावरील दार्ष्टांतिक माझ्या मते

*" जी जी : जेणें वासनेचा परिछेदु होए तो प्रयत्नचि मज होववे ना : मियां काइ करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : पुरुषप्रयत्नीं दैवाचें साह्य[५] : " यावरि दायंबाएं पुसिलें : " जी जी : गोसावी विखोसेवा कां पां वर्जिली : तेथ काही पाप असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : पाप तरि नव्हे : तें तैसेंचि : परि विखो अनंता तापासि आश्रयो : नरकासि हेतु : " " हो कां जी : " म्हणौनि उगेचि राहीले[६] : पर दायंबा ननुसरतीचि : ।।*

## ११४ धर्मनष्ट आति : परि विषयनष्ट नाहीं*

[ [१]गोसावीयांसि छिन्नपापीं[२] गुंफे अवस्थान : एकु दीं दायंबायें गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : मागां पुराणीं भीस्म नरवीर विशेषें आइकों : सुकदेव : वामदेव : नारद : एवमादीक वीखएनष्ट आइकों : तैसें आजि न देखों जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : नरवीरु आति : परि वीखएवीर नाहीं : धर्मनष्ट आति : परि वीखएनष्ट नाहीं : " दायंबाएं म्हणीतलें : " भीष्मशुकादीक काइ वीखएवीर : वीखएनष्ट नव्हती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : राज्य हा एकु विखो : तयाचा तयासि काइ विरामु होता ? म्हणौनि तो वीखएवीर नव्हे ? आणि सुकदेवो : वामदेवो जरि वीखएनष्ट तरि रंभा कां गा आली ? जेणें वीखएनष्ट म्हणे तें तया नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : वीखो काइ एकमुख ? वीखो तो अन्येकमुख : तो काइ कव्हणा त्येजवत असे ?" " हो कां जी : " ।। ]

## ११५ भटां अवक्रीयत्व कथन

भटोबास अंचळा नेसले असति : रोडैले असति : मातिकाम करीत असति : मग बाइसीं ऐसें देखौनि म्हणीतलें : " बावा : हा नागदेओ कैसा अवक्रीयो[१] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : नखाग्रापासौनि[२] केसाग्रवरि[२] सुळुबुळीत[३] वीकारें भरला असे : परि पोरु सीहाणा : उमटों नेदी[४] : वेडेयाचे वीकार बाहीरे प्रगटेति : सीहाणेयाचे आछादति : " ।।

## ११६ तथा तरुदुख निरुपण

गोसावीं प्रश्रेया गुंफेपुर्वे बीजें केलें : सरीसे भटोबास असति : तवं तेथ गांधीया हींवरु असे[१] : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : देखिलीं तरूंचीं दुखें ? वृक्षत्वही पातलेयां

स्वामींचेच आहे. म्हणून समाविष्ट केले आहे.). ५ (**प्रव. आ.** १०१, १०२). ६ (**प्रव. आमा.** ९७).

**११४.** *(**प्रव. आ.** १७, १८).

१ **मुनिबा**°. २ **एवा.** यळापुरीं मढीं.

**११५.** १ **मुहीबीपं.** °दीसतु असे. २ **एवा.** घोंटेयाचीए ठाउनि गळांवरि. **एवा.** पायाचीये ठाउनि डोइवरि. ३ **गो.** चूळु°. **हीबी.** बुचबुचीतु. ४ **मु.** लपवुं जाणे.

**११६.** १ **हीबी.** °सर्वांगीं माकोडे झोंबिनले असति : थबथबां गळत असे--.

परि अवांतरा दुखाचा भोगु न चुकेचि[२] :" "जी जी[३] :" मग गोसावीं गुंफे बीजें केलें : ।।

## ११७ वेसाइ सरवळीं चोरी प्रगटीए करणें

वेसाइसें तीयें कोण्हाची सरवळीं वळुनि[१] देति : तेथिचीं थोडींथोडीं ठेवीति : सांसलीं[२] : मग एकु दीं गोसावीयांचेया दरीसनां घेउनि आलीं : गोसावीयांसि गुंफे आसन असे : गोसावीयांसि दरीसन केलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ बाइ : चोरीचीं सरवळीयें ?" " ना जी : मजकरवि वळवीति : तेथचीं इतुलींइतुलीं ठेवीलीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " पुसौनि घेइजे[३] : न पुसत नेघीजे[४]:" " हो कां : बाबा :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : घेया : एथचेया उपेगा नेया :" मग बाइसीं वेळिली : गोसावीयांसि आरोगण दीधली : ।।

## ११८ आउ दुधा कवडे मागणें

कोण नेणों सणु जाला : आउसां मांडे भीक्षे आले होते : मग एरे दीसीं आउसीं गोसावीयांतें[१] वीनवीलें : " जी जी : स्वामि जगंनाथा : मांडे आले असति जी : तरि दुधालागि कवडे देयावे जी : मां स्वामीं जगंनाथाचेनि प्रसादें चुभळीतचुभळीत जेवीन :" तवं भटोबासीं म्हणीतलें : " गोसावीयांचे कवडे मागौनि दुधमांडे खावे : ते धुळि खाए कां आउ :" " उगा अस रे बा नागणां : काइसेया आड एसी ? तुजइ सुइन : आम्हीं स्वामि जगंनाथाचीं दासरुयें कीं : स्वामि जगंनाथातें न मगों तरि कोणांतें मागों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : नाएकासि दुधालागौनि कवडे ओपा गा :" मग भटोबासीं कवडे दीधले : आउसीं दुध आणिलें : मग दुधमांडे जेवीलीं[२] : ।।

---

२ **हीबी.** सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वरेंवीण ऐसीं दुखें असति गा :" ३ **पंने.** °आणि भटोबास कांटाळले : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्ही कां गा कांटाळलेति ? तुम्ही एक (थ ?) अनुसरलेति कीं गा : अनुसरलेयासि देवत्व तीर्यंचत्व होणें नाहीं कीं गा :" " जी जी :"

**११७.** १ **हीबी.** वळुवळुं. **यमु.** पोथ्यांत हा वृत्तांत पुढीलप्रमाणे : " वेसाइसांचे चुलते घोगरगावीं होते : तेथ वेसाइसें गेली : तयांची सरवळीयें वळिलीं : तयांतु थोडीं ऐसीं चोरिलीं : . . . सरवळीएं बाइसांहातीं दीधलीं : **एवा.** बाइसीं रांधुनि भोजनसमै ताटीं ओळगविलीं : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ यें सरवळीयें चोरीचीं :" . . . . तीहीं म्हणितलें : " हो जी : चुलतीया काइ देती : मां काइ होइल जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : . . . २ **पं.** सासिति. **मुहीबीगो.** सांचिलीं. ३ **गोहीबी.** घेइजति. ४ **गोहीबी.** नेघीजति.

**११८.** १ **यमु.** भटोबासांतें म्हणीतलें : " नागदेया . . . ." भटोबासीं म्हणीतलें : " . . . . धुळि खाए आऊ :" मग गोसावीयातें विनवीलें . . . . २ **पं.** °जवंजवं जेवीति तवंतवं स्वामीं जगंनाथातें आठवीति : तवं गोसावीं बीजें केलें : मग म्हणीतलें : " हे काइ नाएका : एणेंसी जेवीतें असा मां " " जी जी :"

## ११९ भटीं सुस्नात दंडवत घालणें

एकु दीं भटोबास मातिकाम करीत होते : मातिकाम करूं सरलें[१] : मग गंगे आंग धुनि आले : सुस्नात जाले : म्हणौनि गोसावीयांसि दंडवत घातलें : आणि बाइसीं पाठीवरि पाए दीधले : भटोबास कानवडे जाले : आणि बाइसें पडलीं : " देखिलें बाबा : मातें पाडिलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा सुस्नात होउनि एथ दंडवत घालुं आला : मां तुम्हीं याचीये पाठीवरि पाए कैसे दीधले ?" मग उठीले : दंडवत घातलें : गोसावीयां-जवळि बैसले[२] : ।।

## १२० अग्निकुंडीं श्रीकरु दरीसन

पाठकांचे भावे उपासनिये[१] : तेहीं हवनालागौनि खीरि करवीली : मग आपण गंगे स्नाना नीगाले : ब्राम्हणीतें म्हणीतलें : " पाठा एइल : तरि तुं घालसी[२] हो :" "*ना : घालीन कैसी*[३] ?" तवं पाठक आले : तेहीं म्हणीतलें : " ए रे बा : ए : नावेक जेवि :" तेहीं तळीए[४] खीरि उपसिली होती : तेथचि बैसले : जेविले : नीगाले : तवं उपासनीए दारवठां भेटले : "पाठा आला होता कीं ?" "आला होता :" "कांही घालीसी ना कीं ? :" " नां मां :" तेयांतें तीनि कुंडें : एक कुंड उघडिलें : आहुति घालुं बैसले : तवं कुंडाआंतु बरवा गौरु स्रीकरु नीगाला : आहुति नेदीतीचि : तें कुंड झांकिलें[५] : दुसरें काढिलें : तवं तेथही तेंचि देखिलें : ऐसा तींहीं कुंडीं स्रीकरु निगाला : तिहीं कुंडे झांकिलीं[६] : उपवासु केला : ब्राम्हणींसि कोपले : " पापीणीं : हें तुआं तेयांसि घातलें असैल : म्हणौनि एसणें अरीष्ट उठिलें[७] :" मग एरी दीसीं गोसावीयांचेया दरीसनां आले : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : गोसावीयांचें दरीसन जालें : गोसावीयांजवळि बैसले : गोसावीयांचेया श्रीकराकडे पांहों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें काइ पाहात[८] असीजे ?" "जी जी : या श्रीकरासारिखा श्रीकरु माझीए कुंडीं नीगाला :" सर्वज्ञें म्हणीतलें : " आहुति दीधली ?" "नाहीं जी :" " देउनि पाहातेति कां :" " नां जी : माझें अग्निमुखींचि[९] होआवें[१०] :" गोसावी उगेचि राहीले : ।।

---

११९. १ **हीबो.** °दोन्ही गुंफा निर्वाळलीया : पूजावसरासि बरवीया जालीया. २ **रामे.** हे छीन्नपापी. **एवा.** मठीं. **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें न कीजे कीं आणिकांसि तरि अविधि होता : भगतासि अविधि नाही :"

१२० १ **यमु.** "उपासनीए ते पैठणीचे (**प्रश्रा**) । नीवासाचे (**रामे.**) उपासनीयांसि पाठक मेहुणे होति : तयांसि उपासनीए भकति : कदाचीत उपासनीयांचेया घरा जेउं एति : तयांची ब्राह्मणि भाउ म्हणौनि जेउं घाली : ते उपासनीयांसि न मने : एकु दीं उपासनीयांतें श्राध जालें : ते स्नाना नीगाले :. . ." २ **अ.** कालविसी. **यमु.** घालु नको. ३ **(ने.)** ४ **गोने.** तौलीए. ५ **गो.** जापानीलें. ६ **गो.** जापानीलीं. ७ **गोने.** उदैलें. ८ **गोने.** पाहीजत. **एवा.** 'काइ गा ऐसें पाहीजताए'. ९ **गोमु.** °कुंडीचि. १० **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " प्राणियांसि आपुलेया हीताअनहीताचें (**एवा.** सुकृतादुकृताचें) ज्ञान नाही :"

## १२१ माहादाइसां निरए[1] नीरुपण

माहादाइसीं पुराणीं चौरासी नरक आइकीले : मग गोसावीयांतें पूसिलें : " जी जी : पुराणीं चौरासी नर्क बोलीजति हें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साच[2] बाइ : एथौनि निरए निरुपिजति मां देह धरी ऐसा कवणु असे ? देवेंवीण ऐसीं दुखें असति बाइ : असीपत्र : खांडेयाचे धारेऐसीं वृक्षाचीं पानें : देवता[3] हातींपाइं धरुनि तयावरि घालीति[4]: चोहुनि[5] खालि पडति : मागौते घालीजति : ऐसें असीपत्र : १ : लोहाचा कुंभ : तळीं अग्नि जळे : तयाआंतु घालीजति : वरि पर्वताएसणें झांकणें ठेवीजेति[6]: कदाचीत[7] नावेक उघडीति : तवं आवघे डोया काढुंकाढुं नीगति : कपाळावरि मुदगलाचा घाओ देति : आणि वरि माघौतें झांकणें ठेवीति : ऐसे ते कुंभिपाक : २ : खदीरा इंगळ : अव्हा चौरस बारां गाउवांचेनि मानें ढसढसीत खैराचे इंगळ : नेउनि तेयामध्यें घालीजति : कसकसकरि[8] एकु आंगु जळे : मग एरीवानी[9] उलथे[10] : तवं तें कसकसकरि[8] जळे : तवं एर आंग सांधे : ऐसे खदीरांगार : ३ : अव्हा चौरस बारां गाउवांचेनि मानें तांबेयाची पाटी : ढसढसकरि[11] तापली असे : नेउनि तेयामध्यें घालीजति : आणि कसकसकरि जळे : आणि एरीवाहानी उलथे : तवं एर आंग सावध होए : ऐसे ते तांब्रपुष्ट : ४ : तैल्यपाकु तो लोखंडाचा तेलतावा[12] : तळीं आगि जळत असे : सांडसेंकरुनि तेया-आंतु घालीजति : कसकसकरित आंग जळे : मग एरीकडे उलथीति : *तें आंग कसकस-करि जळे : मागौतें उलथीति : तवं एर आंग सांधे[13] :* ऐसे ते तैल्यपाक : ५ : मग एकि घडी योगाएसणी[14] होए : ऐसीं योगें जाति बाइ : " " जी जी : तरि तेयांचीं देहें जाति नां ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तें यातनांदेह कीं : " मग माहादाइसीं पुसिलें : " जी जी : ऐसे नर्क काइसेनि चुकति ? " *सर्वज्ञें म्हणीतलें[13] :* " बाइ : एथीचेयां होइजे तै चुकति : " ।।

## १२२ शास्त्र दृष्टा अदृष्टा कारण निरूपण*

[ [1]छिन्नपापी गुंफे अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : हें निरोपिलें शास्त्र कव्हणी दृष्टाकारणें अभ्यासी : कव्हणी अदृष्टाकारणें अभ्यासी : तरि या दोहींसि काइ फळ होए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : हें शास्त्र दृष्टाप्रति कारण होए : कां अदृष्टा-प्रति कारण होए : " " हो कां जी : तरि दृष्ट तें कवण आणि अदृष्ट तें कवण? " सर्वज्ञें

**१२१,** १ **अगोहीबी**. कळिधर्म. २ **एवा**. आति. ३ **गोनेपं**. जीव. ४ **गोने**. घालीजति. ५ **गोहीबी**. चोहोउनि. **नेपं**. चौहोउनि. ६ **हीबीपं**. °खतखतां कढति. ७ **पं**. °जे कणवेचे असति तेयाकारणें. ८ **गो**. कसकसा°. ९ **ने**. °वाहानी. १० **गो**. उलथीति. ११ **हीबी**. सेंदुर ऐसी. **पं**. धगधग करि. १२ **हीबीपं**. तेलतवा. १३ (**नेगो**.). १४ **हीबीने**. युगा°.

**१२२.** ***(प्रव. आमा**. २४५).

१ **आम्नाय पाठ°**.

म्हणीतलें : "चैतन्य देवता[२] आदिकरूनि सकळ देवता अपरा अमोचका बोलिजेति : हें दृष्ट : आणि चैतन्यापरु परमेश्वरू पाविजे तें अच्युतपद बोलिजे : तें अदृष्ट :" "हो कां जी :" ।। ]

## १२३ मासोपवासिनीवीज्ञापनीं लखुमियां कपाटनीराकरण

सिहंनाराएणीं मासउपवासिनी *मासोपवासी बैसलीया*[१] होतीया : तेथ गोसावी एकाधा वेळु वीहरणा[२] बीजें करिति : चौकीं आसन होए : गोसावीयांचेया श्रीचरणां लागति : मग एकु दीं तीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : हा लखीमींदेवो कवाडें घालितो जी : तेणें आम्हां थोर उवारा होताए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "लखुमीया : कवाडें न घला गा :" "जी जी : मां देवाचीं उपकरणें जाती कीं :" "हें तुमचीए[३] देवाचीं उपकरणें राखैल :" "हो कां जी :" मग ते कवाडे न घलीति : मग तीया नावेक वाराणीं[४] बैसति : मग गोसावी कव्हणांतें पडिताळावेया पाठवीति : "काइ वाया बैसलीया असति ?" "हो बा : गोसावीयांचेनि प्रसादें : वाराणीं[४] एथ[५] असों :" ।।

## १२४ डोंबेग्रामीं मठीं अवस्थान

मग रेइनाएकें गोसावीयांतें वीनवीलें : मग गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरू ज़ालेयानंतरें गोसावी डोंबेग्रामासि नीगाले : नीगतां सीहंनाराएणां तेयांतें पुसावेया गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि चौकीं आसन जालें : तीं गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीया : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें डोंबेग्रामांसि जाइल :" "जी जी : आतां आमतें जयंती : तरि गोसावीं जयंतीवरि राहावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीये दीसीं हें एइल : कां कव्हणां एकातें पाठवील[१] :" मग गोसावीं डोंबेग्रामासि बीजें केलें : तेथ तीनि मठ[२] : एकु दखीणांमुखू : एकु उतरामुखू : एकु पूर्वामुखू : दक्षीणामुखे मठीं पसिमीली भींतीसी : उतरदक्षीण ओटा : दों खांबांमध्यें : तीये मठीं मग गोसावीयांसि अवस्थान जालें : बाहीरीली पटीसाळे : पसीमीली भींतीसीं : उतरदक्षीण ओटा : *तेथ दुपाहाराचा पुजावसरू होए*[३] : ।।

## १२५ नाथोबाकरवि भट बाहीरि घालवणें

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें : गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : गोसावीं नाथोबातें म्हणीतलें : "मंडळिका : तुम्हीं वानरेयातें

---

२ **एवा.** विद्या.

**१२३.** १ **यमु.** २ **अ.** वेहरणा. ३ **अगोनेपं.** तुमचीं उपकरणें. ४ **यमुगोपं.** वाळानीं. **ने.** बाळाणि. ५ **गोनेयमु.** घेत.

**१२४.** १ **गो.** पाटवीजैल. २ **मु.** °येकु नारायेणु मठु : तो उत्तराभिमूख : तया दक्षीणे येकु तो पुर्वाभिमुख : नारायेण मठा उत्तरे नृसींह मठु : तो दक्षिणाभिमूख : ३ **(मु.).**

बाहीरि घाला गा : " "हो कां जी :" *सर्वज्ञें म्हणीतलें*[१] : "वानरेया : तुम्हीं आपणेयांतें बाहीरि घालों नेदा गा : " "हो कां जी : " म्हणौनि नाथोबायें भटोवासांतें दाटुनि दारवरि नेले : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरा बाहीरि घातला मां[२] :" आणि[३] भटोबासां करांउं[४] चढलें : आणि भटोबास नाथोबातें मागिली भींतीसी लावीति : *आणि गोसावी म्हणति*[५] *:* "मंडळीकु लोटीला मां[६] :" आणि नाथोवासि करांउं[७] चढे : आणि नाथोबा भटोवासातें लोटीति : ऐसें गोसावीं नावेक करवीलें : मग पुरें करवीलें : ।।

## १२६ सरभंजनीं देमतीप्रति हिंसापाप नीरुपण

एकु दीं गोसावीयांसि रात्रीचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : बाइसीं फोडी ओळगवीलीया : वीडीया करुनि देतें असति : तवं रेइनाएकाचे भाउ कान्हरनाएक[१] : तेयांचेया घरीं घोडेयांकारणें पाइकीं वळघा केला : तो गजंबु[२] हों लागला : "पाहा पां वानरेया : हा गजंबु[२] काइसा ? " भटोबास उंच मढावरि वळघले : पांहों लागले : तवं पाइकीं घोडेयांकारणें वळघा केला : भीतरिलां बाहीरील नांगवति[३] : आणि बाहीरीलां भीतरील नांगवति[३] : ऐसी घे दे होताए : आणि भटोवासांतें पुर्विल आठवलें : "बळी रे : बळी रे : " म्हणौनि हाक दीधली : तयांतु सब्दुवींधीया[४] होता : तेणें हाकेसरीसें वींधलें : तें कांनसुलां लीगटुनि[५] कांड गेलें : इतुकेनि पाइकीं म्हणीतलें : "हा रे : हे एक भीतरि पाइक आहाति : आणि एक मढाभीतरि[६] पाइक आहाति : वोहटु[७] करा : " मग पाइकीं वोहटु केला : भटोवास गोसावीयांजवळि आले : गोसावीयांसि उंचमढीं आसन असे : मग भटोवासीं म्हणीतलें : "जी जी कान्हरनाएकाचेया[१] घरा पाइकीं घोडेयांकारणें वळघा केला : ते भीतरील पाइक बाहीरीलां नांगवति : आणि बाहीरील पाइक भीतरिलां नांगवति : ते मींयां 'बळि रे बळी' म्हणौनि हाक दीधली : कीं एकें मातें वींधलें : तें माझेनि कांनेंहुनि[८] कांड गेलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुतें एथौनि गजंबु पाहावेया पाठवीलें[९] : तुवां 'बळी रे बळी रे' म्हणौनि हाक देयावेया कारण काइ ? ते एकमेकां जुझजुझों मेले तरि तुज काइ ? तयांतु एकु सब्दवेधीया[१०] होता : तेणें वींधलें : परि एथौनि पाठवीलासि म्हणौनि चुकलें : आणिकासि तरि तें लागतें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां एथौनि म्हणीतलें तें करणीयें कीं गा*[११] *:"*

---

१२५. १ (**मु.**). २ **एवा.** 'गेला गेला वानरा :' ३ **अ.** °भटोवास गर्वा चढले. ४ **एवा.** तात चढे. ५ (**गोनेमु.**). ६ **एवा.** 'गेला गेला मंडळीकु'. ७ **अ.** गर्वं. **ने.** ठाउ.

१२६. १ **गोयमुबीपं.** कान्ह°. २ **गोही.** गजंमू. **ने.** गजबजू. ३ **यमु.** नेणति. ४ **यमुहीबीपं.** °वेधीया. ५ **एवा.** लीगटलें. ६ **गोहीबी.** °वरि. ७ **यमु.** वोहटा. ८ **ने.** कानसुलेंचि. ९ **एवा.** °कीं तुतें 'बळी रे बळी रे' म्हणौनि हाक देयावया कारणें पाठवीलें ? १० **गो.** °वींधीया. ११ (**पं. प्रव. आ.** २५४).

मग गोसावीयांसि पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं वीहरणां बीजें केलें : तेथ एकुएकु दीं एकएकाची मढु झाडावेयाची[१२] पाळी : तीए दीसीं देमाइसांची पाळी : देमाइसें मढु झाडितें होतीं : तवं पौळीसि[१३] अव्हांटा कांड रुतलें देखीलें : तें घेउनि दारवठां रेइनाएकाचा ओळगीया होता तेयासि दीधलें : मढु झाडिला : सडासंमार्जन केलें : चौकरंगमाळिका भरिलीया : मग गोसावीं वीहरणींहुनि बीजें केलें : गोसावीयांसि आसन जालें : मग देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : मीं मढु झाडीत होतीयें : तें पौळीसि[१४] कांड[१५] रुतलें होतें : तें काइसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें तुम्हीं नेणां देमती ? " " नां जी नेणें : " " कान्हरनाएकाचेया[१६] घरा : घोडेयांकारणें पाइकीं वळघा केला : एथौनि वानरेसांतें पांहों पाठवीलें : एणें ' बळी रे बळी ' म्हणौनि हाक दीधली : तेयांमध्यें सब्दवेधीया[१७] होता : तेणें वींधलें : तें कानेंहुनि कांड गेलें : एथौनि पाठवीला म्हणौनि चुकलें : आणिकासि तरि तें लागतें : मग तें कांड काइ केलें देमती ? " " जी जी : तें मीयां दारवठां रेइनाएकाचा ओळगीया होता तयासि दीधलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा मागा : " " हो कां जी : " मग गेलीं : कांड मागौनि[१८] आणिलें : गोसावीं सरु मोडवीला : नाराजु ठेंसौनि पांढरीए पुरवीला : मग म्हणीतलें : " देमती[१९] : हें कां करवीलें हें तुम्हीं जाणां ? " " नां जी : नेणें : " " एणेंकरुनि तो जेया प्राणियासि वोखटें करिता तेयाचें तुम्हांसि नीमीत्य लागतें : हें करितेया नरक : धरितेया नरक : एकु एकासि दे तेयाही नरक : " ।।

## १२७ श्राधभोजनअपराधें भटनाथोबा बाहीरि घालवणें ।। उडीयां घालवणें

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरु जालेयानंतरें : गोसावीयांसि भीतरिलेया ओटेयावरि आसन असे : भटोबास आणि नाथोबा मातिकाम करीत असति : रेइनाएकाचां घरीं स्राध : ते आले : " नागदेवभटो : नाथभटो : *आजि आमचां घरीं श्राध*[१] *:* तुमतें आंवंतिलें असे : " भटोबासीं म्हणीतलें : " आमतें काइ म्हणत असा ? तें गोसावीयांतेंचि म्हणां : गोसावी पाठवीती तरि आम्हीं एउनि : " " नां हो कां : " रेइनाएक आले : गोसावीयांसि दंडवत केलें : स्रीचरणां लागले : मग गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : आजि[१] *आमतें श्राध : तरी*[१] नागदेओभटातें आणि नाथभटातें तेथ जेउं पाठवावें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते माहात्मे कीं गा : ते

१२ **एवा.** राखावेयाची. १३ **गो.** पैली सीहाडां. कांड–. **ने.** पौळीसी हाड कांड–. **यमु.** पौळीसीहाडां कांड. **पं.** °हाता एका : कांड—. १४ **यमुगो.** पौळी सिहाडां. **हीबी.** सीहाडां. १५ **ने.** हांडकांड. १६ **यमुगो.** कान्ह°. १७ **गोने.** °वींधिया. १८ **अ.** मागौतें. **ने.** मोडौनि. १९ **गोने.** °हें कांड कां मोडवीलें°.

१२७. १ **(यमु.)**.

स्राधा[२] कां जेउं येति ?" "ना जी : गोसावी पाठवीती तरि एती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एती तरि कां न पठवीजे ?" तैसेंचि ते आले : "नागदेओभटो : नाथभटो : मींयां गोसावीयांतें वीनवीलें हो :" "हो कां :" रेइनाएक गेले : तीं मातिकाम केलें : मग भटोबास : नाथोबा : आंगें धोआवेया गंगे गेले : आंघोळि करुनि एत होते : तवं दारवठेया परते[३] रेइनाएक भेटले : "चाला चाला नागदेओभटो : नाथभटो : आवघी आइत जाली : ब्राम्हण आले असति :" "नां आम्हीं गोसावीयांसि दंडवत करुनि[४] एउनि :" "नां चाला : उसीरु होइल : मग एउनि करा :" ओढओढुनि[५] आणिले : जेवीले : वीडे तांबोळें : ऐसे गोसावीयांपासि एत असति : गोसावीयांसि पहुडु जाला : उपहुडु जाला : मग तेयांचें एतें मान जालें : मग गोसावीं उंचमढापूर्वे आसन घालवीलें : पुर्वामुख : गोसावीयांसि आसन जालें : तेयांतें एतां देखिलें : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : कवाडें घाला : यां भीतरि येओं नेदा :" आणि आउसें हरीखैलीं[६] : तीयें वेळवेळां बाहीरि घालीजति : आणि तेयांतें बाहीरि कहीं[७] नाहीं : गेलीं : "नको रे भीतरि रीगों : तुम्हां चक्रस्वामीं दारवठे वारीले[८] :" म्हणौनि कवाडें घातलीं : तीहीं म्हणीतलें : "आउ : आम्हांसि भीतरि एओं दे : काइ अपराधु तो पुसों दे :" "नां रे : नको रीगों : चक्रस्वामीं दारवठे घालवीले :" ते वाडवेळु दारवठां उभे होते : मग बाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : "बाबा : भीतरि एओं दीजो : मग काइ अपराधु तो पुसीजो : मग दंड कीजो :" मग गोसावीं कवाडें उघडवीलीं : आले : दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांजवळे बैसले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुम्हीं गुरव ?" "नां : ब्राम्हण :" "लोकाचेया श्राधा काइ म्हणौनि जेउं जा ?" "नां जी : आमतें गोसावीं पाठवीलें[९] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि तुमतें पाठवीलें ?" "ना जी : आम्हीं रेइनाएकाकरवि पुसवीलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेंहीं पर एकी परिचे दुष्ट घालणें कीं : होता नव्हता अर्थु तो आपुला आपण जाणीजे कीं :" "हो कां जी : काइ दंड तो कीजो :" मग गोसावीं राजमढावरुनि[१०] उडीया घालवीलीया : गोसावी बहुता म्हणती : ते थोडीया म्हणति : ऐसां पंचवीसां उडीयां ठी[११] जाली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मागां पाए लागों नेदावे : आणि भुइं हात नेठवावे[१२] :" "हो कां जी :" दोघै उडीया घालीति : हात टेकीति तवं[१३] मागां पाए लागति : आणि गोसावी म्हणती : "हे उडी लेखीं न लगेचि :" आणिक उडी घालीति : आणि गोसावी म्हणती : "हे उडी लेखीं न लगे :" ऐसीया दुणां उडीया घातलीया :

---

२ **एवा.** °जेऊं न एति कीं. ३ **यमु.** पासी. ४ **यमुगोने.** आणि°. **पं.** मग°. ५ **यमु.** °बाहीरि-बाहीरेचि नेले. ६ **अ.** °केली. ७ **यमु.** °कहींची न घलिजे. ८ **अ.** वरजीले. ९ **यमु.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्ही म्हणा 'गोसावी धाडीती तरि एउनि :' तेही एक द्रुष्टचि°. १० **अ.** उचमढा°. ११ **यमु.** सीष्टाइ. १२ **गोने.** न टेकावे. १३ **गोनेही.** कां.

परि गोसावीयांचां लेखीं एकीही उडी न लगेचि[१४] : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबाचां लेखीं एकिही उडी न लगे : आणि एहीं आपारा उडीया घातलीया : आणि बाबाचां लेखीं एकीही उडी न लगेचि : तरि आतां आणिकु दंडु कीजो : " मग गोसावीं पांचसें दंडवतें वीहीलीं : मग दंडवतें घालुं लागले : मग बाइसीं वीनवीलें : " बाबा : मीं दंडवतें घालों लागों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " लागा : " बाइसांसि दंडवतांचा स्रावा हो[१५] : बाइसीं अढैचसें दंडवतें घातलीं : तीहीं दोघी मीळौनि अढैचसें घातलीं[१६] : मग गोसावी उगेचि राहीले : तें अंन जारिलें[१७] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा : भुकैलेति ? " मग गोसावीं पाणिभातु जेवविला : *सर्वज्ञें म्हणीतलें : " तोरणमंडाळाचेया घरा न वचावें[१८] : "* ।।

## १२८ निधिवासेया गमनीं[१] भटा ज्वरनिवृति

एकु दीं गोसावीयांसि दुपाहारिचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : पहुडु : उपहुडु : आसनीं उपवीष्ट जाले : गोसावीयांजवळे आवघे भगतजन आले : दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांचीए ओळगे आवघेचि बैसले : गोसावीं अवघेयांकडे अवळोकिलें : मग म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं आवघे आलेति : वानरा नैए तें काइ ? " तवं दादोसीं म्हणीतलें : " जी जी : गोसावीयांचा वानरा ज्वरें आपणेयां प्रमाण[२] नेणे : स्मरे ना : संभाळी ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बोलावा जा : " दादोस गेले : " नागदेया : चाल : तुतें गोसावी बोलावितातिः " तैसेचि भटोबास आले : रक्तांबर डोळे जाले असति : गोसावीयांसि दंडवत केलें : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा वानरेया : तुम्हीं म्हणे ज्वरें आपणेयां प्रमाण[२] नेणां ? स्मरा ना ? सांभाळा ना ? " " ना जी : कोण[३] म्हणताए[३] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि म्हणीयां एका पाठवीजाल तरि जाओं सकाल ? " " हो कां जी : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वानरा निवासेया पाठवीजताए : तुमतें कांहीं आणणें[४] असे ?" बाइसीं म्हणीतलें : " हो बाबा : असे : " मग बाइसीं वीसां दामांचा वेचु सांघितला : एक दाम सरीये[५] न सरीये[५] दीधला : मग भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : मज

१४ **यमु.** °खूळखूळे जाले. १५ **गोहीबीयमुपं.** वाहो. **ने.** व्यायामू. १६ **एवा.** तीहींचि पांचसें घातलीं. यानंतर **यमु.** प्रतींत पुढील मजकूर आहे : 'आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा जीरीलें ?" तेहीं म्हणितलें : "जी जी : जीरीलें : बाळपणीचें पेहेंसकट जीरीलें :" सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ: तुमतें पाणीभातु असे ?" "हो बाबा : असे :" "यां दोघां जेउं घाला :" "हो कां : बाबा :" मग बाइसीं दोघांइं पाणीभातु जेउं घातला : दोघै तृप्तिपर्यंत जेवीले : ।। १७ **ने.** जीरलें. **एवा.** °उडीया घालों सरलें. १८ (**प्रव. आ.** ८४). **पं.** °मग जेउं कैसें जाओं एइलगा ?".

**१२८.** १ **गो.** प्रौख. **ने.** परिखू. **मु.** प्रेषणीं. २ **यमु.** परिमाण **गो.** परिवान. ३ **मु.** नावेक धगी असे. ४ **एवा.** आणवणें. **एवा.** आणावें. ५ **हीबी.** सरी.

नावेक विस्मृति असे जी : काइसेयाचें काइ घेयावें : ऐसें तें आठवे ना जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हाटामध्यें रीगसी : आवघे पदार्थ देखसी : मग जेयाचें जें घेयावें तें आपैसेंचि आठवैल : " " हो कां जी : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " केव्हडेया वेळा एसी ? " *भट*[६] बाहीरि नीगाले : दीसाचें मान पाहिलें : " जी जी : गोसावीयांचा पूजा-अवस्वरु जालेयानंतरें एइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जेवीसी गा ? " " ना जी : मज भुक नाहीं : " मग दंडवत केलें : स्रीचरणां लागले : मग नीगाले : वामन[७] मतिवीळास : ते निवासां वाचीत होते : ते[८] गोसावीयांचेया दरीसना आले होते : ते अनाध्याचां दीसीं गोसावीयांचेया दरीसना एति : *पाठीलाकडौनि*[९] *तेही नीगाले*[१०] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांचां हातीं वानरेयालागौनि सीदोरी पाठवा : " " हो कां : बाबा : " मग बाइसीं वर्णभातु तयां हातीं दीधला[११] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मार्गीं जात देखाल : परि आळवावा ना : पातलीए[१२] ठाइं पुसावें : " " हो कां जी : " मग ते दंडवत घालूनि नीगाले : भटोवासांतें जातां देखति : परि पाचारिती ना : भटोबास कणैरेस्वर पातले : आवघे घामैले : मग कणैरेस्वराचां घाटीं आंग धुतलें : आवघा ज्वरु गेला[१३] : भुकैले : मग म्हणीतलें : " गोसावी जेववीत होते : " ऐसें म्हणौनि नीगताति तवं वामन मतिवीळास आले : तीहीं म्हणीतलें : " भटो : जेवाल ? " " काइ जेउं ? " " नां गोसावीं तुम्हांलागौनि सीदोरी पाठवीली असे : " मग भटोवासांतें सुख जालें : " गोसावीयांसि माझी चींता : " मग[१४] तीये घाटीं जेवीले : मग दीवेलावणीए हाटामध्यें रीगाले : पदार्थ देखिले : आणि घेओं लागले : पदार्थ घेति : ते तयांचिये ओंटीए घालीति : ऐसा वीसा दामांचा वेचु घेतला : एकु दामु उरला : " याचें काइ घेयावें पां ? " म्हणौनि आवघी हाटवटी हींडीनले : कांहीं आठवे ना : मग म्हणीतलें : " मीयां तरि गोसावीयांतें म्हणीतलें[१५] होतें : " मग तो दामु गांठीं बांधला : दोघै कणैरे-स्वरवरि आले : ते पदार्थ भटोवासांचीए प्रावर्णीं घातले : *मोट बांधली : भटांचीए डोइएवरि ठेविली*[१६] *:* मग ते राहीले : *भटोबास नीगाले*[१६] *: पुढां वाट फाकली*[१७] *:* एकी वाट देइगांवां जाए : एकी वाट डोंबेग्रामां जाए : तेथ न कळे : मग भटोबासीं हाक दीधली : तीय हाकेसरीसे ज्वर सेख होतें तेंहीं गेलें : गोसावीयांचां ठाइं तैसीचि स्थानी घनदाट[१८] असे : सर्वज्ञें म्हणीतलें : " पातला गा वानरा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका जा : मढावरि उभे ठाका : तेथौनि हाक देआ : " " हो कां

६ (**यमुनेहीबी.**). ७ **मु.** °आणि. ८ **मु.** °दोघै. ९ **य.** पाठी°. १० (**मु.**). ११ **यमु.** °तेहीं म्हणितलें : " ते कोणी ठाइं भेटती ? " सर्वज्ञें म्हणितलें : " कणेरेस्वरीं भेटैल : तथा कणैरडे भीमेस्वरीं भेटती : " १२ **य.** परतलीए. १३ **यमु.** °वीसंवले. १४ **एवा.** °कणैरेस्वराचीए दारवठांचीए सोंडीएवरि तीघै जेवीले : १५ **यमुगोनेहीबी.** पूसिलें. १६ (**यमुगोनेहीबी.**). १७ (**यमु.**). १८ **गोने.** °दाटली.

जी :" नाथोबा गेले : मढावरौनि हाक दीधली : आणि भटोबासीं जाणीतलें : 'हे हाक नाथोची : हे वाट डोंबेग्रामां जाइल :' मग आले : गोसावीयांसि दंडवत केलें : स्रीचरणां लागले : गोसावीयांपुढां आवघे पदार्थ ठेविले : बाइसीं अवघे पदार्थ पाहीले : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : ए वेळेचे पदार्थ सवंग : आणि सुटी :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हा गा : ज्वरीताचीं कार्यें तीयें काइ ऐसीं ?" मग भटोबासीं तो दामु दीधला : "जी जी : या दामाचें काइ घेयावें तें नाठवेचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुज नाठवे ऐसें कांहीं नाहीं गा : हा दामु तुज सरीये न सरीये दीधला होता[१९] :" ।।

## १२९ प्रार्धबाइसां[१] देओ निरुपणीं भटां उपाहार स्वीकार

एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हां कांहीं करणीए असे गा :" "जी जी :" "एथ पुजा करावी : आणि उपाहारु करावा :" "हो कां जी :" मग भटोबासांचीए गांठी सा दाम होते : तीं दामांची कणीक तांदुळ घेतलें : तुपाचें[२] बाइसांचां हातीं दीधलें : मग आपण पुजाद्रव्यें आणावेया निवासेया गेले : गोसावीयांतें भीतरिला ओटेयावरि आसन असे : प्रार्दबाइसा गोसावीयांचेया दरिसना आलीं होतीं : तीयें गोसावीयांजवळि बैसलीं होतीं : गोसावीयांसि नीरुपण करावेयाची प्रवृति : गोसावीं प्रार्दबाइसांतें म्हणीतलें : "बाइ : देओ कैसा असे जाणां ?" "ना जी : नेणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरा आझुनि कां नैए ?" म्हणौनि गोसावीं उंचमढावरि बीजें केलें : गोसावीं पुर्वामुख उभे राहुनि मग नावेक भटोबासांची वाट पाहीली : मागुतें गोसावीं मढाभीतरि बीजें केलें : मग प्रार्दबाइसीं गोसावीयांतें म्हणीतलें : "जी जी : देओ कैसा तें गोसावीं निरुपावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : देओ कैसा निरुपावा ?" मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेस आझुइं कां नैयेति ?" ऐसें म्हणौनि मढावरि बीजें केलें : मढावरि उभे ठाकौनि वाट पाहिली : मागुतें मढांआंतु बीजें केलें : आसन जालें : मागुतें प्रार्दबाइसीं म्हणीतलें : "जी जी : देओ कैसा ऐसें निरुपावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : देओ कैसा निरुपावा ?" "ना जी : निरुपावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देओ पाखाणाचा नव्हे : देओ काष्टाचा नव्हे : देॐ मातीचा नव्हे : देॐ चीत्रीचा नव्हे : देॐ पटीचा[३] नव्हे : देॐ धातुचा नव्हे[४] : पाखाणाचा फुटैल : लाकडाचा मोडैल : मातीचा तो वीरैल : चीत्रीचा तो पुसैल : पटीचा[३] तो फाटैल : धातुचा तो झीजैल :

---

१९ °आंनोबासांचीया वासना : सर्वज्ञें म्हणीतलें : 'यासि तुज कहींचि नाहीं वीस्मृति : हा सदा बुधिमंतु :' (**गोने.** प्रतींत 'हा सदा बुधिमंतु' ही रामेश्वरबासाची वासना म्हणून नोंदलेली आहे).

**१२९. १ ने.** प्रतीत सर्वत्र 'प्रार्थबाइसा' नाव आहे, तर **मु.** प्रतीत 'प्राऱ्हादबाइसा' असे आहे. २ **य.** °पाइकें. **मु.** °द्रव्य. ३ **अ.** पडीचा. **ही.** कापडीचा. **गो.** पटीएचा. ४ हे वचन 'वासनाभेदें' म्हणून **अगो.** प्रतीत निर्देशिले आहे. पण त्याच्याशी संबंधित पुढील मजकूर लक्षात घेऊन ते मूळ

देउ॰ तो अछेदु : अभेदु : अच्युतु : अलेख :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आनंदशब्दें ईश्वरु बोलिजे : आनंदु तो : ब्रह्म तो : अच्युतु तो : अविक्रियु तो : अव्यक्तु तो : अमूर्तु तो : शुद्धु तो : बुद्धु तो : नित्यमुक्तु तो : निरभिमानु तो : परु तो : परसाक्षित्व ऐसाही धर्मु तेथ नाहीं : केवळु तो : केवळींचि नित्यसंबंधें माया असे : माया जेथ संबंधातें पातली असे तेथचि न पवे : ऐसीचि वस्तु ते : ऐश्वर्यादिकरौनि सकळही धर्म मायासंबंधेंचि तेथ : सर्वात्मकु तो : सर्वातीतु तो : सर्वकर्ता तो : सर्वसाक्षी तो : ऐसा परमेश्वरु एकु आति[५] :"* ऐसें निरुपण करितातिः तवं बाइसें उंचमढाआंतु व्यापारु करीतें होतीं : तिएं आलीं : "हां बाबा : एथ मीं नसें : ना नागदेओ नसे : तरि हें कवणांप्रति निरुपण करीजताए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथ प्रवृति जाली तरि स्तंबा एकातें नीमीत्य करुनि निरुपिजैल :" म्हणौनि गोसावीं स्रीकरें स्तंबु त्राहाटिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरभट आझुइं कां नैएति ?" ऐसें म्हणौनि गोसावी वाट पाहावेया नीगाले : उंबरेयावरि एकु स्रीचरणु ठेविला : एकु उंबरेयाआंतु : तवं भटोबा आले : गोसावीयांसि दंडवत घातलें : तेयाचि स्रीचरणा लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " उसीरु कां गा लाविला वानरेया ?" "जी जी : नावेकु लागला :" मग बाइसांचां हातीं कांहीं पत्रसाक आणिले होते : ते दीधले : मग भटोबास आले : मग गोसावीयांतें म्हणीतलें : " जी जी : मज उसीरु तरि नाहीं लागला : आणि गोसावीं : 'उसीरु कां लावीला :' हें कां म्हणीतलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ नीरुपावेयाची प्रवृति गा : तें एथौनि तुमची वाट पाहीजत होतीं[६] :" मग गोसावीं प्रार्दवाइसांसि जें निरुपण केलें तें गोसावीं आवघें भटोबासांसि निरुपिलें : मग बाइसीं उपाहारु नीफजवीला : *बाइसासि स्फुरे ना तें साधें स्फुरउनि देती : ऐसा दोघीं उपाहारु नीफजवीला[७] :* मग भटोबासीं पुजाअवस्वराची आइति केली : मग चरणक्षाळण केलें : भटोबासीं गोसावीयांसि पुजाअवस्वर केला : वीडा ॐळगवीला : मग गोसावीं भटोबासांकरवि अनसारिखी वीतिकर्में[८] पुजा करवीली : गोसावीयांसि धुपार्ती : मंगळार्ती जाली : तवं बाइसीं उंचमढीं ठाए केले : गोसावीं उंचमढासि बीजें केलें : गोसावीं ताटें अवळोकिलीं : मग म्हणीतलें : " बाइ : वानरेयासि कवण ठाओ ? " तवं भटोबासीं म्हणीतलें : " जी जी : मज काइ आणिकु ठाओ असे ? मज स्रीचक्रधरू ठाओ :" मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : ए पालिमांडांचे दीवे मुठीये फेडीन : मग एथचि वाढीन :" मग भटोबास ते दीवे मुठीए फेडों नेदीतीचि : मग भटोबास बैसले : गोसावी आरोगण करिति : भटोबासां वरीलीकडे साधें बैसलीं होतीं[९] : भटोबासीं वांगेयाचा देंटु ऐसा धरिला : " एल्हो एल्हो : कैसें उंदिराचें पुंस : पुरण सीजे ऐसें

---

संहितेत स्वीकारले आहे. ५ (**प्रव. वि.** २२७. '... देव तो आछेद आभेद : आणि निर्वचन निरूपिलें :') **प्रव.** नवप्रकरणातील निर्वचनाचा **प्रव.** पाहा. ६ **एवा.** असिजे. ७ (**यमुगोनेहीबीपं.**). ८ **एवा.** व्यतिक्रमें. **मुपं.** विलक्षण. ९ **भटोबास,** आउसा आणि साधे यांच्यातील हा विनोदाचा

सीजलें असे :" "उगा अस रे बा नागणा : आंम्हां अंन[१०] खाओं दे : जी जी : या नागदेयातें वारिजो कां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ म्हणत असे साधें हो ?" "आंम्हां अंन[१०] खांओं नेदी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उगे असा गा वानरेया : साधांसि अंन[१०] खाओं देया :" मागुतें भट वांगेयाची फोडि ऐसी धरीति : "एल्हो एल्हो : कैसी उंदिराची डोइ : पुरण सीजे ऐसी सीजली असे :" "उगा अस रे नागदेया : आंम्हांसि अंन[१०] खांओं दे : जी जी : या नागदेयातें वारिजो जी :" गोसावी म्हणति : "काइ म्हणत असे साधें हो ?" "जी जी : काइ नेणों : काइ नेणों : म्हणत असे : आंम्हां अंन[१०] खांओं नेदी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उगे असा गा वानरेया : साधांसि अंन[१०] खांओं देया :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ऊ्ळगवीला : मग गोसावीं पहुडु स्वीकरीला : उपहुडु जाला :।।

मग आवघे भक्तजन गोसावीयांचीये ऊ्ळगे आले : मग भटोबासांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हांसि आणिक एक करणीए असे गा : तीतुकें न लगे : एथ पुजा करावी : आणि एकि एथ दुधातुपाची आरोगणा देयावी :" "हो कां जी :" भटोबासांचीए गांठी सरुदामु उरला होता : तेयाचें दुधतुप आणिलें[११] : मग वीळिचां भटोबासीं गोसावीयांसि पुजाअवस्वर केला : *गोसावीयांचें चरणक्षाळण केलें*[१२] : भाळप्रदेसीं चंदनाचा आडा होता : तेयाची मळी काढिली : मग भाळप्रदेसीं चंदनाचा आडा रेखिला : मग गोसावीं उदेयाचेयाहीहुनि ते पुजा वीलक्षेण करवीली तैसी भटोबासीं केली : मग गोसावीयांसि धुपार्ती : मंगळार्ती जाली : मग बाइसीं बरवें दुध आळिलें : मग गोसावीयांसि दुधातुपाची आरोगणा दीधली[१३] : नीगतां मग भटोबासीं वीळचांचीए व्याळिएचें वीनवीलें :।।

## १३० मुर्तीप्रकासे रेइनाएका वीस्मो

एकु दीं गोसावीं मध्याने एकी रात्रीं मढावरि बीजें केलें : दुर्गाचीया[१] पांजीया[२] उभे राहीले : गोसावीयांचीए स्रीमुर्तीपासौनि प्रकासु नीगाला : तो रेइनाएकाचीया आवारांतु पडिला : वावणेंनिहुनि[३] भीतरि पडिला : आणि रेइनाएकु गजवजौनि उठिला : 'काइ वोरपेकार आले ?' पाहाति तवं प्रकासुचि देखति : मग कवाडें उघडीलीं :

प्रसंग **यमु.** पोथ्यांत नाही. १० **गो.** अनज. ११ **एवा.** तीनि रुके (**गोयमु.** रुए. रुवे) उरले होते : बाइसातें भटोबासीं म्हणीतलें : "बाइ : तुप कांही. उरलें असे ?" हो : उरलें असे :" मग भटोबासीं तेया तीं रुआंचे रात्रीं दुध आणीलें : १२ (**गोपंने.**). १३ °**एवा.** उपाहारु रेइनाएकाचां आवारीं : बाइसीं आणि साधीं नीफजवीला : तेथचि गोसावीयांसि मर्दना : मादणें : पटिसाळेवरि पुजा : आरोगणा.

**१३०.** १ **यमु.** पौळीचीए. २ **यमुगो.** पांजीयेबरि. **ने.** पाळीए° **ही.** चर्येवरि. ३ **यमुगोहोबी.**

मग ठानांतरीयातें[४] पुसिलें : "हां रे : हा उजीएडु काइसा ?" तेणें सांघीतलें : "गोसावीं मढावरि बीजें केलें होतें : तो गोसावीयांपासौनि प्रकासु पडिला :" मग तयां आस्चर्यें जालें : मग उदीयांचि गोसावीयांचीया पुजाअवस्वरासि आले : मग गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : रात्रीं गोसावीं मढावरि बीजें केलें होतें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति : हें तेव्हेळीं एथ उभें होतें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें कोण्हापुढां न संगीजे हो : लोकु आइके तरि डांकुली वाए[५] :"* रेइनाएकां तेव्हेळीं वीस्मो जाला : ॥

## १३१ मंडकगोपनअपराधें मारकंडा सीक्षापण

एकु दीं कोण नेणों सणु जाला : आवघे भक्तजन भीक्षा करावेया गेले : आवघे भीक्षा करुनि आले : गोसावीयांसि झोळीया द्रीष्टिपुता केलीया : मार्कंडीं आपुलीया कोरकेयांची झोळी लपवीली : नसुधेया भाताची झोळी गोसावीयांसि द्रीष्टपुत केली[१] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हा गा : यां आवघेयां कोरखांड[२] आलें[३] : तुम्हां कांहींचि नैए तें काइ ?" "जी जी : माझी उदास भीक्षा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुं वेखें[४] भीक्षा करीसी : तुं दंडी[५] भीक्षा करीसी : तें काइ उदास ?" "ना जी : माझी भीक्षा उदास :" तवं बाइसीं म्हणीतलें : "बाबाचें काइ : बापुडें उदास भीक्षा करुनि आलें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "जा गा[६] : नाराएणामागां कोरुकेयांची झोळी लपवीली असे : ते घेउनि या :" भक्तजन[७] गेले : झोळी उचमढाचेया नाराएणाआड होती : ते घेउनि आले : तवं असका मांडा : असकी पुरी : आधी पुरी : असकी इडरी : आधी इडरी : असकी पोळी : आधी पोळी : ऐसें गोसावीं दाखवीलें : मग म्हणीतलें : "ऐसें कां गा करा ? काइ एथौनि घेइजैल म्हणौनि ? एथ काइ याची[८] चाड पडली असे[९] ? घेया जेवा :" ते भुमी रेघा काढुं लागले : मग बाइसीं घागरा वांधला : वाइसीं म्हणीतलें : "पोरा : तुझीए मडां वांधे घागरा : मसणवरि वाजतु जाए : पोरा : बाबासीं लटीकें बोलीलासि :" ॥

## १३२ नीरुपण दुखाक्रांत पाठका आसु ज्ञान करणें

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें उचमढीं आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि म्हणीतलें तें कव्हणाहीं जीवां नव्हवे[१] :" ऐसें नीरुपण करूं आदरिलें : तवं पाठकीं म्हणीतलें : "हें काइ जी : नव्हवे कैसें[२] ?" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

वावणेया°. ४ **पं.** दारवठेकारातें. ५ (**यमु.**).

१३१. १ **गोहीने.** °गोसावीं झोळी अवळोकिली. २ **हीबीपं.** कोरके. ३ **यमु.** आलीं. ४ **यमु.** पाटेंपीढेनसी संन्यासवेखें. ५ **गोने.** दंडें. **य.** डंबें. ६ **य.** बाइ. **पं.** °वानरेया. ७ **य.** बाइसें गेलीं. ८ **यमु.** काइसेयाची. ९ **पं.** °पोरा जीवासि एथौनि म्हणितलें तें नव्हवे : मग मरणां सरण जाए : जीउ दोखद्रस्या : जीउ अनंता श्रूष्टी वंचकत्वें मेला : घेया—.

१३२. १ **यमु.** °ईश्वरप्राप्ति ते दुर्लभ. २ **यमुने.** गोसावी ऐसें म्हणतु पा : धडां डोळां सुळु

"ऐसें म्हणत असा ? ए डोळांचा सुळु ए डोळां काढा ?" "तरी आतां काढुंनु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हेंही वरि होववैल पोरा जीवासि : परि एथौनि म्हणीतलें हे नव्हे :" आणि ते उगेचि राहीले : निरुपण अवसान जालें : मग पाठक सोंडीएवरि बैसौनि दुख करुं लागले : मग तैसेचि भीक्षा करावेया गेले : गोसावीं तीए सोंडीएपासि बीजें केलें : तें[3] उदक अवळोकिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणां पां गा : हें उदक काइसें ?" अवघां म्हणीतलें : "हें नेणों जी :" भटोबासीं म्हणीतलें : "जी जी : एथ पाठा बैसौनि दुख करीत होता : *तरी तें होईल*[4] *:*" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि एकीचि ठाइं[5] कां ?" "ना जी : तें नेणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "याचा एकु डोळा तें निपाणीं गा :" ।।

## १३३ म्हांइंभटां उदग्रहणीकापुर्वक ईश्वरप्रतीति करणें

*म्हांइंभट ते सरालांचे*[1] *:* म्हांइंभटबासीं पांच दरीसनें वाचिलीं : साहावें दरीसन प्रभाकर : तें ए देसीं वाचुं नैये : मग तेलंगदेसीं[2] वाचुनि आले : आलेयाउपरि गणपति आपयोसीं भेटि जाली : उघाणी जाली : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : "उभये गंगातटाकीं अळुमाळ पानरट धरुं गणपति आपयो जाणति :" मग गणपति आपयों[3] म्हणीतलें : "म्हांइंभटो : तुमचेया वाचीलेयाचें फळ[4] तै होए जै स्त्रीचांगदेओराउळां गोसावीयांसी भेटि[5] होए :" "ते काइ वीद्वांस ?" "ना माहात्मे :" "कांहीं सास्त्र जाणति ?" "मां जाणति कीं नेणति तें नेणों : ते मऱ्हाटी तवं अनावर बोलत असति :" "ते माहात्मे आणि वरि मऱ्हाटी बोलताति : तरि मासीं म्हांइंयांसीं काइ बोलती ? ते मऱ्हाटीया बोलती : तरि मीं संहंसक्रतैं[6] बोलैन :" "हो कां :" "तुम्हीं तेयांचीया दरिसनां जाल तेव्हळि मातें[7] घेउनि जा :" मग एकु दीं गणपति आपयो गोसावीयांचेया दरीसनां नीगाले : म्हांइंभटबासांतें बोलावीलें : दोघै नीगाले : मग म्हांइंभटबासा वाटे आवघीं[8] स्थळें मनन करुं लागले : "ऐसें बोलती तरि ऐसा आक्षेपु करीन : ऐसें बोलती तरि ऐसा आक्षेपु करीन :" मग दोघै भामाठाणांसि गेले[9] : गणपति आपयोसि गांवांमध्यें प्रयोजन[10] होतें म्हणौनि ते गांवांमध्यें रीगाले : तवं पींपळे वामनभट गोसावीयांचेया दरीसनां जात होते : गणपति आपयोन म्हणीतलें : "वामनभटो : तुम्हीं कें जात असा ?" "ना मीं गोसावीयांचेया दरीसना जातु असें :" "हो कां : तरि

---

रोवावा : एरें डोळेनि काढावा तरी तेंही कीजैल. **ने.** °ए डोळांचा सुळु ए डोळां काढा. ३ **यमु** तीये अडीयेचें. ४ (**यमु.**). ५ **पं.** अडीए.

१३३. १ (**मु.**). २ **यमु.** °वाचावेया वोरंगलासि गेले. ३ **यमुहीबीपं.** आपयोनि. **गो** आपयोएं. ४ **हीबी.** सार्थक. ५ **यमुगोनेहीबी.** दरीसन. दर्सन. ६ **गोपं.** संसक्रतें. **बी** संस्कृतें. ७ **गो.** °बोलाविजा. ८ **मु.** अवघडें. ९ **यमु.** °वामनभटाचेया घरा पाहुणे गेले उदयांचि वामनभट (**य.** उपाहारेंसीं) गोसावीयांचेया दरीसना नीगाले. १० **गोनेही.** कार्ये.

म्हांइंभटातें घेउनि जा : " " हो कां : " मग दोघै गोसावीयांचेया दरीसनां नीगाले : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वर जालेयानंतरें भीतरिला ओटेयावरि पुर्वामुख आसन असे[११] : गोसावीयांचां स्रीकंठीं गळदंडा : स्रीमुखीं तांबोळ : भाळप्रदेसीं चंदनाचा आडा : ऐसें देखिलें : पींपळे वामनभटीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : म्हांइंभटीं कायाप्रणीत केलें : मग दोघै गोसावीयांजवळि बैसले : म्हांइंभटीं गोसावीयांतें देखिलें आणि *मागील*[१२] आवघेंचि वीसरले : नावेक पींपळे वामनभट होते : मग गोसावीयांसि दंडवत करुनी नीगाले : " म्हांइंभटो : चाला ना : " ते उगेचि : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं तवं चाला : यां असों आवडैल तवं असती : मग एती[१३] : " मग पींपळे वामनभट नीगाले : ॥

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि अत्यंतीक संश्रृतीछेदु होए ऐसी कांहीं प्रतीति आथी ? " म्हांइंभटीं म्हणीतलें : " आति : तरि कोणें कामें नाराइजे : " तवं बाइसीं म्हणीतलें[१४] : " बाबावरि प्रतीति नाहीं : " म्हणौनि घागरा वांधों आदरिला : गोसावीं स्रीकरें : स्रीमुखें : स्रीमुगटें म्हणीतलें : " बाइ राहा : जीवीं अनंतां जन्माचे खते बैसले असति : ते सहसा काइसेन फीटती : झाडीलेयांवीन ? आणि[१५] पुर्वी काइ ऐसें तुम्हीं न कराचि ? जें पाएपुसणें बैसों देया : दुधिकरंटां पाणीभातु नेदाचि ? " " पुरे बाबा : पुरे बावा : " म्हणौनि पोळलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि कैसी आथि ? " म्हांइंभटीं म्हणीतलें : " कर्म कीजे : कर्मातव सुध अंतःकरण होए : सुधे अंतष्करणें[१६] वैराग्य उपजे : वैराग्यें[१७] ज्ञान होए : ज्ञानउदयें[१८] मोक्षु : " मग यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " नित्यनिमित्यकें[१९] कर्में तीयें प्रतदिनीचेया प्रतिवाया परीहारा गेलीं : कामीकें तीयें फळा गेलीं : मां कें असे कर्म ? मां काइसेनि सुध अंतष्करण होइल ? मां कें असे वैराग्य ? मां काइसेन ज्ञान उदैजैल[२०] ? मां कें असे मोक्षु ? एकी क्रीएचां ठाइं काइ दोनि फळै असति ? हें आवघेंचि लटीकें : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " अविद्यायुक्तां जीवां स्वता ज्ञान न संभवे : " मां ' कां संभवे : आणि कां न संभवे : ' यावरि उघाणी प्रवर्तली[२१] : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : " गणपति आपैयें म्हणीतलें होतें : ' मऱ्हाटी अनावर बोलति : ' तें हें[२२] : आतां सहंसक्रुतें[२३] उपन्यास करूं : " मग तीं

---

११ **मु.** °आनोबाचीया वासना : पींडापासि ढगावरि भेटि जाली. १२ (**गोनेयमुहीबीपं.**). १३ **अ.** जाती. १४ **यमु.** °बाबावरि ऐसे वो (**य.** हुं) म्हणे. **गो.** °हा बाबा तरि नाहीं : या बाबावरि नाहीं. **ही.** °यासि बाबावरि बुद्धि नाहीं. **ने.** °बाबावरि नाहीं तेंचि बोलत असे. १५ 'आणि पुर्वी....म्हणौनि पोळलीं' हा भाग **यमुगोने.** प्रतीत नाही. **हीबी.** प्रतीत या जागी 'तुम्हींचि पुर्वी एथ काइ केलें ?' असे वाक्य आहे. १६ **गोनेयमु.** °करणीं. १७ **गोनेयमुहीबीपं.** वैराग्यातव. १८ **मु.** ज्ञानादेव. १९ **गोयमुहीबीपं.** नैमित्यकें. २० **यमुगोही.** उपजैल. २१ **अ.** प्रव्रतली. २२ **यमु.** °घडीया च्यारि मऱ्हाटीया उघाणी जाली : मऱ्हाटीया नीरोतर केलें : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : आता—. २३ **यमुने.** संस्क्रुतें. **गो.** संसक्रुतें.

सहंसकृतें[२३] उपन्यासु केला : तवं गोसावीं अवलीळा सहंसकृत[२३] बोलों आदरिलें : गोसावी जे प्रयोग बोलति ते तयां श्रृतचि नाहीं : ऐसी घडीया च्यारि सहंसकृतें उघाणी जाली : मग सहंसकृतें निरोतर केलें : मग म्हांइंभट उगेचि राहीले : मग गोसावींचि मुख केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रृष्टीमध्यें जीवु जेतुलेंहीं करी तेतुलेनि काइसेनहीं न मुंचे : एक वांचौनि :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "तें एक श्रृष्टीअंतरवृत्यें होए : आणि जीवाचें करण होए : तरि तेणें कां[२४] मुंचावें ? आणि एणें[२५] कां न मुंचावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो जीवाचा स्वभाओ[२६] म्हणौनि : *स्वभाओ प्रगटे तै जीव मुंचे*[२७] : स्वभावो म्हणिजे स्वधर्मु :" मग म्हांइंभट बुझुनि गेले : मग म्हणीतलें : "जी जी : एक तें कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें इश्वरदास्य :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी[२८] : निराकारा निर्वेवा इश्वराचें दास्य कैसेनि घडे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरू निर्वेवू निराकारु असे : तो सावेवू साकारू होए : अवतरौनि[२९] आपुलें दास्य[३०] दे :" *म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : व्यक्ताअव्यक्ता परमेश्वरांचें कैसें लक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : व्यक्तीं शक्तीतें अधिकरूनि परमेश्वर व्यापारति : परमेश्वराचा सकळही व्यापार शक्तिद्वारक : अव्यक्तीं व्यापारु नाहीं :" "जी जी : अव्यक्तीं परमेश्वर कैसे व्यापारती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सृष्टीमध्यें परमेश्वरु अवतरेति : मनुष्यवेषधारीए होति : मायावेषधारीए होति : मायापुरधारीए होति : मायानिर्मितं पुरं मायापुरम् : माया घटाकरें आकारें ओते : नखचर्मरोमादिकरौनि शुद्ध चैतन्याचि ते : मायापुरीं मायेसि अभिमानु : ब्रह्मांडीं शक्तिअधीनु शक्तिव्यापारु : मायापुरीं इतर शक्तितुल्य माया : ईश्वरीं संपूर्णा शक्ति : जीवीं अंशतां शक्ति : ऐसेया मायापुरातें स्वीकरौनि कर्मभूमिस्थितां मनुष्यदेहयुक्तां जीवां ज्ञानपर्यंत परमेश्वरु आपला संबंधु देति*[३१] : तें दास्य मोचक : जैसें द्वापरीं स्रीकृष्ण-चक्रव्रतीचें दास्य घडे तै हा जीवु संसारापासौनि मुंचे :" तेयासि म्हांइंभटीं संका केली : "जी जी : तें युगचि गेलें : तेणें अवतारें बीजें केलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जैसें मातापुरीं श्रीदत्तात्रप्रभूचें दास्य घडे तै जीउ सौंसारापासौनि मुंचे :" "जी जी : ते अद्रीस्य : तयां दरीसन देणेंचि नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जैसें द्वारावतीए स्रीचांगदेव राउळांचें दास्य घडे तरि जीउ सौंसारापासौनि मुंचे :" तयासि संका केली : "ते अवीद्यमांन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जैसें आजिकालिचां मानीं रीद्धौरां स्रीगुंडम-राउळांचें दास्य घडे तै हा जीउ सौंसारापासौनि मुंचे[३२] :" तें प्रत्यासि आलें : परि

---

२४ **अ.** कां न° (**न.** चुकून लिहिला गेला असावा). २५ **नेहीबी.** एरें. **पं.** एरीं. २६ **एवा.** स्वधर्मु. २७ (**प्रव.** नव प्रकरणें). २८ **यमु.** °ईश्वर तवं नीर्वेव नीराकार : मां–. २९ **यमुही.** अवतरे. ३० **यमु.** सन्निधान. ३१ (**प्रव. विमा.** १५. म्हाइंभटीं पुसीलें : "जी जी : व्यक्ता अव्यक्ताचें कैसें लक्षण ? . . . . अव्यक्तीं परमेश्वर कैसे व्यापरती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सृष्टीमध्यें परमेश्वरू अवतरेति. . . . ऐसी बारा वचने निरोपिलीं."–उद्धरण. १–१२). ३२ **अ.** °एकी वासना : जैसे परमेश्वरपुरीं श्रीप्रभू गोसावी" "जी जी : ते अबोलणी वस्तु :" **हीबी.** "जी जी :

सवीसेख बुझतीचि ना : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : संनिधान तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें ऐसें :" म्हणौनि आपणेयांकडे स्रीकरें दाखवीलें[३३] : सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवासि बोधु आणि बोधशक्ति ते एथौनीचि कीं गा :" तेथ गोसावी हस्तीचा द्रीस्टांतु निरुपिला :॥

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "गावां हस्ति आला : ते जात्यंध हस्ति पाहों गेले : एकें पावो देखीला : एकें सोंड देखीली : एकें कानु देखीला : एकें पाठि देखीली : एकें पोट देखीलें : एकें पुंस देखीलें : मग ते एकमेकां संवादति : 'हां रे : तुवां हस्ति देखीला ?' पावो देखीला तो म्हणे : 'हस्ति खांवासारिखा :' सोंड देखीली तो म्हणे : 'हस्ति मुसळासारिखा :' कानु देखीला तो म्हणे : 'हस्ति सुपासारिखा :' पाठि देखिली तो म्हणे : 'हस्ति भिंतीसारिखा :' पोट देखिलें तो म्हणे : 'हस्ति कोथळेयासारिखा :' पुंस देखीलें तो म्हणे : 'हस्ति खराटेयासारिखा :' ऐसें एकमेकां उरोधीति : तेयामध्यें डोळसु होता : तो म्हणे : 'आगा ए : हा हस्तिचा एकुएकु अवयेउ होए : परि हस्ति नव्हे : ऐसा अवयेवीं युक्त तो हस्ति :' तैसें जयासि जे शक्ति प्रकासली असे तो तीये शक्तितें परमेश्वरू म्हणे : ज्ञानिया असे तो म्हणे : 'हे परमेश्वराची एकिएकि शक्ति असे : परि परमेश्वरू नव्हे : ऐसा शक्तियुक्त तो परमेश्वरू[३४] ?' " ]

मग म्हांइंभटां बोधु जाला : गोसावीयांवरि प्रतीति आली : परमेश्वरू म्हणौनि उठिले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले :॥

[ मग म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : परमेश्वरातें कव्हणी इंद्र म्हणति : कव्हणी ब्रह्मा म्हणति : कव्हणी विष्णु म्हणति : कव्हणी महादेव म्हणति : ऐसें वहुत प्रकार म्हणति असति : तेणेंचि भावें भजति : तरि तयासि फळ कवण दे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : अनंतशक्ति परमेश्वरू सकळांसिही विषएव्येवस्था करीति[३५] :" ]

[ मग गोसावीं मायानिर्वच निरूपण केलें[३६] : सर्वज्ञें म्हणीतलें : "चैतन्य : माया : विदेह : पराशक्ति। मुख्य : तुल्य : अंश : रश्मि। दिव्य : दिनस्थ : जळस्थ : स्थळस्थ। घटघटाभिमानीए अनुस्यूत। जड : अजड : चिज्जड : एवं त्रिविध माया। राहाटीं घडी

---

ते वेडे पीसे : तयाचें दास्य कैसेनि घडैल जी ? तरि आतां येथ सन्निधान तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "चैतन्यापर परमेश्वरू : तो देवो श्रीचक्रधरू" म्हणौनि आपणयांकडे दाखविलें ३३ **पं.** °आणि दृष्टी तेयांकडे अवळोकीलें : आणि तेयांसि बोधु जाला : ३४ (**दृपा.** ४३. 'हस्तीचा दृष्टांत'. 'म्हांइंभटांप्रति बोध प्रकरणीं'—**दृस्थ.** या दृष्टांतावरील दार्ष्टांतिक माझ्या मतें स्वामींचेच होय. म्हणून येथे अंतर्भूत केले आहे.) ३५ (**प्रव. वि.** २२३). ३६ (**प्रव.** नवप्रकरणाचा प्रकरणवश. [**प्रव.** मुद्रित प्रत. पा. ५] 'म्हांइंभटां बोधसंक्रमण जालें : मी जीव : हा परमेश्वर : ऐसी प्रतीति जाली : यावर निरूपण केलें : चैतन्य : माया : वीदेह : पराशक्ति : ऐसीं चौदा वचनें निरूपण केलें :')

वांधली असे : ते ये : जाये : भरे : रीचवे[३७] : तैसें मायाचक्रभ्रमणन्यायें पर्यायवशें जीवु सकळही पावे : एक वांचौनि । अच्युताचां अज्ञानीं जन्मलें जें अन्यथाज्ञान तें स्वर्ग : नरक : कर्मभूमि : मोक्ष : या चतुर्विधातें आपजवीति असे । चैतन्यानुभूतीं जीवीं बीजभूत अविद्या असे : जैसा वटबीजीं वटु असे । वटबीजामध्यें साकोपसाकीं पानीं-फळीसीं अवघा वट सामावला असे : मोटका भूमिउदकाचा योगु होए : आणि प्ररोहातें पावे[३८] । चैतन्यप्राप्तीं जीवु भ्रांतु होउनि असे । चैतन्यविद्ये चैतन्याचे मळ जाति : जीवाचे आच्छादेति : जीवाचां मोक्षीं चैतन्या मोक्षु । चैतन्यफळ मोक्षतुल्य : परि तेथ च्युति हा दोषु । चैतन्यफळादिकरौनि सकळहीं फळें साधनें मूर्त । कव्हणी एकु वेदविभागु चैतन्याचेया अस्तित्वातें जाणे । " ऐसें बहुत निरूपण केलें : तवं आरोगणेची वेळ जाली : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : उसीरू जाला :" यावरि पांति जाली : म्हाइंभटां पांती भोजन जालें : म्हांइंभटीं प्रसादाची वास पाहीली : आणि गोसावीं प्रसादाचें वाटें सांभाळी केलें : यावरि गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : म्हांइंभटां तांबोळ दीधलें[३९] :] म्हांइंभटीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गावांसि गेले : वरीसा एका श्रीप्रभूचां ठाइं अनुसरले : ।।

## १३४ म्हाइंभटां बोध प्रकरण निरूपण*

[ गोसावीयांसि[१] डोमेग्रामीं राजमठीं अवस्थान : गोसावीं ईश्वरप्रतीति केलेयानंतरें म्हांइंभट दिवसा चौ गोसावीयांचीया दर्शना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : गोसावी परमेश्वरु होति तरि जीवासि बोध कैसा देति ? तें[२] निरोपावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : एकां जीवांप्रति परा गिरा-करूनि परमेश्वरु आपुलें अस्तित्व साधीति : वैखरी अस्तित्वें परमेश्वरु तीहींतें अनुवर्तवीति : जवं पुरुषु विद्येअधीनु नव्हे तवं ब्रह्मविद्ये अधिकारु आति : बोधकाळीं देवता परतीया सरेति : बोधकाळीं मळकर्में परतें सारीति : बोध देतिए अवसरीं जीवु च्यारि घडियापर्यंतु अनाथु होउनि असे : मग एक अनुसरेति : एक ननुसरेति : ननुसरेति ते प्रमादीए बोलिजेति : मग केतुले एक दीसपर्यंत दैव वाट पाहे : मग उदासीनु होए[३] : मग म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : देव कव्हणे कव्हणे वेषें अवतरति तें

---

३७ (**दृपा.** १२. राहाटघडीएचा दृष्टांत. हा दृष्टांत 'कानसे बीजें करितां'. 'वसए देवाप्रति'— **दृस्थ.**) **एवा.** 'गौराइसाप्रति'—अशी मतांतरें आहेत. सूत्र व दृष्टांत यांचा संबंध लक्षात घेता तो येथेच असावा असे मला वाटते. ३८ (**दृपा.** २४. वटबीजाचा दृष्टांत. **दृस्थ.**कर्त्याच्या मते हा दृष्टांत 'भटांप्रति बेलोपुरीं निरूपिला'. पण तो या ठिकाणी अधिक योग्य वाटतो. म्हणून येथे अंतर्भूत केला आहे).

**१३४.** *(**प्रव. विमा.** २३–२७; आणि **वि.** १०४–१२०).
१ माइदेवोबा°. २ **प्रव. विमा.** २३. °तें बोध प्रकर्ण निरोपावें जी :" ३ (**प्रव. विमा.** २३–२७).

निरोपावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : परमेश्वरु त्रिविधा परी मायापुरातें स्वीकरीति : गर्भी स्वीकरीति : कां पतितातें उठवीति : कां जीवातें दवडीति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " देवो कच्छ होति : मच्छ होति : देवामध्यें अवतरेति : तिर्यंचामध्यें अवतरेति : नरामध्यें अवतरला सातां देवो वेडा होए : पीसा होए : मूका होए : परि चालताबोलता देवो तो दुर्लभु कीं गा : परमेश्वरु सकळही देहधर्मु जीवधर्मु स्वीकरीति : " यावरि म्हाइंभटीं पुसिलें : " जी जी : परमेश्वरु सकळही देहधर्मु जीवधर्मु स्वीकरीति तरि जीवासि कव्हणी सुखदुःखें संपादीति ऐसें काहीं आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : तैसें काही एथ नाहीं : एथिचें सकळही तें एथिचीयाचि प्रवृत्ती : आणि जीवाचें तें कर्मवशें : " " हो कां जी : " यावरि म्हाइंभटीं पुसिलें : " जी जी परमेश्वरु युगामध्यें क्रीडति : तें काइसेन वोळखावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " युगानुरूप परमेश्वरू क्रीडति : परि किंचित विलक्षण : तेणें वोळखावें : जैसें श्रीदत्तात्रयप्रभूचें नाना वेषें अमोघ दर्शन : नित्याटन । श्रीकृष्ण अवतारीं प्रथम चतुर्भुज श्रीकृष्णचक्रवर्तीचें दर्शन : ना तें विश्वरूप दर्शन : वासुदेवें गोपाळ जाले : सोळा सहस्रा अंतापुरां आणि गोपिकां प्रतिदिनीं संबंध । द्वारावतीकारापासौनि अनंता सिद्धी : ते सुपें हाणति तयांसि मार्ग प्रकटेति : खराटेनि विद्या । श्रीप्रभु तरि प्रत्यहीं अन्येकें रूपें धरौनि घरोघरीं मार्गोमार्गीं खेळति : मृत्य जीववीति । एथौनि तरि अनुसरणमात्रेंचि सकळही जीवातें उद्धरिजे : यापरी ईश्वरअवतार ओळखावे : " " हो कां जी : " यावरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : अवतार अवताराचें गुरुत्व स्वीकरीति : ऐसें काही आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " आति : भटो : परमेश्वरु स्वयं ज्ञानशक्ति स्वीकरीति : कां मायापुरातें आदिकरौनि स्वीकरीति : मग जीवातें वेधौनि बोधिति : कां बोधौनि वेधीति : " याउपरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : जीवासि देवतेपासौनि : कां जीवापासौनि बोध होए ऐसें काही आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : जीवासि बोधु आणि बोधशक्ति ते एथौनिचि कीं गा : म्हणौनि देवते जीवापासौनि बोधु नव्हे : परि परमेश्वरु अधिकरणातें अधिकरौनि परमेश्वरुचि उद्धरीति : " यावरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : जेथ अधिकर्ण नाहीं : आणि परमेश्वराचेनि मुखें ज्ञान जोडिलेंचि नाहीं : आणि अधिकार तरि फळासि आला : तरि तयाचें कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : एथ प्रवृत्ति जाली तरि स्तंभा एकातें निमित्त करौनि उद्धरीजैल : एथ प्रवृत्ति जाली तरि स्तंभा एकातें निमित्त करौनि बोलिजैल[४] : " यावरि म्हाइंभटीं पुसिलें : " जी जी : या जीवासि ऐसी उर्द्धमति नाहीं जें परमेश्वरज्ञान जोडे : मां जीवासि ज्ञानाधिकार कैसेनि जोडे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : तुम्हीं म्हणत असां तें तैसेंचि : परि आद्यंतीं दैव : मध्यें पुरुषु : " म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : आधीं दैव कैसें व्यापारे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " अयोग्यातें योग्य

४ **प्रव.** °ए दोनी वचनें पूजाअवस्वरीं बाइसाप्रति निरोपिलीं : ऐसें बाइदेवबा बोलति.

करीति : योग्यासि परमेश्वरू ज्ञान देति : कव्हणां कव्हणी व्येसनु : कव्हणां कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरीजेति हेंचि व्येसनु : एथचें व्येसन जयाचेनि प्रतिबंधे तेयालागि हें इशाळुवाचें इशाळु । मूर्ति परमेश्वरू एक घेउनि एक देति : अमूर्ती काहीचि नेघति :" ऐसें गोसावीं निरोपिलें : मग म्हांइंभट श्रीचरणां लागले[५] :]

## १३५ म्हांइंभटां उद्धरण निरूपण*

[म्हांइंभटां उद्धरण निरूपिलेयावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : ब्रह्मविद्ये सकळाही विद्या आनुषंगिका : रिद्धित्वें प्रकटेति कां विघ्नत्वें प्रकटेति : " हें वचन : आणि "चेइलेयां स्वप्नु लटिका तैसा अपरोक्षज्ञानिया प्रपंचु मिथ्या :" हें वचन निरूपिलें : ।।]

## १३६ म्हांइंभटां अनुसरलेयाची चर्या निरूपण*

[म्हांइंभटीं[१] म्हणीतलें : "जी जी : आम्हीं गोसावीयांसि अनुसरूनि : तरि अनुसरलेयाची चर्या निरूपावी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : नीरसां : निराशां : निराश्रयां होउनि असावें । सुखश्रया वेगळेयां होआवें : । रसक्रिये वेगळेयां होआवें : । कर्म धर्म विधि विखो परित्यजुनि परमेश्वरां शरण रिगावें । वृत्तिअधीन न होआवें : स्तितीअधीन न होआवें । विकारु हा इंद्रियधर्मु : विकल्पु हा मनोधर्मु : परित्यजुनि परमेश्वरां शरण रिगावें : मसनीचें लाकुड तेहीं वरि एका उपयोगा जाए परि आपण कव्हणाचेया उपयोगा न वचावें । तुमचेनि मुंगी रांड न होआवी । तुम्हां पडिलेयां धुळी न लगावी :" ।। ]

## १३७ भीक्षाविधि तथा अटणविधी निरूपण*

[म्हाइंभटीं[१] विनवीलें : "जी जी : आम्हां भीक्षाविधि निरूपावा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : परमेश्वरालागी रंकां होआवें । निर्धूम नगर जालेयां भिक्षे रिगीजे । तिसरां पाहारीं भिक्षा कीजे । पाठीं भिक्षे जाए तो विरक्तु । एकी भिक्षा न करावी । क्षण एकु उभेया राहीजे : मग निगौनि जाइजे । भिक्षे पडिला हातीं घेइजे । आला विखो पायें हानावा । भिक्षा मागौनि नदीचां तीरीं भोजन कीजे । क्षुधानिवृत्ति कीजे । जेवितां आवडी गोडी न होआवी । भीक्षे उष्ण ए : सीळें ए : सदन ए : कदन ए : रेंदा ए : चेंदा

---

५ (प्रव. वि. १०४–१२०).

१३५. *(प्रव. विमा. १९८–१९९).

१३६. *(प्रव. आ. ५३–६१).

१ प्रव. आ. ५३. डोंबेग्रामीं अवस्थान°.

१३७. *(प्रव. आमा. ५१–७४).

१ प्रव. आमा. ५१. डोंबेग्रामीं अवस्थान°.

ए : म्हणौनि तुम्हां घृणात्यागु होआवा । हां गा : हें भीक्षान्न कीं : हें पवित्राचें पवित्र कीं । गावांबाहीरि खांडदेउळीं कां झाडातळीं नीद्रा कीजे । स्वभावीं वर्तिजे । सीतोष्ण-परिहारु कीजे । तुम्हां वोली बहीरवास न व्हावी । मार्गी पडिलें वस्त्र घेपे । श्वानकुंडली कां कोपरदुटी पांगुरावी । तुम्हां अशन आच्छादन होआवें । नवें वस्त्र न नेसावें । मळ-घाणी फेडिजे : जळघाणि लावीजे । गोंडी बुंथी घालिजे । अन्यमार्गियांचा संसर्गु न करावा । अन्यमार्गियांचिये गुंफे न वचावें । गोरुवासरिसें गावांतु रिगीजे । देउळीं निद्रा न कीजे । एकां वेडीपिसीं नुरेति । सवेळेंचि उठौनि मार्गीं उभयां ठाकिजे : सांगातु पाहीजे : मागिलें म्हणेति पुढिलांचीं : पुढिलें म्हणेति मागिलांची । सिवनींचींचनां आपुली मोळी गावावाहिरी झाडातळीं घालावी । गंगातीरीं असिजे । सातांपांचां दीसां आपुली दावली दाविजे । " " हो कां जी : " ऐसें म्हाइंभटांसि गोसावीं निरूपीलें : ॥ ]

## १३८ तथा परमेश्वर चतुर्विध लक्षण निरोपण*

[ डोमेग्रामीं राजमठीं अवस्थान : ईश्वरप्रतीति जालेयानंतरें एक वेळ म्हाइंभट गोसावीयांचेया दर्शना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग पूजा केली : भक्तीजनांसहीत स्वेत उपहारू केला : पाटाउ त्रीवडी ॐळगवीली : मग भटां परावर निरोपण करीतां म्हांइंभटीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : ज्ञानाचें लक्षण कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : ज्ञान मोचक : " " हो कां जी : तरि कवणाचें ज्ञान मोचक ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वराचें : " " जी जी : तरि तयाचें कैसें लक्षण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : नित्य व्यापकु परमेश्वरू : तो अप्रमेयु : अनिमीतबंधु : अनाथनाथ : आर्त्तदानी : कृपाळु : " म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : परमेश्वराचें स्वरूप कैसें असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वरु पुरुषार्थु : लाभापासौनि लाभु : *विभुत्व*[1] ऐसें असे हो : " " हो कां जी : " म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : परमेश्वरा कारण कैसें असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वरू सेव्यो : जीवु सेवक : ऐसें असे : " " हो कां जी : तरि कार्ये कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " विरुद्धा धर्मीं समावेश परमेश्वरींचि आति : " यावरि भटीं पुसिलें : " जी जी : व्यक्ताव्यक्त परमेश्वरू तो अनमीतबंधु : आनाथनाथु : कृपाळु : आर्त्तदानी : परमेश्वरू पुरुषार्थु : लाभापासौनि लाभु : ऐसा वाखाणिला असतां साक्ष कैसा बुझावा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : अव्यक्त परवस्तु परमेश्वरु एकु आति : तो आवतरौनि आपुलेया व्यक्ताअव्यक्ताचें ज्ञान करीत आपणचि साधन होए : आपणचि साध्य देता होए : प्राप्य देता होए : आणि अव्यक्त कव्हणी उपयोगा न वचे तो साक्ष बोलिजे : " यावरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : साक्षाचें कैसें लक्षण ? "

---

**१३८. *(प्रव. विमा. १–११)**

१ (**सूत्रपाठ. विमा.** १५२. संपादक).

सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : आपण करी ना : आणीकाकरवी करवी ना : करीतां तरि सकळहीं देखे तो साक्षी बोलिजे : " ऐसें गोसावीं नीरोपीलें : तें म्हांइंभटीं घोकीले : मग म्हाइंभट श्रीचरणां लागले : ।।

## १३९ परमेश्वरशास्त्र सिद्धांत*

[ एकु[१] दीं गोसावीयांसि छिन्नपापी गुंफे अवस्थान : म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : परमेश्वरशास्त्रीं कीती सिद्धांत असति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " च्यारि असति : " " जी जी : ते कवण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " नित्यानित्यवस्तुविवेक : इहामुत्र-फलोपभोगविराग : शमदमादिसाधनं : मुमुक्षत्वं च : " ।। ]

## १४० म्हाइंभटां महावाक्य निरूपण*

[ डोंबेग्रामीं अवस्थान : एकु दीं गोसावीं म्हांइंभटाप्रति महावाक्य नीरोपीलें : तें ऐसें : सर्वज्ञें म्हणीतलें : " जीवप्रपंचव्यतिरिक्त सच्चिदानंदस्वरूप परमेश्वरू एकु आति : तो सर्वशक्तियुक्त : । नित्य : केवळ : अनादि अविद्यायुक्त वस्तु एकु आति : ते जीवशब्दें बोलिजे । विश्वरूपाचिये ठाउनि मृतिकापर्यंत प्रपंचु बोलिजे : व्यतिरिक्त म्हणिजे वेगळा । सत् शब्दें ब्रह्म बोलिजे : चित् शब्दें माया बोलिजे : आनंद शब्दें ईश्वरू बोलिजे : ब्रह्म माया ईश्वरू ऐसा त्र्यंश परमेश्वरू एकु आति :" इतुकें म्हांइंभटीं घोकीले : मग गावा गेले : ।।

उदयांचि आले : पींडापासि गोसावीयांची भेटि जाली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : अंश शब्द वीभागावाचक : कीं समवायी कार्यावाचक ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तीन अंश म्हणिजे वीभाग आहेति जयाचां ठाइं तो त्र्यंश परमेश्वरु : ना तेथ एकावेगळे एक नव्हति म्हणौनि : आणि तुम्ही म्हणत असा त्र्यंशु तरि एकु कैसा ? ना तेथ एकु वेगळा करों नैए म्हणौनि : तेथ अंशु अंशिया ऐसा काही भावो असे ? त्र्यंशु हा निरूपावेया दोषें[१] म्हणिजतु असिजे : तरि तें सकळाचें ज्ञान होआवेया : " ।।

ऐसें महावाक्य नीरोपीलें : आणि काही नीर्वचन : आणि माया ईश्वरीचें प्रथम करण : हें प्रमाण : आणि अनंत ब्रह्मांडीं एकीचि माया : हें : यावरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : ब्रह्म : माया : ईश्वर नित्यानित्य म्हणितलें जीवासि विषयो होति किंवा न होति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : ब्रह्म तें अस्ति नास्ति ऐसेयांसि विखो नव्हे :

---

**१३९.** *(**प्रव. आमा.** १५१).

१ आम्नाय पाठ°.

**१४०.** *(**प्रव. विमा.** १२–१४).

१ **एवा.** °निरूपावेया दोषें म्हणिजे.

माया ते अस्ति नास्ति ऐसेयांसि विखो होए : ईश्वरू तो अस्ति नास्ति ऐसेयांसि विखो होउनिचि परि नव्हे :" "जी जी : ब्रह्म : माया : ईश्वर या त्रीअंशाचें कैसें लक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ब्रह्म सकळधर्मरहितु : माया धर्मवंती : ईश्वरू सकळधर्मरहितु होए : आणि युक्तही होए[२] : ब्रह्म तें सत्य : नित्य : संत : शाश्वत : सर्वधर्मशून्य : ऐसें तें ब्रह्म : । विकरतुचि न विकरे । आनंदें दुमदुमितु असे : ब्रह्म तें नि:शब्द । आद्या शक्ति माया : गुणवंती : धर्मवंती : विकारवंती : ऐसी ते माया : । सकळही सामर्थ्यें शक्ति शब्दें बोलिजेती : । देवतास्वरूपें ज्ञाप्तानंदरूपें । दु:खमिश्रित सुख तें सुख बोलिजे : निरतिशय सुख तो आनंद बोलिजे[३] :" ऐसें गोसावीं म्हांइंभटाप्रति आपार नीरोपीलें : मग श्रीचरणां लागले : ।। ]

## १४१ तथा संसरण निरूपण*

[एकु दीं गोसावीं म्हांइंभटांप्रति संसरण निरोपिलें : तें ऐसें : सर्वज्ञें म्हणीतलें : "मायास्वरूपीं एकदेशीं तम असे : तमोनिमग्न जीव मायास्वरूपीं असति : परमेश्वरप्रवृती माया तमोनिमग्नां जीवां चैतन्यमहं ऐसें उपजवी : माया जीवातें विकरे संचरे विये प्रसवे हालवी डोचली उगळी लोटी : परमेश्वरप्रवृती मायाव्यापारवशें अविद्यात्मक जीव चैतन्यमहं ऐसें घेउनि उठीति : चैतन्यमहं जीवां जन्म बोलिजे : अन्यथाज्ञान बोलिजे : आद्यमळ बोलिजे : मायासृष्टि जीव : जीवसृष्टि प्रपंचु : मायाकृत जीव : जीवकृत प्रपंचु : मायाकार्य जीव : जीवकार्य प्रपंचु : यापरी माया जीवांतें जन्मौनि आपण उदासीन होए : परि सूत्रातें न संडी : जीवु मायेसि अधीनु होए कां प्रपंचासि अधीनु होए : मध्यें असणेंचि नाहीं : जन्मलासांतां जीवु क्षणपर्यंत शुद्ध असे : मग मैळे : चैतन्य मृत्तिकापर्यंत मैळे : चैतन्यासवें जीवु मृत्तिकापर्यंत मैळे :

---

२ (**प्रव. विमा.** १२-१४). ३ सूत्रपाठाच्या 'विचारमाळिके'तील १५३ ते १५९ या वचनांचा प्रकरणवश, 'प्रकरणवशा'च्या कोणत्याच पोथीत आढळत नाही. प्रस्तुत प्रकरणात तो बरोबर जुळतो. म्हणून ही वचने येथे अंतर्भूत केली आहेत.

**१४१. ***श्रीचक्रधरोक्त 'सूत्रपाठा'तील नव प्रकरणात अंतर्भूत असलेले 'संसरण' प्रकरण केसोबासांनी लीळाचरित्राच्या कोणत्या लीळेतून निवडले, म्हणजे त्याचा प्रकरणवश कोणता हे निश्चित सांगता येत नाही. 'प्रकरणवश'कारांनी असे म्हटले आहे की, 'संसर्णाचा प्रकर्णवस भट्टाप्रति : तोचि आणिका न जोडेचि :' याचा अर्थ, आणखी इतर कुणाला तो सांगितल्याचे जुळत नाही, म्हणून तो 'भटा'ला सांगितला, असे मानावे लागते. भटांना स्वामींनी सर्व शास्त्र निरूपिले होते, यात शंकाच नाही. त्यामुळे हे म्हणणे बरोबरच आहे. पण 'प्रकरणवशा'च्या **विमा.** ९३ व त्यापुढील वचनांच्या प्रकरणवशाच्या आरंभी 'गोसावी म्हांइंभटाप्रति संसरण निरूपिलियावरि' —असा उल्लेख आहे. त्यावरून 'संसरण' प्रकरण म्हांइंभटांना निरूपिले होते हे स्पष्ट दिसते. म्हणून ते या ठिकाणी अंतर्भूत केले आहे.

चैतन्य चैतन्यपर्यंत उजळे : चैतन्यासवें जीवु चैतन्यपर्यंत उजळे : आनाचां करणा तेयासि अभिमानु : मग जीवु प्रपंचातें रची : कां रची ? जे अधमति अधगति अधरति म्हणौनि रची : काइसेनि रचि ? तै तया सामर्थ्य आति : मग जीवु नाहीं तेंचि एक गंधर्व नगराकार विश्व रची : तेयामाजि रीगे : तादात्मकु होए : विश्वमहं ऐसे बूझे : मग जीवु नाहीं तेंचि एक गंधर्वनगराकार अष्टधा प्रकृति रची : तियेमाजी रीगे : तादात्मकु होए : प्रकृतिरहं ऐसे बूझे : मग जीवु नाहीं तेचि एक गंधर्वनगराकार अनेकधा विकृति रची : तियेमाजि रीगे : तादात्मकु होए : विकृतिरहं ऐसें बूझे : मग जीवु नाहीं तेचि एक गंधर्वनगराकार अनेकधा विकृति-विकृति रची : तियेमाजी रीगे : तादात्मकु होए : विकृतिविकृतिरहं ऐसें बूझे : यापरी मनुष्यपर्यंत मैळे : मग जीव चतुर्विधा कर्मफळां जाति : स्वर्ग : नरक : कर्मभूमि : मोक्ष : यातें चतुर्विध कर्मफळ बोलिजे : यापरी मागौति जैसी असिली तैसी सृष्टि रची : माया परमेश्वराची प्रवृत्ति वोळगे : "]

## १४२ म्हाइंभटां देवता तथा क्रियास्वरूप निरूपण*

[गोसावीं म्हांइंभटां संसरण निरुपिलियावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : सृष्टी आंतरवृत्ये चैतन्यादि देवता असति : तरि मायाचि ईश्वरीची प्रवृत्ती ऊळगे : तरि एरि कैसीया असति जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : देवता एकी ऊचा : एकी नीचा : पैली आठ : ऐली तीन्हीं समानचि : । देवता एकी राजसा : एकी तामसा : एकी सात्वीका : । देवतेसि खेदु आल्हादु आति : । देवतेसि कर्मलेपाचें ज्ञान आति : । देवतेसि आपणया खालौतें अपरोक्ष। देवता नीचा ऊचातें देखणें नाहीं : ऊचेचेया प्रवृत्ति नीचेचा संहारू : " "जी जी : तरि देवतासि जीवाचें काइसया आधार ज्ञान ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवतेचें मळाधार ज्ञान। जीव : देवता : प्रपंचु : साजात्य : नामसाम्यें साजात्य। जीव : देवता सापेक्षा : परमेश्वरु निरपेक्ष : । जीव : देवता साभिमानिया : परमेश्वरू निरभिमान : " यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : देवता साभिमानिया : हें कैसेनि जाणिजे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : जीव भजक : देवता भज्या : म्हणौनि अधिष्टानीं पालापाणी आति तवं अभिमानु आति : " म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : पालापाणी प्रतिबंधे तेधवां देवतेचा अभिमान काढे : तेथ पुनरपि पालापाणी पडे तरि काइ वायां जाए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "वायां काइसया जाइल ? क्रियाप्रयुक्तीं अभिमानु : " "जी जी : क्रियेचीं काय कवणें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : क्रिया क्रियेप्रति कारण : कां फळाप्रति कारण : क्रियेतव लेपु लागे : एकी निर्लेपा क्रिया : " "जी जी : निर्लेपा क्रिया तिया

---

१४२. *(प्रव. विमा. ९३–१०६).

कवणी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : कर्मभुमी विधीलेप भावा नाहीं : अन्यत्र विधी नाहीं : भावा नाहीं : आणि पुण्येंविन पुण्यफळ : पापेंविन पापफळ : ऐसीया एकी क्रिया तिया निर्लेपा बोलिजेति : " " हो कां जी : तरि पुण्येंविन पुण्यफळ : पापेंविन पापफळ कैसें बुझावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " द्वापरीं गोकुळीं नंदाचें रुण फेडावेया एकि जीव गोपाळवासुरुवें जालें : तेहीं नंदाचें रुण आपुलया काजा घेतलें : तें पुण्य नव्हे कीं : तेणें नंदाचां घरीं जन्मलीं : तेथ पुण्याचें फळ जालें : तैसेंचि जया यादवा शाप घडला तया यादवाचा शारीर संबंध एकीं जोडीला : तेहीं तवं पाप केलें नाहीं : परि तयाचेनि संबंधें तयाही क्षयो जाला : तेथ पापाचें फळ जालें : " " हो कां जी : तरि पाप पुण्य एकीचि देवता संपादी कीं भिन्न ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : जेचि देहारंभक तेचि भोगारंभक : पापा ए फळ दुःख : पुण्या ए फळ सुख : " यावरि म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : जें जें पुण्य तें दानात्मक असे : तरि दानामाजि कवण दान उत्तम ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " अन्नदान तें उत्तम गा : तें मनुष्यत्वातें साधी : " " हो कां जी : " ॥ ]

## १४३ गदोनाएकजायावस्त्रपुजास्वीकारु : वस्त्रदान

गदोनाएक *कटकीं*[1] धरिलें होते : मग गांवां निरोपु धाडिला : " तुम्हीं गोसावीयांपासि जावें : पाटाउंवे धारीचा ओलिसाउला नेयावा : गोसावीयांलागौनि उपाहारू नेयावा : मग गोसावीयांतें माझीए सुटिकेचें वीनवावें : " मग म्हाळाइसीं उपाहारु निफजवीला : कावडी उपाहारु : तो ओलिसाउला घेतला : दांडीये बैसौनि आलीं : दारवठां दांडीए खालुतीं उतरलीं : गोसावीयांसि बाहीरिला ओटेयावरि आसन असे : आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : स्त्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांसि ओलिसाउला : नार्येळ : दरीसन केलें : कापुरु कस्तुरि चंदन : पुजाद्रव्यें : उपाहारू बाइसांचां हातीं दीधलीं : मग गोसावीयांजवळि उगींचि बैसलीं[2] : गोसावीयांतें वीनवीवे नां : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ जा : तुम्हीं जाल तवं[3] नाएकु आले असति : " " हो कां जी : " मग दंडवत घालुनी नीगालीं : गांवां गेलीं : तवं तयांचें पाये धुइजत आहाति : मग तयापुढां अवघें सांघीतलें : ॥

मग बाइसीं तें गोसावीयांसि चंदन ओळगवीलें : मग धुपार्ती : मंगळार्ती केली : मग गोसावीं एकु साउला[4] मालगंठी वेढिला : एकु साउला सुरंगौनि[5] दोन्हीं सोगे

---

१४३. १ (मु.). पं. देवगीरी. २ यमु. °मग गोसावीं पाठवणी दीधली : नीगतां वीनवीलें : "जी जी : नाएकाची सुटका होए ऐसें वीनवीलें असे :" ३ हीबी. °एकु पावो धुवावा असैल. पं. °पाए धुइजत असीजति. ४ यमु. °तयाचेयां पाटाउवां काळीया धारीया : पांढरी भुमीका तो—. ५ गोनेपं. सुरकौनि.

पुष्टिवीभागावरि पडति ऐसे घातले : मग पटिसाळेवरि वेढे करुं आदरिलें : मग भक्तजन पुढिलाकडे : मागीलीकडौनि : स्रीचरणांचीए ठाउनि स्रीमुगटपरीयंत पाहाति : तवं सावेयांचि वरवें दीसे : मग गोसावीं नावेक अवस्वरु देउनि ते मालगंठि फेडिली : मग एरें वस्त्रें वेढिलीं : मग आसनीं उपवीष्ट जाले : तवं वाहीरिलाकडौनि महदाइसें आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : म्हांतारी थोरा एका मंगळकाळा[६] चुकली ना गा ? " " जी जी : " तवं महदाइसीं म्हणीतलें : " कोणां मंगळकाळा चुकलीयें जी : तें सांघावें जी : " म्हणौनि दंडवतें घातलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि मालगंठि घातली[७] होती : " महदाइसीं म्हणीतलें : " मीं चुकलीयें जी : *तरी ते माघौती करावी जी : " म्हणौनि माहादाइसीं आग्रहो घेतला*[८] *:* मग गोसावीं भागुता ओलिसाउला आणवीला : मग भटोबासीं म्हणीतलें : " होइल तरि काइ मागिलाचेया सारिखें होइल ? " तवं गोसावीं ते मालगंठि आधिलाहीपस्य वरवी घातली[९] : एकु साउला तो सुरंगौनि सोगे पुष्टिवीभागावरि पडति ऐसा घातला : गोसावी वेढे करुं लागले : मग पुढिलाकडौनि स्रीमुगुटाचीए ठाउनि स्रीचरणवरि पाहाति तवं सावेयांचि बरवें दीसे : गोसावी पटिसाळेवरि वेढे करुं लागले : मग भक्तजन पुढिलाकडे स्रीचरणाचीये ठाउनि स्रीमुगुटवरि पाहाति तवं तयाहीहुनि बरवें दीसे : ऐसा नावेक गोसावीं अवस्वरु दीधला : मग[१०] भटोबासीं म्हणीतलें : " तुम्हां जाली एकगुणी : आम्हां जाली दुणि : " मग मालगंठि फेडिली : गोसावीं आणिकें वस्त्रें वेढिलीं : मग आसनीं उपवीष्ट जाले[११] : ।।

## १४४ देमतिप्रति कुष्टधर्मनिरुपण

गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : साधें आलीं : तीयें गोसावीयांजवळि बैसलीं असति : देमाइसें आलीं : तीयें गोसावीयांजवळि बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणितलें : " साधें हो : तुम्हीं स्नान करुं जा : " " हो कां जी : " साधें उठिलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : धोत्र घेतलें : वाहीरि आलीं : ' गोसावी देमाइसां काइ पां निरुपीती : ' म्हणौनि दारवंडेंसीं[१] लागौनि आइकावेया राहीलीं : ।।

---

६ **गोने.** अवस्वरा. **हीबी.** अवसरा. ७ **यमु.** केली. ८ **(यमु.)**. यानंतर पुढील मजकूर आहे. सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचीया तीघी कुमारी सुआल तरी कीजैल : " ।। हे परशराम ।। पांचा कुमारी : हे रामेश्वर : ।। "हो कां जी : " मग गोसावी—. ९ **मु.** वेढिली. १० **यमु.** °भक्तजनें माहादाइसांसी तोखलीं : "**मागीलापसि आतां बरवा अवस्वरू जाला : तुमचेनि आम्हां दुणी जाली :**" ११ **हीबी.** °मग तो अवसरू महदाइसें पुन:पुन आठवीतेंचि असति. **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीवातें काइ असे ? एणें मनोर्थुचि वाढवावा कीं : "

**१४४.** १ **ने.** दारवठे. **यमु.** दारेंसीं. **पं.** दारवठेनसीं.

सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : तुम्हीं गांवासि जा : " " हें काइ जी : आपुलें सकळै सांडौनि गोसावीयांचिया दरीसनां एइजे[२] : आणि गोसावी पाठउंचि लागति : कांहीं अर्थु[३] निरुपीति नां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ होतें ? मां काइ सांडिलें देमती[४] ? पोरीया एकु होता : तो मरौनि गेला : सहजचि लेओं नैए : नेसों[५] नैए : खाओं नैए : न्हाओं नैए : तयांचे कांहीं असिलें तरि तें नाहीं : तरि वापांभाउवांचीया हांडीया तावावीया : मग घांसुभरि जेवावें[६] : तयापस्य एथौनि ' या ' म्हणिजे[७] तेव्हळि एइजे : एथौनि ' जा ' म्हणिजे[७] तेव्हळि जाइजे : हें सानें[८] देमती ? " " जी जी : तैसें असों काइ जाणिजताएं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ जाणावें असे देमती ? असिजे ऐसें कुष्टियाचां धर्मी :" " तें कैसें जी ?" " देओ माझा : मीं देवाचा : ऐसीयां होउनि असीजो कां देमती : " " जी जी : कुष्टियाचे धर्म ते कैसें ? " मग गोसावीं कुष्टियाचा द्रुष्टांतु निरुपीला : ।।

[सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु वेव्हारा : तेयासि कुष्ट जालें : धाइरीं सोइरीं तेयाची खंति करीति : वापभाउ खंति करीति : तो थुंकि तरी तेयाचे पुत्र : ब्राह्मणि खंति करीति : बाहीरि बैसों नेदीति[९] : ' तूं मर कोढी :' ' मरो कां : हें आझुइं कां जिताये : ' ऐसा उवगला[१०] : मग गांवांमागें दुबळेस्वरू देवो : तेथ आला : ' देवा : तुं माझा : मी तुझा : ' ऐसें म्हणौनि उंवरां उसिसें करूनि नीजैला : पाठीं तीयें आलीं : तेयातें म्हणे : ' तुम्हीं माझीं नव्हां : मीं तुमचा नव्हें : ' ऐसें म्हणौनि राहे : मग कव्हणी एकु खापरीं भरूनि अन्न ठेवी : कव्हणी एकु करा भरुनि उदक ठेवी : हाता-पायांचे थापे जालें होते : तो ऐसें पाणी पीये[११] : " म्हणौनि गोसावीं श्रीकराचेनि अनुकारें दाखवीलें : " मां काइसी देवता[१२] : दृष्टीं तरी अन्नोदक पुरवीलें : अदृष्टीं आपुलें फळ दीधलें[१३] : देमती : असिजे ऐसें कुष्टियाचां धर्मी : " तवं देमाइसीं म्हणीतलें : " जी

२ **यमु.** °बोलाविति तेव्हळि एइजे : पाठवीति तेव्हळि जाइजे : गोसावी कांही निरूपिति ना. ३ **गोनेहीबीपं.** अपूर्व. ४ **यमुगोनेपं.** °एवा. स्त्रीयांसि तवं त्यागुचि नाहीं. ५ **यमु.** सतसंभवी°. ६ **यमु.** °मुसवणीं पीयावें : हें नीकें ? ७ **गोनेहीबी.** म्हणितलें. ८ **यमु.** वोखटें. ९ **मेयांबा. (वासना)** °मायाबहीणी म्हणति––. १० **एवा.** त्रसला. ११ **रामे.** °कव्हणी एकु सापटें पांगुरावेया दे : १२ **एवा.** प्राकृता देवता : १३ (**दृपा.** ५३) कुष्टीयाचा दृष्टांत. **पं.** प्रतीतील मूळ लीळेतच हा दृष्टांत पुढीलप्रमाणे आलेला आहे. " कुष्टीया एकु होता : तो थबथबां गळे : लसीचे वोघळ वरि जाति : वरि टोंपुलें एक गनमनीती मासीया : हातींपाइंचीया आंगुळिया झडौनि गेलीया : तेयाची मातापीता तेयातें देखौनि थुंकीति : भाउबहीनी थुंकीति : तेयाची स्त्री ते थुंकी ना : ते सूश्रुका करी : मग कीवीं सूळबूळीत पडीले : **एवा :** तेव्हळि ते थुंकीली : मग तेणें म्हणीतलें : ' आतां जीउनि काइ करावें ? आतां मातें नेउनि घाला दुबळेस्वराचां देउळीं : **एवा :** सोमनाथाचां देउळीं : ' ' नां हो

जी : तरि अन्नावस्त्राचें कैसें करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : सासार्जुनें भक्तितव थापा इंगळ घेतलें : तया एसणें सामर्थ्य दीधलें : मां तो एसना परमेश्वरु : तेयांचेयां होइजो कीं देमती[१४] : " ।। ]

## १४५ सहस्रार्जुना वरप्रदान

[ *देमाइसीं पुसिलें : " जी जी : सासार्जुनें थापां इंगळ घेतलें तें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तें तुम्हां एथौनि सांघिजैल[१] : "* सर्वज्ञें म्हणीतलें[२] : " सासार्जूनू तो उपाळींगु[३] : राज्या अन्हू नव्हे : तेणें प्रधाना राज्य नीरोविलें : " तुम्हीं राज्य सांभाळा : आम्हीं आपणेयां हात जोडुं जाउनि[४] : आम्हीं आपणेयां हात जोडुनि : मां राज्य करूनि : " म्हणौनि रीखीस्वरांचे आश्रम पाहातपाहात सैह्याद्रासि आला : तेथ श्रीदत्तात्रयप्रभूचां आश्रमीं नीवैरें भूतें देखिलीं : तेथ राहिला[५] : काहीं सेवादास्य केलें[६] नाहीं : एकू दीसीं श्रीदत्तात्रयप्रभूसि मर्दनामादनें जालें : केसकळाप धुपावेया-कारणें धुपटनें पाहातु होता : तवं धुपटनें नेदखे : केसकळाप वाळति तरि धुपू न लगे : म्हणौनि थापां आंगारा घेतला : *वरी धुपु घातला*[७] : केसकळापां धुपूं लागला : तवं करपटाणि आली : श्रीदत्तात्रयप्रभू ऐसें पाहिलें : " हें काइ ? सांडि : सांडि : माग : प्रसंन जालां : " समोर आला : हात जोडुनि पूढां उभा ठाकला : मग म्हणीतलें : " जी जी : ते गोसावी जाणताति : " श्रीदत्तात्रयप्रभू म्हणीतलें : " सहश्र भुजा होतील : अतुर-बळीया होसील : चक्रवतिपद[८] होइल : तीहीं लोकीं गमन होइल : जाणौनि लोकाचे मनोर्थ पूरवीसी : परि आम्हीं ब्राह्मण : ब्राह्मणू क्षोभवीसी तरि नाससी[९] : तेणें तेंचि केलें : म्हणौनि तेंचि तेयां जालें : " *देमाइसीं*[१०] *पुसिलें : " तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें तुम्हां एथौनि सांघिजैल*[१] : " ।। ]

---

कां : ' मग तेहीं उचलौनि नेउनि लींगापासीं घातला : माए सूश्रुका करी : ते थुकी ना : तवं आस जीनेयांची होती : परि ते दुखातें गनावी नां : मग तेही चीळसाइली : थुंकीली : मग तेणें नेववीलें : तेणें म्हणीतलें : ' माउलीए : तुं माझी आणि मीं तुझा : ' ऐसें म्हणीतलें तवं देवता अभिमानु घेतला : जीयाला : तवं दृष्ट पुरवीलें : अदृष्टीं आपुलेया फळासि नेलें : मां ऐसीया परी असीजो कां देमती : " ।। १४ (**प्रव. आ.** २०६).

**१४५.** १ ही व यापुढील, या श्रीदत्तात्रयप्रभूच्या दोन लीळा सर्वज्ञांनी कोठे व कुणाला सांगितल्या हे निश्चित नाही. पण मागील लीळेच्या अनुषंगाने त्यांचा संबंध येथे योग्य जुळतो. म्हणून मी त्या येथे घातल्या आहेत. हा संबंध जोडणारे हे वाक्य संपादकाचे म्हणजे माझे आहे. २ **मुगो,** °कृतविर्याचा कार्तीकविर्ये तो वीकटबाहु जन्मला : तो राज्या अर्ह नव्हे : ३ **गो.** °तेया हात नाही : ४ **भ.** जाउनु. ५ **गोमु.** °श्रीदत्तात्रयप्रभूचें सेवादास्य करूं लागला : ६ **भ.** आलें. ७ **(मु.)**. ८ **एवा.** वळांक्रते पृथ्वीचें राज्य. ९ **भगोमु.** °गाय : ब्राह्मणु : स्त्री. तिन्ही अवध्य : १० **एवा.** महदाइसीं.

## १४६ परसरामां भेटि

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु दीं राओ पारधीसि आला : तवं राओ अरण्यांतु तान्हैला : एक उदका शोधीत जमदाग्नीचेया ठाया गेला : तवं एकवीरा जमदाग्नी[१] दोघें सारीपाटु खेळतें होतीं : तेणें म्हणीतलें : 'राओ तान्हैला : तरि पाणीं होआवें :' एकवीरा कानीचां मळु काढीला : चरवी[२] केली : तें पाणीयें भरुनि दीधली : तेणें म्हणीतलें : 'एणें उदकें काइ होइल ?' एकवीरा म्हणीतलें : 'जा : पुरैल :' तवं नेतां चरवी फुटली : तो सरोवरु जाला : मग हस्ती घोडे पाइकु परीवारु आवघेयांहि उदक पुरलें : तवं राओ भुकैला : मागुता जनु पाठवीला : तेणें म्हणीतलें : 'राओ भुकैला : तरि जेवण होआवें :' एकवीरा म्हणीतलें : 'ना जा : हातपाए धुनि या :' एकवीरा स्वर्गुनि इंद्राची कामधेनु अव्हानीली : ते नानावीधें पक्वानें श्रवली : तवं राओ आला : रायासि परिवारासि जेउं घातलें : जेवीले : मग राएं म्हणीतलें : 'एं अंनें आमचां राजीं नाहीं :' तीहीं म्हणीतलें : 'एं अंनें ए गाइपासौनि :' राएं म्हणीतलें : 'ना हे गाए आम्हां देयावी :' तीहीं म्हणीतलें : 'नां : हे इंद्राची कामधेनु : तुमचेनि नेववैल तरि नेया :' तेहीं नेओं आदरीलीं : तवं ते हागीली : मूतीली : तो पाइक-परीवारु हस्ती घोडे ऐसें श्रवली : जूंझ हों लागलें : तो राओ पराभवीला : राएं म्हणीतलें : 'इतुलें एणें ब्राह्मणें केलें :' म्हणौनि जमदाग्नी मारीला : आणि एकवीरा वरि पडिली : तीसि घाए लागले : ते गेले : एकवीरा टगटगीति होती : 'परसरामा : धांव धांव :' *म्हणौनि धावा फोंकारीला*[३] : परसरामू कैळासीं माहादेवापासि वीद्या अभ्यासीतु होता : तवं एकवीरा धावा फोकरिला : माहादेवें म्हणीतलें : 'तुमचीए मातेसि आपति पडली असे : तुमतें बोलीवीत असे :' *परसरामू पैजा घेउनि नीगाला : 'एकवीस वेळ नीक्षेत्री प्रीथीवी करीं तारि मीं परसरामू होयें[४] :'* आला : तवं एकवीरा घाइं टूकटूगीत[५] असे : जमदाग्नि घाइं ठेला असे : एकवीरा म्हणीतलें : 'श्रीदत्तात्रयप्रभू आचार्ये करावे : नीसले भूमी संस्कारू करावा :' 'ते मीं काइसेन वोळखैन ?' 'तेयाचां दर्सनीं[६] कोरडा काष्टीं कोंभ फुटती :' तैसेंचि एकवीरा देह ठेवीलें : परसरामें दोन्हीं कावडीं घातलीं : कावडि खांदावरि : परसरामू बहुत भूमी हींडीनला : मग सैह्याद्रासि आला : ऐसा जाते तवं ऐलाकडौनि श्रीदत्तात्रयप्रभू पारधीयाचेनि वेखें बीजें करीत होते : खळिचा साउला : मालगंठी वेढिला होता : डावीए श्रीकरीं सूणेयांची जोडि : तीएचि काखे[७] गडीयाळा : उजिवीए श्रीकरीं मांस : आणि सूरेची करवती : श्रीमुगुटीं दोरनें[८] : श्रीचरणीं दुतळीया उपाहानौ : सरिसीं आउसें होतीं : ते खळिचा

---

**१४६.** १ **गो**$_2$. जमदगीरी. २ **मु.** करंडा केला. ३ (**गो**$_1$**गो**$_2$). ४ (**गो**$_1$**गो**$_2$**मु.**). ५ **भ.** टूकटूकी. ६ **गो**$_1$**गो**$_2$. °नीजीवें तीएं साजीवें होती : अचेतनें तीएं चेतनें होती°. ७ **गो**$_1$**गो**$_2$. °सींग : गडियाळा. ८ **भगो.** दोरियाणा.

साउला परिवटें नेसलीं होतीं : खळिची चोळी लेइलीं होतीं : पाखेयां गांठी दीधलीया होतीया : मोकळी वेणी : पाइं वाहाणा : ऐसें देखिलें : तवं कावडी कोंभ फुटले[९] : तैसीचि कावडि ठेविली : आणि दंडवतें घातलीं : श्रीदतात्रयप्रभु नीराकारूं लागले : 'हें काइ ? तुं ऐसा : आम्हीं ऐसें ? ' ऐसें श्रीदतात्रयप्रभू नीराकारूं लागले : परसरामू वीनउं लागला : श्रीदतात्रयप्रभू वीनवणी न स्वीकरितीचि : मग सरिसीं आउसें होतीं : तीहीं वीनवीलें : तेव्हळि श्रीदतात्रयप्रभू वीनवणी स्वीकरिली : तेव्हळि श्रीदतात्रयप्रभू म्हणीतलें : ' परसरामा : सर्व तीर्थें आणावीं[१०] लागती : ' परसरामें म्हणीतलें : ' जी जी : गोसावीयांचां श्रीचरणीं सर्व तीर्थें : ' तेव्हळि श्रीदतात्रयप्रभू[११] परसरामाकरवि बाणू घालवीला : उदक नीगालें : तेथ श्रीदतात्रयप्रभू श्रीचरणिचा आंगुठा धुतला : सर्व तीर्थें केलीं : मूळदरी संस्कारू केला : एकू टोळा घातला : मूळपीठीं प्रतीष्टिला : सूरा करूनि सींचन केलें : मांस वाइलें : ' भोग[१२] पाव : ' ऐसें म्हणीतलें : ' " महदाइसीं पूसिलें : " सवे होतीं : तीएं कोणें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तीयें अनंघा[१३] : " ।।]

## १४७ मेंडकासि वेधें आकरखणें

गोसावीयांसि वीळिचांचेया[१] पुजाअवस्वराची आइति केली : तवं मेंडकु एकु गोसावीयांचीया पुजाअवस्वरा आला : तो बाइसांचां पाइं लागला : तो पाइं धरुनि सांडिला : तवं एरी दीसीं मागौता आला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : हा मेंडुकु तोचि ? " " ना जी : तोचि काइ होइल ? आणिक एकाधा होइल : " सर्वज्ञें म्हणीतलें[२] : " यासि ओळखण करा गा : " मग भटोबासीं तयाचीये गळां कवडी बांधली : तवं एरे दीं मागौता आला : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें मग दारवठेया बाहीरि घालवीला : तवं एरे दीं पुजाअवस्वराचीए समैं दारवठे गोसावीं घालवीले : तवं माघौता आला : " जी जी : आला जी : " मग गोसावीयांचा पुजाअवस्वरु पाहीला : मग गोसावीं वेसीबाहीरि घालवीला : तवं एरीं दीं माघौता आला : पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं गंगेपाडि[३] घालवीला : तवं एरी दीं पुजाअवस्वराचां मानीं मागौता आला : " जी जी : आला जी : हें काइ जी : तेथौनि कैसा आला ? " सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " हा कव्हणी एके वेधसक्तिचा व्यापारू गा[५] : " ।।

---

९ **गो,गो,** °नीजीवें होतीं तीएं साजीवें जालीं : अचेतनें होतीं तीएं चेतनें जालीं. १० **एवा.** होआवीं. ११ **गो, गो,** °म्हणीतलें : "तरि घालि एथ बाण :" बाण घातला : तवं पाणी नैएचि : तेव्हळि श्रीदत्तात्रप्रभु श्रीचरणीचा आंगुठा लावीला : आणि तेथचि सर्व तीर्थें आलीं : १२ **एवा.** भोगातें. १३ **भ.** अनंगा. °**रावा.** ते मायादेवी.

**१४७. १ यमु.** उदेयांचेया. २ **यमु.** °याचीए गळां कवडा बांधा :" मग भटोबासीं——. ३ **एवा.** °देइगांवांचीए पाणीवठां. ४ **यमु.** °एथचीये सक्ती एकीचा व्यापारु : (सक्तीतें अधीकरुनि परमेश्वरू व्यापारति–**य.**). ५ **पं.** °यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां वेधु आणि वेधसक्ति ते एथौनिचि कीं गा :"

## १४८ इंद्रेया पर्णानएनीं भटां कौसाल्य प्रसंसा

गोसावीयांसि वाहीरिला ओटेयावरि आसन असे : इंद्रभटीं गोसावीयांलागौनि वरवीं पानें : पोफळें : आणिलीं : गोसावीयांपुढें ठेविलीं : दंडवत घातलें : स्रीचरणां लागले : दादोस होते : मग भटोबासीं इंद्रभटांचीया पोफळांचीया फोडी केलीया : तीया गोसावीयांसि ओळगवीलीया : मग तीयें पानें ठेविलीं : मग भटोबासीं आपुलींचि[१] पानें काढिलीं : मग भरेयांतु सें पानां नीवडीति : तयां चोखटां पानांचा गोसावीयांसि वीडा ओळगवीला : मग भटोबास गेले : मग दादोसीं म्हणीतलें : " जी जी : कैसा नागदेओ दुष्ट : प्राणियांचें गोसावीयांचेया उपयोगा जाओं नेदी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसा[२] हा नव्हे कीं गा : निकें तें एथचेया उपयोगा जावें ऐसा[३] हा कीं : *आणि इयें असतां तीएं कां गा देइल ? आणि इयें सरलीं होतीं : मग*[४] तीयें तो काइ करील ? मग तन्हीं एथचेया उपयोगा नेइल कीं ? आणि यालागि जो पदार्थु घेइजे तो याकरवि घेववीजे : तें हा घेओं जाणे : बाइसें याचिकरवि घेववीति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु देवतेसि तीळातांदुळांची[५] पुजा करी : मग कठीया[६] असे तें तो आवघें फेडी[७] : मग देवतेसि त्रपर्ण[८] करी : मग एक पुष्प[९] वाहे : परि तीएसि तयाचें ओखटें नाहीं : कां पां ? तो देवतेसि नीकें तें करीतु असे : वेव्हारेयाचीं[१०] लेंकरूवें तेथ खेळों नेदी : अडीया पाडिती म्हणौनि सींपुटीएसीं पाठीं लागे : पर तयासि तयाचें ओखटें नाहीं : तैसा हा एथचा कठीया कीं गा : "।।

## १४९ दाको आर्पीत जाडि चमरी स्वीकारू

दाको तो चामारगोंदांचा[१] खाती : तयासि भींगारप्रदेसीं[२] गोसावीयांचें दरीसन जालें होतें : मग तेणें[३] गोसावीयांलागौनि एकि पांचवणी जाडि वीणवीली : एकि चवरी[४] : ऐसें घेउनि आला : आंगणीं उभा ठाकला : तवं गोसावीयांसि सदर्था माहाजनांची सरालेकारांची पुजा होत असे : *तवं बाइसें बाहीरि आलीं : तेणें म्हणीतलें :* " आइ : गोसावीयांपुढें ऐसें जाणवा : दाको आला असे : " गोसावीयांपुढां जाणवीलें : " जी जी : दाको आला असे : " गोसावी उगेचि : मग तीहीं गोसावीयांसि वरवा पुजाअवस्वरु केला : मग गोसावीं तयां अवस्वरु देयावा : तो नेदितीचि : मग[५] बाहीरि बीजें केलें[६] : मग दाकोनि गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागला :

---

१४८. १ **गोनेहीबीपं.** हडपी(पे) चीं. २ **एवा.** तैसें नव्हे—. ३ **एवा.** तैसें कीं. ४ (**गोनेही.**). ५ **हीबी.** फुलांतांदुळांची. ६ **गो.** कढीवीं. ७ **एवा.** सावडी. ८ **यगोही.** स्तपण. **नेबीपं.** तर्पण. ९ **एवा.** फुल. १० **एवा.** सदर्थाचीं.

१४९. १ **यमु.** मीरडाचां. २ **यमु.** वांकीयेसि. **हीबी.** °पाठारीं. ३ **यमु.** °चांभारगोंदां. **हीबी.** तेणें गोसावीयां लागौनि पांचवणी जाडि : चवरी : पोफळफोडणा : पळी : आरती : तावा : **एवा.** आरिसा : ऐसे सा ठाये गोसावीयांचेया दर्शना आणिले : ४ **यमु.** °करवीली. ५ **एवा.** °गोसावी सोंडीएवरि (**एवा.** आंगणी) उभे राहीले : ६ **यमु.** आंगणीं उभेयां भेटि जाली.

जाडि चवरी दरीसन[७] केली : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा दाकेया : तुम्हांसि नीरोधु जाला ?" "ना जी नीरोधु काइसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें[८] देखीलें गा दाभणांचें गोणटें[९] : आंतु बाहीरि भरले असति :" "जी जी : हें मीं जाणत असें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ए : ऐसा[१०] बैस :" मग गोसावीं तयासि पाए धुं घालवीलें : मग गोसावीयांसि भीतरि ताट जालें : गोसावीं आपुलीये पांती दृष्टीसमोर पटिसाळेवरि दाकोसि वाढवीलें : गोसावीयांसि आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा उ्ळगवीला : तयां पांती जेवण जालें : तांबोळ देववीलें : मग ते जाडि गोसावीयांचीया तीहीं अवस्वरां उपयोगा जाए : दुपाहारिचां वीळिचां *जाडीएवारी*[११] पहुडु होए : मग ते जाडि चवरी : पोफळफोडणा : आर्ती : धुपटणें : पोफळें : क्वचितमतें कापुरु : हे सा ठाए बेलोपुरींहुनि दायंबा हातीं गोसावीं परमेश्वरपुरा पाठवीले : मग ते जाडि श्रीप्रभूगोसावीयांसि आसनासि वीनयोगा[१२] जाए : ।।

## १५० साधा गुडभेदु[१] कथन

साधें[२] पर्वा चुकलीं म्हणौनि दुखत्रांतें गोसावीयांचेया दरीसनां आलीं : देखिलीं : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : काखेचा मोटळा[३] परता ठेवा : मग एथ नमस्कारु करा :" भवंतें पाहों लागलीं : काखें कांहीं नाहीं : गोसावीयांचेया सब्दावरि लक्ष नाहीं : "जी जी : पर्वा चुकलीएं जी :" म्हणौनि दुख करुं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : हें भेटे तेव्हळिचि पर्वकाळु कीं :" गोसावीयांचेया सब्दावरि लक्ष नाहीं : मागौतें म्हणति : "जी जी : मीं पर्वा चुकलीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "कां चुकलींति साधें हो ?" "आएचीए[४] लेंकिचें बाळांतपण करुं गेलीयें होतीयें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते लेंकि काए आएची[५] ?" "ना जी : पोटीं उपजली तरि माझीए : पर आएचा[६] लोभु म्हणौनि आएची[५] म्हणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें म्हणां तरि तुम्हीं वीडी तोडिली : भेली चाखिली :" "तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सातां[७] वरिखांचा नोवरा : पांचां[८] वरिखांची नोवरी : मग कोडें कवतीकें वेओ[९] कीजे : मग[१०] तेयांकरवि वीडी तोडवीजे : भेली चाखवीजे :" "ना जी : तें आमतें नाहीं : तें तुमतें लाडांतें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति : एथौनि वीडी तोडिली : भेली चाखिली : एथ कमळा नांवं राणीं असे[११] : एथ सतां वरिखाचा पुत्रु असे : तयाचीया[१२] भवै नेतवटें वांधीजताति : तो

७ **यगो.** दर्शना. **हीबी.** जाडी : चवरी : एर पदार्थ दर्शना केले : ८ **यमु.** °अवघें. ९ **यमु.** °असति. १० **मुनेपं.** ऐसें बैसा. ११ **(गोनेहीबी.)**. १२ **यमुनेही.** उपयोगा.

**१५०.** १ **हीने.** °भेली. **य.** °छेदु. **मु.** °स्वाद. २ **हीबी.** °प्रतेस्थानासि गेलीं होतीं : तयांसि चैत्रासि न येवेचि°. ३ **मुने.** मोटाळा. ४ **पं.** आलीएचीए. **यमु.** आइएची लेकि कोनी रिगाली तीयेचें°. ५ **पं.** आलीएची. ६ **गोनेहीयमु.** आइएचा. **पं.** आलीएचा. ७ **एवा.** दाहां. ८ **एवा.** सातां. ९ **गोने.** वीव्हावो. **पं.** वऱ्हाड. १० **यमु.** नोवरी नोवराचीए तोंडीची वीडी काढी : नोवरा नोवरीचीए तोंडीची वीडी काढीतां भेली चाखे. ११ **यमु.** °ते कमळनएना. १२ **यमु.** पाटाउंवा

हातीं काठी धरुनि खें खें करीत चालत असे :" "हें काइ जी : गोसावी इउले : आणि पुत्रु एव्हडा ? हें सांघावें जी :" म्हणोनि पालवा पिळु सुदला : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें नैए सांघों साधें हो :" "ना जी : सांघावें जी :" "हें नैए सांघों साधें हो : हें सांघीजे तरि माल्हुबाइची आण :" साधें उगीचि राहीलीं[१३] : मग साधें बीढारा गेलीं :।।

## १५१ आक्षेत्रीतीए लाहामाइसां आनीत उदकपान

आखेत्रीतीएचां दीसीं लखुबाइसीं गोसावीयांसि वीनवीलें : "जी जी : मीं गोसावीयांचां ठाइं आक्षेत्रीतीया[१] करीन :" गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग तीहीं उपाहारु निफजवीला : गोसावीयांसि मर्दनामादणें[२] जालें : पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि आरोगण जाली : गोसावीयांसि वान घागरी[३] ऐसें वोळगवीलें : तवं लाहामाइसें दुख करुं लागलीं : "यें लखुबाइसें सदैवें : एहीं गोसावीयांचां ठाइं आखतीज[४] केलीं : आम्हीं नदैवें[५]: आमतें कांहींचि नाहीं :" ऐसें दुख करुं लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एहीं एथ आखत्रीतीया केली : तुम्हीं न करा तें काइ ?" "ना जी : आमतें कांहींचि नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें[६]: "जा : हे घागरि आंतुबाहीरि धुआं : खोला पाणियांतु : बुडकळुनि भरा : एथ उदक संपादा : मां एथौनि तुमचीया आखत्रीतीया संपूर्णा[७] कीजती :" तेहीं म्हणीतलें : "हो कां जी :" मग घागरि घेउनि गंगेसि गेलीं : आंतुबाहीरि धुतली : खोला पाणियांतु बुडकळौनि[८] भरुनि घेउनि आलीं : वाटें उटिलें : मग गोसावीयांसि उदक ओळगवीलें : मग गोसावीं स्वीकरीलें : मग म्हणीतलें : "बाइ : एथौनि तुमचीया आखत्रीतीया संपूर्णा हो :" ।।

## १५२ साधां वैस्यगृहवासअभियोगें परीहासु

वारसीचां दीसीं साधें भामाठाणां[१] भीक्षेसि नीगालीं : तवं मागिलाकडौनि अनोसि[२] स्तीति जाली : तीहीं कुपिनु[३] फेडिला : डोइएभवंता भवंडीतभवंडीत एत असति : साधीं देखिलें : आणि भीयालीं : "आइ आइ : अंनोसि पीसें लागलें : हा मज झोंबैल :" म्हणौनि एकी वेसीआड[४] लपालीं : "हा भीक्षा करुनि एइल : मग मीं जाइन :" मग अंनो भीक्षा करुनि आले : मग आपण गेलीं : तवं दोनि पाहार जाले : दों चौं घरीं भीक्षा

---

पागा भवै बांधलीया असति. १३ यमु. येथचि रुसले देवो : साधांपुढें सांघीतलें.

१५१. १ गोने. अखतीज. २ गोय. माजणें. मु. मार्जनें. ३ अ. °दीधली. पं. °वीडा पोफळें ऐसें—. ४ अ. °त्रीज. गो. आखे°. ५ गोबी. नीदैवे. ने. नीदैवें. ६ यमु. °"बाइ : या आरूती : हे केळी रीचवा : जा : खोला पाणीयांतु रीगा : गाळुनि उदक भरा : एथ उदक संपादा :" ७ य. °चरीतार्थ. ८ गो. चुबकळूनि.

१५२. १ यमु. बादाठाणां. २ गोहीबीयमु. प्रतीत सर्वत्र 'आनो' असे रूप आहे. ३ गोनेमुही. कौपीनु. ४ गो. वल्हैटेया°. ने. वल्हाटेया°. मुबीपं. वल्हे°. य. गावांतु कलवडी लपाली. पं. वाळुवंटीं

केलीं : एकां ब्राम्हणाचां घरीं थाळा मागीतला : तेहीं ताकपातसें[५] घातलें : मग तेयांचीये ओसरीयेवरि एकलीं जेविलीं : मग उरली भीक्षा ते ठेविली : मग आलीं : तवं गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा ३०ळगवीला : पहुडु जाला : उपहुडु जाला : गोसावीयांसि आसन असे : तवं साधें आलीं : झोळी खूंटीये ठेविली : मग गोसावीयांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : गोसावीयां-जवळि बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ साधें हो : आजि एथ झोळी द्रुष्टपूत न कराचि तें काइ ? " " जी जी : तें जालें ऐसें : अंनोसि लागलें पीसें : तो हा कुपिनु फेडुनि डोइएभवंता भवंडीतु होता : तेयातें देखिलें : आणि भीयालीयें : हा मज झोंबैल : मग वल्हंटेया[४] आड लपालीयें : मग हा भीक्षा करुनि आला : मग मीयां भीक्षा केली : तें भुकेलीयें जी : दोनि पाहार जाले : मग एकां ब्राम्हणांतें थाळा मागीतला : तीं ताक-पातसें[६] घातलें : मग तेथ जेवीलीयें जी : मग उरलें अंन आणिलें : मग उसिटी झोळी काइ द्रुष्टिपुत करुं : म्हणौनि पैऱ्हां ठेविलीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तें घर वाणीयांचें : " " ना जी : तयांचां दारीं[७] तुळसीचें वृंदावन असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाणियांचांहीं दारीं तुळसीचें वृंदावन असे : कां गा वांनरेया ? " " तरि काइ जी : तीयें कटकीचीं वानीयें : आम्हीं कटका जाओं : तैं तेथ वेचु घेओं : " " ना जी : तयांचीयां बाइलांचे एव्हडे कान : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाणीयांचीयांहीं बाइलाचे एव्हडे कान : " " ना जी तयांचीया बाइला गोरीया : तयांचीं लेंकरुवें गोरीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाणीयांचीयाहीं बाइला गोरीया : वाणीयांचींहीं लेंकरुवें गोरीं : कां गा वांनरेया ? " " तरि काइ जी : " आणि तीयें उगींचि राहीलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : ऐसांहीं तें घर वानीयांचें जालें तरि तुम्हीं काइ कराल ? " " जी जी : तरि मीं गोसावीयांचें चरणोदक घेइन : मग मीं आपुलें पोट पवीत्र करीन : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तें घर वांणीयांचें नव्हे : तें घर ब्राम्हणांचें : तें तुमतें एथौनि चाळवीजत[८] होतें : " *यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " काकु : कक्षा : भावार्थु : प्रकर्ण जाणावें[९] : "* " हो कां जी : " ।।

## १५३ मंडळीकुपुष्टींअरोहणीं साधां जोगिदंडदानअभीमूख

गोसावीं नाथोबाचीए पुष्टीवरि आरोहण करुनि दोहीं श्रीकरीं खांदावरि जोगीदंडु धरिला असे : गोसावीं[१] आंगणीं वेढे करिताति : तवं साधें आलीं : एके स्रीचरणां लागलीं : दुसरेया श्रीचरणां लागलीं : मग जोगीदंडेयाकडे पाहों लागलीं : तो सोनेभरी

---

थोंबा आड--. ५ **होबी.** ताक पत्रसाक. **यमु.** वरण. ६ **यमु.** वरणपासतें. **ही.** ताक पातळसें. ७ **नेहीबी.** घरीं. **पं.** पाडीं. ८ **यमु.** हांसीजत. **हीबीपं.** असीजे हो. ९ (**प्रव. आ.** १४८).

**१५३.** १ **एवा.** °डोंबाएचां.

जोगिदंडा : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें काइ पाहीजताए साधें न्हो[२] ?" " जी जी : हें गोसावीयांचां स्त्रीकरीं काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें न्हो : हा जोगिदंडा :" " जी जी : हा काइ कीजे[३] ?" मग गोसावीं नाथोबाचीए पाठीवरौनि दाखवीला[४]: मग गोसावीं दोंहीं स्त्रीकरीं हणवटीएपासीं धरिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे बैसति तेव्हळि ऐसा धरीति साधें हो : हा तुम्हांसि देओं ?" " ना जी : हा गोसावीयांचां स्त्रीकरीं बरवा साजतु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तऱ्हीं आणिकां दीजैलचि कीं : घेया तुम्हीं[५] :" " ना जी हा गोसावीयांचां स्त्रीकरीं बरवा साजतु असे: " ।।

## १५४ सींपे भोजनअपराधें आउ दवडणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हां आंगी सीवावी[१] असे[२] :" " जी जी : *आनि व्यापारू असे जी*[३] :" " तरि नाएकातें नेया : यांतें तेथ बैसवा : मां तुम्हीं या :" " हो कां जी :" मग भटोबासीं गोसावीयांची प्रमाणालागि आंगी घेतली : " आउ : चाल : मां तुं तेथ बैस : मां मीं माघौता एइन :" मग भटोबास आणि आउसें गेलीं : भटोबासीं एकु दामु सीवनावळि दीधला : आउसें तेथ बैसवीलीं : भटोबास माघौतें आले : सींपेनि म्हणीतलें : " आइ : जेयां गोसावीयांची[४] आंगी ऐसी परीमळबहळ : तरि ते गोसावी[५] कैसे असती ?" " हां रे : तुआं स्वामी जगंनाथु नाहीं देखिला ?" " ना आइ :" " माझा स्वामि जगंनाथु बरवा असे रे : हे आंगी सीवि : मग तुज स्वामीं जगंनाथाचें दरीसन करुं :" मग तेणें आंगी सीवीली : मग आला : गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगवीला : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं आंगणा बीजें केलें : तेथ आंगी ओळगवीली : मग दंडवत घातलें : स्त्रीचरणां लागला : मग गोसावीं मढावरि बीजें केलें : आउसें भीतरि आलीं : तवं उचमढांआंतु नेणों कोणाचा उपाहारु आला असे : बाइसें काइसेया व्यापारा बाहीरि गेलीं असति : आउसीं म्हणीतलें[६] : " जाए रे : थाळा घेउनि ए :" तो थाळा घेउनि आला : तयासि अंन[७]

---

२ **गोनेयमुहीं.** हो. ३ **यमु.** सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसा धरौनि टेकौनि बैसिजे :" म्हणौनि°. ही. "सीधसाधक ऐसा धरूनि बैसती :" ४ **एवा.** °पटिसाळेवरि आसन जालें : मग—. ५ **हीबी.** °मग साधें घेतला : नमस्करीला : तो जोगदंडु दाकोनि आणिला होता. **परसरामबा** : आसनीं बैसलेयां (**रामे.** उभेयां) सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें न्हो : हें तुमचीए पाठीवरि आरोहण करील :" " ना जी : मज पाए नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तुम्हां पाए देइजती :" " ना जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " चाला गा मंडळीका :" आणि तीयें पळालीं : ।।

१५४. १ **गोनेहीबी.** सीउं जावें असे. २ **यमु.** आनि व्यापारु असे तरी—. ३ (**गोनेही.**). ४ **यमुगोनेहीबीपं.** पुरुषांची. ५ **यमुगोनेहीबीपं.** पुरुष. ६ **अ.** °तुज स्वामि जगंनाथु दरीसन नेदी रे : जाए रे—. ७ **यमु.** मांडेभात.

उपसौनि घालितें असति : तवं भट बाहीरिलीकडौनि आले : " हें काइ आउ करीतीसि ? बाइसें भीतरि[८] नाहीं : यासि मीयां सीवनावळि दीधली : मां तुं यासि अंन कां घालीतीसि ?" " उगा अस रे बा नागणा : चक्रस्वामिचेनि प्रसादें अपार असे : तुजही पुरैल : मजही पुरैल : आणि यासिही पुरैल : उगा अस : " मग भटोबास *मढा*[९] वरि गेले : " जी जी : देखिलें कीं ए आउवेचें[१०] ? मीयां सीवनावळिचा एकु दामु दीधला : बाइसें बीढारीं नाहीं : कीं तयासि आवघें अंन उपसुनि घातलें : आणि ऐसीचि जी हे आउ : कालि मीयां गोसावीयांसि उपान्हौआंलागौनि रुआचें[११] लोणीं आणवीलें होतें : यां आधाचें[१२] लोणीं आणिलें : आधाभरि[१३] इया आपुला खांडोवा धुववीला : तो पोटवीला[१४] :" तया अंन घातलें : आणि आपण लवलवुनि आइकुं आलीं : ऐसें आइकिलें : आणि तमलीं : "सडी[१५] पड रे नागणेयां : चक्रस्वामीयेंवांचौनि नाहीं कोण्हांची चाड :" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : घाला घाला नाएकातें पैलाडि :" आणि भटोबासीं गची[१६] दीधली : पैल ठाओवरि चालवीलीं : पैल ठाओवरि गेलीं : *आणि काकुलती आली*[१७] : " काइसेया रे बा नागणा पैलाडि घालीसी ? मीं तुज आपुली वाटी देइन : नको रे वा नागणा : मातें पैलाडि घालुं : मीं तुज आपुलीये[१८] परवंटिचा खांडोवा देइन :" भटोबासीं म्हणीतलें : " आउ : आतांची तवं जाए : मग उदीयां ए :" मग आउसें देइगांवां गेलीं : च्यान्ही पाहार दुख करीतें होतीं : मग उदेयांसीचि तळेगांविचीया[१९] पाणिवठां आपणेयांतें उतरवीलें : मग डोंबेग्रामासि आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : " जी जी : बापुडा नाएकु केंहीं न धडावा जी : न पठवावा जी : बापुडा थोर दुखीया होत असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि न पठवीजे : परि[२०] न पुसत *कांहीं करूं*[२१] नको जाओं :" " जी जी :" म्हणौनि स्रीचरणां लागलीं : ।।

## १५५ दारवठां जिव्हादागस्रवणें भटां मारकंडा खिरोदन भोजन

गोसावीयांसि दारवठांचीए पटिसाळेवरि आसन असे : वीळचांचा पुजाअवस्वरु जाला : तेथचि गोसावीयांसि *तुप भातु साकर : पाठीं दुध भातु साकर ऐसी*[१] आरोगण होत असे : भट आणि मार्कंड[२] गंगे जेउनि आले होते : गोसावीं ऐसा स्रीकरु बुडि

८ **यमु.** बिढारीं. ९ **(यमुगोनेहीबी.). पं.** उचमढावरि. १० **गोनेहीबी.** °करण ? ११ **यमु.** आढाचें. **हीबी.** रुकेयाचें. **पं.** रुइकेयाचें. १२ **यमु.** पाइकेयांचें. **हीबी.** आडीकेयाचें. **गोने.** आढांचें. १३ **यमुगोने.** आढाभरि. **हीबी.** आडीकेनि. १४ **गो.** सोडवीला. **यमुहीबीपं*.** १५ **यमुगोने. पं.** (रावा) चक्रीं. १६ **यमुहीबीपं.** गचीए धरिली. १७ **(यमु.).** १८ **यमु.** °वाटे बहिर्वासु. १९ **हीबी.** सींदोळे गावींचां. **पं.** खौलेगांवींचा. २० **पं.** °एथीचा व्यापारू तो एथ पुसपुसों कीजे कीं नाएका :" २१ **(गोनेहीबी.)** °भलेता व्यापारु न करावा.

**१५५.** १ **(यमुगोनेहीबीपं.).** २ **यमुगो.** मार्तंड.

घातला : आणि भटां प्रसादु दीधला : तैसाचि मार्कंडासि दीधला : भटीं घेतला : आणि म्हणीतलें[३] : " कैसा जिव्हे डाओ पडिला[४] : " मार्कंडीं घेतला : आणि मार्कंडीं म्हणीतलें : " हो नागदेया : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : ऐसयां जेविलेयावरि केती एकें वाटीं दुधभातां जेवाल ? " ते थोडी म्हणति : गोसावी बहुत म्हणति : ऐसां पांचां वाटीयां ठी जाली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें कांहीं भातु असे ? " " हो बाबा : असे : *परी दुध नाहीं[५] :* " मग गोसावीं दुध वीकत घेववीलें : मग मार्कंडीं म्हणीतलें : " जी जी : ऐसा बाहीरा[६] जाओनि एइन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वांनरेया : सांघातें जा गा : हा गजकर्ण[७] जाणे : " " हो कां जी : " भट नीगाले : *तवं मार्तंड पुढां नीगाले[८] :* भट वहीले चालति : आणि तेही वहीले चालति : भट धांवति : आणि तेही धांवति : भटीं म्हणीतलें : " जाए तुझें पाप नर्ककर्म[९] तुजचि : " भट गोसावीयांपासि आले : गोसावीयांसि सांघीतलें : " जी जी : मीं वहीला चालें : तरि तोही वहीला चाले : मीं धांवें तरि तोही धांवे : मीं राहें तरि तोही राहें : मग मीयां म्हणीतलें : ' जाए : धांव : तुझें पाप नर्ककर्म[९] तुजचि : ' मग मीं आलां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तेणें तें केलें गा : " मग मार्कंड बाहीरि[१०] जाओनि[११] आले : मग ते दोघै तीनि तीनि वाटीं दुधभातां जेविले : मग दुध न पुरेचि : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें तुमचीं दोनि दोनि वाटीं दुधभाता लागे : " " हो कां जी : " मग आंचवले : ।।

## १५६ तथा पुर्वामुखे मढीं माहादाइसास्वेतउपाहारीं भट चमरीदंडें ताडणें

माहादाइसें वाराणसीए[१] जावेया आलीं : मग तीहीं गोसावीयांलागि उपहारा वीनवीलें : गोसावीं स्वीकरिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : स्वेतु उपहारु करा : " " हो कां जी : " मग माहादाइसीं तांदुळांचा भातु : तांदुळांची खीरि : खीरघारीया : अमृतफळें : खांडींव[२] दहींवडे : कालण : दुध : दहीं : अपार आणिलें : मग गोसावीयांसि पडदणी ऊळगवीली : मर्दना जाली : मादणें[३] जालें : पुर्वामुखें मढिचेया ओटेयावरि : पुजाअवस्वरु जाला : तेथचि गोसावीयांसि ताट जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यां दोघां येकवट[४] वाढा : " आपुलेया ओटेयापासि वाढवीलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : माहादाइसें वाढितें असति[५] : गोसावी म्हणति : " बाइ : हे दोघै एकवाट

---

३ **गो.** °ऐया--. **मु.** °हाए--. ४ **यमु.** उठिला. ५ (**यमु.**). ६ **गो.** बाहीरि. **ने.** बाहेर. ७ **य.** गजक्रण लुटन. **गोने.** गजकर्म. ८ (**गोनेहीबीपं.**). ९ **गो.** कर्मनरक. **यमुहीबीपं.** पापकर्म. १० **गोने.** बाहीरें. ११ **गोनेहीबी.** घालुनि.

१५६. १ **मु.** वानारसी. २ **ही.** अजीवें. **बी.** अंजीवें. ३ **मु.** मार्जनें. ४ **हीपं.** एकत्र. **गोनेबी.** °वाट. **एवा.** एक ताट करा. ५ **यमु.** °गोसावी म्हणति : " बाइ : वानरेयाचां ठाइं

बैसले असति : सांभाळुनि वाढा : " आणि माहादाइसां भटांसि वाढावेयाचा मनोधर्म[६] : आणिकें अमृतफळें वाढीति : खीरिघारीया वाढिति : मागुतें गोसावी म्हणति : " बाइ : हे दोघै एकवाट बैसले असति : सांभाळुनि वाढा : " माघुतीं माहादाइसें खीरि वाढीति : दुधभात आपारु वाढीति : ऐसें तृप्तिपरीयंत जेविले : गोसावीयांसि आधीं आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीयांचां स्रीकरीं चवरी असे : मग ते आचवों बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " राहा गा : " म्हणौनि हातीं धरिले : " आचवों नको[७] : आपुलें लागिजणें घेया : " " हो कां जी : घांसा प्रास्रमु नाहीं : मां आतां काइसेन जेववैल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें भीक्षु : आतां यातें संभउ असे : आणि जेवीलेयावरि जेवावें ऐसी भाक असे : बाइ : आणा भातु : " भातु घातला : दुध घातलें : " जेवा गा : " " आतां काइसेन जेववैल जी[८] ? " आणि गोसावीं चवरीचेनि दांडेनि ठसालिकरि[९] डोइएवरि हाणितलें : " हां गा : ऐसें म्हणाल ? " म्हणौनि कोंपरावरि हाणति : " हां गा : जीभे डाओ पडिला ऐसें म्हणाल ? " " जी जी : नेजववे जी : " आणि गोसावी गुडघेयावरि हाणति : " हां गा : ऐसें म्हणाल ? " आणि घोंटेयावरि हाणति : मग मागुतें डोइयेवरि हाणति : ऐसें भटां थोर सिक्षापण केलें : मग भटीं म्हणीतलें : " आतां[१०] नव्हे : " मग गोसावीयांचिया स्रीचरणांवरि लोळणि घातली : " जी जी : सीस सुरी : गोसावीयांचां हातीं : आतां गोसावी जाणतु तें करीतु : " मग गोसावीं भटोबासांतें हाणितलें : " हां गा : ऐसें म्हणांल ? ऐसें न म्हणिजे कीं[११] : " ॥

## १५७ दीगांबर स्रीमूर्ति श्रीप्रभूवस्त्रस्वीकारु

उन्हाळे दीस : एकु दीं बाइसीं गोसावीयांसि उदीयांसिचि पडदणी ॐळगवीली : मर्दना जाली : मादणें[१] जालें : बाइसें वस्त्रें आणावेया गेलीं[२] : तवं गोसावीं[३] पडदणीं प्रत्येजुनि[४] पुर्वामुखा मढा बीजें केलें : अग्न कोणीं पुर्वपसीम ओटा : तेथ गोसावीं उताणी स्रीमूर्ति ऐसा पहुडु स्वीकरिला[५] : वक्षेस्थळावरि दोन्हीं स्रीकर : बाहुल्यें बाइसांवरि उदास्य स्वीकरिलें : ऐसें म्हणिजे : बाइसें वस्त्रें घेउनि आलीं : तवं गोसावीयांतें नेदखतीचि : आणि गजबजिली : " बाबाएं केउतें बीजें केलें ? " म्हणौनि बोबांओं[६]

---

पडिताळा. **एवा.** पुडुती पुडुती गोसावी सांभाळीती : आणि माहादाइसां°. ६ **ही.** °आणि माहादाइसें पडीघाउनि वाढीति : **बी.** °आणि माहादाइसें पडिताळुनि वाढीति : ७ **यमु.** वानरेया : हें तुमचा दुधभातु लागे तें आपुलें घेया : **कानडी लुखाइसें.** राहा गा : आपुलें लाहाणें घेया. ८ **यमु.**° घांस दोनि च्यारि घेतले : " जी जी : गीळे ना : " आणि **गोसावीं**—. ९ **ने.** कसकरि. **हीबीपं.** ठसकरि. १० **गोने.** °ऐसें. ११ **एवा.** हो.

**१५७.** १ **मु.** मार्जनें. **गो.** माजणें. २ **मीयांना.** °दोनि वस्त्रें आणिलीं : ते न स्वीकरीति : तीसरें आणुं गेली तवं उदास्य स्वीकरीलें. ३ **यमु.** °उदास्य स्वीकरिलें. ४ **यमु.** °वीवस्त्र. ५ **एवा.** °श्रीनेत्र लागले : **एवा.** श्रीनेत्र उघडे. ६ **यमुही.** पाहों.

लागलीं : तवं गोसावीयांचीए स्रीचरणींचा मागु[७] देखिला : मग गोसावीयांचेया स्रीचरणांपासौनि मागु निगाला तेणें मागें मागें आलीं : तवं गोसावीयांसि उताणी स्रीमूर्ति पहुडु : वक्षेस्थळावरि दोन्हीं स्रीकर[८] : आणि बाइसें भीयालीं[९] : भट उंचमढीं काइ नेणों म्हणीयें करीत होते तें नेणों : बाइसें उंचमढा आलीं : आणि म्हणीतलें : "धांव धांव नागदेया : बाबाएं उदास्य स्वीकरिलें :" आणि भट आले : पाहीलें तवं स्रीमुर्तीवरि उदास्य स्वीकरिलें देखिलें : 'आतां काइ पां कीजे ?' भट वीचारुं लागले : मग म्हणीतलें : "बाइ : परमेस्वरपुरींहुनि दुटी आणिली असे ते आणा पां आरुती ?" बाइसें दुटी घेउनि आलीं : भटांचां हातीं दीधलीं : भट घेउनि आले : भटीं आपुलें आंग लपवीलें : मग दुटी दाखवीली[१०] : "जी जी : प्रसादु स्वीकरिजो जी :" आणि गोसावीं अवळोकिलें : आणि भटातें उमटलें : जें *गोसावी प्रसादवस्त्र स्वीकरीति : भटोबास साउमे गेले : "जी जी : प्रसादवस्त्र स्वीकरीजो जी[११] :"* गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : स्रीकरीं दुटी घेतली : नमस्करिली : स्रीमुगुटावरि ठेविली : बाइसीं पालवें करुनि पुष्टिवीभागु झाडिला : भटांकरवि दुटी उकलविली : भटीं दुटी उकलीली : गोसावीं प्रावर्ण केली : *बाइसीं*[१२] लवलवुनि जाडि आणिली[१३] : "जी जी : आसन रचों देइजो : प्रसादु मैळैल :" आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग म्हणीतलें-: "हें पोर कैसें लटकें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें तुज कैसेनि स्फुरलें ?" *भटीं म्हणीतलें : "श्रीचक्रधराचेनि प्रसादें हें काइ मज बहु[१४] ?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "वीधि करितां वीधी स्फुरे : वीधी अवीधीतें परिहरे :"

याउपरि[१५] भटीं म्हणीतलें : "जी जी[१६] : प्रसादसेवेतव काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रसादसेवेतव पुरुषु धर्मीं दक्षु होए : ईश्वरीं आर्ति उपजे : अविधि परीहरे : वीघ्नां उपसांति होए : वीधि सबीज होए : दैव साह्यातें करी :" ऐसें गोसावीं निरूपिलें : ।।

## १५८ माहादाइसां वाराणसी गमन निक्षेदु

माहादाइसें वाराणसी[१] जावेया म्हणौनि आलीं : आवधीया आइतीसी : गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : मीं वारानसी

---

७ **अ.** आंगुठा. ८ **एवा.** °श्रीनेत्र लाविले (**एवा.** उघडे) ऐसें देखिले. **यमु.** °अर्ध नेत्र लावीले. ९ **पं.** °गजबजूनि पडिलीं : सावधें होउनि......बोबांतें उंचमढा आलीं. १० **यमु.** °आणि गोसावीं प्रसन्ना दृष्टी अवळोकिलें. ११ (**यमु.**). १२ (**यमुनेहीबीपं.**). १३ **यमु.** °बाइसीं म्हणीतलें : **हीबी. भटीं**°. १४ (**हीबी.**). १५ **रामे.** °ते दीसी की एरी दीसी (**एवा.** केव्हडेया वेळा) पुसिलें तें नेणिजे. १६ **अ.** °प्रसादु मैळैल : (इतर पोथ्यांत हे वाक्य येथे नाही. ते अनावश्यक आहे. म्हणून संहितेत गाळले.).

**१५८.** १ **मु.** वानारसी.

जाइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : तीर्थक्षेत्र अमोचक : संन्निधान[२] मोचक :" ऐसें म्हणौनि निरुपण केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : *अग्नीचेनि संबंधें बोलीं कोरडीं सानीं थोरें काष्ठें जळति : तैसीं परमेश्वरसान्निधानीं संतासंतें कर्मे जळति*[३] :" गोसावीयांचें निरुपण प्रतेयासि आलें : मग बीढारा आलीं : दादोसांपुढां सांघीतलें : "हें काइ रुपोबाइ : आइता सांघातु : आइतें संबळ : अल्पसता[४] तीर्थ होइल : मग एउनि सुखें संन्निधानीं असिजो पां : आणि गांविचा हा आवघा लोकु हांसैल : संबळ नेलें तें अवघें माहात्मेयांसीं खादलें[५] :" म्हणौनि दादोसीं अवघें मोडिलें : मग वारानसी जावें ऐसें प्रत्या आलें : मग एरे दीं मागुतें म्हणीतलें : "जी जी : मज वारानसी जावें लागैल : आवघा गांविचा लोकु हांसैल : 'संबळ नेलें तें माहात्मेनिसीं खादलें :' तरि मज जावें लागैल :" यावरि गोसावीं दीक्षितकन्येचा द्रीष्टांतु दीधला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकि दीक्षीताची कन्या वीखयाचीया चाडा गाविचां गावीं कोळीयासी घरवात करी : काळु : कुळ : लोकु : तीन्हीं आंगवी : वीखयाचीया चाडा जीवें तीन्हीं आंगवीलीं तरि परमेश्वराचीया चाडा जीवें काइ एक नांगवावें ?" माहादाइसीं पुसिलें : "जी जी : गांविचा लोकु काइ म्हणे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "गेली गेली : कुळ बुडवीलें[६] :"] ऐसें निरुपण केलें : मागुतें न वचावें ऐसें प्रत्यासि आलें : बीढारासि आलीं : मग दादोसांपुढां सांघीतलें : दादोसीं मोडिलें : मागुतें जावें ऐसें प्रत्यासि आलें : *दुसरा दीसीं माहादाइसीं दादोसांचे आवघे सब्द सांघितले*[१] : मग मागुतें गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : मी वारानसी जाइन :" *मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जाणतेयापसि वरि नेणता चांगु : कर्मचांडाळापसि जातिचांडाळु चांगु*[१] :" यावरि गोसावीं कर्मचांडाळाचा द्रुष्टांतु निरूपिला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : कव्हणी एकु कर्मचांडाळु ब्राम्हणु असे : तो माहारीसीं विटाळे : तेयाचें म्हणीयें करूं सीके : नाडे तुते करी : तेयातें काजभोज[७] होए : तैं तयासि तेयाचीं[८] पांति नाहीं : तेयासि खापरीं अन्न बाहिरी घालिति : तैसें अज्ञानाचियासारिखें ज्ञानिया करी तरि तेयाति प्राप्ति नाहीं[९] :"] मग मागुतें न वचावें ऐसें प्रत्यासि आलें : मागुतीं बीढारासि आलीं : दादोसांपुढां सांघीतलें : दादोसीं मागुतें मोडिलें : मागुतें जावें ऐसें प्रत्यासि आलें : मग उदीयांचि आलीं : "आतां गोसावीयांतें कवणें तोंडें पुसों ? गोसावीयांचा स्त्रीकरु उमरडौनि[१०] जातीयें : गोसावीयां दंडवत घालों आणि नीघों :" ऐसें म्हणौनि एतें असति : गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : गोसावी ऐसा स्त्रीकरु भवंडिति : आणि ऐसा करीति : आणि हास्य केलें : तें बाइसीं देखिलें : "हां बावा : ऐसें काइ

---

२ **ने.** ईश्वर°. **यमु.** परमेश्वरदास्य. ३ (**दृपा.** ६५ अग्नीचा दृष्टांत. 'महदाइसां प्रति डोंबेग्रामीं निरुपिला : **एवा** : आउसाप्रति भांडारेंकारापरि'–**दृस्थ.**). ४ **ने.** अल्पासाठी. **य.** अन्यसता. **मु.** आनाएसता. **ही.** मां पन्हातें. **एवा.** अवघेयां सरीसें. ५ **एवा.** घातलें. ६ (**दृपा.** ५२ दीक्षीतकन्येचा दृष्टांत. दार्ष्टांतिक स्वामींचे होय म्हणून अंतर्भूत केले आहे.). ७ **रामे.** कार्ये प्रयोजन. ८ **एवा.** तयाचीए जातीची. ९ (**दृपा.** ४८. कर्मचांडाळाचा दृष्टांत.). १० **यमु.** मोडनि.

कीजताए[११] ? " सर्वज्ञें म्हणीतलें[१२] : " बाइ : ताकिची मासी ताकाबाहीरि घालिजे : तैसी म्हांतारी संनिधानाबाहीरि घालीजताए : " तवं माहादाइसें आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि उगींचि बैसलीं : गोसावीयांतें कांहीं वीनववे ना : सर्वज्ञें म्हणीतलें : "*काइ बाइ : वाराणसी जाणें होत असे ?*" "*हो जी :*" *सर्वज्ञें म्हणीतलें*[१३] *:* " बाइ : तेथौनि या : मां एथौनि तुम्हां संन्यास[१४] दीजैल : " आणि माहादाइसें श्रीचरणां लागलीं :

" जी जी : तेथ जाइजताए : तरि तेथिचें[१५] *काइ करावें ऐसें*[१३] काहीं जाणिजे ना : तरि गोसावीं तेथिचा विधि सांघावा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ तेथिचा वीधि तो अवघडु : तो कव्हणीचि नेणे : तो तुम्हांपुढां एथौनि सांघीजैल : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणाचेया बीढारापासि बीढार नेघावें : मोलें भुमि वीकत घेयावी : *मोलें बीढार घेयावें : मोलें सर्पण घेयावें*[१६] *:* मोलें पाणी घेयावें : कव्हणी कव्हणां सूए : आपण एकाधें उघडें नागिवें देखिजे : तेया सुइजे : ऐसा तेथीचा एथोचीत वीधि जयां घडे तयासि तेथीची देवता अतितारक ब्रम्ह उपदेसी : जेयासि न घडे तयासि तेथिचा काळभैरव अंतीं त्रीसुळ[१७] ओडवी[१८] : भुमी आणि देहा संबंध हों नेदी : " ऐसें गोसावीं नीरुपीलें : *माहादाइसीं पुसिलें : "तारि तेथ कैसें असावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोळलें सुनें असे : तयासि कव्हणे ठाइं सुखासि नैए : वळाणिखालि रीगे : पारि सुखासि नैए : कडवलांआंतु*[१९] *रीगे : तऱ्हीं सुखासि नैए*[२०] *: ऐसें अखंड जळताचि असे : तैसें पोळलेया सुनेयाचीया परी असावें*[२१] *:* " मग माहादाइसीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : मग वारानसी नीगालीं : दादोस माहादाइसें रीद्धपुरीं राहाति म्हणौनि रामुवरि बोळवीत गेले : मग भक्तजनें आलीं : तीहीं गोसावीयांपुढें सांघीतलें : " जी जी : माहादाइसें परमेश्वरपुरा राहाती[२२] म्हणौनि दादोस रामवरि बोळवीत गेले : " सर्वज्ञें म्हणीतलें[२३] : " मांहात्मा म्हातारीएसि कानवाथरु होउनि लागला असें गा : " यावरि कानवाथराचा द्रुष्टांतु दीधला : [ सर्वज्ञें म्हणीतलें : " कानवाथरू असे : तो

---

११ **अ.** करीजताए°. १२ **यमु.** °म्हातारीयेचें वाराणसी जाणें जालें : हें होए : म्हांतारी एथ पुसावेया येत असे : " श्रीकरें अनुकार केला. भटीं म्हणीतलें : "जी जी : हें काइ ऐसें कीजताए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " ताकांतु मासी असे : ते ऐसी इकडे पडे : तैसी म्हांतारी येथचेया मंगळा चुकति असे : " तवं महदाइसें आली—. १३ **(यमु.)**. १४ **यमु.** सन्निधान. १५ **अ.** °काही जाणिजे ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : काइ करावे असे : तरि°. १६ **(यमुगोनेही.)**. १७ **मु.** त्रिसूळीं. १८ **यमुहीबी.** वोवी. १९ **पंने.** कलवडी°. २० **एवा.** °पांणीयां आंतु रीगे तऱ्हीं सुखासि नैए : २१ (**दृपा.** ८६. पोळलेया सुनेयाचा दृष्टांत. 'पोळलेया सुणेयाचेया परी' या वचनाचा **प्रव.** बेलोपुर–चरित्रात आहे. तथापि, 'हा दृष्टांत गोसावीं महदाइसांप्रति वाराणसी निर्गमनीं डोमेग्रामीं निरूपिला :—**दृस्थ.**' असे स्पष्ट म्हटलेले असल्यामुळे तो येथे घातला आहे.) २२ **अ.** जाती. २३ **ना. (अज्ञात)**. °पोरू म्हांतारीएसि गडदरा होउनि वोडवला असे : " यावरि रामगडदरा नावं

सीरसाळेयातें व्यापुनि राहीला असे : तयासि टांकी लागे ना : ऐसांही लाविजे तरि उसळौनि पैन्हां पडे : एकाधा एकु तयावरि कोळें जाळी : वरि कुळथवनीयें सींपी : मग टांकी लावी तरि लागे : एवढालीया चकतळीया नीगति : तीया पुरीजती : तीया ऐसीयाचि सांडिजति तरी पावो तोडीति : तया वना पाटा नाहीं : तळीं सीरसाळा निगे : तयाचीं लींगें होति : प्रतिमा होति : जें कीजे तें होए[२४] :" ।।]

## १५९ वीद्यावंत[१] निवारणीं भटां कोपणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं वीहरणा बीजें केलें : मग वीहरण सारुनि मढासि बीजें करिताति : गोसावीयांसि चंदनाचा आडा असे : अक्षता : उंचे वस्त्रें : पटिसाळे वीद्यावंतें[२] होतीं : तींहीं गोसावीयांतें देखिलें : मग मागिलाकडौनि आलीं : गोसावीं लवलउनि दारवठेयाआंतु[३] बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कवाडें घाला गा :" भटीं कावाडें घातलीं : गोसावीयांसि बाहीरिला ओटेयावरि आसन असे : तवं वीद्यावंतें[२] दारवठेया आलीं : आणि दारवठां दांडी टणकारिली[४] : गाओं आदरिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : यांतें पाठवा जा :" भट आले : "काइ जालें यां टोलगीयांसि : वीद्यावंतें होउनि गांवढीं[५] : एथ काइ कव्हणी दानि असे ? जा परतीं :" तीयें गेलीं : भट आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुमतें एथौनि वारावेया पाठवीलें कीं : मां तुं तेयांतें टोलगीं कैसीं म्हणसि ? *काइ महात्मा नव्हेसी ? यांसी हें बोलणें ? महात्मेनि प्रियवक्तेयां होआवें कीं*[६] : आणि ऐसें म्हणसि : 'एथ काइ कव्हणी दानि असे ?' एथ दानि नसे तरि असे तो कवणि ठाइं ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्ही परमेस्वराची प्रवृत्ति भंगों नेदावी : परमेस्वरपरायणाची मनोवृत्ति भंगों नेदावी*[७] :" ।।

## १६० मार्गीं अरद्रवस्त्रवीमोचनीं रेइनाएकाचीं वस्त्रें वेढणें

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं छीनपापासि वीहरणां बीजें केलें : सींहंनाराएणा[१] दक्षिणे पींपळु : तयातळीं गोसावीयांसि आसन जालें : मग घोगरगांउनि इंद्रभट गोसावीयांसि उपाहारालागौनि वीनवावेया आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : गोसावीयांतें

---

ठेविलें. २४ (**दृपा.** २९. कानवाथराचा दृष्टांत).

**१५९.** १ **गोनेय.** विदा°. २ **गोय.** विदा°. ३ **अ.** मढांतु. ४ **गोपं.** टींबकरिली. **य.** झणकारीली. ५ **य.** गाउंठी. ६ **(यमु.)**. ७ (**प्रव. आमा.** १९७). **पं. एवा.** °जा बोलावा :" मग बोलावीलीं : दोनि गीत गाइले : मग पुडवाटुवा उलथुनि तांबोळ दीधलें : आणि भटांकरवि सा दाम देववीले : मग गेलीं : ।।

**१६०.** १ **यमु.** सींहंनाराएणाचां देउळीं . . . आसन जालें.

उपाहारालागौनि वीनवावेया वीसरले : तैसाचि पाउसु ओळला : सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रेया : आतां जाल तरि पावाल गा : एऱ्हवीं तींमाल : " " हो कां जी : " इंद्रभटीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : आणि इंद्रभट घोगरगांवां निगाले : ते पुढां जाति : मागुतें पाहाति : तवं मागां पाउसु पडतु असे : ऐसें माळवधाचीए पटिसाळेवरि उभे जाले : आणि पाउसाची मोट रीचवली : गोसावीं पाउसांतुचि बीजें केलें : गोसावीयांवरि भक्तजनीं चांदोवा धरिला : गोसावी चांदोवेयापुढें बीजें करिति : तवं पुढां धरीति : गोसावी मागां राहाति : तवं वस्त्र तींमे : आणि आणिका वस्त्राचा चांदोवा धरीति : तऱ्हीं गोसावीं तैसेंचि बीजें करिति : गोसावी भक्तजनांचीए काखेचीं वस्त्रें आसुडिति : तयाचा चांदोवा धरीति : तेथेंहीं गोसावीं तैसेंचि[२] करीति : ऐसां गोसावी मढु पातले : तवं गोसावीयांचीं वस्त्रें तींमलीं : आणि भक्तजनांचीहीं वस्त्रें तींमलीं : गोसावी दारवठांचीए पटिसाळेवरि उभे राहीले : तेथ गोसावीयांचीं वस्त्रें पीळिलीं : तवं रेइनाएकाचेया आवारींहुनि गोसावीयांलागौनि धुवटु ओलिसाउला आणिला : भक्तजनालागि कव्हणां पासोडीची पाटी : कव्हणां धोत्र : साउलें : सुपवतीची गौसणी : ऐसीं वस्त्रें आणिलीं : गोसावीं वस्त्रें वेढिलीं[३] : मग रेइनाएकाचीए आवारींहुनि भक्तजनासहित उपाहारु आणिला : गोसावीयांसि पुर्वामुखा मढाचीए पटिसाळेवरि आसन जालें : पुजाअवस्वरु जाला : सपरीवारीं आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : तीएचि मढीं गोसावीयांसि पहुडु : ।।

## १६१ अस्वथमुळी इंद्रोपाहारीं इंद्रया दैवंप्रसंसा

मग उदीयांसीचि गोसावीयांसि *पूजाअवस्वरू जालेयानंतरें*[१] तयाचि पींपळातळि आसन असे[२] : गोसावीयांचीए आरोगणेची वेळ जाली : आणि बाइसीं म्हणीतलें : " बाबा : आरोगणे बीजें कीजो ना ? " *गोसावीं*[३] ऐसें उदराकडे[४] अवळोकिलें : " बाइ हें आझुइं मागे ना : " नावेक जालें : मागुतें बाइसीं वीनवीलें : " बाबा : आरोगणे ऊसीरु जाला : तरि आतां बीजें कीजो ना ? " मागुतें गोसावीं दोंदाकडे[४] अवळोकिलें : *" बाइ : हें आझुइं मागे ना[३] : "* सर्वज्ञें म्हणीतलें : " मार्कंडा : सींहंनारायेणाचीए पौळीवरि उभे ठाका : कव्हणीं घोगरगांवींचीए मार्गें एत पाहा : " " हो कां जी : " मार्कंड पौळीवरि[५] उभे ठाकले : आणि पाहीलें : तवं दुरि झीळिमीळित एत देखिलें : " जी जी : दुरि झीळिमीळितु[६] एत असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " धांवत जा : न बोलत[७] तयांचीए डोइचें ओझें घेया : " " हो कां जी : " मार्कंड धांवत

---

२ **अने.** °बीजें. ३ **हीबी.** °तवं संजोगनी जाली.

**१६१. १ (यमुनेगोपं.).** २ **अ.** °गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : तीएचि पटिसाळे गोसावीयांसि तयाचि भीडातळि आसन जालें. ३ **(यमुनेगोपं.).** ४ **यगो.** दोंदाहारें. **पं.** उदराहारें **मु.** श्रीदोंदायेउतें. ५ **एवा.** पींपळावरि. ६ **यमु.** °दोघ एत असति. ७ **एवा.** न पुसत. **गो.** न

गेले : तवं इंद्रभट ओझेंनि दाटले *एत*[३] होते : तयांचीए डोइचें[८] ओझें घेतलें : मग[९] इंद्रभटांसरीसें एक तुपाचें कोंढुलें[१०] घेउनि एत असति : तयांचीए हातिचें तुपाचें कोंढुलें[१०] घेतलें : मग तयांतें मागुतें पाठवीलें : मग इंद्रभट आले : तवं गोसावीयांचीया दरीसनां ब्रम्हचारिदेव आले : द्वारावतीएहुनि : मग गोसावीयांसि अस्वथमुळीं पुजा जाली : इंद्रोबातें स्राध[११] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा इंद्रेया : कांहीं[१२] तैसैनि तैसें वर्तैल ?" " ना जी : गोसावीयांचां ठाइं काइ :" मग गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ब्रम्हचारिदेवां अवघेयां पांति जाली : गोसावी आरोगणा करिताति : आणि म्हणति : " बापु[१३] इंद्रेयाचेया दैवा : नैए इंद्रेयाचेनि देवेंसीं सरि करुं : आपण ब्रम्हचारिदेव कृष्णेचे[१४] कापडी : करंडीयां लोहोवीया गवसणीयां[१५] :" ऐसें ऐसें गोसावी म्हणति : आणि आरोगण करीति : *यावरि भक्तिजनीं[१६] पुसिलें " जी जी आम्हीं धौ देउनि ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " धौ विकारू : " " हो कां जी[१७] : "* ऐसी गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## १६२ चांचलमुदीं[१] आसन

एकु दीं गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : भटीं फोडी ओळगवीलीया : वीडीया करुनि ओळगवीताति : गोसावी आंगणीं वेढे करिताति : तवं पीठऐसें चांदीणें पडतसे[२] : सर्वज्ञें म्हणीतलें[३] : " चांदीणें नीकें ना गा ?" " जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसीए चांदीणां ग्रामांतर कीजे तरि काइ ?" " जी जी : कीजे तरि कीजे : आणि काइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि बाइसांकरवि आइति करवा :" " हो कां जी :" भक्तजन गेले : बाइसांकरवि आइत करविली : बाइसीं कणिकीचें पोतें : तांदळांचें पोतें : आवघै वळीवट एकवट केलें तयाचें एक पोतें : तीयें पोतीं गोसावीयां चोरीयां एकएका भक्तजनांचीए हातीं दीधलीं : मग गोसावीं बीजें केलें : चांचलमुदीं[१] आसन जालें : बाइसीं गोसावियांसि चरणक्षाळण केलें : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला[३] : ।।

---

बोलवीत. ८ **यमुगोनेपं.** डोइएची पाटी घेतली. ९ **यमु.** °इंद्रभटीं एक सरीसें मडकेनिसीं आणिलें होते : इंद्रभटीं तयाचीए डोइएचें वडेयांचें मडकें घेतलें : ते माघौतें धाडीले : १० **ने.** कोंधळें. ११ **एवा.** पर्वं. १२ **गोने.** °एथौनि ऐसें—. १३ **यमु.** °नाहीं इंद्रेयाचेनि दैवेंसीं सरि : आपण—. १४ **एवा.** कृष्णांचे. **पं.** श्रीकृष्णाचे कापडी : द्वारकेचे कापडी : १५ **पं.** °तंब्र पटीया : १६ **पं.** °म्हणीतलें : " जी जी : तैसींचि भगवीं आम्हीही करूं जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हां तंब्रपटी धौ नीक्षेदु कीं गा : " " ना जी : तरि नको : " १७ (**प्रव. आमा.** १६१).

**१६२.** १ **गोने.** चांचर°. २ **मुने.** पडलें असे. ३. **पं.** °मग मागुतें डोंबेग्रामासि बीजें केलें : नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ प्राणीयां एकासि संबंध देउनि : सूखवीसेख देउनि थोरा एका ठायासि नेला गा : प्राणियांसि देओ न जोडे परि कणव तऱ्हीं जोडावी : " " हो कां जी : " ।। (पुढे लीळा २२१ पाहा.)

## १६३ भट तुरंगमारोहणीं गुंफे माहापुजा

एकु दीं गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा[1] जाला : वीडा जाला : मग गोसावी आंगणीं वेढे करीत असति : तवं पीठऐसें चांदिणें पडत असे : सर्वज्ञें म्हणीतलें[2] : " चांदीणें निकें ना गा ? " " जी जी : " " ऐसां चांदिणां खेळों जाइजे तरि काइ ? " " जी जी : जाइजे तरि जाइजे : आणि काइ : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि एथिचा तुरंगमु कोनु होइल ? " कोण्हीं म्हणे 'मीं होइन :' कोण्हीं म्हणे 'मीं होइन :' भटीं म्हणीतलें : " जी जी[3] : मीं होइन जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हा होए राजवाहानु : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : तरि वाइसांकरवि आइत करवा : " मग भक्तजनीं बाइसांकरवि आइत करवीली : बाइसीं आइत केली : गोसावीं फुटेयाची तळसुधि केली : बाहीरवासाचे सुरंग खोविले[4] : भटीं पाचांगि दाटिली : आवघां भक्तजनीं पाचांगी दाटिलीया : काठीया खांदीं : गोसावीं[5] भटांचीए पाठीवरि आरोहण केलें : श्रीकरीं काठी घेतली : मग गोसावीं छीन्नपापासि बीजें केलें : पुढां भक्तजन : मागां गोसावी : भटां स्तीति जाली[6] : हींहींकारु करीति : वारुवांची गति करीत चालति : ऐसें गोसावी रामनाथा पसिमे ओहोळु : तेथ थडीवा[7] सरीसा केला : गोसावी उतरले : भटांचा खांदु थापटिला : मग आरोहण करुनि उजुचि छींनस्थळीएसि[8] बीजें केलें[9] : छींनस्थळीएपासीं उतरले : गोसावीं खांदु थापटिला : गोसावीयांसि छींनस्थळीएवरि आसन जालें : मग भक्तजन पुढां गेलें : सरीसा वीसदेवो घेतला होता : वाति लावीली : गुंफा चोखट केली : मग गोसावीं बीजें केलें : मग गोसावीयांसि गुंफे माहापुजा जाली : संतोखें सीतेळेगव्हाणुनि[10] दुध आणिलें : मग गोसावीयांसि दुधा-भाताची[11] आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला[12] : ।।

## १६४ भट नाथोबा सिरमेळवणीं सुखा प्रादुर्भाओ[1]

मग[2] गोसावीं पस्यात पाहारीं प्रस्नया बीजें केलें : सरीसे नाथोबा : भट : गोसावी परिश्रया बीजें करितां तेया दोघांचीया डोइया एकवट मेळवीलीया : मग प्रस्नेया

---

**१६३.** १ **य.** गुरुळा. २ **यमु.** °कैसें चांदीणें सुभ्र नीर्मळ नीगालें असे. ३ **यमु.** °मी देवीका कींकरू असे—. ४ **यमु.** °काठीयेचा भाला केला. ५ **मु.** °भटाची पुष्टी झाडीली : **य.** °भटाचे खांद झाडीले. ६ **मु.** °राउतैचें आंग न ठकत गोसावीं मार्गीं बीजें करूं आदरीलें. ७ **यमुहीबीपं.** थडीगा. ८ **अनेयमु.** गुंफेसि. ९ (ही परशरामबासाची वासना होय.) **रामेश्वरबासाची** वासना : 'गोसावी कव्हणी ठाइं न न्हातीचि : अवघीं स्थानें मध्यें घालुनि उजुचि छींनस्थळीए बीजें केलें :' १० **यमु.** सीदोळेगव्हाणीहुनि. **गो.** सीतल°. ११ **एवा.** दुधातुपाची. १२ **पं.** °मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हा तुरंगमु देवका दासू : यासि चासनीं देया गा : " मग भटांसि दुधातुपाचा प्रसादु दीधला : मग मढासि बीजें केलें : ।।

**१६४.** १ **अ.** प्रार्थ°. **गो.** प्रर्थ°. **ने.** पात्र°. **य.** प्रात°. २ **यमु.** 'एकु दी गोसावीयांसि उदयाचा पूजावसर

बीजें केलें : प्रस्रयो सारुनि गोसावीं गुंफेसि बीजें केलें : मग वाइसीं पुसिलें : " हां बाबा : ते दोघै कें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते दोघै डोइए डोइ मेळवीताति : " " बाबा : तयांतें बोलाउं जाओं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : " आणि गोसावीं पींडापासिला[३] ओहोळाकडे रामनाथापसिमे प्रस्रया बीजें केलें होतें : तेथ दोघै होते : बाइसें आलीं : तवं तेथ दोघै जुंझताति : बाइसीं म्हणीतलें : " हें काइ पोरें हो : बाबाएं एकलेयां बीजें केलें : तुम्हीं एथ काइ करीत असा ? चाला : " ऐसें म्हणीतलें आणि स्तीति भंगली : दोघै गोसावीयांपासि आले : तवं गोसावी दंतधावन[४] करिताति : गोसावीं ऐसी सीळिका धरिली : मग म्हणीतलें : " काइ करीत होतेति : गा ? " " जी जी : डोइया डोइ मेळवीत होतों : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा : एव्हडा वेळु कैसे डोइया डोइ मेळवीत होतेति ? " " *जी जी : तेणें आम्हांसि थोर सुख होतें जी*[५] *:* " ।।

## १६५ मासोउपवासिनीं परसोधनीं[१] मार्कंडा कोपणें[२]

मासोउपवासिनीं गोसावीयांतें वीनवीलें होतें : सर्वज्ञें[३] म्हणीतलें होतें : " हें तीए दीसीं एइल : कां कव्हणां एकातें पाठवील : " मग तीयें दीसीं जयंतीची आइत केली होती : गोसावीयांची वाट पाहातें असति : मग गोसावीयांसि वीळचांचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " वानरेया : मंडळीका : तुम्हीं सींहंनारायेणासि जा गा : " " हो कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देया : दोघांचीए हातीं दोनि पाणिभाताचीया मुदा देया : " " हो कां बाबा : " मग बाइसीं दोघांचीए हातीं दोनि पाणिभाताचीया मुदा दीधलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : " खातखात जा : " " हो कां जी : " मग दोघै स्रीचरणां लागले : खातखात निगाले : गोसावीं *मार्कंडातें*[५] म्हणीतलें : " मार्कंडा : तुम्हीं जा : हे काइ करीती तें पाहा : काइ बोलती तें आइका : आणि यापुढां ठेवीती तें घेया[६] : " " हो कां जी : " मग मार्कंड

---

जालेयानंतरें गोसावीं छीन्नपापा वीहरणा बीजें केलें : गुंफे आसन जालें : पाहारा एका परीश्रया पींडाकडे बीजें केलें : परीश्रयो सारुनि आले : उदका वीनयोगु केला : ते दोघै उभे होते : तया दोघांचीया डोइया धरुनि ऐसीया एकवाट मेळवीलीया : आपण गुंफेसि बीजें केलें : बाइसीं पुसिलें :— ३ **अ.** भीडा°. ४ **गो.** ध्वन. **ने.** °धावनी. ५ (**पंमु.** शोध). **होबी.** " जवंजवं डोइयेसि डोइ मेळउं तवंतवं सुखचि होए जी : " **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हांसि हाचि आनंदु थोरू : मग परमानंदु तो कैसा असैल गा ? " ।।

**१६५.** १ **गोने.** प्रसोधनीं. २ **यमुही.** सीक्षापण. ३ **यमु.** °तयांसि गोसावीं पुढारु दीधला होता : मग तीये दीसीं जयंतीची—. ४ **यमु.** °वानरेया : तुम्हां मासोपवासीनीतें पडीताळणें असे कीं : " ५ **यमु.** मार्तंडातें. ६ **एवा.** घेउनि या.

मागिलाकडौनि गेले : तवं तेहीं अवघी आइत केली असे : भटीं म्हणीतलें : " कवाडें उघडा : " " तुम्हीं कोण ? " " आम्हीं गोसावीयांचे : " मग कवाडें उघडिलीं : " भीतरि या : " " ना आम्हीं ऐसे असों : " " ना तुम्हीं ऐसेचि भले : " मग दोघां दोनि आसनें घातलीं : दोघै बैसले : दोघांपुढां दोनि वानें वीस्तारिलीं[७] : तवं मागिलाकडौनि मार्कंड आले : बाहीरि दारवंडेंसीं बैसले : इतुलेनि भटां स्तीति जाली होती[८] : अन्यव्यावृती-पुर्वक बोलों लागले : नाथोबायें एकु एकु[९] लाडु घेतला : ते एकि एकि सेव[१०] खाओं लागले : तेवींचि एरी वानिचे पदार्थ एरी वानी ठेवीति[११] : मार्कंड नावेक होते : मग मढासि आले : भट पस्यातपाहारवरि निरुपण करीत होते : मग आले : तवं तयांपुढिलें वानें तयांचां परिचारिकीं[१२] घेतलीं : दोघै आले : तवं गोसावी प्रस्नेया बीजें करिताति : सरीसी बाइसें : गोसावी दारवठां भेटले : भटोबासें नाथोबायें गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : नाथोबाचां हातीं लाडु होता : तो लाडु नाथोबायें गोसावी-यांचां स्रीकरीं ऽळगविला : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले: तवं बाइसीं म्हणीतलें : " पोरा : उसिटा लाडु कैसा बाबांचां स्रीकरीं ऽळगवीसि ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : उसीटा ऐसें हा काइ जाणतु असे ? " मग गोसावीं प्रस्नेया बीजें केलें : प्रस्नयो सारुनि गोसावीं मढासि बीजें केलें : ओटेयावरि आसन जालें : मार्कंडातें बोलाविलें : गोसावीं पुसिलें : " मार्कंडा : तुम्हीं गेलेति : मां हे काइ करीत होते ? " " जी जी : मीं गेलां तवं हे दोघै भीतरि बैसले होते : नागदेओ काइ नेणों काइ नेणों बोले[१३] : नाथोवायें एकु लाडु घेतला : एक एकु सेवखंड खाए : तेवींचि एरी ठाइंचे पदार्थ एरी ठाइं घालीति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरा काइ बोलतु होता ? " " जी जी : तें मज कांहीं नाठवे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " दाहावीस सब्द नाठवति ? " " ना जी : " " सातपांच सब्द नाठवति ? " " ना जी : " " दोनिच्यारि सब्द नाठवति ? " " ना जी : " " एकुही नाठवे ? " " ना जी : " *" तें वाण घेतलें ? " " ना जी[१४] : "* सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : हे काए करीत होते तें पाहासिचि ना : हे काइ बोलत होते तें आइकसिचि ना : यांपुढें ठेविलें तें घेसीचि ना : तरि तुतें एथौनि कां गा पाठवीलें ? तो तीतुला मंगळ काळु जाला : जीया बाइला[१५] तीयें वानें घेतलीं तीएसि परम[१६] गोमटें[१७] जालें[१८] : *मंगळ काळा जो चुके तयासि एथिचें नेणों केसणें गोमटें अंतरे : " मग बाइसें मार्तंडासि कोपलीं : घागरा बांधला : मग ते उगेचि राहीले[१९] : ।।*

७ **गोनेयमुही.** ठेविलीं. °**पं.** °पातिया : खीसू : दीवे : ऐसीं नवनव वानें ठेवीलीं : ८ **यमु.** °भट ते वान चाखिती आणि निरूपण करिती. ९ **नेहीयमु.** एकु. १० **नेयमु.** °खंड. ११ **एवा.** घालिती. १२ **यमु.** गुरवीं. १३ **एवा.** बोलतु होता. १४ (**यमु.**). १५ **एवा.** बाइयां. १६ **अ.** प्रेम. **यमु.** थोर एक. १७ **यमु.** श्रये. **एवा.** लाभु जाला. १८ **ही.** °तुम्हां नीदैवां ऐसें कां होइल ? " **पं.** °तुम्हीं नसुधेचि राहीले गा : " ।। १९ (**प्रव. आ. १५३**).

## १६६ नाथोबा सुएर करवणें

एकि[1] वाइल ते गरव्हार[2] : ते मढासि आली : गोसावीयांतें वीनवीलें : *"जी जी : वोळगिया सांडुनि गेला : मज कोण्हीं नाहीं[3] :"* सर्वज्ञें म्हणीतलें[4] : "वाइ : हे असों देया :" *दारवठां बीढार दीधलें[3] :* मग ते मठु झाडी : तीयेसि वाइसें जेउं घालीति : रेइनाएकांचां घरीं म्हणीयें करी : तीयें जेउं घालीति : मग तीएसि नववां मासु रीगाला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांसि झाडों नको देओं :" मग वाइसें तीयेसि झाडों नेदीति : मग एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं वेहरणा बीजें केलें : मग मागुतें मठासि बीजें केलें : तवं तीयांसि दारवठांचीये पटिसाळेवरि प्रसुति जाली असे : पुढां लेंकुरूं : गोसावीयांतें देखिलें : आणि दुख करुं लागली[5] : " जी जी : माए नाहीं : ना बहीणि नाहीं : कोण्हीं नाहीं : जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दुख न करा : हें असे नव्हे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : तुम्हीं यांचें सुयेर करा : " " हो कां जी : " " लागैल तें बाइसांतें मागा : " मग नाथोवायें बाज घातली : तयांतें धुतलें : लेंकरुवाचें नाळ खांडिलें : सगडीया घातलीया : वाइसांतें पींपळीया मागीतलीया : तीया वाटौनि दीधलीया : मग बाइसें पथ्य करीति : ते नाथोबा सुति : मग तेयां पडदणीं देति : चीकसा कालउनि देति : मग तीयें आपुलें आंग माखीति : नाथोवा डोइए तेल घालीति : पाणीं ठेवीति : तेया पाणीयांचा सेकु घेति : लेंकरुं न्हांणिति[6] : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग तेथ गोसावीं पडिताळावेया बीजें केलें : गोसावी तेथ उभे राहिले : मग म्हणति : " बाळांतीणि बाइ काइ करीताए ? " " जी जी[7] : सुखें[8] असें जी : " मग वाजुलेयाचिवरौनि हात जोडीति : मग गोसावी वीहरणां बीजें करीति : वेहरणींहुनि एतां पडिताळीति : सर्वज्ञें म्हणीतलें : *" मंडळीका : पशु असे : तें झाडिजे पुसिजे तरि साउमें ए : वरि मान घाली : ना थैक म्हणीजे तरि परतें जाए : तैसे जीव झाडिले पुसिले वाहाती : त्रसले जाती[9] :"* ऐसी नाथोबायें तयांची बारा दीस सुस्रका[10] केली : ।।

---

**१६६.** १ **यमु.** वोळगीया एकाची स्त्री. **हीबी.** एकि बाइको परदेसीनि. २ **मुही.** गरोधर. ३ (**यमु.**). **हीबी.** "जी जी : मीं परदेशीनि : गोसावीयांचा मढु झाडुनि असैन." ४ **यमु.** "बाइ : गजबजा ना : एथ असा : बाइ हे—. ५ **अ.** रीगाली. ६ **अगोने.** °हे रामेश्वरबा : ।। प्रसरामबा : 'पाणीयाचा सेकु नाहीं : सगडीचि घालिती : पथ्य बाइसेंचि करीति :' ७ **नेहीबीपं.** °गोसावीयांचेनि प्रसादें. . . ' ८ **ने.** सुखी. ९ (**दृपा.** ६०. 'झाडिलेपुसिलेयाचा दृष्टांत' 'डोंबेग्रामीं नाथोबाप्रति निरूपिला :' —**दृस्थ.** यावरील दार्ष्टांतिक निश्चित स्वामींचे होय. म्हणून अंतर्भूत केले आहे). १० **एवा.** सुएर केलें. **पं.** °बारां दीसां न्हांणिली : उटीली : वोंटी भरीली : मग बाहीरि नीगाली : आपुलें म्हणीएं करूं लागली : जवं गोसावीं राज्य केलें तवं होती : ।।

## १६७ मंडळिका दुधानयेंनि जीवपरीहारु भाव कथन

नाथोबा सितळेगव्हांणुनि[१] दुध आणिति : नीच पुजाअवस्वरु जालेयानंतरें जाति : तीयें दीसीं सकाळींचि गेले : तवं ते बाइल[२] म्हैसि दोहे : तीया म्हैसि दोहीली : पाणी मीसळों न ल्हाएचि : *नाथोबांसि थोडें दुध घातलें*[३] *:* नाथोबासीं दुध घेतलें : आणि आले : बाइसां हातीं दीधलें : बाइसीं दुध पाहीलें : तवं थोडें : " हां नाथो : हें दुध आजि कां थोडें ? काइ सांडिलें ?" " ना आइ :" " तरि काइ कवडे पाडिले ?" " ना आइ ?" " तरि कां[४] दुध थोडें ?" ते परीहारु देति : तीयें तैसेंचि म्हणति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा नीच उसीरां जाए : तवं तें बाइल पाणीं मीसळी : आजि[५] सकाळि गेला : म्हणौनि आजि पाणीं मीसळों न ल्हाएचि :" " हें काइ बाबा : पाणीं कैसें मीसळैल ? " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " उगे असा गा मंडळिका : जीव जीवां काइ परीहारु असे ? " ।।

## १६८ भटां अद्वैत[१]समर्थनीं म्हांइंभटां कुमति हरणें

छींनपापासि[२] गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि गुंफेबाहीरिला ओटेयावरि आसन असे : भटमुक्षकरुनि[३] भक्तजन अवघे मातिकाम करिताति : म्हांइंभट गोसावीयांचेया दरीसनां आले : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : " गोसावी परमेश्वरु : एर आवघे सुंटदेव :" ऐसें[४] पोटीं भाविलें : मग जवळि बैसले असति : गोसावीं भटांतें म्हणीतलें : " काइ गा : मनन करीत असा ?" " जी जी :" " मनन तरि हे सास्त्रभाख : हे काइ जाणति मनन करुं ? कांहीं गोसावीं नीरुपिलें तें मनन करीत असती :" मग व्यापारु करुं सरला : गोसावीं म्हणीतलें : " बाइ : या दोघांचां हातीं दोनि पाणिभाताचीं पात्रें ओपा[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : " गंगेसि जा[६] : एकु घांसु तुम्हीं घेया : एकु खालि घाला :" "ना जी : आम्हां[७] आपुलें भीक्षान खालि न घलवे : एकु घांसु आम्हीं घेउनि : एकु घांसु हातावरि धरुनि : मग म्हणौनि 'घेइल तें घेओं' :" गोसावीं मानिलें : मग गंगे गेले : अंघोळी केलीया : मग छींनस्तळीपासि जेउं बैसले : एकु घांसु आपण घेति : एकु घांसु हातावरि धरीति : आणि म्हणति : "घेइल तें घेओं[८] लागों :" ऐसें म्हणति : आणि अद्रीस्य होए : ऐसें भट नाथोबा जेविले : पात्रें पुसुनि भवंडिति *गोसावीयांपासि आले : गोसावीं म्हांइंभटातें म्हणीतलें*[९] *:*

---

**१६७.** १ **यमुहीबीने.** सीदोळे°. २ **अ.** बाइको. ३ **(यमु.)**. ४ **अ.** काइ. ५ **एवा.** हें आजि सकाळि गेले :

**१६८.** १ **अगो.** अद्वीत°. २ **यमु.** 'एकु दी गोसावीयांसि उदयांचा पूजाअवस्वर जालेयानंतरें मढीं आसनीं उपविष्ट असति : भट मुख्य करुनि......' ३ **नेहीबी.** मुख्य°. ४ **मुनेपं.** ऐसा पोटीं उलेखु केला. ५ **एवा.** देया. ६ **एवा.** रुद्रभूमी धाडिलें. ७ **अगो.** आम्हीं. **मु.** आम्हांसि. ८ **ने.** °गा. ९ **(गोनेहीबीपं.)**.

"हें आधार : कीं नीराधार ?" "ना जी : बोटाचा आधारु : एर आवघें नीराधार :" म
भट नाथोवा दंडवतें *घालौनि बैसले*[८] : गोसावीं पुसिलें : "काइ गा घालेति ?
"जी जी : काइ आम्हींचि धालों ? चराचर वीस्व धालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं
धालेयां कैसें गा चराचर वीस्व धालें ?" "ना ऐसेंचि आहे : यें काइ बापुडीं जाणि
ताति ?" म्हणौनि म्हांइंभटांकडे हातु केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं तें चराचर वीस्व
होआ ?" "आम्हीं तेंचि चराचर वीस्व :" "तरि चराचर वीस्व तेंचि तुम्हीं ?" "ना हो
चराचर वीस्व तेंचि आम्हीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें कैसें ?" "ना तें ऐसें :" म्हणौनि
भट बोलों लागले : गोसावी आक्षेपु करीति[१०] : म्हांइंभट म्हणति : "आतां भट एथ काइ
परीहारु करीती पां ?" ऐसें म्हांइंभट वीचारीति : तवं भट[११] परीहारु करूं सरति[१२]
"आतां गोसावी एथ काइ अक्षेपु लावीती पां ?" ऐसें वीचीरीति : तवं गोसावीयां
अक्षेपु लाउं सरे : ऐसें म्हांइंभटांचें अंतस्करण[१३] आंदोळीए जालें : गोसावी द्वीत
प्रत्येष्टीति तवं भट अद्वीत प्रत्यष्टीति : ऐसी वाड्डवेळ्ळु उघाणी जाली : मग सर्वज्ञें म्हणी-
तलें : "काइ गा : कांहीं तुमचेया सास्त्रासि मीळताए ? कीं अवघें[१४] झाडकवि[१५] :"
म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : मागें संखराचार्या बोलतां[१६] जे अक्षेप राहीले ते आतां
भट बोलत असति :" मग गोसावीं अवसान केलें : मग म्हांइंभटांसि भटांवरि बुधि
आली : मग एति तेधवां भटांसि नमस्कारु करीति : ।।

## १६९ अग्नसोधनीं कथनीं आउ रुसणें[१]

गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : *आरोगण जाली : गुळुळा वीडा
जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला*[२] : गोसावीयांसि आसन जालें असे : गोसावी
नीरुपण करिताति : तवं वाइसीं म्हणीतलें : "आउ[३] : वीसदेओ आहे कीं नाहीं ऐसें
पाहुनि ए हो :" "हो कां :" आलीं : गुंफे वीसदेओ पाहीला : तवं वीसदेओ नाहीं :
मग तीयें एउनि उगींचि बैसलीं : नीरुपण जालें : गोसावीं सींहंनाराएणाहुनि वीळिचां
गुंफेसि बीजें केलें : वाइसें पुजाअवस्वरालागि वीसदेओ पाहों गेलीं : तवं वीसदेओ
नाहीं : "हें काइ आउवे : तुजकरवि वीसीदेओ पाहावविला : तरि 'नाहीं' ऐसें सांगसि
ना :" "काइ सांघावें असे ? काइ तुम्हीं जाल[४] : कीं गोसावीं जाती[५] ? आमतेंचि धाडाल
म्हणां :" आणि वाइसीं म्हणीतलें : "पाहा वो काइ जालें ये जोगिणिसि : बाबांचें
नांव कां[६] घेताए ?" म्हणौनि घागरा बांधला : आउसीं म्हणीतलें : "न सको रे ए[७]

१० **एवा.** लाविती. ११ **गोने.** भटां. १२ **गोने.** सरे. १३ **पं.** °आंदोळाएमान जालें. **हीबी.** °गजबजीलें. १४ **एवा.** अवघी. १५ **गो.** झाडकव्य. **य.** झकवण. १६ **एवा.** °जीया श्रृती राहीलीया असति तिया आतां—.

**१६९.** १ **अमु.** दवडणें. २ **(गोनेमुहीबोपं.).** ३ **यमु.** °चुली. ४ **यमु.** आणाल. ५ **यमु.** आणिती. ६ **यमुने.***. **हीबी.** कैसें. ७ **मु इ. पं.** तुमचीए.

रीपीरीपीसि[८] : काढुं आपुला जोगु :" म्हणौनि आपुली अवघी मात्रा घेतली : जाउनि दुसरीये गुंफेसि बैसली[९] : गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरु जाला : सीहंनाराएणींहुनि वीसदेओ आणिला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : उदीयांचि पुजाअवस्वरु जालीयानंतरें गोसावीं एरी गुंफेचीया आंगणा बीजें केले : *सरीसे भटोबास असति*[१०] : तेथ गोसावी उभे राहीले : तवं आउसें समोर जोगवटा घालौनि[११] बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : आपण कै[१२] आलेयां ?" "कालीचि कालीचि : कां[१३] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एवंपरीयंत उदास्यचि मां :" मग गोसावीं दोन्हीं स्रीचरण जोडिले : मग म्हणीतलें : "एथ नमस्कारु कां न करा[१४] ?" "कवणें कवणांतें नमावें स्वामीं जगंनाथा ? सर्व वीष्णुमय जगत्र[१५] :" तवं भटीं म्हणीतलें : "जी जी[१६] : हे आउ आवघें देहसीध :" "काइ गा सामानस्त्रीया देहसीधा नसति ?" "पाहा वो : पाहा वो : उपासनीयांची सुन : दीक्षितांची कन्या : नाथुपंथीं उपदेसु : चातुर्वर्णीं भीक्षा करीं : पाणिभातु जेवीं : तींतीरेया महोवांचा कृष्णया ध्याएं[१७] : कीं त्या आणि सामानस्त्रीया ओ सरी केली[१८] : बापु गोडीसेया देवा : नाहीं एणें गोडीसेन देवें चाड : काढीन आपुला जोगु :" म्हणौनि नीगालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "खेळिजैल नाएका :" "हो खेळिजैल स्वामीं जगंनाथा :" मग सरालेया गेलीं : सा मास सरालां होतीं : गोसावी एक असति ऐसें आठवेही नां : ॥

मग प्रार्धबाइसें[१९] : एकवीरा बाइसें[२०] : मदळसा बाइसें : तीया गांवां गेलीं : 'कोणीं ठाइं नीद्रा करूं पां जाओं ? गोसावीयांची आउ असे तीये गुंफे जाओं :' *म्हणौनि आउसाचीये गुंफे आलीया : तेथ राहीलीया*[२१] : तेथ तीए दीसीं आउसां एक वाढिलें आलें : तीयें जेवीलीं होतीं : तवं रात्रीं गणपति आपयोचां घरुनि ताट आलें : तीए दीं तेयांतें स्राध : "आउ : तुम्हांलागौनि गणपति आपैयें ताट पाठवीलें :" "ना रे : मागुतें नेया : हा जेविला रे :" "ना आइ :" म्हणौनि ठेवीलें : आणि गेलीं : मग आउसीं *तेयां बाइयांतें*[२२] म्हणीतलें : "जेवा ना कां रे : काइसेया उपवासी मराल ? ब्राम्हणांचीए घरिचें ताट :" तीए दीसीं एकादसी : "जेउं ना कां :" म्हणौनि तीयें जेविलीं : आंचवलीं : आणि गोसावीयांचें नांव 'चक्रधरु' ऐसें घेतलें : *आणि उजळली*[२२] : "हे रे : तुम्हीं माझेया चक्रस्वामिचीया ? माझा चक्रस्वामि : माझा चक्रस्वामि :" ऐसी च्यान्ही

---

८ **य.** रीपुरीपुसी **मु.** रीपीरीसि. ९ **गो.** राहीलीं. **यमु.** °सीदोळेगव्हाणाचां गुरवीं सीहंनाराएणीं वाति लाविली : सीहंनाराएणीहुनि बाइसीं वाति आणिली : गोसावीयांसि रात्रीचा—. १० **(यमु.)**. ११ **यमु.** °समोर पटिसाळे बैसोनि वोतपळी घेते असति : १२ **एवा.** कैसेयां. १३ **यमु.** मां. १४ **एवा.** एथ नमस्कारु करा. १५ **य.** जगत. **मु.** °असे. १६ **यमुहीबी.** °ये आउवे देहेसीधी जाली जी. **पं.** °हे आउ द्रीढसीधि. १७ **अ.** पुजी. **पं.** रीरीए पीतळेची जोगलादेवि पुजी. १८ **गो.** घातली. १९ **यमु.** प्रान्हाद°. २० **अ.** दरळयाबाइसें. **य.** द्रावडा°. **मु.** द्रविळास°. २१ **(ही.)**. २२ **(यमु.)**.

पाहार नीद्रा नाहीं : उदीयांचि उठिलीं : पालवेंसींचि[२३] गोसावीयांचेया दरीसनां नीगालीं : भरलीभादली गुंफा तैसीचि सांडिली : मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं आंगीटोपरें केलें : मग गोसावीं भक्तजनांतें पुसिलें : "आजि कोणीकडें खेळों जाइजैल?" कव्हणी कव्हणीकडे म्हणे : कव्हणी कव्हणीकडे म्हणे : सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि हें नाएकासि सामोरें[२४] जाइल :" म्हणौनि गोसावीं बीजें केलें : मग गोसावीं डोंबेग्रामुनि तेया वृक्षातळीं आसन केलें : तवं आउसें एतां देखिलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आला नाएकु आला मां :" गोसावीं पाउलें दोनिच्यारि साउमें बीजें केलें : तवं तीयें दुख करुं लागलीं : पाठिमोरीं ठाकलीं : सर्वज्ञें म्हणीतलें: "नाएका या : काइ एथौनि पाठवीलीति ? तुम्हींचि गेलीति :" मग गोसावी खेमाळींगन[२५] दीधलें : तीहीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : मग तयाचि निबातळिं आसन जालें[२६] : ।।

## १७० भटां स्तुतिकरणीं सर्वसास्त्रप्रतिभिज्ञा करणें

गोसावीं छीनपापासि बीजें केलें : मग भट निर्वचनाआधार स्तुति करुं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "हें आपुलें : कीं एथिचें ?" "ना जी गोसावीयांचें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचें एथ काइ करावें असे[२] ? स्तुति करुं भांडारेकार जाणति :" यावरि भांडारेकारांची स्तुतिची गोष्टि सांघीतली[३] : ।।

## १७१ डोंबेग्राम प्रांतीं मार्कंडादीकांसि जुझतां भटांसि पराजयो करणें

एकु दीं गोसावीयांसि मढीं पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं गांवां इसान्यें पींपळ : तेथ वीहरणासि बीजें केलें : तयां पींपळातळिं आसन जालें : मग गोसावीं भक्तजनांतें म्हणीतलें : "आगा : तुम्हीं अवघे एकीकडे होआ : आणि *एकला*[१] वानरा एकीकडे : *तुम्हीं आवघे मीळौनि वानरेयातें वोजावा*[१] *:* चाउं ओरपों न लभे : एऱ्हवीं भलेतेथ

---

२३ **मु.** पांगुरलेन वस्त्रेसीं. **य.** वानवेसी. **ने.** पावलेंसीं. २४ **यमुने.** साउमें. २५ **ने.** क्षेमा°. २६. **पं.** °मग गोसावीं पुसिलें : "नाएका : तुमचें मागें कांहीं असे ?" "हो जी स्वामी जगंनाथा : गुळु असे : फुटाणे असति : उळा : तीळ : तीळाआंतु तीनि दाम असेति :" सर्वज्ञें म्हणीतलें: "मंडळिका : जा : घेउनि या :" "हो कां जी :" गेले : आणिले : गोसावीयांपुढें ठेवीले : गोसावीं बाइसांकरवि अवघेयां भक्तजनासि देववीलें : मग गोसावीं जोगरेयाचा अनुतापु हे गोष्टि सांघीतली : ।।

**१७०.** १ **यमु.** "हां गा : तुम्ही काइ आपुलें बोलत असा की येथचें ?" २ (**अगो.** प्रतीत हे वाक्य 'भट......स्तुति करूं लागले :' या वाक्यानंतर आहे. **यमुनेही.** या प्रतीप्रमाणे ते खाली घेतले आहे. संदर्भाच्या दृष्टीनेही तेच योग्य आहे). ३ (पूर्वार्ध लीळा ४७ पाहा).

**१७१.** १ (**यमु.**).

हाणावें[२] : " "हो कां जी : " पांगुरणें ठेविलीं : मग लागले जुझों : ते भट[३] बुकीया हाणति : कोंपरें हाणति : पांपरा हाणति[४] : भट काइसेनहीं नांगवति[५] : ऐसें मार्कंड[६] धरों गेले : आणि भटीं पांपरा हाणीतलें : ते पांपर थोरि लागली : पांपरेसरीसे पडिले : परि पांपर[७] न सोडितीचि : आणि गोसावी आसनुनि[८] उभे ठाकले : स्रीकरें आंगीचीया बाहीया ऐसीया वरुती केलीया : "वोजावा : वोजावा गा वानरा : " म्हणौनि सामोरें बीजें केलें : मार्कंडीं पांपर धरिलीचि होती : अवघे झोंबींनले : भट पाडिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया बुकीवरि : " मग आवघे बुकीवरि घेओं लागले : ऐसे भट निफुंड[९] जाले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां पुरे गा : " मग जयाचा गुडुघा जेथ[१०] लागला होता तो तेथ तेणें धरिला : मग भटां उठवे ना : मग कांनवडें ठाकुनि गोसावीयांचेया स्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा वानरेया : दुखवलेति ? " म्हणौनि स्रीकरु देउनि उठवीलें : भटीं म्हणीतलें : "जी जी : कांहीं न दुखवें : " मग म्हणीतलें : "जी जी : मीयां खंडवीखंडीं[११] जुझावें तें माझें गोसावीं नासिलें : " *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : धीरवीरां होआवें[१२] : "* मग गोसावीं मठासि बीजें केलें : ।।

## १७२ अस्वथआरोहणीं भट गुंडेवरि[१] घेववणें

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : वेसीउतरे गंगेचीए थडीए पींपळु : तेथ वीहरणासि बीजें केलें : भटां स्तीति जाली : ते तेया पींपळावरि वेघले[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "हा कां गा पींपळावरि एउनि वेघला ? " "ना जी नेणों : " सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया गुंडेवरि : " "हो कां जी : " लागले अवघे गुंडेवरि घेओं : भट आवघेयांचे गुंडे चुकवीति : *ते डाहाळीएहुनि आणीकी डाहाळीए जाति[३] :* कोण्हाचा न लगे : मग गोसावीं स्रीकरें आंगीचीया बाहीया वरतीया केलीया : श्रीकरीं गुंडा घेतला : "आतां तुझा कोणु गा राखैल ? " मग भटोबासीं म्हणीतलें : "जी जी : अवघेयांचे गुंडे चुकवीले : गोसावीयांचा गुंडा काइसेनि चुकवैल ? आतां माझा स्रीचक्रधरु राखैल : " म्हणौनि खालि उडी घातली : गोसावीयांचेया स्रीचरणां लागले[४] : ।।

---

२ °हे परशरामबास ।। रामेश्वरबास : 'चाउं ओरपुं न लभे : एरव्हीं भलेतेण भलेतेयातें भलेतेथ हाणावें :' ३ **यमुहीबी.** भटातें. ४ **पं** °ढीमां हानति : बुदकेनि हानति : बखलुनि घालीति :— ५ **यमुपं.** नावरति. **हीबी.** अडती ना. ६ **यमु.** मार्तंड. ७ **यमुनेपं.** पावो. ८ **हीबी.** आवेसौनि. ९ **ने.** नीफुंद. **य.** नीढाळ. **मु.** नीर्बुज. १० **अ.** जेया. ११ **यगोनेही.** खंडीवीखंडी. १२ (**प्रव. आमा.** २२२).

**१७२.** १ **गो.** दगड°. २ **मुहीबी.** वळघले. ३ (**यमु.**). ४ **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "आलें विघिन (**एवा.** आला आपाओ) चुकउं जाणा : "

## १७३ त्रीयंबका गमनीं लखूबाइसांप्रति ईश्वरप्रतीति करणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि एमळार्जुनातळीं आसन असे : बाइसां आणि लखूबाइसां नावेक तुडपुड[1] जाली : मग परीवंट बांधला : गोसावीयांपासि आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : मग म्हणीतलें : "जी जी : त्रीयंबका जाइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कां बाइ ?" "ना जी[2] : मजसीं बाइसें ऐसें बोलति : ऐसें बोलति :" म्हणौनि गोसावीयांपुढां बाइसांचें गान्हाणें सांगीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं बाइसांचें काइ पाहा : तुम्हीं एथिचें पाहीजे[3] कीं :" "ना जी : मीं जाइन :" म्हणौनि नीगालीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा गा वानरेया : राहावा[4] : म्हांतारी थोरा एका अनीष्टा वरिपडी होइल :" "हें काइ जी : गोसावीयांचेनि न ऱ्हातीचि : मां माझेनि काइ राहाती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमचेनि राहाती :" मग भट गेले : आणि म्हणीतलें : "हें काइ जालें लखूबाइ : गोसावी राहावीताति तरि राहा ना कैसीं ?" "घेइं नागदेया : गोसावीयांचें काइ ? गोसावीयांचें तें जालें कीं : तुं तवं मातें कहीं कांहीं न म्हणसि ?" "हें काइ जालें लखूबाइ ? एकीकडे गोसावी : आणि एकीकडे मीं :" "घेइं नागदेया : गोसावीयांचें काइ ? गोसावीयांचें जालें कीं : तुं तवं मातें कहीं कांहीं न म्हणसि कीं ?" भटीं म्हणीतलें : "यें तवं माझेनि राहातें असति : आणि गोसावीं मातें राहावावेया पाठवीलें असे : तरि राहावों[5] ना कां :" "हो कां : मी म्हणतुसें राहा :" "हो कां :" म्हणौनि मठा गेलीं : मात्रा ठेविली : भट आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग म्हणीतलें : "हें काइ जी : गोसावीयां राहावीतां न राहातिचि : आणि माझेनि राहीलीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीव जीवां साजात्य : हें सकळां वैजात्य[6] :" यावरि गोसावीं बांदीकाराचा दृष्टांतु निरुपिला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु मैळा चोरू असे : तो बांद धरी : राओ तेयातें मागावेया जाए : 'आरे मैळेया : हे बांद आम्हांसि दे : मग तुं मागसी तें आम्हीं तुज देउनि :' तो रायासि नेदी : मग पंचनगरें[7] मागावेया जाति : तियें म्हणति : 'आरे मैळेया : हे बांद आम्हांसि दे : मां तुं मागसी तें आम्हीं तुज देउनि : तुं म्हणसीं तें करुनि :' तेयांहीं नेदी : मग गानें : भाटें : थोंटी[8] : सीमुरें : रांधवनें :

---

**१७३.** १ **यमु.** भांडण जालें : **पं.** उरो जाला. २ **गोपं.** °मसीं. **ने.** °मासीं. **मु.** °बाइसाकरवि काइ आसों लाभत असे ? मजसीं—. ३ **यमुनेपं.** पाहावें. ४ **एवा.** बोलावा : **अगो.** °हो कां जी : ५ **अ.** राव्हों. ६ **प्रव.** वि. १२८–३०. °म्हणौनि तुमचेनि राहीली : एथीचेनि न राहातीचि :" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : जेंचि विघ्न तेंचि अधीन : तेयासीचि वेगळा होए : अपरोक्षज्ञानियासि बहुरूपता : बहुकामता होए : कृपास्पदीभूत होउनी अनंत काळ असे : परि अगाधचक्रवर्ती तेयाची वासु न पाहे :" ए तीन वचनें उद्धरणीं असति : ७ **एवा.** नवनगरें. ८ °बहुरुपीयें : **थोटीं**–. (नाना गुरु गोपीराज, रुद्धपूर, यांची 'मुक्तपाठ' पोथी).

सामान्य स्त्रीया : कालळें : तीयें रायातें विडा मागावेया एति : तीयें म्हणति : ' आम्हीं मागौनि : ' राओ म्हणे : ' आम्हांसि नेदीचि : पंचनगरांसि नेदीचि : मां तुम्हांसि काइ देइल ? ' ' नां आम्हीं मागौनि : ' मग राओ तयांसि वीडा दे : मग तीयें जाति : म्हणति : ' आरे मैळेया : हें बांद आम्हांसि दे : ' तो म्हणे : ' मातें रावो मागावेया आला होता : तेयासि नेदींचि : पंचनगरासि नेदींचि : मां तुम्हांसि काइ देइन ? ' तीयें म्हणति : ' हें काइ रे मैळेया : मर : तुवां जोडावें : आम्हीं खावें : मागां जोडिलें तें आमसींचि खादलें : पुढां जोडिसी तें आमसींचि खासी : ' ऐसां उमेठां शब्दीं वर्णीति : मग तो तेयांसि दे[९] : तैसें वानरेया : जीव जीवाचें म्हणितलें करीति[१०] : " ।।

## १७४ छिन्नवृक्षभपास भटांप्रति कर्मज्ञाननिरुपण

एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : एमळार्जुनातळिं आसन असे : वसो एकु तो गांविचीं[१] सेतें खाए : एकु दीसीं गांवींचे आवघे मीनले : तयांचीया[२] खूरीया घेतलीया : तीनि दीस तयासि पांणीं नाहीं : मग[३] तीसरां दीसीं तो पांणींयासि हळुहळु एताए : तवं भक्तजनीं देखिला : " जी जी : कैसा बापुडा खूरीं अडला असे : जी : याचीया खूरीया खांडुं[४] ? " गोसावी वीनवणी न स्वीकरीतीचि : मागुतें वीनवीलें : " जी जी : कैसा बापुडा वसो खूरीं अडला असे : अवघे बंध[५] मासांआंतु गेले असति : बापुडा सीधों[६] पांतु असे जी : बापुडेयासि[७] देहपातु हों पांतु असे जी : तरि याचे बंध खांडुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हा कां गा खांडुं देइल ? " " जी जी : देइल : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें नेदी : पाणियांतु रीगों देया : मग खांडा : " " हो कां जी : " " पोफळफोडणा घेया : " मां पोफळफोडणा घेतला : पाणीयांतु रीगाला : मग भटीं म्हणीतलें : " तुम्हीं अवघे धरा : मीं खूरीया खांडीन : ना तरि मीं एकला धरीन : तुम्हीं खूरीया खांडा : " " ना नागदेया : तुं धरि : आम्हीं खूरीया खांडुनि : " मग भटीं घोनारुनि धरिला[८] : एरीं खूरीया खांडिलीया : अवघी गंगा असुधें वाहाली : मग भक्तजन गोसावीयांपासि आले : " जी जी : बापुडा वसो जी : खूरीं थोरु अडला होता जी : आवघी गंगा असुधें वाहिली जी : खूरीया न खंडीजतीया : तरि सीधता[९] : " तवं वसो मागिलाकडौनि आला : गोसावीयांपासीं[१०] उभा राहीला : मग सर्वज्ञें

---

९ (**वृपा.** १६. **बांदीकाराचा दृष्टांत**). १० (**प्रव. विमा.** ४३).

**१७४.** १ **मु.** देइगांविचीं. २ **यमु.** °पाइचीया खूरीया बांधलीया : तीया पुले (लै)लीया. **हीबो.** बांधलीया. **पं.** °मासाआंतु बांद बुडौनि गेले. ३ **एवा.** तयाचि वोतापासि थडिए पडिला होता : तेथ बाबुळ होती : तीए बाबुळेतळि गोसावीयांसि आसन जालें असे : भक्तिजनीं देखीला—. ४ **यमुही.** सोडुं. ५ **यने.** बांध. **गोपं.** बांद. ६ **मु.** उठों. **नेपं.** सीदों. **एवा.** मरों ७ (**नेगो.** प्रतीत हे वाक्य ' एकी वासना ' म्हणून दिलेले आहे). ८ **मु.** चौखरूनि. ९ **ही.** आपघातें मरता. १० **ही.** °वांकारेन.

म्हणीतलें : "तुम्हीं याचीं कृतकर्में नेणां गा : म्हणौनि तुम्हां घ्रुणा उपनलि[११] : एथौनि याचीं कृतकर्में जाणिजतातिं : म्हणौनि एथ घ्रुणा नुपजे :" यावरि गोसावी माळेकाराचा दृष्टांतु निरुपिला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु माळेकारू माळेयावरि उभा असे : तेयाचीए सेताचीए लवणीं चोरु एकु असे : तो वाटा घे : वोहरें मारी : ब्राम्हण मारी : संन्यासी मारी : तें तो देखे : परि उगाचि असे : मग एकु दीसु तो रायासि सांपडे : मग रावो तेयातें खैरी जुंपावेया धाडी : मग अवघा गांविचा लोकु पाहावेया ये : तो म्हणे : 'कैसा बापुडा गोरागोमटा : धारेधाकुटा : बरवा राणीएचा पुतु ऐसा दीसतु असे : मां राओ यातें खैरी कां जुपताए ? यातें पाखाळु कां नेघे ?' मग तो माळेकारू कांवळेयाची बुंथि घालुनि पाहावेया ए : तें तो आइके : मग म्हणे : 'एणें जियें पापें केलीं आहाति तीयें मीं जाणतु आहे कीं : याचे लांब[१२] खांड तें महुरीए येवढें करावें : याचां खांडीं गांवो पुजावा[१३] :' "] ।।

## १७५ मेंडुकभीत स्त्रीए[१] भएनिवृति : वर्णभातीं रुचि करणें

गोसावीयांसि उदयाचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें एमळार्जुनातळीं आसन असे : गोसावीयांचेया दरीसना वाइल एकि आली होती : गोसावीयांचां ठाइं भक्तजनें रुची-अरुचीचीया गोष्टी करीतातिं : तवं तीया[२] बाइला[२] म्हणीतलें : "जी जी : मीं मेंडकासि भीयें : आणि वर्णभातु न रुचे :" मग गोसावीं बीढारौनि वर्णभातु आणवीला[३] : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा नाएका : मेंडुक एकु पाहुनि आणां :" "हो कां जी :" आउसें गंगा हींडति : "दीस कां रे बा मेंडुका : चक्रस्वामींचें कोपणें होइल :" तयां न दीसे : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जा : मेंडुकु[४] पाहुनि आणां :" "जी जी :" भट गेले[५] : परवती[६] भाद[७] घेउनि आले : वर्णभातु वाटां घातला : गोसावीं तयांचीए हातीं मेंडुकु[४] दीधला : वर्णभातु पुढां ठेविला : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : वर्णभाताचा घांसु घेया : मेंडुकाची[४] वास पाहा : तेवींचि याची[८] वास पाहा :" मग तेहीं मेंडुकु[४] कांपतकांपत हातीं घेतला : वर्णभाताचा घांसु घेति : आणि गोसावीयांची वास पाहाति : आणि मेंडुकाचीही[४] वास पाहाति : आणि जेवीतजेवीतां वर्णभातु रुचला : आणि मेंडुकाचें[४] भय निवर्तलें : जेविलीं : मग तयां वर्णभातु रुचे : आणि मेंडुका न भीयति : ।।

---

११ **एवा.** उपजे. १२ **एवा.** लाहान. १३ (**दृपा.** १३. माळेकाराचा दृष्टांत).

**१७५.** १ **हीबी.** साधां. २ **हीबी.** साधीं. **यमुपं.** एकवीराबाइसीं. ३ **एवा.** आउसां नाथोबाकरवि मेंडुकु आणवीला. ४ **ही.** बेंडुक. ५ **यमु.** (**एवा.**) नाथोबासां सांपडला : ते थोरली धाव घेउनि आले. ६ **नेपं.** परभति. **गो.** प्रबति. **बी.** परबत ऐसी धाब—. ७ **गोबी.** धाव. ८ **एवा.** एथची.

## १७६ साधां जळक्रीडे बोलावणें

गोसावीं वीळिचांचीया[१] पाहारा[२] एका जळक्रीडे बीजें केलें : गोसावीयांसि लोंबतां स्रीचरणीं खडकावरि आसन जालें : दोन्हीं स्रीचरण[३] उदकाआंतु : तवं साधें : लाहामाइसें : रत्नमाणिकें भामाठाणींहुनि भीक्षा करुनि आलीं होतीं : तवं साधीं गोसावीयांतें देखिलें : आणि साधें गोसावीयांपासि आलीं : गोसावी एकलेचि असति : साधीं झोळी गोसावीयांसि द्रीष्टपुत केली : झोळी खडकावरि ठेविली : मग गोसावीयांचेया स्रीचरणां लागों बैसलीं : आणि गोसावीं स्रीचरण फांकीले[४] : तें साधांचें तोंड चुबकळलें[५] : साधीं म्हणीतलें : " हें काइ जी ? " गोसावी इक्षीत[६] हास्य केलें : मग दोन्हीं स्रीचरण मेळवीले : मग श्रीचरणां लागलीं :॥

सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : या : जळकेळि खेळों : " " जी जी : जळकेळि ते कैसी जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : हें उदकामध्यें रीगैल : तुम्हीं उदकामध्यें रीगा : मां हें तुमतें सींपैल : तुम्हीं यातें सींपा : " " हो कां जी : " तवं लाहामाइसें बोबांओं लागलीं : " एल्हो ए : एल्हो ए : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : " " जी जी : " " तुमची माता बोलावीत असे : " गेलीं : " कां वो बोवांत[७] अससि ? मातें गोसावी जळकेळि खेळावेया बोलाविताति : " मग झोळी तयांचां हातीं दीधली : मग कासोटा[८] दाटुनि आलीं : " कां जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जालें नव्हे साधें हो : आतां जा : " ॥

## १७७ तथा आंगी देयावेया अभीमुखता

गोसावी सोरटीए जाडिची आंगी लेंउनि वीळचां वेळीं डोंबाएचां आंगणीं उभे असती : तवं साधें आलीं : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : आणि आंगी हातें ऐसी पाहीली[१] : " जी जी : हे आंगी काइसेयाची ? " " साधें हो : हे सोरटीए जाडिची[२] आंगी : " " ऐसी[३] कैसी सोरटीए जाडिची ? हे तवं पाटोळी[४] ऐसी दीसतीए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : हे आंगी तुम्हांसि देओं ? " " ना जी : हे गोसावीयांसीचि वरवी साजतीए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तऱ्हीं आणिकासि देइजैल कीं : घेया गा : " " ना जी : हे गोसावीयांसीचि वरवी साजतीए : " ॥

---

**१७६.** १ **अगो.** वीळिची(चे)या. २ **मुहीबी.** अर्ध°. **यने.** अद°. **पं.** आध°. ३ **ने.** श्रीकर. ४ **अगोहीबी.** चुब(भ)कळीले. **पं.** बुडकळिले. ५ **यपं.** उदकाआंतु बुडळलें. ६ **गोनेहीबी.** इखीत. ७ **यमु.** बोलावितीसि. **गो.** बोलावीलें. ८ **अ.** कासाटा.

**१७७.** १ **यमु.**° " जी जी : हे आंगी काइ पाटावु ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " पाटावु नव्हे : कांबळेयाची आंगी : साधे हो : " २ **एवा.** हे दीषीचेया उंदीराचीए लोवेची. ३ **एवा.** ऐसी कैसी जी उंदीराचीए लोवेची ? ४ **ने.** पाटाउवांची.

## १७८ नाथोबा तुप वाढणें

एकु दीसीं गोसावीयांसि रेइनाएकाचीए आवारीं पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनां वाढिलें[1] : गोसावी आरोगण करिताति : नाथोबा आपोसन[2] धरुनि[3] उगेचि : सर्वज्ञें म्हणीतलें : " जेवा ना कां गा मंडळीका : " " जी जी : तुप वाढावें असे : " " आणां आणां तुप : " म्हणौनि रेइनाएकु बोवाइले : मग तयां तुप वाढिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं माहात्मे कीं गा : तुम्हीं पात्रीं पडिलें तें भोजन करावें[4] कीं : " *मग गोसावी रेइनाएकाकरवी तयासि ठोंबरा वाढवूं लागले : तवं ते नीराकारीती : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " कां गा घेया ना ? " " ना जी : गोसावीं वारिलें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : धाये तवं अन्न घेइजे गा : अन्नीं काइ दोषु असे ? त्रसाल तारी खळेया पाळीं टेकाल[5] : "* मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## १७९ नाथोबा समरणवीधान

एकु दीं गोसावीयांसि रेइनाएकाचां आवारीं दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जाले : गोसावीं ताटावरि बीजें केलें : भक्तजन आवघे बैसले : गोसावी आरोगण करिताति : भक्तजन आवघे जेउं लागले : नाथोबा रुची जेवीताति : गोसावीं तयांकडे अवळोकिलें[1] : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं मढासि[2] बीजें केले[3] : रेइनाएकाचीया आवारामागें गोसावी उभे राहीले : मग गोसावीं नाथोबातें म्हणीतलें : " मंडळिका : जेवीतां हें तुम्हां आठवत होतें ? " " ना जी : नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हां सएनासनीं भोजनीं परमेश्वरू होआवा कीं गा : " ऐसें निरोपिलें : मग मढासि बीजें केलें : ।।

---

**१७८.** १ **यमु.** ठाए केले. २ **हीबी.** प्रणामु. ३ **यमु.** करुनि. **पं.** घेउनि. ४ **गोहीबीने.** कीजे. ५ (**प्रव. आमा.** ६५).

**१७९.** १ **यमु.** °सदेठीया वांगीयाचीया फाळी वाढीलीया होतीया : भटीं फाळि हातीं घेतली : मग म्हणीतलें : "एल्हो : उंदीराचें पुंस कैसें सीजलें ? " ऐसी फाळी दाखवीली : साधीं म्हणीतलें : "जी जी : हा नागदेवो वारिजो ना : देखीला : हा मज आनज खावों नेदी." सर्वज्ञें म्हणीतलें : " उगे असा गा वानरेया : साधांसि अनज खावों द्या. मग गोसावियांसि आरोगण—. **प्रव.** (**आ.** ३०) °सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें काइ निभुला होउनि जेवित असा ? मंडळीका : तुम्हां सएनासनीं : भोजनीं परमेश्वरू होआवा कीं गा : " "हो कां जी : " म्हणौनि संकले : मग नाम आठवित जेवों लागले. २ **गो.** बीढारासि. **यमु.** °बीजें करीतां नाथोबाचेया खांदावरि श्रीकरू घातला : ३ **नेहीबी.** करिताति. **पं.** करितां—.

## १८० नाथोबा हृदयसुन्यता

एकु दीं गोसावीं नीरुपण *अवर-पर ऐसें*[1] केलें : नीरुपण अवसान जालें : मग भट नाथोवातें पुसत होते : " नाथो : गोसावीं आजि नीरुपण केलें तें तुज कांहीं आठवत असे तरि मजपुढां सांग पां : " " नागदेया : मज नाठवे : कांहींचि नाठवे : " " एकही सब्दु नाठवे ? " " ना नागदेया : मज एकुही सब्दु नाठवे : " आणि भटां वीस्मो जाला : गोसावीयांपासि भट आले : " जी जी : म्यां नाथोतें पुसिलें : ' नाथो : आजि गोसावीं निरुपण केलें : तें तुज आठवताए ? ' ' ना नागदेया नाठवे : ' ' एकुही सब्दु नाठवे ? ' ' ना नागदेया एकुही सब्दु नाठवे : ' " भटोबासीं म्हणीतलें : " हें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हा हृदयसुन्य गा : हा तेव्हळीचि तेथ नाहीं गा : हृदयसुन्य धर्मीं अधिकारु नाहीं : " यावरि गोसावी वेळुवाचा दृष्टांतु निरुपिला : [ सर्वज्ञें म्हणीतलें : " चंदनाचीया जवळीका आरी : बोरी : टाकळी : वेहंकळी : पाडळी वेधति : परि वेळु न वेधे : कां ? तो भीतरि[2] पोकळु असे[3] : " ] *भटीं पुसिलें : " जी जी : हृदयसुन्य तो कवण " सर्वज्ञें म्हणीतलें : " हृदयसुन्य तो ब्रह्मवासनेचा अभेदवादी : जैसे भगवे[4] : " " हो कां जी : तरि परधर्मीं कवण अनाधिकारी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जरठां धर्मीं अधिकारु नाहीं : जैसें जारसैलें वाळुक असे : तें खावोंचि न ये : ऐसाहीं मीठमीरपुडी लाउनि खाइजे तरि तोंडीं खतचि पाडी : तैसें जरठांप्रति बोलोंचि नये : ऐसांहीं बोलीजे तरि दोखेंसींचि उठी[5] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " भक्तिजडां धर्मीं अधिकारु नाहीं : जैसें भवरैलें वाळुक असे : तें वारि बरवें दीसे : फोडौनि पाहीजे : तवं आंत गाठी भरलें असे[6] : " " जी जी : भक्तिजड ते कवण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जैसे क्षेपनिक आणि याज्ञिक : " " हो कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " कर्मजडां धर्मीं अधिकारु नाहीं : जैसें देहलुतैलें वाळुक असे : ते हातीं घेउंचि नये : ऐसांही घेइजे तरि दोन्ही हात कीवींयां भरति[7] : तैसें कर्मजडांसि आपणपें दाउंचि नए : ऐसांही दाखविजे तरि दोखुचि घे : " " तरि अधिकारिया तो कवण जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " जीवु सर्वाधिकार्या : जैसें कोवळें वाळुक असे : तें नीदोंष : सर्व उपयोगा जाए : तयाचें तळींव होए : सांबारींव होए : कुसंबीर होए : लोणीचें होए : हीरवें खावों ये : तैसा वयसा कोमळ पुरुषु सर्वाधिकार्या[8] : "* ॥

---

**१८०.** १ **(हीबी.). गोने.** बरवें. २ **एवा.** °अंतरसारू नव्हे. ३ (**दृपा.** ३०. वेळुवाचा दृष्टांत). ४ (**प्रव. आमा.** ८९). ५ (**वि.** २५७ व **दृपा.** ३१. जारसैलेया वाळुकाचा दृष्टांत). ६ (**आमा.** ८९ व **दृपा.** ३२. भवरैलेया वाळुकाचा दृष्टांत). ७ (**आमा.** ९० व **दृपा.** देहलुतैलेया वाळुकाचा दृष्टांत). ८ (**आमा.** १७९ व **दृपा.** ३४. कोवळेया वाळुकाचा दृष्टांत). जारसैलेया, भवरैलेया व देहलुतैलेया वाळुकाचे दृष्टांत—. हे तिन्ही दृष्टांत **दृस्थ.**काराच्या मते ' रामदेवाप्रति ' निरूपिलेले आहेत. **एकी वासना** म्हणून ' भक्तजनाप्रति ' असे निर्दिष्ट केले आहे. ' भवरैलेया वाळुकाचा

## १८१ मंडळीका देवता अनुर्वाजित एणें

एकु दीं गोसावीं नाथोबातें कवणा गांवां म्हणीयां पाठवीलें तें नेणीजे : गेले : म्हणीएं केलें : मागुतें वीळचां निगाले : *तो आंधारू पडिला : मां भेवों लागले : मग प्रकासु पडीला*[१] : ते वेसीआंतु रीगति तेव्हडा वेळू सुजीएडु[२] होता : वेसीआंतु रीगाले : आणि अंधकारु पडिला : तवं गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडाचेनि मानें आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयां-जवळि बैसले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा मंडळिका : इतुलेया[३] वेळा कैसे आलेति ? " " जी जी : मीं वीळिचां गांउनि नीगालां : *तवं आंधारू जाला : मग मीं भीयालां जी : तवं प्रकासु पाडिला : जी जी : पुढां प्रकासु देखीजे वेसीव्यन्ही प्रकासु पाडिला*[१] : वेसीआंतु रीगें तवं तीतुलाचि दीसु[४] होता : वेसीआंतु रीगालां आणि अंधकारु पडिला : हें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तीयें[५] स्थानिची देवता गा : तुमतें अनुवर्जन करीत हा ठाओवरि आली : " ।।

## १८२ मनुष्यबंधनश्रवणें भीतां साधां अभयदान*

[ एकु दीं गोसावीयांसि आरोगण जालेयानंतरें गोसावी उपरीबाहीरि बीजें केलें : पटिसाळे पुर्वीलीकडे खांबापासि डावेनि श्रीकरें मदळसा धरुनि पसीमांमुख उभे होते :

---

दृष्टांत 'रामदेवा प्रति : क्षेउर प्रकरणीं **नाउरीं**' असा निर्देश आहे. 'नाउर' येथे गोसावीयांचे 'अग्निष्टिके क्षौर' (पृ. २७९) असे प्रकरण आहे. पण तेथे 'लीळा' कोणतीच नाही. तेथे रामदेवाची भेट झाली असणेंही शक्य नाही. ती १०/१२ दिवसांनंतर स्वामी बीडला गेले तेव्हा झाली आहे. 'जारसैलेया' व 'देहलुतैलेया' वाळकांचे दृष्टांत रामदेवाला सांगितल्याचा निर्देश असला तरी स्थळ व तेथील लीळा निर्दिष्ट केलेली नाही. रामदेवाशी संबद्ध अशा प्रकरणांत हे दृष्टांत बसत नाहीत. म्हणूनच की काय '**एकी वासना :** भक्तजनाप्रति' हे दृष्टांत सांगितले, असा निर्देश आढळतो. त्याच्या आधारे हे दृष्टांत मी येथे घेतले आहेत. हे तीन दृष्टांत व कोवळेया वाळुकाचा दृष्टांत, असे चारही दृष्टांत वाळुकासंबंधी असून त्यात अन्योन्यसंबंध आहे. त्यामुळे ते एकाच प्रसंगी सांगितलेले असले पाहिजेत, असे मला वाटते. म्हणून, या दृष्टांतांचा अन्वय ज्या वचनांशी लावलेला आढळतो त्यांच्या आधारे व प्रकरणवशाच्या साह्याने हे चारही दृष्टांत 'नाथोबा हृदयसून्यता' या प्रकरणात मी येथे घातले आहेत. माझ्या मते त्यांवरील दार्ष्टांतिकेही स्वामींचीच आहेत. म्हणून तीही घेतली आहेत.

**१८१.** १ (**यमु.**). २ **यमु.** प्रकाशु. **नेहीबीपं.** उजीएडु. ३ **एवा.** एव्हडेया. ४ **पं.** सुजीएडु. **एवा.** दीसतु. ५ **यमु.** "त्या देवता तुमतें वोळगती आलीया." (प्रश्नामबास) ।। "त्या देवता गा : तुम्हीं भियाल म्हणौनि बोळविती आलीया" (रामेश्वरबास) ।।

**१८२.** * **अगोहीबी.** प्रतीत ही लीळा नाही. 'रत्नमाळास्तोत्रा'तही नाही. **यमुनेपं.** प्रतींत ती आहे. या प्रतीतील लीळेत आलेले तुरुक, गोलाम ( = गुलाम ) हे शब्द पाहाता, मूळ लीळेत नंतर बरेच प्रक्षेप झाले असावेत असे वाटते. **आचार** सूत्र १०४ चा प्रकरणवश म्हणून 'प्रकरणवशा'त ही लीळा आलेली

पासि साधें होतीं : गाइ गोन्हा जोडी देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : वळियाडें येती ते मानसातें धरूनि नेती : नाकीं सडे घालीती : " साधीं म्हणीतलें : " जी जी : ते न देखावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ना भीया हो साधें हो : तुम्हांवरि एथौनि वाजत वारा धरिजैल : " ।। ]

## १८३ साधां बीढारा पाठवणें

गोसावीयांसि वीळिचां वेळीं डोंबाएचां आंगणीं आसन असे : साधें गंगे जेउनि आलीं : गोसावीयांचां श्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : आतां बीढारा जा ना : " " जी जी : भुरडें[1] भुरडें[1] मीं वाटे देखें : तयांसि भीयें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " चाला : हें तुमतें बोळवीत एइल : " मग गोसावीं आंगणांचां सेवटुवेन्हीं बोळवीत बीजें केलें : तेथ गोसावी राहीले : साधें जाति : मागील वास पाहाति : तवं गोसावी उभेचि[2] देखति : मग गुंफेचेया दारवठेयाआंतु रीगालीं : आणि गोसावीयांतें नेदखतीचि : आणि अंधकारु पडिला : तवं लाहामाइसीं म्हणीतलें : " हें काइ एल्हो : एव्हडेया वेळा कैसी आलीसि ? " " ना मातें गोसावी बोळवीत आले : " ।।

---

आहे, त्यावरून ती संपूर्ण लीळा प्रक्षिप्त असावी असे वाटत नाही. येथे ' प्रकरणवशा 'तील लीळाच (प्रारंभीचा आवश्यक तो भाग **मु.** प्रतीतील घेऊन) स्वीकारली आहे तुलना करून पाहाता यावी म्हणून अन्यत्र आढळणारी ही लीळा **मु.** प्रतीतून खाली उध्दृत करीत आहे.

**मनुष्यविक्रएश्रवणें भीतां साधां अभयदान**

एकु दीं गोसावीयांसि आरोगण जालेयाउपरि बाहीरि बीजें केलें : पटिसाळे पुर्वीलीकडे खांबापासि डावेनि श्रीकरें मदळसा धरूनि पसीमांमुख उभे होते : पासि साधें होतीं : बाइसें वीडीया करूनि देतें होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : एक देसीं ऐसें आति : तुरुक माणुसां धरीति : " तीहीं म्हणीतलें : " जी जी : माणुसें काइसेया धरूं देती ? तीयें काइ गोरूवें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : धरुनि नेती : कान वींधुनि दोर वोवीती : धाकुटीं गोलामें करीती : वडीलांचे गळे कांकरीति : **सोधु.** : एकी देसीं मानुसें धरूनि नेइजती : नीकीं नीकीं तीयें वीकीजती : एरें दासीपाइकें कीजति : " " हें काइ जी ? तीयें काइ गोरूवें ? तीयें कां धरूं देती ? " " एथें फोडीती : मग लोखंडाचा दोरू सीरीती : **सोधु.** : एकीं देसीं ऐसें वर्ते " ।। छ ।। तथा **हीराइसें** ।। " साधें हो : आतां एथ ऐसें वर्तेल : आणिकी देसीची आणीका देसा धरूनि नेइजति : नीकीं नीकीं वीकीजति : " " तीयें काइ मानुसें नव्हति ? तीयें काइ ढोरें ? मां आपणेयांतें धरूं देति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : ते बळीयाडे : ते एथें काकरू सीरीति : " ।। छ ।। मग साधें कांटाळौनि म्हणीतलें : " जी जी : तियें मीयां न देखावीं जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते तुम्हीं न देखा हो : ना भीया हो साधें हो : तुम्हांवरि एथौनि वाजत वारा धरिजैल : " ।।

**१८३.** १ **एवा.** जुंबाडे जुंबाडें. **यनेपं.** जूंबडें. **गो.** जूरूडे जूरूडे : तथा जूंबूडे जूंबूडें. २ **गोहीबीयमुपंने.** उभे(भ)यांचि.

## १८४ तथा कंटकु फेडणें

एकु दीं गोसावीयांसि डोबायेचां देउळीं[१] आसन असे : मग साधें गंगे जेउनि आलीं : कांटा मोडला : कुंटितेंकुंटितें आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : कुंटितें असा कां ?" " जी जी : कांटा मोडला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " या : हें तुमचा कांटा फेडील : " " ना जी : गोसावीयांकरवि[२] कैसा फेडवीन[३] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " या : कंटकु फेडुं देया : " " ना जी : गोसावियांकरवि कैसा फेडवावा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेसांकरवि फेडउं ?" " हो कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : साधांचा कांटा फेडा गा : " " हो कां जी : " मग भटीं कांटेनि[४] कांटा फेडीला :

## १८५ शास्त्रकथन निषेध*

[ *डोंबाइचां देउळीं साधीं पुसीलें : " जी जी : मागां नागदयासि जें निरूपिलें तैसेंचि मज निरूपावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " विकारविकल्पशून्य : स्वभावमात्रें : निरालंबी : देवतास्मरणें : जो जन्म क्षेपी तेयासि परमेश्वरू पुनरपि आपुला संबंधु देति : " ऐसी असतीपर निरोपिली : ते साधीं घोकिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधे हो : हें शास्त्र कव्हणाप्रति न बोलावें : " साधीं म्हणीतलें : " जी जी : मी काइसया बोलैन जी : " मग बीढारा पाठवीली :* ॥ ]

## १८६ तथा रंगमाळिकाप्रसंगें प्रतीति पुसणें

गोसावीं वीहरणुनि[१] बीजें केलें : मग मढावरि बीजें केलें : साधीं सडा घातला : मग आंगणीं रंगमाळिका भरितें असति : गोसावी मढावरुनि उतरले : *साधाचीए पाठीवारि श्रीकरु ठेविला*[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : हें काइ करीतें असा? रंगमाळिका भरितें[३] असा ?" " जी जी : रांगोळीया भरीतें असें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " या कां[४] ? " " जी जी : गोसावी बीजें[५] करिती म्हणौनि : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होए : " तवं भटीं म्हणीतलें : " वाइ : हे एल्हो नीकी : गोसावीयांचां ठाया[६] ए तेव्हळि *एथ*[२] सडासंमार्जन करी : चौकरंगमाळिका भरी : स्रीप्रभूचीया दरीसना जाए तेव्हळि *तेथ*[२] सडासंमार्जन करी : चौकरंगमाळिका भरी : दादोसांचेया ठाया जाए *तेव्हळि*[२] तेथ[७] सडासंमार्जन करी : चौकरंगमाळिका भरी : " तवं साधीं मनीं म्हणीतलें :

---

१८४. १ **यमु.** आंगणीं. **हीबीपं.** पटिसाळे. २ **ने.** °कडे. ३ **हीबी.** फेडउं. ४ (**यगोनेपं.**).

१८५. *(**प्रव. आमा.** २७. कमळाइसें वासना).

१८६. १ **गोहीबीपं.** °णौनि. २ (**गोनेहीबीपंयमु.**). ३ **यमु.** सुति. ४ **अ.** काइ. **नेही.** °भरितें असा ? **यमु.** °सुतें असा ? ५ **यमु.** °श्रीचरणु ठेवीती—. ६ **अ.** ठाइं. ७ **यमुहीबीपं.** °ही.

"कैसा हा नागदेओ : सदाकदा गोसावीयांपुढां माझा घालु[8] घाली :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : स्रीप्रभूवरि : एथ : माहात्मेयावरि : कैसी बुधि[9] असे[10] : ऐसें सांघावें : एऱ्हवीं हें जाणत असे :" "जी जी : गोसावी परमेश्वरु : स्रीप्रभू ते आकास[11] : रामु आमुचा सोएरा : तेणें इतुकें ऐसें पोटीं गोमटें सुदलें म्हणौनि तेयाचा इतुला ऐसा लोभु :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : हें जैसें म्हणीतलें तैसेंचि : स्रीप्रभू निर्गुण ब्रम्ह ऐसें जाणिजे हो : माहात्मा तो तुमचा सोएरा : तेणें तुमचां पोटीं इतुलें ऐसें गोमटें सुदलें म्हणौनि तेयाचा इतुला ऐसा लोभु करा : तोही न कीजे हो साधें हो :" मग गोसावीं मढांआंतु बीजें केलें : ।।

## १८७ वैराग्य मिरउं आवडे हाही एकु विकारचि*

[ डोमेग्रामीं अवस्थान : गोसावीयांचां ठाइं हिंवाळां उदयाचें मातीकाम होत होतें : तें सीं वाजत होतें : तेणें भक्तिजनासि व्यापारू होववे ना : आणि भट व्यापार करूं लागले : नाथोबाएं म्हणीतलें : "नागदेया : तुं कैसा कांहीं हींवसी ना ?" तवं भटीं म्हणीतलें : "आम्हीं वैरागी : काइसीया हींव :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : पोरा जीवासि वैराग्य मिरउं आवडे हाही एकु विकारुचि कीं गा :" यावरि भटीं म्हणीतलें : "जी जी : निर्विकारु तो कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : पोरु जीवु विकारावेगळा केव्हळाहि झालाचि नाहीं : मां तुं काइ तया वेगळा अससि ?" "हो कां जी :" ।। ]

## १८८ मृतीकापींडुग्रहणीं वीकारज्ञान

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन असे : मातीकाम होत असे[1] : लखूबाइसें पेंड देतें असति : भट पेंड वाहात होते : मग एकु पेंडु घेतला : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : हा पेंडु वीकारें घेतला गा :" "जी जी : तें गोसावी जाणत असति कीं :" "ऐसेंही एक सुक्ष्म वीकार[2]

---

८ **एवा.** घाला. ९ **यमु.** प्रतीति. १० **गोनेही.** °जैसें असे तैसें सांघावें. ११ **ने.** आत्मप्रकाश. **यमु.** °लीवोंसीवों नैएति.

१८७. * (**प्रव. आ.** ४५, ४६. साळकर महादेववा वासना).

१८८. १ **यमु.** °भक्तजन पेंड वाहात होते : भटोबास भींती करीत असति : लखुबाइसीं पेंडु दीधला तो भटीं लवकरि घेतला : . . . . सर्वज्ञें म्हणीतलें : "पेंडु वीकारें घेतला गा :" भटीं पाहिलें : तवं देखति ना : मग म्हणीतलें : "जी जी : काहीं देखिजे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवाचां ठाइं हा ठावो व्यऱ्हीं सुक्ष्म वीकार असति ते आपुले आपणयां परी देखति ना : तथा वोळखति ना :" २ **एवा.** अर्थ. **एवा.** धर्म.

असति कीं गा : जे आपुले आपणेयां उपलखति[३] ना :" मग भटां कळलें : मग संकले : ।।

## १८९ दाइभागवताकरवि ओटेया चुना पीटवणें

[१]दाइभागवतीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : माझा जरु[२] जाएचि ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "या ओटेया चुना पीटा : मां तुमचा जरु[२] जाइल :" मग तेहीं राजमढाचेया ओटेयासीं चुना पीटीला : मग तेयांचा ज्वरु गेला[३] : ।।

## १९० देवां सीखासुत्रत्यागु नीरुपणें

एकु[१] दीं सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : सीखासुत्राचा त्यागु करा : एथ अनुसरा[२] :" " ना जी : हें मज नव्हवे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि वीव्हाओ करा :" " ना जी : मज हेंहीं नव्हवे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि एथौनि जा :" " हो कां जी :" मग गेले : मग[३] साधें गोसावीयांचेया दरीसना आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ साधें हो : माहात्मेयांचीए सीष्टाइए आलींति ?" " जी जी : सीष्टाइ काइसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " येथौनि माहात्मेयांतें ऐसें म्हणीतलें : 'माहात्मे हो : सीखासुत्राचा त्यागु करा : एथ अनुसरा :' ' ना : हें मज नव्हवे :' ' तरि वीव्हावो करा :' ' ना: हेंहीं मज नव्हवे :' ' तरि एथौनि जा :' ' हो कां जी :' तो एथ[४] भांडौनि गेला : हा नव्हे[५] गुढघा कांपत असे :" साधीं म्हणीतलें : " हें काइ जालें रामांसि ? गोसावीयांसि कैसा भांडौनि गेला ?" मग मागुतीं साधें गेलीं : मग

---

३ **होबीपंने.** उपलक्षेति. **यमु. (गोपाळबा)** °यावरि गोसावीं स्त्रीव्यव्हाराची गोष्टि सांघीतली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "अवघे पारीं बैसले असति : स्त्री आणि पुरुष (तथा आबुला आबुली) जयाजवळि व्यव्हारू सांघों जाति ते कीं स्त्रीचेयासारीखे बोलेति : ते काइ तेणें सांडीली : त्यजिली : **एकी वासना :** मागां उपयोगा गेली नाहीं : प्रस्तुति उपयोगा न वचे : पुढां न वचे : परी भलतोही स्त्रीचेयाचि सारीखे बोले : एवंपर्यंत वीकारू ।। **(लक्ष्मींधरबा)** सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु दादला : तयाची बाइल : दोघे सभेसि गेली : वेव्हारू सांघावेया : सभेचे तीयेतें देखेति : आणि तयाचा न्याओचि असे : परि सभा तीयेचेयाचिसारीखे बोले : तयांसि तीसि लागलाहानें नाहीं : पुण तीयेचेयाचिसारीखें बोलों आवडे : ऐसें दर्शनाचें सामर्थ्य असे : तें तीयेचेया रूपाचें कीं गा वानरेया :"

**१८९.** १ **यमु.** एकु दी दाइभागवता दुसरा सीतज्वरु आला : मग गोसावियातें वीनवीलें : "जी जी : माझा ज्वरु फेडावा :" सर्वज्ञें म्हणीतलें—. २ **ने.** ज्वरु. **ही.** °नीसेख. ३ **य.** °हे लीळा रामे. ।। वोटा करवणें : हे रामें : ।। पहीलें आदि एथें :

**१९०.** १ **मु.** माहादाइसांचेया वाराणसी जाणेयांपूर्वी : कीं माघौतें बोळवुनि आलेयां : हें नेणिजे: **(यमु.)** एकु दीं देव गोसावीयांपासि बैसले होते°. २ **यमु.** भीक्षा करा : एथचीया दर्शना या : हें तुम्हां दर्शन देइल : ३ **यमु.** °एक वेळ. ४ **अने.** एथौनि. ५ **यमु.** होए.

नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : माहात्मा भेटैल तरि तेयांतें ऐसें म्हणावें : 'एथौनि[६] बोलाविलें असे : ' " "हो कां जी :" मग साधें गेलीं : " हें काइ जालें तुज रामा ? गोसावीयांसि कैसा भांडौनि आलासि ? जाए : तुतें गोसावीं बोलाविलें असे :" " हा होये कीं मी रामु :" म्हणौनि वाहे आफळीली : " मजवीण काइ गोसावीयांसि सरत असे ? दाहाएक[७] नागदेव जाले तरि काइ ?" मग गोसावीयांचेया दरीसनां आले : ।।

## १९१ बाइसीं नीरोपण पुसणें

एकु दीं गोसावीं नीरुपण केलें : तें बाइसें आरातीचि नां : मग गोसावीयांतें बाइसीं पुसिलें : " हां बाबा : मघां काइ नीरुपण जालें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें वानरेयातें पुसा : " भट गोसावीयांजवळि[१] बैसले असति : मग बाइसीं भटातें पुसिलें : भट बोलों लागले : बाइसीं म्हणीतलें : " हां बाबा : ऐसें होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा कांहीं[२] आपुलें बोलैल ? हा एथिचेंचि बोलैल कीं :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "जेंचि जीव जीवापासौनि पावती तेंचि परमेश्वरापासौनि पावति : एक वांचौनि[३] :"* मग बाइसां भटोबासांचेया सब्दावरि प्रतीति आली : ।।

## १९२ आपुलेयाचा सुश्रका वीधी नीरोपणें*

[ एकु दीं नाथोबासि जरु आला[१] : सीरवेथा थोर उठिली : तेणें करुनि आपणपें सांभाळीति ना : अन्न नाहीं : उदकचि घेति : तेहीं वस्त्रे सांडीलीं : कुपीनु आपणेयां गेला : गोसावीयांसि उदेयांचा पुजावसर जालेयांनंतरें मग उंचमढासि बीजें केलें : तवं नाथोबा उघडेनागीवे देखीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तुम्हां असकेयां असतां यातें पांगुरवा ना तें काइ ?" "ना जी : हा आपणपें सांभाळी ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : " आपुलेया पडिलेयाची सूश्रका कीजे कीं गा :" मग गोसावीं कुपीनु सरीसा केला : पांगुरवीलें : मग बीजें केलें : ।। ]

---

६ **यमु.** एथचेया दर्शना. ७ **अ.** दाहेक.

**१९१.** १ **गोही.** °जवळे. २ **यगोही.** काइ°. **मु.** काइ. ३ (**प्रव. वि.** १२६).

**१९२.** * **अ.**प्रतीत 'सुश्रका वीधी नीरूपणें' ही 'आदी' असून नंतर 'यावरी सुश्रकेचें प्रमाण नीरूपिलें :' एवढाच मजकूर आहे. **आचार** सूत्र १९४ च्या 'प्रकरणवशा' वरून ही लीळा नाथोबा संबंधी असावी असे स्पष्ट दिसते. नाथोबासंबंधीची लीळा फक्त **पं.** प्रतीत व प्रकरणवशात आढळते. तेथून ती येथे घेतली आहे. अन्य प्रतीत नाथोबासंबंधीची लीळा आढळत नाही.

१ **एवा.** अन्य महात्मे असक्त होते : ।।

## १९३ पचन-पाचननिषेध निरूपण*

[डोमेग्रामीं अवस्थान : एकु वेळ भट नाथोबा कव्हणा एका व्यापारा बीडासि गेले होते : नावेक वेळ जाली : मार्गीं भुक लागली : म्हणौनि एकाकरवी रांधवीलें : जेविले : मागुतें एका पेणां आपणचि रांधूनि जेविले : ऐसें गोसावीयांपासि आले : अवघा पुर्ववृत्तांत सांघीतला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं महात्मे कीं गा : महात्मेनि पचनपाचन न कीजे : भीक्षा मागौनि जेवीजे कीं :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले : ।। ]

## १९४ उपासनीयां रीद्धपुरीं वासु निक्षेदु

उपासनीये[१] ते रीद्धपुरा गेले : तीहीं दोघी बाइया सीक्षिणी[२] केलीया : आपणेयां पुजापुरस्कार करवीति : *मग कोणें नेणों भगतजनें आलीं : परमेस्वरपुरौनि : तेंहीं गोसावीयांपुढां सांघितलें : "जी जी : उपासनीए रीधपुरीं आपणेयां पूजापुरस्कार करवीताति*[३] : तेथ मढी केली असे :" ऐसें गोसावीयांपुढें सांघीतलें : मग आणिकें भक्तजनें परमेश्वरपुरा गेलीं[४] : तयां हातीं गोसावीं निरोपु पाठवीला : सर्वज्ञें म्हणीतलें : "उपासनीं[५] तेथ नसावें : तेथ श्रीप्रभु राज्य करिताति : आपणेयां पुजापुरस्कार न स्वीकरावें : कां स्थानत्यागु करावा : गुरुपस्य अधीकवृती न वर्तावें :" तयावरि अधिक वृतीचें प्रमाण नीरुपिलें[६] : [सर्वज्ञें म्हणीतलें : "कान्ह् वहुडीचेया वनासि आला : सातसें डबुरां अंतराळीं वाजति : सातसें भुमंडळीं वाजति : कान्हें म्हणीतलें : 'बहुडिये : एक नारियेळ दे कां :' वहुडीया म्हणीतलें : 'राउळो : सामर्थ्य असे तरि तोडुनि घेया :' कान्हें दृष्टी नारीयेळ तोडीलें : चेलेयाचां हातीं दीधलें : वहुडीया दृष्टीं त्राहाटिलें : मागौतें देंठीं लावीलें : कान्ह् आवघीं नारियेळें तोडुनि खालि पाडी : बहुडी माघौतीं दृष्टी त्राहाटी : तियें देंठीं लावी : मग कान्हें म्हणीतलें : 'या : आम्हीं तुम्हीं आंगें जुंझों : मीं आपुलें वीर्य खीरों नेदीं : तुं आपुलें वीर्य खीरों नेदीं :' 'हो कां :' मग कान्ह् उर्द्धरेता : अधरेत घे : तें उर्द्धं सोखी : ऐसी बहुडी रोडैली : ते कामाख्येची दासि : तिया पुसिलें : 'बहुडीये : तुं ऐसी कां ?' तिया अवघी व्यवस्था सांघितली : मग तिया म्हणीतलें : 'कान्हु अवीधी खादला असे : तुं रमतां रंध्रीं हीरा धरि : आणि

---

**१९३.** *(**प्रव. आ.** १९५).

**१९४.** १ **यमु.** उपासनीए रूधिपुरासि नीगत होते : नीगतां गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : मीं रूधिपुरासि जाइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं परमेश्वरपुरा जात असा : तेथ बहुत दीस नसावें : असावें तरि दीस तीनि असावें : तेथ बहुत दीस असों नये :" "हो कां जी :" मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग ते रूधिपुरा गेले : २ **हीमुपं.** सीखीणी. ३ **(गोनेहीबीयमु.)**. ४ **गोनेय.** नीगालीं. ५ **अगो.** उपेणें. **नेमुपंहीबी.** °नीएं. ६ यानंतर **मु. अज्ञात** लीळा ९ 'कान्हा बहुडी वीवादीं

जींकसी : ' मग तिया हीरा धरीला : कान्ह सोखूं गेला : आणि ब्रह्मांडीं हीरा बैसला : ' मर मर वहुडीये : कपट केलें : ' आणि कान्हु पडिला :" सर्वज्ञें म्हणीतलें : " स्त्रियांचां स्वरूपीं कपट आति : कान्हु काइ वहुडीये जाए ? परि.अवीधीतव गेला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " गुरूपसि अधीकवृती न वर्त्तिजे[७] : " ] मग तीं तो नीरोपु तयांपुढां सांघीतला : परि वारीलें न करीतीचि : *एकु दी तेयांसि स्तीति जाली : तेहीं आपणेयांतें अडीं घातलें : तयांचां सीक्षींहीं घातलें : मग आणिकीं भगतजनीं येउनि गोसावीयांपुढें सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरा जीवा एथौनि म्हणीतलें तें नव्हे : मग मरणा सरण जाए[८] : "* ।।

## १९५ नाथवाणिप्रसंसा

आबाइसें गोसावीयांपासि चौपदी गाति : सर्वज्ञें म्हणीतलें : " हे नाथवाणि : हे सीद्धवाणि : नाथवाणि ते नीकी : *नाथवाणि : सीद्धवाणि गाओं ए : तैसें एथीचें[१] गावों नैये[२] : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " अन्यकथनें जाये : अन्यधर्में पुरुषु धर्मापासौनि जाये[३] : "* ।।[४]

*भटीं पुसिलें " जी जी : महात्मेयां वेळ न कंठे तेव्हेळी संगीत गावों ए ? " गोसावीं श्रीमुगुटें निराकारीलें : भटीं म्हणीतलें : " तें कां जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें " गीत विखो : म्हणौनि : " " हो कां जी[५] : "* ।।

*सारंगपंडिता बाइया न मनेति : मग कटाक्षुनि पुसिलें : " जी जी : मागां नाथ आइकों परी नाथिनी नाइकों : सीध आइकों परी सीधिनी नाइकों : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मागां गार्गी : मैत्री : मदळसा : दीलहुती या लोकिचिया पुराणप्रसीधा ब्रह्मविदा नव्हति गा ? " आणि उगेचि राहिले[६] :* ।।

## १९६ आबाइसां गुरु लक्ष कथन

गोसावीं आबाइसांतें म्हणीतलें : " बाइ : तुमचा गुरु एकचि लक्ष जाणें[१] : नासाग्रीचें भृलक्ष[२] तें उतम[३] : " ।।

---

अविधि कथन' येथे घातली आहे. ७ **शोधु.** अधिकवृत्तिवरि हे गोष्टि सांघीतली. ८ **(ही.)**.

**१९५.** १ **एवा.** आणिकी. **एवा.** अर्वाचीक. **एवा.** तैसें सर्वाची कळा घेओं ए. २ **(हीबी.)**. ३ **(प्रव. आ.** १५७; **आमा.** १०). ४ **अगोने.** हे सोधीची लीळा. **मु.** एथ. वासना : गणपतिमठीं : हंसराजाचीए भेटीपुर्वी. ५ **(प्रव. आमा.** १७१. मुनीवा पाठ). ६ अज्ञात चरित्राच्या **ना.** प्रतीत दोन ठिकाणी 'नाथवाणी प्रसंसाचां प्रसंगी गार्गी मैत्री अनुवादु' ही लीळा आहे. म्हणून ती येथे घातली आहे.

**१९६.** १ **य.** °नासाग्रापासौनि भ्रुभंगीचें तें नीकें. २ **अ.** भरलक्ष. **पं.** °ते नेणति : भ्रुलक्ष तें उत्तम. ३ **य.** °हे प्रसरामबा : अज्ञात. **मुही.** तथा हे लीळा एथ : एऱ्हवीं अज्ञात.

## १९७ चंद्रदेवा खीरिभोजना पाठवणें

चंद्रदेव[1] ते भामांठाणीं पढति : मग अनाध्याचां दीसीं गोसावीयांचेया दरीसनां एति : कां जीए दीसीं वार नाहीं तीए दीसीं एति : तयां सात वार एति : एकु नाहीं : तीए दीसीं गोसावी बाइसांकरवि जेउं घालवीति : मग एकु दीसीं गोसावीयांचेया दरीसना आले : गोसावीयांसि दरीसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " चंद्रया : आजि तुम्हां खीरिभोजन होइल गा[2] : " " जी जी : " " जा स्नान करा : " मग ते गंगे[3] स्नाना गेले : स्नान करुनि एताति तवं एकी बाइ तीयेतें स्राध : तीया ब्राम्हणां आवंतिलें : कर्म[4] करुं कोण्हींचि नेणे : तीया म्हणीतलें : " कल्पु कोण्हीं नेणे : " ते गंगे स्नाना आली : तवं ते मार्गीं भेटले : मग तीया पुसिलें : " बटीका : तुं कल्पु जाणसि ? " " ना हो : " "हों कां : चाला आमचेया घरा :" तीं कल्पीलें : कर्म करणीए केलें : मग ते खीरि तुप जेविले : मग एउनि अवघी वेवस्था गोसावीयांपुढां सांघीतली : ।।

## १९८ तथा लाडुभोजना पाठवणें

मागुतें गोसावीयांचेया दरीसना आले : गोसावीयांसीं दरीसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " चंद्रेया : आजि तुम्हां लाडुभोजन होइल गा : स्नान करुं जा : " " हो कां जी : " मग ते स्नान करावेया गेले : स्नान केलें : तवं एकीं बाइला पुसिलें : " बटीका : तुं अनंताची काहाणी सांघों जाणसि ? " " हो जाणें : " " हो कां : तरि चाल : " मग तीं अनंताची काहाणी सांघीतली : मग तेहीं तयां तुप लाडु जेउं सुदलें : मग तीं एउनि गोसावीयांपुढां सांघीतलें : ।।

## १९९ भुतानंदा कोल्हापुरा पाठवणें

गोसावीं भुतानंदापुढां गोवारीयाची[1] गोष्टी सांघीतली होती : तयांचेया नातोंडासि ज्वरु आला[2] : मग तीं ते गोसावीयांची लीळा आठौनि तयासरिसी नीजैली : मग तयाचा[3] ज्वरु तयांसि आला : मग[4] तीयें गोसावीयांचेया दरीसनां आलीं : मग भक्तजनीं ते गोष्टी तेयांची गोसावीयांपुढां सांघीतली होती : मग तेयां गोसावीयांसीं दरीसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " भुतानंदा : तुम्हीं म्हणे सांपें जरू घेतें असा ? " " हो जी : जरू काइ घेइन : " मग गोसावीयांपुढां अवघी गोष्टी सांघीतली : सर्वज्ञें

---

**१९७.** १ **यमु.** चंद्रदेव ते कानडेया (**मु.** कारडया) ब्राह्मणाचे मुंजीये : नीवासां पढति : वारी जेवीति : एकु वारु नाहीं तो गोसावीयांचा ठाइं जेवीति : मग एकु दीसीं——. **बी.** इंद्रदेव. २ **यमु.** °बादाठाणा जा. **ही.** °स्नान करूं जा." ३ **यमु.** बादाठाणा गेले. ४ **गोने.** कल्पु कोण्हीचि नेणे

**१९९.** १ **अगोपं.** कोल्हापुरिचीया गोष्टी सांघीतलीया होतीया. (पूर्वार्ध लीळा ५४ पाहा.) २ **यमु.** °राजौरीं : ३ **ही.** नातीचा. ४ **मु.** °ज्वरनिवृत्ति जालेया——.

म्हणीतलें : " ऐसें तुम्हांसि हो : " " जी जी : होइल तरि हो कां : हें काइ ओखटें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं कोल्हापुरासि जा : पेणावेणां जावें : उपेणें न करावें : संबंधीयां[5] न भेटावें : पहिला पेणां[6] एकी भेटैल : दुसरां पेणां दोनि भेटती : तीसरां पेणां तीघी भेटती : ऐसें कोल्हापुर पावाल : तवं सातै भेटती : दांडी[7] पाटु साउमां एइल : देवतेचा परीएळु एइल : अतीत : अनागत : वर्तमान : त्रीकाळज्ञान होइल[8] : " " हो कां जी : " मग गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : मग नीगालीं[9] : तीयें नीवासेया आलीं : *एकातें पुसीलें*[10] *:* " हा कोणु गाउं ? " " ना नीवासें : " तेथ तेयांची एकि लेंकी होती : " जाओं : बापुडीयातें पडिताळुं[11] : आतां काइ भेटि होति असे ? पडीताळों आणि नीगों : राहों ना म्हणा[12] : " आलीं : भेटि जाली : आणि म्हणीतलें : " आतां मी जाइन[13] : " " हें काइ आइ ? आलीसि : आणि सवेंचि कैसी जासी ? " " ना मातें गोसावीं कोल्हापुरा पाठवीलें असे : मातें सर्वज्ञें म्हणीतलें : 'संबंधीया न[14] भेटावें : ' " " ना हो कां : जेवि : मां जाए : " " हो कां " म्हणौनि तयांलागि तांदुळ वेळुं रीगाली[15] : तें हातावरि[16] वेळण आलें : मग जाणें राहीलें : मग तयांचेया हाताची[17] सुस्रका तेहींचि केली : आपण रांधीति[18] : " आतां हातु पानपैल : मां जाइन : " तवं तीएं कोणीं नीगालीं : तयांचें बाळांतपण केलें : ऐसे सा मास लागले : मग तीयें एउनि गोसावीयांपुढां सांघीतलें[19] : *सर्वज्ञें म्हणीतलें : " कें द्वापरीचें आयुष्य ? कें त्रीकाळज्ञान ? आणि कें बाळांतपण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हां नीदेवां ऐसें कां होइल*[20] *? "* ।।

## २०० साधां मागावेया अनोज्ञा

एकु दीं[1] गोसावी साधांवरि प्रसंन जाले : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : एथ कांहीं पुसा[2] : " " जी जी : कांहीं पुसों नेणें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वेडीं नव्हा : पींसीं नव्हा : "

---

५ **यमु.** संबंधीयांचेया गावां न वचावें—. ६ **य.** °एकि भोपेयासि स्वप्नीं जाइल : दुसरीए पेणां . . . ७ **यमु.** देवतेचे भोपे साउमे एती : देवतेचा परीएळु एइल : दांडीपाटु एइल : गात वात तुमतें नेती : तेथची जखीण भराडी त्रीकाळ ज्ञान उपदेसील : अतीत : अनागत . . . . ८ **यमु.** °ऐसे कराल तरि ऐसेंचि होइल : ना तरि लेकीचीं सा मास घरटीं वांटाल." ९ **हीबी.** °तवं मार्गीं एकि बाइको भेटली : तीया म्हणीतलें : " तुं कें जातीसि ? " " ना मीं कोल्हापुरासि जातें : " " हो कां : चाल : तरि मी सांघातें येइन : " ऐसीया निध्विवासेयातें आलीया : १० (**यमु.**). ११ **गोहीबी.** सांभाळुं. १२ **हीबी.** °सांघातिनीतें म्हणीतलें : " तुं एथ राहे मी गावांतुनि एइन : " १३ **गो.** एइन. १४ **गो.** नेभटावें. **य.** नेभेटावें. १५ **गोनेही.** बैसली. १६ **यमु.** पाया°. १७ **यमु.** पायाची. १८ **गो.** °हात पानपलें तवं ते कोणीं—. **य.** °पाए पानपलें तवं ते—. १९ **पं.** सर्वज्ञें म्हणीतलें : " ते तैसें कां तुम्हांसि होइल : लखाचे कपडेयासि कां एइल ? नी उंचाचें चीमुटीएति कां एइल ? " २० (**हीबी.**).

**२००.** १ **य.** °एकु दी आसनीं उपविष्ट असति : साधें पासि बैसलीं असति : मुंगीयाचि हारि जात असे : गोसावीं मुंगीयाची हारि अवळोकीली : मग साधावरि प्रसंन—. २ **अ.** मागा.

"*नेणा कैसी*[३] ?" "ना जी : नेणें :" "तरि कांहीं मागा :" "जी जी : कांहीं मागों नेणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कांहीं मागा :" "हो कां जी : तरि गोसावीं पुनसंबंधु[४] देयावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : नेणौनि जरि ऐसें मागीतलें : जरि जाणतींति तरि काइ मागतींति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देइजैल[५] हो : साधें हो :" "हो कां जी :" मग स्त्रीचरणां लागलीं : ।।

## २०१ अन्यवार्तानिषेध निरूपण*

[डोमेग्रामीं अवस्थान : भटादिक अन्यवार्ता करीत होते : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "अन्यवार्ता न कीजे : अन्यवार्तेपसि निद्रा चांग : वरि निद्रा कीजे : परि अन्यवार्ता न कीजे :" ऐसें निरूपण केलें : "हो कां जी :" म्हणौनि अवघे श्रीचरणां लागले : ।।

मग एकु दीं पाठक आणि भट तर्कट धर्मवार्ता करीत होते : मां प्रतिज्ञा सारूं लागले : एकमेकां नोकीती : जें 'तुज काइ येत असे ?' तवं गोसावीं तेथ बीजें केलें : मग तेहीं दोघीं पुर्ववृतांत सांघितला : सर्वज्ञें म्हणीतलें : "आगा वानरेया : पाठेया : सुख : श्रेय : शृंगारू : इयें तीनि नाहीं ते काइ गा गोष्टी ? तें अरण्यरुदन कीं :" ।। ]

## २०२ अध्रीत शास्त्र निरूपण*

[डोमेग्रामीं अवस्थान : उंचमढीं भटां निरूपण करितां भटीं म्हणीतलें : "जी जी : मज हें धरवे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें अध्रीत शास्त्र कीं गा : हें होउनि कव्हणाचें घर न रीगे : आपणचि याचें घर रिगीजे : एयां आपणपें दीजे तरि हें आपणपें दे : घेइजे : घोकीजे : मग काळेंकरौनि उपयोगा जाये : आतांचें तवं ऐसें घेपे : पाठीं अनुभवें जाणाल : हें वचन : हा वचनार्थु : वचन जाओं नेदीजे :" ऐसें निरूपण केलें : भटीं म्हणीतलें : "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले : ।। ]

## २०३ ज्ञानभक्तिवैराग्य निरूपण*

[[१]डोमेग्रामीं अवस्थान : भटीं पुसिलें : "जी जी : ज्ञान : भक्ति : वैराग्य : एकें मोचकें : एकें अमोचकें : तरि मोचक तें एथीचें : आणि अमोचक तें अन्य महात्मेयाचें : तें एथिचीया साजात्य कवणें धर्में असे पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विकल्पत्रुटी अन्य महात्मेयासि साजात्य :" "हो कां जी :" ।। ]

---

३ **(हीबो.) ने.** कांहीं ऐसें जाणा ना ?" **गो.** कांहीं ऐसें नेणा ? ४ **य.** पुनर्दर्सन होआवें जी : ५ **य.** होइल.

**२०१.** *(**प्रव. आ.** १५१–१५२).

**२०२.** *(**प्रव. आ.** १४२–१४७).

**२०३.** *(**प्रव. आमा.** २५०).

१ महेश्वर पंडित°.

## २०४ वाराणसी मुक्तिक्षेत्र निषेध*

[ डोमेग्रामीं अवस्थान : महदाइसीं पुसिलें : "जी जी : दादोस ऐसें म्हणति : जें 'पुराणीं ऐसें बोलिलें असे : नवखंड जंबुदीप : तयामाजि भरथ खंड : दाहावें खंड वारानसी : काळभैरवाचेया त्रीशुळावरि उभिलें असे : माहादेवासि ब्रह्मकपाट लागलें : तेव्हेळीं अवघीं तीर्थे हींडीनला : परि कव्हणीए ठाइं न फीटेचि : मग वारानसीसि फीटलें : ऐसें मुक्तीक्षेत्र तें : मनुष्यां दुर्लभु : हें काइ म्हणावें असे ? परि देवां दुर्लभु : पंचक्रोशामध्यें पडिलेयां कृमीकीटकां गति : ऐसी वारानसी मोचक : तेथ जावें :' ऐसें दादोस निरूपिताति : तरि तें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : वाराणसी म्हणिजे स्वर्गखंड : तेथ विधिनिषेध आति : परि पुण्य पाप नाहीं : ऐसें तयाचेनि सिधांतें येताए :" महदाइसीं पुसिलें : "जी जी : तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : पंचक्रोशामाजि पडिलेयां कृमीकीटकां गति : तरि तेथ विधिनिषेध किमर्थ ? कां पां ? निषेध पाप नाहीं : विधी पुण्य नाहीं : तरि मुचिजे ना : म्हणौनि हें न घडे वाइ :" "हो कां जी :" ।। ]

## २०५ म्हांइंभटां संहार निरूपण*

[ डोमेग्रामीं अवस्थान : एक वेळ म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : सृष्टीसंव्हार कव्हणे परी होए ?" मग गोसावीं संहार प्रकरण निरूपिलें : मग म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : सृष्टिसंहारीं जैसा मायेसि अधिकार तैसा एरा देवतांसि आति कीं नाहीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : उचेचीया प्रवृत्ती नीचेचा संहार :" "जी जी : तरि माहासंव्हारावेगळे कीती संव्हार असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अवांतरु संहारु एकु आति : तोही संहाराचि सारिखा : तेयाचांही ठाइं तम एक आति :" "जी जी : तो किंपर्यंत संव्हारू होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भूतेंपर्यंत संव्हारू यातें आवांतर संव्हारू बोलिजे :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : भूतें कवणाचीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अष्टभैरवांचां ठाइं पांचै भूतें : तीन्हीं गुण :" "हो कां जी :" ।। ]

## २०६ भटां नाथोबां शास्त्रविषयत्व*

[ एक वेळ डोबेग्रामीं उंचमढीं भट : नाथोबा कांहीं शास्त्र बोलत होते : तेथ गोसावीं बीजें केलें : परि गोसावीयांचेया श्रीचरणां लागावें ऐसेंहीं न स्फुरे : मग एर काहीं स्फुरैल ? मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें तुम्हां विषयत्वेंचि लागौनि ठाकलें मां :" ।। ]

---

**२०४.** *(**प्रव. विमा.** १३३).

**२०५.** *(**प्रव. विमा.** ७६–७८).

**२०६.** *(**प्रव. वि.** २३६).

## २०७ साभिमानियांचे साभिमानु निरूपण*

[ डोंबेग्रामीं[१] अवस्थान : एक वेळ महदाइसीं पुसिलें : " जी जी : जीव : देवता : परमेश्वर कवणें गुणें विलक्षण ओळखावा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : जीव देवता सापेक्षा : परमेश्वरु निरापेक्ष : जीव देवता साभिमानिया : परमेश्वरु निराभिमान : " यावरि साधीं म्हणीतलें : " जी जी : परमेश्वरु निराभिमानू तरि संसारशत्रुभेण कवणां साभिमानीयांचेयां होआवें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : आणिका साभिमानीयांचेयां होआवें : मां एका निरभिमानीयांचेयां होइजो कां : हें तरि निरभिमानू : परि आपुलेयालागुनि साभिमानियांचे साभिमानू : " ।। ]

## २०८ बोडी गंगा समान अनुवादु*

[ गोसावीयांसि डोमेग्रामीं अवस्थान : एमळार्जुनातळीं आसन असे : तवं गोसावीयांपासी कव्हणी एक भक्तिजनें वाद करीत होते : एक म्हणति : " भागीरथी उत्तम : " एक म्हणति : " गौतमी उत्तम : " यावरि भटीं म्हणीतलें : " अगा : गौतमी उत्तम : गौतमीचें तें ब्रह्मोदक : आन भागीरथीचें तें क्षेत्रोदक : " आणि इतुकेनि ते उगेचि राहीले : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं महात्मे कीं गा : तुम्हां बोडी गंगा समानचि होआवी कीं गा : " ।। ]

## २०९ भटां दुसरेनि अन्यव्यावृत्ति निरूपण*

[ डोमेग्रामीं अवस्थान : गोसावीं भटोवासातें दुसरेनि अन्यव्यावृत्ति निरोपिली : सर्वज्ञें म्हणीतलें : " चैतन्य देवता होए : परि परमेश्वरू नव्हे : चैतन्यविद्या आदिकरौनि सकळाही विद्या अपरा अमोचका बोलिजेति : चैतन्यापर परमेश्वरू पाविजे : तें अच्युत पद बोलिजे : ज्ञान : भक्ति : वैराग्य : एकें मोचकें : एकें अमोचकें : चैतन्यादि देवतांचीं अमोचकें : चैतन्यफळ आदिकरूनि सकळही फळें च्युतिमंतें : चैतन्यापर परमेश्वरु पाविजे तें अच्युत पद बोलिजे : " ।। ]

## २१० तथा पाहालें म्हणणें*

[ गोसावी डोंबेग्रामीं निरूपण करीत असति : एकु दीसीं नीरूपण केलें : तवं पाहालें : भट वाहीरि आले : तवं पाहालें : मग भटोवासीं म्हणीतलें : " जी जी : पाहालें जी : "

---

**२०७.** * (**प्रव. आमा.** ३७).

१ **प्रव.** मुनिबा : अज्ञात : एकी वासना°.

**२०८.** * (**प्रव. आ.** ११५).

**२०९.** * (**प्रव. विमा.** ८१).

**२१०.** *प्रस्तुत लीळा **हीबीमु.** प्रतीत आहे. येथे ती **ना.** प्रतीतील अज्ञात लीळेतून (लीळा १०) घेतली आहे.

सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तुम्हां पाहालेंचि बहुत : पुरुषांचिये भेटी युगें जाति : " भटीं पुसिलें : " ते कैसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु रावो पुरुषाचिये भेटी नीगाला : आपुला पाइकुपरिवारू पैऱ्हां राहाविला : आपण पुढारां गेला : तवं पुरुषाची काष्टी[१] लागली असे : 'काष्टी[१] विसर्जैल मग मीं[२] नमस्कारू करीन :' मग काष्टी[१] विसर्जली : मग[३] नमस्कारू केला : अनोज्ञा पुसिली : नीगों बैसला : तेहीं म्हणीतलें : 'कें जातु असा ?' 'ना माझा पाइकु परिवारु पैऱ्हां उभा असे :' तेहीं म्हणीतलें : 'तें हें युगचि नव्हे[४] :' " ।। ]

## २११ देइगांवीं पातळी प्रतीष्ठा : आरोगण

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं देइगांवांसि वीहरणा बीजें केलें[१] : तीए देउळीएसि गोसावीयांसि[२] आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " जै या देउळासि उद्यापन केलें[३] तैं हें एथ पातळी घालुनि जेविलें : " ऐसें गोसावीं आउसांपुढां सांघीतलें[४] : मग आउसीं गुरवासि पुसिलें : " है रे : या देउळासि केतीसें वरीखां जालीं ? " " आइ[५] : जालीं सें तीनि : " मग गोसावीं तेथौनि बीजें केलें[६] : आउसें म्हणों लागलीं : " पांचां[७] सतां[७] वरीखांचा पुरुषु रे[८] : " ऐसें म्हणत तो कोणटावरि आली : मग गोसावी तेथ उभे राहीले : सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें न म्हणीजे कीं नाएका : लोकु डांकुली वाए : तरि आपणेयांसि अवीधि होए : " मग तीएं उगींचि राहीली : ।।

## २१२ सरालां गणपति आपैयोप्रति कुष्टधर्म निरुपणें

गोसावीं सरालेयासि बीजें केलें : नरसीहांचां[१] देउळीं[२] पटिसाळेवरि पंचरात्रि अवस्थान जालें : मग एकु दीं गणपति आपैयें[३] गोसावीयांसि उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग तयांचां आवारीं गोसावीयांसि मर्दना जाली : मादनें[४] जालें : पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला :

---

१ **हीबी.** टाळी. **एवा.** समाधी. २ हीबी. °वीडा ॐळगवीन : म्हणौनि विडा घेउनि उभा राहीला : तवं दर्शनेंचि देहविद्या जाली. ३ **हीबी.** °वीडा ॐळगवीला. ४ **हीबी.** °मां कोठे जासील ? बैस : " तवं बाइसीं म्हणीतलें : " तरि ते आमचेचि बाबा होतील : " गोसावीं मानिलें : उगेचि होते ।। एक म्हणति : हे लीळा निधिवासां : पुरादित्यीं : ।।

२११. १ **यमु.** °सरिसी आउसें मुख्यकरूनि भक्तजनें आवघींचि असति. २ **यमुहीबी.** °चौकीं. ३ **गोनेयमुहीबी.** जालें. ४ **हीबी.** °गोसावीयांचें प्रत्यासि न येचि : मग गुरुवातें पुसों गेली : ५ **हीबी.** °आमचे वडील म्हणति पांचसे वरीसें जालीं. ६ **यमु.** वेसीदारीं माणुसें होती : आउसें तयापासि सांगों गेलीं. ७ **यमु.** सातास्यां. ८ **यमुही.** °तीनिसें गुरवें सांघीतलें : दोनि आउसीं आपुलीं घातली : **एवा.** पांचसें गुरवें सांघीतलीं : दोनि आउसीं घातली : सातास्यांचा).

२१२. १ **एवा.** °लेपाचां. **एवा.** °महालक्ष्मीएचां. २ **गो.** मढीं. ३ **गो.** आपयोएं. **ने.** °योनि. ४ **गो.** माजणें.

मग तेहीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : माझें कुष्ट गोसावीं धाडावें[५] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ अनुसरा : मां धाडिजैल[६] : " " जी जी : गोसावी ऐसेंचि धाडीती तरि काइ न वचे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें एथची खावणि कीं गा[७] : " " जी जी : मीं अमरी[८] अनि राख सेवीं : तेणें कांहीं होइल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " प्रतिबंधैल : परि अधीक नव्हे : " ।।

## २१३ माळेकार दृष्टांत निरूपणें*

[ गोसावीं निरूपणावसरीं दायंबातें म्हणीतलें : " भोजेया : आद्यंती दैव : मध्यें पुरुषु : केतुले एक दीस दैव वाट पाहे : मग उदासीन होए : " यावरि गोसावीं माळेकाराचा दृष्टांतु निरूपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु माळेकारु माळेया-वरि उभा असे : कव्हणी एकु वाटा जातु असे : तेयातें तो म्हणे : 'आगा : या वाटा जासी तरि नगरां पुरां पाटणां वरिपडा होसि : ना या वाटा जासी तरि चोरीं नागवीजसि : कां वाघें खाइजसि : ' या वाटा जाये तरि नगरां पुरां पाटणां वरिपडा होए : ना या वाटा जाये तरि चोरीं नागविजे : कां वाघे खाइजे : तैसे परमेश्वरू विधिअविधीचें ज्ञान करीति : जरि जीवु विधी आचरे तरि विधी इष्टा वरिपडा होए : ना अवीधि आचरे तरि अवीधि अनिष्टा वरिपडा होए " ।। ]

## २१४ टाकळीए डो वीसरणें

मग गोसावीं तेथौनि टाकळीएसि बीजें केलें : रानमळां गोसावीयांसि दुपाहारीचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें[१] : डो नीबोणीचां फांटां राहिला : मग मार्गीं आठवला : वाइसीं म्हणीतलें : " बाबा : डो वीसरलीयें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जा गा : तो तेथचि असे : " भट आले : तवं तेथचि होता : मग घेउनि आले : ।।

---

५ **यमु.** फेडावें. **गो.** दवडावें. ६ **यमु.** फेडिजैल. ७ **यमु.** °मग तयाचीया ब्राह्मणीं पुसिलें : " हा जी अधीक होइल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : अधीक होआवेया काइ कारण ? सतसंभवीं उणेंचि होइल : अंबरी आणि रानसेणीची राख लावा : " ८ **मु.** अंबरी.

**२१३.** *(**दृपा.** ५० 'हा दृष्टांत गोसावीं दाइंबाप्रति सराळा नीरोपीला : ' –**दृस्थ.** ५०. म्हणून, काही पोथ्यांत आढळणारे त्यावरील पाठवचन व दार्ष्टांतिक यांसहित या ठिकाणी स्वतंत्र लीळा देऊन तो घातला आहे.)

**२१४.** १ **यमु.** °तवं गोसावीयांचा तुपाचा डो तो नींबोणीचां फाटां घातला होता : तो तेथचि भटोबास वीसरले : मार्गीं आठवला : भटोबास गजवजों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा विसरलेति ? " तीहीं म्हणितलें : " जी जी : डो विसरलां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जाए : नींबोणीचा फाटां असे : " भटोबास गेले तवं—.

## २१५ नीवासांहुनि एतां रात्रीं घोगरगांवीं स्वानध्वनी करवणें

*मग गोसावीं नीवासेया बीजें केलें*[१] : मग गोसावी *रात्रीं*[२] नीवासेयांहुनि *घोगरगांवा*[२] बीजें केलें : गोसावी गांवींचीया आखरापासी[३] उभे राहीले : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा : माहात्मे आले ऐसें जाणवीजे ना[४] ?" "जी जी : कैसें जाणउं[५] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कोल्हेभुंकि करा :" "जी जी आम्हीं कोल्हेभुंकि नेणों : सुनेभुंकि जाणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि सुनेभुंकि करा :" इतुलेनि[६] ते आवघे भुंकुं लागले : तें माहारवडांचीं सुनीं : गांवांआंतुलीं सुनीं भुंकों लागलीं : इतुलेनि गांवां-आंतु[७] खळबळिलें : पाइक आले : अवघा गाउं बळकाविला : मग गोसावीं गांउं उजिवा घालुनि अग्निष्टिके बीजें केलें : तेथ गोसावीयांसि पूजाअवस्वरु जाला : मग पस्यात पाहारीं गोसावीं प्रस्रेया बीजें केलें : प्रस्रयो सारुनि गोसावीयांसि सोंडियेवरि आसन जालें[८] : गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : मग भीतरि पुजाअवस्वरु जाला : मग भक्त-जनांतें रीगतां नीगतां : गावींचां माहाजनीं देखिलें : मग आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : "जी जी : गोसावीं एथ केधवां बीजें केलें ? :" सर्वज्ञें म्हणीतलें : "रात्रीं :" "जी जी : रात्रीं येथ पाइक आले होते जी : गोसावीं एथ बीजें केलें म्हणौनि आमचा गांउं वांचला जी :" मग गोसावीं भक्तजनांची वास पाहुनि *इखीत*[९] हास्य केलें[१०] : ।।

## २१६ असक्तां सुश्रूका विधी निरोपणें[१]

उंचमढीं माहात्मे एक असक्त होते : एकु दीं उदयाचा पुजावसर जालेयांनंतरें गोसावीं वीहरणा बीजें केलें : नावेक आसन जालें : आणि गोसावीं लवकरीचि बीढारा बीजें केलें : उंचमढांतु पडीताळावेया गेले : तवं तेहीं म्हणीतलें : "जी जी : मीं ताहानां मरतु असे :" म्हणौनि आंजूळी वोडवीली : गोसावीं भटाची वास पाहीली : भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी आम्हांपुढां कांहीं सांघतीचि ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुमतें एथौनि म्हणावें : मां तुम्हीं करावें : कीं हें तुम्हांसीचि स्फुरावें ?" मग गोसावीं तेयां पाणीं पेओं सुदलें : ।।

---

**२१५.** १ (**गोनेहीबीपंयमु.**). २ (**गोनेहीबी.**). ३ **यमु.** बाह्य प्रदेशीं. ४ **यमुही.** °भटीं म्हणीतलें :–. ५ **अ.** जाणौं. ६ **यमु.** °भटोबास मुख्यकरुनि. ७ **यमु.** °चेइरें जालें : गजबजों (**य.** खळबळुं) लागलें : ८ **यमु.** °दंतधावन करीताति तवं गावीचे माहाजन आले : गोसावीयांसि—. ९ (**यमुगोनेहीबीपं.**). १० **एवा.** एक म्हणति : गोसावीं एथौनि टाकळीए बीजें केलें : मग गोसावीं घुमनदेवासि बीजें केलें : तेथौनि मग डों आणावेया पाठवीलें :

**२१६.** १ मागे उत्तरार्ध लीळा १९२ वरील टीप पाहा.

*भटीं पुसिलें : "जी जी : महात्मेयाचा औषधेंवीन रोगु न वचे तरि ओखद घेओं ए : ऐसें काहीं आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु हिरडा बेहाडा दे तरि ना न म्हणीजे[२] :"* ॥

## २१७ बाइसांचे लखुबाइसीं पाए धुणें

एकु दीं बाइसें दुपाहारीं नीजैलीं होतीं : लखुबाइसें आलीं : बाइसांचे पाए[१] वजरी लाउनि धुतले : वाडुवेळु : माखिले[२] : मग बाइसें उठीलीं : "बाबा : लखुबाइयां पाए कैसे बरवे धुतले : माखिले :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : *तें केलें काइ तेथ ? तें केलें एथ*[३] : तुमचे पाए धुतलेया तयां केसणें गोमटें जालें :" ॥

## २१८ पोगीफळ द्रीस्टांतु कथन

एकु दीं गोसावीयांसि भीतरीला ओटेयावरि आसन असे : आउसें झाडितें होतीं : तवं पोफळ पडलें होतें : तें घेतलें[१] : "जी जी : स्वामीं जगंनाथा : एथ पोफळ पडिलें होतें :" म्हणौनि आसनावरि[२] ठेविलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका[३] : समर्थांतें दासी बटकी असति : मग तीयें आसु दाम घालुनि पाहाति : हें भिक्षु माहात्में : तरि हें कवडा पोफळ घालुनि पाहें :" ॥

## २१९ पन्हीवां भीक्षांनत्यागीं मंडळीका सीक्षापण

एकु दीसीं नाथोबा जेवीले : मग खरकोटीया पन्हीवां झाडीलीया[१] : गोसावीयांसि उदयांचा पूजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं लघुपरीहारा[२] तया पन्हीवेयाकडे बीजें केलें : सरीसे नाथोबा असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळिका : हें भीक्षाअंन कोणें गा सांडीलें ?" "जी जी : मीयां एथ झोळी झाडीली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : ऐसें आनु आनु[३] सांडावें ते काइ तुमचे दाइ ? आपणेयां लागे तेंचि मागिजे कीं : *तुम्हीं माहात्मे कीं गा : महात्मेनि आपुलें सीत मुंगिए आदिकरौनि नेवों नेदावें*[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

२ (**प्रव. आ.** १९३).

**२१७.** १ **गोनेयमु.** °बरवे. २ **यमु.** चोपडीले. **ही.** °तळहातीतें होतीं. ३ (**हीबी.**).

**२१८.** १ **ही.** देखिलें. २ **यमु.** श्रीकरीं दीधलें. ३ **यमु.** °सदर्थांसि दासी बटिकीची परीक्षा (**य.** परियावो) पाहावेया कवडे पोफळे घालीति : तीयें देखति : आणौनि देती : विश्वासु होए: तयातें राहावीति : एरातें दवडीति : तैसें तुम्हां केलें नायका : ॥

**२१९.** १ **मु.** सांडीलीया. **ने.** दाटिलिया. २ **यमुहीने.** लघुपरीश्रया. ३ **नेमु.** आनुं आनुं. **गोय.** अनुअनु. ४ (**प्रव. आमा.** २११).

*"हां गा : हें भीक्षान्न कीं : हें पवित्राचें पवित्र कीं*[५] : वेंचा एं सीतें :" मग वेंचुनि भीतरि घेतलीं : ।।

## २२० भिक्षान्नीं अमृत निरूपण*

[ तैसेंचि गोसावीं महाद्वारा बीजें केलें : तेथ भटीं पुसिलें : "जी जी : गोसावी भिक्षान्न वायां जावों नेदीति : तरि भिक्षान्नीं ऐसें काइ असे जें वायांचि जावों नेदावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : भिक्षान्नीं सवावो पळ अमृत आति :" भटीं म्हणीतलें : "जी जी : कव्हणी अमरां न देखों : नाइकों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जेणें कर्मफळ चुके तें अमृत : एर तें अमृत नव्हे कीं :" "जी जी : तें काइसेनि चुके ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हिंसा : अन्यधर्म : विखो न सेवीति जो भिक्षान्न सेवी तोचि अमृत होए : हिंसा न कीजे तेणें नर्क चुकती : अन्यधर्म न कीजे तेणें स्वर्ग चुकती : विखो न सेवी तेणें कर्मभूमी चुके : भिक्षान्न जेवी तेणें मोक्ष चुके : आणि नीत्यविधी : नीमित्यविधी योग्यता होए :" "हो कां जी : तरि पळ म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पळ म्हणिजे पाद : चौथेया विभागातें म्हणीतलें :" "हो कां जी :" ।। ]

## २२१ डोंबेग्रामुनि नीधिवासां : चाचळमुदीं आसन[१]

एकु दीं गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें आरोगण जाली : गुळुळा जाला : फोडी उव्ळगवीलीया : मग गोसावीं आंगणां बीजें केलें : पीठ ऐसें चांदिणें पडत असे : गोसावी वेढे करीत असति[२] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "चांदिणें निकें ना गा ?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसिये चांदिणां ग्रामांतर कीजे तरि काइ ?" "जी जी : कीजे तरि कीजे आणि काइ :" "तरि बाइसांकरवि[३] आइत करवा :" मग बाइसांकरवि आइत करवीली : मग बाइसीं कणीकीचें पोतें : तांदुळांचें पोतें : एकवट वाठुजगां[४] घातलें : एक पोतें : गोसावीयां चोरीयां आवघेयां भक्तजनांहातीं एकएक दीधलें : मग गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि चांचलमुदीं[५] तीये चौकीं आसन जालें : बाइसीं चरणक्षाळण केलें : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

---

५ (**प्रव. आमा.** ६३).

**२२०.** *(**प्रव. आमा.** २१२).

**२२१.** १ **यमु.** प्रतीत "मार्गीं चाचरमुदीं चौकीं आसन जालें : बाइसीं चरणक्षाळण केलें : गुळुळा. वीडा : ।।" एवढेच आहे. त्यानंतर त्याच लीळेत, यापुढची 'भटा अभयदान' ही लीळा अंतर्भूत केलेली आहे. प्रस्तुत **अ.** प्रतीतील हीच लीळा याच प्रतीत पूर्वी १६२ वी लीळा म्हणून आलेली आहे. **गोनेही.** प्रतीतही ती अशीच पुनरुक्त आहे. २ **अगोने.** °एक म्हणति पूजाअवस्वरू जालेयानंतरें आंगणा बीजें केलें : मग वेढे करिताति. ३ **हीबी.** °करवा मात्रा. ४ **गोने.** वळवटः ५ **गोनेहीबी.** चांचरमुदीं.

## २२२ तथा वीज्ञापनीं भटा अभयेदान

मग भटीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : नीवासेया जायें : कीं एतां जातां हा ठाओ पावें : आणि भीयें[1] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं कां गा भीया : यें तुम्हां आपणपेयां न दखवीत कीं : जरि हांन भीयाल[2] मग कें रीगिजैल ? " मग गोसावीं तेंथौनि बीजें केलें : मग नावेक गोसावीयांसि चौबारां आसन जालें : गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

## २२३ कुसमेस्वरींहुनि मंडळीकु पुढां पाठवणें

मग गोसावीयांसि कुसमेस्वरीं आसन जालें : चरणक्षाळण बाइसीं केलें : गोसावीयांसि विडा जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : तुम्हीं बडुवेयांचेया[1] घरा जा : कुंचीटाळें मागा : मढु उघडा : मढु चोखटु करा : " " हो कां जी : " मग[2] *नाथोबा बडुवेयाचेया घरा गेले*[3] : नाथोबायें कुंचीटाळें मागीतलें : मढु उघडिला : घागरि मागीतली : मढु आंतुबाहीरि धुतला : कापडें अवघा मढु दाटिला[4] : मग सांघावेया आले : मग गोसावीं बीजें केलें : पुर्वामुखें मढीं : पुरादित्याचां[5] : गोसावीयांसि अवस्थान जालें : दखीणीले भींतीसीं पुर्वपसीम ओटा[6] : मां नावेक पांकुळियांची घाणि होती : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " तुपाभाताचा धुपु दावा : " मां तुपाभाताचा धुपु दाविला : मग[7] घाणि गेली : ।।

## २२४ निवासां पुरादितीं अवस्थान ।। रात्रीं सपरीवारीं आरोगण

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[1] : असे तें वेचा : न पुरे तें बडुवेयांतें मागा : अवघेयांसहीत[2] उपाहारु[3] करा : " " हो कां बाबा : " मग बाइसीं बडुवेयांचां घरीं रंधन केलें : गुळमीरीयांचीया[4] पोळीया : तांदुळ वेळिले : चौवणी[5] एकवाट वेळिलीं : काइ साकवती केली तें नेणिजे : मग अवघा उपहारु मढासि आणिला : मग भट हाटासि गेले : पुजाद्रव्यें आणिलीं[6] : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग तुप बाइसीं

---

२२२. १ **गोने.** बीहें. **ही.** बीहों. **यमु.** °रात्रीं कां दुपाहारीं. २ **हीबी.** °तरि मग एहीं कें—

२२३. १ **अ.** °यांच्या. **यमु.** °यांचां. २ **नेही.** °नाथोबा पुढां गेले. ३ (**यमु.**). ४ **एवा.** झाडिला. ५ **अ.** °दैत्याचां. ६ **हीबी.** °ओटयावरि गोसावीयांसि आसन : तवं चाचड खावों रीगाले : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : चाचड खाताति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुपाभाताचा—. ७ **हीबी.** °ते गेली :

२२४. १ **यमु.** °तुमतें सामग्री असे तेतुकी वेचा. २ **एवा.** °समवीत. **एवा.** °पुरतें. ३ **एवा.** रंधन. ४ **अ.** °यांच्या. ५ **यमु.** चौवणीची क्षीरी केली (**रामे.** वेळिली). °**हीबी.** गुळवणीयें वळवट वेळीलें : काइसयाचें कालण केलें तें नेणीजे. ६ **अगोने.** °एक म्हणति बाइसातें उरलीं होती.

बडुवेयांतें मागीतलें : मग गोसावीयांसि सपरीवारीं आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं आंगणां बीजें केलें : तवं वीवळलें[7] : मग तैसेंचि गोसावीं प्रस्नेया बीजें केलें : प्रस्नयो सारुनि गोसावीं पटिसाळे बीजें केलें : पटिसाळेवरि आसन जालें : मग बाइसीं पुजाअवस्वरिची आइति करुं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ धुपार्तीचि करा :" "हो कां बाबा :" मग बाइसीं धुपार्ती : मंगळार्तीचि केली : ।।

मग भक्तजनांतें रीगतां नीगतां गांविचां माहाजनीं देखिलें : वामन मतिवीळास : अवघे भक्तजन आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : "जी जी : गोसावीं एथ केधवां बीजें केलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें एथ रात्रीं आलें :" तवं वामन मतिवीळासीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं रात्रीचीयाही पुजाअवस्वरा चुकलों : आणि आतांचीयाही चुकलों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पुनरपि एथ धुपार्ति करा :" मग मागुति बाइसीं धुपार्ति : मंगळार्ति केली : तेहीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : ।।

## २२५ गोळकहोडें भटां पराजयो करणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा[1] पुजाअवस्वरु जाला : गोसावी[2] आसनीं उपवीष्ट असति : गोसावीयांसि कोणें नेणों नारेळाचा गोळा दरीसनां केला होता : तो गोसावीयांचां स्रीकरीं असे : भट क्षौर[3] करुनि आले : गोसावीयांजवळि बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें[4] : "वानरेया : हा गोळा तुम्हीं डोइए एकें घायें हाणौनि फोडाल गा ?" "पाहों[5] जी :" म्हणौनि घेतला : आणि म्हणीतलें : "फोडीं तरि काइ ?" "तरि तुम्हींचि घेया :" "जी जी : न फुटे तरि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि आवघेयां सरीसा भागु :" "हो कां जी :" भटीं तो डोइए हाणीतला : फुटला : परि वेगळा नव्हेचि : मग डोइएसि रगडों बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां पोरा : न फुटेचि : मां[6] कां लकरीतासि :" म्हणौनि स्रीकरें हातीं धरिलें : मग गोळा स्रीकरीं घेतला : "बाइ : वीभागु करा :" मग बाइसें वीभाग करुं लागलीं : ते रुठों लागले : "जी जी : माझी

---

७ **यमु.** पाहाट जाली : **य.** पाहाट जाली : भटोबासीं म्हणीतलें : "जी जी : पाहालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुम्हां एथौनि पाहालें बहुत : मां पुरूखाचीया जवळीका युगें गेलीं :" पुरुषाची गोष्टि सांघीतली : °**हीबी.** °पाहालें : हे लीळा एथ. (मागे उत्तरार्ध लीळा २१० पाहा.)

**२२५.** १ **यमु.** दुपाहाराचा. २ **ही.** मग माहाजन गेलेयांउपरि गोसावी आसनीं उपविष्ट असति : तेहीं नारीयेळाचा गोळा—. ३ **यमुने.** क्षेउर. **गो.** खेउर. **एवा.** भिक्षा. ४ **अगोयमु.** (**मीयांबा.** "वानरेया : हा गोळा तुम्हीं डोइए हाणौनि फोडा तरि तुम्हीचि घेया :" "जी जी : न फुटे तरि काइ ?") ५ **अ.** हो कां. ६ **यमु.** °कालकेलें होतें : होड हारवीली : **हीबी.** °आतां कां तळतळितसि : **एवा.** °कां रगडीतासि.

डोइ दुखवली : मजही आवघेयां सरीसा भागु ? " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यासि दुसरा भागु ओपा : " मग भटां दुसरा भागु दीधला : ।।

## २२६ पुरादित्यामागां हातगुंडां भटां पराजयो करणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें : गोसावीं पुरादित्या-मागां[1] बीजें केलें : तेथ उभे जाले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एणेंसीं[2] पैलाडि होडा गुंडा घालाल गा ?" " जी जी : घालीं तरि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि हें तुम्हांसि आनंदु देइल : " " न घलवे तरि काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि तुम्हीं[3] एथचें सेवादास्य करावें : " बाइसें गोसावीयांसि वेंचवेंचु गुंडे देति : भक्तजन भटां वेंचवेंचु गुंडे देति : मग गोसावीं अवलीळा *गुंडा*[4] घातला : तो पैलाडि पडला : भटीं घातला : तो पाणियांतु पडला : ऐसा भटांचा गुंडा वांवां दों आरुता पडे : वांवां एका आरुता पडे : हातां दों आरुता पडे : परि गोसावीयांचेया[5] सरिसा न पडे : मग बाइसीं म्हणीतलें : " आतां पुरों दीजो : बाबा : स्त्रीकरु दुखवैल : " मग गोसावी न घलितीचि : ।।

## २२७ उर्णपटानएनीं मार्कंडा चोरी प्रकटीए करणें

प्रसनाएक[1] द्वारावतीए निगाले[2] : सर्वज्ञें म्हणीतलें : " प्रसेया : मार्कंडातेंहीं द्वारा-वतीए नेया गा : " " जी जी : वाटे भीक्षा नाहीं : ब्राम्हणाचें गांव नाहीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " याचाही भगवा करा : " " *हो कां जी : " मग तेयाचे*[3] *संन्यासी केलें*[4] : मग बाइसीं म्हणीतलें : " भास्करा : या दोनि आसु घेया : मग दों आसुंची बाबा-लागौनि सोरटी जाडि घेउनि ये : " " हो कां : " मग बाइसीं दोनि[5] आसु दीधलीया : आठु दाम तेयां वेचावेया दीधले : मग दोघै द्वारावतीए गेले[6] : मग मार्कंड मासां दों मागुते आले : गोसावीयांसीं दरीसन जालें : मग बाइसांपुढां सांघों लागले : " काइ बाइ अमुकीए ठाइ चोर उठिले : तेंथ नागवीलों : मारीजत चुकलों : वांचलों : " बाइसीं म्हणीतलें : " जाओं दे : तुं वांचलासि तें निकें जालें : बाबाचेनि प्रसादें आमतें काइ उणे असे ? " मग बाइसीं तयांसि कांहीं पांगुरावेया दीधलें : मग मार्कंडीं तीया दोन्हि आसु : ते आठै दाम : पन्हैएपासि[7] पुरिलें : ।।

---

२२६. १ **अय.** पुरादैत्या°. २ **अगोहीबी.** एथौनि. ३ **एवा.** तुवां. ४ (**नेहीबी.**). ५ **अ.** गोसावीयां

२२७. १ **अगो.** मार्कंड आणि प्रसनाएक. २ **यमु.** °मार्तंड म्हणति : " परसनाएको : मी एइन. . सर्वज्ञें म्हणीतलें—. ३ **ने.** तेयातें. **ही.** भागीरथीचा. **यमु.** मार्तंडाचे. ४ (**गोनेयमु.**). **यमु.** °म बाइसीं गोसावीयांसि पुसिलें : " बाबा : सोरठीची जाडि आणवुं ? " गोसावीं मानिलें : सर्व म्हणीतलें : " मार्तंडा हातीं द्या : " मग बाइसी—. ५ **यमु.** एकि आसु : तीनि दाम वेचावेया— ६ **य.** मार्तंड द्वारावतीए सांडिले. ७ **यमुपं.** वल्हेपासि. **हीबी.** वल्हेबुढी. **गोने.** पव्हेपा

मग एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मार्कंडु एथ माउंदीं न करी ?" "बाबा : काइसेन करील ? वापुडें नागवलें : कांहीं आति ना : कांहीं मीळैल मग करील :" मग गोसावीं मार्कंडातें म्हणीतलें : "मार्कंडा : तुम्हीं एथ माउंदीयें न करा तें काइ ?" "जी जी : कांहीं नाहीं : माउंदीयें काइसेन करुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कांहीं बीटी खांड[८] नाहीं ?" "ना जी : नाहीं :" "*दाम च्यारि नाहीं ?*" "*ना जीं नाहीं*[९] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें असे तें *एथौनि*[९] घेइजो ?" "हो कां जी : घेइजो :" मग गोसावीं बीजें केलें : तीए पन्हैकडे[१०] : सरीसें भट होते : गोसावीं स्त्रीचरणिचेनि आंगुठेनिकरुनि[११] ऐसें उकरिलें : पीसवी नीघाली : गोसावीं पीसवी स्त्रीकरीं घेतली : मग गोसावी मढासि आलें : मग गोसावीं दोन्हीं आसु वाइसांकडे घातलीया : " या घेया तुमचीया आसु :" म्हणौनि गोसावीं बाइसांकडे पीसवी टाकिली : "हे तुमची पीसवी होए ?" मग बाइसें पीसवी सोडुनि पाहाति : तवं तीयाचि आसु : तेचि आठै दाम देखिले : "होति : बाबा :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसा असे तुमचा मार्कंडु : हा निका नव्हे : हा दवडा :" मग बाइसीं घागरा बांधला : ते उगेचि राहीले : ।।

## २२८ म्हांइंभटगमनीं प्रसंसा

म्हांइंभट राजकार्यासि[१] निवासेंयासि आले : भट वीळचांचेया पुजाअवस्वरालागि पुजाद्रव्यें आणावेया गेले : तवं हाटवटीये म्हांइंभट भेटलें : म्हांइंभटीं भटांसि नमस्कारु केला : आणि म्हणीतलें : "गोसावी कवणि ठाइं राज्य करितातिं ?" भटीं म्हणीतलें : "गोसावीं एथ बीजें केलें असे :" "कवणीं ठाइं असति ?" भटीं म्हणीतलें : "पुरादितीं[२] :" "हो कां : मीं कांहीं राजकार्या आलां असें[३] : मग मीं गोसावीयांचेया दरीसनां एइन :" मग भट पुजाद्रव्यें घेउनि आले : मग भट गोसावीयांपुढां न संगति : नावेंकु भटीं पुजेसि उसीरु केला : वाट पाहीली : परि न एतीचि : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळळा जाला : गोसावीयांसि फोडी ओळगविलीया : वीडीया करुनि देताति : गोसावी वेढे करिताति : मग सांगीतलें : "जी जी : गोसावियांचा म्हांइंया मघां मज हाटवटीएसि भेटला : परि गोसावीयांचेया दरीसनां नैएचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एइल तै तोचि एओं जाणैल कीं गा :" ।।

---

८ **यमु.** °अर्ध खांड (**शोध :** धारण). ९ (**गोनेहीबीयमु.**). १० **गोने.** पन्हे—. **यमु.** वल्हेटेयापासि. ११ **यमु.** °दाखवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ खणा :" (**ही.** उकरा) : मग भटीं उकरीलें : पीसवी नीगाली :—.

**२२८.** १ **य.** राज्य°. २ **अ.** °दैती. **य.** °दैत्यीं. **हीबी.** °दित्यीं. ३ **ने.** °तें सारिन. **हीबी.** आराउनि गोसावीयांचेया—.

## २२९ म्हाळसीभुवनीं बडुवीं पुजा

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं म्हाळसीचीया देउळासि वीहरणां बीजें केलें : रीगतां डावेया हाता खातें : तेथ[१] गोसावीयांसि आसन जालें : बडुवीं गोसावीयांसि एतां देखिलें : तांब्रकळस[२] भरुनि आणिले : मग आधीं ताटीं गोसावीयांसि चरणक्षाळण केलें : मग उरलेनि पाणीयें[३] देवतेसि तर्पण केलें : आधीं बरवी पुजा गोसावीयांसि केली : मग उरलेयां पुस्पांची[४] पुजा देवतेंसि केली : गोसावीयांसि धुपार्ति : मंगळार्ति केली : अवघीं वाजंत्रें वाजवीलीं : मग[५] परिएळें देवातें ओवाळिलें मग म्हाळसी वोवाळिली : ऐसी पुजा स्वीकरिली : गोसावीं मग मढासि बीजें केलें : ।।

## २३० माडावरौनि सींपणें अवळोकणें

एकु दीं[१] गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं म्हाळसीचीया देउळासि बीजें केलें : वीहरणासि : दखिणिले दारवठांचां माडीं पहीलीए खणावरि[२] : गोसावी उभे राहीले[३] : तळीं सींपणें खेळत असति : माहामघीए तैं तेथ सिपणें होए : कव्हणी पानें घाली : कव्हणी नार्येळें घाली : कव्हणी थाळे तांबीयें घालीति : गोसावीयांसि अवळोकुं सरले[४] : थाळां गोसावीं पुडुवाटुवा तेथ रीचवीला : मग तेयातळीं होते तेहीं पानें पोफळें झेलीलीं : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## २३१ साधांसि म्हाळसी पांहों पाठवणें

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं म्हाळसीचीया देउळासि बीजें केलें : मग गोपाळाचां देउळीं[१] दारा उतरिलीकडे आसन जालें असे : गोसावीयांचेया दरीसनां साधें आलीं असति : तीयें गोसावीयांजवळि बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं म्हाळसी देखिली ? " " ना जी : नाहीं : " " तरि पाहा जा :" " हो कां जी : " गेलीं तवं तीएचे अळंकार फेडिले असति : न्हवण[२] करावेया : ऐसी देखिली : आणि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : म्हाळसी देखिली ? "

---

**२२९.** १ **एवा.** चौकीं : **एवा.** गरुडारां (**गो.** गरुडाळां) २ **यमु.** °उदका भरूनि. ३ **यमु.** उदकें. ४ **य.** फुलांची. ५ **अ.** °परिवारू देवतें ओवाळिली : मग—. **यमु.** °परिवारू देवते ओवाळीजति तैसी म्हाळसा—.

**२३०.** १ **यमु.** सीमुगेयाचां दीसीं °वीळीचां गोसावीं म्हाळसेचेय देउळा बीजें केलें. २ **यमु.** °खणीं दोहीं बाळाणेंनसीं आसन जालें : ३ **य.** °सीमुगां दारवठेयापुढें पेखणें होत होतें : मग सींपणें जालें : आवघे खेळों लागले : कव्हणी पानें घाली :—. ४ (पुढील भाग **अपंने.** प्रतीत **एकी वासना** म्हणून दिला आहे. **मुहीबी.** मधे मुख्य लीळेचाच तो भाग आहे.)

**२३१.** १ **यमु.** °चौकीं. **प्रवा.** °उतरीलीए रवणीवरि आसन—. २ **ने.** न्हाण.

"जी जी : देखिली" "*कैसी असे*[3] ?" "आहे काळीमीटीकी[4] : सर्वज्ञें म्हणीतलें[5] : तुमतें कोण्हीं पुसैल : तयापुढें काइ ऐसी सांघाल ? एकु वेळु पाहा जा :" "हो कां जी :" मागुतीं गेलीं : तवं स्त्रींघारु केला असे ऐसी देखिली : मग आलीं : मग गोसावीं पुसिलें : "साधें हो : म्हाळसी देखिली ?" "जी जी : देखिली :" "*कैसी असे*[3] ?" "पाटाउं साउलें नेसली असे : पाटाउं चोळी : कांकणें कळावीया : सोनेयांचीं तानवडें[6] : भवरीया : भांगटीळा : नाकीं मोतीं[7] : जी जी : ऐसी देखिली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां होए :" ।।

## २३२ वाळहुंटीं सांइंभटाचीं कर्दळीफळें आरोगण

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें मग म्हाळसीचीया देउळाकडें बीजें केलें : मग वीहरण सारुनि गोसावीं पसीमीले दारवठेंनिहुनि बीजें केलें : तोचि घाटु गोसावी उतरले : तवं राया एकाचे आंघोळी[1] सांइंभट[2] दांडीए बैसौनि : वरि स्त्रीगीरि[3] ऐसे देवतेसि जातातिं[4] : गोसावीयांतें एतां देखिलें : आणि दांडीएखालौतें उतरले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागले : गोसावीयांसि ओलीचें आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसावीयांवरि स्त्रीगीरि[5] धरिली : गोसावीयांतें आरोगणेलागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग हडपीयां धांवंडीलें[6] : हाटुनि केळेंसाखर आणिली : मग गोसावीयांसि आरोगण दीधली : गोसावीं तीनि केळें आरोगण केली : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## २३३ यात्राहाटीं ग्राहीकवेखुस्वीकारु

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि सकाळीं आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं आंगीटोपरें केलें : गोसावीं ग्राहीकवेखु स्वीकरीला : भटोबासाचां हातीं पुडुवाटुवा : गोसावीं पव्हेयाआंतु बीजें केलें : हाटवटीए बीजें केलें[1] : गोसावीं दुसीयांचेया पसारेया बीजें केलें : "या[2] जी :" म्हणौनि

---

३ (**यमु.**). ४ **यहीबी.** °बीटकी. **पं.** आहे बीटकी वोखटी. ५ **यमु.** °तैसें नव्हे कीं : एक वेळु जा : गावां जाल : तुमतें पुसती : 'म्हाळसि कैसी असे ?' म्हाळसी ऐसी ऐसी सांघाल : एक वेळ पाहा जा :" ६ **यमु.** °बरवे आंदु पाएवटे : भांगटीळा—. **एवा.** मुखवटें : भवरिया : फुलें : राखडी : सीसफुल ऐसी घवघवीत देखीली. ७ **यमु.** °डोइए मुगुटु.

**२३२.** १ **यमुनेगो.** °आंघोळीए. **हीबी.** पुरोहीतु. २ **मुपं.** साइंदेव. ३ **यमु.** छत्र. ४ **यमु.** °उदेयाचेया पाहारा एका : तवं वाळवंटीं (**मु.** वाळुहुटीं) गोसावीयांतें—. ५ **य.** छत्र धरिलें. **मु.** अनुकारें छत्र धरवीलें : ६ **यपं.** धाडीलें.

**२३३.** १ **यमु.** °वाळवंटीं हाटवटीयां (**य.** हाटवटीयांचे) पसारे मांडिले असति : २ **यमु.** एइजो.

गोसावीयांसि आसन घालीति : गोसावी आसनीं उपवीष्ट होति : गोसावीयांसि वीडा उ॰ळगवीति : गोसावीं धारण चर्चीति : गोसावीं[3] हातासन करीति[4] : गोसावीं आवघेंचि घेति ऐसे दीसति : मग बीजें करुनि आणिकी ठाइं ग्राहीकी करीति : मग आणिकी ठाइं करीति आणि गोसावी बीजें करिति : कापुरु : कस्तुरि : सडक : चवर : पाटाउं : मोतीयें : उंचनिच सकळै : दीसु मावळे : तवं आवघेया हाटा संबंधु दीधला : मग मढासि बीजें केलें : ।।

## २३४ देवतायात्राआकर्खणीं सर्व वेवस्था कथन

एकु दीं[1] गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वीहरणां बीजें केलें : नदीचीये पसीमीली घाटीं : देउळीएपुढां गोसावियांसि आसन जालें : तवं म्हाळसी पव्हा[2] अपार आला असे : यात्रा थोरि भरली असे : गोसावीं यात्रा अवळोकिली : *आणि बाइसांची वास पाहीली*[3] : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथौनि यात्रा मोहरिजैल[4] तरि मोहरैल : परि म्हाळसी थोटावली ठाकैल : " " मोहरिजो[5] कां बाबा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथौनि जरि अवेवस्था होआवी तरि वेवस्था कोठौनि होआवी ?" ।।

## २३५ माहात्मेयां दीवाळी सणु करवणें

दीवाळीचीए अवंसेचीए एरी दीसीं रात्रीं बाइसीं गोसावीयांसि मर्दना दीधली : मादणें[1] घातलें : गोसावीयांसि वस्त्रें उ॰ळगवीलीं : गोसावीयांसि चंदनाचा आडा : रेखिला[2] : पुजा जाली : गोसावीयांसि बाहिरिली पटिसाळेवरि आसन असे : मग गोसावीयांचेया दरीसनां गांवीचे भक्तजन[3] आले : कोण्हीं[4] पाटाउं पासवडी : कोण्हीं[4] खळिची : कोण्हीं[4] मांजिठी : कोण्ही[4] ओलिसाउले[5] : न्हाले[6] : टीळे तांबोळें : ऐसे आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : गोसावीं आपुलेयां भक्तजनांतें अवळोकिलें : तवं ते पांढरे भुरके : फाटकीं[7] पांगरुणें पांगुरले असति : ऐसें देखिले : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मेयां[8] आनंदाची दीवाळी[9] कां गा करा ना ? " मग गोसावीं आपुले भक्तजन अवघे अवळोकीले : आणि आवघेयां आनंदु संचरला : मग[10]

---

३ **ने.** ते तेयांसि. ४ **यमु.** बोलति :

**२३४.** १ **यमु.** °विळीचेया पाहारा एका गोसावीं वाळवंटा बीजें केलें. २ **मु.** पोहा. ३ (**यमु.**). ४ **नेपं.** मोहरविजैल. ५ **नेपं.** मोहरवीजो.

**२३५.** १ **गो.** माजणें **मु.** मार्जनें. २ **मु.** (**शोध.**) सर्वांगीं भोवरि दीधली : ३ **नेहीबीपं.** महाजन. **यमु.** ब्राह्मण. ४ **यमुनेही.** कोण्हां. ५ **हीबी.** °पांगुरले असति : ६ गो. °जेविले. ७ **ने.** फाळकीं. ८ **यमु.** °दिवाळी सणु हो (**एवा.** होआवा). ९ **अगो.** °करूं ना : **हीबी.** कां न कीजे : १० **यमु.** °गोसावीयांचे.

गांविचे भक्तजन आपणेयांकडे पाहाति : आणि तयांकडे पाहाति : तवं आपणेयांतें सोच्यां[११] देखति : तयांतें थोरां[१२] देखति : ऐसी वाडुवेळु स्तीति भोगिली : ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हांसि कांहीं म्हणीयें असे गा : " " जी जी : " मग भटांसि आठवलें : 'मज देइगांवां वस्त्रें आणुं जावें असे :' मग अवघेयांचीया स्तीती भंगलीया : मग भट दंडवतें घालुनि देइगांवां नीगाले : मग नीगतां सर्वज्ञें म्हणीतलें :[१३] " वानरेया : तुम्हां मार्गीं कव्हणी भेटैल : तरि संभाखिजे[१४] हो : " " हो कां जी : " मग नीगाले : ।।

## २३६ पास नीरोपण

गांवींचे[१] भक्तजन[२] आले : ते बैसलेचि असति : गोसावीयांसि आरोगणेसि उसीरु जाला : मग बाइसीं म्हणीतलें : " बावा : आतां यांसि पाठवणी देइजो नां[३] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांसि जे पास लागले असति तेचि यांतें आपसैयाचि नेती : " स्रीकराचा अनुकारु : तवं कव्हणाचें भांवंड आले : कव्हणाचें लेंकरुं आलें : कव्हणाचें नातोंड आलें : " बा चाल : तुतें आया[४] बोलाविलें असे : " ऐसें आवघेचि गेले : मग गोसावीयांसि आरोगण जाली : ।।

## २३७ पद्मनाभिभेटिकथनीं प्रसंसा

मग भट देइगांवां गेले : वस्त्रें घेउनि एत असति : तवं चाचलमुदेपासि[१] पद्मनाभिदेव जाताति[२] : तयां नाठवेचि : तवं तया वाटा पैलु ठाओंवरि भट गेले : मग आठवलें : मग परतलें : मग एकातें पुसिलें : " हां गा : हा कवणु जात असे ?" "हा रेमनाएकाचा पद्मनाभि :" भटीं म्हणीतलें : " हे दांडी उभी राहावा[३] कां : " मग दांडी उभी केली : भट साउमे गेले : भटां हात जोडिले : भटांतें ओळखति ना[४] : भटीं म्हणीतलें : " मातें ओळखत असा ? " " ना मीं नोळखें : " " गोसावीयांचां ठाइं वानरा एकु आइकीजे कीं ? " " ना हो : हो कां : " " तों मीं :" मागुतें हात जोडिले : मग पुसिलें : " गोसावी कवणी ठाइं राज्य करिताति ? " " ना नीवासां राज्य करिताति : "

---

११ **यमु.** थोरां. **गो.** सोच्यां. १२ **यमु.** सोच्यां. १३ **गो.** "वानरेया : तुम्हीं म्हातारी संबोखीजे हो :" **एवा.** " भेटैल तरि संबोखीजे हो " १४ **एवा.** संबोखिजे.

**२३६.** १ **यमु.** एकु दी ब्राह्मणू एकु गोसावीयांचेया दर्शना आला : वाडवेळु गोसावीयांपासि बैसला होता : गोसावीयांसि आरोगणे—. २ **नेही.** माहाजन. ३ **यमु.** °पाठवणी दीधली : परी न वचेति : ४ **पं.** आइया.

**२३७.** १ **यमुगोनेपं.** चाचरमुदा°. २ **यमु.** °दांडीएवरि आडवा पावो घातला असे : पुढें आसूची वाखारी : ऐसे जात देखिले : ३ **गोने.** करा. ४ **यमु.** °तीहीं पुसिलें : " तुम्हीं कोण ? " " ना

" तरि मज[५] सांघातें या कां : जाओं : मग मीं गोसावीयांचेया दरीसनां एइन :" " ना तुम्हीं[६] जाणत असा कीं[७] मज कांही पुसिलेयावीण कांही करुं नैए[८] : " " हो कां : " मग भटां हात जोडिले : मग नीगाले : ॥

मग भट[९] आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांपुढां वस्त्रें[१०] ठेविलीं : मग बैसले : "जी जी : बाइसांचा पद्मनाभि भेटला होता : मीं वस्त्रें घेउनि एत होतां तवं ते आडवाटा जात होते : मीं पैल ठाओवरि गेलां : मग मज आठवलें : मग प्रतलां : मग एकातें पुसिलें : 'हां गा : हा कवणु ?' 'हा रेमनाएकाचा पद्मनाभि :' मीयां म्हणीतलें : 'दांडी उभी करवा :' मग तीं दांडी उभी करवीली : मीं साउमां गेलां : मज हात जोडि : आडासनीं पाओ घातला असे : आसुंची वाखारि झेलिताति : मीयां म्हणीतलें : 'मातें ओळखता ?' 'ना मीं नोळखें :' 'गोसावीयांचां ठाइं वानरा एकु आइका कीं ?' 'ना : हो :' 'तरि तो मीं :' मग मागुता नमस्कारु केला : मग मातें पुसिलें : 'गोसावी कवणी ठाइं राज्य करिताति ?' मीयां म्हणीतलें : 'नीवासां राज्य करिताति :' 'तरि मज सांघातें या कां : जाओं : मग मीं गोसावीयांचेया दरीसनां एइन :' मीयां म्हणीतलें : 'तुम्हीं जाणत असा कीं : गोसावीयांतें पुसिलेया-वांचौनि मज यओं नैए : कांहीं करुं नैए :' 'हो कां' म्हणौनि मज हात जोडिले : मग नीगाले : मग बाइसीं म्हणीतलें : "जातासि कां तरि बापुडेयासि बाबाचें दरीसन होतें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा म्हणतु असे तें नव्हें[११] ? मां तुम्हीं म्हणत असा तें होए[१२] ? तो काइ एथचेया दरीसनां एइल ? तो तें एक करुं जात होता जेथ[१३] काइसेनहीं उसंतुचि नाहीं : तें याचेया भेटी चुकलें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : जीइ क्षेणा एकामाजि तें एकु आपजवी आपणयांसि : जें जन्माचां सहस्रीं निस्तरों न सरे[१४] :"* ॥

## २३८ बाइसीं वर्णित वीरक्ताचें भटां सोपहासु दरिसन

गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : पटिसाळेवरि आसन असे : तवं एकु *अन्य*[१] माहात्मा : काखे झोळा[२] : ऐसा एतु असे : गोसावीं एतु देखिला : मग म्हणितलें : " यासि बीढार घेओं नेदा गा[३] : " " जी जी : " मग तो आला : " एथ बीढार घेओं[४] ? " " एथ कें घोंगडें ठेवीसी ? एथ पवाडु नाहीं : " मग नीगाला : ॥

मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : यासि कां बीढार घेओं नेदिजे ? बापुडा वीरग[त] ऐसा दीसतु असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हा ऐसा दीसतु असे : परि भीतरि

---

गोसावीयांचां ठाइं—. ५ **यमु.** आजिचा दीसु°. ६ **यमु.** °गोसावीयांचें. ७ **यमु.** °गोसावीया[ं] पुसिलेयावीण—' ८ **यमु.** °गोसावी म्हणति तेंचि कीजे :" ९ **यमु.** °वस्त्रें घेउनि. १० **यमु.** लुगडें ११ **यमु.** सानें. १२ **यमु.** थोर. १३ **एवा.** °तेणें तेयासि काइसेनहीं—. १४ (**प्रवा. वि.** २०७

**२३८.** १ (**नेहोबीपं.**). २ **गोनेहोबीमु.** मोटळा. ३ **एवा.** यासि बीढारा एवों नेदा गा ४ **एवा.** करूं. ५ **यमु.** °अविद्येचा मोटळा असे. **होबी.** °विकारें बुचबुचीतु भरला अ

सुळबुळीतु[६] अवीद्या भरला असे : " " वापुडेयासि कें असे अवीद्या ? " मग गोसावी उगेचि राहीले :।।

मग गोसावीं वीहरणां वाळुवंटाकडें बीजें केलें : तवं तो उरावरि[७] सगडी ठेविली असे : 'पैरा गा : पैरा गा ' ऐसें बोवातु असे : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : देखिला गा वाइसांचा वीरगतु ? " " जी जी : बाइसांचे वीरगत ते ऐसेचि कीं : " बाइसीं म्हणीतलें : " पोरा : बाबा पां म्हणेति : मां तुं काइ म्हणौनि म्हणसि[८] ? " ।।

## २३९ भटां होडें केळें खाववणें

गोसावीयांसि भीतरि[१] आसन असे : गोसावीयांजवळि भट बैसले असति : गोसावीयां-जवळि केळें असति : कवणें दरिसनां केलीं तें नेणिजे : मग भटोवासातें सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एथौनि होडा केळें केतीएकें[२] खाल गा ? " भट म्हणति : 'बहुतें म्हणों ना कां ? मग न खवति[३] तरि गोसावी काइ करीती ?' म्हणौनि 'बहुतें' म्हणितलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरा : तैसें नव्हे : न खावति[४] तरि मारुनि[५] लेख[६] घेइजैल ? " *मग बहुतें थोडीं करीतां पंचवीसां केळां ठी जाली : भट केळें खावों लागले*[७] : सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरा : एक एकामध्यें सालीसीं खाए : एऱ्हवीं पोटीं[८] थरू[९] बैसैल : " मग एक एकामध्यें सालि खाति : ऐसीं पंचवीस केळें खादलीं : सेवटील सालीसीं खादलें : मग गोसावीं पुरे करवीलीं[१०] : ।।

## २४० दाइंबा उपाहारीं संतोखू करणें

दाइंबायें गोसावीयांसि उपाहारालागि वीनवीलें : *गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग बाइसीं उपाहारू नीफजवीला*[१] : पोळीया *केलीया*[२] : तांदुळ वेळिले : खीरि पत्रसाक[३] : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : तवं एका भक्तजनाचा सदेस्तु[४] उपहारु आला : दाइंबायें[५] इउलें ऐसें तोंड करुनि दुख करुं लागले : " माझें पापीयाचें गोसावी-यांचेया काइसेया उपयोगा जाइल ? आतां हा उपहारु सांडुनि बाइसें काइ माझेया उपहाराचें ताट करिती ? " म्हणौनि दुखक्रांत बैसले : मग तीं बरवी गोसावीयांसि

---

६ **ने.** आसुळवीसुळित. ७. **नेपं.** °जळत. ८ **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : इंद्रीयांचा सएमु : रसाचा नेमु : पदार्थाचा परीछेदु : वासनेचा वीरामु : यातें वीरक्त ऐसें बोलिजे कीं बाइ : " ।।

**२३९.** १ **नेहीबीपं.** भीतरीला ओटेयावरि. २ **नेहीबी.** कीती. **यगोपं.** कीतीएं. ३ **नेहीगो.** खावति. **बी.** खाववति. ४ **यमुपं.** खवति. **ने.** खावें. **बी.** खाववति. ५ **यमु.** धरूनि. ६ **यमु.** मोल. ७ (**यमुने.**). ८ **एवा.** °सुळु उपजैल. **पं.** °पाली : तथा सुळु बैसैल. ९ **यमु.** °बांधिजाल. १० **यमुनेहीबीपं.** °वीलें.

**२४०.** १ (**यमुगोनेही.**). २ (**यमु.**). ३ **यमु.** पातसें आणीलें. **बी.** पत्रसाख. **पं.** पत्रसाग. ४ **गोनेयमुपं.** वरवा श्रेष्ट. **हीबी.** स्वेत. ५ **यमुगोने.** दाइंबा.

पुजा केली : मग गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनां आवघेयां वाढिलें : मग गोसावीयांसि[६] आसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : भोजेयाचा भातु आणा :" मग बाइसीं दाइंवाचा भातु वाढिला : "बाइ : भोजेयाचें तुप आणा :" "बाइ : भोजेयाचें आंब आणा :" मग बाइसीं तुप आणिलें : गोसावीयांसि वाढिलें : आंब वाढिलें : मग गोसावी आरोगण करीति : आणि गोसावी म्हणति : "बाइ : भोजेयाचा भातु निका जाला : बाइ : भोजेयाची कढी नीकी जाली : वाइ : भोजेयाची पत्रसाक नीकी जाली :" मग म्हणीतलें : "बाइ : भोजेयाची खीरि वाढा : भोजेयाची पोळी वाढा :" मग वाइसीं वाढिलें : मग आरोगण करीत म्हणति : "बाइ : भोजेयाची पोळी नीकी जाली : बाइ : भोजेयाची खीरि नीकी जाली :" ऐसी अन्मोदीत आरोगण केली : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग दाइंवासि थोर सुख जालें : ।।

## २४१ मार्कंडमोदकचोरी प्रगटीए करणें

वाइसीं गोसावीयांलागौनि वरवे साखरलाडु बांधले : पोतें भरुनि ठेविलें : मार्कंड[१] पोतें सोडीति : लाडु फोडीति[२] : सेव[३] घेति : मागुतें पोतें बांधति : मग पैऱ्हां जाउनि खाति : पोतें ढीलें होए : वाइसें पाहाति तवं पोतें ढीलें देखति : *सोडुनि पाहाति तवं पोताचे लाडु साने*[४] : मग वाइसीं पुसिलें : "हां वावा : पोतें ढीलें होताए : लाडु साने होताति : हें काइ वावा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ[५] : पुसा मार्कंडातें :" "वावाचें काइ : वापुडा मार्कंडु तैसा नव्हे :" गोसावी उगेचि राहीले : मग एकु दीसीं पोतें सोडिलें : चुरि घेतली तवं बाइसीं देखिलें : "हें काइ जालें पोरा : वावाचे ओरोगणेंचे लाडु कैसे खातासि ? मीं वावातें उरोधीं :" घागरा[६] वांधला : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ हा दीसवडि ऐसेंचि करी : हा आजि तुम्हीं देखिला[७] :" ।।

## २४२ मंडळिकातिरस्कारीं देवता गाऱ्हाणेनसीं एणें

नाथोवा एका गांवां म्हणीयां गेले होते : मग गोसावीयांचेया दरीसना मागुते एताति : एका गांवां आले : तवं दोनि पाहार जाले : एका देउळा गेले : तवं तेथ[१] डांका[२] वाजताति : मग आणिका देउळा गेले : तवं भवंतीया देवता[३] असति : "कैसीया या रांडा

६ **यमु.** °ताटावरि.

**२४१.** १ **यमुबी.** मार्तंड. २ **यमुनेहीबीपं.** झाडीति. ३ **यमु.** सेवखंडें. ४ **(मु.). पं.** थोडे. ५ **यमु.** °मार्तंडें काढिले : खादले : पुसा—. ६ **ही.** "तुझां मडां बांधे घागरा : जो जाये मसणवरि वाजतु :" ७ **हीबी.** °म्हणौनि नीकें जालें. **पं.** °हा नीका नव्हे म्हणौनि : जीवासि वरूतें देखणेंचि नाहीं : यावरि गोसावीं अधमति : अधगति : अधरति : हें प्रमाण नीरूपीलें ।।

**२४२.** १ **यमु.** °चहुंकडे देवतें आपारें असति : २ **हीगो.** डाहाका. ३ **यमु.** °सेंदुरें डवरलीय

भवंतीया बैसलीया असति : कवणे ठाइं पाठि घालुं ?" मग एका झाडातळिं[४] पाठि घातली : तवं हुडहुडीत[५] ज्वरु आला : गोसावीयांसि उपहुडु जाला : गोसावीयांसि वाहीरीले पटिसाळेवरि आसन असे : देवता गाऱ्हाणें सांघावेया आलीया : गोसावीयांपुढां सांघों लागलीया : गोसावी 'हुं हुं' ऐसें म्हणताति : मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हें कवणेंसीं बोलीजताए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मंडळिकाचें एथ गाऱ्हाणें आलें :" "गाऱ्हाणें काइसें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळिकें देवतेसि सवीया[६] दीधलीया : तयासि तेथ ज्वरु आणिला[७] : आपण एथ गाऱ्हाणेंनसीं आलीया :" तवं वीळचां वेळीं नाथोबा दुखणेंनसीं निवासेया आले : *आंगीं जरू : रगतांबर डोळे : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले*[८] : गोसावीं पुसिलें : "उसीरु कां गा लावीला[९] मंडळिका ?" "जी जी : मज ज्वरु आला : मग मज चालवेचि ना : मग हळुहळु आलां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्वरु कां गा आला ?" "जी जी : तें नेणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं देवतेसि सवीया कां गा दीधलीया ?" "जी जी : मीं एका गांवां[१०] आलां : तवं दोनि पाहार जाले : मग तातवेळ भांजावेया एका देउळासि आलां : तवं तेथ डांका[११] वाजत होतीया : मग आणिका देउळा गेलां : तवं आवघीया भवंतीया बैसलीया असति : मग म्यां सवी दीधली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां तेथ ज्वरु आणिला : आपण एथ गाऱ्हाणेंनसीं आली : तें स्थान[१२] न पळे तरि आपण आणिका स्थाना जाइजे : परि देवतेसि सवी नेदीजे कीं गा : आपण कव्हणाची तांति न कीजे : तरि आपुली कव्हणी न करी[१३] : *मंडळीका : वोखटें करीत सातां कव्हणी गोमटेयातें न पवे : गोमटें करीत सातां कव्हणी वोखटेयातें न पवे : आपण कव्हणातें वोखटें न म्हणे तरि आपणेयातें कव्हणी वोखटें न म्हणे :" सर्वज्ञें म्हणींतलें : "सतसंभवी आपुलें विघ्न चुकवावें कीं : मां अपादुनि ऐसें कां जोडीतां ? एथिचे म्हणौनि उपसाहिलें :" नाथोबा म्हणीतलें : "ना जी : मीं तात काइसया करीन :" मीयां ऐसें म्हणीतलें : "बरवा ज्ञात जोगीया वाइला व्यापीती : आणि बरवें झाड रांडा देवता व्यापीती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सवी देणें हेंही एक तात करणेंचि कीं गा :" "हो कां जी : आजिलागौनि न करीं जी*[१४] *:"* मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यातें पाणिभाताची मुद करुनि वोवाळा :" मग बाइसीं पाणिभाताचीया मुदा करुनि वोवाळिलें : मग तयांचा ज्वरु गेला : ।।

---

देवता—. **पं.** देवतांचीया प्रतिमा. ४ **यमु.** रुखाखालि. ५ **मु.** हडहडुनि. **बीपं.** हुडहुडीत. ६ **एवा.** सवी दीधली. ७ **अ.** आला. ८ (**गोनेयमुहीबीपं.**). ९ **गोहीबी.** लागला. १० **हीबी.** रांजणगावां. ११ **गोही.** डाहाका. १२ **एवा.** °प्रतिबंधलें तरी. १३ **नेपं.** °लेपाचां देउळीं न बैसावें ।। भोगस्थानीं नसावें :।। अतिअसुरे स्थानीं नसावें : ।। १४ (**प्रव. आ.** २२३).

## २४३ अनो अधिकार्यातें जाओं नेदणें

अनोसि स्तीति जाली : तेहीं कुपीनु हातीं घेतला : जाउनि वेसीसीं[1] उभे राहीले : अधीकार्या गांओं[2] रीगावेया आला : तयासि रीगों नेंदीति : *कासोटा आड वोडवीति*[3] : "हां हां बापा : जाओं नैए :" मागुतें "हां हां बापा : जाओं नैए :" एरीकडे ठाकति : एरीकडे ठाकति : परि कव्हणां पुढां रीगवे ना : "आरे हा कवणांचा पीसा ?" "ना हा चांगदेओराउळां गोसावीयांचा पीसा :" तेहीं म्हणीतलें : "जा तेयांतें वीनवा :" *मग आले*[4] *:* "जी जी गोसावीयांचा पीसा तो वेसीसीं उभा राहीला असे : अधीकार्यासि गांओ रीगों नेदी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जा : एथौनि बोलावीलें असे ऐसें म्हणां :" मग भट गेले : "अनो : चाल : तुतें गोसावी बोलावीताति :" *मग स्तीति भंगली*[5] *:* मग आले : ।।

## २४४ बाइसांकरवि काळबोटा दवडवणें

काळबोटे ते एक बाइसीं राहावीले होते : ते बाइसांलागि सांवारु[1] आणिति : कांहीं हाटवेचु आणिति : बाइसें कवडे देति : आधेयाचा वेचु आणिति : आधें ठेवीति[2] : मग एकाधा दीं आपुलेयां कवडेयांचें कांहीं आणिति : "बाइ : हें मज जोडलें : तेयाचें आणिलें :" बाइसें तोखति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा काळबोटा निका नव्हे : हा दवडा :" "कां बाबा ? बापुडा निका : कांहीं जोडताए तरि आम्हांलागौनि घेउनि एताए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा काइ तुम्हांसि देइल ? हा तुमचेंचि चोरी : मां तुम्हांसिचि दे :" "तैसें काइ बाबा करील ?" मग गोसावी उगेचि राहीले : मग गोसावी एकु दीं लघुपरीहारा तीए वल्हैकडे[3] बीजें केलें : सरीसे भट असति : गोसावीं स्रीचरणी-चेनि आंगुठेन दाखवीलें : "वानरेया : एथ उकरा[4] गा :" भटीं उकरिलें : तवं कवडेयांचें पेंव नीगालें : मग आणिकी ठाइं दाखवीलें : "एथ उकरा गा :" तेथ उकरीलें : तवं आणिक पेंव नीगालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे घेया तुमचेया काळबोटेयाचे कवडे :" दोन्हीं पीसवीया बाइसांकडे घातलीया : एकि तुम्हां देयावी[5] : एकि आपण नेआवी : मग बाइसीं घागरा बांधला : मग दवडिला : ।।

## २४५ तथा सीखासुत्रत्यागु प्रसंसा

एकु दीसीं गोसावीं आउसांतें पुसिलें : "नाएका : अनो नीका कीं मार्कंड नीका ?" "जी जी : स्वामी जगंनाथा : अनो निका नव्हे : तो चातुर्वर्णी भिक्षा करी : मार्कंडु

---

**२४३.** १ **मु.** गांवांचां माहाद्वारीं. २ **मु.** गावांतु. ३ (**यमु.**). ४ (**मुने.**). **य.** मग तयाचे सेवक गेले. ५ (**यमुहीबी.**).

**२४४.** १ **यने.** साबारू. **पं.** °वेसवारू. २ **य.** °ते पेवं घालीति : ३ **गोने.** पव्हेकडे ४ **एवा.** कोरा. ५ **एवा.** आणावी.

निका[१] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ढोरे राखा हो नाएका : एथिचेया दरीसनाचीया चाडा ब्रम्हण्यांचें सर्वस्व सीखासुत्र सांडिलें[२] तो अनो ओखटा ? मां मार्कंडु चांग ? जो सदा एथ अनृत्यचि[३] बोले : " " नेणेंचि जी स्वामी जगंनाथा : " ।।

## २४६ भटां केंसतोडा पाणिकापड बांधवणें

एकु वेळु भटां[१] केंसतोडु निगाला : " जी जी : केंसतोडु नीगाला जी : एथ काइ बांधों ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ पाणिकापड बांधा : " मग पाणिकापड बांधलें[२] : मग गेला[३] : ।।

## २४७ म्हाळसा दरीसनां एणें

गोसावीयांसि[१] भीतरिला ओटेयावरि आसन असे : भक्तजन अवघे गोसावीयांजवळि बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " परते सरा गा : म्हाळसी[२] एथिचीया दरीसनां एताए : " " हो कां जी : " अवघे परते सरले : " जी जी : आम्हीं देखौनि : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते देवता कीं गा : ते कां आपणेयांतें देखों देइल[३] ? डोळे झांका[४] : " मग तेहीं अवघां डोळे झांकिले[५] : मग म्हाळसी आली : अवघेया मढांतु प्रकासु[६] पडिला : अंदुचा घवघवाटु : अनेग परिमळ : आली : गोसावीयांचें दरीसन जालें : मग नीगाली : दाइंबायें आंगुळिया फांकिलीया : तवं प्रकासा डोळे भरलें : एति जाणितली : जाति जाणितली : मग दाइंबाएं पुसीलें : " *जी जी : मीयां आंगोळीया फांकीलीया तवं प्रकासा डोळे भरले : काहीं देखोंचि ना : एति जाणितली : जाति जाणितली*[७] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तयाचां ठाइं *काइ*[७] इतुलेंहीं सामर्थ्य नाहीं जें आपणपें[८] देखों नेदिजे ? " ।।

## २४८ नाथोबा मनोर्थउपहारीं क्रीया चरीतार्थ करणें

गोसावीयांचेया दरीसनां भक्तजनें एकें आलीं : उपाहारु करावेया : मग तींहीं गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : " जी जी : एकाधा आम्हां[१] हाटवेचु करुनि[२] दे ऐसा देआवा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका जा : " " हो कां जी : " नाथोबा[३]

---

**२४५.** १ **पं.** °तो आपुलें ब्रह्मण्य भंगों नेदी : २ **ने.** धाडिलें. **पं.** °सीखासूत्राचा त्यागु : कर्माचा लोपु : वर्णाचा आभावो : तो अनो—. ३ **एवा.** असत्य.

**२४६.** १ **मु.** एकांसि. **य.** माहात्मेयां एकासि. २ **ही.** °दु:ख काढलें : नीका जाला : ३ **ने.** नीका जाला.

**२४७.** १ **यमु.** एकु दीं वीळीचां समइं (**शोध.**) रात्रीचेया पाहारा एका—. **हीबीपं.** गोसावीयांसि उदयाचा पुजावसरू जाला°. २ **गो.** म्हाळसा. ३ **एवा.** ते आपणेयांतें देखों नेदी. ४ **पं.** झांपा. ५ **पं.** झांपीले. ६ **एवा.** उजीएडु. ७ (**गोनेयमुहीबीपं.**). ८ **ने.** आपणयासि.

**२४८.** १ **यमु.** °पुजासाधनें आणुनि दे ऐसा—. **पं.** °हाटवक करूनि—. २ **गो.** घेउनि. ३ **यमु.** °सरीसे.

गेले : मग तीं गोसावीयांलागौनि[४] बरवे उतम तांदुळ : उतम पदार्थ घेतले : उतमें बरवीं पुजाद्रव्यें घेतलीं : बरवा उपाहारु निफजवीला : मग गोसावीयांसि बरवी पुजा केली : मग नाथोबा मनोर्थ करुं लागले : “मातें *जरी काहीं*[५] असतें तरि मीं याहीहुनि गोसावीयांसि बरवी पुजा करितां[६] :” मग गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जाले : गोसावीं ताटावरि बीजें केलें : मग नाथोबा म्हणों लागले : “*हा काइसा उपाहारु ? मातें जरी असतें*[७] तरि मीं याहीहुन बरवा उपाहारु करितां :” ऐसे मनोर्थ करुं लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : “मंडळिका : तुम्हीं एथ दंडवत घाला : एथौनि[८] तुमची क्रीया चरीतार्थ हो :” मग नाथोबायें दंडवत घातलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : ॥

## २४९ तथा एळौर मांगळौर म्हणवणें*

गोसावी[१] वीहरणा बीजें करीत होते : वाळ्हवंटीं[२] हाटवटी भरली असें : सर्वज्ञें म्हणीतलें : “मंडळिका : तुम्हीं एथ सातरा[३] पसरा :” “हो कां जी : मां काइ म्हणों जी ?” “एळौर मांगळौर म्हणा :” आणि ‘ते एळौर मांगळौर’ म्हणों लागले : तो अपुर्व सब्दु *आइकौनि*[४] कोण्ही तांदुळ घाली : कोण्ही गहुं घाली : कोण्ही उडीद घाली : तारा[५] पोफळ घाली[६] : ऐसी पाहारा एका मोटभरि आली : मोट वांधौनि मढा घेउनि आले : गोसावीयांसि द्रीष्टपूत केली : बाइसीं[७] गोसावीयांपुरतेंचि चोखट उपाहारा-लागि निवडिलें : एराचीं गोसावीं बाइसांकरवि दीवसीं करवीलीं : सर्वज्ञें[८] म्हणीतलें :

४ **यमु.** °बरवीं उत्तमें पुजासाधनें घेतलीं : बरवा उपाहारु—–. ५ (**गोहीबी.**). **पं.** पदार्थ. ६ **यमु.** °तेणेंचि अनुक्रमें जो पदार्थ वोळगवीति तो तो मनोर्थ करीति : “हे काइसे पदार्थ ? मातें जरि असतें तरि मीं याहीहुनि बरवे पदार्थ वोळगवीतां :” ऐसा मनोर्थ करीति : मग दंडवतें घालतीए समइं सर्वज्ञें म्हणीतलें—–. **ने.** °**परशरामबास** : खडकुलीए इंद्रभटाचीए उपाहारावरि म्हणीतलें : रामेश्वरबास : नीवासाचि : ॥ ७ (**यमुगोनेहीबीपं.**) **अ.** “हो कां : ऐसा जरि उपाहारु मातें असता तरि—–. ८ **यमु.** °तुमचा मनोर्थु चरितार्थ हो.

**२४९.** *लीळाचरित्राच्या पूर्वार्धातही ही लीळा आली आहे. तेथे ती रद्द केली आहे. त्या लीळेतील पाठांतरे पूर्वार्ध संपादनातील **अ.** प्रत **अपू.** या संक्षेपाने पुढे दिली आहेत.

१ **अपू.** हे लीळा **प्रवा.** नेवासां. **रावा.** एळापुरीं माणिकेश्वरीं ॥ **यमु.** °म्हाळसापुरा—–. २ **यमु.** वाळवंटाचीए ठाउनि दारवठावेन्ही हाटवटी—–. **गोने.** वाळुवंटीं. **अपू.** °यात्रा भरली असे : यात्रेआंतु एकी ठाइं दोहीं सुरकणीं आंधळी जंगमें : कुष्टीए : जोगीए : अक्षेमें : सातरिया पसरुनि : पैरा पैरा म्हणतें बैसलीं असति : सर्वज्ञें—–. ३ **मु.** सातरी. **य.** सातरें. ४ (**गोने.**) **पं.** म्हणौनि. ५ **गोनेयमुपं.** तार. ६ **यमु.** °ऐसे बहुत आलें : नाथोबा हरीखैले : बहुतें मजचि घालीति : एरां कव्हणीं न घलीति : मग वीळचां मोट बांधौनि—–. ७ **यमु.** °तार मुक्षकरुनि वेगळाले नीवडीले : चोखट तयाच उपाहारू नीफजवीला. ८ **ने.** एरि दी°.

" वाइ : हें दळा : याचीं दीवसीं[९] करा : " मग बाइसीं गोसावीयांलागि बरवा चोखटु उपाहारु केला : एराचीं दळुनि दीवसीं केलीं : कांही तारा[१०] कवडे आले होते : तयांचीं पुजाद्रव्यें आणवीलीं : गोसावीयांपुरतें तुप आणिलें : एरांलागौनि तेल आणिलें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जाले : गोसावीं ताटावरि बीजें केलें : नाथोबायें दंडवत घातलें : मग गोसावीयांसि सपरिवारीं[११] आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : ।।

## २५० निरोधद्योतननिषेध*

[ निधिवासां अवस्थान : एक वेळ नाथोबा कव्हणा एका व्यापारा गेले : व्यापार करूनि आले : भागले : भुकैले : बाइसीं जेउं सुदलें : जेवीले : नीजैले : तवं भागें नीद्रा नैए : मार्तंडेसीं बोलुं लागले : " पाहे मार्तंडा : आजि मीं वहुत भागलां : " तवं मार्तंडें म्हणीतलें : " भागलासि तरि जाए : बैस टेकावरि : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : तयाकरवि तुं श्रमनिवृत्ति करवितासि ? परि तो न करी कीं ? " तवं नाथोबाएं म्हणीतलें : " ना जी : मीं तरि करवीत नाहीं जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : आपुले निरोध आणिका द्योतविजेति तेंहीं एक करवणेंचि कीं गा : " " हो कां जी : " मग भटांकरवि नाथोबासाची श्रमनिवृत्ति करविली : ।। ]

## २५१ संतोखा पासवडी अवीधिपरिहारु

संतोखासि[१] पासवडी मीनली : मग ते तेहीं गोसावीयांसि वोळगवीली होती : मग ते गोसावीं बाइसांसि दीधली : तें संतोखासि न मनेचि : मग एकाधा वेळु उदेयांसीचि गोसावीयांपासि कुणुकुणित बैसति : " ऐसें[२] हें काइ जी ? अवंदा अपार सीं[३] वाजताए : " मग सर्वज्ञ म्हणति : " कंथेसि थीगळ घालावें[४] : " मग ते म्हणति : " जी जी : सीं थोर वाजताए जी : " मग गोसावी एक साउलें देत होते : " ना जी : गोसावीं बाइसांसि पासवडी दीधली ते देयावी[५] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हो कां : वाइ : ते पासवडी आणां : " मग वाइसीं पासवडी आणिली : मग तयांसि दीधली[६] : ।।

---

९ **यमु.** दाळिदीवसीं. १० **गोने.** तारकवडा आला होता. ११ **अ.** सैरीवैरी. **यमु.** सहपंक्ती.

**२५०.** *(**प्रव. आमा.** १८७).

**२५१.** १ **य.** एळापुरीं नवचंडीए°. २ **एवा.** एया, ऐया. ३ **गोही.** हींव. ४ **एवा.** लावावें. ५ **य.** "ना जी :" मग एकु दीं भक्तिजनातें म्हणीतलें : "गोसावीं माझी पासवडी बाइसां दीधली : ते माझी मजचि देतु कां :" ते गोसावीयांतें म्हणति : गोसावी उगेचि असति : मग एकु दीं आपणचि गोसावीयातें म्हणति : "जी जी : गोसावीं माझी पासवडी बाइसांसि दीधली : ते माझी देतु कां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हो कां :" ६ **अगो.** °मग बहुतां दीसां तीहीं

मग एकु दीं गोसावीं वीहरणां बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " संतोखा : तुम्हीं एथ सातरा[७] पसरा[८] : " " हो कां जी : " मग संतोखें सातरा[७] पसरिला : ते 'पैरा गा : पैरा गा ' ऐसे म्हणिति : मग गोसावीं नाथोबाकरवि सातरा पसरविला[९] : मग संतोखासि तांदुळ : उडीद : गहुं : जोन्हळे : कवडा : पोफळ : तारा[१०] : ऐसें घेउनि वीळिचां आले : मग गोसावीयांपुढां ठेविलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : अवघेयांसहीतु उपहारु करा : " मग एरी दीं गोसावीयांपुरता चोखटु उपहारु केला : एरांचीं दळीचीं[११] दीवसीं केली : गोसावीयांलागौनि तारा आलीया[१२] होतीया : तयाचीं गोसावीयांलागौनि पुजाद्रव्यें आणिलीं : गोसावीयांपुरतें तुप आणिलें : एरां-लागौनि तेल आणिलें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जाले : गोसावीं ताटावरि बीजें केलें : अवघे भक्तजन बैसले : मग संतोखुबायें दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " संतोखा : आणिक एक एथ दंडवत घाला : ऐसें म्हणां ' तुम्हीं एथ पासवडी दीधली : ते एथौनि बाइसां दीधली : बाइसांपासौनि हीरतली : तयातव मज जाला जो अवीधि तो माझा परिहरो : ' ऐसें म्हणां : " " हो कां जी : " बाइसीं म्हणीतलें : " अवीधि काइसा बाबा बापुडेयासि ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वीधी अवीधि परीहरे : " मग तेहीं म्हणीतलें : दंडवत घातलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : ।।

## २५२ वस्त्रेंकरुनि वींचु धरवणें

वीळिचाचां पूजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांचेया ओटेयावरि वींचु निगाला : बाइसीं म्हणीतलें : " बाबा : वींचु निगाला : काइ करुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें[१] : " वस्त्रें धरुनि[२] बाहीरि टाका : " वस्त्रें[३] धरुनि बाहीरि टाकिला : मग वरवें सयनासन रचिलें[४] : ।।

## २५३ भटां ज्ञानभक्तिवैराग्य निरूपण*

[ [१]गोसावीयांसि निधिवासा अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : ज्ञान : भक्ति : वैराग्य : या तिहींचीं रूपें कैसीं जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : ज्ञान तें रसरूप

---

सातरा पसरीला : मन एकु दीं—. ७ **गोने.** सातरी . ८ **एवा.** घाला. ९ **अगोने.** °हे मागील लीळ
१० **यगोनेहीबी.** तार. **पं.** तारकवडा. ११ **गोनेपं.** दळुनि. **हीबी.** दळउनि. १२. **अगो.** आणिलीय
**नेपं.** तारकवडा आला होता.

**२५२.** १ **हीबी.** °वानरेया : वस्त्रें धरुनि—. २ **अ.** करुनि. **ने.** करुनि धरा. ३ **हीबी.** भटी
४ **नेहीबी.** °मग गोसावीयांसि पहुडु जाला.

**२५३.** * (**प्रव. आमा.** २०९).
१ कवीश्वरबा°.

वैराग्य तें वृत्तिरूप : भक्ति ते क्रियारूप : " " हो कां जी : " भटीं म्हणीतलें : " जी जी : रसज्ञान : वृत्तिज्ञान : क्रियाज्ञान : यांची कवण मर्यादा होअवे : ऐसें काहीं आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " रसज्ञान : क्रियाज्ञान : वृत्तिज्ञान : यें तीन्हीं वाढविलीं तेसणीं वाढति : " " हो कां जी : " ।। ]

## २५४ गोपाळमढीं देवां भेटि

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं गोपाळाचेया देउळा वीहरणां बीजें केलें : गोसावीयांसि उतरिलीकडे आडवांगीं[1] आसन असे[2] : रामदेव आवधीए आइतीसीं गोसावीयांचेया दरीसनां आले : द्रव्यें[3] : चंदनाचीया वडीया[4] : 'गोसावीयांचां ठाइं राहावें सातपांच दीस : मग गोसावीयांचां ठाइं उपाहारु करावा :' ऐसीया वासनां आले : हाटांतु गेले : पुजाद्रव्यें घेतलीं : मग गोसावीयांतें सोधिलें : गोसावी गोपाळीं असति : मग आले : गोसावीयांतें जेथौनि देखिलें तेथौनि दंडवतेंसीं एति : दंडवतेंसीं आले : गोसावी आसनावरुनि उभे ठाकले : दादोसां[5] खेमाळींगन दीधलें : दादोसीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : मग गोसावीयांचें दादोसीं चरणक्षाळण केलें : वडीया उगाळिलीया : गोसावीयांसि चंदनाचा आडा रेखिला[6] : गोसावीयांसि पुजा केली : अवस्वरु जाला : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## २५५ प्रयाण[1]अवस्वरीं देवां दीनदान प्रष्णू

मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला[2] : सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : एथौनि ग्रामांतर करावेयाची प्रवृत्ति होती : तवं तुम्हीं आलेति : तरि तुमचें सातपांच दीस भेटिचें कवणी ठाइं देयावे ? " " गोसावी बीजें करुतु[3] : मीं गोसावीयांसरीसा एइन : मग गोसावीयांसि जेथ प्रवृत्ति तेथ देतु : " मग गोसावीं राजणगांवां बीजें केलें : ।।

## २५६ राजणगांवीं रात्रीं राणाइ उदकानएनीं देवां कोपणें

मग गोसावीयांसि राजणगांवीं माहालक्षुमीएचां[1] देउळीं वस्ति जाली : गोसावीयांसि वीळिचांचा पूजाअवस्वरु जाला : मग दादोस बीढारा गेले : सकाळी[2] निजैले उठिले :

---

२५४. १ **यमु.** °रवणीएवरि. **एवा.** चौकीं. २ **यमु.** °मागां देवांपुढे साधीं नीरोपु धाडिला होता : ते रामदेव——. ३ **यमु.** द्रव्य. **ने.** पूजाद्रव्य. ४ **यमु.** °आणिलीया. ५ **य.** °उठुनि. ६ **अ.** केला.

२५५. १ **अ.** प्राण. २ **यमुपं.** °गोसावीं अंगीटोपरें केलें : मग देवातें म्हणीतलें : ३ **गो.** करीतु. **ने.** करितातिः तरि मी——.

२५६. १ **यमुबी.** आउवाचां. **ही.** आवाचां. २ **यमु.** सकाळीचि नीजैले : रात्रीं पाणी पीयावेया

पाणीं पेयावेया सागळ घेतली : तवं सागळे पाणीं नाहीं : मग हालौनि मागुती ठेवीली : सीक्षीं[३] राणाइसीं सागळ घेतली : दादोस तान्हैले[४] : मग वीहीरी गेलीं : गोसावीयांसि[५] आरोगणा जाली : पहुडाचें मान : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : जा : सागळ भरुनि आणां :" "हो कां जी :" नाथोबायें सागळ घेतली : तवं पाणीं असे : "गोसावीयांसि कांहीं हेंतु असे :" मग वीहीरी गेले[६] : तवं राणाइसें वीहीरीचा रीगावा नेणति : " हें कोण ? " "नाथो : मीं राणाइसें :" "एव्हडेया वेळा काइ ?" "दादोस तान्हैले : तें पाणीं नाहीं : सागळ भरावेया आलीएं :" *नाथोबायें म्हणीतलें : " ऐसे गा आमुचे गोसावी : आपुलें ऐश्वर्य लोपीती : उजु कां न सगावें[७] ?"* मग नाथोबाएं तयाची : आपुली सागळ भरिली : मग तयांतें बीढारवरि बोळवीलें : *मग आले : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "उसीरू कां गा लागला मंडळीका ?" "जी जी : दादोस तान्हैले : तें सागळे पाणी नाहीं : तें राणाइसें सागळ भरावेया आलीं : तीएं वीहीरीचा रीगावा चुकली : मीयां सागळ भरूनि दीधली : तयातें बीढारवारि बोळवीलें : म्हणौनि उसीरू लागला जी : " मग गोसावीयांसि पहुडु जाला[८] :* ।।

मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : पुजाअवस्वरा दादोस आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : एकली स्त्री तेव्हडेया वेळा तैसीया स्थाना न धडीजे कीं : स्वयं दास्यं तपस्विनां :" " ना जी : मीयां नाहीं पाठवीली : मीं पाणीं पेयावेया[९] उठिलां : सागळे पाणीं नाहीं : मग हालउनि ठेविली :" सर्वज्ञें म्हणीतलें : " हालवणें तयांतु एक पाठवणें कीं :" मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं मीरीएसि बीजें केलें : ।।

## २५७ मीरीए देवीं माहालक्ष्मींए अवस्थान

मग गोसावीयांसि मीरीए माहालक्ष्मींएचां देउळीं दीस २० अवस्थान जालें : प्रतदीनीं दादोसांचाचि उपाहारू[१] होए : ।।

## २५८ भटां अटणविधि निरूपण*

[मीरीए[१] अवस्थान : एकु दीं भटीं पुसिलें : " जी जी : महात्मेनि आटन करितां कवणे काळीं वर्तनें चुकवावीं ? महात्मेनि कवणी कवणी ठाइं न वसावें जी ? कवणा वृक्षाखालि

---

(**मु.** पीयाले) उठिले. ३ **यमु.** माता. ४ **ही.** °मोडसी होइल म्हणौनि. ५ **अ.** °पासि आलीं. **ने.** आरती. ६ **यमु.** °तवं राणाइसें वीहीरीसि भीतें (भवंतें ?) असति : आंधारू पडिला असे : वीहीरीचा रीगावा—. **हीबी.** °तवं रागाइसें रवणिएसि भवंती भवंतें असति. ७ (**हीबी.**). ८ (**गोनेहीबी.**). ९ **ने.** पाहावेया.

**२५७.** १ **अहीबी.** पूजाअवस्वरू.

**२५८.** *(**प्रव. आमा.** २०४–२०८).

१ गोपाळबा°.

न बैसावें ? आणि काइ काइ न पाहावें जी ? " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " अवेळ : सवेळ : दुपाहारू : इयें तीन्हीं चकवावीं : सिंदी : नदी : दंदी : यांचेया गांवीं न वसावें : फळतेया फुलतेया वृक्षाखालीं न बैसावें : उडत पांखीरूं न पाहावें : पाखरिला घोडा न पाहावा : " " हो कां जी : " भटीं म्हणीतलें : " गोसावीं खेचर भूचर पाहुनि शोधिलें कीं : " गोसावीं मानिलें : ।। ]

## २५९ देवांतें पाठवणें : साधांतें पुढें पाठवणें

मग एकु दीसीं रात्रिचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : *सातपांच दीस एकत्र असीजे : मग आपणालेयां जाओं लागीजे : पूर्वोत्तर क्षण दुर्लभ*[१] : तुमचे सातपांच दी भेटिचे दीधले : आतां यासि[२] अनोज्ञा[३] : " " हो कां जी : गोसावी कवणीकडे बीजें करिती ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें ऐसें घाटावरि जाइल : " मग दादोसीं आसनावरि पांच पोफळें ठेविलीं : सतभरि[४] दंडवतें घातलीं : मग दादोस बीढारा नीगालें : ।।

साधें : तीघी बाइया बैसलीयाचि असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो[५] : माहात्मे बीढारा गेले[६] : तुम्हीं बीढारा जा ना ?" " हो जी : जाइन आणि काइ : " " तरि काइ म्हणतें असा साधें हो ? " " जी जी : आम्हांसि गोसावीं आपणेयां सांघातें घाटावरि एओं देयावें : " तवं[७] बाइसीं म्हणीतलें : " घाटावरि कोठें एइल ? मार्गि काइ भिक्षा असे ? घाटावरि भीक्षा नाहीं : पाठा[८] एइल : भीक्षा करील : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : प्राणियांचेया इष्टाआड नैएजे[९] कीं : " तैसीचि साधें बीढारा गेलीं : 'आम्हांसि गोसावीं एओं दीधलें : ' ऐसें साधां जालें : ।।

मग उदीयांसीचि परीवंट बांधौनि आपुलीए आइतीसींचि आली : दादोस आले : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग दादोसीं आसनावरि एक पोफळ ठेविलें : एक दंडवत घातलें : मग मागुतवाउलीं गोसावीयांची श्रीमूर्ति देखति तवं जाति : निगाले : साधें गोसावीयांजवळि उभींचि असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : माहात्मा निगाला : तुम्हीं जा ना ?" "जी जी : गोसावीं आम्हां एओं दीधलें कीं[१०] : " मग गोसावीं

---

**२५९.** १ (**प्रव. आ.** १३४). २ **यमु.** तुम्हां. ३ **न.** °होए ना ? **हीबीपं** °होए ? ४ **हीबी.** सेंभरी. ५ **यमु.** (**शोध.**) °एकली बीढारा जाओं सकाल ?" ६ **यमु.** नीगाले. ७ **यमु.** °बाइसें कोपली : ८ **यमु.** एकला पाठा भीक्षा करील : मग बाबासि आरोगण देइल : तुं एउनि काइ खासी ? यां राडां-हातीं कोण्हीकडे जावोंचि नये : " सर्वज्ञें म्हणीतलें——. ९ **गोने.** न एइजे. १० **यमु.** °सर्वज्ञें म्हणीतलें: " ऐसें तरि हा पैल पाठा देखिला : तेणें मार्गें चाला : " श्रीकरें दाखवीलें : मग साधें नीगालीं : मग

लाहामाइसांतें पुसिलें : " बाइ : तुम्हीं काइ ?" " जी जी : एल्हो धाकुटी : मज यावें लागैल : एन्हवीं गोताकुटुंवाचा बोलु लागैल : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एसें म्हणां : बाइ : तुम्हीं साधांसि रक्षण : " मग रत्नाइसांतें पुसिलें : " रत्नमाणिकां : तुम्हीं काइ ?" " जी जी : मज एल्होसि एकी गोणीचें संवळ : " सर्वज्ञें म्हणीतलें[११] : " पुढां पाठा जातु असे : तेणें मार्गें जा : " " हो कां जी : " मग नीगालीं[१२] : मग दादोस नीगाले : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## २६० मार्गीं साधांतें वाहाणा लेववणें

मग गोसावीं बीजें केलें : गोसावीयांतें एत देखिलें आणि साधीं वाहाणा फेडिलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : वाहाणा कां फेडिलीया ? लेया ना : " " जी जी : गोसावीयांवरि रज[१] जाइल[२] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मार्गीं तैसें कांहीं नाहीं : वाहाणा लेओं एति : " " ना जी : गोसावीयांवरि रज एइल : " मग गोसावीं पुढां बीजें केलें : " आतां लेया : " " हो कां जी : " मग लेइली : ।।

## २६१ खांडेगांवीं[१] मळां पुजा

मग गोसावीं खांडेगांवांसि बीजें केलें : मग गोसावीयांसि मळां वाहाळेसि[२] आसन जालें : *नाथोबा भीक्षेसि गेले : तवं भीक्षा न पाळेचि : सेर एक अन्न आलें : मग तैसेंचि गोसावीयांपासि आले : आणि म्हणों लागले : " जी जी : नीच नीच भीक्षा पाळे : कदाचित एकाधा दी एकाधा ठाइं न पाळे : हें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : भीक्षा म्हणिजे पारधि गा[३] : "* ।।

एके वाहाळेसि अपार कणेर : साधीं फुलें वेंचिलीं[४] : मग गोसावीयांसि कणेरांची[५] पुजा जाली[६] : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं पुढें पिंपळगांवासि जा : हें मागिलाकडौनि एइल : " " हो कां जी : " मग साधें निगालीं : गोसावीयांसि नावेक पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं मढपींपळ-गांवांसि बीजें केलें : ।।

---

गोसावीं लाहामाइसातें°. ११. **यमु.** °तरी तुम्हींही चाला : " मग नीगालीं : मग गोसावीं बीजें केलें : ।। १२ **ने.** नीगालीया :

**२६०.** १ **यमु.** °चालतां. २ **यमु.** उधळैल.

**२६१.** १ **अ.** खांड°. २ **गोने.** °पासि. ३ **(प्रव. आ. ९०)**. ४ **अ.** वेचिलें. **यमु.** °माळ केली. ५ **गो.** कणेराचां फुलीं. ६ **यमु. (शोध.)** °सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : साधें व्याप्तिसारें असति : तुम्हां उपेगा जाति : "

## २६२ मढपींपळगांवीं वस्ति : साधींकृत उष्णोदकें पुजा

मग साधें पुढां गेलीं : मढु झाडिला : वाटे गोवरु होता : ते पाएवरि वाट केली : गुरुवातें भरणुकें मागीतलें : तेथ उष्ण[१] उदक ठेविलें : माळ गुरवातें गुंफौनि मागीतली : मग पटिसाळेवरि बैसौनि तीघी गोसावीयांची वाट पाहातााति : नावेक उसीरु[२] जाला : मग लाहामाइसीं म्हणीतलें : "एल्हो : गोसावी तरि एतीचि ना : सीधे दादोसही अंतरले :" साधीं म्हणीतलें : "उगीया असा वो आइया हो : हा इकडील दीसु इकडे निगे तरि[३] गोसावी लटिकें बोलति :" ऐसीया गोष्टी करितााति : तवं गोसावीं बीजें केलें : गोसावीयांतें एत देखिलें आणि साधीं पटिसाळेवरुनि दंडवत घातलें : मग साउमीं गेलीं : स्रीचरणां लागलीं : मग गोसावीं पुसिलें : "साधें हो : हे वाट कवणें केली ?" "जी जी : मीयां :" "हें कां ?" "जी जी : गोसावीयांचेया स्रीचरणांवरि रज एइल म्हणौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें होए :" मग गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन जालें : बाइसें चरणक्षाळण करुं बैसलीं : मग साधीं उष्णोदक आणिलें : ओंटीए माळ होती ते दीधली : मग गोसावीं पुसिलें : "साधें हो : हें उष्णोदक कैंचें ?" "जी जी : या गुरुवातें भरणुकें मागीतलें : मां[४] ठेविलें :" "माळ कैंची ?" "जी जी : गुरुवातें गुंफौनि मागीतली :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : साधें व्याप्तिसारें असति : तुमचेया उपेगा जाती[५] :" "हो कां बावा :" मग गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : ।।

## २६३ भटां पयोवर्त सीक्षापण

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कांहीं अपजवा : जा :" मग भट गेले : पारीं कुणबी बैसले होते : "आहो : तुमचां गांवीं ब्राम्हणांचीं घरें नाहीं : तरि कांही कोरान भीक्षा होआवी[१] :" तीहीं म्हणीतलें : "ना कीती अंनआहारीये असति ? कीती पयोआहारीये असति ?" "ना थोडीं पयोआहारीयें असति : थोडीं अंनआहारीयें असति :" "हो कां : आम्हीं आणुनि :" मग तीहीं[२] कणीक : तुप : तांदुळ : दुध : ऐसें[३] घेउनि आले : "हें अंनआहारीयांलागौनि कणीक तांदुळ : हें पयोआहारीयांलागौनि दुध तुप घेया :" मग ते[४] गेलेयावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ कवण गा अनआहारीयें असति ? आणि कवणें पयोआहारीयें असति ? यें देखों तवं अवघीं अनआहारीयेंचि असति[५] : माहात्मेयां सत्यार्जवां होआवें :" ।।

---

२६२. १ पं. उन्हवणी. २ यमु. वीळु जाला : परि गोसावी न एतिचि. ३ यमु. °माझे गोसावी आने आन बोलती. ४ ने. मीया पाणि—. पं. मग पाणीं—. यमु. मग उन्हवणीं तावीलें. ५ यमु. °ऐसी असति.

२६३. १ यमु. °तीहीं म्हणितलें : "पयोवर्तीये (मु. पयोआहारीये) आहाति कीं अन्नआहारीए ?" "ना थोडीं—. २ नेहीबी. ते. ३ य. आणीले. ४ गोयमु. तेयां. ने. तेयांसि. ५ यमु. °ऐसें का बोलों बैसलासि ? नावेक पाहातासि कां : माहात्मेयां—.

## २६४ साधां प्रसादग्रहण : एकादसीं वर्तखंडन

मग वाइसीं गोसावीयांसि पुजाअवस्वरू केला : मग उपहारु निफजवीला : तीए दीसीं एकादसी : रात्रि वडील जाली : मग गोसावीयांसि ताट जालें : राळांदुळाचा भातु : गोसावीयांसि आरोगण जाली : साधें पासि बैसलीं होतीं[१] : " वाइ : मज प्रसाद देया कां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुमची एकादसी वर्त खंडे[२] ना ? " " ना जी : " " तरि कां घेत असा ? " " जी जी : पोट पवीत्र होआवेया : " " ऐसें होए : बाइ : तीं बोटांतु माए इतुला प्रसाद देया[३] : " मग बाइसीं प्रसादु दीधला : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग तीघीं वाइं पटिसाळेवरि आंथुरिलें : तीया दोघीं नीजैलीया : साधें आंथुरणावरि बैसलीं असति : मग गोसावी पटिसाळेवरि वेढे करूं लागले : साधें पाहों लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : निजा ना कां ? " " हो जी : आतां नीजैन : " मग सेवटिला वेढेया तयांपासि गोसावीं बीजें केलें : मग स्रीचरणां लागों बैसलीं : तवं ओणववे ना : गोसावीं स्रीचरणु उचलौनि तयांचेया निडळावरि ठेविला : मग वाडवेळु धरुनिचि होती : मग गोसावीं स्रीचरणीचेनि आंगुठेनि निजवीली : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : ऐसेनचि[४] नीद्रा करा : उठाल तेधवां एणेंसींचि उठा : " मग साधीं निद्रा केली : मग गोसावीयांसि पहुडु जाला : ।।

## २६५ चीचौंडीए साधांचा टीळा प्रेस्न

मग गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं पुढां चीचौंडीए जा : बीढार करा : पारणेंयाची[१] तेथ भीक्षा करा : तवं हें मागिलाकडौनि एइल : " " हो कां जी : " मग तीयें पुढां निगालीं : मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं चीचौंडीयेसि बीजें केलें : आदीत्याचीया देउळासि : मग गोसावीयांसि पुर्वामुखें दारवठां : आडदांडीएवरि लोंबता स्रीचरणीं आसन असे : तवं साधें भीक्षा करुनि[२] गोसावीयांतें पाहातें असति : तवं गोसावीयांसि साधीं देखिलें : आणि दंडवत घातलें : लाहामाइसीं म्हणीतलें : " हें काइ जालें एल्हो : भलेतेथ दडकरि[३] लोळतीसि ? " साधीं म्हणीतलें : " हें काइ ओ : मीं काइसेया लोळैन ? मीं आपलेया गोसावीयांसि दंडवतें घालीताएं : " मग आलीं : गोसावीयांचेया स्रीचरणां

---

**२६४.** १ **यमु.** °गोसावी त्रिसुधी जेवावया उठवीत होते : ते एकादशि म्हणौनि न एतिचि : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधे हो : एथचा प्रसाद घेयाल कीं ? " " हो जी : " " प्रसादु कां घेयावा ? " " जी जी : पोट पवित्र होआवेया : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एकादशी मोडे ना ? " " न मोडे जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तीं बोटांतु—. २ **अ.** खंडन होइल. **नेपं.** भंगे. ३ **एवा.** तीं बोटामध्यें सामाए इतुला प्रसाद ओपा : ४ **नेहीबो.** ऐसीचि. **एवा.** एणेंसींचि.

**२६५.** १ **हीबीपं.** बारसीची. २ **य.** करितें. **मु.** करीतां. ३ **गोनेयमुहीबीपं.** डुकर. (**मु.** डुकरि)

लागलीं : तवं गोसावीयांचां भाळप्रदेशीं जोंहळेयाचा टीळा लाविला असे[४] : "हें काइ जी : बैलु घेतला ऐसा टीळा लावीला काइ मां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : यां बडुवांतें ग्रहप्रवेसु जाला : बहुत जोन्हळे होआवेया एथ टीळा लावीला :" मग गोसावीं स्त्रीकरें भाळप्रदेसिचे जोन्हळे घेतले : घेउनि साधां प्रसादु दीधला : मग गोसावीयांसि द्रीष्टपुता झोळीया केलीया : ओंटीए कोरका होता तो वीसरीलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : ओंटीए काइ ?" "हो जी : हा कोरुका : गोसावीयांसि दृष्टपुत करुं वीसरलीयें :" मग गोसावीयांसि दृष्टिपुत केला : गोसावीं नावेक प्रसादु केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : आतां पारणें करा[५] : जा :" "हो कां जी :" मग पारणें करावेया गेलीं : ।।

## २६६ साधांतें राहावणें : रंगमाळिके नेमु

मग गोसावीयांसि तेथ पंचरात्रि अवस्थान : एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : या : हें तुम्हां कानमातणें[१] सांघैल :" "जी जी :" मग आलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : तुम्हीं एथ राहा :" "जी जी : गोसावीं आम्हां राहों[२] दीधलें कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं सात बाइया : हें एकलें : बोडिकें : तरि लोकीं[३] वीरोधु कीं : तुम्हीं एथ असा : मां एथ सडासंमार्जन करा : चौकरंगमाळिका भरा[४] : मग मासा एका मंडळीकु बोलाउं पाठवीजैल :" "हो कां जी : जी जी : गोसावी कवणींकडे बीजें करिती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जाइल ऐसें भींगारापाठाराहारें[५] :" "जी जी : भींगार गाउ : पाठार देसु ? कीं पाठार गाउ : भींगार देसु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : भींगार गांउं : पाठार देसु :" मग गोसावीं मढपिंपरीएसि बीजें केलें : तीयें प्रतदीनीं तैसाचि वीधि करीति : ।।

## २६७ नारोबा भेटि : भटां संबंधू विज्ञापन

मढपींपरीएचां मढीं दीस २० अवस्थान : नारोबा[१] करंजखेडा[२] गेले : सामकोसासीं भेटि जाली : न्हाले : जेवीले : रात्रीं निजैले असति : मग सामकोसांतें पुसिलें : "हां आइ : सांपें वर्तमानें : आबैचा नागुदेओ कोठें असे : ऐसें आइकीजे ना ?" "तो[३] स्त्रीचांगदेओसांपें राउळां गोसावीयांपासि असे :" आणि स्तीति जाली : "ते कवणे ठाइं असति ?" "ते

लोळे ऐसी. ४ (ने.). ५ गो. करूं.

२६६. १ ने. कानवाथणें. हीबी. कानीं. २ नेयमु. एओं. गो. असों. ३ गो. लोकवीरूध कीं. ४ ने. एथ बैसौनि यातें आठवा. य. हें देखिलें तैसें आठवा. ५ एवा. °कडे.

२६७. १ मु. नारोबा ते भटाचे मावुसभावु : ते धारासुरीं असति : एकु दीं ते करंजाळीया आले : २ गोने. कर्जाळेया. यपं. करंजाळेया. ३ यमु. "ना तो गोसावीयांपासि असे :" "कोण

चीचवडीए[4] असति : " आणि तैसेचि निगाले[5] : ते अन्होरात्रीं गोसावीयांचेया दरी-सनासि आले : गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि पटिसाळेवरि रीगतां डावेया हाता आसन असे : आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हां कांहीं संबंधीएं होती गा ? " भट नोळखति : " काइ पां ? सर्वज्ञें म्हणीतलें तरि होती : पुसों पां : आगा तुं कोणीं गांउनि एतुसि ? " " मीं धारासीरुनि एतांयें : " " तुझेया[6] पीतेया नांव काइ ? " " वामननाएकु[7] : " " माते नांव काइ ? " " एल्हाइसें : " " जी जी : हा मज माउसभाउ होए : उठि : मज खेव दे : " मग खेव दीधलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " याचे पाए धुआ : कांटे फेडा : वाइसांकरवि जेउं घालवा : " मग पाए धुतले : कांटे फेडिले : वाइसांकरवि जेउं घालवीलें : ।।

## २६८ नारोबातें वाहाणा घेओं पाठवणें

मग[1] गोसावीं उदेयांचि भटोबासातें म्हणीतलें : " वानरेया : यांसि वाहाणा बांधा[2] जा : " " हो कां जी : " मग चामाराचेया[3] घरा घेउनि गेले : तवं एकें ब्राम्हणें आपणेयांलागौनि वाहाणा बांधवीलीया : तो[4] लेयावेया आला : भटीं म्हणीतलें "भटो : या वाहाणा यासि लेववाल ? " " हो कां : " नारोबासि वाहाणा लेववीलीया तवं तेयांचां पाइं निरुतीया ठेलीया[5] : भट लेख देत होते : परि तो ब्राम्हणु नेघेचि मग भटीं गोसावीयां पुढां सांघीतलें : ।।

## २६९ पारिपळ नाम करणें

एकु[1] *नारोबाचे*[2] दामु लागे : तो सेजां गांवीं होता : 'गोसावीयांसि कांहीं दरस केलें[3] नाहीं : तरि जाओं : तयासि कांहीं मागों : ' म्हणौनि नपुसत गेले : बाइ पुसिलें : " हां बाबा : आजि तो बटीकु देखों नां ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : त पारिपळु[4] असे : " मग नारोबा सोळा दाम घेउनि आले : गोसावीयांसि पटिसाळेवरि

---

गोसावी ?" "ना श्रीचांगदेवो राउळ :" मग नांव रूप गुण वानीले : आणि स्तीति जाली ४ **यमुहीबी.** मढपींपरीये. ५ **यमु.** °पुढां आभासु देखति : मार्गीं नइआंतु उतरति : परि पा न पीएति : ६ **यमु.** "तरी तुम्हीं वामनभटांचे पुत्र ?" "ना : हो :" "एल्हकोचे पुत्र ?" "ना हो : "जी जी हा मज°. ७ **गोने.** बाएनाएकु.

**२६८.** १ **यमु.** मग गोसावीं तेयातें वाहाणावीन खीरंडतां देखीलें : मग—. २ **गो.** बांधव **यमुहीबीने.** लेववा. ३ **गो.** चर्मकराचेया. **मु.** चांभाराचेयां. ४ **यमु.** °लेत हो ५ **अ.** ठेवीलीया. **मुहीने.** आलीया.

**२६९.** १ **अगोने.** °एकु दीं एक दामु—. **पं.** एकु दीं गोसावीयांसि नारोबाएं म्हणीतलें : " म दाम एकु जनु लागे : " २ (**यमुने.**). ३ **अ.** जालें. ४ **ने.** परिपळु. **हीबी.** काहीं मेळउं गे

आसन असे : ते गोसावीयांचां स्त्रीकरीं देओं बैसले : तवं बाइसीं म्हणीतलें : “ हें काइ बटीका ? बाबाचां स्त्रीकरीं कैसें ओळगवीतासि[५] ? आसनावरि ठेवि : ” मग आसनावरि ठेवीले : बाइसीं म्हणीतलें : “ बटीकु कैसा वेडा : बाबाचां स्त्रीकरीं ओळगवीतु असे : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : एथची बुधि होइल : मग सहजचि सेहाणा होइल : ” ।।

## २७० वांकीए मठीं अवस्थान : मंडळिका हटवादें जोगीया पराजयो करणें

मग गोसावीं वांकीएसि बीजें केलें : मढीं अवस्थान जालें : एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पूजाअवस्वर जालेयानंतरें : गोसावीयांसि मढामागां[१] आसन असे : तवं जोगी माहात्मा एकु गोसावीयांपासीं आला[२] : गोसावीयांतें पुसिलें : “ आपण कांहीं जोगु जाणिजे ? ” गोसावीं स्त्रीमुगुटें निराकारिलें[३] : “ जोगु नाहीं : जुगुति नाहीं : ध्यान नाहीं : धारण नाहीं : लय नाहीं : लक्ष नाहीं : आसन नाहीं : समादि नाहीं : जोगु नासला : जोगाचे पार कव्हणीं नेणे : जोगु गहनु : हे अवघे चेंदेपोइ[४] : ” मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ मंडळिका : जोगीया काइ म्हणतु[५] असे[५] ? ” आणि नाथोबासि स्तीति जाली : “ ए रे जोगीया : आसनें घालुं : ” म्हणौनि नाथोबा आसनें घालों लागले : ते तो सोयेही नेणें : मग तेणें म्हणीतलें : “ हें काइ साधन[६] म्हणां : ए डोहीं देवता असे : घाणा असे : धवळा बैलु असे : या डोहाआंतु रीगों[७] : ” तो माहात्मा नाथोबायें पाइं धरिला : “ चाल रे जोगीया : दाखवि : ” म्हणौनि फरफरकरि[८] काढिला : “ वारिजो जी : वारिजो जी : ” म्हणौनि काकुलती आला : मग नाथोबायें डोहांतु उडी घातली : “ कें आहे रे जोगीया धवळा बैलु ? कें आहे रे जोगीया घाणा ? कें आहे रे जोगीया देवता ? ” म्हणौनि बुडिया देति : *अवघा डोहो डहुळीला*[९] : “ *नाहीं रे जोगिया देवता*[१०] : तुं लटीका : तुझा गुरु लटीका : ” ऐसा आवघा डोहो डव्हळीला[९] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ मंडळिका : मंडळिका : या : ” मग आले : मग ते माहात्मे भूइं रेखा[११] काढीत राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ माहात्मेयां ऐसें न म्हणीजे हो : हे बहुरत्न वसुंधरा : ” ।।

## २७१ पारेगावीं जोगेस्वरीं वस्ति : अभीयोगें वेव्हारा रक्षणें

मग गोसावीं पारेगांवां बीजें केलें : गोसावीयांसि जोगेस्वरीचां चौकीं आसन जालें : वेव्हारा एकु[१] : तो तीए नासीसि लपाला होता : गोसावीयांतें देखिलें : मग

---

५ **गो.** °तोसि.

**२७०.** १ **एवा.** लींगाचेया देउळामागां. **यमु.** °पासि नाथोबा असति. २ **यमु.** °नाथोबातें म्हणीतलें : “ हे काहीं हटु जाणति ? ” गोसावीं श्रीमुगुटें नीराकरीलें : मग गोसावीयांतें पुसिलें—. ३ **यमु.** °मग हट निरूपुं आदरीला : “ हटें पींडु : पींडें प्राप्ति : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ मंडळीका—. ४ **मुनेहीबीपं.** चेंदेवाइक. **य.** चेंदेवाइल. ५ **एवा.** म्हणते. ६ **गो.** साधणुक. ७ **यमुनेपं.** रीगे (**मु.** पव्हे) तो महात्मा : ८ **यमुहीबीनेपं.** फरफरां. ९ **य.** धांडुळिला. १० (**यगो.**). ११ **गोनेयमुहीबीपं.** रेघा.

**२७१.** १ **यमु.** °तीए गाविचा : तयातें मारावेया दंदी पाठी लागले : पळतु गोसावीयांपासि आला :

आला : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागला[२] : गोसावीयांजवळि बैसला : गोसावीयांपुढां सांगों लागला : " जी जी : मज पुस्चळकीचा[३] अव्हळाओ आला : तो मी आजि तीन दीस ए नासीसि लपालां असें : मज तीन उपवास : " *सर्वज्ञें म्हणीतलें :* *" कळियुगीं तस्करत्व पुंश्चळत्व हा धर्म स्वरूपीं न वर्त्ते ऐसा विरळा : "* " ते कां जी ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : " जियेचा एक अवेवु देखिलेयां अलगाचिये मुनैवरि घाली : पाठी सरणावारि तियेचें सर्वांग देखे : परि आड पालव वोडउनि जाये : कां जें माजवी ते तेथ नाहीं[४] : "* सर्वज्ञें म्हणीतलें : " जा : आतां तुमची कव्हणी वास न पाहे : " " हो कां जी : " " जी जी : मीं गोसावीयांलागि उपाहारु घेउनि एइन : " गोसावी वीनवणी स्वीकरिली : मग तो उपाहारु घेउनि आला : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला[५] : ।।

## २७२ वांकीएहुनि मीरडां रेमेस्वरीं वसति

उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वांकीएसि बीजें केलें : मढीं उपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावीं भीक्षाअवस्वरीं मीरडेयासि बीजें केलें : मीरडां रेमेस्वरीं वस्ति जाली[१] : ।।

## २७३ मांडवगणीं सीधनाथीं वस्ति : भर्जित चींचा भोजन करवणें

मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं मांडवगणां बीजें केलें : सीधनाथीं अवस्थान[१] जालें : गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु जाला : मग भक्तजन जेविले : एक चींचा तोडुं जातातिः चींचा तोडतो खाओं लागले : गोसावीयांसि उपहुडु जाला : मग गोसावीं तेथ बीजें केलें : देउळाचे दक्षिणिले कोणटां आसन जालें : गोसावीयांसि आवघां दंडवतें घातलीं : स्रीचरणा लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसीया चींचा नको खाओं कीं : नको गा खाओं : आंवट लागैल : भाजभाजुं खा[२] : " " हो कां जी : " मग वीसीदेओ आणवीला : जगटीं घालवीलें : मग भाजभाजुं खादलीया[३] : ।।

---

२ **यमु.** °गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : राखावें जी : सरण आलां जी : " तवं ते आं
३ **मुगो.** °कैचा. **नेयही.** पुश्चळी(ळै)चा. ४ (**प्रव. आ.** ११). ५ **यमु.** (**एवा.**) गोस सीष्टाइ केली : मग ते नीगाले :

**२७२.** १ **यमुहीबीपं.** प्रतीत यानंतर ' घोगरगावीं वसति '. ही आदि आहे. त्यानंतर ' मांडवग वस्ति '.

**२७३.** १ **अगोहीबीपंने.** (**प्रवा.**) वस्ति जाली. २ **यमु.** °मग बाधति ना : ३ **पं.** °" जी ज भाजलीया चींचा कैसीया गोड लागति आहाति जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पुरुखू प्रएत्नीं दैवाचें स कीं गा : " ।।

## २७४ मंडळीकु साधांतें बोलाउं पाठवणें

मग तीसरां दीं उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : तुम्हीं साधांतें बोलाउं[1] जा : हें भींगारा जाइल : तेथ तेयांतें घेउनि या :" "हो कां जी :" मग नाथोबा तेयांतें बोलवावेया[2] निगाले : ।।

## २७५ अरणग्रामीं गुंफे अवस्थान

मग गोसावीं भींगारासि[1] बीजें करूं आदरीलें : *आधा एकु मार्गु पातले*[2] : मग एका गावां एकि वाट निगाली ते भींगारा जाए : एक वाट अरणग्रामासि[3] जाए : ते वाटेचां बेझां गोसावी उभे राहीले : सर्वज्ञें म्हणीतलें : "या वाटा जें जावें तें या वाटा कां न वचावें ?" मग अर्णग्रामाचेनि मार्गें बीजें केलें : भटांतें म्हणीतलें : "वानरेया : ए गावीं साधांसि निरोपु ठेवा :" "हो कां जी :" मग भट पारीं बैसले होते तयांपासि आले : मग म्हणीतलें : "आहो : आमचीया पांच बाइया : एकु माहात्मा : ऐसीं या वाटा एताति : तरि तयांपासि ऐसें सांघावें : 'तुमचे गोसावी भींगारा न वचतीचि : ते अर्णग्रामासि गेले :'" मग मागिलाकडौनि साधें आलीं : मग तेहीं सांगीतलें : "आइ : तुमचे गोसावी भींगारा न वचतीचि : ते अर्णग्रामा गेले : तुमतें अर्णग्रामा बोलावीलें आहे :" "आलेया : पाठा निरोपु सांघावेया आला होता कीं नागदेओ ?" तवं ते हांसिले : "काइ आलेया हांसता ? नागदेओ तयासि दोनि डोळे : पाठेयासि एकु डोळा : तो धाकुटा होता : तो पाळणेंयावरुनि पडिला : तें जासलवट रुपलें : तो डोळा फुटला :" ते अधीका हांसिले : "हें काइ आलेया : हांसतासि ? तुम्हां काइ मायाबहीणी नाहीं ?" "ना आइ : आम्हीं पाठा काइ जाणों ? नागदेओ कोणु म्हणौनि काइ जाणों ? तीं नीरोपु सांघीतला तो तुम्हांपुढें सांघीतला :" ।।

गोसावीयांसि नाराएणडोहीं वस्ति जाली[4] : नाराएणडोहीं बाइसीं : भटीं भीक्षा केली : गोसावीं पुढां अर्णग्रामा बीजें केलें : ।।

गोसावीयांसि पुर्विले दारवठाचीए पौळी : जगतीचा दारवठाउतरिले सोंडीएवरि आसन जालें : गोसावीयांचें आंगीटोपरें घामैलें : तें वाळत घातलें : बाइसें : भट : भीक्षा करुनि आलीं : गोसावीयांसि द्रीष्टपुता झोळीया केलीया : मागिलाकडौनि साधीं तीएचि गांवीं पारणेयांची भीक्षा करुनि आलीं : ।।

---

**२७४.** १ **एवा.** आणुं. २ **यमुने.** बोलावुं. **ही.** आणावेया.

**२७५.** १ **अ.** अर्णग्रामासि बीजें केलें. २ **(शोध).** ३ **अगो.** चीचुंडीए. ४ **अगोयमु.** °एक म्हणति : नाहीं.

## २७६ सोंडीएवरि द्रळसबाइसां सीक्षापण

गोसावीयांसि सोंडीएवरि आसन असे : द्रळसबाइसांचें[१] आंग घामैलें असे : तरि "घामैलेनि आंगेसीं काइ गोसावीयांपासि जाओं ? हातपाए धुं[२] : मग जाओं :" पुढां वाहाळ : तेथ[३] हात काखांचीए ठाउनि धुताति : तवं बाइसीं देखिलें : "वावा : काइ जालें यां रांडांसि : आवघीया[४] वाहीया : काखांची मागि : वाहीरि घातली :" मग आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ बाइ : एथौनि हें देखताए : हा अवघा लोकु देखतु असे : ऐसें न कीजे कीं : लज्यारुप धर्म स्त्रीयांसि रक्षण[५] :"॥

मग गोसावीयांसि नागनाथाचां देउळीं दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : मग[६] गोसावीं वाहीरवासु दीधला : तेयावरि अवघेयांचीया[७] झोळीयांचा काला केला[८] : मग गोसावीयांसि आरोगण जाली : आवघेयां भक्तजनां पांति[९] जाली : मग गोसावीयांसि चौकीं पहुडु जाला : उपहुडु जाला :॥

भटांतें गांवांआतु बीढार पाहावेया पाठवीलें : भट गांवांतु बीढार पाहावेया गेले : तवं गांवांतु बीढार नाहीं : मग मळेयांआंतु आले : तवं तेथ गुंफा असे : मग गोसावीयांपुढां सांघावेया आले : "जी जी : गांवांतु बीढार नाहीं : मळेयांतु गुंफा असे[१०] :" मग गोसावीं तेथ बीजें केलें[११] : भटांकरवि गुंफा उघडवीली : झाडवीली : मग गोसावीयांसि तेथ आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : वाइसांकरवि एथचि बीढार आणवा :" मग बाइसीं तेथचि बीढार आणिलें : मग गोसावीयांसि तेथचि अवस्थान जालें : ॥

## २७७ स्वजनअभियोगें गुजरा नार्यळ कथन

मग जया गुजराची[१] गुफा तो आला : तेणें आसुचें नार्यळ पुरिलें होतें : तयाचा मैत्रु जाणे : तो घेउनि गेला : तो पाहावेया आला : तवं तेथ नार्यळ नाहीं : "माझें नार्यळ एथ होतें : तें तुम्हीं काढिलें : तें माझें देया :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : यासीं

---

**२७६.** १ **मु.** द्रविळास°. **गोय.** द्रळास°. **हीं.** द्रवडा°. **ने.** दुर्लभा°. **बी.** दुरळास°. २ **यमुगोनेही.** धों. ३ **यमु.** °कोपराचीए ठाउनि हात दात धुतले : ४ **यमु.** **(ही.)** आवघीया बाइ(हि)यांची मागि—. **गो.** आवर्घाया काखांची मागि°. **ने.** आवघीया बाहिया काखा उघडिया : बाहिरि घातलिया : ५ **हीबीनेपं.** °आपुली मांडी परपूरुखा देखों न दीजे कीं :" ६ **ही.** °बाइसीं गोसावीयांचा बाहीरवासु पसरीला. **ने.** °पसरविला. ७ **यमु.** °झोळीया ठेविलीया. ८ **यमुने.** °मग बाइसीं गोसावीयांलागि बरवे पदार्थ नीवडीले : एराचा . . .काला केला. ९ **यमुहीबीगोने.** पारणें(णीं). १० **यमु.** °परि दार अडकीलें असे. ११ **अ.** °**एक म्हणति** : गोसावीचि तेथ लघु परीहारा बीजें केलें : तवं तेथ गुंफा देखिली : सरीसे भट होते : गोसावीं तेथ बीजें केलें :

**२७७.** १ **ने.** गुरुवांची.

वेव्हारु सांघों[२] जा :" भटीं म्हणीतलें : "चाल : आम्हीं तुम्हीं तेव्हारु सांघों जाओं : मग वेव्हारें होइल तरि देओं :" मग भट वेव्हारु सांघावेया गेले : ॥

गोसावीयांसि मागुतें तीएचि सोंडीएवरि आसन जालें : मग पांचै वाइया गोसावीयांच्या दुपाहारिचा पुजाअवस्वरु पाहाति : मग आंकोलनेरा भीक्षे जाति : उदेयांचि गोसावीयांचेया दरीसना एति : मग तीया नीद्रास्थानासि गेलीया : मग घरिचां[३] तीघीं तीन वीडे दीधले : एरीं घेतलें : खादलें : साधें न खातिचि : ॥

मग उदेयांचि गोसावीयांचेया दरीसनां आलीं : गोसावीयांसि सोंडीएवरि आसन असे : आलीं : गोसावीसियां दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : साधीं गोसावीयांसि वीडा ऊळगवीला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ साधें हो : गुजराचेया नारेळाचा वेचु केला :" "नारेळ काइसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : *तांबोळ कैचें*[४] ? गुजराचें नार्यळ गेलें : तो आळु[५] आला : हा नव्हे वानरा वेव्हारु सांघतु असे[६] ? " म्हणौनि श्रीकरें भट दाखवीले : तवं साधीं म्हणीतलें : "मरतुं मरतुं तीयें ऐसींचि[७] : आमचे काइ करीती नार्यळ ? आमचे देतां[८] नेघति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ साधें हो : तुम्हीं संसारत्रसीतें कीं : तुम्हीं भलेयाचीया चाडा ईश्वरा सरण रीगालीं असा : आणि प्राणीयांतें 'मरतु का : मरतु कां :' ऐसें म्हणत असा ? आलींति अपराधा : ठाका आतां एकें पायें उभीं :" मग एकें पायें उभीं ठाकों जाति तवं दडकरि पडति : एकें पायें उभेयां न ठकवे : मग वाइसीं वीनवीलें : "वावा : इयेसि[९] एकें पायें उभेयां[१०] न ठकवे : आतां आणिकु दंडु कीजो :" मग गोसावीं सेंभरि दंडवतें वीहीलीं[११] : मग दंडवतें घालुं लागलीं : मग वाइसीं वीनवीलें : "वावा : मीं घालों लागों ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "लागा :" मग बाइसें दंडवतें घालुं लागलीं : दंडवतें घातलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि तुम्हीं ऐसेयां होआवें कीं : हा जनु तुमतें डोइये डोइये मारील : परि तुम्हीं डोइचि ओडवावी कीं : *तुम्हां मारीता पुजीता समान होआवा कीं गा : मुक्तीची चाड तेणें मुंगीए विरू न चिंतावें :*" "हो कां जी" *म्हणौनि*[१२] मग गोसावीयांचेया श्रीचरणां लागली : ॥

मग भटोवासीं तो वेव्हारें नीरोतरु केला : "*याचें नारीएळ*[१३] आम्हीं श्रृतें[१४] नेणों : भेदें नेणों : *वोस गुंफा ते हा सांडौनि गेला :*" *ऐसा परीहारु दीधला* [१३] : मग अवघां *महाजनीं*[१५] म्हणीतलें : "आगा : हे काइ करिती तुझें नार्यळ? तुं यांचेया गोसावीयांसि सेणेंमातीया आंग माखौनि आड पड : जाए : मग ते तुझेया नार्यळाची

---

२ **गोहीबीनेपं.** सांघा. ३ **यमु.** °ब्राह्मणीं तयांसि वीडे दीधले : तीहीं घेतलें : एरीं खादले : साधें न खातिचि. ४ **(यमु.)**. ५ **यमु.** अभियोगु. ६ °**एवा.** वेवहारु सांघते. ७ **यमु.** नीदैवें ८ **गो.** दीधलेयां. ९ **अ.** यांसि. १० **अहीबीपं.** उभें. ११ **अ.** घालवीलीं. १२ (**प्रव. आ.** ६४, ६५). १३ **(यमु)**. १४ **अ.** श्रृत. १५ **(नेपं.)** **यमु.** गावीचां ब्राह्मणीं. **हीबी.** सभा

सुधि सांगती : " मग भट पुढां आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग आवघी वेवस्ता सांघीतली : मग तेणें माहात्मेनि सेणमातीया आंग माखिलें : एउनि गोसावीयांसि आड पडिला : " जी जी : मज बोलु लागला : माझेया नार्येळाची गोसावीं सुधी सांघावी : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मेया : काया पाखाळा जा : " मग तो आंग धुनि आला[१६] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि म्हणिजैल तें कराल तरि तुमचेया नार्येळाची सुधि सांगिजैल : " " हो कां जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें नार्येळ तुमचा मैत्रु घेउनि गेला : तेणें आपुलीये मातेहातीं ठेवावेया[१७] दीधलें : तयां आंतुल तेणें एकि[१८] आसु वेचिली असे : तेयातें ते न मगावी : ते अमुकीए उतरंडी : अमुकीए मडकां असे : हे खूण सांघा : आणि देइल : " मग ते खूण सांघीतली : मग तीया नार्येळ दीधलें : पाहाति तवं एकि आसु नाहीं : मग गोसावीयांलागौनि पाइली एकि कणीक : पाइली एकि तांदुळ : पसा एकु दाळि : सुकलें ऐसें वांगें : एकु वीडा : ऐसें घेउनि आला : बाइसां नावेक न मनेचि : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : घेया : एथिचेया उपयोगा नेया : " मग बाइसीं घेतलें[१९] : ॥

## २७८ साधांचा चणकसाकु भोजन

एकु दीं गोसावीयांसि उदयाचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें : गुंफे दखिणे[१] सेत : गोसावीं तेउतें वीहरणा बीजें केलें : तेथ चणा होता : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : जा चणा मागा : " " हो कां जी : " मग सेतकरीयापासि गेलीं : " आलेया : नावेक चणा दे कां : " " हो कां : आइ घेया : " " हो कां : " गेलीं : तीयें उपडीति : मुळीया टाकीति : चणा घेति : " आइ : हें काइ करीता ? " " आलेया : मां मीं खूडुं नेणें कीं : " तेणें म्हणीतलें : " ए आनुन आन करिती : " तेणें खूडुनि दीधला : मग घेउनि आलीं : गोसावीयांसि द्रीष्टपुत केला : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : गांवांतु जा : ब्राम्हणाचां घरीं रांधा : " " हो कां जी : " मग ब्राम्हणाचेया घरा गेलीं : तेयातें तौली[२] मागीतली : तेल हींगु मीरीयें मीठ : मग आधा[३] फोडणियां रांधिला : आधेयाचें पीठें केलें : तयांतें कणी वाटुनि मागीतली : मग घेउनि आलीं : मग बाइसांहातीं दीधला : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : बाइसीं ताट केलें : मग ताटीं दोन्हीं साकवतीया ओळगवीलीया : मग गोसावी आरोगण करुं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " साधें हो : हें काइ ? " " जी

म्हणीतलें. १६ अ. °धों गेला. १७ **एवा.** ठेउं. १८ **एवा.** दोनि. . . .वेचिलीया. **एवा.** °आसु चोरुनि घेतली : वेचिली. १९ **पं.** °मग सर्वज्ञें म्हणीतलें : " जीव अभिलाखें बांधले असति : कर्मवसेचें तें कर्मचि करील : बांधौनि करील : दैववसेचें तें एथची प्रवृत्ती होइल कीं बाइ : " ॥

**२७८.** १ **यमुहीबी.** पसिमे. २ **अ.** तउली. ३ **अमु.** साधीं. ४ **यमु.** " साधे हो (**य.** साधेन्हो) चणा नीका जाला : खार नव्हेचि : आलोणी नव्हेचि : करपेचि ना : हीरवा न ठकेचि : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : साधें सुगरीएं (**य.** सुग्रहीयें) असति : तुम्हां उपयोगा जाति : "

जी : एकीचि साकवती काइ करूं ? म्हणौनि आधेयाचें पीठें केलें : आधा फोडणीयां रांधिला : " मग गोसावीं पुसिलें : " तेल मीठ कैंचें ? " " जी : तेयांतें मागीतलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : साधें प्रयोजकें असति : तुमचेया उपेगा जाती : " " हो कां बाबा : " " बाइ : चणा नीका जाला : अलोणीं नव्हेचि : सीजला : कर्पेचि ना : " मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## २७९ लाहामाइ ज्वरीं पडिताळणें

एकु दीं गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : मग पांचै बाइया भिक्षेसि निगों बैसलीया : तवं लाहामाइसां ज्वरु[१] आला : मग साधें लाहामाइसांपासि राहीलीं : एरी बाइया गेलीया : मग गोसावी बाहीरि निगाले : तवं साधें[२] आलीं : लाहामाइसें पौळीपसीमे पींपळु : तयासि पारु : तया पारावरि असति : गोसावीं तेथ बीजें केलें : साधें स्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं भीक्षे कां न वचाचि ? " " जी जी : आइएसि[३] ज्वरू आला : " " जा : हें तुमचीए आइएसि[३] पडिताळील[४] : " " हो कां जी : " मग साधें भीक्षेसि गेलीं : मग रात्रीं गोसावीं तेयां पडिताळावेया बाइसां पाठवीलें : मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं पडिताळावेया बीजें केलें : मग तीयें म्हणति : *" जी जी : मी गोसावीयांचे श्रीचरण प्रक्षाळीन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " अशक्तासि विधि नाहीं[५] : "* तवं तीयें म्हणति : " जी जी : तरि माझेया नीडळावरि गोसावीं स्रीचरणु ठेवावा : " मग गोसावीं तेयांचेया निडळावरि स्रीचरणु ठेविला : मग तीयें म्हणति : " जी जी : ऐसा ज्वरु मज जन्मोजन्मीं होआवा : जें मज गोसावी पडिताळिती : " मग गोसावीयांसि आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुम्हां काइ होआवें ? " " जी जी : दुध तुप न लगे[६] : ऐसा प्रसादु होआवा : आणि चरणउदक होआवें : " मग दुध तुप न लगे ऐसा गोसावीं तयांलागौनि प्रसादु पाठवीला : चरणोदक तें उष्णोदक : ऐसें प्रतदीनीं तयांसि होए : आणि प्रतदीनीं पडिताळीति : ।।

## २८० साधां सोमवारीये पुढारु

एकु दीं गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं साधांतें म्हणीतलें : " साधें हो : तुमचीए मातेचा ज्वरु[१] जाएचि ना[२] : आता हें ग्रामांतर

**२७९.** १ **गो.** जरु. २ **यमु.** °आणि लाहामाइसें आली. ३ **यमु.** आइसि. **अ.** आसि. ४ °**एवा.** तुमचीए मातेतें पडिताळील. ५ (**प्रव. आमा.** २८). ६ **यमु.** °चरणोदक तें उदक : ताटीचा प्रसाद तें पथ्य :

**२८०.** १ **गो.** जरु. २ **यमु.** °तरि आता यासि अनोज्ञा : " साधीं म्हणीतलें : " जी जी. . . .

करील : " " जी जी : गोसावी कवणीकडे बीजें करिती ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें भींगारा[३] जाइल : " " जी जी : मीं सोमवारीए चुकैन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुमची सोमवारी भींगारीं देइजैल : " " हो कां जी : " मग श्रीचरणां लागलीं : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## २८१ भींगारीं आदीतीं अवस्थान : साधां सोमवारी देणें

मग गोसावीं भींगारा बीजें केलें : आदीतीं अवस्थान जालें : मग सोमवारी आली : मग साधीं म्हणीतलें : " आइ : तुझा जरु जाएचि ना : आणि मज गोसावी सोमवारीए पुढारले असति : तरि मीं जाइन : तरि तुं राहे : " " ना हो कां : " मग साधीं परीवंटु बांधला : आणि तीयेंहीं उठीलीं : तीहीं परीवंटु बांधों आदरिला : "हें काइ आइ? तुं कां परीवंटु बांधतेसि[१] ? " " ना एल्हो : मीं चालैन : चालवैल तरि चालैन : मग न चलवे तरि तेथ तुं सांडुनि मातें जाए : " " ना हो कां : " मग तीया[२] नीघालीया : भींगारा आलीया : मग चीचवंडीए नीबीया[३] जोगनाएकाचे तीं तीं रुवांचे गहुं दळिले होते : तयांतें एकी ठाइं बैसवीले : मग साधें हाटांतु गेलीं : तीं रुआंचीया तीनि माळा घेतलीया : तीं रुआंचे तीनि वीडे घेतले : तीं रुआंचे तीनि भेले[४] घेतले : एतें असति : तवं तान्हैलीं : एकां ब्राह्मणाचेया घरा पाणीं पेयावेया गेलीं : हातिचे भेले ओसरीएवरि ठेवीले : " आलीए : पाणीं पेओं सोए कां ? " तीयां पाणीं पेवेया सुदलें : पाणि पेओं बैसलीं : तवं वासरुं आलें : तेणें एकु भेला खादला : " आतां काइ आइचा खादला म्हणों : कीं बाइएचा खादला म्हणों ? खादला माझा नीदैवेचा : " मग आलीं : तीयां दोघीं हातीं माळा वीडे गुळाचे भेले दीधले : मग गोसावीयांचेया दरीसना आलीया : गोसावीयांसि आदीत्याचां देउळीं आसन असे : आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : मग स्रीकंठीं माळा घातलीया : आसनावरि वीडे : गुळाचे भेले ठेविले : साधीं माळ घातली : आणि वीडा ॲळगवीला : मग बैसलीं : मग गोसावीं पुसिलें : " हें काइ साधें हो : एहीं एथ गुळ संपादिला : तुम्हीं एथ गुळ संपादाचि ना तें काइ ? " " जी जी : तें जालें ऐसें : हाटा गेलीयें : तीं रुवांचीया तीनि माळा घेतलीया : तीं रुवांचे तीनि वीडे घेतले : तीं रुवांचे तीनि भेले घेतले : एतीयें होतीयें : तवं तान्हैलीयें : मग एकां ब्राम्हणाचेया घरा पाणीं पेयावेया गेलीयें : वोसरीयेवरि तीन्हीं भेले ठेविले : पाणीं पेओं बैसलीयें तवं वासरुं आलें : तेणें एकु भेला खादला : आतां काइ आइएचा खादला म्हणों : कीं वाइएचा खादला म्हणों : खादला

---

३ ने. °पाठारा.

**२८१.** १ **गो.** बांधतीएसि. **मुने.** °तीसि. **य.** °तासि. **पं.** बांधिताएसि. २ **यमुगोनेहीबी.** तीघी. ३ **यमु.** नीबेया. **गो.** नींबेया. ४ **गोनेय.** °गुळाचे°.

माझा नीदैवेचा :" सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तुम्हीं काइसेया नीदैवें होआल ? हें तुम्हां गुळु देइल :" " जी जी : गोसावीयांचाचि गोसावीयांसि काइ देयावा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : कव्हणातें कांहीं असे[५] ? हें सकळै देवाचें कीं : मां देओ दे तें आपुलें :" " हो कां जी :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें कांहीं गुळ असे ?" " हो बाबा : असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " घेउनि या :" मग बाइसीं गुळु आणिला : मग गोसावीं आंजुळी घेतला : गोसावीं साधांचीए आंजुळी घातला : ते उमाळ आंजुळि भरली : साखर गुळु मग आसनावरि ठेविला : मग दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : घेया : एथिचेया उपेगा नेआ :" मग बाइसीं गुळु ठेविला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : हें तुमची सोमवारी लागे : ते दीधली हो : आतां तुम्हां अनोज्ञा देओं ना[६] ?" " ना सर्वेचि काइ जी ?" म्हणौनि काकुलति करुं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें निगालेंचि होतें : परि तुमची सोमवारी लागे म्हणौनि राहीलें[७] :" " जी जी : तरि गोसावी कवणीकडे बीजें करिती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें जाइल सितळोदकाकडे[८] :" " जी जी : पुनरपि दरीसन कवणी ठांइं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " प्रतिस्थान प्रांतीं :" " हो कां जी " सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : तरि तुम्हीं एकली जाओं जाणाल ?" " ना जी नेणें :" मग गोसावीं विधि वीहीला प्रतिस्थानपर्यंत गांवं सांघीतलें[९] : " साधें हो : अटन तें निरुद्देशें करावें : गांउनि गांवां जाइजे : उदीयांचि उठीजे : मार्गीं उभेयां ठाकिजे : सांघातु पाहीजे : मागीले म्हणेति पुढीलांची : पुढीले म्हणेति मागिलांची : ऐसेंयां जाओं लागिजे सीवनचींचना आपुला मोटळा गावांबाहीरि घालिजे : गोरुवें सीवार भरति : माणुसें रान भरति : ऐसेयां आपण जाओं लागिजे : झाडातळीं विजन करावे : अतिअसुरें स्थानीं नसावें : बाइ : देउळीं नीद्रा न कीजे : ऐसे एक जीव असति जे वेडींपीसीं नुरेति : साधे हो : उदीयांचीये पाहारीं भीलांचीये पाडीएसि भय नाहीं[१०] : *स्त्रियां सजन विजन होआवें : कवाडाचां* देउळीं *न बैसावें : समएस्थानीं न बैसावें : साधासंताचीए वोसरीए बिढारू कीजे : असावें ऐसें तोंडावरि फाळुकें घालौनि[११] :"* मग तीए दीसीं गोसावी राहीले : एरीं दीं[१२] बीजें केलें : ।।

---

५ **यमु.** °हा जनु चोरु होउनि खातु असे. ६ **यमुगोने.** (°**एवा.** :) आतां यासि अनोज्ञा होए ना ?" ७ **यमु.** °तुम्हीं गंगातीरा जा. ८ **यमु.** (**शोध.**) पारनेराकडे. ९ (ही परशरामबासांची वासना आहे. रामेश्वरबासांच्या वासनेत 'गांउनि गांवा जाइजे' इत्यादि विधि पुढील वाक्यात आला आहे. दोन्ही वासना संहितेत अंतर्भूत केल्या आहेत). १० (वरील वचने साधांला निरूपिल्याचे **आमा.** ६४ व नंतरच्या **प्रव.** मध्ये स्पष्ट आहे. त्यातील फक्त आरंभीचे व शेवटचे वचन पोथ्यात आहे. अर्थात मधली वचने तेथे अपेक्षित आहेत. **पं.** प्रतीत ती तशी आढळतातही. म्हणून ती मुळात समाविष्ट केली आहेत.) ११ (**प्रव. आ.** २६९–२७२; **आमा.** ४५). १२ **यमु.** °साधें गंगातीरा नीगाली : गोसावीं पैल ठावोवेन्हीं अनुवर्जीत बीजें केलें : मग ग्रामांतर केलें : ।।

## २८२ भिंगारीं देमतीप्रश्नभाषणीं ज्ञान भक्तिवैराग्य निरूपण*

[ देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : गोसावी विहरणा बीजें करिती तरि गोसावीयांसि काइ वैराग्य करावें असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : ज्ञान : भक्ति : वैराग्य : तीन्हीं ईश्वरींचि आति : " देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : पुराणीं ज्ञान : भक्ति : वैराग्य : तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " ज्ञान : भक्ति : वैराग्य : एकें मोचकें : एकें अमोचकें : जीवासि सकळही संपत्ति तिया असंपत्ति : जीवाची परमेश्वर संपत्ति : ज्ञान : भक्ति : वैराग्य : इयें तीन्हीं एकें काळीं न होति : ज्ञानापसि प्रेम उत्तम : "।। ]

## २८३ खेइगोइप्रति चतुर्विध दान निरूपण*

[*एकु दीं खेइगोइ गोसावीयांचेया दर्शना आलीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : गोसावीं तयासि चतुर्विधदान निरूपण केलें*[1] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : परमेश्वरापासौनि चतुर्विध दान आति : कव्हणी एक समुद्रासि उद्यमा जाति : एक कवडे देखति : ते कवडे भरीति : ते कवडांचि धाले जाति : एक म्हणति : ' इये समुद्रीं माणीकें मोतीयें असति : ' ते परते जाति : ते माणिकें मोतीयें भरीति : ते तेणेंचि धाले जाति : एक म्हणति : ' हा समुद्रु : इये समुद्रीं काइएक नसे ? इये समुद्रीं अनर्घें रत्नें असति : ' म्हणौनि ते राहाति : अनर्घा रत्नांचा उदीमु करीति : अनर्घें रत्नें घेति : गावांसि येति : रायासि भेटति : रावो रत्नपारखी बोलावी : ' यांसि रूप काइ ? ' ते म्हणति : ' यांसि रूप नाहीं : यांसि रूप करी तयाचीये जीव्हें कुष्ट लागे[1] : ना इयें अमोलीकें रत्नें : ' मग तयांसि वोवाळणी पडे : ते तयांसि खावेया होए : तयांचीं रत्नें तीयें तैसींचि असति : एरांसि केतुले एक दीं खावेया जालें : मग नाहीं : तैसें परमेश्वरू संनिधानीं असतां एक सील्पवीद्या धाले जाति : एक अपरोक्ष विद्या धाले जाति : एक म्हणति : ' हा परमेश्वरू : ये परमेश्वरीं काइ एक नसे ? परमेश्वरीं ब्रह्मविद्या असे : ' ते ब्रह्मविद्येचा उदीमु करीति : तयांसि ब्रह्मविद्या होए : मग तयाचे यातायात पारुखति : " *" जी जी : " म्हणौनि श्रीचरणां लागलीं : मग गेलीं :* ।। ]

---

**२८२.** *(**प्रव. आमा.** २४० आणि **विमा.** २८, ३०).

**२८३.** *(**दृपा.** ८. 'समुद्राचा दृष्टांत'. 'खेइगोइप्रति भिंगारीं निरूपिला'—**दृस्थ.** भिंगार येथील लीळात 'खेइगोई'ची लीळा नाही. पण तेथे ती असली पाहिजे, हे **दृस्थ.** व इतर पोथ्यांतील उल्लेखावरून निश्चित वाटते. 'समुद्राचा दृष्टांत' अंतर्भूत करण्यासाठी ही स्वतंत्र लीळा म्हणून घातली आहे. यावरील दार्ष्टांतिक माझ्या मतें स्वामींचे होय. म्हणून मुळातच अंतर्भूत केले आहे. या लीळेतील तिरप्या अक्षरांतील वाक्ये संपादकाची).

१ **एवा.** तयाची जीभ झडे.

## २८४ नेपतीए वस्ति

नेपतीए वस्ति जाली ।। एकी वासना ।। नालेगांवीं : ।।

## २८५ पारनेरीं सीतळोदकीं अवस्थान

मग गोसावीं पारनेरा बीजें केलें : सीतळोदकीं : सोमनाथीं : पंचरात्रि किं सप्तरात्रि अवस्थान जालें[१] : ।।

## २८६ गुंफा करवणें

मग गोसावीं तेथ गुंफा करवीली : गोसावी तेथ उभे ठेले : " एथ गुंफा करा गा : " "जी जी : " भक्तजनीं भींती घातलीया : डाहाळे मोडौनि गुंफा केली[१] : गोसावीयांसि लींगाचीए देउळीसि पुजाअवस्वरु होए : दुपाहारिची आरोगणा होए : चौकीं पहुडु होए : ।।

## २८७ भक्ता पाणिकोंडानिमीत्यें प्राएण : गुंफे रीगवणी : नीगवणी

एकु दीं गोसावीयांसि आसन असे : भक्तजन जेउनि आले : गोसावीं पुसिलें : " काइ गा पाणिभातु जाला ?" "हो जी : जाला पाणिकोंडा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तो कैसा ?" "जी जी : भीक्षा करुनि एइजताए : ते राळेयांची धापटी[१] एताए : तीएआंतु पाणि घालीजताए : मग सीतें खालि राहातातिं : वरि अवघा कोंडा एतु असे : " *सर्वज्ञें म्हणीतलें : "नीरसें विरसें अन्नें सेविजति*[२] : " मग वाइसातें म्हणीतलें : " वाइ : माहात्मे पीडतातिं[३] : गुंफे रीगवणी करा[४] : " " हो कां वाबा : " ।।

उदेयां बाइसीं तांदुळ वेळिले : पोळीया केलीया[५] : पत्रसाक : मग गोसावीयांसि मर्दनामादणें[६] : गुंफेआंतु ओटा : तेथ पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां पांती वाढिलें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : गुंफे रीगवणी जाली :

---

२८५. १ **मु.** °खालि लींगाचीये देउळीये दोपाहारांचा अवसरु होये : सोमनाथाचां चौकीं पहुड होए : ।।

२८६. १ **एवा.** सीधीचि गुंफा सरीसी करवीली : ।।

२८७. १ **यमु.** °नीकण. २ (**प्रव. आ.** १११ ; **पं.**). ३ °**एवा.** सिणताति. **मु.** °आतां जाइजे : " ४ **य.** °" बाइ : तुमतें काइ काइ असे ?" "बाबा : कणीक : तांदुळ : दाळि : वळीवट असति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुमतें संग्रहो असे तेतुका वेचा : सोध : आवघें रांधा : वीकत घेया : " **मु.** °बाइ : तुमतें सामग्री असे तेतुकी वेचा : " ५ **यमु.** °वळीवट वेळिलें. ६ **गो.** माजणें. **मु.** मार्जनें.

आतां निगवणी कां न कीजे[७] ?" "हो कां बाबा :" "आइत करा :" मग बाइसीं आइत केली : गोसावीं वीळिचीया पारा[८] तेथौनि बीजें केलें : ।।

## २८८ लोणीए वस्ति : रात्रीं भीक्षान घुगरीया आरोगण

गोसावीं लोणीएसि बीजें केलें : तवं तो राणा लींगासि त्रपण[१] करुनि गांवांतु जातु असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : या राणेयातें राहावा :" भटीं म्हणीतलें : "आगा आगा गुरुवा : उभा राहे[२] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : काइ माहात्मा नव्हसि ? हेंइ एक बोलणें ? या सवीयाचि नव्हति[३] ? माहात्मेनि प्रीएवक्तेयां होआवें कीं :" मग गोसावी साउमे आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "राणे हो : या : तुमचीं पुत्राअपत्यें निकेनि[४] असति ?" "जी जी :" मग गोसावीयांसि चौकीं आसन जालें : "वानरेया राणेयांसि वीडा ओपा गा :" मग भटीं तांबोळ दीधलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें[५] : "राणे हो : तुमचीए गांवीं ब्राम्हणाचीं घरें थोडीं : तरि तुम्हीं[६] अग्रणीयां होआवें :" "हो कां जी :" ।।

मग भट बाइसें भीक्षा करावेया गेलीं[७] : राणा म्हणे : "गांवीं ब्राम्हणाचीं घरें थोडीं : भीक्षा[८] आणां :" भटां बैसावेया घालीति : भीक्षा केली : मग वेसीपासि भटीं बाइसांचीए हातीं झोळी दीधली : भट पारीं बैसले होते तेयांपासि गेले : "आहो : तुमचां गांवीं ब्राम्हणांचीं घरें थोडीं : कांहीं चणे होआवे :" मग तेहीं चोभे दोनि चणे[९] दीधले : ते घेउनि आले : गोसावीयांसि द्रीष्टपुत केले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांचीया घुगरीया रांधा :" "काइसां रांधुं बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीतरि गळतीया असति : तेथ रांधा[१०] :" रांधीति : आणि चौकीं पुजा करीति : अवघीया रांधिलीया : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीयांसि भीक्षाअन ओळगवीलें : घुगरीया : ऐसी व्याळी जाली : मग भक्तजन जेउं पानीं बैसले : आणि घुगरीया खाओं पाहाति : सर्वज्ञें म्हणीतलें : "झोळीये मुद्रा लावा गा :" मग गोसावीं स्रीकरें घेउनि मुद्रा लाविलीया : मग चौकीं आवघां भक्तजनीं एकवाट घुगरीया खादलीया : मग गोसावीयांसि वस्ति

---

७ °**एवा.** नीगवणी कीजे. ८ **यमुहीबीपंने.** पाहारा. **गो.** प्रहरा.

**२८८.** १ **यनेपं.** स्तर्पण. **गो.** स्तपण. **मु.** पुजा. **हीबी.** वाधावनें. २ **एवा.** "गुरवा गुरवा : उभा राहे :" ३ °**एवा.** हे सवीचि नव्हे ? ४ **अ.** निक्यानि. ५ **यमु.** सर्वज्ञें म्हणीतलें : "राणे एथीचेचि ?" "हो जी : हे वृति माझी : हा देवो माझा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा देवो पुजा ?" "हो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ब्राह्मणांची घरें केतीयें असति ?" "जी जी : थोडीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "राणे हो : तुमचीए गावीं—. . . . . . . ६ **मु.** °महात्मेयां अग्रणी होआ :" **हीबीपं.** अग्रणी. ७ **यमु.** °मग तो अग्रणी जाला : घरोघरीं म्हणे "आइ : गांवीं ब्राह्मणाचीं— ८ **ने.** आगळी भीक्षा घाला. ९ **य.** भुरैलेया चणे. **मु.** बुरेले चणे. १० °**एवा.** तांबतौलीए रांधीलीया :

जाली : मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं बीजें केलें : ।।

## २८९ जांबगांवीं वस्ति

मग जांबगांवांपसीमे लींगाचें[१] देउळ पुर्वामुख : तेथ वस्ति जाली[२] : ।।

## २९० नागापुरीं वस्ति

रामेस्वरबास : तेथौनि नागापुरीं वस्ति जाली : ।।

## २९१ वामौरी वस्ति ।।

## २९२ अव्हाणां वस्ति ।।

## २९३ देउळाणां वस्ति

देउळाणां गावांउतरे गंगेचीए थडीए पुर्वामुख_लींगाचें देउळ : तेथ वस्ति जाली : ।।

## २९४ काउळगांवीं वस्ति

गंगेचीए थडीए : पुर्वामुख टेंकावरि कावलेस्वराचें देउळ : तेथ वस्ति जाली : ।।

## २९५ जोगेस्वरीं वस्ति : साधां भेटि

तेथौनि जोगेस्वरी बीजें केलें : तेथ साधां भेटि जाली : ।।

## २९६ जांबगांवीं सींगेस्वरीं वस्ति

तेथौनि जांबगांवां बीजें केलें : गांवांतु सींगेस्वराचें देउळ पुर्वामुख : तेथ वस्ति जाली : ।।

## २९७ बागडीए मढीं वस्ति ।।

## २९८ नेउरगांवीं धाएखडकीं इंद्रभटां हनवीं पुजा

तेथौनि[१] गोसावीं नेउरगावां बीजें केलें : गोसावी गावांतु न रीगतीचि : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया[२] : इंद्रेयातें बोलावा जा : " " हो कां जी : " मग गोसावीं धाएखडकाकडें बीजें केलें : भट गावांत गेले : इंद्रभट डोल्हारेयावरि बैसले[३] असति :

---

**२८९.** १ **ही.** रामनाथाचें. २ °हे रामे. ।। प्रश्रा. नगराकार : तीए दीसीं एकादसी : ।।

**२९८.** १ **यमु.** गोसावीं घाटावरौनि प्रतीस्थानावरौनि जोगेस्वरीवरौनि नेउरगावां बीजें केलें. २ **यमु.** °हें आलें ऐसें इंद्रया सांघा जा. ३ **यमु.** नीजैले.

भट दारीं उभे ठेले : " इंद्रभटो : इंद्रभटो : गोसावीं बीजें केलें असे : " ऐसें म्हणीतलें : आणि भट नीगाले : इंद्रभटां अरे[४] जाली होती : तेहीं डोल्हारेयावरुनि[५] खालि उडी घातली : ते[६] अरे फुटली : वाहाणा लेइले[७] : अवघा पुडा[८] पुवें असुधें भरला[९] तें नेणति : ऐसें भट गोसावीयांतें टाकीत एताती : इंद्रभट तेयांतें द्रुष्टी सुनि एताती : मग गोसावी धाएखडकाकडे अव्हाटले : मग भट आले : भटांपासि जाडि होती : तीचें आसन केलें : गोसावीयांपासि आसन जालें : मग इंद्रोबा आले : वाहाणा फेडिलीया : पुडा पुयें भरला असे : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : इंद्रोबाचे गांठीं एकीए आसुचीं[१०] हनवें[११] होतीं : तीएं दोनि दोनि स्रीचरणांवरि ठेविलीं : दोनि दोनि जानुवरि ठेविलीं : दोनि दोहीं गुडघेयावरि ठेविलीं : दोनि दोहीं मुडपांवरि ठेविलीं : एकु[१२] स्रीमुगुटावरि ठेविलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा इंद्रेया : देओ स्वर्णी[१३] फुलीं पुजिजताए[१४] : " तेहीं म्हणीतलें : " जी जी : ऐसा देओ काइसेनि पुजावा[१५] ? " मग स्रीचरणां लागले : गोसावीं डोबेग्रामासि बीजें केलें : इंद्रोबा गोसावीयांतें राहावीत होते : परि गोसावी वीनवणी न स्विकरितीचि : मग गोसावीं डोंबेग्रामा बीजें केलें : ।।

## २९९ गदोनाएका घरीं अवस्थान

गदोनाएकु कटकीं धरिले होते : ते सुटले[१] : आलें : मग[२] कवाडें पडलींचि[३] असति : मग एकु दीसु तेहीं आपुलेया कोणातें[४] गोसावीयांतें पाहावेया पाठवीलें : तयांतें म्हणीतलें : " गोसावीयांतें ऐसें वीनवावें : मज बाहीरि नीगों नैए : तरि गोसावीं एथ एउनि मज दरीसन देयावें : " मग ते डोंबेग्रामा[५] आले : गोसावीयांतें वीनवीलें : गोसावीं वीनवणीं स्वीकरिली : गोसावीं तेथ वीळिचां बीजें केलें : देव्हारचौकीं पसिमामुख : तेथ अवस्थान जालें : मास एकु : ।।

## ३०० इंद्रभटां दारवठां सौरसु करणें

एरी दीसीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं तेया घाटासि बीजें केलें : घाटीं उभे राहीले : इंद्रोबा धोत्र धुत असति : इंद्रोबा गोसावी आले म्हणौनि नेणति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा वानरेया : हा पैलु इंद्रा नव्हे ? " " जी जी : "

---

४ **ने.** आरे. **यमु.** (पाइं) वळु जाला असे. **पं.** इंद्रभटाचां पाइं अरे नीगाली होती. ५ **य.** डोल्हारेया हडुती. उडी घातली. ६ **यमु.** तो वळु फुटला. ७ **म.** वाहाणाचा अवघा पुडा—. ८ **अ.** पावो. ९ **गो.** माखला. १० **यमुगोनेहीबी.** आसुचें. ११ **यमुगोहीबी.** हनव. **ने.** हनम. १२ **रामेश्वर-बास.** सोळा....ठेविलीं. १३ **एवा.** सुवर्णीं पुष्पीं. **पं.** सुवर्णफुलीं. १४ **यमु.** अर्चिजतु असीजे. १५ **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रेया : देवो तो अंतरगामिया कीं गा : तो काइसेनि पुजावा लागे ? "

**२९९.** १ **हीबी.** पळौनि आले. २ **मु.** परि भयें कवाडें—. ३ **यमुगोहीबीनेपं.** घातलींचि. ४ **एवा.** लेकातें. **एवा.** रेइनाइकासि. **पं.** संबंधीयातें. **हीबी.** विश्वासु सेवकातें. ५ **यमु.** छीन्नपापा.

सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रेया इंद्रेया : " आणि तेहीं[१] वास पाहीली : तवं गोसावीयांतें देखिलें : आणि आले[२] : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : वीनतकंदर[३] होउनि पुढां उभे ठाकलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा इंद्रेया[४] : बोलाउं बोलाउं भेटि देइजताए मां : " " जी जी : देओ कृपाळु कीं : " मग गोसावीं अग्नीष्टकें बीजें केलें : तेथ आसन जालें[५] : मग गोसावीं आवारा बीजें केलें : इंद्रोबा सरीसे असति : गोसावी दारवठां उभे राहीले : दारवठेकारातें म्हणीतलें : " यासि भीतरि येओं देयावें : हा एथिचा असे : " " जी जी : हे आलेयां मीयां कैसें जाणावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एइल तेधवां कवाड टीमकारील : " " हो कां जी : " मग गोसावीं भीतरि बीजें केलें : गदोनाएकें इंद्रभटांतें देखिलें : " हे राजीके : " ते भेओं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " भेओं नोका : हा एथिचाचि : " मग इंद्रोबा दीसवडि अवस्वरा एति : ।।

## ३०१ गदोनाएकाची पुजा : द्रव्यादिभजनें ईश्वरप्राप्ति निषेध

मग एकु दीं गदोनाएकें आपण गोसावीयांसि आडदांडीएपासि मर्दना दीधली : बाळाणेयांचा चौरंगु सोंडीएवरि ठेविला : तेथ[१] गोसावीयांसि आसन जालें : गदोनाएकें[२] गोसावीयांचां स्रीमुगटीं चोखणी लाविली : मग बाइसें गाडु ढाळीति :

---

**३००. १ यमु.** °मागील. २ °**एकी वासना.** सर्वज्ञें म्हणीतलें : " जा बोलावा : " मग भट गेले : " इंद्रभटो इंद्रभटो : या : गोसावीं बीजें केलें : या : तुमतें बोलावीताति : " तैसेंचि इंद्रभट आले : ३ **हीबी.** कींकीर. ४ **यमु.** °आफाउनि आफाउनि दर्सन दीजत असीजे मां : ". ५ **ने.** प्रतीत 'इंद्रभटा आफाउनि भेटि देणें' या आदीची लीळा येथे संपली आहे. त्यानंतर 'इंद्रभटा दारवठा सौरस करणें' या आदीची लीळा असून तिच्यातील मजकूर, प्रस्तुत **अ.** पोथीतील 'तेथ आसन जालें' या वाक्यापुढील मजकुरासारखाच आहे. प्रस्तुत लीळेच्या **यमु.** प्रतीतही अशाच दोन लीळा आहेत. पण त्यातील 'इंद्रभटा दारवठा सौरस करणें' या दुसऱ्या लीळेतील मजकूर बराच भिन्न आहे. 'आफाउनि दर्शन देणें' या लीळेच्या शेवटी 'गोसावीं आवारासि बीजें केलें : इंद्रोबा सारिसे आले : मग दारवठां राहिले : ' असे वाक्य आहे. त्यानंतर 'दारवठां सोरसु करणें' ही लीळा आहे. ती पुढीलप्रमाणे :

'**तथा दारवठां सौरसु करणें** ।। मग इंद्रोबा विळीचां गोसावीयांचेया दर्शना आले : तवं दारवठेकार रिगों नेदीचि : गेले : मागुतें पाहानपटींचि येउनि दारवठां बैसले असति : तवं गोसावीं परिश्रयां बीजें केलें : दारवठां गोसावीयांसीं भेटि जाली : सर्वज्ञें म्हणीतलें : " हे कोण ? इंद्रेया ? " " जी जी : " सोधु : " तुम्ही केधवां आलेति ? " ।। " जी जी : मी वीळीचां आलां होतां : तवं दारवठेकार रीगों नेदीचि : म्हणौनि सकाळीचि येउनि बैसलां : " मग गोसावी परीश्रयो सारुनि आले : दारवठेकारांतें म्हणीतलें : " हा एइल तेव्हळीं एवों द्यावा : " " हे आले ऐसें मीयां कैसेनि जाणावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रेया : तुम्ही याल तेव्हळीं कवाड टीमकारावें : " " हो कां जी : " मग गोसावी भीतरि बीजें केलें : इंद्रोबा : सरीसे आले : गदोनाएक इंद्रभटातें देखौनि गजबजीले : सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसें कांहीं नाहीं : हा येथचाचि येथचाचि : " मग इंद्रोबा तीहीं अवसरा एति : ।। '

**३०१. १ यमु.** °बोंडणबावीये. २ **गो.** गजोनाएकें.

गदोनाएकु स्त्रीमुगुटिची[३] सेवा करीति : मग गोसावीयांसि मादणें[४] जालें : गोसावीं वस्त्रें वेढिलीं : तोचि चौरंगु बरवा वस्त्रेंकरुनि पुसिला : मग तेयावरि आसन घातलें[५] : मां पुर्वामुखें ओसरीए : पटिसाळेवरि उजिवीएकडे : चौरंगावरि आसन जालें : गोसावीयांसि चंदन ओळगवीलें : मग गदोनाएकें ताट भरुनि अळंकरा आणिले : मग गदोनाएकु *बाइसां हातीं*[६] देति : बाइसें ओळगवीति : " बाइ : हा अमुका : अमुकीए ठाइं ओळगवा : हा अमुका : अमुकीया सेजां ओळगावा :" मुदीयांचे बेग काढिजे[७] : ओळगवीजे : या रत्नखचितां पदार्थांची पुजा केली : धुपार्ती मंगळार्ती जाली : दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागले : मग बाइसीं फोडी ओळगवीलीया : वीडीया करुनि देताति : तवं गदोनाएकें म्हणीतलें : " जी जी : मातें द्रव्य असे : आणि आणिकही असे : तरि मज एणें परमेश्वरू होइल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : द्रव्यें जरि परमेश्वरू पाविजे तरि हे राएमंडळिक काइ हेळ[८] ? : तेयातें काइ द्रव्य नाहीं : कीं परमेश्वरु होआवा ऐसी बुधि नाहीं ? द्रव्यसंपती परमेश्वरू न पवीजे : पुत्रसंपती परमेश्वरू न पवीजे : कलत्रसंपती परमेश्वरू न पवीजे : भ्रातृसंपती परमेश्वरू न पवीजे : सुहृदसंपती परमेश्वरू न पवीजे : बीद्यासंपती परमेश्वरू न पवीजे[९] : हे सकळै प्रतेजुनि अनन्यगती ईश्वरा सरण रीगिजे तैचि होए : आणिकें काइसेनहीं नव्हे : देओ तो देवेंचि होए : *अप्राप्ति होए तरि पाविजे :" सर्वज्ञें म्हणीतलें " अप्राप्तिनिमित्तकें दु:खें कर्मांचीया राशी नासती : पोरा जीवा अप्राप्ति ते दुर्लभु : अप्राप्ती भावी तो विरळा : पोरु जीवु करी ना : परि करीन ऐसी हांवही न बंधे*[१०] *:"* ॥

## ३०२ सुरेगावीं मार्गी मार्कंडा भेटि : मौन्यें इंद्रभटा भेटि

मग गोसावीं डोंबेग्रामासि बीजें केलें : डोंबेग्रामौनि गोसावीं नेउरगावांतु न रीगतां सुरेगावां बीजें केलें[१] : गंगेआंतु लींग : त्या लींगापासि खडकावरि गोसावीयांसि आसन जालें : मग मार्कंडु भीक्षे नीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : " मार्कंडा : मौन्येसीं भीक्षा करावी : आणि हें आलें ऐसें कव्हणांपुढां न संघावें : " " हो कां जी : " मार्कंडु[२] भीक्षा करावेया निगाले : तवं इंद्रभट एकी घरीं बैसले असति : " हें काइ मार्कंडा ? " म्हणौनि उठिले : " तुम्हीं आलेति तरि काइ गोसावीं बीजें केलें ? " तवं ते उगेचि : " कां बोला ना ? "

३ **यमुगोनेही.** श्रीमूर्तिची. ४ **गो.** माजणें. ५ **अ.** जालें. ६ (**यमुनेपं.**). ७ **नेय.** काढिलें. °**एवा.** तोळबंधी काढिजे : बेग काढिजे. **नेय.** °(**एवा.**) तोळबंधीयाचे बेग काढिले. **गो.** (**एवा.**)° तुळबंधियाचे. ८ **अ.** तरि हे राए मंडलिका काइ हेळा ? °**एवा.** तरि या राया मंडळिकातें काइ द्रव्य नाहीं ? **मुने.** °पडिले असति ? ९ **अ.** °दोनि वासना भेदाचिया : (म्हणजे दोन भिन्न वासना येथे एकत्रित केल्या आहेत). १० (**प्रव. आ.** ७१; **आमा.** २३, २४).

**३०२. १ मु.** (**रामेश्वरबास** : निवासया बीजें केलें : तेथचि हंसराज डांगरेश भेटलीं : मग सुरेगांवां बीजें केलें ॥) २ **यमु.** °नेउरगांवां.

" ना : मज गोसावीं मौन्य वीहीलें : " " हो कां : तुमचें मौन्य भंगलें : आतां सांघा : " ते उगेचि होते : इंद्रोबायें म्हणीतलें : " या पाठींपाठीं[3] जाओं : आपैसेयाचि गोसावी भेटती : " मग मार्कंडीं भीक्षा केली : मग गोसावीयांपासि आले : द्रीष्टपुत झोळी केली : मग इंद्रभट आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : गोसावी उगेचि[4] : " काइ गा इंद्रेया : मार्कंडीं सांघीतलें ? " " ना जी : " मग मागील आवघी गोष्टि सांघीतली : " जी जी : मार्कंडु भिक्षे आले : मीयां पुसिलें : 'मार्कंडा तुम्हीं आलेति तरि काइ गोसावीं बीजें केलें ?' हे उगेचि : मीयां म्हणीतलें : 'बोला ना कां ?' 'ना मज गोसावीं मौन्य वीहीलें : ' मीयां म्हणीतलें : 'तुमचें मौन्य भंगलें : आता सांघा : ' तवं हे उगेचि राहीले : मग एहीं भीक्षा केली : मग मीं या मागमागां[5] आलां : " सर्वज्ञें म्हणीतलें : " यांतु तें सांघीतलेंचि होए कीं गा " मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली ।। सुरेगावीं[6] मढीं वस्ति जालीं : दादरेनिहुनि वरि वीजें केलें : नावेकु खेळु केला : मग मढीं वस्ति जाली : ।।

## ३०३ मार्गी कागसूक्रदृष्टांतद्वारें इंद्रभटां सीक्षापण

मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरू जाला : गोसावी आंगीटोपरें वेढिताति[1] : मग पाठकीं जाडि घेतली : कांहीं मात्रा घेतली : रात्रीं वीचारू जाला होता : जें निवासेया जावें : मग पाठक निवासेयाचीया वाटा लागले : गोसावी कानड-भालुगांवांचीया वाटा बीजें केलें : तवं बाइसीं म्हणीतलें : " हां बाबा : हा पाठा या वाटा कोणीकडे नीगाला ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यातें देखौनि मग आपैसेयांचि एइल : " पाठकीं मागील वास पाहीली : तवं गोसावीयांतें तेया वाटा जातां देखिलें : मग गोसावीयांकडे आले : इंद्रोबा गोसावीयांतें बोळवीत एताति : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : इंद्रा दुरि बोळवीतु आला : आतां राहावीजो ना ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एओ कांइ : आतां हेचि भेटि कीं : " मग इंद्रोबायें जाणितलें 'आतां गोसावी मजवरि उदास : ' *गातीए कमळदेव साधांचे जावाइ : आणि आप दादोसाचा भाउ : तयांपासि भवरी गहाण ठेविली : तयाकारणें भांडण जालें : इंद्रभटीं कैवारू घेतला : कमळनाएकासीं भांडीनले : राउळवेन्हीं भांडण जालें : तेणें कारणें गोसावी उदास : मग मार्गीं चालतां सीष्यापिलें[2] :* तयांतें

---

३ **गो.** पाठोवाठीं. **हीबी.** मागें. ४ **एवा.** उदास. ५ **एवा.** सांघातें. ६ **एवा.** सुराए वसति जाली : आंगणीं आसन जालें : तीये दीसीं इंद्रभट गोसावीयांपासि राहीले : रात्रीचा पुजावसरु जाला : आरोगण जाली : पांती इंद्रबासि जेवण जालें : गोसावीयांसि पहुडु जाला : ।।

**३०३.** १ **मु.** करिताति. २ **(यमु.)** हाच वृत्तांत आणखी एका पोथीत विस्ताराने आलेला आहे तो पुढीलप्रमाणे : 'पुर्वि ऐसें परिसिलें होतें : रामदेवाचे बंधु आपे : तेहीं गातेया कमळनाएकापासि भवरिया गाहाणा ठेविलीया होतीया : ते गातेया कमळनाएकापासौनि भवरी पडली : भवरी घेउनि गेले : आणि दाम नेदीति : ते म्हणति : " भवरीएवारी भवरी घ्या : " ते म्हणति : " तेचि द्या : "

अडाचीए[३] मानीं सर्वज्ञें म्हणीतलें : "मर मर[४] इंद्रेया : आपुलीये बुधीसीं मुक्तीचीया चाडा जयाची जवळीक करा तेयाचीया कागसुक्राचीयासारखीया चेष्टा करा ? तत्रापि तो ब्राम्हणु : वरि एथचें दरीसन : तेयासीं तुम्हीं ऐसें बोला ?" मग वाइसीं म्हणीतलें : "हां बाबा : कागुसूक्रु म्हणिजे काइ ?" यावरि गोसावीं कागसुक्राचा दृष्टांतु नीरूपिला : [ सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काउळा असे : तो चांचुकरुनि अमेध्यू ऐसा सारी : ऐसा सारी : तेयाआंतु सार नीवडी : तेयांतु कैचें सार ? तेथचें सार तेंहीं अमेध्यूचि कीं : सोरू[५] असे : तें बोडीआंतु चुंडि खोवी : ऐसी सारी : ऐसी सारी : तेयांतु सार नीवडी : तेयांतु कैचें सार ? तेथचें सार तेंहीं बोडीचि कीं : तैसें माहात्मां विखएवेव्हारामाजि असौनि परमार्थु नीवडी : तेथ कैचा परमार्थु ? तेयाचेनि तेयां गोमटें नाहीं : मां तेयाचिया जवळिका तुम्हांसि कैचें[६] ?"] मग इंद्रावायें दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग राहावीले : मग[७] गोसावीं टोकेगव्हाणासि बीजें केलें : ।।

## ३०४ पेहरासंगमीं टोंकेगव्हाणीं मढीं अवस्थान

पेहरासंगमी टोंकेगव्हाणीं गावांतु उतरामुख मढु : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : ।।

## ३०५ हंसराजा भेटि : डांगुरेया प्रसादेंवीण न जेवणें

गोसावीं छीनपापुनि बीजें केलें : तै संतोखु असक्तु होता : मग गूंफेपुर्वे हंसराजातें सर्वज्ञें म्हणीतलें : "हंसराजा : तुम्हीं संतोखाचीए सुस्रके राहा :" "हो कां जी :" "डांगुरेया : तुम्हीं राहा :" मग तीयें राहीलीं : गोसावीं बीजें केलें : मग संतोखाचें देह गेलें : मग हंसराज बेहों लागलीं : मग कवाड अडकौनि[१] गोसावीयांपुढां सांगावेया पेहरासंगमा टोंकेगव्हाणा आलीं : ।।

तवं गोसावीयांसि आरोगण जाली : मग गोसावी पटिसाळेवरि वेढे करिताति : तवं डांगुरेसीं गोसावीयांतें पैलाडुनि देखिलें : मग उजुचि डोहांतुनि घातलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "संतोखाचें देह गेलें कीं : हंसराजु आला गा :" "तें काइ बाबा ?"

---

ऐसा व्यवहार तयासि लागला : आपेयाचेनि कैवारें देव उठिति : देवाचेनि कैवारें इंद्रभट उठिति : हें गोसावीं पुर्वि परिसिलें होतें : परि माने ना : मग कृपावंतें म्हणितलें : "हां गा इंद्रेया धर्माचीया चाडा जयाची जवळीक करा—." ३ **एवा.** मार्गीचीये कांटीएतळीं. ४ **एवा.** मरा मरा. ५ **एवा.** सुकरू. ६ (**दूपा.** १७. काकसूकराचा दृष्टांत. यावरील दार्ष्टांतिक 'महात्मा' (=रामदेव), 'तुम्हांसि'— या शब्दांवरून निश्चित स्वामींचेच होय. म्हणून मुळात समाविष्ट केले आहे.). ७ **मु.** मग गोसावीं भालुगावां बीजें केलें : ।। **ही.** मग गोसावीयांसि भालुगांवीं हरणेश्वरीं वस्ति जाली : ।। ४७ ।। जांबुगांवीं सींगेस्वरीं वस्ति : तें गावांतु देउळ : ।। ४८ ।। पेहेरासंगमीं टोकेगव्हाणीं मठीं अवस्थान : ।।

**३०५.** १ **एवा.** बांधौनि.

सर्वज्ञें म्हणीतलें : "हा नव्हे डांगुरा आला : हंसराजु आला :" तवं डांगुरेस आले : स्रीचरणांभवंतें[२] भवुं लागले : 'हुं हुं[३]' : म्हणति : "हो डांगरेया :" म्हणौनि स्रीकरें अस्फरिसीलें[४] : मग गोसावीयांसि पटिसाळेवरि आसन जालें : तवं हंसराजु आलीं : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : मग सांघीतलें : "जी जी : संतोखाचें देह गेलें : मीं बीहुं लागलीयें : मग कवाड अडकुनि आलीयें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "*बाइ : जीतेंनि मृत्याचां धर्मी वर्तावें*[५] : वानरेया : तुमतें अभ्यागतें आलीं : जा : डांगुरेयासि अंन घाला :" "हो कां जी :" मग भटीं वर्णभातु कालवीला : मग बाहीरि सीळेवरि घातला : डांगुरेस आले : हुंघिलें : आणि जाउनि पैऱ्हां बैसले : "जी जी : हा न खाए जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : कां न खाए ?" "जी जी : आलें असैल कव्हणें ठाउनि पोट भरुनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें नव्हे : हा एथिचेया प्रसादाची वाट पाहातु असे गा : आणां आरुता भातु :" मग वाटां आणिकु भातु आणिला : गोसावीं प्रसादु केला : "जा आतां : तयावरि घाला :" आणि बोलाविलें : आणि खाओं लागले[६] : ।।

मग[७] सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : आणिकु दुसरा कोणु नेणिजे : जा : तेयाची मोट वांधा : तांदुळा[८] घाला : तयांसि जळनीक्षेपु[९] करा :" मग भट जाउनि तयां तैसेंचि करूनि आले : ।।

## ३०६ सोमवारीये आकर्खणीं जनुपुजा

एकु दीं गोसावीयांसि सकाळि आरोगण जाली : मग गोसावीं संगमेस्वराचेया देउळा बीजें केलें : रीगतां डावेया हाता : दारवंटांचीए पटिसाळे बाइसीं जाडिचें आसन घातलें : पांजीसि सव्यें गोसावीयांसि आसन जालें[१] : मग ते दीसीं सोमवारी : तो कटकिचा अवघा लोकु[२] आला होता : दांडीया दांडी अडली : मग एक स्नानें करुं लागले : एक पींडप्रदानें करुं लागले : एक त्रपणें[३] करुं लागले : मग देउळासि[४] लोकु एओं लागला : मग दारवठेयाआंतु लोकु रीगे : तवं गोसावीयांसि देखे : आणि गोसावीयांपासि इये : जे पुजा आणिली असे ते गोसावीयांसि करीति[५] : च्यारिएकी अक्षता लींगावरी टाकुनि घालीति : आणि जाति : ऐसी अवघेया लोकाची गोसावीं पुजा स्वीकरिली : विळवरि लोकु आला : राणा तया साजेयावरि मदळस धरुनि इउलें

---

२ **यमु.** श्रीचरणांवरि (**एवा.** पालखतीवरि) लोळों लागले. ३ **नेपं.** कूं कूं करीति. ४ **यमुने.** स्पर्शिला. **पं.** स्पर्शिलें. **गो.** स्फर्शिलें. ५ (**प्रव. आ.** ७४). ६ **हीबीपं.** °गोसावीं आणीकु भातु वाढवीला. ७ **एवा.** गोसावीं तेथ भटमार्तंड पाठवीले. ८ **गो.** टोळा. **एवा.** दगड बांधा. ९ **एवा.** जळप्रवाहो.

**३०६.** १ (हे वाक्य **गोही.** प्रतीत **एवा.** म्हणून दिले आहे.) २ **मु.** °देवते. ३ **गो.** तर्पणें. ४ **य.** देवासि **मु.** देवते. ५ **य.** दर्सना करीति **मु.** ऊळगवीति : पाठी देवते जाति :

ऐसें तोंड करुनि पांतु असे : एक द्रव्यवांचौनि एराचीया[६] रासी जालीया : मग गोसावी आसनावरुनि उभे ठाकले : आणि बाइसीं घेओं आदरिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : राहा : हें राणेयांचें कीं[७] : " ऐसें सर्वज्ञें म्हणीतलें तवं तेयाची उडी तेथ पडों सरली : मग तें तो घेउनि गेला : मग गोसावीं मढासि बीजें केलें : ।।

## ३०७ पेहरासंगमीं वचीष्टदेवांचें अंन्न आरोगण

एकु दीं गोसावीं एकलेयांचि[१] वाळुजादेवीचेया देउळा बीजें केलें : दोहीं स्रीकरीं दोन्हीं दारवंडा[२] धरिलीया : मग भीतरि अवळोकिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " भीतरि कवण असे ? " तवं वचीष्टदेव[३] भीतरि अनुष्ठान करीत होते : "जी जी : मीं असें :" आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग गोसावीयांसि घोंगडेयाचें[४] आसन रचिलें : गोसावीयांसि चौकीं आसन जालें : तांववटीए[५] उदक होतें : तेणें गोसावीयांचेया स्रीचरणांसि आर्चन केलें : स्रीचरणां तुळसी वाइलीया : मग गोसावीयांतें आरोगणेलागि वीनवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " आणां : " मग दधिभातु आणिला : कढिवां धोत्रीं आलें खोविलें : वाटां दधिभातु : सागळें उदक : ऐसें घेउनि आले : गोसावीयांसि आरोगण देताति : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेनि दधिभातेंसीं आलें होए कां तरि नीकें :" " जी जी असे : परि मीं वीसरलां : " मग आलें ओळगवीलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## ३०८ वचीष्टदेवांचीए गुंफे अवस्थान

मग वचिष्टदेवीं[१] गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : मातें दोनि गुंफा असति : तरि गोसावीं एकी गुंफे असावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : गोसावीं गुंफेसि बीजें केलें : मग थोरली गुंफा गोसावीयांसि दीधली : तेथ ओटेयावरि आसन जालें : ।।

भट गांवां गेलें होते : ते आलें : मग बाइसीं म्हणीतलें : " नागदेया : बाबासि आरोगणे उसीरु जाला : बाबा आझुइं बीजें न करीति : तरि जाए कां : पाहे : " मग भट सोधीतसोधीत आले : तवं भट मुगवणी[२] आंगी लेइलें असति : तवं एकि बाइ सडा

---

६ **यमु.** पानें पोफळें : नारीयेळें : माहुळंगें : केळें : अक्षेता ऐसीया पदार्थाचीया रासी जालीया : एक द्रव्यवांचौनि : ७ (**रामेश्वरबास**)° तवं ते संको लागलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हे तुमचें कीं " मग आले : गोसावीयांलागि बरवीं पानें पोफळें श्रेष्ठ पदार्थ बाइसाहातीं दीधलें : गोसावीं स्वीकरीले : मग गोसावीं मठासि बीजें केलें :

**३०७.** १ **मु.** °पेहरेपैलाडि. २ **गोनेहीबीमु.** दारसंका. ३ **यमुगोनेहीबीपं.** वसीष्ट°. ४ **यमु.** जाडीचें आसन रचिलें : वरी चोखट गाळणा घातला : ५ **गोने.** °वतीए. **पं.** तांबतौलीएसि.

**३०८.** १ **यमुगोनेहीबीपं.** वसीष्ट°. २ **एवा.** मेघवणी.

घालितीए : तीची एकि सीक्षीणीं दारेंसीं बैसली असे : भटोबासीं म्हणीतलें : " आइ : एथ गोसावीं बीजें केलें असे कीं ? " तीया नोळखति : ' आंगी लेइले आहाति : हातीं काठी ' ऐसे देखिले : ' काइ कोण्हीं म्हणियारा ? : ' भटीं म्हणीतलें : " एथ गोसावीं बीजें केलें असे ? " " ना नाहीं आले : " समोर एउनि ओनउनि पाहों लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : या गा : हें एथ असे : " मग भट आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले[३] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "*वानरेश आजची घडी धरुनि तुकीत होते : तें एथौनिचि घडिलें*[४] : आणिका गुरुतें[५] कै नेणों पींपळी बांधतासि : *कां पां ? एथ ऐसी प्रवृत्ति नसतां हे यातें तुकातचि असति :" यावरि भटीं म्हणीतलें : "जी जी : माझा दोष आझुनिवेऱ्हीं गेला नव्हता : हें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जीवु सर्व दोषांचें आळें :" यावरि भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावी-यावरि मीं कां अन्यथा होतु असें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : मागीलां जन्मीं एथिचें नेणों तुम्हीं केतुके दोष घेतले असति : तयाचा संस्कारु आतां भजत असे :" "जी जी : ते कवण दोष ? " सर्वज्ञें म्हणीतले : "एथौनि तुमचे दोष बाहिरि घालिजेति तरि पोरें हो : पोटीं सुरी सोंसों मराल :" यावरि भट उगेचि राहीलें*[४] : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : वाइसातें एथचि बोलावा : एथचि बीढार आणा :" मग वाइसें आलीं : बीढार आणिलें : मग गोसावीयांसि तेथचि अवस्थान जालें : ।।

## ३०९ रामाइदरीसनकृत नार्येळ कथन

एकु दीं रामाइसें तीयें गोसावीयांचीया दरीसनां आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : नार्येळाचा गोळा गोसावीयांसि दरीसन केला : तो सोलिला होता : मग खडी सारुनि घोंटाळिला होता : आंतु साखरा भरिला[१] : तीयें गोसावीयांजवळि बैसली होतीं : मग तो गोळा स्रीकरीं घेतला : सर्वज्ञें म्हणीतलें : " जाणां पां गा वानरेया : हें कवणा वृक्षाचें फळ ?" भटीं हातीं घेतला : पाहीला : "जी जी : नेणों : " एरु हातीं घे : पाहे : तो म्हणे : " नेणों : " एरु पाहे : तो म्हणे " नेणों : " पाठकीं हातीं घेतला : " होइल कव्हणा वृक्षाचें फळ : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पाठा काइ[२] पाठा : पाठा म्हणिजे[३] आद्यंत[४] सर्वज्ञ : " " तरि काइ कव्हणा वृक्षाचें

---

३ **यमु.** °तवं वसीष्टदेवीं आपुली सीक्षीणी नमस्कारा धाडीली : आली : तवं श्रीमुर्तिपासुनि गुंफेबाहीरी प्रकासु पडीला : तो देखीला : गेली : वचीष्टदेवांपुढें सांघीतलें : तेहीं मागुतीं धाडीली : भीतरि आली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : भटोबासातें म्हणीयां धाडीलें : बाइसातें बोलाउं : ४ (**प्रव. वि.** २०२–२०३). ५ **अ.** गुरुवातें.

**३०९.** १ **यमु.** °डांबीर(रि) घातली. २ **एवा.** °म्हणतु असे ? **बी.** °म्हणतु असे ? " तेहीं म्हणीतलें : " जी : हें आंबिया वृक्षाचें फळ नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " पाठ आवेदित सर्वज्ञ : " ३ **गो.** म्हणीपे. ४ **यमुने.** अविदीत. **गोहीं.** अद्वीत. **पं.** अतीत्व.

फळ नव्हे ?" मग भटीं पुसिलें : " जी जी : हें काइसेयाचें : कव्हणा वृक्षाचें फळ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हा नार्येळाचा गोळा गा : " " जी जी[५] : तरि हा उजळु कां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हा सोलीला : खडी सारुनि घोंटाळिला : म्हणौनि उजळु : नीतळु :" " जी जी : तरि हा जडु कां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हा साखरा भरिला असे :" " जी जी : हा कैसेनि भरिला ? तरि कांहीं याचें तोंड देखों ना ?" मग गोसावीं स्त्रीकरिचीए करांगुळीचेनि नखेंकरुनि तें डांबीर उघडीलें : बाइसांकरवि पालिमांडें आणविलें : पालिमांडेयावरि साखर रीचवीली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वांटा : " मग बाइसीं वांटिलें : गोसावीं प्रसादु केला : मग अवघेयां दीधला : ।।

## ३१० रामाइपाठवणीप्रसंगें धर्मार्थी स्वीकारु

मग रामाइसां आस्चर्यें जालें : मग रामाइसीं म्हणीतलें : " जी जी : गोसावीं मज आपणेयांपासि राहों देयावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ कवणांइ असों[१] नेदिजे :" मग वचीष्टदेवांतें म्हणीतलें : " वचीष्टदेव हो : गोसावीयांतें वीनवा कां : मीं गोसावीयांपासि राहीन :" मग वचिष्टदेवीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : यें रामाइसें नीकीं : स्रेष्टें : संभावनीकें : यांसि गोसावीं राहों देयावें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वचिष्टदेव हो : एथ कव्हणांहीं राहों नेदिजे : " " जी जी : यांसि कवणाची आयाबंधनी[२] अक्षेपता नाहीं : यें स्वतंत्रें : " " तैसें काइ वचिष्टदेव हो : धर्माचीया चाडा रायाची राणी कां नैए : वरिपडतें आकास धरिजैल : परि धर्माची चाड नाहीं :" *मग गोसावीं अदंडिनाथाची गोष्टि सांघीतली*[३] ।।

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसें कीं वचीष्टदेव हो : प्राकृता मनुक्षाचां[४] ठाइं जरि येतुलें सामर्थ्य तरि काइ एथ इतुलेयाहीं पुरतें नाहीं ? परि धर्माची चाड नाहीं :" मग गोसावी तयांसि राहों नेदीतीचि : ।।

## ३११ गळनींबा वस्ति : भुतानंदानीनादें ग्रहो दवडणें

मग गोसावीं गळनींबेया बीजें केलें : गोसावी आंगणीं उभे ठाकले : नींबीं ग्रहो होते : ते मानुसां वसों[१] नेदीति : भलेतेयां लागति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " भुतानंदा : हाक

---

५ **यमु.** °तो हळु असे कीं : **हीबी.** तरि हा जडु कां ? आणि उजळु कां ?

**३१०.** १ **एवा.** राहों. २ **य.** आयाबंधना नाहीं. **मु.** कवणाचें बंधन नाहीं. **हीबी.** कव्हणाचें बंधन आकर्खना नाहीं. ३ (**हीबीपं.**) ही कथा 'पूर्वार्ध लीळा १९८' मध्ये 'अदंडीनाथा सामृथ्यकथन' या 'आदि' खाली आलेली आहे. म्हणून येथे गाळली आहे. त्या लीळेतील 'मग तया आस्चर्यें जालें :' राए म्हणीतलें : 'पुरूख सामान्य नव्हेति :' यानंतर प्रस्तुत लीळेतील पुढील भाग वाचावा. ४ **ने.** पुरुषाचां.

**३११.** १ **यहीपं.** असों.

देया : हा नींबु पांपरा हाणां : मग एथ ग्रहो असति ते दवडा : " " हो कां जी : " आणि तयां स्तिति जाली : तीं हाक देउनि निबु पांपरा हाणितला : आणि हाकेसरीसा तीहीं ग्रहीं आटासु[२] दीधला : आणि निगाले : मग गोसावीयांसि तीए माहालक्ष्मीएचां देउळीं वस्ति जाली : गांविचेया लोकां अवघेयां आस्चर्यें जालें : ।।

## ३१२ दुसरां गळनींबा मढीं वस्ति : कोळेस्वरीं अवस्थान

मग गोसावीं कोळेस्वरासि बीजें केलें : पुर्वमुख देउळ : वाव्य कोणीं : पुर्वपसीम ओटा : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : ।।

## ३१३ प्रसनाएका स्तीतिमरणीं वानरादि संबोखू

एकु दीं गोसावीयांसि पस्यांत पाहारीं उपहुडु जाला : प्रस्नयो सारुनि आसनीं उपवीष्ट जाले : *गोसावीयांसि निरूपण करावेयाची प्रवृत्ति : कव्हणी भक्तिजन सन्मुख नव्हतीचि : यावारि गोसावीं प्रसनाएकासि स्तिती दीधली : भक्तजनें आलीं*[१] : गोसावीयांसि आवघां भक्तजनीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : प्रसनाएकासि स्तीति जाली : देउळीं : ते उठिति ना : खोडवळले असति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं अवघे उठिलेति : आलेति : परसा कां नुठी ? " " ना जी : नेणों : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पाहा पां : हा एथ असे कीं नसे ? " पांति : तवं खोडवळले असे : " जी जी : परसनाएकु सरले : " भक्तजन उगेचि[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : उगलेचि काइ ? " " जी जी : तरि काइ करुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मायावहीणी काइ करीति ? " आणि अवघे रडों लागले : दायांबा रडति : " माझेया प्रसया : माझेया प्रसनाएका : माझेया प्रसोवा[३] : दंडु कोणां निरोविला ? झोळी कोणां निरोवीली ? " ऐसें अनेगीं अळापीं दुख करितातिं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " दुख न करा गा *अपमृत्यु एकु आति*[४] : " परि ते रडतचि असति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : काइ रडतचि असाल ? " " जी जी : तरि काइ करुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मेलेया ओउजें[५] तें करा : " " हो कां जी : " ।।

मग भट गळनींबेया गेले : लाकुडें आनिलीं : सरण रेइलें : मग तयांलागि कीडडी केली : तयांसि उथानपींडु दीधला[६] : कीडडीएवरि घातलें : चौघ खांदीं रीगाले : दायंबायें वीसदेओ घेतला : मग नीगाले : सरीसें गोसावीं बीजें केलें : खोलबुंथि घातली : मग मध्यें उथांनपींडु दीधला : तेथ गोसावी उभे राहीले : मग नेउनि सरणावरि घातले :

---

२ **अ.** ग्रहो आटु सुदला.

**३१३.** १ (**प्रव.** 'संहारा'चा प्रकरणवश). २ **गो.** उगलेचि. ३ **यमु.** °दुधीया ताकाचा कोणासि नीरोवीला ? पात्र कोणासि नीरोविलें ? दंडु—. ४ (**संपादक. विमा.** ५ १२०). °**एवां.** कीजे **यमुने.** वोवजे. ६ **यमु.** उंडीतोंडावरि ठेविली.

मग समसानपींडु दीधला : दायंबायें धार दीधली : पाइतीं करा[७] फोडीला : आणि तेथ लोळींनले : मग अग्न प्रजळिला : गोसावी नावेक उभे होते : ।।

मग पींपळाखालि आसन जालें : मग अवघे भक्तजन एउनि गोसावीयांजवळि बैसले : रडों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " दुख न करा : प्रपंच अनित्य : देह नासिवंत : असे तें दीसे : दीसे तें नासे : दुख न करा : " परि ते रडतेंचि असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " दुख न करा गा : *संसारु म्हणिजे हा दीर्घ स्वप्नु गा : दुःखरूपता : पापमूलता : अनित्यता इयें तीन्हीं नव्हेति तारि संसारावांचौनि आणिक कांहीं गोमटें असे ? परि अनित्य म्हणौनि तें गोमटें फावया न वचे : म्हणौनि दुःख न करा : दुःख म्हणिजे पाप*[८] *:* " यावारि *गोसावीं संहार प्रकर्ण नीरोपिलें*[९] *: सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वरप्रवृती माया सृष्टिसंहारू करी : विखो इंद्रियीं विलया जाए : इंद्रिय अंतःकरणीं विलया जाए : अंतःकरण देहीं विलया जाए : देह विदेहीं विलया जाए : विदेह ते नित्य : कार्यअविद्या कारण-अविद्येचां ठाइं विलया जाए : कार्य कारणीं विलया जाए : एकु नित्यवर्गु : एकु अनित्य वर्ग : नित्यवर्गीं जीव : देवता : परमेश्वरु उरेति : अनित्यवर्गीं अनादिअविद्या कर्मलेप उरेति : अनादिअविद्याकर्मलेपयुक्त जीव मायास्वरूपीं असति : देवता स्वरूपीं स्थिता होति : यापरी प्रपंचु संहरे : माया परमेश्वराची प्रवृती वोळगे*[१०] *: " ऐसें गोसावी निरूपण करिती*[८] *:* परि तें रडतेंचि असति : तवं दहन चेतलें : प्रसनाएका नावेक उब लागली : आणि स्तीति भंगली : पींडु तोंडावरि होता तो खादला : एउनि भक्त-जनामागां बैसले : तेहीं रडों लागलें : मग गोसावीं भक्तजनांतें पुसिलें : " तुम्हीं कां गा रडता ? " " जी जी : परसानाएक मेलें म्हणौनि : " " तुम्हीं कां गा रडता प्रसया ? " " जी जी : तें ऐसें जालें : हे अवघे रडताति म्हणौनि : " आणि गोसावीं हास्य केलें : मग दोहीं गांविचा लोकु पाहावेया आला होता : तया ऐसें जालें : गोसावीं आपुलें मेलें[११] जीववीलें : ।।

## ३१४ तथा कर्णौशधश्रवणें उपहासु*

[ एकु दीं परसनाएकु गोसावीयांपुढां बैसलें होतें : तेंहीं कानीं वीष्णुक्रांताचा मणी बांधला होता : तो गोसावीं श्रीकराचेनि अनुकारें पुसीला : " हें काइ ? " " जी जी : हा वीष्णुक्रांताचा मणी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एणें काइ होए गा परसेया ? " " जी

---

७ **यमु.** केळी फोडिली. **नेपं.** घागरि फोडिली. ८ (**प्रव. वि.** १९१. **प्रव.**तील हा भाग **पं.** प्रतीतील या लीळेत आहे.). ९ (**प्रव.** 'संहारा'चा प्रकरणवश). १० (**सूत्रपाठ.** संहार प्रकरण). ११ (**यमुने.**).

**३१४.** * येथे ही लीळा **मु.** प्रतीतून घेतली आहे. अन्यत्र ती केवळ **य.** प्रतीत आहे. पण तेथेही नुसती 'आदि' आहे. 'पाठसमुदाया'च्या पोथ्यांतील चरित्रांच्या 'आद्यां'तही ती आढळते.

जी : कांही द्रव्य : औषधी : जी जी : हा अदीत्यवारीं चतुर्दसीं आवंतीजे : मग आवेसें पुजुनि कानीं बांधीजे : तेणें लोकु मानी : आणि सौकर्यें सोपस्कर भिक्षा होए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " चतुर्थाश्रमु संन्यासुवेसें नव्हेचि होए : मां आतां एणें काइ होइल ? वरि एथिचें दर्शन : " म्हणौनि श्रीकरू झाडिला : उपहासीलें : दैन्य जालें : ।। ]

## ३१५ मेंढखडकीं आसन

मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : मेंढखडकीं आसन जालें : *सारिसें इंद्रभट होते : तयाची पासवडी मैळली देखौनि*[1] सर्वज्ञें म्हणीतलें : " इंद्रेया : एथ तुम्हीं पसवडी धुआवी गा : " " हो कां जी : चोखट नव्हे[2] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मळघाणि फेडिजे : जळघाणि लावीजे : " " हो कां जी : " मग तेथें सीधीं लेंडीं होतीं : *तीयें वेंचलीं*[3] : पासवडी कुसकरिली : मग धुतली : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग बीजें केलें : ।।

## ३१६ वाडेगांवीं धाबां आसन : हींसानिमीत्यें गमन

मग वाडेगांवीं जोगस्वरीएचां देउळीं आसन जालें : तवं तेथ एकु मेंढरुं घेउनि आला : तवं बाइसीं म्हणीतलें : " जा परतीं : एथ बाबा असति : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हें घेइन घेइन म्हणतीए : हा देइन देइन म्हणताए : एथौनि चाला : *राजसे तामसे स्थानीं न बैसावें*[1] : " मग गोसावीं नरसींहांचेया देउळा बीजें केलें : तेथ वस्ति जाली : ।।

## ३१७ कपाटीं दधीभातु आरोगणा

मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : कपाटीं आसन जालें : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला[1] : मग गोसावीयांसि दधिभातु आरोगण जाली[2] : ।।

---

**३१५.** १ (**यमु.**). २ **हीबी.** नव्हैल. ३ (**यगोही.**).

**३१६.** १ (**प्रव. आ.** २४२). **पं.** °हींसा वार्ते तीए स्थानी माहात्मेयाति असो नए : "

**३१७.** १ **ने.** °तवं सारंगपाणीभट दधिभात घेउनि आले : बाइसांपासीं वोपिला : गोसावीयांसि दुपाहाराचा पूजावस्वर : चंदन वोळगविलें : आडा रेखिला : आक्षेतांचें आर्चन केलें : दंडवत केलें : ताट केलें : गोसावीयांसि आरोगण : भक्तजना प्रसादु जाला : सारंगपाणीभटा पाठवणी जाली : श्रीचरण नमस्कारूनि नीगाले : बाइसीं शएनासन रचिलें : गोसावीयांसि तेथ पहुड : पश्चात पाहारीं उदैचां उपहुड : मग गोसावीं बीजें केलें : ।। **पं.** °तवं चक्रपाणिभट गोसावीयांचेया दरीसनां आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले. **एवा :** बाइसें भीक्षेसि गेलीं होतीं : तवं त्याचीया ब्राह्मणीं लेकुरूवातें उपंगळीए घेउनि बैसलीं असति : तवं बाइसीं पुसिलें : " हां ओ : हे डोळे कां उघडी ना लेकरूं ? " " आइ : हें अपुरेया द्याचें सातां मासांचे जन्मलें : " बाइसीं म्हणीतलें : " आमचेया बाबाचेया दरीसनां या पां : " मग तेंही चक्रपाणिभटां पुढां सांघीतलें : मग सातां दीसांचे गोपाळ पंडीत गोसावीयांचेया

## ३१८ रावणा पेंधया भावानुवादु*

[गोसावी घटसीधनाथाचेया देवालया बीजें करिताति : पेंडां[1] चरणचारी उभे जाले : भगतजनापूढां दाविलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें घेया गा : पेंधयानि दगड वाइले देवतेसि : तें घेया गा पेंधयाचें फुल : " ऐसें दाविलें : मग तेयाचि पिंडाचें टेक वळघौनि घटसीधनाथा बीजें केलें : उतरामूखेनि दारवठेनि आंतु बीजें केलें : दोन्हीं दारसंका दोहीं श्रीकरीं धरीलीया : भक्तजनां दाखवीलें : " हें घेया गा : पेंधेनि दगडाची पूजा केली ते हे देवता : ऐसा कोण्ही देवतेचा भाओ नाहीं : जे दगडीं पूजा करी : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " भावो तरि पेंधेया रावणाचा : " भक्तजनीं म्हणीतलें : " जी जी : तो कैसा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " महादेवाची भक्ति रावणें केली : हाताचा रावण हाताकरूनि आळवीलें : बरवें गायेन केलें : परि काहीं प्रसन्न नव्हेचि : मग आपणचि अनुक्रमें नवहीं शीरें लोटिलीं : दाहावियां सीराचिये गळां शस्त्र घातलें : तवं 'राहे : राहे :' म्हणौनि वारिलें : 'माग : प्रसन्न जालां :' 'हो कां : प्रसन्न झालासि तरि मज चौदा चौकडियांचें राज्य देयावें :' 'ना : हो कां : दीधलें :' आठ चौकडिया पार्वतीयेचिया : दोनि स्वामि कार्त्तिकाचिया : च्यारि महादेवाचिया : भावें ऐसें जालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : " भावो अनिएतु फळ दे : " ।।

---

दरीसना घेऊनि आले : दरीसन जालें : गोसावीयांचीए उसंगीए गोपाळ पंडीत घातले : मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांचीए जानुवरि चळवळ चळवळ करूं लागले : गोसावीं श्रीकरें स्पर्सीलें : कृपादृष्टि अवलोकिलें : मग म्हणीतलें : "हा एथीचाचि मां : देवाभक्तां भेटि जाली मां : " (**होबो.** सर्वज्ञें म्हणीतलें : "चर्मचक्षु लोपती : मग ज्ञानचक्षु होति : " ) मग आरोगण दधिभाताची : तेहीं आणिला होता : **एवा.** बाइसांतेंचि होता : मग गोसावीं तेयांसि पाठवणी देउनि मग घटसीधनाथासि बीजें केलें : तेथ अवस्थान जालें : ।।

(**होबो.** प्रतीत 'सारंगपाणिभटां भेटि' आणि 'तथा ज्ञानचक्षुकथन' अशा दोन स्वतंत्र लीळा आहेत. सारंगपाणिभट व चक्रपाणीभट या दोन नावांत काही घोटाळा झालेला असावा. असे 'तथा' या शब्दावरून वाटते. मुरारीमल्लबासाच्या पीढीपाठाच्या दुसऱ्या शोधनीत (**मु.** प्रत) या लीळा नाहीत. म्हणून त्या संहितेत अंतर्भूत न करता तळटीपांत दिल्या आहेत.)

२ **एवा.** एकें ब्राह्मणें रोटी आणिली : **एवा.** बाइसाची होती : **अ.** °मग गोसावीयांसि तेथ घटसीधनाथीं वसती जालि : ।।

**३१८.** *प्रस्तुत लीळा **अ.** प्रतीत नाही. येथे ती **गो.** प्रतीतून उद्धृत केली आहे. **ने.** प्रतीत ती उत्तरार्ध २६७ वी लीळा म्हणून आली आहे. **मु.** प्रतीतील **अज्ञात** लीळेतील १० वी लीळा 'रावणा पेंधेया भावानुवादु' ही या लीळेचाच भाग होय. म्हणून ती या लीळेत अंतर्भूत केली आहे. तोच या लीळेचा मुख्य भाग असल्यामुळे संपूर्ण लीळेची 'आदि' **मु.** प्रतीतील आदीप्रमाणेच ठेवली आहे.

१ **ने.** पेंधीं ( पेंढीं ? ).

सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसेंचि पेंधेनि भावो केला : पहिलें देवतेसि फुल वाये : तीयें न पुरति : मग पाला खोडें वाये : तीयेंहीं न पुरति : मग खडेगोटे वाये : तेहीं न पुरति : मग थोरलिया धोंडी वाये : ऐसां एकु दीं थोरली ऐसी धोंडि घालावेया आला : तवं देवता प्रसन्न जाली : ' माग माग पेंधेया : ' तेणें म्हणीतलें : ' मज आपणयांपासि असों द्यावें : तुआं आपणयां वेगळें न करावें : ' ' हो कां : ' म्हणौनि प्रसन्न जाली : " सर्वज्ञें म्हणीतलें : " *भावो जैसा पेंधेयाचा : प्रल्हादाचिया भावातिशयें आणिके देवते आड रिगौनि फळातें दिधलें : भावो अनियत फळ दे : प्रल्हादाचेया कैवारा भूत एक अवतरलें : तेयाचेया कोपापुरतें चराचर विश्व न पुरे*[२] : " ।।

मग गोसावीं घटसीधनाथाचेया देवळा बीजें केलें : बाइसीं झाडौनि आसन केलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : श्रीचरण प्रक्षाळिले : वीळिचां पूजाअवस्वरू जाला : व्याळी जाली : वीडा जाला : भक्तजना प्रसादु जाला : चौकीं वसति[३] जाली : ।।

## ३१९ सीधनाथा वीडा वाणें[१]

[ एरी दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवस्वरु जाला : गोसावीं आसनीं उपविष्ट असति : तवं सारंगपाणिभट आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांसि चोखा पानाचा वीडा वोळगवीला : गोसावीं लींगापासि बीजें केलें : लींगासि[२] वीडा वाइला : मग चौकीं आसन जालें : ।। ] मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : ।।

---

२ (**प्रव. वि.** ४९–५१) 'पेंधेया भावो कथन :' ही लीळा **हीबी.** प्रतीत पुढीलप्रमाणे आहे. 'सर्वज्ञें म्हणीतले : " बाइ : देखिलें हें पेंधियांचें फुल ?" बाइसीं म्हणीतलें : " बाबा : फुल काइसें ? आणि पेंधा म्हणिजे काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पेंधा तो गोवारी : अवघेया गावींचे गोवारें राखे : तयासि देवतेची भगति : देवतेसि फुलपत्री वाए तेधवां तो अन्न घे : ऐसा तेयासि नेमु : देवता चीत पाहों आदरिलें : फुलें पानें तुटलीं : मग डाहाळे वाये : तेहीं नाहीं : मग खांदीया वाये : त्याहीं नाहीं : अवरीखनें पडीलें : तेणें म्हणीतलें : 'देवतेसि पुजा करिन तेधवा अन्न खाइन :' म्हणौनि अवस्थाभुत नीगाला : तवं फुलपत्री न जोडे : एकी दरां पडीला : दहावी अवस्था प्रकटली तवं सूर्यो उगवला: सूर्याचीया तीरपीं पाखाणु झळझळीत देखीला : आणि स्तीति जाली : उठिला : फुल जोडलें म्हणौनि पाखाणु उचलौनि डोइएसि घेतला : घेउनि ये तवं देवता सामोरी आली : 'अरे : सांडी सांडि : प्रसंन जालां :' 'तु कवणु ?' 'मीं सीधनाथु : माग माग : प्रसंन जालां :' तेणें फुल ठेविलें : चरणांसि लागला : दोन्ही अदृश्य जाले : देवता फळासी नेला : तें हें पेंधयाचें फुल बाइ : " ।। '
३ **रावा.** °गाभारेयाआंतु बीजें केलें : सीधनाथ हातें स्परीसीला : वीडा वाइला : ।।

**३१९.** १ ही लीळा येथे **हीबी.** प्रतीतून उद्धृत केली आहे. २ **एवा.** °तयाकरवि वीडा वाववीला.

## ३२० ब्राम्हणीए वस्ति*

[ तैसेंचि गोसावीं बीजें केलें : सांघातें सारंगपाणिभट असति : गोसावी गांवासमीप आले : मग तेहीं वीनवीलें : " आजि येथ राहावें जी : माझें कुटंव सांभाळावें : " गोसावीं वीनवणीं स्वीकरीली : तेहीं सडेसंमार्जनें केलीं : गुढी उभीली : मग गोसावीयांसि मर्दना दीधली : मादनें जालें : गोसावीयासि मंगळार्ति धुपार्ति जाली : मग ताट केलें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुरुळा वीडा जाला : मग गोसावीयांसि उतरामुखे चौकीयेसि वस्ति जाली : ।। ]

## ३२१ प्रतीस्थानीं गणपतिमठीं अवस्थान[१]

मग गोसावीं प्रतीस्थाना बीजें केलें : पुर्वामुखु मढु : दखीणीली भींतीसी पुर्वपसीम ओटा : *पुढां चहुंकडे पटीसाळ*[२] : मध्यें बोडणवावि : दादरा बोडणवाविचा दारवठा उतरामुख : जगतिचा दारवठा पुर्वामुखु : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : ।।

## ३२२ भटां वृतांगफाळिगमनीं आस्चर्ये दाखवणें[१]

एकु दीं गोसावीयांसि दुपाहारिचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि बाइसीं ताट केलें : गोसावी आरोगण करिताति : मग गोसावीं स्रीकरीं वांगेयाची फाळि[२] घेतली[३] : श्रीकरीं देंटु धरीला : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : हे वांगेयाची फोडि जातीए गा : धरा : " " हें काइ जी : जाइल कैसी ? " म्हणौनि भटीं दाटुनि दोहीं हातीं धरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : " दाटुनि धरा : गेली हो : " " हो कां जी : मीयां दाटुनि धरिली आहे : " " पा हो जाइल : दाटुनि धरा : गेली हो : " " हो कां जी : जाइल कैसी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " गेली हो : " आणि सोडिली : भट मुठि उकलुनि पाहाति तवं हातीं काहीं नाहीं : मग भटां आस्चर्ये जालें[४] : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ।।

## ३२३ घांटेयां हरिभटां प्रपंचविस्मृति करणें

घांटे हरिभट गोसावीयांचेया दरिसनां सकुटंबी आले : गोसावीयांसि दरीसन जालें : मग एकु दीसीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : हरीभट : तयांची ब्राम्हणि : तीयें

---

३२०. ***अ.** व इतर बहुतेक पोथ्यांत या लीळेची आदि आढळते. **होबी.** प्रतीत ती सविस्तर आली आहे. तेथून येथे उध्दृत केली आहे.

३२१. १ **हो.** प्रतीत ब्राम्हणीनंतर 'काउळगावीं कावलेश्वरीं वस्ती' – नंतर 'देवळाणां वस्ति' – व मग प्रतिष्ठान, असा क्रम आहे. २ (**यमुगो.**).

३२२. १ या लीळेपूर्वी **अ.** व इतर बहुतेक पोथ्यांत महदाइसेसंबंधीच्या काही लीळा आहेत. मी त्या, महदाइसा वाराणसीहून परत आल्यावर घातल्या आहेत. (पुढे लीळा ४१७, ४१८ पाहा). २ **एवा.** फोडि. ३ **यमु.** देटीं वोळकंबत वोळकंबत धरिली. ४ **होबी.** °भटीं म्हणीतलें : " हें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हा शक्ती एकीचा व्यापारू : " मग––.

गोसावीयांपासि बैसलीं असति : गोसावीं हरिभटातें म्हणीतलें : " भटो : एथ कांहीं मागा : " " हो कां जी : जी जी : गोसावीं मज असेखा प्रपंचाची वीस्मुर्ति[1] देयावी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : असेखा प्रपंचाची विस्मुर्ति हा काइ पुरुखार्थु ? हें तवं अज्ञान : सर्वत्र ज्ञान मोचक कीं : " " ना जी : मज हेंचि होआवें : " " तुम्हीं वीद्वांस : काहीं सास्त्र जाणा : मां यां तुम्हां वीचारितां जें नीकें[2] तें कां नां[3] ? " " ना जी : मज हेंचि होआवें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " चांग वीचारा : निकें वीचारा : लग्नघडी वर्तति असे : *असें*[3] तेणेंसीं उठीतिल : कां स्तीत्यंतर[4] प्रगटैल : " " जी जी : वीचारिलें : " आणि तयां स्तिति जाली : वस्त्रें सांडीलीं : धोत्र सांडिलें : मग गोसावीयांचे दोन्हीं स्रीचरण सीरावरि धरीले : मग म्हणीतलें : " जाइजताए गा श्रीचक्रधरा : " ऐसें म्हणौनि नीगालें : मग तेयांचीया ब्राम्हणीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : एहीं हें मागीतलें : आतां मीं काइ करुं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुम्हीं असाल तेथ एतील : तुम्हीं म्हणाल तें करितील : " *मग तीयें नीगालीं : तीयें रीधपुरीचीया वाटे लागलीं : पेणें पावे*[5] *:* मग तीयें असति तेथ एति[6] : त्यें म्हणति तेतुलेंहीं करीति : रीधपुरा जाति : दावें नेसति : दोरु पांगुरति : श्रीप्रभूसि हातीं राख घेउनि[7] मग धुपार्ती करीति : गांविचा लोकु म्हणे : " राउळांचें तें यांसि आलें : एरें आवघीं धांदेया लागलीं : " ।।

## ३२४ स्त्रीदत्त दरीसनपुण्यें ब्राम्हणा बळदत्वनिवृति

दोघी[1] बाइया गोसावीयांचेया दर्सना एति : मग एकु दीसु तीं रात्रीं स्वप्न देखिलें एकु ब्राम्हणु तेयां सपनां आला : " आइ : मीं पुर्वीं ब्राम्हणु[2] : मग कोण्हां एका पापास्तव मीं बैलु जालां : तो मीं ग्रगाडां[3] पडिलां असें : माझें देह काइसेनहीं जाए ना : तरि मज गोसावीयांचेया एका दरीसनाचें पुण्य देया कां : मग मीं या बैलत्वापासौनि[4] मुचैन : " ऐसें सपन देखिलें : मग उदीयांचि उठीलीया : ग्रगाडेया पांहों गेलीया : पांति तवं तो बैलु खूर[5] खोडीतु[6] असे : मग गोसावीयांचेया पुजाअवस्वरा आलीं : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांपुढां सांघों लागलीं : " जी जी : मीयां[7] आजि सपन

---

३२३. १ **मुनेहीबीपं.** विस्मृति. २ **अ.** जें नेए तें का : " **हीबीपंने.** तें कां न करा. ३ **(गोनेय.)**. ४ **अही.** स्तीत्व तरी. **गो.** स्तीत्यांतु. **बी.** अस्तित्व ५ **(यमु.)**. ६ **अ.** असति. ७ **अ.** घेति.

३२४. १ **यमु.** वाणीनि एकि दीसवडा (**मु.** नीच) गोसावीयांचेया दर्शना ए : तीहीं स्वप्न देखिलें : तांबोळीयाचा बैलु टबकला : तो चींचाए आडां पडिला असे : तो स्वप्नीं आला. २ **पं.** °तेलीयाचीया दोनि आसु लागें : तेया पापास्तव—. **एवा.** °तें मीं द्वेखें यौगीयाचीए डोइएसि वोझें दीधलें : तेया पापास्तव—. ३ **गोपं.** गर्गाडां. **ने.** गरगाडां. **हीबी.** गडदरां. ४ **चमु.** बैलपणा°. ५ **नेपं.** खुरिया. ६ **अ.** खुरडीतु. ७ **गोपं.** आम्हीं.

देखिलें : एकु ब्राम्हणु सपनीं देखिला : ' आइ : मीं पुर्वीं ब्राम्हणु : कव्हणा एका पापास्तव बैलु जालां : तो मीं ए ग्रगाडां[7] पडलां असें : माझें देह् काइसेनहीं जाए ना : तरि मज गोसावीयांचेया दर्सनाचें पुण्य[8] देया कां : मग मीं बैलत्वापासौनि मुचैन : ' ऐसें सपन देखिलें : मग उदेयासीचि उठीलों : ग्रगाडेया गेलों : पांहों तवं तो बैलु खूरु खोडीतु असे : मग गोसावीयांचेया पुजाअवस्वरा आलों : " मग गोसावीं पुसिलें : " बाइ : तुम्हीं दीधलें ? " " ना जी : आमचें जाए ना ? " " बाइ : जावेयासि काइ कारण ? सतसंभवीं अधिकाचि होए : पुण्य देतां पुण्यहीं वाढे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दीवेयापासौनि दीवा लाविजे तरि काइ दीवा उणा होतु असे ? " मग तीहीं स्नान केलें : मग आलीं : " तुज गोसावीयांचेया *एका*[9] दरीसनांचें पुण्य हो : " म्हणौनि तयावरि उदक घातलें : आणि तयाचें देह् गेलें : ।।

## ३२५ भट माहादेओ पाठक उदग्रहणिके कन्याक्रीडा भाखण

भट गंगेकडे गेले होते : मग एतां मार्गिं माहादेओ पाठक भेटले : ते भटांसीं उघाणी करीत दारवठावरि आले : आणि उगेचि राहीले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : दोघै गोसावीयांजवळि बैसले : मग गोसावीं भटोबासांतें म्हणीतलें : " काइ गा : बोलसि ना ? " " जी जी[1] : हे वीद्वांस : मां यांसीं काइ बोलों ? ना जी : मीं काहीं सास्त्र स्वत जाणतु असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बोल : तुझां मुखींहुनि असास्त्रीए न नीगे[2] : " इतुलेनि भट बोलों लागले : एतुलेनि माहादेओपाठक भटीं अडीले : मग माहादेओपाठक उगेचि राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ भटो : बोला ना : " " जी जी : भट वरवें बोलताति : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बटकींआंतु खेळिजे[3] : तैसें बटीकांआंतु खेळों नै ए कीं[4] : " ।।

## ३२६ हंसराजु आयागमनीं आबैसातें रीधपुरा पाठवणें

गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जालां : आरोगण जाली : पहुडु जाला : उपहुडु होउनि वाहीरिला ओटेयावरि आसन असे : हंसराजु रीधपुरींहुनि[1] आलीं : बोंडणवाविचेया दारवठेयापासि देखिली : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ हंसराजा : तुम्हीं आलींति तरि तेथ कवण ? " " जी जी : एइन : मग वीनवीन : " मग सामोरीं आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं :

---

८ **एवा.** फळ. ९ **एवा.** होइल. १० **(यमुगोहीने.)**

**३२५.** १ **यमु.** °मी काइ वीद्वांस ? २ °**एवा.** " काइ तुझा मुखींहुनि अन्य सास्त्र नीगैल ? " ३ °**एवा.** खेळों ए. ४ **एवा.** आंडोरी आंतु खेळोंए तैसें आंडोरां आंतु खेळों नैए :

**३२६.** १ **यमुगोने.** परमेश्वरपुरूनि.

मग सांघों रीगालीं[२] : "जी जी : गोसावी अनेग आग्रहो घेति : धानांचा भातु मागति[३] : तरि मीयां काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें तुम्हीं एथ सांघौनि पाठवावें कीं : तें एथौनि पाठवीजतें कीं : आतां श्रीप्रभूसि तया स्थानाची[४] सवे जाली असे : श्रीप्रभू एति : दोन्हीं दारवंडा धरीति : पालवा पीळा सुति : 'तुं कें गेलीसि वो' म्हणति : श्रीचरणें[५] पाटु[६] थापटीति : तेव्हळि काइ खाइजैल ? काइ पाणीं पीजैल[७] ? आतां श्रीप्रभूचीए सेवेसि कवण योग्य ?" म्हणौनि गोसावीं चींता स्वीकरीली :

मग आबैसा गोसावीयांजवळि होतीं : तेयांतें गोसावी मागां श्रीप्रभूचीए सेवे पाठवीत होते : तै आबैसीं गोसावीयांपुढां ऐसें म्हणीतलें होतें : 'मज वैजोचीए ब्राम्हणीचें बाळांतपण करावें असे :' तें मागिलें अनुचितें आबैसांसि गोसावीयांतें वीनववे ना : मग आबैसीं बाइसांकरवि वीनववीलें : "बाइ : तुम्हीं गोसावीयांतें वीनवा कां : गोसावी जरि मातें पाठवीति : तरि मीं जाइन :" मग बाइसीं वीनवीलें : "बावा : श्रीधाबाइ ऐसें म्हणताए : 'बाबा जरि मातें पाठवीतील तरि मीं जाइन :'" सर्वज्ञें म्हणीतलें[८] : "यें जातील तरि लेंकीसुनांचीं बाळांतिपणें कवण करील ?" आणि आबैसां थोर दुख उपनलें : मग माघौतें आबैसीं वीनववीलें : "बाइ : गोसावीयांतें वीनवां कां : गोसावी जरि मातें पाठवीती तरि मीं जाइन :" मग बाइसीं म्हणीतलें : "बाबा : श्रीधाबाइ ऐसें म्हणतीए : 'बाबा जरि मातें पाठवीती तरि मीं आतां जाइन :'" गोसावी उगेचि : तवं आबैसां अदीक दुख उपनलें : ॥

मग गोसावींचि मुख केलें : "बाइ : तरि एकलीं जाओं जाणती ?" "हो जी : जाइन :" मग साउमीं आलीं : श्रीचरणां लागलीं : "जी जी : तरि मीं आतांचि नीगों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां नको : भोजेयासि आणि भोजेयाचे ब्राम्हणिसि अनुसंधान[९] कीजैल : तेयांसि परमेश्वरपुरा जाणें असे : मग तेयां सांघातें जा :" मग दायांबा आणि दायांबाचीए ब्राम्हणीसि गोसावीं बुझावणीं केली : गोसावीं तयांचा अळंकारु देववीला : "भोजेया : तुम्ही भीक्षा करावी : नीकी भीक्षा एइल ते यांसि जेउं सुआवी : यांचेया अळंकारांची वास न पाहावी :" ॥

मग नीगतां आबैसीं गोसावीयांचां ठाइं एकु उपहारु केला : मग आबैसें पुरीया रांधीतें होतीं : बाइसें एकि पुरी घेउनि आलीं : "बाबा : श्रीधाबाइ एवढीया पुरीया रांधीतीए : नेसों पुरते[१०] :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "यें देवसुगरणें[११] कीं :" मग दाइंबा

---

२ **यमु.** आदरिलें. ३ **यमु.** °वेचावेया नाहीं : तरि मीयां—. ४ **एवा.** अंनाची. **एवा.** आसनाची. ५ **यमुने.** श्रीकरें. ६ **ने.** पाठी. **ही.** पाओ. ७ **यमु.** °हें नाठवे होए ? हें जरि आठवे तरि यववैल कैसें ? पाउलचि कैसें घालवैल ? आतां—. ८ **यमु.** °यासि श्रीप्रभुची सेवा काइसी ? एहीं धाएवन्हीं लेकीसुनांचीं बाळांतिपणें करावीं कीं :" ९ **मु.** पुनसंधान. **य.** सीष्टाइ. १० **यमु.** °पुरेती एवढीया. **गोने.** पुरतीए. ११ **एवा.** अतिसुगरणें.

नीगाले : निगतां आबैसीं पुसिलें : " जी जी : मीं तेथ जातीयें : तेथिचि सेवा अवघड आइकीजे : तरि मीयां तेथ कैसेयां वर्तावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीप्रभूसि जो पदार्थु ओळगवीजे तो आधीं द्रीष्टपुत कीजे : आणि तेथची प्रवृति ऐसी : कांहीं न पाहात कांहीं मुखीं न घलीजे : श्रीप्रभूसि तुमची सवे लागतलागत श्रीप्रभू तुमची सेवा अंगीकरीती हो : तुम्हांसि श्रीप्रभूची सेवा होववैल हो :" मग आबैसें नीगालीं : *मग भटाप्रति सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : ऐसेया जीवां श्रीप्रभूची सेवा : परि नेणिजे श्रीप्रभूची प्रवृत्ति कैसी*[१२] *:"* ।।

## ३२७ सारंगपंडीतकृताव्यतिरेकें भटअभीमानु स्वीकारु

सारंगपंडीतीं एकु दीसीं गोसावीयांसि उपहारालागि वीनवीलें : गोसावीं तयांचेया आवारा बीजें केलें : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग एरां भीतरि ताटें जालीं : मग गोसावीं ताटावरि बीजें केलें : मग सारंगपंडीतीं भटांचीए थाळां तुप[१] वाढिलें : तेणें आवघीं सेवै सरवळीं वरतीं आलीं : भटीं म्हणीतलें : " हें काइ सारंगपंडितो : हें काइ वाढणें ? " " घेया जेवा : तुम्हां पाहुनि[२] हें काइ बहुत ?" " तुम्हीं नावेक धनाडि[३] : आम्हीं काइ याचें मुख देखिलें असे[४] ?" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " काइ गा वानरेया ?" " पाहीजो जी : ऐसें काइ वाढणें होए ?" म्हणौनि थाळाचि उचलौनि दाखवीला : गोसावीयांपुढां : सर्वज्ञें म्हणीतलें : " हा म्हणताए ऐसें जरि नाहीं तरि[५] ऐसें करावेया कारण काइ ? हा ठाओचि परुता नेया :" मग आनीकु ठाओ आणिला : मग गोसावीं आपुलीए ताटिचें तुप वाढिलें : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीं मढासि बीजें केलें : गणपतिमठीं पहुडु जाला :।।

## ३२८ त्रृप्तपर्यंत अनुचर भोजनीं सारंगपंडितां उपालंभु

एकु दीसीं तेयां उपरि सारंगपंडितीं गोसावीयांतें उपहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणीं स्वीकरीली : गोसावीयांतेंचि उपाहारालागि वीनवीति : परि भक्तजनांतें न म्हणति : मग गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : गोसावीयांसि पूजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा वानरेया : मंडळिका : पांडा तुमतें जेउं[१] बोलावेया एइल : तऱ्हीं तेयाचेया घरा जेउं याल ?" " ना जी : नैयों[२] :" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

१२ (**प्रव.** वि. २१९).

**३२७.** १ **यमु.** °बहुत. २ **यगो.** पासौनि. ३ **यमुने.** धनाढय. ४ **यमु.** °तेहीं म्हणितलें: "फेडुं : आणि काइ ? आमचे भोजे (**मु.** आमतें भीकारी) खाति : तैसें कांहीं नाहीं :" तवं सर्वज्ञें म्हणीतलें—. ५ **पं.** °तरि ऐसें करा : घेया कोरूका : बाइ : हा ठावो—.

**३२८.** १ **गोने.** जेवावया बोलाउं एइल. **यमु.** जेउं बोलाउं एइल. २ **यमु.** सर्वज्ञें म्हणीतलें :

"एथौनि ऐसेंचि म्हणिजताए[३] : एथौनि म्हणिजैल : परि न वचावें :" "हो कां जी :" ।।

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ तुमतें पांणिभातु असे कीं :" "हो बाबा : असे :" " तरि आंबटी भाजी करा :" मग बाइसीं आंबटी भाजी केली : मग आवघे तृप्तपर्यंत जेविले :।।

मग सारंगपंडित बोलवावेया आले : मग गोसावीं तेथ बीजें केलें : आवघे भक्तजन गेले : मग गोसावीयांसि वरवा पूजाअवस्वरू जाला : तवंवरि तैसींचि ताटें केलीं : गोसावीं ताटावरि बीजें केलें : बाइसें बैसलीं : भक्तजन कोण्हीं नुठीति : सारंगपंडित आले : " नागदेओभटो : मंडळिकभटो : चाला ना भीतरि :" "आम्हीं आतांचि जेविलों :" " तरि जेतुकी भूक असैल तेतुकेंचि जेवा :" " ना आम्हां भुक नाहीं :" मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : यांतें म्हणीजो ना ?" "कां गा ? पांडा म्हणतु असे तें करा ना :" "ना जी : आम्हीं आतांचि जेविलों : गोसावी जाणताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं यांतें म्हणीतलें ?" " ना जी :" " आगा : तरि हे[४] काइसेयालागौनि एति ? एथिचा अवस्वरु पाहावेयालागौनि एति[५] : यांसि काइ याची चाड पडली असे ?" मग सारंगपंडितीं म्हणीतलें : " न या जा : होइल माझेया भोजयां[६] :" हा सब्दु बाइसीं आइकीला : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसावीं बीजें केलें : मग मार्गीं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : पांडेयासि परिवारावरि इतुलीही बुधी नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : आधीं एथ बुधी होआवी : मां एथिचेया परिवारावरि होआवी :" मग गोसावीं मढासि बीजें केलें ।।

## ३२९ भट उदकानएनीं दासी द्रीस्टांतु कथन

एकु दीं गोसावीयांसि मढीं आसन जालें असे : गोसावी नीरूपण करीत असति : तवं बाइसीं म्हणीतलें : " नागदेया : हे घागरि भरुनि आणि हो :" आणि भटां न मनेचि : घागरि घेतली : ' कैसीं यें बाइसें : नीरूपणाचांचि प्रसंगीं म्हणीयें देति : नावेक राहातीं तरि काइ होतें ?' ऐसें भट पोटीं करीत[१] गेले : लोणारतीर्थीं घागरि भरिली : गुडघेयावरि ठेविली : आणि वासना उपरतली : ' हें काइ जालें मज ? बाइसीं काइ आपुलें आंग धुवावेया आणवीलें ? गोसावीयांलागि आणवीलें कीं :' ऐसा अनुतापु करीत आले : घागरि ठेवीली : गोसावीयांसि दंडवत घातलें : मग सर्वज्ञें म्हणितलें :

---

"एथीचा पुजाअवस्वर पाहावेयाही न या ?" "जी जी : पुजाअवस्वरु पाहावेया येउनि :" सर्वज्ञें म्हणीतलें :—. ३ **एवा.** म्हणिजत असीजे. ४ **ने. यमु.** °काइ यालागौनि—. ५ **गो.** आले: ६ **ते.** भोइयासि.

**३२९.** १ **यमु.** भरीत. **ने.** म्हणत. **ही.** ऐसें तमतम करीत—.

" वानरेया : तुम्हीं जेंहुनि[२] गेलेति तें नव्हे : आलेति तें होए : यावरि गोसावीं दासीचा द्रीस्टांतु नीरुपिला : [ सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणा एकाची दासि असे : ते अष्टौपाहार म्हणीयें करी : यें मज खावों जेउं सुति : लेवों नेसों देति : ऐसें म्हणौनि न करी : माझें करणीयें म्हणौनि करी : मग तीएची गोसांवीणि जेउं बैसे तेव्हळि आधें तीएसि वाढी : आधें आपण घे : ते तीयेतें काइसेनहीं वंची ना[३] : " ।। ]

## ३३० नागाराउळभुवनीं भुखणधारणपुर्वक मोदक आरोगण

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें : पार्वतीचेया[१] देउळा वीहरणां बीजें केलें : तेथ नागाराउळें होतीं[२] : तेहीं देखिलें : आणि साउमीं आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांसि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग म्हणों लागलीं : " आइको सांपें पडिताळी[३] ना : माउली पडिताळी ना : आपुलें अपत्य पडिताळी ना : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " हें नव्हे आलें[४] : "* मग गोसावीयांसि चरणक्षाळण केलें : मग वाटां तुपलाडु ओळगवीले : गोसावीं आरोगण केलें : गुळुळा जाला : वीडा जाला : मग तयांतें अळंकारु होता : तीं सरें लेइलीं होतीं : सांखळी : सरी : अनंत : हातकडगै : मुद्रिका : वीरोदीया : वरवें वस्त्र[५] : ऐसे गोसावीयांसि अळंकार ओळगवीले[६] : मग गोसावीं नीगतां देओं आदरीलें : "ना जी : मीं नेघें हो : गोसावीयांसि वरवा साजतु असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां एथिचा होता घेया : " " ना जी : मीं नेघें : हा गोसावीयांसीचि वरवा साजतु असे : " ऐसीं तीयें काइसेनहीं नेघति : मग गोसावीं स्रीकंठीची सांखळी फेडिली : मग गोसावीं तेयांचीए गळां घातली : सरी फेडिली : तेयांचीए गळां घातली : अनंत फेडिलें : तेयांचीए कानीं घातलें : हातकडगीं फेडिलीं : तेयांचीए हातीं घातलीं[७] : मुद्रिका फेडिलीया : तेयांचीया आंगुळीयां घातलीया : वीरोदिया फेडिलीया तेयाचां हातीं घातलीया : मग गोसावीं बीजें केलें : तीएं नावेक अनुवर्जन करीतें आलीं : " जी जी : आपुलें अपत्य पडिताळिजे हो : " मग तयांतें राहावीलें : गोसावीं गणपतिमढा बीजें केलें : ।।

---

२ **यने.** जें होउनि. ३ (**दृपा.** ६२. 'दासीचा दृष्टांत').

**३३०.** १ **यमुहीबो.** पार्वती सोमनाथायाचेया. २ **यमु.** °नागाराउळ ते बाइल : परि तया दादलेयाचा वेखु. ३ **हीबो.** सांभाळी. ४ **हीबो.** सांभाळीलें. ५ °**हे परश्रामबास** : ।। वाघनख : रीठेगांठी : आंबुले : माहुलीं : मुद्रिका : वीरोदीया : **हे रामेश्वरबास** : ।। ६ **यमु.** °मग गोसावी उभे राहीले : वेढे करूं लागले : तीयें श्रीचरणां मोमे देति : दोंदा मोमे देति : म्हणति : " माझी आइको ऐसी दीसति असे : माझी बाइको ऐसी दीसति असे : माझी माउली : " ।। ७ **य.** °आंबुले फेडीले : तयांचां कानीं घातलें : बाळे फेडिले : तयाचां हातीं घातले :

## ३३१ लजीत उपाध्यांची रोटी आरोगण

उपाधीए एकु दीं गोसावीयांचां ठाइं उपाहारु करावा म्हणौनि कटकासि गोदानासि गेले : तवं तेथ गोदान होएचि ना : मग मागुते प्रतीस्थानासि एताति : तवं लोणारखांडीपासीं वणिजारे उतरले होते : तेहीं चणेयांचीया[१] कुंठा[२] भरलिया होतीया : तीया तीमलीया[३] होतीया : ते भीजलेया चणेयांची रासि केली असे : तेयांपासीं गेलें : स्वस्तिवचन केलें : तींहीं आदमणु एकु चणेयां घातला : साउमे आले : तवं चाटां रोटीया भाजिलीया असति : तयां स्वस्तिवचन केलें : तीं एकि रोटी दीधली : आडिका[४] तेलालागी दीधला : मग हाटां गेले : पाइकेयाची माळ घेतली : पाइकेयाचा[५] सतांबोळ वीडा घेतला : मग गणपतिमढा आलें : ।।

गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : मग लाजिले : घोंगडें वाहिरि ठेविलें : मग आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : स्रीकंठीं माळ घातली : आसनावरि वीडा ठेविला : गोसावीयांजवळि बैसले : मग गोसावीं पुसिलें : "वटिका[६] : वाहिरि काइ ठेवीलें ?" "ना जी : कांहीं नाहीं" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : वाहीरि वटीकें काइ ठेविलें असे तें आणां :" वाइसें गेलीं : घोंगडें घेउनि आलीं : गोसावीयांपुढें ठेविलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : सोडा :" वाइसीं सोडिलें : तवं रोटी चणे देखिले : गोसावीं स्रीकरीं रोटी घेतली : "ऐया : रोटी मां :" वाइसांकरवि पालीमांडें आणवीलें : "वाइ : ये रोटीएचे वीभाग करा :" वाइसीं रोटीएचे वीभाग केले : गोसावीयांलागौनि मोआचा[७] आगळा केला : मग गोसावीयांसि तुप वोळगवीलें[८] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणांचें कांहीं : कव्हणांचें कांहीं : यांचें एथ हें एक :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : यां चणेयांचें ढांकाणें करा :" "हो कां वाबा :" मग वाइसीं चणेयांचें ढांकाणें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांचे वीभाग करा :" बाइसीं वीभाग केले : मग गोसावीयांसि वोळगवीले : मो वोळगवीला :[९] [ सर्वज्ञें म्हणीतलें :

---

**३३१.** १ **ने.** °गोणीयाचिया. २ **य.** गोणिया°. ३ **नेगोपं** (**ने.** पाणियें) झळंबलिया. ४ **य.** आढू एकु. **मुगो.** आढू कवडेयां. **ने.** आठ कवडेया. ५ **यमु.** आडिकेयाचीं पानें पोफळें घेतलीं. ६ **एवा.** भटो....ठेविलें असे ?" ७ **य.** मोउआचा. **यगोनेपं.** °भागु केला. ८ **पं.** मग अवघेयां भक्तालागि वीभाग दीधले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अवघेयांसि तुप घाला :" मग बाइसीं अवघेयांसि तुप घातलें : ९ या पुढील कथा 'द्वापरलीळा'= श्रीकृष्ण चरित्रातील 'मीथळे सूतदेवा जनका भेटि' ही लीळा होय. 'बाइंदेशकर' पाठाच्या श्रीकृष्णचरित्रात 'लज्जीतु उपाध्या भोजनप्रशंसाप्रसंगें श्रुतदेव भावकथन' अशी तिची 'आदि' आहे. (लीळा ४०) म्हणून येथे अंतर्भूत केली आहे. 'पूर्वार्ध' संपादनासाठी घेतलेल्या **अ.** प्रतीतून ती उद्धृत केली असून पाठांतरेंही त्यातील आहेत. उत्तरार्ध लीळा ३२६. तळटीप ९ पाहा.

"वाइ : श्रीकृस्णचक्रव्रतीन मीथळेसि[१०] बीजें केलें : जनकाचेया ठाया बीजें केलें : आणि सूतदेवाचेयाहीं ठायासि बीजें केलें : श्रीकृस्णचक्रव्रति जनकाचेया ठाया वीज्ञानें बीजें केलें : आणि तेयाचेया ठायासि येन्हवी[११] बीजें केलें : सूतदेव ते ब्राह्मण : ते धान्य मागति : धान्याचा चोभाभरि करवंटेया आला[१२] होता : तेहीं तेयाचें पीठ केलें : तेहीं डेरे मांडिले : मग घागरिवरि दोघें पाणीं वाहों लागलीं : डेरे पाणीयां भरिले : मग तेथें इतुलालें[१३] पीठ घातलें : "श्रीकराचा अनूकारू : "मग श्रीकृस्णचक्रव्रतीसि सपरिवारी आरोगण दीधली : "] सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें वाइ : कव्हणांचें सतभोजन : कव्हणांचें सहस्रभोजन : वटीकाचें परीखानिमंत्रण[१४] :" मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा उळगवीला : ।।

## ३३२ सारंगपंडितां भोजन प्रस्णु

गोसावी एकु दीं आसनीं उपवीष्ट असति : जवळि सारंगपंडित बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : एथ अनुसरा गा :" तीं म्हणीतलें[१] "जी जी : मज तुपभातु आणि तांबोळ : बाजसुपवती होआवी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें एथौनि पुरवीजैल : भोगु काइ काउळां खादला असे : भोगु पाहा जा :" "हो कां जी :" 'जाओं ना कां पांहों :' म्हणौनि एका गांवां गेले : बैसले असति : तवं एक वोळखीचे भेटले : "हें काइ पंडितो : तुम्हीं केधवां आलेति ? चाला चाला घरा :" मग घरा गेलें : उटीलें[२] न्हाणिलें : ताटीं ठानवैं : तुपीं तांदुळीं जेविलें : पुडुवाटोवा[३] पानांपोफळां भरिला : वाजसुपौतीएवरि निजैले : उदेयांसीचि उठीले : "हा सोएरेयांचा गांवु : आतां उदासा गांवां जाओं :" मग आणीका गांवां गेले : बैसले असति : तांबोळी उतरले होते : तेहीं पानें पोफळें दीधलीं : एकें ब्राम्हणें देखिलें : "पंडितो : आमचेया घरा चाला :" तो घेउनि गेला : तेणें तुपींतांदुळीं जेउं सुदलें : बाजसुपवती नीजावेया दीधली : मागुतें आणीका गांवां गेले : तवं तेथेंहीं तैसेंचि जालें : मग एरी दीसीं मागुतें गोसावीयांचेया दरीसनां आलें : मग गोसावीयांपुढां आवघी वेवस्था सांघीतली : मग सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "भोगु तरि ऐसा असे : परि पांडेयासि तरुणी ब्राम्हणि : आणि व्रीति : यें दोन्हीं न संडति[५] :" ।।

---

१० **म.** महीतळीं. ११ **पंमु.** सत्यार्थें. १२ **अ.** आणिला. १३ **पंभग.** इतुकें इतुकें. १४ **अ.** प्रीक्षा°.

**३३२** १ **यमु.** "जी जी : मज तुपेंभातेंवीन : तांबोळेंवीन : बाजसुपवतीयेवीन न गमे :" २ **ने.** °माखिलें. ३ **अ.** पुडुवा. ४ **यमु.** °भोगु काइं काउळां खादला : **प्रवा.** माळां माथां भोगु मीळैल : **रामे.** ५ **हीबी.** सर्वज्ञें म्हणीतलें : "स्त्री : वैस्या : संपति : तीन्ही प्राणीयांसि अत्यज्य :" ऐसें गोसावीं नीरोपण केलें :

## ३३३ दुधपक्वानाक्षाइका स्त्रवण[१]

वाइसीं म्हणीतलें : " वावा : या वामदेवांचा एकु सीक्षु : तेयांची स्त्री तेयालागौनि नसुधेया दुधाचीं पक्वानें करी : तवं एकीं वामदेवांतें म्हणीतलें : ' नसुधेया दुधाचीं काइ पक्वानें होताति ? ते तयांआंतु धान्यें[२] मीसळीतीए :' तवं वामदेवीं म्हणीतलें : ' ऐसें ऐसें पा गा : माझें जन्मांतिक[३] व्रत[४] भंगिलें :' मग तो सीक्षु तयासि नमस्कारा आला : ' जाए जाए परता पापीया : आपुलें मुख नको दाखउं :' ' कां ?' ' ना : तुझी ब्राम्हणि आम्हांलागौनि जीयें पक्वानें करी तयांआंतु धान्य[२] मीसळी[५] ' ऐसा तो घरा गेला : ' पापीणी पापीणी : आतां मीं तुज नाहीं : तुं मज नाहीं : आतां धोत्र फाडौनि : डोइ बोडुनि उतरापथें जाइन :' तिया पुसीलें : ' कां ? ' ' ना माझेया गुरूचें जन्मांतिक व्रत भंगिलें :' ' तें कैसें ? ' ' ना तुं पक्वानें करीसि : तयामध्यें धान्य मीसळीसि :' ' मां काइ जालें : तुम्हीं माझी परीक्षा[६] पाहा : माझीये हातीं दुध देया : मां तुम्हां देखतां नसुधेया दुधाचीं पक्वानें केलीं तरि साच : नाहीं तरि जालेंचि आहे म्हणा :' मग तेणें वामदेवांपुढां सांगीतलें : मग तीयें बोलाउं धाडिलीं : झाडा घेतला : मग तीया नसुधेया दुधाचीं आधीलाहीहुनि बरवीं पक्वानें केलीं : मग वामदेवीं म्हणीतलें : ' आतां होआ भक्तें : करा भक्ति :' ऐसें वावा तीया वाइला केलें[७] :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मर मर सोच्या जीवा : तुतें काइ असे ? मां काइ देसी ? नव्हेचि तरि तो तीएसि नाहीं : ते तेयासि नाहीं : जालें जाणीतलें तरि होआ भक्तें : करा भक्ति :" ।।

## ३३४ स्त्रीवेथाक्षाइका स्त्रवण

" वावा : हे वामदेव : यांचे सीक्ष : चौधोत्रांचां[१] जवळगांवीं असति : तयांतें माघस्नानालागौनि घेउनि जाति : मग वानरीया[२] भरुनि उदका ठेविलीया असति : मग यांतें उंचीं बैसवीति : यांचा पाओ आडदांडीयेवरि ठेवीति : वरि घागरि रीचवीति : मग बुडि आवधीं माहो नाहाति : मग पायां तीडिक[३] लागे : मग आखुडीति : मग तीएं सीक्षें रात्रीं गहुवांचीया घुगरीया[४] करीति : मग पाओ सेकीति : ऐसें बाबा :" मग

---

**३३३.** १ या लीळेपूर्वी **अयगोने.** प्रतीत ' वामदेवां भूतश्रृष्टि दाखवणे ' व ' वामदेवां नमस्कारा येणे ' अशा दोन लीळा आहेत. त्या पूर्वार्धात (लीळा १३४ व १३५) आलेल्या आहेत. म्हणून येथे गाळल्या आहेत. २ **य.** कणीक. ३ **नेही.** जन्मांतिचें. **मु.** जन्माचें. ४ **मु.** तप. ५ **हीबी.** मेळवी. ६ **अहीपं.** प्रक्षा. ७ **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " कर्मचांडाळा पस्य जातिचांडाळ चांगु :" यावरि कर्मचांडाळाचा दृष्टांतु निरूपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " फुटला तरि डोळा : नां मोडिली तरि काही :" ।। **हीबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " हा ठावो वेन्हीं अंतु पाहाणें : " ।।

**३३४.** १ **अ.** चौदोत्रांचां. २ **य.** °केळीया भरूं भरूं ठेवीति. ३ **यमुने.** तिडका लागेति. ४ **यने.**

सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पोरु जीउ मरौनि इस्वर्ये[५] साधी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एक माहात्मे एका गांवांसि गेले : गांवींचीया लोकांपुढां म्हणति : ' आम्हांसि अमुकां वरीखीं : अमुकां मासीं : अमुकां दीसीं : आम्हां वीमान एइल : आम्हीं वीमानावरि बैसौनि जाउनि :' मग तो दीसु आला : आवघा लोकु मीळाला[६] : आतांचि वीमान एइल : तरि कांहीं वीमान एचि ना : मग आपण गुंफेआंत रीगाले : मग वीख घेतलें : तो तेणें गळा घुरुघुरुं लागला : तें लोकें आइकीलें : माहात्मेनि वीख घेतलें : मग तेयासि लोकें उपवीख केलें : " सर्वज्ञें म्हणीतलें[७] : " ऐसें गा जीव : मरौनि इस्वर्ये साधीति : " *यावरि भटीं म्हणीतलें : " जी जी : हे वामदेव मातें जेधवां देखीति तेधवां मातें म्हणति : ' नागदेया : तुवां धांडाळें सांडीलीं आणि श्रीचांगदेओ राउळापासि राहिलासि हें नीकें केलें :' ऐसें प्रतिभेटी म्हणति : " तें आइकौनि सर्वज्ञें म्हणीतलें : " जीवु म्हणिजे दोषदर्शिया गा : गुणावरि लक्षचि नाहीं : म्हणौनि[८] : "* ।।

## ३३५ पाखाणजाती नीरुपणें

गोसावी सारंगपंडितांचेया आवारा बीजें केलें होतें : मग मागुतें गोसावी मढासि बीजें करितातिः तवं ते वैजनाथाचें देउळ करावेया चीरे घडिताति : गोसावी तेथ उभे राहीले : मग पुसीलें : " हां गा : पाखाणांचीया कीती[१] जाती ? " मग तेहीं आपुलीया अनुभवीचीया सांगीतलीया : सीरसाळा : कोदवा : मुरुंबाळा[२] : मग गोसावीं पाखाणांचीया जाती निरुपिलीया : मग तेहीं म्हणीतलें : " जी जी : आम्हीं यांची सोएही[३] नेणों : या गोसावींचि नीरुपावीया : आणि गोसावींचि परीसावीया[४] : "।।

## ३३६ साधांप्रति मुंडीत जोगी प्रसंसा

एकु दीं गोसावीयांचें क्षेउर[१] जालें : गोसावीयांसि भीतरीला ओटेयावरि आसन असे : साधें आलीं : गोसावीयांचेया स्रीचरणां लागलीं : गोसावीयांचा उघडा[२] स्रीमुगुटु होता : दारवंडेसीं उभीं राहीलीं : स्रीमुगुटाकडे पाहों लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हों : ऐसें काइ पाहीजताए ? " " जी जी : वारिकें केलें तें पाहीजताए :

---

घुगरियावरि (**ने.** करि) सेकीति. ५ **ने.** ऐश्वर्य. ६ **गोनेही.** मीनला. ७ **ने.** " ऐसा गा पोर जीउ अभिमानें नरकासि जाए : " ८ (**प्रव. विमा.** ४२).

**३३५.** १ **गो.** केती. २ **ने.** °ह्मैसा. **ही.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें नव्हे : " " जी जी तरि कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तें ऐसें : स्वेतु : नेतु : श्रीसाळा : गव्हाळा : कांनवाथरू : कृधु : कृधाळा : स्फटीकु : नीळा : सेंदुरा : " आणीकही जाती गोसावीं नीरोपीलीया : तेही म्हणीतलें —. **पं.** °सेना : कानवाथरू : कादळा : गौहाळा : गारगा : नीळा : कोदवा : धौवाळा : ऐसीया जाति नीरूपीलीया : ३ **अ.** आएही. ४ °**एकी वासना** : गोसावी माइतेया हरिचीया आवारीहुनि बीजें करीत होते : तीए मार्गीं नीरोपीलीया :

**३३६.** १ **अ.** क्षौर. २ **ने.** उजडा.

जी जी : गोसावीयांचा स्त्रीमुगुटु कैसा बरवा मीरवताए : " सर्वज्ञें म्हणीतलें : " हाति गुढिला नीका[3] दीसे : जोगी मुंडिला नीका[3] दीसे : साधें हो : तुम्हां करूं ? " " ना जी : मातें कवडे नाहीं : " " एथौनि[4] कवडे देइजती : " " ना जी : गोसावीयांचे कवडे घेउनि कैसें करावें ? " ।।

## ३३७ चुनापीटनीं उपाध्यें अनृत्यनीक्षेदु

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि वाहीरिला ओटेयावरि आसन असे : गोसावीं मढासि चुना पीटवीला : उपाध्यांतें राखण घातलें[1] : उपाध्यें चुना पीटवीताति : तवं गोसावी नीरोपण करूं लागले : उपाध्ये दादरेनहूनि उतरले : नीरोपण आइकों बैसले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वटीका : चुना पिटिला ? " " जी जी : " ते नावेक उगे होते : मग मागुते लागले पीटुं : आणि गोसावीं उपाध्यांची वास पाहीली : सर्वज्ञें म्हणीतलें : " वटीका : एथ हांसतांहीं परि लटीकें बोलिजे ना हो : " ।।

## ३३८ गणपतिमढीं सारंगपंडितीं सोमपर्वीं पुजा

एकु दीसीं सोमपर्व जालें[1] : मग सारंगपंडितीं आवघेयां उपाहाराची आइति केली : पसंबुरी[2] आदिकरुनि खांडिलीया : मग चंदन उगाळिलें : माळा गुंफिलीया : आवघेयांलागि एकिएकि माळ : एकुएकु वीडा : मग चौरंगु घेतला : गंगाळ : लोहे : ऐसीए[3] आइतीसीं गणपतिमढां आले : बाइसांहातीं आवघे पदार्थ दीधले : मग सारंगपंडितीं घागरि घेतली : पाणीं आणिलें[4] : मादनेयांलागौनि पाणीं ठेविलें[5] : दारीं बुरुंगाळिबुरुंगाळि[6] पाणीं एताए : मोटकी बोंब जाली : आणि सारंगपंडितीं गोसावीयांसि पडदनी देओं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : आझुइं पर्वकाळु न वर्ते गा : " " जी जी : " *तें मान आलें*[7] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : आतां पर्वकाळु वर्तत असे गा : " मग सारंगपंडितीं गोसावीयांसि पडदनी दीधली : मग बोंडणवावीचीए सोंडीयेवरि चौरंगु घालौनि मादनें[8] जालें : मग भक्तजनीं आणिकें पाणीयें आंघोळी केलीया[9] : मग चौरंगावरि बरवें आसन रचिलें : गोसावीयांसि आसन जालें : मग

---

३ **अ.** बरवा. ४ **यमु.** हें कवडे देइल :

**३३७.** १ **ने.** ठेविलें. **यमु.** राहावीलें.

**३३८.** १ **मुहीबीपं.** आलें. २ **यपं.** पुसुंबरी. **ने.** पसूपारिया. **गो.** कूसूबीरी. **होबी.** कोथंबीरी. ३ **यगोनेपं.** °आवधीया(ए). ४ **मुने.** वाहिलें. ५ **य.** °दारीं पाउस : अभाळ दाटलें. **मु.** °तैसाचि पाउस मांडला : तैसीचि हाक वाजीनली : सारंगपंडितीं—. ६ **गोपं.** ब्रूंगाळि ब्रूंगाळि. ७ **(मु.)**. ८ **मु.** मार्जनें. **गो.** माजणें. ९ °**एकी वासना.** सारंगपंडितीं बोंडणवावि बरवी धुतली : पऱ्हीवां धोत्र दाटिलें : मग गोसावीयांसि बोंडणवावीआंतु आसन जालें : सारंगपंडितीं स्त्रीमुगुटीं चोखणीं

चंदनाचा आडा रेखिला : गोसावीयांसि बरवी पूजा केली : धुपार्ती जाली : मंगळार्ती जाली : वीडा जाला : तवं उमाइसां नीद्रा आली होती : तवं चेवो आला : तीयें रडों लागलीं : " मातें उठवाचि ना : " सारंगपंडीतीं म्हणीतलें : " तुम्हीं उठाचि ना कां ? तुम्हीं काइ एथ निद्रा करावेया आलीति ? " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : वोहारी काइ गा रुसली[१०] ? " " जी जी : यें कां रुसताति ? यें काइ येथ निद्रा करावेया आलीं जी ? अवसरा चुकलीयें म्हणताति[११] : " " सर्वज्ञें म्हणीतलें : " " बाइ : या : " आलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : ऐसी उर्मी उपजों नेदिजे कीं : उपजली उर्मि समिजे : ना तरि[१२] आपणेयां एथचें एसणें[१३] गोमटें अंतरे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यांसि माळ वोपा : " मग बाइसीं माळ ओपिली : मग तीं गोसावीयांचां स्रीकंठीं माळ घातली : वीडा वोळगविला : मग बाइसीं उपाहारू नीफजवीला : गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जाले[१४] : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग सारंगपंडीत तेथचि नीजैले : मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरू जाला : तो पाहिला : मग आवघीं बीढारा गेलीं : ।।

## ३३९ तथा उमाइचे रोट आरोगण

गोसावीयांसि गणपति मढीं आसन असे : आरोगण जाली : पहुड होउनि उपहुडु जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : उमाइसीं रोट केले[१] : दों रोटीयांचें[२] वाण गोसावीयांलागौनि घेउनि आलीं : सारंगपंडितां चोरीया घेउनि आलीं : मग गोसावीयांसि वाण वोळगवीलें : स्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ बाइ ? " " जी जी[३] : आखाडिये पुर्णिवेलागौनि लींगा बेलु वाइजे : तो कार्तीकें पुर्णीवे संपे : ते हे पांच रोट : दोनि देवा : दोनि ब्राम्हणां : एकु आपणेयां : देवाचें तें आपुलेयां गोसावीयांलागौनि वाण आणिलें जी : *जी जी : मीं एथ एवों न ल्हाएं जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ जें जेया अंतरीं वसे ते तेया दर्शन असे कीं बाइ : एका सन्निधानीं असान्निधान : एका असन्निधानीं सन्निधान*[४] : " मग वाइसीं दोन्हीं रोट ठेविले : वाटीचें

---

लावीली : मग बाइसें गाडु ढाळीति : सारंगपंडित स्रीमुगुटीची सेवा करीति : अपार गाडु ढाळीति : आबघी बोंडणवावि भरली : मग गोसावीं वस्त्रें वेढिलीं : मग आधीं सारंगपंडितीं आंघोळी केली : पाठीं उमाइसीं केली : मग आवघां भक्तजनीं : १० **एवा.** रूसवीली. ११ **अगो.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आली उर्मी समिजे की : " १२ **एवा.** एन्हवीं. १३ **एवा.** एवढें. १४ **यमु.** °वाढीतां तूपपहीत वाढूं वीसरले : सारंगपंडितीं म्हणीतलें : "सरा सरा : " तूपपहीत घेउनि आली : "तूपपहीत वाढूं वीसलीयें जी : " मग वाढीलें :

**३३९.** १ **अगो.** °एकु देवाचा : एकु अपुला. २ **यमु.** मां दोनि रोटे : वाटीभरि तुपां ऐसें गोसावीयांलागौनि घेउनि आलीं. ३ **मु.** °श्रावणा मासा बेलु लींगा वाइजे. ४ **(पं. प्रव.**

तुप ठेविलें[५] : सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : जेणें मार्गें आलीति तेणें मार्गें नको जाओं : ते पांडा एतु भेटैल : आणिकें मार्गें जा : " मग आणिकें मार्गें गेलीं : तीयें नीगालीं : तवं सारंगपंडित गोसावीयांचेया दरीसनां आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग गेले : ।।

## ३४० देमाइसांची स्रमनिवृति करवणें

देमाइसें आणि एकाइसें[१] अटणा[२] गेलीं होतीं : मग गोसावीयांचेया दरीसनां एताति : प्रतीस्थाना आलीं : एकाइसीं[३] म्हणीतलें : " देमाइ : आधीं सारंगपंडितांचेया आवारा जाओं : तेथ नावेक सीनभाग फेडुं : मग गोसावीयांचेया दरिसनासि जाओं : *सीनभागु पुढां करुनि काइ जाओं*[४] ? " " ना आइ : गोसावीयांचेया दरीसनां कैसी सीनभागु फेडुनि जाओं ? गोसावीयांचेया दरीसनां उतवळवाइ जावें : मीं नैयें : तुम्हीं जा : " एकाइसें[१] सारंगपंडितांचेया घरा गेलीं : तवं तयांतें पाहुणे आले असति : " या या एकाइसें[१] : " म्हणौनि रांधनेयावरि बैसवीलीं : कुडवाभरीयांचे[५] मांडे रांधवीले : देमाइसें गोसावीयांचेया दरीसनां आलीं : तवं गोसवीयांसि पहुड होउनि उपहुडु जाला : वाहीरिला ओटेयावरि आसन असे : देमाइसें आलीं : गोसावीयांचेया स्रीचरणां लागलीं : मग गोसावीं पुसिलें : " देमतीए : तुमचीं सांघातीयें कें ? " मग देमाइसीं मागिल गोष्टि सांगीतली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : देमतीएचे पाए धुआ : स्रमनिवृति करा : " मग वाइसीं पाए धुतले : मळी काढिली : " वाइ : देमतीएसि जेउं वाढा : " मग वाइसीं जेउं वाढिलें : जेविलीं : मग गोसावीं वाइसांकरवि वाटी[६] धुववीली : वाइसांकरवि आंथुरवीलें[७] : नावेक नीजलीं : मग उठिलीं : मग वीळिचां एकाइसें[१] अंन खाउनि गोसावीयांचेया दरीसनां आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ वाइ : देमती एथचेया दरीसनां आलीं : तुम्हीं नैयाचि तें काइ ? " " जी जी : मीयां म्हणीतलें : 'देमाइ : आधीं सारंगपंडितांचेया घरा जाओं : तेथ सीनभाग फेडुं : मग गोसावीयांचेया दरीसनां जाओं : सीनभागु पुढां करुनि गोसावीयांचेया दरीसनां काइ जाओं ? ' " सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : एथ आलेयां काइ एथचेयाही[८] स्रमनीवृत्ति[९] नव्हति ? " मग एकाइसें[१] देमाइसांपुढां सांघों लागलीं : " गेलीयें तवं पाहुणे आले असति : मग जातखेओ रांधणेयावरि बैसवीलीयें :

---

वि. १४२). ५ **गोने.** फेडिलें.

**३४०.** १ **यमु.** लखूबाइसें. २ **शो.** कटका. ३ **यमु.** लखबाइसीं. ४ (**मुगोहीबी.**). ५ **हीबी.** मणा°. ६ **एवा.** थाळा धुववीला. ७ **ही.** आंथुरतें देवविलें. ८ **गोहीबी.** °तेथचेयाही इतुली. ९ **अ.** सर्म°.

एका कुडवाचे मांडे रांधवीले :" मग देमाइसीं[१०] गोसावीयांपुढां एकाइसांकरवि करवीलें तें सांगीतलें : ।।

## ३४१ गणपति मठीं डांगुरेया देहावसान

एकु दीं गोसावी गणपति मठीं आसनीं उपवीष्ट असति : भक्तजनांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं अवघे कां गा एथ असा ? तुम्हीं तरि एथिचीए प्रवृती वीखो हों जाणां ना : तुम्हां एथ असतां सतसंभवीं अनीष्टचि होताए : तुम्हीं अवघे एथौनि जा :" "हो कां जी :" मग अवघे गेले : डांगरदेव[१] बैसले होते : "डांगरेया[२] : तुम्हीं जा :" उठिले : स्रीचरणां-भवंती प्रदक्षणा केली आणि नीगाले : ते केदारादक्षीणे ओहोळु[३] : तेथ देह ठेविलें : मग दुपाहारिचेया पुजाअवस्वरा आवघे भक्तजन आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुम्हीं अवघे आलेंति : डांगरा नैएचि तें काइ[४] ?" "जी जी : तो गेला असैल कोन्हीकडे पोट भरुं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें नव्हे : जा सुधि करा :" मग भटोबास मुक्षकरुनि आवघे भक्तजन सुधि करावेया गेले : तवं भटीं तेथ तैसें देखिलें : मग सांगावेया आले : "जी जी : डांगुरेसीं देह ठेविलें :" मग गोसावीं तेथ बीजें केलें : तेयांपासि आसन जालें : "डांगुरेया :" म्हणौनि स्रीकरें स्पर्सीलें : मग भटांकरवि गुंफा करवीली : मग तयांचा नीक्षेपु करवीला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांपरीस वरि हें सुनें चांग गा : जें[५] एथीचेनि वीयोगें जीवों[६] न सकेचि :" *यावरि गोसावीं निरूपण केलें : तें प्रेमसाधनपूर्वक भक्ति नीरूपीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : मायापुरातें स्वीकरौनि कर्मभूमिस्थितां मनुष्यदेहयुक्तां जीवां ज्ञानपर्यंत परमेश्वरू आपुला संबंधु देति : ।' ज्ञानियासि अनिष्टनिवृत्ति करिती : भक्तासि अनिष्टनिवृत्ति करौनि इष्टप्राप्ती करिती । एकां प्रेम संचारीती : । प्रेम बोलिजे : भक्ति बोलीजे : । प्रेमसंचारमात्रें विकारु : विकल्प : स्वभावो : इये तीनि उच्छेदौनि जाति : । भक्ताचें सकळही सन्निधानीं चारितार्थ होए : भक्तासि श्रीमूर्तिवरी साध्य-साधन ऐसी प्रतीति : प्राप्य-प्रापक बोधु : । साध्य साधनाकारें आकारलें : करचरणवंत ब्रह्म हें : ऐसी भक्तासि प्रतीति : । भक्त वियोगीं नुरे : भक्तां नित्यसंबंधु : । परमेश्वरु भक्तासि आपुली अनुभूति रति देति : ।" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणा एकासि दोनि स्रीया : एकि आवडति : एकि नावडति : नावडतीएचां ठांइ अन्न : वस्त्र : अळंकार : न्हाणें : जेवणें : हांसणें : खेळणें असे : पारि आपणपें नेदी : आपणपें तें आवडतीएसीचि देति[८] : तैसें*

१० **गोने.** °गोसावीं करविलें तें सांघितलें.

**३४१.** १ **गो.** डांगोरेश. २ **गो.** डांगोरेया. ३ **यमु.** वोत. ४ °**एवा.** डांगरेस नैएतीचि तें काइ : ५ **यमु.** °एथचा वीयोगु साहों न सकेचि. ६ **अगोने.** जेओं (वों). **य.** जीयों. ७ (**प्रव. नवप्रकराचा प्रव.** °यावरि गोसावी भक्ताचीं आठ वचनें : आणि तीन वचनें साध्याचीं : ऐसें निरूपण भटाप्रति केलें :). ८ (**दृपा.** ८३. द्विभार्याचा दृष्टांत) हा दृष्टांत **दृस्थ**कारांच्या मते 'भटांप्रति बेलोपुरीं निरूपिला' एका पोथीत 'भटाप्रति बेलोपुरीं स्मरणाउपरि निरूपिला' असा उल्लेख आहे.

*भक्तासि आपणपें समोर देति : । ज्ञानियासि पाठीसि घालिती : । भक्त भेदें अनुभवीं : कीं अभेदें अनुभवी : ऐसा विकल्प तेथ करों न ए[७] :" मग गोसावीं मढासि बीजें केलें[८] : ।।*

## ३४२ वैराग्यदेव नामकरण

गांगाइसें : उमाइसें : महेस्वरपंडित : सा मासांचे वैराग्यदेव[१] गोसावीयांचेया दरीसना आनीलें[२] गोसावीयांसि आसन असे : उमाइसीं वैराग्यदेव घेतले : गांगाइसां हातीं वीडा : उमाइसीं वैराग्यदेव गोसावीयांचेया स्रीचरणांवरि घातले : गोसावीं दोहीं स्रीकरीं घेतले : गांगाइसीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : वीडा

---

तर 'श्रीमुख दृष्टांत प्रकरण'काराच्या मते तो 'देवां भटांवरी निरूपिला' येथे स्थानाचा किंवा प्रकरणाचा निर्देश नाही. तो 'भटांप्रति' निरूपिला, हे मत स्वीकार्य आहे. ज्ञानिया आणि भक्त यांच्या साध्यांतील फरक स्पष्ट करणे, हा या दृष्टांताचा आशय लक्षात घेऊन मी तो या ठिकाणी भक्ताच्या साध्याच्या वचनांत पुनःस्थापित केला आहे. ९ **पं.** प्रतीत आलेली ही लीळा विशेष विचारात घेण्यासारखी आहे. म्हणून तिच्यातील आवश्यक तो महत्त्वाचा भाग येथे उद्धृत करतो. '**डांगरेया देहअवसान** ।। एकु दीसीं गोसावियांसि उदयांचा पुजावसर जालेयानंतरें मग सपुजीत आसनीं उपविष्ट असति : भवते अवघे भक्तजन बैसले असति : गोसावीं निरूपण केलें : तें प्रेमसाधनपुर्वक भक्ति नीरूपीली : " हे कव्हणा जीवासी घडे ना : ते तुम्हांसि एथौनि दीजत असे गा : जें सन्निधानीं असतां तें सतेंसहश्रें गेलेयां नव्हे गा :" यावरि भक्तिजनी म्हणीतले : " जी जी : ऐसी भक्ति आम्हांसि काइसेनि होववैल जी ? आम्हीं असौनि गोविंदु गोविंदु म्हणतें : **एवा** : आम्ही असौनि आपुले गोसावी स्मरतें : । आणि भक्तिही गोसावींचीं घडवावी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरे हो : हें अवघे एथौनिचि घडवावें तरि तुम्ही एथ काइ करावें असे ? आणि हेंचि अवघें करीत असें : जें ऐसेया मायापुरातें स्वीकरौनि कर्मभूमिस्थितां मनुक्षदेहयुक्तां जीवां ज्ञानपर्यंत आपुला संबंधु देति : १ : एकां प्रेम संचरीति : २ : प्रेम बोलिजे : भक्ति बोलिजे : ३ : प्रेमसंचारमात्रें वीकारू वीकल्प स्वभाओ तीन्हीं उछेदुनि जाति : ४ : भक्ताचें सकळै सन्निधानीं चरितार्थ होए : ५ : भक्तासि श्रीमुर्तिवरि साध्यसाधन प्रतीति : प्राप्यप्रापकु बोधु : ६ :" ऐसें नीरूपण केलें : " मग ज्ञानें मोक्षु : तेया मोक्षाचा हेतु परमेश्वरासि नाहीं : कव्हणां कव्हणी वेसन : एथ जीव उधरावे याचेंचि वेसन असे : तें प्रेमाचाचि हेतु कीं गा : भक्ति म्हणिजे एथचें सेवादास्य आवडिपुर्वक दुखेंसी करी हे भक्ति प्रेमातें देती : ज्ञानें कोरडी क्रीया कीजे ते मोक्षाते दे :" मग भक्तिजनीं म्हणीतले : " जी जी : हे आम्हां असक्ष : आणि अटक :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं एथौनि जा गा : एथिचीए प्रवृतीसी वीखो नव्हा : एथ असतां सतसंभवी नरकचि घडवित असा : **एवा** : तुम्हीं तरि एथीचीए प्रवृतीसी वीखो हों जाणा ना : तुम्हां एथं असतां सतसंभवी अनिष्टचि घडत असे : तरि तुम्ही आवघे जा गा :" " हो कां जी :" म्हणौनि भक्तिजन आवघे उठौनि गेले : डांगुरेस बैसलेचि होते : सर्वज्ञें म्हणीतलें : " डांगुरेया : तुम्हींही एथौनि जागा :" आणि ते उठीले : श्रीचरणांभवंती प्रदक्षणा केली : आणि नीगाले : (यानंतरचा 'तुम्हांपसि वर हें सुणें चांग : जें एथीचेनि वीयोगें जेवों न सकेचि :' एथपर्यंतचा वृत्तांत प्रस्तुत लीळेप्रमाणे).

**३४२.** १ **ने.** °ऐसीं. २ **ने.** आलीं.

ऽळगवीला : मग गोसावीं स्रीकरीं घेउनि वैराग्यदेव अवळोकिले : मग म्हणीतलें : "काइ वैराग्यदेव हो :" उमाइसीं म्हणीतलें : "जी जी : या नावं वैराग्यदेओ म्हनावा :" मग तया वैराग्यदेओ ऐसें नावं ठेविलें : मग गोसावीं सींपा बोलावीला : गोसावीयांची आंगी होती : तीची गांगाइसां चोळी : महेस्वरपंडितां आंगी : वैराग्यदेवां आंगुलें : मग कीती दीस होती तें नेणिजे : मग[३] वैराग्यदेवां बारां वरीसां भटांपासौनि ज्ञान जालें : तैसेंचि अनुसरले : आउठां वरीसां गोसावीयांचेया दरीसनां गेले : ।।

## ३४३ आउवेचा नागदेओ करणें

भट गोसावीयांचें सेवादास्य करीताति : मग एकु दीं गोसावीं लघुपरीहारा बीजें केलें : भट सागळ घेउनि नीगाले : तवं आउसां ऐसें जालें : 'आहा : मीं पुरुष होतीयें कां : तरि[१] मींहीं गोसावीयांचें सेवादास्य करितीयें :' मग गोसावीं लघुपरिहारु सारुनि बीजें केलें : आसनीं उपवीष्ट जाले : मग आउसीं वीनवीलें : "जी जी : स्वामीं जगंनाथा : आउवेचा नागदेओ कीजो जी : आणि नागदेयाची आउ कीजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न कीजे कीं नाएका : आउवेचा नागदेओ न कीजे : नागदेयाची आउ न कीजे : आउ ते आउ : नागदेओ तो नागदेओ :" ।।

## ३४४ आउ पींडपातुनीखेदु

एकु दीसीं गोसावी आउसांसीं उदास : काइ अनुचीत[१] तें नेणिजे: मग गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं वीहरणां बीजें केलें : आउमुक्षकरुनि आवघीं भक्तजनें सरीसीं असति : गोसावी लोणारखांडीमध्यें उभे राहीले : गोसावीं स्रीकरें : श्रीमुगुटें : श्रीमुखें म्हणीतलें : "नाएका : तुम्हीं राहा :" आणि तीयें मसिचेनि कुंचेनि हाणितलीं ऐसीं राहीलीं : "स्वामीं जगंनाथु उदासु : आतां जीउनि काइ करावें असे ?" मग काइ मेळवणी देह पाडावेंयाची करितें होतीं तें नेणिजे : मग गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : निच गोसावी सकाळि[३] बीजें करीति : तीए दीसीं उसीरु[२] केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां न वचोंचि नैए : आतां जरि न वचीजे तरि पोरि आउ कडबाड[४] पाडिजे ऐसें देह पाडील :" मग गोसावीं मढा बीजें केलें : गोसावीयांसि वोटेयावरि आसन जालें : गोसावीयांचेया सेवादास्यालागौनि आवघींचि भक्तजनें व्यापारु करुं लागलीं : आउसें उगींचि एकीकडे बैसलीं असति : मग सर्वज्ञें म्हणीतलें :

---

३ **यमु.** °गोसावीयामागां वैराग्यदेवां रीद्धिपुरी मुंजि बांधली : बारा वरीसां—.

**३४३.** १ **म.** °गोसावीयांसरीसी उठीतीयें : वैसतीयें :" **गो.** °मीचि आवघें गोसावीयांचें—.

**३४४.** १ **ने.** केलें. **यगोही.** °केलें. २ **ने.** उसीरा. ३ **ने.** सकाळीचि बीजें केलें. ४ **यगोने.** करबाड.

" नाएका : यें कोण्हीं कांहीं करीताति : तुम्हीं एथ कांहीं न करा तें काइ[५] ?" " जी जी : स्वामी जगंनाथा : स्वामी जगंनाथु उदासु : तरि जीउनि काइ करावें असे ? आम्हीं अहीरें मानुसें : जेओं जाणों : मरों जाणों : करवाड[६] पाडिजे ऐसा पींडु पाडुं : " गोसावीं दोन्हीं स्रीकर कर्णयुगळांवरि ठेविले : " ऐसें हांन[७] कराल हो नाएका : हा पींडु केसना ? ए पींडीं ब्रम्हा वीष्णु माहादेओ : तीन्हीं देव असति : या देखीलीया आउठ कोडी रोमावळी ? " म्हणौनि स्रीकरें गोसावीं स्रीचरणिचीए[८] अंगुठांची रोम धरिली : "या आउठ कोडी मुक्ष चाउंडा[९] : जेंचि मान पींडा[१०]: तेंचि ब्रम्हांडा[११] : जेयाचि देवता पींडीं तेयाचि ब्रम्हांडीं : ब्रम्हांडीं मुर्ती देवता : पींडीं मेदमांसरुपा देवता : *हारीता : पीता : श्वेता : मंजिष्ठा : कृष्णा : मूर्ती प्रकाशेती*[१२] *:* पींडहनन केलेयां ब्रम्हांडहनन केलें होए : नाएका : अहंतेचें मुळ सकंदीं उपडावें नाएका : एऱ्हवीं आंकुर नीगति : मग सांतिचें रोप लावावें : आत्मघातकीया कव्हणीं ठाओ नाहीं नाएका : *मन बुद्धि चित्त अहंकार : मन अधिष्ठात्री देवता ब्रह्मा : बुद्धि अधिष्ठात्री देवता शेषशय्या : चित्त अधिष्ठात्री देवता विष्णु : अहंकार अधिष्ठात्री देवता महादेवो : चक्षु अधिष्ठात्री देवता सूर्यु*[१२] *:* नैवाहाळांचीं उदकें एकां वांटली : वावीपोखरीणींचीं उदकें एकां वांटलीं : तळांथीलरींचीं उदकें एकां वांटलीं : पाखालांचीं[१३] उदकें एकां वांटलीं : गळतीयांचे थेंव : सागळांचे थेंव : आदिकरुनि एकां वांटले : अंनें एका वांटलीं : उष्टावळीचीं सीतें आदिकरुनि एकां वाटलीं : साउलीया एकां वाटलीया : देउळांचीया साउलीया एकां वांटलीया : सुखनासीचीया[१४] साउलीया एकां वाटलीया : दोहीं[१५] दगडांचीया साउलीया आदिकरुनि वांटलीया : वृक्षाचीया साउलीया आदिकरुनि वांटलीया : पानोवानीं[१६] असति नाएका : द्रीष्टापस्य अद्रीष्टें वहुतें नाएका : ऐसें कांहीं कराल हो : नाएका : " ।।

---

५ °**एवा.** गोसावीयांसि पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : पहुडु जाला : उपहुडु होउनि गोसावी वोटेयावरि आसनीं उपवीष्ट असति : आवघीं भक्तजनें गोसावीयांजवळि बैसलीं असति : आउसें मसीचेनि कुंचेनि हाणितलीं ऐसी जाली : गालावरि हातु ठेवुनि उगींचि एके कोनटां बैसलीं असति : मग गोसावीं पुसिलें : " नाएका : तुम्हीं ऐसीं कां ?" ६ **यगोनेहीबी.** कडबाड. ७ **एवा.** हनन. ८ **एवा.** स्रीकरिचीए. (**गो.** आंगोळीएची). ९ **एवा.** चाउंड. (**गो.** चामुंडा). १० **ने.** पींडीं. ११ **ने.** ब्रह्मांडीं. १२ (**प्रव. वि.** ६७–७१). **पं.** °कर्णनासापुष्ठ अधिष्टात्री देवता सोमु : पृथ्वी : आप : तेज : वायो : आकाश : रज : तम : सत्व देवता अष्टभैरव : धातु भुतें तत्वें यांचीया तन्मात्रा यातें सुक्ष्म प्रपंचु बोलिजे : एक स्थुळ : हा सुक्ष्मु : ऐसें हें द्वीध पींड वीरचेचा : चैतन्य माएचा : जीउ यथीचा : ऐसें हें देह नीर्वाळिलें : एथ हनन न कीजे नाएका : कां : नदी वाहाळाचीं उदकें— : १३ **यगो.** पाखालासागळांची. १४ **ने.** सुकनासी°. १५ **नेगो.** दगडागुंडेयाचिया. १६ **हीबी.** °अभिमानु : नाएका :

## ३४५ देमतीगाएनप्रसंगीं वीकारु निराकारणें

एकु दीं गोसावीयांसि ओटेयावरि पहुडु असे : भुतानंदाची लेंकि[१] : तीयें एकाइसें : काहीं गातें होतीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : गा : " आणि लाजीलीं : " ना जी : मीं गाओं नेणें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " गा : हें तोंड पांगुरवील : " म्हणौनि फुटा स्रीमुखावरि[२] घातला : देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : स्रीमुख नको पांगुरौं : मीं गाइन : " मग तीं गाइलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " ये भींति वीकारु होआवा तरि देमतीचां ठाइं होआवा[३] : " ।।

## ३४६ तथा देमती वोवीगाएनीं मासु दीसु असों देणें

एकु दीं बाइसां आणि देमाइसां भांडन जालें : मग बाइसीं म्हणीतलें : " बाबा : या रांडा दवडावीया : या भांडती असति : " मग उदेयां देमाइसें गोसावीयांचेया पुजा-अवस्वरा आलीं : मग पुजाअवस्वरु जालेयानंतरें सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : तुम्हीं एथौनि जा : " मग देमाइसीं म्हणीतलें : " पाउलें म्हणीतलें न करीती हरी : कवणी-परी जाओं आम्हीं ।। तुझां चरणीं रंगलें मन : काइसेया[१] कांन्हा पाठवीसी ।। तुझेनि वेधें असों संभ्रमीतें : निर्विकारा जोगीयाचें निष्टुर चीत[२] ।। " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : आतां तुम्हीं खेळा : सदा[३] असावेया अनोज्ञा हो[४] : " ।।

## ३४७ तथा अवस्वरअनअवस्वरु कथन

एकु दीं गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांलागौनि बाइसीं ताट केलें होतें : गोसावी आरोगण करावेया बीजें करिताति : एकु स्रीचरण उंबरेयावरि[१] : एकु आंतु : ऐसां अवस्वरीं देमाइसीं पुसीलें : " जी जी : हा प्रस्नु कैसा ? " गोसावी भीतरि उभे राहीले : तवं बाइसें कोपलीं : " काइ वो जालें यां रांडांसि : अवस्वरु नाहीं : अनअवस्वरु नाहीं : बाबा आरोगणे बीजें करिताति[२] : " मग गोसावीं तो प्रस्नु निर्वचीला[३] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती[४] : तुम्हां अवस्वरु अनअवस्वरु[५]

---

**३४५.** १ **गोनेहीबी.** नाति. २ **एवा.** स्रीमुगुटावरि. ३ **पं.** °म्हणौनि भींति श्रीकरें हाणीतली.

**३४६.** १ **हीबी.** °अंतरीं ध्यान गोविंदाचें : । २ **हीबी.** प्रतीत चरण बरेच अव्यवस्थित आहेत. चौथें कडवें जास्त आहे. ते पुढीलप्रमाणे : 'सीणाचीं उत्तरें : जीव्हार भेदलें : आतां जळो हें जीयालें : तुजवीण : ' ।। ३ **पं.** मासु दी—. ४ **हीबी.** जवं असवैल तवं असा : मग मासु दी गोसावीयांचां संनिधानीं होती :

**३४७.** १ **गोनेमुपं.** °बाहीरि. २ **मु.** °ऐसें नेणेति : " **हीबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : राहा : प्राणीयांचीया इष्टा आड नैजे (**बी.** न एइजे) कीं : " मग°. ३ **हीबी.** °तें महावाक्यीचें पहिलें प्रमाण. ४ **य.** " पुसावेया अनोज्ञा : तुम्हां—. ५ **नेपं.** °ऐसें कांहीं नाहीं हो : "

यें दोन्हीं नाहीं हो :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला :॥

## ३४८ तथा आर्तो कोंपरा पान्हा एणें

एकु दीं[१] देमाइसें गोसावीयांची स्तुति करुं लागलीं : "जी जी : गोसावी अनाथांचा नाथु : देओ कृपाळु : देओ आर्तदानी : देओ सरणागतां वज्रपंजरु[२]" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : नाथु असे : परि जीवें अनाथां होआवें[३] कीं : दानि असे : परि जीवासि आर्ति होआवी[३] कीं : कृपाळु असे : परि जीवें कृपेसि पात्र होआवें[३] कीं : वज्रपंजरु असे : परि जीवें सरणागतां होआवें[३] कीं : "जी जी : आम्हीं आर्तें असों नव्हे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं होआ आर्तें तरि कोंपरा पान्हाओ[४] नैए ?" म्हणौनि कोंपरु दाखवीला[५] :॥

## ३४९ माइंतेया हरी स्वपनीं भेटि : आरोगण

माइतेया हरीचा आवारु : तो गणपति मढाचीए आळीये : तो सानीए आइतीचा[१] परि अत्यंत स्रींघारीया : तो तया वाटा[२] ए जाए : परि गोसावीयांचेया दरीसनां कहीं नैए : तयाचेया पीतया नांव माइता[३] : तयाचें स्राध जालें : मग तेयासि तो सपनां आला : "हां रे वा हरी : मज जेउं सुइ कां :" "हें काइ बा : तुम्हां जेउं सुदलें कीं :" "ना मीं तेणें धायेंचि ना : गणपति मढीं स्रीचांगदेओराउळ असति : तयां जरि आरोगण देसी तरि मीं धाइन[४]:" "हो कां :" उठिला : मग उदेयांसीचि गोसावीयांचेया दरीसना आला : तवं गोसावीयांसि बोंडणवावीचेया ओटेयावरि आसन असे : गोसावी दंतध्वन[५] करिताति : माइंतया हरीनाएकांतें एतां देखिलें : आणि द्रीष्टिचेनि अनुकारें आश्चर्य केलें : ऐसें देखिलें : मग तीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : मग गोसावीयांतें उपहारालागि वीनौं आदरिलें : " जी जी : आजि तेथ भातु[६] स्वीकरावा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें इतुले दीस एथ असें : परि एथ केधवांहीं न म्हणां : आजि म्हणता[७] तें काइ ?" "जी जी : मीयां कालि आपुलेया पीतेयाचें स्राध केलें : तो रात्रीं स्वपनां आला : 'आरे बा हरी : मज जेउं सुइ कां :' 'बा : तुमचें[८] स्राध केलें कीं :' 'ना मीं तेणें धायेंचि ना : गणपति मढीं स्रीचांगदेओराउळ गोसावी असति :

---

**३४८.** १ **प्रव. आमा.** ९२. °देमाइसासि स्तीति जाली : देमाइसें—. २ **अ.** वरपंजरू. ३ **एवा.** °लागैल कीं : ४ **गोहीबीयपं.** पान्हां. ५ **प्रव.आमा.** ९५. °आणि तेयाची स्तीति भंगली.

**३४९.** १ **यमु.** राहाटीचा. २ **गोय.** °जाए. **अ.** °जाताए. ३ **अ.** मांइंतेया. ४ **ने.** धाइल. ५ **यमुगोने.** दंतधावन. ६ **यमु.** उपाहारु. ७ **एवा.** म्हणीतलें. ८ **ने.** तुमतें.

तयां जरि आरोगण देसी तरि मीं धाइन : ' जी जी : तरि गोसावीं तेथ बीजें करावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग गोसावीं तयां अनोज्ञा दीधली : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : मग वीहरण सारुनि मढासि बीजें केलें : गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : मग हरीनाएकु बोलवावेया आले : मग गोसावीं बीजें केलें : गोसावीयांसि पुजा केली : मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावीयांसि बाहीरिलि पटिसाळेवरि आसन जालें : तवं सारिपाटु[९] देखिला : मग अवळोकिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : तुम्हीं म्हणे सारी खेळों जाणां ?" " तरि काइ जी : सारी खेळों आम्हींचि जाणों : सारी खेळतां : सारी जुआरु : माहादेओराओ जींकिला[१०] :" सर्वज्ञें म्हणीतलें : " पां आणा :" मग सारीपाटु मांडिला : सारी मांडिलीया : गोसावीं स्रीकरीं फांसे घेतले : घेतखेओंचि जाणितलें : 'गोसावी सारी खेळों जाणति' : मग गोसावीं उठाउठी तीनि फळीं जींकीलीं[११] : मग दोहीं स्रीकरीं पांसे[१२] घेउनि चोळुं[१३] लागले :" तरि तुम्हीं कैसा माहादेओराओ जींकिला ?" "जी जी : राओ जींकों एइल : परि देओ जींकों नैए कीं :" मग गोसावीं मढासि बीजें केलें : मग ते गोसावीयांचेया दरीसनां एति : ते उपाहारालागि वीनवीति : ।।

## ३५० हरिनायकाप्रश्नें उद्धरणगुणनिरूपण*

[ [१]गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : एकवेळ माइतेया हरीनाएकीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : परमेश्वरु जीवातें उद्धरीति तें कवणें गुणें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " दया : मया : कृपा : करुणा : हे ईश्वरींचि आति : अन्यत्र आति तें ईश्वरीं आति : ईश्वरीं आति तें अन्यत्र नाहीं : ईश्वरीचें तें सकळही नित्य :" यावरि हरीनाएकीं पुसिलें : " जी जी : निरपेक्ष परमेश्वरु जीवातें कां पां उद्धरीति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरु जीवां नित्यबंधु : म्हणौनि :" यावरि हरीनाएकीं पुसिलें : " जी जी : परमेश्वर जीवातें उद्धरण आरंभीलें तयासि कीती काळ जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवेश्वरा स्वामीभृत्यसंबंधु हा अनादीचा : देवाभक्ताचेया मातेयांपीतेयां भलें :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : अनुसरलेयाचीया मातापितरासि गोमटें होत असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " जेंचि देवाचेया मातापितरां तेंचि भक्ताचेयां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवाचां बंधमोक्षीं परमेश्वरु क्रीडति :" ।। ]

---

९ **एवा.** सारिवटू. १० **यमुने. पं.** जींतला. ११ **मुहीबी.** लाविलीं. **नेयपं.** जींतलीं.
१२ **ने.** फासे. १३ **ने.** खेळुं.

**३५०.** * (**प्रव. वि.** १२१–१२५.)
१ कवीश्वरबा°.

## ३५१ आउ श्रीप्रभूदरीसन नीराकारण

गोसावीयांपासौनि[1] एकें भक्तजनें श्रीप्रभूचेया दरीसनां नीगाली[2] : तवं आउसीं म्हणीतलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : मीं गोवींदस्वामीचीया दरीसनां जाइन :" सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : उदासीन वस्तुते : तेथ काइ कव्हणी कार्य : हेतु असे? विदेह पुरुखु ते : तेथ तुम्हां जावेया अधीकारु नाहीं : तेथ समळां जीवां अधिकारु नाहीं :" " हो कां जी स्वामी जगंनाथा :" " है रे[3] : तरि गोवींदस्वामीपुढां ऐसें सांघावें : चक्रस्वामींचां ठाइं एक दासिरुं असे : तयाचीं पांचसें दंडवतें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " ढोरें राखां हो नाएका : तेथही आणि तेवींचि आणिका[4] सांघावें लागे ? पोरे हो : तेथ नेणिजे ऐसें काहीं असे ? तेथ सकळही जाणौनिचि नेणिजे कीं :" " नेणेंचि जी स्वामीं जगंनाथा :" ।।

## ३५२ आउ वरप्रदान

एकु दीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : आउसें गोसावीयांजवळि बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : तुम्हीं एथ कांहीं मागा :" " हो कां जी स्वामीं जगंनाथा : तरि गौर आणि स्याम[1] दोन्हीं स्त्रीमुर्ती मीयां देखतांचि असावीया :" सर्वज्ञें म्हणीतलें : " देखाल हो नाएका :" मग स्तीति होए : आणि दोन्हीं स्त्रीमुर्ती देखतेंचि[2] असति : ।।

## ३५३ उमाइगाएनीं प्रसंसा

एकु दीं गोसावीयांसि आरोगण जाली : पहुडु होउनि उपहुडु असे : उमाइसें हळुहळु गाताति : गोसावीं पुसिलें : " बाइ : मासउपवासीयें गाताति ? " माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी :" आणि *तीयें*[1] लाजीलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " मासउपवासीयें हो : गा :" " जी जी : मीं काइ गाओं जाणतीयें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं गा : मग हें गाइल :" येतुलेन बाइसें माहादाइसें म्हणों लागलीं : " उमै : गाए : तुं गासी तरि बावा गाती :" मग[2] उमाइसीं म्हणीतलें : " बापु रे मोरी अवस्था लो :

---

**३५१.** १ **यमु.** बाइसें परमेश्वरपुरा नीगतांसमैं आउसीं म्हणीतलें—. २ **अ.** आली. ३ **यमु.** मग आउसीं भटोबासातें म्हणीतलें : " नागदेया : गोवींदस्वामीतें ऐसें म्हणावें :" ४ **अ.** एक **गो.** एकां.

**३५२.** १ अ. गौरा स्याम. २ **गो.** देखतांचि.

**३५३.** १ (**नेहीबी.**) २ **य.** °उमाइसीं गाइली : 'नगरद्वार : भीक्षा हो मागों' हे चौपदी गाइली : पाठीं गोसावी गाइली : 'मुळ स्थानीं भीडु बांधो हो जोइ :' हे चौपदी गोसावीं गाइली

जांहां जाओं तांहां आपुसरीसा : कोइ न करे मोरी चींता : " हे चौपदी गाइली : सर्वज्ञें म्हणीतलें :

" मुळस्थानीं भीडु बांधों हो जोइ : जेवि ना काळुकळाइ :
गुरुवचनें वोडिएनां[3] बांधों : जेवि ना चंचळ होइ :
गोरक्षु[4] हो सुनि बंधीं स्थीर होइ : जेणें तुम्ही जाया :
सो परि मारो बैरी : आनु ना कोइ ।। धृ० ।।
पांचै पंचाएन[5] पांचै जन हो : धावंति आनाआनि स्थानीं
उन्मनीकारणें नीज मुनी लीन : ते मारिले नीजस्थानीं ।। छ ।।
पवनु परो हो : मन स्थीर करो हो : चंद्रा मेळाओ भानु :
आयागमन यें दुइं निवारो : बुधी राखो आपणां ।।
भाटीं जाति निवारो हो : भीडे वायो न जाइ :
अखै निरांजनीं लो करों हो : भाव अभाव ना होइ " ।। (रागू धानाश्री ।।)

ऐसी गोसावीं चौपदी गाइली : आवघीं स्त्रीचरणां लागलीं : ।।

## ३५४ भटां ज्ञान भक्ति वैराग्य निरूपण*

[ [1]गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : एक वेळ भटीं पुसिलें : " जी जी : ज्ञान : भक्ति : वैराग्य : एं तीन्हीं एकएकासीचि होववेति : किंवा एक एक ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " एकां ज्ञान होअवे : एकां भक्ति होअवे : वैराग्य तें कव्हणाहीं न होअवें : " " जी जी : तेंचि कां नव्हवे जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तीसरीए धारेवरि चाले ऐसा कवणु असे ? " " हो कां जी : " ।। ]

## ३५५ आर्तातें परमेश्वरु वाडोवाडीं गीवसीति*

[ गोसावीयांसि[1] गणपति मढीं अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : जया पुरुषासि ज्ञानाधिकारु कां प्रेमाधिकारू जोडे तेणेंसीं आणि परमेश्वरासीं कैसीया परी योग घडे जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : आपुलेयाकारणें परमेश्वरू हाळोहाळीं गीवसीती : आर्तातें परमेश्वरू वाडोवाडीं गीवसीती : " ।। ]

---

३ **गो.** °दृढ बंधाइ. **नेपं.** °दृढ. ४ **गो.** प्रतीत हा चरण नाही. पुढील तीन चरणांचे मिळून दुसरे कडवे आहे. ५ **हीवीपं.** पंचानन.

**३५४.** *(**प्रव. आमा.** २२६).

१ **प्रव. महेश्वरबा**°.

**३५५.** * (**प्रव.** आ. २१८).

१ **प्रव.** कानडी लखुबाइसे वासना°.

## ३५६ विषयनिरूपण*

[गोसावीयांसि[१] गणपत मढीं अवस्थान : एक वेळ दाएंबाएं पुसिलें : "जी जी : मीं रायाचीए सभेसि गेलां : तेथ विषयाचीया वार्ता होत होतीया : जें 'विखो त्रीवीध : एकु जातिविखो : एकु वैजात्यविखो : एकु ग्रामविखो : तयामाजि जातिविखो तो उत्तमु :' ऐसें मीयां आइकीलें : तरि तें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति गा भोजेया : जातिविखो एकु आति : तो सेविलेयां तुष्टि : पुष्टि : रस : श्रये : इयें च्यान्हीं होति : जैसें गोघृत : जातिविखो सेविलेयां इंद्रियकाठिन्य निवर्ते : परि अंतःकरणाचें काठिन्य न निवर्ते : यंत्रारूढा होइजे तो उसीटा विखो भोगणें कीं : विखो तो हावभावींचि भोगों सरे :" ।। ]

## ३५७ गर्भस्थितासि चैतन्यविद्या निरूपण*

[गणपत मढीं अवस्थान : एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : सुकदेवासि मातेचां गर्भी असतां ज्ञान प्रकटिलें : हें काइ जी ? आधिकारदसेवीन कैसें प्रकटिलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : परमेश्वरापासौनि गर्भस्थितासि विद्या आति : म्हणौनि प्रकटिलें :" "जी जी : ते कवण विद्या ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते चैतन्यविद्या :" "हो कां जी :" ।। ]

---

**३५६.** *(**प्रव. वि.** १९२–१९४).

१ **प्रव.** महेश्वरबा पाठ°.

**३५७.** *(**प्रव. विमा.** ११५). या लीळेनंतर, स्वामींचे 'गणपत मढीं अवस्थान' असताना घडलेल्या दोन लीळा मला नागराज प्रतीतील 'अज्ञात लीळां'त आढळल्या. मुरारीमल्लबासाच्या दुसऱ्या शोधनीच्या 'अज्ञात लीळां'त त्यांचा अंतर्भाव नसल्यामुळे त्या मूळ संहितेत न स्वीकारता मी त्या येथे तळटीपांत नमूद केलेल्या आहेत. त्या लीळा अशा :

**घाटीं परिसु कथन**

भक्तिजन एकमेकां गोष्टी करीत असति : पींपळेश्वरा वेचलें : घाटु बांधला : पौळी दारवठेया काइ वेचलें ? देउळीयां देउळासि काइ वेचलें ? एथ गाडेयासि वोंगणासि काइ वेचलें द्रव्य ? म्हणौनि गोष्टी भक्तिजन करिताति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तयाजवळि परीसु होता : हें आवघें करूनि सरलें मग तो एथचि वेदिकेतळि ठेविला :" म्हणौनि ठावो दाखविला : मग गोसावीं ढोरेश्वरा बीजें केलें : ।।

**हेडाउं मठीं प्रज्ञासागरां भेटि**

गोसावीं हेडाउं मठासि बीजें केलें[१] : तो मठु उपरीचियापरी मठावरि मठू होता : तळिं हेडाउंवांचें बीढार : वरि प्रज्ञासागरांची गुंफा : ते सन्यासी विद्वांस : तेथ तयांसीं भेटि जाली : गोष्टि जाली : हेडाउं मठीं गोसावीयांसि सपुजीत आसन असे : मग प्रज्ञासागरीं तिये पुजेवरि दुणा पुजा केली : टीळा : माळ : वीडा वोळगविला : मग धावा वोळगविला : वोळगवितीये वेळीं गोसावी श्रीकरें श्रीमुकुटें श्रीमुखें तोखलें : मग भक्तिजनीं घोकिला : ।। [१ **एवा.** गोसावीयांसि तेथ अवस्थान असे.]

## ३५८ पाठकनीमीत्यें ढोरेस्वरीं बीजें करणें

एकु दीसीं पाठक ऐसें नीगों बैसले : तवं डोइए दारवंडु लागला : थोर दुखवले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां उभा पाठा माइल तया स्थाना जाइजैल : बाइ : आइत करा :" मग बाइसीं आइत केली : मग गोसावीं ढोरेस्वरा बीजें केलें : ।।

## ३५९ ढोरेस्वरीं अवस्थान : मास दाहा

गणपति मढीं मास चार अवस्थान जालें : मग गोसावीं ढोरेस्वरा बीजें केलें : ढोरेस्वराचें देउळ पुर्वामुख : तीनि चौक : माझारिले चौकीं चहुंकडे च्यारि ओटे : च्यान्ही ओटे अवस्थानाचे : चौकासि तीनि द्वारें : जगतीसि दोनि दारवठे : उतरदक्षीण : तेथ बीजें केलें : " बाइ हें होए : " मग गोसावीयांसि आवघे दाहा मास अवस्थान जालें : ।।

## ३६० जातिक्रीडे लघुत्व प्रगटीये करणें

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि चौकीं आसन असे : मग गोसावी उभे ठाकले : " बाइ : या : एथौनि जातिअंधाचा खेळु दाखवीजैल : जातीअंधा बाहुबळ : " मग गोसावीं दोन्हीं स्त्रीकर[१] स्त्रीमुगुटावरि ठेवीले : बाइसीं कासवडा दाटिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " जयाचा[२] भारु जडु : तयावरि डाइ : " मग एकीकडे बाइसें गोसावीयांचां कोंपरीं वरिलीकडे धरीलें : एकीकडे नाथोबायें धरिलें : आणि गोसावी भवरि देति : नाथोबाचा भारू जडु जाला : तयांचे हात सुटले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीकावरि डाइ : " मग नाथोबायें दोन्हीं हात डोइएवरि ठेविले : मग एकीकडे गोसावीं धरीलें : एकीकडे बाइसीं : मग नाथोबा भवरि देति : गोसावीयांचा भारू हळु : बाइसांचा भारू जडु : बाइसांचे हात सुटले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइसांवरि डाइ : " बाइसीं दोन्हीं हात डोइवरि ठेविलें : एकीकडे गोसावी : एकीकडे नाथोबा : मग बाइसें भवरि देओं जाति : आणि बाइसांचे हात सुटति : ऐसा जवं खेळु करिताति तवं[३] पुर्विला दारवंडावरि सर्पु देखिला : " जी जी : सापु : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : धरा जा : " " हो कां जी : " म्हणौनि उठिले : गेले : धरावा जवं तवं सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : मंडळिका : या : " " कां जी ? " " जालें नव्हे गा[४] ? " मग तो सीसीं करूनि[५] बाहीरि घातला : ।।

---

**३६०.** १ **यमु.** °ऐसें बरुते केलें : आंगुळीयांतु आंगुळिया सीरुनि दोन्ही तल्हात श्रीमुगुटावरी ठेविले : २ **यमु.** जयाचेया कडे सुटे तयावरि डाही. ३ **यमु.** °कवाडाचां वातां सर्पु नीगाला : ४ **हीं.** " तुमचें एक जन्म येथ लेखीं लागलें गा : " मग—. ५ **यने.** सुसकरुनि. **ही.** हुसहुसकउं.

## ३६१ पन्हीवां सर्पा संनिधान देणें

एकु दीं गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : पहुडु जाला : उपहुडु जाला : मग गोसावी लघुपरीहारा[१] बैसले : लघुपरीहाराचें मान लोटलें : गोसावी परीव्हेयाकडे अवळोकीत असति : मग भटीं पुसिलें : " जी जी : मघांलागौनि काइ पाहीजताए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " प्राणीया एका संबंधु देइजतु असीजे गा[२] : " भट जवं पाहाति तवं सर्पु डोइ[३] काढुनि[३] गोसावीयांची स्रीमुर्ति पाहातु असे : *भटीं पुसिलें : " जी जी : एथ संबंध तो कैसा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " संबंधीं असंबंधु : असंबंधीं संबंधु : " " हो कां जी[४] : "* मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ३६२ मंडळिकाकरवि सर्पु धरवणें : नीराकारणें

एकु दीं गोसावीयांसि वीळचां[१] वेळीं भीडामागिलीकडे आसन असे : नाथोबा गोसावीयांजवळि बैसले असति : तवं पौळीमागां सर्पु बोबांओं लागला : जैसा वसो डरे तैसा बोवांओं लागला : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : हें काइ गा बोवाताए ? " " जी जी : पींपळेस्वरिचा वसो : सेतें खाउनि ए : मग[२] ये वाठानीं एउनि बैसे : तो बोवातु असैल जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा पां : पाहा : " " हो कां जी : " मग गेले : तवं माहागजेंद्र[३] सर्पु देखिला : आणि बीहाले : आणि टाळी वाजवीत आले : " हें काइ जी : एवढा सर्पु काइ जी ? एवढें[४] सावज आम्हीं कहीं नाहीं देखिलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जा धरा : " " हो कां जी : " आणि गेले : धरावा तवं गोसावी बोवाइले[५] : " मंडळिका : मंडळिका : या : " आणि आले : " काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : *" तुमचें एक जन्म एथ जालें हो[६] "* ।।

*यावारि सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी शरणागत मरणाभेण रायासि शरण रीगे : रावो तयासि पाठीसी घाली : मरणासि राखे : परि राज्य नेदी : राज्य तें पुत्रासीचि दे[७] :*

---

**३६१.** १ **गोने.** °उतरीला पन्हिवेयाकडे बीजें केलें : सागळ घेउनि भट सरिसे नीगाले. २ °**एवा.** देइजताए : ३ **यमु.** फडेकरूनि. ४ (**प्रव. आमा.** १५५).

**३६२.** १ **गोही.** वीळिचाचां. २ **यमु.** मग येथ बैसे. **ही.** °येथ वांकानीं—. ३ **गो.** माहागजींद्रु. ४ **गो.** एसणें. ५ **गोही.** बोलावीलें. ६ (**हीबी.**) **अगोपं.** जालें नव्हे गा मंडळिका : " " हो कां जी : " ।। **पं.** °मग गोसावीं श्रीकरें स्पर्सीलें तोखू थोरू जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "अनुसरौनि काई कीजे गा मंडळिका : हें एक जन्म एथ दीधलें गा : " ।। ७ (**दृपा.** ११२. 'शरणागताचा दृष्टांत'. 'नाथोबाप्रति सर्पधरणीं निरूपिला'—**दृस्थ.**) दोन जुन्या पोथ्या व ओंकारदादा परंडेकर यांच्या पाठसमुदायात हा दृष्टांत पुढीलप्रमाणे आढळतो. " कव्हणी येकु असे : तो रायासि शरण रिगे : राओ तेयातें पाठीसि घाली : निका मानु करी : अवघेयासि कारण होय : रायासि निका आवडे : परि राज्याभिशेखू न कीजे : राज्याभिशेखू कीजे तें पुत्रासीचि कीं : तेयासि नाहीं : " **प.** प्रतीत हा दृष्टांत पुढीलप्रमाणे आढळतो : " कव्हणी

*कव्हणी एकु रावो असे : तो आपुलेया पुत्रासि राज्याभिषेकु करी : परि एरासि न करी : राज्याचा धनी तो पुत्रचि होए[८] :"*॥

## ३६३ तथा नागीणि खेळवणें

एकु दीसीं गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : तवं नांदीयाचेया[१] साजीया[२] पसीमे : अंगणीं नागीणि नीगाली : आणि नाथोबायें हाताभवंती ओलि गुंडिली : तोंडें डांक वाजवीति : ते नाचे : गोसावी उभे राहिले : नावेकु खेळु अवळोकिला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा : आतां जाओं दे : एऱ्हवीं खाइल :" मग गेली : गोसावीं देउळा बीजें केलें : मग पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : ॥

## ३६४ मंडळिका स्तीति : फळभक्षेणि भुतानंदा नालकोलु अनुवादु

एकु दीसीं भुतानंदाची कन्या धानाइसें[१] : तींहीं म्हणीतलें : "आइ : आजि मीं अमृतफळें करीन : तरि गोसावीयांलागौनि घेउनि जाए कां :" मग तेहीं अपारें अमृतफळें केलीं : "आइ : यें घेउनि जाए :" "इतुकीं काइ करीसी? वांयांचि नालांकोलांकरवि काइसेया खाववीसी ? गोसावीयांचिपुरतीं घालि :" मग गोसावीयांचिपुरतीं घेउनि आलीं : गोसावीयांसि चौकीं आसन असे : जवळि नाथोबा बैसले असति : गोसावीं एत देखिलें : आणि[२] म्हणीतलें : "मंडळिका : आइतें[३] अमृतफळ मागा :" आणि नाथोबासि स्तीति जाली : दारेंसीं उभे राहीले : "आइ : दे कां वो एक अमृतफळ :" म्हणौनि तेयांचेया पालवा पीळा घातला : तयांसि भीतरि रीगों नेदीति : "जी जी : या नाथोतें वारिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : लेंकरुवाचा अग्रहो पाळिजे कीं[४] :" मग तीहीं एक अमृतफळ दीधलें : तें तेहीं तोंडीं घातलें : मागुतें मागति : "आइ : एक

---

एकु असे : तेणें परद्वारी केली असे : मग जेयाचें कार्ये (भार्ये ?) तो मारावेया उभा टाकला असे : परि अनेत्र न ठकति : परि खंतिवसू करीति : ऐसें जाणौनि मग रायासि सरण रीगे : मग तो राओ आपुलीया राउळगणांआंतु राखे : बाहीरि नीगों नेदी : ते मारितील म्हणौनि : आपुलीये पांती जेउं घाली : आपणेयां सांघातें आणी : ने : वीस्वासू कवणाचा न करी : मग तो राओ म्हणे : "आजिलागौनि तुआं ऐसें काम न करावें :" मग तेणें धाकें परीचारिका असति तेयांची वास न पाहे : तें कां ? नां मी रायासि दुऱ्हा होइन : मग आणिक कव्हणी राखे ऐसा नाहीं : म्हणौनि : सूचाचि असे : ऐसें जाणौनि रायासि कणव उपजे : मग तेयांसि सकळै गोमटें करी :"

८ [**दृपा.** ११३. 'राज्याभिषेकाचा दृष्टांत'. 'नाथोबाप्रति सर्पधरणीं' (**एवा.** 'छेत्राच्या न्यायाउपरि) निरूपिला '—**दृस्थ.**]. वरील दोन्ही दृष्टांतांचा अन्वय काही महंतांनी या सूत्राशी लावला आहे. म्हणून ते येथे घातले आहेत.

**३६३.** १ **मु.** नंदीचेया. **ने.** नांदेयाचेया. २ **यमुगोनेहीबी.** साजेया.

**३६४.** १ **य.** गागाइसें. **मु.** नागाइसें. २ **यमु.** °नाथोबातें अवळोकिलें : आणि नाथोबासि स्तीति जाली : ३ **एवा.** यातें. ४ **एवा.** लेकरुवाची आळि पाळिजे कीं :

अमृतफळ दे ओ :" मागुतें तीयें गोसावीयांतें वीनवीति : गोसावी तैसेंचि म्हणति : ऐसीं आवघीं अमृतफळें खादलीं : मग भीतरि आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : "जी जी : अवघीं अमृतफळें नाथोनि[५] खादलीं : आतां मीं आणिकें आणुं जाइन[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काइसेंया आणाल ? वांयांचि नालांकोलांकरवि खाववाल :" मग तीयें घरा गेलीं : मग अवघी वेवस्ता लेंकीपुढां सांगीतली : मग तीं म्हणीतलें : "आइ : तुतें म्हणीतलें कीं : आगळीं ने :" ।।

## ३६५ अनो मंडळीकु उदकानएनीं अनोसि घटांतरा धाडणें

: एकु दीसीं बाइसीं नाथोबा आणि अनो दोघै उदका पाठवीले : दोघीं घागरी भरिलीया : घेउनि एत होतें : तें अनोसि स्तीति होती : अडुखूळले : ते घागरि फोडिली : आणि तेथचि बैसले : आणि नाथोबायें म्हणीतलें : "अनो : चाल :" "ना : मीं हे घागरि सांदीन : मग भरुनि घेउनि एइन : मज[१] बाइसें कोपती :" म्हणौनि खापरें वेंचुं[२] बैसले[३] : नाथोबा आले : घागरि रीचविली : "जी जी : अनोयें घागरि फोडिली[४] : मीयां म्हणीतलें : 'अनो चाल :' 'ना मीं हे घागरि सांदीन : मग मीं हे भरुनि घेउनि एइन :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : हे घागरि तयांसि ओपा : एथौनि बोलाविलें असें[५] : ऐसें म्हणा :" मग नाथोबा आले : "अनो : चाल : हे घागरि घे : तुज गोसावीं बोलावीलें असे :" मग उठीले : घागरि भरिली : डोइए ठेउनि घेउनि आले : आंगणीं उभे ठाकले : वरतीचि मान : सर्वज्ञें म्हणीतलें : "हा कन्हेयावरि बैसला[६] असे : याची घागरि उतरा गा :" मग घागरि उतरिली : ।।

## ३६६ मंडळीकावारीत भक्तभोजनीं साल्योदन करवणें

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जें असे तें वेचा : माहात्मेयांसहीत उपहारु करा :" *"हो कां बाबा :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तांदुळ वेळा : मांडे पुरीया करा[१] :* वळवट वेळा :" मग बाइसें पाणिभातु पाहों गेलीं : तवं पाणिभाता डेरा भरला असे : "बाबा : मांडे पुरीया जेविती[२] : पाठीं इतुकालें वळीवट जेविती : मग भातु काइ जेवीती ? पाठीं इतुलाला पाणिभातु जेवीती : तरि वायांचि काइसेया तांदुळ वेळुं ?" गोसावी उगेचि होते : मग

---

५ **यमुपं.** नाथोएं. ६ **एवा.** जाओं.

**३६५.** १ **अ. मग.** २ **अ.** वेंचुनि. ३ **एवा.** लागले. **यमु.** °खापरें वेचीति : एकवट मेळवीति : मातीएवरि सांदीति : मग. . . ४ **यमु.** °तो खापरें मेळवुनि मातीया सांदीत असे : ५ **एवा.** आहे. ६ **एवा.** बैसोनि आला. **यमु.** वेंघला.

**३६६.** १ **(गोनेहीबीयमुपं.)** २ **अ.** °पाणिभातु कालनी : वळीवट जेवीती.

बाइसें व्यापारु करीति : तेवींचि गोसावीयांसि वीडीया ओळगवीति[3] : नाथोबासि सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळिका : वाइसांतें जेउं मागा : जा :" मग बाइसातें जेउं मागों गेले : "बाइ : मज म्हणीयां जावें असे : मज जेउं घाला :" वाइसीं म्हणीतलें[4]: "नावेक राहे कां : मग वावाचीए पांतीं जेवि :" "ना आइ : मज भुक लागली :" "जाए नाथो : पाणिभातु डेरा भरला असे : तो घे : जाए :" मग वाटें घेतलें : पाणिभाताचेया डेरेया-जवळि[5] बैसले : वाटें डेरेयाआंतु घालीति : आणि पाणिभातु घेति : जेवीति : ऐसा आवघा पाणिभातु जेवीले : अर्धं एक पाणी उरलें[6] : मग आंचवले : मग गोसावीयांपासीं आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा मंडळिका : पाणिभातु जाला ?" "हो जालें पाणि सावळें ऐसें :" तेधवां वाइसें गोसावीयांसि वीडीया ओळगवीताति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : भातु आवघेयां[7] पुरे इतुका असे ?" "तरि काइ वावा :" परि वाइसां साधारेचि[8] नां : 'काइ पां ? वावायें म्हणीतलें तरि काइ न पुरे ?' मग पाहावेया गेली : डेरेयांआंतु हातु घालुनि पाहाति : तवं पाणीयांतु हातु चुवकरि[9] घातला[10] : मग वाइसें गोसावीयां-पासीं आलीं : "बाबा : या नाथोचेया पोटासि काइ जालें ? डेराभरि पाणिभातु जेविला : आणि बावातें म्हणे : 'जालें पाणि सावळें ऐसें :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमतें म्हणीतलें कीं : तांदुळ वेळा :" "तरि हें वावाचेंचि करणें म्हणां :" मग वाइसीं तांदुळ वेळिले : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनां आवघेयां पांति जाली : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : ते दीसीं कोण नेणों सणु : ।।

## ३६७ मंडळिका स्तीतिभोजनीं देवकोपुपुर्वक वीखयेनींदा

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग दादोसीं गोसावीयांसि उपाहारालागौनि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : उपहारु तेथचि निफजवीला : मग गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनां आवघेयां ठाए जाले : तवं नाथोवासां स्तीति जाली : मग दादोसीं म्हणीतलें : "कैसा नाथो निदैउं[1] : खातीएजेवीतीएचि वेळे यासि हें हों बैसे[2] :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मे हो : यांसि जालें तें सानें : मां तुम्हीं म्हणता तें थोरु ? सकळ[3] सुखें सांडुनि

३ **यमु.** °नाथोबासि गोसावीं म्हणियें दीधलें : मग बाइसातें जेउं मागों गेले : "बाइ : मज—.
४ **अगोहीबी.** °जाए नाथो : पाणिभाता डेरा भरला असे : नावेक राहे कां—. ५ **ने.** मडकेयापासि.
६ °**एवा.** पाणीयासकट बोळा दीधला : ७ **अ.** °पुरता काइ असे ? ८ **मु.** सा:वरेचि.
९ **गोमुपं.** चबकरि. १० °**एवा.** नसुधीं बोटें बुढीं लागलीं :

**३६७.** १ **अ.** निदसुरा. २ **यमु.** °दैवां वेगळी वाटतें. ३ **एवा.** एक विखए सुख सांडुनि. **यमु.** हा वीखो कीं : वीखो तापा मुळ : नरकां आश्रो :" ऐसें गोसावी कोपले : मग गोसावीयांसि—.

मग स्तीतिसुखें असांसीति : मग जाला जो आनंदु तो देवां दुर्लभु : एकु *ग्रामपशु : एकु अरण्यपशु : एकु अमेध्यक्रमी : एकु विखएक्रमी*[४] *:* अमेध्यतुल्य वीखो तो कोणासि दुर्लभु : जे क्रीमितुल्य पुरुष तयांसि कीं : *विखो अनंता तापासि आश्रयो : नरकासि हेतु*[५] : " मग गोसावीयांसि सपरीवारीं आरोगण जाली : ते स्तीति भोगीतचि होते : ।।

## ३६८ मंडळीका आटासुग्रामुभयजननीं कोपणें

एकु दीसीं गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें नाथोबा ढोराआळीए[१] दुध आणावेया गेले : दुध घेउनि एताति : आणि स्तीति जाली : ते हाक दीधली : हाकेसरीसें तेया नगराआंतु खळवळिलें : ' पारके आले ' म्हणौनि च्याऱ्ही खांडी पडीलीया : आणि आडीं घातलीं : दारवठेया पाइक आले : लागले[२] : *गजंबु हों लागला*[३] : नाथोबा दुध घेउनि आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : हा गजंबु काइसा ?" " जी जी मीयां हाक दीधली : तेणें नगरामध्यें खळवळीताए : पारके आले म्हणौनि[४] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं माहात्मे कीं गा : तुम्हीं चतुर्वीधा भुतग्रामा अभये देआवें कीं गा : वानरेया जा : ऐसे फोकरा[५] : ' एथचा पींसा तेणें हाक दीधली : ' " मग भट गेले : " आहो पारके नव्हेति : भेओं[६] नोका : हा स्रीचांगदेओराउळांचा पींसा : तेणें हाक दीधली : " ऐसें भटोबासीं नगरामध्यें फोकरिलें : मग तयांचें भय निवर्तलें : मग भट गोसावीयांपासि आले : ।।

## ३६९ प्रागवटपर्णानएनीं प्रेक्षित मंडळीका अव्हानणें

गोसावीयांसि रात्रीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुड होतें मान जालें[१] : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका[२] जा : प्रागवटाचीं पानें घेउनि या : " " हो कां जी : " गोसावीयांचां स्त्रीचरणां लागले : आणि नीगाले : दारवठांवरि गेले : आणि आठवलें : मागुते प्रतले : " जी जी : परमेश्वरपुरावरुनि जाओं ? श्रीप्रभूचें दरीसन

४ (**प्रव. आ.** २४६–२४८). ५ (**प्रव. आमा.** ९७).

**३६८.** १ **मुने.** ढोराळीए. २ **यमु.** सवंसारले. ३ (**यमुगोनेहोबी.**). ४ **यमु.** °लोकु भीयाला : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हाक कां दीधली? लोकु भीयाळा कीं : (**शोध:** ऐसें भये नुपजविजे कीं : ।। प्राणीयांसि वोखटें : ) माघोतें जाए : पारके नव्हति : मीयां माहात्मेनि हांक दीधली : म्हणां :" नाथोबा गेले : तयातें म्हणीतलें : " आहो : पारके नव्हेति : ५ **एवा.** म्हणा. ६ **गोने.** बीहों.

**३६९.** १ **होबी.** °भगतिजनें वीसावलीं असति : गोसावी इखीति खांकरुनि श्रीचरणचारी उभे राहीले : सर्वज्ञें म्हणीतलें : " ये सातरीये कवण गा असे ?" गोसावी येवढीया वेळा कांहीं म्हणीयें देति म्हणौनि उगींचि : ऐसीया अवघीया सातरीया पाहात : पाचारीत : नाथोबाजवळि आले : सर्वज्ञें म्हणीतलें : " येथ कवण गा असे ?" " जी देविका दासु मंडळीकु : " उठीले : श्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका जा—. २ **यमु.** °एथौनि प्रागा घाडीजाल तरि जाल ? " हो जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसेयांचि नीगावें : पेणोवेणां जावें : उपेणें न करावें : प्रागवटाचीं पानें आणा :"

घेओं ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " घेया : " आणि नीगाले : धांवं[३] एकि भुमि गेले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : जा गा : मंडळिकातें बोलावा : धांवत जा : सादु घाला : " " हो कां जी : " आणि भट धांवत नीगाले : आंधारी राति : कांहीं देखिजे ना : भट साद घालीति : " मंडळिका मंडळिका : उभे राहा : " बैसति : पाहाति : ऐसे धांवींनले : मग सब्दु आइकीला : मग आले : एरएऱ्हें गोसावीयांपासि आले : स्त्रीचरणां लागले : " कां जी बोलाविलें ? " " जालें नव्हे गा मंडळिका : " " हो कां जी : " ।।

## ३७० इंद्रभट वसुवार देणें

इंद्रभट गोसावीयांचां संन्यधानीं होते : इंद्रोवाचेया सोइरेयांतें[१] वेओ : ते साडेगांवां गौराइसांतें आणावेया गेले : मग आबैसीं गौराइसांतें पाठवीलें : " इतें नेया : " इंद्रभट तेथ गोसावीयांपासि असति : मग तीयें प्रतीस्थानासि[२] आलीं : गौराइसें गोसावीयांचेया दरीसनासि एताति : गोसावीयांसि चौकीं आसन असे : इंद्रोबा गोसावीयांजवळि बैसले असति : गोसावीं गौराइसांतें एतां देखिलें : आणि म्हणीतलें : " इंद्रेया : मेंढी म्हैसेया मुळ आली गा : " इंद्रोबा पाहाति तवं गौराइसें एताति : आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : मग इंद्रोबा गावांआंतु गेले : गौराइसें गेलीं : मग वीळचां माघौतीं आलीं : गोसावी नंदीचेया[३] साजेयापासीं उभे राहीले : " इंद्रेया : तुम्हांसि हें वसुवार गा : एथ तुम्हीं नीद्रा करावी : सुसुगें[४] जीयें होती तीयें इतुकां ठाइं माती : " मग इंद्रोबा आणि गौराइसें तेथ निद्रा करीति : ।।

## ३७१ सारंगपंडितां भीडबंधन कथन

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांसि देउळामागां[१] भीडासीं आसन असे : जवळि सारंगपंडित बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : हें जाणां पां गा : देउळासि भीडु काइसा[२] ? कोणें केला ? " कोण्हींएक म्हणति : " गंगेचीए थडीए देउळ : पुरें जाइल : म्हणौनि केला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसें नव्हे कीं गा[३] : जोगीया एकु तेथ[४] बैसला होता : जोगीणी म्हणे : 'देवा : आजि वेचावेया नाहीं : ' तेणें म्हणीतलें[५] : 'देउळांआंतु कोण असे ? जा : पाहा : ' 'हो कां जी : ' पाहीलें :

---

३ **हीबी.** आवड दोनि.

**३७०.** १ **मु.** सोइरेयांचां घरीं वियो : ते तया मूळ आले : २ **यमु.** ढोरेश्वरा : ३ **हीने.** नांदी°. ४ **यगो.** सुंचंचे. **मु.** सुचेचे. **नेपं.** सुसंतें.

**३७१.** १ **यमु.** ढोरेश्वरामागां. २ °**एवा.** ढोरेस्वरामागां आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें : " जाणां पां गा : हा भीडु काइसा ? **य.** ° " जी जी : एरां देउळासि भीडु बांधिती तैसा यासींही बांधला असे : " ३ **यमु.** °जोगी एकु : जोगीणि एकि : दोघें होतीं : जोगीणी म्हणीतलें :— ४ **गोनेहीबी.** एथ. ५ **नेपं.** °भवंतें पाहा : " " हो कां : " पाहिलें तवं कोण्ही नाहीं : तेणें तोंडीं

तवं कोण्हीं नाहीं : घुटीका तोंडीं घातली : 'या देवाखालि[६] तांबीया भरला असे : आसुचा : तो[७] काढा :' ब्राह्मणु एकु देवापासीं होता : तेणें आइकीलें : तो आला : दंडवत घातलें : 'जी जी[८] : मज सांघा :' सांघीतलें : 'देउळामागीली भींतीसीं तीनि लोही असति : तीया काढा :' काढीलीया : बैलु भरुनि नेलीया : तेलंगदेसासि गेला : तेथौनि हा भीडु करवीला :" गोसावीं गोष्टि सांघीतली : तेथ बैसौनि : ।।

## ३७२ गौवेधें सारंगपंडितवचनस्वीकारु

एकु दीसीं गोसावीं सारंगपंडितांचेया आवारा बीजें केलें होतें : मग वीळचां वेळीं गोसावीं लोणारखांडी बीजें केलें : नीगतां डावेया हाता सोंडीएवरि गोसावी उभे राहीले असति : तवं[१] गाइ गांवांआंतु आलीया : गोसावीयांतें[२] देखिलें : आणि वेधलीया[३] : आणि उभीया राहीलीया : मग[४] एरीचीया[५] बागाडवरि एरीचें बागाड[६] : ऐसीया अवघीया दाटलीया : गोसावीयांची श्रीमुर्ति पाहात असति : जवळि सारंगपंडित उभे असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : गाइ काइ गा पाहाती असति ?" "जी जी : द्वापरीं श्रीकृस्णचक्रव्रतीचीए श्रीमुर्तिची धणि घेतां न पुरेचि : ते आतां घेत असति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा पांडेया : वगत्रुत्व[६] कीजताए ?" "जी जी : एथार्थु नव्हे ?" गोसावीं वेधु आकर्खिला : मग ढोरेस्वरा बीजें केलें : ।।

## ३७३ देत स्रीकरावलंबनीं सारंगपंडितां अनुसरण : उधरण कथन

गोसावीं नगरामध्यें बीजें केलें होतें : मग मागुते ढोरेस्वरा बीजें करिताति : सरीसे सारंगपंडित असति : गोसावी ओतु पातले : तवं भरला असे : गोसावीं अवलीळा पैलाडि बीजें केलें : सारंगपंडितां न एवे : मग म्हणीतलें : "जी जी : मज नैएवे :" गोसावीं स्रीकरु दीधला : स्रीकरीचीं नखें तयांचां हातीं कांहीं लागलीं : कांहीं न लगतीचि : आणि गोसावीं स्रीकरु आसुडिला[१] : आणि गरकरि[२] ऐली थडीये आले : आणि वीस्मो जाला : "हें काइ जी : गोसावीयांचीए स्रीकरीचीं नखें माझां हातीं काहीं लागलीं : काहीं न लगतीचि : आणि आपैसेयाचि ऐलाडि आलां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया :

---

घुटिका घातली : सीळ उधविली : आसुचा तांबिया काढिला : ६ **यमु.** (**ही.** या वीनाइकामागां). ७ **यमु.** एकि आसु काढा : ८ **यमु.** (**एवा.**). °मी दुबळा ब्राह्मणु : तरी मज तांबीयाचें काही देयावें : तेहीं म्हणीतलें : "देउळामागें दोनि इटा पाडा : चरवी आहे ते घेउनि जा ?" मग तेणें ते चरवी काढीली : तेथौनि गेला : पैन्हाहुनि देउळ पडैल म्हणौनि हा भीडु बांधिला : "

**३७२.** १ **यमु.** °पैलाकडौनि. २ **यमु.** °उभयां. ३ **यमु.** °गोवळ मागिला कडौनि मारीति : परि चालति ना. ४ **हीबी.** वरति बगाडें करुनि ठकारें उभीया राहीलीया. ५ **गो.** एकीचेयां बगटावरि एरीचें बगट. **नेपं.** एकीचेया बगटावरि एकीचें बगट. ६ **एवा.** पांडित्य.

**३७३.** १ **गोही.** आखूडिला. २ **ने.** सरकरि. **ही.** फरकरि.

एथ अनुसराल तरि ऐसेचि[३] काढिजाल गा : " [सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : वानरी असे : ते *आपुलें पिलु पोटीं लावुनि*[४] ऐली खांदीएवरूनि पैली खांदीए जाये : पैलीए खांदियेवरुनि ऐलीए खांदी ए : *तिएची पीलयासहीत क्रीडा जे पाहाति तयाचिया*[४] देखतिया गती हें *पिलु*[४] पडैल पडैल ऐसें वाटे : परि *तया पीलयाची*[४] धरिती परी ते तेचि जाणे : आणि जेणें न सुटे तें सूत्र ते वानरीचि जाणे : तैसे अनुसरती परी जीवें जाणावी : नरक चुकवीती परी तें परमेश्वरु जाणति[५] : " ।।]

*तवं गोसावी पिंपळेस्वरा पातले : तेथ गोसावीयांसि आसन जालें : सारंगपंडिती गोसावीयांसि पुसिलें : " जी जी : गोसावी 'अनुसरा : अनुसरा :' ऐसें म्हणताति : तरि अनुसरणें काइ होये जी[६] ?"* [सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : परमेश्वरु एकां जीवांप्रति परागिराकरौनि आपुलें अस्तित्व साधीति : । मग एकु अनुसरेति : एकु ननुसरेति : । ननुसरेति ते प्रमादिये बोलिजेति : तयां सृष्टि शून्य होए : " *सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया कव्हणी एकु देसाचा रीणाइतु असे : तेयातें एकु धरी : तेयांसि कांही देउनि सोडवी : तवं आणिकु धरी : तेयाहीपासौनि सोडवी : तवं आणिकु धरी : ऐसा उबगला : त्रसला सदर्थी*[७] *रायासि सरण रीगे : मग तो तेयाचेया रीणाची वेवस्ता करी : कां ? तो नीत्यमंत म्हणौनि : 'हा आयें खंगला :' म्हणौनि लखाचें*[८] *कवडेया बुझावी : हा जें देइल तें घेयावें : जेव्हळि देइल तेव्हळि घेयावें : जैसें देइल तैसें घेयावें*[९] *:* तैसें अनुसरलेयाचें आगंतुक कुंठे : अनारब्ध सुके : प्रारब्धां भोगें क्षयो : । अनुसरलेयासि कर्मसवा भोगु नाहीं : दैवसवा भोगु : । अनुसरलेयासि देवत्व : तिर्यंचत्व होणें नाहीं : ज्ञानियासि श्रीमूर्तिवरि साधनप्रतीति प्रापकु बोधु : । कैवल्यदाता हा : मोक्षदाता हा : ऐसी ज्ञानियासि प्रतीति : । अनुसरौनि सन्निधान करी : यापरी योग्य होए : तेयासि परमेश्वरू सत्ताज्ञानदान करीति : । *कव्हणी तृषावंतु वाटा जातु असे : तवं पाणियावरी थोर कणबाबुळी आली असे : बाबुळी परती सारौनि उदक घे : मागौती बाबुळी वरि तैसीचि*

---

३ **गो.** ऐसेयांचि. ४ (**हा पाठ** ओंकारदादा परंडेकर यांच्या पाठसमुदायातून घेतला आहे). ५ (**दृपा.** ५५. 'वानरीएचा दृष्टांत'. 'पांडेयाप्रति पैठणीं निरूपिला'—**दृस्थ.** यावरील दार्ष्टांतिक माझ्या मते निश्चित स्वामींचेच होय. म्हणून ते अंतर्भूत केले आहे.) ६ (**लक्षणबंद.** 'उद्धरणा'चा प्रकरणवश. °सर्वज्ञें म्हणीतलें : "एक अनुसरति : एक ननुसरति :" ऐसीं शाब्दज्ञानीचीं ८ वचनें : अपरोक्षीचीं १३ वचनें : सामान्याची ५ वचनें : विशेषाचीं ७ वचनें : ऐसें निरूपण केलें : (यापुढें संबंधित वचनें 'सूत्रपाठा' तून उद्धृत केली आहेत. ती चौकटी कंसात घातली आहेत. त्यांत अंतर्भूत केलेले दृष्टांत तिरप्या अक्षरात छापले आहेत). ७ **एवा.** समर्था बलियासि. ८ **दृपा. नेनेप्रत.** लक्षाचे. ९. (**दृपा.** '७३. रीणाइताचा दृष्टांत'. 'गोसावीं साधाप्रति डोंबेग्रामीं पर्वा चुकलीए म्हणीतलें : तै बीजें करिता निरूपिला :'—**दृस्थ. एवा.** भक्तजनाप्रति : 'साधे' चा प्रकरणात (उत्तरार्ध. लीळा १४६ पाहा.) हा दृष्टांत सार्थतेने बसत नाही. आशय व वचनसंबंध लक्षात घेऊन मी तो येथे घातला

*मीळे*[10] : तैसें कव्हणी एकी अवसरीं सकळही मळांचें परिसारण करौनि परमेश्वरू जीवीं आपुली सत्ताशक्ति संचरिति : मग मागौते मळ घालीति : । सत्ता बोलिजे : सूचा बोलिजे : अव्यभिचार्य ज्ञान बोलिजे : । सत्ता ते विदित : । सत्ताज्ञान तेचि अपरोक्ष-ज्ञान : । सत्ताज्ञानीं अशेष कर्म जाणे : कर्मक्षाळणीं उपाओ जाणे : एतें विघ्न जाणे : विघ्नोपशमु जाणे : । सन्निधानीं क्षाळी : कां असन्निधानीं क्षाळी : । सन्निधानीं तोकडेनि वहुत क्षाळी : असन्निधानीं जें जेतुलेनि क्षाळावें तें तेतुलेनि क्षाळी : । सत्ताज्ञानीं विकारसृष्टि : कर्मसृष्टि आधीना होति : दैव विघ्न : । ब्रह्मादिक आपुलेया पदा नेयावेया एति : परि तो तयांची वासुही न पाहे : । अष्टभैरव हालवीति : डंडळवीति : परि तो जैसा काहीं तैसाचि : । ब्रह्मतुल्य आनंद विघ्नत्वें प्रकटति : । विद्या : अविद्या : पुरुषु यां तीहींतें विद्या प्रकाशी : मग तो विद्येअधीनु होए : । यापरी योग्य होए तेयासि परमेश्वरू सामान्यज्ञानदान करीति : । सामान्यज्ञानीं विकारसृष्टिकर्मसृष्टिवेगळा होए : दैवसृष्टि अधीना होति : । सत्ता सामान्यज्ञान मिळौनि अशेष कर्मक्षाळण करी : अशेष मळ क्षाळण करी : । तेणें लाविलें तें तो फेडी : तेणें नाहीं लाविलें तें तेयाचेनि न फिटे : ।" *सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु नीजैला जागसुता असे : तयातें कव्हणी एकु उठवावेया ए : अमुका उठउं आला ऐसें जाणे : परी तो काइ लेंइला असे : काइ पांगुरला असे : काइ नेसला असे ऐसें नेणे : तैसें व्यवधान फीटे : समग्र अज्ञान नीवर्ते : तवं सत्ताचि देखे*[11] *:* यत्क्रियते तत्कर्म : म्हणौनि कर्म : कर्मशब्दें कर्म बोलिजे : कर्मशब्दें मळही बोलिजेति : । यापरी योग्य होए तेयासि परमेश्वरु विशेषज्ञान करीति : । विशेषज्ञानीं दैवसृष्टिवेगळा होए : सकळांही शक्ति आधीना होति : अपरोक्षा होति : । माया कोपौनि उदासीन होए : । मायाकृपाव्यतिरिक्त परमेश्वरु तेयासि सकळांही शक्ति दाना करीति : । मग तो सकळांसिही प्रमाणद्रव्य होए : । आद्यमळयुक्त चरमदेहस्थित कृपास्पदीभूत होउनि असे : । मग परमेश्वरु तेयासि कृपा करीति : । ज्ञानियासि मोक्ष देति : ब्रम्हीभूत करिती : पाठीसि घालीति : । ज्ञानिया ब्रह्मीं मिसळे : बुडी दे : । यापरी परमेश्वरू जीवांतें उद्धरीति : " ।। ]

---

आहे.) १० (**दृपा.** '१००. बाबुळीएचा दृष्टांत'. 'बाइसाप्रति त्रिदोष फेडूनि : पैठणीं'—**दृस्थ.** या दृष्टांतात बाबुळी परती सारल्यावर ती पुन्हा मिळून आल्याचे वर्णन आहे. बाइसांचे त्रिदोष फेडल्यावर ते पुन्हा निर्माण झाले असे नाही. म्हणून **दृस्थ**कर्त्यांचे म्हणणे मान्य करता येत नाही. या दृष्टांतावरील दार्ष्टांतिक म्हणजे 'उद्धरण' प्रकरणातील ३० वे वचन होय. तेव्हा त्या वचनाच्या अनुषंगानेच हा दृष्टांत निरूपिला असला पाहिजे, हे स्पष्ट आहे. म्हणून तो या ठिकाणी घातला आहे. मूळ दृष्टांतावरील दार्ष्टांतिक स्वामींचेच होय हे निराळे सांगणे नको.) ११ (**दृपा.** '१०३. जागसुतेयाचा दृष्टांत' 'महदाइसाप्रति बेलोपुरीं'—**दृस्थ. एवा.** 'महदाइसाप्रति प्रतिष्टानीं' यावरून या दृष्टांताचा प्रकरणवश निश्चित होऊ शकत नाही. त्यावरील दार्ष्टांतिक सत्ताज्ञाना-संबंधी आहे. हे लक्षात घेऊन हा दृष्टांत, त्यावरील दार्ष्टांतिकासह येथे घातला आहे.)

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : तुम्हीं एथ अनुसरा गा : मग तुमतें संसारावेगळे कीजैल :" सारंगपंडितीं म्हणीतलें : "जी जी : हें ऐसें उच वर्णाचें देह :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : जन्माचीया काइ अनुपपत्ति पडिलिया असेति : ऐसीं अनंतें जन्में वायां गेलीं : म्हेळिये जन्मु दीधलें : मोळिये जन्मु दीधलें : सिवणेया दीधलें : रुंभणेया दीधलें : मा हें एक जन्म एथ दीजो कां : मां काइ होइल तें पाहीजो :" *सर्वज्ञें म्हणीतले : "पांडेया : डोळेयाचां ठाइं स्वतसीधा दोनि सामग्रीया : तेजसामग्री आणि मेदसामग्री : तेजसामग्री वाढवी तरि रत्नाचीये गर्भीचे खूतले रंग देखे : मेदसामग्री वाढवी तरि कांहींचि नेदखे[१२] :"* ऐसें गोसावी निरूपण केलें : परि ते ननुसरतीचि : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : नवी वृत्ती : आणि तरुणी स्त्री : हें काइ गा सांडवें ? " यावरि सारंगपंडित उगेचि राहीले[१३] : ।। ]

## ३७४ भट सारंगपंडीत भुमिविकर्खणी क्रीडा

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावी पोटफोडेयाचेनि मार्गें बीजें करिताति : तवं मार्गीं सेत : कुणबीयें नागरु[१] उभा केला असे : आणि आपण जेवीत असे : गोसावीं तयाचि सेताकडे बीजें केलें : उभे राहीले : "पांडेया[२] : हें तुम्हीं जाणा गा ?" "जी जी : काइ ब्रह्मवीद्या ? मां नेणीजे : यासि काइ जाणावें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पां एथ दाखवा :" "हो कां जी :" मग तुता घेतला : रुम्हणें धरिलें : दोरु धरिला : तापटीलें[३] : तवं एकु बैलु आनौता[४] गेला : एकु बैलु आनौता[४] गेला[५] : नांगरु एउता[६] पडे : एउता पडे : मग ते राहीले : ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया[२] : हें तुम्हीं जाणा गा ?" "जी जी : यासि काइ जाणावें असे ? हें आमचेंचि म्हणा[७] :" "पां[८] एथ दाखवा :" मग भटोबासीं[९] नागरु[१] धरीला : नेला : आणिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : एक चुकलेति गा :" "काइ जी ?" "वरंबा[१०] फुटेचि ना :" मग गोसावीं कटीप्रदेसीं फुटा वेढिला[११] : आंगीचीया वाहीया वरतीया केलीया : स्त्रीकरीं तुता घेतला : रुम्हणेयापासि दोरु धरिला : मग गोसावीं बैल तापटीले[३] : मग चास उजुचि नेलें : मागुतें आणिलें[१२] : मग तेणें कुणबीयें

---

१२ (**वृपा.** '१४ डोळेयाचा दृष्टांत'. 'प्रतिष्टानी पांडेयाप्रति निरूपिला'—**वृस्थ**). १३. (**प्रव. आ.** २८८. हा प्रकरणवश चौकटी कंसात दिला असून त्यात अंतर्भूत केलेला 'डोळेयाचा दृष्टांत' तिरप्या अक्षरांत छापला आहे).

**३७४.** १ **मुने.** नांगरु. २ **यमु.** °आउत वाहों जाणा? ३ **ने.** थापटिलें. ४ **मुनेगो.** आनुता. ५ **यमु.** फांकला. ६ **य.** इउता. **ने.** आनुता पडैला. ७ **हीबी.** म्हणीयें. **यमु.** °आम्ही वाहावळ : कुळवाडी करूं : ८ **यमु.** "वाहा पां :" ९ **यमु.** °आउत धरीलें : तापटीलें : परतीले : १० **गो.** वरंभा. **ने.** वोरंभा. **पं.** वरंबु. ११ **यमु.** खोविला. १२ **यमु.** °मग सेतकरीयासि वीस्मो जाला.

म्हणीतलें : "आवघेयां वाहावळांचा बापु जालासि : गोसावी वाहावळे नव्हति : हे गोसावी आवघेयां वाहावळांचा बापु : जन्म गेलें आमुचें एणें खोडेंसीं झोंबतां : परि ऐसें आउत वाहों कोण्हीचि नेणे :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कव्हणी एकु खर्गधारेवरि चाले : आंगाचें लघुत्व : बुधीचें कौसल्य असे तेयासि खर्गधार साधे : ना आंगाचें लघुत्व नाहीं : बुधीचें कौशल्य नाहीं : तो पडे : तेयाचे हातपाय तुटति[१३] :" मग गोसावीं बीजे केलें :* ।।

## ३७५ पण्यस्त्रीविटकानीत पर्णस्वीकारु

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि चौकीं आसन असे : भट काइसेया व्यापारा बाहीरि नीगाले : तवं तीया बाइया एति असति : तीघी सामानस्त्रीया[१] : भट मागुते आले : "जी जी : मानुसेंऐसीं एतातिं :" बाइसीं पुसिलें : "बाबा मानुसें काइसीं[२] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हे भाक वानरेस जाणति : " तवं दोघी सामानस्त्रीया[१] आलीया : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागलीया : वतीसांवतीसां काळेयां पानाचे वीडे गोसावीयांसि दर्सना केले : मग गोसावीयांजवळि बैसलीया : मग भटीं तेयांचीया पोफळांचीया फोडी केलीया : मग भटीं हडपेचीं चोखटें[३] पानें काढीलीं : मग गोसावीयांसि वीडा ओळगवीला : मग तेहीं एकमेकांची वास पाहीली : 'ऐसीं पानें आमतें नाहींति :' मग म्हणीतलें : "घेतलेनि मोलें एकदोनि वीडे आम्हां देया का : मग आमचे वीडे गोसावीयांसि ओळगवा : " मग भटीं म्हणीतलें : "हें दाम नीकें पानें[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं साधर्मीं तांबोळी कीं गा : घेतलेनि मोलें ओपा : " मग भटीं घेतलेनि मोलें दोनि वीडे तेयांतें दीधले : तेहीं गोसावीयांसि ओळगवीले : मग तेहीं गोसावीयांसि मनीं अभिळाखिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "अनेत्र[५] पाहीजे तेंचि एथ पाहीजे : तरि कव्हणी ठाइं नाहीं तें कें पाहीजे[६] ? अनेत्र आति[७] तेंचि एथही आति : " मग तेहीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं गोसावीयांपासि राहुनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ राहाल तरि[८] ऐसेयां होआवें लागैल :" स्त्रीकरिचीए अंगुळीएचां अनुकारीं दाखवीलें : "जी जी : हेंहीं करूनि[९] : परि गोसावी[१०] काइ आम्हां राहों देताति ?" मग नावेक होतीया : मग गोसावीं तयांसि पाठवणी दीधली : ।।

---

१३ (**दृपा.** ९३. 'खर्गधारेचा दृष्टांत'. 'भटांप्रति पैठणीं निरूपिला'—**दृस्थ.**).

**३७५.** १ **यमुगोहीबी.** सामान्य°. २ **यमु.** म्हणिजेति काइ ? ३ **गोनेयमु.** चोखें. ४ **यमुनेपं.** पान. ५ **गोहीबीपं.** अन्यत्र. ६ **अ.** पां. ७ **अ.** पाहीजे. ८ **एवा.** °ऐसें करावें लागैल : ९ **अ.** करुं. १० **ने.** °राहों देयावें.

## ३७६ भीक्षे निक्षेदुमंडनपूर्वक कुष्टखता आउदुखनिराकारण

आउसें भीक्षेसि जाति : मग भीक्षाअवस्वरीं धुतवस्त्र नेसति : धुतलेया बाहीरवासाची बुंथि घालीति : तोंड हातपाए धुति : त्रीपुंड रेखीति[१] : मग गोसावीयांतें भीक्षे जावेया पुसावेया एति : एकु दीसीं आलीं : आणि सर्वज्ञें म्हणीतलें[२] : " लीसि पुसि कीजे हे धर्म वैस्याचे[३] कीं नाएका : जोगीया तो मसीघसी लीतला होआवा कीं नाएका : " " पां वो : पां वो : दीक्षीतांची कंन्या : उपासनीयांची सुन : नाथपंथीं उपदेसु : चातुर्वर्णि भीक्षा करीं : पाणिभातु खायें : तींतरेया महुवांचां कृस्णेयां ध्यायें : मज आणि सामानस्त्रिएचे धर्म म्हणीतलें : *बापु गोडिसेया देवा : नाहीं येणें देवें काज*[४] : काढीन आपुला जोगु : " सर्वज्ञें म्हणीतलें : " खेळीजैल नाएका ? " " खेळीजैल स्वामी जगंनाथा : " ॥

मग चौदोत्राचेया[५] जवळगांवां[६] गेलीं : रात्रि जाली : आणि दुख करुं लागलीं : " माझा चक्रस्वामि : माझेया चक्रस्वामींसि आतां पुजा होति असैल : " उदेयांचि एति[७] : आधीं[८] एकी वाटे बैसति : गोसावीयांचे पुजाअवस्वर आठवीति : मागुती भीक्षाअवस्वरीं जवळगांवां[६] जाति : ऐसीं तीनि दीस होतीं : ॥

चौथां दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : अंगीटोपरें केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आजि कवणीकडे[९] खेळों जाइजैल गा ? " कोण्हीं म्हणे कोण्हींकडे : कोण्हीं म्हणे कोण्हींकडे : सर्वज्ञें म्हणीतलें : " आजि हें नाएकासि साउमें[१०] जाइल : " गोसावीं पोटफोडेयासि बीजें केलें : पोटफोडां आसन जालें : मग म्हणीतलें : " मंडळिका : पोरी आउवेसि[११] अभीमानातव आरुतेयां तवं एववे ना : जा बोलाउनि घेउनि या : " मग नाथोबा गेले : तवं वाटे बैसौनि दुख करीताति : नाथोबातें देखिलें : आणि रडों लागलीं : " आउ चाल : तुतें गोसावीं बोलाउं पाठवीलें : " मग आलीं : गोसावीं तयांतें एतां देखिलें आणि साउमेयां बीजें केलें : तवं तीयें नावेक पाठिमोरी राहीलीं : नावेक रडों लागलीं : गोसावीं क्षेमाळींगन दीधलें : आउसीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : " जी जी स्वामी जगंनाथा : स्वामीचेन जाणें : स्वामीचेन एणें : वापुडा दुखीया होतु असे जी : केंहीं न पठवावा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : काइ एथौनि तुमतें पाठवीलें ? तुम्हींचि गेलींति[१२] : " [ मग सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : तापसाचे ऐसे धर्म तरि वेश्याचे कैसे धर्म ? " आउसीं म्हणीतलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : तरि काइ तापसासीं करूं न लभे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : हे ऐसे तापसासि

---

**३७६.** १ **एवा.** लावीति. २ **यमु.** °" हे काइ नाएका ? तापसांचे ऐसे धर्म तरि सामानस्त्रीया काइ करावें ?" ३ **यही.** सामानस्त्रीयांचे. **मु.** व्यष्यांचे. **पं.** वेस्याचे. ४ **(यमु.)**. ५ **यमुगोनेहोबी.** चौधोत्रा°. ६ **यहोबी.** जळगांवां. ७ **यने.** येउनि. ८ **गोनेमुपं.** अर्धी. ९ **एवा.** °बीजे कीजैल गा? १० **एवा.** °सामोरें. ११ **यमु.** °एथ एतां येववे ना : तेथ राहातां राहावें ना : आधी एकि वाटे येउनि गावांचेया वाहानीं बैसते असति : जा—. १२ (यापुढील भाग **प्रव.**मधील आचार

करूं न लभे :" "तरि जी जी : जे जे तापसा लाभे ते ते नीरूपावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीतेनि मृत्याचां धर्मीं वर्त्तावें : आणि तुम्हीं लिसी पुसी करीतां कीं ? असुरपसुर नीजतां कीं ?" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "*माकोडा असे : तो जीवन पाहे*[१३] *: जीवन सांपुडे : आणि धरी : तो झाडितां झडे ना : तोडितां तुटे ना : ऐसांहीं तोडिजे*[१४] *तरि धड तुटे : परि*[१५] *न सोडी*[१६] *: तैसें* नाएका : धड तुटलेयांहीं जीवें परमेश्वरातें न सोडावें : वासना न संडावी : आणि तुम्हीं वैद्यकमांत्रिक करितां कीं ?" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : महात्मेनि खळाळीं मोकलावें : आणि तुम्हीं रचमच करितां कीं ? तुम्हां विजन नावडे :" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका महात्मेनि हाडाची रांगवळी करावी :" "आणि तुम्हीं असुरपसुर आंथरूनि निजतां कीं ?" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : महात्मेनि कटंकटीएमान होउनि असावें : आणि तुम्हां जें जें रुचे तें तें जेवितां कीं ?" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सुखसाधनें देवो न पविजे नाएका[१७] : आणि जेणें दुख उपजे तो एथिचा उचित व्यापार न करा कीं ?" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : ऐसें हें एथिचें म्हणितलें जो करी तयाचें उटणेंबैसणें इतुलेंही वायां न वचे : म्हणौनि एथिचें म्हणितलें तुम्हीं करावें :" "हो कां जी : स्वामी जगन्नाथा :" म्हणौनि साष्टांग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : ] मग गोसावीं देउळासि बीजें केलें : ।।

## ३७७ आउ पडवा मागणें

गोसावीयांसि पडवा कोणें दीधला तें नेणिजे : तो पडवा बाइसें भीक्षाअवस्वरीं नेसति : एकाधे वेळ पुजा करीतां नेसति : मग एकु दीसीं आउसें भीक्षा अवस्वरीं नीगालीं : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : स्वामी जगंनाथा : हा पडवा मज नावेक

---

प्रकरणाच्या ७४ ते ८० या वचनांच्या प्रकरणवशातून घेतला आहे. तो चौकोनी चौकटीत घातला आहे. त्यांत अंतर्भूत केलेला 'माकोडेयाचा दृष्टांत' तिरप्या अक्षरात छापला आहे. १३ °**रावा.** तयाचें जिवन असुध. १४ **ने.** झाडीजे. १५ **ने.** °झडे ना. १६ (**दृपा.** '५६. माकोडेयाचा दृष्टांत'. 'भटांप्रति पैठणी निरुपिला'—**दृस्थ.** या दृष्टांतातील उदाहरण लक्षात घेता 'धड तुटलेयाही जीवें परमेश्ववरातें न सोडावे 'या वचनावर तो निरूपिलेला असला पाहिजे हे स्पष्ट दिसते. म्हणून तो येथे पुनःस्थापित केला आहे.) १७ 'सूत्रपाठा'तील याच वचनाचा निराळा प्रकरणवश असलेली एक अज्ञात लीळा मला **नागराज** प्रतीत आढळली. ती पुढीलप्रमाणे : **आउसांप्रति श्वानकुंडली कथन ।।** सप्तमात्रां अवस्थान : अश्वीनौदेवीं : आउसें भीतरि निद्रा करीति : रात्रीं वोसाडा ये : वरि गळिनलें : आउसीं आंथुरिलें : पाएघोळ : पाहातांचि आलीं : कसकसितें : गोसावीं पुसिलें : "जी जी : रात्रीं निद्रा नाहीं :" रात्रिचा अनसुरवाडु सांघितला : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें असरपसर आंथुरिता : ऐसें न कीजे : सुखसाधनें देवो न पवीजे नाएका : कोरडें ऐसें पाहिजे : मग तेथ श्वानकुंडली घालिजे :" मग गोसावीं उकरडां पहुडु हे गोष्टि सांघितली : यावरि आचारपरा लीळा : ।। (**ना.** ८४).

नेसावेया देयावा : मीं स्वामी जगंनाथाचेनि प्रसादें खडपडीत नेसैन : मग मीरवत-मीरवत भीक्षे जाइन : भीक्षा करीन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : पडवा तुम्हां नेसावेया नेदीजे : " " जी जी : तरि बाइसां नेसों देइजताए ? " सर्वज्ञें म्हणीतलें[1] : " जें बाइसें तें तुम्हीं[2] ? " मग उगींचि राहिलीं : ।।

## ३७८ अमर्दक तपोधनें देवता अज्ञान कथन

एकु दीसीं[1] *गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : आवघे भक्तजन बैसले असेति : आउसीं पुसीलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : लिंग तो ढोरेस्वरु : कीं नांदिया तों ढोरेस्वरु ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : तुम्हांसि जाली अमर्दक तपोधनाची परी : दाहा मास एथ असा : वरि कोण ढोरेस्वरु ऐसें नेणां : " तवं बाइसीं म्हणीतलें : " बाबा : अमर्दक तपोधन म्हणिजे काइ बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " आवंढांहुनि एक तपोधन आले : तवं एकीं पुसिलें*[2] *:* ' कांहांथी आवी[3] छों ? ' ' आंवढें गांउओं : नागनाथु देओ : उंहांथी आवी छों[3] : ' तेणें पुसिलें : ' आंवढें गांओ : नागनाथु देओ : कीं अवढें देओ : नागनाथु पाटण ? ' तेणें म्हणीतलें : ' आवंढें गावो कीं नागनाथु देओ : ना अवढें देओ कीं : नागनाथु पाटण : नागनाथु चांडी कीं बीणी[4] : एउ[5] हों न जाणों : हों[6] *अछु*[7] पुडा[8] पातळीउपरि : ' " सर्वज्ञें म्हणीतलें : " बारा वरीखें क्षत्रसंन्यासु घेतला : परि जीए देवतेची उपास्ति करी तीचें नांवही नेणे : *तैसें जालें नाएकासि*[2] *:* " ।।

## ३७९ बळानीत डखलेयां उर्धदेहीं क्रीया करणें

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग गोसावीं[1] ढोरेस्वरींहुनि बीजें केलें : चक्रपाणीवरिलीकडे चास : तेया चासाचेया टेंकावरि गोसावी उभे राहीले : आवघे भक्तजन गोसावीयांसरीसे असति : मग गोसावी भक्तजनातें गांव पुसों लागले : " हा कोणु गाओ ? " " जी जी : हा अमुका : " " हा कोणु गावो ? " " जी जी हा अमूका : " ऐसें गोसावी देखति तो पुसति : सर्वज्ञें[2] म्हणीतलें : " हा कोणु गांवु ? " " जी जी : हे डाउवाडी[3] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथ डखला असे कीं ? " " जी जी असे : " " मग तो सांपें एथ दीसे ना तें काइ ? " तवं एकें म्हणीतलें : " जी जी[4] : ते

---

**३७७.** १ **ने.** °" बाइसें तें बाइसें : तुह्मीं ते तुह्मीं : "   २ **हीबी.** °ऐसें न म्हणीजे हो : "

**३७८.** १ **अ.** °गोसावीं एकातें पुसिलें : **गोनेहीबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : " एकी एकातें पुसिलें. २ (**पं.**). ३ **गो.** ओछो. **ने.** आवो छे. **ही.** आवां छो. **अ.** आवी छो.  ४ **नेपं.** बीणा.  ५ **एवा.** ऐसें नेणों. ६ **नेही.** हुं. ७ (**नेपं.**). **अ.** असों. ८ **ने.** पुडी.

**३७९.** १ **रावा.** °ढोरेस्वरासि बीजें केलें : आवघे भक्तजन—. २ **अने.** एकी वासना°. ३ **यमु.** डाउलवाडी. ४ **यमु.** °तेयासि वेवो घडला असे : "

सांपें आपणेयां वीव्हाओ करीताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसे[5] ? जा तेयांचेया घरा : जे आइत असैल ते घेउनि या : कोण्ही काहीं म्हणैल : तेयातें ऐसें म्हणावें : तुम्हां[6] राउळ रुठले[7] :" "हो कां जी :" मग आवघे स्रीचरणां लागौनि डाउवाडीए गेले : ।।

खेइभटांचेया घरा गेले : तवं तयांची म्हांतारीं दारेंसीं बैसली असे : तयांतें पुसिलें : " खेइभट कें वो ?" " बा : ते बाहीर गेले असति :" आणि आवघे भीतरि रीगाले : " हें काइ बा : हें काइ बा : घराआंतु कां रीगता ?" " तुम्हां[6] राउळ रुठले[7]" आणि तीयें भीयालीं : तीं हांडीया उतरिलीया : कणिकी : तांदुळ : वळीवट : वडापापड : कुरवडी : दाळि : आवघें काढिलें : कंथा पसरिली : ओलीं मोटा बांधलीया : तुपाची घागरि घेतली : मग नीगाले : तवं खेइभट आलें : मग तीं सांघीतलें : " बोडिके[8] आले : मातें पुसिलें : 'खेइभट कें ओ :'" म्यां म्हणीतलें : 'बाहीरि गेले असति :' ते आवघे घरांतु रीगाले : 'हें काइ बा : घरांतु कां रीगता ?' 'ना तुम्हांसि राउळ रुठले :' ते आवघी आइति घेउनि गेले : डखलां जाणीतलें : भरवसेन गोसावीं करवीलें : "कोणी वाटा निगाले ?" " पैठणिचेया वाटा निगाले :" मग मागिलाकडुनि तेहीं[9] आले : ते भक्तजनातें द्रीष्टी सुनि एताति[10] : पींपळेस्वरा दक्षीणे वटु : तया वडाची पारंबी धरुनि गोसावी उभे असति : तेथ भक्तजनां डखलेयां दरीसन जालें[11] : मग भक्तजन मोटा घेउनि आले : मोटा ठेवीलीया : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मागिलाकडौनि डखले आले : तेहीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि वीनतकंदर होउनि बैसले : ।।

मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ गा डखलेया[12] : सांपें तुम्हीं एथ दीसा ना तें काइ पां ?" " जी जी : गोसावी कवणी ठाइं राज्य करीताति तें ऐसें मीं जाणें ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें एथचि प्रतेस्थानीं असे मां :" एतुलेनि ते उगेचि राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : सांपें म्हणे तुम्हीं आपणेयांसि वीव्हाओ करीता ?" ते उगेचि राहीले[13] : " हां गा : धर्मु पां नाठवे ? मां धाइरीक सोइरीक तेही नाठवे ? हा तवं धर्मापासौनि गेला : गेला तैसा मेला : तरि मेलेया वौजे[14] तें कां करा ना ?" " जी जी : काइ करुं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " याचा कारटु[15] करा :" " हो कां जी :" म्हणौनि

---

५ **यमु.** °डखलेयासि वेवो ? तरी धर्मापासौनि गेला गा : जा—. ६ **एवा.** तुमचे. ७ **एवा.** रूसले. **एवा.** रूंठले. ८ **यमु.** बोडिके बोडिके ऐसे—. ९ **यमु.** °भक्तजनातें टाकीत नीगाले. १० **यमुअनेगो.** °गोसावी चासौनि पाठवीलें : तिया वासना : ११ **यमुअनेगो.** °ढोरेस्वरौनि पाठवीलें : तिया वासना : गोसावीयांसि चौकीं आसन असे. (अ. पोथीत 'चासौनि पाठवीलें' ही वासना आहे. म्हणून येथे त्याच वासनेतील वृत्तांत संहितेत स्वीकारला आहे). १२ **य.** °एथचेया एथ असतां एथचेया दर्सना न या तें काइ ? १३ **एवा.** "धर्मू पां नाहीं : मां धाइरीक सोइरीक तेहीं नाहीं : हा तवं—. १४ **अही.** कीजे. **ने.** वोवजे. १५ **ने.** कारटा.

तेथचि आइति करुं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ नको : चक्रतीर्थासि चाला :" "हो कां जी :" मग सारंगपंडितांचीए घरुनि चरवीया गोसावीं आणवीलीया : मग[१६] गोसावीं कारटुक्रीयाखडका बीजें केलें :॥

मग आवघें रांधुं रीगाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "यां तुम्हां अर्धेन सीष्टाइ गा :" मग अर्धी कणीक : अर्धे तांदुळ : अर्धे वळीवट : अर्धे वडापापड : कुरवडी : तुप : मग रोटीया केलीया : तांदुळ वेळिले : वरण रांधिलें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि ताट केलें : आवघेयां भक्तजनां वाढिलें : गोसावी आरोगण करुं लागले : आवघे भक्तजन[१७] जेवितातिं[१८] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : देखिलें गा : कैसी डखलेयासि नोवरकळा साजति[१९] असे :" तें दाइंबासि नुमटेचि[२०] : मग "जी जी" म्हणीतलें : मागौतें सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा भोजेया : डखलेयासि कैसी नोवरकळा साजति असे :" *आणि दाइंबासि उमटलें*[२१] : "जी जी : नोवरकळा न दीसे : हे मडछाया दीसति असे :" आणि गोसावीं इखीत हास्य केलें : मग दायांबाएं एकि गोष्टि सांघीतली :॥

"या भगवेयातें संन्यासु देइजे तेव्हळि तयाचा कारटु कीजे : मग तो हांसिलापुसिला[२२] ऐसा दीसे तरि म्हणति : 'हा राजसु होइल :' ना कोमाइला ऐसा देखति तरि म्हणति : 'हा वीरगतु होइल :' तैसा डखला वीरगतु ऐसा दीसतु असे जी :" ते कोमाइले ऐसे दीसत असति : ऐसे वीनोद करीतां गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग एकि रोटी उरली : ते गोसावीं स्रीकरीं घेतली : मग दोहीं स्रीकरीं तीएसि आवघीएसि संबंधु देत होते : जवं ते आवघे जेउं सरति : मग आंचवले : मग ते रोटी गोसावीं डखलेयांसि दीधली : तेहीं रोटी घेतली : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग गोसावीं तयां पाठवणी दीधली : मग ते गांवां घेउनि गेले : मग ते रोटी धुति : मग तें पाणी पीति : थाळां चौघरीं भीक्षा करीति : मग आपुलें अंन तेया वीरजें घेति : मग तींहीं मरतां म्हणीतलें : "माझा कारटु तुम्हीं न करावा : माझा कारटु गोसावीं केला :" ॥

## ३८० सारंगपंडितां पाहुंणां प्रस्नु करणें

एकु दीसीं सारंगपंडीतीं गोसावीयांसि उपहारालागि वीनवीलें : गोसावीं विनवणी स्वीकरिली : मग गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : तवं ताट नैए : बाइसीं म्हणीतलें : "देमाइ : जा कां : आझुइं ताट नैए : बाबासि आरोगणेसि उसीरु

१६ **एवा.** °चांसावरिली बाबुळातळीं आसन जालें : १७ **य.** °डखले जेवितातिं : मग सर्वज्ञें—. १८ **अगो.** °डखले : मग सर्वज्ञें—. **ने.** डखले बैसले असति. १९ **एवा.** साजताए. २० **अ.** न मनेचि. २१ **(गोनेयमु.)**. २२ **मु.** हासळा ऐसा—. **यने.** हांसळाफांसळा ऐसा—. **हीबी.** हांसला पासला ऐसा—.

जाला :" देमाइसें गेलीं : तवं पाहुंणे आणि सारंगपंडित वोसरीएवरि बैसले असति : देमाइसें भीतरि गेलीं : " काइ उमाइ : गोसावीयांसि आरोगणे उसीरु जाला : आझुंइं कैसें ताट नधडा ? " " काइ करुं देमाइ : पाहुंणे आले : पाहुंणेयालागौनि वेगळें रांधावें : गोसावीयांलागौनि वेगळा उपहारु निफजवावा : मग उसीरु लागला : " तवं पाहुंणां पुसिलें : " ताट कोणांलागौनि ? " सारंगपंडितीं म्हणीतलें : " ना स्रीचांगदेओराउळां गोसावीयांलागौनि : " "चांगदेओराउळ कोण ? द्वारावतीकार ?" " ना हो :" "ना ते सुपें हाणति तयां वीद्या प्रकटे : खरांटेनि हाणति तयां मार्ग प्रगटति : तैसें कांहीं यांचां ठाइं आति ?" " ना : तें यांचां ठाइं कांहीं देखों ना[1] :" मग उमाइसीं ताटें केलीं : मग सारंगपंडीत आणि उमाइसें ताटें घेउनि आलीं : मार्गीं देमाइसांतें म्हणीतलें : " गोसावीयांपुढां हे गोष्टि नको सांघो :" सारंगपंडीतीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : तुम्हां उसीरु कां लागला ? " " जी जी : सारंगपंडितां पाहुंणे[2] आले : मीं गेलीयें : 'हें काइ उमाइ : गोसावीयांलागौनि आझुइं ताट कैसें नधडा ? गोसावीयांसि आरोगणे उसीरु जाला :' ' काइ करुं देमाइ : पाहुंणेयांपुरुतें वेगळें रांधावें : गोसावीयांलागौनि वेगळा उपहारु करावा : म्हणौनि उसीरु लागला :' तवं पाहुंणां[3] पुसिलें : 'ताट कोणांलागि ?' तवं सारंगपंडितीं म्हणीतलें : 'स्रीचांगदेओराउळागोसावीयांलागि :' तवं पाहुंणां पुसिलें : 'चांगदेओराउळ कोण ? द्वारावतीकार ?' पंडितीं म्हणीतलें : 'हो :" मां ते सुपें हानति तयां वीद्या प्रकटति : खरांटेनि हाणति तयां मार्ग प्रगटति : तैसें काहीं यांचां ठाइं आति ? ' पंडितीं म्हणीतलें : 'तें कांहीं देखों ना :' तवं पंडीतीं गळेयाकडे दाखवीलें : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : तै[4] देओ होता आणि भगतु होता : आतां देओ असे : परि भगतु नाहीं :" " हें काइ जी : भगतु कैसा नाहीं ? जी जी : आम्हीं असों नव्हे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि देओचि नाहीं : " आणि उगेचि राहीले : ॥

## ३८१ सारंगपंडितां धातुकरवणीं लब्धुधत्व कथन

एकु दीसीं सारंगपंडीतीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : धातु कैसी कीजे[1] ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " यांसि काइ गा जाणावें असे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आणां आरुतिं पैल रानसेनीची राख : आणि तांबवटी[2] : आणि एक झाड[3] : तें तुमचीए पानवैवरि

---

३८०. १ ने. °परि आपणेयांसि ते इश्वरू म्हणविताति." २ गो. पाहोणे. ३ गो. पाहोणां. ४ (गोहीबी.).

३८१. १ मु. "हां जी : सोनेयां केलेयां होए ? " २ गो. वाटी. ३ पं. तीधारी कांडवेलि : तें—.

असे[४] :" "जी जी : दावीजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "दाविजैल : परि पोरें हो : द्रव्यलब्ध[५] होआल :" ।।

## ३८२ अनोनीवारणीं उपाध्यां कोपणें

अनो ते बळ्हेग्रामिचे : एकु दीसीं तयांसि स्तीति जाली : ते उपाध्यांचीया घरावरि वेघले[१] : लागले घर उकलुं[२] : आवघे वारुं लागले : परि कोण्हाचेनिही न ऱ्हाति : मग नागदेओ उपाधीं म्हणीतलें : " जानोपुढां सांघा : मग तयांचेनि राहिल[३] :" मग उपाध्यांपुढां सांघीतलें : मग उपाध्ये आले : तीं म्हणीतलें : "अनो : हें घर कां उकलितासि[४] ? काइ तुजकरवि *श्रीचांगदेओराउळीं*[५] गोसावीं करविलें[६] ? उतरा[७] :" गोसावीयांचें नांवं आइकिलें आणि स्तीति भंगली : आणि उतरले : उपाध्ये गोसावीयांचेया दरीसनां आले : गोसावीयांसीं दरीसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुं यांतें कां सीक्षापीसि ? तेविंचि एथचें नांव घेसि ? तें काइ तो करीतु होता : तें करुं दीजतें[८] :" ।।

## ३८३ सीनलीयें कृष्णा म्हणणें

एकु दीसीं[१] उपाध्यां स्तीति जाली : मग डोइ भवंडीति : आणि म्हणति : " सीनलीयें[२] कृष्णा : सीनलीयें[२] कृष्णा[३] :" तवं दाइंबायें म्हणीतलें[३] : " सीनलासि तरि जाए घालि पैली आडवाटेचीए गाडवाटे :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हां गा : हें काइ म्हणतु असे : *आणि तुम्हीं काइ म्हणतु असा*[४] :" ।।

## ३८४ उमाइनमस्कारें आंगुठा लावणें

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग गोसावी वीहरणां बीजें करिताति : तवं उमाइसें दखीणिली दारवठेयापासीं पसीमीलीकडे बैसली असति :

---

४ **पं.** °तेहीं आणीली : तेयाचा रसू काढवीला : म्हैसीचें सेन आणवीलें : तेयाचा रसू काढविला : रानसेनीची राख वस्त्रगाळीत करवीली : सेनरसाआंतु तांबतौलीए घालवीले : मग मुस केली : तांबोळ घातलें : आटिलें : रसू जाला : मग तेथ कांडवलीचा रसू घातला आणि तांबवटीएसि वीझविले : तो बावन कसू जाला : । ५ **गो.** °लबुधें. **ने.** द्रव्यलब्धां होइजैल. **हीबी.** °लंपटें.

**३८२.** १ **यमु.** °घर उकलीलें (**य.** उकरीलें) : कुहीटि सांडुं लागले : २ **ने.** उज(च ?)लुं. **बी.** उपसुं. ३ **नेहीबी.** राहाति. ४ **अय.** उकरितासि. **ने.** उचलितासि. ५ (**पं.**). ६ **गोहीबीपं.** उकलविलें. **य.** उकरविलें. **ने.** उचलिलें. ७ **हीबी.** उतरा हडुते. ८ **अ.** देइजे. **ने.** देइजतें.

**३८३.** १ **ही.** °गोसावी आसनीं उपविष्ट असति : उपाध्ये गोसावीयांची श्रीमूर्ति अवलोकीत बैसले असति आणि—. **गो.** °गोसावीयापासौनि—. २ **मुने. सीणलां. गोहीबी.** सीणलों. ३ **पं.** °सेन लाकुड माती :" ४ (**हीबीनेपं.**) **हीबी.** °ऐसें विरोध न म्हणिजे कीं :"

उमाइसें अस्परीसीयें[१] असति : म्हणौनि अळगौनि गोसावीयांचेया स्रीचरणां लागलीं : गोसावीं स्रीचरणीचा आंगुठा तयांचां नीडळीं लाविला : आणि तीयें संकलीं[२] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ बाइ : एथिचेया आंगुठेयासि वीटाळु केला[३] ? " " ना जी : मीं न करीं : गोसावीं स्रीचरणु वरुता धरिला[४] : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया :" " जी जी : " " एथचेया आंगुठेया[५] वीटाळु जाला : आतां लोणारा नेयावा लागैल : केदारा नेयावा लागैल : मलिनाथा नेयावा लागैल : " ॥

सर्वज्ञें म्हणीतलें[६] : "बाइ : नव नाडी बाहात्रि कोठे : नवां नाडीमध्यें हे एकि नाडि बाइ : एकि क्रीस्ण नाडि : एकि सुक्ल नाडि : क्रस्णेचा वीटाळु कां होआवा ? सुक्लेचा वीटाळु कां न व्हावा बाइ ? तेणें कांहीं नाहीं : कव्हणी एकी अवस्वरीं कव्हणा एका इंद्रीयांची नाडी श्रवे : एकी अधे : एकी उर्धे : " तवं उमाइसीं म्हणीतलें : " जी जी : वीटाळु हें काइ जी? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : यें नवद्वारें : जैसा नाकीं सेंब्रुड ए : डोळेयां चीपडीं एति : कानां मळू ए : तोंडा थुंका ए : गूह्यद्वारा मळ एति : तैसी हे एकि[७] धातु स्रवे : मग नीवर्ते : याचा विकल्पु धरुं नैए : जरि धरीजे तरि प्रतदेह होए : " " ना जी : तरि आजिलागौनि न धरीं जी : " ॥

## ३८५ दाइंबा जवळीक नीराकरण[१]

दायांबायें गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : गोसावी ईश्वरू : आणि ईश्वरीं तरी अदये नाहीं[२] : आणि आम्हीं तरि ईश्वराची जवळीक पातलों असों : तरि आम्हां काइ गोमटें[३] होत असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें[४] : " आति[५] : " ॥

---

**३८४.** १ **अ.** स्परीसीयें. **गोनेवं.** स्पर्शे. **यमु.** अ(आ)ळगें जालीं होतीं. २ **य.** दचकलीं. ३ **एवा.** जाला. °**एकी वासना :** मढाआंतु रीगतां डावेया हाता कोणीं गोसावीयांसि आसन असे : उमाइसें आलीं : तेहीं नमस्कारु केला : आंगुठा नीडळीं लाविला : " हें काइ बाइ : एथचीया आंगुठेयासि वीटाळ कैसा केला ? आतां आंगुठा काइ गंगेसि नेइजल ?" ४. **एवा.** " जी जी : अळग करुं बैसलीयें तवं नीडळ लागलें : " ५ **एवा.** °एहीं वीटाळु केला. ६ **य.** °बाइ : देहामध्यें नव नाडी : कव्हणी वेळ सुक्ल वाहे : कव्हणी वेळ श्रोणीत वाहे : बाइ काइसा वीटाळ : " ७ **एवा.** नाडि.

**३८५.** १ (पूर्वार्धं लीळा २४४ व त्यावरील टीप पाहा). २ **मु.** °तरि अवघेयां जीवा गोमटें कां न व्हावें ? ३ **रावा.** °होइल. ४ **यमुनेगो.** " जरि जवळीक असे तरि कां गोमटें न व्हावें ?" **गो.** सर्वज्ञें म्हणीतलें : "इंद्रादीकां तुम्हां कीती जवळीक ? यां ब्रह्मांदीकां कीती जवळीक ? चैतन्यपरौता परमेश्वरु : तेणेंसीं जवळीक असे तरी कां न व्हावें ?" **ने.** " जरि जवळिक पातले असाल तरि कां न व्हावें ? कर्मभुमिचिया अष्टौदेवयोनी कीती जवळिक ? अष्टौदेवयोनी आणि अंतराळा कीती जवळिक ?" यापरी नवै खापणी सांघीतली : " तेयां जरि नाहीं : मां चैतन्यापर परमेश्वरू : तेयां आणि तुम्हां कें गा असे जवळिक ?" " तरि काइ जी : वायां गेलों ? करितों तें नव्हे ? " " वायां जावेयां काइ कार्ये ? करितां तें होए : परि म्हणतां तें नव्हे : " ५ 'दाइंबा जवळीक नीराकरण'

## ३८६ क्षेउरक्षोभें नीराकारण

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांचें क्षेउर जालें : मग भट वारिकातें बोलवावेया गेले : तवं एकु संभावनसीळु ऐसा वारीकु देखिला : " हा होए : " मग भटीं म्हणीतलें : " हां गा : तुं क्षेउर करुं जाणसि ? " आणि क्षोभला : " ना : जाणों तरि काइ देया ? " भटीं तेयाची काकु जाणीतली : कळा जाणीतली : " एकु दामु देउनि : " " हो कां : " भट तयातें घेउनि आले : गोसावीयांसि चौकीं आसन असे : " कोणाचें क्षेउर ? " " ना गोसावीयांचें[1] : " " या गोसावीयांचें क्षेउर मज नव्हवे : " म्हणौनि परता सरला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " या : तुम्हां एथिचें क्षेउर होववैल हो : " " हो कां जी : " मग क्षोभु[2] फीटला : मग गोसावीयांचें बरवें क्षेउर केलें : बरवीं नखें फेडिलीं : मग भटीं तयांसि दामु देओं आदरिला : तेणें म्हणीतलें : " मज गोसावीं दीधलें तें थोर[3] : मातें[4] गोसावीयांचेनि प्रसादें अपार असे : हेंचि मज देयावें : 'मीं गोसावीयांचें क्षेउर करीन : ' " मग गोसावीयांसि चौ दीसां मादणें[5] होए : आठां दीसां क्षेउर होए : तीए दीसीं तो आपैसेयाचि ये : बाइसें तयासि जेउं घालीति : गोसावीयांचें क्षौर जेणें सुरें करी तेणें आणिकाचें न करी : ।।

---

ही लीळा पूर्वी निर्देशिल्याप्रमाणे 'पूर्वार्धा'त देखील आलेली आहे (**पूर्वार्ध** लीळा २४४ पाहा.). या दोन्ही ठिकाणी प्रामुख्याने स्वामींनी दायंबाला 'अन्यव्यावृत्ति' निरूपिली आहे. त्याचप्रमाणे 'पूर्वार्धा'तील 'दाइंबाप्रति पाटनीयां सारिखवांटनीयां कथन' (लीळा ४५४) याही ठिकाणी ती निरूपिली आहे. 'लक्षणबंद'काराच्या मते अन्यव्यावृत्ति 'ते कोनाप्रति' निरूपिली ? ना माहिमभट्टाप्रति : १ : सावखेडां पूर्वार्ध 'भट्टा ईश्वर प्रतीति करणे' : २ : करंजखेड पूर्वार्ध 'दाइंबा पाटणीयां सारिखीवाटणीयां' निरूपण प्रसंगीं : ३ : प्रत्यस्थान उत्तरार्ध 'दायंबा जवळीक निराकरण' प्रसंगीं : ४ : बेलोपूर उत्तरार्ध माहिमभट्टाप्रति : ५ :' यात पूर्वार्धातील श्रीनगर येथील 'दाइंबा जवळीक निराकरण' (लीळा २४४) या लीळेचा उल्लेख नाहीं. तथापि, पूर्वार्धाच्या अनेक पोथ्यांत ती आढळते. 'प्रकरणवशा'त 'अन्यव्यावृत्ती'चे प्रकरणवश देताना तिसरा प्रकरणवश म्हणून 'श्रीनगर पूर्वार्ध :' विश्व भ्रमण कथन : दायंबाए पुसीलें : 'जी जी : हे विश्व भ्रमणातें कां पावलें असे—' इत्यादी—असा स्पष्ट उल्लेख आहे. म्हणून ही लीळा मी पूर्वार्धातही ठेवली आहे.

प्रतिष्ठान येथील प्रस्तुत 'दाइंबा जवळीक निराकरण' ही लीळा निर्दिष्ट करताना प्रकरणवश-काराने पुढीलप्रमाणे आरंभ केलेला आहे. 'दायंबा गोसावीयां सरीसे उठती : बैसती : सरीसे चालती : विडीया तोडीती : सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजा काइ भोजा : सापें ढगार माथां लागत असे ? " दायंबाएं म्हणीतलें : " जी जी : तें तैचि : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " सापें आतां दिसत असे : " यावरि गोसावीं 'खंडान्वय अन्यव्यावृत्ति निरूपिली :' पूर्वार्धाच्या पोथ्याप्रमाणे वस्तुतः हा भाग 'दाइंबाप्रति पाटनीयां'—(लीळा ४५४ मध्ये आलेला आहे). म्हणून मी तो या ठिकाणी अंतर्भूत केला नाही.

**३८६.** १ **यमु.** °तेणें गोसावीयांकडे पाहीलें : तवं गोसावीयांचें आगाधपण देखिलें : (**मु.** : आणि क्षोभला :) तेणें म्हणीतलें :—. २ **अ.** भयो. ३ **गोनेमु.** थोडें. ४ **अ.** मातेंही. **यगो.** मातें हें. **ने.** मज. ५ **गो.** माजणें.

## ३८७ भटां निषेध निरूपण*

[ढोरेश्वरीं अवस्थान : भटीं म्हणीतलें : "जी जी : जेणेंजेणें निषेधें पुरुषु धर्मापासौनि जाए तेते निषेध निरूपावे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : अविधितव पुरुषु धर्मापासौनि जाए : अन्यकथनें जाए : हें शास्त्र जेथौनि होए तेथीचिया विपरीतबुद्धी जाए : द्रव्ययंत्रसेवेतव जाए : अपक्व कखाइया जाए : तैसा कुयोगिया न वचे : एक सेवितु जाए : एक न सेवितु जाए :" भटीं म्हणीतलें : "जी जी : या दोहीं एकचि फळ ? किंवा भेद असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कुयोगिया द्रव्ययंत्रसेवेतव धर्मापासौनि जाए : आणि कखाइया पुर्वावस्तेचि धर्मापासौनि जाए : मग कुयोगिया उत्तर अवस्ते दोषेंसीं निरया जाए : विकल्पसंचारमात्रें जाए : तैसा विकारें न वचे :" "हो कां जी :" यावरि भटीं म्हणीतलें : "जी जी : विकल्पाचें कैसें लक्षण असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : अपरधर्माचें धारण यातें विकल्पु बोलीजे :" "हो कां जी : ऐसा विकल्पु काइसेनि संचरे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अनिष्टसेवेतव विकल्पु संचरें : यापरी अविधी अविधीतें प्रसवे : मग अविधीतव पुरुषु धर्मापासौनि जाए : म्हणौनि महात्मेनि कव्हणी अविधी आचरावा नाहीं :" "हो कां जी :" ।। ]

## ३८८ पुरुष जवंजवं पळे निरूपण*

[एकु दीं भटीं पुसिलें : "जी जी : जवंपर्यंत एकाधेया पदार्थाचा नेमु धरिजे तवंपर्यंत तो पदार्थ निराकरितां पाठीं लागे : बळेंचि संपादी : आणि तोचि जेधवां घेवों आदरिजे तेधवां मागतांही न मीळे : मां सुटेल काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरुषु जवंजवं पळे तवंतवं विखो पाठीं लागे : पुरुषु पाठीं लागे तवंतवं विखो पळे :" ।। ]

## ३८९ भट बाइसें श्रीप्रभूचेया दरीसनां पाठवणें*

[एकु दीं गोसावीं उदास्य स्वीकरीलें : भगतिजनें गोसावीयांचीये प्रवृती वीखो नव्हति : म्हणीतलें न करीति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं अवघीं येथौनि जा गा : बाइ : तुम्हींही येथौनि जा : बाइसांचें तोंड इउलें ऐसें जालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं बाइसांसांघातें जा : गा : श्रीप्रभुसीं दरीसन घेया :" *भटीं म्हणीतलें : "जी जी : मीं काइ जाइन : मातें काइ असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीप्रभूचीए सेवे आणिका द्रव्याचें ना : तूं नसुधाचि पुरसी[1] :"* "हो कां जी ?" मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग रीधपुरासि गेलीं : ।। ]

---

३८७. *(प्रव. आ. १५७–१६३. 'कुमर माल्हाइसें : अज्ञात : एकी वासना).

३८८. *(प्रव. आ. १९).

३८९. *ही लीळा **हीबीमु.** प्रतींतून घेतली आहे.

१ (प्रव. आमा. ३१).

## ३९० उदास्यस्वीकारें अनिएत[1] वासु*

भट वाइसें परमेश्वरपुरा गेलीं : मग गोसावीं उदास्य स्वीकरिलें : मग गोसावीयांसि सवेंचि ढोरेस्वरीं अवस्थान : सवेंचि गणपतिमढीं : सप्तमात्रां : रवळमठीं : चींचाए : नागनाथीं : ऐसें गोसावीयांचेया अवस्थाना नीगूति[2] नाहीं : ।।

## ३९१ नींबातळीं कैवल्यदान प्रगटीए करणें

एकु दीसीं गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पुजा-अवस्वरु जाला : गोसावीं केदारा पसीमे निबु : तेथ वीहरणा बीजें केलें : तया निबा-तळि आसन जालें : ते दीसीं सोमवारी : अपार लोकु सोमवारीए आला असे : एक स्नानें करिताति : एक त्रपणें[1] करिताति : एक पींडप्रदानें करिताति : ऐसें आवघे गोसावीं अवळोकीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : “ पांडेया : हे आवघे द्रीष्टार्थीए कीं अद्रीष्टार्थीए ? ” “ जी जी : हे आवघे अद्रीष्टार्थीए कीं : ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ यांतु कवणु असे अद्रीष्टार्थीया ? ” सर्वज्ञें म्हणीतलें : “ जा गा वानरेया : ऐसें फोकरा : कैवल्यदानि एकु आला असे : तो घाया घाया कैवल्य देतु असे : ” “ हो कां जी : ” मग भट गेले : “ आगा : एकु कैवल्यदानि आला असे गा : तो घाया घाया कैवल्य देतु असे : ” क्षेत्र[2] तीर्थ : बहुसाल मांदीं : तेथ भटीं म्हणीतलें : “ आगा ए सदापाणिबुडे : कैवल्याचा दानि एकु आला असे गा : तो घाया घाया कैवल्य देतु असे : ” तैसें भट चक्रपाणीपासौनि भोगावतीपर्यंत बोबात गेले : एरी थडीया मागौते आले बोबात : परि भटांची कोण्हीं वास न पाहे : मग भट गोसावीयांपासि आले : स्त्रीचरणां लागले : “ जी जी : मीं दोहीं थडीया बोबातु गेलां : परि माझी कोण्हीं वास न पाहे : ” मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ पांडेया : यांत कवणु अद्रीष्टार्थीया असे ? हे[3] देखों आवघे द्रीष्टार्थिये : ” भटांसांघातें एकु आला : तेयासि गोसावीयांपासौनि स्तीति जाली : ।।

---

**३९०. ***ही लीळा **मु.** प्रतीत पुढीलप्रमाणे आहे :

एकु दीं गोसावीं भट : बाइसें परमेश्वरपुरा पाठवीलीं : श्रीप्रभूचेया दर्शना : मग गोसावीं अनीएतु वासु अंगीकारीला : ।। मागां एक वेळु खडकुलीएहुनि पाठवीली : तै गोसावी प्रतीस्थानवरि आले होते : तैंहीं ढोरेश्वरींचि अवस्थान : ।। आणि तीये वेळे तीएंहीं तेथचि भेटली : हें दुसरेन : हें पुढां हरिनाएकाचां आवारीं भेटति : ।।

१ **अ.** अनेत. **ही.** अनेत्य. २ **गोने.** नेमू.

**३९१.** १ **गोनेहीबीमु.** तर्पणें. २ **गोनेमु.** जेथ. ३ **एबा.** हे अवघे स्रीस्नोदरपरायण. **एबा.** हे अवघे पाणिबुडे.

## ३९२ मुसळबुडी निरूपण*

[ गोसावीयांसि[१] ढोरेश्वरीं अवस्थान : एक वेळ सोमपर्व आलें : तैं दायंबाएं पुसिलें : "जी जी : स्नानसंग्रहेविन न सरे : आणि हें तवं गोसावीं वारिलें : तरि जेणें देवताविधीचें स्नान चुके ऐसें निरूपावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : बुडी मात्र दीजे : " "जी जी : ते कैसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "दीजे ऐसी मुसळबुडी[२] : " "जी जी : तरि मुसळबुडी म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्राणियांतु मुसळ घालिजे : ते सळकरि वरूतें ये : तरंगाए : ऐसें विधियुक्त नव्हे : स्नानसंग्रहो एकु आति भोजेया : "।। ]

## ३९३ आउसांप्रति भांडेदानीं स्वरुपदर्शनभाओ कथन

गोसावीयांसि सप्तमात्रीं अवस्थान : *बाइसें गेलेयां*[१] गोसावीयांसि मादणें[२] नाहीं : मग आउसीं गोसावीयांतें मादणेयालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग आउसें एकांचेया घरा गेलीं : " हे रे[३] : नावेक पाणीयाचें मडकें पाणी तावावेया देया कां : मग मीं स्वामीसि मादणें देइन : " "आइ : मज जरि मागता तरि मज गोसावीयांचें दरीसन कराल तरि देइन : " " हो कां : स्वामी मादणें[१] करावेया बाहीरि एती तेधवां तुं[४] दारवठेपासि उभी राहे : मग तुज स्वामींचें दरीसन होइल : " मग मडकें घेउनि आलीं : पाणीं ठेविलें : चोखणी केली : मग गोसावीयांसि मर्दना दीधली : ते वाडवेळु मर्दना जाली : मग बाहीरि आसन घातलें : " जी जी : स्वामी जगंनाथा : बाहीरि बीजें कीजो ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : चोखणी एथचि आणा : " मग गोसावीं चोखणीं भीतरिचि आणवीली : लाविली : ते[५] दारवठेयांसीं उभी राहीली : "जी जी : स्वामी जगंनाथा : आतां बाहीरि बीजें कीजो : बापुडी केवढा वेळु उभी असैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " ढोरें राखा हो नाएका : मडकेयासाटीं हें[६] आपणेयां दाखवील ? जा पाठवा : " मग गेलीं : "जाए : स्वामी जगंनाथु दरीसन नेदीति : " मग तीयें गेलीं : " जी जी : स्वामी जगंनाथा : गेलीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : कवाडें घाला : " मग कवाडें घातलीं : मग गोसावीं बाहीरि बीजें केलें : मग मादणें[७] जालें : वस्त्रें वेढिलीं : मग भीतरि बीजें केलें : ।।

---

**३९२. *(प्रव. आमा.** २३७).

१ चक्रपाणी पाठ°. २ यापुढील भाग **ना.** प्रतीतील 'स्नानसंग्रहो कथन' या अज्ञात चरित्रातून घेतला आहे.

**३९३.** १ **(मु.)**. २ **यगो.** माजणें. **मु.** मार्जनें. ३ **एवा.** हां गे. ४ **य.** °उपरवाया पाहे : **मु.** °उपरवाहीयां पाहे. ५ **यमु.** ते बाइ उपरवाइं **(मु.** उभी) ठाकौनि पाहों लागली : ६ **एवा.** °हें आपुलें दरीसन देइल. ७ **गो.** माजणें.

## ३९४ लखूबाइवस्त्रपुजास्वीकारु

गोसावीयांसि सप्तमात्रीं अवस्थान[१] : लखूबाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मीं गोसावीयांलागौनि वस्त्र घेइन : तें गोसावीं पांगुरावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें पांचां आसुंचें वांचौनि वस्त्र पांगुरे ना :" "जी जी : पांच आसु नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां यासि आणि तुम्हांसि अर्धेनि सिष्टाइ :" "हो कां जी :" मग लखूबाइसीं सेताची पाटी एकाइसां दों आसु गाहान ठेविली[२] : अर्धी आसु नपुरे : मग चौलेया[३]साटीं[४] आउसांची[५] वाटी वीकीली : मग अढैचां आसुचें गोसावीयांलागौनि वस्त्र घेतलें : आउसीं गोसावीयांतें उपहारालागि वीनवीलें होतें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें वस्त्र ओळगवीलें : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एकांची[६] गेली वाटी : एकांची[६] गेली पाटी : मग हें वस्त्र पांगुरलें[७] :" ।।

## ३९५ वासनाएका पुरुषोत्तम क्षेत्र निषेध*

[गोसावीयांसि[१] ढोरेश्वरीं अवस्थान : वासनाएक ते व्यवहारे : कांहीं घुइनायकासि गोत्रज होती : ते गोसावीयांचेया दर्शना आले : तया स्तीति जाली : मग ते गोसावीयांपासि येति : कदाचित जाती : एक वेळ वासनायकीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : आमुचे वडील बंधु दैवनायक : तयासि पुरुषोत्तमाची भक्ति : म्हणौनि पुरुषोत्तमक्षेत्रासि तीं वरुसां जाती : वडिया जगन्नाथासि जाति : तीं तीं वरुसां जाति असति : आमुतें चाला म्हणति : आम्हीं वावो नाहीं : आणि कव्हणी ऐसें बोलती : 'जेणें पुरुषोत्तमक्षेत्र देखीलें तेणें एचि देहीं वैकुंठ देखीलें :' तरि तेथ आम्हांसि जावों ए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरुषोत्तमक्षेत्रा न वचावें : पुरुषोत्तमक्षेत्रीं देवतेचां परियेळीं वर्णावर्ण एक करिती : याचि परी त्रीमलेसिही होए : आणि विद्यावंतीं पुरुषीं जीएं क्षेत्रें अधिष्ठिजेति तीएं पुरुषोत्तमक्षेत्रें म्हणिजेति : तेथहीं तुम्हीं न वचावें : तीर्थ : देवता : पुरुष : ये तीन्हीं आपलविती : म्हणौनि :" ऐसें गोसावीं निरोपिलें : मग वासनाएक श्रीचरणां लागले :।। ]

---

**३९४.** १ **यमु.** °एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : लखुबाइसें : एकाइसें : आउसें : पासि बैसलीं असति : मग एकमेकां गोष्टी करीतें असति : गोसावीयांचीं वस्त्रें फाटलीं : तरि गोसावीयांसि वस्त्रें घेयावीं—. २ **मु.** °अर्ध आसुचीये पुरवणी आउसाची वाटी वीकीली : ३ **य.** °सोनेयां° **ने.** चौली एक सोनया.° ४ **अ.** पाटी. ५ **एवा.** आसुची. ६ **यमु.** एकीची. ७ (**प्रव. वि.** १८०). मग एकाइसीं म्हणीतलें : "जी जी : हा आत्मा गोसावीयांसिचि वाइजताए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ: कर्मवासनेपासि ब्रह्मवासना उत्तमु :"।।

**३९५.** *(**प्रव. आमा.** १३४).
१ **हीराइ पाठ°.**

## ३९६ सारंगपंडीता कवीत्व नीराकरणें*

[ एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : सारंगपंडीत गोसावीयांचेया दर्शना आले : तेहीं कवीत्व केलें : तें गोसावीयांपासि गाइलें : तयाचा अभंगु : तेथ ऐसें घातलें होतें : जें ' चांगदेवो मुनि म्हणे : ' ऐसें आइकौनि गोसावीयां न मनेचि : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : मुनि म्हणिजे काइ गा ?" " मननसीळ तो मुनि : " " तरि हें कवणातें चिंती आणि आठवी ? मनन स्मरण ऐसें कवण असे गा पांडेया ? ऐसें न गाइजे कीं : देवो गीतीं गावों नेणिजे कीं : " ।।

यावरि आउसीं म्हणीतलें : " हें यासि काइ जालें ? गोसावी काइ रावो ? मां कवीत्व केलें ? मां यासि काइ देति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें यासि ऐसें वाटत असे : पुनु हे आगाधाचें आगाध कीं नाएका : एयातें कव्हणीचि नेणे : हें पाहुनि काइ असे ?"।। ]

## ३९७ कळीयुगीं तस्करत्व पुश्चळत्व निरूपण*

[ ढोरश्वरीं[1] अवस्थान : एक वेळ दायंबाएं वैश्यागमन केलें : मग क्षेउर केलें : प्राश्चित घेउनि गोसावीयांचां दर्शना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : कळियुगीं तस्करत्व : पुश्चळत्व हा धर्मु स्वरूपीं न वर्ते ऐसा विरळा : " यावरि भटीं पुसिलें : " जी जी : जेतुके मनुष्य असे तेतुकेयासि के असे तस्करत्व : पुश्चळत्व ? हे कदाचीत वर्ते : कदाचीत न वर्ते : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " एक आपण उपयोगा न वचे : आणिकांतें पुढां सूनि विखो भोगी : " ।। ]

## ३९८ पळे तो परतों लाहे*

[ गोसावीयांसि[1] ढोरेश्वरीं अवस्थान : एक वेळ भटीं पुसिलें : " जी जी : गोसावीं नीरूपीलें : जें ' त्रसला सातां जीवु देशाचेया सेवटा जाउनि सर्वाधमत्व ब्राह्मणत्व

---

**३९६.** *ही लीळा फक्त **मु.** प्रतीत व **नागराज** प्रतीतील अज्ञात लीळात आढळते. इतर प्रतींत ती नाही. मुरारीमल्लबासांनी ती ' रूढि ' म्हणून स्वीकारली असल्यामुळे मी ती संहितेत अंतर्भूत केली आहे. **आमा.** १३८ या वचनाच्या प्रकरणवशापेक्षा ही लीळा अधिक समर्पक वाटते. हेही ती अंतर्भूत करण्याचे एक कारण होय. ' प्रकरणवशा 'तील लीळा पुढीलप्रमाणे :

सारंगपंडितीं पुसिलें : " जी जी : हे वेदवक्ते ब्राह्मण सामकमंत्रातें गीता ऐसें म्हणति : बावन उपनिषधातें भगवतद्‌गीत ऐसें म्हणति : हें साच जी ? " गोसावी मानीलें : मग मागुतीं सारंगपंडीतीं पुसिलें : " जी जी : हे अवघे वेदवक्ते म्हणति : जें सामकगीता देवो गावों जाणीजे : तैसें अन्यत्र न वर्ते : हें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " देवो गीति गावों नेणिजे गा पांडेया : देवों तो भगवद्‌गीता गावों जाणिजे : " " हो कां जीं : " ।।

**३९७.** *(**प्रव. आमा.** २२०).

१ मेयांबा°.

**३९८.** *(**प्रव. आमा.** २२८).

१ बाइदेवबा°.

स्वीकरी : ' ऐसा त्रसला भेणें पळे तो मागुता परतों लाहे ऐसें कांहीं आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " आति गा वानरेया : पळे तो परतों लाहे : जैसा एकाधा सौरा पारकेयाचा थोर उमाळा देखौनि पळों लागे : मां पळावेयाहीं ठाव नाहीं : मग म्हणे : 'आतां समरंगणीं पडिजे तें नीकें :' म्हणौनि परते : आणि तो जीणे : तैसाचि यथचा जो त्रसें पळे तोचि जरि वीचाराचा हात धरी तरि मागुता परते ऐसेंहीं आति :" " हो कां जी :" ।। ]

## ३९९ नागवेयां नसावें*

[ ढोरेश्वरीं[१] अवस्थान : एक वेळ पाठकीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : महात्मेनि दीगांबरताही असे : ऐसें काही आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " पाठको : महात्मेनि कौपीनोद्धारण करावें : कौपीन न साहे तरि हात दोनि सुडा वेढीजे : परि नागवेयां नसावें :" ।। ]

## ४०० सारंगपंडितासीं कवडां खेळु*

[ ढोरेश्वरीं[१] अवस्थान : एक वेळ गोसावी सारंगपंडितासीं कवडां खेळत होते : तवं भट आले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं येथ वोथंबे होउनि पाहा गा : जयाचा डावो जाइल तो सांगुनि देया गा : " तवं भटीं म्हणीतलें : " जी जी : जेहीं खेळीजे तयासि काइ तें न दिसे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "ते आवेशें न देखति : वोथंबा डावो देखे[२] :" ।। ]

---

**३९९.** *(**प्रव. आमा.** २२९).

१ **हीरांबा**°.

**४००.** *(**प्रव. आमा.** २२७).

१ बाइदेवोबा°. २ पैठण येथे सारंगपंडितांच्या घरी किंवा अन्यत्र घडलेल्या काही लीळा मला **नागराज** प्रतीच्या 'अज्ञात चरित्रा'त आढळल्या. मुरारीमल्लबासांच्या शोधनीत त्या नाहीत. संहितेत अंतर्भूत करण्याइतपत त्यांची विश्वासार्हता तपासून पाहण्यास अन्य साधन नाही. म्हणून त्यांचा अंतर्भाव संहितेत केला नाही. अभ्यासकांच्या विचारासाठी त्या अज्ञात लीळा येथे तळटीपांत उद्धृत करीत आहे :

(१) **घाटीं खवासा वेधु** : ।। सोमवारीए ढोरेश्वरीं घाटीं म्हाळसेपसिमे वाटेसीचि आसन असे : पव्हा बहुत : एकु तया पव्हेयांतु खवासु असे : तो आवघेयांतें वेगु करी : "आरे : चाला वहिले : वेगु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा पैलु खवासु एथुनि वेधिजतु असे : पां पां :" साउमा आला : आणि वेधला : नावेक स्तीति जाली : मग मागौतें तेंचि म्हणतु नीगाला : **एवा.** ते दीसीं तेथचि निरूपण जालें : ।। (**ना.** ४६)

(२) **ललिताइसांसीं खुबटां खेळु** ।। भुतानंद स्नाना जाति : एतां गोसावीयांसि दंडवता एति : तयांसरिसीं ललिताइसें एति : तियें तयांची नाति : तिहीं खुबटें वोंटिये आणिले : ते गोसावीयांपुढें रीचविले : खेळों आदरिलें : हारी मांडिलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा :" तियें हातें तोंडें बोलावीति :

पर न चलति : गोसावी श्रीकरें अनुकार करीति : आणि चालति : आणि ते आपण घेति : एर न चलेति ते गोसावीयांसि देति : माघौतें गोसावीयांचे चालति : तयांचे न चलति : ऐसा दोनिच्यारि वेळ खेळु जाला : खातां : म्हाळसेचां देउळीं : ।। (**ना.** ४७)

(३) **खडखांबुलां खेळु** ।। गोसावीयांसि ढोरेश्वरीचां चौकीं आसन असे : भुतानंदाची नाति तयासरिसीं आलीं : तिहीं म्हणीतलें : "एइजो जी : खडखांबुलां खेळों :" मग खेळतां म्हणति : "असो : मजचिवरि डाही एतिए : गोसावी आपणेयां सीवों नेदीति : मजचिवरि डाही एतिये[१] :" **गोपाळबा वासना** : खडखांबुलां खेळु जाला : नावेक चाळविली : तवं भुतानंदु बाइसांचा व्यापारू करूं लागलीं : तियें आलीं : "ललिताइ : चाल वो : गोसावीयां उपद्रो देतीसि :" मग नीगालीं : ।। (**ना.** ४८)

(४) **साधां स्नाना पाठवणें** ।। ढोरेश्वरीं असतां साधें पाहातां आलीं : वोंटिये तीळ तांदुळ : पानें पोफळें ऐसीं आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : गोसावीयांपुढां बैसलीं : आणि निरूपणा वेधलीं : तवं लोकु देवतादर्शना आला : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधे हो : हें वोंटिये काइ ?" "जी जी : हे पुजा : आणि वीडा : आजि सोमवारी थोडीचि : पर्वणी वेळ होती ते जाली : पर्वणी जाली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधे हो : तुम्हीं एथचें नीरूपण आइकिलें : तेणें महंत गोमटें जालें : आतां स्नान करा : जा :" "जी जी : पर्वणी गेली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीर्थिचें अभिमानियें असे नव्हे ? जा :" गेलीं : स्नान केलें : एतां विचारिलें : "तीर्थदेवता कोणें देखिलीया असति : आतां सकळै तें गोसावीचि :" म्हणौनि पुजा श्रीचरणासि केली : वीडा दीपवति ठेविली : तिए दीउनि साधां बुधि ईश्वरत्वें आली : प्रतीति वर्तली : आवघा पुजावसरू पाहिला : मग गेलीं : ।। (**ना.** ५७)

(५) **रांजणवटिकेचें वोखद कथन** ।। सारंगपंडिताचां घरीं पटिसाळेवरि गोसावीयांसि आसन असे : पुजावसरू जाला : भक्तिजनासहित आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : तवं पाणिवैएवरि वोखद होतें : तें देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें धातुर्वादा उपयोगा जाए गा :" सारंगपंडितीं म्हणीतलें : "कें असे धातुर्वादु ? हें लटिकें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "घरिचा वैद्यू : आणि परिसीची वोखदी : ए कोण्हाचेया मना नैएति कीं गा पांडेया :" ।। (**ना.** ६२)

(६) **मार्त्तंडा स्त्रीसौच्यदर्शन** ।। मार्तंड नागदेउळियां नागडोहीं सौच्य करीत होते : तवं सरले : तवं साटोप नग्न स्त्री सौच्य करितां देखति : पुढपुढां जेउतजेउते बैसति तेउततेउती बैसे : जेउतजेउते सरति तेउततेउती ये : आपणेयांतें दाखवी : ऐसें वाडवेळु सौच्य करूं नेदीचि : मग तेहीं ढोरेश्वरा एउनि गोसावीयांपुढां सांघितलें : "हें ऐसें काइ जी ?" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मार्तंडा : ते तिये तीर्थिची देवता गा : ते तुमसीं खेळु करीत होती : ऐसें न कीजे कीं गा : एथचे म्हणौनि चुकलेति : आणीक तरि सळौनि पडतें : ते तयातें सळिती :" ।। (**ना.** ६५)

(७) **सारंगपंडितांसीं कवडां खेळु** ।। गोसावीं कवडे देखिले : मग म्हणीतलें : "पांडेया : तुम्हीं खेळों जाणा गा ?" "जी जी :" पां म्हणौनि आणविले : मग कवडां खेळु खेळिनले : तें सारंगपंडितीं बहुत हारविलें : ते म्हणति : "गोसावी काइ मातें मागति :" मग गोसावीं नीगतां म्हणीतलें : "दया : मग जा : हें देवस्व : ब्रह्मस्व : चंडिस : हें राखों न ए : हें फेडिजे कीं गा : पांडेया :" ।। (**ना.** ९४)

(८) **सारीं खेळु** ।। सारीही खेळतां एकही फळें न जींकतीचि : संतोखले : मग सारंगपंडितीं म्हणीतलें : "हा धरुचरु वेगु आणिकां नाहीं जी :" ।। (**ना.** ९५)

(९) **सारंगपंडितां छर्दितान्न भोजन** ।। गोसावी ढोरेश्वरूनि बीजें करितातिः साद्रव कव्हणी एक वमिलें होतें : तें देखिलें : सवें सारंगपंडीत : गोसावी सारंगपंडितांची वास पाहिली : इतुकेनि तयां

## ४०१ सप्तमात्रीं कीतवेदिका : देवपुजिका वनिता प्रतारणें

सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "एथ सातां मात्रांचा[२] ओटा करा :" "जी जी आम्हीं करुं नेणों :" तवं सप्तमात्रीचीया गुरुवीणीं[३] म्हणीतलें : "जी जी : मीं करीन :" मग तीया इटा आणिलीया : पळ्हो[४] केला : मग तीया सातां मात्रांचा[२] वोटा केला[५] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : यांसि जेउं घाला :" "जाए वो : थाळा घेउनि ए :" मग ते थाळा घेउनि आली : मग तीसि अंन घातलें : गोसावीं काइसेया कारणें ओटा घालवीला तें नेणिजे : "मीयां काइ यांकारणें ओटा केला ?" म्हणौनि रुठों[६] लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : यातें वाहीरि घाला :" मग तीयें आउसीं दारवठेयावाहीरि घातलीं :।।

## ४०२ तीकवनाएकाउपहारीं आउ स्वइछा भोजन

तीकवनाएकें गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणि स्वीकरिली : गोसावीयांलागि उपाहारु सप्तमात्रांसि आणिला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : मग आउसीं म्हणीतलें[१] : "ए रे वा नाथो : आतां आपुलीया स्वइछा जेउं : बाइसें[२] एती : मां ऐसीं[३] काइ जेउं लाहुनि ?" सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "नाएका : तरि काइ तुम्हीं बाइसांतें जातांचि पाहीलें ?" मग आवघें अंन जेविलीं : गोसावीयांचीए व्याळीएलागौनि काहीं अंन न रखतीचि : मग गोसावीयांतें व्याळीयेलागौनि न म्हणति :

---

स्थीति जाली : आणि तेहीं तें आवघेंचि खादलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा पांडेया : तुम्हीं लोकीचे श्रेष्ट आणि संभावनीक : आणि ऐसें करितां ?" ऐसें म्हणीतलें : आणि स्थीति पातळ जाली :।। (ना. १०१)

(१०) **मोकानंद चारित्रानुवादु ।।** गोसावीयांसि सारंगपंडितीं उपाहारालागि विनविलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग मोकानंदाहातीं ताट पाठवीलें : एतां ताट कानवडें जालें : तो वडा पडिला : तो मोडला : मागौता पुसौनि साधिला : मग ताट बाइसां हातीं दीधलें : बाइसीं पाहिलें तवं वडा मोडला देखिला : "काइ पां : बाबाकारणें तवं मोडला वडा न पाठवीति :" मग गोसावीयांतें पुसिलें : "हां बाबा : वडा कां मोडला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें मोकानंदचरीत्र :" "बाबा : मोकानंदचरीत्र म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "यांसि आणितां वडा पडिला : तो मोडला : तो एहीं साधिला :" मग गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला :।। (ना. १६८)

**४०१.** १ **यमु.** °"साता भुमीचा एथ वोटा कीजैल : तेव्हळि हें एथ बैसैल. २ **हीबी.** थरांचा ३ **अपं.** गुरवीं. **यमु.** पुजारीया. ४ **यमुगोने.** पल्हो. **हीबी.** चीखलु. ५ **यमु.** °मग बैसतां सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसी सरा :" रूठली : तवं तीकवनाएकाचा उपाहारू आला : तेयातें बाहीरि घालवीलें : रागसैलीं : मग गोसावीयांसि पुजा जाली : आरोगण : गुरुळा : वीडा : मग गोसावीं तीसि फुलांची सरी दीधली : अन देववीलें :।। ६ **नेपं.** रडों. **हीबी.** रूसली.

**४०२.** १ **अ.** °हें आतां जाओ ना राहो : आता आपुलीया—. २ **एवा.** बाइसें असति तरि काइ आम्हीं जेवुं लाहातों. ३ **यमुगोनेहीबी.** *४ **यमु.** ° "तरि काइ नाएका : बाइसातें जातांचि सीरा

गोसावींचि म्हणीतलें : "नाएका : एथ व्याळी काइ ?" "जी जी : स्वामी जगंनाथा : अंन आवघें पाळलें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका[५] : तुम्ही जैसें केलें तैसें काइ बाइसां होववतें ?" मग गोसावीं तैसाचि पहुडु स्वीकरिला : ॥

## ४०३ आचरे तयाचा धर्म*

[गोसावीयांसि सप्तमात्रीं अवस्थान : तै नाथोबाएं आउसातें कव्हणा एका व्यापारालागि बोलावीलें : मां तीएं तमलीं : आणि म्हणीतलें : "मातेंचि व्यापारालागि बोलावितातिः चक्रस्वामीचां ठाइं आणीकें दासरूवें नसतीं ? जाए : हा न ए : भागला असे :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "नायका : रजस्तमें निरसौनि सत्वस्थितां धर्मी अधिकारू : राजसां तामसां धर्मीं अधिकारू नाहीं : म्हणौनि तुम्हीं सत्वस्थितां होउनि धर्मु आचरावा :" यावरि आउसीं म्हणीतलें : "तरि हे अवघे कां नाचरती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न म्हणिजे कीं नायका : आचरे तयाचा धर्मु : तुम्हीं तवं आचरा : एराचें तुम्हां काइ वाटलें असे ?" "हो कां जी : तरि आचरैन आणि काइ :" ॥]

## ४०४ माइतेया हरी उपाहारीं भटांबाइसां भेटि

माहादाइसें वाराणसीहुनि परमेश्वरपुरासि आलीं : बाइसें परमेश्वरपुरीं होतीं : तेथ बाइसांसीं भेटि जाली : बाइसांसि समाधान नसेचि : *माहादाइसीं*[१] श्रीप्रभूचां ठाइं उपहारु केला : अंन[२] जेउं बैसलीं : तवं तुप नाहीं : *माहादाइसीं म्हणीतलें*[३] *:* "बाइ : तांबवटीभरि तुप उसीनें देया कां :" *बाइसीं म्हणातलें*[१] *?* "हें काइ रुपै : उसीनें तें मासउपवासिनीसि कीं : बाबाचें तें माझें : तुझें नव्हे ?" *मग बाइसीं तुप दीधलें : ऐसा श्रीप्रभुचां ठाइं उपाहारु करुनि मग समस्तें नीगालीं*[१] *: गोसावीयांचेनि संनिधानेंवीण*[४] बाइसांचें देह तुटलें : तेणें चालवे ना : *मग भटीं*[५] खाटदांडी केली[६]: एकीकडे भट : एकीकडे[७] माहादाइसीं घेतली : पैठणासि भोगावतीएसि आलीं : आंग घामैलें होतें : वावासि खेव देतां अवघड : भोगावतीएसि आंघोळि करावेया राहीलीं : बाइसीं म्हणीतलें : "नागदेया : जाए पां : बाबा कोणें ठाइं राज्य करीत असति तें पाहा :" माइतेया हरीन गोसावीयांतें उपहारालागि वीनवीलें होतें : गोसावीं तेथ बीजें केलें[८] : गोसावीं वेळा दोनि पुसिलें : "बाइसें आझुइं कां नैएति ?" बाइसीं भोगावतीए आंघोळि केली : मग भटोवासांतें तेथ

---

होतींति म्हणा :" ५ **एवा.** "तुम्हां जैसें होववलें तैसें काइ बाइसां होववतें (**ने.** होववैल :)-"

**४०३.** *(**प्रव. आ.** ५१–५२).

**४०४.** १ (**यहीबी.**). २ **गोने.** आपण. **ही.** वाढूं बैसली तवं–. ३ (**हीबी.**). ४ (**यमु.**). ५ (**यमुहीबी.**). ६ **यमु.** °भट महदाइसें दांडी चालवीती : ७ **ने.** °महदाइसें : खाटदांडी घेतली : ८ **यमु.** °हरि माइतेनि गोसावीयांसि बरवी पुजा केली : पुजेउपरि आइकीलें : जें बाइसें आलीं

भेटि जाली : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा : तुम्हींचि : आलेति ?" "ना जी : बाइसें आणि माहादाइसें : उमाइसें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जा : एथचि बोलावा :" मग भट गेले : गोसावीयांसि पुजा होत होती : ते राहावीली : बाइसांतें बोलाउनि आणिलें : बाइसीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरपुरिचीयें कापडीयें तीयें एथ राहातु : वाराणसीचीयें कापडीयें तीयें वऱ्हारदेवासि जातु :" बाइसीं एउनि पुजा केली : गोसावीयांसि भाळप्रदेसीं पत्रवेली रेखिली : पुजाअवस्वरु जाला : धुपार्ति : मंगळार्ति : जाली : मग गोसावीयांसि ताट केलें : भक्तजनांसि ठाए केले : गोसावीं ताटावरि बीजें केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरपुरिचीं कापडीयें तीयें भीतरि एतु :" माहादाइसें आपुलां ठाइं खोंचलीं : गोसावी आरोगण करीत असति : बाइसां प्रसादु देति : पत्रसाक वाढीति : "बाइ : पाहा पां : हें तुम्हां कैंचें[९] ?" गोसावीयांसि आरोगण जाली : वीडा जाला : *तवं हरीनाएकें म्हणीतलें*[१०] *:* "जी जी : मज पत्रवेलि रेखों देयावी : मग गोसावीं बीजें करावें :" *सर्वज्ञें बाइसांतें म्हणीतलें*[१०] *:* "बाइ : तुम्हीं रवळमढा जा : तेथ हें एत असे[११] :" माहादाइसातें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं पींपळमढा जा :" *मग बाइसें गेलीं : वाटे माहादाइसांतें म्हणीतलें*[१०] *:* "रुपै : बाबा मसीं एणे वेळे उदास : मातें मढासि पाठवीलें :" "बाइ : तुमसीं कैसें उदास ? उदास ते आमसींचि कीं : जें *एतखेवीं*[१२] गोसावीं म्हणीतलें परमेश्वरपुरिचीं कापडीयें तीयें भीतरि यतु कां[१३] :" ।।

## ४०५ रवळमढीं सारंगपंडितां प्रस्नें बाइसां उदासपरीहारु

गोसावीं रवळमढासि बीजें केलें : रवळमढाचीया सोंडीया उंचा होतीया : गोसावीं बाइसांसि हातु देउनि उचलीलें : गोसावीं सारंगपंडितांतें म्हणीतलें : "पांडेया : जाणा पां गा : बाइसें ऐसीं कां रोडैलीं[१] ?" "जी जी[२] : पंथु नव्हे : वाटे मार्गीं झडुवारा : उस्ण : वेळेचें[३] अंनउदक नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें नव्हे कीं गा : बाइसें[४] एथिचेनि सन्निधानेंवीण रोडैलीं :" इतुलेनि बाइसांसि सुख जालें : यावरि बाइसांचें उदास परीहरलें : *बाइसें वस्त्र जुनें गोसावीयांचिये ठाउनि नेसौनि गेलीं होतीं : तेंचि वस्त्र मैळलें : फाटलें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं सांते जाल : तरि बाइसांलागौनि नीकें ऐसें वस्त्र घेयावें :" म्हणौनि उच वस्त्र घेवविलें : तिहीं उच वस्त्र घेतलें*[५] *:* ।।

---

(**य.** म्हणौनि हरीखु स्वीकरीला : उतकंठा स्वीकरीली :) ९ **गोनेपं.** रुचे. **यमु.** रुचैल. १० (**मु.**). ११ **ने.** हरिनाएकासि पत्रवेलि रेखावेयाचा मनोधर्म होता : तो राहिला होता : आणि बाइसां असतां करूं नये : तो बाइसींचि करावा : म्हणौनि पाठविली : १२ (**ही.**). १३ (**ही.**) °वारानसीचीं नैयेतु :"

**४०५.** १ **अने.** रोडिकी. **एवा.** कोमाइलीं. २ **यमु.** °वाटे चालतां भागश्रमु : तेणें :" ३ **हीबी.** वेळेवारीचें. ४ **अ.** इयें. **ने.** तीयें. **गो.** °तें. ५ (**अज्ञात. ना.** ६ **मु.** बाइसां वस्त्र घेववणें.).

## ४०६ व्हारदेवीं भटां प्रष्णें माहादाइसां उदास्यपरीहारु[१]

*मग एकु दीं गोसावीं सप्तमात्रां वीहरणा बीजें केलें : वीहरणाचां आंतीं महदाइसीं वीनवीलें : "जी जी : मज गोसावी कवणे ठाइं अवसरू देती ?" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं वाराहदेवा जा: हें मागिलाकडौनि एइल :" मग महदाइसें उमाइसें वाराहदेवा गेलीं तेथ सडासामार्जन केलें : रंगमाळीका भरलीया : मग गोसावीयांची वाट पाहात बैसली : ॥*

*तवं गोसावी सप्तमात्राहुनि नीगाले : मार्गी एता ब्रम्हचारीदेवाचीए गुंफे बीजे केलें : नावेक तेथ तेया अवसरू दीधला : तेथ गोसावीयांसि नावेक काळु लागला : इतुलेनि महदाइसें : उमाइसें दुख करूं लागली[२] : ॥*

गोसावी व्हारदेवाचेया देवाइला बीजें करिताति : तवं महदाइसें : उमाइसें पूढांचि आलीं होतीं : व्हारदेवीं दुख करिताति : तवं गोसावीं बीजें केलें : लवकरि महदाइसें उठिलीं : लवकरि जाडिचें आसन केलें : गोसावी आसनीं उपविष्ट जाले : मग श्रीचरणां लागलीं : वाराणसीहुनि कुपीया उदकें भरूनि आणिलीया होतीया : त्यां कुपीयांचीं तोंडें खालाटीलीं होतीं : तें फेडिलीं : मग गोसावीयांचे श्रीचरण क्षाळण केले : वाळू बूडि उरली ते काढिली : ते गोसावीयांचां श्रीमुगुटीं वोळगवीली : उदकें भरत : तवं बाइसीं घागरा वांधला : "काइ वो जालें यां रांडासि ? बाबाचां श्रीमुगटीं भरैले उदकाची वाळू वोळगवीली :" "जी जी : आवघा लोकू मध्यें वाटें कूपीया फोडीलीया : गंगेसि प्रागीं : वाराणसी : तेथौनि कव्हणी ठाइं प्रोढीलीया नाहीं :" ऐसी थोरी सांघीतली : मग गोसावीं भटाची वास पाहीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तीर्थ पाळलें ?" तवं उमाइसीं म्हणीतलें : "जी जी : एथौनि नीघालों : रामटेंकवरि रामू बोळवीतु आला : मग गेलों : प्रागाजवळि : मध्यें वाटे रूपैसि बाहीरती लागली : लोकू आवघा नीगौनि गेला : रूपैसि काळी बाहीरती प्रतली : मीयां म्हणितलें : 'तुज काळी बाहीरती प्रतली : लोकू निगौनि गेला : तुज मज एकी गोणीएचें संबळ : मीयां काइ करावें ?' म्हणौनि दुख करूं लागलीएं : तवं रूपैया म्हणीतलें : 'तुं उमै : दुख कां करितासि ?' तेव्हळि गोसावीयांतें स्मरीलें : 'आमचेयां गोसावीयांचें काइ बोलणें असत्य होतें ? ते ब्रह्मवाचा :' मातें म्हणीतलें : 'बाइ : वाराणसीहूनि या : मां तुम्हां एथौनि संन्यासू दीजैल :' ऐसा पूढारू गोसावीं दीधला : तुं दुख नको करूं :' ऐसें मातें संबोखिलें : जी जी : मग बाहीरती राहिली : मग वाराणसी गेलों : आंघोळी केलीया :" आवघें क्रीया अनुसंदान सांघितलें : *उमाइसीं म्हणीतलें : "जी जी : रुपैया मनकर्णिका देखीली : तैसेंचि आपणेयांतें उभेयां*

---

४०६. १ अय. प्रतीत या लीळेची केवळ आदि आहे. प्रस्तुत लीळा येथे गो. प्रतीतून घेतली आहे. २ (मु.).

*घातलें : उदकासारीखें उदक : पाखाणासारीखे पाखाण : गांवासारीखें गांव : झाडासारीखीं झाडें : माणुसासारीखीं माणुसें : धाए मोकलुनि रडों लागलीं : मग मीयां म्हणीतलें : ' हें काइ रुपै : उठीसि ना ? लोके माध्यानस्नानें केलीं : ' तेव्हळि उठीली : आंघोळी केली*[3] : कीं जी : दादोसां तीळांजूळि दीधली : ऐसेयां तीर्था : व्रता वरिपडी केलीएं : हें इतुकें दादोसीं केलें : तीर्थासारिखीं तीर्थें : उदकासारिखीं उदकें : देउळांसारिखीं देउळें : हें इतुकें दादोएं केलें : तीर्था : क्षेत्रा : व्रता : वरिपडीए केलीएं : म्हणौनि आधीं दादोसां तीळांजूळि दीधली : मग आवघेयां तीळांजूळि दीधली :" "मां दादोसां कां तीळांजूळि दीधली ?" "हो वो : हो वो : वीसरलीएं : हे दादोसि दुसरी तीळांजूळि : म्हणौनि दीधली : हें इतुकें दादोनि केलें : जी जी : म्हणौनि दुसरी तीळांजूळि दीधली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : म्हांतारी आतां आन होउनि आली असे गा :" "हो जी : द्वारके गेलीं : वाराणसी गेलीं : आतां मल्लिकार्जूना जाती :" "तैसें ना गा : माहात्मया तीळांजूळि दीधली : आतां म्हांतारीएचें कांहीं उरलें असे ? म्हांतारीएसि वीस्वेस्वरें ब्रम्हवीद्या उपदेसू केला :" ऐसें गोसावीं महदाइसातें पूरस्करिलें : उदास्य परिहरलें : "वाइ : तुमतें वर्जीलें कीं ? तुम्हींचि गेलींति तरि एथौनि काइ कीजैल ? एथिचें सन्यधान : दास्य तें मोचक : तीर्थें : क्षेत्रें : व्रतें : दानें : एं अमोचकें कीं : एथ तुम्हीं न वचावें कीं :" "हो कां जी :" मग श्रीचरणां लागलीया : महदाइसांची तीर्थाक्षेत्राव्रतादानादादोसावरूनि नीर्पौनि बूधि काढिली : मग महदाइसांसहीत गोसावीं ढोरेस्वरा बीजें केलें : आसन जालें : श्रीचरण प्रक्षाळिले : दुपाहारीचा साष्टांग पूजाअवस्वरू केला : ताट केलें : महदाइसां ठाओ केला : उमाइसांसि केला : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : महदाइसां उमाइसां पांती प्रसादु जाला : ।।

## ४०७ भटां[1] अरीसें प्रश्नु करणें

भटोवासासि अरीसेयांच। उपद्रो[2] : मग भटोवासीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मातें[3] अरीसे थोर उपद्रो करीताति[4] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरपुरुनि या : मग तुमचे अरीसे धाडीजती :" मग भटोवास परमेश्वरपुरासि गेले : तेथौनि आले : आणि अरीसे आपैसेयाचि गेले : मग गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : सांपें अरीसे मातें न वधीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें माहारोग न वधीति कीं गा[5] : *अनुसरलेयासि*

---

३ (पं.).

**४०७.** १ **हीबीगो.** भटीं. **ने.** भटोबासीं. २ **यमु.** एकु दी गोसावीं बाइसातें परमेश्वरपुरा पाठवीलें सरिसे भटोबासातें पाठवीलें : (**य.** गोसावी बोळवीत आले) नीगतां (**य.** खडकुलीए) भटीं वीनवीलें :- ३ **यमु.** मज दुर्नामियाचा उपद्रो असे. ४ **हीबी.** °ऐसे हीवरळीएसि वीनवीलें : ५ **हीबी.** हें चरीत

*कर्मसवा भोगु नाहीं : दैवसवा भोगु*[६] *:" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाणिचोरेयाचें एक द्वार धरिजे तवं आणिक वाहे : तें धरिजे तवं आणिक वाहे : तेंहीं धरिजे तवं आणिक वाहे : आवघीं धरिजति तवं वरिल वाहे : मुदल द्वार धरिलेयां आवघीं धरिलीं होतीं*[७] *:"* ।।

## ४०८ उग्रादैत्यीं सारंगपंडितां निरए नीरुपण

गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेया-नंतरें गोसावीं उग्रादैत्याचेया[१] देउळा बीजें केलें : उग्रादैत्याचां[१] चौकीं आसन जालें : जवळि सारंगपंडित बैसले असति : *ते देउळीं नीरयांची जाति लीहीली होती : ते दृष्टी अवळोकुनि मग*[२] सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया[३] : जीवासि हा ठाओवेन्हीं पावणें आति गा : जें जीउ *निरए पावे : आणि*[४] नीत्यनरकही पावे :" सारंगपंडीत आपुलां जीवीं म्हणों लागले : "हें काइ पां ? नर्क आणि नीत्य काइसेनीं[५] ? जी जी : ते कोणी क्रीएस्तव होति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वीस्वहननातव नीत्यनरक :" "जी जी : एकां जीवां वीस्वहनन कैसेनि ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "एका हननातव विस्वहनन घडे :" "जी जी : तें कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "तें वीश्रान्तचैतन्य गा : *विश्रांतचैतन्य जेथ असे तेथ हनन घडलेयां विश्वहनन होए*[६] *:"* मग ते आपुलां सास्त्रीं पाहों लागले : तवं कांहीं उमटे ना : मग म्हणीतलें : "जी जी : वीश्रांतचैतन्य तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें हें :" म्हणौनि जानु थापटिली : इतुलेनि ते उगेचि राहीले : *सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : तेया हननापरौतें हनन नाहीं : तेया भजनापरौतें भजन नाहीं : तेया भजनीं सद्रूपता नाहीं : तेया भजनीं असद्परूता नाहीं :" "हो कां जी*[७] *:"* ।।

## ४०९ तथा हृरळत्व नीरुपण

गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं उग्रादैत्याचेया[१] देउळा वीहरणां बीजें केलें : तेथ आसन असे : जवळे सारंगपंडित बैसले असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया[२] : हा जनु आवघा काळा-चीए दाढे पडीला असे गा :" "जी जी[३] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसे नव्हे कीं : आपण हृरळस्थानीं[४] होआवें :" "तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकाधा एकु तुपभातु जेवीतु

---

पूर्वार्धीचें. ६ (**प्रव. आ.** १९१). **पं.** प्रतीतील लीळेतच हे वाक्य या ठिकाणी आहे. ७ (**दृपा.** ७० पाणिचोरेयाचा दृष्टांत "हा दृष्टांत गोसावीं भटाप्रति पैठणीं आरूसयाउपरि नीरोपीला"—**दृस्थ**).

**४०८.** १ **गोमुपं.** उग्रादीत्या°. २ **(पं.)**. ३ **मु.** (**शोध.** "पांडेया : नीत्यनरक जीवांसि पावणें आति गा :"). ४ (**प्रव. विमा.** १२२–१२४). ५ **गोनेयमु.** कैसे.

**४०९.** १ **गोमु.** उग्रादीत्या°. २ **यमु.** °हें आवघे विश्व....पडिलें असे गा :" ३ **यमु.** (**गोपाळबावासना** : "काइ जी : एकलेंचि विश्व पडिलें असे ?). ४ **यमु.** हृरळां.

असे : घांसु घे : चावी : तवं दाढे हरळु आडळे : मग हातीं धरुनि बाहीरि टाकी : नां चावी तरि दाढ पाडी :" परि[५] ते उगेचि राहीले : ।।

## ४१० नागनाथीं उपाधीयांचीया उततीया स्वीकारु

गोसावीयांसि नागनाथीं अवस्थान असे : उपाध्ये कांहीं द्रव्य जोडुनि घेउनि आले : गोसावीयांसि दरीसन जालें : गोसावीयांसि एकु दीसीं उदेयांचा पुजाअवस्वरु जालेया-नंतरें गोसावीयांतें उपहारालागि वीनवीलें : गोसावीयांचां ठाइं एकु उपहारु केला : एरी दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांतें पुसौनि गांवां नीगाले : पैल ठाओवरि गेले : मग आठवलें : " हे दोनि दाम उरले : गोसावीयांचेया उपहाराआंतुल[१] : हा गांवां काइसेया नेओं? याचीया गोसावीयांलागि उततीया घेओं :" मग हाटा गेले : मग तयाचीया उततीया घेतलीया : मग गोसावीयांचेया दरीसनां आले : गोसावीं देखिले आणि पुसिलें : "बटिका : कां गा मागुते आलेति? काइ कांहीं वीसरलेति?" "ना जी :" मग स्त्रीचरणां लागले : मग गोसावीयांसि उततीया दरीसनां केलीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : उततीया काइसेया?" "जी जी : मजपासी दोनि दाम उरले होते : तें मज पैऱ्हां आठवलें : हे गांवां काइसेया नेओं : यांचीया गोसावीयांलागि उततीया घेओं :" मग गोसावीं स्त्रीकरीं उततीया घेतलीया : *मग कानापासि वाजविलीं*[२] तवं वाजे ना : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " उततीया चोहरीया[३] : बरवीया घेओं जाणां :" गोसावीं प्रसादु केला : "बाइ : घेया : एथीचेया उपेगा नेया :" मग बाइसीं ठेवीलीया : मग उपाधीं पुसिलें : "जी जी : मीं गांवां जाइन :" गोसावीयांसि आरोगणेचें मान जालें असे : तवं बाइसीं म्हणीतलें : "बटिका : राहे : बाबाचीए पांती जेवि : मग जाए :" मग उपाधीं गोसावीयांचेया स्त्रीमुखाची वास पाहीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बटिका : बाइसें म्हणताति तें करा :" "हो कां जी :" मग बाइसीं गोसावीयांसि पुजाअवस्वरु केला : गोसावीयांसि आरोगण जाली : तयांसि पांती जेवण जालें : गोसावीयांसि गुळळा जाला : वीडा जाला : सर्वज्ञें म्हणीतलें : "एवढेया वेळां निगालेयां पावाल?" "हो जी : आम्हीं वीळचांचीया दों घडीयां निगालेयां पावौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पावाल कीरु : तुम्ही धीरु वीरु कीं गा :" ।।

## ४११ स्त्रीरुदनीं उदरवेथा कथन

गोसावीयांसि नागनाथीं अवस्थान : वीळचां वेळीं एकि बाइको[१] नागनाथाचेया देउळा आली : ते कुचीता[२] वासना आली : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांसि भीतरि

५ **मु.** परि तया कांहीं उमटेचि ना.

**४१०.** १ °**एवा** : सरु दामु उरला. २ (**गोयमु.**). ३ °**एवा. चोखरीया** :

**४११.** १ **गोनेहीबी.** बाइल. २ **हीबी.** कुडीया.

रीगों नेदा :" मग बाइसें तीसि भीतरि रीगों नेदीतीचि : मग तीयें रात्रीं बाहीरि रडों लागलीं : मग बाइसीं पुसिलें : "बाबा : हे बाइल कां रडतीये ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यांचें पोट दुखत असे :" मग गोसावीं बाहीरि बीजें न करितीचि : ।।

## ४१२ भक्ता निंबु पींपळु दाखवणें

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं वीहरणासि बीजें केलें[१] : मग पींपळेस्वराउतरे गंगेचीए थडीए पींपळु : तेयाखालि गोसावी उभे राहीले : जवळे आवघे भक्तजन असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हा पींपळु कीं निंबु ?" "जी जी : हा पींपळु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हा पींपळु ?" "ना जी : हा निंबु :" "हां गा : हा नीबु ?" "ना जी : हा पींपळु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तरि एथ अनृत्य कां बोलता[२] ? पींपळु तो पींपळु :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "तर्कु अप्रतिष्ठु : तर्कें अर्थ वितर्कें : परि यथार्थु न भंगे*[३] :" मग गोसावीं ढोरेस्वरा बीजें केलें : ।।

## ४१३ सारंगपंडितां तांबोळ गर्वहरण

गोसावीयांसि सप्तमात्रां अवस्थान : सारंगपंडीत गोसावीयांलागौनि बरवीं पानें पोफळें घेउनि आले : गोसावीयांसि वीडयापाठीं वीडा देओं लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : तुम्हीं यातें[१] तांबोळ पुरवाल गा ?" "जी जी : काइ पुरवावें असे ?" "जा : आणा :" मग हाटा गेले : एकी आसुचीं पानें पोफळें घेउनि आले : मग गोसावीयांसि वीडीया[२] देओं लागले : मग गोसावी सेवटीली वीडीयें तांबोळ प्रतेजीति : *ऐसीं तेयाचीं पानें सरलीं*[३] : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा पांडेया : देया ना ?" "जी जी : पानें सरलीं :" ।।

## ४१४ तथा तांबोळा आंकुरु निगणें

एकु दीसीं गोसावीयांसि आस्वीनदेवाचीए देउळीएसि आसन असे[१] : सारंगपंडीतीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : चौरंगीची वीद्या कवणी ठाइं आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहीजे : पुसिजे : चर्चिजे[२] :" मग गोसावीं श्रीमुखिचें तांबोळ उंबरवटावरि[३] घातलें :

---

**४१२.** १ **मुगोने.** °मग वीहरण सारूनि मढासि बीजें करिताति : मग पींपळेस्वरा उतरे—. २ °**एवा.** ।। तरि कां गा अन्योअन्य बोलता. ३ (**प्रव. वि.** १६७).

**४१३.** १ **गोनेमु.** एथ. २ **गो.** वीडा. **ने.** वीडे. ३ (**गोनेहीबी.**).

**४१४.** १ **यमु.** एकु दीं सप्तमात्रांचां चौकीं गोसावीयांसि आसन असे : सारंगपंडीताचीया घरा दोघ पाहुणे आले : ते पांडेयासरीसे दर्सना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणांपासि बैसले : मग ते मागीलां पुरुषांचीया सामर्थ्याचीया गोष्टी करूं लागले : आतां कोण्ही तैसे नसति :— २ **यमु.** (**शोध** : °मग जेथ आति तेथ आति :) ३ **यमु.** (**रामेश्वरबास** : लींगाचीए पींडीएवरि.).

उदेयां सारंगपंडित गोसावीयांचेया दरीसना आले : माघौतें गोसावीयांसि तेथचि आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : तें तांबोळ पाहा पां :" सारंगपंडितीं पाहीलें : तवं आवघेया तांबोळा आंकुर निगाले असति[४] : मग सारंगपंडितां विस्मो जाला : "जी जी : आवघेया तांबोळा आंकुर निगाले असति जी : गोसावीयांचां ठाइं सकळ वीद्या असति :" ।।

## ४१५ उमाइ कोळीग्रही भेडवणें

गोसावीयांचें सेवादास्य महदाइसें करीति : तें उमाइसें देखति : मग एकु दीं उमाइसीं[१] म्हणीतलें : " रुपै : तुं कां जैसी गोसावीयांची जालीसि तैसीचि मीहीं आतां होइन : मग गोसावीयांतें नसंडीत असैन : " तें गोसावीं आइकीलें : " बाइ : मासउपवासीयें काइ म्हणताति ? " " जी जी : ऐसें म्हणतीये : ' रुपै : तुं कां जैसी गोसावीयांची जालीसि तैसीचि मीहीं होइन : मग गोसावीयांतें नसंडीत असैन : ' " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथिची होआल तरि एथौनि म्हणिजैल तें करावें लागैल : " " जी जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि ऐसें म्हणिजैल[२] : 'तुम्हीं कोळीयाची घरवात करावी : तयाचीं सात लेकरुवें वीयावीं : *अभक्ष भक्षावें : अपेय पीयावें : ' " " ना जी : हें मज न व्हावें जी[३] :* " आणि उगींचि राहीलीं : *सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरा जीवा एथौनि म्हणितलें तें न होअवें : मग मरणा शरण जाए[४] : "* ।।

## ४१६ अन्यनमस्कारें भीतें माहदाइसें देवांचीए भेटि धाडणें

सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : जा माहात्मा तुमची वाट पाहातु असे : *भेटों[१] जा[२]* : " माहादाइसीं म्हणीतलें : " आतां काइ जाइन जी ? आतां आम्हांसि तयासि भेटवे ना आणि तयांसि नमस्कारु करवे ना : " सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां तुम्हां नमस्कारु करुं नैए : आणि तुमचा नमस्कारु तयां घेउं नैए : परि एथिचा संबंधीया : म्हणौनि करावा[३] : " ।।

---

४ **हीबी.** °नागवेलीचा देटू : खैराचें झाड : पोफळीचें झाड : चुनयाचा खडा : ऐसें वेगळाले देखीले : मग—.

**४१५.** १ **यमु.** °गोसावीयातें म्हणीतलें : " जी जी : रूपै गोसावीयांची जाली तैसीचि . . . . असैन : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मासोपवासीये हो : देवाचेयां होणें अवघड असे : म्हणितलें करावें लागैल : " २ **एवा.** म्हणीजताए. **यमु.** °सात लेंकरुवें होतीं तवं कोळीयाचीए घरवातें असावें : " ३ **(पं. प्रब. आ.** २२२).

**४१६.** १ **मु.** भेटी. **गो.** भेटा. २ **(ने.).** ३ °**परशरामबास** : " आतां तुमचा तयांसि नमस्कारु घेउं नैए : परि प्राणियां जळैल : म्हणौनि वंदन मात्र करा **(एवा.** कीजे ").

## ४१७ महदाइसां उमाइसां भेटी

गोसावीं सप्तमालौनि बीजें केलें : माहादाइसें : आणि उमाइसें दादोसातें भेटावेया चौदोलांचेया[1] जळगांवां[2] आधिलां दीं गेलीं : दादोसातें भेटलीं : च्यान्ही पाहारु भांडतां गेले[3] : उदेयांचि निगालीं : दादोस राहाउं रीगाले : " रुपाबाइ : राहा : तुम्हीं भागलीं आलीति : तरि एथ पायां पाएवणी मीळैल : " " ना दादो : मज कार्य असे : मीं जाइन : " तैसींचि उदेयांसीचि प्रतीस्थानासि आलीं : वीजनें पाहातपाहात गेलीं : गंगेचीया थडीया एताति : सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : सागळ भरा जा : " भटीं सागळ घेतली : तवं सागळे उदक असे : " काइ पां : सागळे तरि उदक असे : तरि कांहीं गोसावीयांसि हेतु असे : " *भट गंगे गेले : तवं महदाइसें*[4] थडीएथडीए एताति : *तवं महदाइसातें देखीलें*[5] *:* भटीं म्हणीतलें : " रुपै रुपै : या : तुमतें गोसावीं बोलाउं पाठवीलें असे : " माहादाइसें आलीं : गोसावीयांजवळि आलीं : आणि गोसावीं भाळप्रदेसावरि स्रीकर ठेवीला : " हें काइ बाइ : दीस कैसे लाविले[6] ? " " जी जी : " गोसावी बैसलेयांचि क्षेमाळींगन दीधलें : माहादाइसें स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : मग दादोसांची भेटि आवघी गोसावीयांपुढां सांघीतली : *सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तें अनिष्ट कीं : अनिष्टसेवेतव पुरुषु घर्मापासौनि जाए*[7] *: "* ।।

## ४१८ तथा संन्यास निरूपण*

[ मग महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : सर्वज्ञें म्हणीतलें होतें : जें ' तेथौनि या : मग संन्यासु दीजैल : ' तरि मज संन्यासु दीजो जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : उराइतुकेया पाणियांतु रीगौनि उर्धबाहो होउनि मग फोकरिजे : ' संन्यस्तोऽहम् : संन्यस्तोऽहम् : ' परि रागादिक न त्यजे : बाइ : तो काए संन्यासु ? तो संन्यासु नव्हे बाइ : राग : द्वेष : काम : क्रोध : मद : मत्सर : यांचा त्यागु : याचि नावें संन्यासु कीं बाइ : कार्याचा न्यास कीजे : कारणाचा नाहीं : " महदाइसीं म्हणीतलें : "कारणाचा कां नाहीं जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "ये दसे कार्यसंन्यासु आति : कारणसंन्यासु नाहीं : " " हो कां जी : तरि मज वेष देयावा जी : " मग गोसावीं महदाइसासि महात्मेयाचा वेषु दीधला : मग श्रीचरणां लागलीं : ।।]

---

**४१७.** १ **गोने.** चौधोलाचेया. २ **मुगो.** जवळगांवा. ३ **यमु.** °येरी दीसीं महदाइसीं पुसीलें : "दादो : मी गावां जाइन : " " हें काइ रूपै : कालीचि आलीति : आजि गावां कैसी जाल ? भेटि नाहीं : गोष्टि नाहीं : " " ना दादो : मीं जाइन : " नन्हातीचि : उमाइसें म्हणति : " रूपै : आजिचा दीस (**य.** देओ) राहे : " महदाइसीं म्हणीतलें : " तरि तूं राहे : " महदाइसें नीगाली : उमाइसें नावेक राहिली : महदाइसें प्रतीस्थाना आली—. ४ (**गोने.**). ५ (**ही.**). **यमु.** भेटि जाली : महदाइसीं पुसीलें : " नागदेया : गोसावी कवणी ठाइं असति ? " " ना चौबारां : चाला : तुमतें गोसावीं—. ६ **यमु.** °हें नीडळावरि हात ठेउनि वाट पाहात असे : " ७ (**पं. प्रव. आ.** १६३).
**४१८.** *(**प्रव.** आ. ५० व १७७. **ने.** उत्तरार्ध ४४१ लीळा पाहा.)

## ४१९ सोमवारीए रामदेवीं पुजा : उपाहारु

एकु दीं सोमवारी आली : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : मग रामदेवीं गोसावीयांसि उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मागिलाकडौनि सारंगपंडितीं वीनवीलें : गोसावीं तयांचीही विनती स्वीकरीली : मग रामदेवीं लवलौनि[1] गोसावीयांचि पुरता उपहारु निफजवीला : पुजाद्रव्यें आणिलीं : मग रामदेवीं बरवी गोसावीयांसि पुजा केली : मग गोसावीयांसि आरोगण दीधली : गुळुळा जाला : वीडा जाला : *पहुडु जाला : उपहुडु जाला*[2] : मग गोसावी आसनीं उपवीष्ट असति : तवं सारंगपंडीत गोसावीयांलागौनि ताट घेउनि आले : पुजाद्रव्यें चंदन : वीडा : घेउनि आलें : तवं गोसावीयांचां स्रीकंठीं गळदंडा : श्रीमुखीं तांबोळ : सारंगपंडितीं दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : उसीरु कां लावीला ? " " जी जी : बाइलीची खीतिखीति[3] काइसेनही सरे ना : " मग गोसावीयांसि चंदनाचा आडा केला : श्रीकंठीं गळदंडा घातला : वीडा जाला : मग तयां पाठवणी दीधली : ।।

## ४२० साधां स्नानां पाठवणें

गोसावीयांचेया दरीसनां साधें आलीं असति : माएधुवा आलीया असति : तीया गोसावीयांजवळि बैसलीया असति : गोसावीं साधांतें म्हणीतलें : " साधें हो[1] : लोणार-तीर्थीं एक स्नान करुं जा : " " हो कां जी : " साधीं लोणारतीर्थीं स्नान केलें : मग स्नान करुनि एताति तवं दुर्गाचां आधोपरीं[2] एकि रींगणीं फुलली होती : तीयें फुलें घेतलीं[3] : आलीं : मग गोसावीयांसि साष्टांगीं पुजा केली : स्रीचरणां लागलीं[4] : मग गोसावीं श्रीमुगुटावरील फुल स्रीकरीं घेतलें : मग अवळोकिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " हो कां : हें काइ साधें हो : देओ स्वर्णीं फुलीं[5] पुजीजताए मां : " " जी जी : " माएधुवा बैसलीया होतीया : मग लेंकीं गोसावीयांचीए स्रीकरिचीं फुलें[6] घेतलीं : " कें जालीं सोनेयाचीं ? यें तवं रींगणीएचीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : होतु कां रींगणीएची : परि भाओ अपुर्व कीं : " तवं बाइसीं म्हणीतलें : " काइ ओ जालें रांडेसि ? बाबाचे स्रीकरीचीं फुलें बोचुकुनि[7] घेतलीं : बाबाचां स्रीकरीं नखें रुपति ना ? " यावरि तयांचीया माता तयांचे दोख सांघों आदरिले : " जी जी : ऐसीचि जी हे : मीं वारीं तेंचि करी : वाटे

---

**४१९.** १ **गोनेबी.** लवकरूनि. **ही.** लवलवकरूनि. **यमु.** लवलवौनि. २ **(यमुगोनेही.).** ३ **य.** खीतपीत. **मुगो.** खीतिपीति. **ने.** खीटिखीटि.

**४२०.** १ **य.** न्हो. **यमु.** °आजि सोमवारी. २ **ने.** आढो° **पं.** आधपरां. ३ **यमु.** °माझारील पीवळे कळे नीवडीले : ४ **यमु.** °उरलीं फुलें तीयें श्रीमुगुटीं वाइलीं. ५ **एवा.** पुष्पीं. ६ **यमु.** °ऐसीं आसुडुनि. ७ **एवा.** वोरपौनि.

जातां भलेतेयातें खडेयानि हाणे : उपरवांइ[८] भलेंतेयातें पाहे :" ऐसे दोख सांघों आदरिले : *सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : प्राणियाचे दोष एथ न सांगिजेति : एन्हवीं एथौनि नेणिजे ऐसें काहीं असे ? तरि कां म्हणिजे ना करीति ना ? परि एथचीया दर्शनाही न एति : एथीचें दर्शन दुर्लभाचें दुर्लभ कीं : बाइ : हे जीव झाडिले पुसिले वाहति : त्रसले तरि जाति : म्हणौनि यांतें त्रसावें नाहीं :" "हो कां जी*[९] *:"* मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं माए कीं : मां माएचां ठाइं : आणि एथ : सकळ सामाए कीं : बाइ : स्त्रीये पांच गुरु : माता : पीता : सासु : सासुरा : भ्रतारु : यां पांचांचें म्हणीतलें केलेयां प्रेम[१०] गोमटें :" मग माएधुवां पाठवणी दीधली : ।।

## ४२१ साधां क्षीरिभोजन : टीळातांबोळमाळदान

मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : साधांसि जेउं वाढा :" "हो कां बाबा : एल्हो ए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचि आणा :" "हो कां बाबा :" मग आणिक वाढुं आदरिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पांडेयाचीए घरुनि ताट आलें असे तें आणां[१] :" मग बाइसीं ताट आणिलें : गोसावीं पालिमांडें आणवीलें : आपुलेनि स्रीकरें तांदुळांची खीरि घातली : मग दोहीं स्रीकरीं लींगाकृत केली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : तुम्हीं खोबा[२] करु जाणां ?" "ना जी : मीं नेणें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें पुर्वीं गोवळांआंतु होतें : हें खोबा[२] करुं जाणें :" मग गोसावीं स्रीकरिचेनि आंगुठेनि खोबा[२] केला : मग स्रीकरीं डो घेतला : तुप घातलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : घांसु घेया : तेवींचि एथची वास पाहा :" घांसु घेति : आणि तेवींचि गोसावीयांची वास पाहाति : एकाधा वेळु दुचीतीं होति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : घांसु घेया : तेवींचि एथची वास पाहा : मग हें तुम्हां कैचें ?" "हो कां जी :" मग खीरि जेविली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : वाढुं ?" "ना जी : धालीयें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आंगुळी पावति असे ?" आंगुळी घालुनि पाहाति : तवं न पवे : "ना जी : न पवे :" "तरि रिगैल : घेया :" मग गोसावीं दहींभातु वाढिला : तो जेविलीं : मागुतें गोसावीं पुसिलें : "साधें हो : वाढुं ?" "ना जी : धालीयें :" "आंगुळी पावताए ?" मग आंगुळि घालुनि पाहाति : "ना जी : आंगुळी तरि न पवे जी : परि आतां धालीएं जी :" मग आंचवलीं : मग गोसावीं आपुलेनि स्रीकरें फोडी दीधलीया : मग वीडीया दीधलीया सारंगपंडितांचां घरींहुनि चंदन आणिलें होतें : तयाचा आपुलेनि स्रीकरें टीळा लाविला : स्रीकंठिचा गळदंडा दीधला : गळां घातला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : उभीया हाटवटीया : हाटचोहटा[३] मीरवीतें मीरवीतें जा : कोण्हीं माळ मागैल तरि देओं

---

८ **मुनेहीगो.** °वाही. ९ (**प्रव. आ.** २५९) १० **यमु. गोने.** परम.

**४२१. १ यमु.** °मग हें साधांसि जेउ सुइलं. २ **य.** खुबा. **मुनेंही. खोंबा.** ३ **अ.** हाटें°.

नको : " "हो कां जी :" मग साधें दादोसांचीया बीढारा गेलीं : दादोसीं पुसिलें : " एल्हो : माळ कोणें दीधली ?" " ना गोसावीं दीधली :" देवीं म्हणीतलें : " मज देया कां : " " मीं तुज काइसेया देइंन :" " ऐसे गा अमचे गोसावी : जें रांडांबाइलांसि माळ[४] देताति :" मग दादोस गोसावीयांचेया वीळचांचेया पुजाअवस्वरा आले : मग साधें[५] गोसावीयांपुढां सांघति[६] म्हणौनि आपणचि सांघों लागले : "जी जी : गोसावीं एल्होसि माळ दीधली : ते मीं मागत होतां : 'एल्हो : तुज माळ कोणें दीधली ?' 'मज गोसावीं दीधली :' 'मज दे कां :' 'मीं काइसेया देइन :'" तवं साधीं म्हणीतलें : " जी जी : हा ऐसें म्हणे : जें 'ऐसे गा अमचे गोसावी : जें रांडाबाइलासि माळ देताति :'" मग सर्वज्ञें म्हणीतलें : " माहात्मे हो : जेयासि दीधली तो रांड[७] नव्हे कीं :" *सर्वज्ञें म्हणीतलें : " हे इसाळुवाचें इसाळु : कव्हणी एकु इसाळु असे : तो आपुलीए स्त्रीएचा इसाळु करी[८] : आपुलिया बापाभाउवाचीए मांडीएवारि लोळे : ते तयासि खंति ये : परि काहीं करूं नैए[९] : तैसेंचि जारि आणीकेंसीं करी तरि आधां दातीं सीस घे[१०] : "* ।।

## ४२२ साधां निबु माधुर्ये करणें ।। नीब मौळी मंडन प्रसाद दान

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीं पीठजैयेकडे वीहरणां बीजें केलें : तेथ गोसावीयांसि भावैएचां खेळां वेंठी ओळगवीली[१] : एक एक पान : महुरु : निंबोळीयां : ऐसी वेंठि गोसावीयांसि वोळगवीली : मग गोसावीं मढासि बीजें केलें : पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु होउनि उपहुडु जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : गोसावीयांचां श्रीमुगुटीं वेंठि असे : साधें आलीं : गोसावीयांचां स्रीचरणां लागलीं : मग गोसावीयांचेया स्रीमुगुटाकडे पाहों लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो : ऐसें काइ पाहीजताए ? " " जी जी : गोसावीयांचां स्रीमुगुटीं असे तें :" गोसावीं एक पान तोडिलें : आणि चाखावेया दीधलें : घेतलें आणि थुंकिलीं : " जी जी : कडु असे :" मग गोसावीं आणीक पान तोडिलें : अवळोकीलें : मग देओं आदरीलें : " जी जी : कडु असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " आतां घेया :" मग घेतलें : खादलें तवं गौल्य साकर ऐसें : " जी जी : गोड साकर ऐसें असे जी :" मग गोसावीं स्रीकरें वेंठि फेडिली : अवळोकुनि दीधली : मग साधें खाओं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " साधें हो :

---

४ **गो.** माळा देति. ५ (**अबी.**) साधीं. ६ **अबी.** सांघीतलें. ७ **एवा.** रांडवा. ८ **रावा.** °ते तयासि तोंड दे. (यापुढे, एका जुन्या पोथीत मला पुढील वाक्य लिहून खोडलेले आढळले. ते असे : 'तीएचे बापभाउ तीयेसि भेटावेया एति : ते तयासि क्षेव दे' हे वाक्य मुळात असावे. पण, दृष्टांताचा अन्वय लावताना, अनावश्यक म्हणून ते केसोबासांनीच गाळले असावे.). ९ **एवा.** °कां पां ? ना ते तयापासौनि जाली म्हणौनि. १० (**दृपा.** ८२. 'दुसरेया इसाळुवाचा' अथवा 'चाटरीएचा' दृष्टांत. 'रामदेवाप्रति पैठणीं निरूपिला' **दृस्थ.**).

**४२२.** १ **रावा.** °एक एक पान : एकी एकी मोगरेयाची कळी : एकि एकि निंबोळी. **यमु.** तीएसि एकएक पान : एक एक नीबोळी : मध्यें एकएक मोगरे : मध्यें मध्यें महुरु : मध्यें वानासीएचें

एकलींचि खातें असा ? यां कोण्हांइं देया ना ?:" "जी जी : गोड असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "गोड असे[२]: तरि काइ आपणचि खाइजे ?" मग तीहींचि ते वेंठि खादली ।।

## ४२३ बहुडी स्तीति ताडणीं देवां कोपणें

एकु दीं रामदेव आपुलेयां सीक्षांसहीत गोसावीयांचेया दरीसनां एत होते : गोसावीयांसि बोंडणवावीचेया ओटेयावरि आसन असे[१] : तेयातें एत देखिलें : आणि गोसावीं बहुडीयेतें खूणावीलें : आणि तयां स्तीति जाली : तेहीं हातीं काठी[२] घेतली : दारेसीं उभीं ठाकलीं : "रीगों नैए[३]: संभुचीया[४]" ऐसें *म्हणाति*[५]: काइसेनहीं रीगों *नेदिति*[६]: मग दादोसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : वहुडीयेंतें बारिजो जी : आम्हांसि एओं नेदी :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बहुडी : यांसि रीगों देया :" मग तयांची स्तीति भंगली : मग रीगों दीधलें : मग आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : ।।

## ४२४ देवकोपखेदखीन माहादाइसां यादव गुरु नीरुपणें

एकु दीं सारंगपंडितीं गोसावीयांसि उपहारालागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरीली : मग गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : मग सारंगपंडित गोसावीयांतें बोलवावेया आलें : गोसावीं भक्तजनांसहीत सारंगपंडितांचेया आवारा बीजें केलें : सरीसे दादोस असति : गोसावी रामनाथु पातलें : आणि गोसावीयांसि रामनाथाचां चौकीं[१] आसन जालें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : आइति जाली कीं नाहीं ऐसें पाहुनि या :" मग सारंगपंडित पाहावेया गेलें : गोसावीयांचे स्रीचरण रजा[२] भरले असति : आणि उन्हाळे दी : मग माहादाइसें भीतरि गेलीं : भीतरि गळती भरली होती : ते आणिली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "स्नेहाचां ठाइं उचीत स्फुरे : स्नेहाचां काजीं[३] जाणावें[४] :" मग गोसावीयांसि चरणक्षाळण जालें : माहादाइसीं चरणोदक घेतलें : दादोसातें न मनेचि : मग सारंगपंडित बोलवावेया आलें : मग गोसावीं तेथ बीजें केलें : गोसावीयांसि बरवा पुजाअवस्वरु जाला : बरवा उपहारु निफजवीला होता : तयाचीं तीहीं ताटें केलीं : मग गोसावीं

---

फुल : ऐसी वेंठि—. २ **एवा.** होए.

**४२३.** १ **मु.** बहुडी ते गणपति मठीची पुजारीणि : गोसावीयांजवळि **बैसली** असे : २ **यमु.** हातियेरू. ३ **अ. न.** ४ **यमु.** संभु संभु ऐसें म्हणति. ५ **(गोने.).** ६ **अगो.** नैए :

**४२४.** १ **रावा.** दारवठाचीए सोंडीएवरि. २ **गोनेहीबीपं.** रजें. **मु.** °धुसर जाले असति. ३ **गोहीबीय.** कांजी. ४ **गो.** जाणावा. **हीबीपं.** जाणवें.

ताटावरि बीजें केलें : आवघेयां भक्तजनां गोसावीयां सपरीवारीं आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : आवघेयां भक्तजनां तांबोळें दीधलीं[५] : मग गोसावीं मढा बीजें केंलें : एकि वाट गणपतिमढा जाए : एकि वाट पींपळमढा जाए : ते वाटवरि दादोस सरीसे आलें : तेथौनि पींपळमढा फाकलें : गोसावीं गणपतिमढासि बीजें केंलें : महदाइसें गोसावीयांसरीसीं आलीं : गोसावीयांसि पहुडु जाला : मग माहादाइसें पींपळमढा आलीं : तवं दादोस बैसले असति : "रुपोबाइ : तुम्हीं स्नान केंलें ?" "दादो : स्नान काइसें ?" "कैसें[६] स्नान काइसें ? मघां तुम्हीं गुरुवाचें पाणीं पीयालीति ?" "कै जालें गुरुवाचें पाणीं ? मीं[७] गोसावीयांचें चरणोदक पेयालीयें :" "हो कां चरणोदक : परि पाणीं गुरुवाचें कीं :" "मां[८] गुरुवाचें जरि पाणीं होए तरि तें कां गोसावी वारितीचि ना ?" "मां गोसावी ईश्वरू : गोसावी काइसेया वारिती ? गोसावीयांसि काइ वाटलें असें जें जीव स्वर्गा गेले तरि काइ : ना नर्का गेले तरि काइ ?" *तिहीं म्हणीतलें : "आपुलेयाचें[९] वाटे कीं[१०] :"* "मां आपुलेंयाचेंही न वटे : मां आपुलेंयाचें जरि वाटे : तरि सपन कोडि यादवां : साटि लक्ष निजकुमरां : एकमेकां खांडेवरि जुझजुझों मेले : तेव्हळि कां श्रीकृष्णचक्रवृति वारितीचि ना ?" इतुलेनि अडलीं : मग गोसावीयांपासि आलीं : गोसावी उपहुडलें असति : परि सयनासनींचि असति : माहादाइसें दारवंडेंसीं लागलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बाहीरि कवण ?" "बाबा एव्हडेया वेळा कवण एइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहा पां :" मग बाइसीं पाहीलें : तवं माहादाइसें देखिलीं : "बाबा : रुपै आली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीतरि बोलावा :" "रुपै : भीतरि या :" मग माहादाइसें आलीं : स्रीचरणां लागलीं : स्रीचरणांचेयाकडे ओटेयाखालि बैसलीं : मग म्हणीतलें : "जी जी : जीवाचें गोसावीयांसि कांहीं न वटे : जीव स्वर्गा गेले तरि काइ : ना नर्का गेले तरि काइ ? आणि[११] सतसंभवीं जीव नरकींचि घालीजती[१२] :" आणि गोसावीं खांकरुनि जानु थापटिली : आणि म्हणीतलें : "ऐसें कवण म्हणे बाइ ?" म्हणौनि आसनीं उपवीष्ट जाले : मग माहादाइसीं सांघीतलें : "जी जी : मीं दादोसांचीया बीढारा गेलीयें : तवं दादोस म्हणति : 'रुपोबाइ : स्नान केलें ?' *म्हणौनि तर्कु केला :"* *यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "तर्कु अप्रतिष्ठु : तर्कें अर्थु वितर्कें : परि यथार्थु न भंगे[१३] :"* "जी जी : मियां पुसिलें : 'दादो : स्नान काइसें ?' 'कैसें स्नान काइसें ? तुम्हीं गुरुवाचें पाणीं पीयालीति :'

---

५ **गोयपं.** जालीं. ६ **यमु.** "ना वीटाळलीति : मघां—. (**एवा.**) "रूपाबाइ : नरकां जा तेंचि करीतें असा : वोखटें करीतें असा :" "तें काइ दादो ?" "ना गुरुवाचें पाणीं—. ७ **यमु.** मीयां गोसावीयांचा प्रसादु घेतला :" "हो कां प्रसादु : परि पाणीं—. ८ **यमु.** °तें जरि अनुचीत होए तरि मातें कां—. ९ **हीबीपं.** °कैसें न वटे ? १० (**यमु.**). ११ **गोही.** °गोसावी सतसंभवीं (**ही.** जीवासि) नरकचि घडवीति. १२ **नेपं.** घालिति. १३ (**प्रव.वि. १६७**).

'मीं काइसेया गुरुवाचें पाणी पेइन ? मीं गोसावीयांचें चरणोदक पीयालीयें :'' हो कां चरणोदक : परि पाणीं गुरुवाचें कीं :' मीयां म्हणीतलें : 'पाणीं गुरुवाचें होए तरि कां गोसावी मातें वारितीचि ना ?' 'मां गोसावी ईश्वरु : गोसावीयांसि काइ वाटलें असे : जीव स्वर्गा गेले तरि काइ : ना नर्का गेले तरि काइ ?' 'मां आपुलेयाचेंहीं न वटे ?' 'मां आपुलेयाचें जरि वाटे : तरि कां सपन कोडि यादवां : साटि लक्ष निजकुमरां : प्रभासे एकमेकां खांडेवरि जुझजुझों मेले : तरि श्रीकृष्णु वारितीचि ना ?' मग मीं उगीचि राहीलीयें :'' मग सर्वज्ञें म्हणीतलें : "ते नर्का गेले ऐसें कवण म्हणे बाइ ? आणि ऐसांहीं श्रीकृष्णचक्रवर्ति सतसंभवीं वारितेचि जाले : 'मत्त द्रव्यें न सेवा गा : मत्त द्रव्यें न सेवा गा :' परि ते श्रीकृष्णचक्रवृती म्हणीतलें न करितीचि : आणि तेथ कवणु श्रीकृष्णचक्रवतीचा होता ? येकु[१४] उधवुअर्जुनावांचौनि ? कव्हणी सुर्याचा : कव्हणी येमाचा : कव्हणी सुक्राचा : कव्हणी ब्रहस्पतिचा : कव्हणी गर्गाचा : कव्हणी वायोचा : कव्हणी अग्नीचा[१५] :'' *महदाइसीं पुसीलें : "जी जी : या आवघेया जीवासि नर्का जावेया कवण द्वार जी ?'' सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काम : क्रोध : लोभ : एं तीन्हीं नरकद्वारें*[१६] *:''* ॥

## ४२५ माहादाइ हस्तिभंगापराधें दंडु करणें

गोसावीयांसि दुपाहाराचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु जाला : उपहुडु जाला : भीतरिला ओटेयावरि आसन असे : गोसावीयांसि कव्हणें केळें

---

१४ **ने.** एकु उद्धववांचौनि. १५ **हीबो.** °परि ते भावें संबंधा गेले कीं अभावें संबंधा गेले : ऐसें कव्हणीची नेणे कीं बाइ'' ॥ **पं.** °तेथ कवणु असे श्रीकृष्णचक्रवर्तीचा अष्टवीध ब्रह्मचर्यें : यावरि हेचि प्रमाण : १६ (**प्रव. आ.** १७२). याच लीळेच्या अनुषंगाने **पं.** प्रतीतील श्रीकृष्णचरित्रात पुढील लीळा आलेली आहे :—

(**प्रभासे कुमरनिमज्जन** ॥ याउपरि महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : कुमर एकमेकां कैसे वैरी जाले जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते श्रीकृष्णचक्रवर्त्तीची प्रवृत्ति : मग ते प्रभासेसि गेले : काठवटि उगाळिली : तो फेसू नीगाला : ते पाणि जाली : खीळा होता तो मासेनि गीळिला : मासा ढीवरें गळीं लाविला : ढीवरें खीळा भीलासि दीधला : तेणें सूंबा केला : कुमर प्रभासेसि पव्हों रीगाले : पांनिचे घोडे केले : सस्त्रें केलीं : तीएं साचोकारीं जालीं : वरुणेचेनि संदें खेळतखेळतां नीकरासि गेले : युध्य प्रवर्त्तलें : मग श्रीकृष्णें बळिभद्रासि म्हणीतलें : 'दादो : कुमर एकमेकां जुझजूझों मरताति : तरि जा पां : वारा :' ते गेले : तवं तयाचि उजू सूटले : बळभद्रासि पाठीं घाए लागले : मग तेहीं नागर एकवटौनि : वरि मुसळाचा घाओ देउनि अवघेचि मारीले : श्रीकृष्णचक्रवर्त्तीन म्हणीतलें : 'दादो : वारूं धाडिलेति तें मारुनिचि कैसे आलेति ?' बळभद्रें म्हणीतलें : 'काइ सांघों श्रीकृष्णां : मी वारूं गेलां : तवं मजचि मारूं उठीले : हे घाए पाहा पाठीसी :' म्हणौनि दाखवीले : तेहींचि घाएं तेयांचें देह गेलें : ऐसें ना : श्रीकृष्णचक्रवर्त्तीचेनि वियोगें गेलें :") (**पं.** ५१).

ओळगवीलीं तें नेणीजे : तीया साली ओटेयाखालि सांडीलीया असति[1] : तीयां सालींचा हाति आकारुनि गोसावी अवळोकिताति : तवं माहादाइसें आलीं : 'गोसावीयांपुढां साली काइ ? मासीया गोगाती[2] ' म्हणौनि न पुसत एउनि[3] झाडिलीया[4] : गोसावीं झाडितां[5] म्हणीतलें : "म्हातारी बहुतां दीसां थोरा अपराधा आली :" आणि माहादाइसें पोळलीं : "जी जी : काइ अपराधु तो सांगिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथिचा हाति मोडिला :" "जी जी : हाति काइसा ? कें असे हाति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " या सालींचा हाति एथौनि आकारिला होता : तो मोडिला :" "हो जी : गोसावीयांचा हाति मोडिला : तरि काइ दंडु तो कीजो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जेणें हातें मोडिला तेया हातासि दंडु :" "हो कां जी :" "तेणें हातें तीनि दी व्यापारु न करावा :" मग माहादाइसीं काहीं अवचटें धरणें पडैल म्हणौनि हातु गुंडिला : मग गळां घातला[6] : भीक्षा करावेया जाति : मग एकु कानां गूडघा घालीति : एकु डावेनि हातें धरीति : कोण्ही पुसे : "हें हातीं काइ जालें : आइ ?" "ना हातु अवटळला :" मग ऐसा तीन दी होता : चौथां दीं गोसावीयांतें पुसौनि सोडिला[7] :।।

## ४२६ तथा वोवीयागाएनीं सुहृदत्व स्वीकारु

माहादाइसें काम सोजीएचें बरवें जाणति : माहादाइसें गांउनि एति : बाइसें सोजीएचा व्यापारु माहादाइसांचि करवि करवीति : मग एकु दीं बाइसीं म्हणीतलें : " रुपै : वाबालागि लाडु करि कां :" "हो कां :" मग माहादाइसीं सोजी काढिली :

---

**४२५.** १ **यमु.** °गोसावीं केळांची सालि श्रीकरीं घेतली : मग उजवीए श्रीकरीचेनि नखें हाती लीहीला : सालीसि सालि पुढां ठेवीली : मग अवळोकीत होते. २ **यमुगो.** गोंगाती. **ही.** गोंगाताति. ३ **नेगो.** घेउनि. ४ **नेही.** सांडि°. **गा.** टाकि°. ५ **गोने.** सांडितां. ६ **बी.** °गुळखोडी घातली. **ही.** °गळां खोडी घातुला. **एवा.** °पीसवी घातली. ७ **ही.** सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न पुसतां भलेतैं न कीजे कीं :" मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : "हो कां जी : न करीं :" **पं.** °माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : गोसावीयांचा हाति मोडिलेयां काइ जालें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हस्ति भंगीलेयां वटांचें जन्म पावतीति : सहश्रवरीखे दुखें भोगितीति : तें एथौनि नासिलें :"

'दृष्टांतस्थळ'कारांच्या मते ' हीरडेयावेहाडेयाचा दृष्टांत गोसावीं महदाइसाप्रति पैठणी हस्तिभंगावरि निरूपिला' म्हणजे या लीळेच्या प्रसंगी सांगितला. माझ्या मते हा दृष्टांत या ठिकाणी अन्वर्थक वाटत नाही. '**दृस्थ**'कारांचे मत मान्य केल्यास यापुढे पुढीलप्रमाणे मजकूर येईल.

यावरी गोसावी महदाइसाप्रति हीरडेयाबेहाडेयाचा दृष्टांतु निरूपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : कव्हणी एकी माता असे : ते लेंकुरवासि भूक नाही : मांद्य असे : म्हणौनि हीरडेयाबेहाडेयाचा गळाळा दे : मग तेयासि भूक लागे : मांद्य फीटे : मग स्तनपान दे : तैसे परमेश्वरू जीवांसि आर्ति उपजौनि ज्ञान देति :"।।

*तीमीली*[1] : मग बोंडणवाविचीए सोंडीएवरि बैसौनि कांडितें असति : गोसावीयांसि दुपाहाराचा[2] पुजाअवस्वरु जाला : आरोगण होउनि पहुडु जाला : उपहुडु होउनि दादरेयाहुनि मढावरि बीजें केलें : मग माहादाइसें वोवीया गाओं लागलीं : ' गोमतीए तीरीं नीळेया गुढरा : राजेया गुजरा श्रीकृष्णराया[3] ।। नीळा[4] गुढरु राजा गुजरू : माणीकीं मंडपीं : स्त्रीचक्रधरु ।। गोमटें मांजीटें आरव कुंडीचें : राजेया दडीचें[5] स्त्रीचक्रधरा[6] ।। गोरें[7] आंग बाहीया डवरीया चंदनें : स्त्रीचक्रधरा झणें दीठी होए ।। वापु म्हणे कीं भाइया : माझें साजणी गोत चाहीया वो ।। ' हे वोवी गाति तवं गोसावीं दादरेनि उतरुनि मागिलाकडौनि तयांचें मुसळ धरिलें : माहादाइसीं मागील वास पाहीली : तवं गोसावीयांचेया जानुसि डोइ लागली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " वाइ : ऐसीया ओवीया वापाभाउवां[8] गाइजति : " " जी जी : गोसावी वापु : गोसावी भाउ : गोसावीचि साजणी गोत : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होए[9] : " *महदाइसीं पुसीलें : " जी जी परमेस्वरासि जीवाचें स्नेह तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मायाबहिनी आशंसिति : आमचा दांडिये डोळिये कै जाइल : परमेस्वरु आशंसिति : कटंकाटियेमान गव्हरीं कपाटीं ऐसा कै असैल*[10] : " मग गोसावीं मढांतु बीजें केलें : ।।

## ४२७ महादाइ अक्रूरवोवियागाएनीं नीषेधु*

[ महदाइसें सोजी कांडितें होतीं : ' अक्रूरा मंगळें लवति पिंगळे : कृष्णु संध्यावेळे भेटतील ।। १ ।। अक्रूरें घातली सगुण गांठी : आजि द्वारकेराएसीं होइल भेटी ।। २ ।। हातीं वीडा बतीसा पानांचा : अक्रूर कान्हाचा नीजभक्तु ।। ३ ।। श्रीकृष्णा मुळ तो अक्रूरू नीगाला : गोकुळ पातला उत्साएसीं ।। ४ ।। अति संभ्रमीतु अक्रूरू भगत : तो अवसरू जाणवीतु आंगाजवळि ।। ५ ।। ' या पांच वोविया गाएलीया : मग गोसावीं पुसिलें : " बाइ : हें काइ गाइजत असिजे ? " " हें अक्रूरातें गाति असें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तयातें कैसी गातें असा ? " " तरि काइ गाएं जी ? तो भक्तु म्हणौनि

---

**४२६.** १ (**यमुगोनेहीबी.**). २ **अ.** उदयाचा. ३ **हीबी.** चक्रपाणी. **एवा.** श्रीचक्रधरा. ४ **यमु.** समुद्रातीरीं नीळा गुढरू : राजा गुजरू : श्रीचक्रपाणी ।। २ ।। ५ **यमुबी.** दौडींचे. **हीगो.** डौडीचें. **ने.** डौंडीचें. **पं.** कुडीचें ६ **हीबी.** चाल्हराजा. ७ गोरीया आंगा : ८ **अ.** °बापभाउवां. ९ °ललिताइसाचिया वासना : " ऐसें कैं होइल पोरा जीवा एथिचा सास्वत संबंधु : जें एणेंसी संप्रृति संबंधु : " १० (**प्रव. आमा.** २).

**४२७.** * **हीना.** प्रतीतील अज्ञात लीळा क्रमांक १०९. यापूर्वीच्या लीळेतील सोजी कांडण्याचा व ओव्या गायनाचा प्रसंग लक्षात घेता ही लीळाही प्रतिष्ठानचीच असावी असे मला वाटते. म्हणून ती येथे घेतली आहे. इतर अनेक पोथ्यांतील ' अज्ञातचरित्रां 'त ही लीळा आढळते. **मु.** प्रतीत मात्र नाही.

गाति असें : आणि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भक्तु जरि ऐसा तरि स्वामिदुऱ्हा तो कैसा ? अक्रुरु जरि ऐसा तरि क्रूरू तो कैसा ? ससुरा मारविला : मणीलागि : एसणी कळि लाविली : देवो आणिला : सुरसीं बोलीं : घातकू तो कैसा ?" ।। ]

## ४२८ देवमातृकास्वपात्रुका आकर्खणीं माहादाइवचनप्रसंसा

दादोस गांवां जाती म्हणौनि दादोसीं गोसावीयांतें आधिला दीसीं वीनवीलें : उपहारालागि : गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग दादोसीं गणपति मढींचि उपहारु निफजवीला : गोसावीयांसि पुजाअवस्वरु जालेयानंतरें मग सपरीवारीं गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा ऊ्ळगवीला : गोसावीयांसि वाहीरिला ओटेयावरि आसन असे : दादोसीं दोनि वाटीया तेलंगदेसीहुनि आणिलीया होतीया : एकि गोसावीयांलागौनि : एकि आपणेयांलागौनि : भलेतो पदार्थु[१] देखति : एकि आपणेयांलागौनि : तैसीचि गोसावीयांलागौनि घेति : तीया दोन्हीं वाटीया सारिखीयाचि : मग पालटैल म्हणौनि भटीं[२] गोसावीयांचीए वाटीए ओळखण केलें : तीया वाटीया धुतां एकवाट मीळालीया : ते गांवां जावेया आइत करीताति : वाटी नाहीं : मग देवांची माता राणाइसें वाटी मागावेया आलीं : " बाइ : वाटी देया कां : " बाइसीं म्हणीतलें : " जाए : समोर असे ते घे जाए : " मग राणाइसें ओळखति ना : मग गोसावीयांची वाटी घेउनि नीगालीं : तवं माहादाइसें पैलाकडौनि आलीं : राणाइसें आंगणीं भेटलीं : " आवो : हे कोणाची वाटी नेता ?" " ना आमुची : रामाची वाटी नेतीयें वो : " " ना हे अमची[३] वाटी[४] : " म्हणौनि घेतली : " तुमची हे घेया वाटी : " म्हणौनि तयांचीए हातीं नेउनि दीधली : मग गोसावीयांजवळि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें वाटी असे ?" " तरि काइ जी : गोसावीयांची ते आमची नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें[५] : " बाइ : *कव्हणी एकि पतिव्रता असे : ते आपुलीया पतीची सेवा करी : सुश्रषा करी : म्हणीये व्यापारू करी : तो तेयाचा म्हणौनि करी : लेंकुरवां जेउं वाढी तीयें तेयाचीं म्हणौनि वाढी : आपणेयां श्रींधारू करी तो तेयालागि म्हणौनि करी : मग तो[६] जेतुली जोडि जोडी तेतुली तीएचां हातीं दे : तो तीएतें काइसेनहीं वंची ना[७] :* ऐसें कै होइल पोरा जीवा : जें एथिचें तें आपुलें : " ।।

## ४२९ तथा अनुवर्जनीं अनृत्यवादा माहादाइसां क्षेदाउपनोति

मग दादोस गोसावीयांचेया पुजाअवस्वरासि आले : रात्रीचा पुजाअवस्वरु जाला : मग दादोसीं पांच पोफळें आसनावरि ठेविलीं : सेंभरि दंडवतें घातलीं : मग वीनतकंदर

---

**४२८.** १ **एवा.** भलेती वस्तु. २ **य.** माहादाइसीं. ३ **मु.** आमचें. ४ **मु.** वाटें. ५ **गोने.** "ऐसें होए : ऐसें पोरा°. ६ **ने. (दृपा.)** °तेयाची जेतुली जोडी असे तेतुली—. ७ [**दृपा.** ६३. 'पतिव्रतेचा दृष्टांत'—'महदाइसाप्रति पैठणीं निरूपिला'—**दृस्थ. ने. (दृपा.)** 'पैठण येथे महदाइसेला'—**एवा.** 'पैठणीं बाइसाप्रति'.]

होउनि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : “ प्रभाते माहात्मेयां काइ[1] ग्रामांतर कीजैल ? ” मग माहादाइसांतें पुसिलें : “ बाइ : तुम्हीं काइ[1] ?” “ जी जी : मीं पाडळीए जाइन : ” मग गोसावीं आवघेयां पाठवणी दीधली : मग उदेयांचेया पुजाअवस्वरा आले : दादोसीं आसनावरि एक पोफळ ठेविलें : एक दंडवत घातलें : मग मागुतवाउलींचि नीगाले : जवं गोसावीयांची श्रीमुर्ति देखति : मग आवघीं भक्तजनें दादोसांतें बोळवीतें नीगालीं : मग दादोस माहादाइसांतें म्हणों लागले : “ रुपाबाइ : तुम्हीं आम्हां सांघातें कटका या कां : जाओं : ” “ ना दादो : मज पाडळीए जाणें असे : ” “ आम्हां सांघातें या[2] : मां मीं एकु बोळवीतु[3] देइन : ” “ ना दादो : मीं एतीयें परि मीयां *गोसावीयां पुढां*[4] रात्रीं : ‘ मीं पाडळीए जाइन : ’ ऐसें म्हणीतलें होतें : तरि गोसावीयांसि लटीकीयां नव्हीजे ?” “ ऐसें इतुलेयासिचि काइ : आणि गोसावी काइ जाणताति ?” “ हें काइ दादो : गोसावी कैसे नेणति ? गोसावी ईश्वरू : गोसावी मनिचें जाणति : ” ऐसें दादोस म्हणत जाति : महदाइसें निराकरितें जाति : मग अवघीं भक्तजनें राहीलीं : माहादाइसें पोटफोडावरि बोळवीतें गेलीं : मग अवघीं भक्तजनें गोसावीयांपासि आलीं : मग सांघों लागलीं : “ जी जी : माहादाइसें गांवां गेलीं : ” मग सर्वज्ञें म्हणीतलें : “ म्हांतारी गांवां गेली : तरि एथ लटीकें कां बोलिली ? ” मग गोसावीं वीहरणा बीजें केलें : मग माहादाइसें दादोसांतें बोळाउनि आलीं : तवं लखुबाइसें मार्गीं भेटलीं : “ हें काइ रुपोबाइ : तुम्हीं गावां गेलीति ऐसें आइकिलें होतें : ” “ कोण म्हणे ? ” “ ना गोसावीयांपुढां मघां ऐसीया गोष्टी होत होतीया : ” “ मग गोसावी काइ म्हणति ?” गोसावी म्हणति : “ म्हांतारी गांवां गेली : तरि एथ लटीकें कां बोलिली ?” मग महदाइसीं म्हणीतलें : “ आवघीं पां लटीकें बोलति : मां गोसावी कां म्हणति ? गोसावी ईश्वरू : गोसावी पां[5] मनिचें जाणति : ” मग माहादाइसें गणपति मढासि आलीं : मढु उघडीला : घागरि घेतली : पाणीं आणिलें : सडासंमार्जन केलें : चौकरंगमाळिका भरिलीया : वोटेयावरि दाटें पद्में भरिलीं : मग मढाचें मागुतें कवाड घालुनि पींपळमढा गेलीं : तवं गोसावीं वीहरणौनि बीजें केलें : दारवठां उभे राहीले : सरीसे भट असति : सर्वज्ञें म्हणीतलें : “ जाणा पां गा वानरेया : हें कवणें केलें ? ” भट वीचारुं लागले : “ काइ पां : रुपै तरि गांवां गेलीं : लखुबाइसें तरि ऐसें कऱ्हणारे नव्हति : ” मग भटीं म्हणीतलें : “ जी जी : नेणें : ” मग गोसावी रंगमाळिका[6] चुकवीतचुकवीत बीजें केलें : तवं भटीं म्हणीतलें : “ जी जी : या रंगमाळिका[6] कां चुकवीजताति ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “ यां रंगमाळिकासि[7] रोसु[8] असे गा : ” मग गोसावी दारापासि मढाचेया उभे राहीले :

---

**४२९.** १ **मुगोने.** (**एवा.**). काइ गंतुकाम : २ **हीबी.** °आम्हां अन्नाउदेकाचा सुरवाडू होइल :– ३ **गोही.** बोळावीत. **नेबीपं. बोळावा.** ४ (**यगोहीबीपंने.**). ५ **गोनेहीबीपं.** तवं. ६ **यमु.** रांगवळिया. ७ **एवा.** रांगोळीयासि. ८ **य.** रसु. **नेपं.** रोसभोगु. **हीबी.** या रंगमाळीका

तवं वोटेयावरि[९] दाटें पद्में भरिलीं असति : मग भटीं म्हणीतलें : "जी जी : आतां आपुलेनि इस्वयें चुकवीजैल[१०] तरि जाइजो कां :" मग गोसावीं इक्षीत[११] हास्य केलें : "पोर कैसें लटकें[१२] :" मग वाइसीं वोटेयावरि आसन घातलें : तेयावरि आसन जालें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : पहुडु होउनि उपहुडु जाला : गोसावी आसनीं उपवीष्ट असति : तवं माहादाइसें आलीं : वाहीरि उभीं राहीलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : बाहीरि कवण आलें असे ?" "बाबा : एवढेया वेळा कवण एइल ?" "पाहा पां :" बाइसें आलीं : तवं माहादाइसें बाहीरि आलीं असति : "बावा : रुपै आलीं असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भीतरि बोलावा :" "रुपै : भीतरि ए :" मग माहादाइसें आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीयांजवळि बैसलीं : मग गोसावीं पुसिलें : "बाइ : तुम्हीं गेलींति : मग माहात्मा काइ म्हणतु होता ?" "दादोस म्हणों लागले : 'रुपावाइ : आम्हां सांघातें या कां : जाओं : तुम्हीं आम्हां सांघातें एताति तरि आम्हां अनांपाणीयांचा[१३] सुरवाडु होता :' मीयां म्हणीतलें : 'दादो : मीं एतीयें : परि मीयां गोसावीयांपुढां ऐसें म्हणीतलें होतें : मीं पाडळीए जाइन : तरि मीं गोसावीयांसि लटीकी नव्हे ?' 'ऐसी इतुलेयासीचि काइ ? गोसावी काइ जाणताति ?' 'हें काइ दादो : गोसावी ईश्वरू : गोसावी कैसें नेणति ? गोसावी मनिचें जाणति : गोसावी ईश्वरू :' ऐसें जी म्हणत होते[१४] :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : एथ हांसतांहीं लटीकें न बोलिजे कीं : एथ लटीकें बोलीलीयां जें ओखटें होइल तें तो केवि जाणे ? हें इसाळुवांचें इसाळु" यावरि गोसावीं इसाळुवाचा दृष्टांतु नीरुपिला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु इसाळु असे : तो आपुलीए स्त्रीएचा इसाळु करी : आज्ञा[१५] करी : तवं तीएचां दारापुढौनि वऱ्हाड जाए : सेजिया साइलेया असति : तीया पाहों एति : ते सेजेयासाइलेयातें पुसे : 'हां वो : नोवरी केव्हडी असे ? कैसी असे ? काइ लेइली असे ? काइ नेसली असे ? नोवरा केव्हडा असे ? कैसा असे ? काइ लेइला असे ? काइ नेसला असे ?' मग तेया म्हणति : 'येसी ना कां ? भीतीआडौनि पाहे :' 'ना वो आइ : माझेनि वरैतें मज आज्ञा केली असे :' 'मां काइ तुतें भींतीआडुनि देखतु असे ?' 'ना तेयाची दृष्टि ते मजचि वरि असे[१६] :' तैसें बाइ : हें इसाळुवांचे इसाळु :"] मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : आवघी पां ऐसें म्हणति : मां गोसावी काइ म्हणौनि ऐसें म्हणति : 'म्हांतारी गांवां गेली : तरि एथ लटिकें कां बोलीलि ?'" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : कव्हणी कांहीं बोले : कव्हणी कांहीं बोले : एथ एक बोलों अवडलें :" ।।

---

तममीश्रीता आहाति गा. ९ **एवा.** °पासि. १० **गोनेयमुपं.** जाइजैल. **हीबी.** चुकवीजतु. ११ **गोने.** इखीत. १२ **एवा.** लट. १३ **नेहींबी.** अन्ना°. १४ **हींबी.** होता. **पं.** होतीएं. १५ **रावा.** रेघ काढी. १६ (**दृपा.** ५९ इसाळुवाचा दृष्टांत).

## ४३० माहादाइ मोदकप्रोतानएनीं अविधिपरिहारु कथन

गोसावीयांसि बाहीरिला ओटेयावरि आसन असे : तवं गोसावीयांचेया दरीसनां पुरुख[१] एक आले : तयांसि ब्राम्हणवेखू : गोसावी उभे ठाकले : तयांसि खेमाळींगन दीधलें : आपुलां अर्धासनीं बैसवीले : बाइसांकरवि पाए धुववीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तुमतें खाजें असे तें घेउनि या : " मग बाइसीं वाटां दोनितीनि एक[२] लाडु : एतुली ऐसी चुरी : घेउनि आलीं : गोसावीयांपुढां ठेविली[३] : मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आणिक आणा : " बाइसें गेलीं : एकु लाडु : इतुलीऐसी चुरी घेउनि आलीं : गोसावीयांपुढां ठेविली : मागुतें सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : आणिक आणा : " ' बावा : आतां आणीक आणवीती : ' म्हणौनि बाइसें डाळणीं[४] करुनि भीतरि गेलीं : जवळि माहादाइसें उभीं होतीं : तयांतें म्हणीतलें : " बाइ : आवघें पोतेंचि आणा : " माहादाइसें गेलीं : आवघे लाडु पालिमांडां रीचविले : दोनि एक लाडु : इतुलीऐसी चुरी : घेउनि आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हेचि चुरी[५] ? " " तरि काइ जी : हें नव्हे पोतें आणिलें ? " मग तीहीं लाडु खादले : पाणीं पेओं सुदलें : तांबोळ दीधलें : मग गोसावीं नीगतां अनुवर्जनाचे अनुकार[६] केले : मग ते निगाले : मग माहादाइसें आलीं : स्त्रीचरणां लागलीं : मग माहादाइसीं म्हणीतलें : " गोसावीयांचीये आरोगणेचे साखरलाडु बाइसें आणुं न सकती : तरि मीं कैसी जी आणीं ? " आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " आणिवीजती[७] तरि कैसीं आणा ना ? " " तें मीं गोसावीयांसि लटीकें बोलीलीयें जी : मीयां अवघे लाडु पालिमांडां फेडिले जी : मग दोनिएक लाडु : इतुली ऐसी चुरि : घेउनि आलीयें जी : तरि काइ जी : मज अवीधि जाला ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : स्त्रीउधवदेवीं आज्ञा-भंगु केला तरि काइ तेयांसि अवीधि जाला ? तरि काइ ईश्वराची आज्ञा ईश्वराचि कारणें भंगिली कीं : " यावरि प्रभासेची गोष्टि सांघीतली[८] : ।।

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रभासेसि श्रीकृष्णचक्रवर्ती बीजें केलें : ऐसेयां साटि लक्ष कूमरां : सपन्न कोडी यादवां : समस्तें द्वारावतीयसि आलीं : आवघेयाचें तेथ कदन जालें : मागिलाकडौनि श्रीउधवदेओ द्वारावतीयेहुनि आलें : यकें मडि वोलांडिति : येकां मडेयावरि पाय देति : येकें मडीं चूकवीति : अश्वथाबूडीं श्रीकृष्णचक्रवर्तीसि पहुडु : तवं श्रीकृस्णचक्रव्रतीसि तैसी अवस्था देखिली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : ' माझा वीदुरू नैयेचि : ' तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीसि बीजें करावेयाची प्रवृति : श्रीउधवदेवातें म्हणीतलें : ' उधवदेव

---

**४३०.** १ **य.** माहांत्मां. **मु.** विद्यावंत. २ **ने.** दोनि एक सेव लाडु. ३ **यमु.** °तीहीं खादले. ४ **यनेहीबी.** टाळणीं. **यमु.** °नाइकतया भाखा भीतरि गेली. ५ **यगोने.** लाडु. ६ **ने.** अनुकरण. **हीबी.** मान. ७ **ने.** आणा तरि नाणीं कैसी. **पं.** आणवीति तरि नाणीं कैसी जी ? ८. पुढील ' प्रभासेची गोष्टि ' येथे पूर्वार्ध चरित्राच्या संपादनासाठी घेतलेल्या **अ.** प्रतीतील ' द्वापरीच्या लीळा '

हो[९] जा : ' मग श्रीउधवदेवीं प्रदक्षणा केली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग श्रीउधवदेव नीगाले : पैल ठावोवरि गेले : आणि न वचवे : माघौते आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : माघौतें पाठविले : माघौतें पैल ठाओवेन्हीं गेले : आणि न वचवे : माघौते आले : तेव्हळि श्रीक्रुस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : ' येथौनि जा ना तरि येथीची आण : ' आणि तैसेचि नीगाले : पैल ठाओवेन्हीं गेले : आणि न वचवे : माघौतें आले : तेव्हळि श्रीक्रुस्णचक्रव्रतीन[१०] श्रीउधवदेवातें म्हणीयां म्हणौनि पाठवीलें : तैसींचि श्रीउधवदेवीं प्रदक्षणा केली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : नीगातां श्रीकृष्णचक्रवतीं म्हणीतलें : ' माझा विदुरु तुम्हां लागे हो : ' मग श्रीउधवदेव नीगाले : बद्रिकाश्रमासि गेले : "]

मग बाइसीं पुसिलें : " हां बाबा : श्रीक्रुष्णचक्रव्रतितें श्रीकृष्णचक्रवृति म्हणताति : आणि उधवदेवांतेंहीं : श्रीउधवदेव म्हणताति : हें काए बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भक्ताची थोरी देओचि जाणति : " ॥

## ४३१ सारंगपंडितां तारांगोळीक्रीडे माहादाइसां प्रास्चीत कथन

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : सारंगपंडीत गोसावीयांलागौनि बरवीं पानें पोफळें घेउनि आले : गोसावीयांसि दरीसन[१] केलीं : स्रीचरणां लागले : गोसावीयांजवळि ओटेयावरि बैसले : गोसावीं स्रीकरीं पोफळ घेतलें : मग गोसावीयांसीं सारंगपंडीत तारांगुळी खेळों लागले[२] : माहादाइसें मढु सारवीतें असति : गोसावीयांचीए स्रीकरिचें पोफळ खालि गडबडीत गेलें : गोसावीं माहादाइसांची वास पाहिली : आणि माहादाइसीं टाकुनि घातलें : आणि गोसावीं मागुतीं वास पाहीली : आणि पोळलीं : " जी जी : पापीणि : जाणेंचि[३] ना : उठावें : गोसावीयांचां स्रीकरीं देयावें कीं : मां टाकौनि घातलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " पोरु जीउ आपुलें ओखटें गोमटें जाणे : परि जाणौनिचि करी : " यावरि माहादाइसां अधीक दुख जालें : " पापीणी जी : गोसावीयांसि लागतें तरि काइ करितीयें ? " म्हणौनि दुख करुं लागलीं : " जी जी : तरि यासि मज काइ प्रास्चित : तें मज सांघिजो : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ[४] : क्रीयेसि अनुतापु पुरस्चरण : " मग सारंगपंडित हारी पडिले : ते खेळतचि होते : सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : एथिचें

---

श्रीकृष्णचरित्रातून उद्धृत केली आहे. पूर्वार्ध चरित्राच्या **भगपं.** प्रतीतील ' द्वापरीच्या लीळा 'तील या लीळेच्या साहाय्याने तिचे संपादन केले आहे. ९ **पं.** °तुम्हीं बदरीकाआश्रमा जा : " १० **पं.** °कैवल्य संचरीलें : मग म्हणीतलें : " चाला : आम्हींहीं एतों : " म्हणौनि नीगाले : । हे लीळा प्रतेस्थानीं गणपतिमठीं लाडुवाचेया पोतयाचेया प्रसंगें सांघीतली :

**४३१.** १ **गो.** दर्सना. २ **एवा.** आदरिलें. ३ **एवा.** जाणतीएं. ४ **गोने.** °केलीए–.

रीण नीकें नव्हे गा : काहीं एक देउनि उतराइ करावें[५] : " मग केलें कीं नाहीं तें नेणिजे : ।।

## ४३२ देवअव्हानीं माहादाइसा अपक्षेपण अवलोकणें

मग देवीं आपुली माता राणाइसें : आणि सीक्षें राणाइसें : माहादाइसांतें बोलाउं पाठवीली : आलीं : माहादाइसांसि भेटलीं : " रुपोबाइ : तुमतें रामें बोलाउं पाठवीलें असे : " " ना हो कां : " मग दुपाहारिचीया पुजाअवस्वरा आलीं : गोसावीयांसीं दरीसन जालें : मग गोसावीयांसि सांघीतलें : " जी जी : माहादाइसांतें रामें बोलाउं पाठवीलें असे : " मग गोसावीं पुसिलें : " बाइ : माहात्मेनि बोलाउं पाठवीलें असे : तरि तुमचें जाणें होताए ? " " तरि काइ जी : दादोसीं बोलाउं पाठवीलें तरि जाणेंचि लागैल : " मग माहादाइसीं बरवे तयांचे पाए धुतले : स्रमनिवृति केली : तयां दोघींतें राहावीलें : भीक्षा करुनि आलीं[१] : गोसावीयांचा रात्रीं पुजाअवस्वरु पाहुनि आलीं[२] : कांहीं मीस घेयावेया पाहातातिः परि कांहीं स्फुरे ना : मग दोघी जेउं बैसलीया : आपण बैसलीं : जेविलीं : मग आपुलेनि हातें आपुली आणि तयांची वाटी धुआवेया दारा निघालीं : आणि स्फुरलें : ' ये सोंडीएवरुनि पडलीयें : ऐसें मीस घेवों : ' म्हणौनि उसिटें सांडिलें : आणि वाटी सोंडीएवरि ठनकरि टाकिली[३] : आपणेयांतें खालि घातलें : " मेलीयें वो : मेलीयें वो : " " काइ[४] वो : काइ[४] वो : " बोबाति दोघी दारा नीघालीया : खालि बोबाति[५] : " पाओ गेला वो : " मग दोघीं उचलौनि मढांतु आणिलीं : मग च्यार्‍ही पाहार कुंथतें होतीं : कुंथति : खूरडति[६] : उदीयां राणाइसें उठिलीं : " माहादाइसें : मीं आतां गावां जाइन : " " दीस दोनि राहा : माझा पाओ बळी होइल : मग मीहीं एइन : " " ना मज जावें लागैल : रामापासि कव्हणी मानुस नाहीं : रामु अवसरि[७] करील : " " हो कां : " मग राणाइसें गोसावीयांपासि आलीं : स्रीचरणां लागलीं : " जी जी : रात्रीं माहादाइसें वाटीया धुआवेया गेलीं : तीयें पडिलीं : तो पाओ अवटळला[८] : तीयें च्यार्‍ही पाहार वीवळतें होतीं : नीद्रा नाहीं : मग म्हणों लागलीं : ' दीस दोनि राहा : माझा पाओ निका[९] होउं देया : मग जाओं : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दीस दोनि राहा ना कां : मग तयांचा पाओ बळी होइल : मग जा : " " ना : रामु अवसरि[७] करील : " मग तीयें नीगालीं : ।।

मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आंगीटोपरें केलें : मग गोसावीं भक्तजनांतें पुसिलें : " हा गा : आजि कवणीकडे खेळों जाइजैल ? " " कव्हणी कव्हणीकडे म्हणे :

---

५ **एवा.** होइजे. **एवा.** होआवें.

**४३२.** १ **यगो.** आणिली. २ **यमु.** °गोसावीयां पाउनि (**मु.** पासौनि) नीगवे नां : ३ **यगोने.** घातली. ४ **ने.** °जालें. ५ **गो.** बोबातीए. ६ **य.** परूवंती. **मु.** परूवति. **ने.** परिंवंदेति. **गो.** करूवति. **हीबी.** कन्हाति. **पं.** रडति. ७ **यने.** अवसरे. **मु.** अवसर. ८ **गोने.** अवं°. ९ **गो.** बळी.

कव्हणी कव्हणीकडे म्हणे :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आजि म्हांतारी असे[10] तया स्थानां जाइजैल :" मग गोसावीं पींपळमढा बीजें केलें : भीतरि उभे ठाकले : तवं माहादाइसें पाहों लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : तीयें एथ कव्हणी नाहीं :" मग उठिलीं : स्रीचरणां लागलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : म्हणे रात्रीं तुम्हीं पडलींति ?" "तरि काइ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पाहों : कैसीं पडिलीति तें एथ दाखवा :" मग माहादाइसीं वाटी घेतली : गोसावी बाहीरि सोंडीएवरि उभे ठाकले : "जी जी : ऐसें पाणीं सांडों बैसलीयें आणि ऐसीचि पडिलीयें :" वाटी टाकौनि घातली : आणि आपण दडकरि सोंडीएखालि घालीति[11] : आणि गोसावी इखीत हास्य करीति : मागुतें गोसावी म्हणति : "पां पां बाइ : एकु वेळ दाखवा :" "जी जी : ऐसीचि आलीयें : आणि ऐसीचि पडिलीयें :" आणि गोसावी इखीत हास्य करीति : "बाइ : एकु वेळ दाखवा : कैसीं पडिलींति :" मागुतें दाखवीति : गोसावी इक्षित हास्य करीति : मग गोसावी तीए दीसीं वीहरणां बीजें न करितिचि : भीतरि आसन जालें : मग तीये दीसीं तयांतें प्रधान करुनि गोसावीं नीरुपण केलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : "राजहंसु असे : तो मानसरोवरावांचौनि[12] न रमे : गांवोगावीं देसोदेसीं नदनदी[13] बावीपोखरणी असति : पर तेथ तो न रमे : कां ? तीयें आदिवंतें उदकें म्हणौनि : तैसें भक्त ईश्वरसुखावांचौनि आणिकें सुखें न सेवी[14] : खाजें खादलेयां क्षुधानीवृति तरि होए : परि भुक[15] न वचे[16] : अन जेविलेंयां भुक[17] तरि जाए : परि अमरां नव्हीजे[18] : अमृत पीजे तरि अमरां होइजे[19] :"* मग मढा बीजें केलें :।।

## ४३३ शब्दार्थनीर्वचनपुर्वक माहादाइसां अनुभवदेव नामकरण

एकु दीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : माहादाइसें गोसावीयांजवळि बैसलीं असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : एथ *अनुसरा : मग तुम्हांसि ब्रह्मानुभुति होइल :" महादाइसीं म्हणीतलें : "जी जी : अनुसरौनि ब्रह्मानुभुति देयावी ते ननुसरतांचि कां न*

---

य. बरवा. १० **यगोनेपं.** पडिली. **हीबी.** म्हांतारी पडिताळावेया जाइजैल. **११ गोयने.** घातलें. १२ **ने.** मानस°. १३. **ने.** नदोनदी. १४. (**दृपा.** ८०. 'राजहंसाचा दृष्टांत'—'गोसावीं माहादाइसांसि प्रतिष्टानीं देवो अव्हानीं ए लीळेवरि निरूपिला'—**दृस्थ.**). १५ **एवा.** तृप्ति नव्हे. १६. (**दृपा.** २१. खाजेयाचा दृष्टांत.). १७. **एवा.** तृप्ति तरि होए°. १८ (**दृपा.** २२. अन्नाचा दृष्टांत. 'गोसावीं बाइसांप्रति निरूपिला'–**दृस्थ. एवा.** माहादाइसांप्रति). १९ (**दृपा.** २३. अमृताचा दृष्टांत. 'गोसावीं माहादाइसांप्रति पैठणीं देवआव्हानीं निरूपिला' **दृस्थ.**). २२ व २३ हे दृष्टांत तर महदाइसेला निरूपिले आहेतच. २१, २२ व २३ या तिन्ही दृष्टांतात उत्तरोत्तर क्रम आहे. तिन्ही दृष्टांत मिळून एकच वाक्य मुळात असावे. म्हणून २२ व २३ या दृष्टांताबरोबर २१ वा दृष्टांतही येथे अंतर्भूत केला आहे. **पू.** लीळा १४५ वरील टीपा पाहा.

*देयावी ?" सर्वज्ञें म्हणीतले : "बाइ : तुम्ही म्हणतां तें नीकें : परि ब्रह्मानुभुति ते दुर्लभु[१] :* ब्रम्हअनुभुति तें कवणांइं जीवां नाहीं :" "जी जी : आम्हां असे नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते कैसी ?" "गोसावी ब्रम्ह : आम्हीं अनुभवीतें असों नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ब्रम्हअनुभुति ते कवणांइं जीवां नाहीं :" "जी जी : आम्हा असे नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते कैसी ?" "गोसावी ब्रम्ह : आणि आम्हीं अनुभवीतें असों नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें तरि तुम्हां नांव अनुभवदेव म्हणा :" यावरि गोसावीं साकरेचा दृष्टांत निरूपिला[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : साकर होइजे तें नीकें कीं साकर अनुभविजे तें नीकें ? तैसें ब्रह्म होइजे तें नीकें कीं ब्रह्म अनुभवीजे तें नीकें[३] ?" ।।

## ४३४ माहादाइसां आत्मज्ञान निरुपणें

माहादाइसें पुराण आइकति : पुराणीं आत्मा आइकति : आत्मज्ञान आइकीलें : मग एकु दीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : आत्मज्ञान तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मृत्याचे धर्म जीवीताप्रति कैसे निरुपावे[१] : बाइ :" यावरि गोसावीं डोळेयाचा द्रीष्टान्तु निरोपिला : [सर्वज्ञें म्हणीतलें : "डोळा सकळातें देखे परि आपणयातें कहींचि न देखे : मग कव्हणें एकें साधनेंकरूनि डोळेनिचि डोळेयातें देखता होए : तैसा आत्मां सकळांतें देखे : परि आपणेयातें कहींचि न देखें : मग कव्हणें एकें साधनेंकरुनि आत्मेनीचि आत्मेयांतें देखता होए[२] :" ।। ]

*महदाइसीं पुसीलें : "जी जी : आत्मा कैसा असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आत्मा परमात्मा ऐसा असे :" "परमात्मा काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एक जीव आत्मा : एक परमेश्वर परमात्मा : जीव परमात्मयाऐसा असे :" "ऐसें काइसयातव जाणीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "समग्र स्वरूपीं मिसळत असे : यातव जाणीजे : जी जी : मिसळे हें काइसेन जाणीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतांचें तवं ऐसें घेपे : पाठीं अनुभवें जाणाल :" "हो कां जी[३] :" ।।*

---

**४३३.** १ (**प्रव. आ.** २८९). २ (माझ्याजवळील दृष्टांतपाठाच्या अनेक पोथ्यांमध्ये हे वाक्य या ठिकाणी आहे). ३ (**दृपा.** ११४. 'साकरेचा दृष्टांत'. 'महदाइसांप्रति पैठणीं'—**दृस्थ.** 'दृष्टांत पाठाच्या' अनेक पोथ्यांत या दृष्टांतापूर्वी प्रस्तुत लीळेतील, 'महदाइसां' 'ब्रह्मानुभूती ते कवणांही जीवां नाहीं'— हा प्रकरणवश दिला आहे).

**४३४.** १ **एवा.** सांधावे. २ (**दृपा.** डोळेयाचा दृष्टांत १०१. या दृष्टांतावरील दार्ष्टांतिक स्वामींचेच होय. स्वामी आत्मज्ञानाचे निरूपण करीत आहेत. येथे दिलेला डोळचाचा दृष्टांत या दार्ष्टांतिका-शिवाय पूर्ण होत नाही. म्हणून हे दार्ष्टांतिक स्वामींचेच असले पाहिजे). ३ (**प्रव. आ.** १४६).

*सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आत्मज्ञानें मोक्षु :" महदाइसीं पुसिलें : "जी जी पुराणीं सर्व जीवां एके वेळे मोक्ष बोलिला : तो साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : लिंगपातें मोक्ष*[४] *: कव्हणी एकु बहुरुपी असे : तो सो आवगौनि ए : आड जवनिक लावी : वालिपेची : सो तरी वालिपे आंतुनि अवघा दीसे : पारी व्यक्त न देखीजे : जवनिक फीटावी ऐसी आसंसा*[५] *करीति : मग जवनीक फीटे : तेव्हळि तेयां सुख*[६] *होए*[७] *" ॥ ]*

## ४३५ विषयव्यवस्था निरूपण*

[ गणपति मठीं अवस्थान : महदाइसीं पुसीलें : " जी जी : एथचयासि वेद पुराणें शास्त्रें आइकों एति ऐसें कांहीं आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : विषयव्यवस्था करों जाणे तेयासिचि आइकों ये : जो विषयव्यवस्था करों नेणे तयासि विकल्पु संचरे : " " हो कां जी : " ॥ ]

## ४३६ माहादाइसां कळोधर्म नीरुपणें

माहादाइसें पुराण आइकति : ते पुराणीं कळीचां अंतीं ऐसें ऐसें वर्तैल ऐसें आइकीजे : मग गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : कळिचां अंतीं ऐसें[१] ऐसें वर्तैल : तें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साच[२] बाइ : वर्तैल बाइ : कळीचां अंतीं सीवाइलें[३] वीस्णुग्रहें लोपती : मैराळ[४] क्षेत्रपाळ यें स्थानें होती : कळीयौगिचां अंतीं कव्हणी मार्ग न वर्तति : कव्हणी धर्माधर्म न वर्तति : वर्णावर्ण लोपती : सुवीद्या न वर्तति : सत्यवीद्या न स्फुरति : कुवीद्या अस्फुरति : कलियुगीं विद्यावंत नाहीं : *कलियुगीं आगम न वर्तेति : उत्तरापंथीं तंत्रशेषु वर्ते : कलियुगीं विखो आति परि विखया नाहीं : हे राएमंडळीक आदिकरौनि सकळही निरोधपरिहारिए : कलियुगीं तस्करत्व पुंश्चलत्व हा धर्मु स्वरूपीं न वर्ते ऐसा विरळा*[५] *: कलियुगीं पतिव्रता हा धर्मु न वर्ते : अवकाशु नाहीं : प्रार्थिता नरु नाहीं :*

---

४ (**प्रव. वि.** १३२–१३३). ५ **एवा.** आपेक्षा. ६ **एवा.** समाधान. ७ (**दृपा.** १०८. जवनिकेचा दृष्टांत. 'महदाइसांप्रति बेलोपुरीं निरूपिला' **दृस्थ.** काही ठिकाणी हा दृष्टांत 'भटांप्रति निरूपिला' असाही उल्लेख आढळतो. काही प्राचीन आचार्यांनी या दृष्टांताचा अन्वय 'लिंगपातें मोक्ष' या वचनाशी लावला आहे. त्या अनुषंगाने तो या ठिकाणी घातला आहे.) प्रस्तुत दृष्टांत **पं.** प्रतीत व माझ्याजवळील दृष्टांतपाठाच्या दोन प्रतीत येथे उद्धृत केल्याप्रमाणेच आढळतो. काही पोथ्यात तो **ने.** प्रतीतील प्रमाणे आढळतो. तो असा : 'स्वांग जवनिकेआडौनि दीसे : व्यक्त न देखीजे : मोटकी जवनीक फेडीजे आन सावेव देखीजे :'—यात मूळ दृष्टांताचा पूर्वार्ध गाळलेला दिसतो.

**४३५.** *(**प्रव. आ.** १५०).

**४३६.** १ **गोही.** ऐसेनि. २ **एवा.** आति. ३ **ने.** शीवालयें. **गो.** सीवाळीं. **य.** सीवाळें. ४ **ने.** मैराळ क्षेत्रपाळाचिया स्थापना होती. ५ (**प्रव. वि.** ९४–९८).

*म्हणौनि* चुके[६] *:* अधर्मसीळ राए होती : पापरता[७] प्रजा होती : राजां पीडीलीया प्रजा[८] साजावींझा सरण जातील : नगरें पुरें पाटणें वोसें होतील : हाळीया पाळीया वसतील : पालीवनें वसतील[९] : रायांचीया राणीयां[१०] कोदेयां भातेयां पडती : परुसीचीं सेतें होतील : कुहांचीं उदकें होतील : आंजुळिभरि सोनेयां घेया ओ : मग चुळु उदका सुआ कां : आंजुळिभरि सोनें घेया कां : मग घांसु अना सोआ[११] कां : परि तो लाहाति ना : एकमेकांचेया हातिचेया घांसा झोंबती : बापु पुता पाठिमोरा ठाकैल : तावीनर्मदा-आदिकरुनि माहानदीआ आटती : तावीनर्मदे वीहीरे कीजती : अंगुष्टप्रमाण मनुक्षें होतील : दोघेंदोघें होतील : तीयेंचि जन्मतील : तीयेंचि वर्तती : कृमितुल्य आउक्ष होइल : मग बारा वरीखें अनावृष्टि अवरीखणें जाइल : बाराही आदीत्य तपतील : पर्वतआदिकरुनि चुनेयांचे खडे ऐसे भाजती : मग बारा वरीखें अतिवृष्टि होइल : हस्तीचीए सोंडेएसनीया धारा पडती :" स्रीकराचा अनुकारु : "आवघी पृथ्वी उदकमए होइल : मग आवघी भुमि समस्थळ[१२] होइल : लोनीवत फटीकाकार होइल : तयावरि कृतयौग रचैल : *युगाविपरीत धर्मानुष्ठानवंता कृतयुगीं जन्मु : युग पुरे तवं अवगळा असे : कळियुगीं जन्ममात्ते चौकडीपर्यंत नरकू : युगाविपरीत धर्मानुष्ठान घडे तारि चौकडी चुके*[१३] *:*" मग माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : तरि ऐसीं दुखें काइसेन चुकती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचेयां होइजे : एथौनि म्हणीतलें तें कीजे : तै चुकति :"।।

*यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : कळीधर्म ऐसे तरि एर युगधर्म कैसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ सकळही साधनें तिहीं युगीं वर्तति : प्रथम युगीं नाहीं : चहुं युगीं हिंसा अधर्मु :" यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : प्रथम युगीची काइ व्यवस्था ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तिये युगीं द्वंद्वावस्थान : तिये युगीं अंतीं विकारू : विकारनिमित्यें देहपात : तिये युगीं मनोद्वंद्वें आति : पारि देहद्वंद्वें नाहीं :"* ऐसा गोसावीं युगधर्म *निरोपिला*[१४] *:* ।।

## ४३७ माहादाइसा चींचकरटां पाणिभातु रांधणें

माहादाइसें भीक्षेसि गेलीं होतीं[१] : तवं आंडोरीं एके घरीं चींचकरटां पाणीं घातलें : तांदुळ घातले : आगीवरि ठेविलें : तें कढत असे : ऐसें देखिलें : मग माहादाइसें भीक्षा करुनि आलीं : गोसावीयांसि द्रीष्टपुत झोळी केली : मग सांघों लागलीं : "मीं भीक्षे

---

६ (**प्रव. आमा.** १६८). ७ **अ.** पापत्रा. **होबी.** पापरूपा. ८ **होमु.** °वींझा सरण जातील. ९ °**एवा.** बारा गाउवां गांउं होइल (वसैल). १० **य.** °कोदेभातें कांडीती. ११ **एवा.** देया. १२ **मने.** तल्हातऐसी. **मु.** तळहाताऐसी. **ने.** सपटल. १३ (**प्रव. वि.** ७२, ९९, १००). १४ (**प्रव. विमा.** ४४–४८).

**४३७.** १ **यमु.** °भीक्षा करीतां भुतानंदाचीये लेंकीचीया घरा गेलीं : तेथें भुतानंदाचीया नातीं

गेलीयें होतीयें : तवं एकी घरीं आंडोरीं चींचकरटां तांदुळ घातले : पाणीं घातलें : आगीवरि ठेवीलें : जी जी : कढताए : परि जळे ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आति बाइ : पुर्वीं हें गोंडवाडां होतें : तीयें ऐसेंचि करीति :" याउपरि गोंडवाडांची गोष्टि सांघीतली[२] : ।।

## ४३८ माहादाइसां राजकुमरु अनुवादु

एकु दीं माहादाइसें भीक्षे गेलीं होतीं : मग आवघा लोकु[१] भातु[२] जेवीतु : लेइला नेसला : डोल्हारेयावरि बैसलीं : ऐसीं देखिलीं : मग म्हणति : "आतां ऐसींऐसीं दीसतें असति : पाहाटे काइ करीति ?" आणि आपणेंयांतें थोरां[३] देखति : मग भीक्षा करुनि आलीं : गोसावीयांसि द्रीष्टपुत झोळी केली : मग सांघों लागलीं : "जी जी : मीं भीक्षे गेलीयें होतीयें : आवघा लोकु[४] लेइला नेसला : कांकणें कळावीया : डोल्हारेयावरि बैसलीं असति : परि कीं जी तीयें सोच्यें ऐसीं वाटताति[५] आणि आम्हीं आपणेंयांतें थोरां[३] देखों[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं राजकुमरें कीं :" ।।

## ४३९ माहादाइसां नित्यउपवासीत्व कथन

माहादाइसीं[१] गोसावीयांतें एकु दीं पुसिलें : "जी जी[२] : एकादसीचां दीसीं : दोनि वेळ जेवीजे : वारसिचां दीसीं जेवीजे : परि उपवासाचाचि पाडु होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं नीत्यउपवासीयें कीं :" ।।

## ४४० तथा भिक्षाकाळ निरूपण*

[ माहादाइसीं पुसिलें : "जी जी : देशकाळाअनुरूप भीक्षेसि नेमु नाहीं : तरि काळव्यतीरिकें भीक्षा मागुं ए ? आणि जेधवां भुक लागे तेधवां मागुं ए ?" सर्वज्ञें

---

(एवा. लेंकरुवीं) चींचकरटां तांदुळ रांधीले : तें माहादाइसीं देखिलें : तें गोसावीयापुढां सांघीतलें : "जी जी : तांदुळ सीजले जी :"—. २ पूर्वार्ध लीळा ४१ पाहा.

**४३८.** १ **हीबी.** °न्हालाधुला : लेइलानेसला......डोल्हारेयावरि बैसला ऐसा देखीला : २ **य.** तूपभातु. **गो.** °खातु. **ने.** °खातां. ३ **अ.** थोर. ४ **हीबी.** °न्हालाधुला—. ५ **हीबी.** दीसती. **ने.** दीसताति : ६ **अ.** देखतों.

**४३९.** १ **य.** महदाइसें बारसीचां दीसीं भीक्षा करीतां श्रमेति : मग एकु दी—. २ **य.**° एकादसीचां दीं दोनि वेळ जेउं : कीं बारसीचां दीं पारणें केलेयाचा पाडु जाए :" **मु.** °एकादशीचां दीसीं लागे तें जेविजे : कीं बारसीचां दीसीं पारणें केलेयाचा पाडु जाए :" **प्रव. आ.** ९४. °आम्हीं भीक्षान्न लागे तें जेउं : परी पोट ठाय ना : तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जो भीक्षान्न जेवी तो नित्योपवासी : म्हणौनि बाइ : तुम्ही नित्यउपवासीए कीं :"

**४४०.** *(**प्रव. आ.** ८८–८९).

म्हणीतलें : " वाइ : तयांसि असे तवं तुम्हांसि असे : तयासि जवं नाहीं तवं तुम्हांसि नाहीं : म्हणौनि तयांसि जवं असे तवं भलतीएचि काळीं मागुं ए : " " हो कां जी : " याउपरि महदाइसीं पुसीलें : " जी जी : दुकाळीं भीक्षा न ये तरि काइ करावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एकु दीं न मीळे : दोनि दीं न मीळे : तिसरां दीं न मीळोंचि न ए : " " हो कां जी : " म्हणौनि श्रीचरणां लागली : ।। ]

## ४४१ श्रीदत्तात्रयप्रभुमहिमा निरूपण : अळर्का भेटि*

[ *गोसावीयांसि गणपति मठीं अवस्थान : गोसावी श्रीदत्तात्रेयप्रभूची महिमा निरूपीत असति : महदाइसीं पुसिलें : " जी जी : श्रीदत्तात्रयप्रभूचा अवतारु कवणे युगीं असे : कवणे युगीं नसे : हें सांघावें जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीदत्तात्रेयप्रभूचा चतुर्युगीं अवतारू : " यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : श्रीदत्तात्रयप्रभूचा शिष्य आळर्क : तयाची तापनिवृत्ति केली : ऐसें पुराणीक बोलती : तें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साच बाइ[१] : "* यावरि माहादाइसीं गोसावीयांतें पूसिलें : " जी जी : श्रीदत्तात्रयप्रभू अळर्कासि कवणें वेखें भेटि दीधली ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते मातांग-वेखें : तीहीं[२] तापीं तापला अळर्कु नीगाला : सैह्याद्रासि आला : ऐसा जातु असे : तवं पैलाकडौनि श्रीदत्तात्रयप्रभु मातांगवेखें बीजें करीत असति : उभे धाटीया साउला[३] नेसले होते : कटिप्रदेशीं[४] मांसभेदिती काती खोविली होती : श्रीकंठीं बोरीया मणीयांची गांठी : श्रीचरणीं दुतळीया उपाह्यनौ : खांदावरि मांसाची कावडि : परि-भारीं श्रीमूर्ति ऐसी लवतिलवति जाति होती[५] : अळर्कातें देखीलें : आणि ' सेंबोलि सेंबोलि : ' म्हणीतलें[६] : अळर्कू जळतु जात होता तो नीवाला : ' मीं काइसेनि पां नीवालां ? ' ऐसें पाहे तवं देखिलें : आणि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " अळर्काचे तीन्ही ताप दरीसनांसरीसें श्रीदत्तात्रयप्रभू : ' सेंबोलि : सेंबोलि : ' म्हणौनि फेडिते जाले : कां ? ते वाणि अमृतवरीखणी कीं : " " जी जी : तेयांसि ते वाचेपासौनि अमृत वरीखलें : आम्हांसि एचि वाचेपासौनि अमृत वरीखताए : " सर्वज्ञें म्हणितलें : " मग अळर्कू श्रीदत्तात्रयप्रभूचां ठाइं अनुसरला : " ।। ]

---

**४४१.** *ही लीळा व यापुढील श्रीदत्तात्रयप्रभूच्या लीळा ' सह्याद्री चरित्र 'तून येथे, प्रकरणवशाच्या साह्याने अंतर्भूत केलेल्या आहेत. ' पूर्वार्ध ' संपादनासाठी घेतलेल्या **अ.** प्रतीतून मूळ संहिता. पाठभेद **भगोमु.** प्रतीतून.

१ (**प्रव. वि.** २८२–२८३.) २ **भ.** त्रीवीधीं. ३ **गो.** खळिचा°. ४ **गो.** °परिवंटीं. ५ **गो.** °तें गोसावीं अनुकारें दाखवीलें : ६ **गो.** °सेंबोलि म्हणति आणि काठीया भूमि हाणति : ऐसें त्रीसूधी ' सेंबोलि ' म्हणौनि भूमि हाणितली :

## ४४२ एकवीरे भोगा अनुवादु

[गोसावीयांसि प्रतेस्थानीं अवस्थान : उदेयांचा पूजाअवस्वरू जालेयांअनंतरें गोसावी वीहरणा बीजें करीत होते : महदाइसें मुक्षकरूनि आवघीं भक्तजनें सरिसीं होतीं : एकवीरेचा पव्हा अपारू आला होता : चीह्लाचीह्ल[१] अपार आलें होतें : तें देखौनि महदाइसीं पूसिलें : " जी जी : एकवीरेसि आवघाचि लोकू जात्रे जातु असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीदत्तात्रयप्रभू प्रतीष्टा केली तै 'भोग पाव :' ऐसें म्हणीतलें होतें : म्हणौनि भोगु पावत असे : " ।। ]

## ४४३ एकवीरे प्रतीष्टा

[गोसावीयांसि आवघांचि भक्तजनीं प्रस्णू पूसिला : " जी जी : एकवीरा हे रीखी-भार्या : तरि इसि मद्यमांस[१] प्रीए केवि जालें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीदत्तात्रयप्रभू प्रतीष्टा केली : तेह्वळि एकी श्रीकरीं मद्याची[२] करवी[३] : एकी श्रीकरीं मांस : मद्यसींचन[१] केलें : मांस वाइलें : म्हणौनि हेंचि प्रीए जालें : " ।। ]

## ४४४ मेरूवाळां जळक्रीडा

[ महदाइसीं गोसावीयांतें पूसिलें : " जी जी : श्रीदत्तात्रयप्रभू मेरूवाळां जळक्रीडा करीति : तें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साच[१] बाइ : अद्यापि श्रीदत्तात्रयप्रभू मेरूवाळां जळक्रीडा करिताति : " ]

## ४४५ श्रीकृष्णीं अष्टविध ब्रह्मचर्यानुवादु*

[ गणपत मढी अवस्थान[१] : एक वेळ महदाइसीं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्तीसि सोळा सहस्रा अंतापुरा : सतें आगळीया : आठ पाटमुखीया : दाहा दाहा कुमर : एकि एकि कुमरी आणि श्रीकृष्णचक्रवर्ती बाळ ब्रह्मचारी : *ऐसें भागवत बोलें*[२] : हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " साच बाइ : श्रीकृष्णीं अष्टविध ब्रह्मचर्ये : सोळा सहस्र अंतापुरा : सतें आगळीया : आठ पाटमुखीया : दाहा दाहा कुमर : एकि एकि कुमरि : मां भावें संमंधा गेले कीं अभावें संबंधा गेले हा परीयावो विनयोगु : तेथ तो कवणें करावा बाइ[३] ?" ।।

[ यावरि गोसावीं मागील द्वापरिची गोष्टि सांघितली : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : कैळासीहुनि नारदु माहामुनि आले : " तेहीं म्हणीतलें : 'श्रीकृष्णचक्रवर्ती

---

**४४२.** १ **भ.** चीह्लेंचीह्लें आपारें आलीं होतीं. **ग.** चीह्लें अपारें लाविलीं होतीं : चौंडकें वाजवीत : गात : तें देखौनि——.

**४४३.** १ **रावा.** मदिरा°. २ **रावा.** मदिरेची. ३ **भ.** करे.

**४४४.** १ **एवा.** आति.

**४४५.** *ही लीळा येथे 'द्वापरलीळा'तून समाविष्ट केली आहे.

१ केशराजबास°. २ (**प्रव. वि.** ७८). ३ पूर्वार्ध चरित्राच्या पोथ्यांतील 'द्वापरलीळा'तील (=श्रीकृष्णचरित्रातील) या लीळेचा एवढाच भाग बहुतेक पोथ्यांत आढळतो पुढील कथाभाग **भ.** प्रतीतून घेतला आहे. **भ.** प्रतीतील 'द्वापरलीळा' एकूण ४४ आहेत. हे लक्षात घेऊन पुढील भाग

बाळब्रह्मचारी :' हा संदेहो पुर्वि रुक्मीणिदेवीसि पडिला : तीयें गोसावीयांतें पुसों भीति : मग कव्हणी एकी दीसीं श्रीकृष्णचक्रवर्ती पहुडले होते : रुक्मीणि पाए तळ्हातीतें असति : मग रुक्मिणीदेवीं म्हणीतलें :' हें काइ जी ? हे दुर्वासदेव साटीं खांडियांचें बोणें आरोगिति : आणि नीराहारी म्हणविताति : हें मज प्रत्या नैए : आणि श्रीकृष्ण-चक्रवर्तीसि सोळा सहस्र अंतापुरा : सतें आगळिया : आठ पाटमुख्या : तीतुकीयाचि कुमरी : ऐसीया साटि लक्ष कुमरां : जैसेंचि गोसावी माझां ठाइं वर्तति तैसेंचि आवघेया अंतापुराचां ठाइं वर्तति : जयाचि परी माझां सर्व अवेवीं रमति तयाचि परी सर्व अंतापुराचां ठाइं सर्व अवेवीं रमति : हें मीं आणि गोसावीचि जाणों : आणि गोसावी ब्रम्हचारी कैसे जी ?' श्रीकृष्णचक्रवर्त्तीन म्हणीतलें : ' समुद्राचां गोटीं दृवासामुनि तप करीतु असे : तेयां साटीं खांडीयांचें बोणें करा : समुद्राचां काठीं उभीं ठाका : आणि ऐसें म्हणा : ' दुर्वासा नीराहारी तरि समुद्रा मज वाट दे :' मग रुक्मिणीदेवीं साटीं खांडीयांचें बोणें निफजविलें : तें घेउनि समुद्राचीये थडिए गेलीं : तेथ उभीं राहिलीं : आणि म्हणीतलें : ' दुर्वासा नीराहारी तरि समुद्रा मज वाट दे :' तेव्हळि समुदृ दों भागीं जाला : वाळवंटें चालतें गेलीं : बेटीं जाउनि दुर्वासियापुढां उभीं राहीलीं : उपहारु समर्पीला : ते जेवीले : मग रुक्मिणी आउसें तेयातें म्हणीतलें : ' आतां मीं जावों कैसी ?' तेहीं म्हणीतलें : ' आलीति कैसी ?' रुक्मिणी आउसीं म्हणीतलें : ' मीं आलीयें तेव्हळि समुद्रातें ऐसें म्हणीतलें : दुर्वासा नीराहारी तरि समुद्रा मज वाट दे : तेव्हळीं समुदृ दों भागीं जाला : मज वाट दीधली : मग मीं आलीयें : आतां कैसी जावों ?' दुर्वासिनि म्हणीतलें : ' आतां ऐसें म्हणा : श्रीकृष्णु वाळब्रह्मचारी तरि समुद्रा मज वाट दे :' मग रुक्मिणीदेवीं म्हणीतलें : ' श्रीकृष्णचक्रवर्ती वाळब्रह्मचारी तरि समुद्रा मज वाट दे :' तेव्हळी समुदृ दों भागीं जाला : वाट दीधली : रुक्मिणी आउसें वाळुवंटेंचि चालतें आलीं : ऐसें बाइ : श्रीकृष्णीं अष्टविध ब्रह्मचर्ये : हा तेथिचा पर्यावो विनियोगु तो कवणें करावा[४] ?" ]

[मग माहादाइसीं म्हणीतलें : " हो कां जी : तरि अष्टविध ब्रह्मचर्य तें कवण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " नासा : रसना : चक्षु : त्वचा : श्रोत्र : एं पांच ज्ञानेंद्रियें : मुख : उपस्त : पाणी : एं तीनि कर्मेंद्रियें : या आठां इंद्रियांचा अत्यंत त्यागु तें अष्टविध ब्रह्मचर्यें बोलिजे :" " जी जी : कवणाचे कवण विषय ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : नासा : रसना : चक्षु : त्वचा : श्रोत्र : या पांचां इंद्रियांचें सुगंध : रस : रूप : स्पर्श : आळाप : एं पांचि विषय : आणि मुख : पाणी : उपस्त : याहि कर्मेंद्रियांचे चुंबन : कुचमर्दन : मैथुन हे

भ. प्रतीतून स्वीकारला आहे. ४ हा भाग भ. प्रतीतून घेतला आहे. काही ठिकाणी आवश्यक ती वाक्ये पं. प्रतीतून घेतली आहेत. यापूर्वीचा भाग व कथेनंतर " हो कां जी[१] " येथून तो शेवटपर्यंतचा भाग

तीनि विषए :" "हो कां जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : विखो तो श्रीकृष्णचक्रवर्तीचि भोगों जाणेति[५] :" ]

## ४४६ श्रीकृष्णबळिभद्रीं वेधु निरूपण*

[ गणपत मढीं अवस्थान : महदाइसीं पुसिलें : " जी जी : पुर्वी श्रीकृष्णचक्रवर्ती विज्ञानशक्ति खेळीन्नलें : पाठीं ज्ञानशक्ति स्वीकरिली : ते पूर्वी म्हणिजे कव्हणे काळीं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पूर्वी म्हणिजे बाळत्वालागौनि कंसवधपर्यंत : पाठीं कंसवधानंतरें :" " हो कां जी :" याउपरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : श्रीकृष्ण अवतारीं कव्हणेंकव्हणें राज्य केलें? कवणकवण लोक उद्धरीले?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रवर्ती अनंत उद्धरीले : परि उद्धवार्जुन हे पुराणीं प्रसिद्ध : एर जनक : मुचकुंद : पुरीरवा एवमादिक अनंत असति :" "हो कां जी :" यावरि बाइसीं पुसिलें : " जी जी : पुराणीं तरि बळिभद्राची आणि श्रीकृष्णचक्रवर्तीची आपार वेधवंती वाखाणे : तरि ते काइ साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : ते केवि जाणति : ते तुम्हां एथौनि सांघिजैल : बळिभद्रीं साजात्या वेधु : श्रीकृष्णीं साजात्यांवैजात्यां वेधु :" महदाइसीं पुसिलें : " जी जी : बळिभद्रीं साजात्यां वेधु : श्रीकृष्णीं साजात्यांवैजात्यां वेधु तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एकु आज्ञाधरू : एकु पराज्ञाधरू :" महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : आज्ञाधरू ते कवण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एकु ते बळिभद्रदेवो : ते सते आंतरवृते विद्या देति : आणि श्रीकृष्णचक्रवर्ती ते पराज्ञाधर : म्हणौनि दुरौनि अंतःकरणें विद्या देति :" महदाइसीं पुसिलें : " जी जी : बळिभद्रदेवो तेही दुरौनि कां नेदीति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दृक् : स्पर्शु : आळापु : अंतःकरणु : ऐसें परमेश्वरू चतुःप्रकारें वेध संचरेंति : देवतेसि दृष्टिवांचौनि नाहीं :" " हो कां जी :" ॥ ]

## ४४७ राजसूइं अग्रपूजा स्वीकारू*

[ गणपत मढीं[१] अवस्थान : एक वेळ महदाइसीं पुसिलें : " जी जी : युधिष्ठिराचां राजस यागीं अठ्ठयासी सहस्त्र रुषेश्वर होते : तेथ व्यासही होता : तेणें अठरा पुराणें : च्यारि वेद केले : तेयां अवघेयांतें सांडौनि सुकदेवासि अग्रपूजा करूं आदरिली होती : ते कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : ज्ञान पूज्य : ज्ञानवृद्ध तो सर्वत्र पूज्य :"

---

प्रकरणवशातून घेतला आहे. ५ (प्रव. वि. ७९).

**४४६.** *(प्रव. वि. ८२–८४).

**४४७.** *(प्रव. वि. १४३). प्रस्तुत लीळेचा मुख्य भाग पूर्वार्ध चरित्राच्या अ. प्रतीतील 'द्वापर-लीळा'तून घेतला आहे. तिरप्या अक्षरातील वाक्ये **पंभ.** प्रतीतील आहेत.

१ **प्रव.** लखुबाइसें°.

*सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकी अवस्वरीं अर्जुनें पुसीलें : 'हां जी : स्वर्गीहुनि एतां गोसावी मज पाइरीवरि पाओ देओं नेदीतिचि : तें काइ जी ?' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'तो तुमचा पीता गा :' अर्जुनें म्हणीतलें : 'जी जी : तो तेथौनि मूचे ऐसें कांहीं असे ?' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'यज्ञ करा : मां मुचैल :' तेव्हळि जाउनि धर्मापुढां सांघीतलें[३] :" सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "धर्में राजस यज्ञु करूं आदरिला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मूळ केलें : आवघेयां रीखीस्वरां मूळें केलीं : आवघेयां रायां मूळें केलीं : तेथ श्रीकृष्णचक्रवर्ति बीजें केलें : समस्त रीखीस्वर : राए : मंडळीक मुक्षकरुनि तेथ आले : वऱ्हाडींके आवघे आले : येकेकें यकेक उलींग मागीतलें : श्रीकृष्णचक्रवर्ति ब्राम्हणांसि क्षीरिभोजन वाढावेयाचें उलींग मागितलें[५]* : तेथ अठ्यासी सहश्र रीखेस्वर बैसले होते : अवघेचि राए बैसले होते : धर्मु आला : हात जोडुनि पुढां उभा राहीला : धर्में रीखी-स्वरातें पुसीलें : 'मीयां अग्रपूजा कवणासि करावी ?' तेव्हळि तेहीं अवघांचि वीचारीलें : *'व्यासदेव वडील : व्यासदेवां करा :'* *व्यासदेवीं म्हणीतलें[५]* : 'सूकदेवो जो तो ज्ञानीया : *आणि ब्रह्मचर्याचा पूतळा[३]* : तरि तेयांसि करावी :' तेव्हळि सूकदेओ लेंकरूवांआंतु उभा ठाकौनि श्रीकृष्णचक्रव्रतीची लीळा पाहात होता : आवघां तेयांतें बोलाउं पाठवीलें : तैसाचि सूकदेओ आला : सूकदेवांतें म्हणीतलें : 'तुम्हीं अग्रपूजा स्वीकरावी :' सूकदेवें म्हणीतलें : 'हे अवघे असतां आम्हां अग्रपूजा काइ ?' तेव्हळि आवघीचि वेवस्था सांघीतली : *तेहीं म्हणीतलें : 'तुं ज्ञानीया आणि ब्रह्मचर्याचा पूतळा होसि : म्हणौनि तुज अग्रपुजा[३]* :' सूकदेवें म्हणीतलें : 'तरि आवघेया ज्ञानीयांचा बापू आणि *ब्रह्मचर्याचा पूतळा[३]* : हा श्रीकृष्णु : तरि यांसि करा :' तेव्हळि श्रीकृष्ण-चक्रव्रती श्रीकरीं कनकाचें भाजन घेउनि ब्राम्हणासि खीरि वाढीत होते : इतुकाले श्रीकर अनें भरले होते : *आंगिचीया बाहीया वरुतिया खोविलीया होतिया : कटिप्रदेसीं फुटा[५]* : श्रीकृष्णचक्रव्रतीतें बोलाउं पाठवीलें : श्रीकृष्णचक्रव्रती यज्ञमंडपासि बीजें केलें : श्रीकृष्णचक्रव्रती म्हणीतलें : 'हे आवघे असतां आम्हां अग्रपुजा काइ ?' तेहीं आवघी वेवस्था सांघीतली : तैसेचि श्रीकृष्णचक्रव्रती श्रीकर धुनि येज्ञमंडपीं बैसौनि अग्रपूजा स्वीकरिली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्ञान पूज्य : ज्ञानवृध तो सर्वत्रही पूज्य :" *यावरि गोसावीं साइलोची गोष्टि सांघीतली[३]* : ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणतेयांमाजि एकु जाणता मानिजे : नेणतेयांमाजि एकु नेणता मानिजे : गोपाळांमध्यें[६] साइलो तो एकु जाणता : आवघेचि गोपाळ गोरुवें सोडीति :

---

३ (**मुपं.**). ४ **अ.** प्रतीत स्वामींनी भक्तजनास प्रथम साइलोची गोष्ट सांगून त्यावर उदाहरण म्हणून ही अग्रपूजास्वीकाराची गोष्ट सांगितली, अशी मांडणी आहे. **पं.** (आणि इतर) प्रतीत हा क्रम उलटा आहे. तोच येथे स्वीकारला आहे. **अ.** प्रतीत प्रथम आलेली साइलोची कथा या लीळेच्या शेवटी घेतली आहे. ५ (**भ.**). ६ **मु.** गोपाळांतु एकु जाणता : तो आवघेयां मीळौनि एकु साइलो

आखरीं उभे राहाति : साइलोची वाट पाहाति : मग तो ए : तेयां जाणतेयांतें पुसति : ' साइलो : गुरुवें कवणीकडे नेओं ? ' साइलो म्हणे : ' इकडे नेओं तरि गुरुवें खडापाणीयां मिळति : तेयां अंनें उदकें होति : आणि खेळों पवाडेति : ' साइलोतें न पुसति तरि तीयें खडापाणीयां न मिळति : तेयां अंनें उदकें नव्हति : मां खेळों काइ पवाडति ? तैसें हें तुमचें साइलो : तुम्हीं यातें पूसपूसों करावें[७] : " ]

[ महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : ईश्वरीचिया बोधाची सरी आणि स्वस्तता पावे ऐसें काही आति ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : हिरवाटुटवा जीव : ईश्वरबोधें बोधवंतु तेयाची सरि चैतन्यविद्यावंतु न पवे : मां एर ते के लागेति ? एणें बोधें बोधवंता जे स्वस्थता आति ते चैतन्य विद्यावंता नाहीं[८] : " ।। ]

## ४४८ अर्जुनाप्रति ज्ञानदान : विभूति निरूपण : अपरोक्ष दर्शन*

[ गणपत मढीं अवस्थान[१] : माहादाइसें पुराण आइकौनि आलीं : महदाइसीं पुसिलें : " जी जी : पुराणीक ऐसें म्हणति : जें श्रीकृष्ण नाराएणाचा अवतारु : आणि अर्जुन नराचा अवतारू : दोहीची समान सामग्री : तरि तें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तें ते केवि जाणति : तें तुम्हांसि एथौनि सांघिजैल : श्रीकृष्ण तो परमेश्वराचा अवतारू : आणि अर्जुन तो जीवु : परि चौदा विद्या अभ्यासिलिया : तेणें श्रीकृष्णेंसीं साजात्य : अर्जुन सकळ सामग्रीया सामग्रीवंतु : एकु वांचौनि : " " जी जी : ते कवण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एक ते ब्रह्मविद्या : " " हो कां जी : " यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : हे पुराणीक ऐसें बोलति : जें श्रीकृष्णाचिया भक्तांमाजि अर्जुनाचिया ऐसी युक्तीचि नाहीं : तें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " साच बाइ : तें तुम्हांसि एथौनि सांघिजैल : पूसतेया अर्जुनाचिया युक्ती श्रीकृष्णचक्रवर्तीचि परिहरेति : पूसतेया अर्जुनाचा अभिप्रावो ऐसा जें श्रीकृष्णचक्रवर्तीचें परावरत्व सुचौनि बोलतु असे : " " हो कां जी : " यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : भगवद्गीतेमाजि श्रीकृष्णचक्रवर्ती

---

करीति : ।। **शोधु** : मुखरी करीति : ७ (**मु.**). ८ (**प्रव. वि.** १४४–१४५).

**४४८.** *(**प्रव. वि.** ८६–९० या वचनांच्या या प्रकरणवशात 'द्वापरलीळां'तील—श्रीकृष्णचरित्रातील–'विभूति निरोपणे' व 'विश्वरूप दाखविणे' या दोन लीळा अंतर्भूत झाल्या आहेत. या प्रकरणांचा आशय लक्षात घेऊन 'द्वापरलीळां'तील 'योध्यसमइं अर्जुना ज्ञानदान : ' व 'संजयो प्रतीति' या लीळा यातच चौकटीच्या कंसात घातल्या आहेत. त्यांचा परस्परसंबंध स्पष्ट आहे. १ ही लीळा **पं.** प्रतीत सविस्तर आली आहे. ती पुढीलप्रमाणे :

**अर्जूनाप्रति वीस्वरूप दाखवणें**

महदाइसीं पुसिलें : " जी जी : गोसावीं अर्जूनाप्रति ज्ञान कवणी वेळीं दीधलें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दोन्ही अरणी उनता जालीया : एरांची कांडें एरांवरि पडति : ऐसा समैं दीधलें : अर्जूनें ऐसें नेहाळुनि पाहीलें : तवं एक आजे : एक पणजे : एक चुलते : एक गुरू : एक गुरूभाउ : एक चुलतभाउ :

म्हणितलें असे : जें सकळै तो मीं : अर्थतर्कु तो मीं : उचश्रवा तो मीं : ऐरावतु तो मीं : आदित्यांमाजि विष्णु तो मीं : नक्षत्रांमाजि चंद्रु तो मीं : देवांमध्यें इंद्र तो मीं : गंधर्वामध्यें चित्ररथ तो मीं : ऐसें बहुत असे : तरि तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रवर्ती तिएतिए शक्तीचां ठाइं अहंता स्वीकरौनि ते ते शक्ती आत्मत्वेंचि निरोपिते जाले : " यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : श्रीकृष्णचक्रवर्ती ते ते शक्ती नव्हति : तरि तिएतिए शक्तीचां ठाइं अहंता कां पां स्वीकरीली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देवो कच्छ होति : मच्छ होति : देवामध्यें अवतरेति : नरांमध्यें अवतरेति : तिर्यंचामध्यें अवतरेति : कां जे जे शक्ती अवतारधारणा उपयोगा जाए ऐसी असे तेथतेथ अवतार धरीति : म्हणौनि श्रीकृष्णचक्रवर्ती तिए शक्तीचां ठाइं अहंता स्वीकरीली असे : अन्येत्रीं नाहीं : " " हो कां जी : " [ यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : श्रीकृष्णचक्रव्रतीन अर्जुनासि ज्ञान केव्हळि दीधलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " दोन्ही अरणी उनता जालीया : येरांचीं कांडें येरांवरि पडति : येरांचीं कांडे येरांवरि पडति ऐसां समैं दीधलें : " ] महदाइसीं पुसिलें : " जी जी : अर्जुनासि बोधु केधवा जाला ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रवर्ती निरूपितां अर्जुनाची शंका पारुखेचि ना : तेव्हेळीं अपरोक्ष प्रकटिलें : मग शंका पारुखली : विश्वरूप प्रकटौनि सामर्थ्यें दाखवीलें : समर्थत्व उमटविलें : तेव्हेळीं प्रतीति आली : मग बोध जाला : मग जे सांघति तें घेत जाति : " [ यावरि महदाइसीं पुसिलें : " जी जी : अर्जुन विश्वरूप देखे तरि संजयो काइ देखे जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : संजयो चतुर्भुज देखे : अर्जुनु विस्वरूप देखे : उधवदेव कैवल्य परब्रम्ह देखति : " " हो कां जी " म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

---

पुतणीए : ऐसे अवघे गोत्रज देखीले : आणि करूणा उपनली : धनुक सांडीलें : " श्रीकृष्णें म्हणीतलें : " अर्जूना : धनुक कां सांडीलें ?" अर्जूनें म्हणीतलें : " ऐसा गोत्रवधु करूनि मग राज्य करूं : यापरीस मरीजे तें नीकें : कां ताप साहुनि वारानसि सेवीजे : " श्रीकृष्णें म्हणीतलें : " हें करीतें कवण ? करवीतें कवण ?" ऐसें बोलतां अठरा आध्ये जाले : अर्जूनें म्हणीतलें : " तुं देवकीचा : मीं कोंतीएचा : मां एथ नवल काइ ? आणि अपुर्व तें काइ ?" ऐसी श्रीकृष्णचक्रवर्त्ती निरोपितां अर्जुनाची संका काइसेनही पारूखे ना : मग अपरोक्ष प्रगटीलें : आणि म्हणीतलें : " आतां पाहे पां ऐसें : " तवं यादव : पांडव : कौरव ऐसे देखीले : आणिकही भयानका देवता देखीलीया : भयानकें रूपें ऐसीं देखीलीं : आणि चौदाही भुवनें उदरामाजि दाखवीलीं : विश्वरूप प्रकटौनि सामर्थ्य दाखवीले : समर्थत्व उमटविलें : तेव्हेळी प्रतीति आली : मग बोध जाला : आणि म्हणीतलें : " पुरे : पुरे : " " आतां तुझें वचन मज करणीए : " श्रीकृष्णें म्हणीतलें : " करीसी ?" ऐसें त्रीसूधी संक्रमीलें : " तरि घेए पां धनुक : घे धर्माचें सीर : " धर्माचें सीर घेओं आदरीलें : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : " पूरे : पूरे : " म्हणौनि हातु धरीला : " आतां उजू युध्य करि : " मग करीता जाला : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पाउडां पाओ आणि ब्रह्मविद्या उपदेसू : तो अर्जुनासीचि जाला बाइ : " ।।

## ४४९ गीता श्रीकृष्णोक्ति निरूपण*

[ गणपति मढीं अवस्थान : एक वेळ महदाइसीं पुसिलें : "जी जी : पुराणीं ऐसें बोलति : जें हें श्रीभागवत आणि भगवद्गीता श्रीकृष्णें ब्रह्मेयाप्रति निरोपिली : हें साच जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तें तैसें नव्हे : तें तुम्हां एथौनि सांघिजैल : बाइ : गीता श्रीकृष्णोक्ति : एर अवघी व्यासोक्ति : बाइ : परिवारासहीत श्रीकृष्णाचें जें जें चरित्र तें भागवत बोलिजे : आणि नित्यानित्यवस्तुविवेक शमदमादि साधन जें मुखोक्त ते गीता बोलिजे : बाइ : द्वापरीं आर्जुनाप्रति श्रीकृष्णचक्रवर्ती गीता श्लोकींचि निरूपिली : मग कथासंगति ते श्लोकीं व्यासें बांधिली :" "हो कां जी :" ।। ]

## ४५० परमेश्वरासि जीवाचें स्नेह निरूपण*

[ [१]गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : महदाइसीं पुसिलें : "जी जी : परमेश्वरासि जीवाचें स्नेह तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : मायाबहिनी असंसीति : आमचा दांडीये डोळीये कै जाइल : परमेश्वरू असंसीति : कटंकटियेमान गव्हरीं कपाटीं ऐसा कै आसैल :" "हो कां जी :" ।। ]

## ४५१ जीवु आपुलें मात्रागमन न देखे निरूपण*

[ गणपति मढीं अवस्थान : महदाइसीं पुसीलें : " जी जी : हे रावसगावीचे भगवे अवघेचि अनाचार करिती : कव्हणी सुरापान करीती : कव्हणी मांस खाती : कव्हणी वेश्यागमन करीती : कव्हणी मायबहिणी ऐसें म्हणौनि बाइलासि व्यभीचरती : ऐसें आपण करीती : आणि आमुतें म्हणती : जें एहीं मासोपवास सांडीले : देवब्राह्मण वर्जीले : तीर्थतपोवनें नाहीं : ऐसें विचीत्र नव्हतीही भकती : हें ऐसें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पोरु जीवु आपुलें मात्रागमन न देखे : परि पुढीलाचें वेश्यागमन देखे : ऐसे हे जीव कृतघ्न : म्हणौनि ऐसेयाचा संसर्गु न करावा :" "हो कां जी :" ।। ]

## ४५२ मातापिताश्राद्धानुवादु*

[ गणपति मढीं अवस्थान : एक वेळ महदाइसीं पुसिलें : " जी जी : मातेपीतेयाचें श्राद्ध कीजे तें तेयांसि पावे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : दाहा दीसांभीतरी कीजे तें पावे : एर न पवे : ते पितृसंबंधा अवघे :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

---

**४४९.** *(**प्रव. विमा.** १०९).
**४५०.** *(**प्रव. आमा.** २).
१ **प्रव. मुनिबा°.**
**४५१.** *(**प्रव. आ.** १७५).
**४५२.** *(**प्रव. वि.** २७४).

## ४५३ गुजरीया भाखा गुजरेंसीं गोष्टि करणें

*एकु दीसु गोसावियांसि चींचाये अवस्थान असे : तवं तेथ*[१] गुजरु एकु आला : तयासीं भेटि जाली[२] : आणि गोसावीं हरीखु स्वीकरिला : तयासीं गुजरी भाखा गोष्टि केली[३] : तो थोरु सुखीया जाला : ।।

## ४५४ लखूबाइसां लखूमीयां वीरु कथन

उंवरडां आणि सेउगांवां[१] मध्यें वाट उठिली : तेथ लखूमीयां मारिला[२] : तो अधोगती गेला : कान्हरदेयाचेया पोटा एउनि जाए : सपनीं आला : 'गोसावीयांचां ठाइं उपाहारु करि : मग मीं उपजैन : मरें ना :' लखूबाइसीं वीनवीलें[३] : सर्वज्ञें म्हणीतलें : "व्रीधासंगमापासौनि वाघांड[४]संगमुवरि अर्तलो[५] पर्तुलो करा : आणि एथ एकु उपाहारु करा[६] :" ।।

---

**४५३.** १ (यमु.). २ **हीबो.** तेणें गोसावीयांतें देखिलें : आणि म्हणीतलें : " आम्हारो येजमानु इह्या असे मां. ३ **मु.** °कवण गावंथी आवीयो ? कवण गावं जाइछो ?" म्हणौनि देसीची क्षेमवार्ता पुसीली : तेणें सांघीतली : आपण सांघीतली : तेणें तो थोर सुखीया जाला : **एवा.** "रूढुं कीधुं तुम्हारे बापु : म्हारों पीतर : म्हारा धणी : म्हारों तुम्हीं स्वदेसीया जी : धन्य म्हारो जी : पुण्य होता : भलों कीधों : गुसाइ आम्हारो :" थोरं सुखीया जाला : मग गोसावीं पाठवणी दीधली : ।।

**४५४.** १ **ने.** सेइगावा° **गो.** सेगावा°. २ **य.** लखुमबाइसाचे भाउ लखुमीयां : तो घोटणीचीये वाटे जुझीं पडिला : तेथ तयांचा भडखंबा केला : वरि धुपें घातलें : लखुमबाइसें तया वाटा एति जाति : तया धुपेयापासि बसति : तवं कोन्हीं आखत वाए : दुधाचें बोट लावी : दहीयांचें बोट लावी : तीयें दुख करीति : मग एकु दी स्वप्न देखीला : 'मज जेउं सुं कां : मीं भुका मरतु असे :' मग गोसावीयांपासि आलीं : स्वप्नू सांघीतलें : मग गोसावीयांतें उपाहारालागि वीनवीलें : गोसावीं मानिलें : उपाहारू नीफजवीला : गोसावीयांसि ताट केलें : आरोगण दीधली : गुरुळा : वीडा : ।। **मु.** कान्हरदेया धारा लखुमियां : तो सेवुगावीचां मार्गीं उंबरडीची सांत करी : तयासि मार्गीं चोर उठीले : तयांसीं जुंझीनला : ते अवघेचि आधी मारीले : मग तोही पडीला : तो कान्हरदेयांसि स्वप्नीं ये : ३ **मु.** °"जी जी : लखुमियां वीर जाला : तो स्वप्नीं दाखवीतु असे : कान्हरदेयाचेया पोटा एवुनि नवमास भरति : तवं बरवा गर्भीं वाढताए : आणि प्रसुतिसमै आडवा येताये : मग सुइनीकरवि खांडखांडुं काटवीजे : ऐसे कष्ट जोमायेसि होताति जी : ते अखंड मातें म्हणति. . . . "तरि ज्या गोसावीयांची गोष्टि करिते असा तयांतें तुम्ही विनवा :" ४ **नेही.** वाग°. ५ **अ.** वर्तलो. **मु.** आनुलोमु प्रतिलोमु ऐसीया यात्रा करा. ६ **सोध.** लखूबाइसांची भाउजै : त्यें पाटा बांधौनि आली : कोणी रीघावेया : दीस दोनि पोट दुखत होते : (**य.** परि कोनु नव्हे :) आणि आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : वीनवीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : लखूमीयां पोटासि आला असे : तयाचां घाइं बहुत ठेले : तो बहुतांचां घाइं ठेला : वाघाडेसंगमुनि व्रीधासंगमवरि अर्तलो पर्तलो करा : मग उपजैल :" मग तैसींचि नीगाली.

## ४५५ माहादाइसां आर्य अनुवादु

गोसावी अंगीटोपरें कासीत होते : माहादाइसीं म्हणीतलें[१] : " आमचे गोसावी कैसे नागर :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें बरवें नव्हे : भीतरि क्रीडत असे तें बरवें[२] : श्रीप्रभु आर्ये : हें आर्येनागर : श्रीकृष्ण चक्रवर्ति[३] ते नागर :" ।।

## ४५६ संकीयातें पुजा पाहों धाडणें

गोसावीयांसि नागनाथीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जाला : गोसावीयांसि चौकीं आसन असे : नागनाथिचा संकी[१] तो तेथ संकू[२] वाजवी[३] : तो जात्यंधु : तो गोसावीयांजवळि बैसला असे[४] : सर्वज्ञें म्हणीतलें : "संकीया[५] : जा : पींपळेस्वरिची पुजा पाहुनि या :" आणि गेले[६] : ते पाहों लागले : पींपळेस्वरा गेले : आवघी बरवी पुजा बांधली होती : ते आवघी देखिली : देउळ देखिलें : गंगा देखिली : मग एउनि अवघी पुजा गोसावीयांपुढां सांघीतली : आणि न देखति[७] : ।।

## ४५७ साधांतें चक्रपाणि पाहों धाडणें

गोसावीयांसि चक्रतीर्थीं आसन असे : सर्वज्ञें म्हणीतलें[१]: "साधें हों : तुम्हीं चक्रपाणि पाहों जा :" "जी जी : गोसावी बीजें करीती कीं ?" "जा : हें तुमतें पारूखैल :" "हो कां जी :" निगालीं[२] : आणि घाटु वेघति : आणि गोसावीयांकडे पाहाति : देउळाआंतु रीगालीं : आणि गोसावीं ढोरेस्वरां बीजें केलें : मग नीगालीं : तवं गोसावी जाताति : मग लवडसवडीं गोसावीयांतें टाकीलें[३] : ।।

---

**४५५.** १ **यमु.** एकु दीं गोसावीयासि भीतरि वोटेयावरि पुजाअवस्वरू जाला : भटीं आंगीटोपरें वोळगवीलें : गोसावीं आंगीटोपरें कासीलें : गोसावी (**मु.** आंगीटोपरें परिधान करूनि) उभे राहीले : भट आंगीचे कसे दाटताति : महदाइसें पासि उभीं असति : गोसावीयांचें सौंदर्य महादाइसाचेया डोळेया असमाइ जालें : मग पोटीं म्हणितलें :—. २ **अ.** अलौकिक. ३ (**गोने.**).

**४५६.** १ **य.** संखीया. **मु.** कठिया. २ **यमुहीबी.** संखू. ३ **ने.** फुकी. ४ **हीबी.** °तेणें पोटीं मनोर्थु केला : ' मज डोळे असते तरि मीहीं पाहातां :' ५ **य.** संखीया. ६ **य.** °तयासि दृष्टि आली. **हीबी.** °आणि डोळे उघडले. ७ **ने.** नेदखति. °**रामेश्वरबास :** आणि देखतचि होते :

**४५७.** १ **एवा.** °"साधे हो : तुम्हीं चक्रपाणि देखिला ?" "नाहीं जी :" **सर्वज्ञें** म्हणीतलें : "गावीं तुमतें पुसती तरि तुम्हीं काइ सांघाल ? जा : पाहा :" २ **एवा.** °एक वेळ दारवठाहुनि आलीं ते मागौतीं पाठवीलीं : दुसरेनि चौकीहुनि आली : मागुती पाठवीली : तीसरेनि चक्रपाणी देखीला : ३ **एवा.** °मग गोसावीं पुसिलें : "साधे हो : तुम्हीं चक्रपाणि देखीला ?" "हो जी : देखिला : जी जी : बरवा असे : मुगुट पदक : सांखळें : हातकडगें : उतरी : जानीवें : अवघे सोनेयाचेचि अळंकार जी :"

## ४५८ एकाइसां स्नाननीखेदु

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीयांसि केदारापसिमे निंबु : तयातळीं आसन असे : जवळि[१] सारंगपंडीत असति : तेथ पुढां एकाइसें गंगे स्नान करिताति : गोसावी देखताति : सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा पांडेया : यें स्नान कां गा करिताति? यांचें काइ कोण्हीं मेलें?" "ना जी : या वीधवा[२] स्त्रीया : यांसि स्नान करणें लागे :" मग एकाइसें स्नान करुनि आलीं : खांदावरि धोत्र : गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं स्नान कां करा ? काइ तुमचें कोण्हीं मेलें?" "ना जी : आम्हीं वीधवा[२] स्त्रीया : आम्हां स्नान करणें लागे :" "बाइ : तुमचा काइ म्रीत्यपति[३] ? तुमचा तो नित्यपति कीं :" *यावरि गोसावीं नीचादिक्रमें युगधर्म निरूपिला*[४] *:* [सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : च्यारि लक्ष कलियुग : । कलियुगीं तीर्थ : क्षेत्र : व्रत : दान : हा धर्मु : । हिंसा अधर्मु : । धर्मातव अंतराळप्राप्ति फळ : । अधर्मातव नरक : उत्तमा धर्मातव अंतराळप्राप्ति फळ : । मध्यमा धर्मातव अष्टौदेवयोनिप्राप्ति फळ : । कनीयसा धर्मातव अधोनिकप्राप्ति फळ : ।। आठ लक्ष द्वापर : । द्वापरीं याग हा धर्मु : । तीर्थ : क्षेत्र: व्रत : दान : अधर्मु : । धर्मातव स्वर्गप्राप्ति फळ : । अधर्मातव खालीली युगीं जन्म : ।। सोळा लक्ष त्रेत : । त्रेतीं भक्ती हा धर्मु : । यागु अधर्मु : । धर्मातव कैलास-वैकुंठप्राप्ति फळ : । अधर्मातव खालीली युगीं जन्म : ।। बत्तीस लक्ष कृतयुग : । कृतयुगीं आत्मोपास्ति हा धर्मु : । भक्ती अधर्मु : । धर्मातव चैतन्यप्राप्ति फळ : । अधर्मातव खालीली युगीं जन्म :।। कृतयुगीं लक्षभरि आयुष्य : । त्रेतीं दाहा सहस्र : । द्वापरीं सहस्र : । कलियुगीं शत : ।। या चहुयुगांचां धर्मीं परमेश्वरू नेणिजे : न पविजे : परमेश्वरें परमेश्वरू जाणिजे : परमेश्वरें परमेश्वरू पाविजे : ।।]" *इतुलेनि बाइया श्रीचरणा लागलिया : मग गेलिया*[४] *:* ।।

---

ऐसें रुची सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "साधे हो : श्रृंगारिला खूंट बरवा दीसे : मां हे देवता लेइली नेसली :" "जी जी :" मग गोसावीयासि पूजावस्वर जाला : आरोगण जाली : ।। **हे रूढि** ।। **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : चक्रपाणी देखीला ?" "जी जी : मज गोसावी पारूखतिचि ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "साचोकारा चक्रपाणि सांडुनि तेथ कां गेलींति ?" "ना जी : मातें गोसावीं पाठवीलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथौनि तुमतें ऐसें म्हणीजैल : घाला देउळावरूनि उडी : "ना जी : तरि नेणेंचि जी :" ।।

**४५८.** १ **गोनेय.** जवळे. २ **यगोने.** वीध्वा. ३ **गोनेमुही. बीपं.** मृत्यपति. ४. **पं.** °यावरि गोसावीं युगधर्म निरोपिले : [(**प्रकरणवश.** नवप्रकरणाचा). **लक्षणबंद.** युगधर्माचा प्रकरणवश ] **एवा.** हें चरित्र अज्ञात. (**यापुढील** 'युगधर्मा'ची वचने येथे 'सूत्रपाठा'तून अंतर्भूत केली आहेत).

## ४५९ एकाइसांकरवि मुद्रिका फेडवणें*

[एकाइसें तीएं बरवीं स्वक्रीयें : संभवाथिलीं : अभरणें लेति : एकु दीं हातीं मुदीया लेउनि गोसावीयांचेया दर्शना आलीं : दंडवतें घातलीं : दोन्हीं हात श्रीचरणांवरि ठेउनि श्रीचरणां लागलीं : बैसलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या हातीचीया मुदीया फेडा : हा वीकारू :" सर्वज्ञें म्हणीतलें : "विषया साक्षी न ठकावें[१] :" तीएं गेलीं : फेडिलीया : मग गळां अनंतीं घातलीया : मग एरी दीं दर्शना आलीं : नमस्कारू करीतां वाजीनलीया :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या एथौनिहीं फेडा : हाही विकारूचि कीं :" तेहीं फेडुनि गांठीं बांधलीया : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "अनंतीचाही प्राणियांसि विकारू भोगु आवडे :"॥]

## ४६० तथा वीस्वपति नीरुपणें

एकु दीसीं गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें : गोसावीयांसि उग्रादैतीं[१] आसन असे : गांविचे ब्राम्हण गोसावीयांचीये वोळगे बैसले : एकाइसें गोसावीयांचेया दरीसनां आलीं : मांदी[२] देखिली : आणि प्रतलीं[३] : गेलीं : मांदी[४] गेली : मग आलीं : गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मघां तुम्हीं आलींति आणि गेलींति कां ? एथ नमस्कारु न कराचि तें काइ ?" "जी जी : मघां मांदी होती : तरि कोण्हीं कांहीं बोलैल म्हणौनि न करींचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरीया एका कारणें सातां पाचांचा सासुरवासु साहीजे : मां वीस्वाचा पति परमेश्वरु तेणेंसीं धरणें मांडलें असे : तरि जगाचा सासुरेवासु साहावा कीं :"॥

## ४६१ पार्वतीभुवनीं पुरुखोतमदेवांचे पागडे स्वीकारु

एकु दीसीं गोसावीं पुरुखोतमदेवांचेया मढा बीजें केलें : ते[१] सोमनाथाचां देउळीं होते : गोसावीयांतें देखिलें : "एइजो जी : एइजो जी :" म्हणौनि उठिले : दंडवत घातलें : स्रीचरणां लागले : गोसावी आसनी उपवीष्ट जाले : गोसावीयांचें चरणक्षाळण केलें : वीडा वोळगवीला : मग तयांचां[२] पाइं रीरीए पीतळेचे पागडे होते : *ते तीहीं काढुनि*[३]

---

**४५९.** ***ही** लीळा येथे **मु.** प्रतीतून घेतली आहे.
१ (**प्रव. आ.** १५).

**४६०.** १ **गो.** उग्रादीतीं. **नेहीबीमु.** उग्रादीत्यीं. २ **मु.** तेथ बहुत वोळग. ३ **गो.** परतीं गेलीं. ४ **मु.** वोळग वीसर्जली. **हीबी.** °वोसरली.

**४६१.** १ **यमु.** पुरुखोतमदेवाचें बीढार पार्वतीचां देउळीं होते. २ **ने.** °पाइरीचिए. **य.** °पाइं रीए. **हीबी.** °पाइं बरवे रिरिये पीतळेचे घागरे होते. ३ (**मु.**).

गोसावीयांचां स्रीचरणीं वोळगवीले : मग गोसावी आंगणीं वेढे करूं लागले : आणि तीयें[४] घवघवां[५] वाजों लागलीं : मग पुढां आडवांगीं वोणवति : मग म्हणति : "मां मां माझी माए ऐसी दीसतीए : माझी माउली ऐसी दीसतीए : माझी अंबा ऐसी दीसतीए : माझी आइ ऐसी दीसतीए : माझी अंबाळिका ऐसी दीसतीए :" गोसावी वेढे करीताति तवंतवं तया सुख होए : आणि हे च्यान्ही सब्द म्हणति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां आपुली[६] पागडी घेया :" "ना जी : मीं नेघें[७] :" मग गोसावीं आपुलेनि स्रीकरें फेडिलीं : मग तेहीं हातीं घेतलीं : मग गोसावीं बीढारा बीजें केलें : ।।

## ४६२ सायागोपाळीं स्त्रीभुखनस्वीकारु

गोसावीयांसि सायागोपाळाचां[१] देउळीं आसन असे : बाइ[२] एकि : तीया नागाराउळांची क्रीया[३] देखिली होती : तीयें[४] सायागोपाळाचेया देउळासि आलीं : तवं गोसावीयांतें देखिलें : देवा[५] जावीं[६] तें न वचतीचि : गोसावीयांसि दंडवत घातलें : स्रीचरणां लागलीं : मग गळांची सांखळी काढिली : गोसावीयांचां कंठीं घातली : सरि ओळगवीली : कानिचें नांदीए[७] काढिले : गोसावीयांचेया कर्णयुगळीं वोळगवीलें : हातीं सोनेयांचे दोरे होते : ते स्रीकरीं घातले : मुदीया आंगुळीया घातलीया : मग नावेक गोसावीयांपासीं बैसलीं होतीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आतां जा :" पैल ठाओवेऱ्हीं जाति : आणि मागौतीं एति : "जाओं ?" गोसावीं स्रीमुगुटें अनूज्ञा देति : तीनि वेळ ऐसी अनोज्ञा दीधली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आतां घेया आपुलें :" "हो कां जी :" मग तेयांचे अळंकार दीधले : मग गेलीं : ।।

## ४६३ ब्रम्हचारिदेवाचीए गुंफे बीजें करणें

गोसावीं ब्रम्हचारिदेवांचीए[१] गुंफे बीजें केलें : तवं ब्रम्हचारिदेवांची बाइ[२] आंगणीं सडा[३] घालीति होती : गोसावीयांतें देखिलें : आणि तीया गोसावीयांतें क्षेमाळींगन[४]

---

४ **हीबी.** ते घागरे. ५ **हीबी.** खळखळा. ६ **हीबी.** आपुलीया घागरीया. ७ **एवा.** °गोसावीयासीचि बरवीया साजताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "घेया : एथौनि दीजताति :" "ना जी : मीं नेघें :"

**४६२.** १ **यमुगोनेबी.** छाया°. २ **यमु.** ब्राम्हणी एकि हातरीती. **हीबी.** गुरुवी. ३ **नेबी.** क्रीडा. ४ **हीबी.** ते सायागोपाळा वाधावनें करूं आलीं. ५ **मु.** देवतेसि **न वचवेचि. हीबी.** °वाधावनें करावें तें न करीतीचि. ६ **गोने.** जावें. ७ **गो.** गांठीए. **नेही.** नादीये.

**४६३.** १ **मु.** हयग्रिवा. **य.** हयगर्वी ब्रह्मचारी देवांची गुफा होती तेथ–. २ **यबी.** सिक्षीणि. **मुही.** सीखीण. ३ **य.** सारवीत होती. ४ **हीमु.** क्षेम. **गोय.** खेवं.

दीधलें : आवघा फुटा सेणें माखला : तवं लींगाचां देउळीं जे ब्राम्हण होते तीं म्हणीतलें : "बाहुल्यें : स्त्रीचांगदेओराउळां गोसावीयांचां ठाइं स्त्रीयांसीचि वेधु :" तीया बाइया क्षेव[४] सोडिलें : तवं ब्रम्हचारिदेवीं गोसावीयांतें देखिलें : गुंफेआंतुनि धांवीनले : तवं दारवंडु भवैसि लागला : ते भवै फुटली : तैसेचि आले : एउनि गोसावीयांसि क्षेमाळींगन दीधलें : आवघा फुटा असुधें[५] माखला : मग गोसावीं तेयांची वास पाहुनि म्हणीतलें : "एथ नरनारी समान वेधु :" मग गोसावीयांसि ब्रम्हचारिदेवीं पटिसाळेवरि आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : गोसावीं स्त्रीमुखिचें तांबोळ तेयांचीए भवै बांधलें : गोसावीयांसि चरणक्षाळण केलें : वीडा ओळगवीला : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ४६४ सास्त्रमढीं संन्यासीयां वेधु

गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : पहुडु होउनि उपहुडु जाला : मग वीळचांचा वेळु जाला : मग गोसावीं देइभागवतांतें म्हणीतलें : "बटीका : जाडि आणि सागळ घेया :" "हो कां जी :" मग देइभागवतीं जाडि आणि सागळ घेतली : गोसावी सास्त्रमढा बीजें करिताति : तवं नरसींहांचीए जगतीपसिमे माहादास्त्रमु[१] जात वाटे भेटले : पाइं वाहाणा : सवे सीक्षु : तेणें वरि स्त्रीगीरि[२] धरिली असे : गोसावीयांतें देखिलें : वाहाणा फेडिलीया : स्त्रीगीरि[२] परती केली : गोसावीयांसि वामवस्त्र[३] केलें[४] : तवं गोसावीं कानसुलीं फुलली देखिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "वृधाप्य आलें मां :" "जी जी : थोडे दीस जाले :" मग ते परते नीघाले : ।।

गोसावीं सास्त्रमढा बीजें केलें : जगतीचा उतरामुख दारवठा : दारवठांचीए सोंडीए-वरि आसन जालें : जाडीवरि : गोसावीं तांबोळ प्रतेजुं आदरिलें : तवं देइभागवतीं म्हणीतलें : "जी जी : तांबोळ कां प्रतेजीतां असीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेनि[५] भगवेयांचेया ठाया जाओं नैए[६] :" मग तेहीं उगाळा आंजुळि ओडवली : उमाळ आंजुळि भरली : मग तेहीं तोंडीं घातलें : मग माए ना[७] : मग आंगुळीवरि दाटीति : गोसावीं गुळळा केला : मग सास्त्रमढांतु बीजें केलें : तवं पुढां संन्यासीं देखिले : "एइजो जी :"

---

५ **ने.** अशुद्धें.

**४६४.** १ **यमु.** °भीक्षे. २ **य.** साती. ३ **हीबी.** कायाप्रणीत. ४ **यमु.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "भीक्षे जात असीजे ?" "हो जी :" गोसावीं श्रीकरें (हातें स्पर्शीलें) परीसीलें : तवं गोसावीं कानसुलीं—. ५ **गोने.** ऐसेनसीं. ६ °**एवा.** राजसा धर्मीं निवर्ता (निवृत्ता) चेया आस्त्रमा जाओं नैए : ७ **यमु.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "अंगुळीवरि दाटा".

म्हणौनि आसन रचुं आदरिलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें नव्हे :" मग दाइभागवतीं आसन घातलें : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग पुसिलें : "हें काइ वाचीजताए[८] ?" "जी जी : हें वेदांत :" "वेदांतीं काइ प्रतीपाद्य?" "जी जी आत्मा :" "तो कैसा?" मग तीं बोलों आदरिला : बोलीला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तो काइ ऐसा ? तो ऐसा कीं[९] :" गोसावीं बोलिला : बोलत होते : तेयां स्तीति जाली : गोसावीं[१०] बीजें केलें तवं कुपीनु प्रवर्तना उसीरु जाला : माहादास्रमीं म्हणीतलें : "जा पां रे : संन्यासी आझुइं कां कुपीनु प्रवर्तना नैएति : काइ तेथ स्रीचांगदेओराउळीं बीजें केलें ?" आले तवं ते आवघे स्तीति भोगिताति : "हें काइ ? प्रसादा : कुपीनुप्रवर्तना उसीरु जाला : आझुइं कैसे नैयाचि[११] ?" आणि स्तीति भंगली : मग एरु एरांपुढें धांवे : मग माहादास्रमा सांघीतलें : 'तेथ गोसावीं बीजें केलें होतें :' तें माहादास्रमां न मनेचि : मग एरां चोरीया एरु दरीसना ए : मग संन्यासीयांचीचि[१२] वोळग दाटे : संन्यासी तांबोळाचा प्रसादु घेति : तें माहादास्रमीं जाणीतलें : मग म्हणीतलें : "आतां हे आमचा मार्गु उछेदीती :" मग[१३] एंत्रासन केलें : ॥

## ४६५ एंत्रासनपुर्वक माहादेओ आस्रमाची पूजास्वीकारु

[१]माहादेओआस्रमीं[२] म्हणीतलें : "हे चांगदेओराउळ आमचा मार्गु उछेदीती :" म्हणौनि कामाक्षाचां[३] देउळीं रंगपूजा केली : यंत्रासन रचीलें[४] : मग आपुलेयां[५] सीक्षांतें बोलाउं पाठवीलें : गोसावीं तेथ[६] बीजें केलें : सरीसे भट असति : उठीलें : "एइजो जी : एइजो जी :" मग गोसावीं डावेनि स्रीचरणिचेनि आंगुठेनि गोसावीं आसन ढाळिलें[७] : आणि आंगुठेनिकरुनि ऐसें खोविलें : मग गोसावी आसनीं उपवीष्ट

---

८ **एवा.** वाचता. ९ **यमुही.** मग गोसावीं निरूपण केलें : गोसावीयांसि नीरूपीतां ते वेधले ठेले : १० **एवा.** (**परशरामबास**) गोसावी तेथचि होते : ते अस्तीति भोगीति **बैसले** असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रसादु कुतपु :" (**एवा.** प्रसादु कुपिनु) आणि स्तीति भंगली. ११ **एवा.** न वचा. १२ **अगोपं.** संन्यास्यांचीचि. १३ **य.** वोखटेया प्रवर्त्तले.

**४६५.** १ **मु.** °गोसावीं मागा संन्यासीयां वेधु संक्रमीला : तीए दीवुनि संन्यासी अवघेचि वेधले : एराचोरीया दर्शना बीजें केलें : ऐसे अवघेचि एति : संन्यासीयांचीया वोळगि दाटे : तांबूळाचा प्रसाद घेति : चरणोदक घेति : हें अवघें माहादाश्रमीं जाणीतलें : मग म्हणीतलें :–. २ **यगोने.** माहादाश्रमीं. **बी.** महदाश्रमीं. ३ **य.** काळीकेचीया. **हीबी.** शास्त्रमढीं. ४ **हीबी.** मढु धुपीला : देवता आकर्खीलीया. ५ **यमु.** आपुले सीक्ष पुजा पाहावेया गोसावीयातें बोलाउं धाडीलें : ६ **हीबी.** °बीजें करिताति : सरीसे भट असति : भटीं फोडी वोळगवीलीया : वीडीया देत येताति : दारवठां पातले : आणि गोसावीं तांबोळ प्रतेजिलें : भटीं म्हणीतलें : "काइ जी : लवचिकरि कैसें तांबोळ प्रतेजिलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रवृताचां धर्मीं नीवृताचेया ठाया जावों नैये कीं गा :" ७ **यमु.** वोढिलें.

जाले : गोसावीयांसि वीडा ऊळगविला : गोसावीं रंगासि रूप केलें : चुक जेथ तेथ चुक दाखवीलें : नीकें तें मानिलें : मग गोसावीयांसि पूजा केली : वीडा ऊळगविला : मग गोसावीं बीजें केलें : मार्गीं भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीं स्त्रीचरणिचेन आंगुठेनकरुनि आसन कां ढाळीलें[७] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीहीं तें[८] यंत्र उधारीलें होतें गा : आवघीया देवता अव्हानुनि उर्धमुखा केलीया होतीया : मग एथौनि ढाळुनि अधोमुखा केलीया : तया आसनावरि जो बैसे तयातें घेति :" भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांसि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तयांचां ठाइं एकें सामृथ्यें असति : तीयें तऱ्हीं एथौनिचि सीधी नेइजति कीं गा[९] :" ।।

---

८ **यमु.** यंत्रासन केलें : मंत्रीकरुनि देवता उर्धमुखा केलीया असति : ९ **नेयमुपं.** °यावरि गोसावीं जरासंदाची गोष्टि सांघितली. (ही लीळा मागे **उत्त.** ११ मध्ये आलेली आहे. ती पाहावी.)

**पं.** प्रतीत प्रस्तुत लीळेच्या अनुषंगाने पुढील लीळा आलेली आहे :

**भानमतिए कपट दर्सन**

गोसावीयांसि गणपतिमठीं अवस्थान : सास्त्रमढीं एंत्रासनाउपरि भटांप्रति गोसावीं सांघीतलें : भटीं म्हणीतलें : "बापु श्रीकृष्णचक्रवर्ती मानवेंरितेयांसि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : दुर्योधनें केव्हढें कपट केलें : मां श्रीकृष्णु काइ वीकरले ?" भटीं म्हणीतलें : "ते कैसें जी न वीकरतीचि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : 'पांडव कव्हणी परी आंतुडतीचि ना :' मग दुर्योधनें म्हणीतलें : 'हा श्रीकृष्णु आणि हा बळभद्र : हेचि आंतुडउं : आणि आपैसेयाचि पांडव आंतुडती :' म्हणौनि सा मास रचना केली : मग मुळ पाठवीलें : श्रीकृष्णचक्रवती यादवांसहीत बीजें केलें : पांडवांसहीत हस्तनपुरा बीजें केलें : तवं दुर्योधनु हरकैला : 'आतां आंतुडले :' ऐसेन मनोधर्मेंसीं साउमां आला : सवें वीद्रुदेवही आले : दुख करीति : ऐसें म्हणति : 'हे सदैवं : यांसीं देवो बोलैल : यांसि खेवं देइल : याचेया घरा जाइल : मीं काइ पापिया नीर्देउ :' ऐसें दुख करीत तेही आले : सकळीकांसि लांवखेवें जालीं : मग श्रीकृष्ण-चक्रवर्त्ती म्हणीतलें : 'वीद्रुदेव हो : खेवं देया :' मग खेवं दीधलें : बळभद्रदेव मुक्षकरुनि दुर्योधनासरीसे पाठवीले : आपण उधवदेवाचा हातु धरुनु म्हणीतलें : 'वीद्रुदेव हो : चाला : तुमचेया घरासि जाओं :' मग तो आनंदें नीर्भरू जाला : पुढें चालतचालतां धोत्र सूटलें : लोकु म्हणे : 'वीद्रुदेव हो : धोत्र सूटलें :' ते म्हणति : 'माझेया घरासि देओ आला :' घरासि नेलें : तवं बैसों घालावेया कांहीं नाहीं : संभ्रमें घराची कुहीटि घातली : तवं ते पलंगपास्वडें जाले : सूपवतीया होति : मग श्रीचरण प्रक्षाळिले : प्रत्रावळी केलीया : धान्य मागौनि आले होते : ते तरन केलें होतें : तें वोळगवीलें : मग म्हणीतलें : 'चौदा भुवनांचा गोसावी माझा तो प्रीति पाओ :' ऐसें म्हणौनि दंडवत घातलें : पत्रावळीवरौनि पसरला : श्रीकृष्णचक्रवर्त्ती श्रीकरेंकरुनि आवरीति : परि आवरे ना :" श्रीकराचा अनुकारू : "तवं उधवदेवीं म्हणीतलें : 'सूद्रसेनाचेनि प्रतापें दैत्यदानव आवरिले : मां हा घाटा कैसा आवरे ना जी ?' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'हा घाटा नव्हे गा : हा यांचा भाओ मज आवरे ना : उधवदेव हो :' तैसेंचि दुर्योधनाचेया घरासि बीजें केलें : दुर्योधनें म्हणीतलें : 'तेयाचेया घरा गेलेति : मां काइ जेउं घातलें ?' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'भोजन काइ पुससि राजेया : भोजन गतजीर्ण : आदरू कां

## ४६६ पींपळेघाटीं भुतानंदाकरवि दधीभातु भोजन करवणें

भुतानंदीं[१] म्हणीतलें : आपुलीए लेंकितें : "नामाइसें[२] : आजि दधीभातु कालवीं पां : मग गोसावीयांलागि घेउनि जाओं[३] :" मग तेहीं बरवा दधिभातु घातला : साकवती : मग तीयें घेउनि आलीं : गोसावीयांतें बीढारीं पाहीलें : गोसावीं वीहरणां बीजें केलें : मग भवंतें पाहुनि पींपळेस्वराचेया घाटा आलीं : तवं भुक लागली : "हा दहीभातु जेउं : मग गोसावीयांलागौनि आणीकु आणुं : गोसावी तवं एवढा वेळुनि बीजें न करीतीचि :" मग[४] जेउं बैसलीं : घांस दोनि घेतले : तवं गोसावीं बीजें केलें : घाटीं तयांमागां उभे राहीले : ओसाइली तेयांवरि पडिली : आणि मागील वास पाहाति तवं गोसावी देखिले : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ बाइ : एथिचा दधीभातु कैसा जेवीत असा ?" "जी जी : एवढा वेळु गोसावीयांतें भवंतें पाहीलें : तवं गोसावीयांतें कव्हणी ठाइं देखेंचि ना : वाट पाहीली : मां भुकैलीयें जी : तें जेउं बैसलीयें : हा जेवीन : मग गोसावीयांलागौनि आणिकु घेउनि एइन : जी जी : मी आतां आणिकु आणिन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां आणाल तो काइ यासारिखा होइल ?" ।।

## ४६७ तथा गंधर्वपति नीरुपण

एकु दीसीं भुतानंदीं[१] आपुलेया सासुरेवासाची गोष्टि सांगीतली : "जी जी : मज थोरु सासुरेवासु :" सांघीतला[२] : "सात लेंकीचि जालीया :" मग सर्वज्ञें म्हणीतलें :

---

न पुससि राजेया ? तो आदरू अजरामरू न पुससि राजेया ?' तवं भानामती भेटति ना : दुख करूं लागली : 'हें काइ दादो : सा मास डोळे कुहीले जाले पाहुनरू नीफजवीतां : आणि वाट पाहातां : आणि तुं ऐसा :' म्हणौनि दुख करूं लागली : श्रीकृष्णचक्रवर्त्ती पोटेंसीं धरूनि संबोखीली : मग तेहीं म्हणीतलें : 'दादो श्रीकृष्णा : तुज पांडव काइ होति : मां कौरव काइ नव्हति ?' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'पांडव ते माझे भक्त : आणि हे सदाचे कपट ओ :' तेहीं म्हणीतलें : 'कैसे कपट ? हें पाहे पां तुजलागि कैसे आदर केले असति :' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'आइ : आम्हांसि आदर केले जे ते चाल दाखउं तुज :' म्हणौनि श्रीचरणीचेनि आंगुठेनि पासवडा परता केला : तवं धगधगीतें सस्त्रें देखीलीं : जैसीया काळानेयां सर्पाचीयां जीभा : ऐसें देखीलें : आणि भीयाली : 'बा : हें तुम्हांलागि केलें ?' 'नां आम्हांलागि केलें :' 'तरि यां पापियांसि वीस्वासों नको रे बा : ऐसे हे तरि यांचा नीर्वंसू होइल :' ऐसा श्रापू दीधला : तैसेंचि श्रीकृष्णचक्रवर्ती बीजें केलें :" ।। (**पं.** द्वापरलीळा ३८).

**४६६.** १ **य.** भुतानंदाची लेकि नाइसें : तीहीं गोसावीयांलागौनि दहीकरंबा केला. **मु.** भुतानंदीं आपुलीये लेंकी नागाइसांकरवि गोसावीयालागि दहीकरंबा करवीला : २ **गो.** नाइसें. **ने.** धानाइ : ३ **एवा.** जाइन. ४ **मु.** ऐसें वेवस्थुनि.

**४६७.** १ **यमु.** भूतानंदें गोसावीयांपुढें सासुरेवासु सांघीतला : "जी जी : स्त्रीत्व वोखटें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें आति ना : गंधर्वलोका जाल : मग मुदला गंधर्वाची राणीं होआल : तयाचीए मांडीएवरि बैसाल : कनकदंडीं वीजीजाल :" तीहीं म्हणीतलें : "हें काइ जी : तेथही गेलेयां स्त्रीत्व ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हो जा : तरि तोचि तुमची स्त्री होइल : तुमचीए मांडीएवरि बैसेल :" २ **ने.** राहिंला.

"भुतानंदा : आतां सासुरेवासु नव्हे : आतां एका गंधर्वाचीए पालखतीवरि बैसौनि[३] : मग एकु गंधर्व आइकां[४] :" "जी जी : तेंहीं पातलेयां स्त्रीपण न चुके :" म्हणौनि कांटाळा दीधला : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि तोचि तुमचीए पालखतीवरि बैसैल[५] :" ॥

## ४६८ उपासनीयां देहत्यागु

परमेश्वरपुरौनि[१] भक्तजनें आलीं : तेहीं गोसावीयांपुढां सांघीतलें : "जी जी : उपासनीयां स्तीति जाली : तेहीं तें अडीं घातलें : तयांचीया दोघी सीक्षीणी[२] होतीया : तेहीं घातलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा जीवा एथौनि म्हणीतलें तें नव्हवे : मग मरणा सरण जाए :" ॥

*मग भटीं म्हणीतलें : "जी जी : पुरुषु मरणा शरण जाए : तयाचें मरण चुके ऐसें काहीं आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति गा वानरेया : पुरुषु प्रमादु चुकवी तरि चुके :" "हो कां जी[३] :"* ॥

## ४६९ सेनपुंजीपात्रुत्व कथन

गोसावीयांसि ढोरेस्वरीं अवस्थान : गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेया-नंतरें दखिणीली जगतीचां दारवठां गोसावी उभे असति : तवं[१] एकि बाइल सेन पुंजिताए : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोर कैसें पात्र[२] :" "देइजो[३] कां : बाबा :" सर्वज्ञें म्हणीतलें[४] : "बाइ : एथ प्रवृति नाहीं :" ॥

---

**हीबी.** जाला **पं.** साहिला. ३ **हीबी.** °सुख भोगाल. ४ **य.** (**ही.** आइकाल). ५ **एवा.** बैसवीजैल.

**४६८.** १ **यमु.** उपासनीयें गोसावीयांतें पुसौनि परमेश्वरपुरा गेले : सीक्षीणीकरवि आपणेयांसि पुजापुरस्कार करवीति : मग एकु दी तया स्तीति जाली : ते अडीं घालुनि मेले : तयांपाठीं दोघीं सीक्षीणीहीं अडीं घालुनि मेलीया : मग रूधिपुरूनि भक्तिजनें आलीं—. २ **गो.** सीखीणी. ३ (**प्रव. आमा.** २१४).

**४६९.** १ **यमु.** °सेनपुंजी एकि अप्रास्य सेन पुंजीत (**य.** पुजीत) असे : गोसावी मार्गीं (**य.** वाटे) उभे राहीले : तीतें अवळोकुं लागले : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : काइ पाहीजत असीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरु जीवु कैसा पात्र :" २ °**एवा.** पोरि कैसी पात्र : ३ **हीबीपंगोमु.** दीजो. ४ **हीबी.** "ये दसे देवों नए बाइ :" "तरि कवणी दसे बाबा" सर्वज्ञें म्हणीतलें : "राजा ये दसे येइल : हे राजयाचिये दसेसि येइल तै दीजैल बाइ :". **पं.** °पुढां हे माहादेवो रायाचीए दसे एइल तै यांसि दीजैल : आणि माहादेवोराओ यांचीए दसे एइल तै तयांसि दीजैल :"

## ४७० सर्दोबा भेटि[१]

गोसावीयांसि प्रातःपुजा जाली : भक्तिजनां अवस्वरू दीधला : गोसावी वीहरणां बीजें करिताति : तवं स्रधोबा[२] एताति : हातीं सेळी : डोइए पाळणा : कडीए लेंकरूं : पासि तैसीए परीची स्त्री : ऐसे वाटा जाताति : गोसावीं भक्तिजनां दाखवीलें : " हे घेया गा स्रदोबा[२] : एथीचेनि बोधें बोधवंत : तयाची सरि न पवे चैतन्यविद्यावंतु : तेयासि ऐसेया परी मळीनता आली : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " जा पां नाएका : हातीं सेळी : डोइए पाळणा : एं काह्याचीं ऐसें पुसा पां : " आउसें गेलीं : " है रे : तुम्हीं काह्याचीं रे ? " तेहीं म्हणीतलें : " आम्हीं नागाराउळांचीं : " तेणें म्हणीतलें : " तुम्हीं कोणाचीं ? " आउसीं म्हणीतलें : " आम्हीं गोसावीयांचीं : " " गोसावी कवण ? नागाराउळ ? " एउनि आउसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " काह्याची रे ? नागा-राउळांचीं ? एथीचें नांवहीं नाहीं[३] ? "* [ सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणा एकाचा पाइकु सन्निपातैला असे : तो आपुलीया गोसावीयांसि म्हेळीएची सीवी दे : तो तेयाचें वोखटें नेधौनि हिताचि प्रवर्त्ते : म्हणे : ' यातें कव्हणी राखो गा : यातें जो राखैल तेयासि मीं एव्हढीं सोनेयाची रासी करीन : ' तेंचि सावधु जालेयावरि जरि म्हणे तरि सुरीया हाणौनि मारौनि फेडी : तैसें परमेश्वरातें जीवु म्हणे : देवतातें जीवु म्हणे : परि परमेश्वरु तेयाचें वोखटें नेघौनि ज्ञान देति : तेंचि जरि ज्ञान जालेयावरि म्हणे तरि अव्हेरिती[४] : " ॥ ]

बाइसीं म्हणीतलें : " बाबा : यासि हें काइ जालें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " संगातव : [ ऋषीशृंग स्त्रीपुरुष ऐसा विभागुही नेणे : परि संबंधें पोराचें चैतन्य गेलें : स्त्रीएचेनि दर्शनें : भाषणें पोरु धर्मापासौनि[५] गेला : तैसे स्त्रीपुरुषु विभागुही जाणे : आणि विखोही जाणे : मां हा कैसा न वचे[६] ? ] ईश्वरबोधें बोधवंतु : ईश्वरवीयोगें देसाचां सेवटीं जन्म क्षेपों जाए : स्मरणा वीलो पडैल म्हणौनि स्रधीत अंन भोजन करी : हा ठावोवेन्हीं घृणा जिंतिली : तेया संगास्तव ऐसें जालें : तो सवेतव एवंपर्यंत मैळे : " ॥

भक्तिजनीं पुसिलें : " जी जी : कव्हणी परी ऐसें जालें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " मागां झाडाचा तरसु[७] लागला : गाउन गांवां जाति : एकी गांवीं झाड सत्वस्त मीनलें : तीनि दी पाळलें : चौथां दीं एकु[८] आला : बैसला : तें सांडिलें : दुसरीया झाडाखालि बैसले : तेथही एउनि बैसला[९] : तें लागलेपण देखौनि बोलावीला : कांहीं

---

**४७०.** १ **गोने.** °सोधीचे ॥ **होबी.** °हे रूढि ॥ २ **गो.** श्रदोबा. **होबी.** सारदोबा. ३ (**होबी.**). ४ (**दृपा.** ३६. सन्निपातैलेयाचा दृष्टांत : " छर्दोबावरि भक्तिजनाप्रति निरूपिला : "**–दृस्थ.** यावरील दार्ष्टांतिक माझ्या मते स्वामींचे होय. म्हणून अंतर्भूत केले आहे). ५ **रावा.** तपा°. ६ (**दृपा.** ७९ ऋषीशृंगाचा दृष्टांत. 'भटांप्रति : **एवा.** भक्तिजनाप्रति निरुपिला :'**–दृस्थ एवा.** छर्दोबावरि). ७ **गो.** त्रासू. ८ **होबी.** कुनबी. ९ **होबी.** °कांही हुरडा संपादीला.

तयांसीं बोलों लागले : मग कांहीं कांजी भाजी आणीति : ते घेति : जेवीति : मग हळुहळु घ्रष्टि पडली[१०] : ऐसेयां तयासीं असकति मांडली : तो सरला : तयाचीया स्त्रीया म्हणीतलें : 'देउळीं जे पाठि घालीता ते एथचि पाठि घाला : एथचि जेवा :' तयांचें म्हणीतलें केलें : तेथ जेवीति : तेथचि पाठि घालीति : तया संगास्तव हा ठाओवेन्हीं गेला गा : म्हणौनि स्तीति : व्रीति अधीनां न व्हावें : एका झाडाची सवे न व्हावी : एका स्थानाची सवे न व्हावी : सवे ते काइसेयाचीही न होआवी :" ॥

*सर्वज्ञें म्हणीतलें : "तवं देसीं दुर्भिक्ष पडिलें म्हणौनि हा नीगाला*[१] [यावरि गोसावीं अहीरदेसीचीए म्हांतारीएचा दृष्टांतु निरूपिला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकि अहीरदेशीची म्हांतारी असे : ते लेंकुरुवांचेनि दुखेंकरूनि माहाराष्ट्रासि ये : ब्राह्मणा एकाचीए वोसरीए राहे : भीक्षा करी : पुराण आइके : मागिलां लेंकुरुवांचेनि दुखें तयाचेया लेंकुरुवांसि वोसरीए टेंकों नेदी : आपण तेयांची वास न पाहे : ऐसें असतअसतां तेयां लेंकुरुवांची माए सरली : मग तो ब्राह्मणु म्हणे : "आइ : मी जोडुनि आणीन : तुम्हीं उकडौनि घाला :" "हो कां :" काइ वडपींपळ लावीजति ना : ऐसें म्हणौनि करी : ऐसें असतअसतां तोही सरे : मग तीएं तीयेसीचि पोसावीं लागति[११] : कांडादळा : तथा करंडा[१२] करौनी तयातें पोसी : ऐसें असतअसतां तीएंहीं सरलीं : मग तीएचेया दुखासि कांहीं पारावारू नाही[१३] " ॥]

## ४७१ श्रेष्ठत्व तथा अन्यधर्मनिषेध निरूपण*

[मग एकु दीं भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीं 'एका स्थानाची सवे न व्हावी :' म्हणीतलें : तरि बळवत्तर काइ पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तवंपर्यंत असावें जवं आपुलें श्रेष्टत्व नष्टत्व प्रकाशे ना :" भटीं म्हणीतलें : "श्रेष्टत्व नष्टत्व प्रकाशे तेणें काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रेष्टत्व प्रकाशे तेणें उपद्रो उठीं :" भटीं म्हणीतलें : "जी जी :

---

१० **हीबी.** कुणबीएं म्हणीतलें : "माझेया सेताचीये मेरे झाड बरवें आहे तेथ बैसा :" एरी दीसीं म्हणीतले : "माझेया मळेयाची साउली बरवी आहे तेथ बैसा :" एरी दीसीं म्हणीतले : "माळेयावरी बैसा :" एरी दीसीं म्हणीतलें : "देऊळीं नीद्रा करीतां ते आमुची वोसरी बरी आहे तेथ करा :" ऐसे आपलवले : मग तो कुणबी सरला : कुणबीणी म्हणीतलें : "सांडो नोका :" तयाचें म्हणीतलें केलें : तवं देसीं दुर्भिक्ष पडिलें : म्हणौनि घेउनि नीगाला : ११ **एवा.** °कुळवाडी करौनि. १२ **एवा.** कोंडा. १३ (**दृपा.** ९१. अहीरदेसीचीए म्हांतारीएचा दृष्टांत : 'रामदेवाप्रति छर्दोबावरी पैठणीं : **एवा.** भक्तिजनाप्रति. निरूपिला–**दृस्थ**).

**४७१.** *(**प्रव. आमा.** ९–१२).

अन्यधर्मे विकारु उपजे तेणें काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अन्यधर्मे पुरुषु धर्मापासौनि जाए : विकारें पुरुषु धर्मापासौनि जाए :" भटीं म्हणीतलें : "जी जी : आपणेयां उपद्रो उठी तरि काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : आपणेयां उपद्रो उठी तयाचा असंबंध कीजे :" ।। ]

## ४७२ त्रिविध वेध निरूपण*

[ प्रत्यस्थानीं अवस्थान : वेधनिरूपण : महदाइसें पुराण आइकौनि आलीं : मग पुसिलें : "जी जी : पुराणीं त्रिविध वेध बोलिजताए : हे साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : ते ते केवि जाणति ? ते तुम्हां एथौनि निरोपिजेति : आन्नव : शाक्तेय : शांभव : ऐसा त्रिविध वेध : आन्नवीं साध्य : साधन : साधकु : ऐसी त्रिविध प्रतीति : शाक्तेयीं साध्य : साधकु ऐसी द्वीध प्रतीति : शांभवीं साध्य प्रतीति : आवेशु : अवस्ता : स्तीति : *विद्यावंता ईश्वरीं पुरुष ऐसी प्रतीति*[१] :" ।। ]

## ४७३ घुइनाएका कर्मनिरूपण*

[ गोसावीयांसि प्रत्यस्थानीं नागनाथीं अवस्थान : एकु दीं घुइनाएकु सेकुटाहुनि गोसावीयांचीया दरीसना आले : भेटिविधि सारिला : मग तेहीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : या कर्माची गती किंपर्यंत ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : कर्मवसें जीवु सकळही पावे : एक वांचौनि :" "जी जी : एक तें कवण ? आणि आन्येक ते कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एक तें अच्युत पद : आन्यकें च्युतिमंतें पदें :" "जी जी : तयाची सीमा कीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "चैतन्यफळआदिकरौनि सकळ फळें च्युतिमंतें बोलिजेति : चैतन्यापर परमेश्वरु पाविजे तें अच्युत पद बोलिजे :" "हो कां जी :" यावरि घुइनाएकीं पुसिलें : "जी जी : जिया क्रिया जीवासि कर्म निफजे तीएचें रूप कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "क्रिया उभयरूपा :" "जी जी : उभएरूपें तीए कवणें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "संत : असंत : मग मिश्र ते तेयाचिमाजि :" "हो कां जी : तरि जीवासि वेगा संत जोडे कीं असंत जोडे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : जीवासि असंत वेगा जोडे : जीवु क्षेणा एका माजि तें एकु आपजवी : आपणेयांसि जें जन्माचां सहस्त्रीं निस्तरों न सरे : तें ऐसें जोडे : तैसें संत ना जोडे :" "हो कां जी : तरि ऐसें कर्म कवणीए भूमी निफजे : निमे : तें सांगिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कर्मभूमी एक करीतां एक नीमे : एक निफजे :

---

**४७२.** *(**प्रव. वि.** २४–२७).
१ (**प्रव. विमा.** १८३).
**४७३.** *(**प्रव. वि.** २०५–२१२. °हे लीळा बाइदेवोबामुखें आनुष्टीली).

स्वर्गीं नरकीं असे ते नीमे :" "हो कां जी : तरि कर्मभूमीमध्यें संतासंत काइसेनि निफजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्ञानें संत निफजे : अन्यथाज्ञानें असंत निफजे :" "जी जी : अन्यथाज्ञान तें कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तें छांदस पानीबुडीयाचें वाक्य म्हणा पां :" मग तें वाक्य भटीं म्हणीतलें : "यः करोति सुरापानं ब्रह्महत्याशुभं भवेत् । पातकं तस्य लोकेऽस्मिन् रौरवं नरकं व्रजेत् :" ऐसें वाक्य गोसावीं आइकौनि घुइनाएकातें म्हणीतलें : "देखिलें गा : कें जोन्हळेयांचें पाणी आणि धामोडेयाची साली : आणि कें ब्रह्महननू : परि हा ठावोवेऱ्हीं मत्त द्रव्य दूषिलें : तैसें एथ नाहीं : परमेश्वरशास्त्रीं एवं वा नाहीं : पर्याय नाहीं : अभावीं भावरूप फळ नाहीं : अकरणीं प्रत्यवायो नाहीं :" "हो कां जी :" यावरि घुइनाएकें पुसिलें : "जी जी : कर्मभूमी कवण संख्या ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हिमासेतुमध्यें पांच शतें कर्मभूमि :" "हो कां जी : तरि कर्मभूमीमध्यें कवण आर्जक ? कवण फळदातें ? कवण व्यापारतें ? कवण उद्धरीता ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवु आर्जकु : देवता फळदाती : चैतन्य व्यापारतें : परमेश्वरू उद्धरीता :" "हो कां जी : इतुकेयासि काइ संख्या ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अनंतें ब्रह्मांडें : अनंता देवता अनंत जीवु : अनंत परमेश्वरू :" "हो कां जी :" ऐसें गोसावीं निरूपीलें : तें तेहीं घोकीलें : मग दंडवतें करौनि आपुलेया गावा गेले : ।। ]

## ४७४ माहादाइसां उतमरस्मिरहस्य निरुपण

माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : द्वारावतीकारां गोसावीयांपासौनि अपार वीद्यावंत आइकीजताति : आणि गोसावीयांपासौनि कव्हणी नाइकीजति : तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथचेया[1] संबंधा गेले तेतुलेही प्राणीये सत्वस्त : म्हणौनि[2] उतमे रस्मिचा संचारु जाला : एथचेया[3] संबंधा गेले तेतुलेही प्राणीये तामस : म्हणौनि उतमे रस्मिचा संचारु नव्हेचि :" ।।

## ४७५ भोजेया काळवंचना

*गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु होउनि गोसावी आसनीं उपविष्ट असति : तवं दायंबायें म्हणीतलें : "जी जी : नाथपंथीं काळवंचना बोलीजताये : ते साच जी[1] ?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "वर्तिजे[2] : भोजेया : काळवंचना एकि आति गा :" "जी जी : ते कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हा आत्मा असे : देह जातांसमें एक स्थान असे : तेथ लपवीजे : काळु ए : तो भीतरि पाहुनि जाए : मग काढीजे :" दायंवायें म्हणीतलें :

---

**४७४.** १ पं. एथचेया. २ (यमु.) °तेयां. ३ पं. तेथचेया.

**४७५.** १ (होबी.). २ यमुने.*

" जी जी : तरि[3] म्हांतारपण एइल कीं[4] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " म्हांतारपण न[5] ए : तें आणीक असे : " " ना[6] जी : म्हांतारपण एइल : मग हा आत्मा काइसेनहीं जाए ना : मग पोटीं सुरी सुआवी ऐसें उपजैल[7] : तरि काइ करावें असे ? "

*सर्वज्ञें म्हणीतलें : " देह न वचे ऐसें आणीकही असे : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " वज्रोळी : अमरोळी : सिद्धोळी : दिव्योळी : इया च्यान्ही ओळी नाथांचिया : कळियुगीं वज्रोळी : अमरोळी आति : सिद्धोळी दिव्योळी नाहीं : हे च्यान्ही अष्टभैरवांचे आगम बाहियांग : अष्टभैरवांचां ठाइं दिग्देशु : काळु : लोकु नाहीं[8] : " ।।*

## ४७६ वस्त्रतुल्यत्व अनुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळिका : हें तुम्हां काळेंकरुनि वस्त्रतुल्य होइल गा : वस्त्र देखीलेयां : पुर्वीं आम्हीं ऐसें एक वस्त्र पांगुरलों होतों[1] : " ।।

## ४७७ पांडेयाप्रति निराकारणें

एकु दीसीं सारंगपंडीत म्हणति : " मज जैसे गोसावी आवडति तैसें कांहींचि नावडे : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : हें तुम्हां दारिचेया खूंटेया इतुलें[1] न पढीए गा : " ।।

---

३ **अहीबी.** °मज. **यमु.** ° " तरि. म्हांतारीयां होइजे कीं नव्हीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " म्हांतारीयां होइजे : " ४ **ना.** (अज्ञात). °यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " एथौनि तेहीं नाहीं : आयुष्य चढे अपवाडें मृत्यू रीगाबा नाहीं : " " जी जी : तैसें काहीं देखिजे ना : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पांडेया : विद्यासाधन काइ लटिकें ?" इतुकें नीरूपण जालें : मग गोसावी धेंडेखांडीहुनि बीजें करितां पूर्वप्रांतीं दर्शनाचा आभासु दाविला : पर नुमटेचि : ।। ६६ ।। ५ (**यगोनेहीबी.**). ६ **यमु.** " तरि नको जी : खें खें (**एवा.** बखबख) करीतां असावें तरि काइ करावें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " म्हांतारीयां नव्हे : तें आणीक एक असे : " ७ **पं.** °जी जी : हा आत्मा कवणी ठाइं लपवीजे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " चंद्रसूर्याचां संपुष्टीं लपवीजे : मग स्वासउस्वास पारूखति : क्षुधापीपासा नीवर्ते : चळनवळन पारूखे : सतरावी कळा अमृत श्रवे : ऐसा काष्ठी लयंगत बैसलेयां युगें जाती : परि तो असतु असे : अव्हांतें कां श्रृष्टिकाळीं संहारे तव असतुचि असे : " " जी जी : तरि गोसावी होती कीं नव्हती ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : तेणें काइ देवो होईल गा ? तेयांसि नरक : मां नरकचि : " ।। ८ (**प्रव. विमा.** १७३–१७५).

**४७६.** १ **पं.** °ऐसेंचि नेसलां होतां. ऐसें तुम्हीं : जैसेचि हे क्षेत्री तैसेचि आम्हीं : जैसेची हे ब्राह्मण तैसेचि आम्हीं ब्राह्मण : जैसें अर्जूनदेवीं म्हणीतलें : तुम्हींहीं लेंकरूं : आणि आम्हांहीं लेंकरूं : तुं देवकीचां उसंगीं उदरीं जन्मलासि : मी कोंतीएचां उसंगीं उदरीं जन्मलां : तुझें उसीटें आम्हीं खादलें : आणि आमचें उसीटें तुआं खादलें : ऐसें सम देखीजे परि सामर्थ्य नेदखति : तैसें गा काळेंकरूनि हें तुम्हां वस्त्रतुल्य होईल : " ।।

**४७७.** १ अ. इतुकें.

## ४७८ द्रीष्टमूर्तिसाद्रीस्य भटां अनुवादु

गोसावीयांसि गणपति मढीं अवस्थान : गोसावीयांचीए[१] प्रवृतीसि भक्तजनें वोळगति : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां[२] ऐसें करीतां : पाठीं एथीचेया सारीखेया पाठीं धावाल[३] :" तवं नाथोबायें म्हणीतलें : "ना जी : आम्हीं आपुले गोसावी बरवेपणें ओळखौनि : आमचेयां गोसावीयांचें बरवेपण कोण्हीं ठाइं नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचेया-सारिखे अन्येत्र आति[४] : परि एथिची दैवी ते क्वापि नाहीं :" एतुलेन नाथोबा उगेचि राहीले : मग गोसावीं माहादाइसांची वास पाहीली : माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं आपुले गोसावी कांदीकरौनि ओळखौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हेंहीं अनेत्र आति :" मग गोसावीं भटांची वास पाहीली : तवं भटीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं आपुले गोसावी सास्त्रेंकरौनि ओळखौनि : आमचेया गोसावीयांचें सास्त्र कव्हणी ठाइं नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सास्त्र भक्ताचां ठाइं असे :" एतुलेनि भट उगेचि राहीले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं म्हणीतलें तें तैसेंचि गा :" "जी जी : मां सास्त्र भक्ताचां ठाइं असे कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भक्त आपणेंयातें देओ न म्हणवी कीं गा :" *यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : भक्तां काइ सामर्थ्यें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भक्त अपरधर्मापासौनि काढी : परधर्मीं लावी :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : इतुलेंचि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरे हो : हें काइ सानें ? हें काइ कव्हणें ठाइं असे[५] ?"* ।।

## ४७९ माहादाइसां नेत्रदीप अनुवादु

माहादाइसीं[१] गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : जैसे गोसावीयांचे डोळे बरवे : तैसेचि काइ जी गुजरातेचेयां : आवघेयां मानुसांचे डोळे बरवे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : गुजरात म्हणिजे डोळेयांचें दीप कीं :" ।।

## ४८० रामदेवां ब्रम्हवीद्या निराकारणें

रामदेवीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं आम्हांसि वीद्यामार्ग नीरुपावे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ एकि ब्रह्मवीद्या असे : ते पुसिजे : ते र्चाचिजे ना

---

४७८. १ **यमुगोनेही.** गोसावीयांची प्रवृत्ति. २ **एवा.** "आतां एथ ऐसें करीत असा : मग एथचें सारीखे देखाल : नीउनावी कीत सारिखें आति : (**शोध** : एथीचें सारीखें अन्यत्र आति :") ३ °**एवा.** ।। गोसावीयांसि दुपाहारीचा पुजाअवस्वरू जाला : आरोगण जाली : पहुडु होउनि उपहुडु असे : गोसावी सएनासनीं असति : नाथोबा स्रीचरण रगडिताति : आणि ऐसें आळंगीताति : सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां ऐसें–. ४ **एवा.** "एथचेयासारीखें अन्यत्र आति :" ५ (**प्रव. वि.** १३९-१४०).

४७९. १ **यमु.** पुर्वीं महदाइसें द्वारावतीये गेलीं होतीं : तेथ गुजरातेचेया अवघेयां मानुसांचे डोळे बरवे देखिले होते : मग एकु दीं गोसावीयांचेया डोळेयाउपरि आठवलें –.

कां ?" "ना जी : आपुली ब्रम्हवीद्या रायाराणी करावी : आमचे वीद्यामार्गचि ते आम्हां निरुपावे :" यावरि गोसावीं घासाचा द्रीष्टांतु निरुपिला :" ॥

[सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकि माता असे : ते हातीं तुपाभाताची वाटी घेउनि लेंकुरुवांचां तोंडीं घासु सूए : तें तोंड ऐसें पळवी : ऐसें पळवी : मग ते म्हणे : 'आलें असैल आलेयापालेया पोट भरूनि :' म्हणौनि वाटी खालि ठेवी : तैसे विद्यामार्गीचि नावें आलेपाले असति : तेथ ब्रम्हविद्या कें रीगैल[1] ?" ॥]

*मग रामदेवीं विनविलें : " जी जी : गोसावी परमेश्वरू : जो जें मागे तें तेया देति : तरी आम्हीं हेंचि निरोपिजो जी :" मग गोसावीं विद्यामार्ग निरूपिला : यावरि भटीं पुसिलें : "जी जी : विद्यामार्गु परमेश्वरू जीवांसि केसेया परी देति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साक्षात्कारें देति :" "जी जी : स्वीकरीति कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरू स्वयें विद्या स्वीकरीति : जैसे द्वारावतीकार श्रीचांगदेओ राउळ :" यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : द्वारावतीकारापासौनि कव्हणासि काइ जालें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : द्वारावतीकारापासौनि अनंता सिद्धी : अनंता प्रकटीलीया : सुपेनि हाणति तेयांसि मार्ग प्रकटेती : खराटेनि हाणति तेयांसि विद्या प्रकटेति : तेथौनि दुंडिराउळां मंत्रजात वीदीत :" "जी जी : विद्या कव्हणासि जाली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेथौनि बावनां पुरुषां विद्यादान :" "जी जी : खराटेनि विद्या कैसीया होति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : इंद्रिएद्वारक शक्तिसंचारू :" "जी जी : ईश्वर विद्या देति तेयासि कव्हण व्यापारवी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीएची विद्या तेचि व्यापारवी : देवता ने आणि करी : करवी : आपुला भक्त ऐसें म्हणे :" "हो कां जी :" भटीं पुसिलें : "जी जी : विद्यावंताचेनि सृष्टि संहारवे ऐसें काही आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : विद्यावंतु पुरुषु होए : परि सृष्टिसंहार करितां समर्थ नव्हे :" तवं रामदेवीं पुसिलें : "जी जी : विद्या जालयां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सहश्र वरुषें आयुष्य रायें ईश्वरत्वें मानीति : त्रिकाळ ज्ञान : इतुकें प्रकटे :" "हो कां जी[2] :" ॥*

*भटीं पुसिलें : "जी जी : जैसें बाहिर्यागें फळीं अंतराय असे तैसें विद्ये असे कीं नसे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तैसे विद्ये नाहीं : विद्ये निरंतर फळ :" "हो कां जी : तरि विद्ये कवण फळ ? आणि बहिर्यागीं कवण फळ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जेंचि अंतर्यागें पाविजे तेंचि बहिर्यागें पाविजे :" "जी जी : परमेश्वरू स्वयें विद्या देति तरि देवता काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : निमित्तातें साक्षी करौनि देवता विद्या दे :" "हो कां जी[3] :" ॥*

---

**४८०.** १ (**दृपा.** २५. तुपाभाताचिया घासाचा दृष्टांत. 'देवाप्रति विद्या रायाराणीवरि निरूपिला' **दृस्थ.** या दृष्टांतावरील दार्ष्टीतिक माझ्या मते सर्वज्ञांचे होय म्हणून अंतर्भूत केले आहे). २ (**प्रव. विमा.** ४९ ते ५८). ३ (**प्रव. विमा.** ६० ते ६२).

*तैसेंचि रामदेव दंडवतें करूनि बळ्हेग्रामासि गेले : तेथ अवघां महाजनापासि विद्यामार्ग-निरूपण केलें : मग सेनपुंजी सेन पुंजीतां मोटा पोहो घेउनि धाकुटेया पोहावरि घालिती : आणि म्हणति : ' हे महान्नव आन्नवांत घातले : ' तयाचि परी धाकुटा थोरावरि घालती : आणि म्हणति : ' हे आन्नव महान्नवांत घातले : ' ऐसा अनादरें नाच होउं लागला : गोवळरूवेंहीं आन्नव : महान्नव : ऐसीं देवतांचीं नांवें घेति : तें उपाधीं आइकौनि गोसावीयांपासि आले : सांघितलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " बटिका : पोरा जीवासि सामग्री जाली तरि बाहिरी घालितां वेळुचि न लगे[४] : " याउपरि गोसावीं भक्तिजनांतें म्हणीतलें : " सेवाळैलें खडक असे : तेयावरि पाओ देवोंचि नैए : ऐसांहीं दीजे तरि नीसरौनि पाडी : गुडघे कोंपर झांजरति : तैसें तामसांप्रति बोलोंचि नैए : ऐसांहीं बोलिजे तरि दुखातेंचि दे : राजसां तामसां धर्मी अधिकारू नाहीं[५] : " ॥*

## ४८१ सकळ सास्त्रांचा सीधांत जाणें म्हणणें

गोसावीं पीठजैए वीहरणां बीजें केलें होतें : मग वाळुवंटें ढोरेस्वराकडे[१] बीजें करीत होते : मागिलांकडौनि[२] भक्तजनमांदी सरीसी धांवत जाताए : ब्राम्हण पींपळेस्वराकडौनि एत होते : गोसावी पाठिमोरे जाले आणि तेहीं ब्राम्हणीं म्हणीतलें : "हे चांगदेओराउळ गोसावी काइ जाणति ?" आणि गोसावी प्रतौनि[३] उभे राहीले : मग म्हणीतलें : "हें सकळ सीधांताचा[४] मतीतार्थु जाणे :" आणि ते उगेचि राहीले : गोसावीं बीजें केलें : ॥

## ४८२ जीवाअवीद्ये वीभागु करुं जाणें म्हणणें

एकु दीसीं गोसावी नगराकडौनि वाळुवंठें ढोरेस्वराकडे[१] बीजें करिताति : सरीसी भक्तजनांची मांदी[२] : तवं पींपळेस्वराकडौनि ब्राम्हण एत होते : तेहीं गोसावीयांतें देखिलें : गोसावी पाठिमोरे जाले : मग तीं म्हणीतलें : " हें चांगदेओराउळ काइ जाणति ?" आणि प्रतौनि[३] उभे राहीले : मग म्हणीतलें : " हें[४] *सकळ शास्त्राचा मतीतार्थ जाणे*[५] : जीवा अवीद्ये वीभागु करुं जाणे : जैसें[६] बापापुतां वांटलें : जैसा अर्था अर्थु संबंधु नाहीं : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणा एका आंताचीए सवडी वज्रकीटकी लागली असे : ते आगीं जाळितां जळे ना : पांणीयांतु बुडे ना : शस्त्रें छेदे ना : घणवरि पींटीतां परि मरे*

---

४ (**प्रव.** आ. १८१). ५ (**वृपा.** २६. सेवाळलेया खडकाचा दृष्टांत. ' देवाप्रति निरूपिला : **एवा.** देवांउपरि भक्तिजनाप्रति '– **दृस्थ.** यावरील हे दार्ष्टांतिक स्वामींचेच असावे म्हणून अंतर्भूत केले आहे ).

**४८१.** १ **यमु.** °गोसावी गजगती जाताति. **पं.** °गजगती बीजें–. २ **यमु.** °भक्तजनांची मांदी (**मु.** घसरें) धावति असे. ३ **यमुहीने.** परतौनि. ४ **एवा.** सास्त्रांचा.

**४८२.** १ **यमु.** °गजगती बीजें करिताति. २ **यमु.** (**मु.** °घसरें) धावति असे. ३ **यमुहीने.** परतौनि. ४ **यमु.** °आणीक कांहींचि नेणे : जीवा अविद्ये–. ५ (**प्रव.** नवप्रकरणाचा). ६ **यमु.** जैसें अर्था

*ना : सांडसवारि तोडीतां परि तुटे ना : कव्हणीचि रोगु नेणे : अधिका दु:खचि होए : एकाधा एकु रोगु जाणे : परि उपावो नेणे : एकाधा उपावो जाणे परि रोगु नेणे : एकाधा एकु जाणता ये : तो रोगुही जाणे आणि उपावोही जाणे तो तेयातें अपये पाजी : तेणें ते चडफडौनि मरे : तैसे जीवासि अनादिअविद्या लागली असे : ते फेडावेया जीवु अनेग उपाए करी : तेणें अधीका नरकचि होति : मग परमेश्वरू आपुलीया कृपासक्तीकरूनि फेडीति तै फीटे*[७] : ऐसें म्हणीतलें : आणि उगेचि राहीले : ।।

*मग गोसावी ढोरेस्वरासि बीजें केलें : बाइसीं पुसिलें : "बाबा : अनादिअविद्या म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मूळाविद्या" "बाबा : मूळाविद्या म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अज्ञान : अविद्या :" यावरि गोसावी अविद्याछेदाची तीन वचनें निरूपिलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ परमेश्वरू जीवासी कृपा करीती : मग परमेश्वर आपुलिया कृपाशक्तिकरूनि तेयाची अनादिअविद्या छेदु करीति : मूळाविद्या छेदु करीति : अज्ञानछेदु करोति : अज्ञानछेदें करुनि अन्यथाज्ञानत्रुटि होए : आद्यमळत्रुटि होए : जीवत्वत्रुटि होए : तळिचील हाणितलेया वरिचील पडे : उतरंडीं गडबडी : यापरी परमेश्वरू तेयातें मायापारंगत करीति*[८] *:"* ऐसें निरूपण केलें : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ४८३ बाइसांकरवि सीळिका आणवणें

गोसावीयांसि मार्गीं गुळळा करावेया आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पैल सीळिका घेउनि या :" बाइसें गेलीं : तवं बोरीचीया डीरीया निगालीया असति : बाइसें पयोर्वातियें : आधीं हींसा करुं नैए : तीयें भेओं लागलीं : भवंतीं भवों लागलीं : तोडवे ना : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "भवंतीं भवंसी[१] तऱ्हीं दोनि सीळिका आणिसी[२] :" मग बाइसीं दोनि सीळिका आणिलीया : मग गोसावीयांसि ओळगवीलीया : मग दंतध्वन[३] जालें : गुळुळा जाला : वीडा ऊळगवीला : ।।

## ४८४ प्रज्ञासागरां आत्मज्ञानें मोक्ष निरूपण*

[ [१]गोसावीयांसि प्रत्यस्थानीं नागनाथीं अवस्थान : एकवेळ प्रज्ञासागरीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : या जीवासि मोक्षु काइसेनि होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आत्मज्ञानें

---

अर्थु संबंधु नाहीं. ७ (**दृपा.** २०. वज्रकीटकीएचादृष्टांत. **दृस्थ.**काराच्या मतें 'भटांप्रति खडकुलीए निरोपिला' तथापी या दृष्टांताचा वचनसंबंध लक्षात घेता तो या प्रसंगीच समर्पक दिसतो. यावरील दार्ष्टांतिक स्वामींचेच असले पाहिजे. त्याशिवाय दृष्टांत पूर्ण होत नाही. म्हणून अंतर्भूत केले आहे. ८ (**प्रव.** नवप्रकरणाचा. अविद्याछेदाची वचने सूत्रपाठातून घेतली आहेत).

**४८३.** १ **गोनेहीबी.** भवाल. २ **गोनेहीबी.** आणाल. ३ **गो.** °धवन. **ने.** °धावन.

**४८४.** *(**प्रव. वि.** १३२–१३४).

१ **नात नागाइसें°.**

मोक्षु : लींगपातें मोक्षु :" प्रज्ञासागरीं म्हणीतलें : "जी जी : आत्मज्ञान जालेयां काइ लींगपातु नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आत्मज्ञान जालेयां जीवु वासनेपासौनि मोकले : मळापासौनि मोकले : परि अविद्येपासौनि न मोकले : परमेश्वरु अविद्या निरसीति तै मुंचे : म्हणौनि लींगपातें मोक्षु :" यावरि प्रज्ञासागरीं पुसिलें : "जी जी : आत्मज्ञान जालेयां सकळही जीव वासनेपासौनि मोकलीति ऐसी तवं निष्टाचि नाहीं : एक मोकलीति : एक न मोकलीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्वभावो प्रकटे तै जीवु मुंचे :" "जी जी : स्वभावो म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्वभावो म्हणिजे स्वधर्मुदास्य :" "हो कां जी :" ।। ]

## ४८५ भोजेया नामकरण

एकु दीं दाइंबा गोसावीयांसि मर्दना देत होते : तवं तेलाचा थेंबु पडिला : तो गोसावीं स्रीकरिचेनि बोटें घेउनि स्रीचरणीं लावीला : मग याउपरि दाइंबायें भोजराजाची गोष्टि सांघीतली : सांघों सरली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि[१] तुम्हां नांव भोजराजु म्हणां :" मग एणें नांवें गोसावी बोलावीति[२] : ।।

## ४८६ मंडळीका नाम करणें

नाथोबायें[१] : नाथो तथा कान्हो कोरोचेया घरा रायाचे मंडळीक आले होते : तेयांची गोष्टि गोसावीयांपुढें सांगीतली[२] : सांघों सरली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तो तेथिचा मंडळीकु : तुम्हीं एथचे मंडळीक :" मग गोसावी तयांतें तेणें नांवें पाचारीति[३] : ।।

## ४८७ मारकंडा पंचनामकरण

मारकंडासि गोसावीयांचें दरीसन जालेयानंतरें : मग गोसावीं तयांतें पुसिलें : "तुम्हां नांव काइ ?" "जी जी : मज नांव भास्करु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भानु : भास्करु : तेज : मारकंडु : राणां देवीचा कंथु[१] :" मग गोसावी तेयांतें : "मारकंडा या :" एणें नांवें बोलावीति : ।।

## ४८८ श्रीप्रभु परमगुरु निक्षेदु[१]

रामदेवीं परमेश्वरपुरा जाओं आदरिलें : मग गोसावीं पुसिलें : "माहात्मे हो : तुम्हीं[२] *श्रीप्रभुचेया दर्शना*[३] कां जा ?" "जी जी : ते आमचें परम गुरू :" सर्वज्ञें

---

**४८५.** १ **गोनेहीबीपं.** ऐसें तरि–. २ **पं.** °हें प्रसादाचें नाव.

**४८६.** १ **अ.** °एकी वासना ।। २ **पं.** °जी जी : ते ऐसें बैसति : ऐसें उठति : ऐसें ठाकति :" ३ **एवा.** बोलावीति.

**४८७.** १ **गोनेहीबी.** कांतु. **मु.** (अज्ञात) कानादेवीचा कांतु.

**४८८.** १ **गोने.** नीखेदु. **हीबी.** नीषेदु. २ **अगोनेहीबी.** °परमेश्वरपुरा कां जा ?" ३ **(यमु.)**.

म्हणीतलें : " तुमचे परमगुरु ते कांतीएसि असति : " याउपरि गोसावीं कांतीएची गोष्टि सांघीतली[४] : ।।

## ४८९ गुरुप्रसंगें श्रीप्रभू थापे अनुवादु

वीद्यावंतु एकु गोसावीयांचेया दरीसनां आले होते : तेहीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : गोसावीयांचे गुरु कवण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " गुरु हें कव्हणी नेणें : श्रीप्रभु[१] थाप एकि दीधली[२] : तें हें आठउनि असे : " ।।

## ४९० बाइसां प्रस्णें संन्यधानीं कर्म बळिवंत कथन

एकु दीसीं बाइसीं गोसावीयांतें पुसिलें : " हां बाबा : यें आवघीं सुखें असति : आणि मज केधवांहीं सुख नाहीं : अखंड मीं जळतचि असें : हें काइ बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : संन्यधानी[१] जें घडलें ओखटें : तें संनिधानींचि भोगितां : परि ऐसांहीं[२] अन्येथात्व नाहीं : " ।।

## ४९१ पाठकअज्ञानप्रसंगें कोढावरि दादु

गोसावी कांहीं नीरुपण करीति : मग पाठक म्हणति : " होए : होए : जी : नाएकीं[१] ऐसेंचि बोलीलें असे : असेखां[२] सतपंथीं[३] ऐसेंचि बोलिलें असे : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " पाठा काइ पाठा : आधीचि अज्ञान : वरि लागलें अनेथाज्ञान : जैसी कोढावरि दादु : " ।।

## ४९२ तथा भीक्षाप्रसंगें चेष्टा अनुवादु

पाठक[१] तेथचे[२] तेथ चातुरवर्णीं भीक्षा करीति[३] : मग भक्तजनीं[४] गोसावीयांपुढां सांघीतलें : " जी जी : पाठकु यथ चातुर्वर्णीं भीक्षा करीति : " याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : " हें जाणिजे तेथ अति[५] चेष्टा न कीजति कीं : " ।।

---

४ पूर्वार्ध लीळा २५ पाहा.

**४८९.** १ **ने.** श्रीप्रभुची. २ **गोनेहीबी.** घेतली.

**४९०.** १ **ने.** संनिधानीं. **गो.** सन्येधानीं. २ **एवा.** कैसेंहीं. **पं.** काइसेनहीं.

**४९१.** १ **गो.** न्याइकीं. **ने.** नैयायिकीं. **हीबीपं.** नयायेकीं. २ **गो.** असकां. ३ **गो.** सतपथीं. **ने.** संपती.

**४९२.** १ **मु.** पाठकाचे सोएरे प्रतिष्ठानीं असेति : ते ब्राह्मण : उपासनीयांचे मेहुणे : ते तेथ—. २ **गोने.** तेथचां. ३ **मु.** °गोसावीं वारिलें होतें : मागुते भक्तजनें वारीति : ४ **मु.** महदाइसीं. ५ **मु. हीने.** येथेष्ट. **गो.** इचीष्ट.

## ४९३ पाठकभीक्षा भटीं प्रस्णू

एकु दीसीं पाठकीं म्हणीतलें : "जी जी : आतां जाइजैल : मां ऐसीचि भीक्षा कीजैल :" गोसावीं स्त्रीमुगुटें अनोज्ञा[१] दीधली : मग भटीं म्हणीतलें : "जी जी : आम्हांइं[२] ऐसीचि भीक्षा करुं एइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*एथौनि वारिलें तें न कीजे कीं*[३] : तुम्हां एथौनि म्हणीतलें तेंचि करणीये कीं गा : ना ऐसांहीं कराल : तरि बावीपोखरणी वर्जती[४] : पाणिवथे वर्जती : सीवाइलें[५] वीस्णुग्रहें वर्जती : तेणें त्रसाल : मग त्रसला सांतां जीउ देसाचेया सेवटा जाउनि सर्वअधमत्व[६] ब्रम्हण्यत्व स्वीकरील : *अल्पें अनिष्टें बहुत अनीष्ट परिहरे तरि परिहरिजे :" यावरि माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं अल्प अनिष्ट काइसेया सेवुं ? जो निरोध होईल तो साहुं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोंरे हो : तुम्हीं कांटेया अधीन होआल : मां त्रसाचा निरोध काइ साहाल ?" "हो कां जी न साहवे तरि त्रसु उपजों नेदुं : आणि काइ ?" गोसावीं मानीलें : यावरि माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : भिक्षान्न धणवरि जेवींजे : परि एक वेळ न गमे : दोनि वेळ न गमे तरि तीनि वेळां घेवों ए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें काइ बाइ : न गमे तरि तीनि वेळ घेतलें तरि काइ ?" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं*[७] : ।।

## ४९४ सुद्रसुखा अनुवादु

एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु सुद्रु : तो नदी हातपाए धुए[१] : लींग[२] पाहुनि मग घरासि जाए : बाजुलेयापासीं पीढें घेउनि बैसे : वोणवौनि बाजुलेयाखालि वोडवणें असे तें घे : मग तीया[३] उन[४] ठोंबरा रांधिला असे : तो थाळां घालौनि उन्हउन्ह ठोंबरा घेउनि ए : पळिए वीतीगी[५] करी : ते तया ठोंबरेयावरि घाली : दाळि तया ठोंबरेयावरि घाली : मग कालवी : थोरली पाळि[६] करी : मग ते पाळिभरि[७] वांगेयाचा[८] डफळा घे : तें जेवि : पाठीं गाडुवा[९] ऐसा[१०] ताका पीए : आंचवे[११] *तेथचि : मग तेथचि*[१२] हात दोनि सुपवती[१३] असे ते सरीसी आंथुरी : तयावरि नीजें : *घोंटी ऐसी फोडि : वाळलीं काळीं ऐसीं पानें : तेयांचें तांबोळ घे*[१४] : दोघी एकी सेंबुडीया कुवारी : तीया पोटावरि लोळति : मग म्हणे : 'आम्हीं थोरें सुखें असों :' " सर्वज्ञें म्हणीतलें : "आनीक एक सुख असे ऐसें जाणणेंहीं नाहीं :" ।।

---

**४९३.** १ **गो.** आज्ञा. २ **गोनेहीबी.** आम्हांहीं. ३ **(प्र. आ. २५३).** ४ **एवा.** वारीजती. ५ **गोने.** सीवाळीं. ६ **अ.** °अधर्मत्व. ७ **(प्रव. आ. १०८–११०).**

**४९४.** १ **य.** धोए. २ **गो.** लींगापासौनि मग–. ३ **अ.** तया. **होबी.** स्त्रीयां. ४ **यगो.** उन्ह. ५ **ने.** वीठीगी. **य.** वीतवी. **पं.** वीघरा. ६ **अ.** पातळि. ७ **अ.** पातळीवरि. ८ **गो.** वांगेयाचीया. ९ **यगोने.** गाडुगा. **ने.** गाडुगा एक मरडी ऐसें–. १० **गो.** ऐसेयां ताकां–. ११ **ने.** तेणेंचि हातें दुनी. सुपवती–. १२ **(गो.).** १३ **गो.** सुपती. १४ **(यगोनेहीबी.).**

## ४९५ मोळिकारसुखा अनुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें "कव्हणी एकु मोळिकारु : तयाचां पाइं तुटकीया वाहाणा : वाकांचे[१] वाध[२] : फाटकें कांबळें रगटें : तयासि दोरे घातले असति : तें पांगुरैल[३] तरि फाटैल म्हणौनि काखे गोळा करुनि सुए : मग उदेयां मोळीए जाए : मग तयाची चुंभळि करी : मग मोळी घेउनि ए : कहीं दामां वीके : कहीं रुवां[४] तीं वीके : मग तयाचे जोन्हळे घे : तें कांबळें पसरी : तेथ मोट बांधों न पुरे : लोन बांधों न पुरे : मग च्यान्ही पालव पोटेसीं धरुनि घेउनि ए : तीचां हातीं दे : आपण अवकासा जाए : ते तयाचा घाटा करी : रांधी : अवकासा बैसोनि ए : ते फुटकीए नरवंटीए पाणीं घालुनि दे : परुसा जाए तवं पाणीं गळौनि जाए : सौच्य[५] करी तवं हात अवकासां[६] भरे : *आबुली गाडुवां पाणी पाए धुए : वळणी धरे : तळिचील माती वारि लावी*[७] : मग ते घाटा रांधी : काष्टपात्रीं घाटा निवतु घाली : तो सरकाळवरि[८] नीववी : दोघी एकी सेंबुडीया कारी[९] सवें जेउं बैसति : तो जेवी : ते आणीक वाढों बैसे : तो म्हणे : 'पुरे पुरे : आपणेयांलागि ठेवि :' जेवि : मग तुटकीसी बाज : तयावरि फाटकीसी वाकळ आंथुरी : तयावरि नीजे : मग तोंडावरि कुहीटि गळे : मग[१०] वीखएवासना तीएची वास पाहे : मग ते म्हणे : 'चाला कां : जाओं माझेया माहेरा : तेथ लेंकरुवां दुभतें होइल : आम्हां खावेया होइल :' तो म्हणे : 'मा[११] या मानीली भुमि सांडुं न सकों : साहावासु[१२] :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसा कुहीला वीखो : परि तोहीं न संडे[१३] :" ।।

## ४९६ ग्रामेस्वरा गर्वा अनुवादु

एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु ग्रामेस्वरु : पारीं बैसला असे : तेयाची सुन कोनी रीगे : एकु तेयापुढां सांघावेया एति : 'तुमची सुन कोनी रीगाली : लेंकु जाला :' तो म्हणे : 'सुना कोनी रीगति : तरि लेंकचि होती : आमतें ऐसेंचि :' मीसीया आटु घाली :" तो स्त्रीकरें आटु अनुकारु दाखवीला : "'दासी कोनी रीगति : ते लेंकचि[१] होति : आमतें हें ऐसेंचि : *घोडीया पुसवति : तें सींगेंचि होंति : आमतें ऐसेंचि*[२] : गाइ वीति ते गोन्हेचि होति : आमतें ऐसेंचि : म्हैसी वीति : तीया वांठीचि होति : आमतें ऐसेंचि :'" सब्दप्रति स्त्रीकराचा अनुकारु : सर्वज्ञें म्हणीतलें : "पर वडुवे काळु बैसला असे : तेणें[३] दुखें आधा गेला असे : आधा केधवां गीळील तें नेणे :" ।।

---

**४९५.** १ **गोने.** वाखाचे. २ **गो.** बांध. **हींबी.** वाद. ३ **गोनेपं.** पांगुरैन. ४ **ने.** रूका वीके. ५ **अ.** सौचि. ६ **एवा.** अमेध्यें. ७ **(य.)**. ८ **अ.** स्त्रकाळ°. ९ **गोपं.** कूआरी. **ने.** कुमारी. १० **य.** °आबुलीपासि रीगे. ११ **हींबी.** "आमची जन्मभुमि हे कैसी सांडु?" १२ **य.** न सको साहावासु सांडुं. १३ **यगोपंने.** **(एवा.)** ऐसी कुहीली अवीद्या परि तेही न संडे.

**४९६.** १ **नेही.** लेकिचि. २ **(गोहींबी.)**. ३ **गोनेहींबी.** तो न देखे.

## ४९७ सुद्रवेखें अनुवादु

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें : एका देउळा वीहरणां बीजें केलें : बाइसेंमुक्षकरुनि[१] समस्तें भक्तजनें गोसावीयांसरीसीं असति : गोसावीं चौकीं आंगी-टोपरें फेडिलें : ठेविलें : कटप्रदेसीं[२] फुटा वेढिला : वीभुतिचे[३] टीळे सुद्राचेयासारिखे लावीले : मग नासीपासीं एउनि गोसावी उभे राहीले : दोन्हीं स्रीकर जोडिले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " सोरठीसोमनाथु : आवंढां[४] नागनाथु : परळीए वैजनाथु : सें लींगां : सहस्रु लींगां : कोडि लींगां : एक दंडवत : एक[५] दंडवत[५] : सांयांसि भलें : मांयांसि भलें : कांयांसि भलें : साउबाइसि[६] भलें : माउंबाइसि भलें : काउंबाइसि भलें : " आणि गोसावीं भक्तजनांकडे स्रीकरु जोडुनि बीजें केलें : " पावन बापेया[७] : पावन बापेया[७]: पावन बापेया[७]: " तवं बाइसीं म्हणीतलें : " हे काइ बाबा ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : सुद्रु देओ तो ऐसां पाहाती : " ।।

## ४९८ चक्रवाकां अनुवादें गुरुसिक्षां अज्ञान

सर्वज्ञें म्हणीतलें : " एकांचे दोघ सीक्ष : ते बाहीरि नीगालें: तवं डुकर चरत देखिलें : एकें एकातें पुसिलें : 'यो काहो[१] आहे रे ? ' एरें म्हणीतलें : 'यो मुखकव्रीधि[२] आहे रे :' एरें म्हणीतलें : 'ना रे : यो गजक्षेओ[३] होए रे :' एरें म्हणीतलें : 'आयोसु कहे त्या[४] होए :' म्हणौनि धरुनि घेउनि आले : तयापुढां घातलें : तवं तें कींकरि[५] बोबाइलें : 'आयोसु : यो काहो आहे ? यो कहे मुखक व्रीधि : हौं कहों गजक्षेओ : आम्हारा वेवादु तोडी बा : यो काहो आहे[६] रे ? ' तेणें म्हणीतलें : 'फट रे : मोरे पगप्रसादें तुम्हों एव्रोहीं न जाणों ? यो चक्रवाक आहे[७] रे :' " सर्वज्ञें म्हणीतलें : " ते वर सोए बोलत होते : तो तेंहीं नेणे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " अज्ञानु नीरसावेयाचीया चाडा जयाची जवळीक करा तेयाचें ज्ञान ऐसें : " *मग सर्वज्ञें म्हणीतलें : " आपणेयापसि ज्ञाताविरक्ताचा संगु कीजें[८] : " भटीं पुसिलें : " जी जी : ज्ञातविरक्त कैसेनि ओळखावा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : एकु शास्त्र जाणौनि बोलें : एकु नेणौनि बोलें[९] : "* ।।

## ४९९ स्रीपादा अनुवादें ब्राम्हणां अज्ञान

सर्वज्ञें म्हणीतलें : " आवघे वाटे पारीं पींपळीं बैसलें असति : तयांमाजि ब्राम्हणु एकु जाणता : मार्गें संन्यासी एक जात असति : ते तयां ब्राम्हणांतें पुसति[१] : 'हां गा : यें

---

**४९७.** १ **नेहीबी.** मुख्य°. २ **नेहीबी.** कटि°. ३ **गोनेहीबी.** °आडवे. ४ **गोनेहीबी.** आवंढे. ५ **नेहेबी.*** ६ **ने.** आइबाइसीं. ७ **पं.** चालेया.

**४९८.** १ **ने.** काहे. २ **गोपं.** वृधि. **ने.** वृत्ति. **हीबी.*** ३ **गोनेपं.** गजखेओ. ४ **एवा.** °साच. ५ **हीबीनेपं.** केंकरि. ६ **एवा.** अछे. ७ **ने. हैं. ही.** असे. ८ (**पंप्रव. आ.** १९६). ९ (**प्रव. आमा.** ११८).

**४९९.** १ **एवा.** पुसिलें.

काइ ?' तो म्हणे : 'यें श्रीपादें[२] :' 'यें कै दीसति ?' 'ना[३] आगपें आगपें तीयें सी सुदलेयां[४] दाढें[५] दीसति : मागसें मागसें तीएं कार्तिका[६] दाढें[७] दीसति :' 'तै यें कोठें असति ?' 'यें नैवळें[८] नैवळें[८] असति :' 'यें काइ खाति ?' 'ना बुडकळी देति : मासळीया खाति :'" सर्वज्ञें म्हणीतलें[९] : "वेव्हारामध्यें असौनि परि आपुलेया वेव्हाराचें ज्ञान नाहीं :"॥

## ५०० गोलटी गाए

सर्वज्ञें म्हणीतलें : "लाडु आणि लाडाची स्त्री घोडेयावरि बैसौनि मार्गें[१] जात असति : तवं मागिलाकडौनि एकु मऱ्हाटा आला : तवं लाडें पुसिलें : 'हां राउत : तुम्हांरा नांव काइ[२] ?' तेणें म्हणीतलें : 'आम्हांरा नांव वाघराउत :' आणि भीयाला : लाडें म्हणीतलें : 'आम्हांरा नांव पुसों[३] नाहीं ?' तेणें म्हणीतलें : 'तुम्हांरा नांव काइ ?' 'ना आम्हांरा नांव दसबाघराउत : दुइसींगरु[४] : और कुलडीभरि बींची :' तेणें म्हणीतलें : 'तुम्हीं काइसेयासि भीया ?' 'ना आम्हीं पाणीयासि भीयों :' तेणें लाडें पुसिलें : 'तुम्हीं काहोकुं[५] बीहो ?' तेणें म्हणीतलें : 'आम्हीं गोलटीए[६] गाइचेयां सींगासि[७] बीहो :' पुढां पातले तवं नदी भरली जातीए : लाडें म्हणीतलें : 'बाघराउत : आम्हें[८] उतरों नही ?' तेणें म्हणीतलें : 'आधीं तुमतें उतरों : कीं तुमची म्हौराळु[९] उतरुं ?' तेणें पोटीं वीचारिलें : 'आमतें उतरील : तरि आमची म्हौराळु[९] इकडौनिचि घेउनि जाइल :' 'आधीं आम्हारी म्हौराळु[९] उतारों : मग आमतें उतरि :' तेणें आधीं तें घोडें उतरिलें : तीतें उतरिलें : पैलाडि गेला : घोडें पालाणिलें : तीतें घोडेयावरि वाइलें : आणि जाओं लागला : तो म्हणे : 'ए बाघराउत : हां हुं दसबाघराउत : दुइसींगरु राउत : हौर कुलडीभरि बींची : आयो हौ रे : गोलटी[१०] गाएका सींग आया हो : आया हो : फुस फुस :' म्हणौनि नदीनदी[११] धांवे :" स्त्रीकरिचीयां आंगुळीयांचा अनुकारु : "तो घेउनि गेला :" ॥

## ५०१ आउसांप्रति वाकमु दीघमु अनुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : तुम्हां जाली वाकमु दीधमुची वानी[१] :" "ते कैसें जी स्वामी जगंनाथा ?" सर्वज्ञें म्हणीतलें[२] : "एकें एकाची पाइकै केली : तेयाचा धनी आवायासि[३] नीघाला : घोडें तयाचां हातीं दीधलें : आवायासि[४] गेला : तवं कऱ्हें

२ **गोने.** श्रीपदें. ३ **ही.** "ना ये कार्तीक मासां दीसति :" ४ **ने.** सीसुदाळेया. ५ **गोने.** दाडे. ६ **गोने.** कातीया. ७ **गो.** दाडे. **ने.** दाहाडे. ८ **हीबी.** नै वाहाळे. **एवा.** थडीवां. ९ **एवा.** °हा ठाओवेन्हीं धर्माअधर्माचें ज्ञान नाहीं :"

**५००.** १ **एवा.** वाटा. २ **एवा.** काहे आहे. ३ **गोने.** पूछो. ४ **ने.** ह्याळाइसें म्हणें : दुइशींग राउत. **गो.** दुइसींघ : रूत हौर कुलडीभरि–. **ही.** पांचवेउल. **बी.** वाचवेउल. ५ **हीबीने.** काहेकु. ६ **गोनेहीबी.** गोलडीए. ७ **ने.** वेसासि. ८ **गो.** आम्हारे. **ने.** तुमकू. **ही.** आम्हाकु उतारों नदी. ९ **गो.** म्हैराळु. **ने.** म्हेळारूं. **ही.** बैयेर. १० **गोनेहीबी.** गोलडी. ११ **हीबी.** थडियाथडिया.

**५०१.** १ **गोहीबी.** परी. २ **यमु.** °"कव्हणी एकु घोडेया बैसोनि जातु असे : जवळि एकु होता : तयाकरवि घोडें धरवीलें : ३ **गो.** वोआवया. **हीबी.** गावा. ४ **गो.** ओवाया. **हीबी.** संका–

पाणियांसि आलें : तवं घोडें बुजालें : घोडें नीघौनि गेलें : कडीयाळें हातीं राहीलें : मग म्हणताए : 'आगा आगा ऐला : सांघै[5] पैला : दीघुमु आलें : वाकुमु गेलें : ठीकठौळ हातीं ठेलें :' तैसी परि तुम्हां जाली नाएका : कवण आलें : कवण गेलें : ऐसें काहीं नेणां नाएका :" ।।

## ५०२ वचीष्टलवणाक्षान कथन

माहादाइसें पुराण आइकौनि आलीं : मग माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : वचीष्टलवणाक्षान[1] सांघताति : हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साच[2] बाइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "लवणु राओ सींहांसनीं बैसला होता : *पुढां पेखणें[3] होत असे[4]* : तवं लाघवीया एकु आला : तो सभेआंतु पीस भवंडुनि गेला : इतुलेनि तेयासि निद्रा आली : आणि तो हें[5] देखों लागला : तो पारधीसि नीगाला : तवं पुढां सोरु निगाला : तो सोरापाठीं लागला : परिवारु एकीकडे पडीला : सोरु जाताए : आणि घोडा पाठीं लागताए : सोरें एकी कडां[6] घातलें : आणि तेणें[7] घोडा प्रतवीला[8] : घोडा आवरे ना : तेणें एका वृक्षाची खांदी धरिली : घोडा नीगौनि गेला : तो तेया वृक्षातळि राहीला : रात्रि जाली : अनेगी परिचीं क्रुरें सावजें बोबाति : पक्षीकुळा[9] रात्रीं भेओं लागला : उदेयांचि उठिला : मार्गीं जाताए : तवं तान्हैला : भुकैला : ऐसा जाताए : तवं माहाराची[10] आंडोरि : तीचीए डोइए पाणियाचा करा : ते तापणेयांसि[11] जातीए : तवं तेणें म्हणीतलें : 'मज पाणीं पीओं घालि कां :' तवं तीया म्हणीतलें : 'मी माहारि[12] :' तवं तेणें म्हणीतलें : 'होसि ना कां माहारि[13] :' तवं तीया म्हणीतलें : 'माझा वरैतु होसी तरि घालीन :' तवं तेणें म्हणीतलें : 'हो होइन :' मग तीया तयासि पाणीं पेओं घातलें : मग ते पुढां : तो मागां : ऐसी ते माहारवडेया[14] घेउनि आली : आपुलेयां माएबापातें म्हणीतलें : 'मीयां आपणेयासि वरैतु जोडिला :' तीं म्हणीतलें : 'तुं दैवाची भाग्याची : तुवां आपणेयां वरैतु जोडिला :' मग तयासि तीघै लेंकरुवें जालीं : तेथ बारा वरीसें होता : मग तेथ दुकळु पडिला : मग तीयें तेथौनि नीगालीं : तवं एक लेंकरुं सरलें : तें संस्कारिलें : मग पुढां नीगालीं : तवं दुसरें सरलें : तेंहीं संस्कारिलें : मग पुढारीं निगालीं : तवं ते तान्हैली : 'आगा मीं तान्हैलीयें :' तो करा भरावेया गेला : करा भरुनि आणिला : तवं तीयें दोघें सरलीं : तीयें सौंस्कारिलीं : सरणावरि घातलीं : मग दुखें अरंबळला : मग सरणाआंतु उडी घालावेया आंग तुकाविलें[15] : तवं प्रधानें थापटिलें : आणि डोळे

---

परीहारा. ५ **एवा.** जेयाचा मी तयापुढें सांघै.

**५०२.** १ **गोने.** वसीष्टलवणाख्यान. २ **एवा.** आति. ३ **एवा.** बहुरूप. ४ (**हीबी.**). ५ **हीबी** स्वपन. **गोने.*** ६ **हीबी.** झांसी. ७ **ही.** तेणेंही झासीं घातलें. ८ **अ.** प्रतेजीला. **ने.** परतविला ९ **गोने.** पक्षि(क्ष)कुळें : **हीबी.** पक्षिकुळें वीसांवलीं : १० **हीबी.** मातांगाची. ११ **नेबी** पाणियांसि. १२ **हीबी.** मातांगी : पाणी कैसें पीसी ? १३ **हीबी.** मातांगी. १४ **गोने.** °वाडेया १५ **गोहीबी.** तुकीलें.

उघडिले : 'ऐया : काइ देखिलें तें साच : कीं हें साच ?' तवं प्रधानें पुसिलें : 'काइ ?' मग तेणें आवघी गोष्टि तयापुढें सांघीतली : मग ठाणां घोडा पाहाति : तवं घोडा नाहीं : मग तेणें म्हणीतलें : 'चाला : मीं ते ठाए दाखवीन :' मग पाहावेया गेले : 'मीं या वाटां पारधी नीगालां : या वाटां मीं पडिलां : एथ सोरु नीगाला : ए झांसीं सोरें घातलें : एथौनि घोडा प्रतवीला : या वृक्षाची खांदी म्यां धरिली : एथ माहाराची आंडोरि भेटली : एथ बारा वरिखें होतां :' तवं तो म्हांतारा बाहीरि नीगाला : तेहीं म्हणीतलें : 'आमचे जावाइ होते : ते दुकळाचां वरिखीं गेले : ते यांचिसारिखे होते :' मग तेथौनि निगाले : 'मग एक लेंकरुं एथ संस्कारिलें : एथ एक संस्कारिलें : एथ दोघें संस्कारिलीं : मग म्यां सरणांतु उडी घालावी तवं तुवां चेववीलें[१६]' : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "संसारु म्हणिजे हा दीर्घु स्वप्नू गा : साच म्हणौनि घेवों नए : लटिका म्हणौनि सांडों नैये :" *यावरि गोसावीं स्वप्नाचा आणि खाराणीएचा दृष्टांतु निरोपिला*[१७] : [सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु नीजैला असे : तो स्वप्न देखे : म्हणे : 'मीं वाघें खादलां : ऐसें दुःख भोगी : हस्ती वळघलां : ऐसें सुख भोगी : चेवो ए तवं दोन्हीं नाहीं : परि सुखदुख भोगिलें तें काइ लटिकें ? ना : सुखदुख भोगिलें तें साच : तरि वाघें खादला हें लटिकें : हस्ती वळघला हें लटिकें : परि सुखदुख भोगिलें तें साचचि[१८] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकु नीजैला असे : तो आंथरुणीं मुती : म्हणे : 'मीं दारां गेलां : सागळ घेतली : शौच्य केलें :' चेइला तवं लटिकें : परि खाराणि ते साच : ते धुतलेंयांवीण न फीटे[१९] :"] *मग सर्वज्ञें म्हणीतलें : "अज्ञान : अज्ञानीं अन्यथाज्ञान : अन्यथाज्ञानीं ज्ञान : निद्रा : स्वप्न : स्वप्नीं आत्मज्ञान*[२०] : " ।।

## ५०३ दायांबा संन्यासी भगवा

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरु जालेयानंतरें गोसावीं एका देउळा वीहरणां बीजें केलें : सरीसे दाइंबा असति : तेथ एक संन्यासी बैसले असति : गोसावीयांसि जेथ आसन रचावें तेथ तयांचीया वाहाणा असति : दायंबायें वाहाणा घेतलीया : घेउनि बाहीरि टाकीलीया : आणि ते कांपतकांपत उठिले : आणि आपुलीया वाहाणा घेउनि गेले : सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा भोजेया : कोण ठाओवेऱ्हीं जालेपण : वाहाणा बाहीरि घातलीया : जैसा कांहीं हाचि बाहीरि घातला होए :" मग दायंबायें गोसावीयांसि आसन रचिलें : तेथ गोसावीयांसि आसन जालें : ।।

---

१६ **गो.** चेववीलां. १७ (**संपादक.** यापुढील दोन्ही दृष्टांत 'दृष्टांतपाठा'तून घेतले आहेत). १८ (**दृपा.** १०४. स्वप्नाचा दृष्टांत. 'माहादाइसांप्रति लवणाक्षावरि निरूपिला'—**दृस्थ**). १९ (**दृपा.** १०५. खाराणीएचा दृष्टांत. 'पद्मनाभीप्रति कानसे : मार्गी निरूपिला :' **दृस्थ. एवा.** 'महदंबेप्रति प्रतिष्टानीं लवणाख्यानीं निरूपिला.') २० (**प्रव. विमा.** १५०).

## ५०४ दायांबाप्रति जनु ठकला म्हणणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : हा आवघा जनु ठकला असे गा : परि 'मीं ठकलां' ऐसें कव्हणी न म्हणे : कव्हणी एकु ऐसें म्हणैल : 'मीं ठकलां :' तरि तयाचें ठक फेडिजैल :" यावरि दायांबा उगेचि होते : ।।

## ५०५ द्रीढ पुरुष महात्मे उपहासु

दायांबायें[१] हे गोष्टि गोसावीयांपुढां सांघीतली : "जी जी : हा लोकु अवघा डंबें[२] खावा : जी जी : एकें वरीखीं दुकळु पडिला : मग आम्हीं आवघे माहाजन तेलंग देसा गेलों : आवघे माहात्मे जालों : मग एकाचा गोरक्षि[३] केला : एक गांवांआंतु सांघावेयाजाति : 'गांवां गोरक्षी[३] आला :' आवघा लोकु साउमा ए : कणीक : तांदुळ : तुप : द्रव्य आणिति : कणीक : तुप : तांदुळ : जेउं : द्रव्य तें ठेउं : ऐसा जी दुकळु निस्तरलों : आणि कुटुंबां वरो जाली : ऐसा हा लोकु जी : हा डंबें[२] खावा :" आणि गोसावीं हास्य केलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "मग गा भोजेया : कैसें गा माहात्मे जालेति ?" आणि मागुती दायांवा गोष्टि सांघति : ऐसें गोसावीं वेळा तीनि पुसिलें : *दायांबा म्हणति : "जी जी : ऐसा जयाचा वेध : तयाची प्राप्ति :" गोसावीं म्हणीतलें : "भोजेया : ऐसें नव्हे : अंशवेधें संपूर्णाची प्राप्ती :" "जी जी : ते कैसी जी ?" यावारि : गोसावी विद्यामार्ग निरूपिला[४] :* [सर्वज्ञें म्हणीतलें : "एकि विद्या : दोनि विद्या : आठि विद्या : सवावो लक्ष नव कोडी विद्या : वाहात्तर कोडि विद्या। एकि विद्या ते ब्रह्मविद्या। द्विधा शांभव अष्टधा शाक्तेय। सवावो लक्ष नव कोडी महाणव। वाहात्तर कोडी आणव। विषयाधार वेधु : इंद्रियाधार वेधु : अंत:करणाधार वेधु : देहाधार वेधु : विदेहाधार वेधु : केवळाधार वेधु। विषयवेधें विषयाची प्राप्ति : इंद्रियवेधें इंद्रियांची प्राप्ति : अंत:करणवेधें अंत:करणाची प्राप्ति : देहवेधें देहाची प्राप्ति : विदेहवेधें विदेहाची प्राप्ति : केवळवेधें कैवल्याची प्राप्ति :] *चतु:प्रकारें वेध संचरति : दृक् : स्पर्शु : आलाप : अंत:करण[५] :"* [भटीं पुसिलें "अंत:करणें वेध तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कासवी असे : ते थडियेस वीये : आपण पैलाडि असे : तीयें पैलाडि असति : तेथौनि तयांतें अंत:करणीं आठवी अमृतकळा असे ते संचरे : तयातवं तीये वाढती : तैसें परमेश्वराचीये आठवणेतव एका वेध संचरेति[६] :" ।। ]

---

५०५. १ **गोनेही.** दाइंबा–. **बी.** दाइंबें. २ **हीबी.** ठकुनि. ३ **गोहीबीने.** गोरक्षु. ४ (**प्रव.** नव प्रकरणाचा. 'विद्यामार्ग' प्रकरण येथे 'सूत्रपाठा'तून उध्दृत केले आहे). ५ (**प्रव. विमा.** १८२ : वि १७७). ६ (**दृपा.** ६. कासवीएचा दृष्टांत. 'सावखेडां संगमेश्वरीं भटां बोधप्रकरणीं निरूपिला'— **दृस्थ.** 'प्रकरणवशा'च्या आधारे, पाठवचनाच्या अनुषंगाने मी हा दृष्टांत येथे घातला आहे).

## ५०६ स्त्री म्हणिजे मेंढिएचें खाजें*

[ ढोरेश्वरीं[१] अवस्थान : दाएंबाएं गोसावीयांपासि एक गोष्टी सांघीतली : "जी जी : एक एकाचिए बाइलीपासि बळेंचि जाए : एका जाववे ना : मग तो सोवासिनीतें म्हणे : तेथ तयासी व्यभिचरे : तया बाइलासि तवं काइ बोलों चालों न ये :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति गा : भोजेया : स्त्री म्हणिजे मेंढिएचें खाजें गा :" "हो कां जी :" ।।]

## ५०७ गोवींदचंदा उपदेसें जळांधरि अवज्ञा कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "जळांधरि[१] गोवींदचंदाचेया नगरासि आला : गोवींदचंदु तयासि साउमा आला : आपुलेया आवारासि तयांतें घेउनि आला : तयाचा थोरु आदरु केला : मर्दना दीधली : जेविला : नीजैला : मग पाखोळेयासि[२] गेला : सरीसा गोवींदचंदु सागळ घेउनि आला : आणि तो आभारैला : गोवींदचंदें पुसिलें : 'मज तुम्हीं उपदेसु देयावा :' आणि तेणें तयांसि तेथचि सांघीतलें : आणि तो क्षोभला : 'माहात्मेन चाळवीलें : पाखोळां[३] मज सांघीतलें :' मग भुसंगी तराळु बोलाविला : 'जाए : यातें उपद्रवि :' भुसंगी तराळु तो जोगीयांचा उपदेसीया : तो तेयातें नगराबाहीरी घेउनि गेला : बरवा एकुं टाओ पाहिला : तेथ गुंफा केली : तेथ तयांतें बैसवीलें : वरि पाटीया घातलीया[४] : वरि माती घातली : 'जरि पुरुष होती तरि असती : नाहीं तरि आपैसेयाचि मरती :'।।

मग[५] केतुलेयां एकां दीसां तेथ कन्हु[६] आला : तयासवें सातसें डबुरुवां अंतराळीं वाजति : सातसें भुमिमंडळीं : ऐसा देखिला : आणि क्षोभला : 'हा होए :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीउ उपाधीसि क्षोभे :" "मग आपण सर्वदळेंसीं सामोरा आला : गाजतुवाजतु आपुलेया आवारासि घेउनि आला : अपारु आदरु केला : मग पुसिलें : 'मज तुम्हीं उपदेसु देयावा :' मग कान्हें द्रव्य होतें तें पाणियांतु घालवीलें : माणिकें मोतीयें होतीं : तीयें[७] जातां दळवीलीं : मग रानासि नेला : मग सांघीतलें : आणि गोवींदचंदु उगाचि राहिला : कान्हें पुसिलें : 'तुं ऐसा कां ?' 'ना मजपुढां एकें जोगीयें सांघीतलें होतें :' तवं कान्हें म्हणीतलें : 'हें मीं जाणें : कां माझा गुरु जाणे : आणिक कोण्हीचि नेणे :' मग कान्हें पुसिलें : 'मग ते कें गेले ?' 'ना : मीयां तयांसि वोखटें करवीलें :' तवं तेणें म्हणीतलें : 'तयासि छेदभेद नाहीं: कोणाकरवि करवीलें ?' 'ना : भुसंगी तराळाकरवि करवीलें :' भुसंगी तराळु वोलावीला : मग तयांतें पुसिलें : 'तया माहात्मेयांसि तुवां काइ केलें ?'

---

**५०६.** *(**प्रव. आमा.** २५२).
१ मुनिबा°.

**५०७.** १ **नेही.** जाळाधरी. **गो.** जाळाध्री. २ **ने.** पाए खोळेयासि. ३ **ने.** पाए खोळां. ४ **गोने.** बैसवीलीया. ५ **हीबी.** मग मार्गीं कानु आणि गोरक्षी भेटले : ते शास्त्र संवादतां उरोधले : कान्हें म्हणीतलें : "तेरा गुरू भगमुखा पडवा :" गोरक्षीन म्हणीतलें : "तेरा गुरु गोरीमे गडीया : जाए : काहाडि :" तैसेचि आपुलेया गुरूचीये सूधी नीगाले : कानु बंगाल देसा आला : तेयासवें चौदासें चेले : सातसें अंतराळी डबुरू वाजेति–. ६ **गोने.** कान्ह. **ही.** कान. ७ अ. °जाळवीलीं.

मग तेणें आवघी वेवस्था सांघीतली : मग ते तेथ गेले : पाटीया काढिलीया : उघडीलीया : पाहाति तवं[८] तेणें काष्टी लावीली असे : कान्हें पाहीलें : तवं पुरुषांचीए दृष्टीसि कोपु असे : मग मागुतीया पाटीया घातलीया : मग कान्हें लोहाचा गोवींदचंदु[९] करवीला[१०] : मग तेयांतें पुसिलें : 'तुवां तेधवा कैसा श्रृंघारु केला होता ?' मग तैसीं वस्त्रें नेसवीला : तैसातैसा स्रींघारु करुनि पुढां उभा केला : मग मागुतीया पाटीया उघडीलीया : आपण आडवांगीं राहीला : आपणेयां आड गोवींदचंदु उभा केला : मग तेणें टाळी चेतवीली : आणि द्रीष्टि तयांवरि पडिली[११] : 'म्हांरो वांसु गोवींदचंदु कैसें केलें ?' आणि लोहाचा गोवींदचंदु भस्म जाला : ऐसी वास पाहीली : आणि कान्हु पायां लागला : मग म्हणीतलें : 'कान्हु : तुं कव आया ?' तवं कान्हें म्हणीतलें : 'मीं आतांचि आलां :' *पुरुखीं म्हणीतलें : 'माग : प्रसंन जालां*[१२] *:'* मग कान्हें म्हणीतलें : 'मज गोवींदचंदु देयावा :' तेहीं म्हणीतलें : 'तो भस्म जाला कीं :' 'ना : तो आहे :' मग गोवींदचंदु पायांवरि घातला : 'तरि हा कोणु ?' तेव्हळि कान्हें आवघी वेवस्ता सांगीतली : 'ना : भलें केलें :' " ॥

## ५०८ वीठलु वीरु कथन[१]

एकु दीं महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : एव्हडा नडनाचु पांढरीये काइसा ? हें काइ जी ? एसणी उपाधि काइसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा वीरू गाइचां काजीं पडिला : तया नावं वीठलु : तयाचेनि नावें हा मांडिला भडखंबा : तेथ देवता अभिमानु घेतला : तो हे मनोर्थ पुरवीतु असे :" ॥

---

८ **गोने.** °काष्टी लागली असे : ९ **अ.** गोइचंदु. १० **अ.** करूं आदरिला. ११ **होबी.** °आणि 'भस्म रे पुता' म्हणीतलें : आणि लोहाचा–. १२ (**होबी.**).

**५०८.** १ ही लीळा येथे **मु.** प्रतीतील 'अज्ञात' चरित्रातून घेतली आहे. **अ.** प्रतीतील लीळा पुढे दिलेली आहे. **गोहीने.** प्रतीतसुद्धा या लीळेचे स्वरूप **अ.** प्रतीप्रमाणेच आहे. त्यातील 'ते वीठलु रखुमीणि अभंगीं घालीति :' या उल्लेखावरून ती प्रक्षिप्त असावी असे स्पष्ट दिसते. कारण, अभंगात विठ्ठलरुक्मिणीचे उल्लेख हे ज्ञानेश्वरकालीन व त्यानंतरचे आहेत. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी चक्रधरस्वामींचे प्रयाण झाले. तेव्हा त्यांच्या तोंडी हे उल्लेख येणे शक्य नाही. मुरारीमल्लबासांनी सर्व लीळांचे शोधन केले होते. त्यांच्या पाठात प्रस्तुत लीळेचे स्वरूप वरीलप्रमाणे आहे. त्यात 'हा वीरू गाइचां काजीं पडिला' याचा अर्थ 'गाईंच्या कामात', अर्थात 'त्यांचे संरक्षण करताना' पडला=मृत्यू पावला असा अर्थ अभिप्रेत आहे. 'गाइचां काजीं' या पदांच्या अर्थाचा विपर्यास होऊन प्रक्षिप्त लीळा तयार झाली, हे स्पष्ट होय. म्हणून मूळ ग्रंथात मी ती स्वीकारली नाही. **मु.** प्रतीप्रमाणेच **ना.** प्रतीतील या लीळेचा पाठ आहे. तोच मूळ असला पाहिजे. म्हणून ग्रंथात तोच स्वीकारला आहे. **अ.** प्रतीत आलेली ही लीळा पुढीलप्रमाणे :

**वीठलु वीरु कथन**

महादाइसीं पुसिलें : "जी जी : स्रीकृस्णुचक्रवतीचा अवतारु वीठलु बोलताति : हें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वीठलु तो म्हांतारी एकीचा पुतु : तो ब्राह्मणु : आणि नेमदेओ कोळी : म्हांयां गुरउ : हे तीघै चोर : वळघीया घेति : घोडेयांचे वळघे करीति : ओरपे दरवडे घेति : एकु घेणें घेउनि

## ५०९ वनिताचंदनें स्त्रीए प्रीति

देमती हेमाडि पंडितांची[१] राणी : ढोरेस्वरासि आली : स्त्रीमुखिचें तांबोळ घेतलें : स्त्रीचरणीचें चंदन घेतलें : तेणें ते वर्जिली होती : तें चंदन तीया कपाळीं लावीलें[२] : तीयेचेया ठाया तो गेला : तीनि दी तो निगों न म्हणे : "हें ऐसें काइ ? आधीं मीं इकडे वास न पाहें : आतां मज नीगवे ना : हें काइ पां ?" ऐसें पुसिलें : मग तीया सांघीतलें : "मज[३] तेयां गोसावीयांचेनि दरीसनें : तेथौनि चंदन आणिलें : म्हणौनि ऐसें जालें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्त्री म्हणौनि आहाचपणें सांघीतलें[४] : तीएची खंति : आगा : जों[५] आमचेया न मीळे :" ।।

## ५१० जोगी ब्रम्हउपदेसु

*गणपति मठीं अवस्थान : एकु दीं भक्तीजनें काहीं शास्त्र बोलत होते : मग*[१] सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु जोगी : एकी जोगीणि : तया जोगीणी तयातें बहुत दीस आभारवीलें :" मग एकु दीं पुसिलें : 'हां देवा : ब्रम्ह तें कैसें ?' तेणें म्हणीतलें : 'ब्रम्ह तें अगम्य[२] देवी :' मागुता बहुत दीस आभारवीला : मग मागुतें पुसिलें : 'ब्रम्ह सांघावें देवा :' तेणें म्हणीतलें : 'ब्रम्ह सांघों नैए देवी :' 'ना देवा सांघावें :' म्हणौनि दोन्हीं पाए धरिले : आभारला : भवंतें पाहीलें[३] : मग सांघीतलें : 'तीळ आणि गुळु एकवाट कालवीजे : मग तीळांचें तीळपण जाए : मग गुळाचें गुळपण जाए : ऐसें ब्रम्ह जाणावें देवी :' 'होए देवा : होए देवा :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "एतुलेया[४] एका कारणें तेणें केसणें गुढ केलें : मां एसणें रहस्य तें कैसें नीरुपावें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : हें तुमचें रहस्य कीं : मां आपुलें रहस्य तें आणिकाप्रति प्रकटिजे ना कीं*[५] *?"* ।।

## ५११ कणेरी गुरुभक्ति

"कणेरी[१] तो नागार्जुनाचा सीक्षु[२] : तो रांधवणीचीया घरासि भीक्षेसि गेला : तीया वडा भीक्षेसि घातला : तो घेउनि आला : गुरुसि संपादिला : तीं म्हणीतलें : 'वडा

---

जाए : दोघ लागु सांवरीति : ते मांगळवेढांचे : तेहीं एके ठाइं वळघी केली : तो म्हांइंद्रणा गाइ घेउनि गेला : तवं लागु पडिला : तो नेमदेओ कोळी घाइं पडिला : पाठीं तीए पांढरीएवरि वीठलु पडिला : तेयाचे पुत्र आले : ते तेहीं भडखंबा केला : माथां लींगस्थापना केली : तेथ देवता अभिमानु घेतला : लोकाचे मनोर्थ पुरउं लागला : तयाचीए स्त्रीए नांव लाखाइ : एकी वासना : लखमाइ : तयाचे पुत्र जातिपदें करीति : ते वीठलु रखुमीणि अभंगीं घालीति : तो लोकांमध्यें क्षातितें पावला : तो हा वीठलु बाइ : ही परश्रामबास ।। रामेश्वरबास ।। तो घुटिका सीधि जाणे : पौळि पागार उडे : स्त्रीयांसीं भोग तांबोळ उगाळ : ऐसा तो वीठलु :" ।।

**५०९.** १ **ने.** °पंताची. २ **ही.** °ते आंगणीं उभी राहीली : तेणें तीतें देखीलें : आणि तिकडेचि गेला. ३ **ही.** "मी तया गोसावीयांचेया दरीसना गेलायें : तेथौनि–. ४ **ही.** °ये खंतीतव तो वोखटेयासि प्रवर्तला. ५ (**गोने.**).

**५१०.** १ (**प्रव. आ.** १५५). २ **अ.** अगण्य. ३ **गो.** पाहावीलें. ४ **गो.** एतुकेया.

**५११.** १ **गोमु.** (अज्ञात) कणैरी. २ **ने.** सीख्यु.

निका जाला : ना वडा नीका जाला :' तैसेंचि मागुतें गेले : तयांतें वडा मागीतला : तेहीं म्हणीतलें : 'वडा काइसा ?' 'ना तुम्हीं आम्हांसि वडा भीक्षेसि घातला : तो आम्हीं आपुलेया गुरुसि संपादीला : तेहीं म्हणीतलें : वडा नीका जाला :' 'मां जें जें नीकें तें तें काइ लाहीजताए ?' 'कां न ल्हाइजे ?' 'हो कां : तुझे डोळे निके : तरि दे पां आपुला डोळा ?' 'हो कां :' नख घातलें : डोळा काढिला : हातीं घेतला : आणि तीयें भीआलीं : दोनि वडे भीक्षे घातले : डोळेयावरि हात ठेउनि घेउनि आले : नागार्जुनें पुसिलें : 'हें काइ ?' 'ना तुम्हीं म्हणीतलें :' 'वडा नीका जाला :' तो मीं मागुता तेयांचेया घरा गेलां : वडा मागीतला : तीया म्हणीतलें : 'वडा काइसा ?' 'मां तुम्हीं आम्हांसि वडा भीक्षेसि घातला : तो आम्हीं आपुलेया गुरुसि संपादीला :' तेहीं म्हणीतलें : 'वडा नीका जाला :' मग तीं म्हणीतलें : 'जें जें नीकें : तें तें लाभत असे ?' आम्हीं[३] म्हणीतलें : 'कां नलभे ?' 'ना तुझे डोळे निके : तरि देया पां आपुला डोळा :' 'हो कां :' मीयां डोळा काढीला : हातीं घेतला : तीयें बीहालीं : ते दोनि वडे घातले : तीं म्हणीतलें : 'हा आम्हांसि देया :' 'हो कां :' काढुं बैसले : मग तीं म्हणीतलें : 'हा आमचा होता : असों देया : आम्हीं मागौनि तेधवां देया[४] :'" ॥

## ५१२ वैजुवे परीछेदु

सर्वज्ञें म्हणीतलें : "परीछेदु तरि वैजोचा* :" [सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "वैजाये परळियेची वाणीन : लेकीसुना समर्था : ते घरीं सारासारि वीळुवेन्हीं म्हणियें करी : मग वीळिचां स्नान करी : पांढरें वस्त्र नेसे : चोळी ले : कुंकुवाची रेघ लावी : मग दीसवडि धुपपूजा परिएळीं : ऐसी प्रत्यहीं वैजनाथासि जाए : घरिचीं खंति करीति : 'अवेळे न वच :' आवघा वीळुवरि वारीति : परि बळें तैसीये अडनीं ते जाएचि : अवघडीं सासुरेवासु साहे : परि जाएचि : एकु दीं तीहीं राखणें घातलीं : तीहीं म्हणीतलें : 'तुं वारितां येव्हडिये रात्रीं कें जातीसि ?' म्हणौनि खांडीसुरियांसीं पाठीं लागले : हाणावी तवं प्रतौनि पाहीलें : मग म्हणीतलें : 'वैजानाथा : धांवं धांवं :' तवं तो खालि उतरला : तो दोनि भाग होउनि भीतरि सामावीली : धरितां तयांचेया हाता पालौ आला : ऐसा देवता उभयांचिये क्रीयेचा नीर्वाळा देखौनि आड घातलें : दृष्टी देहघातापासौनि राखिली : आणि अदृष्टीं आपुलें फळ दीधलें :" ॥ ]

---

३ **गोने.** मीयां. ४ **मु.** (अज्ञात) °ऐसी गोसावीं भक्ति अनुवादिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "गुरुभक्ति ते कर्णैरीची :"

**५१२.** ***अ.** प्रतीत एवढाच भाग आहे. पुढील सविस्तर लीळा **मु.** प्रतीतील 'अज्ञात' लीळा ११ मधून घेतली आहे. १ **शोधु :** परिछेदी दृढतेवरि गोसावीं हे गोष्टि सांघीतली :

## ५१३ जोगरेया अनुतापानुवादु*

[ महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : अनुतापु तो कैसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अनुतापु जैसा जोगरेयाचा : जोगरा तो ब्राम्हणीयेचा ठाकुरिया[1] नायकु : तो एकु दीं वाटा जातु असे : तवं पुढां तयाचां पाइकीं वाट घेतली : स्त्री वधिली : पोटावरि थानीं बाळक पीत होतें : तेवीचि ग्लादि[2] करी : तवं मागिलाकडौनि तो आला : तें देखौनि कांटाळला : 'हें ऐसें कवणें रे केलें ?' एकें म्हणीतलें : 'आम्हीं केलें :' 'मरा मरा पापिये हो : हें ऐसें कां केलें ? हें तुम्हांकरवि कवणें करवीलें ?' 'ना तुम्हीं : आम्हीं खाणें घेवों : वोरपे घालुं : ओहरें मारूं : एकेक करूं :' आणि घोडेयाखालौती उडी घातली : मग जेणें तोंडें नीरोपु दीधला तें तोंड आपुलेनि हातें सीविलें : वोलेनि कांकरें : मग अनवाहाणीं : उपवासी : ताहान : ऐसा द्वारावतीये नीगाला : देवतेपुढां बैसला : लोकां उठवीतां नुठेचि : मग देवता स्वप्न दाखवीलें : 'तुझें पाप फीटलें :' परि तो न मनी : मग म्हणीतलें[3] : 'मीयां जाणावें केवि ? प्रतीति काइ ?' देवता म्हणीतलें : 'वैसाखिये मासीं द्वारकेचे[4] कळस दीसती :' मग जगदीशें उदकांत द्वारावतियेचे कळस दाखवीले : हे दृष्टीं कीर्त्ति : अदृष्टीं फळ : आपणपें नुरउनि नीर्वाण प्राश्चित घेतलें :" ।। ]

## ५१४ भर्तृहरीवैराग्यप्रसंसा*

[ एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "वैराग्य तरि भर्तृहरीचें[1] : जेतुकीं अंतापुरें तैतुलां ग्रहीं 'माइ भीक्षा दे' म्हणौनि माधुक्रिये जाये : तीया तयातें हावभावीं पाहाति : परि तो वासुही न पाहे : ऐसी संबंधीं सावधानता : ऐसें वैराग्य तें वैराग्य कीं बाइ :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भर्तृहरी वैराग्य आति : परि ज्ञान नाहीं :" ।। ]

## ५१५ गृहत्यागीं त्यागुप्रसंसा*

[ सर्वज्ञें म्हणीतलें : "आंतुलापसि बाहीरीलु चांगु :" यावरि गोसावीं क्रीमीची लीळा निरूपिली[1] : सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणा एकाचां पऱ्हीवां : अथवा सेणांतु जंतुक्रमि :

---

**५१३.** * **अ.** प्रतीत या लीळेची केवळ आदी व सूत्र आहे. ही सविस्तर लीळा **मु.** प्रतीतील अज्ञात चरित्र १२ वरून घेतलेली आहे.

१ **ललिताइसें : बोचिरी धानाइसें.** चोरकुळी. २ **एवा.** गलांदि. ३ **एवा.** °मज जवळांचि वेगळां न करि. ४ **एवा.** तयाचेया साजेयाचे.

**५१४.** * **अ.** प्रतीत ही लीळा त्रोटक असल्यामुळे येथे **मु.** प्रतीतून (अज्ञात चरित्र १३) उद्धृत केली आहे.

१ **अ.** भ्रतुरहरीचें.

**५१५.** * **अ.** प्रतीत या लीळेची केवळ आदी आहे. **मु.** प्रतीतील अज्ञात चरित्रात ती २१ वी लीळा आहे. तेथून येथे घेतली आहे. या लीळेत 'यावरि गोसावीं क्रीमीची लीळा निरूपिली' असे वाक्य आहे. ही क्रीमीची लीळा **मु.** प्रतीतील 'अज्ञात' लीळा १०५ होय. ती मुख्य लीळेत येथेच अंतर्भूत केली आहे.

१ **ना.** (अज्ञात) °मग त्याउपरि भोजनार्थी : ।।

एऱ्हांतु एर : ऐसें तोंडें खोउनि असति : तयांतुल एकु बाहीरि पडौनि सूर्यरश्मी लागौनि मरे : तो तया दुःखापासौनि सुटे : हेंहीं नीकें तयासि कीं बाइ : तैसा घरांतुनि बाहीरि सरे तो नीका : तो तीतुकीये ममतेवेगळा : तयातें तेतुकें दुख नाहीं कीं बाइ : घरांतुलापसि तो नीका[१] :" ।। ]

## ५१६ प्रज्ञासागरां स्वयं ईश्वरत्वसूचन*

[ गोसावीयांसि प्रतिष्टानीं नागनाथीं अवस्थान : एक वेळ गोसावीयांचीया दर्शना प्रज्ञासागर संन्यासी आले : तेहीं दंडवतें केलीं : श्रीचरणां लागले : तेहीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावी कवण काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाहं मनुष्यो नच देवयक्षौ । न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः । न ब्रह्मचारी न गृही वनस्थो । भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः ।।" ऐसें गोसावीं म्हणीतलें : मग ते म्हणों लागले : "जी जी : तरि काइ गोसावी परमेश्वरू होति ? तरि आजि आमुचें जन्म सुफळ जालें : जें गोसावीयांचे श्रीचरण देखिले : जी जी : गोसावीयांचें ज्ञान कवणासि होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "किंकरधर्मीं वर्ते तेयांचेनि सकळांचेही संदेह तुटती : तो म्हणे तो अर्थु तैसाचि होए : आणि आनंदें दुंदुभि :" हें वचन : ऐसें गोसावीं निरूपण केलें : मग प्रज्ञासागर गोसावीयांचे जाले[१] :।। ]

## ५१७ चौबारां आसन : बाइसांचा कंटकु फेडणें

चौबारां[१] आसन जालें : तवं बाइसें मागिलाकडौनि कुंटितें आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कुंटितें असा कां ?" "बाबा : कांटा मोडला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या : हें तुमचा कांटा फेडील :" "ना बाबा : बाबाकरवि कांटा कैसा फेडउं[२] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "या : कांटा फेडूं ए :" मग गोसावीं तेयांचा कांटेनि कांटा फेडिला[३] :।।

## ५१८ देवातें कुमहात्मा म्हणणे*

[एक वेळ देवीं आपुलां ठाइं भक्तिजनाप्रति म्हणीतलें : "गोसावीं माझीं शीष्यें चाळवीलीं :" तें येउनि भक्तिजनीं गोसावीयांपुढां सांघितलें : गोसावीं आइकिलें : मग म्हणीतलें : "तो काइ गा महात्मा ? तो कुमहात्मा कीं गा :"।। ]

---

**५१६.** *(**प्रव. विमा.** २००–२०३. मुद्रित प्रत. पा. १९१).

१ **एवा.** हें वचन आणि हा श्लोक श्रीप्रभुगोसावीं द्रावडदेसीचेया ब्राह्मणाप्रति म्हणितला : तेयाचें नाव विष्णुश्रमाभट : ।। हे परशरामबास वासना : ।।

**५१७.** १ **मुने.** गोसावीं सप्तमात्राहुनि बीजें केलें :– २ **य.** फेडवीन. ३ °**एकी वासना** ।। हे आधीली लीळा : ।।

**५१८.** * ही व यापुढील लीळा **मु.** प्रतीतील अज्ञात लीळा ४५ व ४४ होत. महदाइसा दादोसाशी भांडून येईपर्यंत स्वामीविषयी, त्यांच्या सामर्थ्याविषयी अनुदार उद्‌गार त्याच्या तोंडून निघाले

## ५१९ उपालंबश्रवणें देवां बुद्धिनाशानुवादु

[एक वेळ भक्तिजनें दादोसांपासौनि गोसावीयांचेया दर्शना नीगालीं : तयांतें देवीं पुसिलें : "तुम्हीं कें जातें असा ?" तेहीं म्हणीतलें : "आम्हीं द्वारावतीकारां श्रीचांगदेवोराउळां गोसावीयांचेया दर्शना जातों :" "तेथ कां जातें असा ? तेथ काइ असे ? तयांतें एकि वीद्या होती ते आम्हां जाली : आतां ते रीते ठेले : आतां तेथ काहींचि नाहीं :" ऐसें तीनि वेळां वारिलें : तन्हीं ते दर्शना आलींचि : गोसावीयांसि भेटि जाली : मग प्रसंगें आवघें दादोसांचें सांघितलें : तें आइकौनि गोसावीं हास्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "आम्हांपासौनि जे वीद्या जाली ते तेणें आणिकां नीरूपिली : तरि काइ तो रीता ठेला ? पोरु इतुलेंहीं नेणे : पोरु बुधिमंतु नव्हे : सुणेयां जरि बुधि असे तरि ते जीह्वा पाणी पीये : तैसा महात्मा :"।।]

## ५२० वृधासंगम : आउ पुष्टीं आरोहण

मग गोसावीं चौबारांहुनि बीजें केलें : वृधासंगमांचां[१] मार्गीं उभे ठाकले : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : हें तुमचीए पाठीवरि[२] बैसौनि वृधासंगमा जाइल :" "हो कां जी स्वामी जगंनाथा :" मग आउसीं कासवडा[३] दाटिला[४] : परवंटु दाटिला : मग गोसावीं आरोहण केलें : आणि तीयें चालों लागलीं : गोसावीं नावेकु भारु स्वीकरीति : आणि म्हणति : "जी जी : स्वामी जगंनाथा : लघुत्व[५] स्वीकरिजो जी : बापुडा नाएकु दाटतु असे जी :" आणि गोसावी लघुत्व[६] स्वीकरीति : ऐसें वृधासंगमवेन्हीं बीजें केलें[७] : मार्गीं गोसावीं लोकांचां ठाइं त्रिवीधता स्वीकरिली असे : गोसावीं वृधासंगवेन्हीं बीजें केलें : तेथ गोसावी उतरले[८] : गुंफे अवस्थान जालें : ।।

## ५२१ भयचकित आउ समसानीं बैसवणें

*रात्रीं गुंफेसमीप दहन केलें होतें[१] : माणुस जाळिलें होतें : तो कर्पट वासु येत होता : ऐसा समइं सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : एथौनि कव्हणा एका व्यापारालागि पाठविजैल तरि जाओं सकाल ?" आउसीं म्हणीतलें : "जी जी स्वामी जगन्नाथा : तुमचीया आज्ञा पडनी घालिजैल : आगीं रीगिजैल : मां एर काइ जी ? मी मागां विंझासनी पडनी घालीत*

नाहीत. महदाइसाशी भांडण झाल्यावर दादोस पुन्हा स्वामीकडे आल्याचे दिसत नाही. त्यावरूनही या लीळा प्रतिष्ठानच्याच असाव्या असे निश्चित वाटते. म्हणून त्या येथे घातल्या आहेत.

**५२०.** १ **यमुनेही.** °संगमीचां. २ **यमु.** पाट(ठ)कुळीये. ३ **नेबीपं.** कासवटा. **हीगोमु.** कासोटा. ४ **यमुगोनेहीबी.** दीधला. ५ **यमु.** हळु होइजो जी : ६ **यमु.** हळु होति. ७ **यमु.** °तिये दीसीं वृधासंगमा लोकु बहुत गेला होता : ते मांदी येतां गोसावी मुडुपघसणीयां बीजें केलें : लोकु देखे : तो वीस्मो करी : ८ **अ.** उभे राहीले.

**५२१.** १ **यमु.** तवं गुंफे पश्चिमे (**रामे.** पुर्वे) दहन केलें होतें : (**य.** माणुस जाळिलें होतें :) तें

*होतीएं : आगीं रीगत होतीएं : तें मज जोगीएं वारिलें जी :" गोसावी उगेचि होते*[२] *:* मग गोसावी तया समसानापासीं उभे जाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : हें समसान वीझवा गा : *गंगे आंतु घाला*[३] *:* नाएका : तुम्हीं यांसि वीझउं लागा :" आणि भट : आउसें गेलीं : भटीं देउळाआंतुल घागरि घेतली : भटीं म्हणीतलें : "आउ : तुं वीझवि : मीं सांडीन[४] : कां मीं वीझवीन : तुं सांडि[५] :" *तवं तेथ आगीमाजि सीन सीन करी : तेणें आउसें भियालीं : आउसीं म्हणीतलें*[२] *:* "ना रे वा नागणां : मीं भीतीयें : तुंचि वीझवि : तुंचि सांडि[५] :" "राहे राहे[६] आउवे : गोसावीयांपुढां सांघों दे :" "ना रे वा नागणां : सांगसी तरि सांघ :" भटोबास घागरी घेउनि गंगेसि गेले : तेहीं सरीसीं गेलीं : भट घागरि घेउनि आले : तेहीं सरीसीं आलीं : भटीं तें वीझवीलें : वीझउनि तें आवघें सांडिलें : आउसीं लीकटें आणि वीसदेयाची तौली : वाक : ऐसें तीहीं सांडिलें : भट वीझउनि आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : भटीं म्हणीतलें : "जी जी : मज हे आउ कांहीं वीझउं लागेचि ना :" *म्हणौनि आवघा मागिल वृत्तांत सांघीतला : सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा वानरेया : पोर जीवु पडनी घालों धांवे : आगीं रिगों जाए : आणि सीसनिये भिये*[२] *:"* सर्वज्ञें म्हणीतलें : "वस्त्र[७] हीरा : नेउनि समसानांआंतु बैसवा :" भटीं वस्त्र[७] हीरतलें : नेउनि समसानांआंतु बैसवीलें : समसानांमध्यें दोहीं पाए : दोहीं हातीं गडद[८] धरीली : आणि भवंतीं भवंति : पोळति : तेवींचि बोबाति : "जी जी स्वामी जगंनाथा : वापुडा नाएकु पोळला जी :" ऐसें म्हणौनि बोवाओं लागलीं : वावणाहूनि उजीयेडु पडे : तें देखति : तेणें भीति ना : मग गोसावीं वावणें बुजवीलें : मग म्हणति : "बापुडा नाएकु भीताए जी :" म्हणौनि बोवाओं लागलीं : तेयाचें भये नीवर्तलें[९] : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरी आउवेचेया ढौंगावरि[१०] फाळुकें घाला गा :" भट गेले : साउलें दीधलें : नेसलीं : मग आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं ।।

## ५२२ आउसांकरवि मुनियां क्षेमाळींगन देववणें

गोसावी वडातळि पारंबी धरुनि उभे होते : मुनिए[१] ते गोसावीयांजवळि उभे होते : ते नगन : गोसावीं आउसांतें म्हणीतलें : "नाएका : या मुनियांसि वीवस्त्र[२] होउनि क्षेमाळींगन देयावें :" आउसीं म्हणीतलें : "हें काइ जी स्वामी जगंनाथा : ऐसें काइसेनि

---

रात्रीं द्रवळों लागलें : (**य.** घाणातु असे). २ (**प्रव. आमा.** २१३). ३ (**गोपं.**). ४ **मु.** झाडीन. ५ **मु.** झाडि. ६ **अ.** रांडे. ७ **यमु.** साउलें. ८ **ने.** दगड धरिति. ९ **यमु.** °मग बाइसीं वीनवीलें : "बाबा : बापुडी आउ कीतुका वेळ असैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बोलावा :" बोलाविली : आली : सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : नाथपंथी उपदेसु : चातुर्वर्णीं भीक्षा करा : आणि समसाना भीया ?" आउसीं म्हणीतलें : "नेणेंचि जी स्वामी जगन्नाथा :" १० **ने.** ढुंगावरि.

**५२२.** १ **यमु.** मुनिया एकु उभा असे. २ **यमु.** नग्न (**य.** नगीन) खेव देयावें.

होववैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि हें एकें पायें उभें ठाकैल :" म्हणौनि गोसावी एकें पायें उभें[3] ठाकों पांति : " नको जी स्वामी जगंनाथा : मीं क्षेम देइन :" मग आउसीं वस्त्र फेडिलें : मग म्हणीतलें : " ए रे पोरा : क्षेम दे[4] :" म्हणौनि क्षेम दीधलें : मागुतीं वस्त्रें नेसलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " मुनियांसि क्षेमाळींगन देओं आलें : ऐसें प्रसेयासि देओं नैए :" ।।

## ५२३ आउ नृत्य : रात्री करवणें

गोसावीयांसि भीतरिला ओटेयावरि आसन असे : गोसावीं आउसांतें म्हणीतलें : " नाएका : तुम्हीं एथ वीवस्त्र[1] होउनि नृत्य करावें :" " हें काइ जी स्वामी जगंनाथा : ऐसें काइसेनि होववैल जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तरि हें घागरि घेइल :" " ना जी स्वामीं जगंनाथा : घागरि नको घेओं : मीं नृत्य करीन :" म्हणौनि आउसीं म्हणीतलें : " जी जी : तरि गोसावीं रात्रि करावी :" गोसावीं नेत्रांवरि स्रीकर दीधले : आवघेयां भक्तजनांकरवि देववीले : " रात्रि करा गा :" म्हणीतलें : आणि तीयें वीवस्त्र जालीं : नाचों लागलीं : आणि गोसावी स्रीकरिचीया आंगुळीया फांकीति : आणि अवळोकीति : " जी जी स्वामी जगंनाथा : रात्रि[2] पातळ जाली : दाट कीजो जी : " मागुतीं गोसावी रात्रि दाट करीति : मागुतीं पातळ करीति[3] : मागुतीं आउसें म्हणति : मग गोसावीं पुरे करवीलें : ।।

## ५२४ तथा गोरक्ष फोकरणें

आउसीं गोसावीयांतें वीनवीलें : " जी जी : मीं[1] गोसावीयांचां ठाइं रंगपुजा करीन :" गोसावीं वीनवणी स्वीकरीली[2] : तीयें पैलाडि गोरक्ष फोकरावेया गेलीं : गोरक्ष फोकरुनि आलीं : कांहीं गहु : चणे : जोन्हळे : कांहीं कवडे मागीतले : रंग मेळवीले : मग घेउनि आलीं : उपाहाराची आइति केली : खीचु : पातीया : दीवे : मुठीए : मुदा[3] : गोसावीयांलागि चोखट उपहारु निफजवीला : रात्रीं वृधासंगमीचां[4] चौकीं रंग भरिले : गोसावीयांलागि बरवें आसन रचिलें : गोसावीयांसि तेथ आसन जालें : मग गोसावीयांसि बरवी पुजा केली[5] : आणि आउसीं गोसावीयांचां स्रीकरीं वान दीधलें : आणि म्हणीतलें :

---

३ **गो.** उभयां. ४ **गो.** देओं.

**५२३.** १ **यमु.** नग्न. **नेगो.** वीवस्त्रां. २ **य.** दीसु कीजतु असे : रात्रि कीजो :" ३ **अ.** घेति.

**५२४.** १ **यमु.** मीं गोरक्ष फोकरूं जाइन जी : मग गोसावीयांचां ठाइं–. २ **यमु.** °नीगाली : पांसातीचे गावं मागीतले : करुंवंटें मेळवीलें : कण घेउनि आली : रंगपूजेची आइति केली : ३ **एवा.** °घुगरिया. **यमु.** (**वाल्हदाए वासना :** दीवे थोर केले : तेथ तेल घातलें : जेउं पुरे येतुकें :). ४ **यमु. परशरामवास.** संगमेश्वराचां चौकीं :। **रामेश्वरवास.** जोगेश्वरीचां चौकीं. ५ **यमु.** °मग खीचाचीया मुदा केलीया : पातीवरि मुदा ठेवीलीया : एकीकडे पुरिया : एकीकडे मुठीये : एकीकडे

"चक्रस्वामिचेयां भुजासि[६] उदो :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आउवेसि उदो : ऐसें म्हणां गा :" आउसें म्हणति : "ना जी : स्वामी जगंनाथांसि उदो कीं : " मागुतें आउसें म्हणति : एकाधेयां भक्तजनाचां हातीं वान देति : ऐसी आवघेयांचांहीं हातीं वानें दीधलीं : तेव्हळि ते तेयांचे मुनीए पाहावेया आले होते : गोसावीं दाखवीले : "हे घेया गा : यांचे मुनीयें :" भक्तजनें आवघीं भीयालीं : भीतरि आलीं : मग गोसावीयांसि आरोगण जाली : भक्तजनांसि पांति जाली : मग गोसावीयांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग तेथचि पहुडु जाला : ।।

## ५२५ आउ दीपू उजळणे

गोसावीयांसि रात्रीं वोटेयावरि आसन असे : तेव्हळि दीवा जातु होता : सर्वज्ञें[१] म्हणीतलें : "नाएका : हा दीवा आबुथा[२] :" दीवा आबुथुं[३] गेलीं : तवं पोळलीं : "हाए" म्हणौनि : "जी जी स्वामी जगंनाथा : बापुडा नाएकु पोळला जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा वानरेया : पोरी आउवेसि मीं[४] स्त्री ऐसी बुधीही नाहीं : पुरुषू ऐसीचि बुधि : स्त्रीत्व हें उछेदौनि गेलें : " ।।

## ५२६ तथा नमस्कारु करवणीं अनोज्ञा

गोसावी वटाखालिं[१] उभे होते : आउसें अवकासा बैसौनि एतें होतीं : गोसावीयांतें देखिलें आणि डावलुनि[२] नीगालीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ नाएका : एथचा[३] नमस्कारु काइ[४] ?" आउसीं म्हणीतलें : "हें काइ जी स्वामी जगंनाथा : बापुडा असुचि असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "मनिचें अभिलाख निवर्तले तरि सुचिअसुचि[५] यें दोन्हीं नाहीं[६] नाएका : " ।।

## ५२७ माहादाइसीं उदरवेथा प्रस्णू

माहादाइसातें गोसावीं[१] पुसिलें : तया उपरि तें माहादाइसीं सांघीतलें : "जी जी : वारानसिहुनि आलीयें : कीं मज वाटे एतां असकति जाली : तीये दीउनि मीं कोरडें अंन

---

घुगरिया : मुदेवरि पाजळत दीवे : ऐसी वाणें वीस्तारीलीं : मग भक्तजनाकरवि उदो म्हणविला : आउसीं गोसावीयांचा श्रीकरीं–. ६ **यमुगोनेपं.** खर्गासि. **यमु.** चक्रस्वामीसि उदो : गोवींदस्वामीसि उदो : चक्रस्वामीचेया खर्गासि उदो : गोविंदस्वामीचेया खर्गासि उदो.

**५२५.** १ **एवा.** बाइसीं म्हणीतलें : "आउवें : दीवा आबुथि :" २ **ने.** आंबुथा. ३ **गो.** आबथु. **ने.** आंबथुं. ४ **य.** मी येकि स्त्री ऐसा हा धर्मुहीं नाहीं (न जाणे).

**५२६.** १ **गोनेहीबीपं.** वडा°. २ **एवा.** डाळुनि. **एवा.** टाळुनि. ३ **हीबीपं.** एथ नमस्कारु न करा तें काइ ? ४ **गोने.** कें. ५ **गो.** सौच्य असौच्य. ६ **हीबी.** न व्हावी कीं–.

**५२७.** १ **यमु.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे : एकु दी माहादाइसांचें पोट दुखिनलें : तियें उमाइसाकरवि चुरवीतें होतीं : तें गोसावीं देखिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोट कां चुरवितें असां ?"

खायें तरि मज सुळु उठी[२] जी : तरि मज तुप घेओं एइल जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मीनलेयांहीं न सेवीजे : मग तैसीचि सवे होए[३] :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "मीठाचा खडा आदिकरौनि विखों[४] :"* ।।

## ५२८ महदाइसां सदन भीक्षानुवाद*

[ माहादाइसीं पुसीलें : "जी जी : हे सदन भीक्षा आली तरि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "घेइजे ऐसें कुसकरौनि येऱ्हें येरु परतें : प्राणांसि आहारु देयावा : इंद्रियासि नेदावा : इंद्रियार्थरसु न सेवावा :" यावरि माहादाइसीं पुसीलें : "जी जी : भीक्षान्नाचा काला ऐसांहीं न गीळे तरि काइ करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : घेइजे ऐसें मुसंब खोउनि : आंतु पोकळ असे : खाली वोहटळ असे : जाइल परते :" "जी जी : एकाधेया नवेया : अनधिकार्या : अशक्तासि मुसंब खोविलेयांहीं न लोटे तरि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भदें भरौनि ठेवीजे : मागे तेव्हळीं घालीजे : नेघे तरि म्हणीजे : 'खासील तरी खाए : न खासील तरि धुळि खाए : मरों लागसी तेव्हेळीं आपसयाचि खासी :' यापरी प्राणासि आहारु दीजे : परि कव्हणाचें न जेवीजे :" "हो कां जी :" ।। ]

## ५२९ तथा तीर्थदेवता प्रकटीए करणें

माहादाइसीं : वारानसीहुनि आलीं ते गोष्टि गोसावीयांपुढां सांघीतली होती : "जी जी : सर्वज्ञें म्हणीतलें होतें : 'जें उघडेया नागीवेयां सुवावें :' अवघी आइति केली : तीघांपुरतें अन नीफजवीलें : मग तयांतें पाहावेया गेलीएं[१] : तवं पुरुष एक नागिवे : गोरे हरीयाळ ऐसे : एकाचा हातु धरुनि तेयांचेया बीढारा जात होते : तेयांतें म्हणीतलें : 'आमचेया बीढारा यां कां ? जाओं[२] :' आणि तेहीं तेयांचा हातु सोडिला : आणि म्हणीतलें : 'आतां यांचेया बीढारा जावेंचि लागैल :' म्हणौनि माझा हातु धरिला : आमचेया बीढारासि आलें : आम्हीं तयांसि बैसावेया घातलें : पाए धुतले : पुरुषासि आहारुभरि वाढिलें : ते जेविले : मग म्हणति : 'हा कीं हु कीं[३]' हेंचि : आणिक वाढिलें : तो जेवीला : आणिक वाढिलें : तेहीं जेविला : मग आंचवले : तांबोळ दीधलें : मग

---

माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : दुखत असे : वाटे एतां चोपड माखन दहींदुध घेत असीजे : ते सवे लागली : आतां कोरडें अन्न घेतलेयां पोट दुखत असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मीनलेयांही–. २ **एवा.** उदैजे. ३ **एवा.** लागे. ४ (**प्रव. आमा.** २५३).

**५२८.** *(**प्रव. आ.** ९६ ते १००).

**५२९.** १ **अ.** गेलों. २ **होबी.** °म्हणौनि आखत लाविली : ३ **ने.** "हुं कीं हुं".

ते निगाले :" माहादाइसीं पुसिलें : "ते कवण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते तेथची तीर्थदेवता :" ।।

## ५३० तथा माउंदीयें

माहादाइसातें[१] येकि आसु होती : ते वाएनाएकापासीं ठेवीली होती : ते आणावी : मां गोसावीयांचां ठाइं माउंदीयें करावीं : म्हणौनि गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : मीं पाडळीएसि जाइन : मग गोसावीयांचां ठाइं माउंदीयें करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथचें घेया : मां एथ करा :" "ना जी : गोसावीयांचेंचि घेउनि : गोसावीयांचांचि ठाइं काइ करावें[२] ?" मग तीयें वारभोगींचि निगालीं : निगतां सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नाएकु भेटती तरि[३] हें पुसत होतें ऐसें म्हणावें[४] :" तीयें निगालीं : बाइसें बोळवीतें निगालीं : गोसावीं[५] पुसिलें : "हां गा : बाइसें कें ?" "जी जी : माहादाइसांतें बोळवीतें निगालीं :" सर्वज्ञें म्हणीतलें[६] : "म्हांतारीया बाइसें वेधीलीं गा[७] :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "जयासि हें पढीये ते बाइसांसि विशेष पढीए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जेंचि एरे ठाइं वर्ते तेंचि एरे ठाइं वर्ते[८] :"* ।।

## ५३१ तथा भोजन प्रस्णु

माहादाइसें भीक्षा करुनि आलीं : जेउं बैसलीं[१] : वाटा अर्ध वर्णभातु[२] केला : अर्ध ताकभातु केला : गोसावीं तेयापासि बीजें केलें : उभेयां ठाकौनि ऐसेयां अवळोकीलें : "बाइ : ऐसें हें काइ केलें ?" "ना जी : अर्ध वर्णभातु[२] : अर्ध ताकभातु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वर्ण[३] असे ?" "ना जी : नाहीं :" "तरि ताक असे ?" "ना जी : नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें होए : वर्णेवीन[४] वर्णभातु[२] : ताकेंवीन ताकभातु :" ।।

---

**५३०.** १ **यमु. परशरामबास वासना** : एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : म्हांतारी वाराणसीहुनि आली तरी माउंदीयें कां न करीति ?" ।। **रामेश्वरबास वासना** : एकु दीसीं सर्वज्ञें माहादाइसातें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं वाराणसीहुनि आलीति तरि येथ माउंदीयें कां न करा ?" ।। माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : माझां जीवीं ऐसेंचि होतें. गावां जाइन : मग—. २ **हीबी.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "वारु टाळा :" "ना जी : मीं जाइन :" मग वारु भोगेंचि—. ३ **यमु.** °ऐसें म्हणावें : "तुमतें एथचेया दर्शना बोलावीलें असे :" ४ **पं.** °बाइ : दीस दोनि वाट पाहा ना कां ? मग जा :" "ना जी : मीं लवकरि एइन :" तैसाचि नीगालीं. ५ **यमु.** °भटातें मागीलाकडे. ६ **यमु.** "म्हांतारी वेधक असे :" "हो जी :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : बाइसांहाति येथ असों न लभे : येथ असों आवडे : आणि बाइसें दवडीति :" (**एवा.** "हां गा : हें जया पढीये ते माणुस बाइसां न पढीये :"). ७ **एवा.** मां. ८ (**प्रव. वि.** १८८).

**५३१.** १ **यमु.** °वाटां भातु घेतला : तो दोनि भाग करुनि जेवितें असेति : गोसावी जवळि बीजें केलें :°. २ **हीनेमु.** वरणभातु. ३ **हीनेमु.** वरण. ४ **हीनेमु.** वरणें°.

## ५३२ आउ एळावृधाउतरणीं अंब्रभोजन वचनस्वीकारु

गोसावीयांसि वडातळीं आसन असे : आउसें चौदोत्राचेया[1] जळगांवा[2] गेलीं होतीं : तेथ आंबे घेतले[3] : मांडे करवीले[4] : मग तीन्हीं गंगा उतरौनि गोसावीयांचेया दरीसनासि आलीं[5] : गोसावीयांपुढां आंबे ओळगवीले : मांडे ओळगवीले : मग स्रीचरणां लागलीं : गोसावीयांपासीं बैसलीं : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एळा व्रीधा गंगा तीन्हीं कैसेनि उतरलीति नाएका ?" "जी जी स्वामी जगंनाथा : उतरलीयें मीं यां स्रीचरणांप्रसादें :" सर्वज्ञें म्हणीतलें[6] : "पोरी आउवेचें वेडस वेडस बोलणें : परि अष्टादस पुराणां मीळे : *आउवेचा भावो काइसेया एका न पुरे : वासना : प्रेमा वारिया सरे*[7] :" ।।

## ५३३ देवतेचा ठाइं वेचलेपण होआवें कीं

गोसावीयांसि चौकीं[1] आसन असे : एकु भक्तु[2] जोगेस्वरीसि[3] आला : देवतेसि[4] पुजा केली : दंडवत घातलें : प्रदक्षना केली : मग[5] पुसिलें : "आइ[6] : आतां जाओं ? माउलीये : आतां जाओं ?" मागुता दारवठावरि ए : मागुता पुसे : "आइको : आतां जाओं ? माउलीये : आतां जाओं ?" ऐसें दोनितीनि वेळ पुसिलें : मग गोसावीं भटांतें म्हणीतलें : "देखिलें गा वानरेया : हा ठाओवेऱ्हीं देवतेचां ठाइं वेचलेपण होआवें : *ऐसा एथिचा होए तरि एथचि आपणपें दीजे*[7] :" ।।

## ५३४ सस्त्रधरागमनीं भटां आवेसु[1]

गोसावीयांसि उदेयांचा पुजावसरू जाला : सभा घनदाट बैसली असे : *बाइसें पैठणा*

---

**५३२.** १ **मुनेगोबी.** चौधोत्रा°. **पं.** चौहात्रा°. २ **मुनेगो.** जवळगावां. ३ **मु.** °तुप घेतलें : ४ **मु.** °ऐसें घेउनि आलीं : तवं गंगे पुर आला : मग वरीलीकडे गेलीं : एळा : वृधा : गंगा : तीन्हीं वेगळाली उतरलीं : ५ **मु.** °बाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : "बाबा : आरोगणे उसीरू जाला :" गोसावीं श्रीदोंदाकडे अवलोकीलें : "बाइ : मागे ना :" पुडतीं वीनवीलें : ऐसां वेळां तीं : तवं आउसें आलीं : ६ **मु.** "देखीलें गा आउवेचें बोलणें : वेडस वेडस बोले : परी सकळ सीधांता मीळे :" ७ (**प्रव. वि.** २३१).

**५३३.** १ **एवा.** पटिसाळेसि. २ **य.** राउतु. **मु.** जनु. ३ **यमु.** देवतेचेया ठाया आला. ४ (**यमु.**). ५ **यमु.** मग नीगों आदरीलें : तवं जाओं न सके : पाउलें दोनिच्यारि जाए : आणि मागुता ये : मग—. ६ **एवा.** आइको. ७ (**प्रव. आ.** २०४).

**५३४.** १ बहुतेक पोथ्यांत या लीळेचा पूर्वार्ध एका विशिष्ट प्रकारे देऊन मग **एकी वासना** म्हणून तोच वृत्तांत निराळ्या पद्धतीने वर्णन केला आहे. पूर्वापर संदर्भ लक्षात घेऊन 'एकी वासने'तील वृत्तांत येथे स्वीकारला आहे. मूळ वृत्तांत पुढीलप्रमाणे :

गोसावीयांसि उदेयांचा पुजाअवस्वरू जाला : सभा घनदाट बैसली असे : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांमध्यें कोनु दाटुगा असे गा ?" भटीं परिसिलें : वोळग विसर्जली : भट बाहीरि नीगाले : तवं

*हाटवेचु आणुं गेलीं असति*[२] *:* सर्वज्ञें म्हणीतलें : " मुनिए आले गा[३] : " तवं पाइक दाटुनि आले : आउसें भींति उडौनि पळालीं : जाडी : पोफळफोडणा : चरवी घेउनि : गोसावीं बीजें केलें : बाहीरि : गुंफेसि नागोवा केला : भटीं एका राउतपाइकाचें वोडणखांडें हीरतलें : वोडणखांडें घेउनि एकातें हाणितलें : आणि तेथौनि गोसावीं हाकिलें : " हां हां : वानरेया वानरेया : सांडि सांडि लोखंड : " *भट पाठीं लागले : दोनितीनि वेळा-सरिसे केले*[४] *:* पीटौनि पैठणवरि घातले : पैलीकडौनि खांडें तुळीततुळीत आले : भटीं म्हणीतलें : " जी जी : मानी एकु स्त्रीकृस्ण अवतारू : जेणें खांडेन हाणौनि भडाडु दीधला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " प्रार्धाचेया कैवारा भुत एक अवतलें : तेयाचेया कोपा चराचर वीस्व न पुरेचि : एतुकेयाहीपुरतें एथ नाहीं ? हे आपणेयां आपण मरती : एतुकेंहीं नाहीं ? परि एथिचीया अभीमानीया अभिमानु सांडिला गा : हें काइ एथौनि तुजकरवि करवीलें ? ठेवि खांडें : " *भट हातिरू न ठेवीति*[५] *:* गोसावीं म्हणीतलें : " माहात्मा काइ नव्हसि ? *ठेवीसि ना तरि एथिची आण*[४] *: " मग भटीं हातियेरू सांडिला*[६] : ।।

तेणें म्हणीतलें : " वोडणखांडें देयावें जी : मज पांचां राउतांपाइकांआंतु दैन्य : " सर्वज्ञें म्हणीतलें : " देया गा वोडणखांडें : " मग दीधलें : आणि भटातें उपटी हाणीतलें : " तुझी म्हेळी : " भटीं[७] म्हणीतलें : " तेव्हळा काइ मेला होतासि ? आण घालुनि याकरवि हातीएरु सांडवीला : घेतील हो घेतील म्हेळी : " ।।

मागुते पाइक आले : " हेमाडिपंडितीं बोलाउं धाडिलें असे : " गोसावीयांतें पाणीयां-आंतु बैसओं आदरिलें : ' यातें यापरि ओखटें करावें :' एका राउतपाइकापासील वोडण घेतलें : तें पालथें घातलें : त्यावरि तीं आसन करुनि पैलाडि बीजें केलें : ।।

---

जगतीबाहीरि पाइक देखिले : आणि गोसावीयांपुढें सांघीतलें : " जी जी : पाइक आले : " भट जगती-बाहीरि आले : एकातें चडकना हानीतलें : वोडणखांडें हीरतलें : पाठीं लागले : गेले : वेळा दोनितीनि सरीसे केले : गोसावीं बाहीरि बीजें केलें : मग म्हणीतलें : " वानरेया वानरेया : " म्हणौनि बोबाइले : " हां गा : तुजकरवि काइ एथौनि करवीलें ? " ते उगले ठेले : " ठेवि : ठेवीसि ना तरि एथिची आन : जरि प्रवृति होए : **एवा** : एथ जरि ऐसी प्रवृति होए तरि हे एकमेकां जुझजुझों न मरति ? " **एकी वासना** : (ही वासना वर मूळ संहितेत स्वीकारली आहे.) २ **(यमु.) य.** °तवं धाकुटेनि नीनावेनि पाइक धाडीले : " ओडणींसस्त्रीं तेयातें धरुनि आणावें : " **यमु.** गुंफेबाहीरि उभे राहीले : गोसावीं देखिले : भटांतें म्हणीतलें : " यामध्यें एकु दाहाटु (**हीबी.** दाटुगा) असे गा : " भटीं परिसीलें :–. ३ **हीबी.** °तवं हेमाडीन पाइक धाडीले : ते दाटुनि आले : आउसें भींति उडौनि पळालीं : ४ (हे वाक्य मूळ लीळेतून घेतले आहे.) ५ **(मु.) गोनेयहीबी.** °ते उगले ठेले : ६ **(मु.)**. यापुढील वृत्तांत **मु.** प्रतीत नाही. लीळा येथेच संपली आहे. ७ **एवा.** सर्वज्ञें. **य.** सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें होए पुरुखाइते : येव्हडा वेळु तुज काइ जालें होतें ? आण घालुनि याकरवि हातीएरू सांडवीला : " [ **भ.** तत्समैं तेचि पाइक हेमाडि पंडितीं आणिकी पुर्णेमा दीसीं पाठवीले : तेहीं म्हणीतलें : ] मग ते आवघे मीनले : गोसावीयांपासि आले : मग म्हणीतलें : " जी जी : तुमतें हेमाडि पंडितीं बोलाउ धाडीलें असे : " मग गोसावीं प्रतिस्थाना बीजें केलें :

## ५३५ ईश्वरवीयोगें बाइसां देहत्यागु

बाइसें : नाथो हाटासि गेलीं होतीं : *हाटकेवा घेतला : एतां गंगे डोणीं बैसली*[१] : नावडेयांतें[२] पुसिलें : " तुम्हीं कें गेले होतेति ? " " ना स्रीचांगदेओराउळां गोसावीयांचां ठाइं ऐसेनि ऐसें करावेया : हा नव्हे नागोवा[३] नेत असों : " बाइसीं पाहीलें : तवं जाडि : पालमांडें देखिलें : तैसेंचि नावेवरुनि घातलें : सरीसे नावडां[४] घातलें : कवणीकडे गेलीं ऐसें देखतीचि ना : " चांगदेओराउळांचीया बाइया घातलें : घातलें : " हंसराजु बळ्हे-ग्रामुवरि थडीयाथडीया गेलीं : त्यें नेदखतीचि[५] : ।।

## ५३६ मुधाआदितीं पूजास्वीकारू*

[ मग गोसावीं गंगा उतरौनि पैठणा बीजें केलें : तवं तेहीं मुधादित्यीं सभा केली : हेमाडपंडित : सारंगपंडित : मायिता हरी : प्रज्ञासागर हे मुख्यकरूनि आवघा गावीचा

---

**५३५.** १ (**यमु.**) २ **ने.** नावाडियातें. ३ **अ.** नागवा. ४ **ने.** नावोडा. ५ **यमु.** °तें भटोबासीं आइकीलें : मग गोसावीयांपुढां सांगितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइसीं वेगु कां केला : नावेक पाहाती कां : (**सोध** : °नावेक पैठणीं पाहाती कां : ") **ही.** °मग नाथोबा वृधासंगमा आले : गोसावीयांतें देखीलें : आणि हरीखैलें : . . . . . . . . मागील सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " मंडळीका : बाइसीं लाहो कां गा केला ? सुपर्खीत कीजे कीं : " ।। **पं.** °नाथोबा परतौनि पैठणासि आले : गोसावीयांसि भेटि जाली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग बाइसांचे सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : " म्हातारीया वेगु कां गा केला ? च्यारी दीस सन्यधानीं कां नसावें ? परि देवेंवीण भगतासि उरणेंचि नाहीं : भगतु वीयोगीं नुरे : " ।।

**५३६.** ***अगोनेमु.** प्रतीत ही लीळा नाही. **हीबीयपं.** आणि **दधन.** (कोलते, श्रीचक्रधरचरित्र, पान ३१९ पाहा) या प्रतीत ती आढळते. स्वामींना पैठणाला नेल्यानंतर तेथे काय झाले, यासंबंधीचा वृत्तांत येणे अपेक्षित आहे. ' जळगावीं दाइंबा भेटि :' या लीळेतील ' गोसावी हे लीळा स्वीकरिली ' हे वाक्य, ' भोजेया सत्रसींगा पाठवणें ' या लीळेतील ' गोसावीं हें स्वीकरावें ' हें वाक्य. ' घुइनाएकाची वस्त्रपुजा ' या लीळेतील ' ईश्वरी काइ छेदभेद असति ' हे वाक्य, तसेच ' भट आउ दुखकरणीं अस्वासन ' ही संपूर्ण लीळा लक्षात घेता, पैठण येथे स्वामींनी ' अवयवछेदाची ' लीळा स्वीकरली होती हे स्पष्ट दिसते. (**मु.** प्रतीतील उपरिनिर्दिष्ट लीळांत हे उल्लेख नाहीत. ते गाळले असावेत.) **हीबीपंय.** प्रतीत व मी पाहिलेल्या **दधन.** प्रतीत ' मुधादित्यीं पुजास्वीकारू ' ही लीळा आहे. पाठसमुदायाच्या सर्व पोथ्यांत ' पैठणीं बाइसां ईश्वरवियोगें देहत्यागु ' या लीळेनंतर ' मुधादित्यीं पुजास्वीकारू ' ही ' आदि ' सापडते. तेव्हा ही लीळा मूळ चरित्रात असली पाहिजे यात शंका नाही. आंबा म्हणितलें : ' का गा : कोरा एका प्रपंचाकारणें ऐसें करितां : ' ' तो ज्ञानिया नव्हे : तो बोधवंत नव्हे. . . . . . . . .तो हेमाडि पंडीत : भील : माहादाश्रमु : ब्रह्मसानु : **पैठणीचे माहाजन** . . . . . . ' हे गुजर सिवबासांनी संबंधिलेले लक्षण व विचारस्थळातील पक्ष लक्षात घेता या लीळेविषयी संशय राहात नाही. म्हणून ती संहितेत स्वीकारली आहे.

लोकु : महाजन : विद्वांस : पुराणिक : संन्यासी : ब्रह्मचारी : क्षेपणीक : नाथपंथिये : ऐसे आवघे मिनले : गोसावीयांतें मुधादित्यीं आणिलें : गोसावीयांसि मुधादित्याचां चौकीं आसन जालें : तिहीं आवघीं म्हणीतलें : "गोसावी[1] काइ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें भीक्षु महात्मे :" "ना सांगा कां ना?" "तुम्हीं एकएक प्रधान आवघे मीनले असा : वीद्वांस : ब्रह्मचारी : संन्यासी : पयोव्रती : शास्त्रसीधांती : पुराणिक :" आणि सारंग-पंडिताची वास पाहिली : आणि इउती मान केली : "तुम्हीं महाजन अष्टदसा प्रजा : क्षेपणीक : नाथपंथी : ऐसें आवघे मीनलें असा : जाणिवा आंव न पिया : तरि हें काइ होए ऐसें तुम्हींचि वीचारा पां :" "ना याचां ठाइं स्त्रीयाचि वेधती : ऐसें आथि गा? हे स्त्रीयांचां ठाइं ऐसेनि ऐसें करिती : ऐसें आति गा?" आवघां म्हणितलें : "हो आति :" इतुकेनि सभेसि एकटाळी पीटली : मग[2] एकमेकां आळोंचूं लागलें : मग मायिता हरी : प्रज्ञासागर : हे दोन्ही उठीले : "तुम्हीं आळंचू ओखटा करीत असा :" आळोंचाआंतुनि उठिले : "या राष्टरासि ओखटें असे हो : चांडाळ हो :" म्हणौनि नीगाले :।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं एककी आगमीके : एकक प्रधान बैसले असा : एणें तुमचें काइ गा केलें : ऐसें वीचारा पां :" "ना आम्हीं वीचारीलें :" "हो कां गा : जें वीचारीलें तें करा :" मग जगतिआंतुलीए देउळीए नेलें[3] : तेथ पुजा स्वीकरीली : नाकाची[4] :।।

## ५३७ मायिता हरी : प्रज्ञासागर : देशत्याग*

[मायिता हरी : प्रज्ञासागर : आळोंचाआंतुनि उठिले : नीगाले : घरा गेले : भरलीं भादलीं घरें : वस्तभाओ संपति सांडिली[1] : देशु सांडिला : मायितेन हरी नायकें माळवध : आवारू सांडुनि तेलंगदेसा नीगाले : आसूची वाखारी कढीवा बांधली : हातीं चिरा : एकी हातीं स्त्री : बैल : गाडी : ऐसें नीगाले : तवं उपरीएवरुनि तेणें म्हणीतलें : "घेया घेया याची म्हेळी : आमचेया समया न मिळे : घाला घाला माझेया महाराष्टरावाहेरी :" मायितेन हरीन म्हणीतलें : "म्हेळी घे तुझी : आणि तुझेया वापाची : तुझेया महाराचां महाराष्ट्रहोउनि मीचि जातु असे :"।। ]

---

प्रस्तुत लीळा अनेक प्रतीत आढळते. पण त्यातील वर्णन त्रोटक आहे. म्हणून **द.** प्रतीतून ती येथे घेतली आहे. या लीळेचे मी 'मुधादित्यी पुजा स्वीकारू' आणि 'माइता हरी : प्रज्ञासागर : देशत्याग' असे दोन भाग केले आहेत. त्यामुळे मूळ लीळेत कोणताही फरक झालेला नाही.

१ **एवा.** तुम्हीं. २ **एवा.** °आळोंचूपाळंचू करूं लागले. ३ °एक म्हणति काउसेनेचेंया देउळाआंतु. ४. °एक म्हणति कानासहित.

**५३७.** * यामागील लीळेवरील तळटीप पाहा.

१ °**सोधु** : मायितेया हरीची लवेलागणीचीं तितुलींहीं निगालीं :

## ५३८ चापडगांवीं आउसां भेटि*

[ मग गोसावीं प्रतिष्टाना बीजें केलें : सवेंचि माघौते नीगाले : कांवंसेने वसति जाली : मग एरी दीं चापडगावां बीजें केलें : तवं आधीले दीसीं आउसें गोसावीयांपासौनि तेथ आलीं होतीं : गावो मागावेया : देवुळीं जवं बैसलीं असेति तवं गोसवींहीं तेथ बीजें केलें : आउसीं गोसावीयांतें देखीलें : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलीं : मग दुख करूं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "हें तुमचें तुम्हांसि भेटलें : तरि दुख कां करीतां नाएका ?" दों दीसांचा उपवासू : तोंड पळवलें : बोलवें ना : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : गावांतु जा : अन्न आपजवा : नायेकासि जेउं घाला :" "हो कां जी :" मग भट गावांतु गेले : कुंभारातें भरणुकें मागीतलें : कांहीं गावांतु अन्न आपजवीलें : दुध आपजवीलें : घेउनि आले : उस्ण उदक ठेवीलें : गोसावीयांचें श्रीमुखप्रक्षाळण जालें : श्रीचरण धुतले : गोसावीयांसि आरोगण जाली : आउसांसि जेउं सूदलें : आपण जेवितीचि ना[१] : मग तेथ गोसावीयांसि वसति जाली : गावांपुर्वे देवुळ : ।। ]

## ५३९ भटां देउळ पाहों धाडणें*

[ तेथौनि गोसावीं जवळगावां बीजें केलें : गावांबाहीरि आसन जालें : भटांतें देउळ पाहों धाडिलें : तेहीं पाहिलें : तवं अळखूळें जालें होतें : आले : गोसावीं पुसिलें : "देउळ कैसें असे गा ?" भटीं म्हणीतलें : "जी जी : माहादाश्रमाचेया[१] एंव्रासनासारिखें असे :" तवं गोसावी कोपले : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं माहात्मे कीं गा : तुम्हां मारिता-पूजिता समान होआवा कीं गा[२] :" तवं भटीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं ऐसें म्हणौनिचि :" ।। ]

---

**५३८.** ***अगोने.** प्रतीत या लीळेची केवळ 'आदि' आहे. येथे ही लीळा **मु.** प्रतीतून घेतली आहे. 'श्रीचरणां लागली :' याच्या पुढील वृत्तांत **हीबी.** प्रतीतून घेतला आहे.

१ °**एवा.** गोसावीं प्रसादु दीधला तो घेतला. **पं.** °सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : एथौनि ऐसेनि ऐसें स्वीकरीलें असे :" आणि आउसीं श्रीमुखाची वास पाहीली : मग आउसीं म्हणीतलें : "जी जी स्वामी जगन्नाथा : स्वामी जगन्नाथु तवं आमुचा आला : मग अवएउ गेला तरि जाओ जी :" सर्वज्ञें म्हणीतलें "नाएका : ऐसें होए : तुमचे उपकारक तें तवं आलें असे कीं :" ।।

**५३९.** ***अगो.** प्रतीत ही लीळा नाही. **यमु.** प्रतीतून ती येथे घेतली आहे. **प्रव. आ.** ६४ मध्येही ती आहे.

१ **प्रव.** °पूजेसारिखे. २ **प्रव.** (आ. ६४) °मां तें आझुनि आठवता कैसें ?" "जी जी : दृष्टांत दीजताए : मां आठव काइसेयासि ?" गोसावीं हास्य केलें : ।।

## ५४० जळगांवीं दाइंबा भेटि

गोसावीयांसि जळगांवीं[१] गांवांपसीमे आसन होतें[२] : गोसावीं दाइंबातें एतां देखिलें : तुटकीया वाहाना : फुटकी करवटी : फाटकें धोत्र : फाटकें पांगुरण : मोकळीया झींजीया : सर्वज्ञें म्हणीतलें : "पंचपुडीं भोजा : पातला मां :" आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : जवळि बैसले : दुख करुं लागले : मग सर्वज्ञें म्हणीतलें[३]: "हें काइ गा भोजेया : देहाची[४] पुडी[५] केलीं मा :" मग दाइंबायें म्हणीतलें : "जी जी : गोसावीं हें लीळा स्वीकरिली[६] : भेटि होइल कीं नव्हे : कोठें राज्य करिताति तें नेणिजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यातें आठवा : तेव्हळि हें तुम्हांपासीं असे :" "जी जी : तरि कांहीं देखों ना :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो : पाठीचा वासु काइ दीसतु असे ? धर्मवार्ताप्रसंगें सर्वत्र अवस्थान :"।।

## ५४१ नागार्जूनीं अवस्थान*

[मग गोसावीं नागार्जूना बीजें केलें : तेथ दरियांतु पश्चिमामूख कपाटासि डावेया हाता नागार्जूनाची खांडदेवुळी : पटिसाळे नासीकीये अवस्थान जालें : दीस वीस :।।]

## ५४२ वीवरसीधि कथन

गोसावीयांसि वीवराचां तोंडीं लोंवतां स्रीचरणीं आसन जालें : सर्वज्ञें म्हणीतलें[१] : "भोजेया : हें नागार्जुनाचें वीवर गा : एथ नागार्जुनु पडला असे गा : तयाचें सीर वेगळें पडलें असे : धड वेगळें पडलें असे गा : कव्हणी एकु जाइल : तयाचें सीर लावील : तरि

---

**५४०.** १ **गोनेमु.** जवळगावीं. २ **य.** °ते लीळा दायंबायें आइकीली : मग गोसावीयांतें गीवसीत आले : **मु.** °दाएंबा वृधासंगमीहुनि गोसावीयांतें पुसौनि गेले : मग मागौतें गोसावीयांतें गीवसीत आले : **हीबी.** °दाइंबायें गांवीं आइकीलें : तैसेंचि प्रतिस्थाना आले : गोसावीयांतें चोजवीलें : कव्हणीं सांगीतलें 'ते नागार्जुनाकडे गेले :' तैसेंचि नीगाले : आइकीलें तैचें अन नाहीं : वीळीचाचेया पाहारीं–. ३ **य.** °"भोजेनि देहाची सकटपुडी केली मां :" मग गोसावीं तेयाची पाठि स्परीसीली : मग दाइंबा दुख करूं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेया : दुख कां गा करीत असा ? कोरा एका प्रपंचाकारणें दुख न करा : आंगामाजि खत काइ न पडत आहे ? तुमचें काइ उणें जालें : तुमचे उपकारक ते तवं असे कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देउळीं लेपें असति : तेयाचा एकाधा एकु अवयेवु खोमे : तरि तेयाचें काइ इश्वर्यें जात असे ? परति ये तवं आणिकाचें मनोर्थ पुरवीति कीं : तैसें तुमचें उपकारक तवं असे कीं :" ४ **एवा.** इंद्रीयांची. ५ **हीबी.** सांपुडी. ६ **मु.** प्रतीत 'गोसावीं हे लीळा स्वीकारिली :' हे वाक्य नाही.

**५४१.** ***अ.** प्रतीत फक्त आदी आहे. हा मजकूर **मु.** प्रतीतून घेतला आहे.

**५४२.** १ **यमु.** "भोजेया : येथ वीवर असे : वीवरें वीवरें जा : नागार्जुन भेटैल : सीस लावा : सीधी

लागैल : तो उठील : तयासि वीवरसीधि होइल : तुम्हीं जाल तरि तुम्हांसि होइल :" "जी जी : तरि गोसावी कवणीं ठाइं दरीसन देती?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें नेणिजे :" "जी जी : तरि तो[२] असो परता तैसाचि पडला :" ।।

## ५४३ कमळभैरवभोजनीं दाइंबा कोपणें

गोसावीं केदारदेवा वीहरणां बीजें केलें : एकु दीसीं गोसावीयांसि जळमांडवीएसि लोंबतां स्त्रीचरणीं आसन जालें : एकु दीसीं कमळभैरवांचीए पटिसाळेचीए कोणटां आसन जालें : *कमळभैरव ते बाइल : नागाराउळांची बहीण : तीएसि दादुलेयाचा वेषु : तिएं आपुलेनि हातें न जेवीति*[१] : कमळभैरव ते आपुलीया मढाचीए सोंडीएवरि बैसले असति : त्यांचीं सीक्षें आलीं : तेयासि वाटीए केळें तुप साखर ऐसें[२] जेउं लागलीं : ते म्हणति : "आरे : नेघें रे : हा धाला असे :" म्हणौनि तोंड पळवीति : तवं दाइंबायें म्हणीतलें : "असों देया : असों देया : मरैल : मग आपैसेयाचि खाइल :" तवं रोहुंकुनि[३] पाहीलें : दाइंबायें म्हणीतलें[४] : "रोहुंकुनि[३] पाहाता ? काइ तुमचें वाढीलें खाताए ?" याउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें न म्हणीजे कीं गा भोजेया : प्राणियासि असुख होए :" "पां पां जी : केळें खातां जैसा गळा सोलताए : साखरभातां जैसे दांत कसैजताति :" तवं[५] तयांसि निद्रा एओं लागली : झोंपीं जाओं लागलीं : तवं दाइंबायें म्हणीतलें[६] : "आउवे : यांतें भीतरि नेया : एऱ्हवीं पडती :" तीयें म्हणति : "पुरुषू सहजीं आहे :" इतुलेनि तीयें होतीं : आणि सोंडीएखालुती पडली : आणि दुसरी ते धावीनलीं : "पडिली जी : पडिली जी :" म्हणौनि : दाइंबा बोबाइले : "हां हां : उठउं नको : पुरुषू सहजीं आहे :" गोसावीं इखीत हास्य केलें :।।

## ५४४ भोजेया इंद्रवणीं*

[ गोसावीयांसि मादणें जालें : उदक उरलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजयासि इंद्रवणीं ठेवा गा :" नावेक भटीं कढत तावीलें : मग दाइंबासि उदक सारिलें : दाइंबा आपुली खरूज सेखीती : आणि म्हणति : "हाए हाए : हें सूख इंद्रादीकां नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजया : ऐसें होए : तरि हें इंद्रवणीं म्हणां :" गोसावीयांसि प्रतदीनीं आंघोळि होए : गोसावी म्हणति : "भोजयासि इंद्रवणीं ठेवा गा :" ।। ]

---

होइल :" दायंबायें म्हणीतलें :– २ **यमु.** °पसरलाचि असे ना कां :"

**५४३.** १ (मु.). २ **यमु.** °जेववीताति. ३ **गो.** रोंकौनि. **ने.** रोंकुनि. ४ **यमु.** °रोहोकीतेसि काइ : मी बैसलां बैसला खातु असे : ५ **यमु.** दुसरां दीसीं गोसावी उदेयांचि गोसावीं केदारदेवा वीहरणा बीजें केलें.....कमळभैरव सोंडीयेवरि तेथचि जोगवटा घालौनि बैसलीं असेति : तवं तीयें झोपीं जाओं लागली : ६ **यमु.** °यें थापटि खालि पडती :" तवं तीयां म्हणीतलें : "असो दे : हे तेथचि असो : हे साहाजी असे :"

**५४४.** *अ. प्रतीत फक्त आदी आहे. ही लीळा येथे **गो.** प्रतीतून घेतली आहे.

## ५४५ भटीं मादणें करणें

गोसावीयांसि वहुत दीस मर्दना नाहीं : मग भटीं गोसावीयांसि मादनेयांलागि वीनवीलें : गोसावीं वीनवणी स्वीकरिली[१] : मग भट कमळभैरवांचेया मढासि गेले : तयांतें डेरा मागों लागले : तवं ते डेरा नेदीति : भट दाटुनि रीगाले : डेरा काढिला : घेउनि आले : पाणी ठेविलें : वोलणीं वोळगवीली : मर्दना दीधली : मादणें[२] जालें : ।।

## ५४६ भोजेया सत्रसींगा पाठवणें[१]

दाइंबायें गोसावीयांतें वीनवीलें[२] : "गोसावी सकळ वीद्या जाणति : सकळ वोखदी जाणति : गोसावीं हें स्वीकरावें जी :" "लक्षमणासि जै सक्ति लागली : तैं[३] सैलि : वीसली : वोखदी हनुमंतें आणिलीया : तीया सत्रसींगीं असति : तेथचे वडुवे जाणति :" तैसेंचि दायांवा नीगाले : तेथचेयां वडुवेयांतें पुसिलें : तेहीं म्हणीतलें : "आमचे वडील जाणति : परि सांपडति ना : डोणागीरि पर्वतु नेला : एक डीखळ पडिलें : तो सत्रसींगु जाला : " ।।

## ५४७ आंबा एकवीरे[१] अवस्थान ।।

## ५४८ भट प्रसनाएकु सत्रा जेउं पाठवणें

मग एकवीरेहुनि[१] गोसावीं भट : परसनाएक छत्रा जेउं धाडीले : भट : परसनाएक छत्रा गेले : तेहीं बैसों घातलें : उन्हउन्ह अन वाढीलें : भट जेविले : प्रसनाएकें दुसरा चाटु वाढुं घेतला : भट जेउनि पुढें गोसावीयांचेया दरीसनासि आले : मागिलाकडौनि प्रसनाएकु आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "उसीरु कां गा लाविला प्रसेया ?" "उन्हउन्ह ठोंवरा नागदेन वाढुं घेतला : मीयां दोनि घेतले : काहीं साकवती[२] नाहीं : हा जेउनि पुढें आला : मज गीळेचि ना : तें मज

**५४५. १ यमु.** °भटोबास सेजा गावुनि डेरा घेउनि आले : पाणीं ठेविलें : भटीं गोसावीयांसि मर्दना दीधली : श्रीमगुटीं तेल वोळगवीलें . . . ओळणें ओळगवीलें : गाडु ढाळीले : गोसावीयांसि माजणें झालें : २ **गो.** माजणें.

**५४६. १ मु.** प्रतीत ही लीळा नाही. २ **य.** एकु दीं दाइंबें वीनवीलें : "जी जी : गोसावीं स्वीकरावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सत्रसींगा जा : येथचीया ओखदीया घेउनि या : मग स्वीकरीजैल : नीर्मुळी ओखदी :" (**प्रश्रा.** । सहश्रमुळी : **रामे :** ।) "जी जी : मीं कैसेन ओळखैन जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रकासु देइल :" मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : नीगाले : सत्रसींगा गेले तवं आवघा डोंगरू प्रकासा भरला असे : कोणाची मुळी आणावी तें नेणति : मग माघौतें पुसावेया आले : तवं गोसावीं स्वीकरीलें : ३ **हीबी.** °सल्ली पीसल्ली—. **गो.** °सील्या वीसल्या—.

**५४७. १ गोनेयमु.** तीकवनारायणीं **मु.** एकवीरे वस्ति : एरी दी तीकवनाराएणीं अवस्थान.

**५४८. १ यमु.** °**प्रश्रा** :। तिकवनारायेणीहुनि : **रामे** :। २ **यमु.** (**शोध.** साधन).

जेवितां उसिरु लागला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उन्हउन्ह[3] तेंचि एक साधन कीं गा : *रेंदेया चेंदेया* दरु *भरिजे*[4] :"।।

## ५४९ घूइनाएकाची वस्त्रपुजा

गोसावीयांसि एकवीरे अवस्थान जालें : भट[1] घूइनाएका सांघों गेले : "घूइनाएको : गोसावीं बीजें केलें असे : परि गोसावीं ऐसें स्वीकरिलें असे :" घूइनाएकें म्हणीतलें : "गोसावी ईश्वरु : ईश्वरीं काइ छेदभेद असति : हे ईश्वरिची इछा म्हणां :" ऐसें म्हणीतलें : आणि पानें : पोफळें : वस्त्राचें दींड : एकाचीए डोइए ठेविलें : ऐसे गोसावी-यांचेया दरीसनासि आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : पानें पोफळें दरीसना केलीं : गोसावीयांजवळि बैसले : सर्वज्ञें म्हणीतलें : "घूइनाएको : देओ ऐसा असे :" "जी जी : ईश्वरीं काइ छेदभेद असति : हे ईश्वरिची इछा म्हणां : ऐसें पापीयें काइ केलें :" मग वस्त्रांचें दींड गोसावीयांपुढां ठेविलें : "जी जी : गोसावीं ये वस्त्रें घेयावीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : लागतीं तीयें घेया : एरें मागुतीं पाठवा :" मग[2] भटीं तीनि[3] गोसावीयांलागि निवडिलीं : दोनि आउसांसि : एक प्रसनाएकासि : भटांसि देत होते : परि नेघतीचि : एक म्हणति : भटीं एक घेतलें : अर्धेयाची गोसावीयांलागि पडदनी केली : आधें आपणेयांसि : मग घूइनाएकें गोसावीयांसि वीनवीलें : "जी जी : गोसावी जवं एथ राज्य करिती तवं मीं गोसावीयांलागि उपाहारु आणीन : मीं जरि न पवाडें तरि गोसावीं कव्हणा एका भक्तजनातें पाठवावें :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : मग ते बीढारासि गेले : ।।

## ५५० भट आउ दुखकरणीं अस्वासन

भटीं[1] गोसावीयांची प्रतदीनी प्रवृत्ति देखौनि निबातळीं जाउनि दुख करीत होते : आउसें गेलीं : म्हणों लागलीं : "कां रे वा नागणां दुख करितोसि ?" "ना आउ : गोसावीं ऐसी प्रवृति स्वीकरीली : गोसावी बीजें करीती तरि आम्हीं काइ करुनि ?" इतुलेनि

३ **अगो.** भातु. **ने.** °ठोंबरा. **यमु.** उष्णत्व तेंचि एक साधन. ४ (**प्रव. आ.** ११२).

**५४९.** १ **य.** गोसावी आंबेया आले ऐसें घुइनाएकें आइकीलें : मग दरिसना आले : लुगडेयाचें दींड एक घेउनि आले : **मु.** घुइनाइकीं आइकीलें जें गोसावी एकवीरे राज्य करिताति : मग एकु दीस तेहीं दर्शनाची आइति केली : पानें पोफळें : सवें वस्त्राचें दींड : ऐसे आले : ('ईश्वरीं काइ छेदभेद असति' ही वाक्ये व यासंबंधीची प्रश्नोत्तरे **मु.** प्रतीत नाहीत). २ **यमु.** मग भटोबासीं लागेति तें घेतलीं : गोसावीयांलागौनि वोलि एकि : आंगियां एक : बहीर्वासां एक : पासवडी एक : पासवडी राति पांगुरणाची एकि : ३ **होबो.** °बरवी चांगटें—.

**५५०.** १ **य.** एकु दीं भट मडकें आणावेया सत्रा गेले : मग येउनि देउळामागें बाहीरि भटआउसें दुख करूं लागलीं : तेथ गोसावीं बीजें केलें : "दुख कां गा करीत असां कोरा एका प्रपंचालागौनि ? तुमचें काइ उणें जालें ? आंगामाजि खत काइ न पडत असे ? तुम्हां उपकारक ते तवं असे कीं : चौरंगी विद्या

आउसेंहीं रडों लागलीं : भटहीं रडों लागले : गोसावीं तेथ बीजें केलें : "कां गा वानरेया दुख करीत असा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अवघेया[२] देहामध्यें इतुला यैसा अवेवु[३] उणा म्हणां : तुमचें उपकारक तरि तुम्हांपासीं असे :" "ना जी : हें गोसावीं स्वीकरावें :" म्हणौनि स्रीचरणांवरि माथा ठेविला : दुख करुं लागले : "ना जी : हे गोसावीं प्रवृति भंगावी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसांहीं हें स्वीकरिजैल तरि हें उरों न ल्हाएं : प्राणिया आझुइं जचतु असे :" "जी जी : आमचें उजळमुख करावें :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि यासि तीनि दीस एकांतु देयावा :" ।।

भटीं[४] भीतरि आसन रचिलें : जाडिचें[५] लावणें लाविलें : गोसावी तेथ आसनीं उपवीष्ट असति : आरोगणेचां समैं गोसावीयांसि भटोबास तेथचि ताट करीति : भितरि[६] ओळगवीति : आपण दारेंसीं बैसले असति : ऐसें तीनि दीस गोसावीयांसि अवस्थान होतें : तीसरां दीसीं भटीं निचळ ऐसें देखिलें : भटां ऐसें जालें : 'गोसावीं काइ बीजें केलें[७] ?' भटीं उघडौनि पाहीलें : तवं गोसावीयांची बरवी बतीसलक्षण स्रीमुर्ति देखिली : आणि[८] भटां सुख जालें : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलें : "जी जी : माझा गोसावीं लळा पाळिला :" आउसें आलीं : आउसीं गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : मग भट घुइनाएकासि सांघावेया गेलें : "घुइनाएको : गोसावीयांचेया दरीसनासि चाला जाओं : गोसावीं अवेवु स्वीकरिला :" घुइनाएकु गोसावीयांचेया दरीसनासि आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग भटीं डेरा आणिला : पाणीं ठेविलें : भटीं ओलणीं वोळगवीली : गोसावीयांसि मर्दना जाली : मादणें[९] जालें : वस्त्रें वेढिलीं : भटीं आसन रचिलें : गोसावी आसनीं उपवीष्ट[१०] जाले : मग आउसीं म्हणीतलें : "जी जी : स्वामी जगंनाथा : एक सीस : मां काइसेन ओवाळील :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीउ काइ जाला नाएका[११] :" ।।

---

येथ काइ नाहीं ? परि उरों न ल्हायें :" २ **एवा.** इउलेया. ३ **एवा.** प्रपंचु. ४ **य.** भटोबासीं देउळा पुर्वेवीभागीं आड कानवडा बांधला : तेथ गोसावीयांसि आसन जालें : भटोबास तेथ कोण्हासि रीगों नेदीति : ५ **ने.** जाडीचा कानवडा लावीला : ६ **य.** °कानवडेया आडुनि : ७ **ने.** करिती. ८ **हीबी.** °हरिखैले : सर्वज्ञें म्हणीतलें : "लाहो का गा केला वानरेया ? नावेक धीर करितासि तरि आणिक कांहीं देखतेति :" ९ **गोने.** माजणें. १० **हीबी.** °असति : सपुजीत : श्रीमुखीं तांबोळ : सर्वांगीं चंदन : तवं आउसीं दीवा केला : पांच वाती उजळिलीया : पांचें वाति गोसावीयांतें वोवाळीलें : मग आउसीं म्हणीतलें :—. ११ या लीळेतील अवयवस्वीकाराचा वृत्तांत **मु.** प्रतीत नाही. **मु.** प्रतीत आलेली ही संपूर्ण लीळा पुढीलप्रमाणे : **आउ जीवें वोवाळणी ।।** एकु दी गोसावीयांसि वीळिचां वेळीं मार्जनें जालें : गोसावी आसनीं उपविष्ट असति : सपुजित : आउसें ऐसीं आलीं : गोसावीयांतें ऐसें देखिलें : आणि सुख उपनलें : "जी जी स्वामी जगन्नाथा : एक सीस : मां वोवाळुं काइसेनि ?" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "जीव काइ जाला असे नाएका ?" "ऐसें जी स्वामी जगन्नाथा : जीवें वोवाळणी :" **राम्हे.** हे लीळा एथ : ।। **प्रस.** भटाचेया मार्जनेयांतु ।।

## ५५१ ब्रम्हचारि गाळिदानीं आउ सीक्षापण

गोसावीयांसि ओटेयावरि[१] आसन असे : मुंजीया एकु देवतेसि आला : भीतरि गेला : पाहों[२] लागला : आउसीं वारिला : तवं आउसांतें खवळुं लागला : आउसीं म्हणीतलें : "है रे : तुमचें निसंतान होइल :" म्हणौनि सवीया देओं लागलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "अन्येत्र कीजे तें वारानसीं फेडिजे : वारानसीं कीजे तें कें फेडिजेना एका ? *तैसें असन्निधानीं घडलें ओखटें तें सन्निधानीं फेडावें : आणि सन्निधानीं जें घडलें तें कव्हणें ठाइं फेडावें ? एथिचेनि सन्निधानें कर्में नासा ना तरी कें नासाल नाएका ?" आउसीं म्हणीतलें : " जी जी : कर्में नासावीं लागतीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मळकर्में निवर्तलेयांवीन जीव क्रुपेसी पात्र नव्हे*[३] *:* [ सुरी असे : ते नीसीजे : इतुलेनि तेजा ये : झळका करूनि पोगर आच्छादति : आंबवती दीजे आणि झळक जाए : पोगर असति ते नीवडति[४] :" ] आउसीं म्हणीतलें : "गोसावीयांचेया स्रीचरणां प्रसादें फेडीन जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि करा एथ नमस्कारु :" म्हणौनि गोसावीं स्रीचरण पुढारे केले[५] : आउसें स्रीचरणां लागलीं : ।।

## ५५२ एकाइ रीणयाचनीं लखूबाइसीं उरीण करणें

लखूबाइसीं[१] गोसावीयांचां ठाइं उपहारु केला होता : ते सेताची पाटी एकाइसां दों आसु गाहान ठेविली : सारंगपंडीत वारानसी जात होते : तया सांघातें वारानसी जावेया म्हणौनि लखूबाइसांतें आसु मागों आदरीलीया : "लखूबाइ : माझीया दोन्ही आसु देया : मज वारानसी जावें असे :" लखूबाइसीं म्हणीतलें : "एकाइ[२] : मज गांवां जाओं देया : मीं गांवां जाइन : मग उभराभरि[३] करूनि देइन :" "ना माझीया आतांचि देयाविया :" म्हणौनि धरणें बैसलीं : लखूबाइसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ[४] : तीया आसु एथ उसिनीया देया :" "ना जी : माझीया आतांचि देयावीया :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तेया उपहाराचें तुम्हांसि गोमटें :" "ना जी : मज वारानसी जावें असे : माझीया आतांचि होआवीया :" यावरि गोसावीयांसि खंति आली : मग

---

**५५१.** १ **अगोपंने.** लावणेयां आड. २ **हीबी.** पावो लागला : आणि आउसें कोपली : **य.** तो गोसावीयांतें देखौनि गाळी देओं लागला : आउसें कोपली : "है रे : स्वामीं जगंनाथातें म्हणसि ? चक्रीं पड रे :" सर्वज्ञें म्हणीतलें :– ३ (**प्रव. वि.** २५३–२५४. यात पुनःस्थापित केलेला दृष्टांत चौकटीच्या कंसात दिलेला आहे). ४ (**दृपा.** १०६. सुरीचा (आंबवतीएचा) दृष्टांत. 'पद्मनाभीप्रति बीडीं : **एवा.** महदाइसांप्रति प्रतिष्ठानीं'–**दृस्थ.** प्रकरणवशातील मजकूर व वचनसंबंध लक्षात घेऊन हा दृष्टांत येथे पुनःस्थापित केला आहे.) ५ (**हीबी.**) **अगोपंने.** बाहीरि दाखविले.

**५५२.** १ **यमु.** मागां. . .लखुबाइसीं गोसावीयांचीये वस्त्रपुजेलागि एकाइसांचीया दोनि आसु रूण काढीलीया होतीया : २ **यमु.** °गोसावीयांची सेवा येथ कोण्ही करितें नाहीं : मी गावां जाइन : मग तुमचीया देइन :" ३ **गोहीबीपं.** उभराउभरि. ४ **एबा.** : °"तुमचीया दोनि आसु हें लागे :"

सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : सावंखेडेयासि[५] जा : एल्हंभटातें दोनि आसु मागुनि घेउनि या :" "हो कां जी :" भट सावंखेडेयासि[५] गेले : एल्हंभटातें म्हणीतलें : " एल्हंभटो : तुमतें गोसावीं दोनि आसु मागों धाडिलीया असति :" एल्हंभट आंघोळि करावेया उठिले होते : आसुंची वाखारि ओसरीएवरि होती : वाखारि घेतली : भटांचां हातीं दीधली : " लागेती[६] तीया घेया : माझें दैवं : मातें गोसावीं मागों धाडिलीया :" मग भटीं दोनि आसु घेतलीया : एल्हंभटीं म्हणीतलें : " लागती तीया आणिकी घेया :" "गोसावीं मजकरवि दोनिचि आणविलीया :" मग भटातें राहावीत होते : " राहा : आंघोळि करा : जेवा : मग जा :" " ना : मज गेलेयाबाहीरि[७] न सरे :" तैसेचि भट आले : गोसावीयांसि चौकीं आसन असे : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : आसनापासीं दोन्हीं आसु ठेवीलीया : गोसावीं दोन्हीं आसु घेतलीया : आणि एकाइसांकडे टाकौनि घातलीया : " वाइ : घेया :" इतुलेंनि तीं दोन्हीं आसु घेतलीया : गांठी वांधलीया : ।।

भट गांउनि आले ते भुकैले : अंन आवघें पाळलें होतें : एकाइसीं पोळीया ठेवीलीया होतीया : वरि वांधलीया होतीया : गोसावीं पोळीयांकडें अवळोकिलें : आणि म्हणीतलें : " बापुडें वानरें भुकैलें : कोण्हांतें कांहीं[८] अंन असे ?" ऐसें म्हणीतलें : आणि गोसावीं वाहीरि बीजें केलें : तीयें उगींचि होतीं : मग भीतरि एति आणि म्हणति : " वापुडें वानरें भुकैलें :" बाहीरि जाति आणि म्हणति : " वापुडें वानरें भुकैलें :" ऐसें वेळां दोनि तीनि म्हणीतलें : परि तीयें उगींचि होतीं : मग गोसावीं भटातें अवळोकुनि तयांची भुक हरिली : मग एकाइसें वीळचां गांवांआंतु जातें होतीं : तयांसि माहारांचेया आंडोरांचा वीटाळु जाला : मग तीया रोटीया माहारांसि दीधलीया : ।।

## ५५३ देमाइसांतें राहावणें

एकु[१] दीसीं गोसावी आसनीं उपवीष्ट असति : देमाइसें जवळि बैसली असति : *तवं देमाइसीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : मीं गावांसि जाइन[२] :"* सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : तुम्हीं मागां[३] ऐसें म्हणां : जें वाइसांहातीं एथ असों न ल्हाइजे[४] : तरि[५] आतां[६] धर्माचीया चाडा एथ सातसीया परीवडी वेढिजे ना कां ?" " ना[७] जी : तें दैवचि नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : " देमती : दैवें करावें तें केलें : पुरुषें करावें तें ठेलें :" " जी जी : तेंहीं

५ **यमु.** सांगवखेडेया. ६ **अ.** लागे तया. **गो.** लागे तीया. ७ **ही.** गेलेयावांचौनि. ८ **एवा.** °असे ?

**५५३.** १ **यमु.** एरी दीसीं उदेयांचि देमाइसीं एकाइसीं गोसावीयांतें पुसिलें : मग गावां नीगालीं : नीगतां देमाइसांतें सर्वज्ञें म्हणीतलें :— **प्रव.आ.** २५५. गोसावीयाचें मागील आइकौनि देमाइसा विपरीत आलें : मग जाईन म्हणीतलें. २ (**हीबी.**). ३ **यमु.** इतुके (**य.** इतुले) दीस. ४ **एवा.** ल्हाओं. ५ **एवा.** तरि यातें आतां—. ६ **यमु.** °सातसीया परवडी वेढवेढुं (**य.** वेढुनि) कां नसा ? ७ **यमु.** देमाइसीं म्हणीतलें : " जी जी : मी गावां जाउनि एइन :" सर्वज्ञें—.

गोसावींचि करावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेंहीं एथौनिचि कीजैल : परि पुरुषें चाटसी स्थानीं होआवें कीं : देमती :" यावरि चाटसीएचा दृष्टान्तु निरुपिला :[सर्वज्ञें म्हणीतलें : "सुगरणि असे : ते चाटुसीएतें व्यापारवीत व्यापारवीत पाकनिष्पति करी : आंबाआंतु घाली : खीरीआंतु घाली : खडुरसपाकाआंतु घाली : तैसें ईश्वरू जीवातें व्यापारवीत-व्यापारवीत साधननिष्पति करीति[८] : "] मग[९] तेहीं म्हणीतलें : " जी जी : न सकों कुंभध्वनिसि :" लखूबाइसें देमाइसातें म्हणों लागलीं : "देमाइ : गोसावी राहावितातिं तरि कां राहा ना ?" "ना लखूबाइ : मी न न्हाएं :" मग तीयें निगालीं : ।।

## ५५४ आउ ताटकरणीं भटां दाखवणें

कोणाचा[१] उपहारु आला होता : चणेंयांची डाळि अर्धपात्र भरलें : पळीभरि[२] तुपा : दोनि पोळीया मोडिलीया : मोडुनि वाढिलीया : ऐसें गोसावीयांसि ताट केलें : ऐसें गोसावीं अवळोकिलें : मग म्हणीतलें : " देखिलें गा वानरेया : आउवा कैसें रेइलें असे ?" मग भटीं म्हणीतलें : "ढोरें राखा हो आउवे : जया देवाची सकुमार स्त्रीमंत आरोगण : तेया देवासि मां ऐसें ताट कीजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "यांसि काइ गा कोपत असा : वानरेया : एहीं काइ पुर्वी संतांमहंतांची सेवा केली होती : मां यें जाणती ?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " म्हातारीएसि *पुर्वी*[३] एथची[४] सेवा घडली होती : म्हणौनि घरा जाउनि संबंधु दीधला :" मग भटीं अवघेंचि वरण फेडिलें : तोकडेंचि वर्ण वाढिलें : अवघेंचि तुप फेडिलें : तोकडेंचि तुप वाढिलें : अर्ध पोळी वाढिली : मग गोसावीयांसि आरोगण जाली : यावरि भटांसि बाइसांचें दुख होए : ।।

## ५५५ उमाइअव्हानीं भटांप्रति सेवाभाव कथन

गोसावीयांचें[१] सेवादास्य टकत[२] असे : मग भट उमाइसांतें आणावेयालागि साडे-गांवांसि गेले : उमाइसांतें म्हणीतलें : " उमै : गोसावीयांचें सेवादास्य ठाकत असे : तें करि " "ना नागदेया : मीं एतीयें कीं : परि वैजोची ब्राम्हणी कोनी निघावी असे : तीचें

---

८ (**दृपा.** ६४. चाटसीएचा दृष्टांत. दार्ष्टांतिकाशिवाय निरूपण पूर्ण होत नाही. ते स्वामींचेच असावे. म्हणून अंतर्भूत केले आहे). ९ **य.** मग ते नीगाली : मग तीये मागीलीकडे म्हणति : "चांगदेओराउळ होतु अथवा नव्हतु : परि कुंभध्वनि नीगाला :"

**५५४.** १ **ही.** घुइनाइकाचां घरूनि. **यमु.** एकु दीं आउसीं गोसावीयांसि ताट केलें : डाळि : तुपरोटीया : साकवतिया : एकें वेळे बहुत वाढीलें : मग गोसावीयां पुढां ठेवीलें. २ **गोने.** पाळिभरि. ३ **(गोनेहीबी.)**. ४ **एवा.** ईश्वर°.

**५५५.** १ **यमु.** एकु दी भटोबास गावां कांहीं आणावेया गेले : गाव हींडति : साडेगाव जवळि ठेला : मग वीचारीलें : "गोसावीयांचीये सेवेसि कोण्हीं नाहीं : तरि जाओं ना कां उमैतें आणुं :" म्हणौनि साडेगावा गेले : वाहाणा नफेडीत ओसरीएवरि बैसले : २ **हीबीपं.** ठाकत. **ने.** ठकत.

बाळांतपण करावें असे :" भटांसि खंति आली : "एकीकडे गोसावीयांचें सेवादास्य[३] : एकीकडे वैजोचीए ब्राम्हणीचें बाळांतपण :" तैसेचि भट देहेंचि मागुते आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागले : गोसावीयांपासि बैसले : गोसावीयांपुढां आवघी वेवस्था सांघीतली : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "एथचें सेवादास्य तें काइ तुझेनि भाउपणें होइल ? एथौनि देइजैल तें होइल कीं : *परमेश्वराचा सकळही व्यापारु शक्तिद्वारक : एथिचेनि अभिमानीयें अभिमानु सांडिला गा : आतां तुझेनि उद्यमें काइ होइल*[४] ? तरि दोनि पाउलें परता जातासि कां : म्हातारी निडळावरि हातु देउनि वाट पाहात असे[५] :"।।

## ५५६ हंसराजु म्हांइंभटांतें बोलाउं धाडणें

गोसावीं हंसराजातें म्हणीतलें : "हंसराजा : तुम्हीं परमेश्वरपुरासि जा : श्रीप्रभूचां ठाइं म्हांयां नावें ब्राम्हणु असे : तेयातें ऐसें म्हणावें : 'तुमतें एथौनि बोलाविलें असे :' आधीं हा नीरोपु सांघावा : मग श्रीप्रभूसि दंडवत करावें[१] : तेयांतें ऐसें म्हणावें : 'वस्तिचेयां निगावें :' जातजातां बळ्हेग्रामावरुनि जावें : द्रीढपुरुषांतें ऐसें म्हणावें : 'तुमतें एथौनि बोलावीलें असे :' " ।।

## ५५७ खचले प्राणीए अनुवादु*

[ एकु दीं गोसावीं गंगातीरीचेयांतें बोलाउं नाथोबातें[१] पाठविलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "जा[२] : तयां आवघेयांतें[३] बोलावा : एक वेळ दर्शन[४] दीजैल[५] :" "हो कां जी :" दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : नीगालें : बळ्हेग्रामा गेले : तयां आवघेयांतें म्हणीतलें : "तुमतें गोसावीं बोलाउं धाडिलें असे :" तीहीं म्हणीतलें : "आम्हीं कोण्ही आराओं ना :" मग प्रतीष्टानावरूनि आले : *सारंगपंडितांपुढां*[६] सांघितलें : ते उगेचि होते : मग गोसावीयांपासि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : पासि बैसले : "जी जी : तेथ गेलां : तेयांपुढां सांघीतलें : ते म्हणति : 'आम्हीं आराओं ना :' " गोसावीं आइकों सरलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें[७] : "खचलें प्राणिये : गेलीया बुद्धि : जालिया धर्मा हानि[८] :"

---

३ **हीबी.** °आणि कवणीकडे. ४ (**प्रव. विमा.** १४६ व १३७). ५ **यमु.** °एथ यावेया सांघातेंवीन ठेली असे :" ऐसें गोसावीं पाडळीये माहादाइसाचें दुखण दाखवीलें : ।।

**५५६.** १ **एवा.** घालावें. **यमु.** °जातखेओ खैराळेया वसतीसी नीगावें.

**५५७.** ***अ.** प्रतीत ही लीळा नाही. येथे ती **मु.** प्रतीतून घेतली आहे.

१ हे प्रसराम वासना । रामे. वासना : चांगदेवोभटातें उपाध्यातें बोलाउं–. **ने.** दाइंबातें. २ **ने.** "जा गा : दृढपुरूषा बोलावा". ३ **शोध.** गंगातीरिचेयातें. ४ **एवा.** संबंधु. ५ **ने.** °मग दाइंबा गेले : तवं कोणी नाराति : उपाध्ये आले : एर नारातीचि. ६. (**य.**). ७ **ने.** खचले प्राणिए : गेलिया बुधी : जालिया धर्महानि : गेले प्राणिए धर्मापासौनि. ८ **पं.** °यया अर्था खचलेया देउळाचा दृष्टांतु निरूपिला.

"*जी जी पैठणावरौनि आलां : पांडेयापुढां सांघितलें : ते बोलति ना*[६] *:*" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेयासि आतां ऐसी अवस्था वर्तति असे : यातें देखौनि पालौ वोडउनि जाइजे :" म्हणौनि श्रीकरें अनुकारू केला : ।। ]

## ५५८ मार्गी पुरु उतरणें

मासु दीसु गोसावीयांसि तेथ अवस्थान जालें : पुढें कार्तिकी[१] : तेथ जत्रा भरे : तयाकारणें गोसावीं तेथौनि बीजें केलें : मार्गी वाहाळे पुरु जातु असे : भटीं[२] आणि दाइंबायें मागिलाकडे हात धरिलें : गोसावी तेयांचीए पुष्टीवरि आरोहण जालें : वाहाळ उतरों बैसलें : तवं वाहावले : ते हात सुटले : ते बुडकळले : ऐसें गोसावी थडीएसि उभे राहीले : भट गजबजौनि ऐसें पाहाति : 'गोसावी काइ ?' तवं गोसावी थडीएसि उभे देखिले : "जी जी : गोसावी ऐसें कैसें थडिएसि उभे ठाकले ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुम्हांसि एथौनि इतुलेंचि आश्चर्यें वहु :" ।।

## ५५९ सेकुटां वंकनाथीं अवस्थान

तेथौनि गोसावीं सेकुटेयासि बीजें केलें : तेथ गोसावीयांसि वंकनाथीं : पंचरात्रि[१] एकि अवस्थान जालें : ।।

## ५६० माहांडुळमार्गी भटांलखूबाइसां भांडण

एकु[१] दीसीं घुइनाएकें तेथ वीनवीलें होतें : 'जी जी : गोसावी सेकुटेयासि बीजें करिती[२] तरि तेथौनि उपाहारु आणावा :' मग[३] लखूबाइसें तेथौनि प्रतदीनीं उपाहारु आणीति : एकु दीसीं उपहारु आणावेया गेलीं : तवं उसीरु लागला : म्हणौनि भट अवसरीसि गेले : तवं तीयें चौरंगावरि बैसौनि तयांसीं गोष्टि करितें होतीं : "हें काइ लखूबाइ : तुम्हीं काइ यांसीं गोष्टी करावेया आलींति म्हणां : गोसावीयांसि आरोगणे उसीरु जाला :" लखूबाइसीं म्हणीतलें : "हो हो : उगा अस कां माहादेवा :" भटीं म्हणीतलें : "उगी अस कां पार्वतीए : तुझें मूत[४] ओलांडिलीयां कावरें लागे :" लखूबाइसीं म्हणीतलें : "ऐसीयां माहात्मेयांचां कपाळीं घालीं घांट[५] :" तयांसि उसीरु लागला

---

५५८. १ **य.** कार्तीके पुनीवे (**रामे.** भोंडनी पुनीव). २ **यमु.** मग गोसावीं दाइंबाचेया खांदावरि एकु श्रीचरणु ठेवीला : भटांचेया खांदावरि एकु ठेवीला : उभे राहीले : ते नदीआंतु रीगाले :

५५९. १ **गोने.** सप्तरात्रि.

५६०. १ **यमु.** घुइनाएकाचें एक घर आंवा : एक घर आवारू माहांडळीं. २ **अ.** करावें. ३ **यमु.** एकु दी भट : दाइंबा : लखूमबाइसें उपाहारू आणुं गेलीं : मग येतां भटां लखूमबाइसां भांडन जालें : लखूमबाइसीं म्हणीतलें : "उगे असा इस्नु (**मु.** विष्णु) :" भटीं म्हणीतलें : "उगी अस पार्वतिये :—४ **अ.** मुत्र. ५ **यमु.** °ऐसी भांडतें आलीं : मग गोसावीयांसि आरोगण : पहुड : उपहुड : मग

म्हणौनि दाइंबा आले : मग भटीं दाइंबापुढें सांघीतलें होतें : तवं गोसावीं तीय विहीरीकडे प्रस्त्रेयासि बीजें केलें होतें : प्रस्त्रेयो सारुनि गोसावीं मागुतें बीजें केलें : आणि दाइंवा हांसों लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "काइ गा भोजेया : हांसत असा ?" "ना जी : तें गोसावीं वारिलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां सांघा :" तेव्हळि तीहीं तें अवघें भांडण सांघीतलें : *सर्वज्ञें म्हणीतलें : "प्राणियांचे दोष एथ न सांगिजेति : एऱ्हवीं एथौनि नीणेज ऐसें कांहीं असे : तरि कां म्हणितलें ना करिती ना : पारि एथचेया दर्शनाही न एति :" मग*[६] गोसावीयांसि बाहीरिला सीहाडेनिसीं आसन जालें[७] : लखूबाइसें बाहीरि निगति : भीतरि रीगति : आणि गोसावी म्हणति : "ऐसेयां माहात्मेयांचां कपाळीं घालीं घांट :" मग तीयें आलीं : गोसावीयांचेया स्त्रीचरणां लागलीं : अवघें भांडन सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : एथौनि यांचा आभीमानु : हें कांहीं काइ याप्रति बोलीलें : हें एथ बोलीलें कीं :" म्हणौनि स्त्रीकरें जानु थापटिली : ।।

## ५६१ आंबां पंचलिंगीं वस्ति ।।

## ५६२ पारेगांवीं वस्ति ।।

## ५६३ आंबेखरवंडीए वस्ति ।।

## ५६४ मार्गी म्हांइंभटा भेटि : निर्गमन स्त्रवण

मग आंबाहुनि हंसराजु वळहेग्रामासि गेलीं : द्रीढपुरुषांपुढें सांघीतलें : तवं तीं आपुला अपवाडु सांघीतला : तैसींचि रीधपुरा गेलीं : श्रीप्रभूगोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागलीं : तवं आठवलें : मग म्हणीतलें : "म्हांइंभटो : तुमतें गोसावीं बोलावीलें असे : सर्वज्ञें म्हणीतलें : 'आधीं हा नीरोपु सांघावा : मग श्रीप्रभूसि दंडवत करावें : वस्तिचेयां[१] नीगावें :' ऐसें म्हणीतलें असे :" तैसेंचि म्हांइंभटीं गोसावीयांतें पुसिलें : आबाइसांतें पुसिलें : आबाइसीं प्रसादाचा कुसकटा दीधला : तैसेचि म्हांइंभट तेयांतें पुसौनि निगाले : "गोसावी कवणी ठाइं राज्य करितात ?" "ना आंबां :" तैसेचि आंबेयासि आले : आंबां सोधिलें : तवं गोसावीं आंबेखरवंडीएसि बीजें केलें ऐसें आइकिलें : तैसेचि आंबेखरवंडीएसि सोधीलें : तवं आइकीलें : गोसावीं एळीएसि

---

गोसावीं परिश्रया बीजें केलें : सरीसे नाथोबा : दाइंबा असति : . . . .नाथोबा दाइंबापुढे सांघताति : गोसावी आइकति : ऐसे गोसावी आले. ६ (**प्रव. आ.** २३५). ७ **यमु.** °गोसावी निरूपण करूं आदरीलें : माहात्मेयांचा महीमा नीरूपीति : आणि म्हणति : "ऐसेयां माहात्मेयाचां कपाळीं घालीं घांट" मग लखमबाइसीं जाणीतलें : गोसावी मातेंचि म्हणति : मग लखूमबाइसीं वीनवीलें : "जी जी : नेणेंचि जी :" मग दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : ।।

**५६४. १ अ.** °चीया.

आतांचि वीजें केलें : तैसेचि नीगाले : तवं गोसावीयांतें मार्गीं जातां देखिलें[२] : मग गोसावीयांतें सव्य घालौनि पुढां आले : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले[३] : मग गोसावीयांसि अव्हांटें उजवीया ह्राता वडातळीं आसन जालें : कुसकटा[४] गोसावीयांसि दरीसना केला : गोसावीं पोटळी नमस्करिली[५] : ।।

मग गोसावीं तेयांतें पुसिलें : "कैसेयापरि नीर्गमु जाला ?" "जी जी[६] : भावैचीए वारसी तेरसु जाला : पारणें करुनि अवकासासि गेलां : अवकासा बैसौनि मृतिका[७] घेउनि गंगेसि गेलां : सौच्य करुनि नीगालां : तवं वीचारुं लागलां : 'सर्वज्ञें म्हणीतलें : अनुसरावें' तें कै[८] पां ? वरिखा एका अनुसरों : अवघेयाची वेवस्था करुं : मग अनुसरों : आणि काइ ? तववरि देह् गेलें तरि काइ ? तरि मासां सां अनुसरों : आणि काइ ? आवघेयाची वेवस्था करुं आणि नीगों : आणि काइ ? तववरि देह् गेलें तरि काइ ? तरि मासां तीं अनुसरों आणि काइ ? तवं आवघेयाची वेवस्था करुं : मग अनुसरों : आणि काइ ? तवं देह् गेलें तरि काइ ? तरि मासां एका अनुसरों : आणि काइ ? कांहीं[९] घरीं घालुं : मग नीगों : आणि काइ ? तववरि देह् गेलें तरि काइ ? तरि पाखा एका अनुसरों : आणि काइ ? तववरि देह् गेलें तरि काइ ? तरि आठां दीसां अनुसरों आणि काइ ? तववरि देह् गेलें तरि काइ ? तरि दीसां एका अनुसरों : आणि काइ ? तरि दीसु कोणें देखिला असे ? तरि घरासि जाओं : कांहीं[९] हातीं देओं : आवघेयाची वीखयेवेवस्था करुं : मग नीगों : आणि काइ ? तवं उणीं वासना उमरडली[१०] तरि काइ ? तरि गंगेसि जाओं : सौचि आचमन करुं : आणि तैसेचि निगों : आणि काइ ? तरि गंगेसि जातां मार्गीं सर्पु लागला तेव्हळि काइ ? मग[११] हातीची मृतीका सांडिली : गोसावीयांचेया ठाया यावें तरि सासुरेयां हातीं असों नल्हाओं : तवं ब्राह्मणें एकें म्हणीतलें : 'मृतिका कां सांडिली ?' 'ना ढाळीत असे :' मग अनंतु : मुदीया : धोत्राचीए गांठीसि बांधलीया : मग वोळत गांवासि गेलां : ब्राह्मणा एकांचीए ओसरीएसि निजैलां : उदीयांचि उठिलां : वीचारुं लागलां : 'काइ पां : एथ तरि संबंधीयें असति :' तरि गोसावीं श्रीप्रभूचा अवतारु सांघीतला होता :

---

२ **यमु.** °आणि मागिलाकडौनि दंडवतें घातलीं : मग ऐसें अडवांगुनि पुढां आले :— ३ **यमु.** गोसावीं क्षेमालींगन दीधलें : ४ **यमु.** प्रसादु ओळगवीला : ५ **यमु.** म्हांइंभटीं क्षेमवार्ता सांघीतली : (**मु.** आइकों सरली) मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं नीगालेति जीयापरी तें एथ सांघा पां :" ६ **यमु.** °एकु दीसीं मी बाहीरभुमीं (**मु.** बहिर्भुमीं) गेलां : बाहींरां बैसलां : सौचू करावेया माती घेतली : तवं नीगावेयाचा उलेखू केला : 'मास सां एकां अनुसरों आणि काइ ? सा मास कोणें देखिले असति ?—. ७ **गोने.** माती. **हीबी.** डीखळ. ८ **अ.** कैसें. ९ **अगो.** °तथा : ताळीक. **ने.** °तातकाळीक. १० **अ.** उमटली. ११ **यमु.** मग हातीची माती सांडुनि तैसाचि निगालां : पाटाउं पासवडी होती ते मार्गि एका ब्राह्मणासि दीधली : तेयाची पासवडी घेतली : घोंगडी : जी जी : तीए दीसीं भावैचा चातुर्दसु : क्षेउर केलें : भीक्षेसि गेलां : घरीचेया अनाहुनि बरवि अनें आलीं :

म्हणौनि जी जी : परमेश्वरपुरासि नीगालां[१२] : एका ब्राम्हणातें म्हणीतलें : 'माझी पासवडी तुम्ही घेया : आपुली मज देया :' तेणें म्हणीतलें : 'मज हें पचेना : आणि मीं काए म्हणों ?' 'ना सरालेकारें म्हांइयें दीधली : ऐसें म्हणावें :' मग मीयां आपुली[१३] मंजीष्ट पासौडी तेयांसि दीधली : तेयांची मीयां घेतली : तीए दीसीं चतुर्दसु : मग धोत्र फाडौनि झोळी केली : भावैचां चतुर्दसीं एके गांवीं भीक्षा केली : ते एकी बाइला थाळां वाढिलें होतें : तैसेंचि आणौनि भीक्षा घातली : ताट : ठाणवै : अडणी : तीनि ठाए नाहीं इतुलेंचि : एर अवघेंचि भीक्षेसि आलें : मग गंगेसि गेलां : भोजन करुं बैसलां : तवं धोत्राचा वासु : आणि भीक्षाअंन : ऐसी घ्रुणा उपजली : तें वमलें : एर अंन पाणीयांतु लोटिलें : *मग घरा जावेयाचें वीचारीलें : तवं दुःख वाटलें :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "जाणतेया वीखो सुखातें नेदी :" म्हाइंभटीं म्हणीतलें : "जी जी[१४] :* ते दीसीं अवघा उपवासु पडिला : एरे दीसीं उदीयांचि उठिलां : वीचारुं लागलां[१५] : 'काए पां : अंनेवीण[१६] तरि देह नाहीं : आणि देहेंवीण तरि धर्मू नाहीं : तरि ए स्रुष्टी ननुसरों : मग पुढीलीये स्रुष्टी अनुसरों आणि काइ ? तरि पुढीलीये स्रुष्टी अनुसरण हें काइसेयातव ? तरि ईश्वरें म्हणीतलें : 'अनुसरावें :' तरि अनुसरावें : मग देह[१७] जाओ भावें राहो :' मग एकी गांवीं भीक्षा केली : गंगेसि गेलां : जेउं बैसलां : तवं घांसुभरि पोटीं रीगाला : आणि मेयां म्हणीतलें : 'घांसुभरि पोटीं पडिला : आतां म्यां म्हांइयें जींतिलें :' म्हणौनि म्यां बाहे आफळीली : दुसरें दीसीं दोनि घांस पोटीं पडिले : तीसरे दीसीं तीनि घांसू रीगाले : हळुहळू पाउ[१८] आहारावरि आलें : रीधपुर पावलां तवं आहारासि आलें[१९] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रछेदीं[२०] प्रवर्तलेया पुरुषाचे सकळै निरोध नेणों कोण नीरपौनि फेडी : पुरुषप्रेत्नीं दैवाचें साह्य : *मार्गीं प्रवर्तलेयां पुरुषां अनुकूळां : प्रतिकूळां : उदासां देवता होति : देशकालवर्तमानाचें साह्य आति[२१] :"* ॥

"जी जी : मग[२२] पासवडीची पाटी अकरें दामीं वीकिली : दामा भरीया दुरडी[२३] घेतली : दाहां दामांचा गुळु घेतला : मग परमेश्वरपुरासि गेलां[२४] : तवं दक्षिणीली दारवठां मातांगु भेटला : तयातें पुसिलें : 'एथ राउळ राज्य करीत असति कीं ?' तेणें

१२ **अबोने.** गेलां. (यापुढे यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरुषुप्रेत्नीं दैवाचें साह्य :" हे वचन या तिन्ही प्रतींत येथे आहे. **हीबी.** प्रतीत ते या लीळेच्या शेवटी आहे. तेथेच ते अधिक योग्य आहे. म्हणून **हीबी.** प्रतीनुसार ते शेवटी घातले आहे.). १३ **एवा.** °पोफळी पाटांउं दुटी तेयासि दीधली. १४ (**प्रव. आ.** २१). १५ **यमु.** 'आतां काइसी भीक्षा : आतां घरा जाओं :' मग जीवीं वीखएव्यवस्था केली : 'आतां मागुतें हे मनुष्य देह कैचें ? एसणी श्रूष्टि पाळिपडैल : तरि आतां देह जाए ना कां :' म्हणौनि जी परीछेदु केला : १६ **ने.** पोसणेंवीण. १७ **ने.** देव. १८ **गोने.** पादासनावरि आलें. १९ **ने.** आलां. २० **ने.** परिछेदी. २१ (**प्रव. आ.** २६३, २६४). २२ **हीबी.** °–बेलौरेयासि गेलां. २३ **हीबी.** दामाची पाटी घेतली. **गो.** दवडी. २४ **अ.** नीगालां.

म्हणीतलें : 'हें नव्हे आतांचि नगरांतु बीजें केलें :' तेणें अनुभविचीया दोनिच्यारि लीळा सांघीतलीया : मग तो पाठिमोरा जाला : दुरडी[२५] उतरौनि तयासि दंडवत घातलें : दुरडी[२५] डोइएसि घेतली : मग नीगालां : तवं तीकोउपाध्यांचां आवारीं पटिसाळेवरि आसन असे : अनुकारु करितातिः 'आवो : म्हांइंयां नांवें ब्राह्मणु एइल : गुळु आणील म्हणे : गोड आहे म्हणे : खावा म्हणे :' ऐसे अनुकार करितातिः तवं मीं गेलां : गुळाची दुरडी[२५] गोसावीयांपुढां ठेविली : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागला : मग गोसावीयांपुढां बैसलां : गोसावी गुळु आरोगों लागले : खाडादोंदावरि रसु गळे : उमाइसें बाहीरि उभीं असति : आबैसें भीतरि जेवितें असति : उमाइसीं म्हणीतलें : 'आबै : लवकरि आंचवा : ब्राह्मणें एकें दुरडी[२५] भरिगुळा आणिली असे : ते गोसावीयांपुढां ठेविली असे : गोसावीं आरोगण करीत असति :' तवं आबैसें लवकरि आंचवलीं : बाहिरी आलीं : गुळाची दुरडी[२५] परती ठेवीली : उदक आणिलें : गोसावीयांसि गुळळा करुं घातला : खाड दोंद परीमार्जिलें : मग पुसिलें : 'कवणीकडौनि एत असा ?' 'आइ : गंगातीउराकडुनि एतु असें :' 'तेथ गोसावी राज्य करीत असति कीं ?' 'हो आइ : नीकीयापरी राज्य करीत असति :' मग उदक आणिलें : माझे पाए धुतले : थाळा धुउनि मज जेउं वाढिलें : मग मीं जेविलां : नीजैलां : उदीयांचि उटीलां : मग म्यां आवैसासि म्हणीतलें : 'आबै : मज राखपुंजा सांडुं देया : आणि चुलीभानवसी सारउं देयावीया :' मग तीहीं मज दीधलें : मग तें करुनि मीं तेथ असें :" ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं तेथ कां गेलेति ?" "जी जी : एथचेया एथ सासुरिचीं : तयांहातीं असों नल्हायें : आणि तीयें धरुनि नेती : म्हणौनि मीं गेलां : आणि गोसावी 'श्रीप्रभूचा अवतारु तो इश्वरअवतारु' सांघीतला : आणि 'ईश्वरदास्य मोचक' सांघीतलें : म्हणौनि मीं तेथ गेलां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "*भटो प्रतिसृष्टी परमेस्वरू अवतरेति : अनंत अवतार : परमेस्वरू अनंतीं अवतारीं अवतरले असति : आतां अवतरले असोति : साउमे अवतरति*[२६] : परमेश्वर परदृस्ये होति : अवरदृस्ये होति : परावरदृस्ये होति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आंतुल असे तो आंतुलचि देखे : बाहीरील कांहीचि न देखे : बाहीरीलु जो असे तो बाहीरीलचि देखे : आंतुल कांहीचि न देखे : उंबरेयावरिलु जो असे : तो आंतुलही देखे : आणि बाहीरिलही देखे[२७] : तैसा परमेश्वरू : *चहुं युगीं परमेस्वरू जीवांतें उद्धरीति : अनंत उद्धरीले : अनंत उद्धरीजेति : अनंत असतुचि असति*[२६] : परमेश्वरु कछु होति : मछु होति : नरांमध्यें अवतरति : त्रियंचामध्यें

---

२५ **गो.** दवडी. २६ (**प्रव. विमा.** १७–२२). २७ (**दृपा.** १ ते ३. आंतुलाचा, बाहीरिलाचा, उंबरेयावरिलाचा दृष्टांत). **अगो.** °अवरदृस्यें होति : परदृस्यें होति :–.

अवतरति : नरांमध्यें अवतलां सांतां : वेडे होति : पीसे होति : परि चालता बोलता देओ तो दुर्लभु कीं गा[२८] :" ।।

## ५६५ म्हांइंभटां वस्तुसंबंधनिरूपण*

[[१]एळीए मार्गीं म्हांइंभटां गोसावीयांची भेटि जाली : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग गोसावीयांसि मार्गीं वडातळीं आसन जालें : मग म्हांइंभटीं श्रीप्रभुचीया प्रसादाचीया कुसकरीयाची पोटळी गोसावीयांसि दर्शना केली : गोसावीं नमस्करीलि-यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : परमेश्वराचेया संबंधा गेले जडचेतन पदार्थ ते कां पां नमस्कारावे ? तेथ काइ कांहीं असे ? किंवा प्रसन्नतेलागी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : वस्तुसंबंधें शक्तिनिक्षेपु : म्हणौनि नमस्करावे :" म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : किंपर्यंत शक्तिनिक्षेप ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सृष्टिपर्यंत : तो निक्षेप संहारीं[२] काढे :" "जी जी : कोठवेऱ्हीं संबंधु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जळस्तळपर्यंत जवं कुर्माचें करटें पावे तववेऱ्हीं :" "जी जी : निक्षेपासि औरासचौरास मर्यादा कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आउठ हात :" "हो कां जी :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : वस्तुसंबंधें तिर्यंचां : देवां : जडां : अजडां : मनुष्यां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : वस्तुसंबंधें तिर्यंचां योनिमोक्षु : देवां आनंदु : मनुष्यां फळ : वस्तुसंबंधें जडांअजडां भलें :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : वस्तुसंबंधें जें जेयां होए तें पर्याए होए : किंवा तेधवांचि होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवां आनंदु तो तेधवांचि : आणि एरांसि तरि देहाची सीमा जालेयां आणिका प्रारब्धा जाणें नाहीं : जैसें आधि राइकें विके : कां पां ? बळवत्तरात् दुर्बलं बाध्यते[३] : म्हणौनि :" "हो कां जी :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : परमेश्वराचां दानीं कीती भेद असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "च्यारि : परमेश्वरापासौनि

---

२८. यानंतर **अगोने.** प्रतीत पुढील मजकूर आहे. 'सर्वज्ञें म्हणीतलें : "इतुके दीस तुमचें श्रीप्रभूचां ठांइं नित्य वेचीं काइ वेचे ?" "जी जी : कहीं सरु दाम : कहीं दामु : कहीं पाउण दामु : तीनि रुवें :" गोसावीं सां मासांचा लेखा केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "दत प्राप्त द्रव्य एथ घेउनि या : मग तुमचें संविधान चरितार्थ कीजैल :" "जी जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले : गोसावीयांपुढां वीनतकंदर होउनि बैसले ॥' **मु.** प्रतीत हा मजकूर 'शोध, म्हणून आलेला आहे. **अ.** प्रतीत पुढे लीळा ५८६ मध्ये हा भाग पुन्हा स्वतंत्रपणे आलेला असल्यामुळे प्रस्तुत लीळेतून येथे वगळला आहे. 'सां मासांचा लेखा केला :' यानंतर **यमु.** प्रतीत पुढील मजकूर आहे : 'सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीप्रभूचीये सेवे दीनसुदी लागे : ते जरि एथ करीतेति तरि आन होते : तेथ जेतुले दीं होतेति ते जरि एथ असतेति तरि आन होते :" हें नीरूपण म्हांइंभटा लागलें : ॥ **रामे.** ॥ बेलोपुरी आंगें : जीवें : द्रव्यें दास्य करूं लागले : वेवसावो करुनि :'

**५६५. *(प्रव. वि. १७१–१७७).**

१ **जाखोबा°.** २ **एवा.** आवांतर संहारीं. ३ **एवा.** (विचारबंद) बलवत्तरो दुर्बलं बाधते.

चतुर्विध दान आति :" "जी जी : तें कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "लीळादान : वस्तुसंबंध : एक घेउनी एक देति : कैवल्यदान : *लीळावशें पशूसि परमेश्वरू विद्यानंदु देति : कां फळानंदु देति : अनार्जित ते लीळा*[४] :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : परमेश्वराचें दान कीती प्रकारीं वर्ते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "चतुर्विधा परी :" "जी जी : च्यारि प्रकार ते कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "दृक : स्पर्शु : आळापु : अंत:करण :" ।। ]

## ५६६ म्हांइंभटां अन्यसामग्रीनिषेध*

[ एळीएहुनि मार्गीं जातां म्हाइंभटीं पुसीलें : "जी जी : गोसावीयाचां मार्गीं प्रवर्तैल तेणें एथीचीया उपयोगा जाए ऐसी कवण सामग्री अभ्यासावी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : जीवीं सामग्री असली तरि ईश्वरीं उपयोगा न वचे ऐसें कांहीं असे ? परि पोरां जीवां कव्हणी सामग्री न होआवी :" " जी जी : तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा जीवा सामग्री म्हणिजे हा गडदरा गा :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "हो कां जी : तरि परशास्त्रीं व्युत्पत्तीलागि काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सकळही सामग्रीया परित्यजौनि एथिचीया व्युत्पत्तीव्युत्पन्नां होआवें : आणि एषणत्रय त्यजावें : न त्यजे तरि गडदरां पडैल : म्हणौनि :" यावरि म्हांइंभटीं म्हणितलें : "जी जी : माझी जेतुकी सामग्री तेतुकी आजिलागौनि गोसावीयांचां श्रीचरणीं अर्पिली :" म्हणौनि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ।। ]

## ५६७ वटपत्रानएनीं म्हांइंभटां कोपणें

गोसावीयांसि आरोगणेचा समो जाला : म्हांइंभटांतें म्हणीतलें : "पैला वडाची एका सात्वेयाचीं[१] पानें घेउनि या :" म्हांइंभट गेले : ते पानें बहुतें घेउनि आले : गोसावीयांपुढां ठेविलीं : गोसावीं सातां पानांची पातळि[२] आकारिली : सर्वज्ञें म्हणीतलें : "इयें लागलीं : इयें न लगति :" "तरि इयें मागिलांआंतु[३] घालिजेतु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें कां गा होइल ? इयें मागिलाआंतु[३] न पडति[४] :" मग गोसावीयांसि तेथ आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : मग गोसावीयांसि एळीएसि वस्ति जाली : ।।

## ५६८ भोंकरीं माहालक्ष्मिए वस्ति ।।

---

**एवा.** बलवता दुर्बलो बाध्यते. (**नेने.** सूत्रपाठ आवृत्ती दुसरी). ४ (**सूपा. विमा.** ६५, ६६).

**५६६.** *(**प्रव. विमा.** १४१; **आमा.** ३–६).

**५६७.** १ **गोनेहीबीपं.** सातरेयाचीं. २ **ने.** सातरी. **हीबी.** पत्रावळि. ३ **हीबी.** रासींतु. ४ **गो.** °तथा तें अज्ञान.

## ५६९ बेलोपुरीं सीधनाथीं अवस्थान

मग गोसावीं बेलोपुरासि बीजें केलें : तेथ पूर्वामुख सीधनाथाचें देउळ : तेथ चौकीं दीस पांच अवस्थान जालें : बहिरवाचीए देउळीए पुजाअवस्वरु होए : ।।

## ५७० वनदेवीं अवस्थान

मग गोसावीं वनदेवाचेया देउळासि बीजें केलें : तेथ गोसावीयांसि अवस्थान जालें : दीस दाहा[१] : ।।

## ५७१ तृण मोडणें*

[ भट : म्हांइंभट सेजा गावां कांहीं आपजों गेले होते : आउसातें सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : कांहीं व्यापारु न करा : आणि एथिचीए आरोगणेची चिंता न करा : तें काइ ?" आउसीं म्हणीतलें : " जी जी स्वामी जगन्नाथा : सर्पण नाहीं : काइसेनि रांधुं जी ? " मग गोसावीं वनदेवादक्षीणें बीजें केलें : तेथ तरवंटे वाळले होते : ते गोसावीं श्रीकरें मोडीले : कवळीभरि आणिले : वनदेवापासीं सेहाडेनसीं घातले : सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : सर्पण घ्या : " " जी जी स्वामी जगन्नाथा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नाएका : बाइसें असती तरि काइ एथ व्यापारु सांघती ? तुम्हांसि पां म्हणवलें : " " जी जी : नेणेंचि जी स्वामी जगन्नाथा : " म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

## ५७२ सेनि उपरतणें*

[ एकु दीं गोसावीं वनदेवादक्षीणे बीजें केलें : तेथ सेणी वेंचिलीया : वाहीरवासाचीए वोंटीए भरिलीया : आणुनि सेहाडेयापापासीं घातलीया : तवं भटीं देखिलें : आणि म्हणीतलें : " हें काइ जी ? " " हें माझें सीस लावणें म्हणां : " मग मागिल आवधें भटांपुढां सांघीतलें : मग भट आउसावरि कोपले : मग भटीं गोसावीयांसि कापडमादणें दीधलें : मग गोसावीयांसि पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : गुळुळा : वीडा : भटां : म्हांइंभटां : आउसां प्रसादु जाला : ।। ]

## ५७३ बेलोपुरीं आदीतीं अवस्थान

मग गोसावीं आदित्याचीया देउळासि बीजें केलें : तेथ अवस्थान जालें : मास आउठ : ।

## ५७४ वायो निरोपण

गोसावीयांसि आदीत्याचां देउळीं : रीगतां उजवीया हाता : सोंडीवरि : पुर्वाभीमुख आसन असे : गोसावीयांपासीं म्हांइंभट असति : वारा वाजतु होता : तवं पैलाकडौनि

---

**५७०. १ शोध.** °दोहीं श्रीकरीं द्वारसंका धरीलीया : भीतरि अवलोकीलें : आणि म्हणीतलें : " बळीएचें देवत मां : " (**पं.** " बाइ : हें हींवजाचें देउळ : ").

**५७१.** *ही लीळा व यापुढील लीळा **हीबी.** प्रतीतून घेतल्या आहेत.

वांहांटुळि भवंतभवंत एत होती : म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : हा वारा कें वसे[1]" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें अन्यवसे[1] :" "जी जी : तें कींवसे[1]" "तें अन्यवसे[1]" "तें कींवसे[1]" "तें अन्यवसे[1] :" "तें कींवसे[1]" "तें एथची प्रवृति ओळगे :" ।।

## ५७५ लखुबाइसांउपरि भटां निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : एकु दीं लखुबाइसांतें भटीं म्हणीतलें : "बाइ : गोसावीयांसि आरोगणेसि उसीरु होत असे : आउसांसि तरि करितां न ये : तरि सकाळीं येउनि तुम्हीं उपहार करावा : तुमचेनि बरवा होइल : तुम्हां परम लाभ होइल : मीयां जरि करावें तरि आपजवावेयासि जावें असे :" ऐसें भटीं पुन्हापुन्हा म्हणीतलें : मागां तया आणि भटांसि भांडण जालें होतें : तयातव 'हो' न म्हणतीचि : भटीं प्रार्थुनि म्हणीतलें : भटांतें 'हो' म्हणीतलें : परि तात्पर्यें न म्हणतीचि : "नागदेया : तूं जाए : मज एइल तैसें करीन बाइसासांरीखें काइ होइल ?" मग भटां थोर दुःख जालें : भट दुःख करूं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा : दुःख करीत असां ?" "काइ करूं जी : मज तरि जाणेंचि लागे : गोसावीयांचिए आरोगणे उसीरु होए : तोही नीका नव्हे : मी दों ठाइं पवाडों न सकें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जीवु एकदेशीया कीं गा : तुम्हांसि काइ देवतेचियाऐसें होणें उरणें असे ? मां तेथहि उराल आणि एथहि उराल :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जीवें जें होआवें तेंचि होए : देवता हों जाणे : उरों जाणे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं जा : यांसि वोजवे तैसें करिती गा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भक्ती जैसी रामाची लक्ष्मणें केली : भक्तीसि काइ प्रार्थुनि करवणें असे ? प्रार्थुनि न करविजे कीं :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कव्हणी एकु सुतला असे : तो चेये : तयासि ताहान लागली असे : तो सागळ खुंटीएसि देखे : परि घेववे ना : कां पां जाडयें दाटला असे : म्हणौनि[1] :"* मग भट दुःखेंसीं आपजावया गेले : ।। ]

## ५७६ भटां वस्तुसंबंधु निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : गोसावी नींबाखालि उपान्हौ फेडौनि मुळीएवरि उभे राहीलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : या नींबासि समुळीं : सपत्रीं : संबंधु देइजताए :" भटीं म्हणीतलें : "जी जी : मुळ काइ आंगावेगळें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "याचें मुळ एथ नसे गा :" भटीं पुसिलें : "जी जी : संबंधें काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

**५७४.** १ नेपं. °वश्य.

**५७५.** *(प्रव. वि. ४६ व ७६).

१ (दृपा. १०७. चेइलेयाचा दृष्टांत 'लखुबाइसावरी निरोपिला.'-**दृस्थ.**).

**५७६.** *(**प्रव. वि.** १७१–१७३).

" वस्तुसंबंधें शक्तिनिक्षेपु : वस्तुसंबंधें तिर्यंचा योनिमोक्षु : देवां आनंदु : " भटीं पुसिलें : " जी जी : तिर्यंचा योनि काइ होए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोगभूमी मनुष्यदेह होए : " " जी जी तिर्यंचावेगळें संबंधें काइ होए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वस्तुसंबंधें जडांअजडां भलें : " " जी जी : भलें तें काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भलें तें मनुष्यदेह : " मग भट उगेचि राहीले : ।। ]

## ५७७ म्हाइंभटां अंतराय निरूपण*

[ बेलोपुरीं अवस्थान : दुसरा दीसीं म्हाइंभटीं जाइन म्हणीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : एथिचें सन्निधान दुर्लभ : तें क्षणाक्षणा अंतरत असे : ईश्वरीं अंतर पडों नेदिजे : विकारु विखो न सेवावा : धीरवीरां होआवें : अखोरी अबोटीं जन्म परमेश्वरासि देयावा[१] : संबंधें पुरुषु योगापासौनि जाए : अंतर पडे : " तेहीं म्हणीतलें : " अंतराएं काइ होइल जी ? योग भ्रंसैल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " केतुले एक अनिष्ट उपसाहाती : एका केतुलेया एका अंतरायातें जनीं : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " जी जी : योग भ्रंसलेया काइ होए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " अंतर पडे : कां जाए : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " अंतर तें काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " योगभ्रष्ट तो शाश्वतसमलोकातें पावे[२] : " म्हाइंभटीं पुसिलें : " जी जी : योगभ्रष्टासि काइ लक्षण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " अपरधर्मु सांडिला : परधर्मु तरि आतिचि ना : तो योगभ्रष्टु बोलिजे[३] : " ।।

यावरि भटीं पुसिलें : " जी जी : अपरधर्मु म्हणिजे काइ ? आणि परधर्मु म्हणजे काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " अमेध्यतुल्य विखो म्हणौनि अवर नव्हे तयातें न सेवी : आणि परधर्मु म्हणिजे सात मात्रा अनुष्टे ना : तो दुसरा योगभ्रष्ट : " भटीं म्हणीतलें : " जी जी : योगभ्रष्टासि वचनरूपा परमेश्वरेसीं वियोग घडे : ऐसें जयाचें देह जाए : तया काइ होए ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वियोगीं देह धाडी तेयाहीं एक भलें आति : " " जी जी : भलें म्हणिजे काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भलें म्हणिजे : शाश्वतपुण्यलोकीं चिज्जडफळीं मोक्षफळ : " " हो कां जी[४] : " म्हाइभटीं पुसिलें : " जी जी : योगभ्रष्टासि फळअंतरायें उद्धरण : तरि देहविद्येचा निर्वच निरोपिजो जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " भटो : देहविद्या एकी आति : ते ईश्वराचिपासौनि होए : देहविद्ये भूतें तन्मात्रारूपें होति : सातै अंश झडति : एकाकारवृत्ति उरे हेमकाया होए : वज्रकाया होए : देहविद्ये देहचि फळ : एकी पुरुषी विद्या ते : ऋद्धीसीद्धी होति : भूतेपर्यंत गमन दर्शन[५] : " ।।

---

**५७७.** *प्रकरणवशाच्या अनेक भागातून ही लीळा तयार झाली आहे. त्या त्या भागाचा संदर्भ त्या त्या ठिकाणी खाली दिला आहे.

१ (**प्रव. आमा.** २२१–२२३).   २ (**प्रव. आ.** २५०-२५१).   ३ (**प्रव. आमा.** ८४). ४ (**प्रव. आमा.** ८५).   ५ (**प्रव. विमा.** ७०–७४).

तवं म्हाइंभटीं म्हणीतलें : "जी जी : आम्हां ऐसे विषइं त्याग केवि होववैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : सेंवतेयाचें आरल खुंपे : तोचि खांडेयाभालेयाचे घाय आडे-देव्हडे साहे : ऐसा आति : म्हणौनि हें तुम्हांसीचि होववैल कीं गा :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : योगारूढता आरोपे तवंपर्यंत योगक्षेम न चाले तर पुरुषु त्रसैल कीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं म्हणतां तें तैसेंचि : परि जीवापासौनि पुरुषु उठी तेयाचें नेणों कोणचि सिद्धी ने : पुरुषें आपुलें करणीए करौनि असावें : मग दैवें करावें तें दैवचि करील : पुरुषु जेतुलजेतुला प्रयत्न करी तेतुलतेतुलें दैव साह्यातें करी[६] :" *यावरि गोसावी अयाचग्रासीयाचा दृष्टांत निरूपिला : सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु अयाचग्रासीया असे : तेयासि कव्हणी एकु घांसु सूए : तेणें चावावा गीळावा इतुलेंचि : परि धातुतें नेतें तें आणिक असे : तैसें पुरुषें उभयां ठाकौनि प्रयत्न करावा इतुलेंचि : नव्हतें पुरवीति : परमेश्वरू साह्य करीति[७] :"* ।।

## ५७८ म्हाइंभटां लोकीचें श्रेष्ठत्व निषेध*

[गोसावीयांसि बेलोपुरीं अवस्थान : म्हांइंभट गावांतु जाती : जेवीति : टीळे : सर्वांगी भोरी : गंधाक्षता : तोंडभरि तांबोळ : हातीं पानें : ऐसे गोसावीयांचां दर्शना येती : एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "कां गा : जेविलेति ?" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हे जन ब्राह्मणातें कां मानिती ?" "जी जी : श्रेष्ठ म्हणौनि : ब्राह्मण म्हणौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "लोकीचा श्रेष्टु तो एथीचा नष्टु : एथीचा श्रेष्टु तो लोकीचा नष्टु :" "हो कां जी :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : लोकीचा श्रेष्टु तो एथीचा नष्टु : एथीचा श्रेष्टु तो लोकीचा नष्टु : तो किमर्थ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जवंजवं प्रयोजकु तवंतवं अप्रयोजकु : जवंजवं अप्रयोजकु तवंतवं प्रयोजकु : तुम्ही महात्मे जालेति : श्रीप्रभुपासि अनुसरलेति : आणि मागुतें ब्राह्मणपणाचें श्रेष्टत्व मिरवीजे कीं महंतपणाचें मिरवीजे ?" "जी जी" म्हणौनि संकोचले : ।।

म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : सकळ मार्गी अभिमानें प्रतिपन्न नाहीं : तरि प्रतिपन्न तें कोठें असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "समानधर्मी प्रतिपन्न : तैसें अन्यत्र नाहीं :" तवं म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : समान धर्म तो कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तो परमार्गी :" तवं नाथोबाएं पुसिलें : "जी जी : प्रतिपन्न म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रतिपन्न म्हणिजे किंकरधर्मी :" "हो कां जी[१] :" ।। ]

६ (**प्रव. आमा.** ११४–११७). ७ (**दृपा.** ५१. अयाचग्रासियाचा दृष्टांत. 'चांगदेओभटाप्रति: **एवा.** भक्तिजनाप्रति निरूपिला' –**दृस्थ.** पाठवचनाच्या अनुषंगाने हा दृष्टांत येथे घातला आहे. यावरील दार्ष्टांतिक माझ्या मते स्वामींचे होय. म्हणून तेही अंतर्भूत केले आहे).

**५७८.** *(**प्रव. आमा.** ७-८).

१ (**प्रव. आमा.** १५७).

## ५७९ भटा गुरुअनुगमन निरूपण*

[ बेलोपुरीं[1] अवस्थान : भटीं पुसिलें : " जी जी : आचाराविचारा कैसे फळभेद ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " आचारें योग्यता : विचारें दृढता :" भटीं पुसिलें : " जी जी : गुरुउपयोग किंपर्यंत मानावा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भाजिए गुरु मानावा :" म्हांइंभटीं म्हणीतलें : " संन्यासस्य श्रवणं कुर्याद्विचनं श्रुतेरिगं । ततः के प्रत्येन गंतव्यः" सर्वज्ञें म्हणीतलें : " गुरुरनुगन्तव्यः" तवं भटीं म्हणीतलें : " जी जी श्रुतिवचन संन्यास करुनि श्रवण केलेंयां गुरुअनुसंगीक वर्तावें : तैसें निरालंबीचि कां न व्हावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं म्हणतां तें तैसेंचि : परि पुरुषासि निरालंबी एकलेयां काळु क्षेपवे ना :" ।। ]

## ५८० म्हांइंभटां असन्निधानधर्म निरूपण*

[ [1]म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : तरि परमेश्वर असन्निधानधर्म निरोपिताति ते संक्षेपें निरोपावे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : " देवाची आर्ति होआवी : मार्गाची प्रीति होआवी : विषयांची निवृत्ति होआवी : देहाची अनास्था होआवी : आपली मळीनमाती करावी : कोमळज्ञानीं आचारें इंद्रियधर्मु पातळे होति : अपरोक्षदसे जाती :" यावरि भटीं पुसिलें : " जी जी : जेणें मुख्य आचारें इंद्रियधर्म पातळे होति तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजनाचे पांच तीळ : पादांश : अर्धा आहार : पाउण आहार : पूर्ण आहार : दर्या : हे पांचही तीळ खाइजे तरि अवघी भूक जाए : आणि तिळ खाइजे तरि तिळाएवढी भूक जाए[2] :" ।।

म्हांइंभटीं पुसिलें : " जी जी : महात्मेयां कवणकवण वर्णीं भिक्षा ग्राह्य ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्ष्यम् शौचाचारं न शोधयेत् । मद्यमांसमत्तद्रव्यं योगी नैव कदा भजेत् ।।" "हो कां जी :" मग म्हांइंभटी पुसिलें : " जी जी : कवण घर निषिद्ध ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " सारवला उंबरा देखौनि साउमेयां न वचावें :" " तरि महात्मेनि आणिके कवण निषेध त्यजावे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " महात्मेनि पुजापुरस्कार न स्वीकारावे : स्तुतिपर वैराग्य न करावें :" " हो कां जी[3] :" म्हाइंभटीं पुसिलें : " जी जी : वैराग्यासि काइ लक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " इहामुत्र-फलोपभोगविरागो वैराग्यम्[4] :" ।। ]

---

**५७९.** ***प्रव. आमा.** १२३–१२७.

**१ महेश्वरबा पाठ**°.

**५८०.** *प्रकरणवशाच्या अनेक भागांतून ही लीळा तयार झाली आहे. त्या त्या भागाचा संदर्भ त्या त्या ठिकाणी खाली दिला आहे.

१ **नागनाथबा** : बेलोपुरीं अवस्थान°. २ (**प्रव. आमा.** १३९–१४२). ३ (**प्रव. आमा.** १४४–१४७). ४ (**प्रव. आ.** ३४).

## ५८१ बुद्धिभेद तथा कर्मजड भक्तिजड निरूपण*

[गोसावीयांसि बेलोपुरीं अवस्थान : म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : विद्यावंत : आणि परमेश्वरभक्त : आणि लोक : परमेश्वरअवतारापासौनि आपुलालीं साधनें लाहाति : तया परमेश्वरअवतारीं बुद्धिभेद किंवा एकुचि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बुद्धिभेद आति :" "जी जी : तो कैसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "गुरुबुद्धि : देवताबुद्धि : विशिष्टबुद्धि : ऐसा बुद्धिभेदु आति : विद्यावंतां निरूपणीं गुरुबुद्धि : अनुसरलेयां देवताबुद्धि : लोकां विशिष्ट-बुद्धि :" "हो कां जी :" यावरि म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : लोकांमाजि एक कर्मजड असति : एक भक्तिजड असति : एका कर्मवासना असे : एका ब्रह्मवासना असे : तयांमाजि परमेश्वरधर्मासि कवण योग्य ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : कर्मजडापसि भक्तिजडु चांगु : कर्मवासनेपसि ब्रह्मवासना उत्तमु :" यावरि म्हाइंभटीं पुसिलें : "जी जी : जया विकल्पु आति तया काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विकल्पु आति तया प्रतिदेह आति : जोगियासि प्रतिदेह नाही : आणि भावै सणीं जोगियाचा सो सुये तेयाहीं एक भलें आति :" भटीं म्हणीतलें : "जी जी : जोगी ते कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जोगी ते द्वीध : एकु भक्तिजडु : एकु ब्रह्मवासनेचा :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : प्रतदेहीचा भोग जालेयां जीव कव्हणें आधारें फळासि जाए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : प्रतिदेहापासौनि निवर्तलेयां मग अतिवाहीकें फळा जाए :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले :।।]

## ५८२ जागृती : सुषुप्ती : स्वप्न : उन्मनी निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ म्हांइंभटी पुसिलें : "जी जी : जागृती : सुषुप्ती : स्वप्न : उन्मनी : या च्यारि अवस्था कैसीया ओळखाविया ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सृष्टी म्हणिजे हे दीर्घ जागृती गा : संव्हार म्हणिजे हे दीर्घ सुषुप्ती गा : संसारु म्हणिजे हा दीर्घ स्वप्नू गा : एथीचें दास्य म्हणिजे हे उन्मनी गा :" "हो कां जी" म्हणौनि श्रीचरणां लागले :।।]

## ५८३ हंसपरमहंसानुवादु*

[म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : हंस : परमहंस ऐसें कवणातें म्हणीतलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : जीवु हंसु : परमेश्वरू परमहंसु :" ऐसें निरूपण केलें :।।]

---

५८१. *(प्रव. वि. १७८–१८२; विमा. ११९).

५८२. *(प्रव. वि. २६८).

५८३. *(प्रव. विमा. १५१).

## ५८४ भटां करणीएप्रसंगें म्हाइंभटां संनिधान निरुपणें

एकु दीसीं गोसावीं भटातें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हां करणीए एक असे गा :" "जी जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पर तें द्रव्यसाध्य :" भटीं म्हणीतलें : "जी जी : मातें द्रव्य नाहीं : तें गोसावीं जाणत असति कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुं उभा ठाकलाचि पुरसि : सीधीतें एथौनि नेइजैल : पुरुषू आपुलें करणीए म्हणौनि प्रवर्ते : तयांसि द्रव्याचीं बांधलीं सतें मीळती : भांडारेकारां करणीए एक पडिलें होतें : तें तरि एथौनिचि सीधी नेलें की :" तवं म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : द्रव्य तरि मातें असे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हांसि आन करणीए : आणि यांसि आन करणीए : यांसि[१] संनिधान चरीतार्थ जालें असे : तुम्हांसि संनिधान चरीतार्थ होआवें असे :" "जी जी :" ।।

## ५८५ भटां असन्निधानधर्म नीरुपणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : असन्निधानधर्म जीज्ञासा गा :" भटीं म्हणीतलें : "जी जी : देवेंवीण काइ धर्मू असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं म्हणत असा तें तैसेंचि परि असेतेयासि[१] जतन कीजे : जैसा वटरोपाचा : कव्हणीं एकु वटु लावी : तयासि आळेंनीवणें करी : कुंपकांटी करी : धाकुटें असे तवं सेळियांमेंढियांचां खूररवीं जाए तेंचि प्रौढ जालेयां हस्तीचीया गजघंटा जऱ्हीं बांधलीया परि न वचे : तैसें कोमळज्ञानीं जतन कीजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "कोमळज्ञानीं वीखो वीघ्न[२] :" एथ गोसावीं असती परिचें पहीलें वचन 'विकार विकल्प शून्य :' नीरुपिलें : ।।

तवं भटीं कानावरि हात दीधले : "जी जी : मज हें असक्य[३] : जी जी : मज हें सक्य नव्हे :" गोसावीं म्हांइंभटांची वास पाहीली : सर्वज्ञें म्हणीतलें : "भटो : हा वि पुरुषासि कीं देवासि ?" म्हांइंभटीं म्हणीतलें : "हा पुरुषासिचि कीं :" "तरि एथौनि क म्हणीजत असीजे : आणि हा काइ म्हणतु असे ?" म्हांइंभटीं म्हणीतलें : "भटो : जीवा असक्य[३] : नव्हे[५] : तें काइ गोसावी निरूपीत असति ? सक्य[४] तेंचि निरूपिती : तुम आइकोंचि आदरा :" इतुकेनि भटीं हातीं काडी घेतली : आणि भुइसी रेघा क लागलें : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "हातीं काडी धरिजे तेतुला विकारूचि कीं गा : जी विकारामध्यें वोवलापोवला असे : जीउ विकारावेगळा केव्हळाही जालाचि नाहीं

---

**५८४.** १ **एवा.** हे संनिधान पातले असति : तुम्हीं आतां करिजे (**एवा.** करीतां) गा :"

**५८५.** १ **गोनेपं.** असतेया. **सूत्रपाठ.** परि हे असे तेया रक्षण." यानंतर **अगोने.** प्रतीत 'अ सैयापाळनेचा' या वाक्याने आरंभ करून शय्यापाळनेचा दृष्टांत दिला आहे. **मु.** प्रतीच्या मतानु मी तो पुढे घातला आहे. **हीबीपं.** प्रतीतील लीळेत या दृष्टांताचा उल्लेख नाही. फक्त वटरोप दृष्टांताचा उल्लेख आहे. २ **अगोने.** °एथ गोसावीं असती परिचें पहीलें वचन नीरू ३ **अगो.** असक्ष. ४ **अगो.** सक्ष. ५ **नेपं.** नव्हवे. **हीमु.***

*भटीं पुसिलें : "जी जी : विकारासि कवण मर्यादा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : बाहीरी बैसलेयां परतौनि पाहिलेंयां अमेध्य विकारू : मां एर काइ म्हणावें असे[६] ?"* तवं भटीं हातीची काडी टाकिली : आणि उगेचि राहिले : तवं म्हाइंभटीं म्हणीतलें : "भटो आइकों ठाका : गोसावी काइ निरूपिती :" यावरि भट सन्मुख जाले : सर्वज्ञें म्हणीतलें : "विकारविकल्पशून्य : स्वभावमात्रें : निरालंबी : देवतास्मरणें : जो जन्म क्षेपी तेयासि परमेश्वरू पुनरपि आपुला संबंधु देति : जैसा सैयापाळनेचा : कव्हणी एकि सैयापाळना असे : तीचीए सेजे कव्हणां[७] रीगावा नाहीं : तीचीया देखोवेखीं सुद्रीही करी : तरि[८] जेचि लोक तीएसि होति : तेचि तीएसि होति : *सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणी एकु गुळ्हारी असे : तो गुळु करी : तो उसाचा रसु काढी : काहालीए घाली : तळीं अग्न जाळी : रसु कढे : चाटुसीयाकरुनि मळी वेगळी करी : मग आणीकीं[९] भांडां घाली : द्रावो असे तो बध होए : मग हातीं घेउनि आणिका ठाया नेयावेया योग्य होए : तैसें परमेस्वरू जीवाचीं मळकर्में फेडुनि तेयातें योग्य करिती[१०] :"* ।। [११]

[भटीं पुसीलें : "जी जी : गोसावी असन्निधान देताती : तरि असन्निधानीं महात्मेंनि काइ काइ वर्जावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : द्रव्यसंबंधा साक्षी न ठाकावें : क्रयविक्रय न करावें : छेदभेद न करावे : तुम्हां आवडी नावडी न होआवी : तुम्हां विधिनिषेधु न होआवा : तुम्ही जात्रे क्षेत्रा न वचावें : तुम्हीं पुरीं पाटनीं न वसावें[१२] :"।।

भटीं पुसिलें : "जी जी : पुरुषासि कवणीए अवस्तेसि ज्ञान संचरे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जरठावस्ते विकारु जाए : परि विकल्पु न वचे : म्हणौनि जरठावस्थे ज्ञान संचरे :" "हो कां जी :" भटीं पुसिलें : "जी जी : परमार्गा कवण कवण अनाधिकारी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वेडेयां : पिसेयां : बहिरेयां : आंधळेयां : मुकेयां धर्मीं अधिकारु नाहीं :" "हो कां जी : तरि हे कैसे जाणावे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "निरंतर रजें रंगे तो वेडा : तमें तापे तो पिसा : आइकिली मातु परिसों जाणे परि सांघों नेणें तो मुका : आइकिली मातु परिसों नेणे तो बहिरा : दाखविलेयां न देखे : सांघितलेयांहीं नेघे : मां स्वयमेव काइ देखैल ? जें जें वासने भावे तेंचि घे तो अंधा :" "हो कां जी[१३] :"।।

भटीं म्हणीतलें : "विषयसेवा पुरुष गडदरां पडे : आणि नीगवें ना : तें कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरुष जेतुलजेतुली विषयसेवा करी तेतुलतेतुला धर्मी निबळ जाए :"

---

६ (**प्रव. आमा.** १७२). ७ **गो.** आणीकां. ८ **एवा.** तरि जेचि गति तीएसि : तेचि गति तीएसि होए : ९ **एवा.** °भांडाचां आणीकी. १० (**दृपा.** ६७. गुळ्हारियाचा दृष्टांत. 'भटांप्रति बेलोपुरीं निरूपिला'–**दृस्थ.** या दृष्टांतावरील हें दार्ष्टांतिक स्वामींचे असावे. म्हणून अंतर्भूत केले आहे). ११ यापुढे चौकटीच्या कंसांतील भाग 'प्रकरणवशा'तून घेतले आहेत. प्रत्येक भागाच्या शेवटी तो तो भाग कोणत्या सूत्रांच्या प्रकरणवशातून घेतलेला आहे याचा तळटीपात निर्देश केलेला आहे. १२ (**प्रव. आमा.** १४–२०). १३ (**प्रव. आमा.** १४९–१५०).

भटीं पुसिलें : "जी जी : नित्यविधी : निमित्यविधी : सन्निधानीं : असन्निधानीं जडचेतन पदार्थ असे : तयाचेनि संबंधें विकार उपजे तरि कैसें करावें पां?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विषयाचिए एकासनीं न बैसावें :" "जी जी : एकासनेंवीन न सरे तरि कैसें करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " विषया साक्षी न ठकावें :" भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीयांचा मार्ग पुढां होइल : तेणें कैसेया परी असावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुष्टला जन तरि विखो संपादील : रूसला तरि प्राणा घतैल : म्हणौनि उभयतां जनसंबंधु त्याज्य : म्हणौनि देशाचां सेवटीं झाडातळीं जन्म क्षेपावें : गडींसिडीं असावें : ह्राळिया पाळिया असावें : एका झाडाची सवे न होआवी : एका स्थानाची सवे न होआवी : भोगस्थानीं न बैसावें : तीर्थ : देवता : पुरुषु इये तीनि आपलवीति : लेपाचां देउळीं न बैसावें : लिंग : चिन्ह : मुद्रा : न होआवी : विषयां पात्र न होआवें : मनुष्यमात्र होउनि असावें : जोगिया तो मसींधसीं लीतला होआवा[१४]" ।। ]

[ भटीं पुसिलें : "जी जी : महात्मेयांसि गावामाजि वसणें पडिलेंचि तरि कव्हणी एक ठाइं वसावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : महात्मेनि संपन्नाचां घरीं न वसावें :" भटीं म्हणीतलें : "ऐसांहीं वसलेयाविन न सरे तरि काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि विषयाचा संगु न करावा :" भटीं म्हणीतलें : "जी जी : विषयाचेनि संगें काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरा जीवा जेंचि पोटीं : तेंचि तोंडीं : ऐसा आहाच म्हणौनि :" मग भटीं म्हणीतलें : "जी जी : ऐसा आहाच : तेणें संपन्नाचां घरीं कां वसावें? अरण्यामाजि कां नसावें?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोर जीवु आपणेयां करौं आवडे तेंचि करी : पाठीं पुढिलावरि ठेवी : म्हणौनि आवडी संपन्नाचां घरीं पुढीलातें निमित्य करौनि वर्चति : ऐसे एक असति :" भटीं म्हणीतलें : "जी जी : सेवादास्याचेनि संबंधें स्त्रियांचें दर्शन संभाषण करावेंचि लागे तेथ कैसें करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ आळोंचु न करावा :" "जी जी आळोंचु कां पां निषेधिला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पुरुषासि अविद्यारूपें अविद्या संचरे : आणि कलियुगीं पवित्रता हा धर्मु न वर्ते : अवकाशु नाहीं : प्रार्थित। नरु नाहीं : म्हणौनि चुके : यातवं आळोंच तो नाचि :" "हो कां जी :" भटीं म्हणीतलें : "पुरुषु ऐसांही विषयसेवेलागि प्रपंचीं जडे तेणें काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जेतुलजेतुला प्रपंचीं जडे तेतुलतेतुला ईश्वरीं उजडे : जेतुलजेतुला प्रपंचीं उजडे तेतुलतेतुला ईश्वरीं जडे :" "हो कां जी :" भटीं म्हणीतलें : "जी जी : पुरुषु प्रपंचीं काइसेन जडे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "रससेवा घडे म्हणौनि :" "जी जी : रसासि काइ लक्षण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सर्वत्र विषयीं गोडी तो रसु[१५] :" ]

---

१४ (प्रव. आ. ७, १४, १५, २०, २६, ३७–४४). १५ (प्रव. आमा. १६२–१७०).

[मग भटाचिया चित्तासि आलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "एक विधिकींकरु : एक परमेश्वरकिंकरु : आपण विधिकिंकरां न व्हावें : परमेश्वर किंकरा होआवें : । विधि-भावातीता होआवें : संग्रहो करावा : हिंसा न करावी : । हिंसा पाप : पापातव नर्क : परद्रव्याचेनि नावें पडिला कवडा आदिकरौनि नेघावा : हा प्रवृत्ताचा आचार :" "हो कां जी :" म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : निवृत्ताचा आचार निरोपावा जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्राप्त विषयाचा त्यागु करावा :" म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : त्यागामाजि निर्गुण त्यागासि काइ लक्षण असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "मळवत त्याग तो निर्गुण :" "हो कां जी : तरि पुढें निरोपिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरालागि काळकुळ लोक यें तीन्हीं आंगवावीं : कां तळहातें भाली हाणावी :" महदाइसीं म्हणीतलें : "ते कैसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तळहातें भाली हाणिजे ते जातां कव्हणांहीं न दिसे : ऐसा ये तैसा निगुनी जाये : येर तें दीसे तैसें निगावें नाहीं :" तवं म्हांइंभटीं पुसिलें : "जी जी : काइ धर्म आचरेत ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "समर्थो धर्म आचरेत :" तवं भटीं म्हणीतले : "जी जी : समर्थ असमर्थ अवघेचि पुरुष तर परधर्म आचरती : तयाचाचि काइ विशेष ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं म्हणता तें तैसेंचि : परि विरळा नांदे :" "जी जी : तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "रणामाजि सौरें जुंझालागि निगती : एक मरती : एक भंगती : एक पळती : एक पडती : तेयामाजि जो आपणेयां घाए पाथर न लागत जुंझे : सकळांतें पराभवी तो विरळा : तयाचा पढीएंत : तेणें तो नांदे : प्रसिद्धी होए :" "हो कां जी[१६] :"]

ऐसें आहोरात्र निरूपण केलें : आणिकहीं बहुत निरूपण जालें : भटीं दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : ।।

## ५८६ म्हांइंभटां द्रव्यानएनीं अनोज्ञा

गोसावीं म्हांइंभटांतें पुसिलें : "तुम्हीं स्रीप्रभूचां संन्निधानीं केती दीस होतेति ?" "जी जी : सा मास होतां :" "तुमचें[१] श्रीप्रभूचीए ठाइं नित्य वेचीं काइ वेचे ?" म्हांइं-भटीं म्हणीतलें : "कहीं सरुदामु वेचे : कहीं दामु : कहीं पाउणदामु : तीनि रुवे :" सर्वज्ञें म्हणीतलें[२] : "परि संन्निधान चरीतार्थ नव्हेचि : एतुलें द्रव्य एथ घेउनि या : मां[३] माससंक्षा संन्निधान चरीतार्थ कीजैल तें एथौनि दीससंक्षा संन्निधान चरीतार्थ कीजैल[४] :" सर्वज्ञें

---

१६ (प्रव. आमा. १०२–११३).

५८६. १ मु. "तेथ देहाडीये काइ लागे ?" "जी जी : कहीं रूए तीनि लागति : कहीं दामु एकु लागे :" (शोध : कहीं सरुदामु लागे : आणि जीये दीसीं फुलांचा वोवरा करीं तीए दीसीं आसु लागे : मग त्या द्रव्याकारणें नाणवट करूं आदरिला : ऐसें द्रव्य मेळवीं तें श्रीप्रभूचेया उपयोगा नेलें जी :") २ अगोने. °सोधु. ३ मु. (शोध. °तेथ मास संख्या तें एथ दीस संख्या :" तथा शोध : ते समै गोसावीं म्हांइंभटांप्रति गीतेचे दोनि श्लोक वाखाणीले :). ४ अगोने. °सर्वज्ञें म्हणीतलें : "ततप्राप्त

म्हणीतलें : "कव्हणां कव्हणी व्येसनु : कव्हणां कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरीजेति हेंचि व्येसनु :" एथ गोसावीं गीतेचे दोनि स्लोक वाखाणिले[५] : सर्वज्ञें म्हणीतलें : "प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वती: समा:। शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोभिजायते ।। १ ।। चतुर्विधा भजंते मां जना: सुकृतिनोऽर्जुन : आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ।। २ ।।" *तवं म्हाइंभटीं म्हणीतलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्ती गीतेमाजि च्यारि पुरुष बोलिले : तयाचिया वासना कैसिया ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आर्त्तो दु:खत्रसच्चित्तो जिज्ञासुरुत्तमो मयि । अर्थार्थी नित्यपदाकांक्षी श्रद्धया परमास्तिक: ॥" म्हाइंभट बुझौनि गेले : मग म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी जी : तारि मीं गावांसि जाइन जी : द्रव्यें आणुं :" मग एकु दीसीं म्हांइंभट द्रव्य आणावेया गोसावीयांतें पुसौनि सरालेयासि नीगाले : गोसावीं अनुज्ञा दीधली[६] :* सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथौनि[७] या : मग तुम्हांसि गीता वाखाणिजैल[८] :" "जी जी :" मग नीगाले : ।।

## ५८७ भट म्हांइंभटातें बोलाउं पाठवणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुम्हीं सरालेंयासि जा : म्हांइंयांतें[१] बोलाउनि घेउनि या :" तैसेचि भट सरालेयासि गेले[२] : ।।

## ५८८ माहादाइसां भेटि

गोसावीयांसि नीबातळीं जाडीवरि आसन असे : माहादाइसें[१] दायांबा[२] आलीं : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागलीं : गोसावीं बैसलेयांचि खेमाळींगन दीधलें :

---

(**एवा.** तदप्रमाण) एथ द्रव्य घेउनि या : मग तुमचें सन्निधान चरितार्थ कीजैल :" ५ **ने.** °चतुर्विधा भजन्ते मां :।। तेषां ज्ञानी नित्ययुक्त : ।। हे दोन्हि श्लोक म्हाइंभटाप्रति वाखाणिले : त्या आधारें म्हाइंभटीं कोथळोबासि गीता वाखाणिली : मग तेया दोघांसि देहपर्यंत प्रीति होति : मग कोथळोबायें म्हाइंभटासि पूजा केली. ६ (**हीबी.**). ७ **मु.** °लवकरि. ८ **अमु.** °जति.

**५८७.** १ **हीबी.** ब्राम्हणातें. २ **मु.** (**शोध.** म्हाइंभट सरालेयासि गेले : देमाइसातें द्रव्य मागत होते : तवं तीहीं म्हणीतलें : "आम्हीं म्हणौनि तें कराल तरि तें देउनि :" म्हाइंभटीं म्हणीतलें : "तें आम्हांसि करणीयें नाहीं : तेह्वळीं म्हांइंभट वणिजारेयापासि गेले : तयांसि कण लाविले : विसारू घेतला : पेंवांचीं पाहाळें उघडौनि बैसले असति : इतुकां समैं भटोबास आले : भटोबासीं म्हणीतलें : 'म्हांइंभटो : तुमतें गोसावीं बोलाउं पाठवीलें असे :' तवं म्हांइंभटीं म्हणीतलें : "म्यां वणिजारेयाचा वीसारू घेतला असे : पेंवांचीं पाहाळें उघडलीं असेति : तरि मीं काइ करूं सांघा पां ?" (**एवा.** °म्हणाल : हें आवघें सांडा : तुम्हीं चाला : तरि तुम्हांसरिसाचि एवों लागैन :") तवं भटोबासीं म्हणीतलें : "हें मी नेणें :" (**शोध** : "तुम्हीं आपुलें वीचारा :") "तरि गोसावीयांपुढां ऐसें सांघा : दामु एती : आणि एइन :" तैसेंचि भटोबास नीगाले : ।।

**५८८.** १ **यमु.** महदाइसें पाडळीएहुनि एकु मोलकै केला : मग गोसावीयांचेया दर्सना आलीं. २ **हीबी.** °वणिजारेया सांघातें.

मग[3] माहादाइसांतें म्हणीतलें[4] : "कव्हणाचें जाए : मरे : तरि तें पुसिजे : पडिताळिजे : तरि तेतुलेंयांहीपुरतें एथ नाहीं होए?" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांपासौनि वृधासंगमींहुनि गेलीयें : तै गोसावीं मातें म्हणीतलें : 'बाइ : जरि वाएनाएकु भेटती तरि हें पुसत होतें ऐसें सांघावें :' ऐसें म्हणीतलें : जी जी : गोसावीं मज तैचि उमटवीलें : परि मज नुमटेचि :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काकु : कक्षा : भावार्थ : प्रकर्णे जाणावें*[5] *:*" "जी जी : मीं गेलीयें त्यें *दीसीं वारू : त्या वारासमोर गेलीयें जी*[6] *:* तवं वाएनाएकु समसाना आणिले असति : तवं तेया दुखाचि वरिपडी जालीयें जी : मग संगु नाहीं : सांघातु नाहीं : आणि आपलोतें[7] आणुं म्हणें : तरि तेयाचें गोसावी मजचिकरवि करवीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[8] : तें तुम्हांसीचि करुं आवडे : मगचि करवीजे कीं :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोर जीवु आपणेया करौं आवडे तेंचि करी : पाठीं पुढीलावारि ठेवी*[9] *:*" "मग मीं आपलोसरिसी पैठणासि आलीयें : तेथौनि दायेंदादो सांघातें आलीयें[10] : जी जी : आम्हीं ऐसें आइकीलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : याचें तैसेनि तैसें आइका ? मग तुम्हीं काइ म्हणां ? काइ संबंधीं असौनि म्हणां : कीं माहात्मेयांपासीं असौनि म्हणां ?" "ना जी : संबंधीं काइ असौनि ? आणि माहात्मेयांपासीं काइ असौनि ? असौनि उभेगंगातीउरीं[11] गोवींदु गोवींदु म्हणतें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकि दुहुवा असे : ते वाडीचां वाडीं कडवलीं*[12] *असे : गावींचां गावीं तीएचें सदर्थ बापभाउ असति : ते नेओं एति : पर ते न वचे : ते म्हणे : 'तुमचीं पाटाउवें सुताउवें नेसतां मज असलाग्यता :' ऐसें म्हणौनि राहे : मग कीती एकां दीसां तेणें मळीन रोडिकी दुखीस्त देखीली : मग अनुकंपा उपनली : संबंधु दीधला : गर्भसंभुति जाली :*

---

३ **य.** महदाइसीं पुसिलें : "जी जी : नागदेवो के गेला असे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचा म्हाय नावं ब्राह्मणु° (पुढे लीळा ५९१ पाहा). **हीबो.** मग महदाइसें दुख करूं लागलीं. दुख असाहे जालें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : थोर दुखीए जालेति ना ? एथुनि तुमतें वारीलें की ? परि तुम्हीं वारीलें न कराचि : आणि ढोरासमोर गेलीति :" ४ **यमु.** "बाइ : (**य.** यातें तैसेनि तैसें आइकीलें तरि) तुम्हीं पडिताळुं न याचि तें काइ ? नेणो कोणु (**य.** नेणों) कोणातें पडिताळिती :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : सांघातु नाहीं—. ५ (**प्रव. आ.** १४८.) ६ (**पं.**). ७ **यमु.** वैजोतें आणीं तरि—. ८ **यमु** "बाइ : एथौनि काइसेया करवीजैल? तें तुम्हांसिचि करुं आवडे :" ९ (**प्रव. आमा.** १६५) १० **हीबो.** °मग गोसावीं म्हणीतलें : "बाइ : एथिचें तुम्हीं काइ आइकीलें होतें ?" "हो जी : पहीलें एक आइकीलें : मग दुसरें आइकीलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : लोकु लोकांचें आइकीलेंयां ये : मां तुम्हीं येथीचें आइकौनि कैसीं नैयाचि ?" महदाइसीं म्हणीतलें : "स्त्रीदेह पराअधीन : कोना सांघातें येवों जी ? तेथे तरि राहावें ना : आणि येवों म्हणें तरि कोन्हीं आनीतें नाहीं : मग वणिजारेयासांघातें आलीयें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आधीं आइकीलें तै तुम्हीं काइ म्हणां ?. श्रीप्रभूचेया ठायासि जाओं म्हणां ? कीं माहात्मेयापासि—. ११ **गोनेमु.** °तीरें. १२ **एवा.** कलवडीं

*पुत्र जाला : मग ते तया आवघेयाची गोसावीणि जाली*[१३] *:* " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें तरि तुम्हीं आपुली वीखयेवेवस्था केली देखों : पोरु जीउ कांटेयांचेया पेटेयावरि बैसौनि विखयेवेवस्था करी : " माहादाइसीं म्हणीतलें : " ना जी : आम्हीं आनिक एक आइकीलें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " मग काइ म्हणां ? " " ना जी : काइ म्हणौन ? गोसावी आमतें आवघेयांतें : रक्षतील : गोसावी ऐसें काइ स्वीकरितील ? " सर्वज्ञें म्हणीतलें[१४] : " बाइ : हें आपणेयांतेंचि राखों न सके : मग तुमतें काइ राखैल ? " माहादाइसीं म्हणीतलें : " ना जी : हा लोकु दुराराध्यो : ईश्वरपुरुष होती तेयांतें त्रसवीतांचि होए : देखों न सके : " ।।

## ५८९ ज्ञानांकुस आक्षाइका स्त्रवण

याउपरि ज्ञानाआंकुसाची गोष्टि सांघीतली : माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : ज्ञानआंकुस नावं एक माहात्मे : ते एकीं गांवीं होते : तेयांतें देखौनि गांविचेयां बाइलांसि तैसींचि लेंकरुवें हों लागलीं : गांविचां म्हणीतलें : ' हे वीभचरताति : ' म्हणौनि गांविचां खैरीं जुंपों काढिलें : तीं[१] म्हणीतलें : ' खैरीं काइसेया जुंपता ? सोधी[२] घेया : पाखाळु[३] घेया : दीव[४] घेया : ' ते नेघति : तेलीयांचे बैल आणिले : तेयांतें खैरीं जुंपिलें : बैल बुजवीति : सुसवीति[५] : परि बुजति ना : मग तीं ईश्वरपुरुषू म्हणौनि सोडिलें : तेयांतें बुझाउं लागले : तीं म्हणीतलें : " स्वधर्मपीडामवचिन्त्य योऽयं मत्पापशुध्यर्थमिह प्रवृत्तः । नो चेत्क्षमामप्यहमस्य कुर्यां मत्तः कृतघ्नो वद कीदृशोऽन्यः ।। आहो आपुला स्वधर्मु पीडौनि : माझीये चींते प्रवर्तलेति : कां पां ? जीयें मीयां केलीं पापें : तेयांचीए सुधी प्रवर्तलेति : तेयांसि मीयांचि उपराठी क्षेमा करावी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : माहात्मा तो : खैरीं काढिला माहात्मा वीकरे ना : ऐसेयां होआवें : मग तेहीं काइ केलें ? " " तेहीं दोहीं वेसीदारीं दोनि नांदीए करवीले[६] : एकु फटीकाचा : एकु तांबेयाचा : मग तेयांतें गाइ रीगतांनीगतां देखति : मग तेयांसारिखीं वांसरुवें होति : मग तेयांचें अन्यथाज्ञान[७] फीटलें : "

*मग महदाइसीं गोसावीयांतें पुसीलें : " जी जी : हें ज्ञानांकुश आख्यान सत्य ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : सत्य : ढवळापीवळा करौनि तयाचें अन्यथाज्ञान फेडिलें : " मग सर्वज्ञें म्हणीतलें : " दुजेया अन्यथाज्ञान उपजे ऐसें न कीजे : अन्यथाज्ञानें पुरुषु धर्मापासौनि जाए : विकल्पु स्फुरे तो अर्थु न कीजे*[८] *: "* ।।

---

१३ (**दृपा.** ८४. दुर्भगेचा दृष्टांत. ' महदाइसांप्रति पहिलीये भेटी : बेलोपुरीं '. १४ **एवा.** °पोरे हो : देवो आपणेयातें—.

**५८९.** १ **हीबी.** तीहीं माहात्मां—. २ **यमु.** सोधु. ३ **गो.** चोखाळा. ४ **गो.** दीवे. **यमु.** दीव्य. ५ **यगो.** हुसवीति : **हीबीमु.** हुसकवीति : **ने.** दृकवीति. ६ **अ.** केले. (**एवा.** रोविले). ७ **अ.** अनेथाज्ञान. ८ (**प्रव. आ.** १६९).

## ५९० मादणेंउपकर्मी लखूबाइसां व्यापारु कथन

गोसावीयांची[१] स्रीमुर्ति फुरसैली देखौनि माहादाइसीं गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : मीं गोसावीयांसि मादणें[२] करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बाइसांमागां मादणें[२] ऐसें हें भाखहीं[३] नेणें :" "जी जी : तरि एथ लखूबाइसें : आउसें असति कीं ?" "बाइ : तें चोज एक : एथौनि म्हणीतलें अलोनी[४] : तरि यें खारट करीति : खारट म्हणीतलें : तरि यें अलोनी करीति : एथौनि जरि हीरवें म्हणीतलें तरि यें करपवीति : करपलें म्हणीतलें तरि यें हीरवें करीति : ऐसें[५] एथिचेनि[६] म्हणीयें श्रमति : मग जाति : डेराभरि पाणीयां ठेवीति : आंग उटीति : धुति : मग एरी दीसीं एथ एति[७] :" ।।

मग माहादाइसीं डेरा भरिपाणियां ठेविला[८] : मग पडदणी ओळगवीली : मर्दना दीधली : मादनें[२] जालें : आंगदाटणा ओळगवीला : मग बाहीरवासाची घडी ओळगवीली : फुटा ओळगउं गेलीं तवं फुटेयाचीये पालवीं गांठि देखिली : "जी जी : ये गांठीसि काइ असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बापुडें वानरें चुडीचांचुडी[९] करुनि घेउनि ए : तें तयांचां हातीं दे : तें एक सांडीति : एकें केरासवें सांडीति[१०] : तें हें वेंची : वेंचौनि एथ बांधे : मग एरी दीं तेयांचां हातीं दे : मीरीयें रगडीति : तीया थोरलीया डाळंबीया दवडीति[१०] : मीठाचे थोरले रवे सांडीति : तें हें वेंची : एथ बांधे : तें एरी दीं तयांचां हातीं दे :" मग माहादाइसीं गोसावीयांसि दंडवत केलें : स्रीचरणां लागलीं : मग वीनवीलें : "जी जी : बाइसें गोसावीयांसि पुजाअवस्वरु करीति तैसा मीं गोसावीयांसि पुजाअवस्वरु करीन :" म्हणौनि स्रीचरणां लागलीं : गोसावीं मानिलें : मग पुजाअवस्वरु जाला : आरोगण जाली : वीडा जाला[११] : ।।

## ५९१ म्हांइंभटां अधिकारु प्रसंसा

माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावीयांपासीं नागदेओ होता तो कांहीं देखों ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचा म्हांयां नावें ब्राम्हणु असे : तेयातें बोलाउं धाडिले

---

५९०. १ **यमु.** गोसावीयांचीए श्रीमुर्तिवरि चीति देखौनि–. २ **मु.** मार्जनें. गो. माजणें. ३ **गोनेहीबी.** परिभाषही. ४ **गो.** अलौनी. ५ **यमु.** °ऐसांही म्हणिजे तरि म्हणति : 'ऐसें तरि आम्हीं करुनि : ना तरि आपुलें भलतेयाकरवि करवावें :' एथिचेनि व्यापारें सीणति : ६ **ने.** °म्हणीतलें न मनेति : मग जाति. ७ **यमु.** °मंडळीकु दळुं धाडीजे तरि वीसदेओ आणुं वीसरे : वीसदेओ आणु धाडीजे तरि दळुं वीसरे :" ८ **गो.** ठेविलें. ९ **गो.** चुडुचांचुडु. **य.** चुडचांचुड. **मु.** चडुंचडुं घेउनि ये. १० **गो.** धाडीति. ११ **यमुहीबी.** मग महदाइसीं पुडुतीं वीनवीलें : "जी जी : जैसा बाइसें गोसावीयांसि तीन्ही पुजाअवसरू करीति : तैसेचि मींहीं करीन जी :" गोसावीं विनती स्वीकरीली : (**हीबी.** तैंलागौनि माहादाइसें गोसावीयांचे तीन्ही पुजाअवसरू करीति :)

असति :" माहादाइसीं म्हणीतलें :" जी जी : ऐसा कोणु ब्राम्हणु दैवाचा भाग्याचा : जेयातें गोसावीं बोलाउं धाडिलें ? " "बाइ : ब्राम्हणु *कैसा नीका*[1] : जेयातेया अर्था आइताचि असे : एथ जवं होता तवं पुसतचि होता : तुम्हीं देखतीति तरि तुम्हां थोर सुख होतें[2] :" *"जी जी : सुख काइ होए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "किंचित दुःखें पाप नासे : आनंदें पुण्यराशी नासेति*[3] *:" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : म्हांया ब्राम्हणु सामुग्रीचा असे : परि याहीहुनि भांडारेकार नीळभट*[4] *सामुग्रीएचे :" "जी जी ते कैसे सामुग्रीचे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भांडारेकारां दर्शनासरिसी ज्ञात : आप्त : ऐसी प्रतीति अवधारिली : तैसी म्हांइंयांसि न अवधारेचि :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : एसणी तेयाची सिहाणीव : जें गोसावीयांचे दर्शन होतांचि गोसावीयांतें परमेश्वरु म्हणौनी ओळखीलें : तरि तेयाचां ठाइं बहुत सिहाणीव : कुशळता : चातुर्य हो कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति बाइ : ॐ म्हणौनि भांडारेकाराचेयासारीखें उठोंबैसों कव्हणीचि नेणिजे*[5] *:"*।।

## ५९२ नीबार्ताळि भटां भेटि

गोसावीयांसि नीबातळि आसन असे : तवं पैलीकडौनि भट[1] आले : सर्वज्ञें म्हणीतलें[2] : "ब्राम्हणु नैएचि : वानरेयाचा हारी पाओ न पडे :" तवं भट आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : मग सांगीतलें : "जी जी : मीं तेथ गेलां तवं म्हांइंभटीं[3] ग्राहीकांचा वीसारु घेतला असे : हातीं कुडौ[4] : वाखारी मेजीत[5] होते : मीयां म्हणीतलें : 'म्हांइंभटो चाला : तुमतें गोसावीं बोलाउं धाडिलें असे :' तवं तीं म्हणीतलें : 'भटो : मीं घरीं द्रव्य मागतु होतां : परि तीयें नेदीतीचि : मग मीयां या वानीयांचा वीसारु घेतला असे : वाखारी मेजीतु[6] असे : तुम्हीं म्हणाल तरि ऐसाचि एइन :' मीयां म्हणीतलें : 'तें मीं नेणें : गोसावीं तुमतें बोलाउं धाडिलें असे :' मग ते मातें जेवावेया राहावीत होते : परि मी नऱ्हायेंचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हां गा : तुं म्हणतासि तरि ब्राम्हणु एता कीं गा : तेतुलेया अनिष्टाबाहीरि पडता कीं गा :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसे गा जीवु : जीवाचा वागारा नावेक ढिला करों नये : जरि केला तरि आनौनि आन करितां वेळुचि न लगे*[7] *:"*

---

**५९१.** १ **(यमुने.)**. २ **हीबी.** °याहीहुनि भांडारेकार सामुग्रीयेचे :" महदाइसीं पुसीलें : "जी जी : ते कवण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : झाडिदेशा भांडारे गावो : तेथ हें गेलें होतें. . . . . °(एकांक लीळा ४६ पाहा. हीराइसा पाठात ती येथे वर्णिली आहे). ३ **(प्रव. आमा.** ५०). ४ °वासना दामोधर भट. ५ **(प्रव. वि.** २४१–२४२).

**५९२.** १ **यमु.** °एतां देखीले. २ **यमु.** "बाइ : ब्राम्हणु नैयेचि :" "तें काइ जी ?" "हा नव्हे पैलु वानरा आला : बापुडें वानरें एकलें ठेलें : हारी पाउल न पडे :" ३ ही. °कनाचीया वाखारीचीं पाहाळें काहाडीलीं होतीं : वनीजारेयाचा वीसारू घेतला होता : हातीं कुड घेउनि एकासि कन मेजवीत होते :. . . . मीयां म्हणीतलें—. ४ **गोने.** कुडो. ५ **गो.** झेलीत. ६ **गो.** मेजूं जातसे. ७ **(यमुहीबी.)**.

## ५९३ माहादाइसां तुप वाढितां स्वयं प्रयोक्ती भोजन कथन[१]

माहादाइसें *भीक्षा करुनि आलीं*[२] *:* जेवितें होतीं : तेव्हळि गोसावी आपुलेनि स्रीकरें तुपाचा डो घेउनि वाढुं आले[३] : माहादाइसीं नीराकारिलें : "ना जी : मीं नेघें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथचें गोमटें आसांसितें असा : आणि एथिचेयाचा निरोध करितें असा ?" "ना जी : हें गोसावींचि नीराकारिलें कीं : जें मीनलेयांहीं न सेवावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरें हो : तें तुमचेयाकडौनि तुम्हांसि कांहींचि नव्हावें कीं : एथौनि तुम्हां सकळै होआवें कीं :" "जी जी :" मग तेहीं घेतलें : ।।

## ५९४ सारंगपंडितां व्यावृति : भटां : माहादाइसां : म्हांइंभटां बोधानुवादु

माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "हां जी : सारंगपंडित गोसावीयांचेया दरीसनां आले होते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पांडेयासि आजिकालि ऐसें वर्तते :" *म्हणौनि गोसावीं ऐसा मुखाआड फुटा धरीला*[१] *:* "हें काइ जी : गोसावीयांपासौनि एसणें गोमटें आणि तयांसि ऐसें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथिचीया सबंधा गेले तेतुले प्राणिए तामस : म्हणौनि कव्हणां[२] कें असे भलें : बाइ ? कव्हणां जीवांसि कें *असे*[१] ऐसें गोमटें ?" "हें काइ जी : तरि गोसावीयांपासौनि कव्हणासि[३] कांहीं *गोमटें*[१] नाहीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यांसि नेणों *काइ*[४] एक म्हणा : एसणीं एं हीरडभरडें[५] : तें काइ सातांपांचां[६] नाहीं ?" "जी जी : सातपांच[७] तीयें कवणें ?" "जैसे वानरेस : जैसा तो ब्राम्हणु : जैसीं तुम्हीं :" तवं भटीं म्हणीतलें : "यांसि आणि बोधु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमचा जरठु : यांचा कोमळु :" माहादाइसीं पुसिलें : "जी जी : सारंगपंडितासि एसणी क्रीया तरि तयासि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेयासि क्रीएचें गोमटें :" "जी जी : तरि गदोनाएकासि काइ ?" "तयांसि एक फळ *भजनाचें : अज्ञानासि मायासंबंधु आर्ति*[८] *:"* "जी जी : तरि दाइंदादोसि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजेयासि आणीक एक दरीसन होतें तरि एथ अनुसरते : मंडळीकु बैलीं बांधला बुधला :" ।।

---

**५९३.** १ **अगोनेमु.** प्रतीत यापूर्वी 'भटां भीक्षावचन प्रश्नू' ही लीळा आहे. **हीबी.** प्रतीत याच आशयाची लीळा, भटोबासाच्या अनुसरणानंतर आरंभी आहे. तेथेच ती पाहिजे. म्हणून भीक्षावचन प्रश्नू ही लीळा येथे रद्द करून ती आरंभीच्या दुसऱ्या लीळेत अंतर्भूत केली आहे. २ (**यमु.**). ३ **यमु.** आदरीलें.

**५९४.** १ (**हीबी.**). २ **अगोने.** कवण. **मु.** कव्हणाहीं जीवां भलें नाहीं. **ने.** °के असे मग म्हणीतलें : "बाइ कवणा कांहीं नाहीं : ३ **मु.** कव्हणासिही. ४ (**हीबीगोने.**). ५ **मु.** हरडींभरडीं. **गोने.** हेरडेभेरडे. ६ **मुहीबी.** एकादोघासिही. ७ **मुहीबी.** एक दोघ. ८ (**प्रव. विमा.** ११४).

## ५९५ भटां माहादाइसां प्रकोपु

एकु दीसीं माहादाइसां गोसावीयांचें सेवादास्य करीतां उसीरु जाला : गोसावीयांसि वीळीचांचा पूजाअवस्वरु जाला : व्याळी जाली : माहादाइसां बीढारा जावेया उसीरु जाला : भटीं म्हणीतलें : "हें काइ रुपै : एव्हढा वेळु कां लावीला ? सकाळि बीढारा जा कां : रुपै : तुम्हीं उसीरु न करावा : दीसु असतां जावें : दीसु असतां यावें[१] :" मग तीयें बीढारासि नीगालीं : एरु दीं पाहातांचि[२] आलीं : तवं कवाडें घातलीं होतीं म्हणौनि तेथ उभीं होतीं : तवं गोसावीं प्रस्त्रयासि बीजें करावेया उघडवीलीं[३] : तवं माहादाइसें उभीं देखिलीं : भटीं पाचारिलें : "हें कोण ?" "ना : नागदेया : मीं :" भटीं म्हणीतलें : "हें काइ रुपै : तुम्हीं[४] एके रात्रीं एता : एके रात्रीं जाता : तुम्हां आलेंयां तें कोणें जाणावें ? आणि गेलेयां कोणें जाणावें ? हें आवघें ओखटें होए तें तुम्हींचि केलें :" माहादाइसीं म्हणीतलें : "हें मीं जाणतीएं तुतें : पुरकर नागदेओ : ऐसें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यां कां गा कोपत असा ? एहीं[५] काइ पैऱ्हां बीढार करावेयाकारणें एथ आलीं ? बाइसें होतीं तीयें काइ पैऱ्हां बीढार करीतें होतीं ?" गोसावीं माहादाइसांतें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं एथचि बीढार घेउनि या :" एतुलेनि भट उगेचि राहीले : ।।

मग गोसावीं प्रस्त्रेयासि बीजें केलें : तवं माहादाइसीं[६] आसन रचिलें : दीपु उजळीला : उस्णोदक भटांहातीं दीधलें : गोसावीं प्रस्त्रेयो सारुनि बीजें केलें : आसनीं उपवीष्ट जाले : गुळुळा जाला : महदाइसीं स्त्रीचरण प्रक्षाळिले : मग पुजाअवस्वरु जाला : गोसावीं वीहीरणा बीजें केलें : वाळहवंटीं आसन जालें[७] : भट जवळे बैसले असति : माहादाइसें गंगेसि धोत्रें[८] धों गेलीं होतीं : धोत्रें धुनि आलीं : तवं गोसावीयांतें आसनीं उपवीष्ट देखिलें : 'गोसावीयांतें डावलुनि कैसी जाओं :' म्हणौनि पासीं आलीं : दंडवतें घातलीं : स्त्रीचरणां लागलीं : गोसावीयांपासीं बैसलीं : तवं भटोबासीं म्हणीतलें : "हें काइ रुपै : राना आलेयांहीं परि तुम्हां[९] *हातीं*[१०] असों[११] नल्हाओं : हे घाटिचे ब्राह्मण देखत असति : हें आवघें होताए तुम्हां स्त्रीयांचेनि[१२] कीं : आझुंइ कैसीं आलींति ? हें आवघें वोखटें होए तें तुम्हींचि केलें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ गा : रात्रीं तरि रात्रीं कोपलासि : उदेयां तरि उदेयां कोपलासि : आतां तरि आतां कोपतासि[१३] : यांचेनि काइ

---

**५९५.** १ °**एवा.** पारीं पींपळीं माणुसें एतां जातां देखति ऐसेयां यावें आणि ऐसेयांचि जावें : उसीरू न करावा : २ **गो.** पाहाटेचि. **य.** पाहानपटीचि. ३ **गोने.** उघडीलीं. ४ **य.** रात्रीं तरि रात्रीं तेव्हढेया वेळा गेलीति : आतां तरि आतां येवढेया वेळा आलीति : तुमतें आलेयातें°. ५ **ने.** यें. ६ **हीबी.** °सयेनासन फेडीलें : मठु झाडीला : . . .आसन रचिलें––. ७ **एवा.** गोसावीं पेहेरेकडे नीबु : तेथ वीहीरणा बीजें केलें : तेथ आसन जालें : ८ **गोहीबी.** धोत्र. ९ **अ.** °जेओं तथा असों––. १० (**यगोनेहीबी.**) ११ **अगोनेही.** जेओं. **बी.** जिओं. **पं** सूटों. १२ **अ.** आस्त्रीयांचेनि. १३ **अयहीने.** कोपलासि

होइल ? एथीचीए अभिमानीएं अभीमानु[१४] नाहीं : मां काइ आतां तुझेनि प्रेत्नें होइल ? एहीं काइ गा केलें ? एथिचें तें सकळै एथिचीयाचि प्रवृती कीं गा : *एथ आणि श्रीकृष्णीं त्रिविध जनु : श्रीप्रभूचां ठाइं द्वीध जनु*[१५] *:*" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं अच्युतगोत्र[१६] कीं गा : तुम्हां परस्परें परम[१७] प्रीति होआवी कीं गा वानरेया : आणि म्हातारी आतां तुम्हां लागे कीं गा : कव्हणाइं अर्थीं वंचीजे ना हो : आणि बाइ : तुम्हीं यांतें पुसिजे : हा 'पुरकरु नागदेओ' ऐसें न म्हणीजे हो : हा एथिचीया जवळीका आनु जाला असे हो : जैसा सीवेचा मुढा[१८] असे : कव्हणी एकु सीवेसि गुढा[१८] घाली : तेयांसि सेणमाती माखली असें : तयांवरि सुनींडुकरें मुतीति : इळेकुऱ्हाडा[१९] लावीति : वरि वाहाणवाउली[२०] उभीं ठाकति : पाए पुसीति : कव्हणी[२१] एकु तेयासि तेलसेंदुर लावी : वरि पाणीपाला घाली : मग तयाचीया आंगा : देवत्व[२२] ए : मग तो जगाचे[२३] चींतिले मनोर्थ पुरवी : मग गाडेयांघोडेयांसीं तेथ जात्ते एति : तैसा हा एथीचीया जवळीका आनु एकु जाला असे :" *माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : हा पूर्वी महा धांडाळाचा : याची नींदा अवघे लोक करीती : तेणें दुखें आबाइसें निच घळती : मग हा गोसावीयाचां ठाइं राहीला : आतां यातें अवघीं कुटुंबीचीं वाखानिती : जें एणें कुळ उद्धरीलें :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पुरुषु आपुलें करणीयें करीत सांतां तेथचि कीर्तीतें पावे : कां जें सत्यार्थू प्रगटे*[२४] *:*" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : आम्हीं यांतें काइसेया पुसौनि ? आम्हीं आपुलेयां गोसावीयांतें पुसों नेणों ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें कोण्हींकडे जाए पां : कां तुमतेंचि केउतें पाठवीजे पां :" माहादाइसीं म्हणीतलें : "गोसावीं नागदेओ आपणेयां सामानु केला :" ऐसें पोटीं अवधारिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं परम[१७] प्रीति कीजे : परि वीसीष्ट[२५] बुधी न कीजे : प्रीतीसि वीखो होइजे[२६] :" ।।

## ५९६ श्रीप्रभुपासौनि कैवल्यदान*

[ महदाइसें भटांसि नीरोविलेयां मग भटीं पुसिलें : "जी जी : मज कव्हणा निरोविलें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुज श्रीप्रभूसि निरोविलें :" भटीं पुसिलें :

१४ **यगोनेही.** °सांडिला. १५ (**प्रव. वि.** २२०). १६ **हीगो.** °गोत्रीए. १७ **अगो.** प्रेम. १८ **गोने.** गुंडा. १९ **गोनेहीबीय.** °कुऱ्हाडी. २० **ने.** वाहाणवनी. **गो.** वाहाणा वाउनि. २१ **एवा.** एकाधा. २२ **ने.** देवतपण. **हीबी.** देवपण. २३ **एवा.** लोकांचे. २४ (**प्रव. आ.** २२४)।। २५ **अ.** वचिष्ट. **गो.** वरीष्ट. **एवा.** °बुधी एवों नेदिजे. २६ **बी.** °येकत्र खानपान कीजे : येकमेकांचिये हातिचा घास घेइजे : **हीबी.** °तुम्हीं परस्परें मथन कीजे : मग नुतन होये : स्वोक्ति : शास्त्रोक्ति : लोकोक्ति : या तीन्हीं युक्ती परित्यजुनि येथीचीया व्युत्पत्तिव्युत्पन्नां होआवें : हें अध्रीत शास्त्र कीं गा : हें होउनि कव्हणाचें घर न रीगे : याचें घर आपण रीगीजे : या शास्त्रासि आपणपें देइजे : तरि हें आपणपयातें दे : याचें घर आपण रीगीजे तरि हे आपुलें घर रीगे :' ऐसें गोसावीं निरोपण केलें :. . . .।।

५९६. *प्रव.च्या आधारे.

" जी जी : गोसावी आम्हांसि श्रीप्रभूसि निरोवितातितरि काइ ते कैवल्यदान देतील ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीप्रभुपासौनि जीवां कैवल्यदान आति : " " जी जी : नेदितां बीजें केलें : तरि काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " जेयातें निरोविती तेथौनि जीवां कैवल्यदान आति[1] : " यावरि भक्तिजनें दुख करूं लागलीं : " जी जी : आम्हीं कैसिया परी असावें जी ? कोठे असावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आपणेयांतें कव्हणी नेणे : आपण कव्हणातें नेणीजे : ऐसेया स्थानीं असावें : कानड देशा तेलंग देशा न वचावें : ते विषय-बहळ देश : तेथ अवधूत मान्य : महाराष्ट्रीं असावें : मातापुरा कोल्हापुरा न वचावें : तीयें साभिमानियें स्थानें : साधकांसि विघ्न करीति : देशाचां सेवटीं झाडातळीं जन्म क्षेपावें[2] : " ॥ ]

[ यावरि महदाइसीं पुसीलें : " जी जी : अच्युतगोत्रीं भेटि कैसी घेयावी : आणि भेटकाळीं काइ आचरावें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भ्रमतभ्रमतां भेटि : कां आपजौनि भेटि : " महदाइसीं म्हणीतलें : " भीक्षुमहात्मेयां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " एकमेकां भेटलेयां हें भेटलेयाचा पाडु जाए : म्हणौनि श्रमनीवृत्ती कीजे : एकत्र खानपान कीजे : फाळुकीं पालटीजेति : एथीचिया कथावार्त्ता कीजेती : सातपांच दीस एकत्र असीजे : मग आपणालेयां जावों लागीजे : जवंपर्यंत असावें तवं-पर्यंत पूर्वोत्तर क्षण दुर्लभ[3] : " ]

## ५९७ स्मरण : माहादाइसां जाप्यकरणीं अनोज्ञा*

[ एकु दीं माहादाइसीं गोसावीयांसि पुसिलें : " जी जी : हे गोसावीयांची प्रवृति काइसेन भंगैल जी ? तें गोसावीं सांघावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सरालेकार ब्राह्मण एइल : तयाप्रति गीता वाखाणीजैल तरि प्रवृति भंगैल : ना तरि एथचेन नामें जाप्य करा तरि प्रवृति भंगैल : ना राओ बोलावील तरि प्रवृति भंगैल[1] :" तवं माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : तरि आम्हीं जाप्य करूं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " करा : नामस्मरण करा : नामीं अभिमानु आति : नामस्मरण तेंहीं एक स्मरणाचि कीं :" एथ लेकुरवाळीए मातेचा दृष्टांत नीरूपिला : [ सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकि लेंकुर-वाळी माता असे : ते कव्हणी लेंकरू काइसेनि बुझावी : कव्हणी लेंकरू काइसेनि बुझावी : कव्हणी लेंकरू काइसेनि बुझावी : एक तें काइसेनहीं न बुझावे : तेयासि तीएची

---

१ (**प्रव. विमा.** ६७). २ (**प्रव. आ.** २२–२६). ३ (**प्रव. आ.** १२८–१३५).

**५९७. *हीबी.** प्रतीत ही लीळा आहे. ती लीळा व **प्रव. आमा.** १८६ यांच्या साह्याने प्रस्तुत लीळा सिद्ध केली आहे.

१ **रामेश्वरबास वासना** : °तवं महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : कवणें नामें जाप्य करूं जी ?" गोसावी नावएक चींताग्रस्त होते : मग महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : श्रीचक्रधराचे चरण शरण : ऐसें म्हणों ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " हें स्मरीलें धांवे : व्यता अव्यक्ताचा अभिमानु : **हे रामे** ॥ "

कडीचि होआवी : ते म्हणीयांचेनि लाहें झडती निगे : तें देखे : तवं पाठोवाठीं धांवे : नेदखे तेथचि लोळंनि घाली : मग सेजिया साइलीया असति : तीया तेयातें बुझाउं रीगति : तें तेयांचें तोंड पाहे : इतुलेनि तें तयांचेनि न बुझावे : मग ते म्हणे : 'हें कव्हणाचेनहीं न बुझावे :' म्हणौनि म्हणियें सारुनि झडती ए : पाटाउवांचेनि पालवें लाळसेंबुड पुसौनि : कडीए घेउनि स्तनपान दे[२] :"] माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : केती जाप्य करूं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "लक्षाची संक्षा :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : कवणें नामें करूं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया स्वप्नीं नाम स्वीकरीलें : तेणें नामें करा : तें मूर्तिस्मरण बोलिजे : मूर्तिस्मरण तें वस्तुस्मरण होए : आणि नामस्मरण तें वस्तुस्मरण होए : आणि नामस्मरणहीं होए :" परि कव्हणा होववेंचि ना : ।। ]

## ५९८ माहादाइसाप्रश्नें नाम:लीळा:स्मरणानुवादु*

[मग माहादाइसीं पुसिलें : "जी जी : गोसावी आमतें सोडुनि बीजें करूं पाहातातिं तरि आम्हीं काइ करूनि असावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें देखिलें तैसें आठवीजे[१] :" माहादाइसीं म्हणीतलें : "जैसें हें बरवें रूप तैसें आणीक काइ बरवें असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : त्रेतीं सीता बरवी : द्वापरीं श्रीकृष्णचक्रवर्ती बरवे : कळियुगीं हें बरवें : परि याहीहुनि एक बरवें असे :" "जी जी : तें कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें बरवें नव्हे : भीतरि असे तें बरवें :" "हो कां जी :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : तें काइसेनि देखिजे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीवासि सकळ संपत्ति तिया असंपत्ति : जीवाची परमेश्वर संपत्ति : ऐसें जैं प्रगटे तैं भीतरि जें बरवें असे तें दिसे :" "हो कां जी[२] :" ।।

तवं भटीं म्हणीतलें : "जी जी एक भक्त देवासि पढिये : आणि एका भक्तासि देवो पढीए : या दोहोंमाजि भीतरि बरवें असे तें कवण देखे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : देवासि पढिए तेयापसि देवपढीए ते नीके :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : हें देखिलें तैसें आठवीजे : या धर्मासि कवण कवण अधिकारिये असति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : राजसां तामसां धर्मीं अधिकारू नाहीं :" "हो कां जी[२] :" ।।

माहादाइसीं पुसिलें : "जी जी : आन काइ काइ आठवीजे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नाम : लीळा : मुर्ति : चेष्टा :" "जी जी : अवघेयाचें स्मरण काइ सारिखेंचि

---

२ **दृपा.** ९८. लेकुरवाळीए मातेचा दृष्टांत ('भटांप्रति :' **एवा.** : माहादाइसांप्रति बेलापुरीं निरूपिला जाप्यावरि : **—दृस्थ.**).

**५९८.** *ही लीळा प्रकरणवशाच्या अनेक भागातून तयार झाली आहे. त्या त्या भागाचा संदर्भ त्या त्या ठिकाणी दिला आहे.

(१ **प्रव. आ.** २७). २ (**प्रव. आमा.** २३९–२४२).

किंवा विलक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विलक्षण :" "जी जी : तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्मरण : अनुस्मरण : सकृत स्मरण : तुम्हां शयनासनीं भोजनीं परमेश्वरूचि होआवा[३]" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : परमेश्वराचें नाम स्मरे ऐसा सदैव पुढां होइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें स्मरे तो दुर्लभु[४] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिली श्रीमूर्ति आठवीजे तें मूर्तिस्मरण बोलिजे : आइकिली श्रीमूर्ति आठवीजे ते भावना बोलिजे[५]" भटीं पुसिलें : "जी जी : देहीक व्यापार आणि वाचीके स्मरण : तें पुरुषें किंपर्यंत करावे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : पडे तवं धावावें : मरे तवं करावें :" "हो कां जी[६] :"]

## ५९९ माहादाइसां असन्निधानधर्म निरूपण*

[माहादाइसीं पुसिलें : "गोसावी आम्हांसि असंन्निधान देवों पाताति : तरि असन्निधानीं कैसें वर्तावें जी ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोळलें सुनें असे : तयासि कव्हणे ठाइं सुखासि नैए : वळणीखालि रीगे : पारि सुखासि नैए : कडवला[१] आंतु रीगे : पारि सुखासि नैए : पाणिया आंतु रीगे तऱ्हीं सुखासि नैए : ऐसें अखंड जळतुचि असे[२] : तैसें पोळलेया सुनेयाचेया परी असावें :* आपण कव्हणा अधिन होआवें नाहीं : आपणेयां अधिन कव्हणातें करावें नाहीं : जीवें परमेश्वरां अधिन होआवें : जन्मजीवित परमेश्वरां देयावें :" यावरि माहादाइसीं पुसिलें : "जी जी : असन्निधानीं जेतुके पुरुष असति तेतुके एके क्रीया जन्मजीवित परमेश्वरासि देति : कीं क्रीयाभेदें देति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु ऐसा असे वटोवटो करीतु आपुले च्यारि दीस कडे घाली : मग एकु दीसु 'नव्हे रे' म्हणौनि जावोंचि लागे : एक तळमळीत जन्मातें धाडी तयासि परमेश्वरू आपुलें प्रेम देति : एवंपर्यंत प्रयत्निया एकु आति जो आपुलें करणीयें करौनि देसाचां सेवटीं झाडातळीं जन्मातें धाडी : कांटिये एकिं तळीं सुकौनि पाडी : ऐसाही एकु आति :" ॥

माहादाइसीं पुसिलें : "जी जी : गोसावीयांचां मार्गीं बाइया प्रवर्तती तेहीं कैसेया परी आचरावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अभोक्तया म्हांतारीचिया परी असावें :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पुरुष होउनि असावें : केवळ घरैतेवरैते वर्तति तेथ नसावें : कारुवाखारुवाचेयासारिखें वस्त्र होआवें :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणि एकि बाळविधवा*

---

३ (**प्रव. आ.** २९–३०) °ऐसीं सात वचनें निरूपिलीं : **प्रव. आ.** ३०. तथापि, यापुढील पाच वचने, येथे लागू पडत नाहीत. त्यांचे प्रकरणवशही स्वतंत्र व निराळे आहेत. म्हणून ती येथे अंतर्भूत केली नाहीत. ४ (**प्रव. आमा.** १००). ५ (**प्रव. आमा.** २४६). ६ (**प्रव. आमा.** १९०).

**५९९.** *(**प्रव. आ.** ६७–७३).

**१ एवा.** कलवडा°. २ (**दृपा.** ८६. पोळलेया सुनेयाचा दृष्टांत. 'महदाइसांप्रति वाराणसी निर्गमनीं

*असे : ते कृच्छ्र करी : मासोपवासु करी : तेणें तिएचे इंद्रियेधर्म समति : तिएचें जन्म कडे पडे[3] : तैसा अनुसरला सएमु करी : देहदमन करी : देहसोखण करी : तेणें तयाचेंही जन्म कडे पडे : " ।। ]*

## ६०० एथिचेयासि प्राणापदीची पीडा नाहीं*

[ बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ माहादाइसीं पुसीलें : "जी जी : ऐसें लोकासी देहांतीं थोर दुःख होए : ऐसें शास्त्र बोलें : आणि तैसेंचि देखीजताए :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथिचेयासि प्राणापदीची पीडा नाहीं :" यावरि माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : देहांत मांडिलिया देहीचिया रुजा वेच जालेयां गोसांवीयांचें स्मरण ठाके : तरि काइ काहीं ओखटें होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें काइ बाइ : सेवटीलिया च्यारि घडिया ऐसीया गेलीया तरि काइ ? ना तैसीया गेलीया तरि काइ ? हे देहीचिया वातपीतानुरूप प्रकटे : परि स्मरणाची उणीव तयाचा बाधा नाहीं :" "हो कां जी :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : मृत्याचें कैसें लक्षण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : समानवायोसीं लिंगदेहाचें उत्क्रमण यातें मृत्यु बोलीजे :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

## ६०१ माहादाइसां नृसिंहअवतार निरूपण*

[ माहादाइसीं पुसिलें : "जी जी : या नरसिंहातें पुराणीक परमेश्वरअवतार म्हणति : तें कवणें गुणें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नृसिंह भूत एक अवतरलें : तेयाचा कोपु ब्रह्मांडीं न समाए : म्हणौनि[1] :" "हो कां जी :" यावरि माहादाइसीं पुसिलें : "जी जी : नृसिंह कोणे स्थानिचा अवतार जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सेवटील एक्षणीचा : देवतेसि लीळाविग्रहधारित्व आति : देवता आड रिगौनि फळातें दे : प्रऱ्हादाचेया भावातिशयें आणिके देवते आड रिगौनि फळातें दिधलें : भावो अनियत फळ दे : प्रऱ्हादाचेया कैवारा भूत एक अवतरलें : तेयाचेया कोपापुरतें चराचर विश्व न पुरे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "उपासक आणि देवताविग्रह आपुलालेया साधनवंताकारणें अवतरति :" ।। ]

---

**दृस्थ. एवा.** महदाइसाप्रति'). ३ (**दृपा.** ९७. बाळविधवेचा दृष्टांत 'महदाइसांप्रति बेलोपुरीं निरूपिला'–**दृस्थ.**).

**६००.** *(**प्रव. आ.** २८५–२८७).

**६०१.** *( **प्रव. वि.** ४७–५१).

१ (**प्रव. विमा.** ८५).

## ६०२ नाथोबातें वोडबुरुडन्याय निरूपण*

[ गोसावीयांसि बेलोपुरीं अवस्थान : नाथोबाएं म्हणीतलें : "जी जी : गोसावीं महात्मेयांसि अरण्यवास वीहीला : तरि पाउसाळां काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : पाउसाळां गांवाचां कडिसरां खांडदेउळी एकि पाहीजे : तेथ श्वान-कुंडली घालीजे : जरि अरण्यामाजि निद्रा न करवे तरि वोडबुरुडन्यावो कीजे : तें च्यारीचि घडीया कीं गा : तवं आपण नीद्रा कीजे : पाठीं निजैलेयां मेलेयां सरीचि : पाहातांचि उठौनि फाळुकें झाडौनि जाओं लागिजे : जैसें कव्हणी कव्हणाचें नव्हे :" "हो कां जी :" ।। ]

## ६०३ भटां राष्ट्रासि विनश्यंती निरूपण*

[ बेलोपुरीं अवस्थान : भटीं पुसिलें : "जी जी : हा देवगीरीचा राजा यादव : तरि हा येथ कवणें गुणें राजा जाला असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : हे मागौनिचि असे गा : आतांचें नव्हे गा : हें उत्तरापंथा जाइल : श्रीप्रभुमागां उत्तरेकडुनि म्लेंछ येतील : ते जाधवातें मारितील : आणि राज्य घेतील : मग काळें करौनि या राष्ट्रासि समुळचि विनश्यंति : ऐसें होइल गा :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : राज्य घेतलयां राष्ट्रासि विनश्यंती ते कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "म्लेंछ बंद धरितील : तेणें लोक देशांतरा जातील : जे येथ असतील ते दुःकाळें मरतील : यापरि येथिचेया लोकाची विनश्यंती होइल : मग मागौतीं देशांतरीचीं माणुसें येतीं : कां गेलीं तियें कव्हणी येतीं : मग येकाचें गांव एकां : एकाची वृत्ती एकां : ऐसें होइल गा :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले : ।। ]

## ६०४ बाइसां त्रिदोषउच्छेदानुवादु*

[ बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : बाइसांसि बहुत गर्व होता : तरि तियें गोसावीयांची शिष्या कैसी जाली ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मार्गश्रेष्ठत्व : ज्ञानश्रेष्ठत्व : आचारश्रेष्ठत्व[१] : ऐसा बाइसांचां ठाइं त्रिदोषु एकु होता : तो सन्निधान देउनि फेडिला : *एऱ्हवीं एथचियें प्रथम भेटीसि तीनि दीस एहीं एथ कवाडा-आड कोनीं पायेपुसणें बैसावेया घातलें : दुधिकरटां पाणिभातु : ऐसीया तीनि आरोगणा दीधलीया*[२] *:* मग तीसरां दीसीं अवळोकूनि प्रेम कळिका एकी संचरीली : तेणें गर्व

६०२. *(प्रव. आ. ११९–१२०).

६०३. *(प्रव. विमा. १३८).

६०४. *(प्रव. विमा. १३६).

१ एवा. वयवृद्धत्व. २ (मु. अज्ञात. ३०).

उच्छेदला : मग एथीची शीष्यें जालीं : एऱ्हवीं तियें आपुलीया मार्गामाजि आवघेयाचां सीरां बैसति :" "हो कां जी :" *सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : कव्हणी एकु वीखया असे : तो पात्रालागि देशोदेशीं गावोगावीं हींडे : पात्र देखे तेथ रमे : तैसें बाइ : आर्तातें परमेश्वरू वाडोवाडीं गिवसति : आर्त भेटे तयासि दान देति[३] :"*॥]

## ६०५ माहादाइसां जीवप्रपंचानुवादु

एकु दीं माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : हा नागदेओ सकळै जाणे : आणि इतुले दी संनिधानीं असतां परि आम्हीं कांहींचि नेणों :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : चौपरतें कांहीं जाणावें असे ?" "जी जी : तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ: परमेश्वरू एकु असे ऐसें जाणां कीं ?" "जी जी :" "देवता एकी असति ऐसें जाणां कीं ?" "जी जी :" "जीव एक असति ऐसें जाणां कीं ?" "जी जी :" "प्रपंचु एकु असे ऐसें जाणां कीं ?" "जी जी :" तरि यापरतें काइ जाणावें असे बाइ* ? [अनंतें ब्रह्मांडें : अनंता देवता : अनंत जीवु : अनंत परमेश्वरू[१] : नित्यबद्धा देवता : बद्धमुक्त जीवु : नित्यमुक्त परमेश्वरू[२] : देवता एकी ऊचा : एकी नीचा : पैली आठ : ऐली तीन्हीं समानचि[३] : पैल ऐलातें व्यापौनि वर्ते : ऐल पैलाचें अस्तित्व जाणे[४] : वरिलीचिया इच्छा तळिलीचा व्यापारू[५] : नीचा ऊचेतें देखणें नाहीं : ऊचेचिया प्रवृत्ती नीचेचा संहारू[६] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीव : देवता : परमेश्वरू आणि प्रपंचु : हें जैसें असे तैसें जाणिजे तें ज्ञान[७] :"॥]

## ६०६ भटां ज्ञानभेद निरूपण*

[यावरि भटीं पुसिलें : "जी जी : ज्ञानाचे भेद निरोपावे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "सामान्य ज्ञान : खंड ज्ञान : विज्ञान : विशेष ज्ञान : अखंड ज्ञान[१] :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : अखंड ज्ञानाचे भेद कैसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वृत्तिरूप ज्ञान : रसरूप ज्ञान : विषयरूप ज्ञान[२] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें जैसें असे तैसें जाणिजे : इतुलेनि कपाळावरि फाळुकें घालौनि जावों लागिजे : जेथ गेलेया मेलेयाची सुधी नलभे : तेंचि निरालंबतेचें लक्षण[३] :" "हो कां जी :"॥]

---

३ (**दृपा.** ३७. विषयाचा दृष्टांत 'महदाइसांप्रति बेलोपुरीं निरूपिला'—**दृस्थ.**).

**६०५.** *यापुढे अंतर्भूत केलेल्या सर्व वचनांचा **प्रव.** 'महदाइसां जीवप्रपंचानुवादु' हाच आहे
१ (**प्रव. वि.** २१२). २ (**प्रव. वि.** ४५). ३ (**प्रव. विमा.** ९३). ४ (**प्रव. वि.** ४४). ५ (**प्रव. विमा.** ९२). ६ (**प्रव. विमा.** १६०). ७ (**प्रव. आमा.** १८९).

**६०६.** *या लीळेत अंतर्भूत केलेल्या वचनांचा **प्रव.** 'महदाइसां जीवप्रपंचानुवादु' हाच आहे. संगती कायम ठेवून त्यांची स्वतंत्र लीळा केली आहे.
१ (**प्रव. वि.** १४८). २ (**प्रव. वि.** १४९). ३ (**प्रव. आमा.** १८९).

## ६०७ माहादाइसां निरालंबी जन्म क्षेपणें निरूपण*

[ तवं माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : ऐसी निरालंबता आनुष्टे ऐसा कवण असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : ऐसा कवणे मायेचां पोटीं उपजैल जो देशावरि खांडें काढौनि जाए ?" माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : देशावरि खांडें काढौनि जाए ऐसा कव्हणी देखिजे ना तें काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : ऐसा एकला पळपळीत नीगे जो दु:खपुर्वक आपुलेया देवातें आठवीत वर्ते :" " हो कां जी :" माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : निरालंबी देवतास्मरणें जो जन्म क्षेपी तेणें किंपर्यंत जन्म क्षेपावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : धड तुटे तवं धावावें : देह पडे तवं करावें : परि जीवें न सोडावें :" माहादाइसीं पुसिलें : " जी जी : निरालंबी जन्म क्षेपी तया पुरुषासि कदाचित वातपीत प्रगटे : तेणें स्मरणादि क्रिया प्रतिबंधे : तेधवां पुरुषें काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तेधवां चित्त : वित्त : काया : यें तीन्हीं परमेश्वरासि अर्पावीं : आणि पातलें दु:ख भोगें निमानावें :" " हो कां जी :" माहादाइसीं पुसिलें : " जी जी : निरालंबी क्षेपी तेणें कैसीया परी असावें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : देसाचां सेवटां : झाडाचां तळवटां : देउळाचां कोनटां : इयें तीन्हीं सेउनि असावें :" " हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं[१] : ।। ]

## ६०८ माहादाइसा प्रश्नें धातुसाम्य नीरूपण*

[ एकु दीं माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : हा नागदेवो आपुलीये देहींचें होतें नव्हतें जाणे :" यावरि गोसावीं म्हणीतलें :"बाइ : भक्त : योगिया : विषया : यां तीहीं धातुसाम्य आति :" यावरि गोसावीं नीरूपण केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वात : पीत : श्लेष्मा : या तीनि धातु देहीं असति : मां जयां धातुसाम्य नसे तया रोग उठीति : जया धातुसाम्य असे तया नुठीति[१] : "।।

मग माहादाइसीं म्हणीतलें : " कैसी धातुसाम्य जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वीषया म्हणिजे राजा : तयातें सा रीतुचे वैद्य असति : ते प्रतिदीनीं हातु पाहाति : 'आजि तुम्हीं

---

६०७. *यातील सर्व वचनांचा **प्रव.** 'महदाइसां जीव प्रपंचानुवादु' हाच आहे. संगती कायम ठेवून विचारांच्या दृष्टीने त्यांची स्वतंत्र लीळा कल्पून घेतली आहे.

१ (**प्रव. आमा.** २१५–२१९).

६०८. *ही लीळा **मु.** प्रतीतील अज्ञात लीळा ४६ होय. मागील लीळेत नागदेवाच्या ज्ञानाविषयी महदाइसेने प्रश्न केला. त्या अनुषंगाने पाहाता महदाइसेचा या लीळेतील प्रश्न व त्याला स्वामींचे उत्तर, याच ठिकाणी म्हणजे बेलोपुरचेच असावे असे वाटते. म्हणून ही 'अज्ञात' लीळा येथे घातली आहे.

१ (**प्रव. वि.** १९६).

अमुका रसु सेवावा : तया रसा अमुकें अन्न सेवावें : अमुका शृंगारु करवावा :' तो तया वैद्याअधिन वर्त्ते : ते रीतुपरत्वें रसु देति : म्हणौनि तयातें धातु : श्लेष्मा न बधी : देहपर्यंत धातु वीकरे ना : कां तैसाचि योगिया : आपुलीये विद्येअधिनु वर्त्ते : वीद्येचाचि आहारु करी : अन्नोदकावरि दृष्टि न घली : म्हणौनि तयातें धातु : पीत : श्लेष्मा न बधी : एवमादिक दुखें न बधीति : विद्येचा अनुभवु करीति : तुष्टिपुष्टि असे : धातु वीकरे ना : तैसाचि भक्तु : तेणें ईश्वरू आत्मा केला असे : तो अहीर्नीसीं ईश्वरातेंचि अनुभवी : आणि एथार्थें एथ अनुसरला तयातेंहीं न बधी : हा आज्ञाधर म्हणौनि : यासि धातुसाम्य आति[२] :" ॥]

## ६०९ भक्तीउपावो नीरुपणें

माहादाइसीं पुसिलें : "जी जी : ज्ञान[१] जालेयांवरि प्रेमासी उपावो असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : उपायें न पवीजे ऐसें कांहीं असे ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "अनुसरलेयाचा देवो*[२] *:"* मग तीयें गेलीं : भटांपासीं : भट[३] धोत्राचीया घडीया करीत होते : माहादाइसीं म्हणीतलें : "नागदेया : नागदेया : प्रेमासि म्हणे उपावो असे :" भटीं म्हणीतलें : "उगीं असा कां रुपै : प्रेमासि उपावो कैंचा ?" "ना नागदेया असे :" "तुम्हींचि सांघत असा : कीं गोसावी नीरुपिताति ?" "ना गोसावी नीरुपिताति :" मग भट आले : दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : "हां जी : प्रेमासि म्हणे उपाओ असे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "असे :" "हां जी : तरि गोसावी आम्हांसी कहींचि निरुपिति ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं कै गा[४] पुसिलें ? मां कै नीरुपिजेचि ना ? म्हांतारी जीज्ञासक : म्हांतारी चर्चक : एथ कांहीं पुसतीचि असे : हें ऐसें तुम्हांसीचि स्फुरावें कीं गा : जया वृक्षाची सालि गोड : तयाचें फळ[५] सावियांचि[६] गोड जाणावें कीं : तैसें जेथिचें साधन सुखरुप : तेथिचें साध्य कैसें ? हें ऐसें जाणावें लागे कीं गा[७] :" *भटीं पुसिलें : "जी जी : उपावो तो कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सन्निधानीं आग्रह*[८] *:* पोरा जीवासि आग्रहो नाहीं : आग्रहो जरि होए तरि परमेश्वरु ज्ञानीयांसि प्रेम देति[९] : जैसा दुबळीए मातेचा :

---

२ या दुसऱ्या परिच्छेदातील भाग **मु.** प्रतीत 'शोध' म्हणून निर्दिष्ट केला आहे.

**६०९.** १ **हीबी.** ज्ञानाआंतु प्रेमासि अधिकारु आति ? २ (**प्रव. आमा.** २०२). ३ **हीबी.** भट उतरीली सोंडियेखाली बैंसोनि सीवीत होते. ४ **एवा.** °एथ पुसिलें. ५ **गो.** °कैसें ? तें तेयाहुनि सावियाचि गोड. ६ **अ.** सवायांचि. **दृपा.** तयाचें फळ कैसें असे : हें ऐसें जाणावें कीं : ७ (**दृपा.:** ६९. वृक्षत्वचेचा दृष्टांत). ८ (**प्रव. आमा.** ४९). ९ **हीबी.** मग गोसावी दुबळीये मातेचा दृष्टांतु निरूपिला : दुबळी माता असे ते एका लेकुरवासि दिवसें दे : एकासि भाकरि दे : तानुलें असे तें म्हणे : 'मज दुधभातु घालि :' म्हणौनि पालवासि पिळा घाली : तेव्हळि ते सुप चाटु–

दुबळीए मातेचें लेंकरु आळी[१०] करुनि दुधभातु जेउं मागे[११] : मग ते सुप चाटु गाहाण ठेवी : तयांसि दुधभातु[१२] जेउं घाली[१३] : तैसा जीवासि अग्रहो नाहीं : आणि ईश्वरीं प्रवृति नाहीं : " भटीं म्हणीतलें : " जी जी : मीं आतां अग्रहो करीत असें : गोसावीं आतां मज प्रेम देयावें : " सर्वज्ञें म्हणीतलें : " ऐसें[१४] तें वीसरा : " " ना जी : वीसरों ना : " " आतां तुम्हांसि आचार्यें होआवें लागैल : हें तुमचें लागे : " ऐसा पुढारु दीधला : ।। *मग भटीं पुसिलें : " जी जी : असन्निधानीं काइ ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " असन्निधानीं तळमळ[८] : निरंतर परमेश्वराची आर्ति करावी : निरंतर परमेश्वराचा विरहो भावावा : तळमळीत जन्मातें धाडी तयासि परमेश्वरू आपुलें प्रेम देति : आणि कांटी एकी तळीं सुकौनि पाडी ऐसाहीं एकु आर्ति[८] : " यावरि भटीं म्हणीतलें : " जी जी : गोसावीं म्हणीतलें : जें ' तुम्हांसि आचार्यें होआवें लागैल : ' तरि जी मीं काइसेया आचार्यैत्व करीन ? मीं गोसावीयांचां वियोगीं देसाचां सेवटां झाडा एका तळीं देह पाडीन जी : " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्ही धर्मा धरु दीजे : हें तुम्हांसीचि होअवें[१५] : " ।।*

## ६१० माहादाइसां ज्ञानप्रेमसाधन निरूपण*

[ [१]बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ माहादाइसीं पुसिलें : " जी जी : या जीवासि ज्ञाना-प्रेमा कवण साधन ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : अहेतुक भूतभजन ज्ञानाप्रति साधन : अहेतुक मायापुरभजन प्रेमाप्रति साधन : " यावरि माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : कर्मराहाटीचेनि भजनें ज्ञानाधिकार कैसा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : कर्म-राहाटीचिया मनुष्या : साधनवंता : देवताविग्रहाचेनि भजनें ज्ञान : " " हो कां जी : तरि गोसावीं अहेतुक मायापुरभजन म्हणीतलें : तें परमेश्वरभजन कां न म्हणतिचि ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : मायासंबंधु मायाभजन : " ।। ]

## ६११ सास्त्रचरितार्थ अनुवादु

एकु दीसीं सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेशा : एथौनि तुम्हां वीचारसास्त्र चरितार्थ : तुम्हीं उपदेसा अधिकार्ये : " *यावरि भटीं म्हणीतलें : " जी जी : परमेश्वरशास्त्र अनंत : तें मज कैसेनि चरितार्थ जालें ? मा उपदेशा अधिकारू कैसा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : तुम्हीं म्हणतां तें तैसेंचि : परि तुम्हां पेंडिया भरु मुद्रिला : " " जी जी : तरि आम्हांसि ज्ञान जालें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेशा ज्ञान ज्ञीत्र[१] : " ।।*

---

१० **दृपा.** दुधाची आळी घे : ११ **दृपा.** ६८. °तें काइसेनि बुझावे ना : तें मरैल ऐसें जाणे : मग ते—. १२ **दृपा.** दुध सूए. १३ (**दृपा.** ६८. दुबळीए मातेचा दृष्टांत). १४ **गोनेपं.** असे. १५ (**प्रव. आ.** १९७).

**६१०.** *(**प्रव. वि.** १६८–१७०).

**१ मवळसा पाठ.**

**६११.** १ (**प्रव. वि.** १५४–१५५).

## ६१२ तथा सां मासां अपरोक्ष अनुवादु[१]

[भटीं म्हणीतलें : "जी जी : मज अपरोक्ष देयावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेशा[२] : तुम्हांसि आणीक सा मास संनिधान होतें तरि एथचि अपरोक्ष देइजतें[३] :" तवं भटीं म्हणीतलें : "जी जी : मज सा मासां देयावें तें आतांचि कां नेदावें जी ? गोसावी करिती तें काइ एक नव्हे ?" [सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : कव्हणी एकि माता असे : तीएचें लेंकरूं भुकैलें नीजैलें असे : ते तेयातें उठउनि दुधातुपाची वाटी तोंडीं लावी : माघौतें तैसेंचि नीजवी : तें उदैयांचि उठी : पालवा पीळा घे : 'मी रात्रीं जेविलां नाहीं : भुकैलांचि निजैलां होतां : मज भुक लागली आहे : जेउं वाढि :' म्हणौनि तीयेसरिसें आंतु रीगे : बाहीरि नीगे : पाजिलें दुधतुप तें नेणे : तयासि भुक लागे : तवं ते उगीचि असे : भुक लागली ऐसें जाणे : आणि सुये : तैसें वानरेया : इतुलें दीस काइ करितां काइ होत असे : ऐसें जाणां ना गा : तुम्हां अनंता श्रृष्टी अतिक्रांता[४] :] तुम्हीं पुराणीं पढीयेजाल : एथौनि तुमची थोरी सांघिजैल तरि माथेया डोळे जाती :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : माथेया डोळे कव्हणे प्रकारें जाती जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जवंजवं जाणता तवंतवं नेणता : ऐसा जो आपणयातें अखंड म्हणे तेणें न वचति :" "हो कां जी :"।।]

## ६१३ आचार्या नामकरण

एकु दीं गोसावीयांसि आसन होतें : आणि भट आले : सर्वज्ञें म्हणीतलें : "आचार्ये हो : या :" भटीं म्हणीतलें : "हें काइ जी ?" आणि भटीं कांटाळा दीधला : "आचार्ये होआ :" भटीं म्हणीतलें : "जी जी : गोसावीं आचार्यांसि नर्क नीरुपिले असति कीं ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसा तुं परतारकु आचार्या नव्हसि कीं गा : तुं प्राणियांतें अनीस्टापासौनि काढिता : आणि इस्टीं लाविता आचार्या कीं गा : *तुझेनि मुखें अशास्त्रीय न नीगे कीं*[१] :"।।

---

६१२. १ **अगोनेयमु.** प्रतीत 'वानरेशासि आणिक सा मास संनिधान होतें तरि एथचि अपरोक्ष देइजतें :' एवढेच वाक्य या लीळेत आहे. **प्रव. वि.** १६१–१६४ च्या साह्याने ही लीळा पुनःस्थापित केली आहे. २ **अगोने.** वानरेशासि. ३ **हीबीपं.** भटीं म्हणीतलें : "जीजी : प्रवृति भंगिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तें आजिचें पाहेचें बोलणें कीं गा :" मग भट थोर दुख करूं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "दुख न करा गा : वानरेया :" म्हणौनि श्रीकरें स्परीसीलें :।। ४ (**दृपा.** ९९. निद्रितक्षीरपानाचा दृष्टांत. 'भटांप्रति वेलोपुरीं–**दृस्थ.** 'दृष्टांतपाठा'च्या जुन्या पोथ्यांत या दृष्टांताचा हाच प्रकरणवश स्पष्टपणे आरंभी दिलेला आढळतो. म्हणून तो येथे घातला आहे).

६१३. १ (**प्रव. वि.** १५९).

## ६१४ अधिकरण करुनि ज्ञानदान

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेसांपासौनि सातांपांचां बोधु :" भटीं म्हणीतलें : "हें काइ जी : गोसावीयांपासौनि एकांदोघां बोधु : आणि मजपासौनि सातांपाचां बोधु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हो कां गा : देता काइ तुं ? देतें तें आणीक असे कीं गा : *अक्षरदाता जीवु : बोधदाता परमेस्वरू*[१] *: जीवासि बोधु आणि बोधशक्ति ते एथौनिचि कीं गा*[२] ; अधिकरणातें अधिकरूनि परमेश्वरू जीवांतें उधरीति : *परि माहात्मेनि जिज्ञासा करावी : न करी तरि अक्षरें न रीगति : मां बोध कैसा रीगैल*[३] *?*"।।

*महदाइसीं पुसिलें : "जी जी : अधिकरणेंसीं आणि मार्गेसीं कवणें विधानें वर्तावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आधिकरण भज्य होए : पूज्य होए : एकु देवो : एकु धर्मु : तया परस्परें परमप्रीति होआवी कीं*[४] *:"* ।।

## ६१५ माहादाइ अधीक प्रसाददानीं अविधिकथन

माहादाइसीं पुसिलें : "हां जी : मीं गोसावीयांचा प्रसादु दों ठाइं करीं जी : अर्ध नागदेयांसि दें आणि अर्ध उरे तो अवघेयांसि वीभागुनि[१] दें : तरि काइ जी मज पाप होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पाप तरि नव्हे : परि विधि करितां अविधि संचरे : मग अवीधि अवीधीतें प्रसवे : अवीधीतव पुरुषु धर्मापासौनि जाए : *विद्यारूपें अविद्या संचरे : कां कृपारूपें संचरे : अविद्येचीं अनंत द्वारें : अविद्या द्वार पांतुचि असे*[२] *:" यावरि गोसावीं कठियाचा दृष्टांतु निरूपिला*[३] *:* ।।

[सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कव्हणी एकु कठीया असे : तो देवतेचां ठाइं अष्टौप्रहर वेचला असे : झाडी : सडासमार्जन करी : स्तर्पण करी : त्रीकाळ पुजा करी : एकु दीसीं गावीचां जेवुं बोलावीला : तो पोटभरूनि जेवीला : येउनि देवतेपुढां बैसला : तें जाड्य आलें : तीए देवतेकडे पाए करुनि[४] नीजैला : मग गजबजौनि उठीला : 'काइ माझी माउली माझें इतुलेंहीं नुपसाहे ?' म्हणौनि माघौता तीये देवतेकडे पाए करुनि[४] नीजैला : एरी दीसीं स्तर्पण करितां पींडीए पाए लागति : मग हळुहळु पारिसेनि पाणियें स्तर्पण करी : पारिसींचि फुलें वाए : 'कालीचि झाडीलें होतें : कालीचि सडा घातला होता :' आधीं स्त्रीचेनि नांवें दांडेनि साइली पीटी : तेतुकां समै स्त्री एकि आली : 'देवाची सेवा करूं लाभे ?' 'कां न लभे ? देवाची सेवा काइ कव्हणा करवली असे ?' म्हणौनि राहे : ते झाडी : तो सडा घाली : कांहीं भीक्षेसि धड गोड ए तें तीयेसि सूए :

---

**६१४.** १ (**प्रव. आमा.** १२१). २ (**हीबी. प्रव. वि.** ११२). ३ (**प्रव. आमा.** १२२). ४ (**प्रव. आमा.** ३५–३६).

**६१५.** १ **एवा.** वांटुनि. २ (**प्रव. आ.** १६५–१६६). ३ (**मु.**). ४ **एवा.** पसरुनि.

ऐसें असतअसतां संबंधु जाला : गर्भीणि[5] जाली : लेंकरुवें जालीं : मग तीयें लेंकरुवें पींडीए-जवळि हागति : मुतीति : मग एकी दीसीं गावीचां म्हणीतलें : 'कठीये हो : आतां तुम्हीं लेंकरुवाळे जालेति : आतां गावांतु घर बांधा :' मग गावांतु घर बांधलें : मग तो देवतेसि त्रीकाळ पुजा करी : हळहळु दोनि वेळ करी : मग विळचां ते वाति लावुनि जाए : मग हळुहळु एक वेळ करी : मग तेंहीं न करी : मग तेचि पालापाणी घाली : आपण सेतडीया मागों जाए : मग सेतडीया मागौनि ए : कोनटेयापासि वाहाणा फेडी : दोन्ही हातु जोडुनि मग म्हणे : 'जए देवा :' इतुकें उरलें : तैसें बाइ : अविधी अविधीतें प्रसवे[6] :" ।।

## ६१६ भटां एकलेपण अनुवादु

एकु दीसीं गोसावीयांसि रीगतां उजवीया हाता : दक्षीणाभिमुख *सोंडीएवरि*[1] आसन असे : भट आपजउं गेले होते : ते पैलांकडौनि हळवैले[2] पळवैले आले : स्रीचरणां लागले : बैसले : गोसावीं ऐसा खांदावरि स्रीकरु[3] घातला : भट चुरुं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "बापुडें वानरें आतां एणेंवीण एकलें असैल[4] :" आउसीं म्हणीतलें : "हें काइ जी स्वामी जगंनाथा : नागदेओ कैसा एकला ? स्वामि जगंनाथु असति कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें ऐसें कव्हणीकडे जाए पां :" "तरि आम्हांसि कवणांसि नीरोवीलें जी स्वामीं जगंनाथा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें यांसि नीरोविलें : आणि हा स्रीप्रभूसि नीरोविला :" भट दुख करुं लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : रडीजे ना कीं गा : रडतां काजळी पडे :" ।।

## ६१७ दाइंबा प्रेष्णें बाइसां पुनसंबंधु अनुवादु

दाइंबायें गोसावीयांतें पुसिलें : "हां जी : बाइसीं आपणेयांतें उदकांआंतु घातलें : तरि तयांसि काइ जी आत्महत्या लागली ? *काइ बाइसां पाप लागलें*[1] ?" सर्वज्ञें म्हणीतलें :

---

५ **एवा.** गुरुवीणि. ६ **दृपा.** ९४. कठियाचा दृष्टांत. **दृस्थ.**च्या मते 'नाथोबावरि तांदुळजयाचीए भाजीएवरि : छिन्नपापी गुंफेसि निरोपिला' तोच दृष्टांत 'छिन्नपापी येथे आउसेला प्रसाद वाटतांना दोन चिमटी सर्वांस देण्याप्रमाणे नागदेवास न देता त्याला आणखी देऊ काय असे चक्रधरास विचारिता . . . .सांगितला' असे **नेने** लिहितात (**दृपा. नेने,** पा. १०८) **मु.** प्रतीत प्रस्तुत लीळेच्या शेवटी 'यावरि गोसावीं कठियाचा दृष्टांतु निरूपिला :' असे स्पष्टपणे निर्दिष्ट केले आहे. **हीबी.** प्रतीतही निर्देश आहे. **पं.** प्रतीत या लीळेच्या शेवटी 'जैसा अवीधिप्रसव कठीयाचा' असा निर्देश आहे. ही मते मान्य करून हा दृष्टांत येथे घातला आहे.

**६१६.** १ (**गोने.**). २ **हीने.** झळवैले°. ३ **अ.** स्रीचरणु. ४ **हीबी.** °"जी जी : आतां मातें कोणासि नीरोविलें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तुम्हांसि श्रीप्रभुसि निरोविलें :" "जी जी : श्रीप्रभु ते उदास : तेथ आम्ही काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तुम्हांकारणें त्यांचें उदास्ये भंगैल : आतां तेथ तुमचेंचि करणीए होइल :" ऐसें संबोखीलें :

**६१७.** १ (**मु.** अज्ञात लीळा. ११५).

"तयांसि ऐसें कां गा घडैल ? *बाइसांसि जारि पाप तारि निकें तें कोणा*[१] *?* तीहीं ऐसें परमेश्वरवीयोगें केलें कीं गा : म्हांतारी म्हणिजे तमांचा मोटळा : परि एकचि नीकें जें एणेंवीण गतिचि नाहीं : सुखीयास्त्रीमंतांचां घरीं पुरुषु होउनि जन्मति[२] : बारां वरिखां संबंधु नेंदोंचि नैए : पुर्वी म्हांतारीयेसि ईश्वरसेवा घडली होती : म्हणौनि घरासि जाउनि संबंधु दीधला :" *माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : पुन:संबंधीया पुरुषु कवणीए ठाइं जन्मे ? आणि कवणे संस्कारेसीं उठी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पुन: संबंधीया पुरुषु सुखीयाश्रीमंताचां घरीं जन्मे : विषयव्यवहारावरि बुद्धि नाहीं : देवता-तीर्थावरि बुद्धि नाहीं : हें नव्हे : हें नव्हे*[३] *:"* दाइंबायें म्हणीतलें : "जी जी : तरि जेतुले भक्त तेतुलेयां ऐसेंचि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकाचें आइकतक्षेओ[४] जाए : एकासि अवस्था प्रकटे : एकु उपायें धाडी :" माहादाइसीं म्हणीतलें : "ऐसेंचि ज्ञानीया करी तरि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सुरी : पाटी : वीख : वाघवळ : ऐसें जो ज्ञानिया करी तेयांसि पींडहनन मळु लागे : परि वांयां न वचे :" ।।

*यावरि दाएंबाएं पुसिलें : "जी जी गोसावीयांचां वीयोगीं आम्हीं जीतां नीकें कीं मेलयां नीकें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरे हो : आतां मरा तारि चांगु*[५] *:" दाएंबाएं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्तीचां वीयोगीं झाडें सुकलीं : ऐसी वेधशक्ति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पुर्वी श्रीकृष्णचक्रवर्ती विज्ञानशक्ति खेळीनले : पाठीं ज्ञानशक्ति स्वीकरिली*[६] *:" "जी जी : तरि तयांसि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तयासि भलें :" "भलें तें काइ जी ?" "भलें तें मनुष्यत्व : झाडासी मनुष्यदेह होए :" "तारि मनुष्यासि काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वियोगें देह धाडी तेयांही एक भलें आति : परधर्म तुमचें जीवन कीं गा*[७] *:" दाएंबाएं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्तीचां वियोगीं झाडें सुकलीं : ते वेधासि पात्र जीव तेतुले माया योजिले होते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "संयोग : वियोग : साह्य : इयें तीन्हीं माया करी*[८] *:" दाएंबाएं पुसिलें : "जी जी : असन्निधानीचियासि पुन:संबंधु होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विकारविकल्पशून्य : स्वभावमात्रें : निरालंबी : देवतास्मरणें जो जन्म क्षेपी : तेयासि परमेश्वरू पुनरपि आपुला संबंध देति :" "तारि कैसा देति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "उत्तमासि बारा वरुषां : मग सोळा : तथा विसां :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जोचि अवसरु विषया तोचि ब्रह्मविद्ये*[९] *:"* ।।

---

२ **ने.** उपजति : **गो.** जन्मवीजति. ३ (**प्रव. आमा.** ८७. या अज्ञात प्रकरणवशात महदाइसेचा हा प्रश्न साधाला दिलेल्या पुन:संबंधाच्या वराच्या प्रसंगीचा आहे. पण त्यावेळी महदाइसा वाराणसीला गेलेली होती. म्हणून मी तो येथे घातला आहे). ४ **गोने.** °खेवो. ५ (**प्रव. वि.** २३३). ६ (**प्रव. वि.** ८१). ७ (**प्रव. आमा.** ८५–८६). ८ (**प्रव. आमा.** २५१). ९ (**प्रव. आमा.** १५२).

## ६१८ मार्ग चुकलेया दायंबातें उपदेशु*

[बेलोपुरीं अवस्थान : दाएंबाएं गोसावीयांतें म्हणीतलें : " जी जी : एकु दीं गोसावीयांचीया दर्शना एत होतां : तवं मार्गीं रात्र जाली : अंधार पडिला : तवं एक नगर देखीलें : वस्तीकारणें भीतरी गेलां तवं वोस देखीलें : आणि भीयालां : तेथ उभयां राहावें ना जी : तैसाचि नीगालां : तवं मार्ग चुकलां : महा आंधारी रात्र : भयान्नक वन देखौनि नाम आठवीलें : तथा उच्यारीलें : आणि पाहीलें : अवचित सुर्ये नीगाला : मार्ग सांपडिला : सरीसे रावुत : घोडे : हस्ती : पाइक : परिवार : नाना वेवसाइ : लेंकुरुवें : बाइली : चालावेया पवाड नाहीं : ऐसिया परी गोसावीयांजवळि आलां जी : गोसावीयांतें देखिलें : तरि ऐसें गोसावीयांचेया आठवणेतव जालें : तरि तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " तें कव्हणी एक सामर्थ्यें गा :" सर्वज्ञें म्हणीतलें : " अनंतशक्ति परमेश्वरू सकळांसिही विषएव्येवस्ता करीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : " तुम्हीं कां गा मार्ग चुकला ? सकळही मार्ग एथिचा मार्ग चुकले : हें सकळही मार्ग जाणवी : परि एथीचा मार्ग कव्हणी नेणे :" यावरि विद्यामार्ग निरूपिला : *सर्वज्ञें म्हणीतलें : " सकळहीं शास्त्रें या शास्त्रासि मिळेति : परि हें कव्हणाहीं न मिळे[1] :" ॥*]

## ६१९ दायंबा व्यक्ताव्यक्तीं निमित्त निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : दायंबा गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : प्रेमअपरोक्षादि दृष्टिवांचौनि नाहीं : आणि परमेश्वरू अव्यक्तौनि स्वयं विद्या स्वीकरीति : तरि अव्यक्तीं निमित्त[1] असे जी ? दृष्टिकार्य :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आवरीचें सादृश्य परीं आति : परीचें सादृश्य अवरीं आति : जेतुलजेतुलें पर प्रकाशे तेतुलतेतुलें अवर प्रकाशे[2] : मूर्ती परमेश्वरु एक घेउनि एक देति : अमूर्तीं कांहींचि नेघति : जीव आर्जकु : देवता फळदाती : चैतन्य व्यापारतें : परमेश्वरू उद्धरीता[3] : दया : मया : कृपा : करुणा हे ईश्वरींचि आति : अन्यत्र आति तें ईश्वरीं आति : ईश्वरीं आति तें अन्यत्र नाहीं : ईश्वरीचें तें सकळही नित्य :" ॥]

## ६२० दायंबा देहांतदुःख निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : दाएंबाएं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : जीवासि देहांतीं कीती दुःख होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " शतां वृश्चिकांचेया इतुली पीडा एका सर्पाची

६१८. *(प्रव. वि. २२३).
१ (प्रव. वि. १५१).
६१९. *(प्रव. वि. १२०–१२२).
१ एवा. दृष्ट. २ (प्रव. विमा. १८८). ३ (प्रव. वि. २११).
६२०. *(प्रव. विमा. १६३) आणि (प्रव. विमा. ११६–११७).

होए : शतां सर्पांची पीडा एका देहांतीं जीवासि होए : सहस्र विंचुवांची वेदना एके रोमेचां ठाइं : तें दु:ख देहांतीं जीवासि होए : जें असे तेंचि देहांतीं प्रकटे : " ।। ]

## ६२१ दाइंबा श्रीप्रभुदर्शना पाठवणे*

[ एकु दीं गोसावीयांसि उदेयांचा पूजाअवसरू जालेयांनंतरें सोंडीयेवरि पुर्वामुख आसन असे : दाइंबातें दृष्टी सुनि सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजया : एथौनि तुमतें परमेश्वरपुरा पाठवीजैल तरि जाल गा ? " दायंबाए म्हणीतलें : " जी जी : *गोसावी पाठवीति तरि मीं कैसा न वचें जी[१] ?"* मग गोसावीं माहादाइसांकरवि पांचवर्णी जाडि : चवरी : पोफळफोडणा : आर्ती : पोफळें : हे पांच ठाए आणवीले : ते गोसावीं श्रीकरीं घेउनि भीनभीन दायंबाचां हातीं दीधले : सर्वज्ञें म्हणीतलें : " हे श्रीप्रभूचेया ठाया नेया : " मग दायंबा ते घेउनि परमेश्वरपुरासि गेले : मग दायंबासि मागौते दर्शन नाहीं : ।। ]

## ६२२ माहादाइसां सर्वतोमुख वीखो निरुपणें

गोसावीं[१] माहादाइसातें म्हणीतलें : " बाइ : *माहात्मा जैसा पाणियांतुल गुंडा : वरि पाणियें भीजला : वोला दीसे : फोडौनि पाहीजे तवं आंतु कोरडा असे[२] : ऐसेया* माहात्मेयांची सेवा केली ते तुम्हीं वीखयांची[३] सेवा केली : " माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी : तें गोसावी जाणत असति कीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वीखो तो काइ एकमुखु[४] ? वीखो सर्वतोमुख कीं : कव्हणा एका इंद्रीयाचा वीखो नावडे पां : तरि काइ इतुलाचि वीखो ? माहात्मेयांपासीं जाओं आवडे : बैसों आवडे : पांहों आवडे : आइकों आवडे : तेयांचें घेओं आवडे : आपुलें देओं आवडे : हा आवघा सर्वतोमुख वीखोचि कीं : बाइ : यंत्रारुढां होइजे : तो उसिटा वीखो : वीखो तो हावभावीं भोगुं सरे : पाहा पां : बाइ : ऐसें काइ नव्हे ? " माहादाइसीं म्हणीतलें : " हां जी : तरि ऐसें गोसावीं कहीं नीरुपितिचि ना ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " हें काइ बाइ : तुम्हां

६२१. ***अगोनेपं.** प्रतीत ही लीळा नाही. **यमुहीबो.** प्रतीत आहे. 'पाठसमुदाया'तील 'आदी'त तिचा निर्देश आहे. येथे ती **मु.** प्रतीतून उद्धृत केली आहे.
१ (**हीबो.**).

६२२. १ **हीबो.** गोसावीयांसि दुसरेया नींबातळीं आसन : महदाइसांसि सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : वाएनाएकु सरलेयां माहात्मा आला होता ? " महदाइसीं म्हणीतलें : " जी : नाहीं आले : आणि वेळोवेळा लवलवा काइसया येती ? : तरि वाट पाहातां डोळे फुटति : ये वेळे नैयेति : तरि तयाचें कांहीं न वटे : " यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " तयाचें न वटे : तरि वाटे ते कवणाचें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : माहात्मेयाची सेवा केली—. २ (**दृपा.** २७ पणियांआंतुल गुंडेयाचा दृष्टांत. 'रामदेवाप्रति : **एवा.** °वरि : निरूपिला :'—**दृस्थ.**). ३ **हीबो.** °वीखयेत्वेंचि केली : माहात्मेयांचा संगु केला तो विखयेसंगुचि केला : " ४ **एवा.** एकवीध : वीखो तो अनेकवीध कीं :

वारानसीं जातां वारिजेचि ना? परमेश्वरपुरा जातां माहात्मेयांसांघातें जावें ना[5] माहात्मेयां सांघातें यावें ना : ऐसें एथौनि तुम्हां वारिजेचि ना? सीनरा प्रथम आलींति : तै जरि राहातीति[6] तरि काह्या *पाँ*[7] यांचां पाइं जातींति? एथौनि व्रीधाबाइसातें राहावीजतें[8] तें कोणा कारणें ? सतसंभवीं व्रीधाबाइसें : आणि मास-उपवासीयें : अस्त्रीयांसींचि सांघातु कीं ? ऐसांहीं राहावीजतींति तरि एथिचें नेणों केसणें वोखटें घेउनि जातींति :" ऐसें गोसावीं आवघें हातीं दीधलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "हो आणि काइ[9] ? आतां काइ एणें हातें हा हातु खांडावा :" "मेलीएं जीं : नागवलीयें जी : सरलीयें[10] जी[11] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : काइसेया मराल ? काइसेया सराल ? काइसेया नागवाल ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ अनुसरा : अनुसरलेयाचीया दोनींचि घडीया पुरति : कव्हणी एकी सामान स्त्री असे : ते जगाचे कवडे खाए : सेवटीं एकाचे[12] कवडे खाए : तो मरे : ते तयासरीसी अग्नि रीगे तरि तीएसि सतीयांचे लोक होति : तैसें बाइ : ब्रोधवंताचें जन्म वीषयेवेव्हारांतु जाए : सेवटीं परमेश्वरा सरण रीगे तरि प्रथमत्यागीयाचीये पांतीं बैसै[13] : तैसें एथ अनुसरा :" "जी जी : तें अनुसरण कैसें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथचेयां होइजे[14] : एथौनि म्हणीतलें तें कीजे : यातें अनुसरण बोलिजे :" *माहादाइसीं म्हणीतलें : "आतां कव्हणापासि अनुसरूं ? गोसावीयांचें सन्निधान तवं नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सन्निधानीं असौनि अधीनता नाहीं : यातें असन्निधानु बोलिजे : असन्निधानीं असौनि आज्ञाप्रतिपाळन करी यातें सन्निधानु बोलिजे :" "हो कां जी*[15] *:"* मग तीयें अनुसरलीं :।।

## ६२३ माहादाइसा वजीरी घडीतां पाहाणें

चौकासी वाव्य कोणीं : बाहीरिला आंगा रवणीयवरि : गोसावीयांसि आसन असे : गोसावी आंगी[1] लेइले असति : मोकळे कसे : आंगीचे[2] दोन्हीं पदर मागुतें नेउनि : पुढां आणुनि गांठि पाडिली असे : आंगीचीया[3] बाहीया वरतीया केलीया असति : स्त्रीमुगुटीं

५ **गोपं.** °एतां यावें ना : ऐसें–. ६ **मु.** एकली एतीति. **गो.** अनुसरतींति. ७ (**गोपं.**). ८ **ने.** राहाविजत होते. ९ **मु.** °हा हातु मोडला तरि काइ हा हातु मोडावा ? **हीबो.** एणें हातें हा हात हाणितला (**एवा.** मोडीला) तरि काइ ? १० **ने.** मरलियें. ११ **मुहीबो.** °म्हणौनि थोर दुख करूं लागलीं : (**मु.** सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दुख न करा :") "जी जी येतुलें जन्म वायां गेलें जी : (**हीबो.** एकीही घडी गोसावीयांचां लेखीं न लगेचि जी :"). १२ **हीबो.** °घर करी. **प्रवा.** °ते जरि सेवटीं एकाची होए तरि पतिव्रतेचे लोक होति. १३ **दृपा.** ६१. सामान्य स्त्रीएचा दृष्टांत. यावरील दार्ष्टांतिक **मु.** प्रतीत मुरारीमल्लबासांनी स्वामीच्याच मुखी घातले आहे. अर्थात, त्यांच्या मते ते स्वामींचेच असले पाहिजे. म्हणून अंतर्भूत केले आहे. १४ **मुही.** °एथ अधीना होइंजे—. १५ (**प्रव. आमा.** २४३).

**६२३.** १ **मु.** आंगिया. २ **गोनेमु.** आंगीयांचे. ३ **गोनेमु.** आंगियाचिया.

टोपरें : मोकळीं कानाउवें[४] : फुटेयाचे दोन्हीं पदर स्रीमुगुटावरि : ऐसें उतराअभिमुख गरुड आसन : डावां स्रीकरीं काळी इट : उजिवां स्रीकरीं चीपतळ : उजवीए स्रीचरणीचेनि आंगुठेन दडपुनि[५] : उजवीए स्रीकरिचीया चीपतळाकरूनि : वजीरी[६] घडिली[७] : मग दोहीं स्रीकरीं चीरेयावरि सरिसी करीत असति : आंगीचीया वरतीया बाहीया करीति : द्रीष्टी अवळोकीति : मागुती घडीति : माहादाइसीं म्हणीतलें : "नागदेया नागदेया : आरुता ए हो : गोसावी लीळा करीताति ते पाहे :" ऐसी माहादाइसां भेटि जाली : "जी जी : हें काइ कीजत असीजे ?" "बाइ : हे वजीरी[६] घडीत असीजे :" "जी जी : वजीरी[६] म्हणिजे काइ ?" "बाइ : वजीरी म्हणिजे हे वारितुरंग :" "जी जी : वारितुरंग म्हणिजे काइ ?" "बाइ : वारितुरंग एक घोडे : दीपीं असति : ते उदकावरि चालति : तैसी हे वजिरी : बाइ : उदकावरि तरंगाए म्हणौनि वारितुरंग म्हणिजे:" ।।

## ६२४ भटां सास्त्रसीधांत कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तुमतें परसीधांतु असे तो तुम्हीं जाणां ?" "ना जी : नेणों :" "हां गा : जाणां : मां नेणों कैसें म्हणत असा ?" "जी जी : गोसावी जाणवीति तरि जाणौनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "चैतन्यापर वस्तु एकि आति : चक्राक्ष देवता : तो तुमचा परसीधांतु : ऐसें जाणिजे हो[१] : [जीवप्रपंचव्यतिरिक्त सच्चिदानंदस्वरूप परमेश्वरू एकु आति : तो सर्वशक्तियुक्त :। नित्य : केवळ : अनादि अविद्यायुक्त वस्तु एकु आति : ते जीव शब्दें बोलिजे :। विश्वरूपाचिये ठाउनि मृतिकापर्यंत प्रपंचु बोलिजे :। व्यतिरिक्त म्हणिजे वेगळा :। सत् शब्दें ब्रह्म बोलिजे : चित् शब्दें माया बोलिजे : आनंद शब्दें ईश्वरू बोलिजे : ब्रह्म : माया : ईश्वरू : ऐसा त्र्यंश परमेश्वरू एकु आति :। शक्ति शब्दें सकळही देवता : सकळही गुण : सकळही धर्म : ज्ञान : विज्ञान : हे सर्व शक्तिशब्दें बोलिजेति :। युक्त म्हणिजे एतत्सहित :। सौदर्य : लावण्य : औदार्य : सौभाग्य : दया : मया : कृपा : करुणा : एवमादिक अनंत गुण बोलिजेति :। नित्यत्व : व्यापकत्व : सर्वात्मकत्व : सर्वकर्तृत्व : सर्वसाक्षित्व : एवमादिक अनंत धर्म बोलिजेति :।। ] अव्यक्त पर वस्तु एकि आति : ते वेक्तिमंत[२] होए : मग आपुलेया वेक्ताअवेक्ताचें[३] ज्ञान करी : साध्याची प्राप्ति करी : *साध्याचीए प्राप्ती*[४] साधन निवर्ते : ऐसा परसीधांत बोलिजे : पराचां अंतीं साध्य[५] एक आति :" ।।

---

४ **गो.** कानउवें. **मु.** कानावें. ५ **मु.** दाटुनि. ६ **गोही.** वजरी. **मुने.** वज्री. ७ **मु.** घडीत असति.

**६२४.** १ यापुढील 'महावाक्य' सूत्रपाठातून उद्धृत केले आहे. (**प्रव.** नवप्रकरणाचा. 'भटां परमसीद्धांत कथन : "...तो तुमचा परमसीधांत गा :" यावरि गोसावीं पाठाअर्थासहीत महावाक्य निरोपिलें :'). २ **गो.** व्येक्तिमंत. ३ °**गो.** व्येक्ता. ४ (**गोही.**). ५ **ने.** सीधि.

## ६२५ भटां माहादाइसां शास्त्रअभ्यास निरूपण*

[एक वेळ भटीं माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गोसावीं जें निरूपिलें शास्त्र तें कैसेनि चिंतवें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " परस्परें मथन कीजे : मग नूतन होए : " मग भटीं म्हणीतलें : " जी जी : नूतन काइसेनि होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : स्वोक्ति : शास्त्रोक्ति : लोकोक्ति : इया तीनि उक्ति परित्यजौनि एथीचिया व्युत्पत्ति-व्युत्पन्नां होआवें :" " हो कां जी :" भटीं म्हणीतलें : "जी जी : जैसीं येरें शास्त्रें : एक वेळ बरवीं आवर्तीलीयां धरितीं : आणि मनीं राहातीं : ते केव्हळांहीं वीसरेजेति ना : तैसें हें नव्हे : वेळोवेळां मनन कीजे परि हें न धरे : तें कां पां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : हें अध्रीत शास्त्र कीं गा : हें होउनि कव्हणाचें घर न रीगे : आपणचि याचें घर रिगीजे : एया आपणपें दीजे तरि हें आपणपें दे : घेइजे घोकीजे मग काळेंकरौनि उपयोगा जाये : ऐसां जरि नुमटे तरि आतांचें तवं ऐसें घेपे : पाठीं अनुभवें जाणाल : म्हणौनि हें वचन : हा वचनार्थु : वचन जावों नेदीजे : हें शास्त्र जो अभ्यासी : मनन करी : निदिध्यासन करी : व्याख्यान करी : तेणें तेथ काकु कक्षा भावार्थ प्रकरण जाणावें :। नेणे तरि आनाचें आन बुझैल : तेणें अज्ञान न वचे :"

यावरि भटीं म्हणीतलें : " जी जी : ऐसा परमेश्वरधर्म जरि अविद्याचां महारवाडां एकाधेयापासीं असे : आणि अन्यत्र कव्हणा ठाइं न वर्ते तरि काइ करावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेया : हा धर्म अन्यत्र न वर्ते तरि महारवाडांहुनि धर्मु काढावा : परि महारवाडा ऐसें होआवें नाहीं :" "हो कां जी :" ऐसें गोसावीं नीरूपीलें : ते माहादाइसीं घोकीलें : मग भट माहादाइसें श्रीचरणां लागलीं : ।।]

## ६२६ शास्त्रकथन निरूपण*

[बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ माहादाइसीं पुसीलें : " जी जी : गोसावीयांचां असन्निधानीं असतां कव्हणी एकु अनुकुळ जनु आमतें शास्त्र पुसतील : तरि हें कव्हणां-प्रति बोलावें आणि कव्हणांप्रति न बोलावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें शास्त्र आर्त्ताप्रति बोलावें : आर्त नसे ऐसें असे तरि लोहें पाणी गिळीलें ऐसें होउनि असावें : परि सर्वथा बोलावें नाहीं : " " हो कां जी :" माहादाइसीं म्हणीतलें : "जी जी : आर्ति नसे तो शास्त्राचें आणिका कां पां नेघे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : जो जें होउनि असे तो तेंचि बोले : मां तो काइ आणिकाचें घेइल ? ऐसांहि जो तयाप्रति बोले तया कथन होए : कां ताप पावे :" " हो कां जी : "।।]

---

६२५. *(प्रव. आ. १४०–१४९).

६२६. *(प्रव. आ. १९८–२००).

## ६२७ संखराचार्या वरप्रदान*

गोसावीयांसि बेलोपूरीं अवस्थान : माहादाइसीं[१] गोसावीयांतें पूसिलें : "जी जी : सन्यासीयासि सीखासूत्र नाहीं : संध्यास्नान नाहीं : कह्मणीचि कर्म नाहीं : आणि यांसि लोकीं एसनी काइसी मान्यता ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "संखराचार्यें श्रीदतात्रयप्रभूतें वीनवीलें : 'जी जी : म्यां दर्सन केलें असे : तें लोकीं मान्य होआवें :' श्रीदतात्रयप्रभू म्हणीतलें : 'होइल :' " ॥

## ६२८ देहदमनीं भटांनाथोबां वैजात्य*

[बेलोपुरीं अवस्थान : एक वेळ गोसावीं देहदमनाचें नीरोपण केलें : मग नाथोबाएं पुसिलें : "जी जी : देहदमन कवणा पुरुषाचेनि होववें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "उचित प्राप्त इंद्रियार्थरसु सेविलेयां न विकरे तयाचेनि देहदमन होववें :" नाथोबाएं म्हणीतलें : "जी जी : माझेनि होववैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : तुम्हीं भाजिएचिया सिया जाल : वानरेंशु रस पीति आणि उडौनि जाति :" ॥]

## ६२९ विकल्पे प्रतिदेहानुवादु*

[बेलोपुरीं अवस्थान : महदाइसीं पुसिलें : "जी जी : निर्विकल्प जोगी प्रसंसीला : तरि विकल्पें काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : विकल्पु आति तेयासि प्रतिदेहो आति :" "जी जी : प्रतिदेह निवर्त्तलेयां काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "प्रतिदेहापासौनि निवर्त्तलेयां मग अतिवाहिकें फळासि नेति : *युग पुरे तवं अवगळा असे*[१] :" ॥]

## ६३० परमेश्वर : ब्रम्हविद्या अमूर्त निरूपण*

[[१]बेलोपुरीं अवस्थान : एकु दीं भटीं पुसिलें : "जी जी : जेंचि देवाचिया माता-पितरा तेंचि भक्ताचिया : ऐसें गोसावीं बोलिले : तरि अनंत अवतार : तयाचे अनंत भक्त : तयाचीं अनंत मातापितरें असति : आणि एकएकी अवताराचे अनंत भक्त असति : तयांसि एके वेळे कैसें फळ देति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : परमेश्वरु अमुर्त : ब्रह्मविद्या अमुर्त : परमेश्वरप्राप्ति फलरूप अमुर्त :" ]

---

६२७. *सैह्याद्रि (श्रीदत्तात्रय) चरित्रातील ही लीळा 'बेलोपूर'ची असल्यामुळे येथे घेतली आहे.
१ **यमु.** म्हाइंभटीं.

६२८. *(**प्रव. वि.** २३७).

६२९. *(**प्रव. विमा.** ११८–११९).
१ (**विमा.** १७०).

६३०. *(**प्रव. आमा.** १५६).
१ रामेश्वरबा°.

## ६३१ प्रतिक्षणि त्यागानुवादु*

[ [1]बेलोपुरीं अवस्थान : भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीं त्याग संन्यास निरोपिला : तो एका देहपर्यंत पाळे : एका न पाळे : तरि तो अनुसरलेयां त्यागीयांमाजि घालुं एइल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति गा वानरेया : प्रतिक्षणि प्रतिक्षणि त्यागु : म्हणौनि विखो सेवुनि सेवटीं परमेश्वरासि शरण रीगे तरि प्रथमत्यागीयाचीए पांतीं बैसे :" "हो कां जी :" ।। ]

## ६३२ भलतैसा भलेतेथ परमेश्वरु एकु*

[ [1]भटीं पुसिलें : "जी जी : विकारविकल्पशून्य स्वभावमात्रें निरालंबी देवतास्मरणें जो जन्म क्षेपी तेयासि परमेश्वरु पुनरपि आपुला संबंध देती : तरि परमेश्वरु एक असतां बहुत्व तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : भलेतैसा भलेतेथ भलेतेयापरी परमेश्वरु एकु आति :" "हो कां जी :" ।। ]

## ६३३ ज्ञान : ध्यान : भजन ईश्वरींचि*

[ [1]भटीं पुसिलें : "जी जी : या जीवाचें ज्ञान : ध्यान : भजन : तें कव्हणी ठाइं समावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ज्ञान : ध्यान : भजन : हें ईश्वरींचि आति :" "हो कां जी :" ।। ]

## ६३४ जीवां देवतां परस्परदर्शन*

[ बेलोपुरीं अवस्थान : माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : देवता जीवासि काइसेनि देखति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवतेचें मळाधार ज्ञान : आपुलीया मळातें जीव म्हणति :" "जी जी : जीवासि देवतेचें दर्शन आति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति : बाइ :" "तें काइसेन जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "विद्येतव पिंडस्त प्रकाशे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवतेचा जैसा वर्ण : जैसीं वस्त्रें : जेतुलीया भुजा : जैसीं आयुधें : तैसी प्रकाशे :" "जी जी : कर्मलेप काइ जी देखति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवतेसि कर्मलेपाचें ज्ञान :" "तरि काइ जी सकळहीं देखति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देवतेसि आपणया खालौतें अपरोक्ष :" "हो कां जी :" ।। ]

---

६३१. *(प्रव. आमा. २४७).
१ आम्नाय पाठ°.
६३२. *(प्रव. आमा. २४८).
१ आम्नाय पाठ°.
६३३. *(प्रव. आमा. २४९).
१ आम्नाय पाठ°.
६३४. *(प्रव. विमा. ९६–९९).

## ६३५ जीवसंलग्नानुवादु*

[ बेलोपुरीं अवस्थान : माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : जीवीं संलग्न कैसें असे ? तथा जीव संलग्न दोन्ही कैसीं असति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीवाचें मुख मागां : संलग्नाचें मुख पुढां : बाइ : येरयेरां विमुखें असेति : परमेश्वरू जेव्हेळी जीवासि ज्ञान देति तेव्हेळीं दोन्ही सन्मुख करीति : मग दोहींसि विद्या देति :" माहादाइसीं म्हणीतलें : "दोहींसि एकीचि विद्या देति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ना बाइ : चैतन्यासि चैतन्यविद्या : जीवासि ब्रह्मविद्या : चैतन्यविद्या तो चैतन्याचा मोक्षमार्गु : ब्रह्मविद्या तो जीवाचा मोक्षमार्गु : *केवळ केवळेसीं साजात्य*[1] *:* चैतन्य चैतन्यातें अनुभवी बाइ :" "जी जी : तें कैसें अनुभवी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीवासंलग्नाचें भेटें ब्रह्मविद्येवांचौनि न फिटे : *इंद्रिया मनातें चेष्टविता आत्मा : सकळाहीं प्रकृतीतें चेष्टविता परमात्मा*[2] *:* जीवाचां मोक्षीं चैतन्या मोक्ष। सकळाही विद्या चैतन्यादिभावें : ब्रह्मविद्या जीवादिभावें : परि ते मागिलाकडौनि उल्लेखीउल्लेख करीतिचि असे :" "हो कां जी : तरि चैतन्यविद्ये फळ कोठें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सकळांही विद्यांचीं साधनें एथ : साध्य ब्रह्मांडीं : ब्रह्मविद्येचें साध्यसाधन एथचि :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

## ६३६ आतां तुम्हां नवेया संबंधु*

[ बेलोपुरीं अवस्थान : महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : आतां गोसावी आम्हांसि असंबंधु देवों पांताति : तरि आतां संबंधु आम्हां कै देतील ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हां आतां नवेयां संबंधु :" "जी जी : तो कैसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सुखिया श्रीमंताचां घरीं बरवें पुरुष देह देउनि जन्मवीजैल : मग बारा वरुषां संबंधु दीजैल :" "हो कां जी : तरि तो संबंधु आणि हा संबंधु काइ सारीखाचि कीं अनसारीखा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : साधनापसि साध्य उत्तम :" ।। ]

## ६३७ भटां लग्नघडी अनुवादु : तथा रुदन नीक्षेद*

[ मग भट कोण्हीकडे काहीं आपजौं जात होते : तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : आतां काइसेंया जाल गा ? आतां जालें नव्हे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : लग्नघडी

---

**६३५.** *(**प्रव. विमा.** १९२–१९६).

१ (**विमा.** १९७). २ (**विमा.** १९८). या दोन्ही वचनांचा **प्रव.** उपलब्ध नाही. मी ती वचने येथे घातली आहेत.

**६३६.** *(**प्रव. विमा.** १३९–१४०).

**६३७.** ***अगोयमुने.** प्रतीत ही लीळा नाही. **हीबी.** प्रतीत 'रुदन निषेध', 'भटां निरूपण' अशा दोन लीळांत हीच लीळा आलेली आहे. इतर अनेक पोथ्यांत ती आहे. **आमा.** १५४ व १५५ या वचनांच्या

वर्तत असे गा : वाटे एत असति : यातें सांडुं नको :" इतुकेन भटीं उभयांचि देह घातलें : आटासु माडीला : गडबडां लोळों लागलें : गोसावीं हातीं धरुनि उठवीलें : भीतरि देउळाआंतु नेलें : तयासि नीरूपण करूनि काठीन्यें आणीलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "संबंधीं असंबंध : असंबंधीं संबंध : वीयोगीं योग आणि योगीं वीयोग : दर्शनीं अदर्शन : अदर्शनीं दर्शन : सन्निधानीं असन्निधान : असन्निधानीं सन्निधान :" ऐसें नीरूपणें काठीन्यें आणीलें : भट रडों लागलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " रडीजे ना कीं गा : रडीलेयां काजळी पडे : उहीपुही वीवेक मालवे : असतया ज्ञानाचा अभाव होए : रडीजे ना कीं गा वानरेया : वचनरूप परमेश्वर तो तुम्हांजवळीचि असे कीं गा : तुम्हीं धीरवीरां होआवें :" मग भटीं दुख आवरीलें : ।। ]

## ६३८ मलैसामध्यें अवतरण[१]

गोसावीं आउसातें म्हणीतलें : "आतां हें मलैसांमध्यें[२] असैल : उतरापथें[३] गमन : तयांचेयां बाजांसुपवतीयांवरि निद्रा कीजैल[४] :" तवं आउसीं म्हणीतलें : "जी जी स्वामी जगंनाथा : तैसें न कीजो जी[५] :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरे हो : एणें काइ तुमचेंचि करावें ? अनंता जीवांचीया सातरीया पडलीया[६] असति : तयांतें उठवीता[७] काइ आणिकु देओ असे ?" ।।

## ६३९ राजेया अव्हानीं आउप्रति उतर देणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएका : एथ रायाचा हाकारा एइल : आतां रायाची दांडी पडवा एइल : दांडीए बैसौनि तेथ जाइजैल :" आणि आउसीं म्हणीतलें : "जी जी : येओ[१] कां जी स्वामी जगंनाथा : तरि आम्हीं आपुलेया स्वामिपुढें खडखड करीतें

---

**प्रव.** मध्येही ती आहे. 'पाठ समुदाया 'त 'तथा लग्नघडी अनुवादु' ही 'आदि ' सर्वत्र आढळते. म्हणून ती संहितेत अंतर्भूत केली आहे. एका जुन्या पोथीतून ती येथे घेतली असून **हीबी.** प्रतींच्या साह्याने संपादन केली आहे.

**६३८.** १ ही लीळा व यापुढील 'दांडीए आरोहण : बीजें करणें ' ही लीळा—या दोन्ही लीळा मिळून 'मलैसा (म्लेंसा) मध्यें अवतरण ' ही एकच लीळा **अगोने.** प्रतीत आहे. अन्य काही पोथ्यांत आढळतात त्याप्रमाणे विषयव्यवस्थेच्या दृष्टीने, या एकाच लीळेच्या दोन लीळा करून संहितेत छापल्या आहेत. **यमु.** प्रतीत, ही लीळा नाही. **हीबी.** मध्ये या लीळेचा पूर्वार्ध (येथे छापलेली ६३८ वी लीळा) 'आउ म्लेंछावतारू कथन ' या आदीने आढळतो. पाठाच्या पोथ्यातील 'आद्या ' तही 'आउ म्लेंछावतारू कथन ' ही 'आदि ' सर्वत्र आढळते. २ **नेबी.** म्लेंछामध्यें. ३ **ने.** °पंथें. ४ **हीबी.** °तयाचेयासारीखें बोलिजैल : . . . . तयाचे आहारव्येव्हार स्वीकरीजति : . . . . तयाप्रति ज्ञान नीरोपीजैल :" ५ **हीबी.** °तेथ न वचावें की : ते वोखटे जी :" ६ **ने.** पसरलीया. ७ **एवा.** उधरीता.

**६३९.** १ **गो.** यो.

खोलतें जाउनि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरे हो : तैसें नव्हे कीं नाएका : ते ऐसें नेती आणि ऐसें लोटितील[२] :" आउसीं म्हणीतलें : "जी जी स्वामी जगंनाथा : आतां आम्हांसि कवणि गति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तुम्हांसि गोवींदीं गति कीं नाएका :" ।।

## ६४० दांडीए आरोहण : बीजें करणें

तवं दांडी आली[१] : बाहीरवाहीरे[२] भांगुसीए[३] चालवीलें : मग रायें बोलाउं पाठवीलें : भट दांडीएचा कोंब[४] धरुनि नीगाले : भटीं म्हणीतलें : "जी जी : प्रवृति भंगिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "राओ बोलवील[५] तरि भंगिजैल :" मग[६] रायापासी दांडी नेली : तवं गोसावीयांचीए स्रीचरणिचा आंगुठा देखिला : "कैसा जोगीया बरवा !" भटीं म्हणीतलें : "जी जी[७] : बोलिजो जी :" तवं एरें चांडाळें म्हणीतलें : "हाण हाण यातें :" तवं भटातें कांबी हाणितलें : इतुकेनि भट नीगों बैसलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : नावेक राहा गा : मग आश्चर्य एक देखाल : आणि पुन:संबंधु देइजैल[८] :" भटीं म्हणीतलें : "ना जी[९] : मज राहावे ना :" म्हणौनि भट नीगाले[१०] : ।।

## ६४१ हा होय : हा नव्हे : म्हणणें*

[मग दांडी : घाटाखालि तळें : तया नांव हातियाळें : जातां उजवेया हाता : पसीमीली पाळी : तेथ उतरीली : तेथ दांडीएखालि उतरले : शस्त्रधर उभे राहिले : अमरा : गांगा : मैळा : "हा होए : हा नव्हे : हा अमरा नव्हे : हा गांगा नव्हे : हा मैळा

---

२ **गो.** लोटीती.

**६४०.** १ मी पाहिलेल्या **दधन.** प्रतीत (श्रीचक्रधरचरित्र—कोलते, पा. ३२० पाहा) **'दांडीए अरूहण'** ही स्वतंत्र लीळा आहे. ती पुढीलप्रमाणे : 'तवं रायाची दांडी आली : मग गोसावी दांडिवरि बैसले : सरीसे भटोबास नीगाले : वीळिचेया पहारा एका दांडी खोंकरासि घेउनि गेले : तेथ वसति जाली : गावीचां लोकीं कणीक : तांदुळ : तूप : ऐसें आणीलें : मग भटोबासीं रंधन केलें : गोसावीयांतें आरोगणा दीधली : मग पहुडु ।। एकी वासना : गोसावीयासि आरोगणा नाहीं जाली : उदीयांचि केली होती तेचि आरोगणा : । मग गोसावीं बीजें केलें :।।' यानंतर **'राजनीति बीजें करणें :'** या आदीची दुसरी लीळा असून तिचा आरंभीचा भाग पुढीलप्रमाणे : 'मग उदीयांचि दांडिएवरि आसन जालें : दांडियेवरि झळंबू घातला : बाहीरवाहीरी दांडी भांगसीए नेली—' (या दोन्ही लीळा **पं.** प्रतीतही आहेत). २ **गोने.** °वाहीरि. ३ **गोने.** भागुसीए. ४ **गोने.** कोंभ. ५ **अने.** बोलावील. ६ **दधनपं.** मग दांडी कीर्तिखांबापासी नेली : तेथ राओ आला :. . . ७ **दधनपं.** °प्रवृत्ति भंगिजो जी. ८ **गो.** होइल. ९ **दधनपं.** °हें मज पाहावें ना : देखवें ना. १० **दधनपं.** °मग रायें म्हणीतलें : "दांडी घेउनि जा : ओखटें करा :" मग दांडी नेली :।।

**६४१.** ***रायापाशी दांडी नेल्यानंतर भट तेथून निघून गेले. मग पुढे काय घडले यासंबंधीचा वृत्तांत अगोनेहीबीपं.** यांपैकी कोणत्याच पोथीत नाही. 'दांडीए आरोहण' आणि 'घाटीं पाल्हा

होए : " मग मैळेनि खर्ग प्रजिलें : हाक देउनि उभा राहिला : खर्ग घातलें : श्रीकमळ एरीकडे पडिलें : श्रीमूर्ति एरीकडे पडिली : मग आवघा जन प्रतला : तवं तेथ नाथपंथीये जोगी बैसले होते : तया तळेयाचीये पाळी बैसले होते : तेहीं देखिलें : श्रीकमळ एकीकडुनि चालीलें : श्रीमूर्ति एकीकडुनि चालिली : आणि दोन्हीं जडलीं : मिळालीं : आणि उठूनि आसन जालें : मग तेणेंचि घाटें बीजें केलें : आणि तिहीं जोगीं म्हणितलें : " सीधु रे सीधु : " म्हणौनि बोवाइले : सींगीनादु दीधला : एक म्हणति तया तळयाचिए पाळी तया जोगियांचिया कोपटिया होतिया[१] : ॥]

## ६४२ महादेओपुर घाटीं पाल्हा डांगीया भेटि*

घाटीं पाल्हा डांगिया भेटला : तेणें गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : मग पुसिलें : "जी जी : मियां गोसावीयांवरि ऐसौनि ऐसें आइकीलें : तें साच जी ?"

---

डांगीया भेटि ' या दोन्ही लीळा वाचल्या म्हणजे तो वृत्तांत या लीळांमध्ये असलाच पाहिजे असे स्पष्टपणे जाणवते. अर्थात, दांडी नेल्यावर, राजाने 'ओखटे करा' असे सांगितल्यानंतर आणि गोसावीयांची व पाल्हा डांगीया यांची भेट होण्यापूर्वीच्या वृत्तांताची लीळा येथे अपरिहार्यतेने असलीच पाहिजे हे उघड दिसते. हा वृत्तांत देणारी लीळा मी पाहिलेल्या **दधन.** प्रतीत आहे. ती या ठिकाणी चरित्राच्या सुसंगतीच्या दृष्टीने अपरिहार्य आहे. 'पाल्हा डांगीया भेटि ' या लीळेतील 'तुम्ही आइकिलें तें साच : आणि देखिले तेंहीं साच : म्हणौनि श्रीकंठाकडे रेघ दाखवीली : रांवयाचीये चांचुसारिखी : ' या वाक्यावरून **दधन.** प्रतीतील वृत्तांताला पुष्टीच मिळते. म्हणून **दधन.** प्रतीतील ही लीळा संहितेत अंतर्भूत केली आहे. इतर प्रतीत ही लीळा गाळण्याचे कारण, पुढे पान ७५० वरील 'हीराइ यूक्ति' ही लीळा पाहा.

१ यानंतर आणखी एक लीळा या प्रतीत आढळते. ती पुढीलप्रमाणे :

**अदृष्ट भये उठवीले** ॥ गोसावीं बीजें केलें : तवं नगरामध्यें आंधें पडीलें : अंधकारू पडीला : गाइ चार वर्जिले : लेंकरूवीं स्थनें वरजीलीं : पाखरूइं चारे वर्जिले : वीवसीया उठलीया : घूया बोबाति : भालुवा भुकति : धेनु हंबरडा हाणति : रावो भयाचकीतु जाला : ऐसा सात दीस नगरामध्यें आंदोळ वर्तला : एकी वासना : दीस तीनि : रायें म्हणितलें : "आम्हीं थोर वोखटें केलें : ईश्वरपात्रीं क्रिया वीसंवली : " ॥ (हा वृत्तांत पौराणिक स्वरूपाचा आहे. त्यामुळे ही लीळा निश्चित प्रक्षिप्त असावी).

**६४२.** *'म्लेसामध्यें अवतरण' (मागे लीळा. ६३८ पाहा) या लीळेनंतर **अगोने.** प्रतीत 'महादेओपुर घाटीं पाल्हा डांगिया भेटि' या लीळेची नुसती 'आदी' आहे. लीळा नाही. (**यमु.** प्रतीत 'आदी' ही नाही) ही लीळा **हीबी.** प्रतीतून येथे घेतली आहे. **पंदधन.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे आहे :

**घाटीं पाल्हे डांगिया भेटि** ॥ गोसावी घाट वेंघताति : तवं पैलाकडुनि पाल्हा डांगिया आला : तेणें गोसावीयांतें देखीलें : आणि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : मग वीनवीलें : " जी जी : आम्हीं ऐसौनि ऐसें वोखटें आइकीलें जी : तो मी धांवतु आलां जी : " ऐसें सांगे : तेवीचि अस्वपातीं देखे ना : कंठु दाटला : तेणें कांहीं सब्द नीगे ना : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तें साच गा : हें नव्हे सस्त्र घातलें : वोखटें केलें : " म्हणौनि गोसावीं श्रीकंठु दाखवीला : तै श्रीकंठीं रेघ तैसीचि : तेणें देखीलें : मग म्हणीतलें :

सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं आइकीलें तें साच : आणि देखिलें तेंहीं साच :" म्हणौनि श्रीकंठाकडे रेघ दाखवीली : रांवयाचीये चांचुसारीखी : तेणें म्हणीतलें : "जी जी : ते पापीये चांडाळ : ईश्वरीं काइ छेदभेद असति ?" मग दंडवत करूनि नीगाला : मग गोसावीं बीजें केलें : ।।

## ६४३ पुनरपि सारंगपंडितां भेटि*

[गोसावी घाटाचां माथांहुनि प्रतले : मग प्रतेस्थानासि बीजें केलें : तीये दीसीं सोमवारी आणि सुर्यपर्व : गोसावी लोणारखांडीहुनि प्रयागखांडी निगाले : तवं पैलाकडौनि सारंगपंडीत येताति : गोसावीयांतें देखीलें : आणि आडपालौ केला : आणि गोसावीं पाचारिलें : "हें काइ गा पांडेया : यातें देखौनि आडपालव करौनि कैसे नीगालेति ?" "ना जी : देखीलें नाहीं जी :" गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : "जी जी : केव्हेळि बीजें केलें ?" "हें नव्हे : आतांचि :" मग गोसावीं आवघी व्येवस्ता सांघीतली : मग गोसावीयांतें वीनवीलें : "जी जी : गोसावीं आवारासि बीजें करावें जी : तवं मीं स्नान करुनि येइन जी :" मग स्नान करावेया गेलें : मग गोसावीं बीजें केलें : तवं ते स्नान

---

"आरे आरे पापिए हो : ऐसें काइ केलें : या राष्टरासि वोखटें असे : जी जी : आतां कवणीकडे बीजें कीजैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां हें उतरापथें बीजें करील :"

**हीबी.** प्रतीत 'घाटीं पाल्हा डांगीया भेटि' या लीळेनंतर पुढील लीळा आढळते : **भटां अवस्था प्रकटणें** : ।। तवं भट तेथ आले : त्यापुढां जोगीं सांघीतलें : "साक्षात गोरक्षु : पुरुखीं उठवीलें :" तवं पाल्हा डांगिया भेटला : तेणें सांघीतलें : "मज गोसावी घाटीं भेटले :" इतुकेन भटीं घाटु चढतां तांबोळ देखीलें : भटीं म्हणीतलें : "हें तांबोळ गोसावीयांचें होए :" म्हणौनि घेतलें : नमस्करीलें : मग भटांसि अवस्था प्रगटली : साउमे जात असति तवं परिश्रयो देखीला : चालतां डोळेयां धारा लागलीया : वाट भुलले : मग आभैचा घाटुवरि गेले : मग भटीं म्हणीतलें : "गोसावी श्रीप्रभुची चिंता करीत होते : तरि गोसावी रीधपुरासि बीजें केलें असैल :" मग दुखक्रांत रीधपुरासि आले : तेथ गोसावीयातें न देखती : मग अवस्था प्रगटली : मग भानखेडेयासि आले : ।।

**६४३. *अगोने.** प्रतीत ही लीळा पुढीलप्रमाणे आहे : **सुर्यपर्वी सारंगपंडितां पौळीसि भेटि ।।** बीजें केलेयावरि प्रागखांडीचीए पौळीसी भेटि दीधली : "जी जी : गोसावीं केव्हळि बीजें केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें आतांचि आलें :" सारंगपंडितीं म्हणीतलें : "आवारासि बीजें करावें : तवं मी पर्व सारुनि येतु असे :" मागुती आले तवं भेटि नव्हेचि : एक म्हणति हे संन्यधानपर ।।

ही लीळा वरील सर्व प्रतींत पैठण येथील अवस्थानात घातली आहे. पण 'बीजें केलेयावरि' या आरंभीच्या शब्दावरून ती शेवटच्या प्रकरणानंतरची लीळा असावी, असे दिसते. एका वासनेप्रमाणे ती सन्निधानीची लीळा होय. **य.** प्रतीत ती सन्निधानीची म्हणूनच दिली आहे. पण **मु.** प्रतीत मुरारीमल्लबासांनीही ती शेवटच्या प्रकरणानंतर घेतली आहे. ते मत मान्य करून मी ही लीळा येथे घेतली आहे. **अगोनेमु.** प्रतीतील लीळेत उमाइसाचा वृत्तांत आलेला नाही. **हीबी.** प्रतीत तो आढळतो. इतर काही पोथ्यांतही आढळतो. म्हणून **हीबी.** प्रतीवरून ही लीळा येथे उद्धृत केली आहे.

करुनि आले : उमाइसांतें पुसिलें : "गोसावी कें असति ?" उमाइसीं म्हणीतलें : "कैसें गोसावी कें असति ?" सारंगपंडितीं म्हणीतलें : "कैसें गोसावी कें असति ? मज गोसावी मघा भेटलें :" मियां म्हणीतलें : "जी जी : गोसावी आवारासि बीजें करावें तवं मीं स्नान करुनि येइन :" उमाइसीं म्हणीतलें : "आहा पापिये हो : गोसावीयांतें कैसे विसंबलेंति ? सवेंचि गोसावीयांतें घेउनि न याचि : स्नानेंवीन तुमचें काहीं राहिलें होतें ?" मग उमाइसीं थोर दुख केलें : तिये दीसीं अन्न नाहीं : उदक नाहीं : तैसीचि पाठि घातली : ।।

## ६४४ वींझीं चाटेया भेटि

गोसावीं नीमीत्यें एकें उतरापथें बीजें केलें : वींझेया डोंगराचा घाटु चढलें : मग गोसावी घाटाचेया माथेयावरि ठावंठीकु बीजें करिताति : तवं गंगातीउरिचे[१] चाटे गुजराते कापड वीकुं गेले होते : ते भेटलें : ते माहादाइसांचें भाचे[२] : माथां भेटि जाली : तीं गोसावीयांवरि वार्ता आइकीली होती : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : स्रीचरणां लागले : स्रीमुर्ति आवळोकीत[३] उभे राहीले[४] : तवं गोसावीयांची बरवी चांपेगौरा स्रीमुर्ति : स्रीकंठीं फुलांची माळ : ऐसें देखिलें : मां पुसिलें : "जी जी : आम्हीं गोसावीयांवरि ऐसेनि ऐसें आइकीलें तें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आइकीजे तें साच : कीं देखिजे तें साच ?" "जी जी : देखिजे तें साच :" मग तींहीं पुसिलें : "गोसावी एथ एकले : भक्तजन देखों ना जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तीयें एणेंवीण जीआलीं असति ?" त्यां दीसीं तेथचि राहीले : मग तीहीं गोसावीयांतें वीनवीलें : "*जी जी : आजि येथचि राहिजो जी*[५] :" गोसावीं वीनवणी स्वीकरिली : अर्ध लुगडीं गोसावीयांखालि आंथुरिलीं : अर्ध पांगुरविलीं : चाटां म्हणीतलें : "जी जी : गोसावीयांचे भगतजन गोसावीयांतें पुसती तरि काए सांघावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें पुसत होतें हें सांघावें :" "जी जी :" म्हणौनि स्रीचरणां लागलें : गंगातीउरासि[६] आले[७] : भक्तजनांपुढां सांघीतलें : "गोसावीं

---

या लीळेनंतर **दधनपं.** प्रतीत पुढील दोन लीळा आहेत :

**पुरी महादेओराया भेटि** ।। मग गोसावीं पुरासि बीजें केलें : तेथ रामनाएकु ब्राह्मणु : तयाचां घरीं माहादेओराओ जन्मला होता : तयासि दरीसन दीधलें : कृपादृष्टी अवलोकीला : मग बीजें केलें : ।।

**परमेश्वरपुरीं श्रीप्रभु भेटि** ।।

मग परमेश्वरपुरासि बीजें केलें : बेलौरमार्गीं गौळणीचेया वडातळीं श्रीप्रभु खेळ करीत असति : तवं आमचां गोसावीं बीजें केलें : मग दोहीं देवां क्षेमालिंगन जालें : मग श्रीप्रभुगोसावीं म्हणीतलें : "आवो मेला जाए : जाए म्हणे :" तैसेंचि आमचां गोसावीं बीजें केलें : ।।

या लीळांनंतर वरील पोथ्यांत अनुक्रमे **भटा अवस्था प्रकटणें ।। वींझीं चाटेया भेटि ।। उजनीए अवस्थान ।।** या लीळा आल्या आहेत.

**६४४.** १ **गोने.** °तीरीचे. २ **गो.** भासे. ३ **ने.** पुढां. ४ **गो.** जाले. ५ (**होबी.**). ६ **गोने.** °तीरा. ७ **होबी.** (**एवा.**) तेहीं गोसावीयांसि देशासि चालवावें म्हणौनि तडवेयाआंतु पहुडु जाला : दोहींकडे

तुम्हांसि नीरोपु सांघीतला असे : 'तीयें एणें वीण जीआलीं असति : आणि हें पुसत होतें :' ऐसें सांघावें :" ।।

## ६४५ उजनीए अवस्थान

गोसावीं उजनीय बीजें केलें : तेथ गोसावीयांसि जीवउधरणासि प्रवृति जाली : तवं गंगातीउरिचे चाटे उजनीएसि कापड घेओं जाति : तीहीं गोसावीयांतें मलैसांमध्यें राज्य करितां देखिलें : गोसावी भेटले म्हणौनि मागुतें भक्तजनांपुढां सांघीतलें : 'उजनीए गोसावी[1] देखिले :' म्हणौनि : भक्तजनीं म्हणीतलें : "भटो : आम्हीं गोसावीयांपासीं जाउनि ?" भटीं म्हणीतलें : "हां गा : तुम्हीं जाओं म्हणां : मां मज काइ न वचवे ? पींसेयासि पींपळु[2] दुरि ? काइ माझेयास्तव[3] उजनीए न वचवे ? परि गोसावीं मातें वर्जिलें : सर्वज्ञें म्हणीतलें : 'वानरेया : नवेयां भेटि[4] :' मां आतां जरि उजनीए गेलों तऱ्हीं काइ गा गोसावीयांसि भेटि होते ? ते तरि ब्रम्हवाचा : मां आतां उजनीए जाउनि काइ करुं गा ?" मग थोर दुख जालें : मग भटोबासीं म्हणितलें : "आतां असंनिधानीं सर्वज्ञें म्हणीतलें तें करावें : आणि[5] खडवीध दुख जो करील तेयासि गोसावी भेटती :" ।। बेलोपुर चरीत्रें : उतरार्ध चरीत्रें समाप्त : ।।

---

आपण नीजैले : मध्यें गोसावी नीजैले : मग त्यांसि नीजैलेयाचि सांडिले : मग गोसावीं बीजें केलें :

**६४५.** १ **गो.** °राज्य करीत. २ **नेहीबी.** पिंपळगाव. ३ **ही.** माझेयावस्तु. ४ **ही.** संबंधु. **ने.** °ते तरि ब्रम्हवाचा. ५ **ही.** °वीधि जो जोडील त्यांसि श्रीचक्रधरू होइल.

✾ ✾

# अज्ञात लीळा

## श्रीकृष्णचरित्र

### १ श्रीकृष्ण अवतार निरूपण

माहादाइसीं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णु अवतारू तो कैसा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णु अवतारू तो गर्भीचा[1] : *देवकादेवीचां गर्भीं वसुदेवाचां ठाइं मथुरेसि श्रीकृष्णचक्रवर्ति गोसावी अवतरले : गोकुळीं यश्वदेचां ठाइं वाढिनले*[2] *:* " ॥

### २ मुखामाजि विश्व दाखवणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीकृष्णचक्रवर्ति उपजतक्षेवो जांभै दीधली : मुखामाजि वीस्व दाखविलें : *तें देखौनि देविका आउसें भियाली*[1] *:* देविका आउसीं मुखावरि हातु दीधला : 'लेंकरूं सामान्य नव्हे :' ॥

तैसेंचि दुसरेन : बळभद्रदेवो आणि श्रीकृष्णचक्रवर्ति खेळत होते : तवं बळभद्रदेवीं म्हणीतलें : 'आवो आवो यश्वदे : हा कृष्णु मृतीका भक्षीतु असे :' यश्वदा म्हणीतलें : 'हा कृष्णा ? आ करी पां :' आ केला : मुखामाजि वीश्व दाखवीलें : तीहीं म्हणीतलें : 'लेंकरूं सामान्य नव्हे :' मुखावरि हातु दीधला[2] : " ॥

### ३ रकूमीणी अवस्था श्रवण

माहादाइसें पुराण आइकौनि आलीं : मग गोसावीयांसि पुसिलें : "जी जी : श्रीकृस्णचक्रव्रतीन येकलेयां कां बीजें केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*बाइ : द्वारकेहुनि नागारी कौंडण्यापुरासि आले : तेहीं श्रीकृष्णचक्रवर्त्ती वानिले : आणि रुक्मिणीदेवीसि अवस्था भरली : मग तेहीं सुदेवो ब्राह्मणु पाठवीला*[1] *:* श्रीकृष्णचक्रव्रतीन सुदेवातें पूसिलें : 'तुम्हीं नीगालेति तेव्हळि रकूमीणीसि कैसी[2] अवस्था असे ?' 'जी जी : मीं

---

१. १ पं. °वसूदेवो पीता : देवकी माता :॥ २ (भ.).

२. १ (मु.). २ (भ.).

३. १ (भग.). २ रावा. कैसा अवस्वरू असे ?

दासी : अनूर्धा वाढतें म्हणौनि वाण घेउनि आलों :' *इतुलेनि सत्यभामा क्षोभली : वाण* घेतलें : आणि तैसीचि नीजैली : *मग तीया गेलीया : तवं श्रीकृष्णचक्रवर्ती बीजें केलें : तीहीं सत्यभामेतें पुसीलें : 'ना तीयें नीजैली :'* श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'सत्यभामे : सत्यभामे :' 'जी : जी :' *'नीजैलीति कां ?' इतुलेंनि तियें उठिलीं : आणि म्हणितलें :* ' मज गोसावीं ऐसें म्हणीतलें : जें तुम्हीं आम्हांसि पढीया : म्हणौनि एकू पार्यातकू तुमचांचि द्वारीं लाविला : *आणि* रकूमीणी दे*वीचेया* दासीसि पार्यातकाचे दांडे[3] ?' श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'त्या तुम्ही देखीलीया ?' 'जी जी : देखीलीया :' *'कैसीया देखिलिया ?' 'जी : साळंकृता : सूवासा : दीव्यमाना : पार्यातकाचे दांडे : ऐसीया देखीलीया :' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणितलें : 'तिया नेदखीजति किं : तिया काइ दासी ?' तवं सत्यभामा म्हणितलें : 'जी जी : तरी तिया कवणी ?'* *तेह्वांळि* श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : *'तिया[4] अष्टमाहासीधि :* तुम्हीं आम्हांसि पढीया : म्हणौनि एकू पार्यातकू तुमचां द्वारीं लावीला : आम्हीं तेयांसि पढीयों : म्हणौनि अस्टमाहासीधी *दासी होउनि ओळगति : निरंतर* तेयाचें दास्यत्व करीताति :' *सत्यभामा म्हणीतलें :* 'तरि तुम्हीं आम्हांसी न पढीयां आणि काइ ?' श्रीकृष्णचक्रवर्तीन म्हणितलें : 'तें तैसेंचि :' *इतुकेनि सत्यभामा* मागौती नीजैली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रती तैसेंचि आछादीते जाले : उगेचि राहिले : " ।।

## ७ समुद्रीं जळक्रीडा[1]

सर्वज्ञें म्हणीतलें : "एकू दीसीं श्रीकृष्णचक्रव्रती समूद्राआंतु बीजें केलें : *तेथ जळक्रीडा करीत होते :* जळक्रीडा करितां श्रीकृष्णचक्रव्रती बूडाले : बूडाले : ऐसें जालें : गावीचे आवघे लोक आले : ते दुख करूं लागले : *तेथ सत्यभामा आली :* सत्यभामा *मोकळे कान :* केस : वस्त्रें *विवर्णें :* न संभाळीतें *समुद्राचां काठीं गडबडां लोळति : नेणों केउतें वरियाणें गेले :* मासा चडफडी तैसी तळमळ तळमळ करूं लागलीं : तेव्हळि रकूमीणिदेवी हातीं आरीसा घेउनि श्रींघारू करीतें होतीं : एकी वासना : रकूमीणिदेवी वृंदावनीं तुळसीपुढां रंगमाळिका भरीतें होतीं : एकी वासना : तेव्हळीं रकूमीणिदेवी आरोगणस्थानीं मोतीयांचीया चुरीयाचीया रांगवळीया सूतें होतीं : आइकतखेवीं चैतन्य वीलयासि गेलें :

*मग* तैसेंचि श्रीकृष्णचक्रव्रतीन *समुद्राआंतुनि* बीजें केलें : तवं सत्यभामा श्रीकृष्णचक्रव्रतीतें वोळखति ना : श्रीकृष्णचक्रव्रतीन तेयांतें म्हणीतलें : 'सत्यभामे : सत्यभामे : हें काइ ?' 'जी जी : गोसावीं कें बीजें केलें होतें ?' श्रीकृष्णचक्रव्रतीन *हातीं धरुनि* उठवीली : नखेंकरुनि केंस सरीसे केले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'तुम्हांसि जरी ऐसी अवस्था तरी रकूमीणिसि काइ वर्त्तलें असैल ?' ऐसें म्हणौनि श्रीकृष्णचक्रव्रती

---

३ **भ.** °गळदंडे. ४ **भ.** °देहदीव्यमाना साळंकृता सोवासीनि.

**७.** १ या लीळेतील तिरप्या टाइपांतील मजकूर **भग.** पोथ्यांतील.

सत्यभामेचा हातु धरूनि रकूमीणदेवीचेया आवारासि बीजें केलें : तवं ते तैसिचि बैसलीं देखीलीं[२] : तवं श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'रकूमीणि : रकूमीणि :' तवं कवणें बोलावें ? तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'जेंचि गावीचेया लोकांसि : *वोडा-बुरुडासि :* जालें : तेंचि तुम्हांसि जालें : पढीयाओ काइ ऐसा ? पढीयाओ तो ऐसा कीं :'" श्रीमुखाचा अनुकारु : "ऐसें म्हणौनि श्रीकृष्णचक्रव्रती कांनापासि उभे ठाकौनि थोरें सब्दें म्हणीतलें : 'रकूमीणी : रकूमीणी :' सब्दापस्य[३] सब्दु थोर : *तीसरेन सब्दें उठीलीं :* मग स्वासू घालूनि म्हणीतलें : 'जी जी : गोसावीं कें बीजें केलें होतें ?' सत्यभामा म्हणीतलें : 'जी जी : गोसावी तेयांसीचि पढीएति :' तीए दीउनि सत्यभामा आउसें रकूमीणी आउसातें मानीति :" ।।

## ८ श्रीमंतपंचकीं गोकूळस्तां वेधु

सर्वज्ञें म्हणितलें : "एकु दीं सूर्योपर्वी श्रीकृष्णचक्रव्रती श्रीमंतपंचकासि बीजें केलें होतें : *द्वारावतिचे आवघे लोकु आले होते : गोकुळींचे आवघे लोकु आले होते*[१] : अनदान भोजनें जालेयांअनंतरें श्रीकृष्णचक्रव्रतीन तेयांपासि बीजें केलें : नंद आणि आवघे गौळी साउमे आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोपीका जैसीया कांहीं तैसीयाचि : त्या साउमीयां नैएतीचि : ते फूटी : श्रीकृष्णचक्रव्रतीचेनि वीयोगें दग्धलीं अंतक्रणें : तें मागौतें दर्सन दीधलेयांहीं[२] नीवतीचि ना : *तो दग्धु न फीटेचि*[३] : तेव्हळि श्रीकृष्णचक्रव्रतीन तेयासि च्यारि घडीयापरीयंत चैतन्यवीद्या संचरीली[४] : मग नीवालीं : मग : माघौतीं हरीली :" तेव्हळि माहादाइसीं पूसीलें : "जी जी : तेयांसि काइ जालें ?" सर्वज्ञें म्हणितलें "बाइ : तेयासि महंत[५] श्रएरासि जाली :"।।

## ९ कौरवां सवावो

सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीकृस्णचक्रव्रति पहुडले होते : दुर्योधनू सवाओ[१] मागों आला : रायासि खालि बैसों नैये म्हणौनि श्रीमुगुटाचेयाकडे[२] माचेयावरि बैसला : मागिलीकडुनू अर्जुन आला : वैरीयाखालि बैसों नैये ऐसें म्हणौनि सेवेचेनि मीसें श्रीचरणाकडे[३] बैसला : *श्रीचरण चुरूं लागला*[४] : तवं श्रीकृस्णचक्रव्रति उपहुडले : अर्जूनातें म्हणीतलें : 'अर्जूना : तुं केव्हळि आलासि ?' 'जी जी : आतांचि आलां :' 'कें *आलासि ?*' '*जी जी : सावावो मागों आलां*[५] :' श्रीकृस्णचक्रव्रति कांहीं बोलती म्हणौनि सांघीतलें :

---

२ **पं.** °तवं सत्यभामा म्हणीतलें : 'हे देखा आपुलां ठाइं सूखें असे :' तवं–. ३ **पं.** सब्दा–प्रतिसब्द थोर.

८. १ (ग.). २ **भग.** संयोगु जालेयांहीं. ३ (**भग.**). ४ **भ.** संक्रमीली. ५ **एवा.** °गोमटें जालें.

९. १ **पंभग.** सावावो. २ **भग.** उसीसेयाकडे. ३ **भग.** पाइतेयाकडें. ४ (**पंभ.**). ५ (ग.)

'जी जी : राजे आले असति :' तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन ऐसें पाहिलें : 'राजे केव्हळि आले?' 'जी जी : आतांचि आलां :' तेव्हळि उभा ठाकला : हात जोडिले : मग म्हणीतलें : 'जी जी : सवाओ मागों आलां :' तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रति क्षणू येकू नीश्चळ होउनि मग म्हणीतलें : 'अक्षोणिभरि नारायणी सैन्य : कृतवर्मा दळवै : बळभद्रदेवमूक्ष : येतलें येकीकडे : आणि हें येकलें असस्त्री येकीकडे : परि सेल अर्जूनां :' तवं तेणें म्हणीतलें : 'जी जी : आधीं मीं आलां कीं :' तवं श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'आधीं तुम्हीं आलेति : परि[६] भेटि आधीं यांसी जाली :' मग तेयाचां चीतीं ऐसें जालें : 'आवचें हा घेउनि जाइल : मग एकले गोसावी माझेयाकडे येउनि काइ करिती?' तवं अर्जूनदेवीं म्हणीतलें : 'जी जी : माझेयाकडे गोसावीचि पुरती :' म्हणीतलें तवं दुर्योधनें बाहे आफळीली : तेणें म्हणीतलें : 'सेल ते मजचि जाली :'" ।।

## १० जेद्रथ वधु

सर्वज्ञें म्हणीतलें : "तेरसाचां दीं तेहीं खांबू घातला[१] : चक्रवीहु माडिला : अर्जूनातें बोलाउं आले : अर्जूनू समसप्तका कोळीयासीं जूझावेया गेला : *मग धर्मासि भाटु पाठवीला : तवं धर्में म्हणीतलें : 'श्रीकृष्णु आणि अर्जुन हे दोघै जवळि नाहीं : आणि चक्रवीहुचा रीगावा तरि आम्हीं नेणों : तरि कैसें[२]?'* तवं अभिमनीन[३] म्हणीतलें : 'मीं चक्रवीहुचा रीगावा जाणें : परि नीगावा नेणें :' तेहीं[४] म्हणीतलें : 'रीगावा तुं करिसि : तरि नीगावा आम्हीं करूनि :' तैसेचि नीगाले : तेणें रीगावा केला : रीगावा करूनि पैलीकडे गेला : तयास्तव नीगावा नव्हेचि : पैलीकडौनि नीगों गेला : तेथ पडला : पैलीकडौनि जैद्रथु आला : तेणें पांपरां हाणीतला : 'हें काइ अभीमनी[५] : अर्जूनाचा पूत्रू काइ नव्हेसि? काइ सोरू लोळे ऐसा लोळतासि?' तवं येरीकडे अर्जूनू समसप्तका कोळीयातें जीणौनि आला : तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'अर्जूना : जा पां : अभीमन्यूतें पडिताळि :' 'जी जी :' तैसाचि अर्जूनू आला : अर्जूनें पूसिलें : 'बा रे : तुझे कवण घाय भारीं असति?' अभिमनीन म्हणीतलें : 'ना माझे अवघेचि घाए हळू असति : एकूचि घाओ भारी असे : जें कां पडलेयांवरि जैद्रथें पांपरां हाणीतलें : *आणि म्हणीतलें : 'हें काइ अभीमनी : अर्जुनाचा पुत्रु काइ नव्हेसि? काइ सोरू लोळे ऐसा लोळतासि :' तें मज सलताए[६] :'* तेव्हळि अर्जूनें प्रतज्ञा घेतली : 'उदीयां अस्तंगतें सूर्यें जैद्रथु वधीं ना तरि अग्निप्रवेसू करीन :' तेव्हळि तेयाचे जे होते तेहीं म्हणीतलें :

६ ग. परि आधीं दृष्टि अर्जुनावरि पडिली. भेटिगोष्टि यांसि जाली कीं : मग तुमसीं :'

**१०.** १ **भ.** थावरिला. **ग.** स्थावरिला. २ (**ग.**). ३ **पं.** अभिमन्यें. ४ **पं.** भीमसेनें म्हणीतलें : "रीगावा तुं करिसि तरि नीगावा मीं गदाचां घाइं करिन." ५ **पं.** अभिमन्या. ६ (**ग.**).

'उदीयां काइ जैद्रथु वधवतु असे ? हें सत्य : ऐसेंचि आवघें आमचेया सूत्रासि आलें :' *कौरवीं म्हणीतलें : 'आरें : दीस मावळेतवं यातें राखों : मग पार्थ कैचा ?' म्हणौनि जैद्रथु लोहाचां पांजरां घातला : भवंता सूचीका वीहु : सातै पौळी सैन्याचिया*[७] : उदीयां थोर जूंझ जालें[८] : बहुत सैन्य आटैलें : घडीया च्यारि दीसा असती तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन सूर्याआड सूदर्सन घातलें : अंधकारू पडिला : अर्जूनातें म्हणीतलें : 'अर्जूना : आपूली प्रतज्ञा सांभाळीसि ना ?' तैसेचि अर्जूनू पारुखले : सरण[९] रचिलें : अग्न प्रजळिला : तैसाचि अर्जूनू अग्नप्रवेसू करावेया नीगाला : तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'अर्जूना : धनूक कोणालागि ठेवितासि ? मागें काइ अभीमन्यू असे ? *अर्जुना : क्षेत्री जे असति ते काइ नसुधा हातीं अग्निप्रवेसु करीति ? ते आपुलेया सस्त्रेसीं अग्निप्रवेसू करीति कीं : धनुख घे : सीतीं बाण लावि*[१०] *:'* तैसेंचि धनूक घेववीलें : गुणीं बाणू लावविला : अर्थावरि बैसविला : प्रदक्षणा केली : उडी घालूं बैसला : आणि हातीं धरिला : आवघे कौरव पाहों आले : जैद्रथुहीं आला : तेव्हळि सूर्याआडुनि सूदर्सन काढिलें : आणि म्हणीतलें : 'हा घे सूर्यो : हा घे जैद्रथु :' तैसेंचि सीर तोडिलें : बाणवरि पीटूनि नेलें : तैसाचि हाहाकारू प्रवर्तला : कौरवीं म्हणीतलें : 'अधर्मू केला : अधर्मू केला :' तवं श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'तुम्हीं कवणू धर्मू केला : जें बाळक वेढाळूनि[११] मारिलें ?' तैसेंचि बाणवरि पीटूनि नेलें : समूद्राचीये थडीयेसि तेयाचा पीता वीदुरथु सूर्यासि अर्घु देत होता : तेयाचेया आंजूळीसि पडिलें : तवं तेणें ऐसें पाहिलें : 'माझेया पूत्राचें सीर कवणें पां तोडिलें ? आतां तेयासि श्रापू देइन :' ऐसें म्हणौनि सीर खाली ठेविलें : तवं तयाचेंहीं सीर खाली पडिलें :" ॥

## ११ श्रीकृस्ण पूरत्यागु

माहादाइसें पूराण आइकौनि आलीं : माहादाइसीं पूसिलें : "जी जी : श्रीकृस्णचक्रव्रतीन पूरत्यागु कैसा केला ?" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्ती प्रभासेसि बीजें केलें : देउळीं अश्वत्थमूळीं पहुडु स्वीकरीला : तवं भील तेथें पारधीसि आला : तवं चंद्राचेनि रस्में पदमें श्रीचरणींचीं झळझळितां देखीलीं : 'हें ससेयाचे कान :' म्हणौनि सींथीलीं : तवं श्रीमूर्ती वोळखीली : आणि पोळला : भीयाला : श्रीचरणांवरि माथा ठेविला : श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'ना भि : भि*[१] *:'* " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृस्णचक्रव्रती कर्पूरकर्जळीवत[२] पूरत्यागु केला :" ॥

---

७ (पं.). ८ भग. °तेहीं आवघेया दळामागे जैदर्थु घातला. ९ एवा. कास्टें रचिलीं : १० (भ.). ११ ग. वेढौनि.

११. १ (भ.). २ ग. कर्पूरकज्जलिकावत.

## १२ कोंतीये देहअवसान

माहादाइसीं पूसिलें : " जी जी : श्रीकृस्णचक्रव्रतीन बीजें केलेंयां अनंतरें पांडवीं काइ केलें ? " *सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : धर्में आणि कूंतीया अर्जुनातें म्हणीतलें : ' जाए पां : श्रीकृष्णचक्रवर्तीतें शोधुनि ये*[1] *: ' अर्जुनदेव गेले : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ती तैसी अवस्था स्वीकरीली असे : अर्जुनें दंडवत घातलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : ' अर्जूना : कूंती नीकेनि असे गा ? ' अर्जूनें म्हणीतलें : ' आतां काइसें नीकेंपण जी : ' तैसेचि अर्जूनदेव नीगाले : हारी पावो न पडे : कूंती दारवठेंसीं पाहातचि होतीं : तवं अर्जूनाचा हारी पावो न पडे ऐसें एत देखिलें : ' बा अर्जूना : काइ रे : तुझा सारथी काइ ? ' अर्जूनें म्हणीतलें : ' आइ : तें जालें वो : तेणें सींतारिलों वो*[2] *: ' "* सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृस्णचक्रव्रतीचां वीयोगीं तेयां[3] तेतुलेयां पोरांभीतरि कोण्हाहींअस्तव कांहीं नव्हवेचि : येकलीया कोंतीया आइकतक्षेओ *कवाडेंसी उभेयां*[4] देह त्यजिलें : " ।।

## १३ वीदुरउद्धवदेवां भेटि

सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रव्रतीन बीजें केलेयावरि उधवदेव वृंदावनासि आले : तवं तेथिचीं झाडें आवघीं वाळलीं देखिलीं : ' श्रीकृस्णचक्रव्रतीन बीजें केलें म्हणौनि येंहीं वाळलीं[1] : ये जीती तें काइ उधउ : ' ऐसें जवं दुख करिताति तवं वीदुरदेव भेटले : तेयासीं गोस्टी करितां सांत अहोरात्रें उभयां गेलीं : ऐसा क्षेणू येकू : ' *तो श्रीकृष्णु ऐसा : तो श्रीकृष्णु ऐसा*[2] *: ' "* ।।

## १४ भीला पूतने फळाअनूवादु

येकू वेळ क्रीया प्रवेसन जाली : ऐसें नीरोपण होत होतें : *माहादाइसीं गोसावीयांतें पुसिलें : " जी जी : तींये पूतनेसि आणि भीलासि काइ जालें जी*[1] *? "* सर्वज्ञें म्हणीतलें :

---

१२. १ **पं.** °परि क्षेवं झणें देसी : ' अर्जुन प्रभासेसि आला : तवं श्रीकृष्णचक्रवर्ती ऐसी अवस्था स्वीकरीली असे : अर्जूनें अळगौनि दंडवतें घातलीं : परि साउमां न एचि : श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : ' अर्जूना : कोंति नीकेनि असे गा ? ' अर्जूनें म्हणीतलें : ' आतां काइसें नीकेपण जी : ' मग श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : ' अर्जूना : खेवं दे गा : ' ' ना जी : धर्में मज वारिलें असे : ' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : ' अर्जूना : तूं माझा बाळमैत्र : खेवं नेदीसि तरि हातु तऱ्हीं दे : ' ' ना जी : मज वारिलें असे : ' माघौतें म्हणीतलें : ' अर्जूना : तुं माझा प्राणसखा कीं गा : हातु नेदीसि तरि धनुकाचा गोसा तऱ्हीं दे : ' दुख करीति : परि साउमें न एति : मग धनुकाचा गोसा दीधला : तो श्रीकरें वक्षेस्थळावरि धरिला : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : इतुकीचि सक्ति दीधली : जरि खेवं देते तरि भीलहरण नव्हतें : तैसेचि भील चालीले : अर्जुनास्तव काहींचि नव्हवेचि : मग धनुक भवंडीति : धनुकातळि जे राखीलीं ते वांचलीं : एरी भीलीं नेलीया : मग अर्जुनु नीगाला : हारी पावो न पडे—. २ (**मु.**). ३ **भ.** °पांचांही पोरां कांहीं नव्हेचि. ४ (**भग.**).

१३. १ (**मु.**). °हा काइ उद्धव मां वांचैल ? " २ (**मु.**).

१४. १ (**मु.**).

" भीलू वोखटेन मनोधर्मे नाहीं आला : परि क्रीया प्रवेसन जाली : म्हणौनि तें फळ तेयासि जालें : पूतना ओखटेन मनोधर्मे आली : परि क्रीयाप्रवेसन नव्हेचि : म्हणौनि तें फळ तीसि नव्हेचि[२] : " सर्वज्ञें म्हणीतलें : " जेचि गति एस्वदेसि तेचि गति पूतनेसि : " ।।

## १५ गोपिकां नीरें नीरोपणें

माहादाइसें पूराण आइकौनि आलीं : माहादाइसीं पूसिलें : " जी जी : गोपिकां नरक जाले म्हणति : तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीकृस्णचक्रव्रतीचें अर्धांग पावौनि भीलाचीं सात सात लेंकरूवें वीजति : यापरते आणीक येक नरक असति बाइ ? " ।।

## १६ भक्ता राज्य अनूवादु

माहादाइसीं पूसीलें : " जी जी : *श्रीकृष्णचक्रवर्तीसि सोळा सहश्र अंतापूरा : सतें आगळीया : आठ पाटमुखीया : आणि उधवदेवासि सातसें राणीया : ऐसें*[१] श्रीकृष्णचक्रव्रति राज्य केलें : आणि भक्ताकरवि राज्य करवीलें : आतां जें गोसावीयांजवळे येताए तेयातें गोसावी ऐसेंचि म्हणताति : जें 'क्षेउर करा : भीक्षा मागा : ' तरि हें ऐसें काइ जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तै देवें राज्य केलें म्हणौनि भक्तींहीं राज्य केलें : आतां यथ ऐसी प्रवृत्ति : आतां एथ इतीमूनीचा वेखू : " ।।

## १७ माहादाइसां दस अवतार नीरोपणें

माहादाइसें पूराण आइकौनि आलीं : मग माहादाइसीं पूसीलें : " जी जी : दस अवतार ते काइ इस्वरअवतार ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृस्ण अवतारू तो इस्वरअवतारू : एर देवतांचे : " ।।

## १८ कूबजीके भेटि

सर्वज्ञें म्हणीतलें : " श्रीकृस्णचक्रव्रती मथुरें बीजें केलें : कूबजीका कंपोळें हरीचंदन कंसाकारणें घेउनि जात होती : तवं वाटे भेटि जाली : श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'कूबजीके : हें कवणांलागि नेत अससि ? ' तीया म्हणीतलें : 'श्रीकृस्णा : हें तुजचि लागि : *तुजवांचौनि आणीकु कोणु भोगीया असे*[१] : ' तें श्रीकृस्णचक्रव्रतीन प्रसादु केलें : येर गोपाळीं लावीलें : मग श्रीकृस्णचक्रव्रतीतें कूबजीका म्हणीतलें : 'जी जी : माझेया राउळा बीजें करावें : आणि मीं ऐसी असें : ' श्रीकृस्णचक्रव्रतीन तीचेया डावेया पायाचेया आंगूठेयावरी श्रीचरणीचा आंगुठा ठेवीला : श्रीकरेंकरूनि हणवटी धरीली : आणि उचलीली : तें खोडसवारीखें रूप जालें : " ।।

---

२ **भग.** प्रतीत, भिल्लाने श्रीकृष्णाच्या तळव्यावर बाण मारल्याची कथा येथे दिली आहे. (मागे लीळा ११ पाहा).

१६. १ (**भग.**).

१८. १ (**भ.**).

## १९ उधवदेवा प्रेमदान

*महदाइसीं पुसिलें : "जी जी : उद्धवदेवां कवणें अवस्वरीं प्रेम संचरीलें जी[१] ?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीकृस्णचक्रव्रतीन कंसू वधीला : मग बंदीसाळे बीजें केलें : तवं उधवदेव खांबाआड लपाले होते : तेथ श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'हे कवण ?' 'जी जी : हे कंसाचे प्रधान :' तवं श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : '*कंसाचे मंत्री ते तुम्हीं ?*' '*जी जी : मी बुद्धिमंत्रु सांधें :' श्रीकृष्णचक्रव्रतीन म्हणीतलें*[१] : 'येतुले दीस कंसाचे प्रधान : आतां एथीचे प्रधान : *एथ बुद्धिमंत्रु सांधा*[१]' एणें सब्दें प्रेम संचरीलें :" ।।

## २० चतुर्दस वीद्याअभ्यासू

गोसावीयांसि माहादाइसीं पूसीलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रव्रतीन संदीपानीपासौनि चौदा वीद्या चौदा दीसां अभ्यासीलीया : कीं चौदा वीद्या येकें दीसें अभ्यासीलीया ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृस्णचक्रव्रतीन संदीपानीपासौनि चौदा वीद्या चौदा दीसां अभ्यासीलीया :" ।।

## २१ गुरूपूत्रानएन

*एकु दीं माहादाइसीं गोंसावीयांतें पुसिलें : "जी जी : संदिपानीचा पुत्र श्रीकृष्णचक्रवर्ती आणीला : हें साच जी*[१] *?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "*आति बाइ : एकु दीं*[१] श्रीकृस्णचक्रव्रतीन संदीपानीतें म्हणीतलें : 'कांहीं मागा[२] :' '*काइ मागों श्रीकृष्णा ? तुझेनि प्रसादें आवघेंचि आहे :' 'तरि कांहीं मागा*[१] :' 'हो कां : तरि घरीं पूसौनि एइन : मग मागैन :' घरीं ब्राम्हणीतें पूसीलें : 'श्रीकृस्णू म्हणतो काहीं मागा : तरि काइ मागों ?' ब्राम्हणीं म्हणीतलें : 'आमुचा पूतू समूद्रीं बूडाला असे तो मागा :' संदिपानि श्रीकृस्णचक्रव्रतिपासि आला : 'जी जी : माझा पूतृ समूद्रीं बूडाला असे तो देयावा :' श्रीकृस्णचक्रव्रतीन समूद्रासी बीजें केलें : ब्राम्हणाचेनि वेखें : समुद्र सांउमा आला : श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'एथें आमचेया गुरूचा पूतृ बूडाला असे तो देआवा :' तेणें म्हणीतलें : 'जी जी : तो एमलोकीं आहे :' मग श्रीकृस्णचक्रव्रतीन एमलोकासि बीजें केलें : तेथौनि आणौनि दीधला : ।। "

---

१९. १ (मुग.).

२१. १ (मुभग.). २ अ. ° "जी जी : मागों नेणें :" "तरि काहीं पुसा :" "जी जी : पुसों नेणें : जी जी : तरि घरीं ब्राह्मणीतें—.

## २२ उधवदेवा गोकूळा पाठवणें

[1]आमचां सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीकृस्णचक्रव्रती उधवदेव गोकूळा पाठविले : तवं गोपिका झाडा खेवं देताति : श्रीकृस्णचक्रव्रतीचेनि वीयोगें : तें उधवदेवीं देखिलें : तवं तेहीं म्हणीतलें : 'काइ श्रीकृस्णू आले ?' म्हणौनि पाहों ठाकलीया[2] : तवं तो उधवदेओ जाला : तेथ उधवदेवासि *तेयातें संबोखीतां*[3] सा मास लागले : *नीगों रीगति : आणि गोपीका राहावीति : मागौतें राहावीति : मागौतें नीगति : मागौतें राहावीति*[3] : तवं श्रीकृस्णचक्रव्रतीसि मर्दनामादनें वर्जलें : *उधवदेवीं गोपीकातें संबोखीलें : श्रीमंतपंचकीचा पुढारू दीधला : 'गोसावीयातें आणीन :' म्हणितलें : तवं उधवदेवासि थोर दुख जालें : 'या सदैवा : यांचा गुण मज यावा :' म्हणौनि*[4] उधवदेवीं गोपिकांचें रज पालवीं बांधलें : डोइये घेउनि अर्थावरि घेउनि आले : श्रीकृस्णचक्रव्रति साउमे गेले : 'हें काइ उधवदेव हो : दीस लाविले ? हें डोइए काइ ?' 'जी जी : *गोपीकांसि तुम्हीं पढिया : तेयांसि तुम्हांवारि बूधि : म्हणौनि*[4] हें गोपिकांचें रज : *मीयां आणीलें :' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'ऐसें होए*[4] *:'* मग श्रीकृस्णचक्रव्रतीसि मर्दनामादनें जालें :" ।।

## २३ भीवंदर्पहरण

सर्वज्ञें म्हणीतलें : " भीमसेनासि आपूलेया बळाचा गर्वू होता : एकु दीसीं श्रीकृष्णचक्रवर्ती वेहाळीसि बीजें केलें : सरिसा भीमसेनु : तवं येक तळें देखिलें : तेथ कमळें होतीं : श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'भीमसेना : यें कमळें तोडि :' 'हो कां जी :' म्हणौनि तळेयांतु रीगाला : तवं पाणीयें कासावीस जाला : आणि बाहीरि नीगाला : तवं श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'हें काइ भीमसेना : तुं एसणा वीरू : सासार्जूनाचीये[1] तीसरीये ठीकरीएसि बूडालासि ?' '*ना जी : अक्षोभ पाणी : ठीकरी कैसी*[2] *?'* मग श्रीकृस्णचक्रव्रतीन श्रीचरणाचेनि आंगुठेनि उलथुनि एरी वाहीं घातलीं : उदक *नीगौनि गेलें*[2] *:* मग सर्वज्ञें म्हणीतलें : 'भीमसेंना[3] : आधीं एसणे वीर होते गा : ' " ।।

## २४ हनूमंतदर्पहरण

सर्वज्ञें म्हणीतलें[1] : " हनवंतदेव आणि अर्जूनदेव समुद्राचीये थडीये बैसले होते : तवं अर्जूनें म्हणीतलें : 'रामू येसणा वीरू आणि पाखाणाचा स्वेतु बांधला : सरांचा स्वेतु

---

**२२.** १ **पं.** श्रीउधवदेवासि कव्हणी एकु गर्वु होता : जैसा वानरेसां होतां : म्हणौनि—. २ **अ.** पाठवीलीया. ३ **(ग.)**. ४ **(पं.)**.

**२३.** १ **पंभगमु.** कुंभकर्णाचीए. २ **(पंभगमु.)**. ३ **भग.** °हे कुंभकर्णाचेया (**एवा.** सासार्जुनाचेया) माथेयाची तीसरी ठीकरी गा : आधी—.

**२४.** १ **पं.** °श्रीकृष्णचक्रवर्ती आणि अर्जुनदेव कोरें सोनें आणावेया लंकेसि नीगाले : तवं हनुमंतदेवो

न बंधवेचि :' तवं हनवंतदेवीं म्हणीतलें : 'तेवढेया समूद्रासि : वीरांसि सरांचा स्वेतु काइ राहैल ?' 'मां न न्हाए कैसा ? मीं स्वेतु बांधैन :' आणि हनवंतदेवीं म्हणीतलें : 'मीं भंगीन :' ऐसी दोघांसि पैजा जाली : अर्जूनें म्हणीतलें : 'जरि तुं भंगिसी तरि मीं कास्टें खायें : न भंगीसि तरि काइ ?' तवं हनवंतें म्हणीतलें : 'तरि मीं तुझां धजास्थंबीं राहैन :' म्हणौनि अर्जूनदेवीं स्वेतु बांधला : हनूवंतदेवीं दोहीं काखां दोनि पर्वत घेउनि आले : तेयावरि उडी घातली : स्वेतु भंगिला : अर्जूनें कास्टें रचिलीं : अग्न प्रजळिला : तवं[२] श्रीकृस्णचक्रव्रतीन बीजें केलें : मग म्हणीतलें : 'अर्जूना हें काइ ?' 'जी जी : मज आणि हनवंतदेवांसि पैज जाली : 'म्यां स्वेतु बांधला : तो येहीं भंगिला : तरि मीं अग्नि-प्रवेसू करीन :' येहीं म्हणीतलें : 'न भंगे तरि मीं तुझां धजास्थंबीं राहें : तरि मीं अग्न-प्रवेसू करितें :' श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'तेथ कवण साक्ष होतें ?' 'जी जी : कोण्हीं नसेचि :' 'तरि तुम्हीं दोघै लटीकें : तीसरें एक साक्ष होआवें कीं : आतां करा : हें तुमचें साक्ष होइल :' 'हो कां जी :' म्हणौनि अर्जूनें स्वेतु बांधला : तवं हनूवंत दोहीं काखां दोनि पर्वत घेउनि आला : तेयावरि उडी घातली : तवं श्रीकृस्णचक्रव्रतीन तळिं सूदर्सन संचरिलें[३] : आणि पैन्हां उडौनि पडिला : श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'हा होये कीं अर्जूनू :' मग तो अर्जूनाचां धजास्थंबीं राहिला :''।।

## २५ मदनदर्पहरण

सर्वज्ञें म्हणीतलें : ''मदनासि आपूलेया बरवेपणाचा गर्वू होता : एकु दीं श्रीकृष्ण-चक्रवर्ती ऐसे उभे असति : मदनु ऐसा अंतरीक्ष जातु होता : तवं तेणें श्रीकृस्णचक्रव्रतीतें देखिलें : आणि पडिला : श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें[१] : 'माग : प्रसन जालां :' तेणें म्हणीतलें : 'जी जी : मज तुझा जांघोवा होआवा :' आणि श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'होइल :' मग तो प्रदीमनू[२] होउनि जन्मला[३] :'' ।।

## २६ रेवांतका सत्यलोका गमन

सर्वज्ञें म्हणीतलें : ''रेवांतकू सत्यलोका गेला : ब्रम्हेयांतें रेवांतकीयेसि वरू पूसावेया : *तै त्रेत होते : तै ब्रह्मयाचां ठाइं पेखणें[१] होत होतें : पेखणें[१] सरलें : तवं त्रेत गेलें : द्वापर रीगालें : तेणें ब्रम्हेयातें पुसीलें[२] :* 'रेवांतकिये वरू कवणू ?' ब्रह्मोनि म्हणीतलें :

---

समुद्राचीए थडीएसि बैसला होता :—. २ **पं.** श्रीकृष्णचक्रवर्ती पहुडले होते : तो उपहुडु जाला : हनुमंतदेवीं दंडवत घातलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'अर्जुना : हें काइ ?' ३ **भ.** प्रहरिलें. **पं.** सूदलें.

**२५.** १ **भग.** 'हें काइ ?' मदनें म्हणीतलें : 'ना ऐसा जो तुं बरवा : तरि तुझीए जांघे : मांडिये जन्म होआवें :' २ **भमु.** प्रद्युम्नू. ३ **मु.** °तेंचि कामावतार म्हणौनि गोसावीं प्रकरणवशें सांघीतलें.

**२६.** १ **भग.** बहुरूप. २ (**पंमु.**).

'द्वापरिचां नीगावां[3] रामक्रुस्णू अवत्रती : तेया रामासि माळ घालावी :' तो तेथौनि आला : *द्वापराचां अंतीं रामकृष्ण अवतरले : तेव्हाळि सातै पौळी उंबरेयाचेयापरी वोलांडौनि रेवांतकु रेवांतकीयेसि घेउनि आला*[4] *:* तवं श्रीक्रुस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'वोहृणिसें : दादोसां माळु घालूं येताति[5] : तीयें एकें पांडें सातै पौळी वोलांडौनि येती : आतां सामोरें गेलेयांवांचौनि न सरे :' मग श्रीक्रुस्णचक्रव्रति सामोरे गेले : 'दादो : यांचेया माथेयावरि आपूला हातियेरू ठेवा :' मग तेहीं तेयांचेया माथेयावरि हातियेरू ठेविला : खोडसवारिकें[6] तेयांचें रूप[7] जालें : मग भीतरि आणिलीं : तेयासि सेसपटू भरिला[8] :" ।।

## २७ उधवदेवां अपरोक्ष

*एकु दीं महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : उद्धवदेव प्रेमिये : ते श्रीकृष्ण-चक्रवर्त्तीचां वीयोगीं कैसे वांचले*[1] *?"* सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मग उधवदेवां अपरोक्ष संचरीलें[2] : म्हणौनि वांचले : तेणें ते श्रीक्रुस्णचक्रव्रतीतें देखतचि असति :" ।।

## २८ नारददर्पहरण

सर्वज्ञें म्हणीतलें : "नारदें श्रीक्रुस्णचक्रव्रतीतें म्हणीतलें : 'श्रीक्रुस्णा : इतुलीं तुज अंतुरें[1] असति : एक आम्हां देया :' श्रीक्रुस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'जेथ आम्हीं नसों तें तुम्हीं घेया :' नारदें म्हणीतलें : 'काइ अवघां ठाइं असैल ?' म्हणौनि अवघे ठाय हींडीनला : तवं श्रीक्रुस्णचक्रव्रतीसि कव्हणी ठाइं मर्दना होत असे : कव्हणे ठाइं मादनें होत असे : कव्हणी ठाइं आरोगणा होत असे : कव्हणे ठाइं पहुडु स्वीकरिला असे : ऐसें देखिलें : मग आले : श्रीक्रुस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'कां : गेले होतेति तें काइ ?' 'ना : हे श्रीक्रुस्णा तुझे खेळ :' मग[2] : श्रीक्रुस्णचक्रव्रतीन नारदातें म्हणीतलें : 'एथ[3] आंघोळि करा :' तेहीं आंघोळि केली : ते नारदी जाली : कव्हणी एकू राओ तेथ आला : तो तेयातें घेउनि गेला : लेंकरूवें जालीं : तीएं सरलीं : तो राओ सरला[4] : ते नार तळेयाचीये पाळी

---

३ **भग.** अंतीं. ४ (**भग.**). ५ **पं.** °तवं बळभद्रदेवीं म्हणीतलें : 'हें काइ श्रीकृष्णा : आमसींचि रळी?' तवं तीयें—. ६ **मु.** शोडषवरुषें. **भग.** षोडसवरुसी ऐसी जाली. ७ **पंमु.** ठाण. ८ **अ.** ठेला.

**२७.** १ (**मुग.**). २ **अभग.** ज्ञान जालें.

**२८.** १ **पंमु.** अंतापुरें. **भ.** राणीया. २ यापुढील लीळा 'ऐसें एक म्हणति', म्हणजेच एकी वासना म्हणून दिली आहे. **पं.** प्रतीत ती मूळ लीळेत गोवून दिली आहे. तेच प्रस्तुत संहितेत स्वीकारलें आहे. **भमुग.** प्रतीत ही एकी वासनेची लीळा नाही. ३ **पं.** ए सरोवरीं. ४ **पं.** °तो तेथ संसकारावेया सरोवरासि आणिला : सरणावरि घातला : नारदी राणी जाली होती : ते घोडेयावरि बैसौनि आणिली : आणि रीगावेयालागि : नगर आले पाहावेयालागि : ते सीळेवरि उभी ठाकली :

रडते असे : तवं श्रीकृस्णचक्रव्रतीन बीजें केलें : मग पूसिलें : 'तुं कां रडतेसि?' 'माझीं लेंकरूवें सरलीं : राओ सरला :' ऐसें सांघीतलें : मग म्हणीतलें : 'येथ आंघोळि करा :' मग आंघोळि केली : तेधवां नारंदु जाला : मग श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'नारंदमुनी : हें काइ?' नारंद माहामूनीन म्हणीतलें : 'श्रीकृस्णा : हे तुझे खेळ :' इतुकेन तेयाचा गर्वू गेला :" ।।

## २९ कामू अवतारू कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "कामू तो मदनू होउनि जन्मला :" ।।

## ३० वीस्वरूप उपदेसें अर्जूना पूनस्मरण

सर्वज्ञें म्हणीतलें : "श्रीकृस्णचक्रव्रती अर्जूनाप्रति योध्यसमइं नीरोपण केलें : तें तो वीसरला : मग श्रीकृस्णचक्रव्रतीसि[१] बीजें करितां अर्जूनें म्हणीतलें : 'जी जी : मज जें गोसावीं नीरूपण केलें तें मीं वीसरलां जी : तें मज गोसावीं नीरूपावें जी :' मग श्रीकृस्णचक्रव्रतीन अवघें माघौतें नीरूपण केलें[२] :" ।।

## ३१ बळिभूवना बीजें करणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "देवकीया देवीं श्रीकृस्णचक्रव्रतीतें म्हणीतलें : 'हां बा श्रीकृस्णा : अवघेयांचीं बाळकें आणिलीं : माझीं आणि कां :' श्रीकृस्णचक्रव्रतीन म्हणीतलें : 'आणीन : परि राहाति ना :' मग देवकीया देवीं म्हणीतलें : 'आणि : मज भेटवि : मग[१] जातु :' मग श्रीकृस्णचक्रव्रती बळिभूवनासि बीजें केलें : तेथौनि बाळकें घेउनि आले : देवकीये देवीसि भेटवीलीं : नावेक होतीं : मग गेलीं[२] :" ।।

## ३२ पांडवां हीमवंता परीखू

सर्वज्ञें म्हणीतलें : "साही जणें हीवं चूरितें जाताति : तवं दृपदी पडली : तेथें धर्मे म्हणीतलें : 'अर्जूना : दृपदी पडली :' आणि तो तैसाचि माघौता नीगाला[१] : तेयातें एत देखिलें : आणि ते आपलवती म्हणौनि दृपदिया तोंड झांकिलें : अर्जूनदेवीं म्हणीतलें : 'तुम्हीं तोंड कां झांकिलें? मातें धर्मे पाठविलें असे : *आणि मीं धर्मेंचि आलां असें :'*

---

तवं श्रीकृष्णचक्रवर्ती पांडवासहीत उधवदेवेंसीं तेथ बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : तीतें : "आगो : तुआं आंघोळि केली?" "ना : नाहीं केलीं :" "आंघोळि करिसि नां?" सीळेवरूनि उतरली : आंघोळि केली : तवं नारदु जाला :

**३०.** १ **मु.** °एक वेळ अर्जुनें म्हणीतलें. २ °**शोध.** १८ अध्याय गीता.

**३१.** १ **पं.** °जाती तरि जातु : २ **पं.** आदृस्य जालीं.

**३२.** १ **पंभग.** परतला :

आणि तेहीं तोंड उघडिलें : अर्जूनें म्हणीतलें : 'देओ आणि धर्मू वीसरों नको :' ऐसें म्हणौनि : माघौता नीगाला : हेमाचळीं हीम चूरूनि एककी ठाइं एककू पडिला[२] :" ।।

## ३३ यौधीस्टीरा नीरेदर्सन

सर्वज्ञें म्हणीतलें : "धर्मू सात अहोरात्रें राज्याची वेवस्था करावेया राहिला होता : द्वारावतीयेसि वज्रू बैसविला : आणि आपूला राजीं परीक्षीति बैसविला : तवं कळियौगाचा रीगावां[१] जाला : इतुकेनि नीरयांचीया वाटा चालविला[२] : धर्में म्हणीतलें : 'हां गा : मातें या वाटा कां आणिलें ?' *तेहीं म्हणीतलें : 'तुं कळियुगीं सात अहोरात्रें होतासि : म्हणौनि :' धर्में म्हणीतलें*[३] : 'मीयां तरि कळियौगिचीं अनेंउदकें नाहीं सेविलीं :' तेहीं म्हणीतलें : 'कळियौगिचीं अनेंउदकें नाहीं सेविलीं : परि कळियौगिचा वारा लागला कीं : म्हणौनि :'" सर्वज्ञें म्हणीतलें : "कळीयौगीं जन्ममात्रें चौकडीपर्यंत नर्क : *यौधीस्टीरू तेथीचीं अनेंउदकें न सेवी : परि तेयासि नीरेयाचें दर्सन केलेंचि कीं*[४] :"।।

## ३४ आयुष्य कथन

महदाइसीं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्त्तीन कीती वरूषें राज्य केलें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ती सहश्र वरूषें राज्य केलें : यादवांसहीत :" ।।*

---

२ **मु.** (**स्वमति शोध** : °धर्मु वांचौनि).

**३३.** १ **पं.** संपूर्ण. २ **पं.** °तवं कौरवादीक नरकीं जाचीजताति : एकीं म्हणीतलें : 'आरे : धर्माचें मुख तऱ्हीं पाहों :' तेयांसि उसासा जाला : ऐसें नां धर्में हातु देउनि काढीले : दुर्योधनें म्हणीतलें: 'वैरीयाचें मुख काइ पाहों ?' म्हणौनि नरकीं बुडी दीधली : तवं धर्में म्हणीतलें--. ३ (**ग.**). ४ **अ.** प्रतीत पुनरुक्त झालेल्या २६ व्या लीळेतील वाक्य.

**३४.** * 'पिढीपाठा 'त श्रीकृष्णचरित्राच्या बहुधा ४८ लीळा आढळतात. त्यांपैकी ३४ लीळा वर दिल्या आहेत. इतर १४ लीळा 'लीळाचरित्रा 'च्या संहितेतच समाविष्ट केल्या आहेत त्यांचा तपशील पुढीलप्रमाणे : (१) 'अज्ञात लीळा : श्रीकृष्णचरित्र ' या प्रकरणातील दुसऱ्या लीळेनंतर 'नंदादीका आग्रहो निवृत्ति' ही लीळा येते. ती 'अज्ञात चरित्रे' ९९ मध्ये समाविष्ट केली आहे. (२) त्या लीळेनंतर आलेली 'कुबजीकाभवना बीजें करणें' ही लीळा पूर्वार्ध ४२१ मध्ये समाविष्ट केली आहे. (३) 'रथावरि पतन' या चौथ्या लीळेनंतर येणारी 'अष्टविध ब्रह्मचर्य अनुवादु' ही लीळा उत्तरार्ध ४४५ मध्ये घातली आहे. (४) 'श्रीमंतपंचकीं गोकुळस्था वेधु' या ८ व्या लीळेनंतर आलेली 'क्षीराब्धी-गमन' ही लीळा पूर्वार्ध ३६३ मध्ये समाविष्ट केली आहे. (५) त्याच लीळेपुढे आलेली 'राजसूइं अग्रपूजास्वीकारू' ही लीळा म्हणजे उत्तरार्ध ४४७ वी लीळा होय. (६) 'कौरवा सवावो' या ९ व्या लीळेनंतर 'योध्यसमइं अर्जुना ज्ञानदान', 'विभूति निरोपणें', 'विश्वरूप दाखवणें' व 'संजयो प्रतीति' या चार लीळा येतात. त्या लीळा उत्तरार्ध ४४८ मध्ये समाविष्ट आहेत. (७) 'जैद्रथवधु' या १० व्या लीळेनंतर आलेली 'उधवदेवा आज्ञाभंग अभावो 'ही लीळा उत्तरार्ध ४३० मध्ये समाविष्ट आहे. (८) 'मदनदर्पहरण' या २५ व्या लीळेनंतर आलेली 'मीथळे सूतदेवा जनका भेटि' ही लीळा

उत्तरार्ध ३३१ मध्ये समाविष्ट आहे. (९) 'उधवदेवा अपरोक्ष' या २७ व्या लीळेनंतर आलेली 'वज्रप्रतिष्ठा' ही लीळा पूर्वार्ध ४०२ मध्ये समाविष्ट आहे. (१०) 'विश्वरूप उपदेसें अर्जूना पूनस्मरण' या ३० व्या लीळेनंतर आलेली 'बळिभद्रीं साजात्यां वेधु' ही लीळा उत्तरार्ध ४४६ मध्ये आलेली आहे. (११) त्या लीळेपुढे आलेली 'जरासंदा पाठिवर्ण' ही लीळा उत्तरार्ध ११ मध्ये समाविष्ट आहे.

काही पोथ्यांत 'द्वापरीच्या' (=श्रीकृष्णचरित्राच्या एकूण ६२ लीळा आढळतात. त्यात 'पिढी-पाठा'तील ४८ लीळा (मजकुराच्या कमीअधिक फरकाने) तर असतातच, शिवाय जास्तीच्या १४ लीळा आढळतात. त्यांपैकी 'धर्मदर्पहरण', 'मुचकुंदा मोक्ष देणें', 'प्रभासे कुमरनिमज्जन' व 'भानामतीए कपटदर्शन' या चार लीळा अनुक्रमे पूर्वार्ध ४९०, उत्तरार्ध ११, उत्तरार्ध ४२४ व उत्तरार्ध ४६५ या लीळांच्या टीपांत उद्धृत केलेल्या आहेत. इतर लीळा पुढे देत आहे. या लीळा **पं.** प्रतीतील 'द्वापरलीळा'तून येथे उद्धृत केल्या आहेत.

**माहाबळपूजा पूतने भाओ :।।** सर्वज्ञें म्हणीतलें : "पूतना कंसासीं पैजा घेतली : मां चौरासी वीखें स्थनीं भरूनि गोकुळासि आली : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति एस्वदेचां उसंगीं होते : तेहीं देखीलें आणि हावरू घेतला : गुंजावर्ण डोळे : श्रीमुगुटीं जावळ पींजारलें : आणि झेंप घातली : स्थानपान करूनि सोखीली :" ।। ३ ।।

**हनुमंत दर्पहरण ।।** श्रीकृष्णचक्रवर्त्ती बळीचेया भुवनासि बीजें केलें : सरीसे हनुमंतदेव असति : तवं तेयांसि मर्दना होत होती : दंडवत केलें : श्रीचरणां लागले : मग गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : तवं तेयांची आंघोळि जाली : हनुमंतदेवातें म्हणीतलें : 'पैले कुंडलें देया हो :' कुंडल उचलुं गेले : तवं उरावरि पडिले : कीरिकीरि बोबाइले : तवं बळिची राणी वींसावली आली धावंत : तेया ऐसी करांगुळीए सूनि वोपिलीं : ते लाजिले : तीया म्हणीतलें : 'जी जी : हे कवण ?' श्रीकृष्णचक्रवर्ती म्हणीतलें : 'हे हनुमंतदेव :' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'हें काइ हनुमंतदेव हो ?' 'जी जी :' तेयांचा गर्व होता तो गेला : सर्वज्ञें म्हणीतलें : "जो पर्वत काखे घाली : तेयांसि कुंडल काइ ? परि ते श्रीकृष्णचक्रवर्त्तीची लीळा !" ।। ३९ ।।

**सीष्टाइए जाणें :।।** महदाइसीं गोसावीयांतें पुसीलें : "हां जी : कौरवांसि इतुकें वोखटें जालें तरि गोसावी कांहीं म्हणतीचि ना : नां सीकवीतीचि नां : तें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ती पांडवांतें म्हणीतलें : 'तुम्हीं यांसीं जूं न खेळांवें : आणि यांसि वीस्वासावें नां :' सूरकवडी चेंडुफळी खेळतां भीमसेनें प्रभवीलें : ऐरावति स्वर्गींहुनि अर्जुनें आणिला : एं तीन्हीं तेयांसि खूपतेंचि असति होतीं : तवं सगुणीयां मामां : तेणें कपटाचे पार्फासे केले : पांडवांतें बोलाअुं पाठवीलें : मुळ केलें : तुम्हीं आम्हीं बापभाउ : ऐसें मोहवीलें : नेले : 'वेळु न गमे तरि या : सारीपाट खेळों :' पहीलें सत्य हारवीलें : दुसरें राज्य : तीसरें वनवासू : चौथें आपणयांतें : ऐसें धर्में हारवीलें : मग तेयांतें बांधौनि मग दृपदीसि आणावेया गेले : आणि दुर्योधनें म्हणीतलें : 'ए : सौंदरी : बैस माझीए जानुवरि :' दृपदीया म्हणीतलें : 'तुझीए जानुवरि बैसो काळु : माहाकाळु वडवानळ वडवडीतु : आणि गदा बैसो भीमांची :' तवं दुर्योधनें म्हणीतलें : 'हीरा रे वस्त्रें :' वस्त्रांचें उटंगर जालें : दुस्वासनाचे हात राहीले : तवं भीमसेनें धर्माची वास पाहीली : धर्में वारिलें : मग दृपदीया द्रोणाभीस्मातें म्हणीतलें : 'ताता : आमचे हारि फळें असे तें देया :' दुर्योधनें म्हणीतलें : 'वोपा रे : हेचि काइ करील ?' दृपदीया डाओ पाडिला : सत्य सोडवीलें : आपणेयांसहीत पांडवांतें सोडवीलें : डाओ परतला म्हणौनि दुर्योधनें फांसे टाकिले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तीपासि आलीं : श्रीकृष्णें म्हणीतलें : 'तुमतें वारिलें होतें कीं ?' मग वनवासा गेलीं : वनवासींहुनि आलेंयां श्रीकृष्णचक्रवर्त्ती सीष्टाइए गेले : 'दुर्योधना : पांच गव्हाणें

पांडवासि राहावेया दे :' तेणें म्हणीतलें : 'हें अवघें हाचि करीते : धरा धरा रे यासीचि :' गोसावीं वीज्ञान प्रगटीलें : आपण बीजें केलें : सरीसे वीदुरदेव : भीस्मदेव : बोळावीत आले : तवं कर्ण भेटला : श्रीकृष्णें म्हणीतलें : 'कर्णा : आपुलेया बंधवातें सीकवीसि ना ?' तेणें म्हणीतलें : 'काइ सीकउं जी ? जोन्हळेयाची पाइकी :' श्रीकृष्णें म्हणीतलें : 'काइ गा रायांचीया राणियां खूटु व्यालीया :' ते प्रतौनि आले : तवं एकमेकांतें हाणताति : बांधताति : तेहीं म्हणीतलें : 'हें काइ ?' 'नां श्रीकृष्णातें बांधतों : धरीतों : मारीतों :' वीद्रुदेवीं म्हणीतलें : 'तेयासि आम्हीं बोळाउनि आलों : तो गेला : तो तुम्हीं काइ धराल पापीए हो ?' मग वीज्ञान पारूखवीलें :" ।। ४१ ।।

**भीस्माचार्या गुरूप्रतज्ञाभंगु :।।** महदाइसीं म्हणीतलें : "हां जी : श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणितलें : 'सर्व तो मीं :' तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साच बाइ : दुर्योधनें भीस्माचार्यातें नोकीलें : 'काळु : कामु : एमु तुझां आंकणां : मां काइसी पांडवें ? तरि तुं आमसीं मावेचा : म्हणां :' ऐसा नोकीला : मग तेणें म्हणीतलें : 'उदयांचि नीपांडवी पृथ्वी करीन : आणि नीसस्त्रीया श्रीकृष्णांकरवि सस्त्र जरि मीं घेववीं तरि भीस्मू होए :' ऐसी प्रतज्ञा घेतली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ती पांडवांसहीत तेथ बीजें केलें : तवं तो प्रातकाळीं आंघोळि करूनि देपुजेसि ध्यानीं बैसला असे : श्रीकृष्णचक्रवर्त्ती आसनीं उपवीष्ट जाले : धर्माअर्जूनांसि खूणावीलें : 'उगेयां एकमेकां दंडवतें करा : काळियानीळीया पाटाउवांचीया बुंथी सव्य घालुनि एकमेकां दंडवतें करा :' तो म्हणे 'चीरंजीवीत : चीरंजीवीत :' ध्यान वीसर्जेलें : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्तीतें देखीलें : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलें : 'हें काइ जी ? गोसावीं केव्हळि बीजें केलें ?' आणि श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'तुम्हीं प्रतज्ञा घेतली होती : नीपांडवी पृथ्वी करीन :' म्हणितलें होतें तें साच ? कीं आतां चीरंजीवीत म्हणता तें साच ?" तेणें म्हणीतलें : 'श्रीकृष्णा : हें अवघें तें तुंचि : तरि आतां' चीरंजीवीत 'हें सत्य सव्य :' मग यूध्य प्रवर्त्तलें : भीस्में अर्जूनु कासावीसी केला : वरि बाणु एतां देखीला : आणि श्रीकृष्णचक्रवर्त्ती रथाचे घोडे अगणखीले : मेटें घातलीं : अर्जूनु खालौता जाला : मुगुटावरौनि बाणुगेला : श्रीकृष्णचक्रवर्त्ती सूद्रसेन हातवसीलें : भीस्में म्हणीतलें : 'हा मीं होए कीं जें सस्त्र घेववीलें :' मग भीस्मू पडीला :" महदाइसीं म्हणीतलें : "हां जी : भीस्माचां बाणीं जरि अर्जूनु पडता तरि गोसावी काइ करीते जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तरि हें डीवळ पृथ्वीचें एरीवाहीं घालीजतें :" श्रीकराचा अनुकारू दाखवीला : ।। ४२ ।।

**तथा सैन्यभेद करणें :।।** महदाइसी पुसीलें : "हां जी : नाराएणी सैन्य : आणि कृतवर्मा दळवै : गोसावीं कौरवांसि दीधलें : तरि तेयाचा कांहीं प्रतापु नाहीं ? ना काए जालें ऐसें कांहीं आइकीजे ना जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भीस्म पडलेयांउपरि दोन्हीं अरणी उनता जालीया : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ती कृतवर्मेयातें बोलावीलें : श्रीकृष्णें म्हणीतलें :' कृतवर्मे हो : तुमचेया कटकाआंतु कापुसू केतुकेया वोपे ?' तेहीं म्हणीतलें : ' हें काइ जी ? ' म्हणौनि खदखदकरि हांसीनला : मुखेंसीं वोली धरूनि हांसतुचि गेला : तवं दुर्योधनें पाचारीला : 'कृतवर्मे हो : कृष्णें कां पाचारीलेति ? काइ म्हणीतलें ?' तवं तेणें म्हणीतलें : 'काइ सारा नां : मज म्हणीतलें : तुमचेया डेरेयाआंतु कापुसू केतुकेया वोपे ? म्हणौनि हांसीनलां :' दुर्योधनें म्हणीतलें : 'पाहा हो : आमसींचि झांसा : हे काइ आपुलेया स्वामीसि अंतर देतील ? हे काइ जुंझती ? तुम्हीं जुंझा तरि तुमचेया स्वामीची आण असे : तुम्हीं जा :' तैसेचि ते आले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ती तेयांसि पाठवणी दीधली : मग आपुलेया स्थानासि गेले : बाइ :" ।। ४४ ।।

**भीमसेनांसि आवेसू कथन :।।** सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : मग थोर यौध्ये जालें : भीमसेनु हस्ती हस्तु : घोडेनि घोडा : 'हां हां' म्हणौनि मारीति : भवंडौनि टाकी : तवं दुस्वासनु घायासि आला. तोही पडीला : भीमसेनें म्हणीतलें : 'हां रे : दृपदीएसि हातु लावीला : तो कोणु रे ?' म्हणौनि उरावरि

पाओ देउनि उजवी बाहे उपडीली : मग म्हणीतलें : 'आगा ए दोन्हीं अरणीचे वीर हो : हा दुस्वासन गाए : मीं भीमसेनु वाघु : तरि सोडा कोण्हीं : ' तवं अर्जुनु आवेसला : 'आम्हीं गाइब्राम्हणांचे वेळाइत : जावों सोडअुं : ' तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'अरणीं आवेसले वीर काइ एक न बोलति गा ?' म्हणौनि वारिलें : " ।। ४५ ।।

**दुर्योधन वधु : ।।** महदाइसीं गोसावीयांतें पुसीलें : "जी जी : दुर्योधनें काइ केलें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दुर्योधनु समुद्रीं लपाला : द्रोणु थडिए बैसला होता : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ती भीमसेनासीं सहीत बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'भीमसेनां : पाचारि पां : ' तेथ भीमसेनें पाचारीलें : मग दोघांसि माहायूध्य जालें : भीमसेनु भंगिला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तीची वास पाहीली : तवं श्रीकृष्णें जानु थापटीली : भीमसेनासि खूण जाली : तैसीचि गदा मांडिएवरि हाणौनि पाडिला : मग म्हणीतलें : 'घे गा धर्मा राज्य : ' " सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयांसि ऐसें जालें बाइ : " ।। ४६ ।।

**द्रोणा देहेवीयोगु करणें : ।।** अस्वस्थामां भीमसेनें अर्थेसीं टाकीला होता : तेयाची कव्हणाहीं सूधि नाहीं : म्हणौनि द्रोणाचार्या देह सांडुनि स्वर्गासि गेला : ते वीदेही : ते देह सांडुं न सकति : घेवों सकति : पुत्राचेनि वीयोगे आणि अपमानाची लाज : म्हणौनि देह त्येजिलें : श्रीकृष्णचक्रवर्त्तीन म्हणीतलें : "अर्जुनातें : 'हें देह वीसखळीत करि : एकु एकु नगु एकीकडे टाकि' टाकीला : ऐसें अवघेंचि भंगीलें : " ।। ४७ ।।

**तथा बब्रा प्रेम : ।।** "पद्मावतिया म्हणीतलें : 'बा बब्रा : तुझेया पुर्वजासीं जूझ मांडलें असे : तरि जासि ना सावेयासि ?' तेणें तीनि कांडें घेतलीं : तेयातें म्हणीतलें : 'बा बब्रा : तुं कोणाकडे होसी ?' तेणें म्हणीतलें : 'जे हारवीती तेयांचेकडे होइन : ' मग तैसाचि नीगाला : तवं श्रीकृष्णचक्रवर्त्ती ब्राम्हणांचें रूप धरूनि साउगेयां बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'तुम्हीं कवण ? कवण ठाउनि एता ?' तेणें म्हणीतलें : 'मीं बब्रू : पाताळौनि एतें : ' 'कोठें जाता ?' 'ना कौरवांपांडवां यौध्य माडलें होतें : तें सावेया जातें : ' श्रीकृष्णचक्रवर्त्ती म्हणीतलें : 'तुम्हीं कवणीकडे होआल ?' तेणें म्हणीतलें : 'जे हारवीती तेयांकडेचि होइन : ' श्रीकृष्णचक्रवर्त्तीन म्हणीतलें : 'एं कांडें तीनचि काइसीं ?' तेणें म्हणीतलें : 'ना लोक कीती ? तीनचि : ना चौथें कोणालागि वाहों ?' श्रीकृष्णें म्हणीतलें : 'वींधा का पाताळ लोकु : ' तेणें वींधला : तवं श्रीकृष्णचक्रवर्तिचां तळवां सूबा उमटला : श्रीकृष्णें म्हणीतलें : 'हा हें सत्य करीलचि : ' मग म्हणीतलें : 'माग माग : प्रसन्न जालां : ' तेणें म्हणीतलें : 'आम्हां क्षेत्रीयांसि हातु वोडअुं नैए : तुम्हीं मागा : ' श्रीकृष्णें म्हणीतलें : 'दे भाख : ' दीधली : श्रीकृष्णें म्हणीतलें : 'तुम्हीं आम्हांसि सीर देया : ' तेणें म्हणीतलें : 'जी जी : देइन : परि मीं जे म्हणौनि आलां तें मीयां देखावें जी : ' सर्वज्ञें म्हणीतलें : 'देखाल : ' मग दंडवत करूनि सरेंचिकरूनि सीर छेदीलें : 'घेइजो जी : ' श्रीकृष्णें श्रीकरीं घेतलें : आबिठेयावरि रेवीलें : तो पाहातुचि होता : मग कुरक्षेत्र नीवारलेयावरि धर्मे म्हणीतलें : 'मीयां जींतलें : ' अर्जुनु म्हणे : 'मीयां जींतलें : ' भीमसेनु म्हणे : 'म्यां जीतलें : ' ऐसे अवघेचि वेवादति : श्रीकृष्णचक्रवर्त्तिन म्हणीतलें : 'जा पुसा बब्रासि : तो सांघैल तें साच : ' मग आले : बब्रासि पुसिलें : तेणें म्हणीतलें : 'मीं सूद्रसेन भवंतां देखें : आणि सूद्रसेनां मारीता देखें : तुम्हीं अवघेचि लटीके : ' तेयांसि गर्वू होता तो गेला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडवांसि राजीं बैसउनि आपण द्वारकेसि बीजें केलें : " ।। ४८ ।।

**ब्रह्मेयांची वीनती स्वीकारू : ।।** महदाइसीं गोसावीयांतें पूसीलें : "जी जी : कुरूक्षेत्र संपलेया-उपरि कळियौग कीतां दीसां रीगालें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : बावीस वरिखें गेलीं : **एवा.** दाहा वरिखें गेलीं : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तितें ब्रह्मेनि वीनवीलें : 'जी जी : योगाची सीमा अतिक्रमीली जी : बीजें कीजो : ' ऐसें वीनवीलें : तेयांसि सातां दीसांची कडे दीधली : मग मागौता पाठवीला : मग

यादवांतें म्हणीतलें : 'आतां द्वारका पांणिएं बुडैल : आतां तुम्हीं समस्त बाहीरि चाला : आतां हें नीजधामां नीगालें : तुम्हीं समस्त थडिएसि चाला :' मां प्रव्हाणीं बैसौनि समस्त थडिएसि आले : तेथ मेलीकारू जाला : मग पांडवांसि सांघौनि पाठवीलें : 'कळियौग रीगालें : तुम्हांसि एथ राहों नैए : तुम्हीं उतरापंथें जावें : आम्हीं नीजभुवनासि जाउनि :' ऐसें आइकौनि पांडव आदकले : थोर दुख जालें : आकांतु तेयांसि वर्तला : देसीं तडे पडिली बाइ :" ।। ४९ ।।

**हीराइ यूक्ति :।।** एं वीयोगीचीं चरीत्रें वीन्हया पुरुषांसि आणि वीरक्तेंचि आइकावीं : एरां साबडेयांसि आइकों नेदावीं : अंत:क्रणें जाती : काठीन्य एइल : वीपरीत बैसैल : उभएतांसि नरक घडतील : ।। ५० ।।

**रीखी वाइक्य कथन अंगिकारू :।।** महदाइसीं गोसावीयांतें गणपति मठी पुसीलें : "जी जी : रीखेस्वरें यादवांसि कां श्रापु दीधला जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीजधामां बीजें करूं आदरीलें : म्हणौनि दुर्वासदेव मानसीक दुखें व्याकुळ : चींताग्रस्त : ऐसे आक्रंदत बैसले असति : अधोवतक्र : तवं यादवकुमर खेळतखेळतें तेयांपासि आले : कुमरीं म्हणीतलें : 'आरे : आपणयांतें नीराहारी म्हणवीताति : आणि श्रीकृष्णचक्रवर्त्तितें बाळब्रह्मचारी ऐसें सांघताति तरि हें साच : तरि या पां : यांतें आम्हीं कांहीं पुसों : ते सांगती : कैसे पां सांगतील ? ' मग चेष्टा करूं आदरीली : तेहीं म्हणीतलें : 'आरे : उगे असा कुमरन्हो : जा परते :' ऐसें त्रीसूधी म्हणीतलें : तें म्हणीतलें न करीतीचि : मग एकु स्त्रीचें आवगला : पोटीं कांठवटि बांधली : आणि म्हणीतलें : 'जाणां पां : इचां पोटीं काइ आहे ? हें पोट कोणाचें ? ' ते म्हणति : 'उगे असा रे बा कुमरन्हो : उगे असा नां ? ' ते म्हणती : 'तुम्हीं त्रीकाळज्ञानिए : आणि श्रीकृष्णु बाळब्रह्मचारी : ऐसें जाणां : नां तरि हेंचि कां नेणां ? सांघा पां पोटीं काइ आहे ? ' तेयांसि श्रीकृष्णचक्रवत्तिचा वीयोगु : वरि तेयांची चेष्टा : मग तेहीं म्हणीतलें : 'इचां पोटीं जें आहे : जेणें तुमचा नीर्वंसू होए तें आहे :' मग श्रापीले : ऐसा श्रापु दीधला बाइ : मग श्रीकृष्ण-चक्रवर्त्तिपुढां सांघीतलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति म्हणीतलें : 'आतां तुम्ही प्रभासे जा : हे काठवटि उगाळा :' मग कुमर गेले :" ।। ५२ ।।

**रुक्मीणी देहावसान :।।** महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : तरि रुक्मीणी आउसांसि काइ केलें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसें आनां आन वर्ततां देखीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तिची प्रवृत्ति जाणौनि रुक्मीणीं म्हणीतलें : 'हें ऐसें काइ जी ? ' श्रीकृष्णचक्रवर्त्ति म्हणीतलें : 'आतां हें ऐसेंचि :' तवं तेयांचें उभयांचि देह गेलें : पडिलीं : आणि वृंदेचेंहीं गेलें : तेहीं पडिलीं : एरीं उपाए केले बाइ :" ।। ५४ ।।

**नर्कासूरां जन्म :।।** नरकासूरें लोहाचा पांजरा केला : डोइए घेउनि एत असे : तवं ब्राम्हणाचें रूप धरूनि श्रीकृष्णचक्रवर्त्ति साउमे आले : श्रीकृष्णचक्रवर्त्तिन म्हणीतलें : 'तुम्हीं कें जात असा ? हें काइ नेत असा ? ' तेणें म्हणीतलें : 'जी जी : लोहाचा पांजरा : श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि धरावेया जात असों :' श्रीकृष्णचक्रवर्त्तिन म्हणीतलें : 'श्रीकृष्णु तुम्हांसिचि एसणा असैल ? तुम्हीं पांजरेया आंतु रीगौनि पाहा पां :' तवं तो पांजरेयांतु रीगाला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति डांबीर दीधलें : आणुनि चीत्रसाळेचां खांबेंसीं बांधला : एक माहानुभाव म्हणति : 'तेयाचें नाव सूचीका दैत्य :' ।। ६४ ।।

ॐ ॐ

# अज्ञात लीळा*

## १ महात्मेयां गुरुभक्ति अनुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : "एक महात्मे आणि तयांचा सीष्य : दोघै भीक्षा करीत होते : बारा वरिखें अवरिखणें पडिलें होतें : जया घरीं भीक्षे जाति ते घरीं चालवीति : जया घरीं भीक्षे जाति ते घरीं चालवीति : परि नव्हे : मग तीहीं म्हणीतलें : 'बापुडा लोकु दुखीया होतु असे : *पुता : आतां आम्हांसि भीक्षा नव्हवे*[१] *:*' म्हणौनि जाउनि एका टेकावरि बैसले : मग सीष्यें सत्र[२] शोधीलें : तयांतें भीक्षा मागीतली : तेहीं म्हणीतलें : 'भीक्षा नेदुं : एथचि जेवा :' मग ते ताकभातु जेवीति : पैऱ्हां जाउनि वमीति : धुनि आपुलेया गुरूसि संपादीति : एर भीक्षु अत्यंत तुटले : एकु दीं तो सत्रकारू सत्र पडिताळावेया आला : आवघेयांतें पाहीलें : तवं तयांतें रोडिकेयां देखीलें : तेणें पुसीलें : 'तुम्हीं ऐसें रोडिकें कां?' 'ना काहीं नाहीं :' 'ना सांघा :' मग मागील आवघें सांघीतलें : मग तो सत्रकारांसि कोपला : 'आजिलागौनि तुम्हीं जेवावें : आणि आपुलेया गुरूलागौनि भीक्षा नेयावी :' मग ते जेविले : आणि गुरूलागौनि भीक्षा घेउनि आले : 'पूता[३] : आजिचें अन्न गौल्य[४] कैसें?' आणि ते भीयाले : 'भीयों नको : सांघ :' मग आवघी व्यवस्था सांघीतली : मग तेणें म्हणीतलें : 'पुता : सीनलासि ना?' मग म्हणीतलें : 'अवरिखणेनि लोकु थोरू पीडतु असे : आतां सर्व धान्यें होति ऐसा पाउस आणूं[५] : आणि

---

*मुरारीमल्लबासांच्या दुसऱ्या शोधनीतील 'अज्ञात लीळा'पैकी शेवटच्या अनेक लीळांच्या नुसत्या 'आदि' आहेत. काही लीळा **अहीबीने**. प्रतीत मूळ 'उत्तरार्ध चरित्रात'च अंतर्भूत आहेत. (उदा. **उत्त.** ४९४–५१५) त्यांच्या इतर 'अज्ञात लीळा' १ ते ८२ पर्यंत येथे घेतल्या आहेत. ८२ ते ९१ या लीळा **मु.** प्रतीतील उत्तरार्ध चरित्रातच आहेत. पण अन्य प्रतीत नसल्यामुळे त्यां येथे 'अज्ञात लीळां'त अंतर्भूत केल्या आहेत. ९२ ते ११० लीळा **नागराज** प्रतीतील असून १११ ते १५४ या लीळा 'प्रकरणवशा'तील आहेत. याशिवाय इतर अनेक 'अज्ञात लीळा' आढळतात. पण त्या स्वीकारल्या नाहीत.

१ (**शोध**). २ **ना.** छत्र. ३ **एवा.** °आजिचेया अन्नासि चवि अनारिसी कां? ४ **ना.** नीकें गोड. ५ **एवा.** पाडूं.

काइ :' मग सर्व धान्यें होति ऐसा पाउस आला : लोकां सुकाळु जाला : आश्चर्ये जालें : ऐसें गुरुभक्तीचें कार्ये :" *सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तै तैसें सत्व होतें : आणि साधनीं पुरुष दृढ होतें*[६] *:"* ॥

## २ बसो जैतानुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : "गावांतु पारीं आवघेचि बैसले असति : तवं उकरडेयावरि दोनि वसो जुंझताति : तयांतु एक म्हणे : 'हा तांबा नीका :' दुसरा म्हणे : 'हा काइसा ?

६ (एवा.) ह. प्रतीतील अज्ञात चरित्रात ही लीळा पुढीलप्रमाणें आलेली आहे:

**मर्छदि गोरक्षी भेटि : भगमुख कथन**

"गोरक्षी मछंद्रीचेया नगरासि गेला : दारवठां रीगों बैसला : तवं दारवठेकार रीगों नेदीति : तेयासि मछीद्रनाथें नीरोपु दीधला होता : 'कव्हणी सीधसाधकू पुरुषू रीगों नेदावा :' ते रीगों नेदीतिचि : मग तो तेथचि बैसला : स्वछरू एकु गेला : तवं जटासि कोंभ फुटले : एकु दीं मछीद्रीनाथु बाहीरि नीगाला : तवं तेयातें देखीलें : 'हा कवण रे ?' तवं तेहीं म्हणीतलें : 'आम्हि नेणों : तुम्हीं नीरोपु दीधला होता : कव्हणी सीधसाधक रीगों नेदावा : तरि यासि रीगों नेदुंचि : तवं हे एथचि बैसले : सवंछरू एकु गेला : यांसि :' तवं मछीद्रनाथें म्हणीतलें : 'हा गोरक्षी रे :' मग टाळि चेतवीली : मग भीतरि बोलावीला : तेणें सीक्षा केली : पुढें बैसला : 'गोरक्षी : कब आया ?' 'आयोसु : अबचि आया :' तेथीलु रावो मारिला होता : तेयाचेया बारासें राणीयां घरीं पातलीया होतीया : वडील राणी तीचेया पोटा रावो आला होता : तेयां नांव मीननाथु ठेवीला होता : तो वडील जालेयां अवघीयां जोगीयाचें भस्म करील : ऐसें गोरक्षी जाणे : एकु दीं मीननाथु मछीद्रनाथाचीए मांडीएवरि बैसला होता : तवं तेंणें वीष्टि केली : मग तेणें म्हणीतलें : 'हा धौनि आणी रे गोरक्षि :' गोरक्षीन नेला : तो सीळेवरि उपटिला : कुपावरि वाळों घातला : एउनि मछीद्रनाथापासि बैसला : राणीयां पुसीलें : 'मीननाथु कें ?' 'अयोसु : तो धुनि वाळों घातला :' 'ऐसें काइ गोरक्षी केलें ?' 'आयोसि : तुम्हीं आपुलें पुर्व आठवा ना : भगमुखीं पडिले असा : हा कोणु तुम्हीं नेणा : हा रावो मारिला होता : तोचि तुमचेया पोटासि आला :' 'तो माघौता जीववा रे :' 'हो कां : मजसारीखे सहश्रसींगीं वाजवीति तेधवां तो उठिल :' **एवा :** उठिला : बारा राणीयांतें एकीं भुइरीं घातलीया : मछीद्रनाथातें घेउनि गेला : धुळिकोठेसी गेले : आसन घातलें : आसनीं बैसला : काष्टी लाउनि बैसला : तवं न लगे : मग माहादेवापासि गोरक्षी गेला : तेयातें म्हणीतलें : 'मछीद्रनाथु भगमुखीं पडिला होता तो मीयां काढीला : काष्टी लावी ते लागे ना : तरि काइ करूं ?' तेह्वळी माहादेवें ब्रह्मप्रकासीका दीधली : मग काष्टी लावीली : तैं बारा वरिखें अवरिखणें पडिलें : देसीं अन्न नाहीं : नागार्जुनें अनाचें सत्र घातलें होतें : तें तेथौनि बारा गाउवें होतें : तेथौनि तो भीक्षेसि ए : परि सत्राबाहीरि अन्न नीगों न ए : मग गोरक्षी भीतरि जेवी : बाहीर जाउनि वमन करी : पात्रीं घालुनि धुये : मग तेयालागि ने : ऐसा संवछरू एकु गेला : एकु दीं गोरक्ष पव्हेआंतु बैसला होता : तवं नागार्जुन आपुली पव्हे पाहावेया आला : कणैरीचेया खांदावरि हातु : अवघा पव्हा मोटाधाटा देखीला : गोरक्षी रोडु देखीला : मग कणैरीतें पुसीलें : 'कणैरी : अवघा पव्हा मोटा : हा कां रोड ?' 'आयोसु : तुम्हीं सत्र बाहीरि नीगों नेदा : तरि तुम्हीं यातें नोळखा ? हा गौरक्षी : यासि जेउं घाला : हा मागौतें काढीं : पात्रीं घालुनि गुरुलागि ने :' मग नागार्जुनें म्हणीतलें : 'यांसि भीतरी जेउं घालावें : पात्र भरूनि गुरुलागी देयावें :' नागार्जुनें म्हणीतलें : 'गोरक्षी : तुझेया गुरूलागि इतुकें सामर्थ्ये नाहीं जें आपणेयापुरतें अन्न मिळे ?' मग तो नीगे : गुरूपुढें पात्र ठेवीलें : ते जेवीति : तवं तें

काळाजांबुळा तो नीका किं :' ऐसे दोघै उदास होति : उरोधीति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तांबा नीका जाला तरि तयासि काइ ? ना जांबुळा नीका जाला तरि तयासि काइ ? ऐसे उर्मी कां पडति ? म्हणौनि अभिमानु जींकावा[१] :"।।

## ३ तथा वोसरी नीराकरणें

एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळिका : तुम्हीं साडेगावा : आणि प्रतिष्टानामध्यें वासु न करावा गा : जरि कराल तरि वोसरी लागैल :" मग गोसावीयांमागां तीहीं तेंचि केलें : राक्षसभुवनीं ओसरीये होते : तेथचि देहत्यागु जाला : ।।

## ४ तथा भोगसेवे स्मरणाभावो कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : लोक तुम्हां पुजापुरस्कार करितील गा : टीळे : माळा : ताटे : ठाणवैया : सरवळयांनाखवेयांचिया खीरी : वरि तुपा भरिलीया वाटिया : तेव्हळि हें बोडिकें तुम्हां कां गा आठवैल ?" नाथोबा उगेचि होते : ।।

## ५ तथा परमेश्वरपुरकापडीप्रसंसा

एक वेळ नाथोबा परमेश्वरपुरूनि आले : गोसावी उभे ठाकले : क्षेमाळिंगन दीधलें : परमेश्वरपुरिचे कापडी म्हणौनि मानु केला : आपणेयांजवळि बैसवीलें : मग गोसावीं अनुकरूनि श्रीप्रभूची क्षेमवार्त्ता पुसिली : "काइ गा : श्रीप्रभु नीकेनि राज्य करीत असति ?" नाथोबायें म्हणीतलें : "हुं[१] :" "भक्तजनें नीकेनि असति ?" "हो :" तवं बाइसीं म्हणीतलें : "मर मर पोरा : तुझिये मडां बांधे घागरा : जो जाए मसणवरि बोबातु : बाबा श्रीप्रभूची क्षेमवार्त्ता पुसत असति : कीं करिताये 'हो : हुं :'" सर्वज्ञें

---

अन गौल्य लागलें : परि कोवळीक नसे : मग तेणें म्हणीतलें : 'हा रे पुता : नीच अन आणीसि तेया अना कोवळीक असे : या अन्ना कोवळीक नाहीं तें काइ ?' 'ना आयोसु : पाठीवरि हातु ठेवाल तरि सांघौन :' 'ना ठेवीला :' मग छत्रिची वेवस्ता सांघितली : 'आयोसु : नागार्जुनु ऐसें म्हणे : जें तुमचेया गुरूसि आपणेयापुरतें अन मीळे इतुकें सामर्थ्य नाही ?' 'हो कां : चौहाटवटिया ऐसें फोकरिजे : जें धान्यें वरिखों कीं पाणी वरिखों ?' लोकें वीचारिलें : 'पाणी वरिखैल : मां वाहों कै ? मां पेरूं कै ? तरि धान्य वरिखा म्हणों :' 'ना जी : धान्यें वरिखावीं :' 'हो कां : तरि आपुलालीए ठाइचें घेयावें: आणिकाचें नेघावें :" मग आपुलालीचि घरीं खळीं वाखारिया केलीया : मग धान्यें वरिखों लागलीं: आणिकाचे हात घीतले : आणि वरीखों राहीलीं :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "भक्ति तरि गोरक्षीची : **एवा :** भक्ति तरि माहात्मेयाची गा :" ऐसी भक्ती वीसेखीली : ।। (**ह.** अज्ञात ४३).

**२. १ एवा.** सर्वज्ञें म्हणीतलें : "मार्गीं संन्यासी जात असति : तवं काळा तांबा वसो : ।। शोधु : ।। काळा खैरा वसो : ।। दोन्हीं जुंझति असति : एक म्हणति : 'काळा माझा :' एक म्हणति : 'खैरा माझा :' ।। शोधु : तांबा माझा : ।। मग जयाचा जींके तो म्हणे : 'ऐसा घे : ऐसा ने : ऐसा पीटि :' ते जुंझति : आणि ते दोघै वीकरति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एवं पर्यंत वीकारू गा :" ।।

**५. १ एवा.** हो.

म्हणीतलें : “ बाइ : पोरु तेधवांचि अपराधा आला : परि परमेश्वरपूरिचा कापडी : म्हणौनि उपसाहिलें : ”।।

## ६ गोपाळप्रसंसा

[१]महदाइसीं गोपाळ प्रसंसिले : सर्वज्ञें म्हणीतलें : “ बाइ : एक अरण्यपशु : एक ग्रामपशु : एक ते गावांतु असौनि पुन ते गावांतुल काहींचि नेणति : तयांपसि अरण्यपशु ते चांगु : गावीं काये वाहे वर्त्ते ऐसें नेणे : हें होए : हें नव्हे : ऐसें नेणे : थोरी पाहातां जाये : अवसीये वीळव्यन्हीं रानीं असे : तो गावांतुली क्रीयेसि वेगळा होए : तो चांगु : ऐसेयां होआवें कीं : बाइ : सींवनचींचना आपुला मोटाळा बाहीरि घालावा : ” ।।

## ७ जनवीहारीं अज्ञान कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : “ भोजया : विखो भोगुं कव्हणीचि नेणे : जेउं कव्हणीचि नेणे : घांसु घेवों कव्हणीचि नेणे : तांबुळ घेवों कव्हणीचि नेणे : कैसिया फोडी घेयाविया : वीडिया घेवों कव्हणीचि नेणे : ” ऐसें गोसावीं नीरूपण केलें : दायंबायें उगयांचि आइकीलें : ।।

## ८ भटां प्रक्रमशक्त्यानुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : “ तेथ वानरेश ऐसें दीसत होते : जें सृष्टिसंहारु करिती : ” ।। **एवा :** ।। “ तेथ वानरेश : ऐसें दीसत होते : जें सहश्र पाठिमोरे करिती : ” ।।

## ९ भोजा अन्नेकसंग्रामारूढानुवादु

दाइंबा भीक्षे जाति : ते झोळीये पात्र घालीति : मग वेगळवेगळे पदार्थ घेति : येउनि गोसावीयांसि झोळी दृष्टपुत करीति : तें देखौनि एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : “ भोजया : तुम्हीं झोळीये पात्र न घलावें : ” दाइंबायें मानिलें : मग दोनि झोळिया केलिया : मध्यें दोनि दोरे घातले : च्यारि वाखोरे केले : चहुं वाखोरां आधिलाहीपसि वेगळे वेगळे बरवे पदार्थ घेतले : आणि आणौनि गोसावीयांसि दृष्टपुत केले : गोसावीं[१] ऐसें अवलोकूनि हांस्य केलें : सर्वज्ञें म्हणीतलें : “ भोजा काइ भोजा अन्नेक संग्रामारूढ : ” ।।

## १० बाइसां पदार्थ सांघणें

बाइसें जेधवां जें न देखति तेधवां तें गोसावीयांसि पुसति : “ हां बाबा : अमुकें तें दीसे ना ? ” आणि गोसावी सांघति : “ बाइ : अमुकां ठाइं असे : पैल घेया : हें घेया : ” ।।

---

६. १ **मुना.** सर्वज्ञें म्हणीतलें : “गोपाळ उदयां गाइ राना सोडीति : वीळव्यन्हीं रानीं असति : बीळिचां गावांतु येति : अन्न खाति : सवेंचि नीजति : तीयें उदयांचि उठीति : सवेंचि राना जाति : गावींचे आहारवीहार काहींचि नेणति :—”

९. १ **एवा.** गोसावीं झोळी अवळोकिली : आणि पदार्थ स्पर्शिले : एतुलेनि हास्य केलें.

## ११ तथा परिग्रहो परित्यजवणें

बाइसें आर्त्ती : १ : पालिमंडें : २ : वाटें : ३ : वाटी : ४ : श्रीखंड : ५ : आंगी : ६ : टोपरें : ७ : पासवडा : ८ : आंगदाटना : ९ : गाळनी दोनि : १० : पासवडी : ११ : तांबतौली : १२ : पुड : १३ : वाटोवा : १४ : जाडि : १५ : फुटा : १६ : खांडोवे दोनि : १७ : ऐसा परिवंटु : पोतें सकणा[1] तांदुळांचें एक : १८ : वळिवटाचें एक : १९ : वडे पापड एक : २० : हींगामीरियांचें एक : २१ : साकरेचें[2] नारिएळ[3] : २२ : तुपाचा डो : २३ : चीकसयाची पोटळी : २४ : सोजीचें पोतें : २५ : लोनाचें पोतें : २६ : इतुकें वाहाति : परि ओझें ऐसें न मनीति : जेथ अवस्थान तेथ तरि मादणयांचें मडकें : पाणिभाताचें मडकें : भरणा[4] : आणिकही दोनिच्यारि वस्त्रकापड : ऐसा अपार परिग्रहो देखौनि गोसावीयांसि खंति ये : तें गोसावीं सांडवीति : ।। शोधु : ।। गोसावी म्हणति : "बाइ : लागेल तेंचि घेया : एर[5] पेणें पातलेयां एइल :" तऱ्हीं एकही न संडीति : ।। मग यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "माहात्मेयांसि आश्रो परिग्रहो यें दोन्हीं न व्हावीं कीं :" मग नीगतां त्यजवीति[6] : गोसावी म्हणति : "बाइ : ऐसें कां मेळवीतां ?" "बाबा : काहीं फेडावया : सांटवावेया नाहीं :" गोसावी उगेचि : मग तीयें अवकाशा : कां भीक्षे जाति : आणि गोसावी अवघे फोडवीति : बाइसें एति तवं काहीं न देखति : मग म्हणति : "कटकट बाबा : काइसेया फोडवीलें ?" गोसावी म्हणति : "बाइ : तुमतें वारिलें कीं : हें काइसेया मेळवीत असा ?" "बाबा : काहीं फेडावया सांटवावया होतें ?" *भटीं म्हणीतलें : "जी जी : बाइसें म्हणताति तेंचि करा :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं : माहात्मे कीं गा : माहात्मेया आग्रहो परिग्रहो न व्हावा : महात्मेनि कौपीनोद्धारण करावें : एर ते आवघे आलंबन कीं :" "हो कां जी[7] :"* ।।

## १२ नष्ट नाथपंथानुवादु

एकु दीं गोसावी आसनावरि उपविष्ट असति : तवं एक अन्य महात्मे भीक्षेसि आले : तीहीं भीक्षा शब्दु म्हणीतला : 'सींगरूं खनति :' ते आइकौनि गोसावीं हास्य केलें बाइसीं म्हणीतलें : "बाबा : हास्य कां केलें[1] ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हा ठावोवेऱ्हीं विभचरले :" "तें कैसें बाबा ?" "बाइ : यां महात्मेयांचां गुरूनि ऐसें सांघितलें : 'श्रीगोरक्ष अनंत सीध :' तें गेलें : आणि 'सींगरूं खनति :' ऐसें जालें : ऐसेंचि कीं या

---

**११.** १ **एवा.** स्वकण. २ **ना.** साकरेचा वोळंकु. ३ **ना.** वोळंकु. ४ **एवा.** °गुळळेयाचा : उदकताविता : तांदुळाचा : तौली : आणिकही—. ५ **एवा.** °तुम्हां पेणोवेणां लागैल तें येइल. ६ यापुढील भाग **ना.** प्रतीत स्वतंत्र लीळा म्हणून आहे. **मु.** प्रतीत तो **शोध** म्हणून दिला आहे. ७ (**प्रव. आमा.** १५९, १६०).

**१२.** १ **शोध.** °ते जावे होते म्हणौनि गोसावी उगेचि : मागौतें बाइसीं पुसिलें तवं ते गेले : मग—.

मार्गासि होईल :" "तें कैसें बाबा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "घरें सांडिती : मढिया बांधती : संबंधियें लेंकरूवें बाळें सांडिती : सीष्यें लागती[२] : ऐसा मैळतुमैळतु नष्ट नाथपंथु होइल :" ।।

## १३ दायंबा महंतप्रसंसा

एकु दीं गोसावीयांपुढां दाइंबें आपुली गोष्टि सांघितली : "जी जी : सोयेरेयांधाइरे-यांचेया गावां जाएं : तरि तीयें मज आदर मानु बरवा करीति : स्नानें : जेवणें : आड-वाटिया : ठाणवैया : तुपींभातीं बरवीं अन्नें : ऐसा मानु करीति :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "भोजया : यथौनि तुम्हीं केसणे[१] : ऐसेंयां आपणेयां तुम्हीं नेणा गा : तुम्हीं जयांचेया ठाया जाल : तया परम भलें एक आति कीं गा भोजेया :" ।।

## १४ तथा भीक्षान्नप्रसंगें थोरी प्रभाषणें

एकु दीं दाइंबा भीक्षा करूनि आले : झोळी गोसावीयां दृष्टपुत केली : गोसावी अवलोकूनि म्हणीतलें : "भीक्षा होति असे ?" दाइंबायें म्हणीतलें : "होए ऐसी जी : कव्हणी आदरें घालीति : कव्हणी 'चाला' म्हणति : कव्हणी अवज्ञा करीति :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तीयें अवज्ञा करूनि तन्हीं घालुतु कां गा : परि तुम्हीं जयाचेया दारा जाल : दारीं उभे राहाल : मग जयांचा चुळभरि उदका भराल : तुमचां पात्रीं[१] इतुकें ऐसें अन्न जयाचें पडैल : तयाची थोरी एथौनि सांघों नेणिजे किं गा भोजया :" ।।

## १५ महदाइसां हंस अवतारू निरूपण

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : आजि पुराणीं नीगालें : जें हंसावतारें ब्रह्मयां-चिये सभे सनकादिकां ब्रम्हवीद्या नीरूपीली : तरि हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति बाइ : परि तें एथौनि तुम्हांपुढां सांघिजैल :" गोसावीं अवघें हंसावताराचें नीरूपण केलें : अवतारज्ञान केलें : मग सेवटीं म्हणितलें : "बाइ : हें शास्त्र हंसावतारें ब्रम्हयांप्रति नीरूपिलें : परि अधिकारेंविण घेतें द्वार नुघडेचि :" *यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्ती जें निरोपिलें गीताशास्त्र तयातें भगवे म्हणति : 'हें आमुचेंचि शास्त्र :' तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सकळही शास्त्रें या शास्त्रासि मीळेति : परी हें कव्हणाही न मिळे :"* ऐसें तें नेणति : म्हणौनि आपुलेंचि

---

२ **एवा.** करिती.

१३. १ **एवा.** केवढें.

१४. १ **शोध.** °ठांकरि ऐसा वाळला कुटका टाकिती.

*होए म्हणति :" यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : हें गीताशास्त्र सकळही लोक मानीति : पढति : तरि तया परमेस्वराचा बोधु कां नव्हे ? तों तवं तेथ प्रकटचि असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें हाटचौहटां बोलावें : परि एथौनि दीधलेयांविण कव्हणांही घेवों घोकों न ये :" "हो कां जी[१] :"* ।।

## १६ तथा अवतारांतर दैवी नीरूपण

एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : तवं भक्तजन दैवीचिया गोष्टी करूं लागले : जवळि महदाइसें बैसलीं असति : तीहीं म्हणीतलें : "जी जी : दैवी ते कैसी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : दैवी जैसी श्रीप्रभूची : कां दैवी जैसी येथची :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथिचेया सारिखें अन्यत्र आति : परि एथिची दैवी ते क्वापि नाहीं :" ऐसें गोसावीं नीरूपण केलें : ।।

## १७ भटां सयेमु नीरूपण

एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : भट : महदाइसें : समस्त भक्तजनें असति : गोसावी नीरूपण करीत असति : तवं भटोबासीं म्हणीतलें : "जी जी : मज उणेनि अन्नें न गमे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "न गमे तरि रेंदेयाचेंदेया दरु भरिजे :" तवं महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : भीक्षेचें अन्न दोनि वेळ घेइजे : परि न गमे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें काइ बाइ : न गमे तरि तीन वेळ घेतलें तरि काइ ?" ।।

## १८ काकोसवचनस्वीकारू

साधांचें काकोस रूपदेवोभट : ते चारठाणेकर : तयां सांधातें काकोस भेटले होते : ते एकु दीं गोसावीयांचेंया दर्शना आलें : काइसेन नेणों तयांचा आंगोठा चेंचरला : 'काकोसाचा आंगुठा चेंचरला :' म्हणौनि अवघे भक्तजन गजबजिले : तवं काकोसीं म्हणीतलें : "आंगुठा माझा नव्हे : माझा तो श्रीचक्रधरू देवो कीं :" तें गोसावीं आइकिलें : आणि तोखले : सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसें होए :" *मग गोसावीं श्रीमुखिची पीकि घालवीली : आणि तेधवांचि नीका जाला[१] :* ।।

## १९ महदाइसाप्रश्नें भटाचार्या कर्मस्वरूपज्ञान कथन

एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : पासि महदाइसें बैसलीं असति : महदाइसीं पुसिलें : "जी जी : भटाचार्यें एसणा अभिमानु कां केला जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ :

१५. १ (**प्रव. वि.** १५०, १५१).

१८. १ (**शोध.**) मागे पूर्वार्ध लीळा ५७३ पाहा. तिच्यापेक्षा प्रस्तुत लीळा वेगळी दिसते म्हणून स्वीकारली आहे. एरवी एकाच प्रसंगीच्या घटनेचे वर्णन शोधकारांनी भिन्न रीतीने केलेले असावे, असे वाटणे स्वाभाविक आहे.

तया वेदांतीचें एथावत् कर्मज्ञान होतें : करणियांअकरणियांचें : एणें अभिमानें :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : तेणें इतुलें केलें : देवतेसि आबखा घातला : माझा हा प्रश्नू कीं सरलेयाचें मीष करूनि क्षपणीक कढेआंतु घातले : ते अनिमित हींसा जाली : तरि ऐसें तो नेणें जी ?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : पोरु जीव सकळै आपुलें ओखटें गोमटें जाणे : परि जाणौनिचि करी : *तें तेणें जाणौनिचि केलें : तेणें तो तत्काळ नरका गेला : म्हणौनि बाइ : जाणतेयापसि वारि नेणता चांगु : जैसा वोलेयापसि कोरडा चांगु :*" "*हो कां जी*[१] *:* " म्हणौनि महदाइसें उगीचि राहिली : ।।

## २० तथा वेदवगतृत्व कथन

एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : हे वेद कवणी ठाउनि जाणति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ[१] : कव्हणी एकु वेदवीभागु[२] चैतन्याचेंया अस्तित्वातें जाणे : तथा बोले : हें एक वगतृत्व तयाचिये राहाटीचें :" ।।

## २१ तथा आगमवगतृत्व कथन

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : हे आगम कोणी ठाउनि ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे च्यान्ही आगम सीद्धीकृत : ते आगम भैरववेन्हीं जाणति[१] : हे त्यांचिये स्थानीचें वगतृत्व[२] :" ।।

## २२ तथा पुराणवगतृत्व कथन

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : यें पूराणें कवणी ठाउनि जाणति जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : *पुराणें क्षीराब्धिपर्यंत देखति*[१] *:* हें त्यांचिये लोकिचें वगतृत्व : ऋषीकृत्यें कवीत्वें : यें अठरा : जेहीं जें देखिलें : आइकिलें : अनुभवीलें : ऐसीं कवीत्वें : वगतृत्वें :" ।।

## २३ तथा मुक्ति कथन

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : या च्यान्ही मुक्ती म्हणिजेति काइ? आणि कवणी ठाउनि जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सालोक्यता : सामीप्यता : सारूप्यता :

---

**१९.** १ (**प्रव. वि.** १६५, १६६). पूर्वार्धं लीळा ३९१ व त्यावरील टीपा पाहा.

**२०.** १ **मुना.** °हे विश्वरूपापासौनि चैतन्याचें स्तीत्व वेदु जाणे :" २ **मुना.** °चैतन्याचें स्तीत्व जाणे :

**२१.** १ **ना.** देखति. २ **एवा.** बोलणें.

**२२.** १ (**सूपा.**). **मुना.** "बाइ यें सेखसाया (**मु.** शेषशय्या) वेन्हीं जाणति.

सायोज्यता : या च्याऱ्ही मुक्ती अंतराळापासौनि सेखसैयावेऱ्हीं[1] वर्त्तति : *लौकिक मुक्ती स्त्रिया आति : परी यंत्रारूढता नाहीं :" "हो कां जी[2] :"* ।।

## २४ तथा चतुर्विध त्यागु नीरूपण

महदाइसीं म्हणीतलें : "चतुर्विध त्यागु तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एकु राजसु त्यागु : एकु तामसु त्यागु : एकु सात्वीकु त्यागु : एकु नीर्गुण त्यागु :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु मळत्यागिया : एकु अनिष्ट त्यागिया : एकु स्वतेव जाए तेव्हेळीं सांडी : मळत्यागिया तो दुर्लभु :" मग तयाचीं लक्षणें नीरूपीलीं : ।।

## २५ तथा वाचा नीरूपण

महदाइसीं पुसिलें : "जी जी : वाचा कीती जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वाचा च्यारि :" "तीया कवणी जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परा : पश्यंती : मध्यमा : वैखरी : चैतन्योद्‌भव परा : ताल्वोष्ठपुटव्यापारें यंत्रोद्‌भवा वैखरी : परा ते ईश्वरीची : सीद्धांचां ठाइं पश्यंती : देवांचां ठाइं मध्यमा : मनुष्यांचां ठाइं वैखरी : वैखरीद्वारें परेचा व्यापारू :" गोसावीं बहुत नीरूपण केलें : ।।

## २६ श्रीकृष्णवेधु नीरूपण

एकु दीं महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : आजि पुराणीं श्रीकृष्ण अवताराची वेधवंती नीगाली : गाइगोधनां : गोपीजनां वेधु वाखाणिला : ऐसी प्रतक्ष व्येधशक्ति नीरूपिली जी :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : श्रीकृष्णीं शतासहश्रां वेधु : एथिचां नामीं वेधु :" ऐसें गोसावीं नीरूपण केलें : ।।

## २७ तथा वटवृक्षा आयूष्य कथन

एकु दीं गोसावीं आसनीं उपविष्ट असति : महदाइसें मुख्य समस्तें भक्तिजनें पासि बैसलीं असति : भक्तिजनें वृक्षाचेया आयुष्याचेया गोष्टी करीत होते : तवं महदाइसीं पुसिलें : "जी जी : वडासि आयुष्य कीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सहश्र वरिषां आयुष्य[1] :" ।।

## २८ तथा वसीष्ट वीद्यावंतु कथन

एकु दीं महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : वसीष्टु कवणीये वीद्येचा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : वसीष्ट आणवीचिए प्रथम करणीयेचा रीगावा जाणे : शुक्र आणवीचें अर्ध करण जाणे : *संजयो महाणवींचें प्रथम करण : द्रोणासि शाक्तेयाचें प्रथम*

---

**२३.** १ **मु.** शेषशय्या°. २ (**प्रव. विमा.** १७७).

**२७.** १ **शोधु.** °मागिली युगीचां. **आनोबास.** °पींपळा पांचसें.

*करण : शुकाची ते चैतन्य विद्या*[१] : ।। वसीष्ट आणविचिये प्रथम करणीचा रीगावां जाणे : तयातव देहद्वंद्वें नीवर्त्तलीं : परि मनोद्वंद्वें न नीवर्त्ततीचि : पुत्रवीयोगें[२] आडीदरडीवरौनि[३] घाली : परि अभिमानीनि देवता वरिचीया वरि धरी : मरों नेदी[४] :" याचिवरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : अदंडी कवणीये वीद्येचा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हेही आणवीचे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अदंडी आणवीचां प्रथम करणीचा रिगावा जाणति : हे प्रथम वज्रवोळिचे : मग गोरक्षीनें अमरओळी लाविले : नावं वीरूपाक्ष : मग अदंडीनाथीं दंडीनाथ :" ।।

## २९ महादेवोराज्यप्रसंसा

एकु दीं प्रस्तावेयानुरुप सर्वज्ञें म्हणीतलें : "कान्हरदेवो सात्वीकु : रामदेवो अवेवस्तु[१] : महादेवो तो नीका : तेणें राष्ट्र[२] राज्य राखिलें : तो राज्य करूं जाणे[३] :" ।।

---

**२८.** १ (**प्रव. विमा.** ८०). २ **एवा.** पुत्रशोखें. ३ **एवा.** वरि°. ४ **पं.** (अज्ञात चरित्रें ५१) मध्ये ही लीळा पुढीलप्रमाणे :

"वसीष्ट आणवीचा अधिकरणीचा रीगावा जाणे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वैस्वामैत्रा आणि वसीष्टा वेवादु प्रवर्तला : एरू म्हणे : 'मी जाणता :' एरू म्हणे 'मी जाणता :' ऐसा अवघा मृत्यलोक हींडीनले : परि तेयाचा वेवादु न तुटेचि : मग अठचासी सहश्र रीखीस्वराचेया ठायासि गेले : तेयाचेनही वेवादु न तुटेचि : मग देवतांचेया ठाया गेले : इंद्रमुक्षकरुनि तेतीस कोडी देव बैसले असति : मग म्हणीतलें : 'आमुचा तुम्हीं वेवादु परिसावा :' 'ना आम्हीं म्हणौनि तें परिसाल तरि परिसौनि :' अवघां देवीं वीचारीलें : जेयांसि नावडौनि तो आमतें श्रापील : 'पाताळिचा सेखू आणि सूर्यो जो आणील तेया जैत :' वैस्वामैत्रू गेला : सेखू साउमा आला : दंडवत केलें : मग पुसीलें : 'कवणें कार्यें आलेति ?' वीस्वामैत्रें म्हणीतलें : 'मज आणि वसिष्टासि वेवादु : इंद्रमुक्षकरुनि तेतीस कोडी देव मीनले असति : तुमतें बोलावीलें असे :' सेखसैयें म्हणीतलें : 'ना पृथ्वी तुम्हीं धरा : मग मीं एइन :' मग वैस्वामैत्रु गेला : सूर्यचिया ठाया : तवं सूर्यो उठीला : दंडवत केलें : मग पुसीलें : 'कवणें कार्यें आलेति ?' तेहीं वेवस्ता सांघीतली : 'तरि माझी राहाटि चालवा : मग मी एइन :' 'ना मज हें काइसेनि होइल ?' तवं सूर्यें म्हणीतलें : 'तरि मज काइसेनि एणें होइल ?' मग मागुता आला : वेवस्ता सांघीतली : मग वसीष्टु गेला : सेखू साउमां आला : दंडवत केलें : आणि पुसीलें : 'कवणें कार्यें आलेति ?' तेहीं सांघीतलें : 'तुमतें बोलावीलें असे :' 'नां हे पृथ्वी धरा : मां मीं एइन :' तवं तेहीं 'सरा' म्हणीतलें : आपुलें धोत्र वेंटाळी करूनि तेथ सूदलें : सेखू सभेसि पाठवीला : आपण सूर्यापासि गेला : सूर्यो खालि उतरला : दंडवत केलें 'कवणें कार्यें आलेति ?' तेहीं सांघीतलें : 'तरि हा व्यापारू चालवावा : मग मीं एइन :' वसीष्टें : आपुली काठी ठेविली : दोघै तेथ आले : एतुलेनि वसीष्टासि जैत दीधलें : वसीष्ट आणवीचा अधिकरणीचा रीगावा जाणे : तेणें देहद्वंद्वें निवर्तलीं : परि मनोद्वंद्वें न निवर्ततीचि :" ।। (**पं.** अज्ञात ५१).

**२९.** १ **ना.** अव्यवस्थु. २ **मु.** राष्ट्रीं. ३ **एवा.** महादेवो राज्यधर्म जाणे : कान्हरदेवो आस्तिक : रामदेवो नीपरवसू.

## ३० अन्यधर्मवचनप्रसंसा

व्रताचिया गोष्टी होत होतिया : यावरि आबाइसीं[1] म्हणीतलें : "हें अवघें लटिकें : गोसावीं मज अनंत व्रत उमटवीलें : गोसावीं सांघितलें : 'अंत नाहीं तो अनंतु कीं :' म्हणौनि :" तवं सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें नव्हें कीं : बाइ : तेथहीं एक साच असे कीं : ते धर्म काइ वृथा ? तेथहीं एक साच आति : परि ज्ञान पाहोनि हेळु : एन्हवीं सकळै साच :" ।।

## ३१ महदाइसाप्रश्नें अनुचीतीं संदेहनीवृत्यानुवादु

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : संदेहो कवणातें पुसावा ?" तेव्हळि गोसावीं परस्परें प्रीति नीरूपिली : तेथ नाहीं तरि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : आपणेयां संदेहो पडे तरि सामान्यस्त्रीसदनस्थीता पुरुषापासुनि संदेहतूटि करूं ये : एकु वैराग्यें उकिरडां लोळे : उष्टावळीयेचीं सीतें वेची : परि पडिलीये म्हैसी प्रमाण नेणें : एकु हस्तीचां गजस्कंधीं जाय : कनकदंडीं विज्यमान : परि परधर्मु तो तेयातेंचि पुसावा :" ।।

## ३२ भावै सणीं जोगिया भलें अनुवादु

एकु दीं महदाइसीं भीक्षा करितां नीर्वीकल्पु जोगी देखीला : मग गोसावीयांतें पुसिलें : "हां जी : जोगियाचें प्रेतदेह चुकैल ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि काइ बाइ : चूके : जोगियासि प्रतिदेह नाहीं : याचें काइ म्हणावें असे ? भावै सणीं जोगियाचा सो सूये तयाही एक भलें आति[1] :" ।।

## ३३ महदाइसाप्रश्नें लक्षमणा भक्तिप्रसंसा[1]

एकु दीं महदाइसीं पुराण आइकिलें : तवं तेथ लक्षमणाची भक्ति वाखाणली : ते येउनि महदाइसीं गोसावीयांपुढें सांघितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : त्रेतीं रामाची भक्ति लक्षमणें केली : ते देवता सत्वस्त होए : आणि भक्तही सात्वीक :" ।।

---

३०. १ मु. महदाइसीं.

३२. १ प्रवा. °निर्विकल्पता उठीला बैसला तेतुका काळ. **रावा.** °सुचिमंतां श्रीमंताचां घरीं जन्मे.

३३. १ पं. प्रतीत (अज्ञात लीळा ७९) ही लीळा पुढीलप्रमाणे आलेली आहे :

**लक्षमणा भक्ति कथन** ।। "दसरथासि रामलक्षमणु दोघ पुत्र होती : मग दसरथु अर्थ परीहरी : अर्थु परीहरूनि सुक्र धुळिद्वारें जातु होता : तो पाणिभबारें आंतुनि घातला : तवं अर्थाचा आंकु मोडला : आणि केगैया हात सूदला : मां म्हणौनि अर्थु परीहरीला : सूक्र पाणीद्वारें घातला : धुळिद्वारें जातां तरि बारा वरिखें अवरीखणें जातें : मग दसरथें केगैएतें म्हणीतलें : 'प्रसंन जालों : माग :' 'ना भरतास सत्रघनां राज्य देयावें : रामलक्षमणु वनवासा धाडावे :' मग दसरथें रामु : लक्षमणु : सीता वनवासा

## ३४ तथा तापस्पर्श कथन

एकु दीं महदाइसें पुराण आइकौनि आलीं : जें चौघ ब्रम्हेयांचे वर पुत्र : एकु सनकुसनंदन : एकु सनकुसनातन : एकु जयो : एकु वीजयो : हे दोघै वीष्णुचे द्वारपाळ : वीस्वासू : तेहीं दारवठां सनकादीकां आडकाठी घातली : 'नको जावो : आम्हीं जाउनि : मग तुम्हीं जा :' 'हें काइ : आम्हीं अखंड येवों : एथ आम्हां आडकाठी नाहीं : तुम्हीं काइ रे ?' म्हणौनि शापिले : ते वैकुंठूनि पडिले : तें महदाइसीं गोसावीयांपुढां सांघितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ऐसें असे : कैलासवैकुंठपर्यंत तापस्पर्श एकु आति : एसणी मोक्षासमानें फळें : परि तेथही तापस्पर्शु एकु आति : सकळै सुखें तियें दुखांतिकें कीं बाइ :" ।।

## ३५ तथा जनकु ब्रम्हवीदु कथन

महदाइसीं पुसिलें : "जी जी : बाहातरि जनक : ते अवघेचि ब्रम्हविदु ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तयांतु एकु ब्रह्मविदु : तो बहुळाख्यू[1] : एर अवघे एकेकी वीद्येचा एकेकु :" ।।

## ३६ फळद्वयेप्रसंसा

एकु दीं गोसावीयांचिये अस्थानीं फळांचिया गोष्टी होत होतिया : उचांनीचांचिया : यावरि गोसावीं सांघितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "बोर : आंबा : एथ तृप्ति आति : अरूचि नाहीं[1] : यें उत्तमें फळें कीं गा :" ।।

---

पाठवीलीं : भरथांसत्रघनां राज्य दीधलें : मग दसरथु जवं अर्थु देखे तवं अर्थु पाहातु होता : अर्थ न दीसेचि आणि प्राणु गेला :" ।।

"पंचवटिके नासीकीं रामाचें अनुष्ठान : रामु सेजे पहुडु : लक्षमणु वनफळें आणी : सीतेहातीं दे : रांमासि तें अन्यथाज्ञान जाए : 'गोडें गोडें तीएं आपण खाते : नासलीं वीटलीं तीएं आम्हांकारणें आणिते :' लक्षमणु म्हणे : 'देतील प्रसादु तो मी खाइन :' रांमुं तरि जाणे : परि पुढील अनुसंधान : ऐसें चौदा वरीखें नीराहारी : इंद्रजी आणिकाचेनि वधे ना : जो नीराहारी तेयाचेनि हातें वधे : मग रावणें जै सीता नेली तै हनुमंतु सूधि करूनि आला : मग रामु सकळ सैन्येंसीं लंकेवरि चालीला : तेथ यूध्य होतां लक्षमणाचेनि हातें इंद्रजी वधिला : मग रावणें सक्ति परीहरीली : ते लक्षमणां लागली : रामु दुख करूं लागला : तवं रामें म्हणीतलें : 'बा लक्षमणा : तुं बारा वरिखें आम्हांकारणें वनफळें आणिसि : आम्हीं म्हणों : 'तुं तेथ खासि :' तुं म्हणेसि : 'तीएं देती ते मी खाइन :' ऐसे चौदा वरिखे कष्ट साहीले : मजकारणें :' म्हणौनि रामु दुख करी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भगति तरि लक्षमणां श्रावणांचेया ऐसी होआवी :" ।।

**३५.** १ **ना.** बहुळाक्ष.

**३६.** १ **शोध.** °वासना उरलीचि असे.

## ३७ महदाइसाप्रश्नें आउ वीधिप्रसवानुवादु

एकु दीं महदाइसीं म्हणीतलें : " जी जी : ये आउवेसि मागितलेंयां भलेतेंहीं मीळे जी : हे मागों जाणे :" सर्वज्ञें म्हणीतलें : " याचितां[१] मीळे हा प्रसो वीधीचा कीं बाइ :" ।।

## ३८ शास्त्रइसाळुत्व कथन[१]

सर्वज्ञें म्हणीतलें : "हें शास्त्र आवृती तया आवृत्ते : एऱ्हवीं मा म्हणौनि तोंडींहुनि जाए : हें इसाळुवांचें इसाळु :" ।।

## ३९ आउवर्त्तनश्रवणीं अभीमानानुवादु[१]

भक्तजनासीं आउसें गोष्टी करीतें होती : तें गोसावीं आइकीलें : तयाउपरि सर्वज्ञें म्हणीतलें : " कुश्चितगुरूआज्ञा ते न[२] पाळिजे कीं नायका :" यावरि आउसीं सांघितलें : " जी जी : या पींडाकारणें भवतीं जोगरूवें लुलाति : हा थोरीं कष्टीं राखिला जी : एकु गुरू करूं आदरीला : तो म्हणे : 'कडासनीं बैसावें : तरि उपदेशु देउनि :' तो चीत्ता न येचि : तेव्हळि आणिकु गुरू पाहीला : तोही म्हणें : 'कडासनी बैसाल : कीं कुमारि उपदेशू :' तोही चीत्ता न येचि : तेव्हळि कुष्टिया साधु ऐसा तो गुरू केला : मग तोही चेष्टा करी : ऐसा देखिला : मग तोही सांडिला : मग कुचिळ रूप धरिलें : चींच-बरटें हातपाए तोंड माखीं : वरि राख उधळीं : वरि गोंगातिया मासिया : वोढले हात-पाये : अंचळा : थीगळांची कंथा गळां : येसणा कष्टीं हा पींडु राखिला जी :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "दीक्षितांची कन्या : आणि उपासनियांची सुन : वैधव्याचां धर्मी वर्त्ततां एसणें उपजलें : पुत्राभिमानें जोगियांतुल वासु : उभें बैठें खाणें : सर्ववर्णी भीक्षा : ऐसें अभिमानें सुहृदत्व[३] स्वीकरिलें : हा ठावोवेहीं स्त्रियांचें आंगवणें : वीकरला जीवु काइ एक नांगवी बाइ ?" ।।

## ४० साधां कळंकिनाराएण पाहों धाडणें

एक वेळ गोसावीं साधातें म्हणीतलें : "साधें हो : तुम्हीं अळजपुर देखिलें ?" "तरि काइ जी :" "कळंकिनाराएणा गेलीं होतींति ?" "ना जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तेथ पुढां खांबावरि[१] नीरयेभोग आकारिला असे : तो तुम्हीं देखिला ?" "ना जी :" "तो

---

३७. १ ना. याचेनि ये वीधीचिया चींता : हा प्रसो—.

३८. १ वि. ११९ च्या प्रव. मध्येही ही लीळा आली आहे.

३९. १ ना. प्रतीत या लीळेची 'आदि'–" आउ जोगियांतुल वासु सांघणें :" अशी आहे. २ शोध पाळुं नये कीं. ३ मु. शूद्रत्व.

४०. १ ना. °रांधणेयांतु.

तुम्हीं पांहा हो साधें हो : " मग साधें वेवदाहुनि गाडेया बैसौनि गेलीं : मग तें पाहिलें : मागौतीं गोसावीयांचेया दर्शना आलीं : तें गोसावीयांपूढें अवघें सांघितलें : ।।

## ४१ मृत्यपतीदहनागमनीं स्त्रीये स्वार्थानुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : " एकीचा पति मेला : त्यातें दहना नेलें : आणि ते रडतें गेलीं : तो सरणावरि घालौनि मागौतीं नीगाली : ते अपत्यासि तयाकडे पाहों नेदीं : कांटाळैल : तयालागि वरि अपत्यावरि आस : आस्ता बांधली : परि तयाचें काहीं न वटे : कां अभिळाखू अंतरला : मग येतां आति : नाति : ठेवा : सांटोपा : रीण आवांकितु आलीं : " ।।

## ४२ पूर्वभक्तागमनीं कोल्हापूर संख्यानुवादु

एकु दीं भक्तांचिया गोष्टी होती होतिया : तयावरूनि गोसावीं आपुलीं पूर्वीलें भक्तें सांघितलें : सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : पूर्वीलें भक्तें : महाराष्ट्रीं गंगातीरीं अवतारू असे : म्हणौनि सोधीतसोधितें कोल्हापुरवेन्हीं येति : आणि माघौतीं जाति : " " जी जी : आरूतीं कां न एति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " वर्ण वेषु याचाही पालटु आइकति : आणि 'नव्हे' म्हणौनि मागौतीं जाति : " ।।

## ४३ तथा फटिकु दृष्टांत कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : " फटीकु बाह्यभ्यंतरें सुसोहोज्वळु : जया वर्णावरि ठेविजे तयासारिखा प्रतिबींबे : तेंचि होए : तैसें या जीवाचें स्वरूप : *जीवु स्फटिकाकारू*[1] : " ।।

## ४४ तथा मासीपोफळ दृष्टांत कथन

एकु दीं नीरूपणप्रसंगें सर्वज्ञें म्हणीतलें : " मासीपोफळ खेळतां जयाचेया पोफळावरि मासी बैसे तो जींके : तैसें जयाचें अनुसरण कडै लागे तेणें जींतलें : " ।।

## ४५ तथा थोंटेपारधि दृष्टांतु कथन

एकु दीं थोंटेयाचिया गोष्टी होती होतिया : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एकु पारधी जाए : मग तयाचा चौरंगु केला : तो पारधीचें आंग जाणे : म्हणौनि आवघे तयातें राना नेउनि उंचे टेंकीं बैसवीति : तो आवघेयांतें बुधि सीकवी : ऐसी वागुर चीरिजे : ऐसी मांडिजे : ऐसी चीरणि करावी : ऐसें[1] खवग जया सवा तेथ वाट धरावी : हा सावजाचा यावा : हा नीगावा : मर मर जाइल म्हणे : मर मर गेला म्हणे : वागुर

---

४३. १ (सूपा. आमा. १९३).

४५. १ ना. °लंगनयासवा ते वाट—.

तोडिली म्हणे : म्हणौनि आफळसाफळ थोटें पीटी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "देह नसौनि परि अंतरीं ऐसे मनोरथ करी : जीव मनोरथादि आश्राये : एयांची शून्यता होआवी :" ।।

## ४६ तथा अक्षेता दृष्टांत कथन

एकु दीं नीरूपणप्रसंगें महदाइसांप्रति सर्वज्ञें म्हणीतलें : "एका देइजे : तयाचीया अक्षेता पडिति : इतुकेनि तयाची जाली : आणिकां वास पाहों न ये : काहींचि बोलों न ये किं गा : तैसी अनुसरलेयाची परि :" ।।

## ४७ तथा तृणजळुका दष्टांत कथन

एकु दीं गोसावी निरूपणप्रसंगीं गोसावीं महदाइसांतें म्हणीतलें : "बाइ : एकु धरूनि एकु सोडिजे कीं : जैसी तृणजळुका पुढां दों पाइं काहीं धरी : मग मागील सोडी :" ऐसें गोसावीं आचारकुशळत्व सांघीतलें : ।।

## ४८ तथा सुसरवाति दृष्टांतु कथन

एकु दीं निरूपणी सर्वज्ञें म्हणीतलें : "लेंकरूवें सुसरवाति खेळति : तियें एकु भो करीति : डोळे झांकीति : मग वाति टाकीति : पाहातां जया सांपडे तें पळे : भो सीवे : तैसें काइ? ना जेणें लाणि सीविली तेणें जींतिलें : तैसें जेणें अनुसरण लेखीं लाविलें तेणें जिंकिलें :" ।।

## ४९ अळंचु नीराकरण

एकु दीं भक्तिजनीं गोसावीयां देखतां अळंचु केला : तयांतें सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं यांदेखतां अळंचु केला : ऐसा न कीजे कीं : हें जेथ असे तेथ यासींचि सकळही कीजे :" ।।

## ५० दुधिकरंटें ममता कथन

एकु दीं नीरूपणीं सर्वज्ञें म्हणीतलें : "सकळही सांडीलें तयाचें काहींचि नाहीं : मग दुधिकरंटें लागे : तयाची ममता सांडवीतांहीं न संडे : म्हणौनि अनधिकार जीणावे :" ।।

## ५१ वामदेवां संतलक्षणप्रसंसा

"एक वेळ वामदेव गुणाकरदेवांचां शीष्यीं स्तंभविले[१] : तें तिहीं साहिलें जी :" ऐसें येउनि महदाइसीं गोसावीयांपुढां सांघीतलें : "ऐसें कीं जी तयां तम नाहीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : साहिलें तेणें लोकीं अधिक मान्य[२] जाले : तेहीं संतलक्षणा जतन केली[३] :" ।।

---

५१. १ ना. पराभविले. २ एवा. मान्यता पावले. ३ ना. °कां : ना तें कार्ये संतलक्षणासारिखें दाखवीलें.

## ५२ भीक्षान्नाचा दधिभातु करवणें

एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : भीक्षान्नाचा दधिभातु कीजे :" "तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "भातु मीठें पाणीयें सींपौनि ठेवीजे : *मग चूरिजे*[1] *:* तो दधिभातु होये : पाणिभातु तोही दधिभातु होये : तोही मीठें कुसकरीजे : मग विभाग कीजेति : मुदा कीजेति : वरि पातसें ठेविजे : तें जेविजे :" मग भक्तिजन ऐसें प्रतिदिनीं करीति : वरि प्रसादु ठेवीति : मग जेवीति :।।

## ५३ तथा रूचिप्रसंसा

एकु दीं बाइसें आणि महदाइसें जेउनि गोसावीयांपुढां बैसली : भीक्षान्नाचीया खरकूटीया वाळलीया : तीया[1] जेवितां गोडा लागलीया : ते गौल्यता गोसावीयांपुढां प्रसंसिली : तयावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरे हो : एथौनि तुम्हां दाढे दुध कीं :"।।

## ५४ सौंदर्यानुवादु

एकु दीं गोसावीयांजवळि भक्तिजनें सौंदर्याचीया गोष्टी करीत होते : तें आइकौनि महदाइसीं गोसावीयांचीया[1] सौंदर्याकडे पाहीलें : तें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : द्वापरीं श्रीकृष्णचक्रवर्ती बरवे : कां कळियुगीं हें बरवें : कां रामदेयाचां कटकीं जाउगी बरवा : यें सौंदर्यें युक्तें कीं बाइ :"।।

## ५५ लाखाइ कऱ्हाडुबाइ नामकरण

लाखाइसें तेयातें जाखीरांचा[1] देव्हारा : जाणपण : थोर नावें लाखाइसें : मग तयातें गोसावी : कऱ्हाडआउसें ऐसें म्हणति : *तीयें म्हणती : हा मज गोसावी मान देताति*[2] *:* गोसावी तयासि घराश्रमीचेयाचेनि नावें बोलावीति : तीयें बरवी आणि दुचितें ऐसीचि असति : म्हणौनि गोसावीं नावं ठेविलें : ।।

## ५६ खेइभटां डखला नामकरण

एकु दीं गोसावी आसनीं उपविष्ट असति : तवं गोसावीयांचेया दर्शना खेइभट आले : वरुती वास : भवंतें पाहाति : जवळि न देखति : चालतां पुढां आंग ढोके[1] : डखलीया[2] देत चालताति : हें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : डखलीया[2] देतु आला : तैसाचि जाइल :

---

५२. १ (मु. स्वमति).

५३. १ ना. °गौल्य म्हणौनि प्रसंसिलीया.

५४. १ ना. गोसावीयांचें सौंदर्यें देखौनि वास पाहिली.

५५. १ मु. जाखेराचा. २ (मु.) ना. हा माजनुपरू.

५६. १ ना. थोके. २ मु. डखलेया.

बोलावा :" बोलावीले : आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीं नावेक हास्य केलें : मग तया दीसापासौनि तयातें डखला म्हणति : अवघे भक्तजन म्हणति : ।।

## ५७ माइंबाइ भूतानंदु नामकरण

एकु दीं माइबाइसीं हे गोष्टी गोसावीयांपुढां सांघीतली : " जी जी : आमचेयां अजेयां नावं सारंगपाणि : तयां भूतें वस्यें जी : घरीं म्हणीयें करीति : आनंदतें : तीयें रक्षा करीति : भूतें ग्रहो न संचरे : तरि मीं गोसावीयांचेनि नावें रक्षा करीन जी :" यावरि गोसावी तोखौनि 'भुतानंदु' ऐसें नावं ठेविलें : एऱ्हवीं तयाचें नावं माइंबाइसें : ।।

## ५८ रूपाइसां महदाइसा नामकरण

एकु दीं महदाइसीं हे गोष्टि गोसावीयांपुढां सांघितली : " जी जी : वायेनायेकाची आजी : तया नावं महदाइसें : तीयें प्राज्ञें जी : तिहीं वाचिलें होतें : आणि तयां म्हाळसी प्रसन्न : तयांसीं प्रत्यक्ष बोले : तीयें महादेरायाचीं[१] पुरहितें जी : राजा भलतेंयातें पुसे : तयां भविष्य स्फुरे : एक वेळ तेहीं वीद्वांस खंडिले जी : ऐसीया बाइला प्राज्ञा : आपण काहीं नेणिजे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : महादेरायाचां[२] ठाइं तियें महदाइसें : आणि तुम्हीं एथचीं महदाइसें : तियें तयासीं बोलति : तरि तुम्हीं यासीं[३] बोलावें :" तवं महदाइसीं म्हणीतलें : "हें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि हेंचि तुमसीं बोलैल हो :" ।।

## ५९ आबाइसां वृधाबाइ नामकरण

*अवघेयाचिया दशा धाकुटिया : तयांतु आबाइसें तीयें वडिलें : तें देखौनि गोसावीं प्रस्तावेयानरूप*[१] आबाइसांचें वृधाबाइसें हें नावं ठेविलें : मग गोसावी तेणेंचि नामें बोलावीती : ।।

## ६० एकवीराबाइसें नामकरण

एकवीरावाइसें रेणुकापुराण बरवें गाउनि म्हणति : आणि कुळधर्माची गोष्टि सांघति : आणि रासी नावें सांघति : तयावरूनी गोसावीं एकवीराबाइसें नावं ठेविलें[१] : ।।

---

५८. १ **ना.** माहादेयाचीं. २ **ना.** महादेयाचां. ३ **मु.** आमसीं.

५९. १ (**मु. स्वमति** शोध).

६०. १ **मु. स्वमति** °आधील कवण नावं हें नेणिजे.

## ६१ प्राल्हादबाइसें नामकरण

प्रह्लादबाइसें तीयें प्रह्लादकृत नरसींहपुराण गातीं : तें आइकौनि एकु दीं सर्वज्ञें म्हणीतलें : "हो कां : तरि तुम्हां नावं प्रह्लादबाइसें :" ऐसे गोसावीं प्रसादाचें नावं ठेविले[१] : ।।

## ६२ द्रवीळासबाइसें नामकरण

एकु दीं द्रविळासबाइसें गोसावीयांचेया दर्शना आलीं : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : आणि म्हणीतलें : "जी जी : एथ एइजे आणि अन्येंक परिमळ एति जी : गोसावीयांचे बीढार द्रवळितचि असे जी :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "हो कां : तरि तुम्हां नावं द्रविळासबाइसें म्हणा :" म्हणौनि नावं ठेविलें[१] : ।।

## ६३ खेइभटां भागेया नामकरण

खेइभट ते भागवत प्रसंसीति : संन्यासी पीते : ऐसीया गोष्टी करीति : तयावरूनि गोसावी भागेया नावं ठेविलें : ।।

## ६४ महदाइसां प्रेतत्व नीरूपण

एकु दीं महदाइसें पुराण आइकौनि आलीं : मग गोसावीयांपुढां सांघितलें : "जी जी : आजि पुराणीं प्रेतदेह नीरे एक असति : ऐसें सांघितलें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति बाइ : ते तुम्हां एथौनि सांघीजैल : बाइ : अतिथोर पर्वताएसणें स्थुळदेह : सुइचेया फांसेयाएसणें गळांचें रंध्र : डोंगर[१] एकु अन्नाचा खावा ऐसी भुक : परि सीत गीळितां गीळवें ना : समुद्र सोखावा एसणि ताहान : परि चुळ उदकां न लभे : कोळें[२] जळति ऐसे हातपायें जळति : सर्वांगें तापति : अखंड जळजळ करितें असति : *तांथूयें ये मग तें पाणी पीये : घरीचेयां सांघातें तया स्थाना जाये : अखंड वळाणि सीवे असे : वेगां करीतु कां म्हणे*[३] *:* साइली टाकुनि जाए परि सामाए ना : तया ठावो नेदीति : पीडेचें दुख न साहावें : ऐसें पळपळीत असे : *अखंड जळतचि असे : प्रेताची अहंता तारि नीवर्तली : पारि ममता थोरि असे : वीटाळाचें : स्वभावांचें थोर दुख होय*[३] *:* ऐसा दुखभोगु बारां वरूषें[४] : घराभवंतें भवंत असे : तीर्थाक्षेत्रा सरिसें जायें : मृत्यस्थानीं : दहनस्थानीं क्रिया करीतां तयापाठीं असे :" ऐसें गोसावीं निरूपीलें : आणि महदाइसें

---

६१. १ **मु. स्वमति.** °आधील तयाचें नावं कवण हें नेणिजे.

६२. १ **मु. स्वमति.** °यांचेंहीं मागील नावं नेणिजे.

६४. १ **ना.** पर्वताएसणी भुक. २ **शोध.** सर्वांगीं कोळें बांधली ऐसे—. ३ (**शोध.**). ४ °हे **रामे.** ।। **प्रवा** : कर्माधिकारापासौनि जीतुके दीस जीयाला तीतुके दीसवेऱ्हीं दुख भोगी :

कांटाळैली : " जी जी : तें चुके काइसेनि जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : एथावतु क्रीया होये : कां घ्रणात्यागें चुके : " ।।

## ६५ अन्यमहात्मेयां संभाषणीं आऊ शीष्यापण

एकू दीं आउसें जोगियासीं[१] गोष्टी करीतें होतीं : तें गोसावीं देखीले : आणि सर्वज्ञें म्हणीतलें : " जोगीयांतुल वासु नीका नव्हे नायका : " आउसीं म्हणीतलें : " नव्हे जी स्वामी जगन्नाथा : " सर्वज्ञें म्हणीतलें : " एकु रे एकु : दोनि रे दोनि : तीसरां उडाणीं मोरू पडे कीं नाएका : अन्य महात्मेयांचा संसर्गु न कीजे : अन्य महात्मेयांचीये गुंफे[२] नीद्रा न कीजे : लोंढे एती : ऐसे एती : तेथ वीधिनिषेधु नेणिजे कीं नायका : " ।।

## ६६ महदाइसां गौलोकानुवादु

एकु दीं नीरूपणप्रसंगें[१] गोसावीं महदाइसांप्रति म्हणीतलें : " बाइ : स्वर्गीं गौलोकु एकु आति : " महदाइसीं पुसिलें : " तो कैसा जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : जैसेचि एथ गाइचे कळप तैसेचि तेथ धवळेया गाइंचे कळप : धवळीया गाइ : दुतोंडीया : तो गौलोकु म्हणिजे बाइ : तेथची सुरभि देवता : " ।।

*यावरि दायंबाएं पुसिलें : " जी जी : अंतराळीं कवण देवता असे ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : अंतराळीं गणगंधर्व : खालुती यक्षयाक्षिणी : देवदेवी : " " हो कां जी : " ।।*[१]

## ६७ नाथोबा स्थाननीरीक्षणीं भटप्रसंसा

गावीं एकी नाथोबातें देऊळ पाहों पाठवीलें : पाहिलें : मागौते आले : मागौते पाठवीलें : ऐसें तींवेळीं पाठवीलें : परि दारवठा : चौकु : कवाडें न पाहातीचि : मग कवाडें सांघितलीं : तवं खीळी न पाहातीचि : ऐसी च्यारि वेळ एरझार केली : परि पाहों नेणतीचि : एक पाहाति तवं एक वीसरति : मग भटोबास पाठवीले : तेहीं देउळ पाहिलें : ढळलें : मोडलें : पौळि : दारवठा : चौकु : कवाडें : खीळी : तीन्हीं भूआगळा : ओटे : न्हाणी : शंकास्थान : खातीं : लावणीं : आंतु वीहीरि : जवळि घरें : जवळि ना दुरी परिश्रयें स्थान : उपाधी : उपकरणें : कुरूप निरूप उपाधि : ऐसें पाहिलें : मग येउनि सांघीतलें : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : " वानरेसीं पाहों जाणितलें : एथचेया उपयोगा जाए तें वानरेश जाणति : " ।।

---

६५. १ ना. जोगिणीसीं. २ एवा. °न वचिजे.

६६. १ (प्रव. विमा. ८६–८८). °दाएंबाएं पुसिलें : " जी जी : हे कामधेनु कवणीए स्थानीची देवता ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " भोजेया : स्वर्गी गाइचा लोकु : तेथिची सुरभी देवता : "

## ६८ बाइसांकरवि पाणिभातु सांचवणें

भलतेथ अवस्थानीं एकाधां दीसीं गोसावीं म्हणती : "बाइ : तुम्हीं पाणिभातु सांचावा : आतां एथ तुमतें अभ्यागतें येतील :" मग बाइसें मडकें धुति : भातु नीवडीति : पाणी घालीति : नींबोणिचें पान : सगळें नींबू घालीति : मग तोंड वांधति : तीं दीसां पालटीति : तवं अभ्यागतें येतीं : तो वेचु होये : पाणीं वाघारीति : आंब करीति : ।।

## ६९ भक्तां प्रश्नें जनीं अन्यथाज्ञानानुवादु

एकु दीं नीरूपणीं भक्तिजनीं म्हणीतलें : "जी जी : हा लोकु सत्यानृत्यांचा बांधा :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ काइ असे सत्य ? हें आवघें अज्ञान कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "अज्ञान जीवाचें : अन्यथाज्ञान मनाचें : अन्यथाज्ञानीं ज्ञान : यें तीन्हीं तीघांचीं चालताति : म्हणौनि अज्ञान हें चालतें :"।।

## ७० स्त्रीये वीकारज्ञान करणें

सर्वज्ञें म्हणीतलें : "एकी स्त्रीयेचा पीता स्नेहाळु : समर्थु : तो सरला : तयातें बोळवीतें समस्तें कुटुंबीचीं : गोत्रीचीं समसानवेऱ्हीं गेलीं : तयांतु कन्येचें दुख थोर : अवयेव मोकलुनि करुणाळापीं आपणपें न संभाळी : नेणों केउतें वरियाणें : ऐसां तियेचा भ्रतारू तत्समयीं तेथ आला : तयातें सविकार देखिलें : आणि दुख गेलें : लाजिनली : मग आपणपें सांभाळिलें[१] : वरियाणें : पालौ : पाखिवा : कुरुळें सरिसीं केलीं : तयां वीटु उपजैल म्हणौनि पात्रता राखिली : सरला तयाचें काहीं न वटे : ऐसें जीवाचें स्वरूप बाइ :" ।।

## ७१ तथा मृत्यपतीभार्ये वीकारज्ञान

सर्वज्ञें म्हणीतलें : "एकीचा पति सरला : तो समसाना नेला : समस्तें बोळवीतें नीगालीं : तयांतु तयाची स्त्रीही आपणपें नसंभाळीत नीगालीं : तवं पैलाकडौनि तीयेचा मैत्र आला : आणि लाजिली : आपणपें सवंरीलें : मेला तयाचें काहींचि नाहीं : " ।।

## ७२ भटां प्रश्नें अन्यत्र अन्य प्रपंचु कथन

एकु दीं भटोबासीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : पैली ब्रह्मांडीची वेवस्था ते कैसी ?" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "तुज[१] ये ब्रह्मांडीचें पुसों सरलें : मां एरी ब्रह्मांडीची पुसतासि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ये ब्रह्मांडीं हा प्रपंचु : आणिकीं आणिकु : ऐसीं अनंतें ब्रह्मांडें : तेथची

---

७०. १ मु. सांवरिलें.

७२. १ एवा. तुज ये ब्रह्मांडीची व्यवस्था चर्चुं सरली : मां आणिके ब्रह्मांडीचें चर्चितु अससि :

व्यवस्था ते अनसारिखी असे :" *मग गोसावीं द्विभुजा : चतर्भुजा : सुताळ : वीताळ : सलक्षण : वीलक्षण : ऐसें नीरूपिलें*[२] : सर्वज्ञें म्हणीतलें : "पैलीं अष्टभुजा : दशभुजा : सहश्रभुजा : वीपरीता योनी : ऐसें एरांहुनी एर वीलक्षण : उत्तरोत्तर : ब्रह्मांडप्रति वीलक्षण असति कीं गा वानरेयां :" "जी जी : हे गोवि[३] मीं काहीं परीसेंचि ना :" यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "आतां तव ऐसें घेया : धोका : मग काळेकरुनि उमटैल कीं गा :" *यावरि भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीं जे जे वचनें वाक्यें निरूपिलीं तयामाजि अर्थु उमटे*[४] *ना : तरि कैसें करावें जी ? तेणेंविन सिद्धांत न कळे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "अर्थु तो प्रकरणवशें : प्रकरणें अर्थविनियोजकु : अर्थीं दृष्टांतु दीजे : तेणें उमटे गा :" "हो कां जी*[५] *:"* ।।

## ७३ महदाइसाप्रश्नें त्यागफळानुवादु

एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : गोसावीं अखंड त्यागु करा म्हणताति : तरि त्यागु तो कैसा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु राज्य सांडी : एकातें काहींचि नाहीं : जेवावेया वेळणी नाहीं : पाणी प्यावेया गाडुगा नाहीं : वेळणी जयातें असे तो वेळणी सांडी : आणि एकु राज्य सांडी : दोहीं त्यागाचें गोमटें सारिखेंचि : सारिखीचि ममता : म्हणौनि अनुसरण : त्यागु : प्राप्ती : सरिखीचि :" ।।

## ७४ सीतासौंदर्यानुवादु

एकु दीं प्रसंगें सर्वज्ञें म्हणीतलें : "सीतेचें सात ताळ[१] रूप दीसे :" तवं महदाइसीं पुसिलें : "जी जी : एसणीं रूपें कैसीं जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : त्रेतीं सीतेचें ठाण कडौल[२] : मडौल[३] : साकार : तीचेनि कानेंहुनि गुढरिला हाती जाये : ऐसी[४] ते सीता सूंदर :" ।।

## ७५ भोजया पातलेपण नीषेधु

गावीं एकी गोसावीयांसि अवस्थान असे : तेथचि दाइंबाही होते : परि वेळेचे गोसावीयांचेया दर्शना न येति : मग एकु दीं दर्शना आले : दंडवत घातलें : श्रीचरणां लागलें : सर्वज्ञें म्हणीतलें : "एथ असौनि एथचेया दर्शना न या तें काइ ?" दाइंबा उगेचि : बोलती ना : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "पातलेपणें एथची अवज्ञा घडेतवं एथ नसिजे कीं गा भोजया :" ।।

---

२ (**शोध.**). ३ **एवा.** °मज काहीं उमटेचि ना. ४ **एवा.** घोकवे. ५ (**प्रव.** पा. १८५).

**७४.** १ **मु.** ताड. २ **ना.** कोडौल. ३ **ना.** मढौल. ४ **मु.** आणि.

## ७६ आबाइप्रश्नें देहांतदुख नीरूपण[१]

एकु दीं आबाइसीं गोसावीयातें पुसिलें : "जी जी : हा जीवु अतिवाहिकीं एंत्रीं घालुनि नेइजे तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "ते तिये द्वारीं ओडवीति :" "जी जी : तरि हा जीवु काढितां काइ दुख होत असे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि काइ बाइ : हा नखाग्रापासौनि केशाग्रवेऱ्हीं अवघां ठाइं वोवलापोवला असे : तो काढितां सतांसहश्रां वींचुवाची पीडा एका सर्पाची होए : ऐसेयां सतांसहश्रां सर्पांची पीडा ते एकी देहावसानीं जीवासि होए :" आणि आबाइसे कांटाळैलीं : ।।

## ७७ वस्त्रसंख्या नीरूपण

एकू दीं महदाइसी पुसिलें : "जी जी : वस्त्र अपुरें : तें नेसों न पुरे : तरि काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "तरि हात दोनि सुडा मागौनि लाविजे : आंग झांके ऐसें कीजे[१] :" ।।

## ७८ दाइंबागीतश्रवणीं रवळेयां नीर्वंश[१]कथन

रवळा तो कुंभार : तेणें गीतु केला होता : तो दाइंबायें घोकिला होता : एकु दीं तो दाइंबायें गोसावीयांपुढां म्हणीतला : गोसावीं उगयांचि आइकिला : बाइसीं पुसिलें : "बाबा : गीतु कैसा जाला ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : त्याचेया वंशाचा नीर्वंश होए ऐसा जाला :" बाइसें उगींचि राहिलीं[१] : ।।

## ७९ महदाइसाप्रश्नें मासोपवास नीश्रयानुवादु

एकु दीं महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : या मासोपवासिनी उपवासु करीति : देउळीं सडेसंमार्जनें करीति : चौकरंगमाळिका भरीति असति : तरी यांसि काइ होइल जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तयांसि खंडमंडळिचें राज्य होइल :" ।।

## ८० महदाइप्रश्नें स्थूळसूक्ष्मानुवादु

महदाइसें पुराण आइकौनि आलीं : मग गोसावीयांपुढां सांघितलें : "जी जी : आजि पुराणीं स्थुळ सुक्ष्मू ऐसे दोनि प्रपंच सांघितले : जी जी[१] : आप आपीं सामाए :

---

**७६.** १ याच आशयाची लीळा 'दाइंबा देहांतदुःख निरूपण' अशी आहे. (उत्त. ६२० पाहा.) येथे आबाइसाचा प्रश्न असून त्याला दिलेल्या उत्तरात थोडी अधिक माहिती आहे.

**७७.** १ **एवा.** °हात च्यारि कीजे.

**७८.** १ **मु. स्वमति.** °हा गीतु दुसरा : एकु रवळेनीचि द्वारावतीकारापासि म्हणीतला होता : तो गणपतीमढीं महदाइसीं आमचां गोसावीयांप्रति सांघितला : दायंबायें म्हणीतला हा दुसरा : दोहीं ठाइं एकुचि शब्दु : ।।

**८०.** १ येथून तो 'स्थुळु सांघितला 'पर्यंतचा भाग **मु.** प्रतीत नाही. तो **ना.** प्रतीतून येथे घेतला आहे.

तेज तेजीं सामाए : वायोचां ठाइं वायो सामाए : आकास आकासीं सामाए : पृथ्वी पृथ्वीचां ठाइं सामावे : हां जी : सुक्ष्मू सामावला : आणि राहातु असे हा स्थुळु सांघितला : तरि हें काइ साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हें ऐसें नव्हे : हे ऐसें : विश्वाख्य प्रपंचीं भुतें तन्मात्रा[२]। धातु : भुतें : तत्वें : यांचिया तन्मात्रा यातें सुक्ष्मू प्रपंचु बोलिजे :। सकळही प्रपंचु भौतीकु : त्रीगुणात्मकु । घे सांडी तो स्थुळु बोलिजे :" सर्वज्ञें म्हणीतलें : *"एकातें प्रपंचु परिणामु बोलिजे : एकातें विवर्तु बोलिजे : एथ तैसें नव्हे : एथ प्रपंचु म्हाणिजे स्वतंत्र पदार्थु एकु आति : जैसा गंधर्वनगरीचा हस्ती :" सर्वज्ञें म्हणीतलें : "यदनंतरं यद्दृश्यते तत्तस्य कारणम् : प्रपंचु व्यभिचारिया[३] :"* ।।

## ८१ स्त्रीवेव्हारानुवादु

सर्वज्ञें म्हणीतलें : "एकु दादुला : तयाची बाइल : दोघें सभेपासि गेली : व्यव्हारू सांघावेया : ते सांघों जाति : ते सभेचे तीतें देखति : मोटके : आणि तया दादुलेयाचा न्यावोचि असे : परि सभा तियेचेयासारिखें बोले : तयांसि तीसि लागलाहाणें नाहीं : *मागां उपयोगा गेली नाहीं : प्रस्तुति न वचे : पुढां न वचे*[१] *:* परि[२] आपसेया तियेचि सारिखें बोलों आवडे : ऐसें दर्शनाचें सामर्थ्य : तें तियेचेया रूपाचें : *एवंपर्यंत विकार*[१] कीं गा वानरेया :" ।।

## ८२ वासनाएका अस्तीति

भलेतेधवां तिकवनाएक गोसावीयांचेया दर्शना एति : परि तयाचे भाउ वासनाएक न एति : ऐसां एकु दी दांडीकार वासनाएकु दर्शना आले : दर्शन जालें : वासनाएका अस्तीति जाली : मग पाठवणी दीधली : ।।

## ८३ स्त्रीवेखें अवतारू निराकरण

सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : यासि स्त्रीवेखें अवतारू धरणें नाहीं : स्वीकरणें नाहीं : कां नाहीं ? स्त्रीदेह अनधिकार्ये : ईश्वरअवतारू तो उत्तमे देहीं : पुरुषदेह उत्तम : आणि सर्वाधिकार्ये कीं गा : तयामध्यें दोनि उत्तमें : कां ? ना ईश्वर म्हणौनि :" ।।

## ८४ बाइसां अपरितोखु निराकरण

बाइसें अपरितोखु करीति : "मज बाबाचें काहींचि न घडे :" ऐसें दुख अखंड करितेंचि असति : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुम्हीं अपरितोखु कां करितें असा ? हें एसणें

२ **मु.** तनुमात्रा. ३ (**प्रव. वि.** ६०–६३).

**८१.** १ (**मु.**). २ **मु.** परि भलेतोही स्त्रीयेचियाचि सारिखें बोले.

कवणाकारणें ? हें इतुलें सकळहीं तुम्हांचि कारणें कीं : मां तुम्हीं अपरितोखु कां करितें असा ? " ।।

## ८५ बाइसांकरवि भट पाणियें सींपवणें

गोसावीयांसि एकाधिये गावीं अवस्थान होए : व्याळी होए : मग बाइसें भट जेवीति : मां जवळि बैसति : मग गोसावी निरूपण करीति : एकाधा वेळु भटोबासासि जाड्य ए : आणि गोसावी बाइसांकरवि भटोबासातें पाणियें सींपवीति : मग जाड्य परिहरे : मग निरूपण प्रवेसन होए : एकाधा वेळीं बाइसांसि निद्रा ये : बाइसें निद्रा करावेया जाति : मग भटोबासांसि निरूपण करीत असति : बाइसें उठीति तवं देखति : मग म्हणति : "बाबा : पुरे दीजो : वातीसि तेल नाहीं :" गोसावी म्हणति : "डोचें तुप घाला :" मग तुप घालीति : नीजों जाति : मागुतीं नीजौनि उठीति : तवं गोसावी निरूपीतचि असति : मग बाइसें म्हणति : "नागदेया : बाबासि उनैदा होइल : आझुइं कैसा तुं बैसला असेसि ? जाए : नीद्रा करि :" मग भट नीद्रा करावेया जाति : गोसावीयांसि नीद्रा करावेयाची प्रवृति नसे तरि गोसावी निरूपण करितचि असति : बाइसें उठीति : तवं गोसावीयांसि निरूपण करितां देखति : मग म्हणति : "हां बाबा : एथ नागदेवो नाहीं : मीं नाहीं : हें निरूपण कवणाप्रति कीजताए : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ प्रवृति जाली तरि स्तंभा एकाप्रति निरूपिजैल :" म्हणौनि श्रीकरें खांब्रु त्राहाटिला : ।।

## ८६ अधिकत्वें गुरू कथन

आबाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : गुरु वर्ततां आणीक गुरु करूं ये जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : अधिकत्वें करूं ये :" ।।

## ८७ एकाइमनोरथें देवकन्यानुवादु[१]

एकाइसीं गोसावीयांवरि कुचीत वासना मनोर्थु केला : सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : एथ प्रवृति नाहीं : एथ जरि प्रवृति असे तरि देवलोकीहुनि देवकन्या नाणीजति ?"।।

---

**८७. १ ना.** प्रतीत फक्त 'आदि' आहे, लीळा नाही. ही लीळा येथे **पं.** प्रतीतून घेतली आहे. (लीळा ११०) सर्वज्ञांच्या तोंडी असलेले वचन पाठसमुदायातील शोधनी-विचार पाठान्वयातून घेतले आहे. **नापं.** प्रतीतील 'आदि' मध्ये नागकन्यांचा उल्लेख आहे. पण **पं.** प्रतीतील लीळेत 'तरि पाताळिचीया देवकन्या आणिजतीया :' असे वाक्य आहे. त्यातील 'देवकन्या' हा शब्द न खोडता त्याखालीच 'नाग' (=नागकन्या) असा शब्द लिहिला आहे. पाठसमुदायातील वचन स्वीकारून तदनुषंगाने 'आदि' व लीळा यांतील शब्द दुरुस्त करून घेतले आहेत.

## ८८ ज्ञानदेवां झोटींग प्रसन्न

महदाइसीं गोसावीयांपुढां सांघितलें : "जी जी : ज्ञानदेव नावें महात्मे : ते रायाचे गुरू : जी जी : ते खापरखुंटी धरीति तरि आसु होए : माती धरीति तरि सोनें होए : आणि त्रिकाळ ज्ञान : अतित अनागत वर्तमान जाणति[1] : यां एसणी जाणीव काइसी जी ?" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तया झोटींग प्रसन्न जाला : त्यांसि पुसति तें सांघति : ते जें भाखीति तें साच : ऐसें तेथिचें सामर्थ्य : या नवल नाहीं कीं बाइ : एकएकां एकेक सामर्थ्य असे कीं बाइ :" ।।

## ८९ वनिताक्षौरनिराकरण

गोसावीयांचें क्षौर होत होतें : तवं दोघी साळंकृता नाचणी वोळगे आलिया : गोसावीं भटोबासांतें म्हणीतलें : "करा गा यांसि मुंडण :" तिहीं म्हणीतलें : "हो कां जी : जरि गोसावी सन्निधान देती तरि जवळीचि असौनि : एऱ्हवीं एकलीया ठाकौनि : एऱ्हवीं तरि ना जी :" उपहासु केला :।।

## ९० आउसांचीए उसंगीए रीगणें

आउसें दुखितें चींताग्रस्तें बैसलीं असति : आणि गोसावी एउनि उसंगीए रीगौनि थानिची चुचि श्रीकरें धरुनि श्रीमूख टेंकिलें : आणि तियें कांटाळैलीं : "नको जी स्वामी जगंनाथा : पोरिया एकु होता : तेणें हा उसिटीला :" सर्वज्ञें म्हणीतलें : "हें काइ नाएका : तुम्हां स्त्रीऐसा भावो नाहीं कीं नाएका :" तवं तीहीं म्हणीतलें : "एथ काइ असे जी ?" म्हणौनि श्रीचरणां लागलीं :।।

## ९१ साधां आकासजंतु नीरूपण

एकु दीं गोसावीयांसि उदयांचा पुजावसर जालेयांनंतरें गोसावी आसनीं उपविष्ट असति : साधें बाहिरिलाकडौनि आलीं : गोसावीयांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागलीं : पासि बैसलीं : तवं सींक आलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "साधे हो : सींकिजे ना कीं : हातु हालविजे ना : पावो हालविजे ना : एणें हींसा होए :" तवं साधीं म्हणीतलें : "एथ कें असे जी हींसा ?" गोसावीं श्रीकरीचिया आंगुळिया दाखविलें : "साधे हो :

---

८८. १ **एवा.** °रायासि सामर्थ्य दाखवीति : हांडिया धुववीति : तौलिया पाटिया : पाळी : काठवटी : धुवटें वस्त्रें : मग आकर्खीति : पाहिजति तवं षड्रस पक्वानें : वडे : मांडे : खीरि : साकवतिया : कुसंबीरी : अमर्याद : सकळही पाहिजे तेतुलेंहीं काढितां अन्नमयचि होए : रावो जेविला सपरिवारीं : परि पुरौनि उरलें : जी जी : ऐसें सामर्थ्य तया काइसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "याचें काइ ? बाइ : झोटींग प्रसन्न होता : तो आणआणुं पुरवी : परि तयां जेउं नैए : ते तें जेवीति तरि न पुरे : ऐसें तेथिचें सामर्थ्य :" ।।

हें आवघें आकाश जंतु दुमदुमीत भरलें असे : अनंतां अवतारां उधरीतांही परि चौंगाभरि सवडि पडिली नाहीं :" म्हणौनि गोसावीं चौंगेयावरि चौंगा ठेविला : ।।

## ९२ उजळलेयाचेनि संबंधें मैळला उजळे

एकु दीं निरूपण होत होतें : सर्वज्ञें म्हणीतलें : "उजळलेयाचेनि संगें मैळला उजळे :" मग भक्तिजनीं पुसिलें : "जी जी : तो कैसा जी?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कव्हणा एकाचे दोघ सीक्ष होते : ते हींडों नीगाले : मग एके गावीं भेटि केली : तेथ वीभागु केला : एकासि एकी गावीं तेलियाचिये घरीं भीक्षेसि पेंडि आली : ते रूचली : मग एरी दीसीं मागुती गेले : मागुती आली : तेही रूची जेविले : मग तीसरां दीसीं मागुते आले : मग तेथचि भोजन सारीलें : नदी न वचतीचि : मग तेथचि असति : मग झोळी वरि खुंटियेसि ठेवीति : मग घाणेयावरि बैसति : तापटीति : तवं एर भेटीचीये गावीं आले : ते तेथ न एतीचि : मग सोधीतसोधीत तया गावा आले : तवं एकीं सांघितलें : "एकु महात्मा तेलियाचां घरीं असे :" आले : आणि देखिलें : आणि म्हणीतलें : "आम्हीं ऐसेंचि होतों ना :" आणि तैसेंचि नीगाले : मग नीरूपणें दृढावले : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "उजळलेयाचेनि संगें मैळला उजळे :"।।

## ९३ बाइसीं वस्त्र थु थु करणें

बाइसीं वस्त्र भीजविलें होतें : भीक्षावसरीं गोसावीयांचेया फुटेयाचिये वोलिचें कोंगतें केलें : भीक्षा करूनि आलीं : आणि झाडुनि घडी केली : मग थुथु करूनि दोहीं हातीं धरूनि गोसावीयांचां श्रीकरीं दीधलें : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "देखिलें गा वानरेया : बाइसीं एथिचें वस्त्र वोविळें करूनि थुंकेनि माखुनि दीधलें :" बाइसीं म्हणीतलें : "नेणेंचि बाबा :" म्हणौनि श्रीचरणां लागली : ।।

## ९४ प्रयागवटस्थान अनुवादु

महदाइसें प्रयागा गेलीं होतीं : तेथ प्रयागिचा वटु देखिला होता : मग गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : प्रयागीं वटु असे : तो तोचि जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : तो वटु नव्हे : तें स्थान होए :"।।

## ९५ आबाइसीं सेवेचें उणेंपुरें पुसणें

आबाइसीं प्रसादाचिये विषैचें पुसों पाठविलें : भक्तिजनाहातीं : "जी जी : आबाइसीं म्हणीतलें : 'प्रसादु उरे तयाचें काइ करावें?' ऐसें पुसों पाठविलें असे :" सर्वज्ञें म्हणीतलें : "एथचें उणेंपुरें जैसें बाइसें करिताति तैसें तेथिचें उणेंपुरें तें तेहींचि

करावें : एथचेयाची सता ते बाइसांसि : तैसीचि तेथचेयाची सता ते तेयांसि :" मग आवाइसें तेथिचें आपुलीया उहियापुहिया[१] करीति : ।।

## ९६ तीकवनाएका एंत्रवामकरां वासनाएकां वरप्रदान

श्राधब्राह्मणां क्षेणु दीधला : मग तीकवनाएकु : वासनाएकु दोघै मैत्रभाउ : ते गोसावीयांचेया दर्शना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : तीहीं दांडी टण-कारूनि श्रीकरीं दीधली : गोसावीं श्रीकरीं घेउनि सुती लाउनि वाइली : आणि त्यां आश्चर्य जालें : मग वासुनाएका हातीं दीधली : तिहीं म्हणीतलें : "जी जी : मीं वावों नेणें : " सर्वज्ञें म्हणीतलें : "वावों जाणाल :" वरू दीधला : इतुकेनि तया वरदान जालें : मग तयांचेया सारिखें कव्हणीचि वावों नेणति : ऐसी कळा जाली : मग राज्यमान्य जाले : ऐसी एंत्राची कळा कव्हणीचि ठाइं नाहीं : ते कटकीं असति : कव्हणा एका वेधाचें सुख जालें : स्तिति जाली : तयां उसीरू जाला : ब्राह्मणां अतिकाळु प्रवर्तला : तयाचेनि भाउवें श्राध संकल्पिलें : जेवणें जालीं : वीडे देउनि नीगाले : मग तयां विळिचां आंघोळि पुजा जाली : मग हे गोष्टि[१] तेहीं सांघितली : "या बोटा श्रीचक्रधरेंराएं वेधशक्ति नीक्षेपिली असे :" ।।

## ९७ स्वप्न दाखवणें

भुतानंदाची नाति : दैन्य : खावेया नाहीं : लेयावेया नाहीं : तें स्वप्न जालें : जें गोसावीयां जेउं सुआवें : मग होइल : मग गोसावीयांपुढें सांघितलें : मग गोसावीयांसि उपहारू केला : आणि खावेया जालें : मग लेउनिनेसुनि सुखें असति : ऐसां दुसरें स्वप्न जालें : तेंहीं गोसावीयांपुढें सांघितलें : ।।

## ९८ आसु कथन

सारंगपंडिताचां हातीं आसु होती : ते पडिली : गोसावीयांपासि आले : आणि आठवलें : दुचितें देखौनि गोसावीं पुसिलें : "जी जी : आसु पडिली :" सर्वज्ञें म्हणीतलें : "ऐसेचि जा : गाडेया चाकारीयांचाकारीयांचि जा : चाकारियेआंतु दुर्गाजवळि पडिली असे : देखाल : " गेले : सांपडली : ।।

## ९९ बाइसां स्नानप्रश्नु

थोडी बारसि म्हणौनि दाइंवा पाहातांचि स्नाना गेले : तैसेचि गोसावीयां-पासि आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : गोसावीयांपुढां उभे राहिले : सर्वज्ञें

---

९५. १ एवा. उहापुहा.

९६. १ °बाइदेवोबा वासना :

म्हणीतलें : "हें काइ गा भोजेया : पाहाटविलें ऐसें मां ?" "जी जी : बारसि थोडीचि : पारणेयां उसीरू होइल : म्हणौनि जी दीधली ऐसी मुसळबुडी : आणि काइ जी ?" यावरि बाइसीं पुसिलें : "बाबा : मुसळबुडी म्हणिजे काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : संन्यासियां कर्म नाहीं : काळाज्ञेवीन स्नान : जैसें मुसळ पाणियांतु घालिजे : आणि सळकरि जाए : मग सळकरि नीगे : जैसें तैसें कोरडें : काहीं न लगत : ते मुसळबुडी म्हणिजे : एधवां उदका पवित्रता नाहीं कीं गा भोजेया : " यावरि वरुणलोका नंदु नेला हे गोष्टि सांघितली : ।।

सर्वज्ञें म्हणीतलें : "नंदु बारसिचां दीसीं एमुनेसि स्नाना नीगाला : बारसि थोडी : म्हणौनि सूर्योदयो नव्हतां स्नान करूं रीगाला : तेथ वरुणाचा दुतु राखत होता : तो *वरुणाचेया ठायासि*[१] घेउनि गेला : 'नंदु बुडाला : बुडाला :' ऐसें जालें : तेव्हळि श्रीकृस्णुचक्रवति पहुडले असति : एस्वदा आली : 'बा श्रीकृस्णा : नंदु बुडाला बुडाला : ऐसें आइकिजताए :' तैसेचि श्रीकृस्णचक्रव्रतिही येमूने आंतु बीजें केलें : 'श्रीकृस्णू बुडाला : बुडाला :' ऐसें जालें : तेव्हळि येस्वदेसि अवघीं कोपों लागलीं : 'श्रीकृस्णू धाकुटा : नंदु म्हांतारा : *नंदें खादलें : जेविलें : श्रीकृष्णु बाळु : तेणें काहीं खादलें जेविलें नाहीं :'" ऐसीं तीयें आवघीं गौळियें दुख करूं लागलीं*[२] : तैसेंचि श्रीकृस्णचक्रव्रती वरुणाचेया ठायासि बीजें केलें : वरूणु साउमा आला : माचेयावरि आसन जालें : केसकळापीं श्रीचरण झाडिले : *रत्नांमोतीयांमाणीकांचीं*[१] पूजा केली : *सोनेयाचां परियळीं वोवाळीले*[१] : मग हात जोडुनि पुढां उभा राहिला : मग म्हणीतलें : 'जी जी : हा आम्हीं नाहीं आणिला : *हा एणें*[१] राखणाइतें आणिला : *आतां नेइजो जी आपुला नंदु*[१] :' तैसेंचि श्रीकृस्णचक्रव्रतीन नंदाचा हातु धरूनि बीजें केलें : अवघीं म्हणों लागलीं : 'नंदा : हें काइ जालें ?' नंदासि जो संभ्रमू जाला : तेणें नंदु बोले ना : तवं आवघीं म्हणों लागलीं : 'याचां कानींतोंडीं पाणीं रीगालें : हा चाकावरि घालूनि भवंडा :' तवं नंदें म्हणीतलें : 'काइ म्हणत असा ?' 'ना हें काइ जालें ?' नंदें म्हणीतलें : 'ना : तो एसणा देओ : तेणें जरि यासि पूजा केली तरि हाचि देओ कीं : म्हणौनि याचें जें स्थान तें आम्हीं जाणावें : आणि काए ?' ऐसें म्हणौनि आग्रहो घेतला : तेव्हळि श्रीकृस्णचक्रव्रतीन कव्हणी एकु स्थान तेयासि दाखविते जाले : मागौतें दाखवावें ऐसें म्हणतें तरि मागौतें दाखवितें : तें होआवें ऐसें म्हणते : तरि तैसेंही करिते : " ।।

## १०० भटीं आउसातें खवळणें

भट आउसांतें खवळीति : व्यापारू करितां देखति : तियें गोसावीयांपुढां सांघति : गोसावी सकाकु म्हणति : "वानरेया : उगे असा गा : आउवेतें खवळा ना :" तवं

९९. १ (भ.). २ (ग.).

अधिकाचि खवळीति : " वारिजो जी या नागदेयातें : मातें खवळीतोए : काइ धाकुटा ?" गोसावी म्हणति : " तुम्हीं उगी असा : हे हांसती तवं हांसती : मग अपैसेयाचि उगे राहाति : " ।।

## १०१ सुरजबुधि निराकरण

भटीं राजसीं भावीं श्रीमुर्ति विशेषें आकारिली : तें जाणौनि सर्वज्ञें म्हणीतलें : " हें जरि स्त्रीवेखें देवो होतें तरि वानरेसां गद पडतें : " तेणें तयां दैन्य जाली : दुख करीति : उणें पुरें करीति : ।।

## १०२ आसापतीत्वकथन

सर्वज्ञें म्हणीतलें : " हें जरि स्त्रीवेखें देवो होतें तरि हा जनु आसापतीतु होता कीं गा वानरेया : "।।

## १०३ बहुरूपीयां बंधुनिरोध : आपानवायो प्रसंसा

बहुरूपिएं खेळतां पवनु धरिला : तयासि नीरोधु गुंतला : तयाचिये म्हेळिचीं म्हणति : ' एकु पादु पाद कां गा : एकें पादें इतुकेही जीउनि : ' ऐसें वाडुवेळ प्रार्थिलें : मग वारा सरला : आणि वाधावणी देति : सचाहातें ऐसें खेळति : यावरि सर्वज्ञें म्हणीतलें : "पोरू जीवू ऐसा असे : एक एणेंचि जीताति : एक एणेंचि मरताति : लाजा ऐसे एक : " ।।

## १०४ मतद्रव्यसेवनीं ब्रह्मपातक उपाहासु*

मार्गीं चालतां मातलेयाचा वीटाळु जाला : संन्यासीयां : तेहीं आंघोळी केलिया : मग वाळुवंटीं एकमेक वीद्वांस : संन्यासी : आणीकही लोक जवळि होते : म्हणति : " सुरापान केलेयां ब्रह्महनन केलें होए : एसणें पाप : " ऐसें बोलिलें : महदाइसें स्नान सारूनि एताति : तें आइकिलें : मग एउनि गोसावीयांपुढें सांघितलें : मग म्हणीतलें : " जी जी : हें कैसें ?" गोसावी भट एति तवं न बोलतीचि : मग भट : महदाइसां भक्तिजनासहीत बोलिले : सर्वज्ञें म्हणीतलें : " देखिलें गा : कें जोन्हळेयांचें पाणी : आणि धामोडेयाची सालि[२] : आणि के ब्रह्महनन : परि हा ठावोवेन्हीं मत्त द्रव्य दूणिलें : " *सर्वज्ञें म्हणीतलें : " ब्रह्महत्या ते ब्राह्मणु हतीलेयावीन कैसी घडे[१] ?* पर एक अन्यथाज्ञानें : अभिळाषें : अभिमानें देखति ना वाइ : " ऐसें *निरूपण केले : निरूपणीं प्रस्तावेयानुरूप सर्वज्ञें म्हणीतलें : " परमेश्वरशास्त्रीं एवं वा नाहीं : पर्याय नाहीं : अभावीं भावरूप फळ नाहीं : अकरणीं प्रत्यवायो नाहीं[२] :* " ।।

---

**१०४.** *या लीळेचा पूर्वसंदर्भ **आमा.** ११९ या वचनावरील ' प्रकरणवशां 'त आढळतो.
१ (**ना.** अज्ञात. अपूर्ण. लीळा. ४१). २ (**प्रव. आमा.** ११९).

## १०५ ममतादुख कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "आंतुलापसि बाहिरीलु नीका : तो तीतुकीये ममतेवेगळा : तयातें तेतुकें दुख नाहीं कीं बाइ : घरांतुलापसि तो नीका :"।।

## १०६ जोमाइ नामकरण

जोमाइसें तियें दुबळी : धोंगडा साउला : खांडा वाह्यांची चोळी : नीडळभरि कुंकुं : रीगति : नीगति : तें देखौनि सर्वज्ञें म्हणीतलें : "सोवासीनि मीरवते कैसी :" आणि तया सुखचि होए : तवं तवं पुसति : "सोवासीनि जेविली ?" ऐसा सांभाळु करीति : ऐसें नावं ठेविलें : बाइसां व्यापारू करूं लागति : मग पंचाळेश्वरा गेलीं : ।।

## १०७ महदाइसीं श्राध प्रश्नू करणें

महदाइसीं पुसिलें : "जी जी : श्राध कीजत असिजे तयांसि पावे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तयांसि न पवे :" "तरि काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जो एथ क्रिया करी तीये क्रिएचें गोमटें होए : परि ते अधिष्टानीं तोखु पावे :"।।

## १०८ बाइसांचें वस्त्र वेढणें

एकु दीं गोसावीयांचीं वस्त्रें भीजलीं होतीं : फुटा : बहिर्वासु : तवं गोसावीयांसि मादणें जालें : बाइसीं म्हणीतलें : "बाबा : नागदेवो गंगेहुनि वस्त्रें नाणीचि :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तुमचेया वस्त्राची धुतली घडी असे ते आणा आरती :" आणिली : गोसावीं वेढिली : मग पुजावसरू जाला : आरोगण जाली : फुटा बाहिर्वासु आणिला : तो वेढिला : ।।

## १०९ बाइसांचे गुरु

बाइसांचे गुरू सुमृताबाइसें उचारिलीं असति : ।।

## ११० श्रावणा भगति कथन

सर्वज्ञें म्हणीतलें : "त्रेतीं मातापितरांची भगति हा धर्मु : श्रावणें मातेपीतेयाची भगति बरवी केली : मग मातापीतेनि म्हणीतलें : 'बा श्रावणा : आम्हांसि वाराणसी ने कां :' मग श्रावणु जाचंवंदीतें वाराणसीसि नेतु होता : तवं गावीं एकीं म्हणीतलें : 'बा श्रावणा : तान्हैलों रे :' मग श्रावणें सूनेयांमाजरातव वृक्षाचीए खांदीए कावडि घातली : आपण कमंडलु भरूं गेला : तवं दसरथु पाणिएड राखतु होता : कमंडलु भुडभुडकरि वाजते : दसरथु म्हणे : 'सावज आलें :' म्हणौनि बाण लाउनि घातला : हात नीवाला : अंतर पोळलें : साउमा आला : तवं श्रावणें म्हणीतलें : 'मीं श्रावणु गा :

जाचंदें तान्हैलीं : म्हणौनि पाणियांसि आलां : आतां तुम्हीं उदक नेया : न बोलत पाणी पाजावीं :' मग तो तेथ गेला : आणि तेहीं म्हणीतलें : 'बा श्रावणा : आलासि ?' म्हणति तरि हुं म्हणावें : परि बोलावें ना : कमंडलु भरूनि घेउनि गेला : मागौतें तेहीं म्हणीतलें : 'बा श्रावणा आलासि ?' दसरथें हुं म्हणीतलें : 'बा : बोलसि ना : काइ रागैलासि ?' आणि दसरथें म्हणीतलें : 'आइ : मी दसरथु : पाणिएड राखतु होतां : श्रावणु कमंडलु भरूं आला : कमंडलु भुडभुड वाजीनला : सावज आलें : म्हणौनि वाणु घातला : बोंबीएपासि लागला : मी धावौनि गेलां :' 'बा : तुं कोणु रे ?' 'ना मीं श्रावणु : माझीं जाचबंदें तान्हैलीं : म्हणौनि पाणियासि आलां : तरि न बोलत पाणीं पाजावीं :' मग तेहीं श्रापु दीधला : 'आम्हां जैसा पुत्रसोखू जाला : तैसा तुज हो :' दसरथें सगुणगांठि वांधली : 'पुत्र तवं हो : मग पुत्रसोखू हो : आणि काइ : ' मग तेहीं दोघीं जाचवंदीं प्राण दीधले :" ।।

## १११ आनो उपासनीयां सीरमेळवनीं दंड*

[ [1]एक वेळ आनोसी आणि उपासनीयांसी आन्नविची स्तीति जाली : उपासनिए म्हणों लागले : "द्वैत कीं अद्वैत ?" आनो म्हणों लागले : "अद्वैत :" तर उपासनिएं म्हणीतलें : "अद्वैत साच तरि तुजमज सीरमेळवनी करूं : मा तुही न दुखविसी : आणि मीही न दुखवे : तरि अद्वैत साच :" "हो कां :" म्हणौनि दोघै सीरमेळवनी करूं लागले : कपाळें फुटलीं : परि ओसरती ना : मग भटीं मार्तंडीं दोघै दोहींकडौनि ओढौनि नेले : आणि स्तिती भंगली : मग गोसावीयांपासि आले : आणि हांसों लागले : "जी जी : देखीलें कीं : एणें मज ऐसें केलें :" मग भटातें सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : दोघै अपराधा आले : तयांसि दंड करीं : कां पां ? भांडते दोघै अन्यायी :" ।। ]

## ११२ साधातें अटनविजन निरूपण*

[ [1]एकु दीं साधीं गोसावीयांपासि संन्यास मागितला : गोसावीं दीधला : मग साधें नीगों बैसली : तेव्हळीं साधीं पुसीलें : "जी जी : गोसावीयांपासौनि जाइजे तेव्हळीं कैसें वर्तावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधे हो : गोंडीबुंथी घालिजे : अन्यमार्गियांचा संसर्गु न करावा : अन्यमार्गियांचिये गुंफे न वचावें : गोरुवासरिसें गावांतु रिगीजे । देउळीं निद्रा न कीजे : एकां वेडीपिसीं नुरेति : पाहातांचि उठीजे : मार्गीं उभीयां राहिजे :

१११. *(प्रव. आमा. २२).

१ जाखोबा पाठ : अज्ञात°.

११२. *(प्रव. आमा. ७५-८३; आमा. ४०-४६).

१ अज्ञात°.

सांघातु पाहीजे : मागीले म्हणेति पुढीलाची : पुढील म्हणेति मागीलाची : सिवनीचिचना आपुली मोळी गांवावाहिरी झाडातळीं घालावी : गंगातीरीं असीजे : सातांपांचां दीसां आपुली दावली दाविजे : अटन तें निरुद्देशें करावें : गांउनि गांवा जावें : सवेळेचां पाहारीं दीसु भीलाचिये पाळीये भय नाहीं : झाडातळीं विजन कीजे : अतिअसुरे स्थानीं नसावें : असावें ऐसें तोंडावरि फाळुकें घालौनि : नामस्मरण करावें : नामीं अभिमानु आति : " "हो कां जी : " मग तैसीचि बीढारा गेलीं : ।। ]

## ११३ चणा विखो निरूपण*

[ [१]एक वेळ नाथोबाएं पुसिलें : "जी जी : रायाची राणी ब्राह्मणासि चणे देति असे : तरि तेथ आम्हांसि जावों ए जी ?" गोसावीं श्रीमुगुटें निराकरिलें : यावरि भटीं पुसिलें : "जी जी : तेथ कां जावों न ए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : चना विखो : " भटीं म्हणीतलें : "जी जी : चना कैसा विखो ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "दान देती : मान्यता करिती : तो विखोचि कीं गा : " "जी जी : हा कवण इंद्रियाचा विखो ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "मनाचा : " "हो कां जी : " ।। ]

## ११४ कळियुगीं ब्रम्हचर्ये त्रसले जीव*

[ [१]एक वेळ आउसीं म्हणीतलें : " जी जी स्वामी जगन्नाथा : या भगवेयांमाजि कव्हणी ब्रह्मचारी नाइकों : न देखों : शंकर तो गळित : लुईपाई : कान्ह : जाळंधरी : गोरक्ष हे अवघे गळितचि कीं : " सर्वज्ञें म्हणीतलें : " नायका : कळियुगीं ब्रह्मचर्यें त्रसले जीव विषयाकारणें मढीं उपरतीति[२] : मां एर काइ म्हणावें असे ?" "हो कां जी : " ।। ]

## ११५ योगक्षेम कथन*

[ [१]देमाइसीं पुसिलें : "जी जी : गोसावीयांचा वेष घेतलेयां योगक्षेमाचें कैसें करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देमती : तेणें तवं मोकलावें : मग जयाचें ते संभाळीति : " "हो कां जी : "।। ]

---

**११३.** *(**प्रव. आमा.** १४३).

१ **नागाइसें :** अज्ञात°.

**११४.** *(**प्रव. आमा.** १८१).

१ अज्ञात°. २ **एवा.** उकरतीति.

**११५.** *(**प्रव. आमा.** १८२).

१ अज्ञात°.

## ११६ महावाक्य गोष्टी रानींवनीं करणें*

[ [1]एक वेळ महदाइसें लखुबाइसांसि महावाक्याचीया गोष्टी करीत होती : तेथ जनसंसर्ग होता : तें देखुनि सर्वज्ञें म्हणीतलें : "या ऐसियाऐसिया गोष्टी तिया रानींवनीं कीजेति कीं गा" "हो कां जी : चुकलिएं :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।। ]

## ११७ तूप गाळोत्तर रस निरूपण*

[ [1]भटीं पुसिलें : "जी जी : भिक्षा करितां जरि तेल कां तूप ये तरि काइ करावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तेल : तूप : हा गाळोत्तर रसु कीं गा : मां रसा काइ साक्षी ठाकिजेति[2] ?" "हो कां जी : तरि आजिलागौनि न ठाकों जी :" ।।]

## ११८ अष्टभैरव विद्या आगम निरूपण*

[ [1]एकु दीं महदाइसीं पुसिलें : "जी जी : अष्टभैरवाचे विद्यामार्ग निरूपावे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : नाद : बिंदु : कळा : ज्योति : लो : अवस्था : आनंदु : आवेशु : या अष्टभैरवाचिया आठि विद्या :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : अष्टभैरवाचीं नावें निरोपावीं जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : कराळी : विकराळी : उमापति : पशुपति : सदाशिव : ब्रह्मा : विष्णु : महादेव :" यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी : हे आगम कव्हणाचे ? आणि किती असति ? आणि कवणें केले जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : हे आगम अष्टभैरवाचे : आगम ते च्यारि : आगम ते सिद्धकृत : *आगम भैरववेन्ही जाणति*[2] :" "जी जी : चहुं आगमाचीं नावें कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्वच्छंद : ललित : मंथान : भैरव : आदि : कादि :" महदाइसीं पुसिलें : "जी जी : हे अष्टभैरव परमेश्वराचा कवण व्यापार करिती जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : सृष्टिकर्ते ते : अहंकारीए ते : अभिमानीए ते :" ऐसें गोसावीं महदाइसांसि निरोपण केलें : तें महदाइसीं घोकिलें : मग श्रीचरणां लागलीं : ।। ]

---

**११६.** *(**प्रव. आमा.** १८४).

१ अज्ञात°.

**११७.** *(**प्रव. आमा.** १८५).

१ अज्ञात°. २ **एवा.** ठाकीजताए.

**११८.** *(**प्रव. वि.** १९–२३).

१ **रामेश्वरबा : अज्ञात°.** २ (**मु.** ४१. मागे अज्ञात लीळा २१ पाहा).

## ११९ साजात्यां साजात्यां वेध कथन*

[ [1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : देवताचा वेध कवणा संचरे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : साजात्यां साजात्यां वेधु :" ।। ]

## १२० अंशवेधें संपूर्णाची प्राप्ति निरूपण*

[ [1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : देवताचां लीळाविग्रहीं जीव वेधे तया काइ होए?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : अंशवेधें संपूर्णाची प्राप्ति :" "हो कां जी :" नावेक जाला : मग भटीं पुसिलें : "जी जी : लीळाविग्रह तो अंश : पिंडस्था ते रश्मी : ऐसें वाखाणिलें : तरि अंशवेधें संपूर्णाची प्राप्ति : आणि रश्मिवेधें काइसेयाची प्राप्ति तें सांगिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : विद्यासंक्रमण जालेयां जे पिंडस्थ प्रकाशे ते रश्मी :" "हो कां जी :" ।। ]

## १२१ विद्यामार्ग अंतर्याग निरूपण*

[ [1]भटीं पुसिलें : "जी जी : विद्यामार्ग केतुकेयातें म्हणिजे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : वेध : विद्या : ज्ञान : साधन : धर्मु : या पांचातें विद्यामार्ग म्हणिजे हो :" माइदेवोबाचिया वासना : भटीं ऐसें पुसिलें : "जी जी : अंतर्याग जालेयां किती कार्यें प्रकटती?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वेध : विद्या : ज्ञान : साधन : धर्म : हे पांच कार्यें अंतर्यागीं प्रकटती :" "हो कां जी :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : अंतर्यागासि कैसें लक्षण असे?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*साध्य साधनीं सुखरूपता यातें अंतर्यागु बोलिजे*[2]: उभयान्वीक्षमाणे सत्तासन्निधिमात्रें शक्ति संचरे यातें अंतर्याग बोलिजे :" "हो कां जी :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : उचे देवतेचिया विद्यावंतापासौनि खालीली देवतांचिया विद्या होती ऐसें कांहीं आति?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आति गा वानरेया : जो जेतुला तो तेतुलेयांतें करौं सके :" ।। ]

## १२२ आन्नवमहान्नवादि विभाग निरूपण*

[ [1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : आन्नव : महान्नव : शाक्तेय : शांभव : यांचे विभाग निरोपावे जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : चंद्रसुर्यापासौनि आन्नव :

---

११९. *(प्रव. वि. २८).
१ **रामेश्वरबा : अज्ञात°.**

१२०. *(प्रव. वि. २९).
१ **रूपदेवबा : अज्ञात°.**

१२१. *(प्रव. वि. ३०-३२).
१ **एकोबा : अज्ञात°.** २ (विमा. १८१).

१२२. *(प्रव. वि. ३३).
१ **वोंकारबा : अज्ञात°.**

नारायणाहरिहरापासौनि महान्नव : अष्टभैरव ते शाक्तेय : विश्वचैतन्य ते शांभव :" "हो कां जी :" ।।]

## १२३ इंद्रब्रह्मादिकां जीव कथन*

[[1]एक वेळ भटीं पुसिलें : " जी जी : हे इंद्रादिक कव्हणातें जीव म्हणति ? आणि हे ब्रह्मादिक कव्हणातें जीव म्हणति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : इंद्रादिकां अनात्मा आत्मप्रतीति : ब्रह्मादिकां आत्मा आत्मप्रतीति :" भटीं म्हणीतलें : "जी जी : अनात्मा तो काइसयातें म्हणिजे ? आणि आत्मा तो काइसयातें म्हणिजे ?" मग याचें व्याख्यान गोसावीं सांगितलें : ।।]

## १२४ तीन्हीं ग्रामे तीन्हीं राणे समान निरूपण*

[[1]एक वेळ महदाइसीं पुसिलें : "जी जी : आजि पुराणीं ऐसें आइकीलें : जें ब्रह्मा : विष्णु : महादेवो : या तिहीं देवांमाजि एकाहुनि एक अधिकउणा नाहीं : जो ऐसें म्हणे तयासि महादोष घडे : तरि हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : कव्हणें एकें अर्थें साच : एर नव्हे :" "तें कैसें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : तीन्हीं ग्रामें : तीन्हीं राणे समानचि : एणें अर्थें साच : एर नव्हे :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागलीं : ।।]

## १२५ इतर विद्या जीव न मुंचे निरूपण*

[[1]एक वेळ भटीं पुसिलें : " जी जी : इतर विद्ये ज्ञान : भक्ति : वैराग्य असौनि परि जीवासि मोचक नव्हे : तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : " ब्रह्मविद्येची सारीखवांटणी इतर विद्यांचां ठाइं आति : परि तेणें जीव न मुंचे :" " कां पां ?" "मोक्षमार्गीं जीवाचे मळ जाति : विद्यामार्गीं आच्छादेति :" ।।]

## १२६ प्रमादिया अडनीक्रिये देहविद्यानिरूपण*

[[1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीयांसि जे ननुसरति ते प्रमादिए बोलिजेति : तयांमाजि एका परमार्गीं अडनीची क्रिया घडे : एक ते देहचि वेंचिति :

---

१२३. *(प्रव. वि. ३४).

१ वाएंबाए : अज्ञात°.

१२४. *(प्रव. वि. ३५).

१ पेटे हरीबा : अज्ञात°.

१२५. *(प्रव. वि. ३६–३७).

१ धाकुटे लक्ष्मींधरबा : अज्ञात°.

१२६. *(प्रव. वि. ३८–४०).

१ मुरारबा : अज्ञात°.

तयां काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : तयांसि देह्विद्या होए : जैसें ज्ञानियासि पाठीं घालीति तैसा ठावो :" भटीं म्हणीतलें : "जी जी : देहविद्या जालेयां काइ होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "देहविद्ये देह प्रकाशे : देहीं भूतें तन्मात्रापर्यंत उरेति : सातै अंश झडेति : एकाकारवृत्ति उरे : हेमकाया होए : वज्रकाया होए :" "हो कां जी :"।।]

## १२७ गत्वामुक्ति निरूपण*

[ [१]एक वेळ महदाइसीं पुसिलें : "जी जी : पुराणीं ऐसें बोलति : जें स्वर्ग पातलेयां गत्वा मुक्ति एकी आति : तेणें संसारावेगळेयां होइजे : म्हणौनि जेणें धर्में स्वर्गु होए तो धर्मु आचरावा : तरि हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : स्वर्गीं गत्वा मुक्ति एकि आति हें साच : परि एर नव्हे :" "जी जी : तें कैसें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : यागांत ब्रह्मेयाचिया विग्रहाचां ठाइं भजन घडे तो अधिकार होए : मग स्वर्गीं फळप्राप्ति होए : तेथ *स्वर्गीं परलोकीची देवता एउनि ब्रह्मविद्या उपदेशु करी*[२] : ते विद्येसीं स्वर्गाचें फळ भोगी : मग फळाचा अंत जालेयां पतन होए : मां तेणें संसारनिवृत्ति काइ होइल ?" "हो कां जी :"।।]

## १२८ ऐलपैल देवताव्याप : तथा देखणें*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : देवतामाजि उच निच विभाग : तरि तया परस्परें कैसें दर्शन आणि व्यापकत्व : आणि ज्ञान : तें निरोपावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : उच असे तो तळीचील देखे : पैल ऐलातें व्यापौनि वर्ते : ऐल पैलाचें अस्तित्व जाणे :" ।।]

## १२९ विधिभावातीत अनुष्ठान निरूपण*

[ [१]एकु दीं भटीं पुसिलें : "जी जी : कर्मराहाटीसी एक पुरुष क्रिया विधी अनुष्टीति : एक भावो अनुष्टीति : तरि दैवराहाटीं या दोंमाजि कवण चांग ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : एकु विधिअनुष्ठान : एकु भावअनुष्ठान : हें विधिभावातीत अनुष्ठान : म्हणौनि हें चांग :" "हो कां जी :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : हें विधिभावातीत

**१२७.** *( **प्रव. विमा.** ६३–६४). **प्रव.** °वरील देवता ए : विद्या दे°.

१ **रामदेवमुनि** : अज्ञात°. २ (**सूत्रपाठ. विमा.** ६४).

**१२८.** *(**प्रव. वि.** ४३–४४).

१ **गोपाळबा** : अज्ञात°.

**१२९.** *(**प्रव. वि.** ५४–५५).

१ अज्ञात°.

अनुष्ठान : तरि विधिभावेंवीन काइ अनुष्ठान असे ? तरि विधिभावातीत अनुष्ठान तें कैसें जी ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हीं म्हणता तें तैसेंचि : एकु विधिसहित भावो : एकु भावासहित विधि : ऐसें द्वीध विधिअनुष्ठान बोलिजे : तें पुरुषभेदें असे : " "हो कां जी :" ।। ]

## १३० च्यारि ब्रह्में कथन*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : ब्रह्में कीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया ब्रह्में च्यारि :" "जी जी : तियें कवणें ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "सच्चिदानंद ये तीनि ब्रह्में : आणि विश्वरूप ब्रह्मांड व्यापुनि उरली : म्हणौनि तुर्य ब्रह्म ते : " "हो कां जी :" ।। ]

## १३१ अविद्या : तथा प्रपंचस्वभाव निरूपण*

[ [१]एकु दीं गोसावीं अविद्येचें आणि प्रपंचाचें स्वरूप निरोपिलें : मग भटीं पुसिलें : "जी जी : अविद्या जीवातें सकळ कर्मफळीं व्यापारवी : ते कवणाचेनि निरोपें व्यापारे ? आणि प्रपंचु जीवातें मैळी तो कवणाचेनि निरोपें व्यापारे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : जीवातें प्रतारिजे हा अविद्येचा : प्रपंचाचा स्वतसीद्ध स्वभावो : कव्हणाचें दीधलें नव्हे : आणिलें नव्हे : अविद्या अविद्येसि कारण : प्रपंचु प्रपंचासि कारण :" "हो कां जी :" नावेक जाला : मग भटीं पुसिलें : "जी जी : कार्यकारणासि एकचि नावं : तरि कर्यकारणां भेद कैसा जाणावा जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "यदनंतरं यद्दृश्यते तत्तस्य कारणम् : एणें न्यायें कार्यकारणां भेद जाणावा :" "हो कां जी :" ।। ]

## १३२ युगधर्म निरूपण*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : युगधर्मचिं कैसें लक्षण ? " सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : ज्ञान : ध्यान : मंत्र : स्थावर : ऐसेयाचा वेध बोध तो युगधर्म बोलिजे :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : कृतयुगीचे लोक ते कैसे ? त्रेतीचे कैसे ? द्वापरीचे कैसे ? कळयुगीचे कैसे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कृतयुग ते दैवयुग : तेथिचे ते सकळही आत्मारामु : *आयुष्याचां अंतीं विकारनिमित्तें देहपातु*[२] : त्रेतायुग ते मानवयुग : तेथिचे

---

१३०. *(प्रव. वि. ५६).

१ अज्ञात°.

१३१. *(प्रव. वि. ६१–६२).

१ अज्ञात°.

१३२. *(प्रव. वि. ७३–७४).

१ **कानडी लुखाइसें** : अज्ञात°. २ (**विमा. १७१ सं.**).

ते सकळही मनोराम : द्वापर तें असुर युग : तेथिचे ते सकळही इंद्रिएराम : कळियुग तें अद्धमयुग : कळयुगीचे ते सकळही विषयाराम :" "हो कां जी :" ।।]

## १३३ हीने युगीं बहिर्याग निरूपण*

[[1]भटीं पुसिलें : "जी जी : उपदेसिला बहिर्याग हीने युगीं संभवे : तो कैसीयापरी संभवे ? आणि बहिर्याग तो काइसयावाचक ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : चहुं युगीं धर्म बहिर्याग : *साधनीं दुःखरूपता : साध्यीं सुखरूपता तो बहिर्यागु बोलिजे*[2]: जवं तें युग वर्ते तवं तेथीचा धर्म वर्ते : पुढील रीगे : आणि तो लोपे : आणि काळेकरौनि मागील युगीचा धर्म लोपला सातां एकाधा जाणता उपदेशी : आणि प्रकटे : यापरि उपदेसिला बहिर्याग हीने युगीं संभवे :" ।।]

## १३४ भक्ति जैसी रामाची लक्ष्मणें केली*

[[1]एक वेळ गोसावीयांचां ठाइं भक्तीप्रसंसेचिया गोष्टी नीगालीया : कव्हणी कव्हणाची भक्ती वाखाणी : मग यावरि महदाइसांप्रति सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : भक्ती जैसी रामाची लक्ष्मणें केली : ऐसी कुपात्रीं न वर्ते :" यावरि महदाइसी पुसिलें : "जी जी : हे पुराणिक दशरथी रामातें साक्षात ब्रह्म म्हणती तें कां पां ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : राम शुद्ध सत्वाचा अवतारु : म्हणौनि :" "जी जी : शुद्धसत्व तो कवण जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : शुद्धसत्व तो आठांतुल विष्णुचि होए :" "हो कां जी :"।।]

## १३५ परमेश्वरप्राप्ती जीवासि आधार निरूपण*

[[1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : जीवु माएसि अधीन होए : कां प्रपंचासि : मध्यें असणेंचि नाहीं : तरि परमेश्वरप्राप्ती जीवासि कवण आधार जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कैवल्य :" भटीं म्हणीतलें : "जी जी : जीवासि आधारभूत कैवल्ये : तेथ सेवाभाव होआवा लागे : परि तें कैवल्य कव्हणी एकी ठाइं रमे :" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : एकु जीवकैवल्य : एकु परकैवल्य : जीवकैवल्य तें परकैवल्यीं रमे : परकैवल्य तें स्वस्वरूपीं रमे :"।।]

---

**१३३.** *(**प्रव. वि.** ७५).

१ **अमृते माइदेवोबा :** अज्ञात°. २ (**विमा.** १७२. **सं.**).

**१३४.** *(**प्रव. वि.** ७६–७७).

१ **नागाइसें : अज्ञात°.**

**१३५.** *(**प्रव. वि.** १३१).

१ **आनोबा : अज्ञात°.**

## १३६ विषयप्रेम निरूपण*

[ [1]एकु दीं भटीं पुसिलें : "जी जी : जीवासि ईश्वरीं विषयत्वें प्रेम तें काइसेनि होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : ज्ञानियाभक्ताचां ठाइं जीवासि विषएत्वें आवडी उपजे : मग प्रीति उपजे : मग प्रेम होए : यापरी ज्ञानियाभक्ताचां वियोगीं विषएत्वें देह जाए : तेणें जीवासि ईश्वरीं विषएत्वें प्रेम उपजे : परि ईश्वरीं विषएप्रेम तें दुर्लभ :" यावरि भटीं म्हणीतलें : "जी जी : अहेतुक पुरभजन मुख्य प्रेमातें अपजवी : परि ईश्वरीं विषए-प्रेम जालेयांनंतरें काइ पुरभजन घडवावें लागे ?" मग सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : हो कां गा : तें काइ एरातें अपजउं न सके ? मां तया उपरि भजन काइ काज ?" "हो कां जी :"।। ]

## १३७ मातापिता भक्ति : तथा स्नेह निरूपण*

[ [1]एक वेळ महदाइसीं पुसिलें : "जी जी : पुराणीं मातापीतराची भक्ती थोर प्रसंसीली असे : तरि तिया काइ होए जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वाइ : माता-पितराचेनि अभिमानें बाळकासि भलें : बाळकावरि पीतेयाचें स्नेह तें सहेतुक : मातेचें स्नेह तें नैसर्गिक : तैसें ईश्वरीं जीवाचें :" "जी जी : तरि तें समान ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरीं जीवाचें तयाचा एकदेशु मातेचां ठाइं वर्ते : मां समान केवि होइल ?" "हो कां जी :" यावरि महदाइसीं पुसिलें : "जी जी :" "स्नेह कैसेनि जाणावें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : स्नेहाचां ठाइं उचित स्फुरे : तेणें जाणावें : आणि स्नेहाचां काजीं जाणावें : मां एर काइ म्हणावें असे ? परस्परें स्नेह जाणावें : जेंचि एरां ठाइं वर्ते तेंचि एरां ठाइं वर्ते :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : स्नेह जाणवलेया-नंतरें : जेंचि एरी ठाइं वर्ते तेंचि एरी ठाइं वर्ते : तें एकएकाचें स्नेह नेणौनि : जेंचि एरी ठाइं वर्ते तेंचि एरी ठाइं वर्ते :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीव जीवां उरले असति : म्हणौनि :" महदाइसीं म्हणीतलें : "जी जी : जीव जीवां कां पां उरति ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : जीवु स्वार्थपरु :"।। ]

## १३८ दाएंबा विषयवासनाभेद कथन*

[ [1]एक वेळ दायंबाएं पुसिलें : "जी जी : पुरुषासि शत वरीखें आयुष्ये : तयामाजि विषएवासने भेद कीती ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "च्यारि :" "जी जी : ते कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "दंडी : दर्शी : स्पर्शी : कुचमर्दनी :"।। ]

१३६. *(प्रव. वि. १३५–१३६).

१ वाकुडे दाएंबा : अज्ञात°.

१३७. *(प्रव. वि. १८३–१९०).

१ येल्होबा. पाठ : अज्ञात°.

१३८. *(प्रव. वि. १९७).

१ अज्ञात°.

## १३९ स्त्री सहसा प्रवर्ते ना निरूपण*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : आम्हीं मागां एकाचीया स्त्रीया बहुत लाचाउनि : परि तीए न प्रवर्ततीचि : ऐसीया एकि आति : आणि जिया प्रवर्तेति तिया मरणभए देखौनिही न निवर्तेति : ऐसीया एकि आति : हें ऐसें काइ जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : स्त्री सहसा प्रवर्ते ना : प्रवर्तली तरि निवर्ते ना : पुरुषु प्रवर्तो जाणे : निवर्तो जाणे :" भटीं म्हणीतलें : "जी जी : सहसा कां न प्रवर्ते ? आणि प्रवर्तली ते कां न निवर्ते ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "स्त्रियांसि अष्टगुण कामु : परि लज्जारूप धर्मु एकु आति : स्त्रिया अविद्यात्मका : स्त्रियांचां स्वरूपीं आग्रहो एकु आति :" यावरि[२] गोसावीं क्षीराब्धीगमनाची गोष्टि सांघीतली : ।। ]

## १४० देवो अछेद्यो अभेद्यो निरूपण*

[ एक वेळ घुइनाएक गोसावीयांचिया दर्शना आले : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागले : मग पुसिलें : "जी जी : पुराणीक ऐसें बोलति जे जैसे जीवासि छेदभेद प्रभवति तैसेचि देवासि छेदभेद प्रभवति : जैसें मालिकातीर्थी श्रीकृष्णासि भालि लागली : तरि हें साच जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "नाएको : देवो तो अछेद्यो : अभेद्यो : " ।। ]

## १४१ सन्निधानें विषयवासना नष्ट निरूपण*

[ [१]नाथोवातें सर्वज्ञें म्हणीतलें : "मंडळीका : तुम्हां काही विषयाची वासना असे गा ?" नाथोवायें म्हणीतलें : "जी जी : तें मज ठाइचेंचि नाहीं : तें गोसावी जाणत असति कीं :" सर्वज्ञें म्हणीतलें : "तैसें नव्हे कीं गा मंडळीका : तें एथीचेनि सन्निधानें निवर्त्तलें : अग्निचेनि संबंधें वात श्लेष्मा न बधीति कीं गा मंडळीका : *अग्नीचा संबंधु तवंपर्यंत करावा : जैसा पैऱ्हा गेलेयां वात श्लेष्में न बधिति : तैसें पुरुषें तवंपर्यंत सन्निधान करावें जैसें पैऱ्हां गेलेयां विकारु विकल्प न बधिति*[२] *:* " ।। ]

## १४२ जरठ तथा कोमळ विरहीया निरूपण*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : जरठ विरहीया : कोमळ विरहीया ते कवण ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "कोमळ तो अनुसरला : जरठ तो प्रेमिया :" "जी जी : हें कैसें

---

**१३९.** *(**प्रव. वि.** १९८–२०१).

१ **अज्ञात**°. २ पूर्वार्ध लीळा ३६३ पाहा.

**१४०.** *(**प्रव. वि.** २२७).

**१४१.** *(**प्रव. वि.** २५५).

१ **भाइदेवोबा अज्ञात**°. २ (**दृपा.** ७५. अग्नीसंबंधाचा दृष्टांत. दृष्टांतपाठाच्या सर्व पोथ्यांत या दृष्टांताच्या आरंभी हाच प्रकरणवश दिलेला आहे. म्हणून तो येथें पुनःस्थापित केला आहे.

**१४२.** *(**प्रव. वि.** २५६–२५८).

१ **बाइदेवोबा : अज्ञात**°.

जाणावें जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "एकासि परमेश्वरपदार्थीं सुख होए : परि ईश्वर-विरहें व्याकुळ होए : म्हणौनि आफळसाफळ करी : आणि दुसरेयासि परमेश्वरपदार्थ ते परमेश्वरेंविन आवघेचि आपदार्थ : म्हणौनि तयाचा तो विखोचि नव्हे : जैसीया दोघी विरहीणी असति : तयामाजि एकी पतीचां पदार्थीं सुख मानी परि आफळसाफळ करी[२] : *कव्हणी एकी जरठ वीरहीणी असे : तीएसि चंदन तैसा चीखलु : अन्न तैसी माती : साखर तैसी धुळी*[३] : तिएचेनि नावें तो विखोचि नव्हे : तैसा ठावो :" "हो कां जी :" म्हणौनि श्रीचरणां लागले : याउपरि भटीं पुसिलें : "जी जी : अनुसरणासि कवण अनधिकारी तें निरोपावें जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "जरठां धर्मीं अधिकारू नाहीं : वेडेयांपीसेयां धर्मी अधिकारू नाहीं :" ।। ]

## १४३ विद्या : विकल्पसंचार निरूपण*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : मनुष्यासि कव्हणीए दसे विद्या होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "अल्प दसे होए :" "जी जी : विकल्पु कव्हणीए दसे संचरे ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "आठां वरुषां विकल्पु संचरे :" "हो कां जी : तरि विद्या कव्हणापासौनि होए ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "परमेश्वरापासौनि विद्या होए : कां विद्यावंतापासौनि होए :" "हो कां जी :" ।। ]

## १४४ रसभेद निरूपण*

[ [१]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : रस धातु वेधे : तेया रसाचे कीती प्रकार जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : एकु शतवेधिया रसु : एकु सहस्त्रवेधिया रसु : एकु शब्दवेधिया रसु :" यावरि भटीं पुसिलें : "जी जी : लोकामाजि मणी : मंत्र : औषधें असति : तीए साच कीं मीथ्या ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया मणी : मंत्र : औषधी प्रतिबंधकत्वें प्रमाण आति :" "हो कां जी :" सारंगपंडितीं पुसिलें : "जी जी : एकें औषधें रोगीया मरे : एकें जीए : आन एकें औषधें रोग जाए : एकें न वचे : तें कां जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "पांडेया : जोचि रोग तेंचि ओखद : तेचि देवता : एं तीन्हीं मीळेति तरि जीए : येऱ्हवीं मरे :" "हो कां जी[२] :" ।। ]

---

२ (दृपा. ८८. द्वितीय विरहिणीचा दृष्टांत). ३ (दृपा. ८९. तृतीय विरहिणीचा दृष्टांत).

**१४३.** *(प्रव. वि. २६०–२६१).

१ अज्ञात°.

**१४४.** *(प्रव. वि. २७९–२८०).

१ अज्ञात°. २ (प्रव. आमा. २५४).

## १४५ साकार परमेश्वरव्यापार कथन*

[ [1]एक वेळ भटीं पुसिलें : “जी जी : साकारीं परमेश्वराचा कवण व्यापार जी ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “वानरेया : दर्शन : अनुसरण : सेवा : संबंधु :” ।। ]

## १४६ जीव जैसा संगीं ठेविजे तैसा ठाके*

[ [1]एक वेळ बाइसीं पुसिलें : “बाबा : हा जीवु केवळ असे : तरि पुण्यें पापें कां पां लींपे ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : जीवु जैसा संगीं ठेविजे तैसा ठाके : म्हणौनि लींपे :” “हो कां बाबा :” ।। ]

## १४७ बळिभद्र : भीष्म अवतारू कथन*

[ [1]एक वेळ महदाइसें पुराण आइकौनि आलीं : मग गोसावीयांतें पुसिलें : “जी जी : कव्हणी पुराणीक ऐसें म्हणति : जें बळिभद्रदेवो शेषाचा अवतारू : कव्हणी म्हणति विष्णूचा अवतारू : तरि दोहींमाजि कवण साच जी ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : तें आवघें साच तरि नव्हे : तें तुम्हां एथौनि सांघिजैल : बाइ : बळिभद्रदेवो तो चैतन्याचा अवतारू : ऐसें जाणिजे हो :” “हो कां जी :” “हा भीष्मु कव्हणाचा अवतारू जी ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : हा भीष्मु अवतारू नव्हे : हे ब्रह्मांडीची देवता : फळीयासहीत येथ आली होती :” “जी जी : ते कां आली ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “बाइ : भीष्मदेवो तो आठां वसुआंतुल एकु वसु : परि शापातव आधःपात जाला :” “हो कां जी :” ।। ]

## १४८ स्वर्गीं इंद्रादिक विखो निरूपण*

[ [1]एक वेळ दायेंबें पुसिलें : “जी जी : स्वर्गीचिया देवतांसि विखो ऐसें कां म्हणिजे ?” सर्वज्ञें म्हणीतलें : “भोजया : स्वर्गीं इंद्रादिकाचां ठाइं विषय मानसीक विखो : एथिचीयापसि स्वर्गीचा विखो उत्तम : तो हावभावींचि भोगिजे : लौकिक मुक्ती स्त्रिया आति : परि यंत्रारूढता नाहीं : स्वर्गीचेयापसि पाताळीचा भोग उत्तम : जैसा तुम्हां श्वानसूकराचा विखो तैसा इंद्रादिकां तुमचा :” ।। ]

---

१४५. *(प्रव. वि. २८१).
१ अज्ञात°.
१४६. *(प्रव. विमा. ३९).
१ अज्ञात°.
१४७. *(प्रव. विमा. ८२–८३).
१ अज्ञात°.
१४८. *(प्रव. विमा. ८९–९१).
१ अज्ञात°.

## १४९ स्वप्न लटिका : सुचा साच*

[ [1]भटीं पुसिलें : "जी जी : स्वप्नीं सुखदु:ख भोगीजे हे कवण क्रिया?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : स्वप्न लटिका : सुचा ते साच :" "जी जी : सुचा तें काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "जें जें स्वप्नीं दिसे तें तें तिए दीसीं : कां दोंचौं दीसां अनुभवासि ये तें स्वप्न बोलिजे :" "हो कां जी :"।।]

## १५० सुविद्या कुविद्या निरूपण*

[एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : गोसावीं उपायें सकळही पाविजे म्हणीतलें : तरि अप्राप्ती व्येवहार साधावेया कवण उपाये?" सर्वज्ञें म्हणीतलें : "सत्यानृत्य व्यवहारू-साधे : परि कळियुगीं सुविद्या न स्फुरेति : कुविद्या स्फुरेति : म्हणौनि सुविद्येचा व्यवहारू बाहुल्यें न साधे : जया साधे तो विरळा : कुविद्येचा व्यवहारू बाहुल्यें साधे :" "हो कां जी :"।।]

## १५१ वराडीचे लोक प्रसंसा*

[ [1]एक वेळ भटीं पुसिलें : "जी जी : आमुचे पिते माधवभट गंगातीरीं देशाउर करीति : तयांतें तैसें देशाउर न मिळे : आणि जै वराडामाजि जाति तै बरवें देशाउर होए : तरि हें ऐसें काइ जी?" सर्वज्ञें म्हणीतलें : "वानरेया : गंगातीरीची म्हातारी : ना वराडीची सामान्य स्त्री :" "जी जी : ते कैसी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "गंगातीरीची म्हातारी ते सदर्थ असौनि एका कवडेयाचीया उधारा पातेजे ना : आणि वराडीची सामान्य स्त्री द्रव्यलुब्ध होउनि परि वीळासियासि तात्काळ द्रव्य नेदितां भोगालागि पातेजे : हा ठावोवेऱ्हीं गंगातीरीचे लोक द्रव्यलुब्ध : मां ते काइ देतील ? आणि वराडीचे लोक हा ठावोवेऱ्ही उदार : म्हणौनि ते देति : यापरि देसपरत्व लोक कृपण उदार असति :" "हो कां जी :"।।]

## १५२ चतुर्विध देवताफळें निरूपण*

[ [1]एक वेळ भटीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : जीवासि देवतेचें फळ होए तें एकविध कीं बहुविध ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "चतुर्विध :" "जी जी : तें कवण ?" सर्वज्ञें

---

१४९. *(प्रव. विमा. १२९).
१ अज्ञात°.

१५० *(प्रव. विमा. १३०–१३१).

१५१. *(प्रव. विमा. १३२).
१ अज्ञात°.

१५२. *(प्रव. विमा. १७९–१८०).
१ अज्ञात°.

म्हणीतलें : "सालोक्य : सामीप्य : सारूप्य : सायुज्य : या चौ मुक्ती मिळौनि फळीयांचीं चतुर्विध सुखें असति : *वानरेया : फळियांचां सुखाचीं चार नामें : लौकिक : भौतिक : उपसंहाराख्य : लाभाख्य*[२] :" "जी जी : तयांचीं स्थानें कवणें ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "*इंद्रादिकांचीं फळें तो स्वर्गु बोलिजे : कैलास : वैकुंठ तो मोक्षु बोलिजे*[३] : शेषशय्यावेन्हीं लौकिक वर्त्तेति :" "जी जी : येर काइ ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "लौकिक ते लौकिकीं वर्ते : भौतिक ते अष्टभैरवीं वर्ते : उपसंहाराख्य ते विश्वचैतन्याचेया ठाइं वर्ते : लाभाख्य तें ईश्वरीं वर्ते : लाभाख्य ते द्वीध : भक्ताचिया ठाइं वर्ते : ज्ञानियाचेया ठाइं वर्ते :" "हो कां जी :" ।। ]

## १५३ त्रिविध वेध निरूपण*

[[१]एक वेळ महदाइसीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : पुराणीं त्रिविध वेध बोलिजेति : हे कैसे जी ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : ते केवि जाणति ? ते तुम्हां एथौनि सांघिजेति :" सर्वज्ञें म्हणीतलें[२]: "आणव : शाक्तेय : शांभव : ऐसा त्रिविध वेधु : आणि पिंडीं वेधें ब्रह्मांडीं प्राप्ति : जैसी चक्षुवेधें सुर्याची प्राप्ति : आणि अशेष पिंडवेधें विश्वेची प्राप्ति :" "हो कां जी :" ।। ]

## १५४ विद्यानामें निरूपण*

[[१]एक वेळ भटीं गोसावीयांतें पुसिलें : "जी जी : विद्यांचीं नावें निरूपिजो जी :" सर्वज्ञें म्हणीतलें : "आंकुश विद्या मुद्रा इंद्राची : प्रन्हाद विद्या चंद्राची : छायाबींब विद्या सुर्याची :" आणि सर्वज्ञें म्हणीतलें : "शांकरी : शांभवी : शुद्ध : । वेधवंती ब्रह्मा : विष्णु महादेव शेषशय्या या चौघांचीया च्यारि विद्या । शांकरी ब्रह्मेयाची : शांभवी महादेवाची : शुद्ध विष्णूची : वेधवंती शेषशय्याची । आणि शाक्तेयाचीया विद्या : नाद : बिंदु : कळा : जोति : लो : अवस्था : आनंदु : आवेशु :" तथा कराळादि हीं नामेंही निरूपिलीं : "आणि एक समळ शांभव : एक शुद्ध शांभव : समळ शांभव ते विश्वेची विद्या : शुद्ध शांभव ते चैतन्याची विद्या :" "हो कां जी :" ।। ]

---

२ (**मायांबा : अज्ञात. वि.** ४२ पाहा). ३ (**सं.**).

**१५३.** *(**प्रव. विमा.** १८४, १८५, १८७).

१ **अज्ञात**°. २ **पं.** (**अज्ञात.** ७३) °आणव : साक्तेय : शांभव मुक्षकरुनि समस्त वेध : उंचनीच संचरति : च्यारि द्वारें संचरावेया.

**१५४.** (**प्रव. विमा.** १८९–१९१).

१ **अज्ञात**°.



# परिशिष्ट १ : पुरवणी

**पूर्वार्ध लीळा २४०**

या लीळेतील शेवटच्या चार ओळी पुढीलप्रमाणे वाचाव्या :

. . . .मग सर्वज्ञें म्हणीतलें : "तुम्हां सुखस्तीति कवणापासौनि ?" "जी जी : दादोसा-पासौनि : " सर्वज्ञें म्हणीतलें : "तेयाचेन आड गेलेयां तण न मोडे : " सर्वज्ञें म्हणीतलें : "ते तुम्हां एथौनि स्तीति जाली : ते आतां प्रगटली : " सर्वज्ञें म्हणीतलें : "*बहुतामध्यें जयाची विशेष प्रतीति तेयापासौनि सुखस्वास्थ्य जालें ऐसें जाणावें*[४] : " ।।

**पूर्वार्ध लीळा ५८९**

या लीळेतील शेवटच्या चार ओळी पुढीलप्रमाणे वाचाव्या :

. . . .*सर्वज्ञें म्हणीतलें : " कव्हणी एक हीरयांची खाणि खणति : खणतखणतां खांब राखति : वोदरे तेथ टेका सुति : तयासि षटकोणि हिरा सांपडे : एकासि हीरेकणि सांपडे : एकु नसुधा रीगे : नीगे : एकावरि दरड पडे :*" म्हणौनि गोसावीं मागौतें रात्रिचें नीरूपण केलें : जीवेश्वरविभाग निरोपिला : मग भटोबासांसि बोधू जाला : ।।

**उत्तरार्ध लीळा ६०९**

या लीळेच्या शेवटी पुढील परिच्छेद जोडावा :

*यावरि एकु दीं भटीं पुसिलें : " जी जी : गोसावीं निरूपिलें : जें प्रेमसंचारमात्रें भक्ताचे विकारु : विकल्पु : स्वभावो इयें तीनि उच्छेदौनि जाति : परमेश्वरू भक्तासि आपुली अनुभूति रति देति : ब्रह्मीभूत करीति : तरि काइ भक्त आपुलें प्रेम आणिकासि देवों सके ? " सर्वज्ञें म्हणीतलें : " तैसें नव्हे कीं वानरेया : चंदनाचिया जवळिका सुगंधता सुशीळता ए : परि आणिकातें वेधीजे हें न ए : तैसें परमेश्वरसंनिधानातव भक्ताचे विकार : विकल्प : स्वभावो हे दोष जाति : परि आपुलें प्रेम आणिकासि देइजे हें न ए*[१६] : " ।।

---

**पू. २४०. ४** (**आमा.** १०१. **प्रव.** मध्ये या वचनाचा प्रकरणवश आढळत नाही. माझ्या मते प्रस्तुत लीळा हाच प्रकरणवश असावा. म्हणून हे वचन मी येथे घातले आहे).

**उ. ६०९. १६** (**दृपा.** १११. चंदनाचा दृष्टांत. या दृष्टांतासंबंधी **दृस्थ.**कारांनी 'भटाप्रति बेलोपुरी निरूपिला' एवढाच निर्देश केला आहे. 'प्रेमाच्या उपाया 'संबंधीचा हा दृष्टांत असल्यामुळे मी तो येथे पुनःस्थापित केला आहे).



# परिशिष्ट २ : व्यक्तिसूची


**अ**

**अक्रूर :** उ. ४२७.

**अग्नी :** (देवता) उ. ४२४.

**अत्रि :** पू. १, २६.

**अवंडी :** अ. २८.

**अवंडीनाथ :** पू. १९८, १९९.

**अनंघा :** उ. १४८.

**अनंतनाएक :** (गोविंदप्रभूचे वडील) पू. १५.

**अनंतमुनी :** पू. २६, ४६३.

**अनंतदेव :** पू. ५५०.

**अनुर्ध** (अनिरुद्ध): अश्री. ६.

**अनुसैया :** पू. १.

**अ(आ)नो :** उ. १५२, २४३, २४५, ३६५, ३८२; अ. १११.

**अभीमनी** (अभिमन्यू): अश्री. १०.

**अमरा :** उ. ६४०.

**अर्जुन :** पू. ३६३; उ. ४२४, ४४६–४४८; अश्री. ९, १०, १२, २४, ३०, ३२.

**अवडळ भट** (एल्हंभट): पू. २३९, २४१, ३८०, ५७९, ५८३. 'एल्हंभट' पाहा.

**अळर्क :** उ. ४४१.

**आ**

**आउसा :** पू. ३०, ६७, ७०, ५८४; उ. ९, १०, १४, १५, ३५, ४०, ४२, ४५, ५०, ५१, ७२, ७८, ८१, ८२, ८४, ९५, ९८, ९९, ११८, १२७, १५४, १६९, १७५, २११, २१८, २४५, ३४३, ३४४, ३५१, ३५२, ३७६, ३७७, ३९३, ३९४, ३९६, ४०१–४०३, ५०१, ५२०–५२६, ५३१, ५३२, ५३४, ५३८, ५४९–५५१, ५५४, ५७५, ५९०, ६१६, ६३८, ६३९; अ. ३७, ३९, ६५, ९०, १००, ११४.

**आत्माराम :** पू. २६५.

**आदि महादेवी :** पू. ३५३.

**आप :** उ. ३०३.

**आपदेवभट :** पू. १८२, १८९, १९०, २००, २२०, ३१२.

**आपलो :** पू. ४६५; उ. ५, ८, १०, १२, ५८८.

**आबयो :** पू. ५९०, ५९२.

**आबाइसा :** पू. ३४, २३८, २३९, २४६, ३०२, ३०६, ३०८, ३१५, ३८०, ४४१, ४४३, ४५५, ४५९, ४६३, ४६५, ४७२, ४९३–४९५, ५०६, ५०७, ५१७; उ. १, २८, १९५, १९६, २६७, ३२६, ३७०, ५६४, ५९५, ६२२; अ. ३०, ५९, ७६, ८६, ९५. 'वृधाबाइसें' पाहा.

**आमणदेव :** (यादवनृपति) पू. ५७६.

**इ**

**इंद्र :** (देवता) पू. ३७२ ; उ. ६, ४४८ ; अ. २८(टीं), १२८, १४८, १५४.

**इंद्रभट :** पू. ३८०, ३८४, ३८५, ३९१, ३९३–३९६, ३९८, ४०७, ४५०, ४५५, ४९८, ५०६, ५२०, ५५८, ५५९, ५६७, ५६९, ५७१, ५७६, ५८७; उ. ३, १७, ७१, १४८, १६०, १६१, २९८, ३००, ३०२, ३१५, ३७०.

**इंद्राइ माहात्मा :** पू. २२४.

**उ**

**उधववेव :** पू. ४२१ ; उ. ४२४, ४३०, ४४६; अश्री. १३, १६, १९, २२, २७.

**उधळीनाथ :** पू. २५.

**उपाध्ये :** (जानो, जानोपाध्ये) पू. ११७–११९, १३८, १८१–१८५, २०८, २५७, २५८, २६१, २६७–२६९, ३०३, ३४०, ३६३, ३६४, ३८०, ३८५, ४१४, ४१५, ४३०, ५२५, ५३०, ५३२–५३५, ५४१, ५४७, ५५४, ५५५, ५९१; उ. २३, ३८२, ४०९; **द्रीढपुरुष :** उ. ५५६, ५६४.

**उपाध्ये विष्णुभट :** पू. ३६२, ४१४.

**उपासनीये :** पू. २६३, ३४९, ३५३, ३८५; उ. ९९, १२०, १९४, ४६८; अ. १११.

**उमाइसा :** (सारंगपंडिताची दुसरी पत्नी) पू. ११५, १२४, १२६; उ. ३३८, ३३९, ३८०, ६४३.

**उमाइसा :** (आबाइसाची मुलगी, भटोबासाची बहीण) पू. २३८, २३९, ३०२, ३०६, ३०७, ३८०, ४०३, ४५९, ४६१, ४६६, ४९३, ४९७, ५०१, ५०२, ५०६, ५७९, ५८१–५८४; उ. १, ३४२, ३५३, ३८४, ३८५.

**ऋ**

**ऋषीशृंग :** उ. ४७०.

**ए**

**एकवीरा :** (जमदग्नी ऋषीची पत्नी) उ. १४६.

**एकवीराबाइसें :** उ. १६९; अ. ६७.

**एकाइसें :** (भूतानंदाची लेक) उ. ३४५.

**एकाइसें :** (शांतिबाइसाची मुलगी) पू. १९१, २१७, २१९, ४३५, ४३६; उ. ७०, ३४०, ३९४, ४५८–४६०, ५५२; अ. ८७.

**एल्हंभट :** पू. २३९, २४१, ४४७; उ. ९, २३, ५५२. ‘अवडळभट’ पाहा.

**एल्हाइसें :** एल्हो. (साधे) पू. ३८०, ३८१, ३८६, ४०७, ४७८, ४९३. ‘साधे’ पाहा.

**एल्हाइसें :** (नाथोबाची आई) उ. २६७.

**एस्वदा :** (यशोदा) पू. ९५; अ. ९९; **यस्वदा :** अ. ९९; अश्री. १, २, १४.

**क**

**कणेरी :** उ. ५११.

**कंथडीनाथ :** पू. १७ (टी).

**कन्ह** (कान्ह) **:** पू. ४४८; उ. १९४, ५०७; अ. ११४.

**कमळ भैरव :** उ. ५४३, ५४५.

**कमळाइसा :** (हरिपाळदेवाची पत्नी) पू. १७, १८, २०; **कमळा :** उ. १५०.

**कमळारण्य :** पू. १५.

**कन्हाडबाइ :** पू. ५३९; अ. ५५.

**कवडींब :** पू. १३२, ४१८.

**कंस :** उ. ४४६; अश्री. १९.

**काकोस :** पू. ३८०, ३८५, ४०५, ५०६, ५७३; अ. १८.

**कान्हरदेव :** (यादवनृपति) पू. ५५, ६१; अ. २९.

**कान्हरदेया :** उ. ४५४.

**कान्हरनायक :** उ. १२६.

**कान्हो कोरो :** उ. ४८६.

**काम :** ‘मदन’ पाहा.

**कामाइ :** (राणाइसाची बहीण) पू. ५४०; उ. ४४.

**कामाइसा :** (बाइनायकाची कन्या) पू. ४९२, ४९६.

**कामाइसा :** (मेहकर येथील वडील बोणेबाइ) पू. ९५.

**कामाक्षा (ख्या) :** पू. १४, १६, ४६३; **उ.** १९४.
**कार्तिकस्वामी :** उ. ३१८.
**कास्त हरिदेवपंडित :** पू. ११६, १८१.
**काळदास भट :** पू. ४९७, ४९८, ५१४, ५१९, ५२०.
**काळबोटा :** उ. २४४.
**कुइराम :** पू. २००.
**कुब्जी :** पू. ४२१; **कुब्जिका :** अश्री. १८.
**केसवनाएक :** पू. ५८५.
**कोंती :** (कुंती, पांडवांची आई) पू. ३४९; **कौंती :** अश्री. १२.
**कौंडल्या :** पू. ५४३.
**कौरव :** अश्री. ९, १०.

**ख**

**खेइगोइ :** (खेमाइसा) उ. ४७, ९३, १०४, २८३.
**खेइभट :** उ. ३७९; अ. ५६, ६२. 'डखला' पाहा.
**खोलनायक :** (यादवांचा सेनापती) पू. २७.

**ग**

**गंगाइसा :** (नागदेवाचार्यांची पत्नी) उ. ३१, ३२, ३४२.
**गणपति आपयो :** उ. ९५, १३३, १६९, २१२.
**गणपति ठाकूर :** पू. ३८३.
**गतीए कमळनाएक :** पू. १८२; **गाती कमळदेव :** उ. ३०३.
**गदोनायक :** पू. ११०, ११५; **उ.** १४३, २९९–३०१, ५९४.
**गदो भांडारी :** पू. २१३.
**गर्गाचार्य :** पू. ५५२; उ. २२४.
**गांगा :** उ. ६४०.
**गार्गी :** उ. १९५.
**गुंडमराउळ :** (गोविंदप्रभू), पू. १७४; **उ.** ६०, १३३. 'श्रीप्रभू' पाहा.
**गुणाकरदेव :** पू. ३२५; **अ.** ५१.
**गोंदो :** पू. ३०२, ३१९; **उ.** १०३.
**गोपाळ पंडित :** पू. २१०.
**गोमटदेव** (चक्रधर) **:** पू. १७६.
**गोरक्षी :** पू. १९८, २०६, २६०, ३८०; **गोरख :** अ. १; **गोरक्ष :** अ. १२, २८, ११४.
**गोविंद :** (गोविंदप्रभू) **उ.** ३५१, ५८८, ६३९; 'श्रीप्रभू' पाहा.
**गोविंद :** (गौराइसा) उ. ३६.
**गोविंद :** (सिन्नर येथील व्यापारी) पू. २४५.
**गोविंदचंद :** उ. ५०७.
**गोविंदस्वामी :** पू. ६५.
**गौतम :** पू. २५१, २५२, २५४; **उ.** ८४.
**गौराइसा :** (पद्मनाभीदेवाची आई) पू. ४०६, ४१२.
**गौराइसा :** (इंद्रभटाची पत्नी) **पू.** ३७०, ३८०, ३८३, ३९७, ३९८, ४५५, ५०७, ५१४.
**गौराइसा :** (गोविंद) उ. ३६.
**ग्रहे सारंगपाणी :** पू. १११, ११७ ; **उ.** ३४.

**घ**

**घाटे हरिभट :** पू. १५४, १५६; **उ.** ३२३.
**घुइनायक :** उ. ३९५, ४७३, ५४९, ५५०, ५६०; **अ.** १४०.
**घोडाचूडी :** पू. ३६.

**च**

**चक्रधर :** उ. ३५, ४२, १२९, १५७, १६९, १७२, ३२३, ४२६; °**स्वामी :** उ. ७२, ९५, १२७, १५४, १६९, १७३, ३५१, ३७६, ५२४.
**चंद्रदेव :** उ. १००, १९७, १९८.
**चंद्राइ महात्मा :** पू. २०७.
**चांगदेओ भट :** पू. १११, ११७, १३८, १३९, १५१–१५३, १५६–१५८, १६४–१६७, १७२, १७४, १७९, १८०, १८४, १८६, १८८, २०४, २१५, २४१, २४८, २५७, २५९, ३०२, ३०३, ३११, ३३७, ३४०, ३८०, ३८५.

**चांगदेव राउळ :** (द्वारावतीकार) **पू.** २, ३, ५, १३–१७, २५, २०१, ३१३, ४०२, ४६३; **उ.** ६०, १३३, ४७४, ४८०, ५१९.
**चांगदेव राउळ :** (चक्रधर) **पू.** १२३, १२५, १३६, १५६, १७४, २२५, २३७, २३८, २६५, ३११, ३४३, ३८०, ४६१, ४६५, ४७२, ४७८, ५४१, ५५५, ५८४; **उ.** २१, ६०, ६१, ७१, ७७, ९३, १३३, १३४, १४१, २६७, ३३४, ३४९, ३८०, ४६३, ४६५, ४८१, ४८२, ५३५; **चांगदेव मुनि :** **उ.** ३९५.
**चित्ररथ :** (गंधर्व देवता) **उ.** ४४८.
**चोडा राय :** **पू.** ५४८.
**चौरंगी :** (नाथपंथी जोगी) **पू.** २६०.

**छ**

**छर्दोबा :**(स्रदोबा) **उ.** ४७०. 'स्रदोबा' पाहा.

**ज**

**जगळदेव :** (यादवांचा अधिकारी) **पू.** २७.
**जनक :** (ऋषी) **उ.** ३३१, ४४६; **अ.** १५.
**जनक नरसींहभट :** **पू.** १८२.
**जनकनाएक :** ( चक्रपाणी राउळाचे वडील ) **पू.** २.
**जमदग्नी :** **उ.** १४६.
**जय :** (विष्णूचा द्वारपाळ) **अ.** ३४.
**जरासंद :** **उ.** ११.
**जसमाइसा :** ( शांतिबाइसाची कन्या ) **पू.** २१७.
**जळांधरी :** **उ.** ५०७; **जाळंधर :** **पू.** २०२; **अ.** ११४.
**जाउगी :** **अ.** ५४.
**जाखुबाइ :** **उ.** ८०.
**जापीए विष्णुभट :** **पू.** १८२, १८४.
**जैद्रथ :** **अश्री.** १०.
**जोगनायक :** (सुकीया) **पू.** ३००.
**जोगनायक :** (निंबिया) **उ.** २८१.
**जोगनायक :** (पद्मनाभीदेवाचा भाऊ) **पू.** २९६, ३०३, ३४८, ३७२, ४१२.
**जोगरा :** **उ.** ५१३.
**जोमाइ :** **पू.** ५३९, ५४६; **अ.** १०६.

**ट**

**टोकणे :** **पू.** ५८५.

**ड**

**डखला :** **पू.** १९६, २०१, २०४, २३३, २३४, २४१–२४३, २४८, २५१, २५७, २५८, २६५, २६७, २९३; **अ.** ५६.
**डांगरा :** (डांगरेश) **पू.** ५८५; **उ.** ३०५, ३४१.

**त**

**तिकवनायक :** **पू.** ४५९, ४७०, ४७१, ४७६; **अ.** ९६.
**तिवाडी :** **उ.** ७१.
**तीकोपाध्ये :** **पू.** १५, १६६–१६८, ४१५; **उ.** ५६४.
**तुळसीया :** **पू.** ४६७, ४६८.
**तेलीकार :** **पू.** २६.

**द**

**दत्तात्रेय :** **पू.** १, २, १६, १८२, २०४, ४६३, ५४५; **उ.** ६०, १३४, १४५, १४६, ४४१, ४४४, ६२७.
**दशरथ :** **अ.** ११०, १३४.
**दाइनायक :** **पू.** ४२१.
**दाइंबा :** (भोजा) **पू.** १३६, २४४, २४८, २८०, २९३, ३०२, ३१७, ३१८, ३२०, ३३२, ३३८, ३४०, ३४१; **उ.** ६, ११, ४२, ५६, ८४, ११०–११४, १४९, २१३, २४०, २४७, ३१३, ३२६, ३५६, ३७९, ३८३, ३८५, ३९२, ३९७, ४७५, ४८५, ५०३–५०५, ५२८, ५४०, ५४३, ५४४, ५४६, ५५८, ५६०, ५८८, ५९४, ६१७, ६१९, ६२०, ६२८; **अ.** ७, ९, १३, १४, ६६, ७५, ७८, ९९, १३८, १४८.
**दाइ भागवत :** **पू.** २३२, २९१, २९२; **उ.** १८९; **देइ भागवत :** **उ.** ४६४.

**उळा :** भाजलेला ओला हरबरा. **उ.** १५.

**उळिकांदा :** पाती असलेला हिरवा कांदा. पू. २०१.

## ए

**एं :** मी येतो. **पू.** ११७.

**एइजत असिजे :** येत आहात. **पू.** १०५.

**एइजे :** यावे. **पू.** १०६

**एइजो :** यावे. **पू.** २८, ६९, १०४.

**एउता :** या बाजूला. **उ.** ३७४; **एउतें–पू.** ८१; उ. ७७; **एउती–पू.** २६१.

**एउनि :** येऊ. (प्रपु.अव.). **पू.** ४४, १९८, ३८०; **उ.** १२७.

**एकतळ :** एकपदरी. **उ.** १६.

**एकदेश :** एक अंश. **अ.** १३७.

**एकदेशी :** एके वेळी एकाच ठिकाणी असणारा. **उ.** ५७५.

**एकवट :** एकत्र. **पू.** १८४; **उ.** १६२; °**वाट–** उ. ४२८, ५१०.

**एकवत :** एकत्रित. **पू.** ३०६.

**एकवंद :** एकमत. **पू.** ३२ (पाहा. ज्ञाने. १५. ७३).

**एकसरी :** एकदम. **पू.** ४३; **उ.** ९०.

**एकांकी :** एकाकी, एकटा. **पू.** ३७, १०५, २४७, २५७.

**एका :** एका नदीचे नाव. **उ.** ५३२.

**एके दांडे :** एका दांड्यात. **पू.** १७२.

**एजमान :** यजमान. **पू** २३८; **उ.** २१, ७९.

**एतखेवों :** येताक्षणीच, आल्याबरोबर. **उ.** ४०४.

**एतीबार :** इतका वेळ. **पू.** २०२.

**एतु :** येवो, येऊ दे. **पू.** १९८.

**एतुकेनसी :** इतक्यासहित. **पू.** २०५.

**एंत्रासन :** देवतांना आवाहन करण्यासाठी ज्याच्या खाली तांत्रिक नियमानुसार यंत्रे, विशिष्ट आकृत्या काढल्या आहेत असे आसन. **उ.** ५३९.

**एथ :** येथे, आमच्या ठिकाणी. **पू.** ९५, १८९, ४०८, ४७२, ५५१ इ.; **उ.** ३९, ४७, ७३, ८०, १०२ इ.

**एथार्थ :** यथार्थ, सत्य. **उ.** १०३, ६०८.

**एथौनि :** आमच्याकडून, आम्ही (तृ.). **पू.** ४८, ५४, १०३, १०८, १५४, ४०२ इ.; **उ.** ३५, ३७, ४८, ६१, ६२, ९४ इ.; **एथि (थ) चा** –आमचा. **पू.** ४१२; **उ.** ३१, ७३, ९४, १४६; °**ची–पू.** ४७; **उ.** ९०, ५५४; °**चे–** पू. ४७, १२८; उ. ५३, ९९, ४७०, ५३०. °**चेया–पू.** ४४, ३५५, ३५७, ४१६, ४७२; उ. ३३, ९२; °**चिया–पू.** १३७; **उ.** ९७; °**चेन–उ.** ६१.

**एधवां :** यावेळी. **उ.** ७७.

**एया :** या. **पू.** ७०.

**एर (ऱ्ह) :** इतर, दुसरा. **पू.** ७१, ७२, ८६, ९१; **एऱ्हेएर–**ह्या व त्या, एकमेक. **पू.** ५८९. **एरएरां–पू.** १००; **एरां–पू.** १५७.

**एरीकडे :** दुसरीकडे. **पू.** १०५.

**एरीवानी :** दुसऱ्या बाजूला. **उ.** १२१.

**एवे :** एववे, येणे शक्य आहे. **उ.** ३७३.

**एषणा :** ईषणा, इच्छा, स्त्रीपुत्रद्रव्यदिकासंबंधी आसक्ती, °**त्रय :** लोकेषणा, वित्तेषणा व दारेषणा या तीन प्रकारच्या आसक्ती. **उ.** ५६६.

**एसी :** एक धान्य. **पू.** ५८२.

**एसौले :** एसी हे धान्य ओलवून, वाटून मग त्याचा तयार केलेला धिरड्यासारखा पदार्थ. **पू.** ५८२.

**एहीं :** यांनी. **पू.** ९६.

**एळा :** वेलची. **पू.** ५८५.

**एळौर मांगरोळ :** या दोन गावांतील देवतांचा उदोउदो. **उ.** २४९.

**ऐलाडि :** अलीकडे. **पू.** २६, २९.

**ऐली :** अलीकडच्या. **पू.** १०६; **उ.** १४२, ६०५.

**ऐसांही :** असे असले तरी. **पू.** ३७२, ५८५; **उ.** १५२.

## ओ

**ओ (वो) उजणे :** योग्य क्रिया करणे. **उ.** ३१३.

**ओखटे :** वाईट. **पू.** २९, १००, १४८; **उ.** ३१, ४९०. °**गोमटे–**बरेवाईट. **पू.** १०६.

**ओखटे करणे :** ठार मारणे. **पू.** ३५३.

**ओखद :** औषध. **पू.** ३९९.

**ओग :** उपाहार, नैवेद्य. **पू.** ९१.

**ओगरणे :** ताटात वाढणे. **पू.** ४७०.

**ओठंगणे:** टेकणे. **उ.** १५.

**ओडण :** ढाल. **पू.** ३४३.

**ओडणखांडे :** ढाल व तलवार. **पू.** ३४८, ४२४.

**ओडवणे :** पुढे करणे ; °**विले–पू.** २७, ४३, १०९, ५८९.

**ओणवणे :** पुढे मान करून शरीर वाकवणे. °**वौनि–पू.** १०४.

**ओत :** ओढा, प्रवाह. **पू** ४९७, ४९९, ५७१; **उ.** ३७३.

**ओतपळी :** कोवळे ऊन **पू.** २८, ३८, ११५; **उ.** १७.

**ओपणे :** देणे, अर्पण करणें. **पू.** ४००; **उ.** १६८; **ओपा–उ.** १५, ९९, ११८. **ओपीजे–उ.** ९२. **ओपुनि–पु.** ४००.

**ओपवणे :** स्वच्छ करणे, निर्मळ करणे. °**वीली–पू.** १७४.

**ओंबी :** गव्हाची लोंबी. **उ.** १४.

**ओरखंडा :** ओरखडा, पुसट रेषा. **पू.** ९२.

**ओरपणे :** ओरबाडणे. **पू.** ३१२; **उ.** १७१.

**ओरपेकार :** दरोडेखोर. **पू.** ३४३.

**ओरिसारी :** आवरसावर. **पू.** ६०.

**ओलणी :** ओला चिकसा. **उ.** ५५०.

**ओलणी :** पडदणी, स्नानाच्या वेळी नेसण्याचे वस्त्र. **पू.** २०, ३१, ४०, ११५, ३८६, १२३, २११; **उ.** ५५०.

**ओलिसाउला :** रेशमी शेला. **उ.** १४३, १६०. °**साउलें–उ.** २३५.

**ओली :** रेशमी वस्त्र. **उ.** २३२, ३६३.

**ओवलापोवला :** पूर्णपणे भरलेला, गुंतलेला. **उ.** ५८५.

**ओवाळणी :** ओवाळून टाकलेले पदार्थ. **पू.** ७४.

**ओव्हारी :** वाहारी, सून. **पू.** १७.

**ओसाइली :** ओणवल्यामुळे पडलेली सावली. **उ.** ४६६.

**ओहटणे :** मागे येणे, कमी होणे. °**टला–पू.** ६७.

**ओहर :** वधूवर. **उ** ५१३.

**ओहळखोहळ :** लहानमोठे ओढे. **पू.** ४२.

**ओहळणे :** वाहात्या पाण्यात धुणे. °**ळौनि–पू.** ३०४; **ओहळविलेया–पू.** ३०४.

**ओहोणी :** वहिनी. **पू.** ३७२.

**ओळग :** सेवा. **पू.** ३१, २१७, २२५, ५३५; **उ.** १२८, ५७४.

**ओळगणे :** सेवा करणे. **उ.** ६५, १२९, १४२.

**ओळगवणे :** अर्पण करणे, देणे. **पू.** ६३, ७३; **उ.** १५, १७, १९, २१.

**ओळगीया :** सेवक. **उ.** १२६; °**गीए–पू.** ७७.

**ओळणे :** वळणे, येणे. **उ.** १६०.

## क

**कक्ष :** काख. **उ.** १७.

**कक्षा :** वाक्यातील गर्भित सूचना. **उ.** १५२, ५८८, ६२५.

**कखाइया :** कषाययुक्त. **उ.** ३८७.

**कछु :** कच्छ, कासव. **उ.** ५६४.

**कटक :** (१) राजधानी, कटक देवगिरी. **पू.** १७९, १८१, १९१, २०३, २०४, २१०, २२८, ४०२; **उ.** १७, १४३, १५२. (२) सैन्य ; **पू.** ७४.

**कटकटा :** अरेरे ! **पू.** ४३७ ; **कटकट–पू.** १०२ ; **उ.** १९, ९२, ९९, १०१ ; **अ.** ११.

**कटकै :** फिरती, स्वारी. **पू.** ७४, २३७.

**कंटक :** काटा. ५१७.

**कटंकटीयेमान :** क्षीण, दुबळा, छिन्नविच्छिन्न. **उ.** ३७६, ४२६, ४५०.

**कठीया :** पुजारी. **पू.** ८२, ३१० ; **उ.** १४८, ६१५. **कठीए–**पुजारीण. **पू.** ५००.

**कड :** (१) जुव्यातील दानाचा एक प्रकार. **पू.** २८. (२) बाजू. **पू.** ३२.

**कडकणे :** कढवून तयार केलेले. **पू.** ९५.

**कडती :** धूळपाटी **(का. कडत). पू.** १४५.

**कडदंबा :** कमरपट्टा. **पू.** २१०. (टी.).

**कडप :** उपटल्यानंतर न बांधता रचून ठेवलेला हरबऱ्याच्या झाडांचा ढीग. **उ.** १५ ; **कडपा–पू.** ४११.

**कडबा :** ज्वारीचे धांडे. **पू.** ९६.

**कड(र)बाड :** कडबा, ज्वारीचे धांडे तोडून तयार केलेले कुटार. **पू.** ७० ; **उ.** ३४४.

**कडवल :** शेणमाती साठवण्याचा गोठा. **उ.** ६५, १५८, ५८८.

**कडासन :** गवताचे किंवा चामड्याचे आसन. **अ.** ३९.

**कडिदोरा :** कडदोरा, कमरेला बांधायचा दोरा. **पू.** ७८, २४८.

**कडिवाळा :** मोलकरी, सेवक. **पू.** ४३६.

**कडिसर :** शिवेजवळचा भाग, काठ. **उ.** ५४, ६०२.

**कडीयाळे :** घोड्याचा लगाम. **उ.** ५०१.

**कडे पडणे :** कृतार्थ होणे. **उ.** ५९९. °**लागणे**—**अ.** ४४.

**कढीव :** कंबर, कंबरेखालील भाग. °**वांची**—कमरेभोवतीची. **उ.** २२ ; °**वा**—**उ.** ५३७; °**वां.**—**उ.** ३०७ ; °**वे.**—**पू.** ३७२.

**कण :** धान्य. **पू.** ७०.

**कणवाबुळी :** बांबुळी, शेवाळ. **उ.** ३७३.

**कणवृत्ती :** धान्याचे कण वेचून त्यावर उदर-निर्वाह करण्याचे व्रत. **पू.** २९, १७७.

**कणव :** कृपा, कीव. **पू.** २१९, ४८१ ; **कणवा**—**पू.** ६४.

**कणीकि :** कणीक, गव्हाचे पीठ. **पू.** १०१, १०३, १८५.

**कणीस :** सत्व. **उ.** ३१.

**कंथ :** कांत, नवरा. **उ.** ४८७.

**कदन :** कदान्न, वाईट अन्न. **उ.** १३७, ५२८.

**कपाट :** (१) गुहा, भुयार, गुहेचे दार. **पू.** २६०, ३१४, ३६५, ३६६, ५९१ ; **उ.** ३६, ३१७, ४२६, ५४१. (२) कवाड. **पू.** ५७३.

**कपाळी घाट घालणे :** कपाळावर घाटेनें मारणे. **उ.** ५६०.

**कपीलस्नान :** ओल्या वस्त्राने केवळ अंग पुसून केलेले स्नान. **पू.** ११५.

**करंटा :** पापुद्रा, पोपडा. **पू.** १९१.

**करंटे :** कवच. **पू.** २०० ; **उ.** ५६५.

**करंडी :** वेळूच्या कामटयांनी विणलेली किंवा वेताची टोपली. **उ.** १६१.

**करण :** (१) कृत्य, कर्म. **उ.** १३३. (२) योगमुद्रा. **पू.** ५८४.

**करणी :** बनावट, तयार करण्याची रीत. **पू.** ७६.

**करणीय (ए) :** विधिवत करावयाचे कर्म. **पू.** ३१, ४८, ३९१ ; **उ.** ५७७, ५८४.

**करपटाणि :** कर्पट वास. **उ.** १४५.

**करवटी :** करवंटी. **उ.** ५४० ; °**वंटेया**—करवंटीत. **उ.** ३३१.

**करवडी :** करवड, समूह. **पू.** ५.

**करवती :** लहान करा, घागर, करवंटी. **उ.** १४६.

**करा :** मातीची घागर. **पू.** ४०८ ; **उ.** १४४, ३१३, ५०२.

**कराउ :** गर्व, आवेश. **उ.** १२५.

**करांडा :** भरडलेले धान्य, भरडणे. **उ.** ४७०.

**करूनि :** करू (करणे—या धातूचे प्रथम पुरुषी भविष्यकाळी अनेकवचन). **पू.** ३२, ४८, ९५, १९८, ४१५ ; **उ.** १३, १७३, ५५०.

**कर्पोरगौर :** कापराप्रमाणे पांढरा. **पू.** ५३८.

**कर्मजड :** धार्मिक कर्मकांडात आसक्त. **उ.** ५८१.

**कर्मभूमि :** हिमालय आणि सेतुबंध रामेश्वर यामधील पाचशे योजनांची भूमि. **पू.** २४४.

**कर्मराहाटी :** ईश्वराव्यतिरिक्त जीवदेवता—प्रपंचविषयक कर्मांचा आचार. **उ.** ६१० ; **अ.** १२९.

**कर्मवासना :** वैदिक कर्मे करण्याची इच्छा करणारा. **उ.** ५८१.

**कर्मसवा :** कर्मानुसार, कर्माच्या परवडीप्रमाणे. **उ.** ४०६.

**कऱ्हा :** उंट. **पू.** ५ ; **उ.** ५०१. **कऱ्हे**—**पू.** ५.

**कल्प :** धार्मिक विधी, धर्मविधीचे शास्त्र. उ. १९७. **कल्पिणे**—धार्मिक पूजा सांगणे-करणे. **उ.** १९७.

**कलत्र :** पत्नी. **उ.** ३०१.

**कलवड :** कोथळा, तुरखाटयांचा गोलाकार उभा कोठा. **उ.** ३३. 'कडवल' पाहा.

**कवडा :** पैसे, नाणे, कवडी. **पू.** २८, १२२, ४१३; **उ.** ११८, १६७, २१८, २४९, २८३, ५२४, ५८५, ६२२; °**डा.** कवड्यांनी. **उ.** ४०० ; °**डेयांचे**—**उ.** २४४, डे. **उ.** २८३.

**कवडा :** गोळा. **पू.** ४७७.

**कवडींब :** कवि डिंभ. **पू.** १३२.

**कवतीक :** ससे, तित्तर इत्यादिकांची शिकार. **पू.** २१०.

**कव्हणाइं :** कव्हणाही, कोणालाही. **उ.** ३०९. **कवणाइ–उ.** ४३२.

**कवळी :** कव, दोन्ही हातांची मिठी. **पू.** ४४७.

**कवाड :** दरवाजाची झाकणे. **पू.** ९३, १०६, १६६.

**कष्टीनी :** काष्टी = समाधी लावलेली, समाधिस्थ. **पू.** ५४३.

**कसमळ :** कश्मल, घाण. **पू.** ५८४.

**कसा :** अंगरख्याचे दोन्ही पालव एकत्रित बांधण्याचा बंद, पट्टी. **पू.** ११५; **उ.** ६२३.

**कसैंजताति :** कसकस सुटते. **उ.** ५४३.

**कहीं :** कधी. **पू.** ३५, ११०, ११७; **उ.** ६०९, ६२२.

**कळदीवी :** पेटलेली दिवटी. **पू.** ५७.

**कळविला :** (कळवा = जनावरांच्या पायाला बांधतात ती वादी.) कळव्याने बांधल्या-सारखा, निःस्तब्ध. **पू.** ३१.

**कळा :** कुशलता. **पू.** १२१.

**कळावी :** मनगटावरील बांगडी. **पू.** ५६; **उ.** १०९, २३१, ४३८.

**कळीयुग :** कलियुग. **पू.** २४८. **उ.** ४३६; °**योग. पू.** २००.

**काइ :** काही. काय. **उ.** ३७३.

**काउरवाउर :** कावरेबावरे, गोंधळून जाणे. **पू.** ४६५.

**कांकर :** चामडयाचा धागा, वादी. **उ.** ५१३.

**काकु :** प्रश्न, प्रश्नार्थक वाक्यरचना. **पू.** १६५, १६६; **उ.** १५२, ३८६, ५८८, ६२५.

**काकोस :** काका, वडिलांचा भाऊ. **अ.** १८.

**काख :** बगल, खांद्याखालील हात व बरगडया यामधला खोलगट भाग. **उ.** १५०.

**काग :** काक, कावळा. **उ.** ३०३.

**काचा :** कच्चा. **पू.** १९८.

**काज :** कार्य; **गाइचां काजीं** = गाईचे रक्षण करण्याच्या कामात. **पू.** ३२४, ५०८.

**काजभोज :** कार्यप्रसंगीची जेवणावळ. **उ.** १५८.

**कांजी :** पेज. **उ.** ४७०.

**काटाळे :** कणसांचे भारे, **पू.** ५९१.

**कांटाळणे :** शिसारी येणे, अंग शहारून जाणे. **उ.** ५१३; **अ.** ७६.

**कांटाळा :** कंटाळा, रोमांच, शिसारी. **उ.** ४६७, ६१३.

**कांटाळा सांडी :** कंटाळत नाही, कंटाळा करीत नाही. **पू.** ४९०.

**कांटी :** काटेरी झाड. **पू.** ७८, ७९.

**कांठपुरा :** काठपरा, खापराचे आच्छादन, खापरी कौल, फुटलेल्या मडक्याचा गोल काठ. **उ.** ३३.

**कांठाळ :** सामानाची कंथा. गाठोडी, पडशी. **पू.** ४४९.

**काठीया :** काठीकर, काठी घेऊन समोर राहाणारा सेवक. **पू.** २२७.

**कांड :** बाण. **उ.** १२६.

**कांडादळा :** कांडणदळण. **उ.** ४७०.

**कांडार :** कांडे, कळ. **पू.** ६० ; **कांडर–पू.** १९६, ४४७.

**काढणी :** गुरांना खुंटाशी बांधण्याचा दोर. °**णीया**–काढणीने खुंटाशी बांधलेल्या स्थितीत. **पू.** ३१.

**काढणीया :** घोडयाचा दोर (काढणी) धरणारा सेवक, मोतदार. **पू.** ७५.

**काढणे :** ओढणे, झाडणे. **पू.** २३, ११०, २०७.

**कातणे :** सूत काढणे. **पू.** ५०७.

**काती :** सुरी. **उ.** ४४१.

**कांदी :** डोळयावर पडलेला व्रण. **उ.** ४७८.

**कानमातणे :** कानगोष्ट, गुपचूप कानात सांगितलेली मात. **उ.** २६६.

**कानवटी :** दुरडीवरील आच्छादन. **पू.** ५९२.

**कानवडा :** आडोसा करण्यासाठी बांधलेले वस्त्र, लावणे. **पू.** ३८६, ५०६.

**कानवडी :** वाकडी, तिरपी, एकीकडे मान वळवलेली. **पू.** १०७, ३६१ ; °**वडे–उ.** १११, १७१ ; **कानोडे–उ.** १९.

**कानवाथर :** काणवा (सिरसाळा) दगडा-भोवती थराप्रमाणे घट्ट चिपकून असलेल्या दगडाचे नाव. **काणवा** दगडावरील थराचा दगड. **उ.** १५८.

**कानसुल :** कानाच्या जवळचा भाग. **पू.** १९५ ; **उ.** १२६, ४६४.

**काना :** झोळीच्या दोरीची बाजू. **उ.** ४२५.

**कानाउवे :** कानांजवळ असलेले टोपराचे कसे. **उ.** ६२३.

**कापडमादणे :** ओल्या कापडाने अंग पुसून केलेले स्नान. **पू.** ११५.

**कापडी :** यात्रेकरू. **उ.** १६१ ; **अ.** ५. °**डीयें** (अव)–**पू.** ५८५ ; **उ.** ४०४.

**कांब :** लोखंडी सळी. **उ.** ६४०.

**कांबळा :** घोंगडी. **पू.** १३५; °**ळी–पू.** ५२. °**ळें–पू.** ५२, २००.

**काबा :** गुजराथेतील लुटारू, ओखा मंडळातील चाचे लोक. **पू.** ५.

**कांबीया :** लोखंडाची कांबी हातात धरणारा सेवक. **पू.** २२७.

**कामत :** शेत. **पू.** ४३९, ४४२, ४९२.

**कामठा :** काम करण्याचे दुकान. **उ.** ३९.

**कामीक :** मनात कामना (एखादी इच्छा) धरून केलेले (कर्म). **उ.** १३३.

**काया :** काअुंबाइ ; एक विशेषनाम. **उ.** ४९७.

**कायाप्रणीत :** शरीर वाकवून केलेला नमस्कार. **पू.** २० ; **उ.** १३३.

**कारट :** अंत्यसंस्कार, मृताप्रीत्यर्थचे भोजन. **उ.** ३७९.

**कारी :** कुआरी, मुलगी. **उ.** ४९५.

**कारुवा :** गेरू. **उ.** ५९९.

**कालण :** कालवण, शिकरण. **पू.** १६७ ; **उ.** १५६.

**कालळ :** कलार, दारू गाळणारा व विकणारा. **पू.** २०२ ; **उ.** १७३.

**काला :** अनेक अन्नपदार्थांचे मिश्रण. **पू.** ५७२.

**कालि :** काल, आधल्या दिवशी. **पू.** ११६, २५७.

**कावड :** बांबूच्या दोन टोकांना शिक्याप्रमाणे दोऱ्या बांधून त्यात जड वस्तू नेण्याचे साधन. **उ.** १४३.

**कावरे :** पिसे, वेड. **पू.** २१७ ; **उ.** ५६०.

**काष्टी :** ध्यान, समाधी. **उ.** ८१, २१०, ५०७.

**कास :** कासोटा, कमर. **पू.** १२५, १८७, २४८ ; **उ.** ९६. **कासे लागणे**–एखाद्याच्या आश्रयाला जाणे. **पू.** १८७.

**कासणे :** कमर कसून बांधणे. **उ.** ४५५.

**कासवडा :** कासवटा, कासोटा. **उ.** ३६०, ५२०.

**कासीया :** काश नावाचे गवत, काशा. **पू.** ४७२.

**कासौळी :** काशाची मोठी झांज. **पू.** ३३.

**काहाणी :** गोष्ट. **पू.** १२३ ; **उ.** १९८.

**कांहांथी :** (हिं) कोठून. **पू.** १९८; **उ.** ३७६.

**काहाली :** मोठी कढई. **उ.** ५८५.

**काहाळ :** भेरी, तुतारी. **पू.** ३३, १७६.

**काहाळिया :** सनई, तुतारी वाजविणारा. १२१. (**नरुस्व.** १७८).

**काहो—(हिं) :** काय. **उ.** ४९८.

**काहोंकु—(हिं) :** कशाला. **उ.** ५००.

**काह्या :** कशासाठी. **पू.** ५८५ ; **उ.** ६२२.

**काळवंचना :** मृत्यू चुकवणे. **पू.** ५० ; **उ.** ४७५.

**काळस्फोट :** काळा फोड, काळपुळी. **पू.** ५००.

**काळी धारी :** काळ्या काठाची. **पू.** २११.

**काळुकलाइ :** काळाचे कार्य, मृत्यू. **उ.** ३५३.

**किंकर :** सेवक. **उ.** ५८५.

**किंकरधर्मा :** परमेश्वर सेवेचा धर्म आचरण करणारा. **उ.** ५७८.

**कीउलवाणा :** केविलवाणा, काकुळतीला येऊन. **पू.** ३७५.

**कींकळी :** किंकाळी. **पू.** ३५.

**कीजतीया :** केल्या असत्या. **पू.** २३८.

**कीटकी :** किडी, स्त्री-किडा. **पू.** २१५.

**कीडकीडवणे :** कढवणे. **पू.** ४७७.

**कीडडी :** तिरडी. **पू.** १८२, ३१७, ५८९ ; **उ.** ३१३.

**क्रियाप्रयुक्तों :** केलेल्या क्रियेच्या ठिकाणी. **उ.** १४२.

**कीरू :** खरोखर. **पू.** १०६, ५८९.

**कीलू :** किलबिल. **पू.** ४१.

**कींवी :** कीड, किडा. **पू.** ३०७, ४९० ; **उ.** १८०.

**कुकडी :** कुक्कुटी, कोंबडी. **पू.** १५४; कुकडे– **पू.** ७८.

**कुंचकवत :** चोळीप्रमाणे (काढता येण्यासारखे). **उ.** ३५.

**कुचमर्दनी :** स्त्रीचे स्तन चोळल्याशिवाय ज्याची कामवासना जागृत होत नाही असा. **अ.** १३८.

**कुंचा :** कुंचला. **उ.** ३४४.

**कुचिळ :** कुचैल, मळके कपडे घातलेले, मलिन. **अ.** ४९.

**कुचीत :** कुञ्चित, वाईट. **उ.** ४११.

**कुंची :** किल्ली, कुंजी. **पू.** ८०, ८१.

**कुंचीटाळे :** किल्ली-कुलुप. **पू.** ८०, ८१; **उ.** २२३, **कुंची–पू.** ९१.

**कुजांतर :** कौटाळ. **पू.** ४७७.

**कुटंब :** कुटुंब, घरातील परिवार. **पू.** ७४.

**कुंटिते कुंटिते :** लंगडतलंगडत. **उ.** १८४.

**कुंठ :** गोणी. **उ.** ३३१.

**कुडे :** वाईट, खोटे. **पू.** ७८.

**कुंड :** (१) अग्निकुंड, आहुतिपात्र. **उ.** १२०. (२) पाण्याचे टाके, पवत्री पुष्करणी. **पू.** ६१, ९९, २५१, ५५१.

**कुंडलनी :** शरीरात मणिपुर चक्राच्या ठिकाणी असलेली प्राणरूप सर्पाकार शक्ती. **उ.** ४१.

**कुडौ :** कुडाचे माप, आठ पायल्या धान्याचे माप. **उ.** ५९२; **कुडव–उ.** ३४०.

**कुणबी :** शेतकरी, **पू.** ३२०, ३७२, ४११.

**कुपी :** बाटली. **पू.** १९८; **उ.** ४०६.

**कुपीन :** कौपीन, लंगोट. **उ.** ४२, १५२, २४३.

**कुमंडलु :** कमंडलू, पाण्याचे भांडे, तुंबा. **पू.** २३८.

**कुंभक :** नासिकाद्वारे आत ओढलेला (पूरक) वायू बाहेर जाऊ न देता मस्तकरूपी कुंभात साठवून ठेवणे. **पू.** १९४.

**कुरूंगे :** हरिणाच्या रंगाचे. **पू.** २८.

**कुरूंधन :** एक फळ. **पू.** २६०.

**कुर्म :** कासव. **उ.** ५६५.

**कुवारणे :** मोठमोठ्याने हाका मारून बोलावणे. **पू.** ४१.

**कुवारी :** मुलगी. **उ.** ४९४.

**कुष्ट :** कोड. **उ.** १४४, १४६.

**कुष्टखता :** कोडाचे व्रण झाल्यासारखी, मलीन. **उ.** ३७६.

**कुष्टीया :** कोड झालेला. **पू.** ५५२.

**कुसकटा :** चुरा. **उ.** ५६४.

**कुसकरा :** चुरा. **उ.** ५६५.

**कुसंबीर :** कोशिंबीर. **उ.** १८०.

**कुसासन :** गवताचे आसन. **पू.** २३.

**कुंसी :** कुसि, पोट, गर्भाशय. **पू.** ९१.

**कुसुंबी :** लाल रंगाची एक तिखट-खारट पालेभाजी. **पू.** ५७२.

**कुहीजणे :** सडणे, कुजणे; °**जली–पू.** १५.

**कुहीजविणे :** सडवणे, सडू देणे. °**विती परी–** सडविण्याची रीत. **पू.** ७६.

**कुहीटी :** सडलेले, नासके. **पू.** १९२, ३१५; **उ.** ४९५.

**कुहीला :** कुजट, घाणेरडा, सडका. **उ.** ४९५.

**कुळथवनी :** कुळीथ नावाच्या धान्याचे पाणी. **उ.** १५८.

**कुळवाडि :** शेती व शेतीचे सामानसुमान, शेतीचे व्यवहार. **पू.** २१७, ४१२.

**कूचक :** उंटाच्या पाठीवरील बसण्याचे आसन. **पू.** ५.

**कें :** कुठे. **पू.** ५७, ७४, १२७, इ.; **उ.** ६१, ८२, १३३, ५०७, इ.

**केउतें :** कोणीकडे. **पू.** ५०५; **उ.** १५७, ५९५.

**केती :** किती. **पू.** ३०२; **उ.** ५८६.

**केतीएक :** कित्येक, पुष्कळ. **पू.** २.

**केधवा :** केव्हा. **पू.** ८०.

**केंवसे :** किंवश्य, कोणाच्या आधीन. **उ.** ५७४.

**केव्हळाहि :** केव्हाही. **उ.** १८७.

**केशकळाप :** केसांचा समुदाय. **पू.** १९४.

**केंसतोडु :** केस तोडल्यामुळे त्याजागी आलेला फोड. **उ.** २४६.

**केसना (णा) :** केवढा. **पू.** ६५; **उ.** २१७.

**केंही :** कोठेही. **पू.** २०, १८४, २४७.

**केळी :** कलश, तांब्या, घागर. **पू.** ४९३.

**केळी :** केलि, जड वस्तूशी केलेली क्रीडा. **उ.** ६१.

**कै :** केव्हा, कधी. **पू.** ११७.

**कोंगतें :** बुरखा, बुंथी. **पू.** १३५, २९८, ४३९. **उ.** ७४(टी); **अ.** ९३. °**गता–पू.** १५३.

**कोठा :** गुरे बांधण्याची जागा. **पू.** ४५३.

**कोड :** हरिण, रोही इत्यादींची शिकार. **पू.** २१०.

**कोड :** कौतुक. **उ.** १५०.

**कोडि :** कोटि, एक संख्या. **पू.** १४५; **उ.** ४९७.

**कोडिमोडि :** दुमडून—गुंडाळून—पोटाशी लावून ठेवणे. **पू.** ४३९.

**कोढ :** कोड. **उ.** ४९१.

**कोढळे :** तुपाचा किंवा तेलाचा बुधला. **उ.** २०; **कोंढुले–पू.** ५५८; **उ.** ८, १६१.

**कोणटा :** कोपरा, टोक. **उ.** २११, २७३.

**कोथळा :** धान्य साठवलेले पोते, कणगा. **उ.** १३३ °**ळे–पू.** २५५.

**कोदवा :** एक प्रकारचा पाषाण. **उ.** ३३५.

**कोदे :** एक धान्य. **उ.** १०२.

**कोदेयां भातेयां पडती :** कोदे आणि भात यासाठी उडद्या घेतील. **उ.** ४३६.

**कोनी रीगणे :** बाळंत होणे, गर्भार राहाणे. **उ.** ४९६; °**नीगण–उ.** १९९, ५५५.

**कोपटी :** गुंफा. **उ.** ६४०.

**कोपरदुटी :** तळहातापासून तो कोपरापर्यंत लांबीचे दुपदरी वस्त्र. **उ.** १३७.

**कोपु नटले :** रागाचा अविर्भाव केला. **पू.** १६५.

**कोंभ :** कोंब. **पू.** १४१; **उ.** ४५९.

**कोमाइणे :** कोमेजणे, मलूल होणे. **पू.** ३१५; °**इला–उ.** ३७९. °**इली–उ.** २५७.

**कोमाइलीदुमाइली :** कोमेजलेली. **पू.** ३९८.

**कोर :** तुकडा. °**रे. पू.** १९८; °**रका–उ.** ७८, १३१.

**कोरखांड :** तुकडे. **उ.** १३१.

**कोरवळीत :** कुरवाळीत असलेला, ज्याला कुरवाळीत होते—आलिंगन देत होते असा. **पू.** ६१.

**कोरान :** कोरडे अन्न. **उ.** २६३.

**कोल :** दांडपट्टा. **पू.** २९९, ३१८; **उ.** २१.

**कोहोकें :** भुयार, विवर, बीळ. **उ.** १४, १५; **कोहंक–पू.** १७, ७०.

**कोळपुरूखू :** देवतास्थाने दाखविलेली पुरुषाकृती. **पू.** १४५.

**कोळे :** कोळसे. **उ.** १५८; **अ.** ६४.

**कौपीन :** लंगोट **पू.** ४२४; **उ.** ५७. °**करणे–पू.** ४२४.

**कौपिनोद्धारण :** छाटी किंवा लंगोटी नेसणे. **उ.** ३९९; **अ.** ११.

**कृच्छ्र :** प्रायश्चित्त म्हणून १२ दिवस करावयाचे एक व्रत. **उ.** ५९९.

**कृडा :** क्रीडा. **पू.** १६६.

**कृस्य :** कृश. **पू.** ५७४.

**ऋण :** करण, साधन. **पू.** २१७.

**क्रीमि :** कृमि, लहान किडे. **उ.** ७९, ५१५.

**क्रीयापार :** मृताप्रीत्यर्थचे क्रियाकर्म, धार्मिक विधी. **पू.** ८५.

**क्वापि :** कोठेही. **उ.** ४७८; **अ.** १६.

**क्षाळणे :** धुणे, पुसून टाकणे, नाहीसा करणे. **पू.** ७४, ११६, १९८.

**क्षीण :** छिन्न. **उ.** १७४.

**क्षीराब्धी :** क्षीरसमुद्र, शेषशायी देवतेचे स्थान. **पू.** २४४.

**क्षुधा :** भूक. **पू.** १०४.

**क्षुधार्थी :** भुकेला. **पू.** ३०९.

**क्षेउर :** क्षौर, डोक्यावरील सर्व केस काढून टाकणे, हजामत. **पू.** ८४, २०२, २७९; **उ.** ३३६, ३८६.

**क्षेओ :** (१) क्षणी, तात्काळ. **उ.** ६१७ (२) क्षय, नाश. **पू.** ३४.

**क्षेण :** क्षण, थोडा वेळ. **पू.** २०२.

**क्षेणू :** श्राद्धाचे निमंत्रण. **पू.** २, २२२; **उ.** ११; **अ.** ९६.

**क्षेत्रसंन्यास :** संन्यास घेऊन एकाच क्षेत्रात राहाणे. **पू.** २३८.

**क्षेपणीक** : क्षपणक, बौद्ध किंवा जैन भिक्षु. **पू.** १९८; **उ.** ५८, १८०, ५३६; **क्षपणीक–अ.** १९.

**क्षेपणे** : कंठणे, कालक्रमणा करणे. **पू.** १७; **उ.** ५७९, ५८५, ५९५, ६०७.

**क्षेम** : आलिंगन. **उ.** ५२२.

**क्षेमवार्ता** : कुशल समाचार. **पू.** ५०५.

**क्षेमा** : क्षमा, माफी. **पू.** २०२.

**क्षेमाळींगन** : स्नेहपूर्वक मारलेली मिठी. **पू.** ८९, ११०, १४५, १६५, १८४, २३९; **उ.** ४६३, ५२२.

**क्षेव** : खेव, आलिंगन. **उ.** ४६३.

**क्षोभ** : क्रोध, राग. **पू.** २०१, ३६३.

**क्षोभणे** : (१) रागावणे, क्षुब्ध होणे. **पू.** ३७५; **उ.** ९, ५०७. (२) संतुष्ट होणे. **पू.** ५१८; **उ.** ५०७.

**क्षोभविणे** : राग आणणे. **उ.** १४५.

## ख

**खट्वांगकपाळ** : कवटीचे भिक्षापात्र घेतलेला **पू.** ५३८.

**खट्कर्म** : षट्कर्म; अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह ही ब्राह्मणाची सहा कर्मे. **पू.** ५६१.

**खड** : कोवळे गवत. **पू.** ४९०.

**खडकाळी** : खडक असलेली जागा. **पू.** १७६; **उ.** १८.

**खडखांबुल** : (देवळाच्या सभामंडपातील) अनेक खांबांना शिवण्याचा खेळ. **पू.** १५७; **उ.** ४०० (टी).

**खडपडीत** : चापूनचोपून. **उ.** ३७७.

**खडपडौनि** : खडपड करीत, खडबडून. **पू.** ६४.

**खंडणे** : तोडणे, कापणे. **खंडीजति–उ.** १७४.

**खंडमंडळ** : प्रांत. **अ.** ७९.

**खंडवीखंडी** : एकामागून एक घाव घालीत **उ.** १७१.

**खडवीध** : षड्‌विध, सहा प्रकारचे. **उ.** ६४५.

**खडाइणे** : प्रपंच चालविणे, नांदणे. **उ.** १.

**खडापाणी** : चारापाणी. **उ.** ४४७.

**खडी** : खडू, खडूची लेखणी. **पू.** १४५.

**खडेखूपटे** : दगड व गारगोट्या. **पू.** ५४१.

**खण** : घरातील भाग. **उ.** ६७.

**खणणे** : खोदणे; **खणीतला–पू.** ७०; **खणीतली–पू.** ५०.

**खत** : क्षत, व्रण, गंज. **उ.** ३९, १३३, १८०.

**खंति** : दोष, दुःख, उबग. **पू.** ५०, २१५; **उ.** १४४, ५०९, ५१२.

**खदिर** : खैराचे लाकूड. **खदिरांगार–**खैराच्या लाकडाचा विस्तव जेथे पेटलेला असतो असा नरकाचा एक प्रकार. **उ.** १२१.

**खरकोटी** : खरकट्याचे तुकडे. **उ.** २१९. °**कुटी** : **अ.** ५३.

**खरखरा** : खर्रखर्र असा आवाज करून. **पू.** ७०.

**खरसाहाण** : खरपाच्या दगडाची साहाण. **उ.** ३९.

**खराटा** : झाडू, केरसुणी. **पू.** ३, १५; **उ.** ४८०. °**टेनि–उ.** ४८०.

**खर्ग** : खड्‌ग, शस्त्र. **पू.** २६, १९८, ३५३; **उ.** ६४०.

**खवंडाळी** : खोडकरपणे, चेष्टेने, खिजवण्यासाठी. **पू.** ३६.

**खववणे** : खाववणे, खाता येणे. °**वति** : **उ.** ३९.

**खवळणे** : खिजवणे, थट्टा करणे. **पू.** ५५१; **अ.** १००.

**खस्ता** : त्रास, कष्ट, उपद्रव. **पू.** २७, १००.

**खळखळीत** : खळखळ आवाज करीत. **पू.** १९८.

**खळाळ** : खळखळ आवाज करणारा पाण्याचा प्रवाह. **उ.** ९८, ३७६.

**खळीचें** : खळ दिलेले, चकाकणारे वस्त्र. **उ** ११, १०७, २३५; **खळीव–पू.** ५३४; **उ.** ११; **खळीचा–पू.** १९०, ५६३; **उ.** १४६; **खळीची–पू.** ५३४.

**खळें** : (१) धान्य मळण्याची जागा. **पू.** ४९४; **उ.** १७८, (२) स्मशान. **पू.** ४४७.

**खाकलणे** : खांकरणे °**लिले–पू.** ५११.

**खांखरणे** : खाकरणे; °**रैले–पू.** ९४.

**खांखाळे** : खिकाळणारे, मोठ्याने बोंबा मारणारे. १३४. (पाहा. **शिशु.** ५०२).

**खागरि :** घागर. **पू.** १८४.

**खागें :** चोरांचे संकेतस्थान. **पू.** ५११.

**खाजें :** भातके, खाद्य, खाऊ. **पू.** ३९, ८९, १४५, २०१, २०४ ; **उ.** ४३२, ५०६.

**खाटदांडी :** खाटेची पालखी. **उ** ४०४.

**खाटारा :** खटारा, उघडी गाडी. **पू.** ५७६.

**खांड :** वस्त्राचा तुकडा, फाटके वस्त्र. °**खापर**–(मातीच्या भांड्याचा तुकडा). वस्त्रे पात्रे. **उ.** १.

**खांड :** वेस. वेशीच्या दाराची अडगळ. **उ.** ३६८.

**खांड :** खंडित, आखूड. **अ.** १०६.

**खाड :** दाढी. **पू.** २०, १९४, ४१५ ; **उ.** ५६४. **खाडाचा**–दाढी असलेला. **पू.** १८२.

**खांडणे :** तोडणे, चिरणे, कापणे. **पू.** ५७ ; **उ.** ३३८. °**डुनि**–तोडू (प्रपु.अव.). **उ.** १७४.

**खांडदेउळी :** मूर्ती भंगल्याने जिथे पूजा होत नाही अशी देउळी. **उ.** १३७, ५४१, ६०२.

**खांडी :** एका खंडीचे माप. **पू.** ४३७.

**खांडी :** नदीच्या पार जाण्यासाठी बांधून काढलेली दगडी वाट. **पू.** १०५.

**खांडीव :** खांडवे, तांदुळाच्या पिठाचा एक पदार्थ. **उ.** १५६.

**खांडें :** तरवार, शस्त्र. **पू.** १८९, १९८, २३८; **उ.** ३९, ५१२, ५३४. °**वरि**–शस्त्राने. **पू.** १८९.

**खांडोबा :** वस्त्राचा तुकडा, लहान लुगडे. **उ.** १५४ ; **अ.** ११.

**खाण (णे) :** दरोडा. **पू.** ५४२ ; **उ.** ५१३.

**खाणे :** (१) जेवणे, तोंडात घालणे. **खाउनि :** खाऊ (प्रपु.अव.). **पू.** ५३. **खादला–उ.** १५, ५०२. **खादली–उ.** १९, ३९. **खादले–उ.** १५८. (२) चावणे, डसणे. **खाए :** चावेल. **पू.** ४१५, ५६२. **खाती–उ.** ५१, ७३. **खादला–उ.** १०. **खादली : पू.** ४७, ३१३. **खाइल**–चावेल. **पू.** २१५; **उ.** ३६३.

**खाती :** लोहार. **उ.** ३९, १४९.

**खातें :** कोनाडा. **खातां**–कोनाड्यात. **पू.** १६६

**खांदी :** फांदी, डहाळी. °**एवरि–पू.** ८२; °**एवरौनि–पू.** ८२.

**खापरी :** खापराचे भिक्षापात्र, मडक्याचा तुकडा. **पू.** २०२, २०५, २०६, २०७.

**खाराणी :** खारट पाण्याचा डाग. **उ.** ५०२.

**खारुवा :** खाराणी असलेले, घामाने मळकट झालेले. **उ.** ५९९.

**खालाटणे :** डाग लावून बंद करणे. **उ.** ४०६.

**खालुती**–खाली. **पू.** १०७.

**खालौतें :** खाली, खालच्या बाजूला. **उ.** ६३४.

**खावणि :** इच्छा. **उ.** २१२.

**खिळणे :** एका ठिकाणी राहाणे. °**ळिली–पू.** १९८.

**खीच :** खीर. **पू.** ७० ; **उ.** ५२४.

**खीण :** क्षण, थोडा वेळ. °**भरी–पू.** ३६.

**खीतिखीति :** कटकट. **उ.** ४१९.

**खीरणे :** क्षरणे, खाली पडणे. **पू.** १९४.

**खीराब्धी :** क्षीरसागर, क्षीराब्धी. **पू.** ३६३.

**खीरारी :** गुराखी, (खीरार=गुरांचे खिल्लार) **पू.** ५४.

**खीवणणे :** खेवणणे, जडणे, गुंफणे. **पू.** ३०.

**खीळि :** कडीकोंडा लावल्यावर कोंड्यात घालायचे अडकण, मोठा खिळा. **पू.** ५७, ९४.

**खीळिला :** खिळलेला, जसाचा तसा. **पू.** ५७

**खुंट :** शिल्लक असलेले (अन्न). °**गिळणे–उ.** २.

**खुंटदावें :** घरदार, बायकामुले. **पू.** ३२, ३९८.

**खुंटाफळी :** मोगरी. **पू.** १६६.

**खुपटा :** शिंपल्यासारखा लहान गोटा, गारगोटी. **पू.** ५४१. **खुबटा–उ.** ४६, ४०७.

**खुरडणे :** लंगडत-खुरडत चालणे. **उ.** २८९, ४३२.

**खुर मोडणे :** खुरांनी–पायांनी लंगडत जाणे, खूर–पाय एकमेकांवर घासत जाणे. **उ.** ३२४.

**खुररवीं जाणे :** पळून जाणे, पळवून लावणे. **पू.** ४०२.

**खूडाणा :** खुडण्याजोगा, तोडण्यासारखा **पू.** ३६४.

**खूररव :** पळतांना होणारा खूरांचा आवाज. **पू.** ४०२ ; **उ.** ५८५.

**खूरीया :** पायाचे खूर. उ. १७४.

**खूळिगा :** पाणी वाहण्याची चामडयाची किंवा जाड वस्त्राची पिशवी. पू. ३४९.

**खेओं :** क्षणीच, तात्काळ, लागलीच. पू. १७, ३४९ ; **खेवों :** पू. ३६३.

**खेटणे :** घाणा पुढे रेटणे, चालवणे. पू. ३४.

**खेडे :** बरछी. पू. १९८. (**उगी.** ४५०).

**खेत्र :** क्षेत्र, शेत. पू. ३९.

**खेत्रखार्जे :** शेतातील खाद्यपदार्थ. पू. ३९.

**खेदखीन :** दुःखाने उद्विग्न. पू. १७६.

**खेपणीक :** क्षपणक, जैन मुनी. पू. १९८.

**खेमवार्ता :** क्षेमवार्ता, कुशल. उ. ६२.

**खेमाळींगन :** क्षेमालिंगन. पू. ३८; उ. ६५, १६९, २५४, ४३०, ५८८.

**खेव :** आलिंगन. पू. ३२६, ३९९, ४०८; उ. ६५, ४०४.

**खेवणणे :** जडणे, सोने वगैरेच्या दागिन्यात बसवणे. पू. २१, ३४०.

**खेवाखेवि :** परस्परांना दिलेले आलिंगन. पू. ५०६.

**खेळीनला :** खेळला. पू. ५१. °**नले**—पू. १६, १८, २८.

**खैर :** खैराचे लाकूड. **खैरी जुंपणे**—उ. १७४, ५८९.

**खोंकर :** खोंका असलेले, भोकांची, गळणारी. उ. १०५.

**खोड :** वाळलेले लाकूड. उ. ३१८.

**खोडवळणे :** झाडाच्या खोडाप्रमाणे निश्चेष्ट होणे; घट्ट होणे. °**वळले**—उ. ३२, ३१३.

**खोडसवारिखी :** षोडषवार्षिकी, सोळा वर्षांची. पू. १९०.

**खोडा :** हातपाय अडकवण्याचे लाकडी बंधन. पू. ५७.

**खोबणे :** क्षोभणे, संतुष्ट होणे, पुढेपुढे चालणे. °**बैजे**—पू. ५२३ ; °**बैजेति**—पू. ५२३.

**खोबा :** लिंगाकृति भाताच्या राशीत वरून बोट जाईल असा पण खाली मोठ्या आकाराचा खोपा (खळगा). उ. ४२१.

**खोलणे :** पुढे चालणे. पू. ४२४.

**खोलते :** पुढेपुढे चालणारे. उ. ६३९.

**खोलबुंथी :** तोंड झाकले जाईल अशा रीतीने घेतलेला बुरखा. पू. १६०, ५९० ; उ. ३१३.

**खोलवणे :** नम्र करणे, वाकवणे. (**ज्ञाने.** १७. २५४).

**खोहळ :** लहान ओढा. पू. ४२.

## ग

**गंगाळ :** स्नानासाठी तांब्याचे किंवा पितळेचे अर्धगोलाकार पसरट तोंडाचे भांडे (याला कडच्या असतात). पू. ११५.

**गंगोतरण :** गंगोत्तरण, गंगा उतरून पलीकडे जाणे. उ. ७७.

**गजकर्ण :** योगातील एक प्रक्रिया; हत्ती ज्या प्रमाणे सोंडीतून पोटात घेतलेले पाणी बाहेर टाकतो त्याप्रमाणे अन्नपाणी ओकणे. उ. १५५.

**गजदंत :** हस्तिदंत. पू. १९८.

**गजबजणे :** भिणे, गडबडणे, घाबरणे. पू. २०३; उ. १५७, ५५८, ६१५.

**गजंबु :** गजबज, कोलाहल. पू. २३४, ५११; उ. १२६, ३६८.

**गजक्षेओ :** हत्तीचे पिल्लू. उ. ४९८.

**गडद :** गच्च. उ. ५२१.

**गडदरा :** गड्डा, खोल खड्डा. उ. ५८५.

**गडी :** सोबती, बाजूचा मनुष्य. पू. ५१.

**गडीयाळा :** घडयाळ, घाट. उ. १४६.

**गडे :** दोन भिन्न भाषा बोलणारे लोक जेथे सारख्या संख्येने असतात तो भाग; 'लज्जा-हरणा वस्त्र तथा क्षुधाहरणा अन्न ये दोन्ही असति तयांतें 'गडी' म्हणिजे ? (स्मृस्थ. ५१). उ. ५८५.

**गणग :** निबर चणे. उ. ८.

**गद :** रोग, आजार, संकट. अ. १०१.

**गंधवादी :** अत्तर देणारा, गांधी. पू. २८.

**गंधि :** घाण वास. पू. ५०, ५८५.

**गमणे :** समाधान होणे, करमणे, वेळ क्रमणे. पू. ५५, १४१; उ. ७८, ११३, ४९३.

**गरकरि :** गर्रकन, भिंगरी घेऊन. उ. ३७३.

**गरव्हार :** गर्भार. उ. १६६.

**गरुड आसन :** गरुडाकार आसन. उ. ६२३.

**गरूड घोडा :** गरुडाप्रमाणे वेगवान घोडा. पू. ७४, ७५.

**गरूडार :** गरुडाचे देउळातील ओटा. **पू.** ४३.

**गलांदि :** ग्लांदि, ग्लानि, काकुळती. **उ.** ५३.

**गवसणी :** खोळ. **उ.** १६१.

**गव्हण :** गव्हाण, छोटे गाव. **पू.** १५ ; **उ.** १६३. **गव्हणुनि**–गावाहून. **उ.** १६३.

**गळकंथा :** गळ्यात घालण्याची कंथा, कफनी. **पू.** ४६९.

**गळती :** खाली छिद्र असलेले–ज्यातून पाण्याची धार सतत झिरपते असे भांडे. **उ.** ३४४, ४२४.

**गळदंडा :** गळ्यातील पुष्पमाला. **पू.** २७, ११५, १४५ ; **उ.** ११, ३६, १३३, ४१९, ४२१.

**गळाळा :** घोट. **उ.** ४२५.

**गळित :** ब्रह्मचर्यापासून ढळलेला. **अ.** ११४.

**ग्रगाडा :** खड्डा. **उ.** ३२४.

**ग्रह :** पिशाच्च, भूत. **पू.** ३५, १११. **ग्रहोंचा**–ग्रहांचा. **पू.** ३५.

**ग्रह :** गृह, घर. **उ.** ४९३, ५१४.

**ग्रहस्तधर्म :** गृहस्थाश्रमातील कर्तव्यकर्म. **पू.** ५५५.

**गाउ :** अंतर मोजण्याचे एक प्रमाण, चार कोसांचे अंतर = एक गाउ. **पू.** १५, १८७ ; **उ.** ११, १२१ ; **गाउवें** (अव)–**उ.** ११, ३१ ; **गाउवांचेनि**–**पू.** १५.

**गाउ :** गाव, ग्राम. **पू.** २५९. **गाउनि**–गावाहून. **पू.** २५९.

**गांजीव :** गांडीव (अर्जुनाच्या धनुष्याचे नाव). **पू.** ३६३.

**गांठी :** माळ, गळ्यातील एक दागिना. **पू.** २०४ ; **उ.** ४४१.

**गाडु :** गडवा, तांब्या, तांब्यातील पाण्याची धार ; °**ढाळणे**–गडव्याने आंगावर पाणी ओतणे. **पू.** ३८६, ४८० ; **उ.** ७, ३०१.

**गाडुवा :** गडवा, तांब्या. **उ.** ४९४.

**गांधीया :** ज्यावर अनेक गांधी=गाठी उगवल्या आहेत असा, गाठचाळ. °**हीवरू**–हिवसाचे गाठचाळ झाड. **उ.** ११६.

**गानें :** गायक. **उ.** १७३.

**गारि :** मातीचा चिखल करून ठेवण्यासाठी असलेला गड्डा, ओल्या मातीचा खड्डा. **पू.** ३९२.

**गाव मागणे :** गावात भिक्षा मागणे. **उ.** ५३८.

**गिरगुटीए :** एकसारखे गरगर फिरणारे, सतत चालू असलेले. **उ.** १५.

**गिवसनी :** शोध. **पू.** ४१.

**गीवसणे :** शोधणे. **पू.** ४१, २५७, २५८ ; **उ.** ३५५.

**गुजरु :** गुजराथ प्रांतातील पुरुष. **पू.** २०, २३७ ; **उ.** ४५३.

**गुंडणे :** गुंडाळणे. °**डीति. पू.** ७९ ; **गुंडुगुंडु**–गुंडाळून. **पू.** १८७.

**गुंडा :** दगड. **उ.** ८९, २२६. **गुंडेवरि**–दगडांनी. **उ.** १७२.

**गुढर आंबा :** झाडावरच वस्त्रात गुंडाळून ठेवलेला आंबा (आंब्याचे झाड). **पू.** २, ४२८, ४३२.

**गुढरणे :** (हत्तीवर) अंबारी घालणे. **गुढरला**–वर अंबारी घालून शृंगारलेला. **पू.** २४८.

**गुढा :** दगड, शिवेवर गाडलेला दगड. **पू.** ५८९ ; **उ.** ५९५.

**गुढिला :** वर आच्छादन घातलेला, शृंगारलेला. **उ.** ३३६.

**गुणवीसेख :** गुणविशेष, विशेष गुण. **पू.** १०५.

**गुणीया :** पंचाक्षरी, मांत्रिक. **पू.** ३५.

**गुपैतया :** गुप्तपणाने. **पू.** ६१.

**गुंफा :** पर्णकुटी, झोपडी. **पू.** ४४, १०५, १०६, **उ.** ३४१, ५०७.

**गुरव(उ) :** देवतेचा पुजारी. **पू.** १३७, २५१ ; **उ.** २८८, ४२४.

**गुरवीण :** गुरवाची बायको, पुजारीण. **उ.** ४०१.

**गुरूळा :** गुळुळा, गुळणा, **पू.** ३५, २०१ ; **उ.** १६२.

**गुलगुली :** गुबगुबीत आणि मऊमऊ अशी (स्त्री) ; °**या**–(अव). **उ.** १०२.

**गुळमीरी :** गुळात मिरपूड घातलेली. **उ.** २२४.

**गुळभेली :** गुळाचा लहान गोळा : **पू.** ५८१.

**गूळ्हारी :** गूळ करणारा. **उ.** ५८५.

**गुळुळा :** गुळणा, चूळ. **पू.** ५, २६, २८-३०, ४० इ. ; **उ.** ३, ११ १४, १५, १९, १६३ इ.

**गूंपणे :** गुंफणे, गुंतणे. **पू.** २१, २८१.

**गेलेयावाहीरि :** गेल्यावाचून. **उ.** ५५२.

**गोगाणे :** घोंगावणे. **उ.** ४२५.

**गोट :** बेट. **उ.** ४४४.

**गोठण :** गोठाण, गुरांचे बसण्याचे ठिकाण. **पू.** ५२; °**ठणौनि–पू.** ५२.

**गोडीसा :** मधुर, गोड. °**सेया–उ.** १६९.

**गोंडीबुंथी :** गोंड लोक घेतात त्याप्रमाणे डोक्यावरील आच्छादन. **अ.** ११२.

**गोणटें :** गोणपाट, तागाचे जाडेभरडे वस्त्र. **उ.** १४९.

**गोत्रिज :** गोत्रज, गोत्रात जन्मलेले, नातेवाईक. **पू.** ३२.

**गोतीया :** गोत्रातील, नातेवाईक. **पू.** २७.

**गोदरी :** उकिरडा, हागणखडी. **पू.** ३, १५, १६६, ५८५.

**गोंदळ :** गोंधळ. **पू.** २०४.

**गोधुळ :** सायंकाळ. **पू.** ३२.

**गोपाल (ळ) :** गुराखी. **पू.** ५१, ५२, ७८, ७९, २६०.

**गोपाळनी :** (षष्ठी) गोपाळाची, श्रीकृष्णाची. **पू.** १८.

**गोपाळमंत्र :** श्रीकृष्णाचा मंत्र. **पू.** ११९, १८१.

**गोफणणे :** गोफणीतून दगड फेकणे-मारणे. °**णीति–पू.** ७९.

**गोमटें :** चांगले, पुण्य, भले. **पू.** १३७, १८१; **उ.** १६५, ५९३, ५९४.

**गोरसणे :** गाईचे तूप लावून अंग चोळणे. **पू.** ३८६.

**गोरक्ष :** जोगी. **उ.** ५०५.

**गोरक्ष फोकरणे :** 'गोरक्ष' असा भिक्षाशब्द उच्चारून भिक्षा मागणे. **उ** ५२४.

**गोरुवें :** गाईवासरे. **पू.** २७, ५१, २५१, ४८५; **उ.** ९२.

**गोलटी गाए :** गोगलगाय. **उ.** ५००.

**गोवर :** शेणाचा पोहटा, गोबर. **उ.** २६२.

**गोवळ :** गाई वळणारा, गुराखी. **पू.** ५१, ६०; °**वळे**–(अव). **पू.** ५२.

**गोवळरूवें :** गुराख्यांची मुले. **पू.** २६, ५१; **उ.** ४८०.

**गोवारी :** गुराखी. **पू.** ५४.

**गोवारें :** गुरे. **पू.** ५४.

**गोसावी :** स्वामी. **पू.** ४८.

**गोसावीणि :** स्वामिनी, मालकीण. **उ.** ३२९, ५८८.

**गोळक :** गोळा. **उ.** २२५.

**गौल्य :** गोड. **उ.** ४२४; **अ.** १; **गौल्यता–अ.** ५३.

**गौसणी :** गवसणी, खोळ. **उ.** १६०.

**गौस्फुरण :** जेथे खडा लागतो किंवा एखादा स्पर्श होतो तेवढाच आपल्या शरीराचा भाग गाय हालवते, या विशिष्ट कलेला गौस्फुरण म्हणतात. **पू.** १२१.

**ग्रामविखो :** गावातील सर्वांना प्राप्त होणारा भोग. **उ.** ३५६.

**ग्रामांतर करणे :** दुसऱ्या गावी जाणे. **पू.** ५५४, ५६७.

**ग्रामेस्वर :** गावातील श्रेष्ठ पुरुष, पाटील. **उ.** ४९६.

**ग्राहीक :** गिऱ्हाइक, खरेदी करणारा. **पू.** ७८, १४४.

## घ

**घट :** घागर. **पू.** ९६.

**घटीत :** वधूवरांच्या पत्रिकांची अनुकूलता. **पू.** ३२.

**घडी :** पासोडा किंवा उपरण्यासारख्या लांब वस्त्राची घडी करून (त्याला पिळा देऊन) तयार केलेला दोर. **पू.** ५७.

**घडी :** गाडगे. **पू.** ५७, १४५.

**घणवरि :** घणाने. **पू.** ५८९; **उ.** ४८२.

**घतणे :** घात करणे, ठार मारणे. **घतैल–उ.** ५८५.

**घनवील्हन :** जाड व उत्तम पोताचे वस्त्र. **उ.** ६८.

**घरटी :** राखण, राखण करण्यासाठी घातलेली गस्त. **उ.** ९.

**घरभंग :** पत्नीचा मृत्यू. **पू.** ३००.

**घरवात :** संसार, प्रपंच. **पू.** ५४३ ; **उ.** १, १५६, ३८६. (अमृतानुभव १.१३.)

**घराश्रम :** घरातील व्यवहार. **अ.** ५५.

**घरैत :** घरातील माणसे. **उ.** ५९९.

**घळणे :** घळघळ रडणे. **उ.** ५९५.

**घाएखंडी :** घाव घालणे व इतरांनीं घातलेल्या घावांचे खंडण करणे. **पू.** २९९ ; **उ.** २२.

**घाएळ :** घायाळ, घाव लागलेले. **पू.** ५७६.

**घागरा :** घुंगरू. **पू.** १८२.

**घागरा बांधणे :** तिरडीला घुंगरू बांधणे (एक प्रकारची ही शिवी होय). **पू.** ३३८, ३५३, ४३७, ५८९ इ.; **उ.** ३८, १३१, १३३, १६५, १६९, २२७, २४१, ४०६; **अ.** ५

**घागरि :** घागर, पाणी ठेवण्याचे माती, तांबे, पितळ, इत्यादिकांचे मध्यम आकाराचे भांडे. **पू.** ९६.

**घागाणे :** ओरडणे, रागावून बोलणे. **पू.** १०६.

**घांटऐसा :** घंटीसारखा लोंबता. **पू.** ९४.

**घाटा :** जोंधळे शिजवून व लोणून केलेला पातळजाड पदार्थ, जोंधळयाचा भरडा. **उ.** ४९५.

**घांटी :** गळा, घसा, नरडे. **पू.** ९२.

**घाणा :** एक फेर, एका वेळेचे परिमाण. **पू.** ५५८.

**घाणा :** तेल पिळून काढण्याचे लाकडी यंत्र. **पू.** ५२८.

**घाणाते :** घाण येत असलेले. **पू.** ४६६.

**घामैणे :** घामाघूम होणे, घामाने ओले होणे, घामाचा वास मारणे. **उ.** १२८, ४०४.

**घायाघाया :** त्वरेंने **उ.** ३९१.

**घालुनि :** घालूं (प्रपु.अव). **पू.** ६०.

**घुगरीया :** घुगऱ्या; चणे, तूर, वाटाणे इत्यादिकांची उसळ. **पू.** ७० ; **उ.** २८८, ३३४.

**घुट(टि)का :** घुटिका, सिद्धीने मंतरलेली गोळी. **पू.** ६६; **उ.** ३७१. °**सीधि**–मंत्रसामर्थ्याने सिद्ध केलेली गोळी. **पू.** ६६.

**घुमरी :** बहर, विपुलता, उत्कर्ष. **घुमरीसीं**– बहरून. **पू.** ४७२.

**घेउनि :** घेऊ (प्रपु.अव). **पू.** २१७, २३८, २३९; **उ.** १६८.

**घेणे :** मारणे, ठार करणे. **उ.** ४६५.

**घेपे :** घेइजे, घ्यावे. **उ.** २०२, ४३४, ६२५.

**घेया :** घ्या. **पू.** १००.

**घोख :** घोष, आवाज. **उ.** ९८.

**घोंगतें :** डोक्यावरून घेण्यासाठी इरल्याच्या आकाराचे केलेले वस्त्र. **उ.** ७४.

**घोंटाळणे :** घोटणे. **उ.** ३०९.

**घोंटी :** लहान आकाराचे टणक बोर, आंबा वगैरे फळ. **पू.** ४४६, ४७०, ५३२; **उ.** ४९४. **घोंटे एसे**– टणक बोरासारखे. **पू.** ५३२.

**घोनारणे :** खाली पाडणे, जमिनीवर लोळवणे. °**रुनि**–**उ.** १७४.

**घोळ :** लोखंडाच्या दांडीस कडया लावलेले एक वाद्य. **पू.** ३३.

**घोळाणा :** कडु लिंबाची पाने, चिंचा, शेंगा वगैरे एकत्रित घोळून फोडणी देऊन तयार केलेला पदार्थ. **पू.** ३९, ३६४.

**घृणा :** (१) दया, अनुकंपा. (२) वीट, तिरस्कार, किळस. **पू.** ३६; **उ.** १३७. **घ्रणा**–**उ.** ८, ५६४ ; **अ.** ६४ ; **घ्रुणा**– **पू.** २२१; **उ.** १७४.

**घ्रष्टि :** घसट, दाट मैत्री. **उ.** ४७०.

## च

**चक्रवति :** ज्याच्या रथाचे चाक अडथळा न होता सर्वत्र फिरते असा राजा, सम्राट. **उ.** १४५.

**चडकणा :** चडकण् (नादशब्द). **पू.** ५४.

**चंडीस :** देवतेचे द्रव्य. **पू.** ४००.

**चणकसाक :** चण्याची भाजी. **उ.** २७८.

**चतुर :** चार. **उ.** २१.

**चतुर्विध :** चार प्रकारचे. **उ.** ५६५.

**चतुर्सीव :** चारही बाजूंची शीव; गावाची वेस; °**सीवेसीं**—कोणत्याही शिवेला. **पू.** ५९०.

**चरणचारी :** पायी चालत असताना, पायावर. **पू.** ९१, १६७, २००, ५५७, ५७१; **उ.** ३१८.

**चरणसह्वान :** चरणसंवाहन, पाय चुरणे. **पू.** २६, २९.

**चरबट :** बडबड करणारी. **पू.** ५८४.

**चराचर :** चर आणि उचर, जड व चेतन. **उ.** १६८.

**चरितार्थ :** पूर्ण, सफळ. **पू.** ४८; **उ.** ९९, २४८, ३४१, ५८४, ५८६, ६१०.

**चरी :** पौळीला वरच्या बाजूस असलेले बदामाच्या आकाराचे कंगोरे. **चरिया–चरीया**–कंगोऱ्याकंगोऱ्याने. **पू.** १३६.

**चर्मकार :** चांभार. **पू.** २७; **चर्मकारी**— चांभारीण. **पू.** २७.

**चवकणे :** चमकणे, दचकणे. **पू.** ३९.

**चवरधरू :** चवरी ढाळणारा. **पू.** ७४.

**चळणे :** बहकणे, भ्रष्ट होणे. **पू.** १०९.

**चळना :** चोळणा. **पू.** २०४.

**चळबळा :** चळवळचा. **पू.** ४४४.

**चाउंडा :** चामुंडा देवता. **उ.** ३४४.

**चाकार :** चाकोरी, गाडीच्या चाकांनी मळलेली वाट. **अ.** ९८.

**चाकीकरू :** वर्तुलाकार कडे (चाकी) वाजवणारा, कडगी. **पू.** १२१.

**चांग :** चांगले, नीट. **पू.** १९४. **उ.** १, १५८, ३२३, ६१७.

**चांगी :** चांगली. **पू.** १९८.

**चांचु :** चोच. पू. १७५; **उ.** ३०३; °**करुनि**– चोचीने. **उ.** ३०३.

**चाटणी :** भिक्षान्न चाटून खाणे. **पू.** ३६.

**चाटसी :** चाटू, पळी. **उ.** ५५३.

**चाटा :** (१) सेवक, नोकर, **पू.** ३११, ३८६; (२) विद्यार्थी. **पू.** १५, ४९, १६६; (३) कापडाचा फिरता व्यापारी. **उ.** ९, ३३१, ६४४.

**चाटु :** लाकडी पळी. **पू.** ३६; **उ.** ५४८, ६०९.

**चाटुरुवें :** मुले, पोरटी. **पू.** ५४१.

**चाड :** (१) इच्छा. **पू.** १६, १८; **उ.** ९७, १०२, १३१, ४९८; (२) पर्वा. **उ.** १५४.

**चांडी :** चंडी, चंडिका देवी. **उ.** ३७६.

**चांदोबा :** (१) छत, छताला बांधलेला फुलौरा. **पू.** ७, ३०९; (२) फिरताना किंवा मिरवणुकीत वर धरलेले आच्छादन वस्त्र. **उ.** १०३, १६०, ५३४.

**चांपेल :** चाप्याचे तेल. **पू.** ११.

**चामाठी :** चामड्याचा चाबूक. **पू.** ७५.

**चामार :** चांभार. **उ.** २६८; **चामारि**— चांभारीण. **पू.** २७; **चाम्हार**—**पू.** २७.

**चालवणे :** पुढे जायला सांगणे; हाकलणे. **अ.** १.

**चास :** (१) ओढा, नाला. **उ.** ३७९; (२) तास, शेतात नांगरतांना–पेरतांना पडलेली सरळ रेघ. **उ.** ३७४; (३) नदी-काठावरील ओटा. **पू.** ११५, २४७, २६७.

**चाहाळ :** चाहूल, अस्पष्ट आवाज. **पू.** ५११.

**चाळवणे :** (१) फसवून वश करणे. **पू.** ३२, ३५, १०६, ३०५; **उ.** ५०७, ५१८; (२) झुलवणे, हुलकावणी दाखवणे. **उ.** १५२.

**चिंचकरटें :** चिंचा कुटून, त्याचा जाड पाक करून, त्यापासून तयार केलेले भांडे. **पू.** ४१; **उ.** ४३७.

**चिंचोरा :** चिंचोका, चिंचेतील बी. **पू.** ७८.

**चिज्जड :** मायास्वरूपाचा एक विभाग. **उ.** ५७७.

**चित्र पाडणे :** चित्र काढणे–रेखणे. **पू.** ४४३.

**चिंधीया :** चिंध्या, लहान तुकडे. **पू.** ७९.

**चिमुटी :** चिमुटभर मीठ. **उ.** ७८.

**चिरणे :** लावणे, घालणे, रचणे. **अ.** ४५.

**चीकसा :** सुगंधी उटणे. **पू.** ११५. ३८६, **उ.** १६६.

**चीत्रीव :** रंगीत, नक्षीदार. **पू.** ४१८.

**चीन्ह :** मुद्रा, गंधाचा टिळा. **उ.** ४४०.

**चीन्हाचीन्ह :** पुष्कळ मुद्रा, टिळे, पताका. **उ.** ४४२.

**चीप :** चापट दगड. **पू.** ५८२.

**चीपतळ :** लहान चीप, दगडाचा लहान पातळ तुकडा. **उ.** ६२३.

**चीपुळी :** चुटकी. **उ.** १.

**चीमा :** खडा, चिमखडा. **उ.** १०१.

**चीमोरा :** चिमटा. **पू.** ३९८.

**चीरचोळी :** लुगडे व चोळी. **पू.** २१७.

**चीरटी :** चिंधी. °**या**–(अव). **पू.** ७९.

**चीरा :** तासून घडवलेला पाषाण. **पू.** ३८.

**चुकौनि :** चुकवून, टाळून. **पू.** ५८५.

**चुडि :** चूड, पुढे आलेले लांबट तोंड. **उ.** ३०३.

**चुडी-चांचुडी :** चिमूट चिमूट वेचून, गोळा करून. **उ.** ५९०.

**चुनाडा :** चुना तयार करणारा. °**डे**–**पू.** ७६.

**चुना पिटणे :** चुन्याचा गिलावा देऊन तो पक्का होण्यासाठी ठोकणे. ४८.

**चुना सारणे :** चुना लावणे, सफेती देणे **पू.** ६१.

**चुभळणे :** बुडवणे, बुचकळून भिजवणे. **पू.** ५८१ ; **उ.** ११८.

**चुंभळ :** कापडाची गुंडाळी, वेटोळे. **पू.** २३.

**चूळ :** ताकाचे पाणी. **उ.** ७८.

**चेइणे :** जागे होणे. **चेये**–जागा होतो. **उ.** ५७५ ; **चेइली**–जागी झाली. **उ.** ९ ; **चेइला** (वि)–जागा झालेला. **उ.** १३५.

**चेटक :** जादू, जादुगिरी. **पू.** २००.

**चेंदा :** चोथा झालेले अन्न. **उ.** ९, ३९, १३७.

**चेंदेपोइ :** केवळ भिक्षान्नाचा चेंदा खाऊन राहाणारे, पिचपिचीत शरीराचे, फोफसे. **उ.** २७०.

**चेपणे :** दडपणे, मिळणे ; **चेपे**–**पू.** १०७.

**चेला :** शिष्य. **उ.** १९४.

**चेव :** जागृती. **पू.** १०९ ; **उ.** ३३८, ५०२.

**चेववणे :** जागे करणे. **उ.** ५०२.

**चेष्टविता :** प्रेरणा देणारा, कार्यप्रवृत्त करणारा. **उ.** ६३५.

**चेष्टा :** जड वस्तूबरोबर केलेल्या क्रीडा. **उ.** ५९०.

**चैतन्य :** (१) चैतन्यमाया. **पू.** ८९, २४४ ; **उ.** १३३ ; (२) अंतःकरण. **पू.** ३७५ ; **उ.** ४७०.

**चैतन्यविद्या :** मायेची विद्या. **उ.** ३५७.

**चैतन्यविद्यावंत :** मायेची विद्या प्राप्त झालेला. **उ.** ४४७.

**चैतन्यापर :** मायेच्या पलीकडे. **पू.** १४५ ; **उ.** ४७३.

**चोखट :** स्वच्छ, चांगला. **पू.** १०७, १९२ ; **उ.** १४८, ५२४.

**चोखणी :** डोक्याला लावण्याचे शिकेकाईचे उटणे. **पू.** ३८६, ४९५ ; **उ.** ३०१, ३९३.

**चोखणे** (क्रि) : चोपडणे, उटणे. **पू.** ४८०.

**चोज :** कौतुक. **उ.** ५९०.

**चोजवणे :** शोधणे, तपास करणे. °**वीत. पू.** १०५.

**चोंढी :** दगडाच्या कपारीखालील डोह. **पू.** ५३.

**चोभा :** धान्य मोजण्याचे चार पायल्यांचे माप. **पू.** ६४ ; **उ.** १०, २८८, ३३१.

**चोरिया :** चोरून. **उ.** १६२, २२१, ३३९, ४६४.

**चोहटा :** चव्हाटा, चौक. **उ.** २३, ४२१. **चोहोटा :** **उ.** ४०.

**चोहरीया :** चोखट, उत्तम. **उ.** ४१०.

**चोहुनि :** चिंध्या होऊन, तुकडे होऊन. चारी बाजुंनी. **उ.** १२१.

**चोळें :** चौल, लहान मुलाचे जावळ काढून शेंडी ठेवण्याचा विधी. **पू.** ३०.

**चौक :** देवळाच्या सभामंडपातील चौकोनी आंगण. **पू.** ३३.

**चौक भरणे :** पाटावर किंवा पासोड्यावर गहू, तांदूळ यांनी चौकोनी रांगोळी काढणे. **पू.** ४८०.

**चौकरंगमाळिका :** चौकात, आंगणात काढलेल्या रांगोळ्या. **पू.** १०७, १७५, १७६, ३८६ ; **उ.** २६६, ४२९.

**चौकीया :** भोवती ओवऱ्या असलेला घराच्या मध्यभागातील चौकोनी उघडा भाग. **पू.** ७५, १७६. **देव्हारचौकी**—घरातील देवघराचा खण. **पू.** १७६.

**चौंगा :** हाताचा पंजा, तळहात. **अ.** ९१.

**चौंडका :** चोंडके वाजवणारा. **पू.** ४०६.

**चौंडुका :** चोंडके, एक चर्मवाद्य. **पू.** २०४.

**चौदानी :** चार प्रकारच्या दानांनी. **पू.** २८.

**चौपदी :** चतुष्पदी, एक गीतप्रकार. **उ.** १९५, ३५३.

**चौबारें :** (१) चौकोनी चौक, ओटा, आंगण. **उ.** २२२, ४१५, ५१७, ५२० ; (२) चौकोनी विहीर. **पू.** १३६, १६२.

**चौरंग करणे :** हातपाय तोडून टाकणे, अवयव-छेद करणे. **पू.** २६० ; **अ.** ४५.

**चौरंगी घाव :** एका विशिष्ट प्रकारे चहु बाजूंनी मारा करणे. **पू.** २९९.

**चौरंगी विद्या :** चौरंगीनाथाला प्राप्त झालेली शरीरावयव पुन्हा निर्माण करणारी सिद्धी. **पू.** २६० ; **उ.** ४१४.

**चौरासी :** चौऱ्यांशी. **उ.** १२१.

**चौल :** चवली, एक चतुर्तांश भाग, अर्धा आसु. (?) **उ.** ३९४.

**चौवणी :** एक खाद्य पदार्थ. **पू.** ३८८ ; **उ.** २२४.

**चौहट :** चोहटा, चव्हाटा, चार रस्ते जेथून फुटतात अशी जागा. **अ.** १५.

**च्युतिमंत :** पतनशील, ज्यामुळे शेवटी पतन होते अशी. **पू.** ८९, १४५ ; **उ.** ४७३.

## छ

**छत्र :** अन्नसत्र. **उ.** ९९.

**छंदित :** ओकलेले. **उ.** ४०० (टी) ; ४७०.

**छांदस :** वेदांती. **उ.** ४७३.

**छायापुरूखू :** छायापुरुष. आपल्या सावलीच्या रूपाने प्रगट होणारा पुरुष. **पू.** १८६.

## ज

**जइंती :** जयंती, वाढदिवस. **पू.** ४९३ ; **जयंती– उ.** १६५.

**जगती :** देवळाचे आवार, आवाराची भिंत. **पू.** ९१, २११, २५०, ४१७, ४२४ ; **उ.** ३२१, ५३४.

**जगरें :** गोवऱ्यांचा विस्तव. **उ.** २७३.

**जचणे :** मनात जळणे. **पू.** २०३.

**जटे :** जटा. **पू.** २०७.

**जडणे :** लागणे, चिकटणे, आसक्त होणे. **उ.** ५८५.

**जत :** जति, पद्याचा एक प्रकार. **पू.** १३३.

**जति :** गेय गीत. **पू.** ४१८.

**जन्मवीजैल :** जन्माला घातले जाईल, जन्म देऊ. **उ.** ६३६.

**जमजूत :** यमदूत. **पू.** १०९.

**जर :** ज्वर, ताप. **पू.** २९२ ; **उ.** ९, १८९, १९२, १९९; **जरू–पू.** ५३, ११०, ११६ इ.; **उ.** १९२.

**जरठ :** कठीण, म्हातारा. **उ.** १८०.

**जवट :** समूह, जोडी. **पू.** २०१.

**जवनिक :** पडदा. **उ.** ४३४.

**जवळा :** जवळ. **पू.** ८६ ; **जवळे–पू.** ८९, २२२ ; **उ.** ४१२, ५९५.

**जवळीक :** सन्निधान. **पू.** १९०, २४४.

**जळकुडा :** जळक्रीडा. **पू.** २६७.

**जळधाणि :** पाण्यात वस्त्र धुतल्याने त्याला आलेला मातकट रंग. **उ.** १३७, ३१६.

**जळनीक्षेप :** नदीच्या पाण्यात प्रेत टाकून केलेला अंत्यसंस्कार. **उ.** ३०५.

**जळप्रवाह :** नदीच्या पाण्यात प्रेत घालून केलेला अंत्यसंस्कार. **उ.** ३६.

**जळमांडवी :** (१) पाण्यात वाढणारी एक वेल. **पू.** ४४७; (२) चांदोवा, बाहेर फिरताना अंगावर धरलेले कापडाचे छत्र. **पू.** १७६; (३) जळक्रीडा. **पू.** २१६; (४) जळ-क्रीडेची जागा, पुष्करिणी, बांधून काढलेला तलाव. **पू.** ७५, २१६.

**जळसेन :** जलशयन, विष्णु. **पू.** २८१.

**जळांत :** अथांग, अत्यंत, खोल. **उ.** १८.

**जाखीर :** जाखमाता, यक्षिणी, मंत्रतंत्र करणाऱ्या देवता. **पू.** ५३९ ; **अ.** ५५.

**जागर :** जुव्यातील दानाचा एक प्रकार. **पू.** २८.

**जागलीया :** जागा राहून पाहारा देणारा. **पू.** ५६५.

**जाचंदे :** आईवडील, मातापिता. **अ.** ११० **जाचवंदी : अ.** ११०.

**जाड :** हत्ती, डुक्कर इत्यादींची शिकार. **पू.** २१०.

**जाडि :** घोंगडे, पांघरण्याचे जाड वस्त्र. **पू.** ६०, ८५, १०७, १५२, १८४, २३७ ; **उ.** १४९, ५३४, ५३५.

**जाडच :** फार जेवल्यामुळे आलेली जडता, सुस्ती. **उ.** ६१५.

**जाण :** ज्ञान ; **जाणेंवीण**–ज्ञानावाचून. **पू.** १२१.

**जाणतां :** जाणूनबुजून. **पू.** ५९० ; **उ.** ५६४.

**जाणता :** ज्ञानी : **उ.** ५६४.

**जाणवणे :** कळवणे, सांगणे, माहीत करून देणे. **पू.** २९८.

**जाणिवा :** जाणूनबुजून. **उ.** ५३६.

**जाणिवें :** जानवे. **पू.** २२२, २२३; **जानिवें**– **पू.** २४८.

**जाणे :** गमन करणे. **जाऊनि** (प्रपु.अव.)– **पू.** १९८, २०२, ४१५; **उ.** ९३, १४५ इ.; **जाओनि** (प्रपु.अव.)–जाऊ. **पू.** १९१ ; **जाइजैल**–जाऊ. **उ.** ६३९; **जाइजत** असिजे–जात आहां. **पू.** १८७.

**जाणौनि :** (प्रपु.अव.) जाणू, ज्ञान करून घेऊ. **उ.** ६२४.

**जातखेओ :** जाताक्षणीच. **उ.** ३४०.

**जातां :** जात्यात. **उ.** ५०७.

**जातिक्रीडा :** जात्यंधाचा खेळ. **उ.** ३६०.

**जातिविखो :** जातिवंत–उत्तम भोग. **उ.** ३५६.

**जातिसूध :** जातिशुद्ध ; शुद्ध जातीचा, उत्कृष्ट. **पू.** ३१.

**जातीअंध :** जात्यंध, जन्मतः आंधळा. **उ.** ३६०.

**जातीयें :** (प्रपु.एव.स्त्री.) जाते, जात आहे. **उ.** १५८.

**जातें घालणे :** जाते सुरू करणे, दळणे. **उ.** १५.

**जात्यंध :** जन्मांध. **पू.** ३१०, ४५६ ; **उ.** ३६०.

**जात्यस्मरत्व :** मागील जन्मातील जातीचे स्मरण. **पू.** २८१.

**जात्रा :** यात्रा. **उ.** ५८५, ५९५.

**जाधव :** यादव. **पू.** २०.

**जानवसा :** वऱ्हाडी पाहुण्यांचे निवासस्थान, जनवास, जानोसा. **पू.** ६८.

**जान्हु :** गुडघा, मांडी. **उ.** २९८; **जानु**–**पू.** ४२.

**जाप्य :** जप. **उ.** ५९७.

**जाया :** पत्नी. **उ.** १११, १४३.

**जारक :** प्राणायामाचा एक प्रकार. **पू.** १९५.

**जारणा :** रेत स्तंभित करून ते जिरविण्याची क्रिया. **पू.** २०० ; **उ.** १२७.

**जारणे :** जागच्या ठिकाणी जिरवणे–जिरणे. **पू.** २००; **उ.** १२७.

**जारसें** (वि) : निबर, सुरकुतलेली. **पू.** ४९९.

**जारसैलें :** (वि) : सुकलेले, सुरकुतलेले. **उ.** १८०.

**जारू :** नुकत्याच जन्मलेल्या मुलाच्या अंगावरील चिकट द्रव. **पू.** ३९७.

**जावळाचे :** जावळे, एकाच वेळी जन्मलेले. **पू.** २५९.

**जासलवट :** पळा. **उ.** २७५.

**जाळारख :** जाळंधर, जाळीची खिडकी, झरोका. **पू.** २९.

**जाळी :** झाडाझुडपांनी वेष्टित असे सावजांचे आश्रयस्थान. **पू.** ६२.

**जिव्हादाग :** जिभेला बसलेली (गोडाची) मिठी. **उ.** १५५.

**जीआली :** जिवंत. **उ.** ६४४.

**जीआली :** (क्रि) जिवंत झाली. **उ.** ७५ ; **जीयाला**–**उ.** १०.

**जीआलें :** जिणे, जीवित. **उ.** ३१.

**जीउली :** लहान जीव. **उ.** १०२.

**जीणा :** जिंकलेले द्रव्य. **पू.** १८, २८.

**जीणी :** जीवन, **पू.** ७६. (पाहा. नरुस्व. ३४७).

**जीते :** जागृत. **पू.** ७२.

**जींपती :** जिंकले जातात. **पू.** १९५.

**जीव्हेवरि :** जिव्हेने, जिभेने. **पू.** ६२.

**जीज्ञासणे :** जिज्ञासा करणे, विचारणे. **उ.** ५८५.

**जुं :** द्यूत. **पू.** १८, २८, ४६५.

**जुंआंठा :** जुव्वा खेळण्याची जागा. °**ठेयासि**– **पू.** २८.

**जुआरी :** द्यूतकार, जू खेळणारा. **पू.** १८, ८२, ९२. 'ज्वारी' पाहा.

**जुआरु :** जुव्वा खेळणारा. **पू.** ४६५; **उ.** ३४९.

**जुइंचे :** द्यूताचे. **पू.** १८.

**जुझ :** युद्ध. **पू.** ३४३.

**जुझणे :** युध्द करणे, **पू.** ९८; **उ.** १२६, १६४, १९४, ४२४, ५८५.

**जुत :** द्यूत, जुव्वा. **पू.** १८, २८.

**जुंबड :** झुडुपांचा समुदाय. **पू.** २६.

**जुहारु :** जोहार, नमस्कार. **पू.** १००, ३४७.

**जेउता :** ज्या बाजूला, जिकडे. **पू.** ३१, **जेउती–पू.** ७७; **जेउतेंजेउतें**–जिकडे-तिकडे, सर्वत्र. **पू.** ३९१.

**जैत :** विजय. **पू.** ७१; **अ.** २.

**जोइसी :** ज्योतिषी. **पू.** ३५.

**जोग :** जोग्याचा वेश; **पू.** २०६; **उ.** १६९, २७०.

**जोगबटा :** जोगी आपल्या कमरेभोवती गुंडाळतात तो पट्टा, दोर. **पू.** ३०, १९८; उ. १६९.

**जोगमार्ग :** जोग्यांचा मार्ग, नाथपंथ. **पू.** २०५.

**जोगरुवें :** अधम, नीच योगी. **अ.** ३९.

**जोगी :** जोगी, नाथपंथी महात्मा. **पू.** १९८, २०१, २०५, २०६, २२४; **उ.** २७०, ५०७, ५१०, ५२१, ५८१, ५८५, ६२९, ६४०.

**जोगी :** योग्य. **पू.** ६८. **जोगें–पू.** ७४.

**जोगीणि :** जोगिनी, स्त्री-जोगी, जोग्याची बायको; **उ.** ५१०.

**जोगीदंड :** जोगी साधू हातात **धरतात** ती काठी. **उ.** १५१.

**जोडणे :** मिळणे, प्राप्त होणे. **पू.** १०१; **उ.** २४५. **जोडुनि**–जोडू, मिळवू. (प्रपु.अव.) **उ.** २४५.

**जोती :** दिव्याच्या वातीचा जाळ. **पू.** ५८५.

**जोतीक :** ज्योतिष, ग्रहतारकादिकांच्या गतीचे शास्त्र; **पू.** ५५२.

**जोन्हळे :** जोंधळे, ज्वारी. **पू.** ४३७; **उ.** ३९, २५१, २६५. इ.

**जोहळे :** ज्वारी, जोंधळे. **उ.** २६५.

**जोहारु :** नमस्कार. **उ.** ७२.

**ज्वरित :** ताप आलेला. **उ.** १२८.

**ज्वारी :** जुआरी, जुवा खेळणारा. **पू.** ९२.

## झ

**झडवारा :** पावसाची संतत धार व वारा. **पू.** ४९०.

**झणें :** (नकारसूचक शब्द) **पू.** ४८१. **झणें घेया**–घेऊ नका. **पू.** ४८१.

**झळंबणे :** स्पर्श करणे; पडणे; °**बली–पू.** २६.

**झांजण :** वेषधारी, आंगावरून आच्छादन घेतलेला. **पू.** २३७. (पाहा. सव २९९).

**झांजरणे :** खरचटणे. **उ.** ४८०.

**झाडकवि :** वंचक, खोटे. **उ.** १६८.

**झाडणे :** काढून टाकणे, झटकणे, त्याग करणे. **पू.** २४०; **उ.** १३३, ४७०; °**डिजे–पू.** १६६.

**झाडणेपुसणे :** आंगावरून हात फिरवणे, गोंजारणे. **उ.** ४२०.

**झाडनी :** अंगातील भूत बाहेर काढण्याचा उपाय. °**नीया–पू.** ३५.

**झीन्न :** अस्पष्ट, किंचित. **उ.** ६११.

**झील :** झिरमिरित, भोके पडलेले. **पू.** ८६.

**झुंजरूकें :** झुंजरके, संधिप्रकाश, संध्याकाळ. **पू.** ७४.

**झुंझुरकें :** अरुणोदयाच्या वेळचा संधिप्रकाश. **पू.** २६, ८१.

**झोंबणे :** भिडणे. **झोंबिनले–पू.** १७१.

## ट

**टकणे :** ठाकणे, राहाणे. **उ.** ५५५.

**टका :** एक नाणे. **पू.** ३१.

**टगटगणे :** रडणे, आक्रंदन करणे. **उ.** १४६. ४४३.

**टणकारणे :** 'दांडी' वाद्याच्या तारा छेडणे. उ. १५८.

**टरल :** टरफल, फोतर. **उ.** ३५.

**टाकणे :** जवळ जाऊन पोचणे, प्राप्त करणे, मिळवणे. **पू.** ४२, ४२१, ४४४ ; **उ.** ७६, ४५७.

**टाकळी :** एक औषधी वनस्पती ; **उ.** १८०.

**टांका चेपणे :** टाकोटाक मागे येणे. **उ.** ११.

**रुजा :** **पू.** १०९, २१९; **उ.** ६००; **रुजाग्रस्त**– रोगाने पीडित. **पू.** १०९.

**रुठणे :** रागावणे, रुसणे. **उ.** २२५, ३७९.

**रुंड :** डोके. **पू.** १८८.

**रुण :** कर्ज. **पू.** ४४९.

**रुंभणें :** नांगर, वखर, डवरा यावर दाबून धरण्याची अर्धवर्तुळाकार मुठीची लांब काठी. **पू.** ३७३; **रुम्हणें–पू.** ३७४.

**रुवा :** रुका, रुपयां, चांदीचे नाणे. **उ.** २०१, ४९५, ५८६. **रुवे**–(अव)–**पू.** १७२.

**रूंख :** वृक्ष. **पू.** ५९, ५८४.

**रूप करणे :** वर्णन करणे, पारख करणे. **पू.** २८, ३०, २९१, ३२०; **उ.** २८१, २८३.

**रूळणे :** पडणे. **पू.** १७४.

**रेइणे :** रचणे. **उ.** ३१३.

**रेख :** रेषा, रेघ. **पू.** ४६.

**रेचक :** नासिकाद्वारे बाहेरचा वायू आत घेऊन मस्तकरूपी कुंभात साठवल्यावर तो कोंडलेला (कुंभक) वायू हळूहळू नासिकाद्वारे बाहेर सोडणे. **पू.** १९५.

**रेंदाचेंदा :** चिवडून झालेला गोळा. **उ.** ७, १३७; **अ.** १७.

**रोकडे :** नगदी. पू. १७२.

**रोख :** रोष, राग. पू. ५८, ९८, ५४३; **रोखु– पू.** ६२; **रोखू – पू.** १९७.

**रोट :** मोठा जाड रोडगा. **उ.** ३३९.

**रोटी :** भाकर. **पू.** १६६. **रोटीया–पू.** १८५.

**रोवंतणे :** रवंथ करणे. **रोवंतीति–पू.** ६०.

**रोस :** रोष, राग. **उ.** ४२९.

**रोहंक :** रोष, रोख. **पू.** ३१.

**रोहंकणे :** रागावून पाहणे, रोखून पाहणे. **पू.** ३१, ६२; **उ.** ५४३.

**रोहंतणे :** रवंथ करणे. **रोहंतीति–पू.** ६०.

**ऱ्हाणे :** राहणे. **ऱ्हाएं – पू.** २४६; **ऱ्हाति – पू.** ११८, २१७; **उ.** ३८२.

## ल

**लकरणे :** रगडणे. **लकरितासि–उ.** २२५.

**लगीन :** लग्न, विवाह. **पू.** ६८.

**लग्नघडी :** अंतिम घटिका, शेवटचा क्षण. **उ.** ३२३, ६३७.

**लघुत्व :** वजनाने हलकेपणा. **उ.** ३६०, ३७४.

**लघुनीति :** लघ्वी. **पू.** ३५६.

**लघु परिश्रय :** लघ्वी. 'परश्रेय'–पाहा.

**लघुपरिहार :** लघ्वी. **उ.** ७१, २१९, २४४, ३४३.

**लटकें :** लबाड. **उ.** १५७.

**लटणे :** चुकवले जाणे. **पू.** ५८७.

**लटिका :** खोटा, असत्य. **उ.** ५०२.

**लंड :** लबाड, उद्धट. **पू.** ५८७.

**लबुधत्व :** लुब्धत्व, आसक्ती. **उ.** ३८१.

**लल्हाट :** ललाट, कपाळ. **पू.** २७. २८.

**लवडसवड :** घाई. **पू.** ९५, २४७; **लवडसवडी–घाईने. उ.** ४५७.

**लवण :** ओढ्याची खोल जागा. **पू.** १००; **उ.** १७४.

**लवलवा :** घाईघाईने, लौकरलौकर. **पू.** १७४. **लवलवुनि–**घाईघाईने. **पू.** १५४; १५७, १५९; **लवलवौनि–पू.** ६५. **लवलौनि–** लवलवौनि, लौकर, घाईघाईने. **उ.** ४१९.

**लळा :** प्रेमाचा हट्ट. **उ.** ५५०.

**लांक :** एक धान्य. **पू.** ५३९.

**लागणे :** ऋण असणे. **उ.** १५५, २७५, ६०९.

**लागलेपण :** आसक्ति, ओढ. **उ.** ४७०.

**लागिजणे :** ऋण. **उ.** १५६.

**लांघणे :** अधिक घट्ट होणे, पाकाची मर्यादा ओलांडली जाणे. **पू.** ४०७.

**लाघव :** माया, भ्रांती, कपट. **पू.** ५६२.

**लाघवी :** माया, भ्रांती किंवा चमत्कार करणारा, कुशल मांत्रिक. **पू.** ५१८; **उ.** ५०२.

**लाठ :** पराक्रम, शौर्य. **पू.** २१०.

**लाठी :** तेल्याच्या घाण्यातील दाणे रगडण्याचा लाकडी दांडा. **पू.** ३५३.

**लाड :** लाड शाखेतील माणूस. **उ.** १५०, ५००.

**लाडवणे :** लाड करणे, खेळवणे. पू. २०२.

**लांबडा :** कोल्हा. **उ.** १९ (टी.).

**लाभाख्य :** ईश्वराचे फळ, ब्रह्मप्राप्ती. **अ.** १५१.

**लांव :** राक्षसी. **उ.** ९.

**लावणें :** आडोसा. **उ.** ५५०, ५५१.

**लांसि :** लाहासी, वाघीण. **पू.** ६२.

**लाहणे :** मिळणे. **पू.** ४००; **लाहाणे– उ.** ५८१, **लाहा– पू.** २३३; **लाहीजताए** – मिळते, प्राप्त केले जाते. उ. ५११; **लाहुनि** – लाहू (प्रपु.अव.) करू शकू. **उ.** ४०२.

**लाहानीसीवनी :** लपाछपी. **पू.** २११.

**लाहास :** घोडपागेचे तंबू. **पू.** ३१, ७४.

**लाहेलाहे :** लौकरलौकर. **पू.** १७४.

**लाहो :** घाई. **पू.** १६, २४५.

**ली :** लिपी, रेषा. **ली पुसणे–पू.** १२७.

**लीखित :** लिहिलेले, पत्र. **पू.** ७४.

**लींगपात :** जीवाने आपल्या स्वरूपावर धारण केलेले सर्व देवतांचे मळ गळून पडणे. **उ.** ४८४.

**लींगभेद :** उपास्य दैवताचा नाश. **पू.** २६, ३४८.

**लीतणे :** लिंपणे. **पू.** २०४; **लीतला–उ.** ५८५.

**लीसिपुसि :** वारंवार अंग धुणे-पुसणे, नट्टा-पट्टा करणे. **उ.** ३७६.

**लीळा :** सचेतन जीवाबरोबर केलेली क्रीडा. **उ.** ६२.

**लीळा :** (१) कौतुक. **पू.** १६६; **उ.** १००; (२) चमत्कार. **पू.** १०५; (३) स्वेच्छा-विहार. **पू.** २०१.

**लीळादान :** जीवाने जोडलेले नसले तरी परमेश्वराकडून आपणहून दिले जाणारे दान. **उ.** ५६५.

**लीळाविग्रह :** देवतेने स्वेच्छेने धारण केलेला अवतार. **अ.** १२०.

**लीळाविग्रहधारित्व :** लीलेने दुसरे शरीर–दुसरा अवतार धारण करण्याचा धर्म. **उ.** ६०१.

**लव :** एक प्रकारचे बारीक किडे. **पू.** २०२.

वस्त्र **पू.** ३१; **लुगडीं**–(अव.)

**लुडि :** एखादे फळ किंवा गोळा एकेकाकडे फेकल्यावर इतरांनी तो हिसकावून घेण्याची क्रीडा. **पू.** ५८७.

**लुलाते :** आशाळभूत. **उ.** ९९.

**लेइला :** वस्त्रालंकार घातलेला. **उ.** ४३८.

**लेकरू :** मूल. °**रूवें**–(अव.). **पू.** ४१, ४९, २१७.

**लेख :** मोल, किंमत. **पू.** ३६६; **उ.** २६८.

**लेखी लागणे :** हिशेबात धरली जाणे, मोजली जाणे, सफल होणे. उ. १२७.

**लेंडी :** नाला. **उ.** ३१५.

**लेणे :** डोंगरात कोरलेले मंदिर. **पू.** १७९, १८८, १८९, २१२.

**लेणे :** घालणे, नेसणे. **पू.** १७९, २१२, २६०; **उ.** १४४, ४५९; **लेइला–पू.** १८६.

**लेहणे :** लिहिणे, रेखाटणे. **पू.** ४४३.

**लोकांत :** लोकसमुदाय. **उ.** १.

**लोखंड :** (१) लोखंडी अवजार. **पू.** ४७७; (२) शस्त्र. **उ.** ५३४.

**लोण करणे :** आहटून लोण्याप्रमाणे एकरूप व मऊ करणे, लोणणे. **उ.** १०५.

**लोन :** गाठोडी. **उ.** ४९५.

**लोंव :** केसांचा झुबका. **पू.** २३.

**लोहिव :** लाल रंगाची. **पू.** १४५, ४५४.

**लोही :** लोखंडी भांडे, पेटी. **पू.** १७२.

**लोहे :** कढई, लाल (?). **उ.** ३३८.

**लोहो :** लोखंडी अवजार. उ. १.

**लोहोलोहंकरु :** लोखंडाची अवजारे. **उ.** १.

**लोहोवी :** लाल रंगाची. **उ.** १६१.

**लौकिक :** यक्षिणीपासून तो क्षीराब्धीच्या शेष-शय्यापर्यंतच्या सर्व देवतांची फळे. **अ.** १५१.

**ल्हाणे :** लाहाणे, मिळणे; **ल्हाइजे**–मिळवावे, मिळवता येते. **उ.** ५११; **ल्हाए**–लाहे. **उ.** ५५०; **एवों न ल्हाएं**–येता येत नाही; येण्याला मिळत नाही. **उ.** ३३९. **ल्हा–पू.** २३३.

## व

**वएस्तंबिनी :** वयस्तंभिनी, वय रोखून धरणारी (विद्या). **पू.** २५.

**वखर :** आउत. **पू.** ३२०.

**वगतु(तृ)त्व :** वक्तृत्व. **पू.** २१०; **उ.** ३७२.

**वचणे :** जाणे. **पू.** १०६; **उ.** २, ३६; **वचे–पू.** ३५, १११, २३२; **उ.** ६१, ६५, ७२, ५६६, ५८०. **वचावे–पू.** १९८, २०४; **उ.** १२७, १३६, २०४; **वचवे–पू.** २१७; **उ.** ६४५. **वचती–पू.** १०४, २५७ ; **वचा–पू.** २४७; **उ.** ५८५, ६१२, ३६२; **वचावी–उ.** ९७; **वच** (आज्ञार्थ)–**उ.** ५१२.

**वछ :** वत्स, वासरू. **पू.** १२.

**वजरी :** वज्री, अंगावरील मळ काढण्यासाठी घासून तयार केलेली विटकर. **उ.** २१७; **वजीरी–उ.** ६२३.

**वज्रओ(वो)ळी :** योगांतील एक सिद्धि. **पू.** १९८; **अ.** २८.

**वज्रकीटकी :** वज्राप्रमाणे कडक कीड. **पू.** ५८९; **उ.** ४८२.

**वज्रपंजर :** पोलादी पिंजरा. **उ.** ३४८.

**वटरोप :** वडाच्या झाडाचे रोप. **उ.** ५८५.

**वडपींपळ लावीजति ना :** वड आणि पिंपळ ही भिन्न जातीची झाडे कधी एकरूप होणार नाहीत, त्याप्रमाणे. **उ.** ४७०.

**वडील :** मोठी, थोर, फार. **पू.** ३८६; **उ.** ७०.

**वडुवा :** घास ; **वडुवे**–घास घेण्यासाठी. **उ.** ४९५.

**वणिजारा :** वंजारी, फिरता व्यापारी. **उ.** ३३१.

**वदोवटो :** वटवट (ईश्वराच्या अप्राप्तीविषयी दु:खपूर्वक) बडबड. **उ.** ५९९.

**वन :** व्रण, घाव. **उ.** १५८.

**वने :** फुलपत्री. **पू.** ५२३.

**वर(रि)पडा :** आधीन. **उ.** ११, २१३; °**पडी-उ.** १७१, ४०६, ५८८; °**डौनि–उ.** ७८.

**वरंभा :** जमिनीत नांगर खोल जाऊन ढेकळे फुटणे. **उ.** ३७४.

**वरि :** (१) पर्यंत–**पू.** ३६३ ; 'वेऱ्ही'– पाहा. (२) वेऱ्ही (तृ.); **शेणवरि**– शेणाने. **पू.** ३३१.

**वरि(री)ख :** वर्ष. **पू.** १५, ४३, ४७, २०२; **उ.** १, १५०, २११, ५०२, ५०५; **वरीखां**– (तृ) वर्षांनी. **पू.** २२, २३; **उ.** ६१७.

**वरि(री)खणे :** वर्षणे, वर्षाव करणे, शिंपडणे. **उ.** ४४१; **अ.** १ (टी.).

**वरिचील :** वरच्या बाजूची. **पू.** १७९.

**वरिपडतें :** वर पडणारे, कोसळणारे. **उ.** ३१०.

**वरियाणें :** उत्तरीय वस्त्र, ओढणी. **अश्री.** ७; **अ.** ७०.

**वरै :** वर. **पू.** ५४८.

**वरैत :** पती, नवरा, स्वामी, **पू.** ५६, ११५, २१७, ३१६, ३९९ इ.; **उ.** १०९, ४२९, ५०२, ५६६, ५९९.

**वरो :** अन्नधान्य, अन्नसामग्री. **पू.** ४८७; ५०७, **उ.** ३२, ३३, ५०५.

**वरौती :** वरती, वरच्या बाजूला. **पू.** १०७, १२४; **उ.** ७८.

**वर्जणे :** त्याग करणे. **पू.** ३८३.

**वर्ण :** वरण : **पू.** ६७ ; **उ** ५३१ ; °**भानु– पू.** ८९.

**वर्त :** व्रत. **पू.** ७७; **उ.** २६४.

**वर्त :** (१) दोरी, दोरखंड, **पू.** २०४. (२) दोरीवरून चालण्याची कला. **पू.** २०४.

**वर्मस्पर्श :** मर्मस्थळावर बोट ठेवणे. इतरांच्या दोषाचा तुच्छतेने उल्लेख करणे. **पू.** ४५२.

**वऱ्हाड :** लग्नाची तयारी, वरात; लग्नाचा खर्चवेच. **पू.** ३२; **उ.** ४२९.

**वऱ्हाड :** वऱ्हाडी, लग्नप्रसंगी पाहुण्यांना दिलेले भोजन. **पू.** ६७–६९ ; **वऱ्हाडी**– लग्नातील पाहुणे. **पू.** ६९, **वऱ्हाडीक**– लग्नात वऱ्हाडी म्हणून जाणे. **पू.** ६८.

**वऱ्ही :** वेऱ्ही, पर्यंत. **पू.** २६३, ५८६.

**वल्हे :** कपाशी. **पू.** ४१६;

**वल्है :** कुंपण. **उ.** १५, २४४.

**वंशकरू :** वासरी वाजविणारा. **पू.** १२१.

**वसति :** रात्रभर झालेला मुक्काम. **उ.** ५३८; **वस्ति–पू.** ४२, ४७; **उ.** ६२, ५५६, ५६४.

**वसुवार :** घर, वस्तीची जागा. **उ.** ३७०.

**वसै :** बसति, जैनमंदिर. **पू.** ३९०, ३९१, ३९९.

**वसो :** सांड, बैल. **पू.** १०, १८० ; **उ.** १७४, ३६२; **अ.** २.

**वस्तु :** (१) ईश्वरावतार. उ. ५६५, ५७६; °**संबंध–उ.** ५६५, ५७६; °**स्मरण–उ.** ५९७. (२) मूळ पदार्थ. उ. ६२४.

**वस्तुकार :** वाटसरू. उ. ११.

**वस्तें :** वसते, नांदते, लोकांनी गजबजलेले. उ. ५२.

**वस्त्रपूजा :** वस्त्र अर्पण करून केलेली पूजा. पू. ७७, १६७.

**वही :** कागदाची चोपडी; **वह्या (वहीया)–** उ. ७६.

**वहीली :** लौकर, तात्काळ. पू. ३९९; **वहीले–** पू. २४५; उ. ७९, ८१, १५५ इ.

**वळघणे :** वर चढणे, °**घलीएं–पू.** १०७; उ. १४, १२६; °**घलां–**(प्रपु. एव.) उ ५०२.

**वळघा :** गावघेरी, दरवडा. पू. ५७; उ. १२६.

**वळणी :** ओसरी, वळचण. पू. ३६.

**वळणी :** फुटका तांब्या, भांडे. उ. ४९५.

**वळिवट :** वळून तयार केलेले कणकीचे पदार्थ. पू. ३२९; उ. १६२, ३६६.

**वळीतपळीत :** सुरकुतलेपणा व केस पांढरे होणे. पू. २५, १९५.

**वाउल :** पाउल, पाय. उ. १.

**वाणे :** अर्पण करणे; **वाए–**वाहातो; पू. ७५; **वाइला–पू.** २६९; उ. १५; **वाइली–** पू. २०६, ४०१, ४४९; उ. ३०७; **वाइलीया–**अर्पण केल्या. पू. ७४, १५४, ३९६; **वाइले–पू.** ३२, ४८, ६८; उ. ५००. **वाइजे–उ.** १७; **वाइजताए–उ.** ३९५; **वाइल–पू.** ७७; **वाउनि–पू.** ६०, २०२, ५०१.

**वाणे :** वाजवणे. **वाए :** वाजवतो. उ. २११.

**वस्तीचेयां–**असाल तसे. उ. ६२, ५५६, ५६४.

**वाक :** तागाची दोरी. उ. ५२१.

**वांकट :** व्यंकट, वाकडी. पू. २०.

**वांकद्वार :** पहाऱ्याचा दरवाजा, देवडी-जवळील दार. पू. २०.

**वाकम :** उंट (भावार्थाने). उ. ५०१.

**वांकले :** उपटून रचलेल्या हरबऱ्याच्या झाडांचा ढीग, कडपा. उ. १५ (टी).

**वाखती :** शिदोरीची पिशवी, वाखारी. उ. ९२.

**वाखाणणे :** व्याख्यान करून सांगणे. उ. १३८, ५८६; **वाखाणिजैल; वाखाणी–उ.** ५९७.

**वाखारी :** (१) पिशवी, थैली. पू. ६१, २२३, ४१६; उ. २३७, ५५२. (२) पेव, पेवातील धान्य. उ. ५३७, ५९२; अ. १ (टी).

**वाखोरा :** पिशवीत केलेला विभाग, खण. अ. ९.

**वागजाळ :** शब्दांनी निर्माण केलेला भ्रम, शब्दच्छल. पू. ११८.

**वगतृत्व :** वक्तृत्व, म्हणणे. अ. २०, २१, २२.

**वांगनेमु :** वाङनियम, वाचेवर नियंत्रण, मौन. पू. २.

**वागारा :** लगाम, बंधन, उ. १५, ५९२.

**वागुर :** पाश, फासा. अ. ४५.

**वाघवळ :** गळफास. उ. ६१७.

**वाघांबरपहीरण :** वाघाचे कातडे कमरेभोवती नेसलेला. पू. ५३८.

**वाघारणे :** तुपाची फोडणी देणे. पू. ५८१.

**वाचणे :** अभ्यास करणे, पठण करणे. पू. ७२; उ. १२८, १३३; **वाचिजत–पू.** ५७४. **वाचीजताए–उ.** ४६४.

**वाचीक :** वाचेने उच्चारलेले. उ. ५९८.

**वाजल वारा :** वावटळ, वावटळीप्रमाणे कोसळलेले संकट. उ. ६०, १८२.

**वाट उठणे :** दरोडा पडणे. उ. ४५४.

**वाटक :** वांकट, वाकडी. पू. ७८.

**वाट घेणे :** वाटेत जाणाऱ्यांना लुटणे. उ. १७४, ५१३.

**वाटवनी :** मूत्र. पू. ३५६.

**वाटां :** मोठ्या वाटीत, वाडग्यात. पू. ८४, ८५.

**वाटें :** लहान वाटी. पू. २०३; उ. ९०, १५१.

**वाटेसेया :** वाटेत मिळणारे. पू. १४५.

**वाठान (नी) :** गावठाण. उ. ३६२.

**वाठुजगें :** मोठे पोते. उ.

**वाड :** वाघाची शिकार. पू. २१०.

**वाडवेळ :** वृद्धवेला, उशीर. उ. १२७, ४००. **वाडुवेळ–उ.** १०२, १६८, २१७, २३५.

**वाढतें :** वाढदिवस – **अश्री.** ६.

**वाढीनला :** सरकला, धावला. **पू.** ५४; °**नली–**मोठी झाली. **पू.** ९४.

**वाढै :** सुतार. **पू.** ५७.

**वाण(न) :** (१) वायन, व्रताप्रीत्यर्थ ब्राह्मणांना किंवा स्त्रियांना खण, तूप, साखर वगैरे पदार्थ देतात ते. **पू.** ९५; उ. १६५, ३३९, ३५१, ५२४; **वानें–**(अव) उ. १६५; (२) उष्टावन–**अश्री.** ६९.

**वाण विस्तारणे :** वाण म्हणून अर्पण करण्याचे पदार्थ ताटात ठेवणे. उ. १६५.

**वाणि :** आंब्याचा एक प्रकार, दुर्मिळ. **पू.** २३४.

**वाणे :** वाहून नेणे, वाहणे. **पू.** ४७७; उ. ७७, ८३; **वात**–वाहात. उ. ८३; **वाति–उ.** २०, **वाउनि–पू.** ४०; उ. ७७.

**वाणे :** अर्पण करणे. **पू.** ३०४; **वाये–**अर्पण करी. उ. ३१८; **वाइले–उ.** ३१८; **वावेया**–वाहाण्यासाठी. **पू.** ३८१; **वावीया–पू.** ५५४; **वाल–वाइला. पू.** ३८१; **उ.** ११; **वाति–पू.** ११७.

**वाणे :** वाजविणे, **उ.** १०; **वाइली–पू.** १४; **वाति–पू.** ४१, ४०५; **उ.** १; **वात–**वाजवीत. **पू.** १७६, १९४, ४१८; **वाते–**वाजवणारे. **पू.** २०४.

**वाद्यांत्र :** वाजंत्र, वाद्य. **पू.** ३३.

**वाध :** वादी, बांधण्यासाठी वापरतात ती दोरी. **उ.** ४९५.

**वाधावणी :** वाजंत्र्यांचा आवाज. **अ.** १०३.

**वाधावणे :** घंटी वाजवणे. **पू.** ४५.

**वानणे :** स्तुति करणे. **वानिजे–उ.** ६१.

**वानरी :** (१) एक वनस्पती वेल; वानीर वेल. उ. १६; (२) कलश, घागर. **उ.** ३३४.

**वानीएर :** एक प्रकारचे झाड. **पू.** ४७७.

**वान्हीयारा :** वाणी, व्यापारी. **उ.** ४७.

**वाप :** वाफा, पेरलेल्या रोपांचा भाग. **पू.** २८१.

**वाप धाणे :** पेरणी संपल्यावर औताची पूजा करून सर्वांना जेवण घालणे. **पू.** २१७.

**वाया :** उगीच. **पू.** १०७.

**वार :** ब्राह्मण जेवायला घालण्याचा ठराविक दिवस. **पू.** ४६.

**वारणे :** (१) निवारण करणे. **वारीतवारीत–**वारंवार नाही म्हटले तरीही. **पू.** १०३; **वारिले–पू.** १०३; **वारिसी–पू.** ११८; **वारी–उ.** ४२०; **वारिली–पू.** १६६; (२) वर्ज्य करणे. **उ.** ४९३.

**वारभोग :** वर्ज्य दिवस. **उ.** ५३०.

**वाराणी :** वारा येण्यासाठी असलेली खिडकी उ. १२३.

**वारिक :** न्हावी. **उ.** ३३६, ३८६.

**वारिके :** बारीक, लहान. **पू.** ४२१.

**वारितुरंग :** वज्री, अंग घासण्यासाठी उपयोगात आणलेली विटकर पाण्यावर तरंगते म्हणून तिला वारितुरंग हे पर्याय नाव आहे. **उ.** ६२३.

**वारीया :** वारचे, ऐवजी, जागी. **पू.** ६५, १११, ३८१, ३८६; **उ.** १५.

**वारु :** घोडा. **वारुवांची–**घोड्यांची. **उ.** १६३.

**वाल :** गुंज. **पू.** ४५४.

**वालिप :** पारदर्शक पातळ रेशमी वस्त्र. **उ.** ४३४.

**वाव :** दोन्ही हात पसरल्यावर होणारे अंतर. **उ.** २२६.

**वावणें :** प्रकाशासाठी घराच्या धाब्याला ठेवलेले वर्तुळाकार मोठे भोक. **उ.** १३०, ५२१.

**वावधन :** वावटळ. **उ.** १४.

**वावर :** शेत. **पू.** ४११.

**वावी :** विहीर. **पू.** १७५, ३४४.

**वाव्य :** वायव्य दिशा. **पू.** ३८, ९९, १०४, २५०, ५८८ इ.; **उ.** ६२३.

**वास :** दृष्टी, नजर. **पू.** ५९०; **वास पाहणे–**दिशेकडे पाहाणे. **पू.** १७, २८, ४२, ४८, ६१, ६५, ७१; **उ.** ३७३.

**वासना :** इच्छा, अभिलाषा, बुद्धि. **पू.** ३१५; **उ.** ६८, ११३, ५६४, ५८६.

**वाहांटुळी :** वावटळ. **उ.** ५७४; **वाहुंटुळि–पू.** ६६.

**वाहाणवाउल :** वाहाणा घातलेले पाय. उ. ५९५.

**वाहाणा :** उपानह, चपला. पू. २३८.

**वाहाणा बांधणे :** वाहाणा शिवून घेणे. पू. १०१.

**वाहाणी :** बाजू-मार्ग. उ. १७.

**वाहाणे :** राहाणे, काम करणे. उ. १६६.

**वाहाणे :** शेतीची मशागत करणे. पू. ४७२.

**वाहावळ :** शेती वाहाणारा, शेतकरी. उ. ३७४.

**वाहाळ :** ओढा, ओहोळ. पू. ४२, ४२२; उ. २६१, २७६, ५५८.

**वाहीं :** मुळें. पू. ३९२.

**वाहीरि :** वाचून, शिवाय. उ. ११.

**वाळहुंट :** वाळुवंट. उ. २३२; **वाळुवंट–** उ. ४८१; **वाळुवंठ–**उ. ४८२; **वाळहवंट–** उ. ५९५.

**विकल्प :** संशय, विपरीत कल्पना. उ. १, ३, ११, १३६, ५०९, ५८१; °**रूप.** उ. ३; °**त्रुटी**–उ. २०३.

**विकारसृष्टि :** कर्मभूमी, अष्टौदेवयोंनी, अंतराळ व स्वर्ग या थोव्यातील स्त्री देवता. उ. ३७३.

**विखएक्रमी :** विषयात रमणारा किडा. उ. ३६७.

**विखयप्रेम :** ईश्वर आपणाला पती म्हणून प्राप्त व्हावा अशा आर्ततेची भक्ती. उ. १०८.

**विखएवासना :** कामोपभोगाची इच्छा. पू. ६६०.

**विखयवीर :** विषयांना जिंकणारा. पू. १९३.

**विखया :** विषयोपभोग घेणारा. उ. ४३६.

**विखो :** (१) पात्र, विषय. पू. २४७, २५७, ३५९, ४२१; (२) स्त्रीभोग, उपभोग्य पदार्थ. उ. १, ३९, १११, ११३, ११४, १३७, ३८९, ५२७, ५८५, ६१८; (३) स्वर्ग, अंतराळ, अष्टौदेवयोनी व कर्मभूमी या स्थानातील देवता व त्यांचे मळ. उ. ३१३; अ. १४८.

**विग्रह :** देवतेचा अवतार. अ. १२७; उ. ६०१.

**विचार :** श्रीचक्रधरस्वामींचे तत्त्वज्ञान. उ.

**वि(वी)चारणे :** विचार करणे. उ. १; **वीचारीले**–विचार केला. पू. १२७, २३९, ५६४, ५८९. **वीचारा**–विचार करा. उ. ३२३; **वीचारू**–उ. ६१, १५७, ४२९, ५६४.

**विजयमान :** विज्यमान, ज्याच्यावर चौऱ्या ढाळल्या जात आहेत असा. उ. ५९.

**विडा मागणे :** एखादे काम करण्याची पैज लावणे, पैजेचा विडा उचलणे. उ. १७३.

**विणे :** जनणे. उ. ४९६; **वीयाला**–व्याला. पू. ७०.

**वितर्कणे :** कल्पना करता येणे, शंकाकुशंका काढणे. पू. ३५९; उ. ४१२, ४१३.

**विदित :** ज्ञात, माहीत. उ. ४८०; **वीदीत**– पू. १३३, १६६.

**विदेह :** (१) माया, मायेने लावलेला 'आदिमळ'. उ. ३१३; (२) विदेही, उन्मनस्क. उ. ३५१.

**विद्यामार्ग :** देवतांच्या विद्या व त्यांच्या प्राप्तीचे मार्ग. उ. ४८०, ५०५, ६१८.

**विद्यावंत :** ज्याला देवतेची विद्या प्राप्त झाली आहे असा सिद्ध पुरुष. पू. २००, २०१; उ. १५९, ४००, ४७२, ५८१.

**विधि(धी) :** आज्ञा, धर्मानुष्ठान. पू. २२३; उ. ८९, ६१५.

**विधिंकिंकर :** आचारधर्मात घालून दिलेल्या विधींचीच सेवा करणारा, कर्मजड. उ. ५८५

**विनतकंदर :** मान नम्र केलेला. पू. ३१, ६५, ५०९; उ. ३००, ३७९.

**विनोग :** विनियोग, उपयोग. पू. २३३.

**विमुख :** विरुद्ध बाजूंनी तोंड असलेले. उ. ५३५.

**विरू :** वैर. उ. २७७.

**विरोदी :** स्त्रियांच्या पायाच्या बोटातील अलंकार. उ. ३३०.

**विलक्षण :** वेगळ्या लक्षणाचा, वेगळी चिन्हे असलेला. उ. २०७.

**विवर्ण :** मळकी, तेजहीन. अश्वी. ७.

**विश्वप्रपंच :** विश्वदेवतेने निर्माण केलेला प्रपंच. अ. ८०.

**ाषयत्व :** भोग्यवस्तूच्या ठिकाणी आसक्ती. उ. २०६.

**ाषयनष्ट :** ज्याने विषयसेवा नष्ट केली असा; ज्याच्याकडे विषय ढुंकूनही पाहात नाही असा. उ. ११४.

**ाषयबहळ :** विषयबहुल, उपभोग्य पदार्थांनी संपन्न. उ. ५९५.

**ाषयव्यवस्था :** शंका, संशय, इत्यादिकांचे ऊहापोहपूर्वक–विचारपूर्वक निरसन करणे, व्यवस्थित अर्थ लावणे. उ. ४३५.

**ाषया :** कामातुर. उ. ६०८.

**ाषयानंद :** उपभोगाचा आनंद. उ. १०८.

**ष्णुक्रांत :** एक औषधी वनस्पती; तिच्या जाड लाकडापासून तयार केलेला मणी. उ. ३१४.

**स्मो :** विस्मय, आश्चर्य. पू. ६, १३, ४१, ६०, ६७; उ. ७६, ९०, १३०.

**हरणौनि :** विहरणाहून. पू. २९.

**हिणे :** सांगणे, नेमून देणे. उ. १०, ११०, २२३, ३०२.

**ळ :** क्षण, वेळ; °**वेन्हीं**–क्षणभर. उ. ३९.

**'(वी)ळ :** सायंकाळ, रात्र. **विळचां**–सायंकाळी, रात्री. उ. ६१५; **विळिचां**–पू. ७०, १४५; °**वरी**–रात्रीपर्यंत. उ. ३०६. **विळिचीया**–उ. ७८.

**ळुविळु :** वेळोवेळी, अनेकदा. उ. ७.

**'(वी)ज्ञान :** विपरीत ज्ञान, भावी अभाव आणि अभावी भाव उत्पन्न करणारे ज्ञान. पू. २६१; उ. ६०६; °**शक्ति**–४४६, ६१७.

**ज्ञासनी :** विंध्यवासिनी देवी. उ. ५२१.

**करा :** विक्री. पू. १४४.

**कलपीया :** विकल्पिया, अन्य देवतांचा भक्त. पू. २०२.

**ख :** विष. पू. २०३; उ. १०.

**खप्रलयो :** विषप्रलय, विष देऊन मारणे. पू. ३५.

**खय :** विषय, उपभोग्य पदार्थ. पू. ३५९, ३६८; उ. ७८, ६२२.

**खया :** विषया, उपभोग घेणारा. पू. १९३; उ. ६०४; **वीखैया**–पू. २०२.

**वीखयेनष्ट :** उपभोग्य वस्तू किंवा व्यक्ती ज्यांना विटल्या आहेत, त्यांच्या दृष्टीने नष्ट पुरुष. पू. १९३.

**वीखयेवेवस्था :** 'विषयव्यवस्था'–पाहा. उ. ५६४, ५८८.

**वीखस्थंब :** विषस्तंभन, विषाचा परिणाम थांबविणे. पू. २०३.

**वीखो :** विषय, कामचेष्टा, उपभोग्य वस्तू. पू. ५५, १९३; उ. १८, ३४१, ४९५, ५६४, ५९५.

**वींगुळी :** इंगळी, विंचवाची एक जात. पू. ४७; उ. ५१.

**वीचंबणे :** (१) त्रास देणे, शिणवणे, °**वीजते**–शिणवीत. पू. ५५१; (२) दुःखी होणे, कष्ट भोगणे. उ. ९२.

**वीजन :** भिक्षुकांचे एकांतवासाचे स्थान. उ. ४१५.

**वीजन करणे :** निर्जन स्थानी काटेरी झाडाखाली स्मरण करीत काळ कंठणे. पू. ५६३.

**वींझ :** विंध्य पर्वत. पू. ४१; उ. ६४४.

**वींझू :** वांझ, वंध्य, रिकामा. पू. २१५.

**वीटका :** विडा, विड्याची पाने. उ. ३७५.

**वीडी :** विडा. **वीडीया**–(अव) पू. ६३, ९७, १२०, १९३, २०३, २३९ इ.

**वीडीया मोडीत जाणे :** विडा खात जाणे. पू. ४५४.

**वीणे :** प्रसूत होणे. **वीयाली**–पू. ६२. **वीयाला**–पू. ७०.

**वीत :** वित्त, द्रव्य. पू. ३२.

**वितिकर्मे :** व्यतिक्रमे, उलट क्रमाने. उ. १२९.

**वीतिपात :** व्यतिपात, ज्योतिषदृष्ट्या एक अशुभ योग. पू. ३५९.

**वीतोगी :** फोडणी. उ. ४५४.

**वीतुवीतु :** पिलांना जन्म देत देत. पू. ११०.

**वीदावंत :** विद्यावंत, स्तुतिपाठक, भाट. पू. २८; उ. ४०९.

**वीद्रावण :** विद्रावण, पळवून लावणे. पू. ३३, ९४.

**वीद्वांस :** विद्वान. पू. ५१, २६०.

**वींधणे :** छेद करणे, कोरणे, बाण मारून भेदणे पू. ४१; उ. १२६.

**वीधान :** विधान, आज्ञा, नियम. **पू.** २१५.

**विधि(धी) :** आज्ञा, आचरणाचे नियम. **पू.** २०४, २१९; **उ.** २५१.

**वीन(नी)योग :** विनियोग, उपयोग. **पू.** ३५, १६०, १६७.

**वीपलाणे :** वेडावणे, थट्टा करणे. **पू.** २३४.

**वीभचरणे :** व्यभिचार करणे. **उ.** ५०९.

**वीभुती :** राख, गोपीचंदन. **पू.** ४६९; **उ.** ४९७.

**वीरगंठी :** वीर पुरुष डोक्यावर बांधतात तशी केसांची गांठ. **पू.** २५.

**वीरगत :** विरक्त. **पू.** ३६८; **उ.** २३८, ३७९.

**वीरजा :** सहाय्यक, मदतनीस; °**वीरजे–उ.** १८, ३७९.

**वीर्य :** शुक्र, रेत. **पू.** ६३.

**वीलो :** विलय, खंड. **उ.** ४७०.

**वीवर :** विवर, भुयार. **पू.** १८७.

**वीवरसीधि :** विवरात पुष्कळ काळ राहाता येण्याची सिद्धी. **उ.** ५४२.

**वीवस्त्र :** नागवे. **उ.** ५२२, ५२३.

**वीवळणे :** (१) विव्हळणे, दुःखाने कण्हणे. **पू.** २४३, ५००; (२) पहाट फुटणे, उजाडणे. **पू.** ४७७; **उ.** २२४.

**वीव्हाव :** विवाह, लग्न. **पू.** ३२.

**वीश्वरूप :** विश्वाच्या आकाराएवढी विश्व देवता. **पू.** २४४.

**वीश्वासपंथ :** केवळ गुरूच्या वचनावर अंध विश्वास ठेवणारा धर्म. **पू.** ३६०.

**वीसदेओ(व) :** अग्नी, विस्तव. **पू.** ३६७, ४४०; **उ.** १४, १५, १६३, १६९, २७३, ३१३. ५२१.

**वीसंवणे :** (१) विसंबणे, विसर पडणे, दुर्लक्ष करणे; °**वली–पू.** ९१; (२) विश्रांती घेणे. **उ.** ३२.

**वीसाणे :** विरविरीत होणे. °**इल–पू.** ३०४.

**वीसारणे :** टाकून बोलणे. **पू.** ४१६.

**वीसारू :** आगाऊ द्रव्य; करार पक्का झाल्याचे द्योतक म्हणून आधी घेतलेला पैसा. **उ.** ६०२

...सळणे, धुणे. **पू.** ५३२.

...पीर, बडबड **पू.** २०८.

**वीसेखणे :** गुणवर्णन करणे; **वीसेखु–पू.** ६१.

**वीस्णुग्रह :** विष्णूचे घर–देवालय. **उ.** ४९३.

**वीस्मुर्ती :** विस्मृति. **उ.** ३२३.

**वीहरणुनि :** विहरणाहून. **पू.** ५३; **उ.** १८३; °**णौनि–पू.** ३०.

**वीहिणे :** आज्ञा देणे, सांगणे; **वीहीला–पू.** २०४, २१९; **उ.** १२७.

**वीहीरण :** विहरण, फिरायला जाणे. **पू.** १८६; **उ.** ५९५.

**वीहु :** व्यूह. **अश्री.** १०.

**वीळ :** सायंकाळ, रात्र. **पू.** २७, ३३, २०२, २०४; **उ.** १; **वीळि(ळ)चां**–रात्री. **पू.** ४४, ५४, ६०, ६२, ७९, ८० इ.; **उ.** ३, २३, १२९, १४७, १६५, २९९ इ. **वीळिचांचा–उ.** १, २३, १५, ३२, ३७२; **वीळिचांचा वेळ**–सायंकाळची–रात्रीची वेळ. **पू.** ३३, ११५, ११८, ३४३, ३४७ इ.; **उ.** ४६४; **वीळिचांचेया–पू.** ३९८; **उ.** १४४, २२८; **वीळिचांचीए–पू.** २८, ६०; **उ.** १२९, १७६; °**चेया–उ.** १३४, २२८; **पू.** १८४. **वीळुनि**–रात्रीतून. **पू.** ४६७.

**वीळुवरि :** सायंकाळपर्यंत. **पू.** २८; **वीळव्यन्ही–अ.** ६; °**वेन्ही–उ.** ५१२.

**वीक्षात :** विख्यात, प्रसिद्ध. **पू.** १२७.

**वृतांग :** वांगे. °**फाळी**–वांग्याची फोड. **उ.** ३२२.

**वृतांत :** वृत्तांत. **पू.** ४९, १०९.

**वृत्ति :** चरितार्थासाठी वंशपरंपरेने दिलेले शेत, जमीन, द्रव्य, इत्यादिकांचे वतन. **उ.** ११६, १३५, ६०३.

**वृधा :** एका नदीचे नाव. **उ.** ५३२.

**वृधाप्य :** म्हातारपण. **उ.** ४६४.

**वृषभ :** बैल. **उ.** १७४.

**वेओ :** विवाह. **पू.** ३००; **उ.** १५०.

**वेक्तिमंत :** व्यक्त, प्रकट. **उ.** ६२४.

**वेख :** वेष. **पू.** २, १३१, २०१, २३७; **उ.** ३५, ८०, ४९७.

**वेखंड :** एक औषधी वनस्पती. **पू.** ५४० °**ले**–वेखंडासारखे किटण चढलेले. **उ.** ४४.

**वें(वे)घणे :** चढणे; **वेंघलां–पू.** ३७२; **वेघौनि–पू.** ५७६; **उ.** १७२; °**वति–उ.** ७९; **वेघतां–पू.** ५७४; **वेंघति–उ.** ४५७.

**वेच :** (१) खर्चासाठी द्रव्य. **पू.** ५, १४५; (२) विकत घेतलेले सामान. **पू.** १४४, १६८, १७२, २३३ इ.; **उ.** १२८, १७९.

**वेचकरू :** बाजारहाट करणारा. **पू.** २०, ७४.

**वेचणे :** खर्च करणे, खर्च होणे. **पू.** १०४, ५८६; **उ.** ३६६; **वेचावेया–पू.** १७२; **वेचिजतु–पू.** ३०५; **वेचलेला**–आसक्त. **उ.** ६१५; **वेचुनि–**(प्रपु. अव.) खर्च करू. **पू.** ३२.

**वेचपलेण :** आसक्ति. **उ.** ५३३.

**वेंज :** वेंझ, छिद्र. **पू.** १०७.

**वेठ :** मजुरी न देता सक्तीने करवून घेतलेले काम. **पू.** ५९.

**वेठणे :** नटणे, थाट करणे. **पू.** ४७८.

**वेंठी :** माळ. **उ.** ४२२.

**वेढा :** फेरी. **पू.** ३८; **वेढे**–(अव) **पू.** १६५; **उ.** १६२, १६३.

**वेढाळणे :** वेटाळणे, भोवती गोलाकार बसणे. °**ळुनि.** **उ.** १०२.

**वेढी :** तोटी असलेली तुपाची लोटी. **उ.** २०.

**वेताळे :** भुतांच्या उच्च वर्गातील पिशाच्च. **पू.** १३४.

**वेथा :** व्यथा, दुःख. **पू.** २४३, ३९९; **उ.** ८६, ४१०.

**वेदध्वनि :** वेदाध्ययन, वेदांचे नित्य पठण. **पू.** २०९.

**वेदमार्ग :** वेदाने सांगितलेला धर्म. **उ.** ५८.

**वेदिका :** यज्ञकुंडाच्या भोवतीची जागा. **पू.** ७५, ५४६.

**वेध :** (परमेश्वराची) आवड, आकर्षण. **पू.** २९, ४५, ६५, १०५, ११०; **उ.** ६०; **वेधशक्ति–पू.** १५४.

**वेधणे :** आकृष्ट होणे. **वेधसी–पू.** ६५; **वेधले–पू.** ६५. **वेधली–पू.** १२१.

**वेधाचार्ये :** वेधक व्यक्तीतील सर्वश्रेष्ठ. **पू.** ५१५.

**वेऱ्ही :** पर्यंत **उ.** ११, ४२, ४०७, ४६२, ४७०, ५०३, ५२०, ५६५; **वरि–**पर्यंत. **उ.** १२५, १३१, १५२, १५६, ४०५, ४८२, ४९३, ५६४.

**वेव :** सूत गुंडाळण्याची काडी. **पू.** ३८७.

**वेवसाइ :** व्यवसायी, व्यापार करणारा. **उ.** ६१८.

**वेवस्ता :** व्यवस्था. **पू.** ६५, ११६, १८८, २०४, २१९; **वेवस्था–पू.** ३६३; **उ.** २८, ५०७, ५५५, ५६४.

**वेवाद :** विवाद, भांडण. **उ.** ४९८.

**वेव्हार :** व्यवहार. **उ.** ६१, ६८, ४९९.

**वेव्हारा :** व्यापारी. **पू.** ३५; **उ.** १४४, २७१.

**वेवहारू :** व्यवहार. **पू.** ३३१.

**वेस :** गावाभोवतीचा कोट. **पू.** ८०, ८१.

**वेसजु :** अन्नधान्याची सामग्री. **पू.** १०१.

**वेसदार :** वेशीचा दरवाजा. **उ.** ३३.

**वेसन :** व्यसन, आत्यंतिक आवड. **पू.** १७, १८.

**वेस पडणे :** वेशीचे दरवाजे बंद होणे. **पू.** ८५.

**वेसरू :** वेसजु, मीठमिरची वगैरे. **पू.** १४४, ५११, ५८२.

**वेहंकळी :** एक लहान झाड, विकळी. **उ.** १८०.

**वेहरण :** विहरण. °**णीहुनि–पू.** २२२; **उ.** १६६.

**वेळण :** आधाणाचे पाणी. **उ.** १९९.

**वेळणी :** ताट, तळाला चाळणीसारखी छिद्रे असलेले भांडे. **पू.** ५८५; **उ.** १०९; **अ.** ७३.

**वेळणे :** शिजत घालणे. **उ.** १०१ **वेळिले–पू.** १०७, ३२९; **उ.** २४०, २८७.

**वेळ भांजणे :** वेळ घालविणे, कंठणे. **उ.** २४२.

**वैखरी :** जिभेच्या द्वारा प्रकट होणारी वाणी. **अ.** २५.

**वैजात्य :** वेगळेपणा, विरुद्ध धर्म. **उ.** १७३, ४४६.

**वैजात्य विखो :** विषम पदार्थांचा किंवा व्यक्तींचा भोग. **उ.** ३५६.

**वैष्णव :** भागवत, श्रीकृष्णभक्त. **पू.** ७५.

**वैश्यागमन :** वेश्येकडे जाणे. **उ.** ३९७.

**वैसा :** वयसा, वय. **पू.** १९५.

**वैस्य :** वश स्वाधीन. **पू.** १३४.

**वैहाळी :** विहरण. **अश्री.** २३; **वैह्याळी–पू.** २०२.

**वैही :** वही, चोपडी. **वैहे**–वहीए, वहीत; **वह्या–पू.** ११६.

**वोखटे :** वाईट. **पू.** १३३, २२१; °**करणे**–उपद्रवणे, ठार मारणे. **उ.** १२६, ५०७.

**वोखद :** औषध. पू. ३५; **उ.** ४००; **वोखदी–उ.** ५४६.

**वोजवणे :** पराभूत करणे, खाली पाठीवर पाडणे. **वोजावा–उ.** १७१.

**वोडणखांडे :** ढाल-तलवार. **उ.** ५३४.

**वोडवुरुड : अश्री.** ७; **वोडबुरुडन्याय**–बुरुड वगैरे कामकरी गावाला लागून किंवा गावात मोकळ्या मैदानावर कोठेतरी झोपतात त्याप्रमाणे. **उ.** ६०२.

**वोडवणे :** ताट किंचित कलते रहावे म्हणून ताटाखाली एका बाजूला खाली घालावयाचे टेकण, वडगण. **उ.** ४९४.

**वोडिएना :** योगातील एक बंध, आसन. **उ.** ३५३.

**वोढ कौपिन :** ओढून–कसून बांधलेली लंगोटी. **उ.** ५७.

**वोणवणे :** ओणवे होणे, खाली वाकणे. **उ.** ४९४.

**वोत :** ओढा. **पू.** ५६७.

**वोथंबा :** ओणवा. **उ.** ४००.

**वोदरणे :** खचणे. **पू.** ५८९.

**वोपडाणि :** घाण, कर्पट वास. **पू.** ३३३.

**वोपविणे :** गरम पाण्यात घालून तापविणे. **उ.** ३९.

**वोरपा :** दरोडा. **उ.** ५१३.

**वोरपेकार :** दरोडेखोर. **उ.** १३०.

**वोलणी :** चिकसा, अंगाला चोपडण्याचे सुगंधी उटणे. **पू.** २६.

**वोलि :** रेशमी वस्त्र. **उ.** १३७; °**साउलें**–रेशमी लुगडे. **पू.** २२३.

**वोल्हावण :** खाताना तोंडात रस निर्माण करणारे सकस खाद्य. **उ.** १.

**वोवजणे :** योग्य असेल–इष्ट–शक्य वाटेल तसे करणे. **वोजवे**–जमेल तसे. **उ.** ५७५.

**वोविळे :** ओवळे. **अ.** ९३.

**वोस :** ओसाड. **पू.** २३४; **उ.** ६२८.

**वोसान :** वखराच्या पासेला लागलेला केरकचरा, माती. **पू.** ३७.

**वोहट :** मागे फिरणे. **उ.** १२६.

**वोहटळ :** पन्हाळ, प्रवाह. **उ.** ५२८.

**वोहणिसे :** वहिनी आउसे. **अश्री.** २६.

**वोहर :** वधूवर, जोडपे. **उ.** १७४; **वौहर–पू.** ६९.

**वोहळणे :** पाण्यात बुचकळून धुणे. **पू.** ३८१.

**वोहारी :** वाहारी, सून. **उ.** ३३८.

**वोळग :** (१) सेवा. **पू.** १८; (२) सेवकांची सभा. **उ.** ४६०, ४६१, ४६४, ५३४.

**वोळगणे :** सेवा करणे. **पू.** २००; **उ.** ४८, ६५, ४७८.

**वोळगविणे :** अर्पण करणे. **पू.** २, ४८, ५१.

**वोळगिया :** सेवक. **उ.** १६६.

**वोळघणे :** वेंघणे, चढून वर जाणे. **पू.** ४७८.

**वोळत :** सरळ, थेट. **उ.** ५६४.

**वौजणे :** योग्य किंवा इष्ट क्रियाकर्म करणे. **पू.** ३१७; **उ.** ३७९.

**व्यतीपात :** अशुभ योग, त्यामुळे येणारे संकट टाळण्यासाठी दिलेली दक्षिणा. **पू.** २९८.

**व्यभिचरणे :** व्यभिचार करणे. परस्त्रीशी संभोग करणे. **उ.** ५०६.

**व्यभिचारिया :** बदलणारा, नाशवंत. **पू.** ३९५; **अ.** ८०.

**व्येभिचारू :** परपुरुषाशी संभोग. **पू.** २४८.

**व्यन्ही :** पर्यंत. **उ.** १७१; 'वेरी'–पाहा.

**व्यवधान :** अडथळा. **उ.** ३७३.

**व्यवस्तणे :** व्यवस्था करणे, मनाची समजूत घालणे. **पू.** १०६.

**व्यवहार सांगणे :** महाजनाजवळ जाऊन वादाचा निर्णय करून घेणे. **उ.** २७७.

**व्यापारणे :** काम करणे. **उ.** ८६; °**रति–उ.** १३३; **व्यापारविणे**–काम करण्याला लावणे. **उ.** ४८०.

**व्याप्तिसार :** कार्यमग्न, काम करण्यात कुशल. **उ.** २६२.

**व्यावृत्ति :** निराकरण, परावृत्त. **पू.** १०६, २३८.

**व्याहाळी :** विहार, क्रीडा. **उ.** १.

**व्याळी :** रात्रीचे जेवण. **पू.** १५८, ३२७, ३९८, ४१३; **उ.** १२९, २८८, ३१८, ४०२, ५९५; **अ.** ८५.

**व्युत्पत्तिव्युत्पन्न :** यथार्थज्ञानसंपन्न, शास्त्र-प्रवीण. **उ.** ५६६, ६२५.

**व्येथा :** दुःख. **उ.** ९१.

**व्ये(व्य)वस्ता:** व्यवस्था. **पू.** ६३; **उ.** ६४३.

**व्येसन :** व्यसन, छंद, आवड. **उ.** १३४, ५८५.

**व्रतणे :** वर्तणे, असणे, राहाणे. **व्रतति**–**पू.** ५१९; **व्रतते**–**पू.** ५६७.

**व्रतमान :** वर्तमान–**पू.** ४४७.

**व्रतवणे :** वर्तवणे, ज्योतिषावरून भविष्य सांगणे. **पू.** ५५२, व्रतिली, व्रतवीले–**पू.** ५५२.

**व्रीखभवाहान :** बैलावर बसलेला; शंकर. **पू.** ५३८.

**व्रीगुंठी :** वीरगुंठी, डोक्यावर गाठ घालून केस बांधणे. **पू.** ५८५.

**व्रीति :** वृत्ति, वतन, मानमान्यता. **उ.** ३३२, ४७०.

## श

**शक्तिनिक्षेप :** परमेश्वराकडून संबंधी पदार्थांच्या ठिकाणी ठेवली जाणारी आपल्या कृपाशक्तीची ठेव. **उ.** ५७६.

**शक्ती :** मायामुख्यकरून सर्व देवता. **उ.** १३३; **°द्वारक**—देवतांच्याकडून होणारा. **उ.** १३३, ५५५.

**शब्दवेधीया :** शब्दाला आकृष्ट करणारा, शब्दाकडे आकृष्ट होणारा, केवळ शब्द ऐकून तो शब्द जेथून निघाला ते लक्ष विंधणारा. **पू.** १०८; **सबदुवींधीया**–**उ.** १२६.

**शंबोलि :** 'सेंबोलि' पाहा. **उ.** ४४१.

**शाक्तेय :** देवताचक्रातील अष्टभैरवाच्या स्थानातील देवता. **पू.** १४५; **उ.** ४७२; **अ.** १२२; **शाक्तेय वेध**–या देवतांच्या ठिकाणी आकर्षण. **अ.** १५३.

**शांभव :** देवताचक्रातील माया व विश्व या देवता. **पू.** १४५; **उ.** ४७२; **अ.** १२२; **शांभव वेध**–या देवतांच्या ठिकाणी आकर्षण. **अ.** १५३.

**शिक्षापण :** रागावून सांगितलेली शिकवण. **उ.** ५०.

**शोखणे :** शुष्क होणे, वाळणे. **पू.** १२६.

**शोधणे :** रसायनाची पुटे देऊन शुद्ध करणे. **पू.** ५६६.

**श्रधाधान :** श्रद्धावान. **पू.** ३१४.

**श्रमनिवृत्ति :** थकवा–शीणभाग घालवणे. **पू.** ४६७; **उ.** २५०, ३२८.

**श्रांते :** श्रमाने, कष्टाने. **पू.** १६७.

**श्रापणे :** शाप देणे. **पू.** ५४३.

**श्रीखंड :** चंदन, चंदनाच्या लाकडाचा ओंडका. **पू.** ११५, १४५.

**श्रींघारणे :** सजवणे. **पू.** ७४.

**श्रृत :** ऐकलेले. **उ.** १३३; **श्रुत**–**पू.** ४५.

**श्रृतिकार :** गायकाच्या मागे राहून सूर धरणारा. **पू.** ४१८.

**श्लेष्मा :** सर्दी, पडसें, शेंबूड. **पू.** १५१; **उ.** ६०८; **स्ळेष्मा**–**पू.** २४०.

**श्वानकुंडली :** झोपताना कुत्र्याप्रमाणे पाय पोटाशी घेऊन केलेली शरीराची गाठोडी. **उ.** १३७, ६०२.

## स

**सएम :** संयम. **उ.** ५९९.

**संक :** शंख. **उ.** ११०, ४५६; **संकीया :** शंखीया, शंख वाजवण्याचे काम करणारा. **उ.** ४५६; **संकी**–**उ.** ४५६.

**संकणे :** दचकणे. **उ.** ३८४.

**सकंदी :** मुळासहित. **उ.** ३४४.

**सकरडी :** दुबळी (गाय). **पू.** ४८१. (पाहा **शिशु.** ८९६).

**सकल :** शकल, तुकडा. **पू.** १९१; **°ले**–(अब) **पू.** १९२.

**संकल्प :** व्रतविधीपूर्वी हातावर पाणी सोडून इष्टफलप्राप्तीचा हेतू उच्चारणे. **पू.** ४७०.

**सकार्य :** कामासहित, कामासाठी. **उ.** ११.

**सकाळी :** लौकर.

**संकीर्ण :** कृश, रोड. **पू.** २०.

**सकृत :** एकवेळ. **उ.** १७.

**संकेत :** चिन्ह, खूण, मार्ग. **पू.** १८६, १८७.

**सकेसी :** डोक्यावर पुष्कळ केस वाढलेला. **पू.** ४७९.

**संकोचणे :** लहान होणे. **पू.** ९५; °**चिली–पू.** ९५.

**सक्ति :** शक्ती, शस्त्रविशेष. **उ.** ५४६.

**संक्रमण :** वेदपठणाची एक विशिष्ट पद्धती. **पू.** २०९.

**संक्षा :** संख्या. **उ.** ५८६, ५९७.

**सगडी :** शेगडी, विस्तवाची मातीची चूल. **पू.** ४३९; **उ.** १६६.

**सगुण :** शकुन, शुभाशुभसूचक प्रसंग. **उ.** ४२७.

**सघन :** विशेष जाड. **उ.** ६८.

**संचरणे :** संचार करणे, आत प्रविष्ट करणे. **पू.** १०७; °**रेति–पू.** ११०.

**सडक :** पदराचे लोंबते धागे ; °**चवर**–पताका. **पाटाउ चवराचे सडक–उ.** २३३.

**सडक चवर :** बसावयाची सपाट–सवान जागा (चत्वर–चवर). **उ.** २३३.

**सडा :** नाथ, नाकातून ओवण्याचा दोरा. **उ.** १८२.

**सडी :** एकटी. **पू.** २०.

**सडी पड :** सड, सडून जा, झडून जा. **उ.** १५४.

**सण :** आनंदाचा क्षण, उत्सव. **पू.** १३८.

**सतपंथ :** शेकडो धर्ममार्ग, उत्तम मार्ग. **उ.** ४९१.

**सतसंभवी :** शंभर टक्के, बहुतकरून. **उ.** २४२, ३२४, ३४१, ४२४, ६२२.

**सतसारणे :** शुद्ध करणे. **पू.** ४७०.

**सता :** (१) सत्ता. **पू.** ३५४; (२) अपरोक्ष ज्ञान. **उ.** ३७३.

**सतेव :** स्वतःएव, स्वतःहून, आपणहून. **पू.** १८२, २०७, ५८९.

**संतोख :** संतोष. **पू.** २०५; **उ.** २४०.

**सत्यार्जव :** सत्य व प्रिय बोलणे. **उ.** २६३.

**सत्यावर्ती :** खरोखरीचे. **पू.** ३१.

**सत्र :** अन्नछत्र. **उ.** ५४८; **अ.** १; °**कार–अ.** १.

**सदन :** चांगले अन्न, भरपूर अन्न, सदन्न. **पू.** ४४०; **उ.** १३७, ५२८.

**सदर्थ :** श्रीमंत, संपन्न. **पू.** ३०; **उ.** ११, ६५, १४९, ५८८.

**सदापाणिबुडा :** नेहमी नेहमी स्नान करणारा. **उ.** ३९१.

**सं(सां)दी :** संधी, जोड, दोन भिंतीमधील जागा. **पू.** ५८५; **उ.** १७.

**संदीसवड :** कोपरा. **उ.** ३९.

**सदेस्तु :** सद्यस्त, ताजा, गरमागरम. **उ.** २४०.

**संदेह :** शंका. **पू.** ११९.

**सदैव :** भाग्यवान, सुदैवी. **उ.** १३.

**संध्यातुल्य :** संध्या करण्याच्या वेळी श्लोक-पठण जसे होते त्याप्रमाणे. **पू.** २०९.

**सनमान :** सन्मान. **पू.** ११६.

**सन्निधान :** परमेश्वरावताराची जवळीक व सेवा. **पू.** ११६; **उ.** ३३९, ३७३, ५५१, ५८४, ५८६, ५८७, ६०९, ६१२, ६२२, ६३७; **संनिधान–उ.** ४०४; **संन्यधान–उ.** ४९०.

**सन्यधान : पू.** ४७, ५०, २१७; **सन्येधान–पू.** २१७.

**संन्यास :** सर्वसंगपरित्याग. **उ.** ४१६.

**संन्यासधर्म :** संन्यासाश्रमातील कर्तव्यकर्मे. **पू.** ५५५.

**सप्तदस :** सतरा. °**कळा**–चंद्राची सतरावी कळा. **पू.** १९०.

**सपन :** स्वप्न. **पू.** १०९, २०९; **उ.** ३२४, ४५४.

**सपन :** छप्पन्न. **पू.** ४०२; **उ.** ४२४; °**पन्न–उ.** ४३०.

**सपरिग्रही :** परिवारासहित. **उ.** २३.

**संपादणे :** देणे, अर्पण करणे. **पू.** २२७; **उ.** १५१, २८१, ५११, ५८५.

**सपुजीत :** पूजा झालेल्या स्थितीत. **पू.** ३४८.

**संप्रधार :** विचारविनिमय, कथावार्ता. **उ.** २१.

**संप्रयोग :** जोड, प्राप्ती. **पू.** १०४.

**सबद :** शब्द. **पू.** ४६, ६१, १८८; **उ.** ७२, ७६, १५८; **सब्द–उ.** १५८.

**सबदुबींधीया :** 'शब्दवेधीया' पाहा. **उ.** २१६.

**संबंध :** संबंधी, नातेवाईक. **पू.** २१९; **उ.** ५८८.

**धी :** नातेवाईक. **उ.** ७५, ९७.

**धीये :** नातेवाईक. **पू.** ३८०.

**ळ :** सामग्री, शिधा. **पू.** ४०२, ४०४; **उ.** १५८, ४०६.

**ोज :** नवीन निर्मितीला कारण. **उ.** १५७.

**ोखणे :** समजूत घालणे. **पू.** २४३; **उ.** २०; **°खिले–पू.** ९६; **उ.** ३९, ४०६.

**ाउ :** (धनधान्य, भिक्षान्न इत्यादिकांची) प्राप्ती, संपत्ती, द्रव्य, वस्तू इ.; **संभव–उ.** १५६; **संभौ–पू.** १४५.

**ावाथिली :** संभव–धनधान्य, संपत्ती यांनी युक्त, श्रीमंत. **उ.** ४५९.

**ा :** वादाचा निर्णय लावण्यासाठी पंचांची बैठक. **पू.** ७२.

**ाखणे :** बोलणे, समाचार घेणे; **°खिले–पू.** १८४; **उ.** २३५.

**ावनसील :** संभावित, मान्य. **उ.** ३८६.

**ावनीक :** संभावित, सात्विक, मान्य. **पू.** ४११; **उ.** ३१०, ४००.

**ाय :** सभेचे मुख्य, पंच. **पू.** ७१.

**ामें :** आश्चर्यचकित होऊन. **पू.** ११४.

**ाएस्थान :** प्रसंगविशेषी जेथे लोक जमतात किंवा जेथे वाटसरू उतरतात अशी जागा. **उ.** २८१.

**ाणे :** शांत होणे. **उ.** ५९९.

**ाय :** कट, कारस्थान. **उ.** ५३७.

**ासान :** स्मशान. **पू.** १७, ८६; **उ.** ५२१, ५८९; **अ.** ७०, ७१.

**ासानपिंड :** प्रेत सरणावर ठेवण्यापूर्वी मृताच्या मुखावर ठेवला जाणारा पिंड-कणकेचा गोळा. **उ.** ३१३.

**ाळ :** मलिन. **उ.** ३५१.

**ाादी :** समाधी **पू.** ५५२.

**ा :** समयीं, वेळी. **उ.** ४७५, ६१५.

**ाो :** समय, वेळ **पू.** ५०, १८७; **उ.** ५६७.

**ानासन :** शयनासन, झोपण्याचे अंथरुण. **पू.** ४७; **सयेनासन–पू.** ८५, १८१.

**:** शर, बाण. **उ.** १२६; **अश्री.** २४.

**ाकाळ :** सकाळ, थोडा वेळ. **उ.** ४९५.

**सरकाळ :** तागाची दोरी. **पू.** २००.

**सरण :** शरण. **उ.** ७८, १९४, २७७, ३०१, ४६८.

**सरण :** चिता. **उ.** २७१, ५०२.

**सरणे :** चालणे, उणे न पडणे. **उ.** ६२, ५५२.

**सरणे :** मृत्यू पावणे **पू.** ५६, ३६३; **सरला–पू.** १०; **सरली–पू.** ६४; **सरलेयाचे–पू.** ३९१; **उ.** ११०, ५०२, ६२२.

**सरता :** चालणारा, मान्यता असलेला. **सरतें–उ.** ३१.

**सरभंजन :** बाण मोडणे. **उ.** १२६.

**सरवरू :** सरोवर. **पू.** २६१.

**सरवळी :** गव्हाच्या पिठाचा वळून तयार केलेला पदार्थ, गव्हले. **उ.** ११७, ३२७. **सरवळे**–गव्हाचा वळीव पदार्थ. **पू.** ३१४.

**सरळि :** सरळ उडी, दंडवत. **पू.** १०९.

**सराउ :** दांडपट्ट्याचा अभ्यास, तालीम, शिकवण. **पू.** २९९, ३१८; **उ.** २२; **सराव–पू.** २२५.

**सराउवाचें :** तालमीचे, तालीम केल्यामुळे पीळदार झालेले. **पू.** ३२५.

**सराए :** विपुलता, चंगळ. **पू.** ४१५.

**सराडा :** काठी, पुराणी, बांबूची लांब काठी **पू.** ३१८, ३२०; **°डेयाची–पू.** २००.

**सरि(री) :** समानता, बरोबरी. **पू.** ६१, १८२; **उ.** १६९, ६०२.

**सरिसा :** नीट, सरळ, चांगला. **पू.** १९१; **उ.** ३३.

**सरिसो :** सवान, सपाट. उ. ४९४.

**सरी :** स्त्रियांच्या गळ्यातील चांदीचा किंवा सोन्याचा दागिना. **उ.** ३६२.

**सरीया :** जवळ, बाजूने. **उ.** ९६.

**सरीया :** (अव.). सरी, धारा, तंतू. **पू.** १६, ४६३.

**सरीये न सरीये :** उणेपुरे म्हणून, उण्याअधिका-साठी. **उ.** १२८.

**सरीसा :** बरोबर. उ. १६३, ५२१.

**सरूदाम :** अर्धा दाम. **उ.** १२९.

**सरें :** हातसर, हातात घालायचा सोन्याचा गोफ. **उ.** ३३०.

**सरे :** संत्रे (?), एक फळ. **पू.** २६.

**सर्वस :** सर्वस्व. **पू.** ९४.

**संलग्न :** जीवाला मुक्ती मिळेपर्यंत त्याला कायमचा चिकटून असलेला मायेच्या हरित स्वरूपातून विभागलेला मायेचा अंश. **उ.** ६३५.

**सलदु :** पेटारा, पेटी. **पू.** १२६.

**सलोल :** भावुक, भावनाशील. **पू.** ४१८.

**सवंग :** स्वस्त, कमी किंमतीचा. **पू.** ३१, १४४; **उ.** १२८.

**सवड :** पोकळ भाग. **पू.** ५८९.

**सवरण :** सवरणे, आवराआवर. **पू.** २४६.

**सवंसाळणे :** सांभाळणे. पू. ३३२.

**सवळ :** सकाळ, मोठ्या पहाटेची वेळ. **पू.** १२०, २४३; **उ.** ७४; **सवळे–पू.** ६५; **°ळेंसीचि–पू.** ६५, ९५, १०६, २०४; **सवेळ–उ.** २५८.

**सवा :** सव्वा, एक अधिक एकचतुर्थांश. **पू.** १८५.

**सवान :** समान, सपाट. **पू.** ७०.

**सवाया :** सहज. **पू.** ६०.

**सवावो :** (१) सहज. **उ.** २२०; (२) साह्य, मदत. **अश्री.** ९

**सवि (वी) :** शिवी, गाळी. **उ.** २२, २४२, २८८; **सवीया**–(अव.). **पू.** ५०२, ५८०; **उ.** ३१, ९१, २४२, ५५१.

**सवीयें :** सव्य, उजवी. **पू.** ५३२.

**सवे (वै) :** सवय. **पू.** ७४, ३२६; **उ.** ५३, ३२६, ४७०, ५२७, ५८५; **सवै–पू.** ७४.

**सवेंचि :** तावडतोब : **उ.** २८१.

**संसकार :** अंत्यक्रिया. **पू.** २१९.

**संस्कारणे :** अंत्यक्रिया करणे. **उ.** ५०२.

**संसरण :** 'सूत्रपाठा'तील सृष्टिनिर्मितीचे प्रवचन करणारे एक प्रकरण. **उ.** १४१.

**संसारशत्रुभेण :** संसाररूपी शत्रूच्या भीतीने. **उ.** २०७.

**ससीक :** शशक, ससा. **पू.** ४२.

**समुरा :** सासरा. **उ.** ४२७.

**सहजी :** सहजावस्था प्राप्त झालेला, उन्मनस्क. **उ.** ५४३.

**सहंसकृत :** संस्कृत भाषा. **उ.** १३३.

**सहसा :** एकदम, एकाच वेळी. **उ.** १३३.

**सहस्रसंक्षा :** हजार संख्येचे. **पू.** ११९.

**सहस्रसीर्सा पुरुखाः :** 'सहस्रशीर्षः पुरुषः'– हा वैदिक मंत्र. **पू.** ११७.

**सा :** सहा. **उ.** ६००, ६११.

**साइली :** सावली, छाया. **पू.** २१९.

**साइली :** मैत्रीण. **साइलीया**–(अव.). **पू.** २०४.

**साउमा :** समोर, सन्मुख. **पू.** ६१, ९६, १०८; **साउमी**–पू. ६८; **साउमे–पू.** ३९, ७४, १०४; **उ.** २, ३६, १६६, १६९; **साउमेयां–पू.** ४६, ९४; **उ.** २, ६५, ५८०.

**साउला :** रेशमी वस्त्र, साडी, शेला. **पू.** १९०; उ. ८०, १४३; **साउलें–पू.** ४६; **उ.** ९, ४४, २५१.

**सांकड :** अरुंद, आकुंचित, लहान. **पू.** १०९, ४९६. (पाहा. **ज्ञाने.** १४.१६४).

**साकवति :** शाक, भाजी. **पू.** ३५७, ४३७; **उ.** ७८, २७८, ४६६, ५४८.

**साकोपसाका :** शाखोपशाखा, फांद्या व त्यांना फुटलेल्या फांद्या. **उ.** १३३.

**साक्ष :** साक्षीदार, प्रत्यक्ष पाहणारा. **पू.** २०३.

**सांखळी :** एक सुवर्णालंकार. **पू.** ३२; **°ळे– पू.** २२३.

**सागळ :** पाण्याची कापडी पिशवी; पाण्याचे भांडे. **पू.** २६, ९१, १०७, १७७, २६१; **उ.** १, ७७, २५६, ४१५, ४६४, ५०२, ५०७, ५७५; **सागळे**–(सप्तमी)–**पू.** ८४; **सागळेंचेनि–पू.** २०१.

**सागळीया :** पाण्याचा तांब्या (सागळ) हाती धरणारा, पाणक्या. **पू.** २०, ७४.

**सांगात :** बरोबर असलेले लोक. **पू.** २७, १९१, २१९; **सांघात–पू.** २४६; **उ.** १, २, ४६, १५८.

**सांगातु धर्मु :** आपल्याबरोबर असलेल्या व्यक्तीबरोबर पाळावयाचा आचार. **पू.** १९१.

**सांघणे :** सांगणे, निवेदन करणे; **सांघिजैल**– सांगितले जाईल. **उ.** ६१२; **सांघौनि**– (प्रपु.अव.) सांगू. **पू.** २५७, २५८.

**सांघा(गा)ती :** बरोबर असलेला, मित्र. **पू.** ५७.

**सांघातें :** संगे, बरोबर. **पू.** ३६.

**साच :** सत्य, खरे. **पू.** २९, ७४, ७८, १९६; **उ.** १२१, ४७५, ५०२, ६४४.

**सांचणे :** साचविणे, साठा करणे. **सांचा**–(आज्ञार्थ) साठवा. **पू.** १८१.

**साचोकार :** खराखुरा. **पू.** ५८४; **°कारी**–**पू.** ९५.

**साजणे :** शोभणे. **उ.** १५३.

**साजात्य :** साम्य, समान गुणधर्म, समानधर्मी. **उ.** १७३, २०३, ४४६, ४४८, ६३५; **अ.** ११९.

**साजावींझा :** डोंगरदऱ्या. **उ.** ४३६.

**साजें :** लहान देउळी. **पू.** ४३; **उ.** ३०६, ३३६; **°जीया–उ.** ३६३.

**साटोप :** यथायुक्त, रेखीव. **उ.** ४००(टी); **अ.** ४१.

**सांडणे :** टाकणे, दूर फेकणे. **सांडा–पू.** १११.

**सांडवणे :** सोडायला लावणे. **पू.** ३४५.

**सा(सां)डाक्रम :** योगमार्गातील षट्‌चक्र-भेदनाचा मार्ग. **पू.** २०७, २२४.

**साडे :** लग्नाच्या शेवटी वधूवरांना वस्त्रालंकार अर्पण करण्याचा विधी. **पू.** ३२, ६८.

**सांडोवा :** नदीत किंवा ओढ्यात बांधलेली दगडी पायवाट. **पू.** ५१४; **उ.** १८.

**सांत :** बाजार, हाट. **पू.** ३८७; **उ.** ४०५.

**सातरा :** तढव, सतरंजी, अंथरूण. **पू.** ४६६; **उ.** २४९, २५१; **सातरी–उ.** ६३८.

**सातसी :** नागवेल, नागवेलीसारखी सडपातळ व सुंदर स्त्री (पाहा. शिशु. ३१३); **सातसीया**–(अव.). **उ.** २०२.

**सांति :** शांती. **पू.** ७०; **पू.** ३४४.

**सांतीक :** शांतिक, देवतेला शांत करण्यासाठी धार्मिक विधी. **पू.** ७०.

**सात्रा :** सातरा, पत्रावळी. **उ.** ५६७.

**सात्विक :** स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, वेपथु, वैवर्ण्य आणि अश्रुप्रलय हे आठ सात्विक (सत्वगुणोत्पन्न) भाव. १०७.

**साद :** शब्द, आवाज. **उ.** १४.

**सांदणे :** जोडणे, सांधणे. **पू.** ४४७; **उ.** ३६५; **°धणे–उ.** ४००.

**सांदी :** संधी, दोन घरांच्या आवारांच्या भिंतीमधील जागा. **पू.** १६६, १८५.

**साद्रीस्य :** सादृश्य, सारखेपणा. **उ.** ४७८.

**साधन :** जेवणातील मुख्य पदार्थाबरोबर रुचिपालटासाठी असलेले मीठ, मिरची, ताक, वगैरे अन्य पदार्थ. **पू.** १५७; **उ.** ७८, ५४८.

**साधनचतुष्टय :** रूक्षान्न जेवताना चवीसाठी म्हणून घ्यावयाच्या भाजी, मिरची, ताक, व मीठ या चार वस्तू. **उ.** ७८.

**साधर्मी :** समान धर्माचे. **उ.** ३७५.

**साधारणे :** स्वतःला आवरणे. **उ.** ३६६.

**सानें :** (१) लहान. **पू.** २०६; (२) हलके, थोडे. **उ.** १४४, २३८, ४७८.

**सन्निपातणें :** कफ, वात, पित्त या त्रिदोषांनी त्रस्त होणे. **उ.** ४७०.

**सापण :** वाटून तयार केलेले मिश्रण. **पू.** ५८२.

**सापन :** श्वास. **पू.** ५३९.

**सांपें :** अलीकडे, सांप्रत. **पू.** ६५, १८१, ३०१; **उ.** ९२, १९९, २६७, ३३०, ४०६.

**सांबारीव :** चिरून तयार केलेला पदार्थ. **उ.** १८०.

**सांबारू :** कोथिंबीर. **उ.** २४४.

**सांबा(भा)ळणे :** (१) सांभाळणे. **पू.** ६२; (२) रक्षण करणे, समाचार घेणे. **पू.** १७६.

**सांभव :** शांभव विद्या 'शांभव'–पाहा. **पू.** २६३.

**सामक :** लाड कुळातील एक शाखा, सामवेदाचे गायन करणारा. **पू.** ३२.

**सामग्री :** द्रव्यादि साधनसमृद्धी. **उ.** ५६६; **सामुग्री–उ.** ५९१.

**सामधि :** सामग्री. **पू.** ३२९.

**सामविजे :** सामावून घ्यावे, पोटात घालावे. **पू.** १०६.

**सामान :** (१) समान, बरोबरीचा. **उ.** ५९५; (२) बाजार. **पू.** ९२, ९७.

**सामान स्त्री :** बाजारातील विक्रेय स्त्री, पण्यांगना, वेश्या. **पू.** ९२; °**अस्त्री–पू.** ९७, २०२.

**सामान्य स्त्री :** वेश्या, बाजारातील विक्रेय स्त्री. **उ.** ५९, १६९, १७३, ३७५, ३७६, ६२२; **अ.** ३१, १५१.

**सामीप्य :** ब्रह्मस्वरूपाची जवळीक. **अ.** १५१; °**प्यता**–अ. २३.

**सामूथ्य :** सामर्थ्य. **पू.** ३६, १०५, ११७, १९८; **उ.** १०, ४६५; °**थ्याचे–पू.** ८२.

**सामोरे जाणे :** स्वागतार्थ पुढे जाणे. **उ.** १६९.

**साया :** साईबाई, एक विशेष नाम. **उ.** ४९७.

**साया :** छाया, प्रतिबिंब. **पू.** ३१४; °**पुरूख**– छायापुरुष. **पू.** १८६.

**सायुज्य :** ब्रह्मस्वरूपाशी एकरूपता. **अ.** १५१; °**ज्यता**–अ. २३.

**सारंगधर :** सारंग धनुष्य धारण करणारा, विष्णू. **पू.** ७, ८.

**सारवणे :** (पाणी) सारायला (टाकायला) लावणे. °**वीलें–पू.** २४५.

**सारस्वत काळ :** सूर्योदयापूर्वीची वेळ. **उ.** ६०.

**सारिजैल :** दूर केला जाईल. **पू.** १७२.

**सारी :** सारीपाट. **पू.** १०, ३२, २९८; **उ.** ३४९, ४००.

**सारीखवाटनी :** साम्य. **पू.** ४५४; **अ.** १२५.

**सारीपाट :** फासे टाकून सोंगट्या (सारी) खेळण्याचा पट. **उ.** १४६, ३४९, ४००.

**सारूनि :** (प्रपु.अव.). सारू, लावू. **पू.** ७६.

**सारूप्य :** ब्रह्मस्वरूपाशी सादृश्य. **अ.** १५१; °**प्यता**–अ. २३.

**साली :** साल, त्वचा. उ. ६०९.

**सालोक्य :** ब्रह्मस्थानात असणे, स्थानप्राप्ती. **अ.** १५१; °**क्यता–अ.** २३.

**सांवगणे :** सोंगणे, कापणी करणे. °**गतु–पू.** ३११.

**सावंगणे :** सवंगणे, कापणी करणे. **पू.** २५४.

**सावद :** सावध. **पू.** १११.

**सांवीया :** सहज, स्वाभाविकपणे. **पू.** २०; **उ.** ६०९; °**वेयां–उ.** १४३.

**सावेव :** सावयव, अवयवासहित. **उ.** १३३.

**सासन :** वतनाचे दान निर्दिष्ट करणारे आज्ञा-पत्र. ११६.

**सासीनणे :** बहरणे, फुलून येणे. °**नलीया– पू.** १९८.

**सासुरेवास :** सासुरवास. **उ.** ४६०, ४६७, ५१२.

**सासोल :** स्तुतिपाठक, मोतद्दार, घोड्यापुढे धावणारा सेवक; **सासोलां** (तृ.)–**पू.** ६१. (पाहा. शिशु–५११.)

**साहाण (न) :** (१) धार लावण्याचा दगड, ज्यावर घासून धार लावतात तो दगड. **उ.** ३९; (२) चंदन उगाळण्याचा दगड. **पू.** ४४६.

**साहाणी :** सैन्यातील वीर, सेनापती. **पू.** ५५.

**साहात्मक :** सुसह्य, सहन करता येण्यासारखे. **उ.** ८.

**साहावास :** सहवास, शेजाऱ्यांची साथ. **उ.** ४९५.

**साहीय :** साह्य, मदत. **पू.** ४००.

**साळग्राम :** शिळा. उ. ३६.

**साळा :** शाळा, विद्यालय. **पू.** १२८, १६४.

**साळि :** तांदूळ. **पू.** २५४; °**वन**–भाताचे शेत. **पू.** ५४.

**साळी :** कोष्टी, विणकर. **पू.** ३८७.

**साळै :** चिमणी. **पू.** १२३.

**साळोंकी :** साळुंकी पक्षीण, मैना. **पू.** २८१.

**सिंदी :** शिंदीची झाडे असलेला. **उ.** २५८.

**सिवणे :** हात लावणे, स्पर्श करणे **पू.** १५७, २४२, २६७; **उ.** ३७३.

**सी :** भाजी. **उ.** ७८; **सीया**–(तृ.). **उ.** ६२८.

**सी :** हीव, थंडी. **उ.** १८७, २५१.

**सीआळे :** थंडी, थंडीचे. **पू.** ८६; **उ.** १६, ६८; **सीयाळे**–पू. १५२, १५३, ५८५.

**सीकार :** श्रुतिकार, गायकाच्या मागे राहून सूर भरणारे गायक. **पू.** १३२.

**सीक्ष :** शिष्य. **पू.** २५, ३६, ७२, १८४, १९८, ३६१; **उ.** ९३, १९४, ४६४, ४९८, ५११; **सीक्षे**–(अव.). १४३.

**सीक्षा :** उपदेश : **पू.** ३६, २०२, २२४.

**सीक्षा करणे :** जोगी करतात त्याप्रमाणे भोजनापूर्वी धर्मविधी आचरणे. **पू.** ५८४; अ. १ (टी).

**सीक्षापण :** शिकवणे, शिक्षा देणे, रागावून उपदेश करणे. **पू.** २०६, ४३३, ५८५; **उ.** ११, १५६ ; °**पणे**–(क्रि) **उ.** २२ ; °**पीति–उ.** ३८२.

**सीक्षांसि :** शिष्याला. **पू.** ६५.

**सीक्षासुत्र :** शिखा (शेंडी) आणि जानवे. **पू.** १८२.

**सीक्षीणी :** शिष्या. **उ.** १९४, ३०८, ४६८.

**सीखासूत्र :** शेंडी व जानवे. **उ.** १९०, २४५. **सीका°– उ.** ११३.

**सींग :** शिंगरू. **उ.** ४९६.

**सींगणी नाद :** शृंग = शिंगाचा आवाज. **पू.** ५८४.

**सींजुटी :** सींमुटी, छडी. **उ.** १४८.

**सीडी :** देशाच्या शेवटी पण राजमार्गावर नसलेले स्थान. 'लज्जाहरणा वस्त्र नाही; क्षुधाहरणा अन्न नाही; तया गावाते सीडी म्हणिजे'. (स्मृस्थ. ५१) **उ.** ५८५.

**सीत :** शीत, थंडी, हीव. **पू.** ७०, ८६, १५२, १५३; **उ.** ५९, ९२.

**सीतज्वर :** हिवताप. **पू.** २९१.

**सीतणे :** हाणणे, मारणे, स्पर्श करणे; **सीतोला–पू.** १०.

**सीतपथ्य :** औषधोपचार. **पू.** ११०.

**सींतोडणे :** पाण्याचे शिंतोडे उडून ओले होणे. **पू.** २४२.

**सी (दो) दौरि :** शिदोरी, प्रवासासाठी जेवणाचे खाद्यपदार्थ. **पू.** २९, ११७. ४५९, ५०७; **उ.** १२८.

**सीध :** सिद्ध, योगी. **पू.** ६९, १८६, २६०.

**सीधणे :** मरणे. **उ.** १७४.

**सीधणे :** सिद्ध होणे, प्राप्त होणे; **सीधैल–पू.** ५८४.

**सीधसंकेत :** सिद्धांचा-आगमिकांचा संकेत = उपासनामार्ग. **पू.** १८७.

**सीधसाधक :** ज्याला सिद्धी प्राप्त झाली तो सिद्ध व सिद्धीची साधना करणारा तो साधक. **पू.** ६१, ७४.

**सीधिनी :** सिद्ध स्त्रिया, सिद्धमार्गाच्या अनुयायी स्त्रिया. **उ.** १९५.

**सीधी :** (१) सिद्धी, पूर्णता. **उ.** ६८; (२) सिद्ध, पूर्ण. **पू.** ४६, ४८, २००, २०२.

**सीधू :** सिद्ध, मिद्धी प्राप्त झालेला योगी. **पू.** ६९.

**सीनभाग :** थकवा. **उ.** ३४०.

**सीनलीये :** शिणले. **उ.** ३८३.

**सीनसीन :** जळत्या चितेचा 'सीनसीन' असा आवाज. **उ.** ५२१.

**सीसनी :** चितेचा 'सीनसीन' असा आवाज. उ. ५२१.

**सींपा :** शिंपी, कपडे शिवणारा. **उ.** ३२; **सींपेंनि**–उ. १५४.

**सीमगा :** शिमगा, होळीचा सण. **उ.** २३; **सीमुगा–उ.** ४४.

**सीमुरी :** शेंबडी पोर. **पू.** २०१; **सीमुरें–उ.** १७३.

**सीर :** जमिनीतील प्रवाहाची रेषा – मार्ग. **पू.** ४१.

**सीर :** शीर्ष, डोके, टोक. **पू.** ४३८; **सीरां–** डोक्याकडे, आरंभी. **पू.** ६८.

**सीरकणे :** सरकून पडणे. °**कला–पू.** १०.

**सीरसाळा :** पाषाणाचा एक प्रकार. **उ.** ३३५.

**सीरोवेरी :** शिरून, घुसून. **पू.** ५३४; °**वीरी– पू.** ५३४.

**सील्यवीद्या :** देवताचक्रातील स्वर्ग, अंतराळ, अष्टौदेवयोनी व कर्मभूमी या थोव्यातील देवतांच्या विद्या. 'आणव' विद्या. **उ.** २८३.

**सीवं :** शीव, सीमा, टोक. **पू.** ३८७, ५८५; °**वऱ्ही**–शिवेपर्यंत. **पू.** २९. °**वरी.–पू.** ८५.

**सीवणे**–शिवणे, स्पर्श करणे, हात लावणे. **पू.** १५७, २४२, २६७.

**सीवर्नाचिचन :** चिमण्या चिवचिवायला लागण्याची वेळ, सकाळ. **अ.** ६, १११.

**सीवनावळी :** शिवण्याबद्दल मजुरी. **उ.** १५४.

**सीवाइलें :** शिवालये, शंकराची देवळे; **उ.** ४३६, ४९३.

**सीवालंघन :** व्रतभंग, आचारधर्माच्या मर्यादेचे उल्लंघन. **पू.** ४९७.

